॥ श्री ॥

# कथा-कल्पतरु.

( सरळ गोष्टीच्या रूपानें सुलभ मराठी भाषांतर )

## पूर्वार्ध.

( स्तबक १-७. संपूर्ण. )

प्रकाशक,

दामोदर सांवळाराम आणि मंडळी,

मुंबई, "इंदुप्रकाश" स्टीम प्रेसमध्यें छापिला.

सन १९१०

किंमत ५ रुपये.



## प्रस्तावना.

प्रिय वाचक वृंदहो ! आपणां हिंदूंचें प्राचीन वाङ्मय फार मोठें आहे; परंतु तें सर्व संस्कृत भाषेंत असल्यामुळें त्याचा लाभ निवळ मराठी वाचकांस होऊं शकत नाहीं; अशी परिस्थिति असल्यामुळें लक्षावधि देशबांधव आपल्या प्राचीन इतिहासासंबंधानें अज्ञानावस्थेंत राहिल्यासारखे झाले आहेत. ही मराठी वाचकांची अडचण दूर व्हावी आणि त्यांस चारी वेद, अठरा पुराणें, सहा शास्त्रें, तसेंच भारत, भागवत, रामायण, यांच्यांतील कथांचें सार थोडक्यांत पहावयास मिळावें ह्मणून, महाराष्ट्रांतील प्रसिद्ध कवि '**श्रीकृष्ण**' आणि '**मधुकर**' यांनीं '**कथाकल्पतरु**' या नांवाचा प्राकृत ओंवीबद्ध ग्रंथ तयार करून सर्व मराठी वाचकांवर एक प्रकारचे उपकार केले. हा ग्रंथ कथांचा केवळ कल्पतरु असल्यामुळें ' कथाकल्पतरु ' हें त्याचें नांव अन्वर्थक आहे परंतु हा ग्रंथ फार मोठा असून त्याची किंमतही त्याप्रमाणानें तशीच जरब ह्मणजे वीस रुपये असल्यानें मध्यम स्थितींतील गृहस्थाश्रमी लोकांस ह्या उपयुक्त ग्रंथाचा संग्रह करणें अशक्य झालें आहे. ही अडचण अंशतः दूर करावी, आणि साधारण मराठी वाचकांसही प्राकृत ग्रंथांतील " वाधावणें, बोभाईले, वोहट " इत्यादि शब्दांचा अर्थ समजणें अशक्य असल्यामुळें, प्राकृत ग्रंथांचेंही रहस्य कळणें अशक्य झालें आहे. ती अडचण दूर व्हावी ह्मणून आह्मीं सुलभ मराठी भाषेंत गोष्टीच्या रूपानें हा ग्रंथ तयार करविला आहे, आणि तो संपूर्ण ग्रंथ फक्त पांच रुपयांत देण्याची योजना केली आहे. शिवाय हल्लींच्या परिस्थितीकडे लक्ष दिलें असतां पांच रुपयांसारखी रक्कमही एकदम देण्यास पुष्कळ लोकांस जड पडण्याचा संभव असल्यामुळें ह्या प्रचंड ग्रंथाचे सात भाग करून प्रत्येक भागांत दोन दोन स्तबक घेण्याची व्यवस्था केली आहे, व प्रथम दोन रुपये वर्गणी भरून पहिला भाग घेणारास पुढील सहाही भाग आठ आणे दरानें देण्याची योजना केली आहे. हल्लीं हा पहिला भाग तयार झाला आहे, व पुढील भाग दरमहा एक प्रमाणें सहा महिन्यांत सर्व ग्रंथ प्रसिद्ध करण्याची व्यवस्था केली आहे. सारांश मराठी वाचकांस सुलभ रीतीनें ह्या सर्वमान्य कथाकल्पतरूचा संग्रह करितां येईल, अशाच प्रकारची केलेली ही व्यवस्था सर्वांस पसंत पडेल अशी आह्मांस उमेद आहे.

हें भाषांतर मूळ ग्रंथास धरून होतां होईल तितकें सुलभ करण्याचा प्रयत्न केला आहे, व मूळ ग्रंथांतील पाल्हाळिक वर्णनें कंटाळवाणीं वाटूं नयेत म्हणून तीं थोडक्यांत घेतलीं आहेत. सारांश वाचकांच्या मनाचें रंजन होऊन त्यांस आपल्या प्राचीन वाङ्मयाचा लाभ सुलभ रीतीनें घेतां यावा, अशा दृष्टीनें भाषांतराची रचना केली आहे. या ग्रंथांतील कित्येक कथा, साधारण वाचकांस चमत्कारिक, अपूर्व व अविश्वसनीय अशा वाटण्याचा संभव आहे; परंतु मार्मिक व दूरदृष्टि वाचकांस त्यांतील इत्यर्थ समजण्यास अडचण पडणार नाहीं. आम्हीं या ग्रंथांत स्वतःचें मत वगैरे कांहीं दिलेलें नाहीं, तथापि सर्व ग्रंथाचे शेवटीं उपसंहारादाखल या ग्रंथांतील कथांचा साधकबाधक विचार दाखल करण्याचा आमचा हेतु आहे, व त्यावरून एकंदर कथा वाचतांना लोकांच्या मनांत उत्पन्न होणारे कल्पनातरंग शेवटीं लय पावतील अशी आम्हांस आशा आहे.

या पहिल्या भागांत कांहीं कांहीं ठिकाणीं व्याकरणाच्या नियमाचे थोडेबहुत दोष राहिले आहेत. उदाहरणार्थ 'स्तबक' हा शब्द पुल्लिंगी असून तो पुष्कळ ठिकाणीं नपुंसकलिंगी वापरला आहे. व्याकरणाच्या नियमासंबंधानें बराच मोठा वाद आहे, आणि अनुस्वार व ऱ्हस्व दीर्घ, यासंबंधानें तर वेगवेगळ्या रूढी पहाण्यांत येतात. सारांश या सर्व गोष्टी वादाच्या आहेत व त्यांचा निर्णय करण्याचें हें स्थळ नव्हे. म्हणून त्यासंबंधानें येथें विशेष पाल्हाळ न करितां इतकेंच कळविणें जरूर आहे कीं, हल्लीं चालू असलेला प्रचार व रूढी यांस धरून या ग्रंथाची भाषा होतां होईल तितकी साधी व सोपी ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. आमचे प्रिय वाचक ही सर्व परिस्थिति लक्षांत घेऊन हंसक्षीर न्यायानें याचा लाभ घेतील अशी आम्हांस आशा आहे.

सदर ग्रंथाचें भाषांतर, हें काम बरेंच मोठें व महत्वाचें आहे. तेव्हां या पहिल्या भागावरून आमच्या वाचकांपैकीं कोणास, यांत कांहीं सुधारणा करणें अवश्य आहे असें वाटल्यास, व त्यांनीं त्याबद्दल आम्हांस लिहून कळविल्यास पुढील भागांत त्यासंबंधानें अवश्य विचार करूं.

आपले सर्वमान्य असे जे-वेद, उपनिषदें, ब्रह्मसूत्रें, इत्यादि-ग्रंथ, त्यांचाही लाभ मराठी वाचकांस सुलभ रीतीनें करून देण्याचा आमचा मानस आहे, व त्यासंबंधानें हल्लीं प्रयत्न चालू आहे. इच्छेप्रमाणें सर्व तयारी होतांच, वाचकांपुढें त्याचा नमुनाही सादर करण्यांत येईल. ही आमची इच्छा परमेश्वर लवकरच सफल करील अशी आम्ही आशा बाळगितों.

प्रकाशक.

# अनुक्रमणिका.

## स्तबक १ ला.

# अनुक्रमणिका.



## स्तबक ४ था.

# अनुक्रमणिका.

## स्तबक पांचवा.



## स्तबक सहावा.

## स्तबक सातवा.

असो; आतां मी माझ्या ग्रंथाचे वाचक व श्रोते यांची थोडी विनंति करितों. माझ्या ग्रंथाकडे प्रेमदृष्टीनें पाहणारे वाचक व श्रोते हे श्रीहरीचे भक्त असणार हें उघडच आहे. वाचकहो, आपण ज्ञानवंत व सुशील असून आपल्या हृदयांत समता आहे हें मी जाणून आहे; कारण श्रीहरीचे दास आपल्या हृदयांत कधींहि किल्मीष बाळगित नाहींत. त्यांचीं हृदयें आरशा प्रमाणें स्वच्छ असतात. आपणहि अशाच निर्मळ अंतःकरणानें या माझ्या ग्रंथाचें परिशीलन कराल असा मला भरंवसा आहे. निर्मळ पाणी जसें कोणत्याहि रंगाचें होतें, त्या प्रमाणें आपणहि आपलें निर्मळ अंतःकरण भक्तिरसानें रंगवून या माझ्या ग्रंथाकडे पहावें अशी माझी तुह्माला विनंति आहे. आतां सर्व वाचक एकाच प्रकृतीचे असणें हें कधींही शक्य नाहीं. अनेकांच्या अनेक प्रकृति असणारच, त्यांत कित्येक हरिकथेची टवाळी करणारे असतील. त्यांच्या दृष्टीनें या ग्रंथांत त्यांनां अनेक दोष दिसतील व त्यांच्या आदारास हा ग्रंथ पात्र व्हावयाचा नाहीं; परंतु अशा सत्पुरुषांनां मला एवढेंच सुचवावयाचें आहे कीं, ही वृत्ति लहान कीटकांतील क्षुद्र कीटकांप्रमाणें आहे. फुलपांखरें फुलांवर बसून त्यांतील गोड मध खातात व सुवासानें मत्त होऊन गुंजारव करितात, आणि कित्येक कीटक इतर प्राण्यांनां दंश करितात व घाणीवर बसून मौज मारितात, तर या पैकीं तुह्मांला जी वृत्ति पसंत असेल त्या वृत्तीचा अवलंब तुह्मीं करून या ग्रंथाचें मनन करावें. यावरून माझ्या दोषाकडे लक्ष देणाराचा मी द्वेश करितों असें कोणीही समजूं नये. उलट मी अशा वाच-कांचा अत्यंत ऋणि आहे. कारण कृष्णवर्णाची मृत्तिका भांड्यावर कितीही घासली तरी भांडें न मळतां अधिक स्वच्छ मात्र होतें, त्याप्रमाणें हा ग्रंथही निर्दोष होऊन अधिक उज्वल होईल. ह्मणून ग्रंथाकडे दोष दृष्टीनें पहाणारां-चाही मी उपकारी असून त्यांनांही प्रेमानें वंदन करितों.

भगवंताच्या लीला श्रवणाची उत्सुकता साधारणतः सर्वांनां सारखी आहे, ही उत्सुकता पूर्ण करून घेण्याची साधनें संस्कृत भाषेंत आहेत; परंतु संस्कृतभाषा फार थोडे लोक जाणत असल्यामुळें बहुजनसमाज संस्कृत कथाभांडारास वंचित झाला आहे. ही अडचण दूर करावी ह्मणून मी (कृष्णकवि) हा ग्रंथ लिहित आहे. याग्रंथांत मी वेद, श्रुति, स्मृति, व उपनिषदें यांतील सार प्राकृत जनां-साठीं प्राकृतांत वर्णन करीत आहे. प्रति ईश्वर, असे जे व्यास, व्याल्मिक व शुक; यांनीं महाराभारत, रामायण, श्रीमद्भागवत व अठरा पुराणें असे वेदतुल्य ग्रंथ संस्कृतांत करून ठेविले आहेत. त्या ग्रंथांतील सर्व कथा मी प्राकृतांत वर्णन करण्याचा प्रयत्न करीत आहे. प्राकृत हरिभक्तांची स्थिति, तहानेनें व्याकूळ असलेल्या गृहस्थास पाण्याची खोल विहिर दिसावी, पण पाणी वर काढण्यास जवळ पात्र व दोर असूंनये त्याप्रमाणें झाली आहे. अशा प्राकृतजनांसाठीं मी पात्र

व दोर होऊन तो खोल असलेला संस्कृत ज्ञानसागर उपसून वर आणित आहे. तेव्हां यांत मी कांहीं मोठेंसें करित आहे असें नाहीं, आतां हें उघडच आहे कीं, हा ज्ञानसिंधु फार विशाल आहे, तो संपूर्ण उपसण्याचा मी शक्य तितका प्रयत्न करीन, पण उपसित असतांनां जर कांहीं चुकून राहिलें तर सहृदय वाचक वृंदहो मला तुह्मीं क्षमा करा. तसेंच या प्रयत्नांत विसंगतपणाही होण्याचा संभव आहे; ह्मणून त्याबद्दलही आपली क्षमा इच्छितों. कित्येकांच्या दृष्टीनें संस्कृत भाषा ही देववाणी असून त्या कथा प्राकृतांत उधृत करणें हें त्यांनां अनुचित वाटतें; परंतु मला तसें वाटत नसून अज्ञजनांस तो हरिकथेचा लाभ मिळून देणें हेंच अनुचित होय असें वाटतें, व ह्मणून मी हा प्रयत्न करीत आहे. जे संस्कृत भाषेचे ह्मणजे देववाणीचे अभिमानी असतील त्यानां माझी अशी विनंति आहे कीं, हा ग्रंथ हरिकथेचा आहे या एका दृष्टीनें तरी त्यांनीं माझ्या ग्रंथावर प्रेम करावें. हा ग्रंथ मी कीर्तिसाटीं अथवा धनोत्पार्जनासाटीं लिहित नसून तो केवळ हरिसेवा घडावी व प्राकृत जनांवर थोडे उपकार करावेत या उद्देशानें लिहित आहे. ज्या ग्रंथांत हरिकथा वर्णन केल्या आहेत, तो ग्रंथ कसाहि असला तरि वाचक व श्रोते यांना पुण्यप्रद व मंगलकारक असाच असणार, तेव्हां सर्वांनीं या ग्रंथाचें पठण भक्तिभावानें करावें ह्मणजे परमेश्वर सर्वांचें मंगल करील.

परमेश्वराचें कथामृत प्राशन करण्यास मिळावें ह्मणून साधुसत्पुरुष सारखा प्रयत्न करीत असतात; व असा प्रयत्न आजवर अनेकांनीं केल्याबद्दल इतिहासहि साक्ष देत आहे. स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तिन्हीं ठिकाणच्या लोकांनीं कथामृत सेवनाचा प्रयत्न केलेला आहे; आणि असा प्रयत्न आजवर एकसारखा चालत असल्यामुळें भगवंताचें लीलालाघव सर्वांनां उपलब्ध झालें आहे. श्रीहरीच्या अनंत लीला पाताळांत कंबल व अश्वतर यांनीं वासुकीला सांगितल्या होत्या. स्वर्गांत सुरपतीला बृहदश्वानें सांगितल्या होत्या. त्याच कथा एकदां कैलासांत असतांना शंकरानीं पार्वतीला कथन केल्या होत्या. बद्रिकाश्रमीं त्या सूतांनीं ऋषींना सांगितल्या होत्या. याप्रमाणें परंपरेनें त्या कथा अनेकांनीं अनेकास सांगितल्या आहेत. मी आपल्या या कथाकल्पतरु ग्रंथांत कथोपकथनाचा प्रसंग वैशंपायन ऋषि, व राजा जनमेजय यांचा घेतला आहे. राजा जनमेजय वैशंपायन ऋषींस अनेक कथा विचारित असून वैशंपायन ऋषि त्या कथा राजाला सांगत आहेत, असें मी या ग्रंथांत दाखविलें आहे. शेवटीं पुन्हां एकदां सर्वेश्वरास वंदन करून हें मंगलाचरण पुरें करितों.

---

# अध्याय २ रा.

## वज्रनाभ राजाची कथा—१ ब्रह्मदेवाचें वरप्रदान.

जनमेजय राजा एके दिवशीं वैशंपायन ऋषीला ह्मणाला; मुनिवर्य वैशंपायन महाराज, श्रीकृष्ण परमात्मा निजधामास गेल्यावर मागें त्यांच्या वंशांत कोण कोण राहिले, तें ऐकण्याची मला इच्छा उत्पन्न झाली आहे, तर ही माझी इच्छा पूर्ण करण्याची आपण मजवर कृपा करावी. जनमेजय राजानें अशी विनंति केल्यावर वैशंपायन ऋषींना मोठा आनंद झाला व ते त्या राजाला ह्मणाले, "हे राजा जनमेजया, तुझी ही इच्छा पाहून मला फार संतोष झाला आहे. हे राजा, ईश्वराचें लीलालाघव हें फार मनोरम व मंगलकारक असें आहे. श्रीहरीच्या कथा सांगतांनां मनाला मोठा आनंद वाटतो. त्यांतून कथा ऐकणारा श्रोता श्रद्धावान, ज्ञाता व सावधान असा असला ह्मणजे श्रीहरीचे गुणानुवाद गाण्यास अधिक स्फूर्ति उत्पन्न होते. शिवाय अशा श्रोत्यांचें शंकासमाधानही लवकर करितां येतें. तुझ्यासारखा चतुर व ईश्वरभक्तिपरायण श्रोता मला मिळाला, हा लाभ अलभ्य असाच आहे; तूं विचारलेली कथा तुला कथन करितों, ती शांत चित्तानें श्रवण कर.

द्वापर युगाचे शेवटीं यादव अत्यंत उन्मत्त होऊन त्यांच्यांत सर्वत्र यादवी माजली. त्यावेळीं यादवांनीं अनेक निंद्यकृत्यें केलीं व त्यामुळें सर्व यादवांचा नाश झाला. परंतु सांब व मदन हे दोघे श्रीकृष्णाचे पुत्र त्या प्रसंगांतून वांचले; कारण ते दोघेहि चिरंजीव होते. तसेंच श्रीकृष्णाचा सापत्न बंधु जो गद तोहि त्या प्रसंगांतून वांचला; कारण तोहि चिरंजीव होता. असें सांगतात कीं, हे तिघेहि यादव कुलदीपक, चिरंजीव असल्यामुळें अद्यापपर्यंत सुवर्णमेरु पर्वतावर वज्रपुरी ह्मणून जे प्रसिद्ध नगर आहे, त्या नगरांत राज्य करीत आहेत. पूर्वी या वज्रपुरीचा राजा, वज्रनाभ या नांवांचा होता. त्या राजाला मारून टाकून या तिघांनीं तें राज्य मिळविलें आहे. वज्रनाभ राजाला प्रभावती या नांवाची एक सुंदर मुलगी होती, ती मदनानें आपणास स्त्री केली होती; व त्या प्रभावती मुळेंच तें राज्य या तिघांनां प्राप्त झालेलें आहे."

ही वैशंपायन ऋषीनीं सांगितलेली त्रोटक हकीकत ऐकून जनमेजय राजाला वज्रनाभाची संपूर्णकथा ऐकण्याची इच्छा झाली; तो वैशंपायन ऋषीला म्हणाला; मुनिवर्या, आपण सांगितलेल्या वरील माहिती वरून मला वज्रनाभाची कथा ऐकण्याची इच्छा झाली आहे, तर ही कथा मला आपण सांगावी. याप्रमाणें जममेजय राजानें इच्छा दर्शविल्यावर वैशंपायन ऋषि राजाला ती कथा सांगू लागले. ते ह्मणाले;

हे जनमेजय राजा, पूर्वी कश्यप या नांवाचे एक महातपोनिधि ऋषि होऊन गेले. त्या कश्यपास अनेक स्त्रिया होत्या. त्या सर्व स्त्रियांनां कश्यपापासून शतशः पुत्र झाले होते. कश्यप ऋषीला दिति या नांवांची स्त्री होती, त्या स्त्रीला वज्रनाभ व सुनाभ अशीं दोन अपत्यें झालीं होती. वज्रनाभ हा वडील असून सुनाभ हा धाकटा होता. ते दोघेहि मोठे कार्यकुशल व शक्तिशाली असल्यामुळें त्यांनीं अनेक प्रदेश जिंकून विस्तीर्ण राज्य संपादन केलें होतें. सुवर्णाच्या मेरुपर्वतावर त्यांनीं एक विशाल नगरी बांधून ती आपल्या राज्याची राजधानी केली व तिचें नांव वज्रपुरी असें ठेविलें. हें वज्रपुरी शहर अत्यंत सुंदर असून फारच मोठें आहे. त्या शहराचा विस्तार द्वादश योजनें विस्तीर्ण आहे असें सांगतात. या शहरांत अनेक प्रकांडप्रासाद असून शहरा सभोंवती मनोहर अशीं अनेक उपवनें आहेत. त्या शहरांत वज्रनाभ हा राज्य करीत असतांनां त्यास, सर्व सृष्टि जिंकून तिचें आपण मालक व्हावें, असें वाटूं लागलें. त्या कार्यासाठीं कोणातरी देवाचें वरप्रदान मिळवावें असें वाटून त्यानें ब्रह्मदेवाच्या प्रसन्नतेसाठीं प्रयत्न सुरू केला. तो वज्रनाभ हटयोगांत चांगला प्रवीण असल्यामुळें त्यानें आपल्या योगबलानें ब्रह्मदेवाला लवकरच प्रसन्न केलें; त्याच्या एकनिष्ठ भक्तीमुळें ब्रह्मदेव त्याला प्रसन्न झाले व त्यांनीं वज्रनाभाला तुझी काय इच्छा आहे, ह्मणून विचारिलें; तेव्हां वज्रनाभ ब्रह्मदेवाला विनत मस्तकानें ह्मणाला; “ हे सत्यलोकाधिपति ब्रह्मदेवा, तूं या दासाला प्रसन्न झालास हे अनंत उपकार होत. माझें मागणें अगदीं अत्यल्प आहे. माझी आशा पूर्ण करणें हें तुला सहज साध्य आहे. हे ब्रह्मदेवा ! माझ्या राज्याचा विस्तार सर्वत्र व्हावा अशी माझी इच्छा आहे. देव आणि देवेंद्र, पृथ्वीवरील सर्व भूपाळ, अष्ट दिशांचे दिक्पाळ व सूर्य, चंद्र या सर्वांचा माझ्या हातानें पराभव व्हावा व ते माझ्या बंदिखान्यांत पडावेत असें सामर्थ्य तूं मला दे. तसेंच हे सत्यलोकनाथा ! मला तूं चिरंजीव कर. कोणत्याही शस्त्रानें माझा मृत्यु होऊं देऊं नकोस. देव, राक्षस व मनुष्य यांच्या हातानें माझा मृत्यु होऊं देऊं नकोस. तसेंच पशु, पक्षी, सर्प व कीटक यांच्याकडूनहि माझा मृत्यु घडवून आणूं नकोस. सारांश, शरीर धारण करणारे जेवढे प्राणि या विश्वांत आहेत त्या कोणांकडूनहि मला मृत्यु येऊं देऊं नकोस. ” याप्रमाणें वज्रनाभानें मागणें मागितल्यावर ब्रह्मदेव त्याला प्रसन्न अंतःकरणानें ‘तथास्तु’ म्हणून म्हणाले, व ते तेथून सत्यलोकीं निघून गेले.

## २ वज्रनाभाचें अमरावतीस आगमन.

वज्रनाभ राजाला ब्रह्मदेवाकडून वरील वर मिळाल्यावर तो अत्यंत उन्मत्त झाला व तो संपूर्ण पृथ्वी पादाक्रांत करण्याचे तयारीला लागला. त्यानें आपलें सैन्य सर्व बाजूंनीं उत्तम सिद्ध केलें व त्यांच्याकडून तो अनेक देश जिंकूं लागला;

थोडक्याच दिवसांत त्यानें संपूर्ण पृथ्वि जिंकिली व पृथ्वीवरील राजांनां आपल्या बंदीशाळेंत आणून ठेविलें. त्यानंतर त्यानें अष्टदिशांचे दिक्पाळ व अनेक लोकपाळ यांनां जिंकून बंदीशाळेंत आणून ठेविलें. असें करित करित त्यानें आपलें सैन्य देवेंद्राची अमरावती घेण्यासहि पाठवून दिलें. त्यावेळीं स्वतः वज्रनाभ अमरावतीस गेला व युद्धाला आरंभ होण्याचे पूर्वी इंद्राला भेटून म्हणाला, "हे देवेंद्रा ! मी तुझी अमरावती घेण्यासाठीं ससैन्य आलों आहे, तर मुकाट्यानें आपलें सर्व राज्य माझ्या स्वाधीन कर, अथवा तसें करण्याची तुझी इच्छा नसल्यास युद्धाला तयार हो. देवेंद्रा, तूं माझा सापत्न बंधु असून आपणा सर्वांचे हक्क सारखेच आहेत, असें असतां तूं अमरावतीचें राज्य करून स्वर्गसुखाचा अनुभव घ्यावा व मी पृथ्वीवर मृत्युलोकीं रहावें हें मला मुळींच पसंत नाहीं. आजवर या स्वर्गसुखाचा तूं उपभोग घेतलास पण आतां यापुढें तें सुख मला भोगावयाचें आहे; कारण मी तुझा सापत्न बंधु असल्यामुळें माझाहि त्याच्यांवर हक्क आहे, अमरावतीचें राज्य देण्याची तुझी इच्छा नसल्यास तसें तूं मला स्पष्ट सांग, म्हणजे मी आपल्या सैन्याकडून सर्व इंद्रपुरीचा विध्वंस करून टाकतों."

वज्रनाभाची ती विलक्षण मागणी ऐकून व त्याचें तें भयंकर स्वरूप पाहून देवेंद्र अगदीं भयभीत झाला. त्यास त्या वेळीं काय करावें हें सुचेना. अमरावती देऊं नये तर युद्धाचा प्रसंग येणार, व द्यावी तर आपलें सर्वस्व जाणार. अशा पेंचांत इंद्र सांपडल्यावर त्यानें युक्ति-प्रयुक्तीनें निदान तेवढी तरी वेळ टाळावी असा विचार केला, व तो गोड स्वरानें व विनयानें वज्रनाभाला म्हणाला; "हे वज्रनाभा, तूं माझा सापत्न बंधु आहेस हें मला कबूल आहे, व त्या दृष्टीनें तूं मागतोस तेंहि योग्य आहे असें मला वाटतें, परंतु मी माझा सर्व राज्यकारभार माझे गुरु जे बृहस्पति त्यांच्या सल्यानें चालवीत असतों; तेव्हां त्यांनां या संबंधानें विचारून काय तें लवकरच आपणास कळवितों, तों पर्यंत आपण आपलें वज्रपुरीस स्वस्थ असावें." इंद्रानें वज्रनाभाची अशी विनंति केल्यावर ती त्यानें मान्य केली व तो इंद्रास लवकर जबाब देण्याविषयीं इशारत करून वज्रपुरीस निघून गेला. या प्रमाणें वज्रनाभाची समजूत केल्यावर इंद्र बृहस्पतीकडे गेला व त्यानें बृहस्पतीला हें नवीन आलेलें संकट कथन केलें. तेव्हां त्या संबंधानें बराच वेळ विचार करून बृहस्पति ह्मणाले; "हे देवेंद्रा, तो वज्रनाभ ब्रह्मदेवाच्या वरप्रदानामुळें बहुतेकांशीं चिरंजीव झालेला आहे. तेव्हां त्याच्याबरोबर युद्ध करणें हें अनर्थमूलकच आहे; एवढयासाठीं हरिश्चंद्र राजाप्रमाणें बुद्धिबळानेंच या संकटाचें निवारण केलें पाहिजे."

हें बृहस्पतींचें भाषण ऐकून देवेंद्रास ती कथा ऐकण्याची साहजिक इच्छा झाली. तो बृहस्पतीला ह्मणाला; "गुरू महाराज, हरिश्चंद्र राजावर असें कोणतें

संकट आलें होतें; व त्यानें आपल्या संकटाचें कोणत्या युक्तीनें परिमार्जन केलें; हें ऐकण्याची मला इच्छा झाली आहे, तर ती कथा आपण मला कृपा करून सांगावी. ”

## ३ हरिश्चंद्र राजानें केलेलें पुत्राचें संरक्षण.

देवेंद्रानें बृहस्पतीला अशी विनंति केल्यावर ते त्यास ती कथा सांगू लागले. ते ह्मणाले, “ हें देवेंद्रा, सूर्यवंशीं हरिश्चंद्र राजाला पुष्कळ दिवसपर्यंत संतति न झाल्यामुळें तो अत्यंत चिंताक्रांत झाला होता. पुत्र प्राप्तीसाठीं कांहीं तरी ईश्वर भक्ति केली पाहिजे असें त्यास वाटूं लागले व तो त्याचा विचार, त्याची स्त्री जी तारामति तिलाहि पसंत पडला. मग त्या दोघांनीं पुत्रप्राप्तीसाठीं कित्येक वर्षेंपर्यंत वरुण देवतेची सेवा व सुश्रुषा केली. त्या दोघांची एकनिष्ट भक्ति पाहून वरुण त्यानां प्रसन्न झाला, व इच्छित वर मागा ह्मणून ह्मणाला. तेव्हां हरिश्चंद्रराजा वरुणाला ह्मणाला; “ हे वरुण देवा, मला एक पुत्र व्हावा, एवढेंच माझें मागणें आहे. ” हें हरिश्चंद्र राजाचें मागणें ऐकून वरुण ह्मणाला; “ हरिश्चंद्रा, माझ्या कृपेनें तुला लवकरच एक सुलक्षणी व सर्वांग सुंदर पुत्र होईल, परंतु तो तूं मी मागेन तेव्हां मला परत दिला पाहिजे. ” तेव्हां हरिश्चंद्र ह्मणाला, “ हे वरुणा, तूं मागशील तेव्हां मी पुत्र परत देईन, परंतु मला पुत्र होऊन मी पितृऋणांतून मुक्त झाल्यावांचून तूं पुत्र परत मागूं नयेस एवढीच तुला माझी विनंति आहे. ” वरुणानें ती हरिश्चंद्र राजाची विनंति मान्य केली व तो राजाला वरप्रदान देऊन स्वस्थानीं निघून गेला. पुढें कांहीं दिवसांनीं तारामति प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. हरिश्चंद्र राजाला त्यावेळीं फार आनंद झाला व त्यानें मोठा पुत्रोत्सव करून मुलाचें नांव रोहिदास असें ठेविलें. तो हरिश्चंद्र राजा पुत्रप्राप्तीच्या आनंदांत मग्न झालेला असतांनां बारा दिवसांनीं त्याच्याकडे एकाएकीं वरुण आला व तो राजाजवळ पुत्र परत मागूं लागला. तेव्हां हरिश्चंद्र वरुणाची करुणा भाकून म्हणाला; “ हे वरुणा, मुलगा फारच लहान आहे, त्याला दांत निघाल्यावर तूं ये, व मुलगा घेऊन जा. ” वरुणानें राजाची ती विनंति मान्य केली व वरुण त्या वेळीं तेथून निघून गेला. नंतर तो सोळा महिन्यांनीं हरिश्चंद्राकडे आला, व मुलगा परत मागूं लागला. तो हरिश्चंद्र राजाला म्हणाला; “ हे राजा हरिश्चंद्रा, तूं सांगितल्या प्रमाणें मी मुलाला दांत निघाल्यावर आलों आहे, तर मला मुलगा परत दे. मी नरयागकरण्याचें योजिलें आहे. त्या नरयागासाठीं मला तुझ्या पुत्राची अत्यंत आवश्यकता आहे. ” हें वरुणाचें भाषण ऐकून हरिश्चंद्रराजा अत्यंत चिंतातूर झाला. तो पुन्हां वरुणाची करुणा भाकून म्हणाला; “ हे वरुण देवा, जों पर्यंत मुलाचा व्रतबंध झाला नाहीं, तों पर्यंत तो शूद्र आहे, त्याचा नरयागाला कांहींहि उपयोग व्हावयाचा नाहीं, तर त्या मुलाचा व्रतबंध होईपर्यंत त्याला मजजवळ राहूं

द्यावें, व व्रतबंध झाल्यावर आपण येऊन खुशाल घेऊन जावें." वरुणानें राजाची ती विनंति त्या वेळीं मान्य केली व तो तेथून निघून गेला. नंतर वरुण आठ वर्षांनीं म्हणजे रोहिदासाचा व्रतबंध झाल्यावर हरिश्चंद्र राजाकडे आला, व त्यानें पूर्वीप्रमाणें खरें सांगून पुत्राची मागणी केली; तेव्हां हरिश्चंद्र राजा मोठ्या विचारांत पडला व त्यावेळीं त्यास मुलाचें संरक्षण कोणत्या युक्तीनें करावें तें सुचेना; मग त्यानें पूर्वीप्रमाणेंच वरुणाची विनंति केली. तो वरुणाला म्हणाला; "हे वरुणा, मुलाचा व्रतबंध झाला आहे, परंतु त्याला सर्व शस्त्रास्त्र विद्येंत निपुण करण्याची माझी इच्छा आहे. सर्व युद्धविद्येंत तो निष्णांत झाल्यावर आपण येऊन त्यास घेऊन जा." याप्रमाणें हरिश्चंद्रानें वरुणास विनंति केल्यावर ती वरुणानें मान्य केली व तो आपले स्थानीं निघून गेला. पुढें तो हरिश्चंद्र राजाचा पुत्र रोहिदास सर्व शस्त्रास्त्र विद्येंत चांगला निपुण झाला. त्यावेळीं तो सोळा वर्षांचा होता. वरुणास हरिश्चंद्रानें अभिवचन दिल्या प्रमाणें तो, रोहिदास विद्येंत पारंगत होण्याबरोबर दूतासह वरुण लोकांहून पृथ्वीवर आला, व त्यानें आपले दूत रोहिदासाला आणण्यासाठीं पाठवून दिले. त्यावेळीं ते दूत रोहिदासाला आणण्यासाठीं जात असतांनां वाटेंत गजशाळेंत खेळत असलेला रोहिदास, त्या सर्वांनां आडवा झाला, व त्यानें आपल्या बाहुबलानें त्या सर्वांनां कैद करून टाकलें. तें वर्तमान वरुणाला समजल्यावर वरुण, हरिश्चंद्र राजावर अत्यंत संतप्त झाला व तो स्वतः रोहिदासाला आणण्यासाठीं गजशाळेंत आला; परंतु वरुण येण्याबरोबर रोहिदासानें आपलें धनुष्य आकर्ण ओढलें व आपला भयंकर बाण वरुणावर रोखला. तो रोहिदास वरुणाला म्हणाला; "हे वरुणा, जर तूं पुढें एक पाऊल टाकशील तर माझ्या या तीक्ष्ण बाणानें निष्कारण मरण पावशील." रोहिदासाची ती विलक्षण तेजस्विता पाहून वरुण जागच्या जागींच थबकला, व त्यास रोहिदासाला न्यावें कीं नेऊं नये, याचा विचार उत्पन्न झाला. सहज तर हा येत नाहीं; आणि बळेंच न्यावें तर हा आपणावर बाण रोखून उभा राहिला आहे. अशा स्थितींत यास नेणें दुरापास्त असून कदाचित् हा आपला यागहि नाहींसा करील, असें वाटून वरुण तेथून रोहिदासाला न घेतां निघून गेला. हे देवेंद्रा, याप्रमाणें हरिश्चंद्र राजानें वरुणाला आतां पुत्र देतों, मग पुत्र देतों; असें सांगून रोहिदास स्वतः आपलें स्वसंरक्षण करील इतका काळ वरुणाशीं गोड बोलून काढला व शेवटीं त्यास वरील प्रमाणें रोहिदासाकडून स्पष्ट कळविलें. अशा रीतीनें हें संकट हरिश्चंद्र राजानें टाळलें होतें. वरुणाला यासंबंधानें साहजिक फार राग आला होता, व तो हरिश्चंद्राला त्याबद्दल शिक्षा लावण्याची संधी शोधित होता. एके दिवशीं हरिश्चंद्र राजा नदींत स्नान करण्यासाठीं आला आहे असें पाहून वरुण तेथें आला, व तो राजाला धरून खोल पाण्यांत नेऊन

बुडवूं लागला; परंतु त्या वेळीं रोहिदास तेथें जवळच होता. त्याच्या लक्षांत ती गोष्ट आल्याबरोबर त्यानें पाण्यांत अग्निबाण सोडून आपल्या बापाची सुटका केली व वरुणाला तेथून पळवून लावलें. पुढें मग हरिश्चंद्र राजानें अजीगर्त नांवाच्या एका ब्राह्मणाचा मुलगा त्या अजीगर्तापासून विकत घेऊन वरुणाला दिला व त्याला संतोषित केलें. देवेंद्रा, या हरिश्चंद्र राजाप्रमाणें या वेळीं तूंहि युक्तीनेंच आपला कार्यभाग साधून घे व या संकटाचें निवारण कर. तुह्मां दोघांचा पिता कश्यपऋषि आहे, तो मोठा विचारी असून तो त्या वज्रनाभाची समजूत चांगल्या रीतीनें करील; तर तूं त्या वज्रनाभाला घेऊन कश्यपऋषीकडे जा, ह्मणजे या आलेल्या संकटाचें निवारण चांगल्या रीतीनें होईल. ''

वैशंपायनऋषि, जनमेजय राजाला ह्मणतात; हे राजा जनमेजया, आतां मूळ कथेकडे लक्ष दे. बृहस्पतीनें इंद्राला याप्रमाणें सांगितल्यावर इंद्राला ते देवगुरूचें ह्मणणें पसंत पडलें, व त्यानें वज्रनाभास तो आपला विचार कळवून बोलावून आणलें. नंतर ते दोघेहि कश्यपऋषीच्या आश्रमांत आले व कश्यपऋषीला व आपआपल्या मातांनां वंदन करून त्यांनीं सर्व हकीकत कश्यपास निवेदन केली. तेव्हां कश्यपासहि काय करावें याचा मोठा विचार पडला; कारण ते दोघेहि त्याचे पुत्र असल्यामुळें त्यांचें मन दुखविणें त्यास कठीण वाटूं लागलें. मग तो त्या दोघांनां म्हणाला; '' पुत्रहो हल्लीं मी ही यज्ञदीक्षा घेतलेली असून यज्ञ यागाला आरंभ केला आहे, तर या वेळीं या गोष्टीचा विचार मला करितां येत नाहीं, म्हणून तुम्ही दोघेहि माझा हा यज्ञ पूर्ण होईपर्यंत स्वस्थ आपआपले राज्यांत जाऊन रहा. यज्ञ समाप्तीनंतर तुह्मां दोघांचें हें भांडण मिटवून टाकीन ''
बापाची ही आज्ञा वज्रनाभ व इंद्र या दोघांनींहि मान्य केली व ते तेथून निघून गेले. वज्रनाभाला अमरावती घेण्याची मोठी उत्कंठा लागल्यामुळें त्यास तो यज्ञकाल केव्हां संपेल असें वाटत होतें, व देवेंद्राला त्या यज्ञकालीं साहजिक स्वस्थता प्राप्त होऊन त्याला समाधान वाटत होतें.

## ४ प्रभावती व पार्वती.

वज्रनाभराजा वज्रपुरीस परत आल्यावर त्यानें घडलेली सर्व हकीकत आपला बंधु जो सुनाभ त्यास सांगितली, व ते दोघेहि यज्ञसमाप्तीची वाट पहात बसले. यासुमारास वज्रनाभाची मुलगी प्रभावती, उपवर झाल्यामुळें राजाला तिच्या लग्नाची फार काळजी लागली होती. ती मुलगी फार सद्गुणी असून अत्यंत सुस्वरूप होती. त्या वज्रनाभाला तेवढेंच एक अपत्य असल्यामुळें त्याचें त्या मुलीवर फार प्रेम होतें. वज्रनाभाची स्त्री सुशीला म्हणून होती, तिला तर ती आपली मुलगी प्राणापेक्षांहि अधिक प्रिय वाटत असे. सुशीलेला पुष्कळ दिवसपर्यंत मुलबाळ नव्हतें ह्मणून तिला स्त्रियांच्या स्वभावधर्माप्रमाणें फार वाईट वाटत असे. तिनें आपणास संतति व्हावी ह्मणून पार्वतीची फार दिवसपर्यंत एकनिष्ठपणें सेवा

केली होती. सुशीलेची इच्छा आपणास एक सुंदर सुशील व सर्व गुणसंपन्न अशी मुलगी व्हावी, अशी होती. त्याप्रमाणें ती इच्छा धरून तिनें पार्वतीची पुष्कळ दिवसपर्यंत सेवा केल्यावर देवी पार्वती तिला प्रसन्न झाली व तिनें तिला तुझा इच्छित मनोरथ पूर्ण होईल, असा आशीर्वाद दिला. त्यानंतर सुशीलेला लवकरच गर्भधारण होऊन ती योग्य दिवसांनीं प्रसूत झाली, व तिला एक सुंदर मुलगी झाली. हीच मुलगी प्रभावती ही होय.

राजकन्या प्रभावती ही फार सुशील असून तिचें सौंदर्य तर अप्रतीम होतें. तिचा वर्ण कांचनाप्रमाणें सतेज व गौर असा होता. ती फार उंच नाहीं व ठेंगणी नाहीं अशी मध्यम बांध्याची असून तिचें मुखकमल चंद्राप्रमाणें आल्हाद देणारें होतें. पण तिच्या सुंदर आननाला चंद्राची उपमा देणें हें बरें नव्हे; कारण चंद्र हा गणपतीच्या शापामुळें निस्तेज झाला असून गुरूच्या शापानें त्याच्या मुखाला काळे डाग पडले आहेत. तिच्या मुखाला सुंदर कमळाची उपमा द्यावी असें वाटतें, पण तसें करण्यासहि धैर्य होत नाहीं; कारण कमलिनी ह्या भ्रमराबरोबर व्यभिचार करणाऱ्या असून सूर्यास्तानंतर वैधव्य भोगणाऱ्या आहेत, तेव्हां तिच्या मुखाला कमलाची उपमा देणें हा वेडेपणाच होय. सारांश तिचें वदन अनुपमेय असें होतें. तिचे नेत्र मृगनयनापेक्षांहि सतेज व मनोहर होते. तिच्या भीवयांकडे पाहून धनुष्यास, कटिप्रदेशाकडे पाहून सिंहास व चालण्याकडे पाहून हस्तिनीस लाज वाटावी असे ते तिचे अवयव मनोहर असून चालणें नयनरंजक होतें. तिचा केशकलाप मृदु असून तिचे मांसल भुजदंड मस्तसर्पिणी प्रमाणें दिसत होते. वज्रनाभासारख्या तामसी मनुष्याच्या पोटीं जरी तिनें जन्म घेतला होता, तरी ती प्रभावती शांत प्रकृतीची व सात्विक वृत्तीची होती. तिचें आचरण अत्यंत शुद्ध व प्रेमळ असें होतें. ईश्वरावर तिची दृढ निष्ठा असून ती साधुसंताचा चांगल्या प्रकारें सत्कार करीत असे. आपणास आपणाप्रमाणेंच सुशील, शांत स्वभावाचा, ईश्वरनिष्ठ व पराक्रमी पति मिळावा, अशी तिची स्वाभाविक इच्छा होती, व ती इच्छा पूर्ण व्हावी ह्मणून ती दुर्वास ऋषीची पूज्य बुद्धीनें सेवा करित असे. पुष्कळ दिवस पर्यंत एक निष्ठपणें तिनें दुर्वास ऋषीची सेवा व सुश्रषा केल्यावर दुर्वास ऋषि तिचा भाव ओळखून तिला प्रसन्न झाले. त्यावेळीं दुर्वासऋषीनीं प्रभावतीला असा आशीर्वाद दिला कीं, " हे प्रभावती, तुझा विवाह सद्वंशांतील सुशील व सुंदर मुलाबरोबर होऊन तुझें सर्व मनोरथ पूर्ण होतील. तुह्मीं दोघेहि सुखानें नांदाल व चिरंजीव व्हाल. राज्यादि वैभवाचा तुह्माला चिरकाल लाभ मिळेल." अशा प्रकारें दुर्वास ऋषीनीं आशीर्वाद दिल्यावर प्रभावतीला फार आनंद झाला. त्या दुर्वास ऋषीच्या वाणीवर भरंवसा ठेवून ती निश्चित चित्तानें विवाह

कालाची वाट पहात बसली होती, पण इतक्यांत तिच्या दुर्दैवानें एक निराळाच प्रसंग ओढवून आला.

### ५ प्रभावतीचा बंदिवास.

प्रभावती जसजशी उपवर होत होती तसतशी वज्रनाभाची तिच्या विवाहाविषयींची काळजी वाढत चालली होती. तिला चांगला पति मिळावा अशी त्याची फार इच्छा होती व तेवढयासाठीं तिचें स्वयंवर करावें असें त्याला वारंवार वाटत असे, परंतु जो मुलीचा पति, तोच आपला वैरी होऊन आपला नाश करील, अशी त्याची कांहीं कारणामुळें भावना झाली असल्या कारणानें त्यास मुलीचा विवाह करण्यास धैर्य होईना. इकडे मुलगी तर एकेक दिवसानें वाढत जाऊन अगदीं उपवर झाली. अशा स्थितींत त्याला तो मुलीचा उपवरपणा शल्याप्रमाणें त्रास देत होता. मुलगी अगदींच उपवर झाली आहे, तेव्हां ती आपल्या यौवन स्वभावाप्रमाणें आपल्या अनुमोदनाची वाट न पाहतां कोणा पुरुषाबरोबर विवाह करील; अशी वज्रनाभ राजाला भीति वाटूं लागली. राज्यसत्तेच्या महत्वाकांक्षेमुळें वज्रनाभाला त्या मुलीची फार भीति वाटूं लागली व ती भीति त्यास एक क्षणभरहि चैन म्हणून पडूं देईना. शेवटीं त्या दुष्ट वज्रनाभानें आपली एकुलती एक प्रिय कन्या प्रभावती, हिला महत्वाकांक्षेच्या भरी पडून तुरुंगांत ठेविलें. त्या तुरुंगांत त्यानें प्रभावतीचा असा बंदोबस्त ठेविला होता कीं, तिला तेथें पुरुषाचें दर्शनहि होऊं नये, अशी व्यवस्था केल्यावर वज्रनाभाला कांहींसें बरें वाटूं लागलें व त्याची भीति थोडी दूर झाली.

---

## अध्याय ३ रा.

### १ प्रभावतीची व हंसिणीची कथा, श्रीकृष्ण व देवेंद्र यांची भेट.

देवेंद्र आणि वज्रनाभ या दोघांच्या वादाचा निकाल कश्यपाचा यज्ञ संपल्यावर होणार होता, हें मागील अध्यायांत सांगितलें आहे. यज्ञ होईपर्यंत दोघांनां जरी अवकाश मिळाला होता, तरी पुढें कसें करावयाचें हा प्रश्न दोघा पुढेंहि होताच. विशेषतः इंद्राला या संबंधानें जास्त काळजी लागली होती. कश्यप दोघांचा पिता खरा, पण त्याचें यज्ञमार्गाकडे विशेष लक्ष असल्यामुळें तो आपल्या मुलांच्या या वादाकडे चांगलें लक्ष पुरवील असें इंद्रास वाटेना. शिवाय कश्यप जें कांहीं सांगेल तें वज्रनाभ ऐकेलच अशीहि कांहीं त्यास खात्री वाटेना. अशा स्थितींत कोणाचा आश्रय मागावा हा इंद्राला मोठा विचार पडला होता. विचार

करितां करितां इंद्राच्या असें लक्षांत आलें कीं, द्वारकेंत श्रीकृष्ण परमात्मा केवळ दुष्टांच्या संहारासाठीं अवतार धारण करून राहीले आहेत, तेव्हां त्याचें साह्य मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. याप्रमाणें श्रीकृष्ण परमात्म्याचें स्मरण होतांच इंद्र अमरावतीहून निघून लागलाच द्वारकेस आला. इंद्र द्वारकेंत आल्यावर श्रीकृष्ण त्यास सामोरे गेले व त्याचा मोठा सन्मान करून त्यास आपल्या घरीं घेऊन आले. श्रीकृष्णानें त्यास जेव्हां कुशल विचारलें, तेव्हां इंद्र म्हणाला, "हे मुरारी, तुझ्या कृपें करून सर्व कुशल आहेत; परंतु एक मोठें संकट ओढवलें आहे. वज्रनाभानें फार धुमाकूळ मांडला आहे. पृथ्वीवरील सर्व भूपाळ व अष्टदिशांचे दिक्पाळ जिंकून त्यानें आपल्या बंदिखान्यांत टेविले आहेत. तो आतां अमरावती मागत आहे, न दिल्यास युद्धास उभे रहा म्हणून म्हणत आहे. 'अंगावांचून जो नर असेल, त्या वांचून इतरांकडून तुला मृत्यु येणार नाहीं' असा चमत्कारिक वर ब्रम्हदेवानें त्याला दिला आहे. या वरप्रदानामुळें तो अत्यंत उन्मत्त झाला असून सर्वांना त्रस्त करीत आहे; म्हणून मी तुजकडे आलों आहे." इंद्राचें हें भाषण ऐकून श्रीकृष्ण म्हणाले. "हे सुरेश्वरा, त्या वज्रनाभानें वर मोठा अवघड मिळविलेला आहे. अंगावांचून असा नर या त्रिभुवनांतहि कोणी नाहीं; तेव्हां वज्रनाभाचा नाश होणें मला तर कठीण वाटतें." कृष्णाचें हें बोलणें ऐकून इंद्र म्हणाला; हे मुरारी, तूं त्रिकाळज्ञ असून तुला सर्व कांहीं समजतें. मागें हिरण्य कश्यपाचे वेळेस असेंच संकट पडलें होतें, पण तूं त्यावेळीं नारसिंह रूप धारण करून त्या संकटाचें निवारण केलेंस. समुद्र मंथनाचे वेळीं दैत्यभारामुळें पृथ्वी रसातळास जाऊं लागली तेव्हां तूंच रक्षण केलेंस. श्रुतीचें संरक्षण शंखासुराचा नाश करून केलेंस, हिरण्याक्ष असाच मातला होता, त्यावेळीं तूं वराह अवतार घेऊन त्याचें हनन केलेंस. बळीनें अमरावती घेतली होती, तिचें तूं वामन रूप धारण करून रक्षण केलेंस; अशी तुझी शक्ति असतां वज्रनाभासारख्या राक्षसाचा नाश करण्यास तुला अवकाश तो किती लागणार?"

## २ हंसश्रीकृष्णसंवाद.

इंद्राचें वरील भाषण ऐकून, श्रीकृष्ण ह्मणाले, "देवेंद्रा, या वज्रनाभाचें मरण कोणापासून आहे तें आतां माझ्या लक्षांत आलें. मदनापासून वज्रनाभाचा मृत्यु आहे. कारण मदन हा शरीरावाचून आहे. असो, आतां मदनाचा रिघाव वज्रनाभाकडे कसा होईल याची कांहीं योजना योजिली पाहिजे." याप्रमाणें देवेंद्र व श्रीकृष्ण बोलत असतांनां तेथें अंगणांत एक हंस व एक हंसिणी अशी जोडी येऊन बसली. ते हंस सत्यालोकीचे असून मनुष्याप्रमाणें स्पष्ट बोलत होते. त्या पक्षाकडे पाहून श्रीकृणास परम संतोष झाला, ते त्या हंसाला ह्मणाले; "हंसानों, तुम्हीं कोठें राहतां, हल्ली कोणीकडे

जावयाला निघाला आहांत, येथें कोणत्या उद्देशानें आलां अहांत. हें कृपाकरून सांगावें." हंस श्रीकृष्णास वंदन करून म्हणाला, "आम्हीं सत्य लोकीं राहतों, आम्हीं ब्रह्मदेवाचे दास आहोंत. आह्मीं सर्व त्रिभुवनांत हिंडत असतों. आपलें दर्शन घ्यावें या उद्देशानें येथें आलों." श्रीकृष्ण त्या हंसाला पुन्हा ह्मणाले; "तुम्हीं त्रिभुवनीं हिंडत असतां, तेव्हां तुमच्या दृष्टीस एखादी सुंदर मुलगी पडली आहे काय? आमचा मुलगा प्रद्युम्न विवाहास योग्य झालेला आहे, त्याला शोभणारी एखादी मुलगी असल्यास, कोठें आहे, तें कृपाकरून सांगावें." हंस ह्मणाला; " हे श्रीकृष्णा, आह्मीं वज्रपुरींस गेलों होतों. तेथील राजा वज्रनाभ या नांवाचा आहे. याची मुलगी प्रभावती फारच सुंदर असून उपवर झालेली आहे, परंतु त्या मुलीचें लग्न वज्रनाभ करीत नाहीं. कारण त्या मुलीच्या पतीकडून वज्रनाभाचा मृत्यु होणार आहे. प्रभावतीचे पतीपासून वज्रनाभाचा मृत्यु असल्यामुळें राजा स्वतः तिचें लग्न करीत नाहीं, व प्रभावतीस करितां येऊं नये ह्मणून तिला त्यानें बंदीवासांत ठेविलें आहे." हें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाले; " हंसा, तूं सांगितलेली मुलगी आमच्या मुलास करावी असें मनांत आलें आहे, तूं आमचा सखा आहेस. ह्यासाठीं तुझें साह्य अवश्य पाहिजे. तर तूं वज्रपुरीस जाऊन प्रभावतीची भेट घे आणि तिला मदनाचे रूप गुण सांगून विवाहास तिची अनुमति मिळीव." श्रीकृष्णाची अशी आज्ञा होतांच हंसानें संतोष दर्शविला व लागलीच तो हंस व ती हंसिणी तेथून निघून वज्रपुरींत जेथें प्रभावतीला ठेविलें होतें त्या बंदी-खान्यांत येऊन उतरले.

### ३ प्रभावतीला हंसदर्शन.

वज्रनाभराजानें प्रभावतीला एका विस्तीर्ण उद्यानांतील प्रासादांत ठेविलें होतें, तें उद्यान फारच मनोहर होतें. सत्यलोकीच्या हंसांना देखील ती रमणीय बाग पाहून फार आल्हाद झाला. द्वारकेहून एकदम वज्रपुरीस आल्यामुळें हंस फार थकले होते. त्या उद्यानांत आल्यावर हंसांनीं थोडी विश्रांति घेतली, एका सरोवरांत मज्जन केलें व त्या सरोवरांतील कमळाचे तंतु पोटभर भक्षण केले. नंतर तें मनोहर उपवन पहात पहात ते हंस इकडे तिकडे हिंडूं लागले. त्या उपवनांत आंब्याचीं, फणसाचीं, बकुलाचीं, चाफ्याचीं, चंदनाचीं वगैरे अनेक झाडें होतीं. जाई-जुई, चमेली, मोगरा वगैरे अनेक वेली पुष्प-भारानें डुलत होत्या. कोकीळ, मोर, सारिका, वगैरे अनेक पक्षी मंजूळ स्वरानें गात होते. याचवेळीं प्रभावती आपल्या सख्यांसह गौरीच्या पूजेसाठीं त्या बागेंत फुलें तोडीत होती, तिच्या दृष्टीस तो नवीनच कांचनाप्रमाणें चमकणारा हंस-पक्षांचा जोडा पडला व तिला मोठें आश्चर्य वाटलें. प्रभावतीस ते पक्षी धरावे असें वाटलें, म्हणून तिनें आपल्या सख्यांनां गडबड न करितां शांत राह-ण्यास सांगितलें, व आपण हंसास धरण्याचा प्रयत्न करूं लागली. परंतु हंस

तिच्या हातीं न लागतां, ती त्या हंसाच्या नादीं लागून आपल्या सख्यांपासून बरीच दूर मात्र गेली. बागेंतील एका विहिरीवर रहाट होता. त्या रहाटावर हंस बसले व प्रभावतीस उपवरव्यथा अधिक दुःसह वाटावी अशाप्रकारचे विलास करूं लागले. हंस व हंसिणीचे ते नानाप्रकारचे विलास पाहून प्रभावतीस स्वतःच्या स्थितीबद्दल फार दुःख वाटूं लागलें. ती आपल्या मनांत ह्मणाली— "हे पक्षी असूनहि दांपत्य सुखाचा उपभोग मोठ्या आनंदानें घेत आहेत, आणि मी अभागिणी सर्वावयवांनीं पूर्ण अशी असून हे हाल सोशीत आहे. पुरुषां वांचून ज्या स्त्रीचा काळ जातो, ती खरोखरच फुटक्या नशिबाची होय. मला एवढें रूप व तारुण्य आहे, पण तें फुकट गेलें असें मला वाटतें. दुर्वास ऋषीनीं तुला उत्तम वर मिळेल असा आशीर्वाद दिला आहे; पण तें ऋषीवाक्य खरें होईल असें मला वाटत नाहीं. माझ्यापेक्षां ही हंसिणी पुष्कळ भाग्यवान ह्मणावयाची. जें रूप व तारुण्य वांया जाणार, तें मला विधात्यानें दिलें तरी कशाला कोणाला माहित ! पतिवांचून स्त्रियांचें रूप व तारूण्य विषासारखें होय. मला कुरूप, अथवा कसाहि जरी पति मिळेल, तरी देखील मी आपणाला भाग्य-वान मानीन. पतिवांचून असलेली स्त्री या भूमीस भारभूत होय. हरिणी व पक्षिणी जरी रानांत राहतात तरी पतिसुखाचा लाभ त्यांनां होतो; यावरून मी त्यांच्या पेक्षांहि भाग्यहीन आहे. मी मरेन तर या तापत्रयांतून सुटेन तरी" या प्रमाणें प्रभावती आपलें मनाशीं ह्मणून दुःख करूं लागली. ती प्रभावतीची शोच-नीय मानसिक अवस्था पाहून उभयतां हंसहंसिणीस फारच वाईट वाटलें व ते दोघे त्या संबंधानें कांहीं बोलूं लागले. मनुष्याप्रमाणें हंस बोलत आहेत, हें पाहून प्रभावतीस फार आश्चर्य वाटलें. ती हंसाकडे सकौतुक पहात आहे, इतक्यांत त्या उपवनांत वज्रनाभराजा आपल्या मुलीचें कुशल विचारण्यासाठीं आला. प्रभावतीस कुशल विचारल्यावर त्याचीहि दृष्टी त्या हंसाकडे गेली. हंसाबद्दल वज्रनाभास माहिती होती, त्यानें त्या हंसास वंदन केलें व कोणींकडे आलांत, म्हणून प्रश्न केला; व भूतलावर कांहीं आश्चर्यकारक प्रकार असल्यास तो सांगावा म्हणून विनंति केली.

हंस ह्मणाला;—"वज्रनाभा, भूतलावर आश्चर्यकारक अशा दोन गोष्टी आहेत. एक कैलास पर्वत, आणि दुसरी भद्रनाम नट. त्याच्यासारखा कुशल व सर्व विद्या जाणणारा नट दुसरा कोणीहि नाहीं. हें दोन चमत्कार आमच्या अव-लोकनांत आले आहेत." हें ऐकून वज्रनाभ ह्मणाला; "भद्रनाम नटाविषयीं मीही ऐकिलें आहे. आतां यापुढें जर त्याची व तुमची भेट होईल तर त्याला माझ्याकडे अगत्यपूर्वक पाठवून द्या. आपण माझ्या या बागेंत आल्याबद्दल मला फार आनंद वाटतो, आपली इच्छा असेल तोंपर्यंत आपण येथें आनंदानें रहावें." असें ह्मणून वज्रनाभ तेथून निघून गेला. वज्रनाभ गेल्यावर प्रभावती

हंसाला ह्मणाली; हंसा, माझ्या मनांतील गुह्य तूं कसें जाणलेंस हें ऐकण्याची मला फार उत्कंठा लागली आहे; पण हें हंसा, तें माझें मनोगत तूं येथें सांगूं नयेस. कारण कोणी ऐकेल अशी मला भीति वाटते, ह्मणून तुह्मीं उभयतां माझ्या मंदिरांत चला; आणि तेथें मला सर्व कांहीं सांगा." अशी विनंति करून प्रभावती आपल्या मंदिरांत त्या हंस हंसिणीस घेऊन आली. सर्व आपआपल्या आसनावर बसल्यावर हंसिणी प्रभावतीला ह्मणाली;—"बाई प्रभावती, तूं लावण्याची केवळ पुतळी आहेस. तुझ्यासारखी रूपवान स्त्री मी आजवर कोठेंहि पाहिली नाहीं. तुला पाहून भूतनाथ देखील मोहून जाईल, मग इतरांची ती कथा काय ? पण तुझें हें रूप व तारुण्य फुकट जात आहे हें पाहून मला फार वाईट वाटतें. हें तारुण्य अक्षय राहणारें नाहीं, याचा उपयोग याच वेळीं होणार आहे. नदीचें पाणी वाहून पुढें गेलें ह्मणजे, तें जसें मागें परतून येत नाहीं, त्याच प्रमाणें एकदां तारुण्य गेलें ह्मणजे तें पुन्हां प्राप्त होत नाहीं." हें हंसिणीचें बोलणें ऐकून प्रभावती ह्मणाली; "हंसिणी, तूं ह्मणतेस तें खरें आहे. तूं माझी मानसिक व्यथा बरोबर ओळखलीस. तुह्मीं उभयतां सर्व भूतलावर हिंडत असतां तेव्हां माझ्या जोगता मला अनुरूप असा एखादा वर तुमच्या आढळण्यांत आला असल्यास मला कृपा करून सांगावें." हें ऐकून हंसिणी ह्मणाली; "द्वारकेचा राजा श्रीकृष्ण भगवान्, यांचा मुलगा प्रद्युम्न अगदीं तुझ्या योग्य वर आहे. तो साक्षात मदन आहे, मग त्याच्या स्वरूपाचें वर्णन करण्याचें कारण तें काय ? त्यावांचून स्वरूपवान व सर्व शस्त्रास्त्रविद्या जाणणारा असा पुरुष मला साऱ्या भूतलावर दिसत नाहीं. तो श्रीकृष्णाचा वडील मुलगा असून शंकराच्या कृपाप्रसादानें झालेला आहे. तो चिरंजीव आहे. त्याला मृत्यु असा नाहीं. शंबरासूर नांवाच्या राक्षसानें मदन लहान असतांनां त्याला समुद्रांत नेऊन टाकलें होतें, पण मदन चिरंजीव असल्यामुळें त्या भयाण समुद्रांतूनहि जिवंत परत आला. हंसिणीचें हें बोलणें ऐकून प्रभावतीस मदनाची संपूर्ण हकीकत ऐकून घेण्याची इच्छा झाली; ह्मणून ती हंसिणीस ह्मणाली; "हंसिणी, शंकराच्या प्रसादानें मदनाचा कसा जन्म झाला, आणि त्याला शंबरानें समुद्रांत नेऊन कां टाकलें, व तेथून तो कसा वांचला, तें मला कृपा करून कळवावें." प्रभावतीची ती जिज्ञासा ओळखून हंसिणीला मोठा संतोष झाला, व ती प्रभावतीला मदनाची हकीकत सांगूं लागली.

---

# अध्याय ४ था.

## १ मदन व शंबरासूर यांची कथा.

हंसिणी म्हणाली; "प्रभावती, पूर्वी तारकासूर या नांवाचा राक्षस पृथ्वीवर फारच उन्मत्त झाला होता. त्यानें सर्व त्रिभूवन जिंकून देव व दानव यांनां त्राहीभगवान् करून सोडलें होतें. त्यावेळीं महादेव, दाक्षायणीनें देहत्याग केल्यामुळें, काम्यकवनांत जाऊन जपतप करीत बसले होते. तारकासुरानें ब्रह्मदेवाकडून असें वरप्रदान मिळविलें होतें कीं, शंकराचे पुत्रावांचून कोणाकडूनहि मला मरण येऊं नये. असा वर मागण्याचें कारण, शंकर पुढें विवाह करणार नाहींत अशी त्याची खात्री झालेली होती. तारकासुराच्या जुलमानें तिहीं लोकींचे लोक त्रस्त झाल्यावर देवेंद्रास या तारकासुराचा नाश कसा करितां येईल याची मोटी काळजी पडली. देवगुरु बृहस्पति, यांनां विचारितां त्यांनीं असें सांगितलें कीं, शंकराचा पुत्र या राक्षसाचा नाश करील. पण शंकरास पुत्र नाहीं, बरें होईल म्हणावें तर विधूर आहेत. तेव्हां ते लग्नास प्रवृत्त होतील अशी कांहीं तरी तजवीज केली पाहिजे. असा विचार करून देवेंद्र वगैरे मंडळी त्या उद्योगास लागली. हिमालयाची मुलगी उमादेवी, ही उपवर झालेली असून फुलें आणण्यासाठीं नित्य काम्यक वनांत जात असे. ही संधी साधून इंद्रानें मन्मथ व वसंत यांस काम्यक वनांत पाठवून दिलें. त्या दोघांनीं शंकरास आपल्या तपश्चर्येपासून ढळवावयाचा प्रयत्न चालविला. महादेवी पार्वती, ही स्वरूपानें फारच सुंदर असून उपवरावस्थेमुळें अधिक मनोहर दिसत होती. तिची इच्छा शंकरासच वरावें अशी होती. ती शंकराजवळ येऊन उभी राहिलेली असतांनां शंकरानीं तिच्याकडे सहज डोळे उघडून पाहिलें त्याबरोबर मन्मथानें उभयतांमध्यें कामवासना उत्पन्न केली, महादेवास पार्वतीचें तें स्वरूप पाहून तपश्चर्येचें विस्मरण झालें व ते कामातुर होऊन पार्वतीबरोबर बोलूं लागले. पार्वतीनें, पाणिग्रहण करावें ह्मणून शंकराची विनंति केली, ती शंकरानीं लागलीच मान्य केली. शंकराची कांहीं दिवसांनीं अनुरागानें वाढलेली संततता नाहींशी झाल्यावर त्यांस तपश्चर्येचें स्मरण झालें, व त्याबद्दल फार अनुताप वाटुं लागला. झालेला प्रकार कोणी तरी कपटानें केला आहे अशी त्यांची खात्री झाली व त्यामुळें तें कपट करणारावर महादेव फार रागावले. हें सर्व कृत्य मन्मथाचें आहे असें त्यांच्या लक्षांत आल्याबरोबर महादेवानीं आपला तिसरा डोळा उघडून मन्मथास जाळून टाकलें. मदनाची स्त्री रति ह्मणून होती, तिला आपला पति शंकरानें भस्म करून टाकला असें कळल्यावर त्या साध्वीच्या दुःखास सीमा उरली नाहीं. ती शंकराकडे येऊन मोठ्यानें हंबरडा फोडूं लागली. या वेळीं महादेवाच राग

निवाला असल्यामुळें आपण मन्मथास निष्कारण मारलें असें त्यांस वाटूं लागलें. कारण त्यांत मन्मथाचा कांहींच दोष नव्हता, तो इंद्राचा दास असल्यामुळें त्याला इंद्राची आज्ञा ऐकणें भाग झालें होतें. असें असतां आपण मन्मथास जाळलें हें बरें केलें नाहीं असें महादेवास वाटूं लागलें. महादेवास रतीचा तो शोक पाहून फार दया आली व त्यांनीं तिला अभय दिलें कीं, 'तुला तुझा पति द्वापारीं मिळेल.' हें ऐकून रतीला कांहींसें समाधान वाटलें, व ती एका वनांत पतीची प्राप्ती होईपर्यंत ब्रह्मचर्य व्रतानें राहून तपश्चर्या करूं लागली. रति याप्रमाणें ईश्वरभजनांत पतिविरहाचे दिवस घालवित असतांनां एके दिवशीं शंबर त्या वनांत आला. त्याच्या दृष्टीस रति पडल्यावर तो कामानें वेडा झाला व तिच्या जवळ त्यानें तशी इच्छा प्रदर्शित केली. हें शंबराचें बोलणें ऐकून रति ह्मणाली; ' मी मदनाची स्त्री रति आहे, मी पतिव्रता असून ब्रह्मचर्य व्रतानें रहात आहे. मजकडून असदाचरण कधींहि होणार नाहीं. पृथ्वीवरील मदनाशिवाय सर्व पुरुष मला बंधु बापाप्रमाणें आहेत. आपण भलतेंच कांहीं बोलाल तर मी आत्महत्या करीन.' रतीचा असा निर्धार बघून शंबरास फार संतोष झाला. तो रतीला ह्मणाला; "बाई, मी बोललों त्याबद्दल मला क्षमा कर, तूं माझी धर्माची मुलगी आहेस. तूं माझ्या घरीं येऊन सुखानें रहा. मी तुझें पोटच्या मुलीप्रमाणें पालन करीन." याप्रमाणें शंभरानें रतीला अभय दिलें व तिला आपल्या घरीं घेऊन आला.

## २ श्रीकृष्णास मदनाची प्राप्ती.

हंसिणी ह्मणाली; आतां मदनाचा जन्म द्वापारीं कसा झाला, तें सांगतें. द्वारकेचे राजे श्रीकृष्णभगवान्, आपली स्त्री रुक्मिणी इच्यासह एकांतीं असतांनां रुक्मिणी आपल्या पतीला विनयानें ह्मणाली, 'प्रभो, मला पुत्र नाहीं याबद्दल फार खेद वाटतो. अशा तारुण्यावस्थेंत पुत्राची मला साहजिक इच्छा झाली आहे. मुलावांचून ही संपत्ति, राज्य व ऐश्वर्य मला उणें भासत आहे." श्रीकृष्णभगवान्, आपल्या स्त्रीचें बोलणें ऐकून तिला लीलेनें म्हणाले; "रुक्मिणी, तूं फार सुंदर आहेस, तेव्हां तुझ्या पोटीं जो सर्वांत सुंदर असा मदन, तोच पुत्र होऊन यावा अशी माझी इच्छा आहे. मदन पुत्र व्हावा म्हणून कैलासपर्वतावर जाऊन श्रीशंकराची सेवा केली पाहिजे. तूं जर मला परवानगी देशील तर मी तपश्चर्या करण्यासाठीं कैलासपर्वतावर जाईन, व शंकराचा प्रसाद मिळवीन." हें कृष्णाचें भाषण ऐकून रुक्मिणीला फार संतोष झाला व तिनें मोठ्या आनंदानें आपली अनुमति दर्शविली. याप्रमाणें रुक्मिणीची या गोष्टीस अनुमति मिळाल्यावर, कृष्णानीं आपला बंधु बलराम यांस आपला मनोदय कळविला व त्याच्या स्वाधीन सर्व राज्यसूत्रें करून, भगवान् श्रीकृष्ण शंकराच्या प्रसादासाठीं निघून गेले. श्रीकृष्ण प्रथम बद्रिकाश्रमीं आले, तेथें आल्यावर तेथील

ऋषींनीं भगवंताचा फार सत्कार केला व त्यांची यथाविधि पूजा केली, तेव्हां-पासून बद्रिकाश्रमास बद्रिनारायण असें नांव पडलें आहे. नंतर श्रीकृष्ण मेरु पर्वताच्या पृष्ठभागावर गेले व तेथें शंकराची एकनिष्ठपणें सेवा करूं लागले, ऊन, वारा, पाऊस या सर्वांचा त्रास सोसून पुत्रकामनेसाठीं चालविलेली कडकडीत तपश्चर्या पाहून शंकर पार्वतीसह कृष्णाकडे आले. शंकरांनीं कृष्णास प्रेमानें आलिंगन दिलें व ते ह्मणाले; "कृष्णा, तूं माझें दैवत आहेस, तूं सकल चराचराचा नियंता व सर्व देवांचा देव असतां अशी तपश्चर्या करणें हें अनुचित होय." मग श्रीकृष्ण ह्मणाले; "आपण सर्व देवाधिदेव महादेव आहांत, आपल्या आशीर्वादासाठीं आपली सेवा करणें अवश्य आहे." हें ऐकून शंकर ह्मणाले; "बा कृष्णा, तूंच सर्व कर्ता करविता आहेस. तुला आमच्या आशीर्वादाची काय अवश्यकता आहे ? तुझ्या तपानें मी फार संतुष्ट झालों असून रुक्मिणीच्या पोटीं मदन जन्म घेईल असा मी तुला आशीर्वाद देतों. तसेंच तुला एक लक्ष साठ सहस्र सुपुत्र होतील व ऐंशी हजार सुंदर व सुलक्षणी मुली होतील." याप्रमाणें श्रीकृ-ष्णास वर देऊन महादेव पार्वतीसह कैलासीं निघून गेले. या वरदानानें श्रीकृ-ष्णासहि फार संतोष झाला व ते मोठ्या आनंदानें द्वारकेस परत आले. आपला राजा परत आलेला पाहून द्वारकेच्या लोकांनीं मोठा आनंदोत्सव केला. रुक्मि-णीस त्यावेळीं किती आनंद वाटला असेल याची कल्पनाच केली पाहिजे. नंतर कांहीं दिवसांनीं रुक्मिणी गर्भवती झाली व नवमास पूर्ण झाल्यावर प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. त्या मुलाचें नांव मदन असें ठेविलें, त्या मुलाचें अतुलनीय सौंदर्य पाहून कृष्णास व रुक्मिणीस फार हर्ष झाला. श्रीकृष्णाचें पोटीं मदन अवतीर्ण झाल्याची सुवार्ता सर्व पृथ्वीवर हां हां ह्मणतां पसरली. परंतु ही सुवार्ता ऐकून शंबराची छाती भीतीनें धडधड करूं लागली. कारण मदनाकडून त्या शंबरासुराचा मृत्यु होता. आपला शत्रु लहान आहे तोंच त्याचा नाश केला पाहिजे असा विचार करून शंबरासूर लागलाच द्वारकेजवळ आला; परंतु शहरांत त्याचा शिरकाव होईना. द्वारकेचें भोंवतीं श्रीकृष्णाचें सुदर्शन चक्र सारखें फिरत असल्यामुळें त्याचा द्वारकेंत मुळींच प्रवेश होईना. द्वारकेंत कसा प्रवेश होईल हें पाहण्यासाठीं शंबर द्वारकेच्या भोंवतीं सारखा फिरत होता, पण त्यास वाट दिसेना. सुदर्शन चक्र डोळ्याचें पातें लवतें इतक्या अवकाशांत एकवीस वेळां फिरत होतें, अशी चक्राची विलक्षण गति असल्यामुळें द्वारकेंत वाऱ्याचा रिघाव होणेंहि कठिण होतें, मग शंबराचा रिघाव कोठून होणार ? परंतु पांचव्या दिवशीं चाळीतणी जवळ सटवी येणार असें जाणून त्या दिवशीं भगवंतांनीं सुदर्शनचक्र काढून घेतलें. ती संधी साधून, रात्रीं नगरींतील सर्व लोक निद्रिस्थ आहेत असें पाहून शंबर नगरांत गेला, व गुप्त रूपानें प्रसूतिस्थानीं जाऊन मदनास घेऊन लागलीच तेथून पळून गेला.

शंबर त्या मुलाला नगराच्या बाहेर आणून मारून टाकणार होता, पण त्या वेळीं त्याला तशी बुद्धि न होतां त्याच्या हृदयांत दया उत्पन्न झाली. या लहान मुलाचा आपण आपल्या हातानें प्राण घेणें हें बरें नव्हे असें त्याला वाटून त्यानें त्या पांच दिवसांच्या मदनास मोठ्या समुद्रांत फेंकून दिलें व आपल्या नगराला निघून गेला. इकडे मुलगा बाळंतिणीच्या खोलींतून नाहींसा झाल्याचें ऐकून सर्व द्वारकेंत एकच आकांत उडाला, सर्व द्वारकानगरी त्या दुःखामुळें दुःखसागरांत बुडून गेल्याप्रमाणें दिसूं लागली. श्रीकृष्णभगवान् व बलराम दोघेहि फार शोक करूं लागले. मुलाचें मुखावलोकनहि केलें नाहीं; तोंच मुलगा नाहींसा झाला, याबद्दल श्रीकृष्णास फार हळहळ वाटूं लागली. रुक्मिणीच्या शोकास तर सीमा उरली नाहीं. ती आपलें मस्तक आपटून मोठ्यानें टाहो फोडूं लागली. शोकानें तिची अवस्था वेड्याप्रमाणें झाली, ती शोकभरानें म्हणाली, "हे महादेवा, तूं आपल्या कृपाप्रसादानें पुत्र दिलास, पण तो लागलाच नाहींसा झाला. तुझ्या वरदानानें मिळालेलें फळ अशा रीतीनें नाहींसें व्हावें हें तुझ्या औदाला शोभत नाहीं. तूं दिलेलें अक्षय राहतें अशी तुझी कीर्ति असून आज हें विपरीत कसें झालें ? देवा महादेवा ! तुझ्या बोलाला अशा रीतीनें खोटे-पणा येणें हें चांगलें कां ? " नंतर ती कृष्णाकडे व बळरामाकडे पाहून म्हणाली; "अहो, तुम्हीं एवढे पराक्रमाचे पर्वत असतां माझें अर्भक कोणीहो चोरून नेलें ?" श्रीकृष्ण त्रिकालज्ञ होते, त्यांना सर्व प्रकार ज्ञानदृष्टीनें कळला होता, परंतु त्या वेळीं त्यानांदेखील रुक्मिणीची समजूत करितां येईना. नंतर मोठ्या कष्टानें त्यांनीं तिला झालेला प्रकार कळविला, व 'मदन हा चिरंजीव आहे, त्यास कोणाकडू-नहि मृत्यु येणार नाहीं. तो कुशल आहे. तो तुला लवकरच येऊन भेटेल.' वगैरे अनेक धीराच्या गोष्टी कृष्णानें रुक्मिणीस सांगून तिचें शांतवन केलें.

## ३ रतिमन्मथ भेट.

बाई प्रभावती, आतां इकडे मदनाची काय स्थिति झाली ती ऐक. त्यास शंबरानें समुद्रांत फेंकून दिल्यावर एका मोठ्या माशानें मदनास गिळून आपल्या पोटांत घेतलें, परंतु मदन त्या मोठ्या माशाच्या पोटांत आनंदानें खुशाल खेळूं लागला. एके दिवशीं एक कोळी समुद्रतीरीं जाऊन त्यानें समुद्रांत मासे पक-डण्यासाठीं मोठें थोरलें जाळें टाकलें. त्या जाळ्यांत त्या कोळ्याला पुष्कळ मासे सांपडले; त्यांत तो मोठा मासाहि होता. तो मोठा मासा पाहून त्या कोळ्याला व त्याच्या स्त्रीला फार आनंद झाला. तो मोठा मासा त्या कोळ्यानें पुष्कळ पैसे यावेत या उद्देशानें शंबरासुरास नेऊन विकला. तो मोठा मासा पाहून शंबरा सुरास फार हर्ष झाला व त्यानें त्या कोळ्याला मोठें इनाम देऊन तो मासा लाग-लाच पाकशाळेंत पाठवून दिला. त्या वेळीं पाकशाळेची सर्व व्यवस्था मदनाची स्त्री रति हिच्याकडे होती. रतीनें तो मासा चिरला, तों त्यांतून एक सर्वांग

सुंदर लहान मूल बाहेर पडलें. त्या बालकाच्या रम्य बाळलीला पाहून रतीला मोठें कौतुक वाटलें, परंतु त्या विलक्षण प्रकारामुळें तिला थोडी भीतिहि वाटली. या लहान मुलाचें काय करावें याची तिला मोठी काळजी पडली; इतक्यांत तेथें नारदमुनी अवतीर्ण झाले आणि ते तिला म्हणाले; " रति, तुझा पति मदन तो हाच. हा यादवांचे वंशांत रुक्मिणीचे उदरीं जन्म पावलेला आहे. द्वापारांत तुझा पति मिळेल असा शंकरानें तुला आशीर्वाद दिलेला आहे. त्याप्रमाणें तूं याचें बारा वर्षेपर्यंत संगोपन कर, म्हणजे हा व तूं उभयतां सुखानें नांदाल. या मदनाच्या हातानें शंबरासुराचा मृत्यु होणार आहे. नंतर तुम्ही द्वारकेंत जाऊन रहावें." हें ऐकून रतीला साहजिकच मोठा आनंद झाला, पण बारा वर्षेपर्यंत शत्रूच्या घरांत आपल्या पतीचा आपण कसा सांभाळ करूं ही तिला मोठी काळजी पडली. तेव्हां ती नारदाला म्हणाली; "मुनीवर्या, पण हा जर शंबराच्या दृष्टीस पडेल तर शंबर याचा लागलाच नाश करील, याला कांहीं तरी उपाय सांगा." तेव्हां नारद म्हणाले; "तूं त्याबद्दल मुळींच काळजी करूं नको. मी मदनावर अदृष्ट मंत्राचा प्रयोग केलेला आहे. तेव्हां तो तुझ्या वांचून अन्य कोणासहि दिसणार नाहीं. इंद्रानीं या मुलासाठीं पाळणा व कामधेनु दिलेली आहे, तीहि अदृष्य असल्यामुळें तुझ्या वांचून कोणास दिसणार नाहींत." याप्रमाणें नारदानें रतीला मदनाचें संरक्षण करण्यास सांगून नारद तेथून निघून गेले. नारदाच्या वचनावर विश्वास ठेऊन रति, आपला पति जो मदन त्याचें अत्यंत आनंदानें पण मोठी काळजी घेऊन संरक्षण करीत होती. याप्रमाणें बारा वर्षे पर्यंत रतीनें संरक्षण केल्यावर तो चांगला तरुण दिसूं लागला, तेव्हां रतीस कामेच्छा झाली व ती मदनाशीं कामातुराप्रमाणें वागूं लागली. रतीची ती कृति पाहून पूर्व जन्मींचें विस्मरण झालेल्या मदनाला फार आश्चर्य वाटलें व फार खेद झाला. तो म्हणाला; "बाई, माझ्या आईप्रमाणें तूं माझें संरक्षण केलेंस आणि आतां अशी भलतीच इच्छा प्रदर्शित करितेस हें फार अनुचित होय. मजकडून अशी भलतीच गोष्ट कधींहि होणार नाहीं." हें ऐकून रतीनें मदनास मागील सर्व हकीकत सांगून त्याची भ्रांति दूर केली. अशा रीतीनें उश्शाप झालेल्या मदनास पूर्व जन्मींचें स्मरण होतांच, तो पूर्ववत सुंदर व तरुण झाला व त्यानें आपली स्त्री रति हिला ओळखून आलिंगन दिलें.

## ४ शंबरासुराचा मृत्यु.

शंबरासुराच्या वाड्यांत रति व मदन याप्रमाणें आनंदांत असतां ती गोष्ट शंबराच्या राणीनें पाहिली. ती लागलीच आपल्या पतीकडे गेली व पतीला सांगूं लागली; "तुह्मीं घरीं महापतिव्रता म्हणून आणलेली रति व्यभिचारिणी असून तिच्याकडे कोणीतरी परपुरुष आलेला आहे." हें ऐकून शंबरास फार राग आला व तो आपला त्रिशूळ घेऊन रतीच्या महालांत गेला. पाहतों तों तो पुरुष दुसरा कोणी

नसून रतीचा पति मदन आहे. हा मदन आपला प्राण घातक आहे, तेव्हां याचा आतांच नाश केला पाहिजे, असें जाणून शंबर त्रिशूळ घेऊन मदनाच्या अंगावर धांऊन गेला. परंतु मदनानें मोठी चपलता करून शंबराच्या हातांतला त्रिशूळ आपल्या हातांत काढून घेतला व त्याच त्रिशूळानें शंबरासुराचा नाश केला. हें पाहून शंबरासुराचे दूत मदनाच्या अंगावर तुटून पडले, पण मदनानें सर्वांनां यमसदनाला पाठवून देऊन बरोबर रतीला घेतलें व रथांत बसून ते दोघेहि द्वारकेला येण्यास निघाले. हा प्रकार होण्याबरोबर नारदमुनी श्रीकृष्णाकडे घाईघाईनें येऊन तें आनंददायक वर्तमान श्रीकृष्णाला सांगू लागले. नारद म्हणाले; "कृष्णा, तुझा मुलगा मदन, सुंदर स्त्री मिळवून व शंबरासूर राक्षसाला मारून जय मिळवून येत आहे. तर चल, आपण त्याला आणण्यासाटीं सामोरे जाऊं." हें आनंददायक वर्तमान ऐकून कृष्णास, रुक्मिणीस व द्वारकेंतलि सर्व लोकांनां परमसंतोष झाला; आणि सर्वजण मदनास आणण्यासाटीं सामोरे आले. मदन व रति या दोघांनां येतांनां पाहून कृष्ण व रुक्मिणी या दोघांची अंतःकरणें प्रेमानें उचंबळून आलीं. रुक्मिणीस त्यावेळीं जो गहिंवर आला त्याचें वर्णन करणें कटीण होय. रुक्मिणीनें मदनास आपल्या हृदयाशीं कवटाळून धरल्यावर तिला पान्हा फुटला व तिच्या स्तनांतून दूध गळूं लागलें, आपल्या आईची ती स्थिती पाहून मदनास आपल्या अवस्थेचें भान राहिलें नाहीं व तो आपल्या आईचें दूध घटघटा पिऊं लागला. तो मयालेकरांचा प्रसंग वर्णन करावयाला कोण समर्थ आहे! रतीनें आपल्या सासू सासऱ्यांनां साष्टांग नमस्कार घातला. तिलाहि कृष्णानीं व रुक्मिणीनीं प्रेमानें कुरवाळीलें. त्यावेळीं सगळी द्वारकानगरी त्या आनंदकारक प्रसंगामुळें प्रफुल्ल उद्यानाप्रमाणें दिसूं लागली. तो आनंदोत्सव द्वारकेमध्यें एक वर्षपर्यंत चालला होता."

इतकी हकीकत सांगून हंसिणी प्रभावतीला ह्मणाली; "बाई प्रभावती, त्या मदनानें जर तुला वरलें तर तूं खरोखर त्रिभुवनांत धन्य होशील." प्रभावती तें ऐकून हंसिणीला ह्मणाली; "हे हंसिणी, तूं ह्मणतेस तें सगळें खरें, पण मला तर त्या सुखाचा अनुभव स्वप्नांतहि मिळेल किंवा नाहीं, याची शंका वाटते. हे हंसिणी, मी कोणत्या दुःस्थितींत आहें हें तुला माहीत आहेच. या माझ्या संकटाचें निवारण करणारें मला तुझ्यावांचून कोणीहि दिसत नाहीं. या शरीरांत जोपर्यंत पंचप्राण आहेत तोंपर्यंत कांहीं तरी युक्ति योजून त्या मदनाची व माझी गांठ पडेल असें कर. शंकरासारखे देखील त्या मदनाच्या व्यथेनें विव्हल झाले, मग मजसारख्या साधारण स्त्रीला त्या मदनाचा किती त्रास होत असेल याचा तूंच विचार करून पहा. माझ्या या रोगावर औषध देणारी वैद्यीण तूंच एक मला दिसत आहेस. त्या मदनाची व रतीची सेवा करण्याचा जरी मला मान मिळेल तरी देखील मी आपणाला धन्य मानीन."

हंसिणी प्रभावतीला ह्मणाली; "बाई प्रभावती, तो मदन श्रीकृष्णाचा मुलगा आहे. तो दुर्वास ऋषीच्या वराप्रमाणें तुझा स्वीकार केल्यावांचून कधींही रहाणार नाहीं. तसेंच श्रीकृष्ण परमात्माहि तुझा उद्धार केल्यावांचून रहाणार नाहींत, आपल्या भक्तांची कामना तृप्त करणें एवढ्यासाठींच परमात्म्यानीं अवतार घेतला आहे. भक्तासाठीं कृष्णानीं द्वारकेचें राज्य त्या उग्रसेनाच्या स्वाधीन केलें असून आपण स्वतः निरिच्छ वृत्तीनें रहात आहेत. ती कथा प्रभावती, तुला माहित असेलच;" तेव्हां प्रभावती ह्मणाली; "हंसिणी, ती कथा मला मुळींच माहित नाहीं. कृपा करून सांगशील तर मजवर अनंत उपकार होतील." हें प्रभावतीचें बोलणें ऐकून हंसिणी प्रभावतीला ती कथा सांगूं लागली.

---

# अध्याय ५ वा.

## १ देवयानी व ययाति यांची कथा.

"पूर्वी वृषपर्वा या नांवाचा एक महान पराक्रमी राजा होऊन गेला. प्रसिद्ध शुक्राचार्य हा त्या राजाचा गुरू होय. एके दिवशीं वृषपर्वा राजाची मुलगी, राजकन्या शर्मिष्ठा व शुक्राचार्यांची मुलगी देवयानी, अशा दोघीजणी आपल्या बरोबर सख्यांनां घेऊन एका रमणीय सरोवरावर स्नानासाठीं गेल्या होत्या. पाण्यानें तुडुंब भरलेलें सरोवर पाहून सर्व मुलींनां जलक्रीडा करण्याची इच्छा झाली; त्या मुलींनीं लागलीच आपलीं सर्व वस्त्रें एका वृक्षाजवळ सोडून ठेविलीं व त्या निश्चल मनानें पाण्यांत पोहूं लागल्या; इतक्यांत त्या मार्गानें शंकर चालले होते त्यानां पाहून सर्व मुली लाजल्या व घाईघाईनें बाहेर येऊन आपआपलें वस्त्र परिधान करूं लागल्या. त्या गडबडींत चुकून देवयानीनें शर्मिष्ठेचें वस्त्र घेतलें व तें ती नेसूं लागली; शर्मिष्ठेनेंहि घाईत देवयानीचें वस्त्र घेतलें व तें ती नेसूं लागली; पण ती चूक तिच्या लागलीच लक्षांत आली व हें आपलें वस्त्र नसून देवयानीचें आहे, असें तिला कळून आलें. देवयानीकडे तिनें पाहिलें, तों ती आपलें उत्तम वस्त्र नेसत आहे, असें तिच्या दृष्टोत्पत्तीस आलें. तें पाहून शर्मिष्ठेस फार राग आला व तिनें रागारागानें देवयानी नेसत असलेलें आपलें वस्त्र सोडून घेऊन तिला नग्न केलें; आणि रागानें भिंवया चढवून ती ह्मणाली, " भिकारडे, तूं राजकन्येचें वस्त्र नेसतेस होय ! मुठ मुठ दाणे मागून निर्वाह करावा; अशी तुझ्या पित्याची योग्यता. असें असून तूं एकदम माझें वस्त्र घेऊन माझा असा उपमर्द करितेस काय !" हें ऐकून देवयानी ह्मणाली; "बाई शर्मिष्ठे, माझा पिता ब्राह्मण आहे, भिक्षा मागणें हें त्याचें कर्तव्यच आहे; पण त्याची योग्यता किती आहे हें

तुझ्या बापाला माहित आहे. तुला माहित नाहीं ह्मणून असें भलतेंच बोलतेस, अगे, राजे कितीहि मोठे असले तरी ब्राह्मणाच्या आशीर्वादानें त्यांनां राज्य मिळतें, आणि ब्रास्हणांच्या शापानें त्यांचीं राज्यें नाहींशीं होतात. ब्राम्हण जरी भिक्षार्थी आहेत, तरी रंकाचा राव व रावाचा रंक करण्याचें सामर्थ्य त्यांच्या वाणींत आहे, हें तुला माहित नाहीं !" हें ऐकून त्या उन्मत्त शर्मिष्ठेला विशेषच राग आला. तिनें रागानें देवयानी जें स्वतःचें वस्त्र नेसली होती तेंहि फेडून घेऊन म्हणाली; "हेंहि वस्त्र तुला माझ्याच कृपेनें मिळालेलें आहे, तेंहि मी आपलें घेतें. भिकारडी ती भिकारडी, पण डौल केवढा ! म्हणें राजाचें ऐश्वर्य ब्राम्हणांच्या शब्दावर अवलंबून आहे." असें म्हणून शर्मिष्ठेनें रागानें देवयानीस नग्न स्थितींत एका विहिरींत ढकलून देऊन ती सख्यांसहवर्तमान आपल्या नगरांत निघून गेली. व झालेलें वर्तमान कोणीहि कोणाजवळ सांगू नये अशी तिनें आपल्या सख्यांनां ताकीद दिली.

## २ ययाति व देवयानी यांची भेट.

इकडे ज्या विहिरींत देवयानीस ढकलून दिलें होतें, त्याच विहिरीजवळ ययातिराजा शिकार करून थकल्यामुळें पाणी पिण्यासाटीं आला होता. राजानें विहिरींत पाहिलें तों विहिरींत एक तरुण, सुंदर व उपवर अशी स्त्री रुदन करीत आहे. नग्न स्थितींत असलेल्या त्या स्त्रीला पाहून राजाला फार आश्चर्य वाटलें, व त्याला तिची अत्यंत दया आली. त्यानें आपल्या अंगावरील शेला काढून तो देवयानीच्या अंगावर टाकला व मग त्यानें तिला त्या विहिरींतून बाहेर काढलें; व 'जरूर असल्यास तुला तुझ्या घरीं पोहोंचतें करितों' असें तो ह्मणाला. तेव्हां देवयानी ययातीचा हात धरून म्हणाली; "तूं मला नग्न स्थितींत पाहिलेंस, दुसरें, मला तूं आपल्या वस्त्रानें झांकलीस आणि माझ्या हाताला स्पर्श करून बाहेर काढिलेंस. तेव्हां आतां मला तुजबरोबर विवाह करणें भाग झालें आहे. मी शुक्राचार्यांची मुलगी देवयानी आहे." हें ऐकून ययाति राजा म्हणाला; "पण देवयानीं, तूं ब्राह्मणकन्या असून मी क्षत्रिय आहे. क्षत्रियानें ब्राह्मणाच्या मुलीबरोबर विवाह करूं नये असें शास्त्र आहे. तेव्हां मला तुझ्याबरोबर विवाह कसा करितां येईल ? धर्माविरहित मी आचरण करणार नाहीं." तेव्हां देवयानी ह्मणाली; "राजा, तुझें म्हणणें बरोबर आहे, पण मला ब्राह्मण पति मिळणार नाहीं, असा शाप असल्यामुळें मला क्षत्रियाबरोबर विवाह करणें भाग झालें आहे." ययातिराजा देवयानीचें हें बोलणें ऐकून देवयानीला म्हणाला; "देवयानी, तुला असा कोणाचा शाप झाला आहे, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे." राजाची ती इच्छा जाणून देवयानी आपली शापाची हकीकत ययातीला सांगू लागली.

## ३ कच व देवयानी.

देवयानी म्हणाली; "राजा, माझा बाप शुक्राचार्य हा तामसी वृत्तीच्या असुरांचा गुरू असून त्याला संजीवनी मंत्र अवगत आहे. जेव्हां जेव्हां सुर व असुर यांचें युद्ध होतें, तेव्हां तेव्हां युद्धांत मरणाऱ्या असुरांना माझा बाप संजीवनी मंत्रानें जिवंत करितो. असुरांची अशी स्थिति असल्यामुळें देवांना फार त्रास होऊं लागला. ही विद्या देवांपैकीं कोणालाच अवगत नसल्यामुळें ही कशी प्राप्त करून घ्यावी, याचा देवांनां मोठा विचार पडला. तेव्हां देवगुरू बृहस्पति यांनीं आपला मुलगा कच, यास माझे बापाकडे ती विद्या शिकण्यासाटीं पाठवून दिलें. कच विद्या शिकण्यासाटीं आल्यावर शुक्राचार्यांनीं त्यास 'तुला दैत्य फार त्रास देतील, तेव्हां तूं ही विद्या शिकण्याचें भानगडींत पडूं नको' म्हणून सांगितलें. परंतु कच आपला हेका सोडीना, तेव्हां मीहि आपल्या बापाला सांगितलें कीं, 'बाबा, हा जातीनें ब्राह्मण आहे, आपला ज्ञातिबंधु आहे, याचा अभिमान आपण धरून याला विद्या अवश्य शिकविली पाहिजे. आपण याचें संरक्षण करणारे असल्यावर, राक्षस याला काय करणार आहेत?' असें मी आपल्या पित्याला सांगून कचास आपले घरीं ठेवून घेतलें. तो व मी समवयस्क असल्यामुळें आह्मां उभयतांत साहजिक प्रीति उत्पन्न झाली, तो घटकाभर दृष्टीस पडला नाहीं म्हणजे मला मुळींच करमत नसे. पुढें ही गोष्ट दैत्यांचे कानावर जाऊन त्यांनां कच संजीवनी विद्या शिकण्यासाटीं आला आहे, हें समजलें. तेव्हां त्यांनीं एके दिवशीं कचाला जंगलांत गांठून ठार मारून टाकलें-त्या दिवशीं कच घरीं लवकर न आल्यामुळें मला मोठी काळजी वाटूं लागली, म्हणून मी आपल्या पित्याला त्याच्यासंबंधानें विचारिलें, पित्यानें अंतर दृष्टीनें सारा प्रकार पाहून मला घडलेली हकीकत सांगितली. तेव्हां मी आपल्या बापाला कचास संजीवनी मंत्रानें जिवंत करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें पित्यानें त्यास जिवंत केलें. पुढें राक्षसांनीं तीन चार वेळां या प्रमाणें प्रयत्न केला; पण तितक्याहि वेळां मी आपल्या बापास त्याला जिवंत करावयास लावलें. शेवटीं दैत्यांनीं एक निराळीच युक्ति योजिली त्यांनीं कचास जाळून टाकून त्याची राख केली, व ती राख मद्यांत घालून तें मद्य माझ्या बापास पिण्यास दिलें. कच बराच वेळ दृष्टीस न पडल्यामुळें, मी आपल्या बापास त्याचें वर्तमान विचारिलें, तेव्हां माझा पिता ह्मणाला; " मुली, कच अशा रीतीनें माझ्या पोटांत गेलेला आहे, त्याला जिवंत करावें तर मी मरेन." तेव्हां मी आपल्या बापाला म्हणालें; 'बाबा, कचास पोटांत जिवंत करून अगोदर संजीवनी मंत्र शिकवा आणि मग त्यास पोटांतून बाहेर येण्यास सांगा. म्हणजे तो बाहेर आल्यावर आपणास जिवंत करील.' माझ्या पित्यास ही गोष्ट मानवली व त्यानें त्या प्रमाणें कचास जिवंत केलें. अशा रीतीनें कचास संजीवनी विद्या

प्राप्त झाल्यावर तो आपल्या घरीं जाऊं लागला. तेव्हां मी त्यास आपणा बरोबर विवाह करण्या विषयीं विनंति केली, पण माझी विनंति अमान्य करून तो ह्मणाला, "देवयानीं, तुझें व माझें नातें बंधुभगिनीचें आहे, आपण दोघेही एकाच शुक्राचार्यांच्या पोटचे आहोंत. तेव्हां मला तुजबरोबर विवाह करितां येत नाहीं." असें कचानें सांगितल्यावर मला त्याचा फार राग आला व मी त्याला, 'तुला संजीवनी विद्या फलद्रूप होणार नाहीं,' ह्मणून शाप दिला. तेव्हां त्यानेंहि मला असा शाप दिला कीं, 'तुझा विवाह ब्राह्मणाबरोबर न होतां क्षत्रियाबरोबर होईल.'

## ४ देवयानीचा विवाह.

याप्रमाणें आपली हकीकत सांगून देवयानी ययाति राजाला ह्मणाली; "राजा, माझा पति आतां तूंच आहेस. तूं जर माझा अव्हेर करशील तर मी प्राणत्याग करीन." हें ऐकून ययाति राजा ह्मणाला; "देवयानी, तुझ्या पित्याला जर ही गोष्ट कबूल असेल तर मी तुजबरोबर विवाह करण्यास तयार आहे." असें ययातीनें सांगितल्यावर देवयानी ययातीस आपल्या बापाकडे घेऊन आली, व तिनें आपल्या पित्याला सर्व हकीकत सांगितली. तेव्हां शुक्राचार्यास आपल्या मुलीचा विचार पसंत पडला. व त्यानें ययातीबरोबर देवयानीचा विवाह लावून दिला. नंतर देवयानीनें शर्मिष्ठा आपणास काय काय बोलली; तिनें आपणास विहिरींत कसें ढकलून दिलें वगैरे सर्व हकीकत शुक्राचार्यास कळविली. तें ऐकून शुक्राचार्यास फार राग आला, ते रागानें लाल होऊन वृषपर्व्याकडे गेले व त्यांनीं शर्मिष्ठेनें केलेला अपराध त्याच्या कानावर घातला. शुक्राचार्यांचा तो राग पाहून वृषपर्वा थरथर कांपू लागला. तो ह्मणाला; "गुरुमहाराज, मला क्षमा करावी, आपण सांगाल तें शासन मी शर्मिष्ठेला करण्यास कबूल आहे." त्यावेळीं देवयानी जवळच होती, ती ह्मणाली कीं, 'शर्मिष्ठेनें माझी बटिक होऊन राहिलें पाहिजे.' शुक्राच्या शापभयानें वृषपर्व्यानें ही गोष्ट कबूल केली, बापाच्या कल्याणासाठीं शर्मिष्ठेनेंहि त्या शोचनीय स्थितींत राहण्याचें कबूल केलें. मग ययाति राजानें देवयानीस व शर्मिष्ठेस बरोबर घेतलें व तो मोठ्या समारंभानें आपल्या नगरास आला. नगरांत आल्यावर ययाति राजानें देवयानीचे सांगण्यावरून शर्मिष्ठेला नगराबाहेर मंदिर बांधून तेथें ठेविलें.

## ५ शुक्राचार्यांचा शाप.

एक संवत्सर गेल्यानंतर देवयानीस मुलगा झाला. त्याचें नांव यदु असें ठेविलें. हाच यदु कृष्णाचा पूर्वज होय. नंतर कांहीं दिवसांनीं दुसरा मुलगा झाला. त्याचें नांव तुर्वसू असें ठेविलें. इकडे शर्मिष्ठा आपल्या दुःकारक आयुष्याचे दिवस कष्टानें काढित असतांना, एके दिवशीं राजा ययाति, तिच्याकडे

आला. त्या दिवशीं राजा रानांत शिकारीसाठीं गेला होता. शिकार मिळविण्यासाठीं राजास फार श्रम झाले होते. त्या श्रमानें थकलेला राजा नगरांत येत असतांना शर्मिष्ठा त्याच्या दृष्टीस पडली. शर्मिष्ठा त्या वेळीं ऋतुस्नात असल्यामुळें फारच मनोहर दिसत होती; तिला पाहिल्यावर राजाला अनिवार कामलालसा उत्पन्न झाली व तो तसाच शर्मिष्ठेच्या मंदिरांत गेला. शर्मिष्ठेस राजा आपल्या मंदिरांत आल्याबद्दल फार आनंद झाला, व तिनें राजास प्रेमालिंगन देऊन राजाची इच्छा पूर्ण केली. या गोष्टीस कांहीं दिवस गेल्यावर शर्मिष्ठेसहि दोन पुत्र झाले. वडील मुलाचें नांव दुर्जय व धाकट्या मुलाचें नांव कुरू असें ठेविलें होतें. हीं मुलें साधारण मोठीं झाल्यावर साहाजिक खेळण्यासाठीं घराबाहेर पडूं लागलीं. मुलें याप्रमाणें घरापुढें एके दिवशीं खेळत असतांना रस्त्यानें कांहीं कारणासाठीं देवयानी जात होती, तिच्या दृष्टीस तीं मुलें पडलीं. तीं सर्वांगसुंदर मुलें पाहून देवयानीस मोठें आश्चर्य वाटलें. ती लागलीच शर्मिष्ठेच्या मंदिरांत गेली व त्या मुलांना आपल्या बरोबर घेऊन राजवाड्यांत आली. मुलांच्या चेहऱ्यावरून व एकंदर आकृतीवरून हीं मुलें शर्मिष्ठेस ययातिपासूनच झालेलीं आहेत, असें तिला वाटलें. इतक्यांत ययाति राजाहि देवयानीच्या मंदिरांत आला. राजा कोणास न कळत शर्मिष्ठेच्या मंदिरांत वारंवार जात असल्यामुळें तिच्या मुलांचा व त्याचा साहजिक परिचय झाला होता व तीं त्याचींच मुलें असल्यामुळें त्या मुलांवर त्याचें प्रेमहि बसलें होतें. राजा देवयानीकडे आल्याबरोबर शर्मिष्ठेचीं मुलें हर्षानें ओरडून राजाजवळ गेलीं. राजास त्यावेळीं प्रेमभरामुळें भान न राहून त्यानें त्या दोन्हीं मुलांना उचलून घेऊन त्यांचें चुंबन घेतलें. हें पाहून देवयानीस अनावर संताप उत्पन्न झाला. देवयानी राजाला म्हणाली, "ती शर्मिष्ठा माझी वैरीण असून तिला तुम्ही पुत्र दिलेत ही गोष्ट अत्यंत अनुचित केलीत. ती माझी दासी व बटिक असून तिचें चोज तुम्ही पुरविलेंत हें मी आतांच माझ्या पित्याला जाऊन कळवितें. मी आतां आपल्या मुलांसह येथें क्षणभर देखील राहाणार नाहीं." देवयानीचें हें रागाचें भाषण ऐकून ययाति राजास फार भीति वाटूं लागली. देवयानीचा बाप शुक्राचार्य, यांनीं शाप दिल्यास आपली दुरवस्था होईल, म्हणून तो देवयानीची क्षमा मागून राग न करण्याबद्दल तिची वारंवार विनंति करूं लागला, परंतु देवयानीचा राग शांत झाला नाहीं. तिनें लागलेंच आपल्या बापाला बोलावून आणलें व त्यास झालेली सर्व हकीकत कळविली, ती ऐकून शुक्राचार्यांसहि फार राग आला. शुक्राचार्य रागावून म्हणाले; "राजा ययाति, तूं फार लंपट बुद्धीचा आहेस. म्हणून तुला आतांच जरा प्राप्त होईल." असा शाप मिळाल्याबरोबर ययाति राजा एकदम अत्यंत म्हातारा दिसूं लागला. ययाति राजा त्यावेळीं शुक्राचार्यांच्या

चरणांवर मस्तक ठेवून उःशाप मागूं लागला. तेव्हां शुक्राचार्यांस त्याची दया आली, ते म्हणाले; 'जर तुझा एखादा मुलगा तुझी ही जरा घेईल तर तो वृद्ध होईल व तूं तरुण होशील.' राजास याप्रमाणें उःशाप मिळाल्यावर त्याला थोडेंसें समाधान वाटूं लागलें. परंतु जरा एखाद्या मुलाला द्यावयाची ह्या तरी त्याला मोठी काळजीच होती. राजास तर ती जरावस्था क्षणभरहि सहन होईनाशी झाली. त्याचे काळेभोर केंस पांढरे स्वच्छ झाले. अंग थरथर कांपूं लागलें, डोळ्यांस चिपडें येऊन त्यांतून पाणी गळूं लागलें, कानानें ऐकूं येईनासें झालें, दांत पडून जाऊन तोंडाचें बोळकें झालें, आणि मुखांतून लाळ गळूं लागली. पाठ वांकून कमान झाली, काठीवांचून चालतां येईनासें झालें, मुलें चेष्टा करूं लागलीं, त्याच्या खोंकण्याच्या त्रासानें बायका त्यास घराच्या बाहेर जाऊन खोका म्हणून सांगूं लागल्या. त्या जरावस्थेंत राजाला शारीरिक व मानसिक असे दोन्ही कष्ट होऊं लागले. शेवटीं राजा त्या जरावस्थेमुळें फारच त्रासला व यदु नांवाच्या मुलाजवळ येऊन त्याला म्हणाला; "यदु, माझी ही जरा तूं घे, आणि तुझें तारुण्य मला दे." बापाचें हें बोलणें ऐकून यदूला फार हंसूं आलें, तो म्हणाला; "बाबा, ही गोष्ट कशी होईल ? रत्न देऊन स्फटिक कोणीतरी घेईल कां ?" यदूचें हें बोलणें ऐकून राजा निराश झाला व तुर्वसुकडे जाऊन त्यास आपली जरा घे, म्हणून म्हणूं लागला. तें ऐकून तुर्वसु म्हणाला; 'असें कसें होईल ? जिवंतपण सोडून मरण कोण पत्करील ? कापूस घेऊन कोणी पितांबर देईल काय ? बाबा, आपण तर विष देऊन अमृत मागत आहां.' याप्रमाणें देवयानीच्या मुलांनीं सांगितल्यावर राजा शर्मिष्ठेच्या मुलांकडे गेला, व दुर्जयाला म्हणाला, दुर्जया, 'माझी ही जरा घेऊन तूं आपलें तारुण्य मला दे.' दुर्जय म्हणाला, 'बाबा, असें मजकडून होणार नाहीं. मी आपला सुंदरपणा तुम्हाला देऊन तुमचा विद्रूपपणा मी घेऊं ! इतका मी वेडा नाहीं.' नंतर ययाति राजा कुरुकडे गेला व त्यास आपली जरा घेण्यास सांगूं लागला. कुरु म्हणाला; 'यांत काय मोठेंसें आहे; बापासाठीं मुलानें प्राण देण्यासहि तयार असलें पाहिजे, मग आपण तर फक्त तारुण्यच मागत आहां. मी आपलें तारुण्य तुम्हाला देऊन तुमची जरा घेण्यास मोठ्या आनंदानें तयार आहें.' मग ययाति राजानें आपली जरा कुरूला देऊन, कुरूचें तारुण्य आपण घेतलें. त्या तारुण्याचा उपभोग एक सहस्त्र वर्षें घेतल्यानंतर राजानें आपलें तारुण्य पुन्हां कुरूस परत दिलें, व जरा आपण घेतली. कुरूच्या या पितृभक्तिमुळें राजानें राज्य कुरूला दिलें, व यदु वगैरे तिघां मुलांना शाप देऊन म्हणाला; 'तुम्हा तिघांच्या वंशांत कोणालाहि सिंहासनाचा व छत्रचामरांचा उपभोग घडणार नाहीं.' असें म्हणून ययाति राजा कुरूस राज्य देऊन आपण तपासाठीं अरण्यांत निघून गेला. या ययातीकडून शाप पावलेल्या यदुवंशांत

श्रीकृष्णाचा जन्म असल्यामुळें त्यास छत्रसिंहासनाचा लाभ घेतां येत नाहीं. "उग्रसेनास राज्यावर बसवून आपण सर्व व्यवस्था पहात आहे." ही कथा सांगून हंसिणी प्रभावतीला म्हणाली; "प्रभावती, आतां तुला असें वाटत असेल कीं, मी असुराची मुलगी असल्यामुळें मदन माझा स्वीकार करणार नाहीं, तर ती तुझी शंका व्यर्थ आहे. कारण, मदनाचा मुलगा अनिरुद्ध यानें बाणासुराची मुलगी उषा, हिजबरोबर विवाह केलेला आहे." हें ऐकून प्रभावती म्हणाली; "बाई हंसिणी, त्या उषेची गोष्ट मला ऐकण्याची फार उत्कंठा आहे, तर तेवढी कृपा करून सांग." प्रभावतीची ती इच्छा पाहून हंसिणी तिला उषेची कथा सांगू लागली.

---

# अध्याय ६ वा.

## उषा व अनुरुद्ध यांच्या विवाहाची कथा.

हंसिणी म्हणाली; "प्रभावती, बाणासूर म्हणून जो प्रसिद्ध राजा होऊन गेला त्याची उषा ही कन्या होय. ईश्वराचा परमभक्त प्रऱ्हाद, या प्रऱ्हादाचा पुत्र विरोचन, विरोचनाचा पुत्र बली, आणि बलीचा पुत्र बाणासूर हा होय. तो महा शिवभक्त होता. पाताळांत जाऊन तो प्रत्यहीं एक हजार कमळें आणीत असे, व त्या कमळांनीं महादेवाची पूजा करीत असे. याप्रमाणें शंभर वर्षें महादेवाची सेवा केल्यावर त्यास महादेव प्रसन्न झाले व तुझी इच्छा पुरी करितों म्हणून म्हणाले. बाणानें त्यावेळीं महादेवाजवळ आपणास एक सहस्त्र हात असावे व पुत्राप्रमाणें अधिकार असावे, असा वर मागून घेतला. बाणासुराची राजधानी शोणितापूर ही होय. बाणासुराप्रमाणें त्याची मुलगी उषा ही शिवाचीच भक्ति करीत असे. बाणानें याप्रमाणें वरप्रदान मिळविलें होतें, तरी त्याचा शिवपूजा करण्याचा क्रम सारखा चालला होता, तेव्हां शंकर त्यास कांहीं दिवसांनीं पुन्हां प्रसन्न झाले; शंकर प्रसन्न झाल्यावर बाणासुर शंकराला ह्मणाला; 'देवा, लवकरच एखादा युद्धप्रसंग येऊन त्यांत माझ्या या सहस्त्रभुजा तुटून पडाव्यात अशी माझी इच्छा आहे.' हें चमत्कारिक मागणें ऐकून शंकरास फार खेद वाटला. शंकर ह्मणाले; 'बाणासुरा, तूं हें कांहीं तरी भलतेंच मागितलेंस. अरे मागणें तरी मागतां आलें पाहिजे, कामधेनु आली असतांना भिक्षा मागण्याची इच्छा व्हावी, पवित्र गंगा नदी सन्निध असतां तहान भागविण्यासाठीं डबक्याकडे लक्ष जावें, त्याप्रमाणेंच तुझें हें मागणें होय. असो, आतां तूं ज्या अर्थी मागितलें आहेस त्या अर्थी आह्मास तुझी इच्छा पुरी करणें भाग आहे. तुझी मुलगी उषा, इच्याबरोबर जो विवाह

करील, त्याच्याबरोबर तुझें युद्ध होऊन त्यांत तुझे सहस्रहि हात तुटतील." याप्रमाणें वरप्रदान देऊन शंकर स्वस्थानीं निघून गेले. बाणासुरासहि भलतेंच मागणें मागितल्याबद्दल पश्चात्ताप होऊं लागला, पण मागाहून पश्चात्ताप होऊन तरी काय उपयोग! बाणासुरानें झालेली सर्व हकीकत आपला प्रधान जो कुंभक त्यास सांगितली. प्रधानास राजाच्या त्या वेडेपणाबद्दल फार खेद झाला. इकडे राजकन्या उषा उपवर झाली होती, विवाह करावा तर तिचा पति तोच आपला शत्रु होणार, अशा विचारांत राजा असतां प्रधानानें राजाला अशी सल्ला दिली कीं, राजकन्येचा विवाह न करितां तिला आजन्म अविवाहित ठेवावी ह्मणजे झालें. राजानें ती गोष्ट निरुपाय ह्मणून कबूल केली. कदाचित् राजकन्या स्वतःच कोणाबरोबर विवाह करील ह्मणून राजानें तिला एका महालांत ठेवून त्या महालांत पुरुषांचा मुळींच प्रवेश होणार नाहीं, अशी व्यवस्था करून ठेविली. उषेला फक्त कैलासपर्वतावर शंकराची पूजा करण्यासाठीं जाण्याची परवानगी होती, त्यावांचून अन्य कोणत्याहि कारणासाठीं उषेला आपल्या महालाच्या बाहेर पडतां येत नसे. तिची सखी चित्ररेखा या नांवाची होती, ती उषेला रोज प्रदोषकाळीं विमानांत बसवून शंकराच्या पूजेसाठीं कैलासीं नेत असे.

## २ उषा स्वप्न.

एके दिवशीं रोजच्या नियमाप्रमाणें उषा विमानांत बसून कैलासपर्वतावर शंकराच्या पूजेसाठीं गेली होती, त्यावेळीं शंकर पार्वतीसह सारीपाट खेळत बसले होते; तें पार्वतीचें पतिसुख पाहून उषेला स्वतःच्या दुःस्थितीबद्दल फार खेद वाटूं लागला. आणि मनांत म्हणाली, 'हे देवी पार्वती, या तुझ्या मुलीला या अशा तारुण्यावस्थेंत हें पतिसुख नाहीं हें तुझ्या कसें लक्षांत येत नाहीं!' पार्वतीनें उषेच्या अंतःकरणाची ती तळमळ लागलीच ओळखिली. व तिला अश्वासन देऊन म्हणाली; 'तूंहि लवकरच पति सुखाचा अनुभव घेशील. येत्या वैशाखशुद्ध द्वादशीच्या दिवशीं तुला एक स्वप्न पडेल, त्या स्वप्नांत तूं जो पुरुष पाहशील, त्या पुरुषाबरोबरच तुझा विवाह होईल.' उमादेवीनें उषेला याप्रमाणें अश्वासन दिल्यावर तिला फार आनंद झाला व ती शंकराची पूजा करून चित्ररेखेसह आपल्या मंदिरांत परत आली. त्या दिवसांपासून उषेला द्वादशीचा ध्यास लागला होता. ती आपल्या सखीला वारंवार द्वादशी कधीं येईल म्हणून विचारीत असे. द्वादशी पर्यंतचे दिवस उषेला युगाप्रमाणें वाटत होते. एकेक दिवस ती मोठ्या कष्टानें कंठित होती, शेवटीं तो द्वादशीचा दिवस एकदांचा उगवला. त्या दिवशीं उषेला स्वप्नांत कोणता पुरुष दिसणार, याची मोठी हुरहुर लागली होती. त्या दिवशीं तिनें मंगलस्नान केलें, उत्तम प्रकारचें वस्त्र परिधान केलें, आणि

आपला निजावयाचा पलंग उत्तम शृंगारून त्यावर जाऊन ती निजली. उषेला कोणतें स्वप्न पडतें, व स्वप्नांत तिची काय अवस्था होते; हें पाहण्यासाठीं तिची सखी चित्ररेखा, रात्रभर त्या पलंगाजवळ बसून होती. रात्रींचा प्रथम प्रहर संपल्यावर दुसऱ्या प्रहरांत उषेला स्वप्न पडण्यास आरंभ झाला. उषा पलंगावर पाय लांब करून निजली होती, परंतु स्वप्नांत दिसणारा पुरुष तिच्या मंचकाजवळ आल्याबरोबर, उषेनें आपले पाय वर सरकवून घेतले, त्यावरून स्वप्नांत दिसणाऱ्या पुरुषाला उषेनें पलंगावर बसवून घेतलें असें चित्ररेखेनें ओळखलें. त्यावेळीं उषेचा चेहरा सस्मित दिसूं लागला. त्यावरून ती त्या पुरुषाबरोबर हंसत आहे, असें चित्ररेखेनें जाणलें. नंतर एखाद्या पुरुषास आलिंगन द्यावें त्याप्रमाणें उषेनें आपले बाहू केले, आणि झोंपेंत तिनें आपलें थोडें तोंड फिरविलें. त्यावरून तिनें आपला गाल चुंबनासाठीं स्वप्नांतील पुरुषा पुढें केला असें चित्ररेखेच्या लक्षांत आलें. याप्रमाणें चित्ररेखा उषेची ती झोंपें-तील रम्यलीला पहात असतां उषेचा चेहरा एकाएकीं भयाकुल झालेला दिसला, इतक्यांत उषाहि जागी होऊन, घाबरलेल्या अवाजानें म्हणाली; "माझे पति आतां पलंगावर बसलेले होते, आणि इतक्यांत कोठें गेले !" असें म्हणून उषा वेड्याप्रमाणें इकडे तिकडे पाहूं लागली. ती तिची स्थिति पाहून चित्ररेखा म्हाणाली; 'वेडे, स्वप्नांत पाहिलेला पुरुष तूं येथें शोधलास तर कसा मिळणार !' उषा म्हणाली; 'चित्ररेखे, स्वप्नांत पाहिलेल्या पुरुषाची विरहबाधा मला क्षणभर देखील सहन होत नाहीं, त्याची व माझी भेट लवकर होईल, अशी कांहीं तरी व्यवस्था कर.' चित्ररेखा म्हणाली; 'उषे तूं त्यासंबंधानें मुळीं देखील काळजी करूं नको, तूं त्या पुरुषाचें नांव व गांव सांग, म्हणजे मी त्यास आतां विमानांत बसवून घेऊन येतें.' चित्ररेखेचें हें बोलणें ऐकून उषा गोंधळून गेली, ती म्हणाली; 'चित्ररेखे, मी त्या पुरुषाचें नांव व गांव मुळींच विचारलें नाहीं. तेव्हा चित्ररेखा म्हणाली; 'जर त्याचें नांव व गांव माहीत नाहीं, तर मी तरी त्याला कशी शोधून आणणार ?' हें ऐकून उषेस फार वाईट वाटूं लागलें, ती डोळ्यांतून अश्रू गाळूं लागली, आणि त्या विरहव्यथेमुळें वेडयासारखें करूं लागली. तिची सखी चित्ररेखा फार कुशल होती, पण त्या पुरुषाचें नांव माहित नसल्यामुळें तिचाहि निरुपाय झाला होता, अशा स्थितींत आपल्या सखीची समजूत कशी करावी हें तिला मुळींच कळेना. इकडे उषा तर स्वप्नांतील पुरुषासाठीं अगदीं व्याकुळ झाली होती. मग चित्ररेखेनें अशी युक्ति योजिली कीं अनेक देशाच्या राजांचीं चित्रें उषेस दाखवावीत, म्हणजे त्यांत तिचा पति असल्यास ती ओळ-खील. आणि अशा रीतीनें त्या पुरुषाची ओळख झाल्यावर आपण त्यास घेऊन येऊं. चित्ररेखेनें उषेला त्याप्रमाणें सांगून तिला आपल्या जवळ बसविलें, व आपण रंग वगैरे साहित्य घेऊन चित्रें काढूं लागली.

जशी आकृति असेल तशी ती बरोबर कढावयाची, या कलेंत चित्ररेखा अत्यंत निष्णात होती, या तिच्या गुणावरूनच तिला चित्ररेखा असें नांव मिळालें होतें. प्रथम तिनें स्वर्ग लोकांतील इंद्र, वरुण, गंधर्व, वगैरे अनेकांचीं चित्रें काढून उषेस दाखविलीं. तीं चित्रें पाहून उषा म्हणाली; 'यांत मी पाहिलेला पुरुष मुळींच नाहीं.' मग चित्ररेखेनें भूतलावरील सर्वांचीं चित्रें लिहिलीं. तीं पाहूनहि उषा निराश झाली, मग पाताळांतील सर्वांचीं चित्रें तिनें काढलीं तीं पाहून उषा पूर्ण निराश झाली. ती म्हणाली; 'चित्ररेखे, यांत माझा पुरुष दिसत नाहीं. सखे, आतां त्याचा शोध लागण्याचा मुळींच संभव दिसत नाहीं. त्या पुरुषाची मी स्वप्नांत कां होईना; पण अर्धांगी झालेली आहे. ज्या स्त्रीच्या हातून पतिसेवा घडत नाहीं, ती महापापी होय असें शास्त्र आहे, तेव्हां मजसारख्या पापी स्त्रीनें जिवंत राहण्यापेक्षां मरणेंच चांगलें. तो पुरुष प्राप्त होण्याची कांहींच आशा नसेल तर मी आपला प्राणत्याग करीन.' चित्ररेखा उषेच्या डोळ्यांतील अश्रु पुसून म्हणाली; 'बाई उषे, अद्यून निराश होऊं नकोस, श्रीकृष्णाच्या द्वारका नगरींतील पुरुषांचीं चित्रें काढावयाचीं राहिलीं आहेत, त्यांत तुझा पति खात्रीनें असेल, असें म्हणून चित्ररेखेनें प्रथम श्रीकृष्णाचें चित्र काढल, तें पाहून उषा म्हणाली; 'गडे चित्ररेखे, माझ्या पतीचा चेहरा श्रीकृष्णासारखाच आहे असें मला वाटतें. अंग आकृति अशीच आहे, पण वर्ण गौर आहे.' नंतर चित्ररेखेनें श्रीकृष्णाचा वडील मुलगा मदन, याचें चित्र काढलें. तें पाहून उषेला हाच आपला पति असावा असा संशय पडला; पण तें चित्र नीट न्याहाळून पाहून ती म्हणाली; 'चित्ररेखे, याच्याचसारखा आहे, पण हा नाहीं. अंग, रंग, आकृति वगैरे याच्याचप्रमाणें आहे, पण हा जरा प्रौढ आहे, आणि माझा पति अगदीं तरुण आहे.' हें ऐकून चित्ररेखा हंसत ह्मणाली: 'सखे उषे, तूं फार भाग्यवान आहेस. यादवांच्या वंशातील पुरुष तुला पति मिळाला आहे. प्रत्यक्ष द्वारकाधीश भगवंत श्रीकृष्ण यांच्या नातवाशीं तुझा विवाह होणार असें दिसतें.' असें ह्मणून चित्ररेखेनें मदनाचा मुलगा अनुरुद्ध, याचें चित्र काढलें. तें पाहून उषा एकदम ह्मणाली; 'गडे, हाचगे हाच.' असें ह्मणून उषेनें चित्ररेखेच्या हातांतून तें चित्र आपल्या हातांत घेतलें व तें वंदन करून त्याचें तिनें प्रेमानें चुंबन घेतलें. नंतर उषा ह्मणाली; 'गडे चित्ररेखे, मृगजळानें जशी तृषा शांत होत नाहीं, तसें या चित्रानें माझें काय समाधान होणार आहे बरें ? तर सखे, या अनुरुद्धाची व माझी भेट होईल अशी कांहीं व्यवस्था कर, आणि तसें होण्यासारखें नसल्यास मला स्पष्ट सांग, ह्मणजे मी आपला प्राणत्याग करून मोकळी होते.' चित्ररेखा उषेस अश्वासून ह्मणाली; 'उषे, आतां तूं मुळीं देखील काळजी करूं नको, मी आतां द्वारकेंत जाते, आणि सूर्योदय झाला नाहीं तों अनुरुद्धास तुझ्याकडे घेऊन येते. तोंपर्यंत तूं सावधपणें

स्वस्थ रहा." चित्ररेखा असें ह्मणून, ज्या पादुकाच्या योगानें आकाशांत त्वरेनें गमन करितां येतें, त्या चिंतामणी पादुका घालून, लागलीच आकाशमार्गानें द्वारकेस आली. सर्व तीर्थें समावृत्त झालेल्या पवित्र द्वारकानगरीला वंदन करून, ती शहरांत जाऊं लागली; परंतु द्वारकेसभोंवतीं सुदर्शनचक्र फिरत असल्यामुळें, तिला शहरांत जातां येईना. इतक्यांत नदीतीरीं तिची व नारदमुनीची गांठ पडली; तेव्हां तिनें नारदास सर्व वृत्तांत कळवून द्वारकेंत जाण्याचा उपाय विचारला.

नारद हा अत्यंत कलहप्रिय होता. भांडण, तंटे, लढाया, हीं पाहून त्याला मोठा आनंद होत असे. भांडणतंट्यावांचून त्याचा एक दिवस देखील सुनका जात नसे. ज्या दिवशीं भांडणतंटा होण्याचें कांहींच चिन्ह दिसत नसे, त्या दिवशीं नारद कुत्र्यांनां भाकरी घालून त्यांचें भांडण लावित असे. अनिरुद्ध आणि उषा यांचा विवाह झाल्यास, मोठें रणकंदम माजेल व बरीच गंमत दृष्टीस पडेल; असें जाणून नारदानें चित्ररेखेला, सुदर्शन चक्रावर टाकण्यासाठीं एक मंत्र सांगितला. त्या मंत्रामुळें सुदर्शन चक्रापासून श्रीकृष्णांच्या भक्तांनां मुळींच त्रास होत नसे. चित्ररेखेनें सुदर्शन चक्रावर तो मंत्र टाकून द्वारकेंत प्रवेश केला, व लागलीच ती अनिरुद्ध निजला होता त्या महालांत आली.

### ३ उषा–अनिरुद्ध भेट.

इकडे अनिरुद्धाची अवस्थाहि उषेप्रमाणेंच झाली होती. त्यालाहि त्याचरात्रीं स्वप्न पडून, स्वप्नांत उषा दृष्टीस पडली होती. चित्ररेखा त्याच्या महालांत गेली त्यावेळीं, तो आपल्या पलंगावर कामशरानें विव्हल झाल्याप्रमाणें दिसत होता. त्यानें आपल्या तांबूल पात्रांतून विडा घेतला तो कानावर ठेवला, आणि फुलें घेऊन तीं तोंडांत घालूं लागला. इतक्यांत त्याची दृष्टि चित्ररेखेकडे गेली, व तिला पाहून तो कांहींसा भानावर आला; पण त्या अनोळखी स्त्रीला आपणाकडे एकदम आलेली पाहून, त्याला थोडी भीतिहि वाटली. तो तिला ह्मणाला; "बाई, तूं कोण आहेस ? आणि एकाएकीं येथें कशासाठीं आली आहेस ?" चित्ररेखा म्हणाली; "अनिरुद्धा, मी उषेची सखी आहे, तिनें आज तुला स्वप्नांत पाहिल्यापासून तिची अवस्था अगदीं वेड्यासारखी झाली आहे. तूं जर लवकर आला नाहींस तर कदाचित ती प्राणत्याग देखील करील. तेव्हां एक पळहि फुकट न घालवितां तूं आतांच्या आतां माझ्याबरोबर चल." अनिरुद्धास यावेळीं काय करावें तें कळेना. उषेकडे एकदम जावें असें त्यास वाटें, परंतु चित्ररेखेच्या बोलण्यावर त्याचा विश्वास बसेना. न जाणो, ही कदाचित कोणी भलतीच स्त्री असेल आणि माझा नाश करण्याच्या हेतूनें मला फसवित असेल. तसेंच आपण आपला बाप व आजा यांनां विचारल्यावांचून कसें जावें ? असाहि त्यास विचार पडला. अनिरुद्ध अशाप्रकारें विचार करीत आहे, हें चित्ररेखेच्या तेव्हांच

लक्षांत आलें. यानें असा विचार करून रात्र घालविल्यास, तिकडे उषा प्राण त्याग करील, या भयानें अनिरुद्धास चित्ररेखेनें मोहिनी मंत्रानें मोहिनी घातली, व त्यास तशा स्थितींत पलंगासह उचलून शोणितापुरच्या उषेच्या महालांत आणलें. उषा चित्ररेखेची अगदीं वाट पहात बसली होती. चित्ररेखा अनिरुद्धाला घेऊन आलेली पाहून, उषेस जो आनंद झाला; त्याचें वर्णन करणें कठिण होय. तो चित्ररेखेला कडकडून आलिंगन देऊन ह्मणाली; "गडे, चित्ररेखे, तुझे हे माझ्यावर अनंत उपकार झाले आहेत. या तुझ्या ऋणांतून मीं कधीं देखील मुक्त होणार नाहीं. तूं मला जिवदान दिलेंस. तूं मला सौभाग्यवती केलीस. पतिसुखाचा ठेवा मला केवळ तुझ्यामुळें लाधला." हें ऐकून चित्ररेखा ह्मणाली; "उषे, मी यांत कांहीं देखील विशेष केलें नाहीं. असें करणें माझें कर्तव्यच आहे. बरें, मी आतां बाहेर बसतें. तूं आपल्या पतीच्या पलंगाजवळ बैस. मोहिनी मंत्रामुळें तो स्वस्थ निजलेला आहे. त्याची मोहिनी आतां लवकरच दूर होईल. तो जागा झाला ह्मणजे, त्याचा चांगला आदरसत्कार कर." असें सांगून चित्ररेखा तेथून निघून गेली. नंतर उषा अनिरुद्धाच्या पलंगाजवळ जाऊन उभी राहिली, अनिरुद्धाचें तें मनोहर मुखकमळ पाहून उषा आपलें देहभान विसरूं लागली. सूर्याला पाहून कमळणीला जसा आनंद होतो, अथवा चंद्राला पाहून रोहिणीला जसा हर्ष वाटतो, तशी अवस्था त्यावेळीं उषेची झाली होती. पलंगाजवळ उभी राहून ती आपल्या पतीला वाळ्याच्या पंख्यानें वारा घालूं लागली, तेव्हां तो झोंपेंतून जागें व्हावें त्याप्रमाणें देहभानावर आला. डोळे उघडून पाहतो तों, जवळ उषा विनयानें उभी असून वारा घालीत आहे. हा प्रकार बघून, अनिरुद्धास प्रथम आपण झोंपेंत असून स्वप्न बघत आहों, असें वाटलें; पण हें स्वप्न नसून, हा सर्व प्रकार आपण जागृतावस्थेंतच पहात आहोंत, अशी त्यानें आपली लागलीच खात्री करून घेतली. प्रत्यक्ष समोर उभ्या असलेल्या उषेला पाहून अनिरुद्धास मोठा हर्ष झाला; पण थोड्या वेळांपूर्वीं जिला आपण स्वप्नांत पाहिलें, ती इतक्या लवकर आपणाजवळ आली कशी ? याचें त्यास मोठें गूढ पडलें. त्यास तो प्रकार कांहींच कळेना. तो साभिनयनानें उषेकडे पहात होता; पण तिजबरोबर बोलण्याचें त्याला धैर्य होईना. इकडे प्रभात काळ होण्याचा समय आला, पहांटेचा गार वारा सुटला, पक्षी मंजूळ स्वरानें गाऊं लागले, तेव्हां अनिरुद्धास आपण कोठें आहोंत, आणि कोणत्या स्थितींत आहोंत, तें कांहींच उमजेना. त्याचें डोकें या विचारानें त्रस्त झाल्यामुळें तो तोंडावर शेल्याचा पदर घेऊन स्वस्थ पडला, तेव्हां उषेनें तोंडावरील पदर हळूच काढून ती-स्मित करून ह्मणाली; "हें काय, आतां चांगलें उजाडलें आहे, आपण प्रातरविधी आटोपा, हें येथें मुखमार्जनासाठीं पाणी ठेविलेलें आहे, मंगल स्नानाची तयारी केलेली आहे, स्नान करून

उपहार करा, आणि मग विश्रांति घ्या." उषेचें हें मंजूळ बोलणें ऐकून, त्याची सर्व भ्रांति दूर झाली. आपणाशीं जी बोलत आहे ती उषाच आहे, अशी त्याची खात्री झाली; पण उषेच्या महालांत आपण एकाएकीं कसें आलों ? तें त्याला मुळींच उमजेना. इतक्यांत त्याची दृष्टि चित्ररेखेकडे गेली. तेव्हां तो चित्ररेखेला ह्मणाला. "चित्ररेखे, तूं रात्रीं उषेसंबंधानें हकीकत सांगितल्यावर, मी येथें कसा आलों, वगैरे प्रकार मला कांहींच कळत नाहीं, तर तेवढा माझा भ्रम दूर कर." मग चित्ररेखा हंसत हंसत ह्मणाली; "अनिरुद्धा, तुला उषेकडे जावें कीं जाऊं नये, असा विचार उत्पन्न झाल्यावर, मी मोहिनी मंत्रानें तुला निद्रिस्थ केलें, आणि पलंगासह उचलून, द्वारकेहून या शोणितपुराला आणलें. येथून द्वारका अकरा सहस्र योजनें दूर आहे. मला आपल्या सखीसाठीं तुला अशा रीतीनें अणावें लागलें, याबद्दल क्षमा कर." चित्ररेखेनें याप्रमाणें अनिरुद्धाचा भ्रम दूर केल्यावर अनिरुद्ध निश्चित झाला, व तो मोठ्या आनंदानें उषेच्या महालांत राहिला. त्या दोघीहि कोणाला कळणार नाहीं अशा रीतीनें अनिरुद्धाचा आदरसत्कार करीत होत्या. सायंकाळीं भोजन वगैरे झाल्यावर, मध्यरात्रीचे सुमारास चित्ररेखेनें अनिरुद्धाचें व उषेचें यथाविधि गांधर्वपद्धतीनें लग्न लावून दिलें. बाई प्रभावती, याप्रमाणें त्या उषेचा व अनिरुद्धाचा विवाह झालेला आहे." ही कथा ऐकून प्रभावती हंसिणीला ह्मणाली; "गडे हंसिणी, बाणासुराच्या सहस्र भुजा कशा तुटून पडल्या तें ऐकण्याची माझी फार इच्छा आहे, तर ती कथा मला सांग." तेव्हां हंसिणी ह्मणाली; "तीहि कथा मी तुला सांगतें."

---

## अध्याय ७ वा.

### १ बाणासुर व अनिरुद्ध यांचें युद्ध.

हंसिणी म्हणाली, "प्रभावती, बाणकन्या उषा, व अनिरुद्ध यांचा विवाह होऊन ते उभयतां दांपत्यसुखाचा अनुभव घेऊं लागले; पण इकडे एके दिवशीं राजवाड्यासमोर उभा केलेला ध्वजस्तंभ एकाएकीं मोडून खालीं जमिनीवर आडवा पडला. तें भयंकर अपशकुनाचें चिन्ह अवलोकन करून, बाणासुर राजाच्या पोटांत चर्र झालें. त्यास असें होण्याचें कारण काय ? तें कळेना! इतक्यांत तेथें कांहीं कारणासाठीं उषा आली होती, तिच्याकडे राजाची दृष्टि गेली. तेव्हां तिच्या स्थितींत पुष्कळच फरक पडला आहे, असें बाणासुराच्या लक्षांत आलें. मग त्यानें एका हुशार दासीला, उषेच्या महालांत जाऊन-तेथें कोणी पुरुष आहे कीं काय-तें पाहून येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्या दासीनें

युक्तीनें सर्व शोध करून, कांहीं वेळानीं उषेच्या महालांतील सर्व प्रकार बाणासुराला निवेदन केला. उषेचें तें विलक्षण चरित्र ऐकून, बाणासुराच्या तळव्याची आग मस्तकाला गेली. त्यानें लागलीच आपल्या दूतांनां बोलावून आणून, त्यांनां उषेच्या महालांत आलेल्या पुरुषाला, पकडून आणण्यास सांगितलें. ती राजाज्ञा होण्याबरोबर ते भयंकर दूत एकदम आपापलीं शस्त्रास्त्रें घेऊन, उषेच्या महालाकडे धांवून गेले. राजदूत आपल्या महालावर चालून येत आहेत हें पाहून उषा फारच घाबरली, व आतां आपलें पतिनिधान हरपणार असें वाटून, ती शोक करूं लागली. तिची ही स्थिति पाहून अनिरूद्धास मोठें आश्चर्य वाटलें, तो म्हणाला; "उषे, एकाएकीं तूं घाबरूनजाऊन अशी रडतेस कां?" तेव्हां उषा आपल्या पतीला आलिंगन देऊन, रुदन करीत म्हणाली; "मी तुमचा सर्वस्वी घात केला. माझ्या बापाला हा सर्व प्रकार कळल्यामुळें त्यानें तुम्हाला पकडून नेण्यासाठीं आपले दूत पाठविले आहेत. ते तुम्हाला आतां येऊन पकडून नेतील. तुह्मांवर हा असा प्रसंग येण्यास, सर्वस्वी मीच कारण आहे. मी तुमची स्त्री नसून, तुह्माला वैरीण मात्र झालें आहे." उषा याप्रमाणें विव्हल अंतःकरणानें अनिरुद्धास ती हकीकत सांगत होती. पण अनिरूद्ध ती हकीकत ऐकून निर्भयपणें हंसत होता. तो उषेला ह्मणाला; "उषे, एवढया क्षुल्लक कारणावरून तूं एवढी घाबरलीस! याबद्दल मला फार आश्चर्य वाटतें. तूं मुळींदेखील भिऊं नकोस. मजबरोबर युद्ध करण्यासाठीं तुझ्या बापाचें सर्व सैन्य आलें, तरी मी एकटा त्या सर्वांचा संहार करीन." अनिरूद्ध उषेला याप्रमाणें धैर्य देत आहे, तोंच महालावर बाणासुराचे दूत येऊन दाखल झाले. तेव्हां त्याप्रसंगावधानी अनिरूद्धानें, जवळ कांहीं हत्यार नसल्यामुळें, दाराची अरगळा आपल्या हातांत घेतली, व तो त्या दूतांच्या अंगावर धांवून जाऊन त्यांचा संहार करूं लागला. बाणासुराचे भित्रे दूत अनिरूद्धाचा तो पराक्रम पाहून, प्राण मुठींत धरून राजपथानें पळूं लागले. तेव्हां अनिरूद्धहि त्यांच्या मागें अर्गळा घेऊन धांवत गेला व त्यानें क्षणार्धांत आपल्या बाहुबलानें हजारों दूतांचा संहार केला. तो प्रकार पाहण्यास शेकडों नगरवासी लोक गोळा झाले होते. अनिरूद्धाचा तो अतुल पराक्रम व सुंदर आकृति पाहून, नगरांतील लोक थक्क होऊन गेले. ते एकमेकांजवळ ह्मणूं लागले; 'अहो, या सुंदर व पराक्रमी वीराबरोबर उषेनें विवाह केला, यांत अनुचित तें काय केलें? बाणानें तर या दोघांचा विवाह मोठ्या आनंदानें करावयाला पाहिजे.' नंतर लवकरच बाणाच्या कानावर दूतांच्या संहाराची गोष्ट गेली. तेव्हां तर तो अधिक चिडला, व आपला सर्व सैन्यभार सिद्ध करून त्यानें अनिरूद्धावर चाल केली. त्यावेळीं अनिरूद्धहि आलेल्या सैन्याशीं दोन हात करण्यास तयारच होता. मेलेल्या सैनिकांचीं चांगलीं चांगलीं हत्यारें त्यानें आपल्या हातांत धारण केलीं, व

बाणाच्या सैन्यावर एकदम तुटून पडून, त्यानें हजारों सैनिकांचा संहार चालविला. अनिरुद्धाचा तो पराक्रम पाहून स्वतः बाणासुरहि त्याचें कौतुक करूं लागला. अशा तरुण, सुस्वरूप व पराक्रमी वीरास उषा देणें हेंच उचित होय; असें त्यालाहि वाटूं लागलें, पण तसें केल्यास आपला सर्वस्वी नाश होईल, या भयानें तो अनिरुद्धाशीं सारखा युद्ध करीत होता. युद्ध कौशल्यांत तो आपली पराकाष्ठा करीत होता तरी, अनिरुद्ध त्याला मुळींच आटोपेना. त्या एकट्या बालवीरानें बाणाचे हजारों सैनिक मारून टाकून, थोड्याच वेळांत रण क्षेत्रावर प्रेतांचे पर्वत तयार करून ठेविले होते. असा तो नरशार्दुळ अनिरुद्ध, मुळींच आटोपत नाहीं असें पाहून, बाणासुर अत्यंत चिंतातूर झाला. शेवटीं त्यानें शंकराच्या प्रसादानें मिळालेलें सर्पास्त्र, अनिरुद्धाच्या अंगावर सोडलें. त्या बरोबर अनिरुद्धासभोंवतीं हजारों प्रचंड सर्प उत्पन्न होऊन, त्यानीं अनिरुद्धाचे हात व पाय बांधून टाकले. या प्रमाणें अनिरुद्ध सर्पबद्ध झाल्यावर त्यास कांहींच करितां येईना. अर्थातच त्यावेळीं तो रणक्षेत्रावर निःचेष्ट होऊन पडला. अशा नाजूक स्थितींत अनिरुद्ध सांपडलेला पाहून, बाणासुर त्याच्या जवळ वेगानें धांवून गेला व अनिरुद्धाला मारून टाकण्याकरितां त्यानें आपली तलवार वर केली. परंतु इतक्यांत कुंभक प्रधान बाणासुराचा हात धरून ह्मणाला; "महाराज, शत्रूस अशा रीतीनें मारणें हा वीराचा धर्म नव्हे. तो नागपाशानें बद्ध झालेला आहेच, तेव्हां कांहीं वेळानें मरून जाईल; हें उघड आहे. मग आपण आपल्या हातानें मारून, उगीच पाप कां जोडून घेतां?" प्रधानाचें हें भाषण ऐकून बाण राजा आपल्या सर्व सैन्यासह नगरांत परत आला. उषेच्या कानावर ती अशुभ वार्ता गेल्यावर ती त्या दुःखानें वेडी होऊन गेली. ती जमिनीवर गडबडां लोळूं लागली, व आपलें मस्तक बडवून घेऊं लागली. त्यावेळीं उषेच्या शोकावस्थेला मुळींच सीमा उरली नव्हती. तिची सखी चित्ररेखा, तिला पदोपदीं समजावित होती; पण त्या विलक्षण प्रसंगीं ती तरी तिला काय सांगून तिची समजूत करणार? परंतु त्या दोघींच्या सुदैवानें त्या वेळीं तेथें नारद मुनी आले, ह्मणून बरें झालें. ते उषेला ह्मणाले; 'उषे, तूं या संबंधानें मुळींच काळजी करूं नको. तुझा पति कुशल असून त्याची व तुझी लवकरच गांठ पडेल. द्वारकेहून आतां श्रीकृष्ण भगवान् येतील व तुला तुझ्या पतीसह घेऊन जातील.' या प्रमाणें नारदानें अश्वासन दिल्यावर उषेला कांहींसें बरें वाटलें. इतक्यांत तिच्या कानावर श्रीकृष्ण भगवानहि ससैन्य आल्याची बातमी आली.

## २ बाणासुर वध.

बाणासुरानें अनिरुद्धास नागपाशानें बद्ध केलें आहे, असें श्रीकृष्णास कळल्याबरोबर ते बलराम, प्रद्युम्न, वगैरे वीरांना सर्व सैन्यासह घेऊन, क्षणार्धांचाहि

विलंब न करितां शोणितापुरास आले. आल्याबरोबर श्रीकृष्णांनीं पांचजन्य शंख मोठ्यानें वाजवून, बाणासुराला युद्धास पाचारण केलें. त्याबरोबर बाणहि ससैन्य श्रीकृष्णाबरोबर युद्ध करण्यासाठीं रणांगणांवर आला. मग लवकरच उभय पक्षाची भयंकर लढाई जुंपली. त्या तुमुल युद्धांत बाणासुराचे हजारों सैनिक श्रीकृष्णाच्या शस्त्रांकडून भराभर मृत्यु मुखीं पडूं लागले. स्वतःच्या सैन्याचा तो विलक्षण संहार पाहून, बाणासुरास जय मिळण्याची मुळींच चिन्हें दिसेनात. तेव्हां त्यानें शंकराची प्रार्थना करून त्यानां साह्यार्थ बोलाविलें. बाण हा शंकरचा वरद पुत्र असल्यामुळें, शंकरास त्यावेळीं श्रीकृष्णाचा साहजिक राग आला व लागलीच आपल्या सर्व सैन्यासह श्रीकृष्णाबरोबर युद्ध करण्यासाठीं कैलासाहून शंकर शोणितापुराला आले. आतां लवकरच भयंकर लढाई होऊन, सर्व पृथ्वी रक्तमय होईल अशी भीति सर्वांनां वाटूं लागली. हें हरिहराचें युद्ध सुरू झाल्यास महा प्रळय ओढवेल असें जाणून अनेक देव दोघांची समजूत करण्यास आले. स्वतः श्रीकृष्ण, महादेवाला म्हणाले; "हे कैलासनाथा, मी बाणासुरास मारण्यास आलों नाहीं, तर त्याचे सहस्र हात तोडून टाकण्यासाठीं आलों आहे. तूंच त्याला असा वर दिला आहेस कीं, यादवाशीं तुझें युद्ध होऊन तुझे सहस्र हात कापले जातील. हे तुझे शब्द खरे करण्यासाठीं मी आलों आहे." ब्रह्मदेवानेंहि महादेवास असेंच सांगितलें, ब्रह्मदेव म्हणाला; 'कैलासपति, तूंच तुझे शब्द असे खोटे करूं लागलास तर कसें चालेल?' हें ऐकून शंकराचा राग शांत झाला, व ते सर्व सैन्यासह आल्या मार्गानें कैलासीं निघून गेले. महादेव याप्रमाणें कैलासीं निघून गेले तरी, बाणासुराचें धैर्य कमी झालें नाहीं. तो आपल्या सहस्र बाहूंनीं प्रत्येक क्षणीं कृष्णावर पांचशें बाणांचा वर्षाव करीत होता, परंतु श्रीकृष्ण तितकेहि बाण तोडून टाकीत आणि बाणाच्या सैन्याचा संहार करीत करीत बाणाच्या रथा जवळ आपला रथ नेत होते. बाणासुरहि मोठ्या वेगानें श्रीकृष्णाच्या आंगावर धांवून येत होता. इतक्यांत बाणासुराच्या रथाचा मयूर मोडला, व त्यास दुश्चिन्हें होऊं लागलीं. तरी तो न डगमगतां पुढें पुढें चाल करीत होता. श्रीकृष्णाच्या बाणानें बाणाच्या रथाचा ध्वज मोडला, सारथी पडला, तरी बाणासुर गत धैर्य झाला नाहीं; हें पाहून, श्रीकृष्णासहि त्याच्या पराक्रमाचें कौतुक वाटलें. इतक्यांत बाणाच्या रथाचे घोडेहि पडले, तेव्हां बाण, हातांत गदा घेऊन रथाच्या खालीं उतरला व कृष्णाच्या आंगावर धांवून आला. तेव्हां श्रीकृष्णानें बाणाच्या अंगावर सुदर्शन चक्र सोडलें. त्या चक्राची गति वाऱ्यापेक्षांहि अधिक होती. त्याचें तेज सूर्यापेक्षाहि अधिक असून त्यास सहस्र धारा होत्या. तें चक्र बाणासुराच्या भोंवतीं गरगर फिरून बाणासुराच्या बाहूचें खंडण करूं लागलें. त्या चक्रानें क्षणार्धांत बाणासुरास फक्त दोन हात ठेवून, बाकी सहस्र हात शरीरापा-

सून वेगळे केले. नंतर श्रीकृष्णानें सुदर्शन आवरून धरलें. बाणानें वर मागून घेतल्याप्रमाणें त्याचे सहस्र बाहू खंडण झाल्यावर त्याचा भ्रम दूर झाला. आपणा समोर द्वारकाधीश श्रीकृष्ण भगवान् उभे आहेत असें त्यास दिसलें; त्या बरोबर त्यांच्या चरणावर बाणानें मस्तक ठेऊन, तो ह्मणाला; 'देवा, अशा निमित्यानें तरी तुझें दर्शन झालें. मी या भवबंधनानें फार कष्टलों आहे, तेव्हां या तापत्रयांतून सुटेन असा मला वर दे.' श्रीकृष्ण म्हणाले; 'बाणा, तूं कैलास पर्वतावर जाऊन शंकराची सेवा करून रहा, म्हणजे तुला समाधान प्राप्त होईल.' त्याप्रमाणें बाणासुर लागलाच कैलासीं निघून गेला. महादेवाचा तो वरदपुत्र असल्यामुळें महादेवानें त्याचें नांव महाकाळ असें ठेवून त्यास पुढें चिरंजीव केलें. असो, युद्ध आटोपल्या नंतर श्रीकृष्ण, अनिरुद्धास नागपाशानें बांधून ज्या कारागृहांत ठेविलें होतें तेथें गेले व अनिरुद्धाचे पाश तोडून टाकून त्यांनीं त्यास मोकळे केले. अनिरुद्ध मोकळा झाल्याबरोबर प्रथम बलरामास आनंदानें भेटला, मग त्यानें श्रीकृष्णास आलिंगन दिलें, आणि नंतर तो आपल्या पित्यास भेटला. त्या आनंदमय प्रसंगीं सुरवरांनीं यादवांवर आकाशांतून पुष्पवृष्टि केली. कारागृहांतून अनिरुद्धास सोडवून घेतल्यावर श्रीकृष्णानीं सर्वांसह शोणितपूर शहरांत मोठ्या आनंदानें प्रवेश केला. त्या वेळीं बाणासुराचा प्रधान कुंभक, बरोबर मानकऱ्यांनां घेऊन श्रीकृष्णास सामोरा आला. त्यानें श्रीकृष्णाच्या पायावर मस्तक ठेऊन भगवंताचे पाय घट्ट धरले; आणि तो ह्मणाला; "देवा, आतां सर्व अपराधाची क्षमा करून नगरवासी जनांचें संरक्षण करावें." कृष्ण कुंभक प्रधानास अभय देऊन ह्मणाले; 'कुंभका, तूं माझा परमभक्त आहेस. माझे जे भक्त आहेत, जे माझ्या ठिकाणीं लीन आहेत, त्यांनां भिण्याचें मुळींच कारण नाहीं.' या प्रमाणें कुंभकाला श्रीकृष्णाकडून आश्वासन मिळाल्यावर कुंभक भगवंतास ह्मणाला; 'देवा, आणखी एक विनंति आहे; ज्या उषेसाठीं एवढें युद्ध झालें, त्या उषेचा व अनिरुद्धाचा विवाहसमारंभ शोणितापुरासच व्हावा, अशी आपल्या सर्व भक्तांची विनंति आहे.' श्रीकृष्णानें तें आपल्या भक्तांचें ह्मणणें कबूल केलें. मग कुंभक प्रधानानें शोणीतपुर उत्तम प्रकारें शृंगारून जिकडे तिकडे गुढ्या तोरणें उभारिलीं, आणि सुमुहूर्त पाहून दोघांचा विवाह केला. त्याप्रसंगीं तो लग्नसोहळा पाहण्यासाठीं सर्व सुरवर आले होते. चार दिवस शोणितापुरास आनंदाचें साम्राज्य माजलें होतें. कुंभक प्रधानानें बाणासुराचें राज्य, संपत्ति, जड, जवाहिर, वगैरे सर्व अनिरुद्धास आंदण दिलें. परंतु श्रीकृष्णानें त्याचा तितक्यावेळांपुरता स्वीकार करून, तें सर्व राज्य कुंभक प्रधानाचे स्वाधीन केलें, आणि त्याला राज्यावर बसवून त्यास राज्याभिषेक केला.

## ३ उषेचें द्वारकेंत आगमन.

उषेस याप्रमाणें अनिरुद्ध पति मिळाल्यावर तिला जो आनंद झाला होता, त्याचें वर्णन करणें कठिण होय. हे सर्व उपकार उषेवर चित्ररेखेचे होते. त्याबद्दल उषा चित्ररेखेजवळ वारंवार कृतज्ञता दर्शवीत असे. त्याबद्दल कोणती वस्तु चित्ररेखेस देऊन, तिच्या उपकार–ऋणांतून मुक्त व्हावें हें उषेस कळेना; आणि खरोखर ते उपकार तसेच होते. पैसा, संपत्ति, अलंकार, वस्त्र; इतकेंच नव्हें तर सर्व साम्राज्यहि त्या उपकाराच्या मोलास पुरेसें नव्हतें. त्या उपकाराचा मोबदला–अंतःकरणपूर्वक कृतज्ञता दर्शविणें एवढा एकच होता; व त्याप्रमाणें उषा कृतज्ञता दर्शवीतहि असे. लग्नसोहळा पुरा झाल्यावर श्रीकृष्ण, उषेला बरोबर घेऊन, द्वारकेला जाण्यासाठीं निघाले; त्यावेळीं वियोग-दुःखानें शोणितपुरच्या प्रजाजनांचे डोळे पाण्यानें भरून आले. मग श्रीकृष्णानीं सर्वांचा निरोप घेऊन, त्यांनां आशिर्वाद दिला व ते द्वारकेच्या मार्गाला लागले. इकडे द्वारकेचे प्रजाजन, गोप, गोपी, वगैरे मोठ्या उत्कंठेनें श्रीकृष्णाची वाट पहात होते. भगवान्, अनिरुद्धास उषेसह घेऊन येत आहेत, असें वर्तमान अगोदरच कळल्यामुळें द्वारकेच्या लोकांनां विलक्षण आनंद झाला होता. ज्या दिवशीं श्रीकृष्ण नगरांत प्रवेश करणार होते, त्या दिवशीं द्वारकेच्या लोकांनीं सर्व शहर उत्तमप्रकारें शृंगारून ठेविलें होतें. राजपथ सडासंमार्जन करून, रंगवल्लिकांनीं सुशोभित केला होता. गुढ्या, तोरणें, निशाणें, केळीचे खांब यांनीं सर्व घरें आलंकृत केलीं होतीं. स्त्रिया हातीं लिंबलोण घेऊन, अनिरुद्ध व उषा यांची दृष्ट काढण्यासाठीं बाहेर येऊन उभ्या राहिल्या होत्या. इतक्यांत श्रीकृष्ण नगराबाहेर आल्याची सुवार्ता लोकांच्या कानावर आली व जिकडेतिकडे मंगल वाद्यें वाजूं लागलीं. श्रीकृष्णानीं नगरांत प्रवेश केल्यावर प्रजाजनांचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले. सर्वांनीं श्रीकृष्णाचा जयजयकार केला. याप्रमाणें वाजत गाजत श्रीकृष्ण भगवंताची स्वारी राजवाड्यांत येऊन पोहोंचली. त्या आनंदमय प्रसंगाचें वर्णन करणें मानवशक्तीच्या बाहेरचें कार्य होय. अनिरुद्धाची आई रति, हिनें रथांतून उषेस उतरून घेऊन तिची दृष्ट काढिली, व तिला आपल्या हृदयाशीं कुरवाळून धरिलें, उषा व अनिरुद्ध यांस बघून सर्वांचीं हृदयें आनंदानें गहिंवरून आलीं. तो आनंदोत्सव द्वारकेंतील प्रजाजनांनीं कित्येक दिवस चालविला होता."

---

# अध्याय ८ वा.

## १ नळ व दमयंती यांची कथा.

अनिरुद्ध व उषा यांची कथा ऐकल्यावर प्रभावती हंसिणीला म्हणाली; " हंसिणी, तूं उषेची कथा माझ्या मनाला समाधान वाटावें म्हणून सांगितलीस खरी; पण ती ऐकून समाधान न वाटतां अधिक काळजी मात्र वाढत चालली आहे. त्या उषेच्या व माझ्या स्थितींत, जमीनअस्मानाचें अंतर आहे. तिचा एवढा कार्यभाग, तिच्या चित्ररेखा नांवाच्या सखीनें घडवून आणला, ती स्थिति माझी कोठें आहे ? तिला जशी चित्ररेखेची मदत होती तशी मला तर कोणाची देखील नाहीं ! मी तर निःसाह्य व एकटी अशी असून या कारागृहांत बंदिवान् झालेली आहे !! मला कधीं पुरुषाचें दर्शन देखील होत नाहीं !!! मग मदनाचा आणि माझा सहवास घडून येणें तर दुष्करच आहे. " हें प्रभावतीचें निराशा जनक उद्गार ऐकून हंसिणी म्हणाली, " प्रभावती, त्या उषेची जशी चित्ररेखा, तशी मी तुझी दासी आहे. तुझ्या अमुल्य स्नेहदानानें मी तुझी ऋणी झालेली आहे. तूं सांगशील तें कार्य करण्यास मी तयार असून–मदनाचा आणि तुझा विवाह व्हावा म्हणून, मी शक्य तो प्रयत्न करीन. तुम्हा उभयतांचा सहवास घडवून यावा अशी माझी फार इच्छा आहे. " प्रभावती म्हणाली; " पण हंसिणी, ती चित्ररेखा जशी शक्तिशाली आहे, तशी शक्ति तुला कोठें आहे ? तूं तर बोलून चालून पक्षीण, तुजकडून मला साह्य तें काय होणार ? " मग हंसिणी म्हणाली; " प्रभावती, एका हंसानें नळराजाचा व दमयंतीचा विवाह घडवून आणला, हें तुला माहीत नाहीं; असें दिसतें. ती कथा जर तुला माहीत होईल तर हंसाचे आंगीं किती सामर्थ्य असतें हें तुला सहज कळून येईल. " तेव्हां प्रभावती ह्मणाली; " गडे हंसिणी, मला ती कथा मुळींच माहीत नाहीं. ती ऐकण्याची मला आतां फार उत्कंठा लागली आहे, तर तेवढी कृपा करून सांग." प्रभावतीनें अशी विनंति केल्यावर, हंसिणी प्रभावतीला नळराजाची कथा सांगू लागली.

" पूर्वी नैषध नांवाच्या देशांत सूर्य वंशांतील वीरसेन या नांवाचा महान पराक्रमी क्षत्रीय राजा होऊन गेला. त्या वीरसेन राजाचा नळ हा पुत्र होय. नळराजा आपल्या बापाप्रमाणेंच पराक्रमी, सत्वशील, पापभीरू व पुण्यशील असा होता. एके दिवशीं राजा नळ, अरण्यांत शिकारी साठीं गेला असतांनां; शिकार करितां करितां तृषाक्रांत होऊन, एका सरोवराचे कांठीं पाणी पिण्यासाठीं गेला. त्या सरोवरांतील निर्मळ उदक आकंठ प्राशन केल्यावर राजा विश्रांति घेण्यासाठीं सरोवराजवळच असलेल्या एका स्फटिक-स्थंडिला-

वर जाऊन बसला; आणि सभोंवतालच्या वनश्रीचें अवलोकन करूं लागला. त्या रम्य अरण्यांतील ती स्वाभाविक असलेली वनश्री पाहून, त्यास मोठी मौज वाटूं लागली. व त्या मनोहर वनश्रीच्या दर्शनानें राजाच्या श्रमाचें परिमार्जन होऊं लागलें. राजा या प्रमाणें त्या सृष्टि-सौंदर्याचें अवलोकन करीत असतांना, त्याची नजर एका कांचना प्रमाणें चमकणाऱ्या राजहंसाकडे गेली. तो मनोहर व अभूतपूर्व पक्षी पाहून, नळास अत्यंत आश्चर्य वाटलें; व त्यास तो पक्षी धरण्याची इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां राजा धनुष्यबाण स्थंडिलावर ठेवून उठला व हळूच पाय न वाजवितां त्या पक्षा-जवळ जाऊन, त्यानें त्या राजहंसास धरलें. राजानें त्या हंसास धरल्याबरोबर हंसानें किंचित स्मित केलें व तो मनुष्या प्रमाणें स्पष्टपणें म्हणाला, " राजा, मला धरलेंस हें बरें केलें, मी येथें तुझ्या दर्शनाची इच्छा धरूनच आलों आहे. तुझ्या सारख्या पुण्यशील राजाचें दर्शन होऊन, माझ्या या क्षुद्र देहाला तुझे पवित्र हात लागले, हें मी आपलें मोठें भाग्य समजतों. राजा, मला आतां तूं मोकळा सोड. मी उडून जाईन अशी तूं मनांत मुळींच कल्पना आणूं नकोस, मी तुला एक आनंदाचें वर्तमान सांगण्यासाठीं मुद्दाम आलों आहे. तुझ्या स्कंधावर बसून तुला तें आनंदाचें वर्तमान सांगतों." तो हंस मनुष्याप्रमाणें अस्खलित भाषण करीत आहे, हें पाहून नळास फारच आश्चर्य वाटलें. मग नळानें त्या हंसाला त्याच्या म्हणण्या प्रमाणें मोकळें सोडून, स्कंधावर बसविलें, नंतर नळराजा त्या हंसाला ह्मणाला; " हे हंसा, तूं कोणाचा तरी दूत आहेस असें मला वाटतें. तुला जें काय सांगावयाचें असेल, तें खुशाल सांग." नळ-राजानें असें अश्वासन दिल्यावर हंस ह्मणाला; " राजा, मी नेहमीं ब्रह्मलोकीं असतों. आज इकडे येत असतांनां, एक सर्वांग सुंदर व तरूण कुमारिका पाहिली. ती तुला योग्य नोवरी आहे; असें मला वाटल्यावरून मी तुझ्या-कडे मुद्दाम आलों आहे. वैदर्भदेशांत कौंडण्यपूर या नांवांचें एक मोठें नगर असून तेथें भीमक या नांवाचा राजा राज्य करीत आहे. त्या राजाला दमयंती या नांवांचीं एक अत्यंत सुंदर कन्या आहे. तिच्याच विषयीं मी तुला सांगणार आहे. त्या दमयंतीच्या स्वरूपाचें वर्णन करण्याची शक्ति बृहस्पतींतहि नाहीं, असें मला वाटतें. तिचा वर्ण कांचनाच्या कमळाप्रमाणें मनोहर असून ती पारिजातकाच्या सुमनाप्रमाणें सकुमार आहे. तिचें तें सहास्य वदन ब्रह्मदेवानें सगळी रमणीयता एका ठिकाणीं करून घडविलें आहे असें वाटतें. तिचे सतेज डोळे, कमानदार भुंवया, सरळ नासिका, चिंचोळी हनुवटी, प्रफुल्ल गुलाबाच्या सुमनाप्रमाणें दिसणारे कपोल, विशाल कपाळ, भ्रमरासहि लाजविणारा केश-कलाप यांनीं ती अत्यंत रमणीय दिसते. ती किती मनोहर आहे हें तिला प्रत्यक्ष पाहिल्यावांचून कळणें अशक्य होय. तसेंच राजा, तिची चालण्याची गति,

आवाजांतील मंजूळ पणा, प्रेमळ व पवित्र नजर, मधूर हास्य; तेंहि तिचें अनुपमेय आहे. राजा, ती जशी बाहेरून लावण्यलतिका दिसते, त्याप्रमाणें तिचें अंतःकरणहि अत्यंत पवित्र व थोर आहे. तिच्या हृदयांत दयेचा केवळ सागरच सांठविलेला आहे. असें हें रम्य स्त्री रत्न तूं प्रयत्न करून मिळवावेंस अशी माझी इच्छा आहे."

## २ हंस संदेश.

हंसानें दमयंतीचें केलेलें वर्णन ऐकून, नळराजास, ती मिळविण्याची साहजिक इच्छा झाली. तेव्हां नळ त्या हंसाला ह्मणाला: "हंसा, तूं मजसाठीं अशा प्रकारचें स्त्रीरत्न शोधून काढलेंस, याबद्दल मी तुझा फार ऋणी आहे, पण हंसा, यावेळीं तूं माझा दूत होऊन, पुढील कामगिरीहि तूंच केली पाहिजेस. तूं कौंडिण्यपुरीं जाऊन, दमयंतीला भेट; आणि तिला माझा संदेश कळवून, ती मजबरोबरच विवाह करील अशी कांहीं तजवीज कर. मी तुला आपला सखा समजतों, आपल्या मित्रासाठीं तूं शक्य तितकी खटपट करिशील अशी मला खात्री आहे." नळाच्या तोंडचें हें वाक्य पुरें होतें न होतें तोंच, हंस, राजाची आज्ञा शिरसावंद्य करून, त्याच्या स्कंधावरून उडाला; व मोठ्या वेगानें आकाश मार्ग आक्रमण करून, कौंडण्यपुरास येऊन पोंहोंचला. नंतर तो कौंडण्यपुरांतील भीमक राजाच्या प्रासादाच्या मागच्या बाजूला, एक विस्तीर्ण व अत्यंत रम्य असें उद्यान होतें; त्या उद्यानांतील एका सरोवराचे कांठीं स्वस्थ विश्रांति घेत बसून, दमयंतीची वाट पाहूं लागला. ऊष्ण काळचे दिवस असल्यामुळें, त्यावेळीं दमयंती प्रत्यहि सायंकाळच्या समयीं, त्या उद्यानांत आपल्या सख्यांसह येत असे. रोजच्या नियमाप्रमाणें त्यादिवशींहि ती त्या उद्यानांत आली असतांनां, प्रथमच तिची नजर—हंसाच्या अपूर्व कांचन कांतीमुळें—साहजिक त्या हंसाकडे गेली. हंस त्यावेळीं, आपण अगदीं बेसावध आहों असें दाखवून सरोवराच्या कांठावर बसला होता. 'हा असा मनोहर सुवर्णाप्रमाणें चमकणारा पक्षी, हातीं लागल्यास, आपण त्याला आपल्या सुंदर पिंजऱ्यांत ठेवूं.' अशी दमयंतीला इच्छा उत्पन्न होऊन, ती हळूच पाय न वाजवितां त्या हंसाजवळ गेली. आतां ती त्या हंसाला धरणार, इतक्यांत तो हंस तेथून उडून, थोड्या अंतरावर जाऊन बसला. दमयंती पुनः त्या हंसाजवळ गेली व त्याला धरूं लागली, पण तो हंस पुन्हां आणखी थोडा पलीकडे गेला. अशा प्रकारें त्या हंसानें दमयंतीला तिच्या सख्यांपासून बरेंच लांब आणलें; आणि नंतर तो तिच्या हातीं सांपडला. हंस हातांत सांपडल्याबरोबर दमयंतीला मोठा आनंद झाला. त्यावेळीं इकडे हंसहि मनुष्याप्रमाणें स्मित करूं लागला. तें मनुष्याप्रमाणें हंसाचें हंसणें पाहून, दमयंती चपापली व ती त्या हंसाला सोडून देऊं लागली. तेव्हां तो हंस ह्मणाला; "दमयंती, तूं अगदीं

भिऊं नकोस. मी कोणी यक्ष किंवा राक्षस नसून ब्रह्मलोकीं राहणारा हंस आहे. ब्रह्मलोकचे हंस मनुष्याप्रमाणें स्पष्ट बोलतात, हें तुला माहीत नाहीं असें दिसतें. तुझें दर्शन घ्यावें ह्मणून मी मुद्दाम तुझ्याकडे आलों आहे. या भूमंडळावर, तूं अत्यंत रूपवती आहेस, असें समजल्यावरून मला तुझ्या दर्शनाची साहजिक इच्छा झाली, व ह्मणून मी तुजकडे आलों. खरोखर तुझें हें अतुलनीय स्वरूप व ही मनोहर अंगाकृति पाहून, मला आपल्या डोळ्यांचें सार्थक झाल्यासारखें वाटतें. शिवाय तूं सत्वशील, पवित्र व पापभीरू असल्यामुळें तुझ्या हस्त स्पर्शानें मी पुनित झालों, असें मला वाटतें. खरोखर तुला निर्माण करितेवेळीं ब्रह्मदेव अगदीं एकचित्त होता असें वाटतें. पण दमयंती, अति चांगूलपणा हा देखील वाईटच होय. तुझ्या योग्य तुला जर पति मिळाला तर या सर्व गोष्टीची शोभा, नाहीं तर कावळ्याच्या गळ्यांत माणिक बांधावें त्याप्रमाणें तुझी स्थिति होणार आहे. मी सर्व त्रिभुवनीचे पुरुष पाहिले आहेत, पण त्यांत मला तुझ्या योग्य कोणीहि दिसत नाहीं. अमरावतीचा इंद्र, हा अत्यंत स्वरूपवान आहे हें खरें, पण त्याचें वर्तन बरोबर नाहीं. यमाचे गुण गायला लागावें तर तो निष्ठुर आहे, हें तुला प्रथमच सांगावें लागणार. पृथ्वीवरील भूपाळ तर मला दगडाप्रमाणें गोटे दिसतात. त्यांच्याबरोबर तुझ्यासारख्या कमलिनीचा विवाह होणें, कधींहि श्रेयस्कर होणार नाहीं. परंतु एक पुरुष मात्र अगदीं तुझ्या योग्य आहे, असें मला वाटतें. त्यानें जर तुझा स्वीकार केला, तर खरोखरच तूं मोठ्या भाग्याची आहेस असें म्हटलें पाहिजे. नैषध-देशचा राजा नळ, यावांचून मला तर तुझ्या योग्य असा कोणीहि दिसत नाहीं. तो अत्यंत सौंदर्यशाली, तरुण व फार पराक्रमी आहे. त्याच्यासारखा सच्चरित्र, सत्वशील, पुण्यवान, प्रेमळ व पवित्र कोणीहि नाहीं, असें मला वाटतें. तो सर्व शस्त्रास्त्र-विद्येंत निपूण असून फार विद्वान आहे. तुझा आणि त्याचा विवाह झाल्यास सुवर्णाच्या कोंदणांत हिरकणी बसवावी, त्याप्रमाणें होणार आहे. मी जातीनें पक्षी आहे, तेव्हां मला या भानगडींत पडण्याचें कांहीं कारणहि नाहीं; पण तुझें तारुण्य, तुझा सुकुमारपणा, तुझी विनयशीलता व तुझी सुशीलता पाहून, तुला तुझ्या योग्य पति मिळावा, असें मला साहजिक वाटतें. मी सर्व ठिकाणीं संचार करीत असल्यामुळें, अनेक राजांची मला माहिती आहे, त्यांत नळ हाच एक तुझ्या योग्य वर आहे. म्हणून तूं त्यालाच वरण्याचा प्रयत्न कर."

त्या हंसाचें हें बोलणें ऐकून, तारुण्यानें मुसमुसलेल्या दमयंतीला साहजिक कामव्यथा होऊं लागली. ती त्या हंसावर एकदम विश्वास टाकून म्हणाली; "हे हंसा! त्या नळराजाविषयीं मी देखील ऐकिलें आहे; पण त्याची ही स्थिति मला तूं सांगितली नसतीस, तर बरें झालें असतें. हें ऐकिल्यापासून माझी मनोव्यथा अधिक दुणावली आहे. विस्तवावर तूप टाकल्यानें, तो न विझतां

जसा अधिक पेटतो, त्याप्रमाणें माझी स्थिति झाली आहे. त्याचा व माझा योग कसा घडून येईल ? हें जर तूं सुचवशील, तर मजवर तुझे फार उपकार होतील. माझें हित व्हावें अशी तुझी इच्छा आहे, तेव्हां याकामीं तूं प्रयत्नहि केला पाहिजेस.'' दमयंतीचें तें प्रास्ताविक भाषण ऐकून हंसाला मोठा आनंद झाला. तो तिला म्हणाला; " दमयंती, यांत कठिण असें कांहीं नाहीं, तूं आपल्या बापाला सांगून स्वयंवर करण्याचें ठरीव, आणि स्वयंवराचे वेळीं नळराजाचे गळ्यांत माळ घाल, म्हणजे झालें. तो तुझ्या स्वयंवराला येईल, अशी मी अवश्य तजवीज करीन. " हंसाचें तें भाषण ऐकून दमयंतीला फार आनंद झाला. ती म्हणाली; " हंसा, एवढें कार्य तूं जर करशील, तर तुझें मजवर अनंत उपकार होतील. तूं नळाकडे जाऊन, ते माझा स्वीकार करितील, अशा-प्रकारें त्यांचें मन वळीव. तुला मी आपल्या बंधुप्रमाणें समजतें. तुझ्यावर मी सर्व विश्वास टाकला आहे. तूं आपल्या या बहिणीचें हें कार्य करिशील, असा मला भरंवसा आहे " तेव्हां हंस म्हणाला; " दमयंती, तूं त्यासंबंधानें कांहीं देखील काळजी करूं नको. मी हा आतांच नळराजाकडे जाऊन, त्यास हें आनंददायक वर्तमान कळवितों. " असें म्हणून हंस लागलाच तेथून उडून आकाशपंथानें निघून गेला.

## ३ दिक्पाळांची लालसा.

हंस, दमयंती पासून निघून गेल्यावर, दमयंतीची अवस्था नळ राजाच्या विचारानें मोठी चमत्कारिक झाली होती. आपण इतकें तरुण झालों असून, अझून आपल्या विवाहाची आपला बाप कांहींच तजवीज करीत नाहीं; याबद्दल दमयंतीला मोठी चुटपुट लागली होती. बरें बापाजवळ स्वतः गोष्ट काढावी, तर तें अनुचित दिसणार; ह्मणून दमयंतीनें आपल्या एका सखीकडून आपल्या आईला आपला मनोदय कळविला; आणि आईकडून तो बापाला कळविला. तिचा बाप राजा भीमक, यानें दमयंतीचें तें ह्मणणें मोठ्या आनंदानें मान्य करून त्यानें तिच्या स्वयंवराची लवकरच तयारी केली. स्वयंवराचा दिवस मुकरर करून त्या बेतानें त्यानें सर्व राजपुत्रांनां स्वयंवरास येण्याविषयीं कुंकुम-पत्रिका पाठविल्या. सर्वांबरोबर नळराजासहि कुंकुमपत्रिका मिळाली व ती मिळाल्यावर तो उत्साहानें, कौंडण्यपुरास जाण्यासाठीं निघाला. स्वर्गांत ही गोष्ट इंद्र, वरुण, अग्नि व यम, यांस समजल्यावर, जरी त्यांनां निमंत्रण नव्हतें तरी, दमयंतीची लालसा उत्पन्न झाल्यामुळें ते चवघेहि दमयंतीच्या स्वयंवरा-साठीं स्वर्गांहून निघाले. पुढें हे सर्व, मार्ग–क्रमण करीत असतांना नळाची व या चौघा दिक्पाळांची रस्त्यांत गांठ पडली. अतुल सौंदर्यराशी नळराजास पाहून, ते चवघेहि दिक्पाळ मनांतल्या मनांत दमयंतीच्या लाभाविषयीं साशंक झाले. ते आपसांत एकमेकांना ह्मणाले; ' अरे, हा नळराजा स्वयंवरास

आल्यास, ती दमयंती याच्याच गळ्यांत खात्रीनें माळ घालील. कारण हा आपणा सर्वांपेक्षांहि सुस्वरूप व उदार दिसत आहे, तेव्हां आतां कांहीं तरी युक्ति योजल्यावांचून कार्यभाग होणार नाहीं.' असा विचार करून त्या चौघांनीं, नळ राजास तूं कोण, कोठला, वगैरे माहिती विचारून त्याची ओळख करून घेतल्यासारखें दाखविलें, व मग त्यास ह्मणाले; 'हे नळा, आह्मीं इंद्र, वरुण, अग्नि व यम असे चार दिक्पाळ आहोंत, आह्मीं दमयंतीच्या स्वयंवरासाठीं जात आहोंत, तर तूं आह्मांसाठीं दमयंतीकडे जाऊन, ती आह्मांपैकीं कोणाबरोबर विवाह करील अशी शिष्टाई कर.' हें ऐकून नळ ह्मणाला; 'ही गोष्ट मी मोठ्या आनंदानें करीन, पण स्वयंवर होणाऱ्या राजकन्येकडे स्वयंवर होण्याच्या अगोदर कोणाहि पुरुषास जाऊं देऊं नये, असा नियम आहे व त्या प्रमाणें भीमक राजानें व्यवस्थाहि केली आहे, तेव्हां तिची भेट होणें, मला तर शक्य दिसत नाहीं.' नळाचें हें बोलणें ऐकून, इंद्र म्हणाला, 'नळा, मी तुला अदृश्यपण देतों. म्हणजे तूं कोणासहि दिसणार नाहींस. अशा रीतीनें राजकन्येकडे जाऊन शिष्टाई कर. पण जर तूं मनांत कपट धरून, राजकन्या स्वत:च मिळविण्याचा प्रयत्न केलास, तर सर्वांच्या दृष्टीस पडशील आणि मग तुझी फार फजिती होईल.' याप्रमाणें इंद्रानें नळाला बजाविल्यावर त्यास अदृश्यपण देऊन कौंडण्यपुरीं पाठवून दिलें. अशा रीतीनें नळ अदृश्य झाल्यावर तो तेथून निर्धास्तपणें निघाला व भीमकराजाच्या वाड्यांत गेला. नळराजा अदृश्य असल्यामुळें थेट राजकन्येच्या महालांत जाईपर्यंत तो कोणासहि दिसला नाहीं. राजकन्या दमयंती विरहव्यथेनें वेडी होऊन त्या वेळीं आपल्या पलंगावर अगदीं चिंताक्रांत अशी बसली होती. अशा स्थितींत ती असतांनां नळराजा तिच्या जवळ जाऊन म्हणाला; "दमयंती, तूं मोठी भाग्यवान आहेस असें मला वाटतें. मी इंद्र, वरुण, अग्नि व यम यांचा दूत असून त्यांनीं मला मुद्दाम तुझ्याकडे पाठविलें आहे. ते तुझी लालसा धरून, स्वयंवरासाठीं येत आहेत. तेव्हां तूं त्यांच्यापैकीं कोणाहि एकाच्या गळ्यांत माळ घाल. हे पृथ्वीवरील राजे म्हणजे, मृत्यूला केव्हां तरी वश होणारे; अशा मर्त्य-मानवांनां वरण्यापेक्षां, कोणातरी एका दिक्पाळास वरणें फार उत्तम होय, आणि ते दिक्पाळ शोधावयालाहि तुला मुळींच कांहीं त्रास नाहीं. अनायासे ते तुझ्या घरीं स्वयंवरासाठीं चालून येत आहेत. त्यांच्यापैकीं कोणाहि एकाच्या गळ्यांत माळ घालून तूं धन्य हो." हें ऐकून दमयंती म्हणाली; "या तुझ्या म्हणण्यांत मला कांहीं देखील अर्थ दिसत नाहीं. दिक्पाळांना मृत्यु नाहीं, एवढ्याचसाठीं मी त्यांच्या गळ्यांत माळ घालीन, इतकी कांहीं मी वेडी नाहीं. मी आपल्या मनानें नैषध देशचा राजा नळ, यांस वरिलें आहे. माझा आत्मा त्याच्याजवळ असून, शरीर मात्र येथें आहे. मी आपलें पंचप्राण राजहंसाबरोबर, कधींच नळाकडे पाठवून दिले

आहेत. अर्थात् माझें लग्न नळाबरोबर झाल्यासारखेंच आहे; तेव्हां लग्न झालेल्या स्त्रीजवळ लग्नासंबंधानें कांहीं बोलूं नये हें बरें. आतां जर माझ्या दुर्भाग्यानें नळराजानेंच माझा अव्हेर केला, तर मी प्राणत्याग करून घेईन, पण अन्य पुरुषाचें मुखावलोकनहि करणार नाहीं." नळराजा हें दमयंतीचें बोलणें ऐकून म्हणाला; "दमयंती, तूं प्राणत्याग केलास तर त्यांत फायदा तो काय? तूं विष खाऊन देहत्याग केल्यास, यम तुला घेऊन जाईल. तो यम प्रत्यक्ष आतांच तुझा स्वीकार करण्यासाठीं येत आहे. पाण्यांत उडी मारलीस, तर वरुण नेईल. तो वरुणहि पण येणार आहे. शस्त्र घात करून घेतल्यास इंद्र घेऊन जाईल तो इंद्र तुला वरायाला स्वतःच आला आहे. अग्नींत पडून मरूं ह्मणशील, तर अग्नी स्वतःच आलेला आहे. हे चौघेजण मेल्यावरहि सोडीत नाहींत. मग आतांच त्यांनां कां वरीत नाहींस?" तेव्हां दमयंती म्हणाली; "तूं म्हणतोस हें खरें,—पण एकदां ज्याला वरिलें आहे, त्यावांचून आतां सर्व मला बापभावाप्रमाणें आहेत; म्हणून 'दमयंती तुह्माला माळ घालावयाला तयार नाहीं.' असा माझा निरोप तूं त्यांनां स्पष्ट जाऊन कळीव." दमयंतीचें हें स्पष्ट बोलणें ऐकून, नळराजा तेथून लागलाच निघाला, व दिक्पाळांजवळ येऊन त्यानें झालेली सर्व हकीकत दिक्पाळांना कळविली. दमयंतीचा तो निश्चय बघून त्या चौघांनीं निराळीच युक्ति योजिली. स्वयंवराचे दिवशीं त्या चौघांनींहि नळाचीं रूपें धारण केलीं व ते चौघेहि लग्नमंडपांत येऊन बसले.

## ४ दमयंतीचें स्वयंवर.

स्वयंवराचे दिवशीं लग्नमंडपांत सर्व राजे, महाराजे, आपआपल्या आसनावर बसल्यावर, दमयंती उत्तम प्रकारच्या वस्त्राभरणांनीं सालंकृत होऊन, लग्नमंडपांत आली. ती हातांत माळ घेऊन सर्व राजकुमारावर नजर टाकीत टाकीत लग्नमंडपांत फिरूं लागली. दमयंतीचें तें अनुपमेय सौंदर्य पाहून, कित्येक राजे तर, आपण स्वयंवरासाठीं आलों आहों हें देखील विसरून गेले. कित्येक टकमका दमयंतीकडे पाहूं लागले, व कित्येक कोणाचें भाग्य उदयाला आलें आहे तें शोधूं लागले. हळू हळू लग्नमंडपांत फिरतां फिरतां दमयंती, नळाजवळ आली; पण तेथें एक नळ नसून पांच नळ आहेत, हें पाहून ती फारच गोंधळून गेली. मग तिला दूतांनीं येऊन सांगितलेल्या दिक्पाळांची आठवण झाली व त्यांचेंच हें कपट आहे असें तिनें ओळखलें. तिला याबद्दल त्यांचा फार राग आला, व आपला साध्वीपणा यांनां दाखवावा, असा ती विचार करूं लागली. इतक्यांत चौघांहि दिक्पाळांच्या लक्षांत ती गोष्ट आली,—व 'न जाणो ही साध्वी शाप देऊन आपली विडंबना करील,' असें वाटून त्या चौघांनींहि आपआपलीं रूपें प्रगट केलीं. मग दमयंतीनें एकदम धांवत जाऊन नळराजाचे गळ्यांत माळ घातली. त्यावेळीं सर्वांनीं आनंदानें टाळ्यांचा गजर केला.

मग भीमकानें यथाविधी वरपूजा करून, दमयंती नळास अर्पण केली. चार दिवस लग्नोत्सव करून, आलेल्या सर्व राजांचा योग्य आदर-सत्कार केला. त्या चौघा दिक्पाळांनांहि त्या प्रसंगीं फार आनंद झाला. आम्हीं संकटसमयीं तुझें रक्षण करूं, म्हणून चौघांनीं नळराजास आश्वासन दिलें. वरुणानें त्यास जलशक्ति दिली, अग्नीनें अग्निशक्ति दिली, यमानें अश्वविद्या दिली, आणि इंद्रानें अदृश्यत्व देऊन, शिवाय कंठांतील माळ दिली, व त्याचा बहुमान केला. भीमकानें त्यावेळीं, याचकांनां विपूल दानें देऊन, संतोषित केलें. स्वयंवर होऊन गेल्यावर इंद्र वरुणादि दिक्पाळ, स्वर्गांत परत जात असतांनां, त्यानां वाटेंत द्वापार व कलि असे उभयतां भेटले. एकमेकांचें कुशल विचारणें झाल्यावर, इंद्र त्यांना म्हणाला; 'तुम्हीं उभयतां कोणीकडे जाण्यासाठीं निघाला आहांत?' तेव्हां कली म्हणाला; 'दमयंतीचें स्वयंवर होत आहे, असें ऐकिल्यावरून तिकडे जात आहोंत, ती फारच सुंदर आहे, असें ऐकतों. तेव्हां तिची लालसा धरून चाललों आहों.' हें ऐकून इंद्र हंसला, व म्हणाला; 'वेड्यांनो, तिचें स्वयंवर होऊनहि गेलें. आम्हीं तिच्या स्वयंवरासाठींच गेलों होतों; पण आम्हांपैकीं कोणा-सहि न वरितां, नैषध देशाचा राजा नळ यास तिनें वरिलें.' हें ऐकून कली ह्मणाला, 'असें काय? तिनें तुम्हां सुरवरांना टाकून त्या नळाला वरिलें हें खरोखर आश्चर्य होय!' नंतर दिक्पाळ निघून गेले. द्वापारहि आपले गृहीं परत गेला, पण कलीस त्याच्या स्वभावधर्माप्रमाणें फार वाईट वाटलें, व आपल्या हातची दमयंती गेली, ह्मणून त्या दोघांचा शक्य तितका छळ करण्याचें त्यानें ठरविलें. संधी आल्याबरोबर दोघांनाहि संकटांत ढकलावयास सांपडावें ह्मणून तो दुष्ट कली, नळाबरोबर नेहमीं गुप्तपणें वास करूं लागला.

लग्नसोहळा संपूर्ण झाल्यावर भीमकानें जांवयास विपूल संपत्ति, रत्नें, हत्ती, घोडे, रथ, वगैरे देऊन कन्येसह मार्गस्थ केलें: तो नैषध देशाचा नळराजा आपल्या नगरीस सुखरूपपणें परत आला, व आनंदानें राज्य करूं लागला. त्यांस कांहीं दिवसांनीं एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन अपत्यें झालीं. मुलाचें नांव इंद्रसेन व मुलीचें नांव इंद्रसेनी असें ठेविलें होतें. तो राजा स्वतः अत्यंत शुचिर्भूत राहून आपल्या प्रजेचें पालन पुत्रवत् करीत अस-ल्यामुळें, बारावर्षेपर्यंत कलीस त्याला त्रास देण्यास मुळींच सवड मिळाली नाहीं. पण पुढें नळ राजाच्या हातून कांहीं चूक झाल्यामुळें कलीनें त्या दोघांचा फार छळ केला. तथापि, त्यामुळें नळाच्या कीर्तीत भर पडली, व दमयंतीचें पतिप्रेम सगळ्या जगाच्या निदर्शनास आलें.

---

# अध्याय ९ वा.

## १ नळ विडंबना.

हंसिणीनें सांगितलेली नळदमयंती स्वयंवराची कथा ऐकून, प्रभावतीला नळ-राजाची पुढील कथा ऐकण्याची इच्छा झाली. ती हंसिणीला म्हणाली; " गडे हंसिणी, मला नळराजाची सर्व कथा ऐकावी अशी इच्छा आहे, तर मला ती कथा सांग. " अशी प्रभावतीनें हंसिणीला विनंति केल्यावर, हंसिणी तिला नळाची कलीनें कशी विडंबना केली; तें सांगू लागली. हंसिणी म्हणाली; " प्रभावती, जोंपर्यंत नळराजा अत्यंत शुचिर्भूतपणें वागत होता, तोंपर्यंत कलीला आपला प्रभाव मुळींच दाखवितां येईना; परंतु एके दिवशीं नळराजास शौच्याहून आल्यावर हातपाय धुवून आचमन करण्याची आठवण राहिली नाहीं. तेवढ्या अमंगळपणाची संधी गांठून, त्या कलीनें नळराजाचे शरीरांत प्रवेश केला; व त्याचें पवित्र अंतःकरण मलीन करून त्याचे शुद्ध बुद्धींत पालट उत्पन्न केला. अशा रीतीनें कलीच्या तावडींत नळ राजा सांपडल्यावर हळूहळू राजाचा पुण्यकर्माकडील ओढा कमी होऊन, असदाचरणानें वागण्याची त्यास बुद्धि होऊं लागली. अंतःकरणांत कांहीं चमत्कारिक विचार उत्पन्न झाल्यामुळें राज्यकारभारातलें त्याचें लक्ष कमी झालें, प्रजाजनांविषयींची कळकळ कमी झाली, साधुजनांविषयींचा आदर कमी झाला; इतकेंच नव्हे तर स्वतःच्या स्त्रीपुत्रांवरील प्रेम देखील कमी झालें, नेहमीं सोंगट्या व फासे घेऊन द्यूत खेळत बसावें, असें त्या नळराजाला वाटूं लागलें. कलीनें इतकी तयारी केल्यावर, त्याच नळराजाच्या नगरींत पुष्कर या नांवाचा एक नळाचाच गोत्रज होता, त्याच्याकडे कली जाऊन म्हणाला; " पुष्करा, तूं नळाकडे जाऊन जर द्यूत खेळशील, तर तुला त्यांत त्याचें सर्व राज्य मिळवून देण्याची मी व्यवस्था करितों." तेव्हां पुष्कर म्हणाला; " मी तर अत्यंत दरिद्री मनुष्य आहे; मी नळराजाबरोबर द्यूत खेळण्यास असमर्थ आहे; कारण मजजवळ द्यूतांत पण लावण्यासाठीं कांहीं देखील नाहीं. " तेव्हां कली त्या पुष्कराला म्हणाला; "अरे, मी तुला एक बैल देतों. तो बैल तूं प्रथम पणांत लाव, म्हणजे झालें. त्या एका बैलावर तुला नळाचें सर्व कांहीं प्राप्त होईल. " याप्रमाणें पुष्करास कलीनें सांगितल्यावर तो नळा बरोबर द्यूत खेळण्यास तयार झाला. मग पुष्कर आपणाबरोबर एक बैल घेऊन, नळराजाकडे गेला; व त्यास 'आपण द्यूत खेळण्यासाठीं आलों आहों,' असें त्यानें कळविलें. नळराजास ते त्याचे शब्द ऐकून, फार आनंद झाला. तो म्हणाला; " माझीहि इच्छा कोणाबरोबर द्यूत खेळावें अशी होती; इतक्यांत तूं आलास हें बरें

झालें; पण पुष्करा, तुझ्याजवळ द्यूतांत पण लावण्यासाठीं काय आहे ?" पुष्कर म्हणाला; " हा पहा, मी एक बैल घेऊन आलों आहे, हा मी हारलों तर स्वतः पणाला बसेन; व त्यांतहि हरलों तर तुझी जन्मभर सेवा करून राहीन." तें त्याचें ह्मणणें नळानें मान्य केलें. मग दोघेहि सोंगट्या व फासे घेऊन द्यूत खेळावयाला बसले. दोघेहि आपआपल्या समजुतीप्रमाणें मोठ्या हुषारीनें फासे टाकीत असत; पण फासे हलविण्याचें काम कली अदृश्यपणें करीत असल्यामुळें, पुष्कर जिंकूं लागला, व नळराजा गमावूं लागला. असें होतां होतां नळानें सर्व संपत्ति, राज्य, राजमंदिर, वस्त्रें, सैन्य वगैरे पणाला लावून थोड्याच वेळांत तो अगदीं निष्कांचन झाला. जवळ कांहीं एक न राहिल्यावर नळ द्यूतांत मुलें व स्त्री हीं लावूं लागला; तेव्हां नळराजाच्या प्रधानानें नळास तेथून उठवून बाहेर आणलें. अशा रीतीनें द्यूत पुरें झाल्यावर पुष्करानें आपल्या नांवाची सर्वत्र द्वाही फिरवून, आपण सिंहासनावर बसला. मग त्यानें राजानळ, त्याची स्त्री व मुलें यांचीं सर्व वस्त्रें व अलंकार काढून घेऊन, त्यांनां एकेक वस्त्र दिलें व नगराच्या बाहेर घालवून दिलें. त्यांनां पोंहोंचविण्यासाठीं त्याचा पूर्वीचा प्रधान आला होता. तो नळराजाला ह्मणाला; " प्रभु, आपली जरी अशी स्थिति झाली आहे, तरी आपण येथें निश्चितपणें रहावें, मी आपल्या खाण्यापिण्याची सर्व व्यवस्था करितों." परंतु नळराजानें त्या म्हणण्याचा स्वीकार केला नाहीं. तो म्हणाला; " परान्न घेणें हें अत्यंत अनुचित होय. आम्हीं कांहींतरी श्रम करून, वनांतील कंदमूळांवर दिवस काढूं; तुम्हीं नगरांत जाऊन स्वस्थ रहावें." याप्रमाणें प्रधानास निरोप देऊन, राजा स्त्रीपुत्रांसह पायीं पायीं अरण्यांत मार्ग क्रमूं लागला. तेव्हां दमयंती ह्मणाली; " आपण सर्वजण माझे माहेरीं जाऊन राहूं. माझा बाप भीमकराजा, आपणां सर्वांचा चांगल्या रीतीनें सांभाळ करील." परंतु नळराजास तीहि गोष्ट मानवली नाहीं. तो ह्मणाला; " दुर्दशा प्राप्त झाली असतां, आप्त व सोयरे यांच्या साह्याची कधींहि अपेक्षा बाळगूं नये. जो श्वशुराचे घरीं राहून स्त्री आधीन होतो तो निश्चयानें नरकांत जातो. म्हणून आपणांस भीमकाचें घरीं मुळींच राहतां येणार नाहीं." असें नळानें सांगितल्यावर दमयंतीचा अगदींच नाइलाज झाला, मग तिनें दोन्हीं मुलें तरी निदान माहेरीं पाठवावीं म्हणून आपल्या पतीची विनंति केली. ती विनंति नळानें मान्य केली, व आपल्या दोन्हीं मुलांनां भीमक राजाकडे पोहोंचतें केलें. त्याचवेळीं नळानें दमयंतीस सांगितलें कीं, ' तूंहि आपल्या माहेरीं जाऊन रहा. मी माझ्या हातानें या दुर्दशेंत सांपडलों आहे, तेव्हां हीं कडू फळें मला एकट्यालाच भोगूं दे." परंतु ती गोष्ट दमयंतीनें मान्य केली नाहीं. ती ह्मणाली; " माझा आत्मा, आपणांजवळ आहे, तेव्हां हें शरीर तरी तुमच्यापासून दूर ठेवण्यांत काय अर्थ ? मी केवळ

तुह्मांसाठीं तुमच्या बरोबर विवाह केला आहे. तुह्मी सार्वभौम राजे, तुह्मी ऐश्वर्य शाली; ह्मणून कांहीं मी आपल्या कंठांत माळ घातली नाहीं. तुमचा सहवास हेंच मी आपलें सर्वस्व समजतें, तेंच माझें सर्व सुख होय. मी जशी सुखाची, तशीच दुःखाचीहि पण वाटेकरीण आहे. मी तुमच्या पासून दूर अशी क्षणभरहि होणार नाहीं," याप्रमाणें दमयंतीचा निश्चय पाहून नळराजास तशा संकटावस्थेंतहि फार समाधान वाटलें व तो तिला बरोबर घेऊन अरण्यांत निघून गेला. कांहीं कंदमुळें सांपडल्यास खावींत, न मिळाल्यास उपाशींच रहावें, रात्रीं एकेका वस्त्रावर कुठें तरी अंग टाकावें, असा त्या दोघांचा क्रम त्या अरण्यांत चालला होता. एके दिवशीं राजानें नदीवर जाऊन, कांहीं मासे मारून आणले व ते स्त्रीजवळ शिजविण्यासाठीं दिले. तेव्हां दमयंती ते मासे नदीतिरीं धुण्यासाठीं घेऊन गेली व जेथें चांगलें पाणी होतें तेथें धूत बसली, परंतु त्या माशांनां दमयंतीचा हात लागल्यावर एक निराळाच चमत्कार घडून आला. दमयंतीच्या हातांत अमृत असल्यामुळें, ते मृत झालेले मासे दमयंतीच्या हस्तस्पर्शाबरोबर जिवंत झाले व नदींत निघून गेले. तो प्रकार पाहून दमयंती अत्यंत विस्मित व दुःखीत झाली. दमयंती त्या वेळीं वनवासाच्या दुःखभारानें वेडी झालेली असल्यामुळें, तिला त्या चमत्काराचें कारण उमगलें नाहीं. ती आपल्या पतीकडे आली, व डोळ्यांत अश्रु आणून–' मासे जिवंत होऊन, पुन्हां नदींत निघून गेले;'–ह्मणून सांगू लागली. परंतु नळराजाचा त्या गोष्टीवर मुळींच विश्वास बसला नाहीं. क्षुधाशांत करण्यासाठीं ते आपल्या स्त्रीनेंच आपणास फसवून खाल्ले, अशी त्याची दृढ भावना झाली, व तो त्यावेळीं दमयंतीस रागानें अपशब्द बोलून तिला एकटीच सोडून रानांत निघून गेला.

## २ नळ व दमयंती यांची ताटातूट.

पतीला भलताच आलेला संशय पाहून, दमयंतीला फार वाईट वाटलें. तिनें नळराजाला पुष्कळ समजावून सांगितलें होतें; पण त्यास तें खरें न वाटतां तो उलट 'संकटसमयीं स्त्रीदेखील कामाला येत नाहीं,' असें म्हणाला, व निघून गेला त्यायोगें दमयंतीस आकाश अंगावर कोसळून पडावें असें दुःख झालें. त्या दुःख भारानें ती अगदीं वेडी झाली. आपण कोठें आहों, काय करीत आहों, हें तिला कांहींच कळेना. तो दुःखाचा वेग गेल्यावर तिचें चित्त जरा स्थीर झालें; पण त्याबरोबर लागलीच आपला पति आपणास सोडून गेला आहे, हें तिच्या लक्षांत आलें, व ती पुन्हां दुःखानें क्रांत होऊन, रानांत आपल्या पतीच्या शोधार्थ फिरूं लागली. इकडे नळराजा दमयंतीवर संतापून, एका घोर अरण्यांत गेला; क्षुधा शांत करण्यासाठीं काय करावें, या विचारानें त्याला अगदीं भंडावून सोडिलें होतें; इतक्यांत त्याची दृष्टी दोन पक्षांकडे गेली. तेव्हां ते दोन्ही पक्षी धरून खाऊन टाकावेत, अशी राजाला इच्छा उत्पन्न झाली. ते दोन्ही

पक्षी मंदगतीनें चालत असल्यामुळें, ते सहज हातीं लागतील असें नळाला वाटलें, पण ते धरण्याचें त्याच्याजवळ कांहींच साधन नसल्यामुळें ते पक्षी कसे धरावेत हें त्याला मुळींच कळेना. मग राजानें आपलें नेसलेलें वस्त्र सोडलें व हळूंच त्या पक्षांच्या मागें जाऊन, तें त्यांच्या अंगावर फेंकले. इतक्यांत ते पक्षी तें वस्त्र घेऊन आकाशमार्गानें मोठ्या वेगानें निघून गेले. हें पाहून नळराजाची अवस्था मोठी कठीण झाली. भक्षापरी भक्ष गेलें, आणि जवळ जें लज्जा रक्षणासाठीं एक वस्त्र होतें तें वस्त्रहि गेलें; अशी त्याची चमत्कारीक स्थिति झाली. तेवढ्या एकाच वस्त्रावर तो लज्जेचें रक्षण व थंडीतापाचें निवारण करीत होता. तें त्याचें वस्त्र गेल्यावर द्यूतांत राज्य गमावण्यापेक्षांहि त्यास त्यावेळीं अधिक दुःख झालें. पुन्हां आपणांस कोणी अशा नग्नावस्थेंत पाहील कीं काय, अशी त्याला भीति उत्पन्न झाली. अशा शोचनीय अवस्थेंत नळराजा झाडाच्या आडून आडून भक्ष शोधीत हिंडत असतांनां, त्या अरण्यांत त्याचा शोध करीत फिरत असलेली दमयंती, त्याच्याकडे आली. तिला पाहिल्याबरोबर तो एवढा धैर्यशाली नळराजा, त्यावेळीं डोळ्यांतून अश्रु गाळूं लागला. तो तिला म्हणाला; " दमयंती, तूं आपली आतां माहेरीं जाऊन रहा. मजवर आतां चहूंकडून नाहीं नाहीं तीं संकटें येऊं लागलीं आहेत. दोन पक्षी येथें चरत होते, त्यांनां धरून क्षुधा शांत करावी, म्हणून मीं आपलें वस्त्र सोडलें व त्यांच्या आंगावर घातलें; पण भक्ष न मिळतां ते पक्षी माझें वस्त्र मात्र घेऊन गेले. यावरून माझें दुर्दैव पुरें ओढवलें आहे असें वाटतें. तेव्हां तूं आतां या आपल्या करंट्या पतीला सोड, आणि आपल्या बापाच्या घरीं जाऊन रहा."

नळाचे हे शब्द ऐकून, त्या साध्वी दमयंतीचें हृदय विदीर्ण होऊन गेलें. ती आपल्या पतीच्या पायांवर मस्तक ठेवून अश्रु गाळित गाळित म्हणाली; "प्राणनाथ, आपण या दासीवर असा राग करूं नका. मला वाटेल तितकें दुःख झालें तरी तें मीं सोसण्यास तयार आहें, पण मला आपल्या पायांपासून अशी दूर करूं नका. तुम्हीं या कष्टकारक अवस्थेबद्दल मुळीं देखील काळजी करूं नका. आपण एखाद्या तीर्थक्षेत्राचें ठिकाणीं जाऊं, व तेथें ईश्वराची सेवा करून आयुष्याचे दिवस कंठूं. मी तेथें मोलमजुरी करून कांहीं तरी मिळवीन, आणि त्यावर आपण कसें तरी उपजीवन करूं." असें सांगून दमयंतीनें आपलें अर्धवस्त्र फाडून, आपल्या पतीला नेसावयाला दिलें. नळराजाला आपल्या स्त्रीचें तें म्हणणें रुचलें, व ते दोघेहि एखाद्या तीर्थावर जाण्याच्या उद्देशानें निघाले. कांहीं मार्ग क्रमून गेल्यावर त्यांच्या दृष्टीस एक पर्णकुटिका पडली. दोघेहि कित्येक दिवसाचे उपाशी होते, शिवाय वाटेनें चालण्याचे श्रमहि त्यांनां बरेच झाले होते. म्हणून दोघेहि त्या रिकाम्या असलेल्या पर्णकुटिकेंत जाऊन, त्या रात्रीं तेथेंच निजले. दमयंतीस आपला पति भेटला असल्यामुळें, ती कांहींशी

निष्काळजी झाली होती व त्यामुळें ती आपल्या पतिसन्निध सुखानें झोंपीं गेली; परंतु नळास काळजीमुळें झोंप येईना. ' आपल्या दुर्दैवाचे तडाखे आपण एकट्यानेंच सोसणें वाजवी असून, आपली स्त्री आपणाबरोबर निष्कारण दुःख भोगीत आहे, असें त्याला वाटूं लागलें. तो आपल्या मनांत म्हणाला; ' ज्या दमयंतीला ऊन कसें तें माहीत नव्हतें, तिनें आतां काय सारा दिवस उन्हांत रखडत हिंडावें! पालखी–मेण्यावांचून जी घराच्या बाहेर पडत नसे, तिनें आतां काय अनवाणी हिंडून, पायांत कांट्यांनां आश्रय द्यावा!! मृदुशय्येवर जी नेहमीं लोळत असे, तिनें आतां काय तृणावर निजावें!!! जी आपल्या अन्नसत्रांत हजारों लोकांनां अन्नदानानें संतोषित करीत असे, तिला आतां उपास करण्याचा प्रसंग यावा!! ' अशा प्रकारचे अनेक विचार नळाच्या हृदयांत उत्पन्न होऊन त्यास फार दुःख होऊं लागलें. दमयंतीची या संकटांतून मुक्तता करण्याचा त्याला कांहींच मार्ग दिसेना. शेवटीं त्यानें असें ठरविलें कीं, हिला आपण सोडून जावें, म्हणजे ही कंटाळून आपले बापाचे घरीं जाईल आणि तेथें गेल्यावर सुखानें राहील. ' नळराजास हा विचार पसंत पडल्यावर तो हळूंच उठला; आणि मोठ्या कष्टानें आपल्या स्त्रीला त्या भयंकर रानांत एकटीच टाकून, आपण निघून गेला.

### ३ वनवासी दमयंती.

इकडे प्रभातकाळ झाल्यावर, दमयंती जागी होऊन पाहते तों पर्णकुटिकेंत पति नाहीं. त्याबरोबर तिच्या पोटांत एकदम चर्र झालें. संकटावस्थेंत असा कांहीं प्रकार झाला म्हणजे मनाची धांव प्रथम वाईट विचारावर जाते, तीच अवस्था यावेळीं दमयंतीची झाली. आपला पति पर्णकुटिकेच्या बाहेर असेल असें वाटल्यावरून ती बाहेर आली, व आपल्या पतीला शोधूं लागली. परंतु घटका दोन घटका निघून गेल्या तरी पतीचा शोध लागेना, तेव्हां ती फारच हताश झाली; व आपल्या पतीसाठीं दीनस्वरानें त्या अरण्यांत आक्रोश करूं लागली. दमयंती आपल्या पतीला आपलें सर्वस्व समजत असे. आपलें भूषण, आपलें ऐश्वर्य, आपलें सुख, सर्व काय तें पति; इतकी तिची पतीवर विलक्षण भक्ति होती. पतीला ती आपलें दैवत समजत असे, पतिसेवा हेंच ती आपलें कर्तव्य समजत असे, पतीचें दर्शन हाच प्रसाद; आणि पतीची पूजा हेंच पुण्यकर्म, अशी तिची दृढ भावना झालेली होती. त्या साध्वीला तिच्या पतीनें अशा विपद प्रसंगीं सोडल्यावर, त्या दमयंतीच्या मनाची काय स्थिति झाली असेल, याची कल्पना करणेंहि दुष्कर होय. दमयंती त्या भयंकर अरण्यांत ' अहो नैषधपति नळराज, ' असें म्हणून, सारखा टाहो फोडित सैरावैरा हिंडत होती; पण नळराजा तिच्या दृष्टीस पडेना. ' पति पति ' म्हणून, ती त्या अरण्यांत एकसारखी फिरत होती; पण तिला

पतीचा ह्मणून शोध लागेना, पुष्कळ वेळ शोध केल्यावर पतीची व आपली ताटातूट खात्रीनें झाली, असें तिला कळून आलें. त्यावेळीं तिचें अंतःकरण दुःखानें करपून गेलें. आपण एकीकडे, पति दुसरीकडे; आणि मुलें तिसरीकडे, असें तिघांस तीन दिशेला करून, दुर्दैवानें पक्का दावा साधला, असें तिला वाटूं लागलें. खरोखर दमयंतीच्या त्या दुःस्थितीला सीमाच उरली नव्हती असें ह्मटलें पाहिजे. बिचारी त्या अवस्थेंत रडणार तरी किती! रडून रडून दमयंती इतकी क्लांत झाली कीं, ती आपलें देहभान विसरून जाऊन, मूर्छित झाली. दमयंती याप्रमाणें त्या अरण्यांत मूर्छित असतांनां तेथें एक मोठा अजगर आला. त्यास हें कांहीं तरी भक्षच आहे असें वाटलें व त्यानें दमयंतीस आपल्या पोटांत घेण्यास आरंभ केला. तिला त्या प्रचंड अजगरानें बहुतेक गिळून, तिचे पाय फक्त गिळावयाचे ठेविले होते; इतक्यांत–तेथें जवळच शिकार करीत असलेल्या एका पारध्याची दृष्टि, त्या अजगराकडे गेली. तो विलक्षण प्रकार पाहून, त्या पारध्याला दमयंतीची दया आली; व त्यानें त्या अजगरास युक्तीनें मारून, तिच्या पोटांतून दमयंतीस बाहेर काढलें. नंतर तो दमयंतीस एका नदीचे कांठीं घेऊन गेला व तिच्या अंगाला अजगराचें लागलेलें गरल त्यानें धुवून टाकलें आणि तिला सावध केलें. दमयंती सावध झाल्यावर तो पारधी तिला म्हणाला; ‘ हे स्त्रिये, तूं कोण आहेस? व अशी या भयंकर अरण्यांत कां हिंडतेस ? ’ तेव्हां दमयंती म्हणाली; “ बा पारध्या, मी नैषधपति जो नळराजा, त्याची स्त्री असून, त्याचा या वनांत शोध करीत आहे. ” दमयंती त्या संकटपरंपरेनें इतकी गांजली होती तरी, ती जात्याच सौंदर्यवान असल्यामुळें, त्या विपन्नावस्थेंतही मोहकच दिसत होती. इतकी सुंदर, त्यांतून निःसाह्य दमयंतीला पाहून, त्या नीच पारध्याच्या मनांत तिजविषयीं पापवासना उत्पन्न झाली; व तो कामातुर होऊन तिजबरोबर बोलूं लागला. तेव्हां दमयंती त्याला ह्मणाली; “ बा पारध्या, नळराजावांचून जितके पुरूष आहेत, तितके सर्व मला आपल्या बापाप्रमाणें आहेत. त्यांतून तूं मला प्राणदान दिलें आहेस; म्हणून तुला तर मी आपल्या जन्मदात्या पित्यापेक्षांहि अधिक पूज्य मानते. निःसाह्य अशा लहान अर्भकांचा, व संकटांत सांपडलेल्या अबलांचा, जो सांभाळ करितो; त्याची योग्यता पित्यापेक्षांहि अधिक आहे. तेव्हां तूं मनांत आणलेली पापबुद्धि सोड व मला आपल्या कन्येप्रमाणें समज.” दमयंतीनें त्या पारध्याला केलेला तो हितोपदेश रुचला नाहीं. कामवासनेनें अंध झालेला तो उन्मत्त पारधी, दमयंती एकटी व एकांतांत आहे असें पाहून, तिला त्रास देऊं लागला. तेव्हां दमयंतीनें निरुपाय होऊन, त्या पारध्याला ‘ तुझें भस्म होवो, ’ ह्मणून शाप दिला. त्याबरोबर तो दुर्मति जळून खाक झाला. नंतर दमयंती तेथून निघाली व पतीचा शोध करीत करीत पुढें

चालली. दमयंती त्या भयंकर अरण्यांतून मार्गक्रमीत असतांनां व्याघ्रसिंहादि-क्रूर पशूंनां देखील दमयंतीची ती करुणाजनक स्थिति बघून, दया येई व ते आपले स्वभावधर्म विसरून जाऊन, त्या माउलीस त्रास न देतां वाट देत. त्या अरण्यांतलि तो भयंकर मार्ग कांहीं दिवस मार्ग क्रमिल्यावर, दमयंती अरण्याच्या बाहेर पडून, एका नदीचें काठीं आली. त्या नदीचें तीरावर अनेक आश्रम असून भृगु वसिष्ठादि ऋषि तपश्चर्या करीत बसले होते. तो ऋषींचा रम्य आश्रम पाहून, दमयंतीला एक प्रकारचें धैर्य उत्पन्न झालें. तिनें त्या पुण्याश्रमांत जाऊन सर्व ऋषींना वंदन केलें, व आपली एकंदर हकीकत त्यांनां कळवून आपल्या संकटाचें परिमार्जन कशानें होईल ह्मणून विचारलें.

## ४ दमयंती व सुवंदा यांची भेट.

ऋषींनां दमयंतीची ती हकीकत ऐकून फार दया आली. त्यांनीं तिला अगोदर स्नान करण्यास सांगून, तिला नवीं वस्त्रें नेसावयास दिलीं, व कंद-मूलांचा प्रसाद खाण्यासाठीं दिला. नंतर ते ऋषि दमयंतीला ह्मणाले; " बाई दमयंती, तूं नळाविषयीं कांहीं देखील काळजी करूं नको. तो कुशल असून, तुला लवकरच येऊन भेटेल; पण तूं अशी एकटी आहेस, तेव्हां पतीची भेट होईपर्यंत आपल्या माहेरीं जाऊन रहा. या आश्रमावरून हा जो रस्ता गेला आहे तो नीट वैदर्भ देशाला गेला आहे. या रस्त्यानें गेलीस ह्मणजे तूं आपल्या बापाच्या घरीं जाऊन पोंहोंचशील. नळराजास थोडे दिवस वाईट आलेले आहेत; परंतु ते संपल्यावर तुह्मीं दोघेहि पूर्वीपेक्षां अधिक सुखानें आपल्या ऐश्वर्याचा उपभोग घ्याल. " याप्रमाणें दमयंतीला ऋषींचा आशीर्वाद मिळाल्यावर, ती त्यांनां पुन्हां वंदन करून, वैदर्भ देशाच्या मार्गाला लागली. मार्ग क्रमित असतांनां, तिला एक व्यापारी लोकांचा तांडा भेटला. अनायासें ती सोबत मिळाल्याबद्दल तिला मोठें समाधान वाटलें व ती त्या लोकांच्या सोबतीनें मार्ग क्रमूं लागली. रात्र झाल्यावर त्या व्यापाऱ्यांनीं एका मैदानावर आपलें बिऱ्हाड टेविलें, व त स्वयंपाक वगैरे करूं लागले. दमयंतीहि त्यांच्याच आश्रयानें तेथें जवळ बसली होती; पण त्या व्यापाऱ्यांनां तिचा संशय आला, व त्यांनां ही कोणीतरी जादू-टोणा करणारी स्त्री असून, आपला नाश करण्यासाठीं आपणाबरोबर आली आहे असें वाटलें. तेव्हां त्या व्यापारी लोकांच्या मुख्यानें, दमयंतीस तेथून जाण्यास सांगितलें. त्यावेळीं दमयंतीला फार वाईट वाटलें, पण नाइलाज असल्यामुळें बिचारी तेथून उठली व एका झाडाखालीं जाऊन निजली. इकडे मध्यरात्रीच्या सुमारास, हत्तीचा मोठा कळप तेथें आला व त्यांनीं दांडगाई करून, ते सर्व व्यापारी मारून टाकले. सकाळीं दमयंती त्या मैदानावर जाऊन, पाहते तों सर्व व्यापारी मरून पडलेले तिला दिसले ! व्यापाऱ्यांनीं रात्रीं आपणास आश्रय दिला नाहीं हें एकप्रकारें बरें झालें, असें मानून दमयंती पुढें निघून गेली.

एक दोन दिवस वाट चालल्यावर, ती राजपुरी नांवांच्या एका मोठ्या शहरांत येऊन पोंहोंचली. त्या शहरांत वीरबाहू या नांवांचा राजा राज्य करीत होता. त्या राजाची राणी, गांवाबाहेर एका उपवनांत असतांनां तिनें दमयंतीस रस्त्यानें अनवाणी जातानां पाहिलें. तेव्हां राणीला त्या सुंदर पण दुःखी स्त्रीला पाहून तिची दया आली; व तिनें आपल्या दासीला तिच्याकडे पाठवून तिला बोलावून आणलें. राणीनें दमयंतीला बसावयाला आसन दिलें, व ती ह्मणाली; "बाई, तूं अशा तरूण वयांत बरोबर कोणीं पुरुष माणूस न घेतां, अशी एकटीच हिंडतेस याचें कारण काय ? तूं कांहीं तरी संकटांत असावीस, असें मला वाटतें." मग दमयंती ह्मणाली, "बाई, मी एक दुर्दैवी स्त्री असून, आपल्या पतीचा शोध करीत हिंडत आहे. आज कित्येक दिवस मी एकसारखा शोध करीत आहे. पण अझून मला माझ्या पतीचा शोध लागला नाहीं." हें दमयंतीचे दुःखोद्गार ऐकून ती उदार मनाची राणी ह्मणाली; "बाई, तूं अगदीं तरूण आहेस, एकटें हिंडणें मुळींच प्रशस्थ नाहीं; तूं आतां आपल्या पतीविषयीं मुळींच काळजी करूं नको. मी आपले दूत देशोदेशीं पाठवून त्याचा शोध लाविते; तोंपर्यंत तूं माझ्या घरीं स्वस्थ रहा. मी तुझा माझ्या मुलीप्रमाणें सांभाळ करीन." याप्रमाणें दमयंतीस अश्वासन देऊन राणीनें दमयतीस राजवाड्यांत नेलें व तिचा ती आपल्या मुलीपेक्षांहि अधिक प्रीतीनें सांभाळ करूं लागली. ज्या राणीनें दमयंतीला आश्रय दिला होता तिचें नांव सुनंदा असें होतें."

---

## अध्याय १० वा.

### कर्कोटक सर्प व नळराजा.

ही हकीकत सांगितल्यावर हंसिणी प्रभावतीला नळराजाची पुढील कथा सांगू लागली. ती म्हणाली; "प्रभावती, तो नळराजा दमयंतीला त्या महारण्यांत एकटीच टाकून, तेथून निघाल्यावर, त्यास त्याबद्दल अत्यंत अनुताप होऊ लागला; व पुढें काय करावें हें त्याला कळेना. आंगीं वैराग्य बाणून घेण्याचा तो प्रयत्न करीत होता; परंतु स्त्री व मुलें यांची त्याला क्षणोक्षणीं स्मृति होत होती. तीं कुठें असतील, कशीं असतील, काय करीत असतील, असे हजारो विचार त्याच्या हृदयांत उत्पन्न होऊन, त्याचें हृदय दुःखानें जळून जात होतें. तो एवढा धैर्यशाली होता; पण त्यावेळीं त्याचें सगळें धैर्य, नाहींसें होऊन तो एखाद्या स्त्रीप्रमाणें दिवसरात्र सारखा अश्रु गाळीत होता. एखाद्या तीर्थक्षेत्राचें ठिकाणीं जाऊन, साधुसमागमांत आयुष्य घालवावें, असें नळराजाला

वाटलें व त्यासाठीं तो त्या अरण्यांतून बाहेर पडण्याचा प्रयत्न करूं लागला; परंतु इतक्यांत त्याच्या दृष्टीस अरण्यास वणवा लागलेला दिसला. तें भयंकर अरण्य एकाएकीं पेटून, अग्नीच्या ज्वाळा आकाशासी स्पर्धा करूं लागल्या! मोठमोठाले प्रचंड वृक्ष, अग्नीनें जळून कडाकड मोडून पडूं लागले! तो अपूर्व प्रकार पहात पहात नळ चालला असतांनां, एक प्रचंड सर्प त्या अग्नींत होरपळत आहे, असें त्यानें पाहिलें. त्या सर्पाजवळ नळराजा येतांच तो सर्प दीनस्वरानें म्हणाला; "हे नैषधभूपते नळा, मला या संकटांतून सोडीव; मी तुझे उपकार कधींहि विसरणार नाहीं." सर्पाचे ते उद्गार ऐकून, नळास त्याचीं दया आली व त्यानें त्याला त्या वणव्यांतून बाहेर काढलें. सर्प याप्रमाणें त्या अग्नींतून वांचल्यावर नळाला ह्मणाला; "हे राजा, मी सर्व सर्पांचा नायक असून, माझें नांव कर्कोटक असें आहे. तूं अत्यंत दयाळू आहेस, असें मला माहीत असल्यावरून, मी तुला आपल्या साह्याला बोलाविलें. तूं माझी भीति न बाळगितां मला वांचविलेस हे माझ्यावर तुझे फार उपकार झाले आहेत; पण तुला माझी आणखी एक विनंति आहे. तूं मला पुन्हां उचल आणि एक, दोन, अशीं पावलें मोजून दूर नेऊन सोड." नळ राजानें हें सर्पानें बोलणें ऐकून लागलींच त्या सर्पाला उचललें व एक, दोन, तीन, अशीं पावलें टाकित त्याला तो लांब घेऊन जाऊं लागला. इतक्यांत दाहाव्या पावलाच्या वेळीं, राजा 'दहा' असें म्हणाल्याबरोबर, त्या कर्कोटक सर्पानें राजास दंश केला. सर्पाची ही कृति पाहून, नळराजा घाबरला, व त्यानें त्या सर्पाला खालीं टाकून दिलें. तेव्हां सर्प म्हणाला; 'राजा, तूं मुळीं देखील भिऊं नकोस. माझ्या विषानें तुला कधीं मृत्यु येणार नाहीं, व कोणत्याहि प्रकारचा व्याधि होणार नाहीं. तसेंच तुला जराहि प्राप्त होणार नाहीं. शिवाय माझें विष तुझ्या शरीरांत भिनल्यामुळें तूं अगदीं काळा व कुरूप दिसूं लागला आहेस, तेंहि तुझ्या फायद्याचें आहे. कारण यामुळें, तुला कोणीं ओळखणार नाहीं; व तुला वाटेल तेथें जातां येऊन लोकांत खुशाल हिंडतां फिरतां येईल. तूं आतां अयोध्येस जाऊन तेथील ऋतुपर्ण राजाजवळ नोकर रहा; म्हणजे तुला तुझ्या स्त्रीची व मुलांची लवकर भेट होईल; व तुला तुझें राज्यहि लवकरच प्राप्त होईल. तुला जेव्हां इच्छा होईल, तेव्हां माझें स्मरण कर, म्हणजे मी येऊन आपलें विष तुझ्या शरीरांतून काढून घेईन. तुझ्या शरीरांतलें विष निघाल्यावर तूं पूर्वींपेक्षांहि सुंदर, सतेज व बलवान दिसशील. परंतु नळा, एवढें लक्षांत ठेव, कीं अनकूळ काळ येईपर्यंत, तूं नळ आहेस, असें कोणालाहि सांगूं नकोस, आपलें नांव 'बाहूक' असें सर्वांस सांगत जा. ह्मणजे तुझा कार्यभाग लवकर होईल." याप्रमाणें कर्कोटक सर्पानें नळास उपदेश करून त्यानें त्याला एक सुंदर वस्त्र दिलें, व तो निघून गेला.

## २ नळ व ऋतुपर्ण राजा.

सर्प गेल्यावर नळराजा लागलाच तेथून निघाला तो अयोध्येस ऋतुपर्ण राजाकडे आला. ऋतुपर्ण राजानें त्यास कोण, काय, तें विचारल्यावर, नळराजा म्हणाला; " महाराज, माझें नांव 'बाहुक' असें असून मी अश्वविद्या व पाक निष्पत्ति उत्तम प्रकारें जाणतों. आपली सेवा करावी, या उद्देशानें आपणाकडे आलों आहे." नळाचें तें लीनतेचें भाषण ऐकून, ऋतुपर्ण राजास फार संतोष झाला. त्यास एका चांगल्या सारथ्याची आवश्यकता असल्यामुळें, त्यानें त्या बाहुकास मोठ्या आनंदानें ठेवून घेऊन, आपली सर्व अश्वशाळा त्याच्या स्वाधीन केली. नळराजास अश्वविद्या चांगली अवगत असल्यामुळें, नळानें ऋतुपर्ण राजाची अश्वशाळा लवकरच नांवारूपाला आणिली. नळराजा तेथें आपल्या हातानें स्वयंपाक करून जेवीत असे. इतर सेवकजन त्यास आपणाकडे जेवण्याबद्दल पुष्कळ आग्रह करीत असत; पण दुसऱ्याचें अन्न खावयाचें नाहीं, असा त्याचा नियम असल्यामुळें, तो प्रत्यहीं रात्रीं स्वतः स्वयंपाक करून जेवीत असे, रात्रीं निजल्यावर नळराजास स्त्रीपुत्रांची आठवण होऊन, त्याचें हृदय भडभडून येत असे. प्रत्यहीं रात्रीं अंथुरणावर पडला म्हणजे त्याच्या डोळ्यांतून अश्रु वहात असत. नळराजाची ती स्थिति, दोन-चार दिवसांच्या सहवासानें तेथील इतर सेवकांच्या ध्यानीं आली. एके दिवशीं एक सेवक त्याला म्हणाला; " बाहुका, रोज रात्रीं तूं असे अश्रु गाळीत असतोस, याचें कारण काय ?" तेव्हां नळराजा म्हणाला; " मित्रा, माझी आणि माझ्या स्त्रीची रानांत मार्ग क्रमीत असतांनां चुकामुक झाली आहे. मी तिला पुष्कळ शोधलें; पण ती मला मुळींच भेटली नाहीं. तिची आठवण झाली म्हणजे, मला साहजिक दुःख होतें. तिची माझ्यावर फार प्रीति आहे. आम्हां उभयतां-मध्यें आजपर्यंत कधींहि ताटातूट झाली नव्हती. ती फार सकुमार असून कोंवळ्या मनाची आहे. तिची काय स्थिती झाली असेल, तिला खायाला मिळत असेल कीं नसेल, ती सुखांत असेल कीं दुःखांत असेल, वगैरे अनेक विचार माझ्या मनामध्यें तिच्याविषयीं येतात. केव्हां केव्हां असें वाटतें कीं, तिला क्रूर श्वापदांनीं खाऊन टाकलें असावें, अथवा त्या घोर अरण्यांतल्या कष्टामुळें तिचा अंत झाला असावा; किंवा, पतीची भेट होण्याची आतां कांहीं आशा नाहीं असें जाणून तिनें कदाचित आत्महत्याहि केली असेल. असे अनेक विचार माझ्या मनांत येतात. व त्यामुळें दुःख होतें व माझ्या डोळ्यांतून अश्रु येतात!" नळराजानें ती सांगितलेली हकीकत ऐकून त्या बाहुकाच्या व्यवसायी बंधूला फार वाईट वाटलें.

## ३ दमयंतीला भीमकाचें दर्शन.

नळराजानें आपलीं दोन्हीं मुलें भीमक राजाचे घरीं पाठवून दिल्यावर भीमक राजास,-नळानें द्यूतांत सर्व गमावून, आतां आपण व बायको असे उभयता अरण्यांतून वास करीत आहेत,-असें वर्तमान कळलें. तेव्हां अर्थातच भीमक राजास फार वाईट वाटलें. आपल्या मुलीची व जांवयाची काय स्थिति असेल, या काळजीनें त्याला अगदीं वेडें करून टाकलें होतें. तेव्हां भीमक राजानें त्या दोघांचा शोध करण्यासाठीं आपले अनेक दूत देशोदेशीं पाठवून दिले; परंतु बरेच दिवस झाले तरी त्यांचा कांहींच शोध लागला नाहीं. तेव्हां राजास असें वाटलें कीं, दोघेहि एकाएकीं हीन दशेंत सांपडल्यामुळें लज्जेनें जनसमाजांत वावरत नसतील, निराळीं नांवें धारण करून कुठेंतरी दिवस कंठीत असतील. अशा स्थितींत ते असल्यास त्यांचा युक्तीनेंच शोध लाविला पाहिजे. असा विचार करून राजानें सुदेव नांवांच्या एका चाणाक्ष पुरोहितास त्या दोघांच्या शोधासाठीं बाहेर देशीं पाठवून दिलें. तो सुदेव पुरोहित, स्वामी कार्यासाठीं फार तत्पर होता. प्रत्येक ठिकाणीं जाऊन बारीक रीतीनें माहिती काढून, नळाचा व दमयंतीचा शोध करूं लागला. अनेक अरण्यें, अनेक देश, अनेक नगरें शोधितां शोधितां तो राजपुरी नांवाच्या शहरांत येऊन पोहोंचला. ' कांहीं दिवसांपूर्वी तेथें एक तरुण स्त्री आली असून ती हल्लीं राजवाड्यांत आहे,' असें त्या सुदेवास समजलें. त्याबरोबर तो राजवाड्यांत गेला, व त्यानें युक्तीनें नवीन आलेल्या स्त्रीला अवलोकन केलें. तिला पाहतांच ती दमयंतीच आहे, असें त्यानें तेव्हांच ओळखिलें. त्यावेळीं सुदेवास एकदम गहिंवर येऊन तो ' दमयंती, दमयंती, ' ह्मणून तिला हाका मारूं लागला. दमयंतीला एकाएकीं तिच्या खऱ्या नांवानें हाका मारल्यामुळें, ती आश्चर्यचकित होऊन गेली, व आपणास ओळखून कोण हाका मारित आहे, हें ती पाहूं लागली. तों आपल्या बापाच्या घरचा सुदेव पुरोहित दिसला! सुदेव पुरोहित वृद्ध होता व राजाच्या सर्व माणसांवर त्याचें आपल्या मुलांबाळां-प्रमाणें प्रेम होतें. त्या पूज्य पुरोहितास पाहतांच, दमयंतीचें हृदय आनंद व दुःख या दोहों विकारांनीं एकदम उचंबळून येऊन तिचे डोळे पाण्यानें भरून आले. ती घाईघाईनें पुरोहिताजवळ आली, व त्याच्या पायावर मस्तक ठेवून अश्रु गाळूं लागली. पुष्कळ दिवसांच्या प्रयत्नानें दमयंती मिळाल्याबद्दल पुरोहितास साहजिक आनंद झाला होता, त्यानें तिला उचलून उभें केलें व तिचे डोळे पुसून तो ह्मणाला, " दमयंती, उगी, रडूं नकोस; तुझा मुलगा इंद्रसेन व मुलगी इंद्रसेनी, दोघेंहि कुशल आहेत. तुझ्या पतीचाहि आह्मीं शोध करीत असून त्याची व तुझी लवकरच गांठ पडेल. तुला आपल्या माहेरीं नेण्यासाठीं मी मुद्दाम आलों आहें."

दमयंती व पुरोहित यांचें तें झालेलें बोलणें ऐकून तेथेंच उभ्या असलेल्या सुनंदा राणीला फार आश्चर्य वाटलें. ती लागलीच आपल्या सासूकडे गेली व ह्मणाली; "सासूबाई, थोड्या दिवसांपूर्वी, आपण ज्या एका तरुण स्त्रीला आपल्या घरीं आणून ठेविलें होतें, ती दुसरी कोणी नसून प्रत्यक्ष दमयंती आहे व तिला नेण्यासाठीं भीमक राजानें आपला पुरोहित पाठविला आहे." सुनंदेच्या तोंडून 'दमयंती' हीं अक्षरें बाहेर पडल्याबरोबर राजमातेसहि फार आश्चर्य वाटलें; व ती तेथून उठून दमयंती जवळ आली. राजमातेनें दमयंतीस आपल्या हृदयाशीं कुरवाळून धरलें; व ती त्या पुरोहिताला ह्मणाली; "अहो, ही नळराजाची स्त्री दमयंती आहे, हें मला मुळींच माहीत नव्हतें. आणि त्यामुळें हिच्या आदरसत्कारांत जर कांहीं कमी झालें असेल, तर भीमकराजास ह्मणावें त्याबद्दल आह्मांला क्षमा कर." नंतर राजमाता दमयंतीला ह्मणाली; "दमयंती, तूं इतके दिवस येथें असून, तूं कोण, तें आह्मांस कळविलें नाहींस! दमयंती, मजजवळ खरी हकीकत सांगावयाला कांहीं हरकत नव्हती; कारण मी तुझी मावशी आहे. भीमकाची स्त्री, ही माझी वडील बहीण होय. आह्मीं दोघी सुदामाच्या मुली, त्यांनीं वडील मुलगी भीमकास दिली व मला वीरबाहूस दिली. पुष्कळ दिवस तुला पाहिलें नसल्यामुळें मी तुला ओळखिलें नाहीं. दमयंती, आम्हीं तुला न ओळखिल्यामुळें तुला सेवावृत्ति करावयाला लाविली, याबद्दल फार खेद होतो. असो, झालें तें झालें, तूं आतां आपल्या माहेरीं जाणार आहेस, तेव्हां अगोदर घरांत चल, मी आपल्या हातानें तुला अभ्यंगस्नान घालून तुझी वेणी घालते, तुझी खणानारळांनीं ओटी भरते; आणि तुला मार्गस्थ करिते." राजमातेचें हें बोलणें ऐकून दमयंती म्हणाली; "माझी व माझ्या पतीची जोंपर्यंत गांठ पडणार नाहीं, तोंपर्यंत अभ्यंगस्नान मला करावयाचें नाहीं. तसेंच तोंपर्यंत मी आपली वेणीहि घालणार नाहीं. ज्या स्त्रीला पतीचा सहवास नसून पति कोणत्या दुःखांत, कोणत्या संकटांत असेल याची विवंचना लागली आहे, तिनें असें विलास करणें हें अत्यंत अनुचित होय. मी आपली अशीच आतां आपल्या माहेरीं जातें. तुम्हीं इतके दिवस माझा मुलीप्रमाणें सांभाळ केलात, हेंच माझ्यावर तुमचे मोठे उपकार झाले आहेत." असें म्हणून दमयंतीनें सर्वांचा निरोप घेतला. मग वीरबाहूराजानें दमयंतीस व पुरोहितास बसण्यासाठीं आपला रथ देऊन त्या दोघांनां भीमकराजाकडे पाठवून दिलें.

## ४ दमयंतीचें पुन्हा स्वयंवर.

आपल्या माहेरीं येऊन, दोन्हीं मुलें कुशल आहेत हें पाहून, दमयंतीस फार आनंद झाला. दमयंतीस कुशल पाहून दमयंतीच्या आईबापालाहि तसाच आनंद झाला. घरीं आल्याबरोबर दमयंतीस तिची आई म्हणाली; "दमयंती, तें जुनें वस्त्र टाकून दे आणि आतां चांगलीं चांगलीं वस्त्रें नेस." तेव्हां

दमयंती दुःखद स्वरानें म्हणाली; आई, या फाटक्या वस्त्रावर माझें फार प्रेम आहे. तें मी पतीची भेट झाल्यावांचून टाकून देणार नाहीं. अरण्यांत त्यांचें वस्त्र जेव्हां नाहींसें झालें; तेव्हां मी आपल्या या वस्त्राचे दोन भाग केले. एक आपल्या पतीला दिला, आणि एक मी हा आपल्याजवळ ठेविला आहे. आई, आतां कसेंहि करून माझी व माझ्या पतीची भेट होईल असें कर. त्यांची जोंपर्यंत भेट होणार नाहीं, तोंपर्यंत मला चांगलीं वस्त्रें, चांगलें अन्न, हें कांहीं नको." हें मुलीचें बोलणें ऐकून सर्वांचीं अंतःकरणें गहिंवरून आलीं. भीमक-राजा आपल्या सुदेव पुरोहिताला बोलावून म्हणाला; "सुदेव, तुह्मीं प्रयत्न करून जसा दमयंतीचा शोध लाविला, तसाच आतां नळराजाचाहि लाविला पाहिजे. जो कोणी नळाचा शोध लावील त्याला मी संतोषित करीन." तेव्हां पर्णाद नांवाचा एक ब्राह्मण तेथें होता, तो म्हणाला; "राजा, मला वाटतें नळराजा अयोध्येस असावा; कारण मी एक दिवस शरयुनदीचे कांठीं बसलों असतांनां, राजाच्या अश्वशाळेवरील कांहीं नौकर घोडे घेऊन नदीवर आले होते. त्यांत बाहुक या नांवांचा एक नौकर होता. तो दुसऱ्या नौकराजवळ 'आपली बायको रानांत चुकली, तिचा मी पुष्कळ शोध केला, पण ती कांहीं मिळाली नाहीं,' वगैरे हकीकत सांगून रडत होता. यावरून मला असें वाटतें कीं, तो बाहुकच—नळराजा असावा." हें ऐकून सुदेव म्हणाला; "तो नळराजाच जर असेल तर त्यास येथें सहज आणितां येईल. ऋतुपर्ण राजास, नळराजाचा शोध लागत नाहीं म्हणून दमयंतीचें स्वयंवर करीत आहोंत असें कळवावें; आणि त्याला कुंकुमपत्रिका अशा बेतानें पाठवावी कीं, येथें यायला एक दिवसाचाच अवकाश मिळेल. जर नळराजा तेथें असेल, तर तो त्याला जरी अयोध्या शतयोजनें लांब आहे; तरी एका दिवसांत येथें घेऊन येईल. कारण नळराजा हा, अश्वविद्येंत फार निपूण आहे. ऋतुपर्ण राजाजवळ सारथी फार कुशल आहे, असा सर्वत्र बोभाटा झालेला आहे, तेव्हां तो बाहुकच बहुतेक नळराजा असेल." सुदेवाची ही सल्ला सर्वांनां पसंत पडली. त्याप्रमाणें लागलीच दमयं-तीच्या स्वयंवराची एक कुंकुमपत्रिका तयार केली व ती सुदेव स्वतः घेऊन, अयोध्येस आला. त्यानें आल्याबरोबर ऋतुपर्ण राजाची भेट घेतली, व त्यास कुंकुमपत्रिका वाचून दाखवून, स्वयंवरास आलेंच पाहिजे ह्मणून विनंति केली, ऋतुपर्ण राजास स्वयंवरास जाण्याची इच्छा झाली, परंतु एका दिवसांत शत योजनें दूर असलेल्या कौंडण्यपुरांत जाणें त्यास अशक्य वाटूं लागलें; तेव्हां त्यानें बाहुकाला बोलाविलें व त्याला तो ह्मणाला; "बाहुका, कौंडण्यपुरास दमयंतीचें दुसऱ्यांदा स्वयंवर होत आहे. उद्यां स्वयंवराचे वेळीं तेथें आपण जाऊन पोहोंचूं असे आपल्या शाळेंत घोडे आहेत काय?" तेव्हां बाहुक म्हणाला; "होय महाराज, शतयोजनें मार्ग क्रमितील असे घोडे आपल्या

अश्वशाळेंत आहेत.'' मग बाहुकानें अश्वशाळेंत जाऊन दोन उत्तम पण रोडके घोडे शोधून आणले, व रथ जोडून तयार केला. रथाला जोडलेले रोडके घोडे पाहून ऋतुपर्ण राजा ह्मणाला; "बाहुका, हे रोडके घोडे एवढा लांब पल्ला कसा गांठतील ?'' बाहुक ह्मणाला; "महाराज, हे घोडे जरी रोडके आहेत, तरी ते खरे जातीवंत आहेत. हे शतयोजनें सहज जातील.'' बाहुकानें याप्रमाणें राजास धैर्य दिल्यावर, राजा आपणा बरोबर सुदैव पुरोहित यास घेऊन रथांत बसला, व बाहुकास रथ 'हांक' ह्मणून ह्मणाला.

## ५ नळ व दमयंती यांची भेट.

राजाची आज्ञा होण्याबरोबर बाहुकानें घोड्यांना इशारत करून, काढण्या सैल सोडल्या तेव्हां वाऱ्यापेक्षांहि मोठ्या वेगानें रथ चालू लागला. विलक्षण वेगानें रथ चालूं लागल्यावर, ऋतुपर्ण राजास आपण वेळेवर जाऊन पोंहोंचूं असा भरंवसा उत्पन्न झाला. तो बाहुकास प्रोत्साहन देऊन ह्मणाला; "बाहुका, तूं इंद्राचा सारथी जो मातली, त्याच्यावरहि मात केलीस." याप्रमाणें बाहुकास प्रोत्साहन मिळाल्यावर त्यानें आणखी वेगानें रथ चालविला. रथ अतिशय वेगानें चालत असल्यामुळें, वाऱ्याच्या जोरानें राजाच्या खांद्यावरील शेला उडून खालीं पडला, त्याबरोबर राजा बाहुकाला 'रथ थांबीव' ह्मणून ह्मणाला. तेव्हां रथ थांबवून बाहुक ह्मणाला; "राजा, तो तर एक योजन मागें राहिला आहे.'' इतक्या विलक्षण वेगानें घोडे चालविण्याचें बाहुकाचें सामर्थ्य पाहून ऋतुपर्ण राजाला फार आश्चर्य वाटलें. तो बाहुकाला ह्मणाला; "बाहुका, तुला जशी अश्वविद्या अवगत आहे, तशी मला अक्षविद्या अवगत आहे. हा जो बिब्याचा वृक्ष आहे, या वृक्षास चवदा शाखा, दाहा हजार एक पानें व एक सहस्र पंचाण्णव फळें आहेत.'' राजाचें हें बोलणें खरें कीं खोटें हें पाहण्यासाठीं बाहुक रथाखालीं उतरला व त्यानें त्या झाडाच्या शाखा वगैरे मोजून, राजा गणितविद्येंत फार निपूण आहे, असें जाणलें. नंतर बाहुक राजाला ह्मणाला; 'महाराज, आपण मला अक्षविद्या द्यावी, मी तुह्मांला अश्वविद्या देतों' राजानें ती गोष्ट कबूल केली व नळास अक्षविद्या दिली. नळराजास अक्षविद्या प्राप्त होण्याबरोबर त्याच्या शरीरांतून कली बाहेर पडला, व त्या नळाचे पाय धरून ह्मणाला; "नळा, मी तुला इतके दिवस छळलें याबद्दल क्षमा कर. तुला छळल्यामुळें माझें सर्व शरीर जळूं लागलें आहे. आतां तूं दया कर; मला शाप वगैरे देऊं नकोस. तुझी अवदशा आतां संपली असें समज. तुला तुझी स्त्री व मुलें हीं लवकरच भेटतील. आणि तुझें राज्यहि तुला प्राप्त होईल.'' असें सांगून कलीनें त्या बिब्याच्या झाडांत प्रवेश केला. हा प्रकार ऋतुपर्ण राजास मुळींच कळला नाहीं. मग बाहुक पुन्हा रथावर बसला व त्यानें मोठ्या वेगानें रथ चालवून कौंडण्यपूर गांठलें.

रथांतून उतरल्यावर, राजा ऋतुपर्ण, बरोबर बाहुकास घेऊन, भीमकराजाचे राजवाड्यांत गेला. पण तेथें त्याला दमयंतीचें स्वयंवराची कांहींच तयारी दिसली नाहीं. तेव्हां सुदेवानें आपणास असें खोटें कां सांगितलें, याची ऋतुपर्ण राजाला मोठी चुटपूट लागली. तो यासंबंधानें सुदेवास विचारणार देखील होता; पण इतक्यांत राजा भीमक, ऋतुपर्णास सामोरा आला व त्यानें सत्कारानें त्यास राजवाड्यांत नेऊन, आपणाजवळ बसण्यासाठीं आसन दिलें. एकमेकांनीं एकमेकांस कुशल विचारल्यावर, भीमकानें ऋतुपर्णास कोणीकडे आलांत ह्मणून विचारिलें. तेव्हां ऋतुपर्ण राजा मोठ्या विचारांत पडला. त्यास 'दमयंतीचें स्वयंवरासाठीं आलों' असें स्पष्ट ह्मणतां येईना. मग त्यानें 'सहज आपल्या भेटीला आलों;' असें कांहीं तरी सांगून राजाचें समाधान केलें. राजानें त्यास आपल्याच महालांत पाहुणे ह्मणून ठेवून घेतलें व बाहुकास अश्वशाळेंत उतरण्यासाठीं जागा दिली. याप्रमाणें 'बाहुक' नांव धारण केलेला नळराजा, भीमक राजाकडे आल्यावर, दमयंतीनें केशिनी नांवांच्या एका विश्वासू दासीला त्या बाहुकावर नजर ठेवण्यास सांगितलें. तिनें त्या दासीला, नळाच्या विशेष खुणा त्याला अवगत असलेल्या विद्या, त्याचा स्वभाव वगैरे सर्व माहिती देऊन नळाकडे पाठवून दिलें. नळानें अश्वशाळेंत आपलें बिऱ्हाड लाविल्यावर, केशिनी त्याच्याकडे उत्तम पंचपक्वान्नाच्या भोजनाचें ताट घेऊन आली; पण बाहुकानें त्या अन्नाचा स्वीकार न करितां कच्चा शिधा मागितला. तेव्हां केशिनीनें भोजनाचें ताट परत नेऊन, बाहुकाला सर्व शिधा आणून दिला. नळानें तो शिधा घेतला व अश्वशाळेंत जाऊन ज्या बाजूला कोणीं येणार नाहीं, अशा ठिकाणीं बसून तो स्वयंपाक करूं लागला. नळ आपल्या समजुतीप्रमाणें बाजूला जाऊन बसला होता; पण त्याच्याकडे केशिनीची नजर होतीच. नळानें अग्निमंत्र ह्मणून अग्नि सिद्ध केला, वरुणाचें आवाहन करण्याबरोबर घागर पाण्यानें तुडुंब भरली; अशी तयारी झाल्यावर नळानें स्वयंपाक करून भोजन केलें. केशिनीनें हा सर्व प्रकार दमयंतीस जाऊन सांगितला, तेव्हां तो नळच आहे, असें तिनें जाणलें. तथापि आणखी खात्री होण्यासाठीं, दमयंतीनें इंद्रसेनास केशिनीजवळ दिले व तिला सांगितलें कीं, 'तूं याला बाहुकाजवळ घेऊन जा, आणि त्याच्यासमक्ष याला रागें भरून मारावयाला लाग, ह्मणजे तो जर नळ असेल तर तुला प्रतिबंध केल्यावांचून राहणार नाहीं.' दमयंतीनें असें सांगितल्यावर, केशिनी इंद्रसेनास घेऊन, नळाजवळ आली; व त्यास रागें भरूं लागली. तें पाहून नळास फार वाईट वाटलें व तो त्या दासीस ह्मणाला; "बाई, कां त्या पोराला रागें भरतेस?" तेव्हां केशिनी ह्मणाली; "बाहुका, हा असाच करंटा आहे. याचा बाप याला कोणीकडे सोडून गेला आहे त्याचा मुळींच पत्ता नाहीं. हा झाल्यापासून त्या नळाच्या मागें सारखी ग्रहदशा

लागली आहे. त्याच्याप्रमाणें हा कोणीकडे निघून जात नाहीं एकदांचा! विनाकारण भलताच हट्ट घेऊन बसतो!" असें ह्मणून, केशिनी इंद्रसेनास मारूं लागली. त्या वेळीं नळाचे डोळे पाण्यानें भरून आले, तो त्या दासीचा हात धरून ह्मणाला; " बाई, तूं अगदींच निर्दय आहस. बिचाऱ्या त्या पोराला कां मारितेस? नळाला वाईट ग्रह आले, यांत त्याचा काय अपराध?" असें ह्मणून नळानें केशिनीपासून इंद्रसेनास सोडवून घेतलें व त्यास दुसरीकडे घालवून दिलें. दुरून दमयंती हा प्रकार पहात होतीच. त्या वेळीं तिला हा नळ आहे, असा पक्का भरंवसा उत्पन्न झाला. व आपण स्वत: त्याच्याजवळ जाऊन उभे राहिल्यास काय होतें तें पाहण्यासाठीं ती त्याजवळ येऊन उभी राहिली. नळराजा त्यावेळीं घोड्याला खरारा करीत होता, पण दमयंतीस पाहिल्यावर त्याची स्थिति कांहीं चमत्कारिक झाली. त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले, हातांतला खरारा गळून पडला; आणि तो अधोवदनानें तिच्याकडे पाहूं लागला. यावेळीं दमयंती मुद्दाम तें अरण्यांतील अर्धें फाडलेलें लुगडें नेसून आली होती. त्या वस्त्राकडे पाहून तर नळाचें हृदय शतशः विदीर्ण होऊन गेलें. तो घोड्याची सुश्रषा सोडून देऊन, खालीं बसला व आपलें तोंड दोन्हीं हातांनीं झांकून घेऊन, रडूं लागला. त्यावेळीं दमयंतीसहि देहभान राहिलें नाहीं. तिनें धांवत जाऊन नळाच्या पायाला घट्ट मिठी घातली व ती त्याला करुण स्वरानें ह्मणाली; " मजवर तुह्मीं रागावून गेलांत, ते मला आज भेटलांत. तुह्मीं ऋतुपर्ण राजाकडे अहां, असें कळल्यावरून स्वयंवराचें खोटें कारण लावून तुह्मांस येथें आणलें." दमयंतीस पाहून नळाच्यानें अधिक बोलवेना. त्यानें कर्कोटक सर्पाचें स्मरण करून, त्यास बोलाविलें. कर्कोटक लागलीच आला व त्यानें नळाच्या शरीरांतील सर्व कृष्णवर्णाचें विष काढून घेतलें. तेव्हां नळ पूर्वीपेक्षांहि अधिक सुंदर व सतेज दिसूं लागला. अशा रीतीनें त्याचा कृष्णवर्ण पालटल्याबरोबर त्यास सर्वांनीं ओळखिलें. राजा भीमक व राणी असे उभयतां राजवड्यांतून नळाजवळ आले व त्यांनीं त्यास दमयंतीसह राजवाड्यांत आणलें. ऋतुपर्णानें नळास आलिंगन दिलें, व 'तुला न ओळखल्यामुळें सेवावृत्ति करावयाला लाविली याबद्दल क्षमा कर.' ह्मणून त्यानें नळाची विनंति केली. मग नळानें आपली हा वेळपर्यंत झालेली सर्व हकीकत सर्वांनां सांगितली. तेव्हां सर्वजण नळाच्या शौर्याची, धैर्याची व सत्वाची, वाखाणणी करूं लागले. मग भीमकराजानें ऋतुपर्ण राजास व नळास चार दिवस आपल्या घरीं ठेऊन घेऊन मोठा उत्सव केला. नंतर भीमकानें व ऋतुपर्ण राजानें नळास, सैन्याची मदत देऊन, नैषध देशावर लढाईला पाठवून दिलें. नळराजानें लवकरच पुष्कराचा पराभव करून, आपलें सर्व नैषध देशचें

राज्य परत घेतलें व तो पुढें आपल्या प्रजेचें पुत्राप्रमाणें संरक्षण करून सुखानें राज्य करूं लागला.

याप्रमाणें नळराजाची कथा सांगून, हंसिणी प्रभावतीला ह्मणाली; "प्रभावती, ही नळराजाची कथा–जशी ऐकावयाला मनोरम आहे, तशी ती सर्व पातकांचा नाश करणारी आहे. त्या पुण्यश्लोक नळाच्या चरित्राचें जो मनन करील त्याच्या आपदा व विपदांचा नाश होईल. नळराजा हा परमेश्वराच्या भक्तांत एकनिष्ठ, साधूंत वरिष्ठ आणि सर्व राजांत श्रेष्ठ, असा होऊन गेला आहे. प्रभावती, त्या राजाचा व दमयंतीचा योग,–हंसानेंच घडवून आणला. यावरून पक्षीहि किती कार्य करितात याची तूं कल्पना कर. त्या हंसाप्रमाणेंच आम्हीं उभयतां तुझा व मदनाचा योग घडवून आणूं."

नळराजाची कथा ऐकल्यावर, जनमेय राजा वैशंपायनाला म्हणाला—"मुनी महाराज, ही मूळ कथा कोणीं कोणाला सांगितली आहे, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे." तेव्हां वैशंपायन म्हणाले; "राजा, पांडव वनवासांत असतांना, बृहदश्वानें ही कथा धर्मराजास सांगितली आहे. कौरवांनींहि असेंच कपटद्यूत खेळून पांडवाचें राज्य हरण केलें होतें, व त्यांना वनवासांत पाठवून दिलें होतें. पांडवांना वनवासांत जेव्हां फार कष्ट होऊं लागले, तेव्हां बृहदश्वानें नळराजाची कथा धर्मास सांगून, त्यास असा उपदेश केला कीं, 'धर्मा, तुला काळजी करण्याचें कांहींच कारण नाहीं. तुम्हीं पांचजण बंधु एका ठिकाणीं आहांत. नळराजा तर एकटा होता, त्यानें धैर्य धरून जसे ते दिवस कंठिले, तसे तुह्मांस कंठण्यास तर कांहींच अशक्य नाहीं. तुम्हांबरोबर द्रौपदी आहे, धौम्यादि ऋषि आहेत, तुमचा वनवास नळापेक्षां शतपट बरा आहे.' याप्रमाणें बृहदश्वानें नळाची हकीकत धर्माला सांगून त्यास धैर्य दिलें. धर्मासहि ती नळाची कथा ऐकून फार समाधान झालें. तीच कथा हंसिणीनें प्रभावतीला सांगितली. आतां प्रभावतीचा व मदनाचा विवाह हंसिणीनें कसा लाविला तें मी तुला सांगतों."

---

## अध्याय १२ वा.

### प्रभावती आणि मदन यांचा विवाह.

वैशंपायन ह्मणाले; "हे राजा जनमेजया, याच वेळीं वसुदेवानें एक महायज्ञ करण्यास आरंभ केला होता. यज्ञासाठीं लागणारें साहित्य स्वतः श्रीकृष्ण भगवान् पुरवीत असल्यामुळें, त्या यज्ञास उणेपणा असा मुळीं देखील नव्हता. यज्ञासाठीं, विद्वान्, ज्ञानी, पवित्र, व तपस्वी असे विश्वामित्र,

वसिष्ठ, गौतम, भारद्वाज, कंठलेम, अत्रि, कश्यप, जमदग्नि, वामदेव, गर्ग. देवल, भृगु, मार्केडेय, पैल, ऋषिशृंग, जैमिनी, शांडिल्य, पराशर, नाकीऋतु, बृहस्पति, साराताात, अग्निदीप्ति, नारद, नउद, कौशिक, सांतपन, मेद, उद्दालक, गौरमुख, दुर्वास, विभांडक, कौंडिण्य, बकदालभ्य, पुल्कस, वामन, शैल्यक, शुक, द्वैपायन, मांडव्य, रोमहर्षण, अष्टावक्र, दधीचिक, बृहदश्व, वाल्मिक, धौम्य, कात्यायन, गालव वगैरे अनेक ऋषि आले होते. त्या सर्वांचा योग्य सत्कार करून वसुदेवानें त्यांना यज्ञास बसविलें होतें. या प्रमाणें मोठ्या थाटानें हा यज्ञसमारंभ चालला असतांना, इंद्र कृष्णाकडे येऊन ह्मणाला; "हे चक्रपाणी, अझून तूं वज्रनाभ दैत्याचा नाश करण्याची कांहींच तजवीज करीत नाहींस हें काय?" श्रीकृष्ण त्यास आश्वासन देऊन ह्मणाले; "इंद्रा, तूं त्या संबंधानें मुळीं देखील काळजी करूं नको. योग्य ती व्यवस्था लवकरच होईल. आतां येथें यज्ञसमारंभ होत आहे तो होईपर्यंत तूं येथेंच रहा." असें श्रीकृष्णानीं इंद्रास सांगून त्यास यज्ञासाठीं ठेवून घेतलें. भद्रनाम या नांवांचा जो प्रसिद्ध नट होता, तोहि त्या प्रसंगीं यज्ञसमारंभास गेला होता, व तो तेथें ऋषींची करमणूक करून त्यांची सेवाशुश्रुषा करीत असे. त्या भद्रनाम नटाचे अनेक खेळ पाहून ऋषि फार संतोषित झाले, व त्यांनीं त्या नटाला 'तुझी सर्वत्र मानमान्यता होईल' असा आशीर्वाद दिला.

## २ वज्रपुरीस मदनाचें आगमन.

इकडे हंस व हंसिणी प्रभावतीला आश्वासन देऊन निघाल्यावर, द्वारकेस आले व प्रथम मदनास भेटून त्यांनीं त्याच्याजवळ प्रभावतीच्या सौंदर्याची, तारुण्याची, व सात्विकपणाची योग्य ती प्रशंसा करून तिचा हेतु त्यास कळविला. नंतर श्रीकृष्णाकडे जाऊन त्यास 'आह्मी प्रभावतीचें मदनाविषयीं मन चळवून आलों' असें सांगितलें. इतकी तयारी झाल्यावर श्रीकृष्णांनीं भद्रनाम नटाबरोबर मदन, सांब व गद या तिघांना देऊन, त्यांना वज्रनाभ दैत्याकडे पाठवून दिलें आणि युक्तिनें कार्यभाग करून वज्रनाभाचा नाश करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें भद्रनाम नट वज्रनाभ राजाकडे आला व त्यानें आपल्या व्यवसायाची राजाला माहिती करून देऊन, राजाच्या दरबारांत खेळ करण्याची परवानगी मिळविली. वज्रनाभ दैत्यासहि भद्रनामाचे खेळ पाहण्याची फार दिवसांपासून इच्छा होती. त्यानें त्या नटास मोठ्या आनंदानें परवानगी देऊन, रोज रात्रीं खेळ करण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें भद्रनाम नट रोज रात्रीं वज्रनाभाचे दरबारांत मदन, सांब व गद यांचें साह्य घेऊन, खेळ करून दाखवूं लागला. तो खेळ पाहण्यासाठीं, खालीं पुरुष बसत असत, व वर स्त्रिया बसत असत. उर्वशीनें रावणास शाप दिला होता, त्या प्रसंगाचा खेळ भद्रनामानें वज्रनाभास करून दाखविला. तो खेळ पाहून राजा फार खुष

झाला व त्यानें त्यास चांगलें बक्षीस दिलें. त्या खेळांत मदन स्त्रीवेष घेऊन नाचत असे, सांब मृदंग वाजवीत असे, गद ताल धरीत असे, आणि भद्रनाम बतावणी करीत असे. तो खेळ पाहून प्रभावतीच्या मनावर कांहीं निराळाच परिणाम झाला. स्त्रीवेष घेऊन नाचणाऱ्या मदनाकडे ती लक्षपूर्वक पहात असे. मदनाच्या चेहऱ्यांत आणि नाचणाऱ्या नटाच्या चेहऱ्यांत, साम्य असल्यामुळें, तिला मदनाची वारंवार स्मृति होऊं लागली, व आपला व मदनाचा योग केव्हां घडून येईल असा तिला ध्यास लागला; शिवाय त्या उर्वशी–रावणाच्या खेळांत होणारा शृंगार पाहून तर तिला विशेषच त्रास होऊं लागला.

## ३ रावणाला उर्वशीचा शाप.

वैशंपायन याप्रमाणें जनमेजयास कथा सांगत असतांना; जनमेजय मध्येंच ह्मणाला; "महाराज, मला उर्वशी व रावण यांची कथा ऐकण्याची इच्छा झाली आहे, तर ती अगोदर सांगून, मग प्रभावतीची कथा सांगावी." तेव्हां वैशंपायन बरें ह्मणून, त्यास रावणाची कथा सांगूं लागले. "एकदां रावण कुबेराकडे आला असतांना त्याची व उर्वशीची गांठ पडली, कुबेराचा पुत्र नलकुबेर, त्याच्याकडे जाण्यासाठीं ती आली होती. तिला पाहून रावणास कामेच्छा उत्पन्न झाली व तो तिला अडवूं लागला. त्यावेळीं तिनें रावणास पुष्कळ समजावून सांगितलें परंतु रावण ऐकेना, तेव्हां उर्वशीनें त्यास 'तुझ्या मस्तकाचें चूर्ण होईल;' ह्मणून शाप दिला. पुढें या नलकुबेरासहि शाप होऊन तो वृक्ष झाला होता. ती कथा अशी आहे कीं, कुबेराचे दोन पुत्र मणिग्रीव आणि नलकुबेर, हे नदीवर मद्य पिऊन नग्नावस्थेंत स्नानें करीत असतांना तिकडून नारद आले; परंतु ते दोघे मद्यानें बेहोष झालेले असल्यामुळें त्यांनीं नारदास वंदन न करितां त्यांचा उपमर्द केला. तेव्हां नारदानें त्यांना शाप दिला कीं, 'तुम्हीं दोघेहि वृक्ष व्हाल व तुम्हांला श्रीकृष्णाचे हाताचा स्पर्श होईपर्यंत त्याच अवस्थेंत रहावें लागेल;' नारदाचा याप्रमाणें शाप होताच ते दोघेहि यमूना नदीच्या कांठीं वृक्ष होऊन राहिले; त्या अवस्थेंत ते सहस्र संवत्सर होते. पुढें गोकुळांत श्रीकृष्ण परमात्मा लहान असतांना, यशोदेकडे आले, व तिच्या मांडीवर बसून स्तन तोंडांत धरून दूध पिऊं लागले. इतक्यांत चुलीवर तापत ठेवलेलें दूध उतू जाऊं लागलें म्हणून, यशोदेनें कृष्णास खालीं ठेविलें व ती घाईघाईनें दुधाकडे गेली. इतक्यांत कृष्णानें ताकाची माथणी होती, त्यांतून बहुतेक लोणी काढून खाऊन टाकलें, व ताक सांडून टाकलें. ताकाची माथण खालीं पडल्यामुळे तिचा मोठा आवाज झाला. तो ऐकून घरांतून यशोदा बाहेर आली; आणि पहाते तों चोंहीकडे ताकच ताक झालें असून, घाईघाईनें लोणी खाल्ल्यामुळें

कृष्णाचे हात व तोंड लोण्यानें भरलेले आहेत. तेव्हां ती कृष्णास धरून बांधूं लागली; पण तितक्यांत तो तिच्या हातांतून निसटला, व पळूं लागला. यशोदा त्याला धरण्यासाठीं त्याच्या मागें पळत होती; पण तो कांहीं सांपडेना. शेवटीं कृष्णासच वाटलें कीं, आपल्या मागें पळून पळून यशोदा फार थकली आहे, तेव्हां जास्त पळविणें बरें नाहीं ह्मणून तो उभा राहिला. मग यशोदेनें गुराला बांधावयाची दोरी आणून त्याला ती बांधूं लागली; पण त्याच्या कमरेला एक दावें पुरेना म्हणून तिनें आणखी एक आणलें; पण तेंहि पुरेना, तेव्हां तिनें पुन्हां तिसरें आणलें. याप्रमाणें पांच सहा दावीं आणल्यावर कृष्णाला वाटलें कीं, आतां अधिक त्रास देणें बरें नव्हे, म्हणून त्यानें यशोदेस बांधूं दिलें. यशोदेनें दोरीचा एक पदर कृष्णाच्या कमरेला बांधून दुसरा पदर आंगणांत उखळी होती, त्या उखळीला बांधला. याप्रमाणें बंदोबस्त केल्यावर यशोदा घरांत जाऊन, गृहकृत्यें करूं लागली. इकडे कृष्णानें तें उखळ ओढित ओढित बाहेर आणलें व रस्त्यानें ओढून लांब नेऊं लागला; परंतु जवळ जवळ असलेल्या त्या दोन वृक्षांच्यामध्यें तें उखळ अडल्यामुळें बाहेर निघेना, तेव्हां कृष्णानें आपल्या दोन्हीं हातांनीं ते दोन्हीं वृक्ष उलथून पाडले. इतक्यांत ते वृक्ष नाहींसे होऊन त्याऐवजीं दोन सर्वांग सुंदर पुरुष उत्पन्न झाले. तेच मणिग्रीव व नळकुबेर होत. शापमुक्त झाल्यामुळें त्यांस फार आनंद झाला, व ते दोघे श्रीकृष्णास वंदन करून स्वस्थानीं निघून गेले.

## ४ प्रभावतीच्या महालांत मदनाचा प्रवेश.

ही कथा सांगून वैशंपायन जनमेजयाला म्हणाले; "राजा जनमेजया, आतां प्रभावतीचें पुढें काय झालें तें तुला सांगतों. प्रभावती आपल्या महालांत, त्या मदनाप्रमाणें दिसणाऱ्या नटाविषयीं विचार करीत असतांना, तेथें हंसिणी आली. हंसिणीला पाहिल्याबरोबर प्रभावती म्हणाली, "बाई हंसिणी, आतां त्या मदनाचा मला फारच ध्यास लागला आहे, तो प्राप्त होण्याची कांहीं आशा असेल तर सांग, नाहींतर मी आपला प्राणत्याग करीन. हंसिणी, हल्लीं या शहरांत जे कांहीं नट खेळ करण्यासाठीं आले आहेत, त्यांत एकतर अगदीं मदनासारखा आहे. तो नट नसता तर मी त्याला मदनच म्हणून समजलें असतें. त्या नटाला पाहिल्यापासून मला वारंवार मदनाची आठवण होऊन मी त्याच्यासाठीं अगदीं व्याकूळ होत आहे." हें प्रभावतीचें बोलणें ऐकून हंसिणी हंसूं लागली. ती प्रभावतीला म्हणाली, "प्रभावती, तोच मदन आहे, त्यानें नटवेश घेऊन, या नगरांत तर प्रवेश केला आहे. आतां कांहीं युक्तीनें तो तुझ्या महालांतहि प्रवेश करील." हंसिणीचें हें बोलणें ऐकून प्रभावतीला फार हर्ष झाला; व मदनाला भेटण्याची तिची उत्कंठाहि त्याबरोबर दुप्पट वाढली. ती हंसिणीला ह्मणाली; " हंसिणी, तूं वाटेल तो प्रयत्न करून, मदनाची व माझी भेट होईल असें कर

आणि तसें होण्यासारखें नसेल तर तसें स्पष्ट सांग, म्हणजे मी आपली आत्म-हत्या करून या तापत्रयांतून एकदांची सुटेन तरी." हंसिणी ह्मणाली; "बाई प्रभावती, धैर्य धर, आज रात्रीं त्याची व तुझी खात्रीनें भेट होईल." असें प्रभावतीला सांगून हंसिणी मदनाकडे आली, व प्रभावतीचा निश्चय तिनें त्यास कळवून, 'तूं आज तिच्याकडे गेला नाहींस तर ती प्राणत्याग करील' ह्मणून बजाविलें. हंसिणीचा हा निरोप ऐकून प्रभावतीचे महालांत कसा प्रवेश करितां येईल याचा मदनास मोठा विचार पडला. सायंकाळची वेळ झाल्यावर तो प्रभावतीच्या महाला जवळ गेला व कोणत्या युक्तीनें आंत जातां येईल, तें शोधूं लागला. पण बराच वेळ झाला तरी त्याला योग्य अशी संधी मिळेना. इतक्यांत एक माळीण दुरडींत फुलें घेऊन प्रभावतीच्या महालांत जाऊं लागली. तेव्हां मदनानें भ्रमराचें रूप धारण केलें व तो त्या दुरडींतील एका कमळांत जाऊन बसला. प्रभावतीच्या महालांत माळीण आल्यावर तिनें तिच्या जवळून फुलें घेतलीं, व तिला निरोप दिला. आज आपणाकडे मदन खात्रीनें येणार, या आशेनें तिला मोठा आनंद झाला होता. रोजच्या पेक्षांहि आज आपण विशेष सुस्वरूप दिसावें म्हणून ती वस्त्रें व भूषणें टाकटिकीनें लेवूं लागली. आपली वेणी तिनें बकुळाच्या फुलानें गुंफून डोकींवर एक सुंदर कमळाचें फूल खोंविलें. त्याच कमळांत मदन भृंग्याच्या रूपानें राहिला होता. कपाळावर मालतीच्या कळ्यांची झालर करून तिनें लाविली. डोळ्यांत काजळ घातलें. कुसुंबी रंगाचें पातळ पायघोळ नेसली, अंगांत सुंदर चोळी घालून त्यावर फुलांची जाळी बसविली. या प्रमाणें थाट करून, ती मदनाची वाट पहात बसली. परंतु बराच वेळ झालातरी तिला मदन येतांना दिसेना. तेव्हां ती फारच कष्टी झाली व निराशेनें तिच्या डोळ्यास पाणी आलें. इतक्यांत तेथें हंसिणी आली. तिला पाहतांच प्रभावतीस अधिक रडूं कोसळलें. ती म्हणाली, "हंसिणी, तूं गोड गोड बोलून, मला फसवितेस मात्र, इतका वेळ झाला तरी मदनाचा कांहीं पत्ता नाहीं, तेव्हां आज तो येत नाहीं हेंच खास. आणि उद्यां तरी येणार अशी खात्री कोठें आहे; तेव्हां मला आतां प्राणत्याग करण्यावांचून दुसरा उपायच नाहीं!" असें म्हणून प्रभावती शोकभारानें व्याकूळ होऊन पलंगावर निचेष्ट पडली. प्रभावतीची आपणाठायीं असलेली ती निष्कपट भक्ति पाहून मदनानें आपलें पूर्वरूप प्रगट केलें. मदनास पाहतांच हंसिणीनें प्रभावतीस सावध केलें. मदनाची ती मनोहर मूर्ति पाहतांच, प्रभावतीस आपल्या जन्माचें सार्थक झालें असें वाटलें. मग प्रभावतीनें मदनास, मंगलस्नान घालून, सुंदर वस्त्रें व अलंकार घालावयाला दिले. नंतर मदनानें गांधर्व—लग्नाचे मंत्र म्हटले व प्रभावतीनें मदनाच्या गळ्यांत माळ घातली. याप्रमाणें मदन आणि प्रभावती यांचा गांधर्वविवाह होऊन तीं दोघेंहि सुखाचा अनुभव घेऊं लागलीं.

---

# अध्याय १२ वा.

---

## प्रभावतीस पुत्रप्राप्ती.

प्रभावती पतीच्या सहवासांत आनंदानें दिवस घालवीत असतां, एके दिवशीं तिच्याकडे तिच्या चुलत वहिणी, म्हणजे सुनाभाच्या मुली, चंद्रावती व गुणवती, अशा दोघी आल्या. पतिसहवासांत कांहीं दिवस गेल्यामुळें प्रभावतीच्या प्रकृतींत व आकृतींत बराच फरक झाला होता. त्या फरकावरून तिच्या दोघी वहिणींनीं, ती पुरुषाच्या सहवासांत असावी असें जाणलें. तेव्हां त्यांच्यापैकीं एकजण प्रभावतीला म्हणाली; "गडे प्रभावती, तुला दुर्वासऋषींनीं दिलेल्या वरप्रदानाप्रमाणें फळ मिळालें, असें दिसतें. तुझे ओंठ विडा खाऊन रंगले आहेत, तुझ्या गुलाबी गालांवर पुरुषाच्या दंतव्रणाची खूण दिसत आहे, ऊरस्थल उन्नत झालेलें आहे; आणि चेहरा आनंदभरित दिसत आहे. यावरून तुला योग्य पति मिळाला, असें दिसतें. तूं अशा कोणा भाग्यवानाला आपल्या महालांत आणलें आहेस, तें आम्हांला सांगतेस का?" तेव्हां प्रभावतीनें त्या दोघींना झालेला सर्व प्रकार सांगून, मंचकावर मदन निजला होता, तो त्यांना दाखविला. त्या सुंदर मदनास पाहून, त्या दोघीजणी म्हणाल्या, "प्रभावती, तुझें भाग्य थोर, म्हणून तुला असा पति मिळाला. प्रभावती, आमचा विचारहि यदु वंशांतीलच पुरुषाबरोबर विवाह करण्याचा आहे; तर तूं आपल्या पतीला सांगून आमच्या विवाहाचीहि कांहीं तजवीज कर." तेव्हां प्रभावती म्हणाली, "यांच्याबरोबर आणखी दोन पुरुष आलेले आहेत. ते रूपगुणांनीं यांच्याचप्रमाणें आहेत, तेव्हां त्यांच्यासंबंधानें मी विचारून पाहतें." असें म्हणून प्रभावती मदनाकडे गेली, व तिनें त्यास आपल्या दोन्हीं वहिणींची इच्छा दर्शविली. तें ऐकून मदन म्हणाला, "या गोष्टीला ते दोघेहि मोठ्या आनंदानें तयार होतील, ते दोघेहि मोठे पराक्रमी आहेत. त्या दोघांचीं नांवें गद व सांब अशीं आहेत. गद हा माझा चुलता असून, सांब हा माझा सावत्र बंधु आहे. रुक्मिणी स्वयंवराचे वेळीं, गदानें जरासंधाशीं युद्ध करून जय मिळविला आहे. तसेंच सांब हाहि मोठा पराक्रमी असून त्यानें दुर्योधनाची मुलगी लक्ष्मणा, ही स्वयंवरांत मिळवून आणलेली आहे." लक्ष्मणेचें नांव निघाल्यावर प्रभावती म्हणाली, "मला लक्ष्मणेच्या स्वयंवराची कथा ऐकण्याची फार इच्छा आहे, तर तेवढी कृपा करून सांगावी." मग मदन तिला लक्ष्मणेच्या स्वयंवराची कथा सांगूं लागला. "हस्तनापुरचा राजा दुर्योधन, याची लक्ष्मणा ही मुलगी होय; ती उपवर झाल्यावर, त्या राजानें देशोदेशींचे भूपाळ बोलावून, लक्ष्मणेचें स्वयंवर मांडलें. त्यावेळीं सांबानें लग्नमंडपांतून लक्ष्मणेचें

हरण केलें व तिला तो द्वारकेस घेऊन जाऊं लागला. हा प्रकार पाहून, दुर्योधनास अनिवार कोप आला; व तो ससैन्य सांबाच्या मागें लागला; तेव्हां सांबहि मागें परतून, त्या सर्वांशीं एकटा युद्ध करूं लागला. पण कौरव हजारों असल्यामुळें, एकट्या सांबाचें कांहीं चालेना. तो हतवीर्य, झाला तेव्हां दुर्योधनानें लक्ष्मणेसह सांबास धरून आणून त्या दोघांना हस्तनापुरच्या तुरुंगांत ठेविलें. हें वर्तमान कृष्णास समजल्यावर कृष्णानें सांबाच्या सोडवणुकीसाठीं बलरामाला हस्तनापुरास पाठवून दिलें. बलरामानें दुर्योधनास बोलावून आणून, प्रथमत: नीट सामोपचारानें सांगून पाहिलें; परंतु त्यास अभिमान वाटत असल्यामुळें, त्यानें बलरामाच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून उलट त्याचा अपमान केला. तेव्हां बलरामानें आपला नांगर भूमींत रोंविला व तो हलवूं लागला. त्या प्रसंगी हस्तनापुरांतील हजारों मंदिरें डळमळूं लागलीं. कित्येक घरें पडलीं, आणि साऱ्या नगरांत मोठा अनर्थ उडाला. या अनर्थाचें मूळ दुर्योधनास समजतांच तो बलरामाजवळ आला आणि त्यानें त्याची क्षमा मागितली व बलरामाची समजूत घालून त्यास वाड्यांत नेलें. मग मोठ्या समारंभानें सांबाबरोबर लक्ष्मणेचा विवाह करून बलरामासह त्यांनां द्वारकेस पोहोंचतें केलें. ”

मदनानें सांगितलेली ही कथा ऐकून, गुणवती व चंद्रावती यांनां आपण सांब व गद, यांच्याबरोबर केव्हां विवाह करूं असें झालें. मग मदनानें हंसिणीला सांगून गद व सांब यांस गुप्तरूपानें प्रभावतीचे महालांत बोलावून घेतलें, व आपला हेतु सांगून, गांधर्व पद्धतीनें चंद्रावतीचा गदाबरोबर व गुणवतीचा सांबाबरोबर विवाह लाविला. त्या दोघींना प्रभावतीनें आपल्याच महालांत ठेवून घेतलें. कित्येक दिवसपर्यंत त्या तिघींनीं दाम्पत्यसुखाचा अनुभव घेतल्यावर त्यांच्या शरीरावर गरोदरावस्थेचीं चिन्हें दिसूं लागलीं. त्या सर्वांचे ते दिवस अर्थातच मोठ्या सुखानें चालले होते. खावें, प्यावें, सारीपाट खेळत बसावें आणि मौजेनें गप्पा मारीत रहावें, हाच त्यांचा व्यवसाय झाला होता. मदन त्या सर्वांना अनेक देवादिकांच्या कथा सांगत असे. एके दिवशीं सारीपाट खेळत असतांना; चंद्र, मेघमंडळाच्या आड झाला. त्यामुळें गच्चीवर काळोख पडला. तेव्हां मदन म्हणाला; ‘ येथें तीन शशीवदना आहेत; पण प्रकाश एकीचाहि नाहीं; ’ त्यावरून चंद्राच्या गोष्टी निघाल्या, मदनानें प्रभावतीस चंद्र, चंद्राचा मुलगा बुध व बुधाचा मुलगा पुरूरवा याविषयीं थोडी माहिती सांगितल्यावर सर्वांसच पुरूरव्याची कथा ऐकण्याची इच्छा झाली, व मदनानें पुरुरव्याची कथा सांगण्यास आरंभ केला. मदन म्हणाला; “ चंद्र हा अत्रि ऋषीचा वीर्यगोल होय. तो पूर्वी सोळाहि कलांनीं परिपूर्ण असा होता; परंतु त्यानें—एके दिवशीं बृहस्पति स्नानाला गेले अस-

तांनीं त्यांच्या घरीं जाऊन—त्यांची स्त्री बलात्कारानें हरण करून आपल्या घरीं आणिली. गुरूला हें वर्तमान कळल्यावर, तो इंद्रादि देवांकडे गेला व त्यानें झालेली सर्व हकीगत सांगून आपली स्त्री देवेंद्रास परत आणून देण्याविषयीं विनंति केली. त्याप्रमाणें देवेंद्रानें चंद्राजवळ गुरूची स्त्री जी तारा, तिची मागणी केली, पण तो देईना. तेव्हां देवांनीं चंद्राबरोबर युद्ध सुरू केलें, त्या वेळीं चंद्रानें भयंकर थंडीचा वर्षाव करून, इंद्रादि देवांना थंड गार करून टाकलें. तें वर्तमान महादेवांना कळल्यावर महादेव आपला त्रिशुळ घेऊन व श्रीकृष्ण आपलें सुदर्शनचक्र घेऊन चंद्राचा नाश करण्यासाटीं आले, हा प्रकार पाहून ब्रह्मदेवास वाटलें कीं, आतां हे दोघेहि चंद्राचा नाश करितील. मग ब्रह्मदेव त्या दोघांनां विनयपूर्वक म्हणाला; "अहो, चंद्राचा नाश करूं नका, कारण तो सर्व वनस्पतीला रस देणारा असून त्याच्यावर सर्वांचें जीवन अवलंबून आहे. दिनमान त्याच्यामुळें समजतें, आयुष्याची गणना केवळ त्याच्यामुळें करितां येते; तेव्हां त्याचा नाश करूं नका. त्याचा नाश केल्यास सर्वत्र अनर्थ होईल. मी त्याच्याकडे जाऊन गुरुपत्नीला घेऊन येतों." मग ब्रह्मदेव चंद्राकडे गेले व ते गुरुपत्नीला घेऊन आले. चंद्राकडे असतांना तारा गरोदर झाली, व तिला पुढें मुलगा झाला, तोच बुध हा होय. चंद्रवीर्यापासून तारा जरी गरोदर झाली होती, तरी तिला महापतीव्रता समजतात, व तिचें नांव प्रसिद्ध पंचकन्यांत आहे. बुधानें 'इला' नांवाच्या सूर्यवंशांतील मुलीशीं लग्न केलें होतें. ही इला कांहीं दिवस पुरुष व कांहीं दिवस स्त्री अशी असे. इला ही श्राद्धदेवाची मुलगी होय. श्राद्धदेवास पुष्कळ दिवस संतति होत नसल्यामुळें त्यानें तिच्या प्राप्तीस्तव यज्ञ केला. त्या वेळीं ऋषींनीं त्यास 'तुला मुलगी होईल' ह्मणून आशीर्वाद दिला. मग यथाकालीं त्या श्राद्धदेवाची स्त्री प्रसूत होऊन तिला मुलगी झाली. पण मुलीकडून कुलाचा उद्धार व वंशाची वृद्धि होणार नसल्यामुळें, श्राद्धदेव त्या मुलीला घेऊन ब्रह्मदेवाकडे गेला, व त्याची त्यानें अनन्य भावानें सेवा केली, तेव्हां ब्रह्मदेव प्रसन्न होऊन त्यास म्हणालें; 'हे श्राद्ध देवा, मी तुझ्या भक्तीनें प्रसन्न झालों आहे. या मुलीचाच मुलगा होऊन तो तुझ्या कुळाची वृद्धि करील.' ब्रह्मदेवानें असें म्हटल्याबरोबर त्या मुलीचा सुंदर मुलगा झाला. मग श्राद्धदेवानें त्या मुलाचें नांव सुद्युम्न असें ठेविलें. पुढें तो मुलगा शंकराच्या काम्यक वनांत शिकारीसाठीं गेला असतांनां एकाएकीं पुरुषाचा स्त्री झाला. याचें कारण असें होतें कीं, पूर्वी काम्यक वनांत महादेव, पार्वतीबरोबर क्रीडा करीत असतांनां महादेवाच्या दर्शनासाठीं कांहीं ऋषि आले. त्यावेळीं पार्वती नग्नावस्थेंत असल्यामुळें फार लाजली व घाईघाईनें तिनें वस्त्र परिधान केलें. नंतर ते ऋषि महादेवाचें दर्शन घेऊन गेल्यावर,

पार्वती महादेवाला म्हणाली; ‘ हें काम्यकवन आपण क्रीडेसाठीं मुद्दाम ठेविलेलें असून, येथें देखील लोक येऊन त्रास देतात, हें बरें नव्हे. ’ पार्वतीचें हें बोलणें ऐकून महादेवांनीं ‘ या वनांत जो पुरुष येईल, तो तत्काळ स्त्री होईल.’ असा त्या वनास शाप दिला तेव्हांपासून त्या वनांत जो पुरुष जातो, तो स्त्री होतो. त्या प्रमाणें सुद्युम्नहि स्त्री झाला. पुढें त्या स्त्रीची व बुधाची गांठ होऊन त्या दोघांनीं विवाह केला, आणि त्या स्थितींत असतांनां सुद्युम्नास पुत्र झाला, त्याचें नांव पुरूरवा असें ठेविलें. हा प्रकार श्राद्धदेवास कळल्यावर त्यास फार वाईट वाटलें, मग तो व वशिष्ट, असे शंकराकडे गेले, व सुद्युम्नास पुरुष करा ह्मणून त्यांनीं शंकराची प्रार्थना केली. तेव्हां शंकर प्रसन्न झाले. ते म्हणाले; ‘ माझा वनशाप हा कधींहि टळावयाचा नाहीं; तथापि तुमच्या प्रार्थनेनें मी प्रसन्न झालों असल्यामुळें, मी सुद्युम्नास असा उःशाप देतों कीं, तो महिनाभर पुरूष व एक महिनाभर स्त्री, असा राहील.’ त्या सुद्युम्नाच्या स्त्रीला सुद्युम्नापासून उत्कल, गय, व विमल अशीं तीन मुलें झालीं, आणि तो स्वतः स्त्री असतांना, त्यास पुरूरवा मुलगा झाला. सुद्युम्नास आपल्या त्या स्थितीचा फारच कंटाळा आला व त्यानें आपलें राज्य पुरूरव्यास देऊन तो वानप्रस्थाश्रमी झाला. त्यानें मोठें कडकडीत तप केलें तेव्हां त्यास मुक्ति मिळाली. ”

ही कथा सांगून होत आहे तोंच द्वारकेहून श्रीकृष्णाकडून प्रभावतीच्या महालांत हंस आला. त्यानें सर्वांना द्वारकेकडील कुशल कळविलें व म्हणाला; “मदना तूं आतां असा स्वस्थ बसून दिवस गमावूं नकोस. तिकडे कश्यप ऋषिचा यज्ञ आटोपत आला आहे, तेव्हां तो संपला नाहीं तोंच तुम्हीं, वज्रनाभास मारून टाकिलें पाहिजे. नाहींतर मग पुढें वज्रनाभाचा नाश करावयाला फार जड जाईल.” हें ऐकून मदन म्हणाला; “ हंसा तूं म्हणतोस तें खरें, पण आम्हां सर्वांच्या स्त्रिया गरोदरावस्थेंत आहेत, तेव्हां त्या संबंधानें कसें करावयाचें ? तें तूं पुन्हां द्वारकेस जाऊन श्रीकृष्णास कळीव व ते काय सांगतील तें आम्हांला येऊन सांग.” मग हंस द्वारकेस गेला व पुन्हां श्रीकृष्णाचा निरोप घेऊन आला, हंस म्हणाला; “ मदना, त्या संबंधानें आपण मुळींच काळजी करूं नये, असें श्रीकृष्णानीं सांगितलें आहे, तुम्हां तिघांनांहि पुत्र होतील व ते एक महिन्याचे झाल्यावर त्यांनां सर्व युद्धविद्या प्राप्त होऊन, तुम्हांस ते युद्धाचे प्रसंगीं साह्य करितील.” पुढें कांहीं दिवसांनीं तिघांच्याहि स्त्रिया प्रसूत झाल्या, व तिघीनांहि पुत्र झाले. त्यावेळीं सर्वांसच मोठा आनंद झाला, प्रभावतीनें कोणास कळूं न देतां पुत्र प्राप्तीबद्दल मोठा उत्सव केला. मदनाच्या पुत्राचें नांव विजय, सांबाच्या पुत्राचें नांव गुणवंत व गदाच्या पुत्राचें नांव चंद्रप्रभु असें ठेविलें. पुढें एक महिना लोटल्यावर ते तिघेहि सर्व शस्त्रास्त्र विद्येंत प्रवीण होऊन, मोठाल्या वीराप्रमाणें दिसूं लागले.

# अध्याय १३ वा.

## वज्रनाभ राजाचा संहार.

वैशंपायन ऋषि जनमेजयाला म्हणाले; "हे राजा जनमेजया, प्रभावतीच्या महालांत मदन वगैरे जरी मोठ्या आनंदांत होते तरी, वज्रनाभ दैत्याचा कसा संहार करावयाचा, ही त्यांनां मोठीच काळजी होती. प्रभावतीचें मन न दुखवितां तिच्या बापाला मारावें कसें, अशा विचारांत मदन, गद व सांब असतांना, एके दिवशीं वज्रनाभाचे हजारों सैनिक प्रभावतीच महालावर धांवून आले, व त्यांनीं महालास वेढा घातला. प्रभावतीनें अत्यंत गुप्तपणें विवाह केला होता, व आपल्या महालांतील प्रकार कोणास कळूं नये ह्मणून, फार खबरदारी घेतली होती, व त्याप्रमाणें तिला यशहि आलें होतें. पण घरभेदे हे सर्वत्र असतातच. एके दिवशीं कांहीं कारणावरून, एक परिचारिका प्रभावातीवर रुष्ट झाली व तिनें झालेली सर्व हकीकत वज्रनाभ दैत्यास जाऊन सांगितली. ती हकीकत ऐकून, वज्रनाभास पराकाष्टेचें दुःख झालें व तितकाच संतापहि आला. त्या दुःख व संतापातिरेकानें राजास काय करावें तें कळेना, युद्ध करावें तर मदन वगैरे मृत्युमुखीं पडून मुलींना वैधव्य प्राप्त होणार, आणि त्यांनां वैधव्य प्राप्त झालें ह्मणजे त्या सहगमन केल्यावांचून राहणार नाहींत. बरें युद्ध करूं नये तर, स्वतःचा प्राण जाणार, याप्रमाणें राजा विचार करीत असतां, त्यास नक्की कायतें ठरवितां येईना. शेवटीं त्याच्या मनावर स्वतःच्या महत्वाकांक्षेचा अंमल बसला व तो मदनाबरोबर युद्ध करण्यास प्रवृत्त झाला. मुलींनां वैधव्य येऊन त्यांनीं सहगमन केलें तरी कांहीं हरकत नाहीं. पण स्वतःची महत्वाकांक्षा सोडावयाची नाहीं. असें राजानें ठरविलें. राजाचा हा विचार कायम झाल्यावर, त्यानें आपले हजारों सैनिक प्रभावतीच्या महालांत असलेल्या सहा वीरांनां पकडून आणण्यासाठीं पाठवून दिले.

### २ मदन व प्रभावती.

इकडे प्रभावतीच्या महालाला वज्रनाभाच्या सैन्यानें वेढा घातल्यावर प्रभावती, चंद्रप्रभा व गुणवती या तिघींची अवस्था मोठी चमत्कारिक झाली; त्या आपआपल्या पतीच्या गळ्याला मिठ्या मारून रडूं लागल्या, प्रभावती मदनाला ह्मणाली; "अहो, मी तुमची स्त्री नसून तुह्माला वैरीण मात्र झालें, दारापुढें आलेल्या या सैन्यभारापुढें तुमचा कसा टिकाव लागणार! माझा बाप वज्रनाभ अत्यंत निर्दय आहे. तो तुम्हां सर्वांची कत्तल केल्यावांचून राहणार नाहीं, तेव्हां अगोदर आपल्या हातांनीं आम्हां तिघींनां या जगांतून नाहींसे करा, आणि मग तुह्मांला काय करावयाचें असेल तें करा!!!" प्रभावतीचें हें भाषण

ऐकून ते सहाहि वीर खदखदां हांसले. मदन प्रभावतीला ह्मणाला; "प्रभावती, तुह्मी कोणीहि यासंबंधानें मुळीं देखील काळजी करूं नका. आह्मी सर्व केवळ वज्रनाभाचा संहार करण्यासाठींच येथें आलेलों आहोंत, त्यानें लाखों सैन्य आणलें तरीं, त्याच्याबरोबर युद्ध करण्यास आह्मीं पुरे आहोंत. पण आह्मांला वाईट वाटतें तें एवढेंच कीं, आज तुझ्या बापाला मला या जगांतून नाहींसें करावें लागणार. हा प्रसंग टाळण्यासाठीं तुह्मांला येथून पळवून घेऊन जाण्याचीहि आमच्या आंगीं शक्ति आहे, पण तसें करणें हा वीरांचा धर्म नव्हे. ह्मणून आह्मी आतां तुझ्या पित्याबरोबर युद्ध करून त्याला यमसदनाची वाट दाखविणार. तुझा बाप तुला आज अंतरणार याबद्दल मला खरोखर फार वाईट वाटतें; पण त्याला माझा नाइलाज आहे. दुष्टांचा संहार करणें हें आमचें ब्रीद आहे. तुझ्या बापाच्या संहाराची आह्मी तयारी करीत आहों याबद्दल तुला वाईट वाटत नाहींना ?"

प्रभावती म्हणाली; "नाथ! स्त्रियांचें मुख्य भूषण पति हें होय. स्त्रियांचें सर्वस्व कायतें पति, पतिपेक्षां स्त्रिया कोणावरहि अधिक प्रीति करीत नाहींत. आई, बाप, बंधु या सर्वांपेक्षां पति व पुत्र स्त्रियांना अधिक प्रिय असतो, हीच आम्हीं आमची मुख्य व खरी संपत्ति समजतों, तेव्हां आपण सहाजण सुरक्षित राहण्यासाठीं, व राज्यांतील प्रजाजनांचें दुःख नाहींसें करण्यासाठीं, आपण माझ्या पित्याचा खुशाल वध करावा, त्याच्यावर माझी प्रीति आहे हें खरें! त्याच्या मृत्यूनें मला दुःख होईल; आणि मी त्याच्यासाठीं अश्रु गाळीन हेंही खरें!! पण मी आपणास आपल्या ब्रीदाच्या आड कधींहि येणार नाहीं, आपण आपलें कर्तव्य करीत असतांना, मी आपला हात न धरितां आपणास साह्यच करीन!!!" हें प्रभावतीचें बोलणें ऐकून सर्वांना मोठा आनंद झाला व सर्वजण आपआपलीं शस्त्रास्त्रें घेऊन युद्धास तयार झाले. तिघे पुत्र आपल्या आईचें संरक्षण करण्यासाठीं महालाजवळ राहिले, आणि मदन, गद व सांब, हे महालास वेढा घालणाऱ्या सैन्यावर तुटून पडले. गदानें आपल्या तलवारीच्या विलक्षण चापल्यानें पहिल्याच उसळीला, वज्रनाभाचे हजारों वीर नाहींसे केले, सांबानें सर्व सैन्य रेटीतरेटीत, महालापासून लांब नेलें. हा त्या दोघांचा विलक्षण पराक्रम बघून वज्रनाभाचे सैनिक तोंडांत बोटें घालूं लागले, 'अरे, हे वीर लहान दिसतात, पण यांचा पराक्रम मोठा आहे.' अशी ते त्यांची प्रशंसा करूं लागले. त्यांचा पराक्रम पाहून वज्रनाभाच्या सैन्यासहि अधिक स्फुरण चढलें; व ते जोरानें त्या तिघांवर हल्ले करूं लागले; परंतु यादवांच्या तरवारींनीं क्षणार्धांत बहुतेक सैन्य नाहींसें होऊन, बाकीचें मागें परतून वज्रनाभाकडे गेलें; व त्यास मदनानें उडविलेला हाहाःकार सांगूं लागले. तो युद्धवृत्तांत ऐकून, वज्रनाभ अधिक संतापला, व त्यानें आपला सर्व सैन्यभार

बरोबर घेऊन; तो स्वतः युद्धासाठीं रणक्षेत्रावर आला. त्याच्याप्रमाणेंच महापराक्रमी असा त्याचा बंधु सुनाभ, हाहि त्याच्याबरोबर आला होता. तो रणक्षेत्रावर आल्याबरोबर आपली गदा महा वेगानें फिरवित फिरवित, गदाच्या अंगावर धांवून आला, तेव्हां गदहि आपली गदा घेऊन त्याच्या अंगावर धांवून गेला. त्या वेळीं ते दोघे, दोन पर्वत मोठ्या वेगानें एकमेकाकडे धांवत यावेत त्याप्रमाणें दिसले. सुनाभानें आपली गदा—गदाच्या मस्तकावर हाणून त्यास जमिनीवर लोळविण्याच्या बेतांत आणले होते; परंतु इतक्यांत गदानें चपळाई करून, सुनाभाचा नेम चुकविला, व आपली गदा त्याच्या मस्तकावर घातली; तरी तो आघात सहन करून, सुनाभ गदाबरोबर युद्ध करीत होता; पण तो कमजोर झाला आहे असें पाहून त्याच्या साह्याला कुंभक धांवला. तेव्हां त्यास सांब अडवून ह्मणाला; "अरे, तूं खरा क्षत्रिय नाहींस, असें वाटतें. त्या दोघांचें युद्ध चाललें असतां तूं मध्यें कशाला जातोस ? एका वीराच्या अंगावर दोन वीर कधींहि धांवून जात नाहींत. तुला युद्ध करावयाचें असेल तर माझ्याशी कर." असें सांब म्हणाल्यावर कुंभक सांबाबरोबर युद्ध करूं लागला. कुंभकानें आपला रथ मोठ्या वेगानें सांबाच्या अंगावर घातला, पण सांबानें एका गदेच्या तडाख्यानें रथाचें चूर्ण करून कुंभकास रथाचें खालीं ओढले. व त्याच्या मस्तकावर गदेचा प्रहार करून त्याला रणभूमीवर निजविले. कुंभकासारखा बलाढ्य वीर नाहींसा झाल्यावर वज्रनाभाच्या सैन्यांत एकच हाहाःकार उडाला, व तें सर्व दैत्यसैन्य मागें हटूं लागलें, तेव्हां वज्रनाभानें त्या सर्वांना पुन्हा प्रोत्साहन देऊन रणक्षेत्रावर आणलें व पुन्हां जोराची लढाई सुरू केली, वज्रनाभानें आपला रथ नीट सांबाच्याच अंगावर घातला, तेव्हां मदन पुढें झाला व त्यानें सांबास आपल्या मागें घातलें.

याप्रमाणें युद्ध सुरू झाल्यावर, इंद्र आपला पुत्र जयंत, यासह तो युद्धप्रसंग पाहण्यासाठीं तेथें आला, त्यानें आकाशमार्गानें पाहिलें तों तिघेहि आपल्या पराक्रमानें सर्वांनां दिपवून टाकित आहेत; पण तिघाजवळहि रथ नाहींत, सारथी नाहींत, वाहनें नाहींत, आणि शस्त्रास्त्रांची सामग्रीही पुरेशी नाहीं, अशा स्थितींत त्या यादव वीरांस पाहून इंद्रानें आपला रथ व मातली नांवाचा सारथी गदास दिला, व सांबास आपला ऐरावत दिला. यादव वीरांनां इंद्राकडून ही सामग्री मिळाल्यावर युद्ध अधिक जोरानें चालूं झालें. मदन, सांब व गद या तिघांनी, वज्रनाभाच्या सैन्यांतील हजारों लोक यमसदनीं पाठविलें. रुधिर मांसानें सगळी रणभूमि कुसूंबी रंगानें रंगविल्याप्रमाणें दिसूं लागली. रक्ताचे पाट वाहूं लागले. द्वारकेंत ही हकीकत कळतांच श्रीकृष्णहि आपणाबरोबर अनंतवीर घेऊन तेथें आले. याप्रमाणें यादववीर मदन सांब व गद, यांच्या साह्यास आल्यावर युद्धास अधिकच रंग चढला. हा युद्ध प्रसंग

श्रीकृष्ण परमात्मा दूर उभे राहून पहात होते, व त्या तिघांनां शंख वाजवून वारंवार प्रोत्साहन देत होते. रणांत आपले हजारो राक्षस पटापट मरत आहेत असें पाहून वज्रनाभानें तमास्त्र सोडून सर्व सैन्यावर अंधार पाडला; पण मदनानें सूर्यास्त्र सोडून तो अंधःकार लागलीच नाहींसा केला. पुढें भगवान् वासरमणी अस्ताचली जाण्याची वेळ झाली, तेव्हां उभयतांकडील वीरानीं आपआपलीं शस्त्रास्त्रें खालीं ठेविलीं, त्यांनीं सूर्यास वंदन केलें व ते आपआपल्या छावणींत निघून गेले.

दुसऱ्या दिवशीं सूर्यबिंब दृष्टीस पडल्यावर पुन्हां युद्धास आरंभ झाला. सुनाभ गदा समोर येऊन मोठ्या त्वेषानें लढूं लागला तेव्हां गदानें त्यावर असा प्रहार केला कीं त्याबरोबर सुनाभ ठार झाला. सुनाभांची मृत्युवार्ता रणांत पसरतांच दोन्हीं सैन्यानां अधिक स्फुरण आले. वज्रनाभानें संतप्त होऊन मदनाच्या अंगावर आपला रथ घातला तेव्हां मदनानें असंख्य बाण सोडून वज्रनाभास झांकून त्याचा रथ व घोडे यांचा विध्वंस केला. रथ मोडल्यावर वज्रनाभ रथाखालीं उतरला व आपली गदा घेऊन मदनाच्या अंगावर धांवून आला. त्यावेळीं श्रीकृष्णानीं शंख वाजवून मदनास अधिक प्रोत्साहन दिलें, व त्यास गरुडाकडून सुदर्शनचक्र पाठवून असें कळविलें कीं, यास 'अंगाविरहित होऊन मार, ह्मणजे हा मरेल.' ह्या सूचनें प्रमाणें मदनानें हातांत चक्र घेऊन तो अनंग झाला व त्यानें तें चक्र, वज्रनाभाच्या शरीरावर सोडलें. चक्र वज्रनाभाच्या मस्तकावर जाऊन पडल्याबरोबर, क्षणार्धांत तो उन्मत्त दैत्य रणभूमीवर पडला. हा युद्धचमत्कार आकाशांतून सुरवर पहात होतें. वज्रनाभ पडल्याबरोबर सर्व देवांना मोठा हर्ष झाला, व त्यांनीं सर्व यादव वीरांवर आकाशांतून पुष्पवृष्टी केली. मग कृष्ण व देवेंद्र, मदन वगैरे वीरांनां येऊन भेटले व त्यांच्याकडून त्यांनीं वज्रनाभ व सुनाभ यांची और्ध्वदेहिक क्रिया करविली. वज्रनाभ हत झाल्यावर इंद्रानें त्यास स्वर्गात नेलें, व तेथें त्याचें पद्मनाभ असें नांव ठेविलें. श्रीकृष्णानीं आपल्या सुना व त्यांचे पुत्र यांनां परमप्रीतींनीं कुरवाळिलें व त्यांनां आशीर्वाद दिला.

---

# अध्याय १४ वा.

## १ यादवांचा नाश.

वैशंपायन ऋषी जनमेजयराजाला पुढील कथा सांगू लागले, ते ह्मणाले; "हे जनमेजया, वज्रनाभाचा नाश झाल्यावर श्रीकृष्णादि सर्व यादव, व इंद्रादि सर्व सुरवर, वज्रपुरीस आले. वज्रनाभाचें राज्य फार मोठें होतें व त्यास

पुत्र नव्हता; तेव्हां त्यांनीं त्या राज्याचे चार भाग केले, त्यापैकीं प्रभावती, गुणवती व चंद्रप्रभा या तिघींच्या मुलांनां तीन दिले; व चवथा इंद्राचापुत्र जयंत यानें घेतला. व तो वज्रपुरीच्या राजांचा प्रधान झाला. त्या वज्रनाभाच्या राज्यांत एकसहस्र महापुरें, चारकोटीं उपनगरें, व गांवें व खेडीं हीं तर असंख्य होतीं, शिवाय रथ, पालख्या, हत्ती, घोडे वगैरे संपत्ति अगणित होती. त्या सर्वांची सारखी वाटणी करून, चौघांनां दिली, मुख्य सिंहासनावर प्रभावतीचा पुत्र विजय, यांस बसविलें, जयंतास प्रधान केलें, व चंद्रप्रभु व गुणवंत यांनां राज्याचीं इतर कामें सांगितलीं. विजय यास राज्यावर बसविण्याचे प्रसंगीं श्रीकृष्णांनीं मोठा उत्सव केला. आणि त्या सर्वांना, ' जोंपर्यंत त्रैलोक्य आहे, तों पर्यंत तुमचा यदु वंश चालेल,' असा आशीर्वाद दिला. अशी व्यवस्था केल्यावर श्रीकृष्णानीं, प्रभावती वगैरे तिघा सुनांनां वज्रपुरीस आपल्या पुत्राजवळ राहण्यास सांगितलें, व मदन वगैरे तिघांनां घेऊन तें द्वारकेस जाण्यासाठीं निघाले; पण प्रभावतीनें विनंति केली कीं, ' आमच्या पतींनां आमच्या जवळ आणखी सहा महिनें तरी ठेवावें.' तेव्हां कृष्णानीं मदन, सांब व गद या तिघांनां वज्रपुरीस सहा महिने राहण्यास सांगून, आपण द्वारकेस आले. या वेळीं कृष्णास पुढील अवताराची काळजी लागल्यामुळें, तें कृष्णअवताराच्या समाप्तीच्या तयारीला लागले.

विनाशकाळ आला ह्मणजे बुद्धिहि तशीच होते. त्या प्रमाणें यादवांकडून या प्रसंगीं एक गोष्ट घडून आली. एकदां यादवांनीं ऋषींचा खरें खोटें पणा पाहण्यासाठीं, सांबास स्त्री वेष दिला व त्याचें पोट मोठें करून त्यास ऋषींकडे नेलें. त्या वेषधारी स्त्रीला ऋषिपुढें उभे करून यादव ऋषीला म्हणाले; " अहो, या स्त्रीला मुलगा होईल, किंवा मुलगी होईल तें सांगावें." ऋषीनां यादव उन्मत्त होऊन आपली कुचेष्टा करीत आहेत असें आढळून आलें, तेव्हां त्यांनीं रागावून यादवांनां शाप दिला कीं, ' याच्या पोटांतून जें निघेल, त्यानेंच तुम्हां सर्वांचा अंत होईल.' हा शाप ऐकून सर्व यादव भयभित झाले व त्यांनीं सांबाचें पोट सोडून पाहिलें तों त्यांतून मुसळ बाहेर पडलें, यादवांनीं त्या मुसळाचें, दगडानें तुकडे तुकडे केले व ते समुद्रांत टांकून दिले. ते बारिक बारिक तुकडे एका माशानें गिळले, आणि कर्मधर्म संयोगानें तोच मासा पुढें लुब्धक नांवांच्या कोळ्याला सांपडला. त्यानें तो मासा घरीं आणून चिरला, तों त्याच्या पोटांत मुसळाचे बारिक बारिक तुकडे व मुसळास खालीं बसविलेलें लोखंड असें सांपडलें, कोळ्यानें त्या लोखंडाचें बाणाला पुढच्या बाजूला बसवावयाचें टोंक तयार केलें. व तो लांकडाचा भुगा समुद्र किनारीं नेऊन टाकून दिला. त्या लांकडाच्या भुग्याला तेथें अंकुर फुटले व वाढत वाढत तेथें पाणकणसांचें मोठें थोरलें बन तयार झालें. अवतार समाप्तीचा काळ जेव्हां जवळ आला, तेव्हां

कृष्णास, इंद्र, वरूण, ब्रह्मदेव, शंकर वगैरे भेटावयास आले; आणि कृष्णास नमस्कार करून, त्यांनीं 'आतां अवतार समाप्ति करून वैकुंठीं चलावें' ह्मणून कृष्णाची विनंति केली. तेव्हां कृष्ण भगवंतानीं 'सर्वांची सोडवणुक करून सात दिवसांनीं वैकुंठास येईन.' असें अश्वासन देऊन त्यांना निरोप दिला. मग संकर्षणास बोलावून घेऊन श्रीकृष्ण ह्मणाले; संकर्षणा, आतां हे देह टाकून देऊन आपणास वैकुंठीं गमन केलें पाहिजे. आपणास नेण्यासाठीं देवेंद्र वगैरे आले होते: तर हें वर्तमान व्यास व पार्थ यांनां कळवून त्यांना माझ्या भेटीसाठीं बोलावून आण. या कृष्याज्ञेप्रमाणें संकर्षणानें उद्धवाबरोबर पत्र देऊन, त्यास व्यासाकडे पाठवून दिलें, आणि अक्रुराबरोबर पत्र देऊन त्यास हस्तनापुरास पाठवून दिलें. व्यासानें तें कृष्णाच्या हातचें पत्र पाहून अश्रु गाळण्यास आरंभ केला. अंतकाळचे समयीं आपणास कृष्ण बोलावित आहे, पण तें शेवटचें दृश्य आपणास पाहवणार नाहीं, असें व्यासास वाटलें. मग व्यासानें 'येत नाहीं' असें स्पष्ट न कळवितां, अनुष्ठान संपल्यावर येतों ह्मणून कळविलें. इकडे अक्रुराचें पत्र पाहून, धर्मराजाचीहि तीच झाली, त्यांनीं पार्थास बोलावून सांगितलें कीं, 'अर्जुना, कृष्णानें निजधामास जाण्याची तयारी केलेली आहे, व शेवटीं तुला भेटावें अशी त्यांची इच्छा आहे तर तूं जा, पण पार्था, आतां देवाशीं दुरून दुरूनच बोल, त्याच्या शरीरास स्पर्श केलास तर, तुझी सर्व शक्ति नाहींशी होईल.' अर्जुनास याप्रमाणें सूचना देऊन धर्मानें त्यास द्वारकेस पाठवून दिले.

## ३ द्वारकेस जलसमाधि.

इकडे कृष्णानीं, सर्व यादवांनां बोलावून सांगितलें कीं, तुह्मीं सर्वांनीं आतां द्वारका सोडून प्रभास येथें जावें; कारण ही द्वारका नगरी आतां लवकरच पाण्यांत बुडून जाईल, हें ऐकून सर्व यादव द्वारका सोडून निघाले; त्यावेळीं त्यांनां आपआपलीं सुंदर घरेंदारें सोडतांनां मनस्वी वाईट वाटलें, पण निरुपाय जाणून बिचारे अश्रु ढाळित त्या आपल्या जन्म-भूमीला सोडून, प्रभास येथें आले. यादव द्वारका सोडून गेले तरी श्रीकृष्ण-भगवान् द्वारकेसच राहिले होते. त्या सुंदर नगरींतील ती रमणीय सुवर्णाची मंदिरें रिकामीं पडलेलीं पाहून श्रीकृष्णासहि अत्यंत वाईट वाटूं लागलें. सोळा सहस्त्र गोपींचीं अंतःपुरें शून्य पाहून त्यांना फारच हळहळ वाटली. श्रीकृष्णास सर्व गोष्टी समजत होत्या, ते प्रत्यक्ष ईश्वरच होते, तेव्हां त्यांच्या शक्तीविषयीं सांगणें अप्रस्तुत होय. केवळ सहवासामुळें उत्पन्न झालेलें प्रेम त्यांनाहि सोड-वेना. स्वर्ग, मृत्यु, पाताळ हीं सर्व भुवनें त्यांचीच आहेत, पण त्यावेळीं मृत्यु लोकच्या मायेचा परिणाम त्यांच्यावरहि झाला होता. श्रीकृष्ण याप्रमाणें द्वारकेंत चिंताग्रस्त बसले असतांना त्यांचा परमप्रिय भक्त उद्धव तेथें आला. श्रीकृष्ण

अश्रु गाळीत आहेत हें पाहून, त्यास फार आश्चर्य वाटलें आणि वाईटहि वाटलें. तो कृष्णाला म्हणाला; "देवा! आपल्या अंगीं सर्वांच्या दुःखाचें शांतवन करण्याची शक्ति असून, आज आपणच अश्रु गाळीत आहां हें काय?" तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, "उद्धवा, हा सगळा मायेचा खेळ आहे. मृत्युलोकीं इतके दिवस मी सहवास केल्यामुळें, मला साहजिक या मर्त्यलोकांविषयीं प्रेम उत्पन्न झालें, आणि म्हणून त्या लोकांस सोडतांना वाईट वाटत आहे." हें ऐकून उद्धवासहि मायेच्या शक्तिसंबंधानें फार आश्चर्य वाटलें. व श्रीकृष्णपरमात्मा आतां सर्वांना सोडून जाणार याबद्दल त्यास फार वाईट वाटलें, तो म्हणाला; "देवा" तूं गेल्यावर मागें तुझे भक्त कसे जिवंत राहतील? फुललेल्या वृक्षाच्या आश्रयानें जसे भ्रमर असतात, तसें आम्हीं तुझ्या आश्रयानें आहोंत. तेव्हां आम्हां भ्रमरांचा वृक्षच नाहींसा झाल्यावर आम्हीं तरी कोणाच्या आश्रयावर या लोकीं राहणार? आम्हांसहि आपल्या समागमें वैकुंठास घेऊन जा." हें भाषण ऐकून श्रीकृष्ण म्हणाले, 'उद्धवा, याबद्दल खेद करूं नये हें चांगलें.' ही मृत्युलोकची वस्ती आहे, मृत्यु हा या लोकचा धर्मच आहे. ज्यानें या लोकीं जन्म घेतला, त्यांस हा लोक केव्हां सोडवा लागेल याचा कांहींहि नियम नाहीं. येथील जीवित हें अत्यंत क्षणभंगूर आहे वीज चमकते आणि नाहींशी होते, त्याप्रमाणें या लोकची स्थिति आहे. जोंपर्यंत या शरीरांत आत्मा असतो, तोंपर्यंतच या शरीराची शोभा. आत्म्यानें या शरीरास सोडल्यावर या शरीराची योग्यता मृत्तिकेपेक्षांहि कमी होते. प्राणोत्क्रमण समयीं ऐकूं येण्याची शक्ति, दिशा हरण करितात. नेत्रांतील दृश्यशक्ति सूर्य हरण करितो. दांताची शक्ति वरुण नाहींशी करितो, जठराग्नी हा जिव्हा शक्ति नाहींशी करितो. पाणी हें रक्ताला आकर्षण करून घेतें, वायु स्नायूला निःचेष्ट करितो. शरीरांतील तत्व आकाशांत जातें, शरीर मृत्तिकेंत मिसळतें आणि आत्मा हा मात्र तसाच कायम राहतो. तो पुन्हां दुसरा नवा देह धारण करितो. त्यास मृत्यु नाहीं, तो चिरंजीव आहे, व त्यासच मुक्ति आहे. मृत्युलोक हा बिकट खराच, पण मुक्तीचें साधन याच लोकीं सुलभ आहे. या लोकीं भोगावीं लागणारीं दुःखें व सुखें, हीं ज्याच्या त्याच्या कर्मांचीं फळें होत, या लोकीं ज्ञानदृष्टि ही कमी असून मायेचा प्रभाव हा अधिक आहे. या जगांत कित्येक किडे असें आहेत कीं, ते स्वतःच कोश तयार करून त्यांत आपणास कोंडून घेतात, आणि जेव्हां ज्ञानदृष्टि प्राप्त होतें, तेव्हां ते त्या कोशांतून उडून जातात. म्हणजे कोशांतून उडून जाण्याची त्यांनां शक्ति असतें, पंख असतात, पण कोशाच्या बाहेर पडण्याची त्यांनां बुद्धीच होत नाहीं, त्या प्रमाणें प्रत्येक मनुष्य मायेच्या बंधनांत गुरफटून गेलेला असतो. ही बंधनें तोडण्यासाठीं ज्ञान हें अवश्य पाहिजे, ज्ञान व उपासना, हीं आत्म्याच्या उन्नतीची या लोकचीं

मुख्य व खरीं साधनें आहेत. भक्ति ही अवश्य पाहिजे, भक्तीनेंच ज्ञान प्राप्त होतें; भक्ति न करितां एकदम ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करणें हा वेडेपणा होय. कर्म, भक्ति आणि ज्ञान हेंच या लोकींचें अनुष्ठान होय. आत्म्याच्या उन्नतीसाठीं भक्ति हें फार सोपें साधन आहे. भक्ति ही नऊ प्रकारची आहे. ईश्वराचें नांव ऐकावयाचें, ही भक्तीची पहिली पायरी होय; दुसरी, ईश्वराचें भजन करणें; तिसरी, त्याचें स्मरण करणें. त्यानंतर पादसेवन, वंदन, अर्चन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन, अशा या भक्तीच्या पायऱ्या आहेत. उद्धवा, तूं ज्ञाता आहेस, तुला सर्व कांहीं समजतें, तेव्हां आह्मांबरोबर वैकुंठांत येण्यांत मोठा पुरुषार्थ आहे असें कांहीं नाहीं. तूं आतां बद्रिकाश्रमीं जाऊन आपल्या आयुष्याचा चांगल्या रीतीनें विनियोग कर." कृष्णानें उद्धवास असें सांगितल्यावर उद्धव कृष्णाच्या पायांवर मस्तक ठेवून बद्रिकाश्रमीं निघून गेला, मग श्रीकृष्ण परमात्मा द्वारकेच्या बाहेर आला व त्यानें, मुद्दाम असन्मार्गानें जाऊन पापाचरण करण्याऱ्या पाप्यांना द्वारकेंत येऊन उतरण्याची सोय राहूं नये ह्मणून सर्व द्वारका नगरी समुद्रांत बुडवून टाकली.

## ४ मुसळाची उत्पत्ति व यादवांचा नाश.

द्वारका बुडवून टाकल्यावर श्रीकृष्ण प्रभास येथें आले, त्यांनीं तेथें आल्यावर मदन, सांब व गद यांस बोलावून घेऊन सांगितलें कीं " आतां येथें महा अनर्थ होणार आहे तो तुह्मांस पाहवणार नाहीं, तरी तुह्मीं आपआपल्या स्त्रियांना घेऊन वज्रपुरीस जा, तेथें तुमची इच्छा असेल तोंपर्यंत रहा, तुह्मी तिथे चिरंजीव आहांत, तेव्हां तुह्मांस मृत्यूची भीति नाहीं. तुमची इच्छा असेल त्या वेळीं तुह्मांस मात्र शरीरानें स्वर्गी जातां येईल." श्रीकृष्णांनीं त्यांना याप्रमाणें आज्ञा केल्यावर, ते तिघेहि श्रीकृष्णास वंदन करून, आपआपल्या स्त्रियांना घेऊन वज्रपुरीस निघून गेले. पुढें सर्व यादवांनां जलक्रीडा करण्याची इच्छा झाली ते त्यासाठीं सागरावर गेले. तेथें मुसळापासून उत्पन्न झालेलीं पाणकणसें होतीं, तीं उपटून, एकमेकांच्या अंगावर फेकूं लागले; पण त्या पाणकणसांच्या आघातानें सर्व यादव मृत झाले. त्या प्रसंगांतून फक्त अनिरुद्धाचा मुलगा वज्रनाभ हा मात्र जिवंत राहिला, हा अनर्थ पाहून श्रीकृष्णास फार दुःख झालें. तो एका पिंपळाच्या वृक्षाखालीं शोक करीत बसला असतां, दुःखातिरेकामुळें फार श्रांत झाला व त्याला त्या स्थितींत झोंप लागली. याचवेळीं दुरून एक व्याध शिकार टेहाळीत होता, तेव्हां दुरून कृष्णाचा पाय त्याला दिसला, त्या व्याधाला दुरून हरिणाचे डोळे चमकत आहेत असें वाटलें, व त्यानें त्या माशाच्या पोटांत सांपडलेल्या लोखंडाच्या टोंकाचा बाण, पायाचा नेम धरून कृष्णाच्या अंगावर सोडला, बाण बरोबर लागू पडल्यावर तो व्याध शिकारीच्या आशेनें श्रीकृष्णाजवळ

आला. पण पाहतो, तों आपल्या बाणानें श्रीकृष्ण घायाळ झाला असून विव्हळत पडला आहे; तो प्रकार पाहून त्या व्याधाला अत्यंत दुःख झालें, व तो कृष्णाजवळ क्षमा मागूं लागला. तेव्हां श्रीकृष्ण ह्मणाला, "व्याधा, यांत तुझा कांहीं अपराध नाहीं, तुझ्या पूर्व जन्मांत तुला मी अशाच रीतीनें मारलें होतें. त्या कर्माचें फळ योग्य असेंच मला मिळालें; मृत्यु लोक ही कर्मभूमि आहे, येथें कर्म भोगल्यावांचून सुटका नाहीं. आतां मी आपला मुखानें प्राणोत्क्रमण करीन," श्रीकृष्ण भगवान् असें ह्मणत आहेत तोंच तेथें अर्जुन आला; त्यास पाहिल्यावर कृष्ण ह्मणाले, "अर्जुना! बरा वेळेवर आलास; प्राणोत्क्रमणसमयीं गंगोदक मुखांत पडावें अशी इच्छा आहे." कृष्णाची ही इच्छा पाहून, पार्थानें लागलाच भूमींत बाण मारून गंगा वर आणली, व एका पात्रांत गंगोदक घालून तें पात्र अर्जुनानें श्रीकृष्णाच्या हातांत दिलें. त्या वेळीं, श्रीकृष्णाचा स्पर्श झाला, व त्यायोगें अर्जुनाची सर्व शक्ति नाहींशी झाली. तेव्हां त्यास धर्माच्या बोलण्याची आठवण झाली. श्रीकृष्ण परमात्म्यानीं, गंगोदक प्राशन केलें व देह ठेवला. श्रीकृष्णांनीं याप्रमाणें देह सोडल्यावर अर्जुन पोराप्रमाणें रडूं लागला, मग आपणच आपल्या मनाचें शांतवन करून घेऊन, सर्व गोपींची व यादवांच्या स्त्रियांची समजूत करूं लागला. सर्व और्ध्वदैहिक कर्मे त्यानें अनिरुद्धाचा पुत्र वज्रनाभ याचेकडून करविलीं, मग त्यास व स्त्रियांना तो प्रभासाहून मथुरेस घेऊन आला, मथुरेस येत असतांना वाटेंत चोरांनीं अर्जुनास लुटलें. चोर अर्जुनाकडे आले, तेव्हां त्यानें आपल्या गांडींव धनुष्यास हात घातला, पण तें धनुष्य त्यास त्या वेळीं उचललें देखील नाहीं, मग चालविण्याची गोष्ट कोठली? एवढा मोठा वीर पण शक्ति नाहींशी झाल्यामुळें त्याला त्या वेळीं चोरांनीं खुशाल लुटलें. मथुरेला आल्यावर अर्जुनानें अनिरुद्धाचा मुलगा वज्रनाभ, याला तेथील सिंहासनावर बसवून त्याच्या नांवानें राज्यकारभार चालविला.

याप्रमाणें यादवांच्या नाशाची कथा सांगितल्यावर वैशंपायन ऋषि जनमेजयाला म्हणाला; "जनमेजया, यादव वीर जरी सर्व नाहींसे झाले आहेत, तरी त्यांचे कांहीं वंशज कोठें कोठें आहेत. मथुरेस अनिरुद्धाचा वंश आहे. सांब, मदन व गद यांचा वंश वज्रपुरी येथें आहे. कन्यावंश हस्तिनापुर येथें आहे. यादवांचा इतिहास पुष्कळच आहे, तो हा तुला मी संक्षेपानें सांगितला आहे."

---

## अध्याय १९ वा.

### १ महाप्रळयाची माहिती.

यादवांच्या नाशाचा इतिहास ऐकून घेतल्यावर, जनमेजय वैशंपायन ऋषीला ह्मणाला; "ऋषि! आपण यादवांच्या नाशाची माहिती सांगितली,

तशीच महाप्रळय काळची माहिती आपणांकडून ऐकावी, अशी माझी इच्छा आहे;" जनमेजयाचें हें भाषण ऐकून वैशंपायन ह्मणाला, "राजा! यासंबंधानेंहि मी तुझें समाधान करितों; तथापि ती कथा मला संपूर्ण अशी अवगत नसल्यामुळें तुझें चांगल्या रीतीनें समाधान करितां येईल किंवा नाहीं याची मला शंका आहे. महाप्रळयाचा अनुभव घेऊन ती कथा लिहिणारा किंवा सांगणारा या अखिल त्रिभुवनांत कोणींहि नाहीं. फक्त एक मार्केडेय ऋषि मात्र आहेत, त्यांच्या आयुष्यक्रमांत हा महाप्रळय एकदां झाला होता; पुढें त्यांनीं त्या महाप्रळयाची हकीकत ब्रह्मदेवाला सांगितली, ब्रह्मदेवांनें ती व्यासांना सांगितली होती, आणि व्यासांनीं मला सांगितली आहे. व्यासांनीं जी हकीकत मला सांगितली आहे, ती आतां मी तुला सांगतों.

युगें चार आहेत, त्यांचीं नांवें कृत, त्रेता, द्वापार आणि कली अशीं आहेत. कृत युगाची वर्षसंख्या, सत्रा लक्ष अठ्ठावीस हजार आहे. त्रेता युगाचीं वर्षसंख्या, बारा लक्ष शहाण्णव हजार आहे. द्वापाराचीं वर्षसंख्या, आठ लक्ष चौसष्ट हजार आहे; आणि कलियुगाची वर्षसंख्या, चारलक्ष बत्तीस हजार आहे. या चार युगांचीं सर्व वर्षें लोटलीं ह्मणजे एक देवयुग होतें; आणि अशीं एकाहत्तर देवयुगें झालीं ह्मणजे एक मन्वंतर होतें. मनुष्याचें एक वर्ष, तो देवांचा एक दिवस होय; आणि अठ्ठावीस मन्वंतरें गेलीं ह्मणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो. ब्रह्मदेवाचा एक दिवस झाला ह्मणजे ब्रह्मांडप्रळय होतो आणि अशा रीतीनें ब्रह्मदेवाचीं शंभर वर्षें झालीं ह्मणजे महाप्रळय होतो. कृतयुगाचे वेळीं, चौपट धर्म व एकपट पाप अशी स्थिति होती; त्रेतायुगांत तीन भाग धर्म व दोन भाग पाप, अशी स्थिति होती; द्वापारांत धर्म व पाप हीं समसमान होतीं आणि कलियुगांत चौपट पाप व एकपट धर्म अशी अवस्था आहे. पाप हें अत्यंत वाढल्यावर धर्म निद्रिस्थ होतो व जिकडे तिकडे महा अनर्थ होतात. मग योगमायेच्या संगतीनें सर्वप्राणिमात्रांच्या शक्ति एके ठिकाणीं होऊन महाप्रळय होतो.

महाप्रळय काळीं, आकाशांत बारा सूर्य उत्पन्न होतात, समुद्रांत वडवानळ ह्मणून जो अग्नि आहे, तोहि त्यावेळीं तप्त होतो, आणि शंकरहि आपला तिसरा डोळा उघडून भयंकर ऊष्णता निर्माण करितो. या तिघांची ऊष्णता एका ठिकाणीं झाल्यावर अत्यंत प्रखर असा सर्वत्र अग्नि उत्पन्न होऊन सर्व प्राणिमात्र मरून जातात. सर्व त्रिभुवनांतील पाणी नाहींसें होऊन जातें आणि वनस्पति, वृक्ष वगैरे सर्व कांहीं जळून जातें. तो अग्नि स्वर्गाचाहि नाश करितो पाताळांत जाऊन अमृत शोषून घेऊन नागकुळाचा नाश करून टाकतो, याप्रमाणें सर्व जळाल्यावर ब्रह्मांडांत फक्त रक्षा उडत असते. अशा रीतीनें सर्व चराचराची रक्षा झाल्यावर भयंकर वारा सुटून तो ही रक्षा एका ठिकाणीं करितो.

नंतर मुसळधार पाऊस पडून, सर्वत्र स्वर्ग–मृत्यु–पाताळांत पाणीच पाणी होऊन जातें. या उदकांत क्षीरसमुद्रामध्यें भगवान् विष्णु सहस्रमुखी शेषाच्या शय्येवर निद्रिस्थ असतात. क्षीरसमुद्र ही भगवंताची राजधानी होय. तेथें ते सहस्रावधि युगें योगमायेसह आहेत.

महाप्रळयाचें वेळीं सर्व जलमय झालेलें असतांना, मार्कंडेय ऋषि, पाण्यावर इतस्ततः संचार करीत फिरत होते. मार्कंडेय ऋषि चिरंजीव असल्यामुळें त्यानां त्या भयंकर प्रसंगाची भीति वाटत नव्हती, पण सृष्टीचें तें चमत्कारिक स्वरूप पाहून त्यांच्या मनाला फार उदासीनता उत्पन्न झाली. मनुष्य किंवा दुसरा कोणताहि प्राणि त्यांच्या दृष्टीस ह्मणून पडेना. अशा कष्टकारक स्थितींत सांपडल्यावर, मार्कंडेय ऋषींनीं परमेश्वराची प्रार्थना केली, कीं, " हे आदिपुरुषा! जगन्निवासा! अनंता! हे देवाधिदेवा! या अशा भयाण सृष्टींत मी एकटा काय करूं ? मला ही स्थिति मुळींच बरी वाटत नाहीं. हे केशवा! मला एकवार तुझें दर्शन तरी घडूं दे." याप्रमाणें देवाची स्तुति करीत करीत मार्कंडेय ऋषि एका वटवृक्षाजवळ आले. तो वटवृक्षहि पाण्यांत बहुतेक बुडून गेला असून त्याच्या कांहीं शाखा मात्र पाण्यावर होत्या. त्या झाडाला एक मूळ, तीन शाखा व सहा फांटे होते आणि अठरा पारंब्या होत्या. पानें तर अनंत होतीं. पाण्याला लागून असलेल्या एका पानावर एक बालमूर्ति होती, तें लहान मूल त्या पानावर आनंदानें खेळत असून आपल्या पायाचा आंगठा चोखित होतें. मार्कंडेय ऋषि, त्या वटवृक्षाजवळ आल्यावर तें मूल ह्मणालें. " बाळा, मार्कंडेया! कुशल आहेसना?" त्या मुलाचा हा प्रश्न ऐकून मार्कंडेयास मोठें आश्चर्य वाटलें. वडाच्या पानावर आंगठा चोखीत असलेल्या एका लहान मुलानें आपणास ' बाळ ' ह्मणावें, याबद्दल त्याला राग आला व तो त्या मुलाला ह्मणाला, "अरे एकवीस कल्पांचें माझें आयुष्य आहे. असें असून तूं मला बाळ ह्मणतोस? हा प्रळयकाळ मी प्रत्यक्ष पाहिला, तरी तूं मला पोर समजतोस? मोठें आश्चर्य आहे ह्मणावायचें!" ऋषींचें हें बोलणें ऐकून, वटपत्रावरील मूल खदखदां हांसून ह्मणालें, "बाळा मार्कंडेया! मला तूं लहानच आहेस. अशीं कित्येक कल्पें व महाप्रळय मीं पाहिलीं आहेत. तुझे बापानें माझी भक्ति करून, मला चिरंजीव पुत्र व्हावा असा वर मिळविलेला आहे. ह्मणून तूं चिरंजीव झाला आहेस" नंतर मार्कंडेय ऋषि ह्मणाला; "हे बालका! या प्रलयकाळामुळें मी अत्यंत भयभीत झाल्यामुळें मला तूं कोण आहेस याची ओळख पटत नाहीं. तरी तेवढें

कृपा करून सांग?" मग तें लहान मूल ह्मणालें. "बाळा! मला मुकुंद असें ह्मणतात. या सर्व त्रिभुवनाचा कर्ता, हर्ता मीच काय तो एक आहें. प्रळय काळची कथा सर्वांना कळावी ह्मणून हिचा तूं प्रसार कर." याप्रमाणें मार्कंडेय ऋषीस सांगितल्यावर बालमुकुंदाची मूर्ति अदृश्य झाली.

## २ विश्वउत्पत्ति.

हे जनमेजया! तुला प्रळयाची माहिती सांगितली, आतां उत्पत्तीविषयीं कांहीं माहिती सांगतों. श्रीविष्णूंनीं आपल्या नाभीकमळापासून एक कमल उत्पन्न केलें. या कमलांत ब्रह्मदेव उत्पन्न झाले. त्यांना चार मुखें असून त्यांनीं चार वेद निर्माण केले. पुढें विष्णूच्या कानांतील मलापासून मधु व कैटभ, असे दोन राक्षस उत्पन्न झाले, हे राक्षस फार उन्मत्त झाल्यावर ब्रह्मदेवाकडे जाऊन त्याला आमच्याबरोबर युद्ध कर, ह्मणून ह्मणूं लागले. परंतु ब्रह्मदेव त्यांच्याबरोबर युद्ध करण्यास कबूल झाला नाहीं. ब्रह्मदेव त्यांनां ह्मणाला; "राक्षसहो! युद्धविद्या तर मला स्वप्नांतही माहित नाहीं; तेव्हां मजबरोबर युद्ध करून उपयोग काय? क्षीरसागरीं शेषशाई नारायण निद्रिस्थ आहेत, त्यांच्याकडे तुह्मीं जा ह्मणजे तुमची मनोवांछा ते पुरी करितील." ब्रह्मदेवांनीं असें सांगितल्यावर ते दोघेही विष्णूकडे येऊन त्यास युद्धाला ये, असे ह्मणूं लागले. विष्णूनें त्याप्रमाणें त्यांच्याबरोबर पुष्कळ वेळ युद्ध केलें, परंतु ते दोघेही राक्षस विष्णूला आटोपेनात मग विष्णु त्या दोघांना ह्मणाले, "हे दैत्यहो! मी तुमची युद्धविद्या पाहून प्रसन्न झालों आहें, तर कांहीं वरदान मागणें असल्यास मागून घ्या." त्या राक्षसांना विष्णूचें हें ह्मणणें रुचलें नाहीं. ते दोघेहि ह्मणाले, "तुजसारख्या कृपणाजवळ काय मागावयाचें आहे? तूंच पाहिजे तर आमच्याजवळ कांहीं माग, आह्मीं तें तुला द्यावयाला तयार आहों." तेव्हां विष्णु ह्मणाले, "तुह्मीं दोघेहि आपले प्राण मला द्या." विष्णूचें मागणें ऐकून राक्षस ह्मणाले, "जेथें पाणीं नाहीं व जेथें कोणास मरण नाहीं, अशा ठिकाणीं आमचा वध कर." मग विष्णूनें त्या दोघांना आपल्या मांडीवर मारलें. या दोन राक्षसांच्या मेदापासून पृथ्वी उत्पन्न झाली. ह्मणून पृथ्वीला मेदिनी असें ह्मणतात, याप्रमाणें पृथ्वी उत्पन्न झाल्यावर ब्रह्मदेवानें अनेक प्राणीमात्र व वस्तु वनस्पति, निर्माण केल्या. अशाप्रकारें पृथ्वी उत्पन्न झाली, असें हरिवंश ग्रंथांत आहे. विष्णुपुराणाच्या मतें पृथ्वीची उत्पत्ति हिरण्यगर्भापासून झाली असें आहे. हिरण्यगर्भ हा अंड्याच्या आकारासारखा

असून त्याच्या खालच्या भागाचें पाताळ झालें, वरील भागाचा स्वर्ग झाला. आणि मधले भागाची पृथ्वी झाली; असें उपनिषदांत सांगितलेलें आहे. तसेंच उपनिषदांत असेंही सांगितलें आहे कीं, कश्यपास तेरा स्त्रिया होत्या. या तेरा स्त्रियांपासून निरनिराळे प्राणीमात्र उत्पन्न झाले. मनुरचना यापेक्षां निराळी आहे, सांप्रत वैवस्वत मनु असून या मनूनें, प्रथम आदिशक्ति उत्पन्न केली व या शक्तीपासून पुढें ब्रह्मदेवानें सरस्वती निर्माण केली, मनु व सरस्वती या दोघांनीं स्वतःच्या करमणुकीसाठीं, चिखलाचीं अनेक चित्रें निर्माण केलीं, व धान्य उत्पन्न केलें. तें धान्य* खाल्यावर दोघांनाही कामवासना उत्पन्न झाली, व

---

* बायबलमध्यें सृष्टोत्पत्तीविषयीं कांहीं अंशीं अशीच कथा आहे. ती येथें मुद्दाम दिली आहे.

पृथ्वी, चंद्र, सूर्य, तारे इत्यादि जड विश्व व त्यामधील यच्चयावत सजीव सृष्टि एकामागून एक सहा दिवसांत परमेश्वरानें निर्माण केली. व सातव्या दिवशीं त्यानें विसावा घेतला. या सृष्टीचा उपभोग करून त्यावर स्वामित्व चालविण्याकरितां परमेश्वरानें आमानुरूप असा एक पुरुष मृत्तिकेपासून उत्पन्न करून त्यास ॲडम असें नांव दिलें. नंतर त्यानें ॲडमकरितां सुंदर फलपुष्पांनीं युक्त असें एक उपवन तयार केलें, व या उपवनांत 'जीवनवृक्ष' व 'ज्ञानवृक्ष' असे दोन वृक्ष रोंविले. ॲडमची स्थापना या उद्यानांत करितांनां परमेश्वरानें त्यास बजावून सांगितलें कीं, ज्ञानवृक्षाचें फळ ज्यावेळीं तूं भक्षण करशील, त्यावेळीं तुला मरण प्राप्त होईल. मग ॲडमवर परमेश्वरानें निद्रास्त्र सोडिलें, व तो निजला असतां त्याची एक बरगडी काढून तिजपासून 'ईव' नांवाची एक स्त्री निर्माण केली, व ती त्यास अर्पण केली. ॲडम आणि ईव जन्मतः नग्न होतीं, व तीं तशींच नांदूं लागलीं. परमेश्वरानें निर्मिलेल्या प्राण्यांत सर्प फार धूर्त होता. त्यानें ईवला मोह पाडला, व तिचा बुद्धिभेद केला. ज्ञानवृक्षाचें फळ चाखिल्यानें मृत्यु येईल ही भीति नको. कारण, तें फळ खाणाऱ्या मनुष्यास पापपुण्याचें ज्ञान होऊन तो देवतुल्य होईल; म्हणून परमेश्वरानें ही उगीच धमकी दिली आहे. हा सर्पाचा बुद्धिवाद ईवला खरा वाटला. तिनें ज्ञानवृक्षाचें सुंदर व मधुर फळ स्वतः खाल्लें व ॲडमलाहि दिलें. फळ खातांच त्यांचे डोळे उघडले व आपण नग्न आहोंत हें ज्ञान त्यांस झालें. नंतर त्यांनीं अंजिराचीं पानें एकत्र शिवून वस्त्रें बनविलीं. इतक्यांत नित्यक्रमाप्रमाणें परमेश्वर त्यांच्याशीं भाषण करण्याकरितां येत असतां त्याचा आवाज ऐकून ॲडम व ईव झाडांमध्यें लपलीं. परमेश्वरानें हांक मारून 'तूं आहेस तरी कोठें?' असा प्रश्न करितांच ॲडमनें उत्तर दिलें कीं, 'तुझा आवाज मीं ऐकला पण मी नागवा असल्यानें लपून राहिलों, परमेश्वर म्हणाला, 'पण तूं नागवा आहेस

मनूनें ती इच्छा पुरी करण्याविषयीं सरस्वतीजवळ मागणी केली. सरस्वतीनें ती गोष्ट अमान्य केली. तेव्हां वैवस्वत कामातुर होऊन तिजवर बलात्कार करूं लागला. मग, सरस्वतीनें मृत्तिकेच्या गायींत प्रवेश केला, तेव्हां वैवस्वतानें मृत्तिकेच्या बैलांत प्रवेश करून तिच्याशीं संभोग केला, त्यानंतर सरस्वती बकरीच्या शरीरांत शिरली, वैवस्वत बकऱ्याच्या शरीरांत शिरला. याप्रमाणें सरस्वती अनेक प्राण्यांच्या शरीरांत शिरली, व वैवस्वतहि त्या प्राण्यांच्या शरीरांत प्रवेश करून संभोग करूं लागला. पुढें या सर्व प्राण्यांना संतति होऊं लागली. जरा, मरण वगैरे प्रकारहि त्यांना भोगणें भाग झालें. अशा रीतीनें सृष्टि निर्माण झाल्यावर व्यासानें वर्णाश्रमधर्माची वगैरे स्थापना करून, या जड सृष्टीस सुव्यवस्थित स्वरूप आणलें. ही कथा उपनिषदांत आहे, ती मीं तुला सांगितली; याशिवाय या प्रळयाविषयीं व उत्पत्तीविषयीं अनेक ग्रंथांचीं अनेक मतें आहेत. त्याविषयीं कितीही सांगितलें, तरी थोडेंच आहे." याप्रमाणें वैशंपायन ऋषींनीं जयमेजय राजाला ही कथा सांगितली आहे.

## प्रथम स्तवक संपूर्ण.

---

म्हणून तुला सांगितलें कोणीं ? त्या ज्ञानवृक्षाचें फळ तूं खाल्लें नाहींसना?' ॲडमनें व ईवनें देवास घडलेली सर्व हकीकत सांगितली. तेव्हां देव संतापला, व ॲडम, ईव व सर्प या तिघांसही भयंकर शाप दिले. व नाना तऱ्हेचीं दुःखें, संकटें व त्रास यांचे त्यांस धनी केलें. ज्ञानवृक्षाचीं फळें खाऊन हीं माणसें आपणाप्रमाणें ज्ञानी झालीं, आतां जर त्यांस या बागेंत राहूं दिलें तर कदाचित् 'जीवनवृक्षाची' फळें खाऊन तीं अमर होतील, अशी भीति देवास पडल्यामुळें त्यानें त्यांस बागेंतून कायमचें हांकलून दिलें.

# स्तबक २ रें.

## अध्याय १ ला.

### मंगलाचरण.

देवाधिदेव गजानना! मी तुला प्रेमपुरःसर वंदन करितों. तसेंच सरस्वती! तुजहीं माझा प्रणाम असून मी आपल्या इष्ट कुलदेवतांनाही साष्टांग नमस्कार करितों. हे शेषशयन अनंता! हे सगुणनिर्गुण विश्वव्यापक नारायणा! हे परमानंदा! तुझा जयजयकार असो. हे अनादिसिद्ध गोविंदा! हे गुणातीत शुद्धबोधा! तुला मी अनन्य शरण आलों आहें. हे अव्यक्त परात्पर कैवल्यनिधाना! हे मंगलधाम सकलकला परिपूर्ण भगवंता! मी दीन, अनाथ तुझी करुणा भाकून तुझा आशीर्वाद मागतों. हे वेदगर्भा ज्योतिर्लिंगा! हे परमपुरुष मुकुंदा! भक्तीनें व शुद्ध अंतःकरणानें तुझें नामस्मरण केलें असतां या ग्रंथलेखन प्रसंगीं येणाऱ्या विघ्नांचा सहजच नाश होईल असा मला भरंवसा आहे. अमृत प्राशन केलें असतां ज्याप्रमाणें मृत्यूची भीति दूर होते, त्याप्रमाणें तुझी कृपा असली ह्मणजे विघ्नेंही जळून जातात. हे मुकुंदा! तुझें स्तवन करण्यास मी पामर अगदींच असमर्थ आहें. मी जें कांहीं तुझें हें नामकीर्तन करीत आहें. त्यांत कांहीं मोठासा पुरुषार्थ आहे असें नाहीं. हा माझा प्रयत्न गंगेचें पाणी गंगेलाच अर्पण करण्यासारखा आहे. अथवा सूर्याला आरती करण्यासारखा आहे. आरतीची दीप्ति व सूर्याचें तेज हीं कांहीं दोन नाहींत. त्याप्रमाणें माझें स्तवन हें तुझ्याच कृपेचें चिन्ह होय. त्यांत माझें असें कांहींच नाहीं. हे विश्वंभरा! मी तुला शरण येऊन तुझी वारंवार विनंति करीत आहे कीं, माझ्या हृदयांत जो अज्ञानरूपी अंधःकार आहे तो नाहींसा कर. त्या हृदयप्रांगणावर ज्ञानबीज पेर. ह्मणजे माझा भ्रम दूर होईल व मी तुझें गुणकीर्तन चांगल्या रीतीनें करीन. मी या कथा कल्पतरूचें रोंप रोंविलें आहे, परंतु त्याचा मोठा वृक्ष होऊन त्याला तुझीं नाम स्वरूप सुमनें येणें हें सर्वस्वी तुझ्या स्वाधीन आहे. तूं आपलें कृपाजल सिंचन केल्यास हा वृक्ष मोठा होऊन तो मनोहर दिसेल व सर्वांच्या आदराला पात्र होईल. तुझ्या कृपेवांचून हें होणें शक्य नसल्यामुळें मी तुझ्याजवळ कृपामृताची भिक्षा मागत आहें. तें तुझें कृपामृत अमृतापेक्षांहि अधिक महत्वाचें आहे. आणि ह्मणूनच ज्ञाते अमृतापेक्षां तुझ्या नामामृतानेंच अधिक संतुष्ट होतात. ह्मणून ह्मणतों, हे देवाधिदेवा! हा कल्पतरू ग्रंथ तुझ्या कृपामृतानें शीतल कर ह्मणजे तो उत्कृष्ट व रमणीय असा होईल.

# अध्याय २ रा.

## १ श्रीकृष्ण-जरासंध कथा.

वैशंपायन ऋषि व राजा जनमेजय या उभयतांचा कथोपकथन प्रसंग चालला असतां एके दिवशीं जनमेजय राजानें वैशंपायन ऋषीला असा प्रश्न केला कीं, " एवढी सप्तद्वीप पृथ्वी असून, त्यांपकीं कोणतेंच स्थान श्रीकृष्णाला कां पसंत पडलें नाहीं ? त्यांनीं द्वारकेची स्थापना कां केली ? व ते तेथें सर्व यादवांसह कां राहूं लागले ? " जनमेजय राजाचा हा प्रश्न ऐकून वैशंपायन ऋषी ह्मणाले; " हे राजा जनमेजया ! पूर्वी जरासंध या नांवाचा एक अत्यंत पराक्रमी राक्षस-राजा होऊन गेला. त्यानें श्रीकृष्णाचा सूड उगविण्यासाठीं कृष्णाच्या मथुरा नगरीवर सत्रा वेळ हल्ले केले. त्यामुळें मथुरानगरींतील लोकांचें फार नुकसान झालें व ते अगदीं त्रस्त होऊन गेले. जरासंधाचा नाश करावा तर तसें करण्यासही कांहीं अडचणी होत्या, तेव्हां श्रीकृष्णांनीं ज्या समुद्रांत जरासंधाचा प्रवेश होणार नाहीं, अशा ठिकाणीं द्वारका नांवाची नगरी एका रात्रींत निर्माण करून तेथें सर्व यादवांनां नेऊन ठेविलें व आपणही द्वारकेंतच राहूं लागले. "—

वैशंपायन ऋषीचें हें संक्षिप्त उत्तर ऐकून जनमेजय राजाला ती कथा संपूर्ण ऐकण्याची इच्छा झाली. तो ह्मणाला, " वैशंपायन महाराज ! कृपा करून ती सर्व कथा आपण मला सांगावी. " राजाच्या विनंतीस मान देऊन वैशंपायन ऋषि, ती कथा सांगूं लागला. तो ह्मणाला, " जरासंधाचा जांवई जो कंस, त्या कंसाचा श्रीकृष्णानें नाश केल्यामुळें श्रीकृष्ण व जरासंध या दोघांमध्यें वैर उत्पन्न झालें होतें. जरासंधाला दोन मुली होत्या व त्यांजवर त्याचें फार प्रेम होतें. त्या दोन्ही मुली त्यानें कंसाची कीर्ति व वैभव पाहून त्याला दिल्या होत्या. आपल्या मुलींस कृष्णानें वैधव्यपंकांत लोटून दिल्यामुळें जरासंध कृष्णावर अत्यंत संतप्त झाला, व त्याचा सूड उगविण्याकरितां मथुरेवर सत्रा वेळ हल्ले केले. "

याप्रमाणें वैशंपायन ऋषि कथा सांगत असतांना जनमेजय राजा मध्येंच ह्मणाला; "ऋषि! कंस हा कृष्णाचा सख्खा मामा होता. शिवाय श्रीकृष्ण भगवान् ह्मणजे सर्व कांहीं जाणते. असें असतांना त्यांनीं आपल्या हातांनीं आपल्या मामाचा वध कां केला, हें मोठें गूढ आहे. तर माझी शंका दूर करावी. " तेव्हां वैशंपायन ह्मणाला; " राजा ! कंस हा उग्रसेनाचा मुलगा खरा, परंतु कंसाची उत्पत्ति दैत्यापासून झालेली आहे. उग्रसेन राजा एके दिवशीं अरण्यांत शिकारीसाठीं गेला असतां त्याच्या पश्चात् ' दमिल ' नांवाचा राक्षस उग्रसेनाच्या मंदिरांत उग्रसेनाचें रूप धारण करून गेला. त्यास आपला पती समजून

उग्रसेनाची स्त्री त्याचे बरोबर सर्व व्यवहार करूं लागली. या कपट वेषधारी उग्रसेनापासून त्या पतिव्रतेला जो मुलगा झाला तोच हा कंस होय. या ' दमील' राक्षसाची पापवासना पुरी झाल्यावर त्यानें आपलें पूर्व रूप उग्रसेनाचे स्त्रीस दाखविलें. तेव्हां उग्रसेनाची स्त्री आपल्या पातिव्रत्याचा त्या कपटी दानवानें भंग केला म्हणून आत्महत्या करूं लागली. तेव्हां दमिल म्हणाला; " हे स्त्रिये! तूं पतिव्रताच आहेस; कारण, मी तुला तुझ्या पतिस्वरूपानेंच फसविलें आहे." असें त्या दैत्याचें भाषण ऐकून उग्रसेनाचे स्त्रीनें आत्महत्या केली नाहीं, पण तुझ्या वंशाचा ईश्वर निःपात करील असा त्याला शाप दिला. त्या शापाप्रमाणें कंसाचा श्रीकृष्णांनीं वध करून त्याचा निर्वंश केला. "

## २ गुरुदक्षिणा.

श्रीकृष्णानें, कंसाचा वध केला त्यावेळीं, भगवान् फारच लहान होता. त्यानंतर आठवे वर्षी कृष्णाचा व बलरामाचा व्रतबंध करून त्या दोघांना त्यांच्या आईबापांनीं **संदीपन** ऋषीजवळ विद्याभ्यासासाटीं ठेविलें होतें. तेथेंच श्रीकृष्णाची व सुदामाची ओळख झाली. तो सुदामा पुढें कृष्णाचा मोटा सखा झाला. तिघेही गुरुगृहीं एकोप्यानें राहून विद्याभ्यास करीत असत. कांहीं दिवस गेल्यावर सर्वांचा विद्याभ्यास पुरा झाला. तेव्हां श्रीकृष्णानें गुरूस वंदन करून, "इच्छा असेल ती गुरुदक्षणा मागावी" म्हणून विनंति केली. संदीपन ऋषीला श्रीकृष्णाची अतर्क्य शक्ति माहीत होती. तो म्हणाला, " कृष्णा! प्रभास नांवाच्या पुण्यक्षेत्रीं, समुद्रांत पोहण्यासाठीं माझा मुलगा गेला असतांना, त्याला जलचरांनीं एकाएकीं पाण्यांत ओढून नेलें आहे. तेव्हां मला जर कांहीं गुरुदक्षिणा द्यावयाची असेल, तर तेवढा माझा मुलगा मला परत आणून दे. " मग श्रीकृष्ण गुरूला आश्वासन देऊन तेथून प्रभासक्षेत्रीं आला. व सागराची विनंति करून, " संदीपनपुत्र परत द्या " म्हणून त्यानें सागराजवळ मागणें केलें. तेव्हां सागर म्हणाला, " कृष्णा! पांचजन्य नांवाचा शंख आहे, त्यानें संदीपनाच्या मुलाला नेलें आहे. तर त्याच्याकडे जाऊन तूं मुलगा माग. " सागरानें असें सांगितल्यावर श्रीकृष्णानें समुद्रांत उडी मारली व पांचजन्य शंख शोधून काढला, पण त्याच्याजवळ पुत्र नसून तो यमलोकीं आहे असें कळलें. मग श्रीकृष्ण यमाकडे गेला, व त्याच्याजवळून संदीपनाचा पुत्र मागून घेऊन तो गुरूला नेऊन दिला. याप्रमाणें गुरुदक्षिणा दिल्यावर श्रीकृष्ण मथुरेस बलरामासह परत आला. इकडे कंसाच्या स्त्रिया आपला बाप जो जरासंध याच्याकडे येऊन श्रीकृष्णाचा सूड घेण्याविषयीं त्याची विनवणी करीत होत्या. तेव्हां आपल्या कन्येच्या इच्छेप्रमाणें तेवीस अक्षौहिणी सैन्य आपणाबरोबर घेऊन मथुरेवर आला, त्याच्या सैन्यांत शाल्व, दमघोष, पौंड्रक, वासुदेव, महामद, एकलव्य, दंतवक्र, विदूर वगैरे अनेक मोठमोठे योद्धे

होते. जरासंधानें सर्व मथुरेस वेढा घातला व आंतील लोकांना त्राही त्राही करून सोडलें. तेव्हां श्रीकृष्णही आपल्या सैन्यासह जरासंधाशीं युद्ध करूं लागला.

या भयंकर युद्धामुळें मथुरेच्या लोकांचें फार नुकसान होऊं लागलें. कोणाचीं घरें, कोणाचे वाडे, कोणाचीं मंदिरें हीं धडाडून पडूं लागलीं, लोक मरूं लागले, तेव्हां या अनर्थाबद्दल नगरवासीजन कृष्णास दोष देऊं लागले. लोकांची ही परिस्थिति पाहतांच कृष्ण व बलराम यांस त्वेष चढला. कृष्णानें आपल्या सुदर्शन चक्राच्या योगानें जरासंधाचे हजारों वीर कापून काढले. बलरामानें जरासंधावर मोर्चा केला. बलराम व जरासंध हे दोघेही महापराक्रमी होते. दोघांना नऊ सहस्र नागांचें बळ होतें. त्या दोघांचें युद्ध होतांच पृथ्वीचा प्रळयकाळ समीप आला कीं काय असें लोकांना वाटूं लागलें. बलरामानें आपलें मुसळ वर उचललें व तें तो आतां जरासंधाच्या मस्तकावर घालणार तोंच आकाशांतून देववाणी झाली कीं, हे बलरामा ! तें मुसळ तूं परत घे. तुझ्या हातून जरासंधास मृत्यु नाहीं. ही आकाशवाणी ऐकल्यावर बलरामानें आपलें मुसळ परत घेतलें, व जरासंधाला वरुणपाशानें बांधून टाकलें. इकडे श्रीकृष्णानें आपल्या सुदर्शन चक्रानें सर्व सैन्याचा विध्वंस केल्यामुळें जरासंधाचे वीर गतधैर्य झाले. मग श्रीकृष्णानें जरासंधाचे वरुणपाश तोडून टाकले व त्यास मोकळा करून मोठ्या सन्मानानें त्याच्या नगरास पाठवून दिलें. कांहीं दिवस गेल्यावर जरासंधानें पुन्हां सैन्याची तयारी केली व तो मथुरेवर चालून आला. त्या वेळींही श्रीकृष्णानें व बलरामानें त्याला न मारितां जिवंत सोडून दिलें. याप्रमाणें जरासंधानें सत्रा वेळां मथुरेवर स्वाऱ्या केल्या, पण तितक्याही वेळां श्रीकृष्णानें त्याचा पराभव करून त्याला जिवंत सोडून दिलें.

मथुरेस जरासंधाचा सत्रा वेळां पराभव झाल्यानें तो फारच संतप्त झाला, त्यानें देशोदेशीचे श्रीकृष्णाचे अनेक शत्रु एकत्र केले व मोठ्या तयारीनें त्यानें पुन्हा मथुरेवर हल्ला केला. त्या वेळीं बलराम म्हणाला, " कृष्णा, या जरासंधाला सत्रा वेळां आपण जिवंत सोडलें, तरी तो आपला द्वेष टाकीत नाहीं. सर्पास जिवंत सोडल्याचे जसे उपकार वाटत नाहींत, तसाच हा जरासंध कृतघ्न आहे; ! तेव्हां या प्रसंगीं त्याजवर दया करणें बाजवी नाहीं." श्रीकृष्णास बलरामाचें तें म्हणणें पसंत पडलें व ते दोघेही युद्धासाठीं निघाले; इतक्यांत मथुरेतील विकद्रू नावाचा एक थोर गृहस्थ रामकृष्णांना भेटून म्हणाला, " देवहो ! हा तुमचा युद्धपराक्रम आतां पुरे झाला. त्या जरासंधानें मथुरेवर सत्रा वेळां हल्ले करून साऱ्या मथुरेची धूळधाण करून टाकली. मथुरेंतले अनेक लोक निष्कारण मृत्युमुखीं पडले व हजारों मंदिरें नाहींशीं झालीं. हा सर्व अनर्थ तुम्हीं दोघांनीं केला. तुम्हीं त्या कंसाला मारलें नसतें, तर मथुरेची अशी दुर्दशा कशाला झाली असती ? रामकृष्णहो ! आतां या वेळीं तरी युद्ध करूं

नका, म्हणजे या मथुरेच्या लोकांवर उपकार होतील." हें विकद्रूचें भाषण ऐकून श्रीकृष्ण म्हणाला, "आम्हांपासून जर मथुरेला एवढा उपद्रव होत असेल तर आम्हीं मथुरा सोडून दुसरे ठिकाणीं जातों; तुम्हीं आपला गांव खुशाल सांभाळावा." असें म्हणून ते दोघेही मथुरेहून निघाले ते कोल्हापुरानजीक कऱ्हाडास आले. तेथें त्यांची व परशुरामाची भेट झाली. कऱ्हाडाजवळ एका वटवृक्षाखालीं परशुराम रहात असत; जवळ कामधेनु व धनुष्यबाण असल्यामुळें त्यांना कोणत्याच गोष्टीचें उणें नव्हतें. एकमेकांनीं एकमेकांचें क्षेमकुशल विचारल्यावर भार्गवराम म्हणाले; "कृष्णा! इकडे कोणीकडे येणें केलें?" तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला, "रामा! जरासंधानें सर्व मथुरानगरी पादाक्रांत केली आहे, तेव्हां निरुपाय जाणून नगर सोडलें, व या अरण्यांत तुझ्या आश्रयाला आलों आहोंत." हें कृष्णाचें विनोदाचें बोलणें ऐकून परशुरामाला हंसू आलें. ते म्हणाले, "हे श्रीकृष्णा! संपूर्ण जगत्रयाला तुझा आश्रय असून आमच्या आश्रयाची तुला काय आवश्यकता आहे? तुझें सामर्थ्य मला माहीत आहे. त्या जरासंधाचा तुला धाक तो किती? तूं मनांत आणशील तेव्हां त्याला नाहींसें करूं शकशील. तुझें गूढ चरित्र कोणालाही उकलणार नाहीं. असो. अशा निमित्तानें कां होईना तुह्मां उभयतांची भेट झाली हें फार चांगलें झालें. कऱ्हाड हें तुमचेंच गांव आहे, असें असून येथें मृगाळ व वासुदेव तुमचा वेष धारण करून राज्य करीत आहे. कपटप्रयोगानें तो चतुर्भुज झाला आहे. तरी त्या दोघांचा नाश करून त्याच्या पुत्राला गादीवर बसवा, आणि मग जा. तसेंच हा गोमाचल पर्वत फार उंच वाढला असून सूर्याच्या रथाला वारंवार अडथळा करितो; करितां यालाही भूमीगत करावें." याप्रमाणें भार्गवरामानें श्रीकृष्णास सांगितलें. नंतर कामधेनुकडून उत्तम भोजनाची तयारी करवून त्यांस सत्कारानें भोजन घातलें. नंतर भार्गवराम तेथून निघून वैतरणामुखाजवळ समुद्राचे कांठीं येऊन राहिले.

भार्गवरामांनीं सांगितल्याप्रमाणें श्रीकृष्णानें गावांत प्रवेश करून त्या तोतया कृष्णाला, राज्य सोडण्याविषयीं व खोट्या भुजा कापून टाकण्याविषयीं सांगितलें, परंतु तो तोतया अभिमानानें अंध झाला असल्यामुळें श्रीकृष्णाचें ह्मणणें त्यास पसंत पडलें नाहीं. त्यानें कृष्णाचा धिक्कार करून युद्धाची तयारी केली. तेव्हां बलरामकृष्णांनीं त्याचा विध्वंस केला. अशा रीतीनें मृगालाची व्यवस्था लागल्यावर त्याची स्त्री आपल्या मुलाला श्रीकृष्णाकडे घेऊन आली, व त्याला श्रीकृष्णाच्या पायांवर घालून ह्मणाली, "हे देवाधिदेवा! माझ्या पतीला त्याच्या अपराधाचें योग्य असें प्रायश्चित्त मिळालें. पण आतां या पोरावर दया करावी. हें राज्य व ऐश्वर्य सर्व आप-

लेंच आहे आणि आपलें ह्मणूनच आह्मीं त्याचें रक्षण करूं.” त्या स्त्रीची ही विनंती श्रीकृष्णाने मान्य केली, व मृगालाचे मुलास मोठ्या समारंभानें सिंहासनावर बसवून आपण पुढें गोमाचल पर्वतावर निघून गेला.

### ३ गोमाचल विध्वंस.

इकडे मथुरेवर जरासंध मोठ्या सैन्यानिशीं चालून आला होता, पण श्रीकृष्ण व बलराम हे दोघेही मथुरा सोडून निघून गेल्याचें समजल्यावर तोही युद्ध बंद करून श्रीकृष्णाच्या शोधास निघाला आणि गोमाचल पर्वतावर श्रीकृष्ण व बलराम या दोघांना गांठलें. त्यानें पर्वतासभोंवतीं सैन्याचा वेढा घालून पर्वताचे पायथ्याशीं अग्नि लावून दिला. त्यायोगें सर्व पर्वत पेटला. अग्नीच्या भयंकर ज्वाळांमुळें अनेक जीवजंतु मरूं लागले. पर्वताच्या शीला पर्वतापासून मोकळ्या होऊन खालीं पडूं लागल्या. अशा प्रकारें सर्व बाजूंनी पर्वत पेटल्यावर श्रीकृष्ण व बलराम हे दोघेही काय करावें या विचारांत पडले. कारण, त्या वेळीं त्यांच्याजवळ आयुधें कांहींच नव्हतीं. मग त्यांनीं इंद्राकडे अवश्य त्या आयुधांची मागणी केली. इंद्रानें तत्काल श्रीकृष्णाला ज्या आयुधांची जरूर होती तीं पाठवून दिलीं. आयुधें हातांत आल्याबरोबर दोघांनींही पर्वतावरून उड्डाण केलें व ते जरासंधाच्या सैन्यासमोर येऊन उतरले. चवताळलेला वाघ मेंढरांच्या कळपांत शिरला ह्मणजे त्या कळपाचा जसा विध्वंस करून टाकतो, त्याप्रमाणें बलराम–कृष्णानें जरासंधाच्या सैन्याचा थोड्याच वेळांत विध्वंस केला व शेवटीं एकटा जरासंध जिवंत राहिला. त्याच्या अंगावर बलराम आपलें मुसळ घेऊन धांवला. तोंच आकाशवाणी झाली कीं, ‘ हे बलरामा! याचा तूं वध करूं नकोस. ’ अशी आकाशवाणी ऐकतांच बलरामानें जरासंधाला जिवंत सोडून दिलें. नंतर श्रीकृष्णाने सुदर्शन चक्राच्या योगानें गोमाचल पर्वत सूर्याचे रथाला अडथळा करीत असल्यामुळें त्याला भूमिगत केलें. त्या पर्वताच्या पृष्ठभागाला तेव्हांपासून गोवें असें नांव पडलें. पुढें राम व कृष्ण उभयतां मथुरेस परत आले.

---

## अध्याय ३ रा.

### १ कालयवनाची उत्पत्ति.

मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें जरासंधाचा पराभव झाल्यावर, तो आपले राजधानींत परत आला, व पुन्हा श्रीकृष्णाचें पारिपत्य कसें करावयाचें याचा विचार करूं लागला. त्यावेळीं यवनाचे नगरामध्यें काळयवन, या नांवाचा एक महापराक्रमी यवन राजा राज्य करीत होता. त्या काळयवनाचें साह्य घेण्याचें

जरासंधानें मनांत आणलें. हा काळयवन ऋषीच्या वरदानानें सर्वांना अजिंक्य झाला होता. पूर्वी गर्ग ऋषी एका अरण्यामध्यें लोहपिष्ट खाऊन दहा हजार वर्षे तपश्चर्या करीत बसले होते. गर्गाचार्य हे यादवांचे जामात असून त्या वेळीं त्यांची स्त्री ऐन तारुण्यांत होती; परंतु गर्गऋषींचें लक्ष तपश्चर्येकडे असल्यामुळें ते आपल्या तरुण स्त्रीकडे मुळींच पहात नसत. या त्यांच्या वृत्तीवरून यादव त्यांना हे पुरुष नाहींत असें ह्मणूं लागले. यादवांची ती निंदा ऐकून गर्गमुनींना फार राग आला, व त्यांनीं बारा वर्षेपर्यंत शंकराची सेवा करून शंकरास प्रसन्न करून घेतलें. आणि यादवांचा नाश करणारा पुत्र व्हावा असा वर मागून घेतला. शंकराकडून वर मिळविल्यावर गर्गमुनी घरीं येत असतां त्यांनां यवन राजा भेटला. त्या राजाचें मोठें ऐश्वर्य होतें, परंतु पुत्र नसल्यामुळें तो अत्यंत कष्टी होता. त्यानें गर्गमुनींला साष्टांग नमस्कार घातला, व पुत्राची मागणी केली. ती त्याची विनंति ऐकून गर्गऋषींनीं त्याच्या स्त्रीला मंत्राक्षता दिल्या. त्यायोगें त्या यवन राजाचे स्त्रीला पुत्र झाला. तो रंगानें काळा असल्यामुळें त्याचें नांव काळयवन असें ठेविलें. हाच कालयवन गर्गमुनीचा वरद पुत्र असल्यामुळें, त्याच्या हातून यादवांचा नाश होईल असा जरासंधास भरंवसा उत्पन्न झाला व ह्मणून त्यानें काळयवनास बोलावून त्याला कृष्णाचे पारिपत्यासाठीं पाठविण्याची तजवीज केली.

## २ द्वारकेची स्थापना.

जरासंध काळयवनाला ह्मणाला; " हे काळयवना ! त्या कृष्णानें माझा सत्रा वेळा पराभव करून मानभंग केला आहे; यादवांचा नाश तुझ्या हातून होईल असें तुला वरदान आहे, तेव्हां तूं मथुरेस जाऊन श्रीकृष्णाला मार. तो कृष्ण ओळखण्यासाठीं त्याच्या मुख्य मुख्य खुणा तुला सांगतों. त्याचा वर्ण श्याम असून त्याला चार हात आहेत. त्याच्या हातांत शंख, गदा, चक्र व कमळ अशीं आयुधें आहेत, गळ्यांत कौस्तुभ मणी असून त्याचा मुकुट नवरत्नांचा आहे. त्याच्या हातापायांचे तळवे रक्तकमळाप्रमाणें लाल आहेत, त्याच्या कमरेला नेहमीं पिंवळा पीतांबर असतो. तो मोठा चतुर असून शक्तिसंपन्न आहे. त्याचा तूं आपल्या बाहुबलानें पराभव करून ये. " याप्रमाणें जरासंधानें काळयवनास सांगितल्यावर काळयवन आपणाबरोबर मोठें सैन्य घेऊन मथुरेस आला. काळयवनाचें तें प्रचंड सैन्य मथुरेवर आल्यावर नगरांतील लोक फार घाबरले. अगोदरच जरासंघाच्या सत्रा हल्ल्यांमुळें मथुरा नगरीची अगदीं दुर्दशा झाली होती, त्यांत आणखी हा काळयवन आल्यामुळें लोक अत्यंत भयभीत झाले. मग नगरांतील विकद्रु वगैरे प्रमुख लोक श्रीकृष्णाकडे आले, व त्याला हा अनर्थ टाळण्याची विनंति करूं लागले. विकद्रु ह्मणाला; " हे श्रीकृष्णा, तूं पूर्वी जसें या मथुरेचें सत्रा वेळा जरासंधापासून संरक्षण केलें तसें आतांहि करावें." यावर श्रीकृष्ण

ह्मणाला, "तो काळयवन महा शक्तिसंपन्न असून त्याच्याजवळ पुष्कळ सैन्य आहे, तेव्हां मी एकटा त्याच्याबरोबर युद्ध करण्यास अगदीं असमर्थ आहें. आतां तो चतुर आहे कीं नाहीं, हें पाहून मला पुढील तयारी केली पाहिजे." असें सांगून श्रीकृष्णानें एका मातीच्या घागरींत एक मोठा सर्प घातला व त्या घागरीचें तोंड बांधून ती घागर दूताबरोबर काळयवनाकडे पाठवून दिली. काळयवनानें तो घट सोडला व त्यांत सर्प आहे असें पाहून त्या घागरींत लक्षावधी मुंग्या घालून पुन्हां त्या घटाचें तोंड बांधलें व तो श्रीकृष्णाकडे परत पाठवून दिला. मग तो घट, श्रीकृष्णाने सोडून सर्वांना दाखविला तों सर्प मरून त्याचे अनंत तुकडे झाले होते, असें सर्वांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. तेव्हां श्रीकृष्णानें काळयवनाबरोबर युद्ध करण्याचा विचार रहित केला. व एक निराळीच योजना केली. गरुडास विश्वकर्म्याकडे पाठवून त्यानें विश्वकर्म्याला बोलाविलें. व त्याला अगदीं मथुरेप्रमाणेंच समुद्रांत द्वारका नगरी एका रात्रींत तयार करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें विश्वकर्म्यानें द्वारका नगरी तयार केल्यावर श्रीकृष्णानें तो मजकूर फक्त बलरामाला सांगून रात्रीच्या रात्रीं सर्व लोक निद्रिस्थ असतांना त्यांच्या पशुपक्षी आदि वस्तूंसह द्वारकेस नेऊन टेविलें. सकाळीं उजाडल्यावर लोक द्वारकानगरीच्या बाहेर येऊन पाहतात तों, जिकडे तिकडे समुद्र दिसूं लागला. तो विलक्षण प्रकार पाहून लोकांना आतां जलप्रळय होत असून सर्व मथुरा पाण्यांत जाणार असें वाटूं लागलें. लोक फार भयभीत झाले, माता आपल्या मुलांना हृदयाशीं धरून बसल्या, जो तो अश्रुपात करूं लागला आणि सर्व लोक हाहाःकार करूं लागले. लोकांची ही चमत्कारिक अवस्था बलरामानें पाहून त्यानें सर्व लोकांनां श्रीकृष्णानें मथुरा द्वारकेला काळयवनाचे भीतीनें आणली असें सांगितलें. तेव्हां लोकांत शांतता झाली. लोक आपआपला पैसाअडका ऐवज, धान्याची पेवें, वृक्ष पशु आदि सर्व जेथल्या तेथें आहे हें पाहून फार आश्चर्यचकित झाले व त्यांनीं श्रीकृष्णाची अनन्य भावानें स्तुति केली.

### ३ कालयवनाचा नाश.

इकडे मथुरेमध्यें श्रीकृष्ण रात्रभर एकटाच होता, तो प्रभातकाळ झाल्यावर मथुरेच्या बाहेर पडला व काळयवनाच्या सैन्यासमोरून मार्ग क्रमूं लागला. ती चतुर्भुज पीतांबर नेसलेली श्रीकृष्णाची मूर्ति पाहिल्याबरोबर काळयवनास जरासंधानें सांगितलेला कृष्ण तो हाच असें वाटलें व तो कृष्ण निःशस्त्र एकटा पायांनीं चालत आहे, असें पाहून आपणही निःशस्त्र एकटा कृष्णाला धरण्याचा प्रयत्न करूं लागला. इकडे कृष्णानें धांवल्यासारखें करावें कांहीं चालल्यासारखें करावें, असें करून करून त्यानें काळयवनास पुष्कळ दूर नेलें. याप्रमाणें सैन्यापासून कित्येक कोस लांब आणल्यावर एका गुहेंत शिरला व तेथें मुचुकुंद नांवाचा एक राजा जवळच निद्रिस्थ होता, त्याच्या अंगावर श्रीकृष्णानें आपला

पीतांबर घालून आपण अदृश्य झाला. निजलेला मुचुकुंद हाच श्रीकृष्ण आहे असें पीतांबरामुळें काळयवनाला वाटलें व त्यानें जोरानें एक लाथ मुचुकुंदास मारली, त्याबरोबर त्याच्या नेत्रांतून भयंकर तेज निर्माण झालें, व त्यायोगें तो काळयवन भस्म होऊन गेला. मुचुकुंद त्या लत्ता प्रहारामुळें जागा झाला. व आपणास कोणीं सावध केलें तें पाहूं लागला, परंतु जवळ कोणीहि नसून आपल्या अंगावर पीतांबर आहे याबद्दल त्याला फार आश्चर्य वाटलें. इतक्यांत त्यास आपल्या वरदानाची स्मृति झाली, व तो श्रीकृष्णानें स्तवन करूं लागला. तेव्हां शंखचक्रगदापद्मधारी श्रीकृष्णाची मूर्ति त्याच्या समोर उभी राहिली. याप्रमाणें श्रीकृष्णाचें दर्शन झाल्याबद्दल मुचुकुंदास फार आनंद झाला व त्यानें श्रीकृष्णाचे चरणावर मस्तक ठेवून त्यापासून आशीर्वाद मिळविला. कृष्णानें त्याच्या मस्तकावर हात ठेवून तूं मोक्ष पावशील असा वर दिला व नंतर श्रीकृष्ण तेथून द्वारकेस आला.

## ४ मुचुकुंदाची कथा.

जनमेजय राजा वैशंपायनाला ह्मणाला; " हे मुनिराज! श्रीकृष्णानें द्वारकेची स्थापना कां केली हें मला कळलें; परंतु मुचुकुंदास लाथ मारल्यामुळें काळयवनाचा नाश कां झाला तें मला कृपा करून सांग" वैशम्पायन ह्मणाला, " राजा! सूर्य वंशांतील इक्ष्वाकु राजाचा मुलगा मांधाता, व त्याचा पुत्र मुचुकुंद हा होय. मुचुकुंद हा अयोध्येस राज्य करीत असतांना ब्रह्मदेवाचे वरप्रदानामुळें सर्वांना अजिंक्य झालेला तारकासुर सर्व त्रैलोक्यांत अत्यंत उत्पात करूं लागला. साट सहस्र वर्षेपर्यंत देव तारकासुराबरोबर युद्ध करीत होते, पण तारकासुर कोणासहि आटपेना. तेव्हां मुचुकुंद राजा रणविद्येंत फार निपुण असल्यामुळें तो तारकासुराचा सहज नाश करील, असें इंद्राला नारदानें सांगितल्यावर, इंद्रानें विमान पाठवून मुचुकुंदास अमरावतीस आणिलें. तेथें तारकासुराबरोबर मुचुकुंदराजा दोन युगेंपर्यंत युद्ध करीत होता. पुढें षडाननानें त्या तारकासुराचा नाश केला" त्या वेळीं इंद्र मुचुकुंदला ह्मणाला; " हे राजा! तूं आमच्याकरितां दोन युगेंपर्यंत तारकासुराबरोबर अहोरात्र युद्ध केलें हे तुझे आमच्यावर फार उपकार झाले आहेत तर या उपकारऋणांतून सोडविण्यासाठीं तुझी इच्छा असेल तें माग. मी देण्यास तयार आहें." मग मुचुकुंदानें इंद्राजवळ मोक्षदान मागितलें, "मोक्षदान देण्याची देण्याची आमची योग्यता नसून तशी शक्तीही आमच्या आंगीं नाहीं, पण तूं मागितलें आहेस त्या अर्थी मी तुला असें वचन देतों कीं, द्वापारीं श्रीकृष्ण भगवान् तुला भेटेल त्याच्याकडून तुला मोक्षप्राप्ती होईल. तोंपर्यंत तूं आपले अयोध्येच्या राज्याचा सुखानें उपभोग घे." तेव्हां मुचुकुंद ह्मणाला, " हे सुरनाथा! आतां राज्य करण्याची मला मुळींच इच्छा नाहीं. सतत दोन युगें युद्ध केल्यामुळें मी फार थकलों आहें तर श्रीकृष्ण भगवंताची

भेट होईपर्यंत मला निद्रा मिळावी. त्याप्रमाणें इंद्रानें मुचुकुंदास निद्रा दिली पण तुला जो त्रास देऊन उठवील त्याचा नाश होईल असें सांगितलें." मुचुकुंदास याप्रमाणें वरदान होतें त्यामुळें काळयवनाचा नाश झाला, व मुचुकुंदास श्रीकृष्णाचें दर्शन होऊन मोक्ष मिळाला. तसेंच श्रीकृष्णाचेंहि पण युद्धावांचून काम झालें.

### ५ षडाननाची कथा.

नंतर वैशंपायन म्हणाले; "राजा! षडानन हा महादेवाचा पुत्र होय. तारकासुराचा मृत्यु महादेवाचे मुलाचे हातानें होता. तारकासुरानें अत्यंत प्रळय मांडल्यावर सगळे देव शंकरास पुत्रप्राप्तीची इच्छा करूं लागले, पण त्यावेळीं महादेव व पार्वती यांच्यांत बेबनाव झालेला असल्यामुळें पुत्र होणें दुरापास्त आहे, असें सर्व देवांनां वाटलें. मग अग्नि त्या दोघांचा योग घडवून आणण्यासाठीं पुढें झाला, व मोराचें रूप धारण करून महादेवापुढें नृत्य करूं लागला. त्या मोराचें तें सुंदर नृत्य पाहून शंकराला कामेच्छा उत्पन्न झाली, तेव्हां महादेवाचें रेत पृथ्वीवर स्खलन झालें. आपला कार्यभाग झाला असें पाहून अग्नीनें आपलें रूप धारण केलें व तें वीर्य घेऊन तो तेथून निघून गेला. नंतर पार्वती येऊन पाहूं लागली तों महादेवाचें कांहीं वीर्य पृथ्वीवर पडलेलें आहे, तेव्हां तिच्या मनांत पृथ्वीविषयीं सवतीमत्सर उत्पन्न झाला व ती त्या पृथ्वीवर क्रुद्ध होऊन म्हणाली, "माझ्या पतीच्या वीर्याची मी एकटी मालकीण असून तो भाग तूं भोगलास म्हणून तुला अनंत राजे भोगतील; असा मी शाप देतें." हा शाप ऐकून पृथ्वी म्हणाली; "हे देवी पार्वती! तूं मला निष्कारण शाप दिल्यामुळें मीहि तुला शाप देतें कीं, तुझ्या उदरीं रुद्रवीजापासून फलप्राप्ति होणार नाहीं." पृथ्वीच्या अंगावर त्या वेळीं जें वीर्य सांडलें त्यापासून सोनें, रुपें आदि सप्त धातु निर्माण झाले, अशी रामायणांत कथा आहे. अग्नि ब्राह्मणाचे वेषानें भिक्षेस आला असतां पार्वतीनें त्यास त्या वीर्याची भिक्षा घातली; तें अमृत जाणून अग्नीनें भक्षण केलें, त्यामुळें तो गरोदर झाला, तेव्हां वाटेंत अरुंधतीशिवाय सप्त ऋषींच्या सहा बायका सरोवरावर स्नान करीत होत्या ती संधी पाहून अग्नीनें त्यांच्या उदरांत आपला गर्भ घातला, त्यामुळें त्या स्त्रियांना गरोदरावस्थेचीं चिन्हें जाणवूं लागलीं. आपण गरोदर आहोंत हें आपल्या पतीला कळल्यास मोठा अनर्थ होईल, असें जाणून सर्वजणींनीं आपआपल्या गर्भाचें पतन केलें. ते सहा गर्भ एका ठिकाणीं पडल्यावर त्यापासून सहा मुखांचें मूल निर्माण झालें. पुढें तें मूल नारदानें तेथून उचलून पार्वतीजवळ आणून दिलें, व तिला त्यासंबंधाची सर्व हकीकत सांगून तो मुलगा तुझाच आहे, अशी तिची खात्री करून दिली. शंकरपार्वतींनीं त्याला सहा मुखें असल्यामुळें त्याचें षडानन असें नांव ठेविलें. याप्रमाणें षडाननाची उत्पत्ति असून त्यानें आपल्या पराक्रमानें तारकासुराचा नाश केला.

# अध्याय ४ था.

## १ कुशदैत्य व दुर्वास ऋषि.

जनमेजय राजा वैशंपायनाला ह्मणाला; श्रीकृष्णानें ती द्वारकानगरी एवढी सुंदर वसुंधरा सोडून समुद्रांत कां निर्माण केली तें ऐकण्याची इच्छा आहे. तें ह्मां वैशंपायन ऋषि ह्मणाले, " राजा ! श्रीकृष्णांनीं मथुरा, गोकुळ, वृंदावन या ठिकाणीं जो कांहीं दिवस वास केला, तो वृंदावनाच्या एका स्त्रीचे सांगण्यावरून केला. तेथें गोपिकांसह अनंत वर्षें क्रीडा केल्यावर श्रीकृष्णास मथुरेचा कंटाळा आला होता; शिवाय वृंदेनें ज्याप्रमाणें मथुरेस कृष्णाचा वास करविला होता, त्याचप्रमाणें कुश राक्षसानें द्वारकेस श्रीकृष्णांनीं वास करावा अशी कृष्णाची विनंती केली होती. आणि त्या स्थानावांचून संपूर्ण भूतलावर दुसरें पवित्र असें नगर बांधण्यासाठीं स्थळहि नव्हतें. पृथ्वीवर भागीरथी नदीचे कांठीं श्रीकाशीक्षेत्र ह्मणून एक पवित्र स्थान आहे, पण तेथें श्रीशंकराचा वास असल्यामुळें श्रीकृष्णांनीं आपणासाठीं स्वतंत्र अशी द्वारका नगरी तयार केली. कुशदैत्याचे सांगण्यावरून श्रीकृष्णांनीं द्वारकेस कां वास केला तें तुला सांगतों. कुश हा मुर नांवाच्या असुराचा बंधु होता. त्यानें कित्येक वर्षें कडकडीत तप करून महादेवाला प्रसन्न केलें, व त्यांच्याकडून असा वर मिळविला कीं, संपूर्ण पृथ्वीवर जेथें जेथें सूर्याचे किरण जाऊन पोहोंचतात त्या ठिकाणीं मला मृत्यु येऊं नये; तसेंच रणांत माझे हस्तपादादि अवयव तुटून पडल्यास ते माझ्या धडास लावल्याबरोबर मी पुन्हा पूर्ववत बलवान् व्हावें. शंकरानें प्रसन्न होऊन त्यास वरीलप्रमाणें वरदान दिलें व त्यास असें सांगितलें कीं, तूं चक्रतीर्थाचें संरक्षण कर. कारण या तीर्थाचा असा महिमा आहे कीं, या तीर्थांत जो स्नान करील तो यमाला चुकवील. असें शंकरानें सांगून ते अदृश्य झाले, व कुश तेव्हांपासून चक्रतीर्थाचें संरक्षण करूं लागला. कांहीं दिवस गेल्यावर पुष्कर तीर्थाचे ठिकाणीं दुर्वास ऋषीची व नारदाची गांठ पडली; नारदाचें भ्रमण सर्व भूमंडळीं असल्यामुळें त्यास सृष्टींतील अनंत चमत्कार पहावयाला मिळत असत; ह्मणून जो तो नारदाला कांहीं नवी माहिती विचारीत असे. दुर्वास ऋषीनेंहि नवीन प्रकार आपणास सांगावा ह्मणून नारदाची विनंति केली; तेव्हां नारद ह्मणाला, " ऋषि ! माझ्या अवलोकनांत नवीन असें चक्रतीर्थ ज्याला कुशस्थळही ह्मणतात, तें आलें आहे. त्या तीर्थाचा महिमा मोठा विलक्षण आहे. जो त्या तीर्थांत स्नान करितो, त्याच्या संपूर्ण पातकांचा नाश होतो. तें तीर्थ गोमती नांवाची नदी सागराला ज्या ठिकाणीं मिळते, त्या ठिकाणीं आहे. अशी नारदाकडून चक्रतीर्थाची हकीकत ऐकल्यावर दुर्वास ऋषीला

साहजिक त्या तीर्थांत स्नान करण्याची इच्छा झाली, व तत्काल तो पुष्कराहून चक्रतीर्थाजवळ आला. तें रम्य तीर्थ पाहून दुर्वास ऋषीला मोठा आनंद झाला व तो मोठ्या उल्हासानें त्या तीर्थांत स्नान करूं लागला. इतक्यांत त्या तीर्थाचे रक्षक कुशराक्षसाचे दूत दुर्वासाजवळ आले, व त्यांनीं ऋषीला बाहेर ओढून काढून मारीत मारीत कुशराक्षसाजवळ नेलें. त्या दुष्ट राक्षसानें दुर्वासास अत्यंत छळलें व जिवंत सोडून दिलें. दुर्वास ऋषीच्या मनांत त्यास शाप देऊन त्याला दग्ध करून टाकावें असें आलें होतें, परंतु त्यास शंकराचा वर असल्यामुळें दुर्वासऋषि त्यास शाप न देतां परत आला. परंतु त्या दैत्याचा नाश कसा करितां येईल याचा तो एकसारखा विचार करीत होता. मग त्याच्या असें लक्षांत आलें कीं, भगवान् शेषशाई नारायणावांचून या कुशदैत्याचा नाश करण्यास कोणीहि समर्थ नाहीं. तेव्हां दुर्वास ऋषि नारायणाचा शोध करूं लागला. सर्व पृथ्वी, क्षीरसागर वगैरे ठिकाणीं त्यानें भगवंताचा शोध केला, पण भगवान् कोठेंच दृष्टीस पडेना. तेव्हां दुर्वासऋषि वैकुंठास गेला, पण तेथेंही भगवान् वासुदेव दृष्टीस पडला नाहीं. मग त्याची व नारदाची मार्गांत गांठ झाली. नारदानें भगवान् पाताळांत बळीचे सेवक होऊन राहिले आहेत असें सांगितलें. मोठमोठ्या तापसी जनांना ज्या भगवंताचें दर्शनही होत नाहीं, तो भगवान् वासुदेव, केवळ बळी राजाचे भक्तीमुळें त्याचा चाकर होऊन राहिला आहे, हें ऐकून दुर्वासाला फार आश्चर्य वाटलें व तो लागलाच तेथून निघून पाताळांत गेला. त्यानें भगवंताचे चरणीं आपलें मस्तक ठेविलें व तो भगवंताला ह्मणाला, “ देवा ! चक्रतीर्थावर स्नान करण्यास गेलों असतां कुश दैत्यानें माझी फार विटंबना केली; त्या दैत्याला महादेवाचा वर असल्यामुळें तो फारच उन्मत्त झाला आहे; तुझ्यावांचून त्याचा नाश करण्यास दुसरा कोणीही समर्थ नाहीं. तर हे नारायणा ! त्या राक्षसाचा नाश कर आणि तें चक्रतीर्थ सर्व पतितांना मोकळें कर. ” दुर्वास ऋषीची ही विनंति ऐकून भगवान् वासुदेव ह्मणाले, “ ऋषि ! तुमच्या विनंती प्रमाणें मीं यावें हें खरें, पण हल्लीं मी बळीचा दास आहें. तेव्हां बळीच्या परवानगीवांचून मला येतां येणार नाहीं. ” मग दुर्वासऋषीनें बळीची विनंति केली. तेव्हां बळी ह्मणाला, “ हे दुर्वासऋषे ! मी नारायणाला आपणापासून घटकाभरहि दूर करणार नाहीं. नारायणास घराचे बाहेर जो मूर्ख असेल तोच करील. दारापुढचा कल्पतरु जो वेडा असेल तोच काढून टाकील. नारायणाची योग्यता मी चांगली जाणतों, ह्मणून मी देवाला आपणाजवळून दूर करण्यास मुळींच कबूल नाहीं. ” हें बळीचें बोलणें ऐकून दुर्वास ऋषीची फारच निराशा झाली. मग देव बळीला ह्मणाले कीं, “ लोकांच्या संकटाचें निवारण करून, दुष्टांचें हनन करणें, हें माझें कर्तव्य आहे; मी जर ऋषींचे कार्यासाठीं गेलों नाहीं, तर माझे ब्रीदाला

कमीपणा येईल; ह्मणून मला तूं जाण्याची परवानगी दे. मी नेहमीं आपल्या सर्व भक्तांच्या सन्निध असतों, त्याप्रमाणें तुझ्याहि मी सन्निध आहें.'' विष्णूनें याप्रमाणें बळीला सांगितल्यावर बळीनें विष्णूला जाण्याची परवानगी दिली. मग भगवंतानीं चक्रतीर्थाचे ठिकाणीं वसुंधरेला पाताळांतून द्वार पाडलें व त्यांतून भगवान् व दुर्वासऋषी वर पृथ्वीवर आले, द्वार पाडलें ह्मणून त्या ठिकाणाला द्वारका असें नांव पडलें.

## २ कुशदैत्याचा नाश.

भगवान् व दुर्वासऋषी त्या तीर्थावर आल्यानंतर भगवंतानें दुर्वासाला तीर्थांत स्नान करण्यास सांगितलें व आपण स्वतः त्याच्या रक्षणासाठीं तेथें उभे राहिले. इतक्यांत तीर्थाच्या संरक्षणासाठीं असलेले कुश दैत्याचे रक्षक दुर्वासऋषीच्या आंगावर धांवून येऊं लागले, परंतु विष्णूनें त्या सर्व रक्षकांचा मध्येंच नाश करून टाकला. त्या कुशराक्षसाच्या साठसहस्र रक्षकांना श्रीकृष्णांनीं मारून टाकल्यावर त्या राक्षसाच्या राज्यांत मोठाच हाहा:कार उडाला. तो अनर्थ पाहून कुश राक्षसाचा बंधु, मुर या नांवाचा होता. तो विष्णूवर मोठ्या क्रोधानें धावून आला; तेव्हां भगवंतानें आपल्या चक्रानें त्याचा शिरच्छेद केला. तेव्हांपासून विष्णूचें मुरारि नांव पडलें. मुर दैत्य मेल्यावर त्याचा बंधु कुश विष्णूबरोबर युद्ध करण्यास आला, त्यानें विष्णूच्या हृदयावर त्रिशूल मारला, तो विष्णूच्या हृदयावर वठून खालीं पडला. मग भगवंतानें चक्र सोडून कुश दैत्याच्या शरीराचे तुकडे तुकडे केले; पण त्याच्या सेवकांनीं ते तुकडे एका ठिकाणीं केल्यावर, पुन्हां कुश जिवंत झाला व विष्णुबरोबर युद्ध करूं लागला. याप्रमाणें विष्णूनें सात वेळां कुशाला मारिलें; तरी तो सातही वेळां जिवंत होऊन युद्ध करूं लागला. नंतर भगवंतानें त्याला मारल्याबरोबर त्याचें मांस भूमींत पुरलें व तें कोणीं काढूं नये म्हणून त्यावर शिवाची शाळुंखा ठेविली. अशाप्रकारें कुश दैत्याचा नाश झाल्यावर भगवान् वासुदेव, तो खरा शिवभक्त असल्यामुळें प्रसन्न झाला व कांहीं मागावयाचें असल्यास माग असें म्हणाला. तो दैत्य म्हणाला, "देवा! मी जरी खरोखर शिवभक्त आहें, तरी या तीर्थाचे ठिकाणीं आतां तूंच अक्षय्य वास करावा अशी माझी इच्छा आहे." भगवान् त्याला तथास्तु म्हणून दुसरा असा वर दिला कीं, तुझे शरीरांतून जें रक्त सांडलें आहे, त्यापासून दर्भ निर्माण होतील व त्या रूपानें तूं अमर होऊन राहशील. व त्यायोगें तुला ब्रह्मदेव, मी व महादेव यांचें नित्य दर्शन होत जाईल. तुला सर्व लोक पवित्र मानतील. कुशदैत्यासाठीं भगवंतांनीं मथुरा सोडून द्वारकेस वास केला आहे. गोमती संगमावर तें चक्रतीर्थ सर्व लोकांना मोकळें केल्यावर भगवान् पुन्हा बळीकडे आले व त्याचें दास्यत्व करूं लागले.

## ३ नरसिंह अवतार.

भगवान्, बळीचे घरीं राहून त्याची सेवावृत्ति करीत होता. बळी हा भगवंताचा मोठा प्रियभक्त होता. बळीची कथा ऐकण्याविषयीं राजाची इच्छा जाणून वैशंपायन म्हणाला, "राजा! पूर्वी हिरण्याक्ष या नांवाचा एक महा प्रतापी राक्षस होऊन गेला. त्यानें सर्व पृथ्वी रसातळांत घालण्याचा प्रयत्न केला, तेव्हां नारायणानें वराह अवतार धारण करून त्या दैत्याचा नाश केला, व पृथ्वीचें संरक्षण केलें. त्याचा धाकटा भाऊ हिरण्यकशिपु होता, त्यानें भावाच्या मृत्यूमुळें देवांशीं वैरसुद्धां केलें. हिरण्यकशिपूनें महादेवाला प्रसन्न करून असा वर मिळविला कीं, पशु, पक्षी, सर्प, कीटक, मनुष्य, देव, राक्षस व कोणताहि सचेतन किंवा अचेतन पदार्थ, यांपासून मला दिवसा व रात्रीं, आकाशांत व पृथ्वीवर मृत्यु येऊं नये. असा चमत्कारिक वर मिळविल्यामुळें तोहि सर्वांना अनावर झाला. त्या हिरण्यकशिपूला प्रल्हाद या नांवाचा एक पुत्र होता, तो मोठा भगवद्भक्त होता. तो असुराचा पुत्र असून वैष्णव कसा झाला? असा प्रश्न उत्पन्न होतो; पण त्याचें कारण असें आहे. कीं, एकदां हिरण्यकशिपु शिकारीसाठीं अरण्यांत गेला असतांना, मागें इंद्र त्याचे घरीं येऊन त्याच्या स्त्रीला बलात्कारानें बरोबर घेऊन अमरावतीस जाऊं लागला, तेव्हां इंद्राला वाटेंत नारद भेटला व त्यानें इंद्राला, तिचा पति घरांत नसतांना गरोदरावस्थेंत तिला घेऊन आलास हें तुला मुळींच शोभत नाहीं; वगैरे शब्दांनीं इंद्राची फार फजिती केली व हिरण्यकश्यपूचे स्त्रीला त्यानें इंद्राजवळून घेऊन तिला तिचे घरीं पोंचतें केलें. त्यावेळीं मार्गांत नारद भगवंताचें भजनपूजन करीत असे; तो संस्कार प्रल्हादास गर्भांत झाल्यामुळें तो मोठा भगवद्भक्त झाला. प्रल्हादानें विष्णूची भक्ति सोडावी म्हणून हिरण्यकशिपूनें फार प्रयत्न केला, त्यानें त्यासाठीं प्रल्हादाला, समुद्रांत बुडविलें, विष पाजलें, व अग्नींतहि लोटलें, पण प्रल्हादानें हरीची भक्ति सोडली नाहीं. त्या भक्तीमुळेंच तो सर्व प्रसंगांतून जिवंत पार पडला. कोणत्याच प्रयत्नास यश येत नाहीं असें पाहून एके दिवशीं हिरण्यकशिपु प्रल्हादाला म्हणाला, "ज्या हरीची तूं एवढी भक्ति करितोस तो तुझा हरी कोठें आहे तें मला दाखीव." प्रल्हाद म्हणाला, "तो परमेश्वर सर्वत्र आहे. तो नाहीं असें या जगांत कांहींही नाहीं." हें ऐकून हिरण्यकशिपु अत्यंत रागावून परमेश्वर ह्या स्तंभांत आहे काय, असें प्रल्हादाला विचारूं लागला. प्रल्हाद म्हणाला, होय. या स्तंभांत देखील परमेश्वर आहे. असें म्हणाल्यावर हिरण्यकशिपूला अधिकच राग येऊन त्यानें जोरानें खांबावर बुकी मारिली, त्याबरोबर मोठी गर्जना करून भगवान् नारसिंह स्वरूपानें प्रगट झाला, आणि त्यानें हिरण्यकश्यपूचा वध करून प्रल्हादाला राज्यावर बसविलें. प्रल्हाद राज्य करीत होता तोंपर्यंत त्याच्या प्रजेला व्याधीव्यथा, दारिद्य, वगैरे कोणत्याही

प्रकारचें दुःख माहित नव्हतें. सर्व प्रजा धन, धान्य, पुत्र वगैरे संपत्तीनीं युक्त असून हरिभक्तींत काळ घालविणारी होती. याप्रमाणें प्रल्हादानें आपल्या प्रजेचें पुत्रवत् अनंत वर्षें पालन केल्यावर त्यानें आपल्या विरोचन पुत्राच्या स्वाधीन सर्व राज्यकारभार करून वानप्रस्थाश्रम ग्रहण केला. विरोचन सूर्यभक्त असून त्यानें आपल्या भक्तिबळानें सूर्यास प्रसन्न करून अभेद्य कवच मिळविलें होतें. सूर्यानें प्रसन्न होऊन विरोचनाला आपल्या मस्तकावरचा मुकुट दिला. तो मुकुट मस्तकावर असला, म्हणजे कोणापासूनहि भीति व्हावयाची नाहीं असा त्या मुकुटाचा प्रभाव होता. विरोचनास तो मुकुट मिळाल्यावर त्याला साहजिक अभिमान झाला व त्यानें सर्व भूमंडळास आपल्या पराक्रमानें त्राही भगवान् करून सोडिलें. तेव्हां विरोचनाचें पारिपत्य कसें करावयाचें हा सर्वांना विचार पडला. पण कोणालाच योग्य असा उपाय सुचेना. मग भगवान् विष्णु मोहिनीरूप धारण करून पृथ्वीवर आला, व एका सुंदर उपवनांत राहिला.

विरोचन राजा एके दिवशीं अरण्यांत शिकारीस गेला असतां अत्यंत तृषाक्रांत झाला व पाण्याचा शोध करूं लागला, पाणी शोधतां शोधतां तो राजा मोहिनी ज्या उपवनांत येऊन राहिली होती, त्याच उपवनांत येऊन एका सुंदर सरोवरावर आला, व तें थंड पाणी पिऊन शांत झाला. नंतर राजा त्या उपवनांत इकडे तिकडे हिंडत असतांना त्याच्या दृष्टीस मोहिनी पडली. तिला पाहिल्याबरोबर राजा कामातुर झाला. देवाचें तें मोहिनीरूप पाहून महादेव-देखील देहभान विसरून गेला होता; मग विरोचनाची अवस्था मोहिनीला पाहून वेड्यासारखी झाली यांत आश्चर्य तें काय? मासा ज्याप्रमाणें आमिषाला पाहून फसतो, किंवा पतंग दिव्यावर उडी घालून आपलें शरीर जाळून घेतो, त्याप्रमाणें विरोचन त्या वेळीं मोहिनीसाठीं प्रयत्न करूं लागला. समुद्र-मंथनाचे वेळीं भगवानानें असेंच मोहिनीरूप धारण करून अमृत देवांना दिलें व सुरा असुरांना दिली. तेंच मनोहर मोहिनीरूप भगवंतानें या वेळीं विरोच-नाचे नाशासाठीं धारण केलें होतें."

## अध्याय ५ वा.

### १ समुद्रमंथन व राहूची कथा.

जनमेजय राजानें वैशंपायन ऋषीला समुद्रमंथनाची कथा सांगावी, म्हणून विनंती केली. तेव्हां वैशंपायन ऋषि, जनमेजयाला ती कथा सांगूं लागला. तो म्हणाला, "राजा! पूर्वी देव आणि दैत्य यांनीं समुद्रमंथन करून रत्नें काढाव-याचा विचार केला. त्याप्रमाणें दोघांनीं मंदराचल पर्वताची रवी केली, व वासुकी

नावाच्या सर्पाचा दोर करून समुद्राचें मंथन करण्यास आरंभ केला. देव हे शेपटीच्या बाजूनें आणि राक्षस मुखाच्या बाजूनें ओढीत होते. त्या घर्षणामुळें वासुकीच्या मुखांतून बाहेर पडलेल्या विषानें भयंकर उष्णता उत्पन्न झाली व त्या उष्णतेचा त्रास सर्वांना होऊं लागला. तेव्हां महादेवानें तें विष प्राशन केलें. पुढें त्या समुद्रमंथनांत लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजातक, सुरा, धन्वंतरी, चंद्रमा, रंभा, ऐरावत, अमृत, विष, उच्चैःश्रवा अश्व, कामधेनु, शंख व हरिधनु, अशीं चवदा रत्नें निघालीं; समुद्रमंथन करितेवेळेस मंदराचल पर्वत खालीं जाऊं लागला, तेव्हां विष्णूंनीं कूर्मरूप धारण करून तो पर्वत वर उचलून धरिला. वरील चवदा रत्नांची देव आणि असुर यांमध्यें वांटणी होत असतां अमृत आणि मदिरा या दोन रत्नांचा वाद सुरू झाला. दोघेही आपला हट्ट सोडीनात. तेव्हां या तंट्याचा निकाल करण्यासाठीं देव आणि दैत्य विष्णू-कडे गेले, व दोघांनीं या वादाचा निकाल करावा म्हणून त्याला विनंती केली; विष्णूनें असें सांगितलें कीं, देवांनीं एका पंक्तीला व दैत्यांनीं एका पंक्ती बसावें. त्यावेळीं एक स्त्री येऊन अमृत व सुरा हीं पंक्तींत वाढील, ज्याला जें मिळेल तें त्यानें त्यावेळीं ग्रहण करावें. विष्णूचा हा विचार दोघांनांही पसंत पडला; व त्यांनीं, लवकरच पंक्तिसमारंभ केला, एका पंक्तीला देव व दुसऱ्या बाजला दैत्य बसले. अशी तयारी झाल्यावर भगवान् विष्णु मोहिनीरूप धारण करून उभयतांना अमृत व सुरा वाढण्यासाठीं आले. तें मोहिनीचें स्वरूप पाहून देव व दैत्य हे दोघेहि मोहित झाले. असुर तर देहभान विसरून जाऊन मोहिनीसाठीं वेडे झाले. अशी असुरांची स्थिति झाल्यावर विष्णूनें अमृत देवांना व सुरा असुरांना दिली. त्यावेळीं राहू कपटानें देवांच्या पंक्तीला बसून अमृत प्याला. हा प्रकार चंद्रानें विष्णूला नेत्रांच्या खुणेनें कळविला. तेव्हां विष्णूस अत्यंत कोप येऊन त्यानें आपलें सुदर्शन चक्र त्याच्या मानेवर मारून शिरच्छेद केला. शिर खालीं पडल्याबरोबर आकाशांत उडून गेलें, आणि धड पश्चिम समुद्राकडे वेगानें पळूं लागलें. तो प्रकार पाहून देव आणि राक्षस दोघेही घाबरले, व धडाचा नाश करण्याचा प्रयत्न करूं लागले. परंतु त्यामुळें तें धड अधिकच उसळून धावूं लागलें. शंकरांनीं आपला त्रिशूळ त्याच्या उदरांत घालून त्याचा नाश करण्याचा प्रयत्न केला; पण त्याच्या उदरांत अमृत असल्यामुळें त्याचा मुळींच नाश होईना. तेव्हां शंकरांनीं म्हाळसा नांवाच्या डोंगरावर त्या राहूच्या कंठनाळांत आंगठा घालून अमृत बाहेर काढलें. तेंच अमृत वहात वहात समुद्राला जाऊन मिळालें. त्या ओघाला प्रवरा नदी असें म्हणतात. ही प्रवरा उत्तर समुद्राला जाऊन मिळणार होती, पण गौतमानें शंकराची विनंती केल्यावरून ती गौतमीला म्हणजे गोदावरीला मिळून पूर्वसमुद्राला गेली. या गौतमी संगमावर राहूचें धड खालीं

घालून वर मोहिनी देवी बसली आहे, तिला म्हाळसा असें म्हणतात. तेव्हां-पासून राहू व चंद्र यांच्यांत वैर उत्पन्न झालें, व जेव्हां जेव्हां संधि मिळते, तेव्हां तेव्हां राहू चंद्राला ग्रासतो. मोहिनीनें सर्व दैत्यांना मद्य वाढल्यावर राहिलेलें मद्य भूमीवर टाकून दिलें. त्या मद्यापासून मधुमती नावाची नदी निर्माण झाली. मद्यापासून निघालेली ती नदी ह्मणून सर्व त्या नदीची दया करीत असत, पुढें महादेवांनीं त्या नदीला तीर्थाची योग्यता आणली. ग्रहणाचे वेळीं त्या नदींत स्नान केल्यानें सर्व पातकांचा नाश होतो.

## २ मोहिनी अवतार.

अमृत व मदिरा यांची अशी वांटणी झाल्यावर कांहीं दिवसांनीं महादेवाची व विष्णूची भेट झाली, अनेक गोष्टी झाल्यावर महादेव विष्णूला ह्मणाले, "भगवन् कमलापते ! कांहीं दिवसांपूर्वीं तूं मोहिनी रूप धारण करून देव आणि दानव यांना अमृत व मदिरा दिलीस; तें तुझें मोहिनीरूप पाहण्याची मला इच्छा झाली आहे." महादेवांची ही इच्छा पुरी करण्याचें नारायणानें कबूल केलें. व त्यानें महादेवाला एका सुंदर उपवनांत येण्यास सांगून आपण अदृश्य झाले. विष्णूनें सांगितल्याप्रमाणें महादेव तत्काल उठले व उपवनांत आले. तें उपवन प्रत्यक्ष वैकुंठाधीशानें निर्माण केलें होतें. तेव्हां त्या उपवनाच्या वनश्रीचें वर्णन करणें अशक्य आहे. त्या उपवनांत सर्व प्रकारचे वृक्ष फलपुष्पांनीं डुलत होते, लता सुवासिक फुलभारांनीं लवल्या होत्या. लहान लहान फुलझाडांच्या फुलांचा सुवास सर्वत्र पसरला होता. ठिकठिकाणीं बसण्यासाठीं, कमलपत्रांचे मंडप घातले होते, त्यांत मयूर नृत्य करीत होते, कोकिला गात होत्या, कारंजीं उडत होतीं, लहान लहान सरोवरें पाण्यानें तुडुंब भरून त्यांत कमळें फुललीं होतीं. अशा त्या सुंदर उपवनांत महादेव हिंडत असतां त्यांची दृष्टी एका सुंदर स्त्रीकडे गेली. ती स्त्री, चेंडू खेळत खेळत व महादेवांवर नेत्रकटाक्ष टाकीत टाकीत महादेवांजवळ आली. तें मोहिनीचें अनुपमेय स्वरूप पाहून महादेवांच्या चित्तवृत्तींत बदल झाला व ते मोहिनीस धरण्याचा प्रयत्न करूं लागले. मोहिनी-रूप धारण केलेल्या विष्णूला महादेव कामातुर झाले आहेत, हें पाहून फार आश्चर्य वाटलें व तो पळत पळत येऊन पार्वतीजवळ आपल्या पूर्व स्वरूपानें उभा राहिला. महादेव तेथें येऊन पाहतात, तों मोहिनी नसून भगवान् विष्णु उभा आहे. मग महादेवानें झालेल्या प्रकाराबद्दल अनुताप दर्शवून विष्णूची क्षमा मागितली.

विष्णूचें तें मोहिनीरूप पाहून महादेव देखील भुलले, मग तें स्वरूप पाहून विरोचन राजाची अवस्था वेड्यासारखी झाली यांत मोठेंसें नवल तें काय ? तो त्या मोहिनीजवळ गेला व तिला तूं कोठें राहतेस, इकडे कां आलीस ? तूं कोणाची स्त्री आहेस ? तुझी जात कोण ? वगैरे प्रश्न विचारूं लागला. तेव्हां मोहिनी ह्मणाली, " राजा ! माझे आईबाप कोण तें मला मुळींच माहित नाहीं,

यामुळें मला माझी जात सांगतां येत नाहीं. तसेंच माझें अद्यापि लग्नहि झालेलें नाहीं." हें त्या स्त्रीचें भाषण ऐकून राजा ह्मणाला, "हे सुंदरी! तूं जर मजबरोबर विवाह करिशील तर मी तुला पट्टराणी करीन व तुझ्या वचनांत वागत जाईन." मग मोहिनीनें राजाजवळून भाष्यदान मागून घेऊन ती राजाबरोबर नगरांत आली; उभयतांचे सहवासांत कांहीं दिवस गेल्यावर मोहिनीला गरोदरावस्था जाणवूं लागली, तेव्हां ती राजाला ह्मणाली, "मला पुत्र व्हावा ह्मणून मीं एक व्रत आरंभिलें आहे. त्या व्रताची सांगता करण्यासाठीं आज आपण अभ्यंगस्नान केलें पाहिजे, आपल्या अंगाला तेल वगैरे लावून मीच आज आपणाला स्नान घालीन." विरोचन राजाला ती गोष्ट खरी वाटली व तिनें सांगितल्याप्रमाणें तो स्नानाला बसला. पण मस्तकावरचा मुकुट काढीना, तेव्हां मोहिनीनें राजाला भाष्यदानाची आठवण देऊन मुकुट काढावयाला लाविलें. विरोचनानें याप्रमाणें मुकुट काढल्यावर, मोहिनीनें राजाच्या मस्तकावर आंगठा ठेऊन त्यावर सर्व त्रिभुवनांचा भार घालून त्याच्या शरीराचा चुरा करून मेदमांसाचा मेदिनीवर पर्वत केला. याप्रमाणें विष्णूंनीं मोहिनीरूप धारण करून विरोचनास मारल्यावर सर्व देवांना मोठा आनंद झाला व मोहिनीजवळ येऊन त्यांनीं विष्णूची फार स्तुति केली. त्यावेळीं नारद देवाला ह्मणाला; "देवा! आपण हल्लीं गरोदरावस्थेंत आहांत याबद्दल मला फार लज्जा वाटते, आतां प्रसूत कालीं तुमचें कसें होईल याची मला मोठी काळजी लागली आहे." हें नारदाचें विनोदाचें बोलणें ऐकून मोहिनीनें आपला डावा पाय झाडला त्याबरोबर डाव्या पायाच्या अंगठ्यांतून पुत्र खालीं पडला, त्याचें नांव बळी असें ठेवून त्याला विरोचनाचे राज्यावर बसविलें व सर्व देव आपआपले स्थानीं गेले.

नारद व विष्णु बळीला राज्यावर बसवून वैकुंठीं जात असतांना वाटेंत नारद एका नदींत स्नानासाठीं गेला; नारदानें पाण्यांत बुडी मारली व वर येऊन प्राणायामासाठीं नाकाला हात लावला, तों हाताला नथ लागली. मग नारद आपल्या सर्व शरीराकडे पाहूं लागला, तों सर्व शरीर पालटून आपण एक तरुण स्त्री झालों आहों असें त्यानें पाहिलें. आपण भगवंतास स्त्रीरूप धारण केल्याबद्दल नांवें ठेविलीं त्याचा हा प्रसाद भगवंतांनीं आपणास दिला, असेंहि त्याच्या लवकरच लक्षांत आलें. तो नदीबाहेर येऊन विष्णूला शोधूं लागला, पण विष्णु त्याला कोठेंही मिळाला नाहीं. पुढें एका यक्षाशीं नारदाचें लग्न झालें. त्या यक्षपासून नारदाला साठ संवत्सर पुत्र झाले. नंतर भगवंतास नारदाची दया आली, व त्यानें पुन्हां त्याला स्त्रीचा पुरुष केला.

### ३ बळीचा पराक्रम.

बळीची उत्पत्ति विष्णूचे अंगुष्ठापासून झालेली असल्यामुळें त्यास विष्णूची अर्धकला असें ह्मटलें आहे; तो बळिराजा मोठा पराक्रमी असून वैष्णव होता,

राज्यावर बसल्यावर त्यानें कित्येक दिवस कडकडीत तप करून महादेवास प्रसन्न करून घेतलें, व त्यांच्याकडून मला यमपुरीचें दर्शन होऊं नये आणि मी रणांत सर्वांना जिंकावें, असा वर मिळविला. पुढें बळीनें दशदिशा जिंकून विपुल संपत्ति मिळविली, व शुक्राचार्यादि मोठमोठे ब्राह्मण बोलावून त्यांच्याकडून विश्वजित् यज्ञ केला. यज्ञसमयीं दशदिशा जिंकून आणलेलें द्रव्य त्यानें ब्राह्मणांना दिलें. ज्यावेळीं यज्ञाची पूर्णाहूति झाली, त्या वेळीं यज्ञकुंडांतून धनुष्य, अक्षय भाते, अभेद्य कवच व सुवासिक कमलमाला यांसहित रथ निघाला. असा तो यज्ञाचा प्रसाद मिळाल्यावर बळीला फार आनंद झाला व त्यानें सर्व ब्राह्मणांना अनेक दानें देऊन संतोषित केलें. तो बळीराजा राज्य करीत असतां त्याच्या प्रजाजनांनां कोणत्याहि प्रकारचीं दुःखें माहित नव्हतीं. सर्व लोक सन्मार्गी असून त्यांनां पापाचा गंधहि नव्हता. सर्व प्रजा राजाला आपल्या पित्याप्रमाणें मानीत असून राजाहि आपल्या प्रजेला पुत्राप्रमाणें वागवीत होता; बळीनें पुष्कळ दिवस राज्य केल्यावर त्याला जरासंध, काळयवन, केशी वगैरे राक्षस, त्याच्या या वैष्णवी बाण्याला नांवें ठेवूं लागले. राक्षसाच्या कुलाला तूं कलंक लावलास असें ते ह्मणूं लागले. तुझ्या वाडवडिलांची विष्णूने अत्यंत विटंबना केली, असें असून तूं त्याची भक्ति करितोस हें अत्यंत निंद्य होय. याप्रमाणें राक्षसांनीं बळीला अनेक गोष्टी सांगितल्यावर बळीला तें ह्मणणें खरें वाटलें व त्यानें तेव्हांपासून देवांशीं विरोध धरला. बळीनें देवांशीं युद्ध करून त्यांनां जिंकण्याचा विचार केला, व तो सेना गोळा करूं लागला. त्यानें सर्वत्र आपले दूत पाठवून देशोदेशींचे दैत्यवीर आणिले. प्रल्हाद, ककुंद, कुंभक, अनाहद, चतुर्मुख, मेघनाद, रिठासुर, सहस्रबाहु, सुनाभ, सहस्रजेठी, निकुंभ, काळयवन, जरासंध, वज्रबाहु, गजोदर, कुंभकर्ण, शिरोध्वज, शतलोचन, मैनक, बाण, मकरासुर, सुसर्प, विरूपाक्ष, यक्षभी, सुमुख, बाळक, कांचनाक्ष, धनंजय, शंबरासुर, हयग्रीव, पुलोमा, असिलोमा, चंद्रभास्कर, वृत्रासुर, एकचक्र, वगैरे असंख्य रणकुशल दैत्य बळीनें आणिले. हें वर्तमान इंद्राला कळल्यावर, त्यानें सर्व देवांनां विनंति करून त्यांनां बळीबरोबर युद्ध करण्यासाठीं बोलाविलें. विश्वदेव, समुद्र, यक्ष, किन्नर, अकरा रुद्र, मृत्यु, गंधर्व, राजर्षि, कुबेर, वरुण, पर्वत, सिद्ध, चारण, अवधूत, विद्याधर, अष्टदिशांचे दिक्पाळ, अष्टवसु, महाबळ, वगैरे अनेक देववीर आपलें सैन्य घेऊन, इंद्राला साह्य करण्यासाठीं आले. दोहोंकडची तयारी झाल्यावर भयंकर लढाई झाली, दोहोंकडच्या सैन्याचा नाश होऊन मुख्य मुख्य वीर तेवढेच युद्ध करण्यासाठीं राहिले. यमाला प्रल्हादानें, चंद्राला चंद्रभास्कर राक्षसानें, मारुताला हयग्रीवानें, वायूला पुलोमानें, अश्विनीदेवाला वृत्रासुरानें, कुबेराला अनुर राक्षसानें, वरुणाला विप्रचित्तीनें, प्रवीराला नमुचीनें, गुरूला केशी राक्षसानें, रंगभीरूला बाणानें, विश्वक-

र्यांला भीतकरानें, पळविलें. दैत्यांपुढें कोणाचाच निभाव लागेना, तेव्हां राहिलेले सर्व देव इंद्राला आमचें रक्षण कर असें ह्मणूं लागले. तेव्हां इंद्र सर्व देवांनां आपल्या मागें घालून बळीबरोबर युद्ध करण्यासाठीं रणावर आला. इतक्यांत आकाशवाणी झाली कीं, "हे इंद्रा ! या बळीबरोबर तूं युद्ध करूं नकोस; तुला जय मिळणार नाहीं." आकाशवाणी ऐकून सर्व देव विस्मित झाले. गुरूनींहि आकाश वाणीप्रमाणेंच सर्वांना उपदेश केला, तेव्हां सर्व देव अमरावती सोडून देऊन जीवाच्या भीतीनें पळाले व कश्यपअदितीजवळ येऊन त्यांच्या आश्रयाला राहिले.

देवांनीं कश्यपाला सर्व हकीकत सांगितल्यावर कश्यप इंद्राला ह्मणाला; "इंद्रा तूं आतां ब्रह्मदेवाकडे जाऊन त्याला विचार, ह्मणजे तो तुला योग्य सल्ला देईल." कश्यपानें असें सांगितल्यावर इंद्रादि सर्व देव ब्रह्मदेवाकडे गेले, व ब्रह्मदेवास सर्व हकीकत सांगून पुढें कसें करावें, ह्मणून विचारूं लागले. तेव्हां ब्रह्मदेव ह्मणाला, "इंद्रा ! बळीचें पारिपत्य करण्यास भगवान् शेषशाई नारायणावांचून कोणीहि समर्थ नाहीं, तर तुह्मीं त्याचेकडे जाऊन भगवंताची स्तुति करा, ह्मणजे भगवान् प्रसन्न होऊन तुमचें कार्य करील." ब्रह्मदेवानें असें सांगितल्यावर इंद्र, कश्यप व अदिती यांनां बरोबर घेऊन क्षीरसागरीं गेला.

---

## अध्याय ६ वा.

### १ वामनाची कथा.

बळीनें इंद्राला घालवून त्याचें राज्य तो आनंदानें करूं लागला. त्यानें अमरावतीचें उत्तम पालन केलें. अमरावतीच्या लोकांनांहि बळीच्या राज्यपद्धतीनें मोठें सुख झालें. लोकांनीं धर्ममार्गानें राहून निरंतर ईश्वर भजनांत असावें ह्मणून बळी फार मेहनत घेत असे. राजाची ती इच्छा पाहून लोकहि धर्मरत झाले. घरोघरीं तुळशीचीं वृंदावनें झालीं, जिकडे तिकडे सडासंमार्जन होऊं लागलें, आणि ईश्वराच्या नावाचा गजर होऊं लागला. यक्ष, किन्नर, गंधर्व, अप्सरा वगैरे सर्व बळीवर प्रसन्न असत. याप्रमाणें बळी अमरावतीचें राज्य करित असतां अमरावतीचा लाभ अक्षय्य व्हावा अशी त्यास इच्छा उत्पन्न झाली, व त्यासाठीं कोणता प्रयत्न करावा हें त्यानें आपला गुरु शुक्राचार्य यास विचारलें. शुक्राचार्य ह्मणाला, "राजा ! शंभर याग केले असतांना अमरावतीची अक्षय्य प्राप्ति होऊन इंद्र निःसत्व होतो." हें ऐकून राजाला शंभर यज्ञ करण्याची इच्छा झाली; त्यानें शुक्राचार्याला यागाची तयारी करण्यास सांगितलें. शुक्राचार्यानें नर्मदेचे कांठीं यज्ञासाठीं सुंदर

भूमि तयार केली, व देशोदेशींचे विद्वान्, सत्पात्र व पवित्र ब्राह्मण बोलावून सुमुहूर्तावर बळी राजाचे हातानें शंभर यागांनां आरंभ केला. त्या यागांची समाप्ति सहस्र वर्षांनीं होणार होती. इकडे इंद्र, कश्यप व अदिती क्षीरसागरीं येऊन भगवंताच्या दर्शनासाठीं तप करीत होते, सहस्र वर्षें तप केल्यावर कश्यपानें अदितीला पयोव्रत करण्यास सांगितलें, व दररोज चार लक्ष जप महामंत्राचा करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें अदितीनें तेरा दिवस व्रत केल्यावर कश्यपानें त्या व्रताची योग्यप्रकारें सांगता करून ब्राह्मणांना बोलाविलें व त्यांना भोजनदक्षणा वगैरे देऊन प्रसन्न केलें.

त्या तिघांच्या तपानें व अदितीच्या व्रतामुळें भगवान् विष्णु प्रसन्न होऊन प्रत्यक्ष येऊन उभे राहिले. शंख, चक्र, गदा व पद्म धारण केलेल्या विष्णूला पाहून तिघांनींहि त्याला वंदन केलें. कश्यप हात जोडून विष्णूला ह्मणाला;– "हे नारायणा ! तुझ्यावांचून बळीचा नाश करणारा कोणीहि समर्थ दिसत नाहीं. या संकटाचें तूं आतां लवकर निवारण कर." इंद्र, देवास हात जोडून ह्मणाला, "हे विश्वव्यापक भगवंता, बळी माझी अमरावती घेऊन तो इंद्रपदाचा उपभोग घेत आहे; तें इंद्रपद आपणाकडे अक्षय्य रहावें ह्मणून आतां शंभर यज्ञ करीत आहे; तर हे देवाधिदेवा ! यावेळीं माझ्या लज्जेचें संरक्षण करण्यास तुझ्यावांचून कोणीहि समर्थ नाहीं." हें ऐकून तो गदाधर ह्मणाला, मी लवकरच अदितीचे पोटीं जन्म घेऊन बळीचें हनन करीन. तुह्मीं त्यासंबंधानें कांहींहि काळजी करूं नका. असें सांगून भगवंतानें इंद्र, कश्यप व अदिती यांनां मार्गस्थ केलें.

## २ गदासुराची कथा.

जनमेजय ह्मणाला, "ऋषि ! भगवंतास गदाधर असें कां ह्मणतात, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे, तर ती हकीगत मला सांगावी." वैशंपायन ऋषि राजाला ह्मणाला, "राजा ! पूर्वी लवणासुर या नांवाचा महा पराक्रमी असुर होता, त्याचा श्रीहरीनें नाश केला. त्याचा गद नांवाचा एक पुत्र होता. हा गद गर्भावस्थेंत असतांनाच लवणासुराचा नाश झालेला असल्यामुळें त्याला आपल्या बापाची कांहींच माहिती नव्हती. तेव्हां त्यानें एके दिवशीं आईला बापाची माहिती विचारली; आई ह्मणाली; "गदा ! तूं गर्भावस्थेंत असतांनाच क्षीरसागरीं राहणाऱ्या नारायणानें तुझ्या बापाला मारलें." हे आईच्या तोंडचे शब्द ऐकून गदराक्षसाला फार राग आला. तो ह्मणाला, "ज्या गोविंदानें माझ्या बापाचा नाश केला, त्या गोविंदाचा मीही नाश करीन." असें ह्मणून तो आपल्या आईची आज्ञा घेऊन घराच्या बाहेर पडला व एका घोर अरण्यांत जाऊन त्यानें शंकराच्या प्राप्तीसाठीं हजार वर्षें धूम्रपान करून एकनिष्ठपणें महारुद्राची सेवा केली, तेव्हां शंकर त्यास प्रसन्न झाले व इच्छित वर माग ह्मणाले. महादेव प्रसन्न झाल्यावर तो ह्मणाला, "हे महादेवा !

ज्यानें माझ्या पित्याचा प्राण घेतला त्याला मी जिंकावें, व त्रिभुवनाएवढें मोठें शस्त्र जो हातांत धारण करील त्या वांचून सर्व माझे अंकित व्हावेत असा मला वर दे." महादेव त्यावेळीं प्रसन्न असल्यामुळें तथास्तु म्हणाले. अशा रीतीनें गदासुरानें महादेवाचा वर मिळविल्यावर त्याला आपण अजिंक्य झालों असें वाटलें, व तो विष्णूचा सूड उगविण्यासाठीं त्याचा शोध करूं लागला. तेव्हां गयेस, गदासुर व विष्णू यांची गांठ पडली, भगवंतास पाहतांच गदासुराचा कोप अनावर झाला व तो विष्णूला आपल्या हातांतील त्रिशूळानें प्रहार करूं लागला. त्या आघातामुळें पृथ्वी डळमळूं लागली. सर्व लोक भयभीत झाले, परंतु भगवंतास त्याबद्दल कांहींच वाईट वाटलें नाहीं. पर्वतावर फुलें पडावींत त्याप्रमाणें त्यानें ते त्रिशूळाचे घाव लीलेनें सहन केले. गदासुराचें ताडण सहन करून मग प्रभूनें सुदर्शन चक्र काढलें व तें गदासुराचे आंगावर टाकण्याची तयारी केली; तों आकाशवाणी झाली कीं, "हे अनंता! या गदासुरावर चक्र सोडूं नकोस, त्याचा उपयोग होणार नाहीं; याच्या घाताला त्रिभुवना एवढें शस्त्र पाहिजे." ती आकाशवाणी ऐकून भगवंतांनीं सुदर्शनचक्र परत घेतलें, व आपला प्रवेश गदेंत करून ती त्रिभुवनाएवढी मोठी केली, आणि त्या गदेनें गदासुराचा नाश केला. तेव्हांपासून त्या भक्तवत्सल प्रभूला गदाधर असेंहि ह्मणतात."

## ३ वामनभिक्षा.

प्रभूनें ज्या वेळीं अदितीला मी तुझ्या उदरीं जन्म घेऊन बळीचा नाश करीन असें अभिवचन दिलें होतें, त्याच वेळीं भगवंतांनीं अदितीच्या उदरीं प्रवेश केला. तेथें गर्भावस्थेंत विष्णु बळीच्या यागाची समाप्ति होईपर्यंत ह्मणजे सहस्र वर्षे होते. नंतर भाद्रपद शुद्ध द्वादशीचे दिवशीं प्रभूंनीं जन्म घेतला. त्या मंगलमय प्रसंगीं स्वर्गांत देवांनीं जयजयकार करून, प्रभूच्या बालमूर्तीवर पुष्पवृष्टि केली. दुंदुभी वाजूं लागल्या. स्वर्गांगना नृत्य करूं लागल्या. उमासावित्रींनीं आरती ओंवाळली, व ब्राह्मणांनीं वेदघोष केला. याप्रमाणें सर्वत्र आनंदीआनंद होऊन गेला. कश्यप अदितीकडे लहान मुलास पहावयास आला, तों प्रभूंनीं त्याची भ्रांति नाहींशी व्हावी ह्मणून शंख, चक्र, गदा, पद्मधारी अशी चतुर्भुज मूर्ति त्यास दाखविली, व प्रभु पुन्हा बालरूप झाले. आपल्या पोटीं प्रत्यक्ष प्रभूंनीं जन्म घेतला, याबद्दल कश्यप व अदिती यांना जो आनंद झाला त्याचें वर्णन करणें कठीण होय. कश्यपानें त्याचें नाव वामन असें ठेविलें. प्रभु स्वयंज्योति, स्वयंप्रकाश, स्वत:श्री व ज्ञानी होते. त्यांना शिकविण्याची वगैरे आवश्यकता नव्हती, त्यांच्या सर्व विद्या, वेद वगैरे नेहमींच पूर्ण आहेत. प्रभूला सातवें वर्ष लागल्यावर कश्यपानें अनेक ऋषींना बोलावून वामनाचें मौंजीबंधन केलें. त्या वेळीं ब्रह्मदेवानें वामनाला कमंडलु,

कश्यपानें मेखला, उमासावित्रींनीं भिक्षेचे वेळीं लाडू, पृथ्वीनें आसन, ऋषींनीं तृणासन, चंद्रानें दंड, कुबेरानें पात्र, इंद्रानें छत्र आणि बृहस्पतीनें यज्ञोपवीत दिलें. याप्रमाणें मौंजीबंधन समारंभ झाला, व देव आपापले स्थानीं गेले. आणि ऋषीजन बळीच्या शंभराव्या यागाची समाप्ति असल्यामुळें तिकडे जाण्यास निघाले. बरोबर कश्यपहि होता; सर्व ऋषि निघाल्यावर, मलाहि बरोबर घेऊन चला असें वामन ह्मणाला. तेव्हां कश्यपानें वामनासहि बरोबर घेतलें.

बळीच्या यज्ञमंडपांत सर्व ऋषीजन आल्यावर बळीनें सर्वांचा सत्कार करून सर्वांना बसण्यासाठीं आसनें दिलीं. सर्व ऋषी राजाला पाहिल्याबरोबर मंत्रघोष करूं लागले; त्यांत वामनाचें मनोहर मंत्रोच्चारण पाहून बळी अगदीं मुग्ध होऊन गेला. तो आपले गुरु शुक्राचार्यांना कौतुकानें ह्मणाला, "शुक्राचार्य ! आजपर्यंत आपणाकडे पुष्कळ ब्राह्मण आले, परंतु यासारखा विद्वान् मीं पाहिला नाहीं. तिन्ही सवनांचा शांतिपाठ हा फारच चांगल्या रीतीनें ह्मणाला. हा सकल वेद वगैरे विद्येंत पारंगत असून वयानें किती लहान आहे! याचें नुकतेंच मौंजीबंधन झालें असून याचें वय अवघें सात वर्षांचें आहे. असा ब्राह्मणाचा विद्वान् मुलगा शंभराव्या याग समाप्तीचे वेळीं आला हें आपलें महत्-भाग्य ह्मणावयाचें! याप्रमाणें बळीनें शुक्राचार्यांजवळ वामनाची स्तुति करून त्यास आपणाजवळ बोलावून घेतलें व त्याला शंभर यागांविषयीं राजा सांगूं लागला. तेव्हां वामन बळीला ह्मणाला, "राजा ! हे शंभर यज्ञ तूं केलेस खरे, पण ज्या पद्धतीनें करावयाला पाहिजे होते तसे मुळींच झाले नाहींत; तुझ्याजवळ कोणी विद्वान् ब्राह्मण नसल्यामुळें अशी चूक झाली असें मला वाटतें. या तुझ्या शुक्राचार्य गुरूनें तिन्हीं अग्नींची स्थापना उलटी केली आहे. हें अत्यंत अनुचित असून त्याचें फळ राजाला पीडादायक असें आहे. तसेंच ग्रहांची पूजाहि उलटीच झालेली आहे, त्यामुळें मंत्रभ्रष्टतेचा दोष राजाला लागला आहे. अशा अनेक कारणांनीं हे याग योग्य असे झाले नाहींत." याप्रमाणें बळीला वामनानें शुक्राचार्य जवळ असतांना अनेक श्रुति वगैरेवरून स्पष्ट करून दाखविलें. वामनाची ती विद्वत्ता पाहून बळीला फार आश्चर्य वाटलें. मग तो वामनाला ह्मणाला, "हे बटू ! आपण कोठें राहतां, आपले आईबाप कोण, आपण हा एवढा सकल शास्त्रांचा अभ्यास इतक्या लहानपणीं कोठें केला, तें मला कृपा करून सांगावें." हा बळीचा प्रश्न ऐकून वामनाला हंसूं आलें. वामन ह्मणाला, "बळी! माझा वास कोणत्याहि एका स्थळीं असा नाहीं; यामुळें मी अमुक ठिकाणचा राहणारा आहें असें मला सांगतां येत नाहीं. तसेंच आईबाप कोण तेंहि मला कांहीं आठवत नाहीं, मग त्यांचीं नांवें तरी मला कोठलीं माहित ! विद्याभ्यास असाच स्वतः ऐकून ऐकून केला. जात कोण, कुळ कोण, तेंहि मला माहित नाहीं. मी आपला असा भटकणारा परदेशी असून एकटा आहें. तूं महादानशील

राजा असून तूं शंभर याग करीत आहेस असें ऐकून या ब्राह्मणांबरोबर तुझ्याकडे आलों आहें.'' वामनाचें तें भाषण ऐकून बळीला अत्यंत संतोष झाला. बळी राजा वामनाला ह्मणाला, ''वामना! तूं माझ्या या यागसमयीं याचनेसाठीं आलास याबद्दल मला फार आनंद वाटतो; तुझी जी इच्छा असेल ती मला सांग. मी तें देण्यास तयार आहें.'' याप्रमाणें बळीला प्रसन्न केल्यावर वामन ह्मणाला, ''बळी! मला तीन पावलें जागा द्याल तर फार उपकार होतील. त्या जागेवर आश्रम बांधून स्नानसंध्या करीत राहीन. तर कृपा करून तेवढी तीन पावलें भूमि द्यावी. हें वामनाचें मागणें ऐकून बळीला हंसूं आलें, व तो ह्मणाला, ''बटो! हें आपण अगदींच थोडें मागितलें. कांहीं देश, दुर्ग, रत्नें, सोनें वगैरे मागावें अशी माझी इच्छा आहे. आपणासारख्या विद्वान् ब्राह्मणाला अवघी तीन पावलें भूमि देणें यांत माझी दानशीलता मुळींच दिसून येणार नाहीं. तर कांहीं अन्य माझ्या कीर्तीला शोभेल असें माग.'' वामन ह्मणाला, ''बळी! आह्मां ब्राह्मणांनां देश आणि पैसा घेऊन काय करावयाचें आहे? ही संपत्ति बोलून चालून चंचल आहे, ती कोणाजवळ एकसारखी रहात नाहीं आणि असते तेव्हां मनुष्यास सन्मार्गापासून भ्रष्ट करते; तेव्हां ती लक्ष्मी घेऊन आह्मांस काय करावयाचें आहे? वेणु, पृथु, पुरूरवा, रुक्मांगद, यांच्यासारख्या मोटमोठ्या राजांनीं देखील राज्यलक्ष्मी सोडून देऊन ईश्वरसेवेंत काळ घालविला आहे, मग आह्मांसारख्या ब्राह्मणांना ही राज्यलक्ष्मी घेऊन काय करावयाचें आहे? मला एक तीन पावलें भूमि दे, ह्मणजे तेवढ्यानें माझा कार्यभाग होऊन मला संतोष होईल.''

बळी राजाजवळ वामन याप्रमाणें तीन पावलें भूमीची याचना करीत असतां शुक्राचार्यानें सर्व प्रकार अंतर दृष्टीनें जाणला, मग तो राजाला एका बाजूला बोलावून ह्मणाला, ''राजा! हा बटू कपटवेषधारी विष्णु आहे, वामन अवतार धारण करून तो तुझा नाश करण्यासाठीं आला आहे; तर तो मागतो त्याप्रमाणें त्याला तीन पावलें भूमि देऊं नकोस. अरे! या विष्णूनें वराह अवतार घेऊन हिराण्याक्षाचा व नृसिंह अवतार घेऊन हिरण्यकशिपूचा नाश केला आहे, आणि आतां वामन अवतार धारण करून तुझा नाश करण्यासाठीं आला आहे.'' आपलें भाषण ऐकून बळी राजा त्याप्रमाणें वागेल असा शुक्राचार्याला भरंवसा होता; पण शुक्राचार्याचें तें भाषण ऐकून बळीला मोठा आनंद होऊन तो ह्मणाला; ''गुरु! जर प्रत्यक्ष भगवान् माझा नाश करण्यासाठीं आले असतील तर मी खरोखरच मोठा भाग्यवान् आहें असें ह्मटलें पाहिजे. अहो मोठमोठे तापसी ज्याच्यासाठीं हजारों वर्षें तपश्चर्या करितात, तरी ज्याचें नखहि त्यांच्या दृष्टीस पडत नाहीं, तो जगजेठी प्रत्यक्ष आला आहे, याहून आणखी काय पाहिजे? तो जें इच्छील, तें मी त्याला देईन, असें मी त्याला वचन दिलें आहे. त्या वचनापासून मी कधींहि ढळावयाचा नाहीं. एकवेळ समुद्र मर्यादा

सोडील, शेष आपल्या मस्तकावरील पृथ्वी टाकील, पण मी आपलें वचन कधींहि परत घेणार नाहीं; मी कांहीं त्या नृगराजा* इतका मूर्ख नाहीं. त्यानें दिलेलें दान परत घेतलें होतें ह्मणून तो सहस्र वर्षे शापामुळें सरडा झाला होता. तशी चूक माझ्या हातून कधींहि होणार नाहीं."

## ४ नृगराजाची कथा.

" नृगराजाची गोष्ट निघाल्यावर ती ऐकण्याची जनमेजय राजाला इच्छा झाली. ह्मणून वैशंपायन ऋषि त्यास नृगराजाची कथा सांगूं लागले. "सूर्यवंशांतील, इक्ष्वाकु राजाचा पुत्र नृगराजा होय. तो अत्यंत उदार असून दानधर्म करण्यांत त्याची फार प्रसिद्धि झाली होती. त्या राजानें हत्ती, घोडे, वसुंधरा वगैरे सर्व प्रकारचीं दानें दिल्यावर एकदां त्यानें सर्व ब्राह्मणांनां गाई दान देण्याचें योजिलें. त्यानें देशोदेशींचे ब्राह्मण बोलावून त्यांना सालंकृत अशा असंख्य गाई दिल्या. त्यावेळीं त्या राजानें किती गाई दान दिल्या, याबद्दल मुळींच मोजमाप राहिलें नाहीं. त्यांत एक कपिला गाय, एका ब्राह्मणाला मिळाली होती, पण ती गाय ओढाळ असल्यामुळें त्या ब्राह्मणाचे घरून पळून राजाचे घरीं येऊन राहिली, राजाला त्या गाईसंबंधानें कांहींच माहिती नसल्यामुळें त्यानें ती गाय बांधून ठेविली, पुढें कांहीं दिवसांनीं त्या राजानें पुन्हां ब्राह्मणांनां बोलावून सालंकृत गाई दान दिल्या. त्यावेळीं ती पळून आलेली गाय दुसरे एका ब्राह्मणाला मिळाली, ती तो घेऊन जात असतां ती पूर्वी ज्या ब्राह्मणाला दान मिळाली होती, त्याचे दृष्टीस पडली. तेव्हां त्या उभयतां ब्राह्मणामध्यें त्या गाईसंबंधानें वाद सुरू झाला, मग दोघेहि ब्राह्मण ती गाय घेऊन राजाकडे वादाचा निकाल करण्यासाठीं आले. परंतु राजाला त्या वादाचा निकाल करितां येईना. राजानें दोघांहि ब्राह्मणांनां आणखी पाहिजे तर शंभर गाई देतों, पण वाद करूं नका ह्मणून सांगीतलें, पण ते दोघेहि ब्राह्मण आपला हट्ट सोडिनात, शेवटीं पहिले ब्राह्मणानें राजाला शाप दिला कीं, तूं सरडा होऊन सहस्र वर्षे विहिरींत राहशील तुला ज्यावेळीं श्रीकृष्णाचा स्पर्श होईल त्यावेळीं त्यांतून तुझा उद्धार होईल. याप्रमाणें ब्राह्मणानें शाप दिल्यावर त्या राजाचा कांहीं दिवसानीं अंत झाला. तेव्हां यम त्याला ह्मणाला; " राजा ! अगोदर पाप भोगतोस कीं पुण्य भोगतोस तें मला सांग, ह्मणजे त्याप्रमाणें मी व्यवस्था करतों. " राजा ह्मणाला " अगोदर दुःख भोगूं. आणि मग सुखाचा लाभ घेऊं, " असें सांगितल्यावर यमानें त्या राजाला सरडा केला, व त्याला विहिरींत टाकून दिलें. त्या विहिरींत तो सरडा सहस्र वर्षे होता, पुढें द्वापारीं श्रीकृष्णाचीं मदनभानु वगैरे मुलें त्या विहिरीचे

---

* बळी वामन अवताराचे वेळीं पुढें होणाऱ्या कृष्ण अवतारांतली गोष्ट सांगत आहे हें जरा चमत्कारिक दिसतें; अशा प्रकारचे कालदोष या ग्रंथांत बरेच आहेत.

कांठीं खेळत असतां त्यांची नजर त्या सरड्याकडे गेली, मग त्या मुलांनीं सरड्याच्या कमरेला दोरी बांधली व त्याला वर ओढूं लागले; पण तो सरडा मुळीं एक बोटभर देखील हालेना. हा चमत्कार पाहून मुलांना फार आश्चर्य वाटलें, व त्यांनीं तो प्रकार श्रीकृष्णाला सांगितला; तेव्हां श्रीकृष्ण त्या विहिरी-जवळ आला व त्यानें आंत पाहिलें तों तो सरडा नसून नृगराजा शापामुळें सरडा होऊन पडला आहे असें त्याच्या लक्षांत आलें. मग श्रीकृष्णानें त्याला बाहेर काढून त्याचा उद्धार केला. "

बळी, शुक्राचार्याला ह्मणाला; " गुरू ! मीं वामनाला तीन पावलें भूमि देतों ह्मणून वचन दिलें आहे, तेव्हां आतां मला आपला शब्द कधींहि परत घेतां येणार नाहीं. वचनभंग करणाऱ्या पुरुषाचे दहा पुरुष मागील व दहा पुरुष पुढील नरकांत जातात, तेव्हां त्या पातकाचा मी कधींहि अधिकारी होणार नाहीं. " बळी आपलें ऐकत नाहीं, असें पाहून शुक्राचार्याला फार राग आला व त्यानें बळीला तूं श्रीहीन होशील असा शाप दिला.

---

# अध्याय ७ वा.

## १ तीन पावलें भूमि.

शुक्राचार्य इतका क्रुद्ध होऊन त्यानें बळीला शाप दिला, तरी बळीनें आपला निश्चय ढळविला नाहीं; त्यानें वामनास आसनावर बसवून आपण आपल्या दोन्ही स्त्रियांसह त्याच्या समोर बसला व वामनाची त्यानें विधियुक्त षोडशोपचारें यथासांग पूजा केली; वस्त्रें वगैरे देऊन त्याचें तीर्थ मस्तकावर घेऊन वंदन केलें आणि नंतर तीन पावलें भूमीचा संकल्प केला. वामनाचे हातावर संकल्पाचें उदक पडल्याबरोबर त्यानें आपला बटु वेष टाकून दिला व विराट आदिपुरुषाचें रूप धारण केलें. त्या विराट पुरुषाचें वर्णन करणेंहि कठिण होय. पाय पाताळांत असून मस्तक एकवीस स्वर्गमंडळें व्यापून वर गेलें होतें. वक्षस्थळावर सूर्य चमकत होता, कंठप्रदेशीं तारका माळेप्रमाणें शोभत होत्या, त्याच्या बाहूंनीं सर्व दिग्मंडळें व्यापलीं गेलीं होतीं, असें तें विराट स्वरूप पाहून सर्व भयभीत झाले. परंतु बळीला तें रूप पाहून मोठा हर्ष झाला; प्रभूनें आपणास आज दर्शन दिलें याबद्दल त्याला फार धन्यता वाटली, प्रभूच्या आजच्या कृपेमुळें माझ्या मागच्या व पुढच्या कित्येक पिढ्यांचा उद्धार होईल असा त्याला भर-वसा उत्पन्न झाला. नंतर विष्णूनें आपल्या एका विराट चरणानें संपूर्ण भूमंडळ व्याप्त केलें, दुसरा चरण स्वर्गांत ठेवला, तेव्हां तिसरा चरण ठेवण्यास जागा नाहीं असें पाहून भगवान् बळीला ह्मणाला; "बळी ! दोन चरणानेंच तुझी सर्व

भूमि मीं व्यापिली, तेव्हां तिसरा चरण कोठें ठेवूं तें सांग." भगवंताचें हें बोलणें ऐकून बळीला मोठा विचार पडला कीं, आतां तिसऱ्या चरणाला भूमि कोठून द्यावी, शेवटीं कोठेंहि भूमि नाहीं असें पाहून बळी देवाला ह्मणाला; "देवा ! माझी स्वतःची अशी सर्व भूमि तुझ्या दोन पावलांतच गेली; आतां माझें स्वतःचें असें मजजवळ फक्त शरीर आहे; तर तिसरा चरण माझ्या मस्तकावर ठेऊन मला ब्रह्मऋणांतून मुक्त करावें." असें ह्मणून बळीनें स्नान केलें व मस्तकावर विष्णुस्वरूप असें तुलसीपत्र ठेवून विराट पुरुष भगवंताचे चरणावर मस्तक ठेविलें. त्यावेळीं, त्याच्याजवळ विंध्यावळी व जलपद्मिणी अशा त्याच्या दोन्ही स्त्रियाहि होत्या; त्यांनींहि भगवंताचें दर्शन घेतलें. मग वामनानें आपला पाय बळीच्या मस्तकावर ठेवला. अनंत वर्षे तप करणाऱ्या तापसांनादेखील ज्या प्रभूच्या चरणाचा स्पर्श होत नाहीं, ते प्रभूचे चरण बळीच्या मस्तकाला लागल्यावर बळीला स्वतःविषयीं मोठी धन्यता वाटूं लागली. त्या विराट पुरुषाचे भयंकर चरण बळीला फुलाप्रमाणें वाटूं लागले.

## २ दधीचि ऋषि व देवांचीं शस्त्रें.

बळीला भगवान् आपल्या पायानें भूमींत दडपीत आहे, असें पाहून बळीच्या सैन्याला अनावर कोप आला व ते इंद्रावर धांवून आले, पण बळीनें त्यांना तसें करण्याविषयीं निषेध केला. बळी आपल्या सैन्याला ह्मणाला; "सैनिक हो ! असें करण्याचें आतां कांहीं प्रयोजन नाहीं; मी वचनबद्ध झालों आहें तेव्हां मला माझा शब्द पुरा केला पाहिजे. दधीचि ऋषीनें देवांच्या शस्त्रासाठीं आपल्या शरीरांतल्या अस्थि दिल्या, पण शब्द मागें घेतला नाहीं, त्याप्रमाणें मीहि आपल्या दानव्रतापासून कधीं ढळावयाचा नाहीं; तर यासाठीं तुह्मीं आतां कोणासहि प्रतिबंध न करितां जें होत आहे त्याबद्दल समाधानच माना."

देवांनां दधीचि ऋषीनें आपल्या अस्थि दिल्या हें ऐकून, जनमेजय राजाला ती कथा ऐकण्याची इच्छा झाली; तेव्हां वैशंपायन ऋषि राजाला ती कथा सांगूं लागला. तो ह्मणाला; "राजा ! पूर्वी वृत्रासुर या नांवाचा एक महान् पराक्रमी असुर होता, त्यानें महादेवाची सेवा करून त्याला प्रसन्न करून घेतलें व मी सर्व सुरवरांना जिंकावें असा त्यानें त्यांच्याकडून वर मिळविला. पुढें त्या राक्षसानें इंद्रलोकावर स्वारी करून सर्व देवांना जिंकलें. तेव्हां देव भयाकुल होऊन अमरावती सोडून पळूं लागले, परंतु राक्षस देवांचा पिच्छा सोडीनात, पुढें देव पळत आहेत आणि मागें राक्षस लागले आहेत; अशाप्रकारें पळत पळत देव चालले असतां देवांनीं असा विचार केला कीं, आपण हातांतलीं शस्त्रें खालीं टाकलीं पाहिजेत, त्यावांचून राक्षस आपला पिच्छा सोडणार नाहींत. मग देवांनीं दधीचि ऋषीच्या आश्रमांत येऊन ऋषीजवळ आपआपलीं शस्त्रें दिलीं व ते तेथून निघून गेले. देव निःशस्त्र आहेत असें पाहून राक्षस

देवांचे मार्गे न लागतां तेथून दुसरीकडे निघून गेले. इकडे दधीचि ऋषींनें तीं सर्व शस्त्रें एका ठिकाणीं करून त्याचें चूर्ण केलें व तें कमंडलूंत घालून त्यांत पाणी घातलें आणि तें पाणी प्राशन केलें.

वृत्रासुरानें अमरावती घेतल्यावर पुढें काय करावयाचें असा सर्व देवांना विचार पडला; मग इंद्र ब्रह्मदेवाकडे गेला व त्यानें ब्रह्मदेवाला संकटाचें निवारण कशानें होईल तें विचारलें. ब्रह्मदेवानें सर्व देवांना दहा सहस्र वर्षें तप करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तप केल्यावर देव पुन्हां ब्रह्मदेवाकडे गेले, तेव्हां ब्रह्मदेवानें त्यांना असें सांगितलें कीं, " तुह्मीं दधीचि ऋषीकडे जाऊन आपलीं पूर्वीचीं शस्त्रास्त्रें मागा; ह्मणजे तो ऋषि आपल्या अस्थि तुह्माला देईल. त्या अस्थींचें शस्त्र तयार करा, ह्मणजे त्या शस्त्रानें वृत्रासुराचा नाश होईल." ब्रह्मदेवानें असें सांगितल्यावर इंद्रादि देव दधीचि ऋषीकडे आले व आपआपलीं शस्त्रास्त्रें मागूं लागले. तेव्हां दधीचि ह्मणाला, " मीं तीं शस्त्रें पीठ करून खाऊन टाकलीं आहेत, तेव्हां तीं देणें आतां अशक्य आहे, पण शस्त्रें न दिल्यास मी तुमचा ऋणी होईन आणि ऋण असणें हें मोठें पाप आहे, तर माझा नाश करून माझ्या तुह्मीं अस्थि घ्या, आणि त्यांचीं शस्त्रें तयार करा, ह्मणजे मी तुमच्या ऋणांतून मुक्त होऊन त्या वृत्रासुराचाहि नाश होईल." ऋषीनें असें सांगितल्यावर इंद्रानें कामधेनु आणली व तिचेकडून ऋषीच्या शरीराचा नाश करवून अस्थि, मांस व चर्म हीं निरनिराळीं करविलीं; त्या अस्थींचें बावीस अंगुलें वज्र झालें. पुढें वृत्रासुराचें व इंद्राचें युद्ध झालें, त्यांत इंद्रानें त्या शस्त्रानें वृत्रासुराचा नाश केला.

### ३ ब्रह्महत्येचें पातक.

या दधीचि ऋषीचें पूर्वीही एकदां इंद्रानें मस्तक कापलें होतें; पण अश्विनीकुमारानें त्यावेळीं दधीचि ऋषीचें संरक्षण केलें होतें. दधीचि ऋषीला येत असलेला महामंत्र शिकावा ह्मणून अश्विनीकुमार दधीचीजवळ येऊन राहिला होता; तो मंत्र अश्विनीकुमाराला प्राप्त होऊं नये, अशी इंद्राची इच्छा असल्यामुळें इंद्रानें एकदां संधी साधून दधीचि ऋषीचें मस्तक कापून तें पळविलें; तेव्हां अश्विनीकुमारानें एका घोड्याचें मस्तक आणून तें ऋषीच्या धडावर ठेविलें व ऋषीला जिवंत केलें. तो राग दधीचि ऋषीचे मनांत नव्हता; पण दधीचा पुत्र सुमलु याचे मनांत होता, त्यांत आणखी इंद्रानें कामधेनूकडून आपल्या बापाचा नाश करविल्याचें त्याला कळल्यावर तर तो अत्यंत क्रुद्ध झाला व त्यानें कामधेनूला शाप दिला कीं, " म्लेंछ लोक तुला असेंच कापून तुझें मांस भक्षण करितील, व तुझें मुख अपवित्र होईल." कामधेनूला असा शाप मिळाल्यावर इंद्रालाहि भीति पडली व त्यानें त्या ब्रह्महत्येबद्दल प्रायश्चित्त घेतलें; परंतु पापाचा वांटा स्वतः ग्रहण न करितां त्याचे

चार भाग केले. चार भाग केल्यावर त्यानें स्त्रियांना बोलाविलें. त्यांना एक भाग घेण्याविषयीं सांगितलें. तेव्हां स्त्रिया ह्मणाल्या; "इंद्रा! आह्मीं हा पातकाचा भाग घेतों, पण त्या पातकाच्या सोडवणुकीचा मार्गहि आह्मांला सांगून ठेव. तसेंच अष्टौप्रहर आमच्या आंगीं रतिधर्म उत्पन्न करून आह्मांला अष्टगुण दे." हें ऐकून इंद्र ह्मणाला, "हे गुण तुह्मांला मन्मथामुळें प्राप्त होतील. परंतु याच तुमच्या रजस्वलाधर्मापासून तुह्माला संतति होईल, व त्या संततीच्या पिंडदानामुळें तुमच्या पातकाचा नाश होईल; तसेंच तुह्मीं पतीवर भक्ति ठेवून त्यांची सेवा करावी, व तो निवर्तल्यावर ब्रह्मचर्यव्रतानें रहावें ह्मणजे तुमची सर्व पातकांपासून सोडवणूक होईल" याप्रमाणें ब्रह्महत्येच्या पातकाचा स्त्रियांना एक भाग दिल्यावर, इंद्रानें सर्व नद्यांना बोलाविलें व त्यांना एक भाग दिला; तेव्हां नद्या ह्मणाल्या, "इंद्रा! आह्मीं हा पातकाचा भाग घेतों, पण आमचा प्रवाह जो चारच महिने असतो तो बाराहि महिने वहावा." हें ऐकून इंद्र ह्मणाला, "समुद्राजवळ तुमचा प्रवाह बाराहि महिने राहील. तुह्मीं हें ब्रह्महत्येचें पातक घेतल्यामुळें लोक तुह्मांला वर्षाकाळीं अपवित्र मानितील, परंतु समुद्रास मिळाल्यावर तेथें तुह्मीं पवित्र व्हाल." यानंतर इंद्रानें अग्नीला बोलाविलें व त्याला पातकाचा एक भाग दिला. तेव्हां अग्नि ह्मणाला, "इंद्रा! यामुळें मला अपवित्रता येईल; आज माझ्या मुखांतल्या आहुति सर्व देव घेतात, पण या अपवित्रपणामुळें माझ्या मुखांतल्या आहुति कोणी घेणार नाहीं असें वाटतें; तर हा दोष कोणी न मानतां मला पवित्र मानावें असें मला वरदान दे." इंद्रानें त्याला त्याप्रमाणें वरदान दिलें; पण त्या पातकाची खूण अग्नीला अद्यापि राहिली आहे. अग्निसिद्धि करतेवेळेस, काळा धूर निघतो तो ब्रह्महत्येचा निदर्शक आहे. यानंतर इंद्रानें चवथा भाग पिंपळावांचून इतर सर्व वृक्षांना दिला. तेव्हां वृक्ष ह्मणाले, "इंद्रा! सर्व लोक आमचें छेदन करितात तर त्याचा कांहीं तरी बंदोबस्त करावा." मग इंद्र ह्मणाला, तुमच्या शाखा तोडल्यास तुह्मांस नवे अंकुर फुटतील, तुमचीं फळें लोक आवडीनें खातील, व तुमच्या छायेला वाटसरू बसून आपल्या श्रमाचा परिहार करितील. याप्रमाणें इंद्रानें तें ब्रह्महत्येचें पातक चवघांना वांटून देऊन आपण मोकळा झाला.

## ४ इंद्रद्युम्न राजाची कथा.

त्या दधीचि ऋषीप्रमाणेंच बळी हा सत्यवादी असल्यामुळें त्यानें दानव्रतासाठीं मस्तक प्रभूच्या पायाखालीं देऊन राक्षसांना प्रतिबंध न करण्याविषयीं सुचविलें. मग भगवंतांनीं वरुणपाशांनीं बळीला पक्के बांधून टाकिलें. तेव्हां बळीची स्त्री विंध्यावळी भगवंताला हात जोडून ह्मणाली, "हे अनंता! विश्वपालका! तुझे भक्त तुझी पूजा करीत असतां त्यांना असें बंधन प्राप्त

व्हावें हें तुझ्या ब्रीदाला शोभत नाहीं. इंद्रद्युम्नासारख्यांचा तूं उद्धार केलास, मग माझ्या पतीवर अशी अवकृपा कां ?"

वैशंपायन ऋषि याप्रमाणें बळीची कथा सांगत असतां जनमेजय ह्मणाला, "ऋषी! इंद्रद्युम्नाचा भगवंतानें कसा उद्धार केला तें ऐकण्याची माझी इच्छा आहे तर ती कथा मला सांगावी." तेव्हां वैशंपायन ऋषि ह्मणाला, "राजा ! पूर्वी इंद्रद्युम्न या नांवाचा एक राजा द्रविड देशांत राज्य करीत होता; त्या राजाचें आचरण अत्यंत पवित्र असून तो मोठा विष्णुभक्त होता; तो फार दयाळू असून नेहमीं दानधर्म करीत असे, व आपला सर्व वेळ श्रीहरीच्या भजनपूजनांत घालवीत असे. एके दिवशीं तो राजा पुण्यनदीचे कांठीं श्रीहरीची पूजा करून ध्यानस्थ बसला होता, त्यावेळीं तेथें अगस्तीऋषि आले; परंतु राजा ध्यानस्थ असल्यामुळें त्यानें ऋषीकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं; त्यामुळें ऋषीला राग आला व तो त्या राजाला ह्मणाला, " तूं विष्णुभक्तीमुळें फार उन्मत्त झाला आहेस; ऋषीचा आदरसत्कार तुझ्याकडून झाला नाहीं; या तुझ्या दांडगेपणाबद्दल तूं हत्ती होऊन रानांत फिरशील." हा ऋषीचा शाप ऐकून राजाला फार वाईट वाटलें. तो ऋषीच्या चरणावर मस्तक ठेवून ह्मणाला, "ऋषि ! मी ध्यानस्थ असल्यामुळें मजकडून हा प्रमाद झाला, तरी अपराधाची क्षमा करावी." तेव्हां अगस्ती ऋषि ह्मणाले कीं, "माझा शाप भोगल्यावांचून तुला आतां सुटका नाहीं; पण कांहीं दिवसांनीं तुझ्या शरीराला विष्णूचा हस्तस्पर्श होऊन तुझा उद्धार होईल." पुढें तो राजा हत्ती होऊन वनांत हिंडूं लागला, एके दिवशीं तो पाणी पिण्यासाठीं एका सरोवरांत गेला; तों त्या हत्तीचा एक पाय सरोवरांतील मगरानें घट्ट धरला. पाय सोडवून घेण्यासाठीं हत्तीनें आपली सर्व शक्ति खर्च केली, पण तिचा कांहींएक उपयोग न होतां तो अधिकाधिक खोल पाण्यांत मात्र जाऊं लागला. तेव्हां हत्तीला परमेश्वराचें स्मरण झालें व तो देवाची करुणा भाकूं लागला. " हे दीनोद्धारका वैकुंठपति ! हे अभयंकरा ! हे अनाथनाथा ! गरुडध्वजा ! हे शंखचक्रपद्मगदाधारी नारायणा ! हा तुझा दीन भक्त मगराच्या मुखीं सांपडला आहे, तर यावेळीं धांवून ये, व या तुझ्या भक्ताचें संरक्षण कर." ती त्या हत्तीची दीनवाणी ऐकून भगवंतास दया आली, व तो भक्तवत्सल प्रभु गरुडावर बसून अत्यंत वेगानें गजेंद्राजवळ आला. प्रभूची ती शंखचक्रगदापद्मधारी चतुर्भुज सुंदर शामलमूर्ति पाहून त्या पशूचे डोळे प्रेमाश्रूंनीं भरून आले; मग भगवंतानें गजेंद्रास ओढून सरोवरांतून बाहेर काढलें, तेव्हां तो गजेंद्र प्रभूच्या हस्तस्पर्शामुळें पुन्हां पूर्ववत् इंद्रद्युम्न झाला. तसाच तो मगरहि गंधर्व झाला; तोहि असाच शापामुळें मगर झाला होता. त्या भक्तवत्सल प्रभूनें दोघांची शापापासून मुक्ति केली व त्या दोघांना विमानांत बसवून वैकुंठास नेलें."

## ५ बळीचा पाताळलोकीं वास.

राजा जनमेजया ! बळी राजाचीहि त्या गजेंद्राप्रमाणेंच अवस्था झाली होती, बळीला गजेंद्राप्रमाणेंच शुक्राचार्योचा शाप होता. बळीची ती तशी अवस्था झाल्यावर त्यानें प्रल्हादाचा धांवा केला, तेव्हां त्याचा आजा प्रल्हाद ब्रह्मदेवाला बरोबर घेऊन आला. मग ब्रह्मदेवानें विष्णूची विनंति केली कीं, "हे अनंता ! हा बळी तुझा परमभक्त असून त्यानें आपलें वचन पुरें केलें आहे; आतां झाली इतकी शिक्षा पुरे झाली, तर याच्यावर दया करून ही बळीचीं बंधनें काढून टाक." मग नारायणास दया आली व त्यांनीं बळीचीं बंधनें काढून टाकलीं. नंतर भगवान् ह्मणाला, "मला निष्कांचन भक्त विशेष आवडतात. राज्यसंपत्तीच्या मदानें उन्मत्त झालेल्यांना माझ्या पदाची केव्हांहि प्राप्ति होणार नाहीं. यासाठीं बळीला मला निष्कांचन करावें लागलें. ज्याला संतति संपत्ति पाहिजे असेल त्यानें शंकराची सेवा करावी; मी तें देण्याला समर्थ नाहीं. आमच्याजवळ फक्त मुक्ति आहे, ती मी माझ्या भक्तांना देतों. बळी हा माझा खरा भक्त आहे, त्याच्या सारखा दानशील कोणीहि नाहीं, प्रत्यक्ष मी ज्याच्यापुढें हात पसरला, त्या या बळीच्या उदारतेची कीर्ति जगांत अक्षय्य कायम राहील. त्याला मी पाताळचें राज्य देतों; त्याचा त्यानें आनंदानें उपभोग घ्यावा. असें सांगून भगवंतानें बळीला पाताळांत राज्यावर नेऊन बसविलें." तेव्हां बळी ह्मणाला, "प्रभो ! आपण मला पृथ्वीवरून पाताळांत आणलें पण माझी आठवण पृथ्वीवरील लोकांना राहील अशी कांहींच तजवीज केली नाहीं." हें ऐकून भगवान् ह्मणाला, "तुझी आठवण पृथ्वीवरील लोकांना अक्षय्य राहील. प्रत्येक वर्षीं कार्तिक शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं लोक तुझी प्रतिमा करून तिचें पूजन करितील, व तो दिवस मोठया आनंदानें घालवितील." याप्रमाणें बळीला सांगून भगवान् क्षीरसागरीं निघून गेले.

बळी पाताळांत राज्य करीत असतां कांहीं दिवसांनीं त्यास पुन्हां इंद्राची अमरावती घेण्याची इच्छा झाली; तेव्हां तत्काळ विष्णूचे वरुणपाश येऊन त्यानें बळी बद्ध झाला. ती बळीची अवस्था पाहून प्रल्हाद मोठया विवंचनेंत पडला; त्यास काय करावें तें कळेना, इतक्यांत तेथें नारद आला, व त्यानें प्रल्हादाला श्रीहरीची करुणा भाकण्यास सांगितलें. त्याप्रमाणें प्रल्हादानें विष्णूची प्रार्थना केल्यावर भगवान् प्रगट झाले व त्यानें बळीचीं बंधनें दूर केलीं. मग बळीनें प्रभूची अनन्यभावानें क्षमा मागितली, व भगवंतानें सदोदित आपल्या सन्निध रहावें अशी विनंति केली; भक्तवत्सल प्रभूनें बळीची ती विनंति मान्य केली व तेव्हांपासून तो बळीचे द्वारीं पाताळीं राहिला. तेथून दुर्वासानें त्याला चक्रतीर्थाचे वेळीं कुश दैत्याचा संहार करण्यासाठीं आणलें होतें."

---

# अध्याय ८ वा.

## अंबरीष राजाची कथा.

बळीची कथा सांगितल्यावर वैशंपायन ऋषि जनमेजय राजाला, अंबरीष-राजाची कथा सांगूं लागले. "अंबरीष राजा हा नाभागराजाचा पुत्र होता. तो अत्यंत सुशील व शांत स्वभावाचा होता. दानशूर, धर्मशील व विष्णुभक्त होता. तो पुष्कळ दिवसांपासून एकादशीचें व्रत करीत होता; प्रत्येक एकादशीचे दिवशीं उपवास करून रात्रीं जागरण करून श्रीहरीचें कीर्तन करी; नंतर द्वादशीचे दिवशीं सूर्योदयाबरोबर स्नान वगैरे करून पांच घटका दिवस आल्यावर पारणें करीत असे. याप्रमाणें त्या राजाचा एकादशी व्रताचा पुष्कळ दिवस एकसारखा नियम चालला होता. एकदां एका द्वादशीचे दिवशीं राजानें स्नान करून श्रीहरीची पूजा केली व पारण्याची सर्व सिद्धता केली, वेळ झाल्यावर राजा दाराशीं येऊन कोणी अतिथी अभ्यागत आहे किंवा काय, हें पाहूं लागला. इतक्यांत दुर्वासऋषि दृष्टीस पडले. त्यांना राजानें आज द्वादशी आहे, भोजनाची तयारी झालेली आहे, तर पारणें सोडण्यासाठीं इकडेच यावें, ह्मणून विनंति केली; ती राजाची विनंति ऋषींनीं मान्य केली; बरोबर असलेलें सामान राजाकडे ठेवून ते यमुना नदीवर स्नान करण्यासाठीं गेले. तिकडे दुर्वासाचें यमुनेवर तर्पण, देवतार्चन यास बराच वेळ लागल्यामुळें इकडे राजाची द्वादशीची वेळ होऊन गेली. तेव्हां राजाला काय करावें हा मोठा विचार पडला; आमंत्रित केलेल्या अतिथीवांचून भोजन केल्यास तें अत्यंत अनुचित होय; बरें नैवेद्य समर्पण न करावा तर व्रतभंग होतो; राजा अशा विवंचनेंत पडल्यावर त्याच्या पुरोहितानें राजाला शालिग्रामशिलेचें तीर्थ घेऊन पारणा करण्यास सांगिलें. मग राजानें त्याप्रमाणें शालिग्रामशिलेचें तीर्थ घेऊन व्रताची सांगता केली. राजानें पारणा करून कांहीं वेळ झाल्यावर दुर्वासऋषि आपली स्नानसंध्या आटोपून आले. आल्यावर भोजनाची उत्तम प्रकारची तयारी केलेली आहे, पात्रांत पंचपक्वान्नें वाढलेलीं आहेत, हें पाहून ऋषीला फार आनंद झाला; पण इतक्यांत दुर्वासऋषीच्या असें लक्षांत आलें कीं, राजानें आपली वाट न पाहतां द्वादशी साधून घेतली; राजानें हा आपला मोठा अपमान केला असें दुर्वासऋषीला वाटलें व तो त्यामुळें संतप्त होऊन राजाला ह्मणाला, "राजा! तूं माझी वाट न पाहतां पारणा केलीस हें तूं अत्यंत अनुचित केलेंस. मुक्तीच्या आशेनें तूं विष्णूची भक्ति करून हें व्रत करितोस पण या माझ्या अपमानामुळें तुला दहा वेळां गर्भवास भोगावे लागतील."

## २ सुदर्शनचक्र.

दुर्वासऋषीचा तो शाप ऐकून अंबरीष राजाला फार वाईट वाटलें; गर्भवासाचीं दुःखें चुकावीत ह्मणून तो राजा अहर्निश विष्णूची सेवा करीत असे, अशा त्या राजाला दहा गर्भवासांचा शाप ह्मणजे मोठाच दंड होय. त्या शापवाणीनें राजाचें हृदय भडभडून आलें, डोळे पाण्यानें भरून आले आणि तो सद्गदित स्वरानें भगवंताचा धांवा करूं लागला. हे शारंगधरा! हे करुणाकरा! हे हृषीकेशा! केशवा! श्रीपति! या ऋषिशापापासून मला मुक्त कर. तुझ्या व्रताची योग्यप्रकारें सांगता करीत असतांना मला या ऋषीनें निष्कारण शाप दिला आहे. तर हे प्रभो! नारायणा! हे माझे दहा गर्भवास चुकीव. याप्रमाणें अंबरीष राजानें भगवंताचा धांवा केल्यावर भगवान्–लक्ष्मीनारायण स्वतः अंबरीष राजापुढें प्रगट झाले. ती शंखचक्रगदापद्मधारी वैकुंठवासी श्रीपतीची सुंदर शामलमूर्ति पाहिल्यावर अंबरीष राजाच्या हृदयांत प्रेमाचें भरतें आलें व त्यानें प्रभूच्या चरणकमलाला कडकडून मिठी घातली. मग भगवंतानें राजाला आपल्या हातांनीं धरून उठविलें, त्यावेळीं राजाला भगवान् ह्मणाले, "हे भक्त शिरोमणी अंबरीषा! तुझ्या एकादशीव्रतामुळें मी तुझा ऋणी झालों आहें, तुला या ऋषींनीं दिलेला शाप चुकणें नाहीं. पण तुझ्या भक्तीमुळें मी प्रसन्न होऊन तें दहा गर्भवासांचें दुःख मी स्वतः सोशीन, तूं त्याबद्दल मुळींच काळजी करूं नको. मी तुझे याच जन्मीं सर्व भवपाश तोडून टाकीन." याप्रमाणें भगवंतानें अंबरीषराजाला आश्वासन दिल्यावर दुर्वास ऋषीला अधिक कोप आला तो आपली जटा उपटून अंबरीष राजाचा नाश व्हावा ह्मणून त्याच्या अंगावर टाकूं लागला. तेव्हां भगवंतांनीं सुदर्शन चक्राचेठायीं अग्नीची योजना करून, तें चक्र दुर्वास ऋषीच्या जटेवर सोडलें. ती विलक्षण ज्वाला जटेवर आपटल्यामुळें दुर्वास ऋषी अत्यंत घाबरून गेला व त्या चक्राच्या भीतीनें पळूं लागला. परंतु चक्र त्याचा पिच्छा सोडीना. तो पुढें आणि चक्र मागें, असें एकसारखें चाललें होतें. वाटेंत त्या चक्राच्या आड वृक्षतृणादि जें कांहीं येई त्याचा तें चक्र जाळून नाश करीत असे. दुर्वास ऋषी क्षणमात्र कोठें विसांवा घेण्यासाठीं उभा राहिल्यास तत्काल चक्राच्या ऊष्णतेमुळें जटा जळूं लागे, यामुळें ऋषीला पळतां पळतां कोठें विसांवाहि घेतां येईना. याप्रमाणें तें चक्र चुकवावें ह्मणून दुर्वास ऋषि दरी खोऱ्यांतून, नदीनाल्यांतून, समुद्रांतून एकसारखा पळत होता, पण तें चक्र त्याचा पिच्छा मुळींच सोडीना. शेवटीं दुर्वास ऋषि ब्रह्मदेवाकडे गेला. व त्याला चक्राचें निवारण करण्याविषयीं सांगूं लागला. पण ब्रह्मदेव तसें करीना. तो ह्मणाला; "हे ऋषि! श्रीपति व उमापति यांची शक्ति, कांहीं विलक्षण आहे, मी केवळ त्यांचा दासानुदास असून त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागतों. मी या चक्राचें निवारण करण्यास अगदीं असमर्थ आहें." ब्रह्मदेवानें असें सांगित-

त्यावर दुर्वास ऋषि तेथून महादेवाकडे गेला, पण महादेवांनींहि त्याची ब्रह्मदेवाप्रमाणेंच निराशा केली. महादेव ह्मणाले, "हे दुर्वास ऋषे ! या चक्राचें निवारण करण्यास मी अगदीं असमर्थ आहें. त्या वैकुंठपतीचा महिमा फार मोटा असून मी देखील महाविष्णूला आपलें दैवत समजून त्याची पूजा करितों. तेव्हां तूं आतां परत विष्णूकडे जाऊन त्याचे पाय धर; त्यावांचून तुला आतां सुटका नाहीं." असें महादेवांनीं सांगितल्यावर दुर्वासऋषी तेथून पळत पळत निघाला तो भक्तवत्सल प्रभूकडे आला. याप्रमाणें एक वर्षभर दुर्वासऋषि, त्या चक्राच्या भीतीनें उपवासी पळत फिरत होता, क्षुधेमुळें त्याचीं सर्व गात्रें शिथिल झालीं होतीं, हातांतला कमंडलू गळून पडला होता, आणि हातपाय लटलट कांपत होते. अशा स्थितींत लगवगीनें येऊन दुर्वासानें प्रभूच्या पायांला घट्ट मिठी घातली, व झालेल्या अपराधाबद्दल प्रभूची अनन्यभावानें क्षमा मागूं लागला. ऋषि ह्मणाला, "हे देवा अनंता ! महादेवाचे मागें जसें ब्रह्मदेवाचें मुख लागलें होतें, त्याप्रमाणेंच तुझें हें चक्र माझ्या मागें लागलें आहे, तर या संकटाचें आतां निवारण कर. या संकटांतून सोडावयाला तुझ्यावांचून कोणीहि समर्थ नाहीं."

## ३ कापालेश्वराची कथा.

जनमेजय राजाला वैशंपायन ऋषि अंबरीष राजाची कथा सांगत असतां जनमेजय राजा ह्मणाला; "वैशंपायन महाराज! महादेवाचे मागें ब्रह्मदेवाचें मुख कसें लागलें होतें व त्याचें कारण काय ? तें ऐकावें अशी इच्छा आहे; तर ती कथा मला कृपा करून सांगावी." जनमेजय राजाची ही विनंति ऐकून वैशंपायन ऋषि ह्मणाला; "राजा ! पूर्वी ब्रह्मदेवाला पांच मुखें असून तो चार मुखानें चार वेदांचें पठण करीत असे, व पांचव्या मुखानें उपवेद जें गायन तें ह्मणत असे; परंतु वेदपठण करणारानें गायन करणें निषिद्ध असल्यामुळें शंकरानें ब्रह्मदेवाच्या पांचव्या मुखावर त्रिशूळ मारून तें मुख तोडून टाकलें, तेव्हां ब्रह्मदेवानें महादेवाला चंडीश पूजा वर्ज करण्याबद्दल शाप देऊन आपलें मुख महादेवाच्या मागें सोडलें, महादेवानें पुष्कळ प्रयत्न केला पण तें ब्रह्मदेवाचें मुख महादेवाचा पिच्छा सोडिना, तेव्हां महादेव, गुरु सिंहराशीला आला आहे असें पाहून, अरुणा व गोदावरी यांच्या संगमावर आले. व गोदेच्या पलीकडे निघून गेले. निघून गेल्यावर त्यांच्या मागें मुखहि जाऊं लागलें. पण त्याला गोदावरीच्या पाण्याचा स्पर्श झाल्याबरोबर तें गोदावरीच्या पाण्यांत जिरून गेलें. ही प्रचीति अद्यापिहि असल्यामुळें लोक, गुरु सिंहराशीला आल्यावर गोदावरीचे कांठीं जाऊन मृतांच्या अस्थि पाण्यांत टाकतात. महादेवाची अशा रीतीनें सुटका झाल्यावर गोदावरीनें त्यांची विनंति केली कीं, आपण माझे सन्निध नेहमीं रहावें, त्याप्रमाणें महादेव, अरुणा व गोदावरी यांचे

संगमावर कपालेश्वर या नांवानें राहिले, व गोदावरीला असा वर दिला कीं, गुरु, सिंह राशीला आल्यावर तुला सर्व तीर्थांची महती प्राप्त होईल, व तुझ्या स्नानामुळें लोक पातकापासून मुक्त होतील. ''

## ४ ऋषीचा सत्कार.

दुर्वास ऋषींनीं श्रीहरीचरणीं मस्तक ठेवून प्रार्थना केल्यावर दुर्वासाला भगवान् ह्मणाला; " दुर्वासा ! माझ्याहून माझे भक्त थोर आहेत. त्यांच्या भक्तीमुळें मी त्यांचा दासानुदास होऊन त्यांची सेवा शुश्रूषा करितों, मी एवढा विराट पुरुष, पण माझ्या भक्तांनीं भक्तीमुळें मला आपल्या हृदयकपाटांत कोंडून ठेविलें आहे, यावरून ते मजहून थोर असून मजपेक्षांहि शक्तिशाली आहेत. भक्तीमुळें त्यांनीं मला बांधून टाकलें आहे. तर तूं माझा भक्त जो अंबरीष, त्याच्याकडे जाऊन त्याची क्षमा माग, ह्मणजे तो तुझी या संकटांतून सुटका करील. '' भगवंतानें असें सांगितल्यावर दुर्वास तेथून निघाला व अंबरीष राजाकडे गेला. इकडे अंबरीष राजाहि ऋषि न जेवतां निघून गेला म्हणून एक संवत्सरपर्यंत उपवासी होता. ब्राह्मण आपल्या घरांतून उपाशी गेला तेव्हां तो जेवावयाला येईपर्यंत अन्न ग्रहण करावयाचें नाहीं, असा निग्रह करून अंबरीषराजा दुर्वास ऋषीची मार्गप्रतीक्षा करीत बसला होता, अशा स्थितींत राजा असतांना दुर्वासऋषि एकाएकीं आला व राजाच्या पायांवर लोटांगण घालून, ' चुकलों चुकलों ' म्हणून म्हणूं लागला. दुर्वास आणखी म्हणाला; " हे राजा ! तुला शाप दिल्यामुळें हें चक्र मागें लागलें आहे, त्याचें निवारण करण्यास तुझ्यावांचून कोणी समर्थ नाहीं, असें भगवंतानें सांगितलें आहे, तर या चक्राचें निवारण कर." हे ऋषीचे शब्द ऐकून त्या राजानें ऋषीला उठवून योग्य आसनावर बसविलें, व त्याच्या चरणावर मस्तक ठेवून त्याची विधियुक्त पूजा केली व त्याच्या चरणाचें तीर्थ घेतलें; मग चक्राचें निवारण करण्यासाठीं एकभुक्त सोमवाराचें व एका एकादशीचें पुण्य खर्ची घालून, त्या चक्राला हात जोडून राजा म्हणाला, " हे चक्रा ! तूं सर्वव्यापक असून दुष्टांचा संहार व साधूंचा सांभाळ करण्याची शक्ति तुझ्या अंगीं आहे. तुझ्या अंगीं सर्व शक्ति एकवटलेल्या असून तूं श्रीपतीचा अलंकार आहेस. हे चक्रा ! आतां या दुर्वासाला सोड; त्याच्या ह्या अपराधाबद्दल दया कर. त्याच्या अपराधाबद्दल मी तुजजवळ क्षमा मागतों.'' याप्रमाणें चक्राची प्रार्थना केल्यावर प्रभूचें तें चक्र नाहींसें झालें. मग अंबरीष राजानें दुर्वासाला भोजनाला बसवून त्याचें जेवण झाल्यावर आपण जेवावयाला बसला. नंतर दुर्वासास विडा दक्षिणा वगैरे देऊन त्याचा राजानें योग्य सत्कार केला. तो दुर्वास ऋषि त्या राजाचा निरोप घेतेवेळीं म्हणाला, " राजा तुझा मीं निष्कारण छळ केला याबद्दल मला क्षमा कर. ऊंस पिळला

तरी त्यांतून जसा गोड रस निघतो, किंवा उत्तम सोनें अग्नींत घातलें असतां तें अधिक कसदार होतें, किंवा चंदन घांसला असतां त्याचा जसा परिमल सुटतो, त्याप्रमाणें तुझी कीर्ति चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत जगांत कायम राहील. तूं खरोखर भक्तशिरोमणी आहेस, तो परब्रह्म आदिपुरुष तुझा सेवक झाला आहे, तेव्हां त्याच्याप्रमाणें तुझी कथा देखील लोकांच्या पातकाचा नाश करील.' याप्रमाणें दुर्वास ऋषि अंबरीष राजाला आशीर्वाद देऊन आपले आश्रमाला निघून गेला.''

## अध्याय ९ वा.

### एकादशीव्रताची कथा.

#### १ पुष्पें चोरणारे देवदूत.

अंबरीष राजाच्या एकादशी व्रताचा एवढा प्रभाव ऐकून जनमेजय राजा त्या व्रताविषयींची कथा ऐकण्याच्या इच्छेनें तो वैशंपायन ऋषीला म्हणाला; "ऋषी! हें एकादशीचें व्रत कोणी आरंभिलें, व त्या व्रताची उत्पत्ति कशी झाली, हें मला कृपा करून सांगावें." राजाची ती इच्छा जाणून वैशंपायन ऋषी मोठया संतोषानें जनमेजयाला एकादशीच्या व्रताची कथा सांगूं लागला, "राजा! पूर्वी कांतीनगरांत सूर्यवंशी रुक्मांगद या नावाचा एक उदार पुण्यश्लोक व धर्मस्थराजा राज्य करीत होता. त्याची श्रीहरीवर एकनिष्ठ भक्ति असून तो नेहमीं श्रीहरीच्या भजनपूजनांत मग्न असे. त्याच्याप्रमाणें त्याची स्त्री संध्यावळी, हीहि अत्यंत पुण्यशील असून श्रीहरीचीं व्रतें भक्तिभावानें करीत असे. त्या रुक्मांगद राजाला धर्मांगद या नांवाचा एक पुत्र होता. तोहि बापाप्रमाणेंच धर्मरत असून कल्पवृक्षालाहि लाजवील असा उदार होता. त्या राजाचें राज्य मोठें विस्तीर्ण असून राजाचें राहण्याचें कांती शहर अत्यंत सुंदर होतें. शहरासभोंवतीं मनोहर उपवनें असून, तीं अनेक प्रकारच्या सुवासिक पुष्पभारांनीं अक्षय्य डबडबलेलीं होतीं. शहरांतील घरें, प्रशांत व स्वच्छ असून प्रत्येक घरापुढें सडासंमार्जन होत असे. त्या शहरांत शंकराचीं व विष्णूचीं अनेक मंदिरें असून त्यांचे सुवर्णकळस दुरून झळकत असत; मंदिरावर लावलेल्या मोठमोठया सुंदर ध्वजा वाऱ्याच्या योगानें फडफड उडत असत; कोठें कथा चालली आहे, कोठें पुराण चाललें आहे, कोठें हरिभजन होत आहे, तर कोठें शिवमंदिरांत वेद घोष होत आहे, असें त्या शहरांत अक्षय्य चाललेलें असे. सारांश राजाप्रमाणें त्याची प्रजाहि धर्मरत होती; यामुळें सर्व प्रजाजन सुखी असून त्यांनां रोगराई, दुष्काळ, व अकालिक मृत्यु हीं मुळींच माहीत नव्हतीं.

त्या शहरीं प्रत्येक दिवशीं आपआपल्या देवतेला एक लक्ष अत्यंत सुंदर व सुवासिक पुष्पें वाहणारे हजारों लोक होते. त्याप्रमाणें तो रुक्मांगदराजाहि प्रभातकाळीं उठून स्नानसंध्या करून श्रीहरीची पूजा करी व पूजेच्या वेळीं एक लक्ष पुष्पें श्रीहरीला भक्तीनें अर्पण करीत असे. तो रुक्मांगदराजा व त्याची प्रजा धर्माचरणानें वागून आनंदानें कालक्रम करीत असतां, तो प्रकार एकदां नारदाचे अवलोकनांत आला, तेव्हां नारदाला अत्यंत आश्चर्य वाटून या रुक्मांगद राजानें वैकुंठालाहि लाजविलें असें तो मनांत ह्मणाला. नंतर तो तेथून अमरावतीस इंद्राकडे गेला. तेव्हां इंद्रानें नारदाला आपल्या नंदनवनांतलीं कांहीं पुष्पें दिलीं; तीं फुलें पाहून नारद इंद्राला ह्मणाला, "इंद्रा ! तुला आपल्या नंदनवनाचा व त्यांतील पुष्पांचा मोठा अभिमान आहे; पण पृथ्वीवर रुक्मांगद राजाचे राज्यांत तुझ्या नंदनवनापेक्षांहि सुंदर उपवनें असून त्यांतील फुलेंहि अप्रतिम अशीं आहेत." तें नारदाचें बोलणें ऐकून इंद्रानें आपले दूत विमानांत बसवून कांति नगरच्या उपवनांत फुलें तोडण्यासाटीं पाठवून दिले. कांहीं वेळानें दूतांनीं इंद्रानें सांगितल्याप्रमाणें कांति नगरच्या उपवनांतील पुष्कळ फुलें तोडून आणून इंद्रापुढें ठेविलीं; तीं अप्रतिम फुलें पाहून इंद्राला फार आनंद झाला व त्याला नारदाचें बोलणें खरें वाटलें. इंद्रानें आपल्या दूतांना त्यावेळीं अशी आज्ञा दिली कीं, तुह्मी प्रत्यहीं प्रभातकाळीं कांति नगरास जाऊन तेथील सर्व फुलें तोडून आणा. इंद्राच्या या आज्ञेप्रमाणें इंद्राचे दूत रोज कांति नगरास जाऊन तेथील बागेंतील फुलें अमरावतीला नेऊं लागले.

## २ एकादशीव्रतोत्पत्ति.

इकडे कांति नगरांतील फुलें याप्रमाणें स्वर्गांत जाऊं लागल्यावर तेथील लोकांना देवाच्या पूजेसाठीं फुलें मिळेनाशीं झालीं. राजानें आपल्या माळ्यांना बोलावून आणून अलीकडे फुलें कां नाहींत ह्मणून विचारलें; तेव्हां माळ्यांनीं कोणी चोर विमानांत बसून बागेंत येतात व फुलें तोडून पुन्हां विमानांत बसून पळून जातात असा प्रकार कळविला. हें ऐकून राजाला फार आश्चर्य वाटलें. मग त्यानें आपल्या दूतांना कांहीं तरी युक्तिप्रयुक्ति करून ते चोर धरावेत ह्मणून सांगितलें. विमानाचे खालीं वांग्याच्या लांकडांचा धूर केला ह्मणजे विमान खालीं पडतें, असा शोध राजाच्या माळ्यांना लागल्यावर त्या माळ्यांनीं बागेंतून विमान जाऊं लागलें तेव्हां तीं लांकडें पेटवून त्यांचा धूर विमानाचे खालीं केला. त्याबरोबर, तें इंद्राचें विमान पृथ्वीवर पडलें; मग राजाच्या माळ्यांनीं त्या दूतांना धरून राजापुढें नेऊन उभे केलें; त्या दूतांच्या त्या दिव्य व सुंदर आकृति पाहून राजाला फार आश्चर्य वाटलें, त्यानें त्या दूतांना आसनें बसावयाला देऊन तुह्मी कोण, कोठील, वगैरे माहिती विचारली, तेव्हां इंद्राचा

दूत ह्मणाला, "राजा ! आह्मीं इंद्राचे दूत असून हीं फुलें देवेंद्राच्या आज्ञेप्रमाणें आह्मी घेऊन स्वर्गांत नेतों, तेथें तीं सर्व देवांना मिळतात." हें ऐकून रुक्मांगद राजाला आपलीं फुलें स्वर्गांत देवांच्या मस्तकावर जाऊन पडतात, याबद्दल फार धन्यता वाटली. मग त्यानें त्या दूतांना अलंकारवस्त्रें वगैरे देऊन त्यांचा योग्य सत्कार केला व कांहीं फुलें आह्मांस देवपूजेसाठीं ठेवीत जा, आणि कांहीं घेऊन जात जा, असें सांगून रुक्मांगदानें त्या इंद्राच्या दूतांना जाण्यास निरोप दिला. तेव्हां तो दूत राजाला पुन्हा ह्मणाला; " रुक्मांगदा ! तूं जाण्यास निरोप दिलास खरा. पण आतां आमचें विमान चालणें अशक्य झालें आहे, तें पृथ्वीस लागल्यानें पृथ्वीवरील पापपरिमळानें दूषित झालें आहे. कोणी एकादशीचें पुण्य देईल तर हें भूमीवरून वर जाईल. " तें त्या दूतांचें बोलणें ऐकून रुक्मांगद राजाला फार आश्चर्य वाटलें, त्याला एकादशीचें व्रत ह्मणजे काय, तें त्या वेळेपर्यंत माहित नव्हतें, ह्मणून त्या राजानें त्या दूताला एकादशीचें व्रत ह्मणजे काय व त्याची उत्पत्ति कशी तें सांगण्याविषयीं विनंति केली. ती राजाची विनंति ऐकून इंद्राचा एक दूत राजाला एकादशीच्या व्रताची कथा सांगू लागला.

तो दूत ह्मणाला; " राजा ! कुश राक्षसाचा मुरु या नांवाचा एक बंधू होता, कुशाला श्रीहरीनें मारल्यावर मुरुला त्याबद्दल फार कोप आला व तो विष्णूचा नाश करण्याचा प्रयत्न करूं लागला. त्या मुरु राक्षसानें कैलासपतीची कित्येक वर्षे तपश्चर्या करून त्याला प्रसन्न केलें, व त्याच्याकडून असा वर मिळविला कीं, मी विष्णूला जिंकावें व मला पुरुषाच्या हातानें मरण येऊं नये. महादेवाकडून असा वर मिळविल्यामुळें तो मुरु राक्षस अत्यंत उन्मत्त होऊन विष्णूला त्रास देऊं लागला. तेव्हां विष्णुहि त्या राक्षसाचा नाश करण्याचा प्रयत्न करूं लागला, परंतु तो दैत्य त्याला मुळींच आटोपेना. त्या राक्षसाबरोबर कित्येक वर्षे युद्ध केल्यावर प्रभु अत्यंत क्लांत झाले व ते रणभूमीवरून गिरिकंदरांत जाऊन तेथें स्वस्थ निजले. दहा सहस्र वर्षे युद्ध केल्यामुळें झालेला शीण प्रभूंनीं श्वासमार्गानें बाहेर टाकला व ते निद्रिस्त झाले. प्रभूनें टाकलेल्या श्वासापासून एक सुंदर, सर्व अवयवांनीं पूर्ण, अशी कन्या उत्पन्न झाली. तिनें श्वेतवसन परिधान केलें असून तिला चार हात होते. एका हातांत तलवार, एका हातांत ढाल व दोन हातांत धनुष्यबाण अशीं तिचीं आयुधें होतीं. विष्णु तेथें निद्रिस्त झाल्यावर त्यांच्या मागोमाग तो मुरु दैत्य त्यांना त्रास देण्यासाठीं आला. पण इतक्यांत ती स्त्री त्या दैत्याला आडवी झाली, व तिनें त्या राक्षसाबरोबर युद्ध करून त्याचा नाश केला. त्यावेळीं सर्व देवांना आनंद होऊन त्यांनीं त्या स्त्रीवर पुष्पवृष्टि केली. त्या दिवशीं एकादशी असल्यामुळें त्या स्त्रीला सर्व एकादशी असें ह्मणूं लागले. भगवंतहि तिला पाहून प्रसन्न झाले. ती त्या भक्तवत्सल प्रभूला ह्मणाली, " हे अनंता ! तुझी भक्ति

वाढावी, आणि माझी कीर्ति व्हावी असा मला कांहीं वर दे." तेव्हां भगवान् ह्मणाले," जो एकादशीचें व्रत करील त्याला वैकुंठाची प्राप्ति होईल, व जो त्या दिवशीं उपवास न करितां अन्न भक्षण करील, त्याला नरकाची प्राप्ति होईल." तेव्हांपासून हें एकादशीचें व्रत स्वर्गांत चाललें आहे. हें करण्याची रीत अशी आहे कीं, दशमीचे दिवशीं एकभुक्त राहून एकादशीचे दिवशीं निरशन करावें. व द्वादशीचे दिवशीं प्रभातकाळीं पांच घटका दिवसास भोजन करावें. हें व्रत जो नियमानें सतत करील, त्याच्या पुण्याला गणती राहणार नाहीं. तर राजा! असा कोणी एकादशी करणारा असेल, तर त्याच्या स्पर्शानें हें विमान चालू होईल."

रुक्मांगदाचे राज्यांतच काय, पण संपूर्ण पृथ्वीवर त्या वेळीं तें व्रत कोणीहि करणारा नसल्यामुळें राजानें असा कोणी मनुष्य येथें मिळणार नाहीं असें सांगितलें. तेव्हां एक इंद्रदूत ह्मणाला; "राजा ! आजची द्वादशी आहे. कालची एकादशी होती, जर कोणी काल कांहीं कारणामुळें उपवासी राहिला असेल व त्यानें अद्यापपर्यंत भोजन केलें नसेल, तर त्याच्या हातानें देखील विमान चालू होईल." मग राजानें त्याप्रमाणें शोध करण्यास नगरांत आपले अनेक सेवक पाठविले, तेव्हां एक स्त्री पति रागावल्यामुळें दशमीचे सायंकाळपासून द्वादशीचे सकाळपर्यंत उपवासी होती, तिला घेऊन एक सेवक राजाकडे आला. तेव्हां राजानें तिला तें पुण्य खर्ची घालावयाला सांगून विमानाला हात लावण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्या स्त्रीनें विमानाला हात लावतांच विमान एकाएकीं वर उडालें व आकाश मार्गानें स्वर्गी निघून गेलें. हा चमत्कार पाहून राजाचे हृदयांत एकादशीचे व्रताविषयीं श्रद्धा उत्पन्न झाली व तें व्रत आपले राज्यांत पशु, पक्षी व मुलाबाळांपासून तों अत्यंत वृद्धापर्यंत सर्वांनीं करावें असा त्यानें नियम केला. त्या राजाची प्रजा, राजाप्रमाणेंच धर्मरत असल्यामुळें दुसऱ्या एकादशीपासूनच त्याच्या राज्यांत तें व्रत सर्व आबालवृद्ध करूं लागले. एकादशीचे दिवशीं रात्रीं जागरण करून कीर्तन करावें, श्रीहरीचें भजन करावें, याप्रमाणें सर्वत्र तें व्रत सुरू झालें. ब्राह्मणापासून तों अंत्यजापर्यंत तें व्रत करण्यान्नी कोणाला आडकाठी नसल्यामुळें सर्व लोक तें व्रत करूं लागले.

### ३ रुक्मांगद व मोहिनी.

रुक्मांगदाचे राज्यांत एकादशीचें व्रत सुरू होऊन कांहीं वर्षे झाल्यावर यमाचा कुंभीपाक रिकामा पडला, जो कोणी रुक्मांगदाचे राज्यांत मृत्युवश होई, त्याला विष्णूचे दास उचलून वैकुंठीं नेऊं लागले. हा प्रकार बघून सर्व देवांना मोठी काळजी पडली, यम इंद्राला ह्मणाला; "इंद्रा ! लोकांना हें फुकटचें एकादशीव्रत माहित झाल्यापासून माझा कुंभीपाक अगदीं रिकामा पडला आहे. तेव्हां याला कांहीं तरी उपाय योजिला पाहिजे. नाहीं तर हे महान् महान् पातकी

या व्रतानें सहज नरक चुकवितील." हें ऐकून इंद्रानें मोहिनी नांवाच्या एका स्त्रीला रुक्मांगद राजाकडे जाऊन या एकादशी व्रताचा नाश करण्यास सांगितलें. ती मोहिनी कांतीनगरास आली व तिनें एका उपवनांत रुक्मांगद राजाची भेट घेतली. ती स्वर्गातील अनुपमेय सुंदर स्त्री पाहून राजाला तिचें मोठें आश्चर्य वाटलें. तो तिला ह्मणाला, "हे स्त्रिये ! तूं कोणाची स्त्री आहेस आणि अशा तारुण्यावस्थेंत अशी एकटी कां हिंडतेस ?" राजाचा हा प्रश्न ऐकून ती स्त्री ह्मणाली; "हे राजा! मी देवकन्या असून, अद्यापि माझा विवाह व्हावयाचा आहे, पृथ्वीवर कोणी योग्य पति मिळाल्यास त्याच्याबरोबर विवाह करण्याचा माझा विचार आहे." तेव्हां तो रुक्मांगद राजा ह्मणाला; "हे मोहिनी ! जर मजबरोबर विवाह करशील तर मी आपणास मोठा भाग्यवान् मानीन." यावर मोहिनी ह्मणाली; "राजा ! मला जो भाष्यदान देईल त्याच्या बरोबर मी लग्न करीन, तेव्हां तूं माझें सांगण्याप्रमाणें वागण्याचें कबूल करीत असल्यास मी तुजबरोबर विवाह करितें." राजानें तिच्या ह्मणण्याप्रमाणें तिला भाष्यदान दिलें व तिजबरोबर विवाह करून तिला नगरांत घेऊन आला.

त्या तारुण्यलतिकेच्या सहवासांत असतां राजाला एकादशीचे व्रताचा विसर पडला, व तो अक्षय्य मोहिनीचे महालांत बसून ऐषआराम करूं लागला. राजा याप्रमाणें मोहिनीचे नादीं लागला होता, तरी त्या राजाचा मुलगा धर्मांगद तें एकादशीचें व्रत नियमानें करून आपल्या सर्व प्रजाजनांकडून- नहि करवी. अशा रीतीनें शतसंवत्सर गेल्यावर एका दशमीचे दिवशीं दुपारीं नगरांत दवंडी देणारे लोक दवंडी देत होते, तिकडे राजाचें लक्ष गेलें. त्यावेळीं मोहिनीनें उत्तम प्रकारचा तांबूल तयार करून, तो राजाच्या हातीं दिला होता; राजानें तो तांबूल आतां भक्षण करावा इतक्यांत तो दवंडी देणारा रस्त्यांतून मोठ्यानें ओरडला कीं, "आज दशमी आहे, तेव्हां सर्वांनीं एकभुक्त रहावें उदईक एकादशी आहे, तर उद्यां कोणींहि अन्न ग्रहण करूं नये, सर्वांनीं निरशन करावें, गुरांना गवत आणि लहान मुलांना मातेनें स्तन देखील देऊं नये." अशी दवंडी देऊन तो दवंडी देणारा पुढें निघून गेला. राजानें ते शब्द ऐकल्यावर त्याला त्या व्रताची आठवण झाली, व आपण आजवर तें व्रत केलें नाहीं, याबद्दल त्याला फार पश्चात्ताप वाटूं लागला. त्यानें हातांतला विडा फेंकून दिला आणि तो पलंगावरून उठून खालीं बसला. तेव्हां मोहिनी ह्मणाली, "हे राजेंद्रा ! एकाएकीं माझ्या जवळून उठून आपण भूमीवर कां बसलांत ?" राजा ह्मणाला, "उदईक एकादशी आहे, तें महाव्रत मला करावयाचें आहे. तेव्हां आतां मी एकभुक्त राहून द्वादशीपर्यंत भोगविलास कांहीं- एक करणार नाहीं." हें ऐकून मोहिनी राजाला ह्मणाली, "राजा ! तूं मला भाष्यदान दिलें आहेस, तेव्हां माझ्या आज्ञेवांचून तूं जर हें व्रत करशील तर

मीहि उपाशीं राहीन. राजानें मोहिनीच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष न देतां श्रीहरीचें भजन, पूजन, जागरण, कीर्तन, वगैरे करून एकादशीचें व्रत केलें, दुसरे दिवशीं द्वादशीची पारणा करण्यासाठीं राजानें उत्तम प्रकारच्या भोजनाची तयारी केली, त्यावेळीं राजानें सहस्र ब्राह्मणांना भोजनाला बोलावून त्यांना सहस्र गाई दिल्या व दक्षिणा वगैरे देऊन त्यांचा योग्य सत्कार केला आणि नंतर आपण भोजनास बसला. नंतर स्त्रियांची जेवणाची तयारी झाली, पण मोहिनी रागावली होती ती जेवणासाठीं मुळींच उठेना, राणी संध्यावळीनें व कुमार धर्मांगदानें तिची पुष्कळ समजूत केली, पण ती मोहिनी मुळींच ऐकेना. तिला संध्यावळी ह्मणाली, "बाई मोहिनी! पतीवर स्त्रीनें रागावणें हा स्त्रीचा धर्म नसून ती नरकाची सामग्री मात्र होय, पति हेंच स्त्रीचें दैवत होय, पतीला असंतुष्ट करणें हे मोठें पातक होय, स्त्रीनें नेहमीं पतीची पूजा करून पतीचे आज्ञेंत रहावें, मुलाला आईबाप हेच देव आहेत, सेवकाला स्वामी हाच देव, त्याचप्रमाणें स्त्रीला पति हाच देव आहे, तर हे मोहिनी! तूं व्यर्थ पतिद्रोह करून अळीप्रमाणें दंड भोगूं नकोस."

## ४ अळीची कथा.

रुक्मांगदाची कथा सांगत असतां अळीचा वृत्तांत आला, तेव्हां तो ऐकण्याची जनमेजय राजानें इच्छा दर्शविली, व वैशंपायन ऋषि अळीची गोष्ट सांगूं लागला. "एका झाडामध्यें एक अळी पांचशें वर्षेंपर्यंत होती, पुढें सुतारानें करवत घालून तें झाड कापलें, तेव्हां ती अळी त्या झाडाच्या गर्भांतून बाहेर पडली. ती अळी बाहेर पडल्याबरोबर एक कावळा आला व त्यानें तिला चोंचींत धरून आकाशांत उड्डाण केलें. त्या कावळ्याची नखें लागून व त्याची चोंच लागून त्या अळीला फार त्रास होऊं लागला, तेव्हां ती त्या कावळ्याला ह्मणाली, "बा कावळ्या! तूं कां माझा छळ करितोस?" त्यावेळीं कावळा ह्मणाला; "बाई अळी! मी यमाचा किंकर असून त्याच्या आज्ञेप्रमाणें तुला त्रास देत आहें. हे एवढे कष्ट तूं पतिद्रोहामुळें भोगीत आहेस. तूं पूर्वी ब्राह्मणाची स्त्री असून तुझा पति काशी देशचा राहणारा होता. तो जुगारी असल्यामुळें त्यानें एकदां द्युतांत सर्व द्रव्य गमावलें, तेव्हां द्युतांतील इतर लोक त्याच्याजवळ पैसे मागूं लागले, पण पैसा नसल्यामुळें तो आपल्या देणेकऱ्यांनां तुझ्याकडे घेऊन आला व तुझ्या अंगावरील दागीने दे, असें म्हणूं लागला; पण तूं त्याला दागीने न देतां म्हणालीस, हे सर्व दागीने माझ्या माहेरचे आहेत; पतीचें असें फक्त अशी ही गळसरी आहे, ती घ्या, असें म्हणून तूं ती गळसरी रागानें तोडून टाकिलीस; तेव्हां त्या देणेकऱ्यांनीं तुझ्या पतीला फार मारलें, तरी तुला त्याची दया आली नाहीं, पुढें तुझा पती त्या सावकारांच्या धाकानें अरण्यांत पळून गेला. तेथें तिची व एका राजकन्येची गाठ झाली, ती राजकन्या काशीराजाची असून

ती झोंपेंत असतां एका राक्षसानें तिला दुष्टबुद्धीनें अरण्यांत आणलें होतें. त्या वेळीं तो राक्षस निद्रिस्थ असून, ती राजकन्या आपल्या सुटकेचा मार्ग शोधीत होती; इतक्यांत तुझा पति तिच्या दृष्टीस पडला, तेव्हां ती त्याला ह्मणाली, हे ब्राह्मणा, या राक्षसाचा नाश करून तूं माझा स्वीकार कर. राजकन्येच्या त्या विनंतीप्रमाणें तुझ्या पतीनें त्या राक्षसाचा त्रिशूळ घेऊन त्याचा नाश केला व त्या राजकन्येचा स्वीकार केला. पुढें ती राजकन्या तुझ्या पतीला आपल्या बापाकडे घेऊन गेली, व त्याला तिनें झालेली सर्व हकीकत सांगितली. तेव्हां राजानें तुझ्या पतीचा सत्कार करून राजकन्येबरोबर त्याचें लग्न केलें व आपलें सर्व राज्य जांवयास दिलें. पुढें तुझ्या पतीनें तुला आपल्या-जवळ आणून तुझी बरदास्तही राणीप्रमाणें ठेविली. पुढें कांहीं दिवसांनीं तुला मरण प्राप्त झाल्यावर यमदूतांनीं तुला नरकांत नेऊन टाकलें; तेथें तुझी अत्यंत हालअपेष्टा झाल्यावर मग तुला बेडकुळीचा जन्म प्राप्त झाला; त्या स्थितींत तूं शंभर वर्षें हाल अपेष्टा भोगल्यावर एका कावळ्यानें तुला मारलें; नंतर तूं ह्या जन्मास आलीस. आतां यापुढें तुला कोणती शिक्षा होणार आहे, व कोणता जन्म प्राप्त होणार आहे, तें मला माहित नाहीं.'' असें त्या कावळ्यानें त्या अळीला सांगून तिला तो यमलोकीं घेऊन गेला.

## ५ धर्मांगदाचा शिरच्छेद.

राणी संध्यावळीनें त्या मोहिनीला अळीचें उदाहरण देऊन पुष्कळ उप-देश केला, परंतु मोहिनीनें तिकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. ती राजावर क्रुद्ध होऊन ह्मणाली, " राजा! तूं मला भाष्यदान दिलें आहेस, त्याप्रमाणें या एकादशाच्या व्रताचा त्याग कर, किंवा तें व्रत तुला सोडावयाचें नसल्यास तुझा मुलगा जो धर्मांगद त्याचें शिर मला दे; आणि ह्या दोन्हीही गोष्टी तुला पसंत नसतील तर मी तुझ्या घरीं अन्न ग्रहण करणार नाहीं. मोहिनीचे ते निर्वाणीचे उद्गार ऐकून राजा मोठ्या संकटांत पडला. त्याला त्या वेळीं काय करावें तें सुचेना. मुलाचा वध करावा तरी तें अनिष्टच; बरें व्रत सोडावें तर नरकाची प्राप्ति होणार. अशा अडचणींत राजा सांपडल्यावर त्याचा मुलगा धर्मांगद राजाकडे आला व राजाला ह्मणाला, " बाबा! माझें शीर मी मोहिनीला देण्याला आनंदानें तयार आहें; पण आपण हें एकादशीचें व्रत कदापि सोडूं नये. बापासाठीं मुलानें आपला प्राण खर्ची घालणें यांत विशेष असें कांहींच नाहीं. पित्याच्या आज्ञेप्रमाणें रामलक्ष्मणानें राज्याचा त्याग करून वनवास पत्करला; श्रावणानें बापासाठीं प्राणत्याग केला; पुंडलिकानें आपलें सर्व आयुष्य आईबापांच्या सेवेंत खर्चिलें; सिळ्यानें बापासाठीं शरीर देऊन शंभूला संतोषित केलें; पुरूनें पित्याच्या कल्या-णासाठीं बापाची जरा घेतली; भीष्मानें आजन्म ब्रह्मचर्य स्वीकारिलें; त्याप्र

माणें माझ्या शरीराचा उपयोग तुह्मांसाठीं झाल्यास त्यांत माझें कल्याणच आहे. यावेळीं आपण माझा मोह सोडून देऊन व्रताचें रक्षण करावें अशी माझी आपणास विनंति आहे. " पुत्राचें हें बोलणें ऐकून राजानें व्रताचें रक्षण करण्याचा निश्चय केला, व पुत्राचा वध करण्याचें ठरविलें. राजा मोहिनीला ह्मणाला, मोहिनी ! हा माझा धर्मांगद पुत्र मीं माझ्या व्रताचें संरक्षणासाठीं तुझ्या स्वाधीन केला आहे; तूं याचें शिर तोड अथवा वाटेल तें कर. तेव्हां मोहिनी म्हणाली; "राजा ! ज्याला भोजनाला बोलावतात त्याला कोणी शिधा घेऊन ये असें सांगत नाहीं; किंवा देवाच्या पूजेसाठीं, देवालाच कोणी फुलें घेऊन ये, असें सांगत नाहीं; तुला जर आपलें व्रत राखावयाचें असेल, तर स्वतःच्या हातानें मुलाचें शिर तोडून तें मला दे. " हें मोहिनीचें कटु वाक्य ऐकून राजाला फार दुःख झालें; पण त्यानें व्रत सोडावयाचें नाकारलें नाहीं. तो पुत्रवधाला उद्युक्त झाला. राणी संध्यावळीनें, राजाला व्रतासाठीं पुत्रवधास अनुमति दिली, व तिनें मुलाला अभ्यंग स्नान घालून त्याच्या अंगाला चंदन लावलें; गळ्यांत तुळशीच्या माळा घातल्या; त्याचेकडून श्रीहरीला नमस्कार करविला आणि मग तिनें त्याला राजासमोर आणून उभा केला. धर्मांगदानें आईबापांच्या चरणावर मस्तक ठेवून जन्मोजन्मीं संध्यावळीसारखी आई व रुक्मांगदासारखा बाप मिळावा अशी श्रीहरीची विनंति केली, व तो बापापुढें मान करून उभा राहिला. राजानें म्यानांतून तरवार काढून ती स्वच्छ पुसली, व श्रीहरीचें चिंतन करूं लागला. तो विलक्षण प्रकार पाहण्यासाठीं आकाशांत देव विमानांत बसून आले होते. नारदाचे कानावर ती गोष्ट गेल्यावर तो विष्णूकडे गेला व विष्णूला ह्मणाला, " हे देवाधिदेवा नारायणा ! तुझें व्रत करीत असतां त्या तुझ्या धर्मांगदावर कोण प्रसंग आला आहे, त्याची तुला दादहि नाहीं; त्याचा बाप व्रताच्या संरक्षणासाठीं त्याचा वध करीत आहे, तर हे जगजेठी, आतां विलंब न करितां कांतीनगरास जाऊन त्या पुण्यशील धर्मांगदाचें रक्षण कर. " नारदानें श्रीहरीची याप्रमाणें करुणा भाकल्यावर त्या भक्तवत्सल प्रभूला धर्मांगदाची दया आली व तो मोठ्या त्वरेनें कांतीनगरास येऊन आतां रुक्मांगद धर्मांगदाचे मानेवर तरवार घालणार; तोंच त्यानें रुक्मांगदाचे हात मागून धरले. सर्व लोक पाहतात, तों शंखचक्रगदापद्मधारी भगवान् विष्णु साक्षात् उभे आहेत. त्या एकादशीच्या व्रतामुळें त्यावेळीं नगरांतील सर्व आबालवृद्धांना श्रीहरीचें दर्शन झालें. मग राजानें श्रीहरीचे चरण धुवून तें तीर्थ सर्वांनां दिलें. इतक्यांत वैकुंठाहून हजारों विमानें आलीं, त्या विमानांत श्रीहरीनीं सर्वांना बसवून वैकुंठास नेलें. मागें फक्त मोहिनी तेवढी राहिली.

या एकादशीच्या व्रतामुळें सर्व कांतीनगरचे लोक सदेह वैकुंठास गेले. तो प्रकार पाहून इंद्रादि देवांची मोठी फजिती झाल्यासारखें झालें. त्यांनीं मोहिनीला वर

स्वर्गांत नेण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण पतिद्रोहाच्या पातकामुळें ती देवलोकीं जाण्यास असमर्थ झाली. पुढें त्या मोहिनीला नरक प्राप्त झाला, व ती त्या भयंकर नरकांत कीटक होऊन पडली. स्वतः यमानें व इंद्रानें तिला देवलोकाहून पाठवून तिची अशी दशा केली होती, पण त्यांना तिची सोडवणूक करितां येईना. तेव्हां ते विष्णूकडे गेले व तिची सुटका करा म्हणून म्हणूं लागले. पण विष्णूनेंहि ती गोष्ट अशक्य आहे असें कळविलें, व रुक्मांगदाकडे जाण्यास सांगितलें; त्याप्रमाणें यम व इंद्र रुक्मांगदाकडे आले. तेव्हां रुक्मांगदानें एका एकादशीचें पुण्य देऊन त्या मोहिनीची नरकांतून सोडवणूक केली; असें हें एकादशीचें व्रत पुण्यकारक आहे."

## अध्याय १० वा.

### गंगा व गोदा यांचें पृथ्वीवर आगमन.

#### १ भगीरथराजाचा प्रयत्न.

एकादशीचें व्रत जसें पृथ्वीवर लोकांच्या उद्धारासाठीं आलें आहे, त्याचप्रमाणें भागीरथी व गोदावरी ह्या नद्या लोकांच्या पापक्षालनासाठीं स्वर्गाहून पृथ्वीवर आल्या आहेत. त्या पृथ्वीवर कशा आल्या, याविषयीं जनमेजय राजानें वैशंपायनऋषींनीं विचारल्यावरून, वैशंपायनऋषि त्या पुण्यपावन पवित्र नद्यांची कथा राजाला सांगूं लागले. ते म्हणाले; "राजा! पूर्वी पंचकर्ण येथें बाहुक या नांवांचा एक सूर्यवंशी, अत्यंत उदार व धर्मशील राजा होऊन गेला. तो अकस्मात् मृत पावल्यावर त्याच्या स्त्रीनें अग्निप्रवेश करण्याचा विचार केला, व त्याप्रमाणें तिनें सिद्धता करून ती सिद्ध केलेल्या अग्निजवळ गेली; पण इतक्यांत उर्ग नांवाचा ऋषि तेथें आला, व त्या स्त्रीला म्हणाला; "हे स्त्रिये! तूं गरोदर आहेस तेव्हां तुला अग्निप्रवेश करणें हें निषिद्ध आहे." तें ऋषीचें बोलणें ऐकून त्या स्त्रीनें अग्निप्रवेश करण्याचा विचार रहित केला व ती मंदिरांत परत आली. पुढें कांहीं काळ गेल्यावर ती प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. त्याचें नांव सगर असें ठेविलें. सगर मोठा झाला व पुढें त्याला साठ हजार पुत्र झाले. कांहीं काळ गेल्यानंतर त्या मुलांनीं बापाला अशी विनंति केली कीं, "आम्ही एवढे साठ सहस्र पुत्र तुम्हाला आहोंत, तेव्हां तुम्ही अश्वमेध करा." बापानें ती आपल्या मुलांची इच्छा पाहून मोठा संतोष दर्शविला व अश्वमेधाची सर्व तयारी करून एक सर्वोत्कृष्ट घोडा भूमंडळावर संचार करण्यासाठीं सोडला. पुढें कांहीं दिवसांनीं इंद्रानें तो घोडा धरला व कपिल ऋषींच्या आश्रमांत तो बांधून ठेवला. हा प्रकार कपिल ऋषींना मुळींच माहित नव्हता.

त्या घोड्याचा शोध करीत करीत सगर राजाचे पुत्र हिंडत असतां त्यांना घोडा कोठेंहि दृष्टीस पडेना. तेव्हां त्यांनीं पृथ्वीला भोंक पाडून पाताळांत घोडा शोधण्याचा प्रयत्न केला, पण त्या पाडलेल्या भोंकांतून एकसारखें पृथ्वीवर पाणी येऊन जिकडे तिकडे जलमय होऊन गेलें. सगराच्या पुत्रांनीं तो जलसंचय पृथ्वीवर आणला ह्मणून त्याला सागर असें ह्मणतात; त्या पाडलेल्या विवरांतून सगराचे साठ सहस्र पुत्र पाताळांत गेले व तेथें घोड्याचा शोध करूं लागले, तों घोडा कपील महामुनीचे आश्रमांत बांधलेला दिसला. तेव्हां त्या राजपुत्रांनां–ऋषीनेंच घोडा बांधला,–असा संशय आल्यावरून त्यांनीं ऋषीला ओढलें व घोडा चोरला–ह्मणून दोष देऊं लागले. त्या राजपुत्रांचा तो उन्मत्तपणा पाहून ऋषीला फार कोप आला व त्यानें ते साठ सहस्र राजपुत्र जाळून टाकले. इकडे घोड्याचाही शोध नाहीं, व पुत्रही येत नाहींत, असें पाहून सगर राजा फार काळजींत पडला. त्या राजाचा असीमा नांवाचा नातू होता, त्याला शेवटीं राजानें पुत्रांच्या शोधार्थ पाठविलें. तो असीमा शोध करीत करीत कपिल मुनीचे आश्रमीं आला, तेव्हां तों घोडा व जळत असलेले पितर त्याच्या दृष्टीस पडले. मग त्या असीमानें कपिल मुनीच्या चरणावर मस्तक ठेऊन त्यांची अनन्य भावानें क्षमा मागितली, व पितरांनां जिवंत करावें ह्मणून विनंति केली. त्या वेळीं कपिल मुनी ह्मणाले; "हे असीमा! या तुझ्या पितरांचा उद्धार करण्यास एक स्वर्गांतील गंगा मात्र समर्थ आहे. तिचें पाणी यांच्यावर टाकल्यास, यांची या अधःपातापासून मुक्ति होईल." कपिल मुनीनें असें सांगितल्यावर असीमा आपल्या नगराला परत आला व त्यानें झालेला सर्व प्रकार आपल्या पितामहाला निवेदन करून आपण गंगेच्या प्राप्तीसाठीं तपश्चर्या करीत बसला. त्यानें अनंत वर्षे तपश्चर्या केली व शेवटा त्यांतच त्याचा अंत झाला, पण त्याला गंगेची प्राप्ति झाली नाहीं. पुढें त्याचा पुत्र दिलीप गंगेच्या प्राप्तीसाठीं तपश्चर्येला बसला. पण त्यालाहि गंगेची प्राप्ति न होतां त्याचाही तपश्चर्या करण्यांतच अंत झाला. पुढें त्याचा पुत्र भगीरथ यानें एकनिष्ठपणें एक सहस्र वर्षे तपश्चर्या केल्यावर सालंकृत अशी एक शुभ्रवस्त्र नेसलेली व शुभ्र चोळी घातलेली पवित्र व शांत स्त्री त्याच्या स्वप्नांत आली, व ती भगीरथाला ह्मणाली, "हे भगीरथा! तुला मी प्रसन्न झालें आहे, व त्याप्रमाणें मी पृथ्वीवर येण्यासही तयार आहें, परंतु माझी गति सहन करण्याला योग्य असें पात्र पहा, ह्मणजे मी पृथ्वीवर येईन." असें सांगून गंगा अदृश्य झाली. मग भगीरथराजानें तपश्चर्येनें महादेवास प्रसन्न करून घेतलें, व ह्मणाला, "भगवन्! स्वर्गगंगेचा ओघ सहन करण्यास पृथ्वीवर योग्य असें पात्र नाहीं, तेव्हां ती आल्याबरोबर आपण तिला मस्तकीं धारण करावी," महादेवानें 'तथास्तु' ह्मणून भगीरथ राजाची विनंती मान्य केली. तेव्हां भगीरथ

राजानें गंगेची प्रार्थना करून तिला येण्याविषयीं सुचविलें. त्याबरोबर स्वर्गांतून धोधो करित गंगा आली. तिला महादेवानें आपल्या मस्तकीं धारण केलें. समुद्र मंथनाचे वेळीं वासुकीचें गरळ महादेवानें प्राशन केल्यामुळें त्याच्या शरीराचा दाह होत होता, तो मस्तकावर गंगा धारण केल्यामुळें नाहींसा झाला. याचें कारण गंगा ही भगवंताच्या चरणाचें तीर्थ आहे. ती शंकरानीं मस्तकावर धारण केल्या-वर त्यांतून एक जवभर भगीरथराजाला दिली."

## २ भागीरथीची स्वर्गांत उत्पत्ति.

हे जनमेजय राजा, आतां स्वर्गांत गंगेची उत्पत्ति कशी झाली, तें तुला सांगतों. "एकदां शंकर व पार्वती जवळ जवळ बसलीं होतीं, व त्यांच्या पासून थोड्या अंतरावर बसून ब्रह्मदेव वेद पठण करीत होता; इतक्यांत वाऱ्याच्या योगानें पार्वतीच्या अंगावरील वस्त्र उडून तिचे कांहीं अवयव ब्रह्मदेवाच्या दृष्टीस पडले. त्यामुळें ब्रह्मदेवाला कामोत्पत्ति होऊन रेत स्खलन झालें. तें वीर्य भूमी-वर पडल्यावर ब्रह्मदेवाला मोठी लज्जा उत्पन्न झाली, व त्यानें तें वीर्य पायानें पुसून टाकण्याचा प्रयत्न केला, पण त्या त्याच्या प्रयत्नाला यश न येतां त्या वीर्या पासून वालखिल्य वगैरे साठसहस्र मुलें निर्माण झालीं. तो प्रकार पाहून सर्व देवांनीं ब्रह्मदेवाला त्यानें मानसिक रीतीनें जगन्माता अभिलाषिली म्हणून दोषी ठरविलें, व त्याला प्रायश्चित्त देण्याची ते तजवीज करूं लागले. तेव्हां देवांनीं सर्व त्रिभुवनांतील तीर्थें, महान महान तपस्वी, मोठमोठे ऋषि, यांनां बोलावून त्यांनां आपआपला पुण्यांश देण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्या सर्वांनीं पुण्यांश देऊन त्याचा एक कलश भरला. मग त्या कलशांतल्या पाण्यानें ब्रह्मदेवाला अभिषेक केला. त्यावेळीं ब्रह्मदेवाजवळ असलेला कमंडलू त्या पाण्यानें भरून गेला. पुढें बळीचे वेळां भगवान् श्रीहरि पाताळीं जाऊन राहिले तेव्हां ब्रह्मदेवानें आपणाजवळ विष्णुपदाची स्थापना करून त्याची तो पूजा करूं लागला. त्या विष्णुपदावर त्यानें आपल्या कमंडलूंत पडलेलें उदक घातलें तें उदक विष्णुपदा वरून वाहिल्यामुळें त्याला अधिक पवित्रता आली, व तो ओघ मंदाकिनी या नांवानें प्रसिद्ध झाला. तें विष्णुचरणाचें तीर्थ भगवानानें तिन्ही लोकीं लोकांच्या पापक्षालनासाठीं दिलें आहे. स्वर्गांत ही नदी मंदाकिनी या नांवानें, पाताळांत भोगावती या नांवानें व पृथ्वीवर भागीरथी या नांवानें प्रसिद्ध आहे.

## ३ हरिद्वार व जान्हवी.

भगीरथराजानें जव मात्र गंगा महादेवाजवळून मागून घेऊन तो रथांत बसून निघाला, व त्याच्या मागें गंगाहि जाऊं लागली. तों वाटेंत हिमालय आडवा आला. मग भगीरथ राजानें इंद्राची प्रार्थना करून त्याचा ऐरावत मिळविला, व त्याच्याकडून पर्वत फोडून गंगेच्या ओघाला मार्ग केला. पुढें जानु (जन्हु)

या नांवाचा तापसी याग करीत बसला होता, त्याच्या जवळून भागीरथीचा ओघ जाऊं लागल्यामुळें त्याचें दर्भ वगैरे सामान वाहून जाऊं लागलें तेव्हां त्यानें तो ओघ प्राशन केला. मग भगीरथराजानें जानूची प्रार्थना करून गंगा मागितली तेव्हां जानूनें आपला जानु ह्मणजे गुडघा करंगळीनें चिरला, त्यांतून गंगा खालीं पडून पुढें वाहूं लागली. म्हणून गंगेला जाह्नवी असेंही म्हणतात. ह्मणून तिचें नांव भागीरथी असें सर्वत्र पडलें. भगीरथ. राजानें तें तीर्थ आपल्या सर्व पूर्वजांवर टाकून त्यांचा उद्धार केला. पुढें भागीरथी वहात जाऊन पूर्व सागराला सहस्र मुखांनीं मिळाली. याप्रमाणें भगीरथ राजानें स्वर्गगंगा पृथ्वीवर आणिली, पण तिचा उपयोग ऋषि वगैरे करीनात. कारण ते गंगेला शंकराचें निर्माल्य तीर्थ समजूं लागले. मग स्वतः भगवान श्रीहरि सर्व देवांसह गंगाद्वारीं आले व त्यांनीं भक्तिभावानें गंगेंत स्नान केलें. तेव्हांपासून गंगेचे सर्व दोष नाहींसे झाले असें समजून सर्व आबाल वृद्ध भागीरथींत स्नान, दान, जप, तप वगैरे करूं लागले. त्या गंगाद्वारालाहि तेव्हांपासून हरिद्वार असें ह्मणूं लागले. मकर राशीला रवि असतां या भागीरथींत जो एक मासपर्यंत स्नान करील, त्याला शंभर यज्ञांचें फल मिळेल व त्याच्या सर्व पातकांचा नाश होईल, एवढेंच नव्हे तर त्यावेळीं मिळणारें पुण्य कधींहि संपणार नाहीं, असा या भागीरथीचा महिमा आहे.

## ४ गणपतीची उत्पति व त्याची युक्ती.

भागीरथी प्रमाणेंच गोदावरीची उत्पत्ति आहे. एकदां महादेव स्नानासाठीं गंगेवर गेले असतां पार्वतीसहि स्नानाची इच्छा झाली व तिनें घरीं स्नानाची सर्व तयारी करून ती स्नानाला बसली, आंत कोणी पुरुष येऊं नये ह्मणून तिनें एक मानसपुत्र निर्माण करून त्याला दरवाजावर रक्षणासाठीं ठेविलें व आंत कोणा पुरुषाला येऊं न देण्याविषयीं तिनें बजाविलें. इकडे महादेव गंगेच्याकांठीं स्नान करून जप करित बसले असतां गजासुर या नावाचा एक मदोन्मत्त राक्षस शंकराकडे आला व त्यानें आपल्या पायानें शंकराचा कमंडलू फोडून टाकला. तेव्हां शंकरास अत्यंत क्रोध आला व त्यानीं आपल्या त्रिशूळानें राक्षसाला मारलें नंतर शंकरानें त्या राक्षसाचें कातडें काढून तें अंगावर परिधान केलें व कमंडलू ऐवजीं त्याचें मुख घेऊन ते घरीं आले, परंतु दारावर संरक्षणासाठीं असलेला गण, त्यांना घरांत जाऊं देईना. तेव्हां महादेवांनां त्या गणाचा राग आला व त्यांनीं आपल्या त्रिशूळानें गणाचें डोकें कापलें. इतक्यांत पार्वती स्नान करून बाहेर आली, तिनें तो प्रकार पाहिल्यावर ती महादेवाला ह्मणाली, " अहो ! हा मी माझे संरक्षणासाठीं पुत्र निर्माण केला होता, याचें डोकें तुह्मीं निष्कारण कापलं ! " तेव्हां महादेवानें आपल्या हातांतील गजासुर दैत्याचें मुख गणाचे धडावर बसवून त्याला जिवंत केलें. व त्याचें नांव महादेवांनीं विघ्नेश असें

ठेवून त्याला सर्व गणांचा राजा केला व त्याला सर्व विद्या व कला शिकविल्या. पुढें कांहीं दिवसांनीं पार्वती गणपतीला ह्मणाली; "गणपती! महादेव गंगेसह अनेक विलास करतात, हें मला पाहवत नाहीं, तर तिला कोणत्यातरी युक्तीनें महादेवाजवळून दूर कर," तेव्हां गणपती ह्मणाला; "आई! यांत मोठेंसें कठीण असें कांहीं नाहीं, मी सांगतों तसें तूं कर. आपली जया या नांवाची जी दासी आहे, तिला गाईचें रूप धारण करून पृथ्वीवर जाण्यास सांग. सांप्रत पृथ्वीवर मोठें अवर्षण पडलें असून तें बारा वर्षें राहणारें आहे. या दुष्काळांत बद्रिकारण्यांतील ऋषि दंडकारण्यांत गौतम ऋषीच्या आश्रमांत जाऊन राहिले आहेत. तेथें गौतम ऋषि नित्य साळी पेरतात, त्या मंत्र बळानें बारा घटकेंत तयार होतात मग त्या कांडून कुटून त्याचा भात करितात व त्यावर सर्व ऋषि आपलें उपजीवन करीत आहेत. त्या साळीच्या शेतांत जयानें गाय होऊन जाऊन तेथल्या साळी खाव्यात, आणि ऋषीनें हांकलून दिल्यास प्राण सोडावा." गणपतीनें याप्रमाणें पार्वतीला सांगितल्यावर तिनें जयाला गायीचें रूप देऊन पृथ्वीवर पाठविलें. इकडे गणपतीहि गणेशभट्ट होऊन गौतमऋषीचे आश्रमांत येऊन राहिला. त्या गणेशभट्टाची विद्वत्ता पाहून सर्व ऋषि प्रसन्न झाले व त्यांनीं त्याला मोठ्या सत्कारानें आश्रमांत ठेवून घेतलें. पुढें ठरल्याप्रमाणें ती गाय रोज गौतम ऋषीच्या साळीच्या शेतांत येऊन साळी खाऊं लागली. दुष्काळाचे दिवस असल्यामुळें त्या नुकसानीबद्दल गौतम ऋषीला फार वाईट वाटलें व तो शेताच्या संरक्षणासाठीं बसला. इतक्यांत रोजच्याप्रमाणें गाय येऊन साळी खाऊं लागली, तेव्हां गौतम ऋषि गायीजवळ जाऊन तिला हाकूं लागला, तोंच त्या गायीनें प्राण सोडला.

गौतम ऋषीच्या हातानें याप्रमाणें गायीची हत्या झाल्यावर सर्व ऋषि मंडळी महापाप महापाप ह्मणूं लागले, गौतमाच्या आश्रमांत अन्नपाण्याला स्पर्शहि न करितां सर्व ऋषि आश्रमाबाहेर पडले, व गौतमाला प्रायश्चित्त घे असें ह्मणूं लागले. तेव्हां गौतमानें गोहत्येला कोणतें प्रायश्चित्त आहे तें ऋषींनां विचारलें. त्या सर्व ऋषींमध्यें गणेशभट्ट महा विद्वान होता; तो ह्मणाला, "गौतमा! तूं जर शंकराच्या मस्तकावरील गंगा मिळविशील तर त्यायोगें या गोहत्येच्या पातकापासून मुक्त होशील." गणेशभट्टानीं असें सांगितल्यावर गौतम ब्रह्मगिरी पर्वतावर येऊन शंकराची तपश्चर्या करीत बसला. दोन सहस्र वर्षें कांहींएक न खातां एका अंगुष्ठावर गौतमानें एकनिष्ठपणें तपश्चर्या केल्यावर भगवान् महादेव त्यास प्रसन्न झाले व काय इच्छित वर असेल तो माग, असें ह्मणाले. तेव्हां गौतम ऋषि ह्मणाला, "हे कैलासपते! मजकडून गोहत्या झाली आहे, त्या पापक्षालनासाठीं गंगा मिळावी अशी इच्छा आहे, गंगा मिळाल्यास माझा उद्धार होऊन अनेक लोकांचेंहि पापक्षालन होईल." गौतमाचें हें मागणें

ऐकून महादेव ह्मणाले; "गौतमा ! तिनें मृत्युलोकीं यावें अशी तुझी इच्छा असल्यास तूं गंगेची प्रार्थना करून तिला प्रसन्न कर." असें सांगून महादेव निघून गेले, मग गौतमऋषि गंगेच्या तपश्चर्येला बसले, त्यांनीं हजार वर्षें गंगेची तपश्चर्या केल्यावर गंगा श्वेतवस्त्र परिधान करून व सर्व अलंकारांनीं अलंकृत होऊन गौतमापुढें येऊन उभी राहिली. ती पतितोद्धारिणी पवित्र मूर्ति पाहून गौतमानें तिच्या चरणावर मस्तक ठेवून तिला मृत्युलोकीं येण्याविषयीं विनंति केली. तेव्हां गंगा ह्मणाली; "गौतमा ! मी तुझ्या इच्छेप्रमाणें मृत्युलोकीं येईन, पण तूं पुन्हां महादेवास प्रसन्न करून त्यांची अनुमति मिळीव." त्याप्रमाणें गौतमानें महादेवांची प्रार्थना केल्यावर ते प्रगट झाले व त्यांना आपल्या मस्तकावरील एक जटा गौतमास दिली.

## ५ गौतमाचें आगमन.

गौतमानें शंकराची जटा मिळविल्यावर ती ब्रह्मगिरीवर नेली व औदुंबराचे ढोलींत ठेविली, त्याबरोबर गंगेचा प्रवाह सुरू होऊन तो पश्चिम सागराकडे वाहूं लागला. तो वैतरणी या नांवानें प्रसिद्ध झाला. गंगेचा ओघ वास्तविक पूर्व सागराला मिळावा अशी गौतमाची इच्छा होती, पण ओघ पश्चिमेकडे वाहूं लागला हें पाहून त्याची मोठी निराशा झाली. मग त्यानें गंगेची प्रार्थना करून तिला पूर्व सागराकडे जाण्याविषयीं विनंति केली. त्यावेळीं तेथें सर्व देव आले व त्यांनीं तेथें स्नानें केलीं, त्या स्थळाला कोटीतीर्थ असें ह्मणतात. पुढें ती पूर्व सागराकडे वळली, परतु पर्वतांत अदृश्य झाली. तेव्हां गौतमानें पुन्हां गंगेची प्रार्थना केल्यावर गंगा प्रगट झाली, पण पुढें पुन्हां अदृश्य झाली, तेव्हां गौतमास फार राग आला व त्यानें भूमींत पाताळापर्यंत दर्भ (कुश) घालून पाताळांतलें अमृत वर काढलें. तो अमृतरस दर्भा(कुशा)मुळें भूमीवर बाहेर आला, ह्मणून त्या ओघाला कुशावर्त असें ह्मणूं लागले. गौतमानें गंगा आणली ह्मणून तिला गौतमी अथवा गोदावरी असें म्हणूं लागले. ही गोदावरी ह्मणजे विष्णुचरणाचें अमृत होय त्या नदींत सिंहस्थसमयीं स्नान केल्यास यज्ञ करण्याइतकें पुण्य मिळतें. ती गोदा पूर्व समुद्राला सप्त मुखानें जाऊन मिळाली आहे. त्याप्रमाणेंच गंगेचा अंश जी वैतरणी ती ब्रह्मगिरीचे मागचे बाजूनें निघून पश्चिम समुद्राला मिळाली. त्या वैतरणीचे कांठीं एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी करणारे परशुराम राहिले होते. याप्रमाणें पृथ्वीवर भगीरथ राजानें भागीरथी आणली व गोदावरी व वैतरणी ह्या नद्याहि तिच्याच अंशभूत आहेत. ह्या पुण्यपावन नद्या केवळ पतितांचा उद्धार करण्यासाठीं पृथ्वीवर अवतीर्ण झाल्या आहेत."

# अध्याय ११ वा.

## रेणुका व जमदग्नीची कथा.

### १ रेणुकेचा जन्म.

जनमेजय राजानें वैशंपायन ऋषीला परशुरामाची कथा सांगण्याची विनंति केल्यावरून वैशंपायन ऋषि, जनमेजय राजाला परशुरामाची कथा सांगूं लागले. ते ह्मणाले; " राजा ! पूर्वी इक्ष्वाकु वंशांत रेणु या नांवाचा एक महान् पराक्रमी राजा होऊन गेला. भागीरथीचे कांठीं कान्यकुब्ज नांवाच्या प्रसिद्ध शहरीं राहून तो आपल्या राज्याचा बंदोबस्त करीत असे. त्या राजाला कांहीं संतति नसल्यामुळें त्यानें पुत्रप्राप्तीसाठीं शंकराची भक्तिभावानें कांहीं वर्षे सेवा केली, तेव्हां महादेव त्याला प्रसन्न होऊन ह्मणाले; " हे रेणु राजा ! तुला एक उत्तम, सुशील, सर्वगुणसंपन्न अशी मुलगी होईल. आदिमायेप्रमाणें ती शक्तिशाली होईल व तिची कीर्ति दिगंतरीं होईल. तिच्या दर्शनानें व नामस्मरणानें विघ्नांचा नाश होईल. त्या तुझ्या मुलीची पुराणें देखील स्तुति करतील. तसेंच तुला त्या कन्येनंतर एक पुत्रहि होईल. " याप्रमाणें रेणु राजाला सांगून महादेव तेथून निघून गेले. पुढें रेणु राजानें अत्रि, वसिष्ठ, भार्गव, गालव, गौतम, कौंडिण्य, जैमिनी, ब्रह्मनंदन, मांडव्य, गर्ग, जाबालिक, शौनक, भारद्वाज, सम्यक, दाल्भ्य, देवल, विभांडक, वगैरे ऋषींना बोलावून, पुत्रप्राप्तीसाठीं यागाला आरंभ केला. त्या यागासाठीं अनेक विद्वान् व पवित्र असे ब्राह्मण आले होते, व पाहुण्याकरितां गंधर्व, किन्नर, वगैरेहि आले होते. त्या यागाचे वेळीं पूर्णाहुती झाल्यावर यज्ञकुंडांतून एक तेजःपुंज व सर्वांगसुंदर कन्या निघाली, ऋषींनीं त्या कन्येला उचलून घेऊन राजाच्या मांडीवर बसविलें व त्या कन्येला व राजाला आशीर्वाद दिला. देवांनींहि दुंदुभी वाजवून मोठा जयघोष केला, व त्या कन्येच्या उदरीं भगवान् अवतार घेणार म्हणून तिच्यावर पुष्पवृष्टि केली. रेणु राजानें त्या कन्येचें नांव रेणुका असें ठेविलें. त्यानें आरंभिलेला याग यथासांग पूर्ण केल्यावर त्याला कांहीं दिवसांनीं एक पुत्र झाला, त्याच नांव त्यानें शूरसेन असें ठेविलें.

ही अग्निकुंडांतून निघालेली रेणुका जगन्माता पार्वती व कश्यपाची स्त्री जी अदिती, या दोघींचा अवतार होय. एकदां पृथ्वीवर पाप फार झालें व लोकांना दुष्टांपासून अत्यंत त्रास होऊं लागला. सर्व देवहि त्यामुळें फार त्रस्त झाले व ते ब्रह्मदेवासह क्षीरसागरीं येऊन दुष्टांचा संहार करण्याकरितां शेषशाई नारायणाची प्रार्थना करून म्हणाले; " हे देवाधिदेवा ! हे अनंता ! हे करुणाकरा ! हे जगन्निवासा ! हे दीनवत्सल प्रभो ! पृथ्वीवर दुष्टांनीं अत्यंत

प्रळय मांडला आहे, त्यामुळें सर्व प्राणी त्रस्त झाले आहेत. या वेळीं तूं दुष्टांचा संहार न केल्यास सर्व पृथ्वीवर हाहाःकार होईल. हे प्रभो ! हिरण्याक्षाचे वेळीं वराह अवतार, हिरण्यकश्यपूचे वेळीं नृसिंह अवतार, व बळीचे वेळीं वामन अवतार घेऊन त्यांचें हनन केलेंस, त्याचप्रमाणें प्रभो यावेळीं अवतार धारण करून पृथ्वीवर उन्मत्त झालेल्या राक्षसांचा तूं संहार कर." देवांची ती करुणा-वाणी ऐकून भगवान् श्रीविष्णु प्रसन्न झाले व म्हणाले; " मी लवकरच अवतार धारण करून दुष्टांचा संहार करीन, परंतु या वेळीं मी अदितीचे उदरीं संपूर्ण अंशानें येणार आहें, तेव्हां मी तिचे गर्भी असतां ती माझें तेज सहन करील अशी कांहीं व्यवस्था करा." लक्ष्मीरमण श्रीपतींनीं, याप्रमाणें देवांना आश्वासन दिल्यावर देव आनंदित होऊन निघाले ते अदितीकडे आले. तिला त्यांनीं झालेलें सर्व वर्तमान सांगून प्रभु गर्भांत आल्यावर त्यांचें तेज सहन व्हावें म्हणून तिला आपआपली तेजशक्ति दिली; परंतु देवांच्या या तेजशक्तीनें कांहीं कार्यभाग होणार नाहीं, असें अदितीला वाटल्यावरून तिनें कैलास पर्वतावर जगन्माता जी पार्वती तिची तपश्चर्या केली; तेव्हां कित्येक वर्षांच्या तपामुळें तिला पार्वती प्रसन्न झाली. त्यावेळीं अदिती पार्वतीला म्हणाली; " हे आदिमाये जगज्जननी ! भगवान् महाविष्णु माझे उदरीं सर्व अंशानें अवतार धारण करणार आहेत, भगवंतांचें तेज मला सहन होणार नाहीं; तर हे माते पार्वती ! तूं माझ्या शरीरांत वास कर. म्हणजे मी भगवंताचा गर्भ सहन करीन." अदितीची विनंति मान्य करून पार्वती अदितीला म्हणाली; " मी तुझे ठिकाणीं वास करीन, परंतु तूं आपले पतीचे शरीरांत महादेव वास करतील अशी तजवीज कर." पार्वतीनें असें सांगितल्यावर अदिती शंकराचे तपश्चर्येला बसली व तिनें शंकरास आपल्या भक्तिबळानें प्रसन्न करून घेतलें. महादेव प्रसन्न झाल्यावर अदिती म्हणाली, " हे कैलासपते ! भगवान् श्रीपती माझे उदरीं अवतार घेणार आहेत, तर तुम्हीं व कश्यप एक होऊन माझा स्वीकार करावा." अदितीची ही विनंति ऐकून महादेव तथास्तु म्हणाले. याप्रमाणें महादेवांचा वर मिळाल्यावर अदिती आणि पार्वती एकरूप झाल्या व कश्यप आणि शंकर एकरूप झाले. त्यांनीं कन्यारूप धारण करून रेणुराजाचे घरीं यज्ञकुंडांतून प्रवेश केला. तीच ही रेणुका होय."

## २ जमदग्नि ऋषीची कथा.

राजा जनमेजया ! कश्यप व त्रिपुरारि या दोघांनीं एकरूप होऊन पृथ्वीवर कसा अवतार घेतला तें तुला सांगतों. " पूर्वी भृगुऋषि या नावाचा एक महान पवित्र तापसी होता. त्याची पुलोमा नावाची एक स्त्री होती, एकदां भृगुऋषि स्त्रीयेला आश्रमांत ठेऊन स्नानासाठीं गेला असतां मागें तालजंघासुर भृगुऋषीचें रूप धारण करून आश्रमांत आला व पुलोमेला बलात्कारानें उचलून

पळवून नेऊं लागला. त्यावेळीं पुलोमा गरोदर असल्यामुळें त्या दुष्टाच्या दांड-गाईनें तिचा गर्भ गळून पडला. तेव्हां पुलोमेला त्या राक्षसाचा अत्यंत राग आला, व तिनें त्याला शाप देऊन भस्म केलें. पुढें भृगुऋषि स्नान करून आल्यावर त्यांच्या नजरेस तो प्रकार पडला. तेव्हां त्यांनीं कमंडलूंतलें उदक गर्भावर सिंचन केलें व गर्भ सजीव केला. त्या मुलाचें नांव 'च्यवन' असें ठेवलें. पुढें त्या च्यवन ऋषीला ऋचिक या नांवाचा पुत्र झाला. तो महातापसी अत्यंत पुण्यशील ऋचिक ऋषि गोदावरीचे कांठीं आश्रम बांधून राहिला होता. त्याची तपश्चर्या फार कडक असून त्यानें एकदां कांहीं कारणावरून गोदावरीला शाप देऊन जटायूच्या प्रस्थान क्षेत्राजवळ तिचे दोन भाग केले. सोमवंशी गाधि राजानें आपली मुलगी सत्यवती या ऋचिक ऋषीला दिली होती. त्या गाधीराजानें असा पण केला होता कीं, जो सहस्र श्यामकर्ण आणून देईल त्याला मी आपली मुलगी देईन, त्या प्रमाणें ऋचिक ऋषीनें त्या गाधी-राजाला सहस्र घोडे देऊन सत्यवती मिळविली होती. एकदां एका सिंहस्थ पर्वणीचे वेळीं गाधी राजा आपली स्त्री जी पौलकुशी, तिच्यासह गोदावरीचे कांठीं आला, त्या वेळीं पौलकुशी सत्यवतीला ह्मणाली, "सत्यवती! तूं आपल्या पतीला माझ्यासाठीं विनंति करून पुत्र होईल असा वर माग." तेव्हां सत्यवती आपल्या पतीला ह्मणाली, कीं "माझ्या आईला पुत्र व्हावा अशी तिची इच्छा आहे. तसेंच मलाहि पुत्र व्हावा अशी माझी इच्छा आहे." मग ऋचिक ऋषीनें भाताचे दोन पिंड तयार करून ते मंत्रून सत्यवती जवळ दिले, व तिला सांगि-तलें कीं, यांतील क्षत्रीय पिंड तुझे आईला दे, व तापस पिंड तूं भक्षण कर. त्या प्रमाणें सत्यवतीनें पात्रावर पिंड ठेविले व आईला खाण्यासाठीं बोलविलें. पौलकुशीनें ते दोन पिंड पाहून तिला साहजिक असा संशय आला कीं, सत्य-वतीचा पिंड चांगल्या पुत्र प्राप्तीचा असावा व आपला साधारण पुत्र प्राप्तीचा असावा. ह्मणून तिनें आपल्या मुलीला पाणी आणण्यासाठीं पाठविलें व ती गेल्यावर इकडे पिंडांची अदलाबदल करून ठेविली. पुढें ते पिंड दोघींनीं खाल्यावर दोघीहि गरोदर झाल्या, परंतु दोघींनां डोहाळे निरनिराळे होऊं लागले. सत्यवतीला युद्धविषयक व पौलकुशीला स्नानसंध्येचे डोहाळे होऊं लागले. तो प्रकार पाहून सत्यवतीनें दुसराच पिंड भक्षण केला, असें ऋचिक ऋषीच्या लक्षांत आलें. तेव्हां सत्यवती आपल्या पतीला ह्मणाली, "माझी इच्छा मला सात्विक वृत्तीचा पुत्र व्हावा अशी आहे. मग ऋषीनें तशी व्यवस्था केली, पण तुझे पुत्राचे पोटीं जो पुत्र होईल तो महा तेजस्वी होईल असें तिला सांगितलें. पुढें सत्यवतीचे पोटीं त्रिपुरारी व कश्यप एक रूप होऊन आले, ऋचिक ऋषीनें त्या मुलाचें नांव जमदग्नि असें ठेविलें.

## ३ रेणुकेचें स्वयंवर.

पुढें कांहीं वर्षे गेल्यानंतर ऋचिक ऋषीच्या आश्रमांत अनेक ऋषी आले व त्या सर्वांनीं काशीयात्रेला जाण्याचा विचार केला, त्याप्रमाणें सुमुहूर्त पाहून सर्व ऋषि बरोबर जमदग्नीला घेऊन काशीयात्रेला निघाले, कांहीं दिवस मार्ग क्रमिल्यावर ऋषीनां कान्यकुब्ज नगराच्या राजानें आपल्या मुलीचें स्वयंवर मांडलें आहे असें कळल्यावरून ते ऋषि तो समारंभ पाहण्यासाठीं स्वयंवराचे मंडपात आले. स्वयंवराचे दिवशीं अनेक देशचे राजे, राजपुत्र वगैरे रेणुकेच्या प्राप्तीसाठीं आले होते. तो अपूर्व समारंभ पहावा ह्मणून सर्व ऋषि मंडपांत येऊन बसले. राजानेंहि त्यांचा योग्य सत्कार करून ऋषि समारंभास आल्याबद्दल मोटा संतोष दर्शविला, व त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांनां आसनें बसण्यासाठीं दिलीं. राजेहि बहुमूल्य अशा रत्नखचित आसनावरून रांगेनें बसले. स्वयंवराची वेळ झाल्यावर त्या रेणु राजाची मुलगी रेणुका, जरीचें झगझगीत वस्त्र नेसून व अंगावर अनेक उंची अलंकार घालून हातांत रत्नकुसुमांची माळ घेऊन स्वयंवर मंडपांत आली. स्वयंवरासाठीं आलेले राजेमहाराजे या सर्वांचें ती निरीक्षण करून केवळ स्वयंवर समारंभ पाहण्यासाठीं आलेल्या ऋषि मंडळासमोर गेली व तिनें ऋचिक ऋषीचा मुलगा जमदग्नि याचे गळ्यांत माळ घातली. रेणुका व जमदग्नि यांची गांठ या प्रमाणें पडल्यावर स्वर्गांत देवांनीं दुंदुभी वाजवून व पुष्पवृष्टि करून आनंद प्रदर्शित केला. रेणुकेनें आपणापैकीं कोणास न विचारितां एका ब्राह्मणाला वरलें हे पाहून स्वयंवरासाठीं आलेल्या राजांनां फार वाईट वाटलें. त्या सर्वांनीं असा विचार केला कीं, रेणु राजाबरोबर युद्ध करून रेणुकेला पळवून न्यावी. त्याप्रमाणें सर्व राजे आपआपलें सैन्य घेऊन येऊन रेणु राजाबरोबर युद्ध करूं लागले. ते राजे असंख्य असून त्यांचें सैन्यहि फार मोठें होतें, यामुळें रेणु राजाला जय येण्याचीं चिन्हें दिसेनात, तेव्हां जमदग्नी रेणु राजाचे साह्याला गेला व त्यानें हातांत धनुष्यबाण धारण करून विलक्षण युद्ध कौशल्यानें सर्व राजांनां पळवून लावलें. मग रेणु राजानें जमदग्नीला व सर्व ऋषींनां चार दिवस आपल्या घरीं ठेवून घेतलें, व मोठ्या थाटानें लग्न सोहळा केला. त्यानें जमदग्नीला घोडे, हत्ती, रथ, गायी, दास, दासी, पुरें, शहरें, देश व रत्नभांडार देऊन कन्यादान केलें व भागीरथीचे काठीं वास करावा ह्मणून त्यासी विनंति केली. त्या उत्सव समयीं इंद्रानें जमदग्नीला कामधेनु व कल्पतरू दिला. जमदग्नी रेणुराजाचे विनंतिप्रमाणें आपले स्त्रीसह भागीरथीचे कांठीं राहिला व त्याचा बाप ऋचिक काशीयात्रा करून गोदावरी तटाकीं येऊन राहिला. कांहीं दिवस रेणुकेचे पतिसहवासांत गेल्यावर तिला अग्नि, वायु, सूर्य व इंद्र हे अनुक्रमानें वसु, विश्वावसु, वृद्ध भानु व बृहत्कर्ण असे चार पुत्र झाले. नंतर कांहीं दिवसांनीं रेणुकेकडे नारद

आला व तिला ह्मणाला, " हे आदिमाये अंबिके ! मला चक्रपाणीनीं तुझ्याकडे पाठविलें आहे, ते तुझ्या उदरीं आल्यास तूं त्यांचें तेज सहन करशील किंवा नाहीं असें त्यांनीं विचारलें आहे. " हें ऐकून रेणुका हांसून नारदाला ह्मणाली, " नारदा ! भगवान् माझ्या हृदयांत केव्हां समावतील असें मला झालें आहे, तर त्यांनां गर्भवासांत लवकर येण्यास सांग. मी प्रभूचें तेज सहज सहन करीन." रेणुकेचें हें बोलणें ऐकून नारद तेथून भगवंताकडे निघून गेला.

---

## अध्याय १२ वा.

### १ परशुराम अवताराची कथा.

रेणुकेनें नारदाबरोबर--गर्भवासांत ये--असा भगवंतास निरोप पाठविल्यावर, भगवान् विष्णुनीं रेणुकेच्या उदरीं प्रवेश करून केवळ भक्तांसाठीं ते गर्भवासाचें दुःख भोगूं लागले. श्रीपतीला माझें तेज रेणुका कसें सहन करील अशी काळजी होती, पण भगवान् त्या आदिमायेच्या उदरांत पाहूं लागले तों त्यांना त्याचा अंत मुळींच लागेना. माझ्यासारखे शेंकडों, हजारों नारायण या उदरांत समावतील अशी त्यांची खात्री झाली. रेणुकेला पूर्ण दिवस झाल्यावर वैशाख शुद्ध तृतीयेचे दिवशीं पुनरवसु नक्षत्रावर ती प्रसूत होऊन पुत्र झाला. त्या आनंददायक वार्तेमुळें संपूर्ण त्रिभुवनांत आनंदोत्सव सुरू झाले. दुंदुभीच्या नादानें दशदिशा भरून गेल्या, जिकडे तिकडे निशाणें, पताका, ध्वजा उडूं लागल्या आणि गुलाल उधळल्यामुळें दिशा धुंद होऊन गेल्या; स्वर्गांतून देव सारखी पुष्पवृष्टी करीत होते. याप्रमाणें त्या मंगलकारक प्रसंगीं सर्वांनां आनंद झाला, पण सहस्रार्जुनाला फार भीति वाटूं लागली. त्याचें हृदय धडधड उडूं लागलें, हातपाय थरथर कांपूं लागले आणि त्याला स्पष्ट बोलवेना. तो आपल्या आईला ह्मणाला, " हे रकावती ! माझ्या हृदयांत अशी एकाएकीं भीति कां भरली तें कळत नाहीं. " त्या सहस्रार्जुनाचे आईनें ब्राह्मणांनां बोलावून ग्रहांची शांती वगैरे केली.

इकडे जमदग्नीनें त्या आनंददायक प्रसंगीं अनेक ब्राह्मण बोलावून त्यांनां संतोषित केलें. मुलाचें नाव परशुराम असें ठेवलें. परशुरामाचें वय व्रतबंधाला योग्य झाल्यावर जमदग्नीनें सर्व ऋषि, राजे, वगैरे बोलावून मुलाचें मौंजिबंधन मोठ्या थाटानें केलें. परशुराम म्हणजे प्रत्यक्ष भगवान, त्यांच्या जिव्हाग्रावर सरस्वती खेळत होती. तेव्हां त्यांनां वेदाचें वगैरे अध्ययन करण्यास दिवस ते किती लागणार ? संपूर्ण शास्त्रांचा अभ्यास पूर्ण झाल्यावर परशुरामानें जमदग्नीची परवानगी घेऊन कैलास पर्वतावर गमन केलें व तेथें महादेवाचें तप करण्यास आरंभ

केला. ऊन, वारा, पाऊस, वगैरे कष्ट सहन करून व पंचाग्नीचें साधन करून भगवान परशुराम, महादेवाला प्रसन्न करून घेण्याचें तप करीत होते. कांहीं दिवस तप केल्यावर महादेव प्रसन्न झाले व इच्छित वर माग म्हणून म्हणाले. तेव्हां परशुराम म्हणाले, "हे कैलासपते नीलकंठा! मला आपण धनुर्विद्या शिकवावी," महादेव म्हणाले, "मी तुला धनुर्विद्या शिकवितों, पण तूं कोणाचा कोण वगैरे सांग, म्हणजे ती धनुर्विद्या तुला देईन." परशुराम म्हणाले, "हे महादेवा! माझें नांव परशुराम आहे. मी जमदग्नीचा पुत्र असून, रेणुका ही माझी माता होय." हें परशुरामाचें बोलणें ऐकून महादेव हांसले व म्हणाले, हे वैकुंठपते नारायणा! माझ्यापुढें हा लपंडाव कां करतोस! तुझी 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्' शक्ति असून तुला माझ्या धनुर्विद्येची काय आवश्यकता आहे; मी आपली धनुर्विद्या तुला संतोषानें देऊन दुष्टांच्या संहारासाठीं आपलें पाशुपतास्त्र देतों." असें म्हणून शंकरांनीं परशुरामाला धनुर्विद्या व पाशुपतास्त्र दिलें व ते अदृश्य झाले परशुराम तपश्चर्येला गेल्यावर इकडे रेणुकेला अगदीं करमेना म्हणून जमदग्नीनें तिला खेळण्यासाठीं एक मुलगी दिली, तिचें नांव त्रिकुला असें ठेविलें. तिच्यासहवर्तमान रेणुका आनंदानें रहात असे. नंतर लवकरच परशुराम परत येऊन त्यानें आईबापास वंदन करून पाशुपतास्त्र व धनुर्विद्या मिळविल्याचें सांगितलें.

नंतर परशुरामानें पुन्हां मातापितरांची आज्ञा घेऊन कैलास पर्वतावर गमन केलें व गणपतीच्या तपश्चर्येला आरंभ केला. कांहीं वर्षें गणपतीची आराधना केल्यावर गणपति प्रसन्न झाले व त्यांनीं परशुरामाला तुझी काय इच्छा आहे म्हणून प्रश्न केला. तेव्हां परशुराम म्हणाला: "हे अयोनिसंभव लंबोदरा! मला तूं आपली परशुविद्या दे." त्याप्रमाणें गणपतीनें त्यावेळीं परशुरामाला परशु व परशुविद्या दिली. तेव्हां तेथें महादेवही होते. ते परशुरामाला म्हणाले; "भार्गवरामा! तुला तुझ्या आईबापाविषयीं माहिती आहेच, पण मीहि कांहीं सांगतों. एक स्त्री एका अरण्यांत माझ्या प्राप्तीसाठीं सभोंवतीं प्रखर प्रळयाग्नि पेटलेला असून मध्यें उभी राहून तपश्चर्या करीत होती, तो चमत्कार पाहून मला फार आश्चर्य वाटलें. मग मी तो अग्नि आपल्या मुखानें भक्षण करून, त्या स्त्रीला प्रसन्न झालों. तेव्हां ती म्हणाली, "तूं हा अग्नि खाऊन टाकलास म्हणून तुला जमदग्नी असें म्हणतील. तसेंच हे महादेवा! मी आदिमाया असून तुझ्या प्राप्तीसाठीं आजवर तपश्चर्या केली आहे, तर तूं माझा स्वीकार कर." याप्रमाणें त्या स्त्रीनें माझी विनंती केल्यावर मी तिला म्हणालों, "हे आदिमाये! मी तुझी इच्छा पुरी करीन. ऋचिक ऋषीचे उदरीं जमदग्नी म्हणून जन्म घेईन, आणि हिमालयपर्वत रेणु राजा होईल, त्याचे उदरीं तूं रेणुका म्हणून जन्म घे, आणि नंतर माझा स्वीकार कर. हे परशुरामा! या प्रमाणें तुझ्या आईबापाची कथा

आहे. तूं साक्षात् जगज्जीवन प्रभु असून अशा रीतीनें मला पित्याचा अधिकार दिलास याबद्दल मला मोठा संतोष वाटतो." महादेवाचें या प्रमाणें परशुरामाशीं बोलणें होत आहे इतक्यांत तेथें नारदमुनी आले; वैकुंठपतीचें व कैलासपतीचें एकाच वेळीं त्यांस दर्शन झालें. मग नारदाला दोघांनीं आशीर्वाद देऊन, भूतलावर कांहीं चमत्कार पाहण्यांत आला असल्यास तो आह्मांस श्रुत करावा ह्मणून विनंति केली. तेव्हां नारद ह्मणाला, "सांप्रत पृथ्वीवर जर कांहीं अपूर्व असेल तर तो एक जमदग्नीचा आश्रम होय. तेथें कल्पतरु व कामधेनु असल्यामुळें रेणुका माता हजारों ऋषींनां प्रत्यहीं इच्छाभोजन देत आहे. याहून अपूर्व असें माझ्या कांहींहि अवलोकनांत आलें नाहीं."

## २ परशुरामकृत मातृवध.

परशुराम गणपतीजवळून परशु व परशुविद्या घेऊन आल्यावर कांहीं दिवसांनीं रेणुका भागीरथीवर स्नानाला गेली असतां, तेथें कुबेर विमानांत बसून आपल्या स्त्रियांसहवर्तमान स्नानासाठीं आला. त्या भागीरथीच्या पवित्र जलांत कुबेर व त्याच्या स्त्रिया जलक्रीडा करूं लागल्यावर रेणुकेलाहि त्याप्रमाणें जलक्रीडा करण्याची इच्छा उत्पन्न झाली. ती आपले मनांत म्हणाली, माझा पति जर या वेळा मजबरोबर असता, तर मीहि अशीच जलक्रीडा केली असती. याप्रमाणें मनांत खट्टू होऊन रेणुका बराच वेळ तेथें कुबेर व त्याच्या स्त्रिया यांची क्रीडा पहात उभी राहिली. इतक्यांत तिला आश्रमांत सडासंमार्जन करण्याची आठवण झाली व ती घाईघाईनें आश्रमांत आली. इकडे जमदग्नि, रेणुकेनें आश्रमांत अद्यापि सडासंमार्जन केलें नाहीं म्हणून तिजवर अत्यंत रागावले होते. रेणुका आश्रमांत आल्याबरोबर जमदग्नि तिजवर क्रुद्ध होऊन म्हणाले, "माझी होमाची वेळ होऊन गेली तरी तूं इकडे सडासंमार्जन वगैरे कांहीं एक न करितां तिकडे कुबेराची जलक्रीडा पहात उभी राहिलीस, व त्याविषयीं पापवासनाहि मनांत आणिलीस, यावरून तूं व्यभिचारिणी आहेस. तर माझ्या आश्रमांतून आतांच्या आतां चालती हो, मला आपलें तोंड देखील दाखवूं नकोस." हा जमदग्नीचा राग पाहून रेणुका अत्यंत भयाकुल झाली, ती आपल्या पतीला म्हणाली, "माझ्या पोटीं प्रत्यक्ष नारायण अवतरले आहेत. आणि तो प्रभु यावज्जीवमात्रांचा पिता आहे, तेव्हां मलाहि हे सर्व प्राणीमात्र पौत्राप्रमाणें आहेत. आपणावांचून मी सर्व पुरुषांकडे पौत्रदृष्टीनें पाहतें. मी आपणास माझें दैवत समजतें. आपलें पादोदक, तेंच मी सर्व तप असें मानतें. असें असून आपण मला व्यर्थ दोष देत आहां. हें ऐकून जमदग्नी अधिक क्रुद्ध झाले व थोरला मुलगा जो वसु त्याला बोलावून रेणुकेला ठार मारण्यास सांगितलें. तेव्हां वसु म्हणाला, "बाबा! ही रेणुका म्हणजे संपूर्ण विश्वाची माता आहे, हिचा वध केला असतां मी खात्रीनें अधःपाताला जाईन."

हें वसूचें बोलणें ऐकून जमदग्नीनें, पितृआज्ञा उल्लंघिली म्हणून त्याला शाप देऊन गतप्राण केला. नंतर त्यांनीं विश्वावसूला बोलावून रेणुकेला मारण्यास सांगितलें, पण त्यानेंहि वसू प्रमाणें रेणुकेला मारण्याचें नाकारिल्यावर जमदग्नीनें त्यालाहि शाप देऊन गतप्राण केला. याप्रमाणें जमदग्नीच्या चारही मुलांनीं आपल्या आईला मारण्याचे नाकारल्यामुळें जमदग्नीनें चवघांनांहि शाप देऊन निश्चेष्ट केलें. मग जमदग्नीनें परशुरामास बोलावून त्याला रेणुकेचा वध करण्यास सांगितलें, त्याबरोबर परशुरामानें हातांतला परशु रेणुकेच्या मस्तकावर मारून तिचा नाश केला. आपले आज्ञेप्रमाणें परशुराम वागला हें पाहून जमदग्नीला फार संतोष झाला व तो त्याला कांहीं मागावयाचें असल्यास माग, ह्मणून ह्मणाला; तेव्हां परशुराम आपल्या बापाला ह्मणाला; "बाबा जर कांहीं देणें असेल तर आईला व चवघां बंधूंना सजीव करा व मी वध केल्याचें त्यांना विस्मरण करा, एवढेंच मागणें आहे." मग जमदग्नीनें कमंडलूंतलें उदक पांचजणांवर सिंचन करून त्यांना जिवंत केलें. आदिमाया जगन्मोहिनी याप्रमाणें जिवंत झाल्यावर सर्वांना अत्यंत आनंद झाला व देवांनीं दुंदुभी वाजवून तिजवर पुष्पवृष्टि केली. त्या वेळीं रागाच्या सपाट्यांत आपण भलतेंच अविचाराचें कृत्य केलें होतें, असें जमदग्नीला वाटून त्यानें तेव्हांपासून राग सोडून दिला.''

## ३ सहस्रार्जुनाचा पराक्रम.

हे जनमेजय राजा ! या परशुरामाप्रमाणेंच तुला सहस्रार्जुनाचा कसा जन्म झाला तें सांगतों, ह्मणजे पुढील कथा तुला चांगली समजेल. " सहस्रार्जुनाच्या बापाचें नांव कृतवीर्य असें असून त्याच्या आईचें नांव रंकावती असें होतें. तो सोमवंशी सहस्रार्जुन महिकावती नांवाच्या नगरांत राज्य करीत होता. तो असुर झाला होता, याचें कारण असें कीं, एकदां सायंकाळीं रंकावती कृतवीर्या जवळ भोग मागूं लागली, तेव्हां कृतवीर्यानें ती वेळ चांगली नसून या वेळीं संभोग केल्यास असुर प्रकृतीचा पुत्र होतो ह्मणून रंकावतीला सांगितलें. परंतु रंकावती ऐकेना ह्मणून त्यानें तिला रतिदान दिलें. ती संधी साधून शिखी राक्षसाचा पुत्र मधु नांवाच्या शाप पावलेल्या राक्षसानें तिच्या गर्भांत प्रवेश केला. त्यानें एकदां शंकरास पूजेच्या वेळीं त्रास दिला होता, तसेंच पार्वती अनेक प्रकारचीं फुलें आणून महादेवाची प्रत्यहीं पूजा करीत असे. त्या पार्वतीच्या त्यानें एक हजार पूजा मोडल्या होत्या; ह्मणून महादेवानें त्याला शाप दिला होता कीं, तूं पुढील जन्मीं हातांवाचून जन्म पावशील व पुढें फार दुःख भोगशील. त्याप्रमाणें तो मधु दैत्य नारायणाचे हातानें मृत झाल्यावर रंकावतीचे गर्भांत प्रवेश करून त्यानें सहस्रार्जुन या नावानें पृथ्वीवर जन्म घेतला. तो जन्मला तेव्हां त्याला शंकराच्या शापामुळें हात मुळींच नव्हते. मग त्यानें दत्तात्रेयाची पुष्कळ दिवस सेवा करून त्यांनां प्रसन्न करून घेतलें. दत्तात्रय

प्रसन्न झाल्यावर तो त्यांच्या चरणावर मस्तक ठेवून म्हणाला; " हे प्रभो दत्तात्रेया ! मला सर्व शरीरावर हात दे, व सर्व भूमंडळांत मला अजिंक्य कर. " तेव्हां दत्तात्रेय त्याला म्हणाले, " तुला सहस्र हात उत्पन्न होतील, आणि ब्राह्मणाशिवाय तूं सर्वांना अजिंक्य होशील. " याप्रमाणें वर देऊन दत्तात्रेय तेथून अंतर्धान पावले. नंतर सहस्रार्जुनानें शंकरांची कित्येक वर्षे तपश्चर्या करून त्यांना प्रसन्न करून घेतलें व त्यांच्याकडून त्यानें अमृत मिळविलें. याप्रमाणें दत्तात्रेय व महादेव यांना प्रसन्न करून घेतल्यावर सहस्राअर्जुन महिकावतीस आला, व तेथें राज्य करूं लागला. त्यानें त्या वरप्रदानामुळें संपूर्ण पृथ्वी जिंकून सर्वांना त्रस्त करून सोडलें.

एकदां लंकेचा राजा रावण दिग्विजयासाठीं गेला होता, तो तिकडून जय मिळवून लंकेस परत जात असतां, पूजेची वेळ झाली ह्मणून त्यानें आपल्या सैन्यासह नर्मदेच्या कांठीं मुक्काम केला व तो स्नान वगैरे करून शिवपूजा करीत बसला. त्याच वेळीं सहस्रार्जुन स्नानासाटीं नर्मदेवर आला व पाण्यांत उतरून जलक्रीडा करूं लागला. त्यानें सहज लीलेनें आपल्या सहस्रभुजा पाण्यावर पसरून पाण्याला बंधारा घातला, त्यामुळें नर्मदेचें पाणी वरच्या बाजूला वाढूं लागलें. रावण त्याच बाजूला नर्मदेच्या कांठाशीं बसून शिवपूजा करीत होता. इतक्यांत नर्मदेचें पाणी वाढून त्यायोगें रावणानें स्थापन केलेलें शिवलिंग, पूजा वगैरे सर्व वाहून गेलें. तेव्हां रावणास अत्यंत राग आला व त्यानें आपल्या प्रधानाला असें होण्याचें कारण काय याचा शोध करण्यास सांगितलें. त्याचा प्रधान पुढें जाऊन पाहूं लागला तों सहस्रार्जुन नर्मदेंत स्नान करीत असून त्यानें आपल्या बाहूंनीं पाण्याला बंधारा घातला आहे. तो पाहिलेला सर्व प्रकार प्रधानानें रावणास येऊन सांगितल्यावर रावणास अत्यंत क्रोध आला व तो सर्व सैन्यासह त्या सहस्रार्जुनाचे अंगावर धांवून गेला, पण त्या सहस्रार्जुनानें क्षणार्धांत रावणाच्या सैन्याचा नाश करून रावणास धरलें व त्याला आपल्या बंदीशाळेंत ठेवलें. मग तें वर्तमान रावणाच्या प्रधानानें लंकेस जाऊन रावणाचा बाप विश्रवा व आजा पौलस्ती यांना सांगितलें. ते दोघे ब्रह्मदेवाकडे गेले व त्यांनीं ब्रह्मदेवाला झालेली सर्व हकीकत सांगून, रावणाची सुटका करण्याविषयीं विनंति केली. मग ब्रह्मदेव त्या दोघांना घेऊन महिकावतीस सहस्रार्जुनाकडे आला व त्यानें रावणास सोडून देण्याविषयीं सहस्रार्जुनाला सांगितलें. सहस्रार्जुन ह्मणाला; " हे चतुरानना ! तूं माझ्या घरीं याचक होऊन आलास, हीच त्या रावणाला पुष्कळ शिक्षा झाली." असें ह्मणून सहस्रार्जुनानें रावणास ब्रह्मदेवाचे स्वाधीन केलें. असा तो शक्तिशाली सहस्रार्जुन महिकावतीस राज्य करीत होता."

---

# अध्याय १३ वा.

## १ कामधेनुहरण कथा.

सहस्रार्जुन महिकावतीस राज्य करीत असतां, एकदां नारदमुनी फिरत फिरत त्याच्याकडे आले. सहस्रार्जुनानें मोठ्या सन्मानानें त्यांची पाद्यपूजा वगैरे करून कांहीं नवल विशेष असल्यास सांगण्याविषयीं विनंति केली. तेव्हां नारदमुनि म्हणाले, "राजा! तुला शिकारीचें व्यसन असल्यामुळें त्यासंबंधानें एक सुवार्ता सांगण्यासाठीं मी तुजकडे आलों आहें. भागीरथीचे काठीं दिव्यद्रुम या नांवाचें एक सुंदर निबिड अरण्य आहे, त्यांत अनेक प्रकारचे पशुपक्षी आहेत, असें शिकारीला योग्य अरण्य माझ्या पाहण्यांत आजवर आलें नाहीं. त्याच अरण्यांत जमदग्नीचा आश्रम असून त्याची स्त्री रेणुका, जो कोणी येईल त्याला इच्छाभोजन देत असते. तेव्हां त्या अरण्यांत तूं शिकारीसाठीं जाऊन त्या जमदग्नीऋषीचें दर्शनहि घेऊन ये." नारदानें याप्रमाणें सहस्रार्जुनाला माहिती दिल्यावर सहस्रार्जुनानें तत्काल शिकारीची तयारी केली व बरोबर सैन्य घेऊन त्यानें नारदानें सांगितलेल्या त्या महा अरण्यांत प्रवेश केला. तें अनेक प्रकारच्या फलपुष्पांनीं युक्त अरण्य पाहून सहस्रार्जुनाला फार संतोष झाला. त्या अरण्यांत सर्व प्रकारचे पशुपक्षी निर्भयपणें संचार करीत आहेत हें पाहून तर सहस्रार्जुनाला फारच आश्चर्य वाटलें. त्या अरण्यांत आणखी पुढें गेल्यावर राजाला अनेक ऋषींचे आश्रम दिसले. सर्व आश्रमांत वेदघोष चालला होता. तो ऐकून त्या राजाचा प्रधान ह्मणाला; "राजा! येथें ऋषींचा वास असल्यामुळें येथील पशुपक्षी निर्भय आहेत तेव्हां येथें शिकार न करितां, शिकारीसाठीं आपण दुसरे अरण्यांत जाऊं. येथेंच शिकार केल्यास न जाणो कदाचित् हे ऋषि आपणावर क्रुद्ध होऊन आपणास शाप देतील." प्रधानानें याप्रमाणें राजाला योग्य ती सल्ला दिली, पण ती त्या सहस्रार्जुनाला पसंत न पडून त्यानें आपल्या लोकांना शिकार करण्याचा हुकूम दिला व आपणहि धनुष्यबाण घेऊन निरपराधी अनेक प्राण्यांचा संहार करूं लागला. बराच वेळ शिकार खेळल्यावर राजा फार श्रांत झाला व विसावा घेत बसला. राजा सहस्रार्जुन आला आहे असें पाहून जमदग्नी आपल्या स्त्रीला ह्मणाले; "रेणुके! आज राजा या अरण्यांत आलेला आहे तर त्याला आपल्या आश्रमांत भोजनाला बोलावूं." तेव्हां रेणुका ह्मणाली; "अहो! त्या राजाला भोजनाला बोलावल्यास तो दुष्टबुद्धि कांहीं तरी भलतेंच करील अशी मला भीति वाटते." रेणुका असें ह्मणाली, तरी तिकडे दुर्लक्ष करून जमदग्नी ऋषि सहस्रार्जुनाकडे गेले व त्याला त्याच्या सर्व लोकांसह भोजनास बोलाविलें. सहस्रार्जुनानें तें ऋषींचें निमंत्रण मोठ्या आनंदानें स्वीकारलें, व तो आपल्या लोकांसह भागीरथीवर स्नान करण्यास गेला. स्नान करून आल्यावर राजा आश्रमांत पाहतो तों भोजनाची तयारी कांहींच दिसेना,

तेव्हां हा ब्राह्मण आपणास व आपल्याबरोबरच्या हजारों लोकांना जेवावयाला कसें घालणार, याबद्दल त्याला मोठी जिज्ञासा उत्पन्न झाली.

## २ आतापि, वातापि व इल्वल यांची कथा.

इकडे ऋषींचीं नित्य नैमित्तिक कृत्यें आटोपल्यावर जमदग्नीनें रेणुकेला भोजनाची तयारी करावयाला सांगितली, त्याप्रमाणें रेणुकेनें कामधेनूची प्रार्थना करून पंचपक्वान्नांनीं वाढलेलीं सुवर्णाचीं ताटें मागून घेतलीं. नंतर एका पंक्तीला ऋषीमंडळी व एका पंक्तीला राजासह राजाची मंडळी ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें बसवून तीं खमंग पक्वान्नांचीं ताटें जमदग्नीनें व रेणुकेनें सर्वां पुढें आणून ठेविलीं, नंतर सर्वजण भोजनाला बसले. तो भोजनाचा अपूर्व थाट व तीं देवतादुर्लभ पक्वान्नें पाहून सहस्रार्जुन थक्क होऊन गेला. रेणुका मधून मधून सर्वांना आग्रह करून वाढीत होती. याप्रमाणें सर्वांचीं आनंदानें जेवणें झाल्यावर सहस्रार्जुन जमदग्नीला ह्मणाला; " हे ऋषिवर्या ! तुझ्या आश्रमांत हें असें अपूर्व भोजन मिळेल अशी माझी कल्पना नव्हती, या अरण्यांत हीं दुर्लभ पक्वानें व हीं सुवर्णाचीं ताटें पाहून मला फार आश्चर्य वाटतें; तर ही तयारी आपण कशी करतां हें ऐकण्याची माझी इच्छा आहे. " तेव्हां जमदग्नीनें सहस्रार्जुनाला कामधेनु दाखविली, व ही गाय जें जें इच्छावें तें तें देते असें सांगितलें. हें ऐकून सहस्रार्जुनाला त्या गाईचा लोभ उत्पन्न झाला व त्यानें त्या गाईची जमदग्नीजवळ मागणी केली. मग जमदग्नी ह्मणाला; " राजा ! ही कामधेनु इंद्रानें आमचे आश्रमधर्म सुव्यवस्थितपणें चालावेत ह्मणून दिली आहे. तूं मोठा राजा आहेस, तेव्हां तुला या कामधेनुची कांहींहि आवश्यकता नाहीं." यावर सहस्रार्जुन ह्मणाला; " ऋषी ! मी पाहिजे तर आपणास सहस्र गायी देतों, पण एवढी गाय मला द्या, आणि ही गाय जर आपण मला संतोषानें दिली नाहीं, तर मी तिला बलात्कारें नेईन. " तेव्हां जमदग्नी ह्मणाले; " राजा ! ती गाय कोणाला देण्याचा मला मुळींच अधिकार नाहीं. इंद्रानें ती मला केवळ आश्रमधर्मासाठीं दिली आहे, ती तूं बलात्कारानें नेल्यास तुझा फार नाश होईल. इतकेंच नव्हे तर वंशच्छेदनहि होईल. ब्राह्मणास निष्कारण दुखविणें हें कधींही कोणास श्रेयस्कर होत नाहीं. कपिल मुनीला सगर राजाच्या मुलांनीं दुखविल्यामुळें त्यानें ते साठ सहस्र पुत्र जाळून टाकले." जमदग्नीनें इतकें सांगितलें तरी राजा हट्ट सोडीना, तेव्हां अगस्ति ऋषींनीं सहस्रार्जुनाला नहुष राजाची कथा सांगून हट्ट सोडण्यास सांगितलें, तरी राजा आग्रह सोडीना तेव्हां गौतमऋषि पुढें येऊन ह्मणाले; " बा सहस्रार्जुना ! ब्राह्मणांना छळणारांचें कल्याण तर होत नाहींच पण उलट अधोगति मात्र प्राप्त होते. या अगस्ति ऋषींना मागें आतापि, वातापि आणि इल्वल या तिघांनीं असाच त्रास दिला होता, या तिघांनीं शंकराची

तपश्चर्या करून त्यांना प्रसन्न करून घेतलें व त्यांच्याकडून असा वर मिळविला कीं, आह्मी अन्न व पाणी यांचें रूप धारण करून ज्याचे हृदयांत जाऊं त्याचा नाश व्हावा. असा वर मिळाल्यावर त्यांनीं एका रस्त्यावर अन्नसत्र घातलें व अनेक लोकांना बोलावून त्यांना जेवायाला घालावें व अन्नरूपानें पोटांत जाऊन आपलें पूर्वरूप धारण करून त्यास मारावें, असा क्रम चालवून त्या तिघांनीं हजारों लोक मारले. हा प्रकार अगस्ती ऋषींना कळल्यावर, या गोष्टीचा बंदोबस्त करावा ह्मणून ते मुद्दाम त्या तिघांकडे गेले व त्यांनीं सांगितल्याप्रमाणें जेवावयाला बसले. तेव्हां प्रथम आतापीनें अन्नरूपानें अगस्तीच्या उदरांत प्रवेश केला. ही गोष्ट अगस्तीचें लक्षांत आल्याबरोबर अगस्तींनीं शाप देऊन त्या आतापीस उदरांतच भस्म करून टाकलें. नंतर अद्याप अगस्ति मरत नाहींत असें पाहून वातापी कमंडलूंत शिरला, त्याबरोबर अगस्तीनें तें जल प्राशन करून त्या वातापीलाही शाप देऊन भस्म केलें. तो प्रकार बघून इल्वल घाबरला व जिवाच्या आशेनें पळूं लागला; परंतु अगस्ति ऋषि एकसारखे त्याच्यामागें होते. शेवटीं दृष्टीआड होण्याला कोठेंच जागा नाहीं असें पाहून तो इल्वल राक्षस समुद्रांत लपला. त्या दुष्टाला समुद्रानें आश्रय दिला, त्याबद्दल अगस्तीला राग आला, व त्यांनीं तीन अंजलींनीं सर्व समुद्राचें पाणि पिऊन टाकिलें. तेव्हां समुद्र पुरुषरूप धारण करून अगस्तीची प्रार्थना करून ह्मणाला; " हे ऋषिराज ! या ब्रह्मघातक्याला मी न समजून आश्रय दिला, त्याबद्दल हा योग्य असाच दंड पावलों, पण आतां माझ्यावर दया करा, माझ्या उदरांत जे सहस्र जीवजंतु वास करीत आहेत त्यांना भस्म करूं नका, आणि त्यांच्यासह माझी लवकरच सुटका करा. " मग अगस्ती ऋषि ह्मणाले; " हे समुद्रा ! तूं त्याबद्दल मुळींच काळजी करूं नकोस " असें ह्मणून अगस्ति ऋषींनीं मंत्रबलानें इल्वल राक्षसास पोटांतले पोटांत जाळून टाकलें. नंतर त्यानीं लिंगद्वारानें समुद्राचें प्राशन केलेलें पाणी जीवजंतूंसह सोडून दिलें. पण अगस्तीनें समुद्राला शाप दिला कीं, " तूं ब्राह्मणघातक्याला आश्रय दिलास, ह्मणून पर्वणीवांचून तुला कोणीही स्पर्श करणार नाहीं." याप्रमाणें कथा सांगून गौतम ऋषि सहस्रार्जुनाला ह्मणाला; " राजा ! ब्राह्मणाच्या शापाचा असा परिणाम होतो, ह्मणून ही धेनु तूं नेऊं नकोस, आणि बलात्कारानें घेऊन गेल्यास त्यांत तुझें अकल्याण झाल्यावांचून राहणार नाहीं. "

## ३ जमदग्नीचा मृत्यु.

गौतम ऋषीचें तें भाषण ऐकून सहस्रार्जुन ह्मणाला, " तुह्मी सर्व ब्राह्मण जमून मला नुसत्या शब्दानेंच घाबरविण्याचा प्रयत्न करीत आहां, परंतु मी तुह्मांसारख्या ब्राह्मणांना भिणारा राजा नाहीं. ही अशी कामधेनु या तुमच्या

भिकार आश्रमांत मुळींच शोभत नाहीं. ती माझ्या राजवाड्यांतच पाहिजे, तुह्मी ही गाय मुकाट्यानें माझे स्वाधीन करा, नाहींतर मी सर्वांचा संहार करून गाय घेऊन जाईन. ” शाप देऊन सहस्रार्जुनाचा नाश करण्याचें सामर्थ्य जमदग्नीचे आंगीं होतें, पण त्यांनीं रेणुकेच्या वधाच्या वेळीं क्रोधाचा त्याग केला असल्यामुळें ते या वेळीं मुळींच रागावले नाहींत, ते सहस्रार्जुनाला शांतपणें ह्मणाले, “ राजा ! हें असें करणें तुला शोभत नाहीं, भोजन केल्यावर कोणी पात्र खाऊन टाकीत नाहीं; आणि तूं तर ज्या गायीनें भोजन दिलें त्याच गायीला बांधूं पाहतोस ! तुला जर हें योग्य दिसत असेल तर ती गाय आहे, तूं खुशाल घेऊन जा. ”

जमदग्नीनें असें सांगितल्यावर राजा त्या कामधेनूला बळेंच घेऊन जाऊं लागला. तेव्हां ती गाय क्रुद्ध होऊन तिनें आपल्या नेत्रांपासून म्लेंच्छ, कानापासून बर्बर, योनीपासून कंगुवीर, स्तनापासून द्राविड, खुरांपासून खुरासन व नाकापासून भिल्ल, या लोकांचें सैन्य उत्पन्न केलें. तें सर्व सैन्य सहस्रार्जुनाचे सैन्यावर चालून आलें व त्यानें त्या सैन्याचा नाश केला. तेव्हां सहस्रार्जुन रागानें गाईच्या अंगावर धांवून जाऊन त्यानें आपली तरवार गाईचे अंगावर मारली, तोंच ती गाय घाव चुकवून स्वर्गांत निघून गेली. अशा प्रकारें सहस्रार्जुनाचें सैन्यही मेलें व त्याला गायही मिळाली नाहीं; तेव्हां तो अत्यंत क्रुद्ध होऊन जमदग्नीचे अंगावर धावून त्यांना मारूं लागला, पण ते जमदग्नी ऋषि सहस्रार्जुनावर मुळींच रागावले नाहींत. तेव्हां जमदग्नीचे प्राण वांचवावेत ह्मणून रेणुका आडवी आली, पण त्या नीच राक्षसानें रेणुकेवर एकवीस घाव मारले, व तिला असमर्थ केल्यावर मग त्यानें जमदग्नीला ठार मारलें. पति मृत झालेला पाहून रेणुका अत्यंत शोक करूं लागली, व ती परशुरामाचा धांवा करूं लागली. ती तिची हाक ऐकून परशुराम कैलास पर्वतावर गणपतीची व महादेवाची तपश्चर्या करीत होता, ती सोडून भागीरथीचे कांठीं आला. जमदग्नीचें तें मृत शरीर व आईचें घायाळ झालेलें शरीर पाहून त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. तो आल्यावर रेणुकेनें त्याला सर्व वर्तमान सांगितलें. तें ऐकून भार्गवराम ह्मणाला; “ आई ! तुला ज्या नीचानें एकवीस घाव घातले, त्या सहस्रार्जुनाला मी एकवीस वेळां मारीन, ही पृथ्वी एकवीस वेळां निःक्षत्री करीन, त्या सहस्रार्जुनाला मारून सर्व भूतमात्रांना त्याचा बळी देईन, व त्याचे सहस्र बाहू तोडून ते कोल्ह्याकुत्र्यांना खावयाला देईन. ” मग रेणुका परशुरामाला ह्मणाली, “ बाळा ! हें प्रेत व मला घेऊन सर्व पृथ्वीवर फीर आणि जेथें आकाशवाणी होईल तेथें तूं आपल्या पित्याला दहन कर. ” रेणुकेनें असें सांगितल्यावर परशुरामानें एक कावड तयार केली; त्या कावडीच्या एका पारड्यांत रेणुकेला बसविलें व एका पारडयांत जमदग्नीचें प्रेत घातलें आणि

ती कावड खांद्यावर घेऊन परशुराम रानांत व डोंगरांत हिंडूं लागला. याप्रमाणें हिंडत हिंडत तो सह्याद्रि पर्वताचे पठारावर अमलिका नावाचें एक शहर होतें, त्या शहराजवळ आला. तेथें आल्यावर आकाशवाणी झाली कीं, "हे भार्गवरामा! याच ठिकाणीं जमदग्नीचें दहन कर." अशी आकाशवाणी झाल्यावर परशुरामानें तेथें कावड ठेविली, इतक्यांत तेथें श्रीदत्तात्रेय महाराजांची स्वारी आली. त्यांना वंदन करून परशुराम ह्मणाला; "हे दिगंबर! तुझी अनायासें गांठ पडली हें एक प्रकारें बरें झालें, मला उत्तरकार्याची मुळींच माहिती नाहीं, तेव्हां त्यासंबंधानें तूं मला माहिती दे." हें ऐकून दत्तात्रेय ह्मणाले; "बा परशुरामा! मी या आचरणाचे संबंधानें अगदीं अज्ञानी आहें. धर्मकार्याचें मला कांहींच ज्ञान नाहीं. मला जन्म किंवा मरण हेंच जर नाहीं तर दहनक्रिया व सिंचन, पाप व पुण्य हें तरी कोठून कळणार?" मग दत्तात्रेयानें रेणुकेला वंदन करून तिची स्तुति केली. परशुरामानें तेथें चंदनाचीं लांकडें, कापूर, कस्तुरी, अगरु वगैरे साहित्य मिळवून त्याची चिता तयार केली, त्यावर जमदग्नीला ठेवलें व अग्नी लावला. त्यावेळीं देवांच्या विमानांच्या गर्दीनें आकाश भरून गेलें. सर्व चिता पेटल्यावर रेणुका उभी राहिली; तिनें परशुरामाला सहस्रार्जुनाचा नाश कर व ही पृथ्वी ब्राह्मणांना दे असें सांगून, अग्नींत प्रवेश केला. मग परशुरामानें पृथ्वींत बाण मारून सर्व तीर्थें वर आणिलीं. त्यांत स्नान करून यथाविधि अंत्येष्टि क्रिया वगैरे केली.

## ४ अस्त्रचमत्कार.

त्यानंतर परशुराम तेथून निघून उत्तर दिशेकडे चालला, कांहीं मार्ग क्रमिल्यावर त्याला नारदमुनी भेटले. ते परशुरामाला ह्मणाले; "रामा! या नर्मदा तटाकीं, भूतांनीं अत्यंत प्रळय केला असून तीर्थाला अपवित्रता आणतात व ऋषींना त्रास देतात, तर तूं आपल्या परशूनें त्यांचा संहार कर." त्याप्रमाणें परशुरामानें नर्मदातटाकींचीं सर्व भूतें क्षणार्धांत मारून टाकलीं. मग तेथून नारद व परशुराम दोघेहि मार्कंडेय ऋषीकडे आले. मार्कंडेय ऋषी परशुरामाचा सत्कार करून ह्मणाले, "हे भार्गवरामा! कलिंदु नांवाचा राक्षस आकाश मार्गानें येऊन तपश्चर्येचा वारंवार भंग करतो, आणि तो ब्राह्मणांना मारून त्यांचा आहार करितो, तर त्या कलिंदु राक्षसाचा संहार कर." याप्रमाणें मार्कंडेय ऋषि पशुरामाला सांगत आहेत, तोंच आकाशांत तो कलिंदु राक्षस दिसला; मग पशुरामानें बाणानें वरचेवर तो राक्षस मारून टाकला, तेव्हां त्या राक्षसाचें प्रेत आकाशांतून एकाएकीं महिकावती नगरीवर पडलें. त्यामुळें त्या नगरांतील कित्येक मंदिरें, कित्येक घरें, व वृक्ष मोडले व त्याखालीं नगरांतील असंख्य लोक मेले. त्या प्रेताच्या आघातानें सर्व महिकावती डळमळली, भयंकर वज्रपात व्हावा त्याप्रमाणें मोठा आवाज झाला, तो आवाज ऐकून प्रलयकाळ जवळ

आला असें सर्वांना वाटलें. सहस्रार्जुनानें शोध केला, तेव्हां या सर्व गोष्टींचें कारण एका प्रचंड राक्षसाचें प्रेत हें होय असें त्याला समजलें. तो बलाढ्य राक्षस एकाच बाणानें मृत झालेला पाहून सहस्रार्जुनाला फार आश्चर्य वाटलें व या राक्षसाला मारणारा वीर कोण असावा याचें त्याला मोठें गूढ पडलें; त्या प्रकारामुळें सहस्रार्जुनाला फार भीति वाटली, व पूर्व रात्रीं पडलेल्या स्वप्नाची त्याला स्मृति झाली. तो एका ब्राह्मणाला बोलावून ह्मणाला, " ब्राह्मणा ! रात्रीं मी स्वप्नांत असें पाहिलें कीं, माझी आई रंकावती, मला नग्नावस्थेंत व धडावर शिर नसतांना आपणाबरोबर घेऊन दक्षिणेच्या दिशेनें चालली आहे, तसेंच महीकावती नगर सागरांत बुडालें आहे, आणि तो जमदग्नी व ती रेणुकाही माझ्या स्वप्नांत नित्य येतात. " राजाची ती स्वप्नवार्ता ऐकून ब्राह्मण ह्मणाला; " राजा ! तूं ब्रह्महत्या केलीस ती तुला नडते आहे, या ब्रह्महत्येच्या सोडवणुकीला कोणताही उपाय नाहीं. " ब्राह्मण असें सांगून गेला नाहीं तोंच आकाशांतून भूमीवर उल्का पडूं लागल्या, मेघांतून रक्तबिंदु पडूं लागले, आणि गृध्रादिपक्षी आकाशांत घिरट्या घालूं लागले. त्यानंतर धनुष्याचे टणत्कार सहस्रार्जुनाचे कानावर येऊं लागले. तेव्हां तो आपल्या शहराचे दरवाजावर गेला व एवढा कोण वीर आला आहे तें पाहूं लागला, तों ब्राह्मणाचा एक मुलगा वारंवार धनुष्याचा टणत्कार करीत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां सहस्रार्जुन त्या मुलाला ह्मणाला; " हे मुला ! तूं कोणाचा कोण आहेस आणि निष्कारण धनुष्याचा टणत्कार कां करीत आहेत?" सहस्रार्जुनाचा हा प्रश्न ऐकून परशुराम ह्मणाला, "चांडाळा ब्रह्मघातक्या ! तुझ्याबरोबर बोलणें हें देखील पाप आहे, अरे तूं ज्या जमदग्नीचा वध केलास त्या जमदग्नीचा मी पुत्र असून तुझा प्राण घेण्यासाठीं आलों आहें. तुझ्या ह्या सहस्र भुजा मी तोडून टाकीन व शीर धडापासून निराळें करीन. " हें त्या लहान मुलाचें बोलणें ऐकून सहस्रार्जुन त्याला म्हणाला, " मुला ! तुला अझून माझा पराक्रम माहित नाहीं, अरे मी, मोठा पराक्रमी असा रावण कालच बांधला, तेथें तुझ्यासारख्या मुलाची कथा ती काय ? " असें सहस्रार्जुन सांगत आहे तोंच " परशुरामानें तमास्त्र सोडून सर्वत्र अंधकार केला, व अग्न्यस्त्र सोडून सर्व महिकावती जाळण्यास आरंभ केला. तेव्हां सहस्रार्जुनानें पर्जन्यास्त्र सोडून नगर विझविलें व सर्व सैन्यासह तो परशुरामाचे अंगावर धांवून आला, पण परशुरामानें क्षणार्धांत सर्व सैन्याचा नाश केला.

---

# अध्याय १४ वा.

## १ सहस्रार्जुनाचा मृत्यु.

परशुरामाचा तो पराक्रम पाहून सहस्रार्जुन अगदीं चकित होऊन गेला. हें लहान पोर काय करणार; या घमेंडीनें तो दुरूनच आपल्या सैन्याची हालचाल पहात होता, पण पाहतां पाहतां जेव्हां परशुरामानें क्षणार्धांत सर्व सैन्याचा नाश केला, तेव्हां त्याचा तो गर्व नाहींसा होऊन त्याला आपल्या सैन्याच्या नाशाबद्दल फार वाईट वाटलें व तो परशुरामावर अत्यंत क्रुद्ध झाला, त्यानें मोठ्या त्वेषानें पांचशें धनुष्यें आकर्ण ओढून पांचशें बाण परशुरामावर टाकले, पण परशुरामानें ते बाण धनुष्यापासून सुटले नाहींत, तोंच पांचशें बाण सोडून ते मोडून टाकले. तेव्हां अर्जुनानें सहस्र बाण सोडले, पण त्याचाहि परशुरामानें नाश करून टाकला. परशुरामाची ती विलक्षण शक्ति पाहून सहस्रार्जुन थंड होऊन गेला; आपणास मदत करण्यास कोणीही वीर नाहीं असें पाहून त्यानें महादेवाची विनंति केली; त्याबरोबर एक कोटी महादेव रणावर आले व ते परशुरामावर शस्त्रप्रहार करूं लागले, परंतु परशुरामानें ते सर्व रुद्र क्षणार्धांत रणावरून पळविले. मग भार्गवरामानें सहस्रार्जुनाचे अंगावर हजारों बाण सोडून त्यास अगदीं भयाकुल करून टाकलें. त्या बाणांनीं सहस्रार्जुन विव्हल होऊन रणांतून पळूं लागला, तरी त्याच्या मागें परशुराम एकसारखा लागला होताच. रामानें त्या अर्जुनाला चक्राप्रमाणें सर्व भूमंडळावर फिरविलें, त्याच्या सहस्र भुजा परशुरामानें एकवीस वेळां तोडल्या; तरी त्या फिरून उत्पन्न होत. हा चमत्कार पाहून परशुरामासहि फार आश्चर्य वाटलें. तेव्हां त्यानें गणपतीची स्तुति केली, त्या बरोबर तीन कोटी गणपती, तीन कोटी महावीर वराह रूपानें, व तीन कोटी नृसिंह, परशुरामाचे साह्यासाठीं आले, परशुरामाचें तें विलक्षण सैन्य पाहून सहस्रार्जुन आपले रथासह, पलायन करण्याचे उद्देशानें वर आकाशांत उडाला; पण परशुरामानें एका बाणानेंच त्याला रथासह खालीं पाडलें, व परशु हातांत घेऊन त्या सहस्रार्जुनाचें मस्तक तोडलें, पण तें तत्काल पुन्हा सहस्रार्जुनाचे धडाला चिकटलें.याप्रमाणें एकवीस वेळा झालें. हा चमत्कार पाहून रामाला अत्यंत आश्चर्य वाटलें; तेव्हां परशुरामाचा बंधु विश्वावसु ह्मणाला; "रामा! या राक्षसाचे हृदयांत अमृत आहे, त्याचा नाश केल्यावांचून हा दैत्य मरावयाचा नाहीं." मग परशुरामानें आपला परशु सहस्रार्जुनाचे हृदयावर मारून त्याच्या हृदयांतलें अमृत बाहेर काढलें व त्याच्या छातीवर बसून त्याचा कंठनाळ कापूं लागला; त्या वेळीं सहस्रार्जुन पाहूं लागला, तों आपल्या हृदयावर पीतांबर नेसलेली, शंखचक्रगदापद्मधारी, कंठांत वैजयंतीच्या व तुळशीच्या माळा असलेली,

हृदयावर कौस्तुभ मणि झळकत असलेली, आदिपुरुष, शेषशाई भगवानाची आहे. तेव्हां अर्जुन मनांत ह्मणाला, हा साक्षात् हृषीकेशी असून माझा कापीत आहे, तेव्हां मला मुक्ति प्राप्त होईल. त्याप्रमाणें परशुरामानें त्याला मुक्ति दिली. त्या सहस्रार्जुनाच्या मृत्यूची वार्ता ऐकून त्याचे आप्त वगैरे अनेक राजे परशुरामाबरोबर युद्ध करण्यास आले; पण त्यांचा परशुरामानें तेव्हांच नाश केला. मग रामानें पांच कुंडें तयार करून त्यांत रणावर पडलेलें शोणित सांठविलें व त्या रक्तानें पितृतर्पण केलें. त्या वेळीं स्वर्गांतून देवांनीं परशुरामावर पुष्पवृष्टि केली. त्या सहस्रार्जुनाचे युद्धाचे वेळीं पृथ्वीवरील सर्व क्षत्रिय नाहींसे झाले. नंतर नारद परशुरामाला पाताळांतील दुष्टांचा नाश करण्यासाठीं घेऊन गेला. तेथें अनेक दैत्यांचा नाश केल्यावर रामाला वासुकी येऊन भेटला. त्यानें भार्गवरामाची स्तुति करून पूजा केली व पादप्रक्षालन करून प्रभूचें तीर्थ मिळविलें. त्यानंतर नारदासह परशुराम कैलास पर्वतावर जाऊन गणपती व शंकर यांस भेटला. तुह्मां दोघांच्या प्रसादामुळेंच मला रणांत विजय मिळाला, असें सांगून परशुरामानें त्या दोघांची स्तुति केली. तेव्हां महादेव व गणपती ह्मणाले, " हे परशुरामा! तूं साक्षात् जगत्पती भगवान् आहेस, तुला अशक्य असें कांहींही नाहीं, आह्मांला निष्कारण मोठेपणा देतोस. असो, परशुरामा! तूं अनेक राक्षसांचा संहार केलास, पण दक्षिण दिशेकडील राक्षस तसेच राहिले आहेत, तर त्यांचा संहार करून तूं आपल्या मातेला भेटावयास जा. " महादेवांनीं असें सांगितल्यावर, परशुराम दक्षिण दिशेकडे गेला व त्या दिशेला जेवढे राक्षस होते त्या सर्वांचा त्यानें संहार केला; आणखी पुढें जाऊन रावण व कुंभकर्ण यांचा तो संहार करणार होता, पण इतक्यांत नारद व ब्रह्मदेव यांनीं त्यास रेणुकेकडे नेलें.

## २ वेदांची प्राप्ति.

परशुरामानें रेणुकेच्या चरणावर मस्तक ठेवून, सहस्रार्जुनाचा एकवीस वेळां वध केला असें तिला सांगितलें, व त्याच्या रक्ताचा कलश व त्याच्या अंगावरील अलंकार त्यानें रेणुकेपुढें ठेविले. ती रक्तानें भरलेली घागर पाहून रेणुकेला फार संतोष झाला; तिनें रक्तानें स्नान केलें, व ते अलंकार परशुरामास यज्ञकार्यी खर्च करण्यास सांगितलें; तसेंच यज्ञ समाप्तीचे वेळीं जिंकलेलें सर्व द्रव्य व पृथ्वी ब्राह्मणांना दे, असें तिनें परशुरामाला सांगितलें. आईनें असें सांगितल्यावर परशुरामानें यज्ञासाठीं स्वतःस सुवर्णाची पत्नी तयार करून प्रणिता नदीचे कांठीं यज्ञाची तयारी केली; तेथें विश्वकर्म्यानें रामतीर्थ व चक्रतीर्थ अशीं दोन तीर्थें स्नानासाठीं तयार केलीं; अत्यंत सुशोभित असे यज्ञमंडप तयार केले, कांहीं प्रेक्षकांसाठीं मंडप तयार केले, यज्ञासाठीं लागणारी सर्व सामुग्री गोळा केली, अठ्यायशी हजार ऋषि यज्ञासाठीं बोलावून त्यांत कश्यप

ऋषीला ऋत्विज केलें, यज्ञकुंडें तयार झाल्यावर ऋषींनीं सुवर्णाच्या पुतळी-बरोबर भार्गवरामाचें लग्न करून त्यास गृहस्थ केलें व यज्ञास आरंभ केला. तो यज्ञ पाहण्यासाठीं, ब्रह्मदेव, इंद्र, अग्नि, यम वगैरे देव व यक्ष, गंधर्व, किन्नर वगैरे अनंत लोक आले होते. यथासांग यज्ञ पूर्ण झाल्यावर संपूर्ण द्रव्य परशुरामानें विप्रांनां दिलें व पृथ्वी कश्यपाला दिली. मग सर्व ऋषि प्रणिता नदीवर येऊन त्यांनीं स्नानें केलीं, व रेणुकेची स्तुति केली; तेव्हां रेणुका त्यांना दर्शन देण्यासाठीं प्रकट झाली. त्या वेळीं, रेणुकेच्या दर्शनासाठीं वेद आले. इकडे सत्यलोकीं ब्रह्मदेव वेद नाहींसे झाले असें पाहून अत्यंत शोकाकुल झाला. त्यानें नारायणाची प्रार्थना करून वेदांची मागणी केली, त्या वेळीं आकाशवाणी झाली कीं, " हे ब्रह्मदेवा ! चारही वेद रेणुकेच्या दर्शनाला गेले असून त्यांनीं अनंताची ओळख होण्यासाठीं रेणुकेच्या उदरांत प्रवेश केला आहे. " ती आकाशवाणी ऐकून ब्रह्मदेव रेणुकेकडे आला व वेदप्राप्तीसाठीं तिची प्रार्थना करूं लागला: " हे आदिरूप आदिशक्ति जगदंबे ! तूं सर्व व्यापून उरली आहेस, तूं निर्गुण असून साकारहि आहेस, तूं पर असून परात्परहि आहेस, तिन्ही लोकांचा विस्तार हा तुझाच अंकुर आहे." याप्रमाणें रेणुकेची स्तुति केल्यावर रेणुकेनें हांसून जांभई दिली, तों तोंडांतून श्रुति निघाली; ती ब्रह्मदेवानें घेऊन रेणुकेची पूजा केली, व तो सत्यलोकीं निघून गेला.

### ३ अजिगर्त, त्रिशंकु व इंद्रद्युम्न.

ब्रह्मदेव गेल्यावर रेणुकेनें मंत्रशक्तीनें सहस्रार्जुनाचें कलेवर बोलाविलें व तें मातृकाक्षेत्र ज्याला कृष्णमल्लिका नगर असें लोक ह्मणतात, तेथें बसावयाला घेऊन त्यावर रेणुका बसली. ज्या रेणुकेच्या नामस्मरणानें देखील पातकांचा नाश होतो, तिच्या दर्शनानें पातकांचा नाश होऊन मुक्ति मिळेल यांत मोठेसें नवल तें काय, हरिश्चंद्र राजाला वरुणाला देण्यासाठीं एका मुलाची आवश्यकता होती; तेव्हां अजीगर्तानें त्या राजाला आपला शुनःशेप नावाचा मुलगा विकला, पुढें तो अजीगर्त मृत्यु पावल्यावर यमानें त्याला यमलोकीं नेऊन नरकांत टाकलें, तेथें तो एक हजार वर्षेंपर्यंत नरकयातना भोगीत होता. नंतर त्याला यमलोकांतून पुन्हां भूमंडळावर टाकून दिलें. तेथें शमिक नावाचा कोणी ऋषि तप करीत बसला होता, तो त्या अजिगर्ताला म्हणाला; " अरे तुझी ही अशी दशा कशानें झाली ?" तेव्हां अजिगर्त ह्मणाला; " मुनी ! दुष्काळांत अन्नकष्टामुळें मी आपला मुलगा शुनःशेप, हरिश्चंद्र राजाला विकला ह्मणून मला अशी दशा प्राप्त झाली आहे, यांतून सुटण्याचा कांहीं मार्ग सांगाल तर मजवर आपले अनंत उपकार होतील." तेव्हां शमिक ऋषि ह्मणाला; " अरे अजीगर्ता ! तूं सर्व तीर्थांत स्नान करून रेणुकेचें [illegible]घे ह्मणजे तुझ्या सर्व पातकांचा नाश होऊन तूं

जन्ममरणाच्या बंधनापासून मुक्त होशील." याप्रमाणें शमिक ऋषीनें सांगितल्यावर अजीगर्तानें सर्व तीर्थांत स्नान केलें, व रेणुकेच्या मंदिरांत जाऊन तिचें दर्शन घेतलें, तोंच विष्णुदूतांनीं अजीगर्ताला विमानांत बसवून वैकुंठांत नेलें. तसेंच त्रिशंकु राजाला पुत्र होत नव्हता ह्मणून त्यानें पुष्कळ दिवस पुष्कळ दानधर्म केला, अनेक व्रतें केलीं, कित्येक वर्षें तपश्चर्या केली, पण त्याला पुत्र झाला नाहीं. मग त्याला वसिष्ठानें रेणुकेचें दर्शन घेण्यास सांगितलें. त्याप्रमाणें राजानें मालापूर येथें सर्व तीर्थांत स्नान करून रेणुकेचें दर्शन घेतलें, तेव्हां त्याला कांहीं दिवसांनीं पुत्र झाला. तोच हरिश्चंद्र राजा होय. तसेंच एकदां इंद्रद्युम्न राजा तापसवनांत शिकार करण्यासाठीं गेला होता, तेव्हां त्याला तेथील ऋषींनीं येथील श्वापदें मारूं नकोस ह्मणून बजाविलें, पण तें राजानें न ऐकतां तो श्वापदें मारूं लागला, तेव्हां ऋषि क्रुद्ध होऊन त्यांनीं त्याला तुझी राज्यलक्ष्मी जाईल असा शाप दिला. पुढें नारदानें त्या इंद्रद्युम्न राजाला रेणुकेच्या दर्शनास जा, ह्मणून सांगीतलें. त्या प्रमाणें राजा सर्व तीर्थांवर येऊन तेथें त्यानें स्नान केलें व रेणुकेचें दर्शन घेतलें. तेव्हां लवकरच त्या राजाला राज्यलक्ष्मी प्राप्त झाली. रेणुकेची मातापुर येथें स्थापना झाल्यावर परशुराम तेथून निघाला व स्वत:साठीं राहण्याकरितां भूमि शोधूं लागला, परंतु सर्व भूमंडळ त्यानें ब्राह्मणास दान दिलेलें असल्यामुळें त्याला राहण्याला अशी जागा नव्हती, ह्मणून त्यानें समुद्राजवळ आश्रय मागितला, तेव्हां सागरानें थोडें मागें सरून जमीन परशुरामासाठीं मोकळी करून दिली, तेथेंच वैतरणा नदी समुद्रास येऊन मिळाली होती, तिचे कांठीं परशुरामानीं आश्रम बांधला व तेथें ते राहूं लागले.

---

## अध्याय १५ वा.

### १ विद्याधर ब्राह्मणाची गोष्ट.

हे जनमेजय राजा! तुला आतां पाप व पुण्य यांचीं फळें एका मनुष्ययोनींत भोगणाऱ्या येळ राजाची कथा सांगतों. "तो येळ राजा दिवसा मनुष्यस्थितींत राहत असे, पण रात्रीं त्या राजाच्या शरीराचे अनेक कृमिकीटक उत्पन्न होत असत. या प्रमाणें तो राजा पापपुण्य भोगीत असे. पूर्वजन्मीं तो राजा, रीध नामक नगरांत एका विद्वान् धनेश्वर ब्राह्मणाचा मुलगा होता, तो ब्राह्मण अत्यंत सुशील असून कोट्याधीश होता. त्या धनेश्वर ब्राह्मणाला कांहीं दिवसांनीं पुत्र झाला, धनेश्वरानें त्याचें नांव विद्याधर असें ठेवून एका कुशल अशा जोतिषशास्त्र जाणणाऱ्या ब्राह्मणाकडून त्याची जन्मपत्रिका तयार करविली, वृद्धापकाळीं तो धनेश्वर ब्राह्मण

आपल्या कर्त्यासवरल्या विद्याधर पुत्राचे अंगावर सर्व संसार टाकून आपण काशीयात्रेला निघून गेला, तो तिकडेच कैलासवासी झाला. इकडे विद्याधर आपल्या बापाचा व्यवहार पाहण्यासाठीं कागदपत्र पाहत असतां, त्यांत त्याला आपली स्वतःची पत्रिका आढळून आली. ती पत्रिका संपूर्ण वाचून पाहिल्यावर त्याच्या मनाला फार उद्विग्नता उत्पन्न झाली; कारण त्या पत्रिकेंत विद्याधराकडून मातृगमन, सुरापान व ब्रह्महत्या हे तीन विलक्षण प्रकार होतील, असें वर्तविलें होतें. अशी चमत्कारिक ती पत्रिका पाहून विद्याधराची स्थिति अगदीं वेड्यासारखी झाली; त्या पापभीतीनें त्याचें मन अगदीं त्रस्त होऊन गेलें व त्यास काय करावें तें सुचेनासें झालें. त्यांपैकीं एक गोष्ट जरी हातून झाली, तरी सहस्र वर्षें नरकवास भोगावा लागेल आणि तिन्हीं गोष्टी हातून घडल्यास तीन हजार वर्षें नरकयातना भोगाव्या लागतील, तेव्हां ते प्रकार आपल्या हातून होऊं नयेत ह्मणून काय करावें, अशी त्या विद्याधराला फार काळजी लागली होती. शेवटीं त्या पापभीतीनें विद्याधरानें कांहीं द्रव्य बरोबर घेऊन आईचा निरोप घेतला, व दूर देशांतराला निघून गेला.

कांहीं दिवसांनीं त्या धनेश्वर ब्राह्मणाची स्त्री दुष्काळांत आपल्या जवळचें सर्व द्रव्य घालवून अगदीं निष्कांचन झाली. तिच्याजवळ द्रव्य मुळींच नसल्यामुळें तिचे खाण्यापिण्यावांचून फार हाल होऊं लागले, तेव्हां तिनेंहि आपला गांव सोडला व पोटासाठीं देशोदेश हिंडत हिंडत ज्या देशांत तिचा मुलगा विद्याधर येऊन राहिला होता, त्याच देशांत रेवातीराला असलेल्या एका शहरांत येऊन राहिली. पोटासाठीं तिनें अनेक व्यवसाय केले, परंतु पोट भरेना, ह्मणून शेवटीं ती गणिका झाली, व तो व्यवसाय करूं लागली. एके दिवशीं विद्याधराला कामवासना उत्पन्न झाल्यामुळें तो शहरांत फिरत फिरत त्याच गणिकेकडे आला. तेव्हां त्या गणिकेनें त्याचा चांगल्या प्रकारें आदर सत्कार करून त्याला आपल्या घरीं रात्रभर ठेवून घेतलें. मध्यरात्रीचे सुमारास विद्याधराला फार तहान लागली ह्मणून तो अंधारांत मंचकावरून उठला व मंचकाच्या खालीं असलेलें भांडें घेऊन तें त्यानें तोंडाला लावलें, तें चमत्कारिक चवीचें व घाणेरडें वासाचें पाणी पिऊन त्यास अत्यंत खेद उत्पन्न झाला, व तो त्या गणिकेला हें असें वाईट पाणी येथें कशाला ठेवलेंस ह्मणून ह्मणाला. गणिकेनें तें भांडें पाहून ती ह्मणाली, "तुह्मी पाणी न पितां सुरा प्यालांत, या भांड्यांत सुरा होती." तें त्या गणिकेचें बोलणें ऐकून विद्याधराचे मस्तकावर वज्राघात व्हावा त्याप्रमाणें त्याला दुःख झालें, तो ह्मणाला; जी गोष्ट घडूं नये ह्मणून मी आपलें घर पैसा व आई यांचा त्याग केला, ती गोष्ट अशा रीतिनें घडून आली. यावरून दैवांत ब्रह्मदेवानें जें लिहून ठेविलें असेल तें कोणाच्यानेंही टाळितां

येत नाहीं, असेंच खरें. मग तो त्या गणिकेला ह्मणाला, “ गणिके ! या भयंकर प्रकारामुळें, तूं कोण कोणाची वगैरे आहेस तें ऐकण्याची मला इच्छा झाली आहे, तर तूं आपली हकीकत मला सांग. ” तेव्हां ती ह्मणाली, कीं, “ नट, गणिका व योगी यांनीं आपली पूर्व पीठिका कोणालाही सांगूं नये, परंतु तुला सांगावयाला कांहीं हरकत नाहीं असें वाटल्यावरून मी तुला आपली हकिकत सांगतें. रीधपुर नावाच्या नगरांत राहणाऱ्या प्रसिद्ध धनेश्वर नावाच्या ब्राह्मणाची मी स्त्री आहें, माझा पति वारल्यावर माझा मुलगा विद्याधर ह्मणून होता तो माझें पालन करीत होता. पुढें तोही घरांतून द्रव्य घेऊन देशांतराला निघून गेला. पुढें दुष्काळांत माझ्या जवळचें सर्व द्रव्य नाहींसें झाल्यामुळें माझे खाण्यापिण्यावांचून फार हाल होऊं लागले, तेव्हां मी देशांतर करून हा गणिकेचा धंदा स्वीकारला. ”

त्या गणिकेची ती हकीकत ऐकून विद्याधराची स्थिति अधिक शोचनीय झाली. जें मातृगमन टाळण्यासाठीं तो आपल्या आईला सोडून दूर देशांतराला आला होता, तें मातृगमनही अशा रीतिनें घडलेलें पाहून त्याची अवस्था अगदीं वेड्यासारखी झाली. त्या शोकभरानें तो एखाद्या लहान मुला प्रमाणें रडूं लागला, व स्त्रियां प्रमाणें मस्तक पिटूं लागला. शेवटीं घडलेल्या गोष्टीबद्दल निरुपाय जाणून त्या गणिकेच्या घरांतून बाहेर पडला, व तें शहर सोडून तो आणखी देशोदेश हिंडूं लागला. हातून घडलेल्या पापाची निवृत्ति कशी करावी हें त्याला मुळींच कळेना. पुढें त्यानें एके दिवशीं एका ब्राह्मणाला भोजनाला बोलाविलें. भोजनासाठीं दहीं पाहिजे होतें, ह्मणून त्यानें बाजारांत जाऊन दह्याचीं दोन मडकीं खरेदी केलीं. त्या दोन मडक्यांपैकीं एका मडक्यांत सापाचें गरळ पडलें होतें. दहीं विकणारी बाई घरून दहीं बाजारांत आणित असतां एका घारीनें साप धरला व ती त्या सापाला वर नेऊं लागली, त्या वेळीं सापाचें तोंडांतून जें गरळ पडलें तें नेमकें एका दह्याचा मडक्यांत पडलें होतें, विद्याधराला तो प्रकार कांहींच माहित नसल्यामुळें त्यानें न समजून एक मडकें ब्राह्मणाला दिलें व एक आपण घेतलें. भोजन झाल्यावर कांहीं वेळ गेला नाहीं, तोंच त्या ब्राह्मणाला लहरी येऊं लागल्या व त्यानें थोड्याच वेळानें विद्याधराचे घरांत राम ह्मटला. तो प्रकार पाहून विद्याधर अत्यंत भयाभीत झाला. ज्या तीन भयंकर गोष्टी त्याच्या हातून होतील ह्मणून त्याच्या पत्रिकेंत वर्तविलें होतें, त्या गोष्टी झालेल्या पाहून तो अत्यंत निराश झाला व आतां आपणास तीन सहस्र वर्षे नरकयातना भोगिल्यावांचून गत्यंतर नाहीं अशी त्याची पक्की खात्री झाली. तेव्हां त्याला आपल्या जीवाचा अत्यंत कंटाळा आला व त्यानें त्रिवेणी संगमावर येऊन तेथें स्नान करून परमेश्वराला अनन्य भावानें शरण जाऊन प्राण सोडला.

## २ मनुष्याचे जंतु व जंतुचा मनुष्य.

पवित्र त्रिवेणीचें स्नान करून व विष्णु स्मरण करीत त्यानें प्राण सोडल्यामुळें, त्याला नेण्यासाठीं विष्णुदूत आले, ते त्या विद्याधराला उचलून विमानांत ठेवूं लागले, इतक्यांत यमाचे दूत येऊन ते त्याला यमलोकीं नेऊं लागले, तेव्हां विष्णु दूतांचें व यमदूतांचें भांडण सुरू झालें व तो तंटा देवलोकीं देवांपुढें गेला. मग देवांनीं त्या विद्याधराच्या पापपुण्याचा विचार करून त्याला विचारलें कीं, "तूं अगोदर पाप भोगतोस कीं अगोदर पुण्य भोगतोस ?" तेव्हां विद्याधर ह्मणाला, "मला एकाच शरीराला पाप व पुण्य असे भोग द्या." मग देवांनीं त्या विद्याधराला मनु नामक राजाच्या उदरीं जन्मास घातलें, तो मनुराजा सोमवंशी होता व अलंजापूर येथें राज्य करीत होता. त्याला जो पुत्र झाला तोच पूर्व जन्मींचा विद्याधर होय. त्या मनुराजानें मुलाचें नाव येळू असें ठेविलें. कांहीं दिवसांनीं त्या येळू राजाचें बालपण संपून त्याला तारुण्य प्राप्त झालें, तेव्हां पुण्य व पातक यांचीं फळें मिळण्यास आरंभ झाला. दिवसा तो राजा सर्व कृत्यें व्यवस्थितपणें करित असे, पण रात्रीं भोजनोत्तर पलंगावर जाऊन निजला ह्मणजे त्याच्या शरिराचे अनंत कृमिकीटक होत असत. प्रथम तो प्रकार बघून राणी अत्यंत विस्मित झाली. त्या वेळीं तिला काय करावें तें सुचेना. तिनें मोराच्या पिसांचा कुंचा घेऊन रात्रभर त्या कृमिकीटकांचें संरक्षण केलें. पुढें प्रभात होऊन सूर्योदय झाल्यावर त्या येळू राजाचें शरीर पूर्ववत् झालें. तो प्रकार पाहिल्यावर त्या राजाची स्त्री माणकावती प्रत्यहीं रात्रीं त्या कृमिकीटकांचें संरक्षण करीत असे. त्या येळु राजाचे आयुष्याचे दिवस अशा कष्टकारक रीतीनें चालले होते. पुढें एके दिवशीं तो शिकार करण्यासाठीं एका अरण्यांत गेला; बराच वेळ शिकार केल्यावर तो फार दमला व पिण्यासाठीं पाण्याचा शोध करूं लागला, तो त्या अरण्यांत चोहोंकडे हिंडला परंतु त्याला पाणी कोठेंहि दिसेना, मग शंकरास दया आली व त्यांनीं पाताळांतून भोगावतीचें पाणी एका गाईच्या खुरांत आणलें, राजानें तें गाईच्या खुरांत थोडेसें दिसत असलेलें पाणी पाहून तो तेथें बसला व त्यानें त्या पाण्यानें कसें तरी हात, पाय व तोंड प्रक्षालन केलें; नंतर तो तेथून घरीं आला, व घरीं आल्यावर त्यानें आपली तृषा शांत केली. रोजच्याप्रमाणें तो भोजनोत्तर पलंगावर निजल्यावर त्या राजाच्या शरीराचे कृमी कीटक झाले; परंतु हात, पाय व मुख हीं तशींच कायम राहिलीं, तो प्रकार बघून त्या माणकावतीला फार आनंद झाला. सकाळीं पति उठल्यावर ती पतीला ह्मणाली, काल आपण शिकारीला गेला होतां तेथें गेल्यावर काय काय हकीकत घडली ती मला सांगावी. तेव्हां राजा ह्मणाला, "काल ज्या अरण्यांत शिकारीसाठीं गेलों होतों, त्या अरण्यांत एक दोन श्वापदें मोठ्या कष्टानें मिळालीं;

तीं श्वापदें मारल्यावर मीं तहानेनें अत्यंत व्याकूळ झालों ह्मणून पाण्याचा शोध करूं लागलों. मी आपल्या लोकांनाहि पाण्याचा शोध करण्यास सांगितलें पण पाणी कोठेंहि दृष्टीस पडलें नाहीं; इतक्यांत माझी दृष्टी जमिनींत गाईचा खूर वठला होता त्याकडे गेली; त्या खूर वठलेल्या जागेंत मात्र थोडें पाणी होतें; पाणी कसलें ? कांहीं तरी तें होतें, पण मी अगदीं थकलेला असल्यामुळें त्या पाण्यानें कसें तरी हात पाय व तोंड प्रक्षालन केलें. पण माणकावती ! तें पाणी जरी चांगलें नाहीं, असें मला वाटलें, तरी त्यानें मी आपले हातपाय प्रक्षालन केल्यावर मला फार समाधान वाटलें."

## ३ येळारची स्थापना.

येळु राजानें ही सांगितलेली हकीकत ऐकून माणकावती राणीचे लक्षांत हात, पाय व तोंड हीं तशींच राहण्याचें कारण आलें. त्या खुरांतल्या पाण्यानें राजाला स्नान घातल्यास राजाचें सर्व शरीर रात्रीं तसेंच राहत जाईल असें तिला वाटलें. ती राजाला ह्मणाली; "महाराज ! काल आपण ज्या अरण्यांत शिकारीसाठीं गेला होतां व ज्या खुरांतल्या पाण्यानें हातपाय धुतलेत, तें अरण्य व तो खूर पाहण्याची माझी इच्छा आहे, तर मला तें दाखविण्याची तजवीज करावी." मग राजानें पुन्हां शिकारीची तयारी केली व बरोबर पुष्कळ लोक व राणीला घेऊन तो पूर्व अरण्यांत आला. आणि अरण्यांत आल्यावर राजानें राणीला जमिनींत वठलेला खूर दाखविला; पण त्यांत पाणी नाहीं हें पाहून ती फार निराश झाली; तेव्हां त्या राणीनें ती खुराची जागा पाणी लागेपर्यंत खणण्याचा निश्चय केला, व जोंपर्यंत पाणी लागणार नाहीं तोंपर्यंत अन्नपाण्यावांचून रहावयाचें असें ठरविलें. त्याप्रमाणें तिनें आपला संकल्प राजाला कळविल्यावर राजानें जमीन खणणारे लोक बोलाविले व त्यांच्याकडून ती खूराची जागा खणण्यास आरंभ केला. खणतां खणतां पन्नास दिवस झाले, तरी तेथें पाणी ह्मणून लागेना; इकडे राणीची अवस्था तर अगदीं कठीण झाली. पन्नास दिवस तिला अन्नपाणी नसल्यामुळें तिचें चर्म व अस्थि फक्त राहिल्या होत्या.

राणीची अशी स्थिति झाल्यावर पार्वती महादेवाला ह्मणाली, "अहो ! त्या पतिव्रतेचा आतां किती अंत पाहतां ! तिला तेवढें उदक द्याल तर ती आणि तिचा पति अशी दोघें वांचतील, नाहीं तर ती राणी आतां मरून जाईल" तेव्हां महादेव ह्मणाले, "पार्वती ! अद्यापि त्या येळू राजाचें पाप संपलें नाहीं. तें संपल्यावांचून मला पाणी देतां येत नाहीं. आणखी दहा दिवसांनीं तेथें पाणी लागेल. त्याप्रमाणें इकडे माणकावती राणी खणीत असलेल्या विहिरीला साठावे दिवशीं पाणी लागलें. तें पाणी पाहून राणीला अत्यंत आनंद झाला. तिनें त्या पाण्यानें राजाला स्नान घातलें; ब्राह्मणांना बोलावून राजाची सुवर्णतुला करविली.

आणि तें सर्व सोनें ब्राह्मणांना अर्पण केलें. त्या रात्रीं राजाचें शरीर तसेंच कायम राहिलें; हें पाहून तर राणीच्या आनंदाला सीमा राहिली नाहीं. नगरांतील लोकांना तें वर्तमान कळल्यावर त्यांनींहि ध्वजापताका उभारून आपला आनंद व्यक्त केला. ती खणलेली विहीर साठ मनुष्येंपर्यंत खोल झाली होती, त्या पाण्यानें येळु राजाच्या एवढ्या भयंकर पातकाचा नाश झाला हें पाहून लोकांना त्या पाण्याची योग्यता महातीर्थाप्रमाणें वाटूं लागली. त्या ठिकाणीं पाताळांतल्या भोगावतीचें पाणी आलें होतें. तेव्हां त्या तीर्थानें महा पातकांचा नाश व्हावा यांत मोठेसें आश्चर्य तें काय ? त्या तीर्थाजवळ शंकराचें ज्योतिर्लिंग होतें; त्यावर देऊळ बांधण्याचा नवस माणकावती राणीनें केला होता; तिनें आपल्या पतीला नवसाची गोष्ट कळवून ती आपल्या पतीला ह्मणाली; " महाराज ! आपणास आरोग्य प्राप्त झाल्यावर येथें शिवाचें मंदीर बांधीन, व मंदिराचा कळस दिसल्यावांचून अन्नपाणी घेणार नाहीं, असा मीं नवस केला आहे; तर तुम्हीं देशोदेशींचे कारागीर बोलावून मंदीर बांधण्यास आरंभ करा." राणीनें असें सांगितल्यावर राजानें पैठण नांवाच्या शहरांतून कोकु या नावाचा कारागीर बोलाविला, हा कोकु अत्यंत निष्णात कारागीर असून तो विश्वकर्म्याचाच अवतार होता. राजानें पाचारण केल्यावर तो आपणाबरोबर शिल्पविद्या जाणणारे सातशें लोक घेऊन आला, तो आल्यावर राजानें त्याला आपला मनोदय कळवून असें सांगितलें कीं, "राणीनें कळस दिसल्यावांचून अन्न ग्रहण करावयाचें नाहीं असा निश्चय केला आहे, तर काम किती दिवसांनीं होईल तें सांग." तेव्हां कोकू ह्मणाला, "राजा ! जरी आम्हीं रात्रंदिवस काम केलें तरी सोळा महिन्यावांचून कळसाचें दर्शन होणार नाहीं, " हें ऐकून राजा अत्यंत चिंताग्रस्त झाला, मग कोकु ह्मणाला, " राजा एवढी काळजी करण्याचें कांहीं कारण नाहीं, मी सात दिवसाचें आंत कळस दाखवितों. असें सांगून त्यानें कामाला आरंभ केला. त्या कोकूनें त्या वेळीं निराळीच युक्ति केली. दगड चुना वगैरे साहित्य न जमवितां एक पर्वत कोरून सात दिवसाचें आंत मंदीर तयार केलें व माणकावतीला कळस दाखविला. तें महातीर्थ येळु राजानें बांधलें ह्मणून त्याला येळार असें ह्मणतात."

## ४ शंकर–भिल्लीण कथा.

हे जनमेजय राजा ! आतां येळार येथें शिवाचें ज्योतिर्लिंग कसें स्थापन झालें त्याची कथा तुला सांगतों. " कोणे एके समयीं पार्वती व शंकर सोंगट्या खेळत बसले होते, आणि तें खेळणें, पण लावून चाललें होतें. खेळण्यामध्यें पार्वतीचा हात चांगला असल्यामुळें ती बरोबर फांसा टाकून पाहिजे तें दान घेत असे, आणि शंकर कसे तरी फासे टाकीत असल्यामुळें त्यांना इच्छित डाव पडत नसे; यामुळें पार्वती, पणांत शंकराच्या एकेक वस्तु जिंकूं लागली. पार्वतीनें शंकराचा

त्रिशूळ, डमरू, नंदी, रुंडमाळा, वासुकीहार, अलका, कुबेर, व्याघ्रांबर, कमंडलू, गजचर्म, भिक्षेची झोळी, भस्म, वगैरे सर्व हरण केलें; शेवटीं महादेवांनीं रागावून कमरेची लंगोटी पणांत लावली, पण तीहि पार्वतीनें जिंकली. तेव्हां शंकर पार्वतीला ह्मणाले; "पार्वती! तूं आणखी एक वेळ मजबरोबर खेळ, आणि त्या डावांत जर तूं मला जिंकशील तर मी तुला जिंकलेलें सर्व देईन." मग पार्वती ह्मणाली; "देवा! आतां आपणाजवळ पणांत लावण्यासाटीं कांहींहि नाहीं, ह्मणून मी आपणाबरोबर खेळत नाहीं." तेव्हां महादेव रागावले व ह्मणाले; "तूं जर खेळत नाहींस तर मी तुला तूं जिंकलेलें कांहींहि देत नाहीं." तेव्हां पार्वतीसहि राग आला व तिनें आपल्या सख्यांना बोलावून महादेवांजवळच्या एकेक वस्तु काढून घेतल्या. शेवटीं महादेवांनीं क्रुद्ध होऊन लंगोटीहि फेंकून दिली व कैलास पर्वत सोडून देऊन दुसरीकडे निघून गेले. ती त्या वेळची गंमत पाहून नारद आनंदानें नाचूं लागला, पण कांहीं वेळ गेल्यानंतर पार्वतीला थट्टेचा परिणाम भलताच झाला, याबद्दल फार पश्चाताप वाटूं लागला. मग ती नारदाला ह्मणाली; "नारदा! चल आपण महादेवांनां समजावून आणूं." तेव्हां नारद ह्मणाला, "पार्वती माते! तूं अशीच शंकरांकडे गेल्यास ते अधिक रागावतील, ह्मणून तूं आतां भिल्लिणीचा वेष धारण करून महादेवाकडे जा, ते हल्लीं गोदावरीच्या उत्तर तीरावर सह्याद्रीच्या पाठारीं महेश्वर नांवाच्या क्षेत्राजवळ जें एक अरण्य आहे त्या अरण्यांत तपश्चर्या करित बसले आहेत." मग पार्वतीनें नारदानें सांगितल्या प्रमाणें भिल्लिणीचा वेष धारण केला. हातांत धनुष्य व बाण घेतला, मोराचीं पिसें मस्तकास व कंबरेला बांधलीं, गुंजा वगैरे मण्यांचे हार तयार करून ते गळ्यांत घातले, कानावर फुलें ठेविलीं, सुंदर केंस गुंफून त्यांत केवड्यांची पानें खोविलीं, उत्तम वस्त्र परिधान केलें व पायांत नूपुरें बांधून ती नाचत नाचत व सुस्वर गाणीं गात गात शंकर ज्या वनांत बसले होते, त्या वनांत आली. वसंत ऋतूस नुकताच आरंभ झाल्यामुळें त्या वनालाहि अधिक शोभा आली होती; नाना प्रकारच्या फुलझाडांना फुलांचा बहार आला होता; आंबे, फणस, बकुळ, द्राक्ष, डाळींब वगैरे वृक्ष फलभारानीं लीन झाले होते. मोर टाहो फोडीत होते, कोकीळा सुस्वर गात होत्या. अशा वेळीं भिल्लीण महादेवापुढें जाऊन मल्हार रागांत गाऊन नाचूं लागली. तो सुस्वर स्वर व तो मनोहर नूपुरध्वनि ऐकून महादेवांच्या चित्तवृत्तींत चांचल्य उत्पन्न झालें, व ते डोळे उघडून त्या भिल्लिणीकडे पाहूं लागले, ती संधी साधून भिल्लीण अधिक हावभाव करूं लागली.

त्या भिल्लिणीचे नेत्रकटाक्ष, हावभाव, नृत्य व तें गाणें वगैरे पाहून महादेवांस स्थिर बसवेना, ते टक लावून भिल्लिणीकडे पाहून म्हणाले; "सुंदरी! अम्मळ स्थिर उभी रहा, माझ्याशीं दोन शब्द बोल, तूं कोण

कोणाची तें सर्व मला सांग, आणि माझा स्वीकार कर." पण पार्वती ! शंकराशीं कांहींएक न बोलतां तशीच हळू हळू पुढें जाऊं लागली, तेव्हां शंकर आपल्या आसनावरून उठले व त्या भिल्लिणीच्या मागें जाऊं लागले. मग त्या भिल्लिणीनें त्या सर्व अरण्यांत व पर्वताच्या दऱ्याखोऱ्यांतून आपणामागें शंकरांस फिरविलें, याप्रमाणें शंकरांस तिनें बरेंच हिंडविल्यावर ते थकले असें पाहून ती स्थिर उभी राहिली. मग शंकर तिला म्हणाले; " सुंदरी ! आतां मजवर अनुग्रह कर, मी तुझ्या मागें हिंडतां हिंडतां अगदीं थकून गेलों आहे, मी त्रैलोक्याचा ईश्वर जो महादेव तो आहें, माझा स्वीकार केल्यानें तुला मुळींच कमीपणा येणार नाहीं." याप्रमाणें कामाग्नीनें विव्हल झालले शंकर त्या भिल्लिणीचें आर्जव करूं लागले, यावरून पंचशराचा तडाका किती विलक्षण आहे याची अटकळ कोणासहि करितां येईल. प्रत्यक्ष भगवान् सदाशिवांवर ज्यानें एवढी सत्ता गाजविली, तो इतर मानवांनां किती गांजीत असेल तें सांगणें अशक्य आहे. महादेवानें तिची विनवणी केल्यावर ती भिल्लीण म्हणाली; " शंकरा ! तुम्हीं फार रागीट स्वभावाचे अहांत असा तुमचा बोभाटा मी ऐकला आहे. आपण आपली स्त्री सोडून देऊन असे इकडे तिकडे हिंडतां तसे मलाहि सोडून जाणार नाहीं असें कशावरून ? व आपण आपल्या स्त्रीयेला पुत्रप्राप्तिहि करून दिली नाहीं, त्याप्रमाणेंच माझीहि दुर्दशा कराल. तेव्हां राग सोडून देऊन मला अक्षय सन्निध ठेवाल असें कबूल करित असल्यास मी आपणांस वरीन. तसेंच आपण जर पार्वतीवर रागावलांत तर मी तुम्हांला सोडून जाईन." शंकरांनीं त्या वेळीं भिल्लिणीनें सांगितलेल्या सर्व अटी कबूल केल्या. मग त्या भिल्लिणीनें पुष्पांची माळ शंकरांच्या गळ्यांत घालून त्यांचा स्वीकार केला. तेव्हां शंकारांनीं त्या भिल्लिणीला आपल्या मांडीवर बसविलें, व तिला आलिंगन दिलें. आलिंगन देऊन शंकरांनीं भिल्लिणीकडे पाहिलें तों तिचें भिल्लिणीचें रूप नाहींसें होऊन ती पार्वती झाली. ती आदिशक्तीची रम्य मूर्ति पाहिल्यावर शंकर फार लज्जित झाले. मग पार्वती म्हणाली; " देवा ! तुम्हांला जिंकूं शकेल अशी या त्रिभुवनांत मजशिवाय कोण स्त्री आहे; आपण रागावून गेलांत म्हणून मला अशा रीतीनें आपणास प्रसन्न करून घ्यावें लागलें. त्याबद्दल आपण मला क्षमा करावी." मग शिवानें त्या वनाला काम्यकवन असें नांव ठेविलें.

---

## अध्याय १६ वा.

### १ बारा ज्योतिर्लिंगांची स्थापना.

" हे जनमेजय राजा ! कांहीं दिवसांनीं काम्यकवनांत शंकर व पार्वती नग्नावस्थेंत असतां, कांहीं ऋषि शंकरांच्या दर्शनासाठीं आले; तेव्हां पार्वती अत्यंत लज्जित

झाली व तिनें घाईघाईनें वस्त्र परिधान केलें. दर्शन करून ऋषि गेल्यावर पार्वती महादेवाला ह्मणाली; " मी आजपासून नग्न अशी तुमच्या अंकावर कधींहि बसावयाची नाहीं, कारण तुह्मांकडे कोण पुरुष केव्हां येईल याचा कांहीं नियम नाहीं." तेव्हां शंकर ह्मणाले, " या काम्यक वनांत असतां तूं मजबरोबर नग्नावस्थेंत खुशाल असत जा, मी या वनाला आजपासून असा शाप देऊन ठेवतों कीं, या अरण्यांत जो कोणी पुरुष येईल तो स्त्री होईल." या प्रमाणें शंकरानीं त्या काम्यकवनाला शाप दिल्यावर त्या अरण्यांत कोणीहि जात नसे, परंतु एके दिवशीं सुद्युम्न नावाचा राजा दुर्भाग्यवशात शिकारीच्या नादीं लागून त्या अरण्यांत गेला, व गेल्याबरोबर स्त्री झाला.

सुद्युम्नाची कथा अशी आहे कीं, सूर्यपुत्र श्राद्धदेवाला पुष्कळ दिवसपर्यंत पुत्र होत नव्हता, ह्मणून त्यानें पुत्रप्राप्तीकरितां मोठा यज्ञ केला, परंतु पूर्णाहुतीचे वेळीं ऋषींनीं पुत्राचा आशीरवाद न देतां 'मुलगी होईल' असा आशीरवाद दिला. त्याप्रमाणें त्या श्राद्धदेव राजाला कांहीं काळ गेल्यानंतर येळा नांवाची एक सुंदर मुलगी झाली. त्या कन्येकडून पितृऋणाची फेड कांहीं होणार नसल्यामुळें श्राद्धदेव अत्यंत दुःखी असे, सूर्यवंशाच्या उद्धारासाठीं पुत्र व्हावा ह्मणून त्यानें ब्रह्मदेवास प्रसन्न करून घेतलें. ब्रह्मदेवानें आणखी कांहीं देवांचें साह्य घेऊन श्राद्धदेवाला जी मुलगी झाली होती तिलाच पुरुषाचे अवयव प्राप्त करून दिले. श्राद्धदेवानें त्याचें नाव सुद्युम्न असें ठेविलें; तो सुद्युम्न तरुण झाल्यावर एके दिवशीं माहित नसल्यामुळें शंकरानीं शापिलेल्या काम्यकवनांत शिकारीसाठीं गेला असतां एकर्की पुरुषाचा स्त्री झाला, व त्याच्या घोडयाची घोडी झाली. त्या वेळीं तो अत्यंत लज्जित झाला. व त्यामुळें त्याला त्या अरण्याचे बाहेर पडण्याचें धैर्य होईना. मग तसाच लाजत लाजत कोणाचे दृष्टीस न पडतां तो एका सरोवराचे कांठीं झालेल्या विपरीत प्रकाराबद्दल दुःख करीत बसला. इतक्यांत, बुध त्या अरण्यांत शिकार करित होता, तो तहानेनें व्याकूळ झाल्यामुळें त्याच सरोवरावर पाणी पिण्यासाठीं आला. पाणी प्याल्यावर त्याची दृष्टी त्या सुंदर स्त्रीकडे गेली व तो कामातुर होऊन त्यानें त्या स्त्रियेला आपणास वरण्याविषयीं विनंति केली. सुद्युम्नानें निरुपाय जाणून बुधाची ती मागणी मान्य केली व त्याच्या गळ्यांत माळ घालून ती बुधाची अर्धांगी झाली. त्या सुद्युम्नास पुढें बुधापासून पुरूरवा या नांवाचा पुत्र झाला. इकडे सुद्युम्न बरेच दिवस घरीं न आल्यामुळें श्राद्धदेव मोठया काळजींत पडला व तो त्याचा फार चारकाईनें शोध करूं लागला. कांहीं दिवसांनीं वसिष्ठांनीं सुद्युम्नाची ती हकीकत श्राद्धदेवाला सांगितली. तें ऐकून श्राद्धदेव फार हताश झाला. मग वसिष्ठानें सुद्युम्नास त्या अवस्थेंतून सुटण्यासाठीं शंकराचें तप करण्यास

सांगितलें. सुद्युम्नानें पुष्कळ दिवस शंकरांची सेवा केल्यावर शंकर त्याला प्रसन्न झाले. तेव्हां तो ह्मणाला; " हे कैलासपते ! मला तुझ्या कृपेनें पुन्हां पुरुषत्व मिळावें " तें ऐकून महादेव ह्मणाले; " मी वनाला दिलेला शाप कधींहि कोणाला टाळतां यावयाचा नाहीं, तथापि तुझ्या भक्तीमुळें मी फार प्रसन्न झालों आहें, ह्मणून मी तुला असा वर देतों कीं, तूं एक महिनाभर पुरुष व एक महिनाभर स्त्री राहशील " याप्रमाणें शिवाचा वर मिळाल्यावर तो सुद्युम्न एक महिनाभर पुरुष होऊन आपला राज्यकारभार पाही, व एक महिनाभर स्त्री झाल्यावर बुधाच्या घरचीं गृहकृत्यें करी. याप्रमाणें तो सुद्युम्न आपलें कष्टकारक आयुष्य कंठीत असतां त्याला स्त्रियेच्या अवस्थेंत बुधापासून गर्त, उत्कल आणि मळ असे दुसरे सोमवंशी तीन पुत्र झाले. आणि स्वतः पुरुष असतां त्याला त्याच्या स्त्रियेच्या ठिकाणीं इक्ष्वाकु नांवाचा सूर्यवंशी पुत्र झाला. सुद्युम्नानें आपले पुत्र जाणते झाल्यावर सोमवंशी मुलांचें स्वाधीन पैठणचें राज्य केलें व सूर्यवंशी इक्ष्वाकूचे स्वाधीन अयोध्येचें राज्य करून स्वतः त्या चमत्कारिक स्त्रीपुरुषावस्थेला कंटाळून त्यानें अरण्यांत जाऊन पुढील आयुष्य तपश्चर्येंत घालविलें. व तो सुद्युम्न स्त्रियेच्या अवस्थेंत असतांच परलोकवासी झाला.

## २ येळगंगेची कथा.

त्या सुद्युम्नानें शंकरांची तपश्चर्या अत्यंत भक्तिभावानें केली असल्यामुळें अंतीं त्याला महादेव प्रसन्न झाले, व त्या येळा नावाच्या स्त्रियेचें नाव भूमीवर चिरकाल रहावें ह्मणून तेथें येळा नावाची नदी निर्माण केली, आणि तिला असा आशीर्वाद दिला कीं, तूं महानदी होऊन समुद्राला मिळशील. संपूर्ण भूमंडळावरील लोकांना तूं वंद्य होऊन तुझ्या स्नानानें महा पातक्यांचा देखील उद्धार होईल. असा त्या येळगंगेला आशीर्वाद मिळाल्यावर नारद घाईघाईनें गोदावरीकडे आला व तिला येळगंगेची माहिती सांगून ह्मणाला; " गोदावरी ! आतां पृथ्वीवरील लोक तुला न विचारतां, सर्व येळगंगेकडे जाऊन पावन होतील. तुला जर तुझ्या नावाची कांहीं चाड असेल तर तूं ती येळगंगा समुद्राला मिळाली नाहीं तोंच शंकराला जाऊन भेट, व कांहीं तरी खटपट कर. नाहीं तर ती येळगंगा पश्चिमेच्या वाटेनें धांवू लागेल व तिला उत्तरेकडील सर्व नद्या येऊन मिळतील, तिला सगळे वंद्य मानतील आणि पृथ्वीवरील तेंच एक पुण्यक्षेत्र होईल." नारदाचें तें भाषण ऐकून गोदावरीनें सर्व देवांची प्रार्थना केली. तेव्हां ब्रह्मा, इंद्र वगैरे सर्व देव येऊन विंध्याद्रीवर राहिले. ते गोदावरीला ह्मणाले; " गोदे ! आह्मीं त्या काम्यकवनांत शंकराकडे त्याची विनंति करावयाला गेलों तर सर्वजण स्त्रिया होऊं, ह्मणून तूं त्यांच्याकडे जाऊन त्यांनां इकडे घेऊन ये." त्याप्रमाणें गोदावरी काम्यकवनांत गेली व शंकराला वंदन करून ह्मणाली; "देवाधिदेवा कैलासपते !

तुझ्या दर्शनासाठीं सर्व देव आले आहेत, तर त्यांच्या भेटीसाठीं विंध्याद्रीवर चल." गोदावरीनें असें ह्मणतांच महादेव पार्वतीसह विंध्याद्रीवर आले तेव्हां पार्वती ह्मणाली; "देवा! मला फार तहान लागली आहे, तर उत्तम पाणी शोधून आणा." मग महादेवांनीं आपला त्रिशूळ भूमींत रोवून पाताळांतलें अमृतजल वर आणलें. त्या पाण्याचें वंदन केलें व तें पार्वतीला पिण्यासाठीं दिलें. पार्वतीची तृषा शांत झाल्यावर महादेव पार्वतीला ह्मणाले; "पार्वती! या तीर्थाचे ठिकाणीं जो कोणी स्नान करील तो कधीं यमाचें तोंडसुद्धां पहाणार नाहीं. जरी महा पातकी असला तरी तो, ह्याचें वंदन केल्यानें पातकापासून मुक्त होऊन कैलासीं जाईल." त्या तीर्थाचें नांव 'वरदा' असें असून त्याचा विस्तार पांच कोस आहे. त्या तीर्थाचे कांठीं पार्वतीनें हातावर कुंकू घेतलें, व तें शंकरांचे मस्तकास लावण्यासाठीं हातावर चोळूं लागली, तों त्या कुंकुमाची गोळी झाली. आणि ती गोळी पार्वतीनें हातावर घेतांच त्या गोळीचें ज्योतिर्लिंग तयार झालें. तेव्हां महादेव पार्वतीला ह्मणाले; "माझ्या अंतःकरणांत जो ईश्वर आहे, त्याचा दृश्य आकार हें लिंग आहे." मग महादेवांनीं तें लिंग आपल्या हातावर घेऊन त्यास वंदन केलें, व तें हालणार नाहीं असें भूमीवर ठेविलें. त्यांनीं त्या लिंगाला प्रदक्षिणा घालून नमस्कार केला. इतक्यांत सर्व देवही शंकरांकडे आले, त्यांनीं तें रक्तलिंग पाहून शिवाचेंच अनुकरण करून त्या लिंगाला वंदन केलें. सर्व विष्णु आदि देवांनीं त्या तीर्थांत स्नान करून भक्तीनें त्या लिंगाची पूजा केली, व त्यास नमस्कार केला. जगत्पित्या शंकरानें स्थापन केलेलें तें लिंग, ह्मणून सर्वांनीं अनन्यभावानें त्या लिंगावर अक्षता टाकिल्या, पार्वतीनें कुंकु हातावर घांसून त्याचें लिंग केलें ह्मणून शंकरांनीं त्याचें नांव घृष्णेश्वर असें ठेवलें. या ज्योतिर्लिंगाचें दर्शन ज्याला होईल, त्याला स्वर्गीचें अमृत प्राशन करण्यास मिळेल व तो कितीही पातकी असला, तरी तो नरकयातना चुकवून पुनीत होईल असा त्या स्थानास शंकरांनीं वर दिला.

## ३ ब्राह्मणांचा शिवास शाप.

घृष्णेश्वर ज्योतिर्लिंगाची हकीकत ऐकल्यावर जनमेजयाला द्वादश जोतिर्लिंगांच्या स्थापनेची हकिकत ऐकण्याची इच्छा झाली त्यांनीं वैशंपायन ऋषीला ती कथा सांगण्याविषयीं विनंती केली. तेव्हां वैशंपायन ऋषी ह्मणाले; "राजा जनमेजया! एकदां नारद कैलासीं गेलें व त्यांनीं भक्तिभावानें महादेवांचे चरणावर मस्तक ठेवलें. तेव्हां महादेवांनीं त्याला उठवून प्रेमानें आपल्या आसनावर बसविलें. नंतर महादेव ह्मणाले; "नारदा! कोठें कांहीं नवलविशेष पाहण्यांत आलें असल्यास तें मला सांग." तेव्हां नारद ह्मणाला; "देवा! भागीरथीचे कांठीं एक सहस्र ब्राह्मण ब्रह्मचर्य धारण करून तप करीत बसले आहेत. त्यांच्या स्त्रिया तरुण असून त्रिभुवनांत सुंदर अशा

आहेत. त्यांनां पाहून सर्वांनां मोहिनी पडते. मला वाटतें, त्या स्त्रियांच्या रूपानें मदनच भूतलावर अवतरला आहे. त्या स्त्रिया तारुण्याच्या भरांत आहेत, परंतु त्यांचे पति तप करित असल्यामुळें त्यांनां त्या तारुण्याचा कांहीं उपयोग नाहीं. त्या स्त्रिया प्रात:काळ झाल्याबरोबर आपआपल्या पतीला अन्न नेऊन देतात व आपआपल्या आश्रमांत परत येतात. हा एक चमत्कार मी पृथ्वीवर पाहिला, तो आपणास कथन केला. देवा! त्या स्त्रियांचें सत्व हरण करण्याचा प्रयत्न करून पहावा अशी माझी इच्छा आहे, तर तेवढी या सेवकाची इच्छा पुरी करावी." नारदानें असें सांगितल्यावर शंकरांनीं आपलीं सर्व भूषणें काढून ठेवून आपल्या सर्वांगाला विभूति चर्चून नग्न झाले व पृथ्वीवर त्या ब्राह्मण स्त्रियांच्या आश्रमांजवळ आले. शंकर भगवान आपले डोळे मिटून व प्रत्येक आश्रमासमोर उभे राहून भिक्षा घाला असें ह्मणूं लागले. त्या ऋषींच्या स्त्रियांनीं प्रभातकाळीं, तो नागवा गोसावी आलेला पाहून त्यांना फार भीति वाटली व तो जाईपर्यंत त्या दारें लावून घेऊन आंत बसल्या. याप्रमाणें मध्यान्हापर्यंत शंकर त्या आश्रमाजवळ राहून नंतर कैलासपर्वतीं निघून गेले. त्यानंतर त्या ब्राह्मणांच्या स्त्रिया घरांतून अन्न घेऊन निघाल्या, व त्यांनीं तें आपआपल्या पतीला आणून दिलें. त्या वेळीं ते सर्व ब्राह्मण अन्न आणण्यास उशीर लागला व त्यामुळें देवतार्चन वगैरे राहिलें, ह्मणून आपआपल्या स्त्रियांवर रागावले. तेव्हां त्या स्त्रिया ह्मणाल्या,- "आज सकाळीं उजाडलें नाहीं तोंच कोणी एक नग्न, कपटी, दुष्ट, असा गोसावी आला; तो आश्रमाजवळ मध्यान्हकाळपर्यंत होता, त्यामुळें अन्न आणण्यास उशीर लागला."

## ४ ज्योतिर्लिंगाचें गमनागमन.

स्त्रियांचें तें भाषण ऐकून सर्व ऋषि त्या गोसाव्यावर अत्यंत संतप्त होऊन त्यांनीं त्याला असा शाप दिला कीं, "ज्यानें आमच्या आश्रमाजवळ नग्न येऊन आमच्या स्त्रियांनां त्रास दिला, त्याचें लिंग गळून पडेल." ऋषींनीं अशा प्रकारें शाप दिल्यावर शंकरांचें लिंग गळून पडलें, व तें पाताळांत गेलें. ऋषिशापानें आपलें लिंग नाहींसें होऊन आपण पुरुषत्वाला मुकलों, याबद्दल शंकरांस फार लज्जा उत्पन्न झाली, व ते तपश्चर्या करण्यासाठीं अरण्यांत निघून गेले. मग पार्वती नारदाला ह्मणाली; "नारदा! हा सर्व घोंटाळा तुझ्यामुळें झाला आहे. तर लिंग परत आणण्याची कांहीं तरी तजवीज कर." तेव्हां नारद ह्मणाला; हे देवी पार्वती! तूं पृथ्वीवर जाऊन ऋषींनांच यासंबंधानें काय करावयाचें तें विचार." त्या प्रमाणें पार्वती व नारद ऋषींकडे आले व त्यांनीं ऋषींना सर्व हकिकत सांगून, लिंग परत कसें मिळेल तें विचारलें. लिंगाची प्रार्थना केल्यास लिंग परत येईल असें ऋषींनीं सांगितलें. मग पार्वती त्याप्रमाणें लिंगाची प्रार्थना करीत बसली. प्रार्थना पुरी झाल्यावर

पाताळांतून लिंग वर आलें, पण पार्वतीचा त्याला करस्पर्श झाल्याबरोबर तें पुन्हां पाताळांत गेलें; याप्रमाणें पार्वतीनें बारा वेळ प्रार्थना करून पाताळांतून बारा वेळ लिंग वर आणलें, पण त्याला हात लागल्याबरोबर तें खालीं जात असे. तेव्हां नारद ह्मणाला; "पार्वती ! तूं लिंगास करस्पर्श न करतां तें आपल्या दोन्ही जंघांच्या मध्यें दाबून धर." त्याप्रमाणें मग पार्वतीनें लिंगाची प्रार्थना करून लिंगास वर आणलें व तें आल्याबरोबर जंघेंत दाबून धरिलें, तेव्हां तें स्थिर झालें, आणि अद्यापहि तें तसेंच आहे. खालची शाळुंका ती पार्वतीरूप असून शंकर हे पिंडीच्या स्वरूपानें आहेत. या लिंगाची त्रिकाळ पूजा केली असतां अनंत पुण्य मिळतें. लिंग बारा वेळ ज्या ज्या स्थानीं आलें त्या त्या स्थानीं ज्योतिर्लिंग झालेलें आहे. तीं बारा स्थानें तुला सांगतों. सौराष्ट्रांत सोमनाथ, कर्नाटकांत मल्लिकार्जुन, गौतमीच्या उगमस्थानीं त्र्यंबकेश्वर, हिमालयावर केदारेश्वर (बद्रिकेदार), सेतुबंध येथें रामेश्वर, काशीचा विश्वेश्वर, उज्जनीस महांकाळ, वेरुळास घृष्णेश्वर, द्वारकेस नागेश, भीमेच्या उगमस्थानीं भीमेश, देवपरळीं येथें वैजनाथ आणि महाबलेश्वर येथें ओंकारेश्वर आहे. या बारा ज्योतिर्लिंगांपैकीं वेरूळ येथील लिंगाचें माहात्म्य काशीच्या विश्वेश्वराच्या माहात्म्याच्या बरोबरीचें आहे.

## ५ वेरूळ माहात्म्य.

येळगंगेचें माहात्म्य शंकरांनीं एकदम वाढविल्यामुळें गोदावरी सर्व देवांना आपणाबरोबर घेऊन शंकरांकडे आली, तेव्हां सर्व देव शंकरांना म्हणाले; "हे कैलासपते ! जर ही येळगंगा समुद्राला जाऊन मिळेल तर या गौतमीला कोणीहि विचारणार नाहीं, तिची महती अगदीं कमी होईल." ही देवांची प्रार्थना ऐकून शंकर म्हणाले, "मी या येळगंगेला समुद्राला मिळशील असा वर दिलेला आहे, तर मी आपला शब्द परत घेणार नाहीं." मग इंद्र ह्मणाला; "महादेवा ! तुम्हीं तिला तसा वर दिला असेल तर तिची आणि समुद्राची भेट येथेंच करवूं म्हणजे तुमचा शब्दही खरा होईल आणि गोदावरीचें माहात्म्यहि कमी व्हावयाचें नाहीं." ती इंद्राची गोष्ट महादेवांनीं कबूल केल्यावर देवांनीं समुद्रास अंश रूपानें तेथें आणिलें व त्या येळगंगेची व समुद्राची भेट करविली. त्या समुद्राला तेथें शिवनद असें म्हणत असून त्यानें पांच कोसपर्यंत येळगंगेला बांध घातला आहे, आणि नंतर पुढें उभयतां गौतमीला मिळाल्या आहेत. त्या संगमस्थानाचें माहात्म्य कांहीं विलक्षण आहे. याच वेळीं देवांनीं महादेवाला अशी विनंति केली कीं, "देवा ! या काम्यकवनावरील शापहि काढून टाकावा, नाहीं तर अज्ञानी लोक सहज चुकून येथें येतील आणि बिचारे निष्कारण स्त्रिया होतील." शंकरांनीं ती देवांची विनंति मान्य केली. ते ह्मणाले, "या वनांत कोणीही आलें. तरी हरकत नाहीं, पण कावळा आल्यास

तो स्त्री होईल. " नंतर महादेव देवांनां ह्मणाले कीं, " मी तुमचें ह्मणणें ऐकलें आहे त्या प्रमाणें तुह्मीहि माझें ह्मणणें कबूल करावें. तुह्मी सर्वांनीं वेरूळ येथें अंशरूपानें रहावें. शंकरांचें तें ह्मणणें देवांनीं कबूल केलें, आणि ते सर्व शिवासह तेथें अंशरूपानें राहिले."

"राजा जनमेजया! याप्रमाणें वेरूळ येथें घृष्णेश्वराची स्थापना होऊन सर्व देवांनींहि तेथें वास केल्यावर पातकापासून उद्धार करून घेण्यास लोकांनां ती एक मोठी सोय झाली. ब्रह्मघातकी, सुरापानी, मातृगमनी, बालहत्या करणारे, गोवध करणारे, गुरुद्रोही, वगैरे असंख्य पापी वेरूळ येथें येऊन शिवनदांत स्नान करून, घृष्णेश्वराचें दर्शन घेत त्यास त्यांच्या सर्व पातकांचा नाश करून, शिवगण त्यांनां विमानांत बसवून कैलासीं घेऊन जात. असा क्रम सुरू झालेला पाहून यमाला अत्यंत वाईट वाटलें. त्यानें आपले पाश, दंड, वगैरे साहित्य इंद्रापुढें टेवून इंद्राला अशी विनंति केली कीं, " देवेंद्रा ! हे तुझे पाश वगैरे सांभाळ; कारण आतां याची कांहींच अवश्यकता नाहीं. आज कित्येक दिवसांत मृत्युलोकींचा एकहि मनुष्य नरकांत आला नाहीं आणि जोंपर्यंत वेरूळ येथील घृष्णेश्वर व शिवनद आहे, तोंपर्यंत कोणी येणारही नाहीं. " तें यमाचें बोलणें ऐकून इंद्राला मोठें आश्चर्य वाटलें व असाच क्रम चालल्यास पापपुण्याचा विचार कांहींएक न राहतां संपूर्ण पृथ्वीवर घोटाळे होतील, असा विचार करून तो विष्णु वगैरे सर्व देवांसह शंकरांकडे आला व त्या देवांनीं महादेवास झालेला प्रकार सांगून त्यांच्या अनुमतीनें शिवनद तीर्थ माती टाकून बुजवून टाकलें, व घृष्णेश्वर लिंग किंचित झांकून टाकून देवांनीं आपला किंचित अंश तेथें टेविला, व ते तेथून आपआपल्या स्थानीं निघून गेले. त्या शिवनद तीर्थावर देवांनीं टाकलेली ती माती साठ धनुष्य पर्यंत होती, ती येळराजानें पुढें काढून तें शिवनद तीर्थ मनुष्यांनां स्नानासाठीं मोकळें केलें. त्या शिवनदाचें व घृष्णेश्वर लिंगाचें वर्णन करण्यास कोण समर्थ आहे! या कथेच्या श्रवणानेंच सर्व पातकांचा उद्धार होतो मग दर्शनानें व स्नानानें किती पुण्याचा संचय होत असेल याची कल्पनाच करणें अशक्य आहे. अशा प्रकारची ही कथा आहे.

---

## अध्याय १७ वा.

---

### १ हयग्रीवावतारकथा व बौद्धावतारकथा.

राजा जनमेजय वैशंपायनाला ह्मणाला, " ऋषि! भगवंतानें अनेक अवतार धारण केले आहेत, त्यांतील हयग्रीव अवतार व बौद्ध अवतार हे, प्रभूनें कोण-

त्याप्रसंगीं घेतले, तें मला आपण कृपा करून सांगावें. ” त्यावेळीं वैशंपायन ऋषि ती अवतारकथा सांगूं लागले. ते ह्मणाले; “ राजा ! ज्याप्रमाणें त्या भक्तवत्सल प्रभूनीं नारसिंह अवतार घेतला होता, त्याचप्रमाणें हयग्रीव अवतार घेतला होता. ती कथा अशी आहे कीं, सृष्टि उत्पन्न झाल्यावर प्रथमारंभींच, अगस्तीनें कुरुक्षेत्र येथें एक यज्ञ करण्याचा विचार केला, त्याप्रमाणें त्यानें यज्ञाची सामुग्री तयार करून ऋषींनांही बोलाविलें, परंतु यज्ञाच्या संरक्षणासाठीं कोणी नसल्यामुळें ऋषींला मोठा विचार पडला, तेव्हां अगस्ती ऋषी, भगवंताकडे गेले व त्याला वंदन करून ह्मणाले; “ हे नारायणा ! सृष्टिनिर्माणासाठीं आह्मी सर्व ऋषि कुरुक्षेत्र येथें यज्ञ करीत आहों, तरी तो यज्ञ निर्विघ्नपणें पार पडावा, व तेथें कोणी दुष्टानीं येऊन आह्मांस त्रास देऊं नये ह्मणून तूं त्या यज्ञाचे संरक्षणासाठीं चल. यज्ञमंडपाचे दरवाज्याजवळ तूं धनुष्यबाण घेऊन उभा रहा, आणि सावधान चित्तानें आह्मां सर्वांचें रक्षण कर. ” अगस्ती ऋषींची ती विनंति श्रीहरीनें मान्य केली व तो हातांत धनुष्यबाण धारण करून यज्ञमंडपाचे दरवाजांत यज्ञ रक्षणासाठीं उभा राहिला. याप्रमाणें ऋषींनीं यज्ञ संरक्षणाची तजवीज केल्यानंतर सुमुहूर्त पाहून यज्ञास आरंभ केला. यज्ञकुंड प्रदीप्त झाल्यावर आहुती देण्यासाठीं त्यांनीं प्रथम घोडा निर्माण केला. त्या घोड्याचें मुख अगदीं शेवटीं पूर्णाहुतीचे वेळीं पाहिजे ह्मणून तें कापून ऋषींनीं बाजूला ठेवलें, आणि बाकीच्या अवयवांच्या आहुती देण्यास त्यांनीं सुरवात केली. अशा रीतीनें ऋषींचा यज्ञ चाललेला पाहून श्रीहरीला स्वतःविषयीं मोठी धन्यता वाटली. तो आपल्या मनांत म्हणाला, या ऋषींचा यज्ञ आज मी येथें नसतों तर झाला नसता, या ऋषींचीं—तप व्रत यज्ञ—वगैरे कर्में माझ्यावर अवलंबून आहेत, माझ्या कृपेमुळेंच यांच्या तीर्थयात्रा होतात, व ही चराचर सृष्टि केवळ माझ्याच प्रसादानें चालली आहे, सृष्टीची नियामकता केवळ माझ्याच इच्छेवर अवलंबून आहे, मजकडूनच सर्वांना खाण्यापिण्यास मिळत आहे, ही सृष्टी मीच निर्माण केली असून सर्व प्राणिमात्र मीच उत्पन्न करितों; यावरून या संपूर्ण विश्वांत मीच काय तो एक धन्य असा आहें. ” अशा प्रकारें अभिमानानें प्रेरित होऊन भगवान आपल्या मनांत गर्व मानूं लागले तोंच त्यांच्या धनुष्याची दोरी एकाएकीं तुटली व त्या दोरीचा झटका श्रीहरीच्या मानेला लागल्यामुळें त्यांची मान कापली गेली मस्तक धडापासून वेगळें होऊन आकाशांत उडून गेलें. तेथें त्या मस्तकाचा सूर्य निर्माण झाला.

ऋषी यज्ञ करीत असतां त्यांचें लक्ष नारायणाकडे गेलें तों नारायणाचे शरिरावर मस्तक नसून नारायण तसाच उभा आहे, असें सर्वांच्या लक्षांत आलें. तो प्रकार पाहून सर्व आश्चर्यचकित होऊन अत्यंत दुःखी झाले. श्रीहरींचें मस्तक

कोणी तरी दुष्टांनीं कापून नेलें अशीच त्यावेळीं सर्वांची समजूत झाली, आणि पुढें यज्ञाचें संरक्षण कोण करील, अशी ऋषींनां मोठी काळजी पडली मग ऋषींनीं श्रीहरीलाच जिवंत करण्याचा विचार केला व पूर्णाहुतीसाठीं ठेवलेलें घोड्याचें मस्तक त्यांनीं श्रीहरीच्या शरीरावर बसवून त्याला जिवंत केलें. याप्रमाणें श्रीहरि जिवंत झाल्यावर सर्वांना आनंद झाला, स्वर्गांतून देवांनीं प्रभूवर पुष्पवृष्टी केली. मग भगवान् ऋषींनां म्हणाला, "ऋषीहो! मी मनांत असा गर्व धरला कीं, या सर्व चराचराची घडामोड माझ्यामुळें होत आहे, तुमचा यज्ञ माझ्या शक्तीनें चालला आहे तेव्हां मीच सर्वांत धन्य आहें, असा मी अभिमानांत गर्क झाल्यामुळें धनुष्याची दोरी सहज तुटली व तिच्या झटक्याबरोबर मस्तक कापून जाऊन आकाशांत गेलें. यावरून गर्व अत्यंत नाशक आहे. हा प्रमाद माझ्या हातून घडल्यामुळें आदि पुरुषानें तो माझा गर्व हरण करण्याच्या हेतूनें माझा शिरच्छेद केला, असा या गर्वाचा परिणाम आहे. अभिमान हा यमाचा बाण असून ह्याच्या सारखा प्राणाचा नाश करणारा संपूर्ण विश्वांत दुसरा कोणीही नाहीं. गर्वरूप पाषाणाच्या नौकेनें जो भवसागर तरून जाण्याचें मनांत आणील तो निश्चयानें बुडून जाईल. असो, मला माझ्या गर्वाची शिक्षा चांगलीच मिळाली, तथापि तुह्मीं माझ्या उडून गेलेल्या मस्तकास वंद्य मानीत जा; कारण सर्व गात्रांत शिरकमल हें प्रधान आहे. तें शिरकमल आकाशांत सूर्य झाले आहे. तेव्हां सूर्याला तुह्मीं नारायण स्वरूपच समजत जा. सूर्य हा मीच आहें तरी सूर्याचें जे भजन पूजन करितील, त्याची जे उपासना करितील, त्यांनां त्यांचें इच्छित प्राप्त होईल. तसेंच त्यांनां आरोग्य प्राप्त होऊन सृष्टिप्रळयाची बाधा होणार नाहीं." याप्रमाणें विष्णूनीं ऋषींनां सांगितल्यावर सर्व ऋषींनीं सूर्यमंडळास नमस्कार करून सूर्याची पूजा व प्रार्थना केली.

सूर्य जसा विष्णुरूप आहे, त्याप्रमाणें चंद्र हा ब्रह्मरूप आहे, आणि अंधार हा रुद्ररूप आहे. याप्रमाणें हयग्रीव अवतार झाला असून सूर्य मंडळाची उत्पत्तीहि विष्णुपासूनच झाली आहे. परंतु प्रथम सूर्य हा कश्यप ऋषींनीं निर्माण केला. ती कथा अशी आहे कीं, कश्यप ऋषींनीं एके वेळीं आपली स्त्री अदिती ही कामोत्सुक आहे असें पाहून, आपलें ऊर्ध्वरेत दक्षिण नेत्रांतून खालीं पाडिलें, तो वीर्यगोळा सूर्य होय. कश्यपानें तो वीर्यगोळा अदितीसाठीं पाडला म्हणून त्याचें नांव आदित्य असें ठेवून, त्याला आकाशपंथानें जाण्यास सांगितलें; परंतु तो वीर्यगोळा जरी तेजस्वी होता तरी त्याला किरण नव्हते. विष्णूचें मस्तक त्या वीर्यगोळ्यांत मिळाल्यावर त्या सूर्याला सहस्र किरण उत्पन्न झाले. म्हणून त्याचा प्रकाश सर्वत्र जाऊं लागला."

## २ राक्षसांचे एक लक्ष याग.

वैशंपायन ऋषि ह्मणाले, हे राजा! आतां तुला बौद्ध अवताराची कथा सांगतों. 'एकदां पाताळांत सर्व राक्षस एकत्र मिळाले व त्यांनीं शुक्राचार्याला असा प्रश्न केला कीं, हे शुक्राचार्या! आह्मां दैत्यांचें राज्य सर्व भूमंडळावर होऊन, सर्व इंद्रादि देव आह्मीं जिंकावेत यासाठीं काय केलें पाहिजे तें आम्हांला सांगा.– तेव्हां शुक्राचार्य म्हणाले:–"जो एक लक्ष यज्ञ करील तो अमरावतीचा इंद्र होईल. या यज्ञासाठीं हत्ती, उंट, अनेक मनुष्यें व ऋषींची आवश्यकता असून शिवाय सर्व प्रकारची यज्ञसामग्रीहि पाहिजे. यथासांग हे यज्ञ तुह्मीं केल्यास, तुह्मी प्रबळ होऊन तुमचें राज्य अढळ होईल, आणि देव निर्बल होऊन त्या सर्वांचें तेज व पुण्य तुह्मांस प्राप्त होईल.—याप्रमाणें शुक्राचार्यांनीं सांगितल्यावर राक्षसांनीं यज्ञासाठीं लागणारें सर्व साहित्य मिळविलें, व तरंगजा नदीचे काठीं भव्यमंडप घातला, व ऋत्विज नेमून अश्वमेधाचे पद्धतीनें सुमुहूर्तावर त्यांनीं यज्ञास आरंभ केला; व वेदमंत्राच्या घोषांनीं घृत, मेद वगैरे द्रव्यांच्या आहुती त्यांनीं यज्ञकुंडांत टाकण्यास सुरवात केली. हा प्रकार नारदास विदित होताच तो देवेंद्राकडे गेला व त्यानें पाताळांत राक्षसांनीं आरंभिलेल्या यज्ञाची सर्व हकीकत देवेंद्राला सांगितली. ती हकीकत ऐकून देवेंद्र व सर्व देव भयभीत झाले व त्यांनीं श्रीहरीची करुणा भाकण्यास आरंभ केला; "हे संकटहरणा! दुस्तरतरणा! कमलाधवा! माधवा! नृसिंहरूप धारण करून तूं हिरण्यकशिपूचा जसा नाश केलास त्याचप्रमाणें या वेळीं, पाताळांत आमच्या नाशासाठीं असुरांनीं जो यज्ञ आरंभिला आहे त्याचा नाश कर. त्या असुरांनां वेदमंत्रांचा अधिकार नसतां वेदमंत्राचा घोष करून ते यज्ञ करीत आहेत, तर हे विश्वसंरक्षक नारायणा! त्वरा करून या संकटाचें निवारण कर." या प्रमाणें देवांनीं प्रार्थना केल्यावर भगवान् द्वारकाधीश गरुडावर बसून वेगानें वैकुंठाहून निघाले, व भक्तांच्या संरक्षणासाठीं अमरावतीस आले. आपल्या करुणारवाला हाक देऊन भगवान् आले असें पाहून सर्व देवांनां अत्यंत आनंद झाला व त्यांनीं नारायणास वंदन केलें. मग श्रीकृष्ण भगवान् देवांनां ह्मणाले; "देवहो! त्या असुरांची पुण्यसामग्री यज्ञामुळें बरीच वाढली आहे, त्यांच्याबरोबर तुह्मीं युद्ध केल्यास तुम्हांस जय प्राप्त होणार नाहीं. यावेळीं युक्तीनेंच कार्यभाग साधला पाहिजे. बळीचा नाश जसा युक्तीनेंच केला, त्याप्रमाणें या वेळीं मी बौद्ध अवतार धारण करून त्या यज्ञाचा नाश करितों, तरी तुह्मी सर्व मजबरोबर पाताळांत चला."

## ३ श्रावक-परमहंसांचा मेळा.

विष्णूनें याप्रमाणें सर्वांनां सांगितल्यावर तो आपणाबरोबर सर्व देवांनां घेऊन पाताळांत तरंगजेच्या कांठीं आला. तेथें आल्यावर देव व विष्णु

वस्त्रें काढून टाकून नग्न झाले. विष्णूनें पायांत पुष्पांच्या पादुका घातल्या व गवत किंवा पाणी याला पाय न लावतां, ते हळू हळू अत्यंत काळजीनें पावलें टाकीत टाकीत चालूं लागला, मोराच्या पिसांचा कुंचा तयार करून त्यानें हातीं घेतला व पुढील भूमि अगोदर झटकावी आणि नंतर पाऊल टाकावें, अशा क्रमानें भगवान् विष्णु राक्षसांच्या यज्ञमंडपाकडे येऊं लागला. आकाशांतील अदृष्ट रेणु हेहि जीव धारण करणारे आहेत, तेव्हां त्यांचा शरीरस्पर्शानें नाश होऊं नये ह्मणून मोरांच्या पिसांनीं त्यानें आपलें शरीरही झांकून घेतलें होतें, बरोबर देवांनां शिष्य ह्मणून घेतलें होतें, तेहि सर्व हिंसाभयास्तव मोराचीं पिसें गुंडाळून आले होते. याप्रमाणें हा सर्व मेळा मोराच्या पिसांनीं रस्ता झाडीत झाडीत यज्ञमंडपांत आला.

तो दिगंबर अवस्थेंतील परमहंसाचा मेळा यज्ञमंडपांत आल्यावर, राक्षसांना मोठें आश्चर्य वाटलें. ते त्या दिगंबररूपी भगवानास म्हणाले, "हे परमहंसा! या दर्भासनावर बैस, आणि तूं कोण आहेस, हा मोराच्या पिसांचा कुंचा अंगाभोंवतीं कां फिरवित आहेस, पायांत पुष्पांच्या पादुका कां घातल्या आहेस, तें सर्व आह्मांस सांग. तेव्हां भगवान् दर्भासनाचा अनादर करून ह्मणाले, "आकाशांत अनंत जीव आहेत ते डोळ्यास अगोचर आहेत, त्या जीवांची हिंसा होऊं नये ह्मणून त्या जीवजंतूंना या पिसाऱ्यानें शरिरापासून मी दूर करतों, तसेच भूमीवरहि अनंत सूक्ष्म प्राणी आहेत, त्यांचीहि प्राणहानी होऊं नये ह्मणून पायांत या पुष्पांच्या पादुका घातल्या आहेत." असें सांगून भगवंतानें मोराच्या पिसाऱ्यानें जमीन झाडली व तो खालीं बसला. नंतर पाणी गाळून घेऊन त्या पाण्यानें त्यानें आचमन केलें व तो दैत्यांना ह्मणाला; "असुर हो! हा तुह्मीं कसला होम करीत आहां व याची फलश्रुती काय? तें मला सांगा." तेव्हां दैत्यगुरु शुक्राचार्य ह्मणाला. "याला याग असें ह्मणतात, वेदांच्या श्रुतीप्रमाणें हा आम्हीं करित आहों, यांत पशूंच्या मांसाचें हवन केल्यास तें अवदान देवांनां पावतें, आणि मग देवलोकींचें सिंहासन सहज प्राप्त होतें." हें ऐकून भगवंतानें आपले डोळे झांकले व दीर्घ श्वास सोडून तो ह्मणाला; "अहो; हा तर तुह्मीं मोटा अधर्म करीत आहां; जीवहत्येविषयीं नुसतें बोलण्यानें देखील नरक प्राप्त होतो मग प्रत्यक्ष हिंसा केल्यानें किती अधःपात होत असेल? जो प्राणी हिंसा करतो, तो सहस्र जन्म मासा होऊन त्या अपराधाचीं फळें भोगतो, किंवा पतंग होऊन दिव्यावर पडतो, आणि पुनःपुनः त्याला याचप्रमाणें नरकयातना भोगाव्या लागतात. तेव्हां तुह्मी हा याग करून पुण्य जोडावयाच्या ऐवजीं पाप मात्र संपादन करीत आहांत. जरी कोणाकडून नकळत हिंसा झाली तरी त्याला मुद्दां प्रायश्चित नाहीं, मग जाणून बुजून हिंसा करणारांनां तर त्यांतून सुटावयाला कांहींच मार्ग नाहीं. असें भयंकर पापकर्म

जोडून घेतल्यावर तुह्माला स्वर्गाचें राज्य मिळणें कधींच शक्य नाहीं, असो. झालें तें झालें, आतां तरी हा याग बंद करा आणि पुढें प्राणिहिंसा करूं नका, नाहींतर स्वर्गाचें सिंहासन तर मिळणार नाहींच, पण भयंकर नरकाचे मात्र अधिकारी व्हाल. 'यत्र जीवो शिस्तत्र' असें वचन आहे, तेव्हां सर्व प्राणिमात्र शिवस्वरूप आहेत, त्यांचा वध करणें हें निश्चयानें नरकाची सामग्री आहे. शरीर हें एक कमल असून त्या कमलामध्यें आत्मा हा दिव्याप्रमाणें आहे, आत्मा हा अविनाशी आहे हें खरें, परंतु शरीराच्या नाशानें त्यालाहि त्रास होतो, म्हणून हिंसा करणारास नरक प्राप्त होतो. राक्षसहो! तुम्हीं या शुक्राचार्यांच्या बोलण्यावर विश्वास ठेऊन हा यज्ञ करीत आहां, परंतु हें भयंकर पाप असून तें या शुक्राचार्यांच्या अज्ञानपणामुळें तुम्हीं जोडून घेत अहां. याच्या सांगण्यावरून तुम्हीं आपला कुळाचार कुळधर्म सोडून देऊन भलतेंच कृत्य करीत अहां, तुम्हीं राक्षस महा पराक्रमी असतां तुम्हांस असा यज्ञयाग करण्याची काय अवश्यकता आहे? तुम्हीं युद्ध कराल तर तेव्हांच स्वर्ग मिळवाल, मग हा असा क्षुद्र यज्ञ करून निष्कारण पाप कां जोडून घेतां!"

भगवंताचें तें बोलणें राक्षसांनां खरें वाटलें व त्यांनीं तो यज्ञ बंद करून त्या नवीन श्रावकधर्माची दिक्षा त्या परमहंस स्वरूपी भगवंताकडून घेतली. त्या श्रावकधर्माचें अहिंसा हें मुख्य तत्त्व असून त्यांच्या अरिहंत वगैरे चौवीस देवता आहेत, आणि त्यांच्या चवदा शाखा आहेत. याप्रमाणें भगवंतानें राक्षसांना श्रावकधर्माची दिक्षा देऊन त्या याग समयीं देवांवर आलेलें संकट निवारण केलें. त्या संकटाचें निवारण भगवंतानीं बुद्धीनें म्हणजे युद्ध वगैरे न करितां केलें म्हणून त्या अवतारास बौद्ध अवतार असें म्हणतात."

## दुसरें स्तबक संपूर्ण.

---

# कथाकल्पतरु.



## स्तबक ३ रा.

### अध्याय १ ला.

#### मंगलाचरण.

**यं ब्रह्म वेदांतविदो वदंति, परं प्रधानं पुरुषं तथान्ये ॥**
**विश्वोद्भवं कारणमीश्वरं वा, तस्मै नमो विघ्नविनाशकाय ॥ १ ॥**
**वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनं ॥ देवकीपरमानंदं कृष्णं वंदे जगद्गुरुम् ॥२॥**

हे त्रिगुणातीता! त्रिलोकपूर्णा! शुद्धबुद्धसत्वगुणा! व शुद्ध स्वरूप नारायणा! तुला मी अनन्यभावें शरण येऊन साष्टांग नमस्कार करितों. हे अनंता! तूं कार्य, कारण व कर्ता असून, भोज्य, भोजन व भोक्ता तूंच आहेस. तूं सगुण (मायोपहित चैतन्य) व निर्गुण (ब्रह्मस्वरूप) तूंच आहेस. हे सच्चिदानंदा! दयाघना! त्रिगुणगुणांतलें कांचन (तत्व) तो तूं असून प्रळयकाळचें जीवनहि तूंच आहेस. हे परमहंसा! हे परमपुरुषा! हे महाभागा! हे हृदयकमलांतील बीजांशा! तुझा जयजयकार असो. हे अव्यक्ता! आदिअंकुर अधरा! हे परात्पर जोतिर्लिंगा! तुझा जयजयकार असो. हे विश्वेश्वरा! तुझ्या स्वरूपाचें चित्र काढण्यास मी पामर अगदीं असमर्थ आहे. हे महापुरुषा! तूं शब्द, स्पर्श, स्थूल, सूक्ष्म व गंधहि नसून पूर्णरस परमहंस आहेस. हे जगदाभासा! हे ओंकारप्रकाशा! हे ब्रह्माधीशा! हे अनंता! तूं पर असून परमानंद आहेस. हे विश्वकंद परमात्म्या! तूं जाणण्याला अशक्य असून अभेद्यही आहेस. तूं प्रलयकालाचे अगोदर असून अंतींहि पण आहेस. हे निरंतरा! तूं सर्व देवांमध्यें उदधि (मेघ) अर्थात् वृष्टि करून अन्न देणारा अथवा उदधि (समुद्र) अर्थात् सर्व तीर्थांचें स्वरूप अथवा अंतरहित असून सर्व जगताच्या रचनेला कारणही तूंच आहेस. तूं सर्वज्ञ व त्वंपदबुद्धि असून तूं ज्ञानविधि ह्मणजे उपनिषद्रूप आहेस. तूं हें सर्व चराचर व्यापून पुन्हां अलिप्त असा आहेस. कमळाचें पान जसें पाण्यांत असूनही पाण्यापासून अलिप्त असतें, त्याप्रमाणें तूं सर्व ब्रह्मांडांत

असून ब्रह्मांडापासून अलिप्त आहेस. तूं जीवनाचें जीवन असून ज्ञाननेत्रांना अंजन स्वरूप आहेस. मोह हा तूंच असून वेदाचें ज्ञानरूप अंजनही तूंच आहेस. हे कृपावंता! हे भक्तवत्सला! हे महाशीला! हे धर्मश्रुतीच्या प्रतिपालका! हे गोविंदा! तूं मनाला बंधापासून सोडविणारा असून तत्वमस्यादि वाक्यांच्या ज्ञानाचें साधनही तूंच आहेस. हे अनाथनाथा! हे अनंता! तुझी स्तुति मी अज्ञान पामरानें काय करावयाची आहे? आकाश मोजावयाला कोणतेंही माप जसें अपुरें आहे, त्याप्रमाणें तुझी स्तुति करावयाला कोणतेही शब्द अपुरे आहेत. चार मुखांचा ब्रह्मदेवही तुझी स्तुति करण्यास असमर्थ आहे, तर मी अज्ञानी पामरानें तुझे गुण वर्णन कसे करणार, तसेंच जी कांहीं थोडी तुझी स्तुति केली आहे, ती तरी यथासंगत आहे, असा मला कोठें भरंवसा आहे? परंतु हे कृपानिधे! आपल्या मुलाचे बोबडे बोल मातेला जसे कौतुकप्रद वाटतात; त्या प्रमाणें या दीन लेंकराचे अर्धवट बोल तुला आवडतील असा मला भरंवसा आहे.

हे अनंता! मातृपितृ स्वरूप असून ब्रह्मकुलाची देवताही तूंच आहेस. तूंच गणाधीश गुरु व श्रोता वक्ताहि तूंच आहेस. अंतःकरणपूर्वक तुझें स्तवन केलें असतां तूं सर्व विघ्नांचा नाश करून कार्य पूर्ण करितोस, झाडाच्या मुळाशीं घातलेलें जीवन जसें शाखांचें, पल्लवांचें, पुष्पाचें व फळांचें संरक्षण करितें, त्याप्रमाणें तुझें स्तवन केलें असतां; सहज सर्वांची कृपा संपादितां येते. हे सर्वज्ञ चिंतामणी! तुला माझी एवढीच विनंति आहे कीं, तूं माझ्या अंतःकरणांत प्रवेश करून, जसा बाण लक्ष्यावर जातो, जसा धूर्त मनुष्य दुसऱ्याचें वर्म काढतो, तसा तूं माझ्या मुखानें या तिसऱ्या स्तबकाचें खरें हृद्गत काढ. जसा डोळस मनुष्य आंधळ्याला मार्ग दाखवितो, किंवा जसें सूत्र घोड्याच्या मागें धावतें, त्याप्रमाणें तूं मला मार्ग दाखीव, म्हणजे मी त्या मार्गानें जाईन. मला काव्यस्फूर्ति दे, म्हणजे मी तुझे गुणानुवाद गाईन. मला ज्ञानदृष्टि दे, म्हणजे मी तुझ्या स्वरूपाची ओळख श्रोत्यांस करून देईन. माझ्या हातानें या कथाकल्पतरु, ग्रंथाचे दोन स्तबक पूर्ण झाले; ही केवळ तुझी कृपा होय. अशीच जर तुझी कृपा राहील, तर हा ग्रंथ मी सहज पूर्ण करीन. हे प्रभो! आतां मी या तिसऱ्या स्तबकाला आरंभ केला आहे, तो तूं मला काव्यस्फूर्ति देऊन रसभरीत कर. श्रोते जनहो! आपण ह्या श्रीहरीच्या कथांचें प्रेमानें श्रवण पठण करित आहां, हें पाहून मला फार समाधान वाटत आहे. श्रोतेजनांत कांहीं मूढ असतील, कांहीं ज्ञाते असतील, परंतु मला ते सर्व सारखेच प्रिय आहेत. कारण जे ज्ञाते आहेत ते ज्ञानदृष्टीनें या कथांचें मनन करितील व जे मूढ आहेत ते धोपट मार्गानें व श्रद्धाळूपणें ह्या कथा वाचतील; सारांश दोघांचें कार्य एकच आहे, तेव्हां मला दोघेहि प्रिय वाटणें साहजिक आहे. श्रोतेजनहो! ही

हरिकथा भवभयव्यथा दूर करणारी असल्यामुळें तिचें मनन तुह्मी प्रेमानें व भक्तीनें करा. मी ह्या कथा जर माझ्या कीर्तीसाठीं लिहित नाहीं; तर तुह्मी माझ्या दोषाकडे तरी दृष्टि कशाला देतां ? मुख्य गोष्टीवर नजर देऊन परमेश्वराच्या नामामृताचें पान करा ह्मणजे झालें. जर मजकडून कांहीं दोष झाले असतील तर त्याबद्दल मला क्षमा करा, मी क्षमेला सर्वस्वी पात्र आहें; कारण केवळ परमेश्वराच्या गुणांचें कथन करावें, या दृष्टीनेंच मी हा ग्रंथ लिहित आहें. त्यांत आत्मश्लाघता कांहींहि नाहीं. मला विद्वत्तेचा डौल नाहीं व कीर्तीची अभिलाष नाहीं.

या वाक्पुष्पांच्या हारांत मी अठराहि पुराणांतलीं सुमनें गुंफिलीं आहेत. तसेंच रामायण, भारत, वेद, श्रुति, स्मृति वगैरे परम वंद्य ग्रंथांतील कथारूप सुमनेंही यथावकाश गुंफिलीं आहेत. हा हार तुम्हांस मनोरम वाटेल यांत कांहीं शंका नाहीं, पुराणें किती आहेत व त्यांची ग्रंथसंख्या किती आहे, हें मी आतां तुम्हांस संक्षेपानें सांगतों.

**ब्राह्मं पाद्मं वैष्णवं च शैवं लैंगं सगारुडम् ॥**
**नारदीयं भागवतमाग्नेयं स्कंदसंज्ञितम् ॥ १ ॥**
**भविष्यं ब्रह्मवैवर्तं मार्कंडेयं सवामनम् ॥**
**वाराहं मात्स्यं कौर्मंच ब्रह्मांडाख्यमिति त्रिषट् ॥ २ ॥**

ब्रह्म, पद्म, विष्णु, शिव, लिंग, गरुड, नारद, भागवत, अग्नि, स्कन्द, भविष्य, ब्रह्मवैवर्त, मार्कण्डेय, वामन, वराह, मत्स्य, कूर्म व ब्रह्मांड अशीं अठरा पुराणें आहेत. त्यांची संख्या अशी आहे किं, ब्रह्म पुराण दहा हजार, पद्मपुराण पंचावन हजार, विष्णु पुराण तेवीस हजार, शिव पुराण चोवीस हजार, नारद पुराण पंचवीस हजार, भागवत अठरा हजार, मार्कण्डेय व अग्नि पुराण पंधरा हजार चारशें, भविष्योत्तर पुराण चोवीस हजार पांचशें, ब्रह्मवैवर्त अठरा हजार, लिंग पुराण अकरा हजार, वराह पुराण चोवीस हजार, स्कंद पुराण एक्याऐशीं हजार शंभर, वामन पुराण दहा हजार, कूर्म पुराण सतरा हजार, मत्स्य पुराण चौदा हजार, ब्रह्मांड पुराण बारा हजार व गरुड पुराण एकोणीस हजार आहे. अठरा पुराणांची एकंदर ग्रंथसंख्या चार लक्ष सोळा हजार चारशें इतकी आहे. या सर्वांचें सार काढून मी हा कथा—कल्पतरु ग्रंथ तयार करीत आहें. पुराणाचीं लक्षणें व उपलक्षणें मिळून एकंदर दहा लक्षणें आहेत, त्यांपैकीं पांच लक्षणें आहेत, तीं हीं किं—

**सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वंतराणि च ॥**
**वंशानुचरितं चैव पुराणं पंचलक्षणं ॥ १ ॥**

अव्यक्त ह्मणजे हिरण्यगर्भ स्वरूपाची ओळख करून देणें यास सर्ग लक्षण असें ह्मणतात, विराट स्वरूपाविषयीं विवेचन करणें यास प्रतिसर्ग लक्षण असें ह्मणतात, पंचभूतांचा विचार करणें यास वंशलक्षण असें ह्मणतात, ब्रह्मदेवापासून स्वायंभुवादि जे चौदा मनु झाले त्यांच्याविषयींच्या उहापोहाला मन्वंतर लक्षण असें ह्मणतात, सोमापासून व सूर्यापासून जे वंश निर्माण झाले आहेत त्यांचा इतिहास ग्रथित करणें आणि सत्पुरुषांच्या व राजांच्या कथा वगैरे चांगल्या बुद्धीनें लिहिणें, यांस वंशानु चरित लक्षण असें ह्मणतात. याशिवाय नाना प्रकारचे अवतार धारण करून लोकांचें पालन करणें, सर्व जीवांच्या जीवनाचे उपाय उत्पन्न करणें, प्रलय कालीं सर्वांचा संहार करणें, मी जीव आहें अर्थात् किंचिज्ञ आहें व स्वतःविषयीं आणि परक्याविषयीं न्यायबुद्धि अशीं आणखीं पांच उपलक्षणें आहेत. एकूण पुराणांचीं दहा लक्षणें आहेत. या लक्षणांनीं कथेचें सार काढून तें ग्रहण करावें अशी नीति आहे. गुणी लोक जशी उंसाच्या रसापासून साखर घेतात किंवा दुधापासून नवनीत घेतात, त्याप्रमाणें कथेंतील ग्राह्यांश तेवढा घ्यावा. हे साधुसंत जनहो! मीहि माझ्या या ग्रंथासंबंधानें तुह्मांला हीच विनंति करून हें मंगलाचरण पुरें करितों.

---

## अध्याय २ रा.

### १ क्रौंचपक्षी व रामायण.

जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला ह्मणाला; "मुनिवर्य! या भूमंडळावर सर्वगुणसंपन्न, शीलवंत, दयाळू, उदार, सत्यवचनी, विरक्त, दुष्टांचें हनन व साधूंचें संरक्षण करणारा, पितृभक्त, एकपत्नी, असा कोणी सज्जन पुरुष होऊन गेला असल्यास त्याचें चरित्र आपणाकडून ऐकावें अशी माझी इच्छा आहे." जनमेजय राजाचें असें भाषण ऐकून वैशंपायन ऋषि ह्मणाले; "राजा! तूं ह्मणतोस त्याप्रमाणें उदारचरित्र, एकपत्नी, एकवचनी, एकबाणी, असा सूर्यवंशी क्षत्रियकुलावंतस राजाधिराज श्रीरामचंद्र होऊन गेला आहे. या संपूर्ण पृथ्वीवरच काय, परंतु तीनही लोकांत श्रीरामचंद्राप्रमाणें पुत्रवत् प्रजेचें पालन करणारा राजा झाला नाहीं, आणि पुढेंहि होणार नाहीं. श्रीरामचंद्राच्या चरित्राचा महिमा जितका वर्णावा तितका थोडाच आहे. शंकरासारखे देवहि हालाहल विषापासून होणाऱ्या दाहाची शांति होण्याकरितां ज्या रामाच्या नावाचा अहर्निश जप करितात, असें तें रामचंद्राचें नुसतें नावहि इतकें

पवित्र आहे, तर त्याचें सर्व चरित्र किती पवित्र असेल याची कल्पना करणेंहि अशक्य आहे. राजा जनमेजया ! त्या श्रीरामचंद्राची कथा मी तुला सांगतों; ती तूं आतां श्रवण कर.

पृथ्वीवर प्रभु श्रीरामचंद्राचा अवतार होईल असें, ज्या वेळीं कांहीं एक संभव नव्हता त्या वेळीं, वाल्मीकि ऋषीनें शतकोटी रामायण लिहून भविष्य केलें. पुढें श्रीरामचंद्राचा अवतार झाल्यावर वाल्मीकीनें रामायणांत ज्या ज्या गोष्टी लिहून ठेविल्या होत्या त्या त्या सर्व घडून आल्या, अशी त्या वाल्मीकि ऋषीची विलक्षण शक्ति होती. श्रीरामअवताराचे पूर्वी ब्रह्मदेवानें रामायण एका श्लोकांत लिहिलें. एके दिवशीं ब्रह्मदेव सत्यलोकीं ध्यानस्थ बसला असतां त्याच्या हृदयांत त्याला श्रीरामचंद्राचें दर्शन झालें; आणि पुढें प्रभूच्या हातानें होणाऱ्या सर्व गोष्टी त्याला दिसून आल्या. तेव्हां त्या सर्व चरित्राच्या आशयाचा त्यानें एक श्लोक तयार केला, तो हा किं—

आदौ रामतपोवनाधिगमनं हत्वा मृगं कांचनं,
वैदेहीहरणं जटायुमरणं सुग्रीवसंभाषणं ॥
वालीनिर्दलनं समुद्रतरणं लंकापुरीदाहनं
पश्चाद्रावणकुंभकर्णहननं एतद्धि रामायणम् ॥ १ ॥

याप्रमाणें ब्रह्मदेवानें एका श्लोकांत रामायण तयार केल्यावर तो श्लोक त्यानें नारदाला सांगितला. तो एक श्लोक आधारभूत घेऊन त्यावरून नारदानें शंभर श्लोकाचें रामायण तयार केलें. पुढें कांहीं दिवसांनीं वाल्मीकि ऋषीची व नारदाची शरयू नदीच्या तिरावर भेट झाली. तेव्हां वाल्मीकि ऋषि नारदाला ह्मणाले; " नारदा ! सर्वगुणी, पुण्यश्लोक व खरा क्षत्रिय असून धर्मपालक असा कोणी राजा पृथ्वीवर असल्यास त्याचें चरित्र मला सांग." तेव्हां नारद ह्मणाला " ऋषि ! आपण ह्मणता असा राजा सांप्रत तर पृथ्वीवर कोणी नाहीं, परंतु पुढें होणार आहे. अयोध्या नगरीचा राजा दशरथ, याला कांहीं दिवसांनीं जो एक पुत्र होईल, तो प्रभूचा अवतार होईल; त्या राजाचें नाव श्रीरामचंद्र होईल; मला ब्रह्मदेवानें त्यापुढें होणाऱ्या श्रीरामचंद्राचें चरित्र एका श्लोकानें सांगितलें आहे, तेंच चरित्र मी शंभर श्लोकांत लिहिलें आहे. हे वाल्मीकि ऋषे ! या माझ्या रामायणावरून मला असें वाटतें किं, तो श्रीरामचंद्र प्रभु अत्यंत सच्चरित्र असा राजा होईल. सर्व आबालवृद्धांनीं त्याच्या चरित्राचें मनन करावें व त्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करावा; असें त्याचें उदार चरित्र होईल. तो अत्यंत निर्मल अशा नीतीनें वागेल, पवित्र अशा धर्मानें राहील व सत्य अशा वाणीनें बोलत जाईल, तो रणांत पर्वताप्रमाणें धैर्यानें वागेल, त्याचा बाण कधींहि फुकट जावयाचा नाहीं, तो एकपत्नीव्रतानें राहील, आणि आपल्या

प्रजेचें तो पुत्राप्रमाणें पालन करील. वाल्मीके! त्या श्रीरामचंद्र प्रभूचें चरित्र लिहिण्यास मला वाटतें मी अगदींच असमर्थ आहें. याप्रमाणें पुढें होणाऱ्या श्रीरामचंद्राची त्रोटक माहिती वाल्मीकीला सांगून नारद भ्रमण करण्यास गेला.

नारद गेल्यानंतर वाल्मीकिऋषि, भारद्वाज व सुमंतु, यांनां बरोबर घेऊन शरयू नदीवर स्नानासाठीं आले. स्नान करून संध्या ब्रह्मयज्ञ वगैरे नित्य कर्में आटोपून तिघेहि आश्रमांत परत येत असतां एका वृक्षावर बसलेला एक सुंदर क्रौंच पक्ष्यांचा जोडा त्यांच्या दृष्टीस पडला. त्या पक्ष्यांच्या लीला पाहून तिघांनांहि मोठी मौज वाटली, परंतु इतक्यांत एका दुष्ट पारध्यानें एक बाण त्या पक्ष्यांच्या जोड्याला मारून त्या क्रौंच पक्ष्यांतील नराला खालीं पाडलें, तें शोचनीय दृश्य पाहून त्या तिघांनांहि अत्यंत वाईट वाटलें. विशेषतः त्या वेळीं त्या क्रौंच मादीचा आपल्या पतीसाठीं चाललेला विलाप ऐकून वाल्मीकि ऋषीचें अंतः-करण करपून गेलें. त्याला त्या क्रूर पारध्याचा अत्यंत राग आला, तो त्या पार-ध्याकडे रागानें पाहून म्हणाला.

मा[1] निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ॥
यत्क्रौंचमिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥ १ ॥

‘ निर्दया पारध्या ! त्या सुखी क्रौंच पक्ष्याला मारून त्याच्या स्त्रियेला विपत्तींत लोटलेंस या पातकाबद्दल तूं शंभर वर्षे नरकयातना भोगशील. ’ असें वाल्मीकि ऋषि, रागानें त्या पारध्याला म्हणाला, परंतु त्या पारध्याला त्याबद्दल कांहीं एक वाईट न वाटतां तो त्या मृतक्रौंच पक्ष्याचे पाय आपल्या हातांत धरून वाल्मीकि समोरून निघून गेला. ती मृतपक्ष्याची विटंबना पाहून वाल्मीकि-ऋषीला अधिक वाईट वाटलें, व तो तेथून निघून आपल्या आश्रमांत आला. आश्रमांत आल्यावर तो आपल्या शिष्यांबरोबर अनेक शास्त्रांवर रोजच्या नियमाप्रमाणें चर्चा करित बसला, पण त्या क्रौंचपक्ष्याचा दुःखकारक देखावा हृदयांत घोळत असल्यामुळें त्याचें चित्त त्या शास्त्रचर्चेकडे लागेना; ध्यानस्थ बसून पाहिलें, तरी तेच विचार अंतःकरणांत येऊं लागले. अन्य ठिकाणीं मन गुंतविण्याचा त्यानें बरेच वेळां प्रयत्न केला, परंतु मनांत वारवार त्या क्रौंचपक्ष्याची गोष्ट येऊन, तें पारध्याचें कृत्य दृष्टीपुढें दिसूं लागे, म्हणून वाल्मीकि ऋषीनें नारदानें सांगितलेल्या शतश्लोकी रामायणावरून संपूर्ण रामायण लिहिण्याचें मनांत आणिलें, मग त्यानें भारद्वाजास आपणाजवळ कागद, दऊत, लेखणी धेऊन लिहिण्यासाठीं बसविलें व आपण मजकूर सांगू

---

१ या श्लोकाचे तीन चार अर्थ निषादपर व रामपर असे रामायणाचे टीकेंत केले आहेत.

लागला. राजा जनमेजया ! याप्रमाणें रामायण लिहिण्यास आरंभ केल्यावर वाल्मीकीच्या अंतःकरणांतली तळमळ नाहींशी झाली व त्या कार्यांतच तो व त्याचे शिष्य तल्लीन होऊन गेले. वाल्मीकिऋषि दूरदृष्टीनें भावी काळाकडे दृष्टि देऊन मजकूर सांगे व तो भारद्वाज लिहून घेई. अशा रीतीनें वाल्मीकिऋषीनेंहि शंभर कोटि श्लोक रामचरित्राविषयीं भारद्वाजाला सांगितले.

## २ वाल्मीकि ऋषीची कथा.

वैशंपायन ह्मणाले "हे जनमेजय राजा ! ज्या वाल्मीकिऋषीचे अंगीं एवढें सामर्थ्य होतें, किं राम जन्मास येण्याचे पूर्वीच त्यानें समग्र रामायण लिहून काढलें त्या पुण्यपावन ऋषीचें चरित्र ऐकण्याची तुला साहजिक इच्छा झाली असेल, ह्मणून त्या वाल्मीकि ऋषीची हकीकत तुला संक्षेपानें सांगतो. राजा ! ज्या वाल्मीकीला लोक ऋषि ऋषि ह्मणून अत्यंत वंद्य मानतात, तो वाल्मीकि पूर्वीं वाल्या या नावाचा हीन कोळी जातींतील होता, तो जातीनेंच हीन होता असें नाहीं, तर मनानेंहि अत्यंत निर्दय व बुद्धीनें विलक्षण दुष्ट असा होता. तो केवळ पशु व पक्ष्यानांच मारून आपलें उपजीवन करित होता असें नाहीं, तर मनुष्यांनाहि मारून त्यांचें द्रव्य हरण करित असे व त्या द्रव्यानें आपल्या मुलामाणसांचें संरक्षण करीत असे. याप्रमाणें त्या वाल्या कोळ्याचा कित्येक वर्षें सारखा क्रम चालल्यामुळें त्याच्या हातानें अनंत मनुष्यांचे खून झाले होते. यासंबंधानें अशी दंतकथा आहे किं तो प्रत्यहीं जितक्या माणसांना मारी, तितके खडे तो रांजणांत टाकित असे. एक रांजण भरल्यावर दुसरा, दुसरा भरल्यावर तिसरा, असे त्यानें कित्येक रांजण खड्यांनीं भरून ठेविले होते. असा त्या वाल्या कोळ्याचा क्रम चालला असतां, एके दिवशीं त्या रस्त्यानें बकदाल्भ्य ऋषि जात होते. त्या ऋषींनां अडवून वाल्यानें त्यांच्यावर बाण रोखला, व जवळ काय आहे तें सर्वमाझ्या स्वाधीन कर ह्मणून त्या ऋषीला सांगितलें, तो प्रकार पाहून बकदाल्भ्य ऋषि अत्यंत चकित होऊन गेले, ते त्या कोळ्याला ह्मणाले; "वाल्या ! मला मारून तुला काय मिळावयाचें आहे, मजजवळ कौपीन ( नेसावयाची लंगोटी ), पूजेचा शालिग्राम आणि भीक मागावयाची करवंटी एवढेंच काय तें आहे. या वस्तूंनीं तुझें कोणतेंहि कार्य होण्यासारखें नाहीं, आणि तूं इतरांनां मारून त्यांच्या जवळचें धान्य, द्रव्य, सोनें, पुस्तकें, वस्त्रें, पशु, वगैरे हरण करितोस, त्यापासूनहि तुझा कांहीं फायदा नाहीं. कारण या वस्तु चोरणारांनां सहस्र वर्षें नरकवास भोगावा लागतो, जीवहिंसा करणारांनां अनंत गर्भवास भोगावे लागतात, आणि हीं सर्व दुःखें तुला एकट्यालाच भोगावीं लागतील, तूं हीं नीच कृत्यें करून स्वतःचेंच उपजीवन करित आहेस असें नाहीं, तर तूं आपली बायको, मुलें या सर्वांचें संरक्षण करित आहेस, परंतु तीं या तुझ्या पातकाला मुळीच भागीदार नाहींत,

इतकेंच नव्हे, तर तूं त्यांनां आपल्या पातकाचा थोडा थोडा वांटा देऊं लागल्यास ते तो भाग मुळींच घेणार नाहींत, यावरून तूं विचार कर, किं जें पातक तूं आपल्या बायकामुलांसाठीं करित आहेस, तें पातक तुला एकट्यालाच भोगावें लागणार आहे; मग एवढें हें नीच कृत्य करून तुला फायदा तो कोणता ? " हें बकदाल्भ्य ऋषीचें भाषण ऐकून वाल्या कोळ्याला मोठें आश्चर्य वाटलें; तो ऋषीला ह्मणाला; "ऋषि ! मी ज्या बायकामुलांचें आजपर्यंत संरक्षण करित आहें, ते माझ्या पातकाचे वांटेकरी होतील किंवा नाहीं, हें मी त्यांना विचारून येतों, तोंपर्यंत तुह्मी येथेंच उभे रहा." ती वाल्या कोळ्याची गोष्ट बकदाल्भ्य ऋषींनीं कबूल केल्यावर वाल्या कोळी आपल्या घरीं आला व कुटुंबांतील सर्व माणसांस बोलावून तो ह्मणाला, "आजपर्यंत तुमच्या संरक्षणासाठीं मी असंख्य जीव मारले आहेत तर या माझ्या पातकाचा वांटा तुह्मीं घेण्यास तयार आहां किंवा नाहीं तें मला सांगा." तेव्हां त्याची स्त्री ह्मणाली, " अरे! त्या पातकाची तूं आमच्याजवळ गोष्टहि बोलूं नकोस. मी आपलें एवढें सर्व शरीर तुझ्या भोग विलासासाठीं तुला अर्पण केलें आहे, तें पापासाठीं नसून तुझा पुण्याचा वांटा मिळविण्यासाठीं केलें आहे. मी तुझ्या पातकांतील एक रतीभरहि पाप घेण्यास तयार नाहीं. आमचें संरक्षण करणें हें तुझें कर्तव्यच आहे. तूं आपलें स्वतःचें मांस कापून जरी माझी क्षुधा शांत केलीस, तरी माझ्यावर तुझे उपकार नाहींत." नंतर वाल्यानें आपल्या कन्या पुत्रानां तोच प्रश्न केला, तेव्हां त्यांनींही कानावर हात ठेवून आपल्या आईप्रमाणेंच उत्तर दिलें. मग तो वाल्या कोळी आपल्या आईला पातकाचा वांटा स्वीकार ह्मणून ह्मणाला; तेव्हां त्याची आई ह्मणाली; " बाळा! आम्हीं तुझ्या पुण्याचे वांटेकरी आहोंत, पापाचे वांटेकरी नाहीं. तुझ्या पापाचा मालक तूंच आहेस. तूं बाहेर काय करतोस, तिकडे लक्ष देण्याचें आम्हांस मुळींच कारण नाहीं; तूं कोणत्याहि रीतीनें आम्हांला आणून देत जा, म्हणजे झालें." त्या वाल्या कोळ्याला त्याच्या कुटुंबांतल्या सर्व माणसांनीं याप्रमाणें स्पष्ट सांगितल्यावर त्याच्या मनाला अत्यंत उद्विग्नता आली, व तो बकदाल्भ्य ऋषींकडे परत येऊन म्हणाला; " ऋषि ! पापाचा वांटा घेण्यास कोणीही तयार नाहीं, सर्व पुण्याचे भागीदार आहेत, पापाचे कोणीही नाहींत. हें पाहून माझें मन फार उद्विग्न झालें आहे, तर मी या तापत्रयांतून सुटून पुढें होण्याऱ्या नरकयातनेपासूनहि मुक्त होईन, असा कांहीं मला मार्ग दाखवा." असें म्हणून तो वाल्या कोळी, पश्चात्ताप पावून अत्यंत ऋषिचरणावर गडबडां लोळूं लागला. वाल्याला पुरा पश्चात्ताप झाला आहे, असें जाणून बकदाल्भ्य ऋषींनां त्याची दया आली. मग त्यांनीं त्याच्या मस्तकावर हात ठेवून उठविलें व कानांत बीजमंत्र सांगितला. याप्रमाणें गुरूपदेश केल्यावर वाल्या कोळी त्याच जागेवर मातींत खाचाड तयार करून, त्या खाचाडांत मंत्राचा जप करीत बसला.

व बकदाल्भ्य ऋषि बरोबर असलेल्या शिष्यांनां घेऊन यात्रेला निघून गेले. पुढें ते ऋषि यात्रा करून साठ वर्षांनीं त्याच मार्गानें परत येत असतां, त्यांनीं जेथें वाल्या कोळ्याला उपदेश केला होता, तेथें त्यांच्या दृष्टीस एक मोठें वारुळ पडलें. त्या वारुळांतून मंत्रध्वनि येत आहे हें पाहून सर्वांनां मोठें आश्चर्य वाटलें. मग त्यांनीं तें वारुळ खणून काढलें, तों आंत पूर्वींचा वाल्या कोळी बकदाल्भ्यानीं सांगितल्याप्रमाणें जप करीत बसला आहे, असें सर्वांनां आढळून आलें. त्या तपाच्या सामर्थ्यामुळें त्याची अंगकांती वगैरे सर्वच बदललें होतें. किड्याचा जसा भ्रमर होतो, अथवा सोनें अग्नींत घातलें असतां जसें अधिक सतेज होतें, त्याप्रमाणें त्या वाल्याचे शरीरावर तपाचें तेज दिसत होतें. मग सर्व ऋषींनीं त्यास त्या मृत्तिकेंतून बाहेर काढलें, व त्याला अभिषेक करून गायत्री मंत्राचा व चारही वेदांचा अधिकार दिला, आणि त्याचें नाव वाल्मीकि ऋषि असें ठेविलें. पुढें त्या वाल्मीकिनें रामजन्माच्या अगोदरच रामायण लिहिलें. अशा वाल्मीकीची थोरवी वर्णन करणें कठिण होय. ”

## ३ दशरथराजाची पुत्रविवंचना.

“ राजा जनमेजया ! कोसल देशामध्यें शरयू नांवाच्या पवित्र नदीतिरावर अयोध्या या नावाची एक अत्यंत विस्तीर्ण व सुंदर अशी नगरी आहे. त्या अयोध्येमध्यें पूर्वी अज या नावाचा राजा राज्य करीत होता. पुढें तो राजा निवर्तल्यानंतर त्या अजराजाचा पुत्र दशरथ राजा राज्य करूं लागला. तो दशरथ राजा चक्रवर्ती होता, त्याची राजधानी अयोध्या ही त्याच्या वेळीं बारा योजनें विस्तीर्ण होती. त्या नगराचें वर्णन करण्यास सहस्रमुखी शेषहि असमर्थ आहे, मग इतरांचा पाड तो काय ? त्या रम्य व पवित्र नगरीचें दर्शन व्हावें ह्मणून शेष लक्ष्मणाचा अवतार घेऊन आला, व प्रभु श्रीरामचंद्राचा अवतार घेऊन वैकुंठाहून तेथें आले. यावरून ती अयोध्या वैकुंठाहूनहि सुंदर, रम्य, पवित्र व मोठी होती, असें वाटतें. ती नगरी रामचंद्राच्या वास्तव्यानें पुढें अधिक नावारूपाला आली होती. त्यांच्या वास्तव्यापूर्वी ती विस्तृत नगरी अगदीं कलाहीन दिसत होती. स्त्रियांनां पतीवांचून जसे अलंकार शोभत नाहींत, किंवा शालिग्रामावांचून संपुष्टाला शोभा नाहीं, अथवा कोकिळ-रवावांचून वसंत जसा बहारदार वाटत नाहीं, याप्रमाणें श्रीरामचंद्रावांचून अयोध्या नगरी रजस्वला स्त्रियेप्रमाणें दिसत होती; पण तें त्या नगरीचें औदासिन्य प्रभूंनीं लवकरच नाहींसें केलें.

दशरथराजा हा महापराक्रमी असून त्यानें आपल्या बाहुबलानें चक्रवर्ती हें पद मिळविलें होतें. संपूर्ण पृथ्वीवरील राजांनां त्यानें आपले मांडलिक केले होते, तो राजा अत्यंत उदार असून दानशील होता, तो सर्व विद्यांत निपुण असून पुत्राप्रमाणें प्रजेचें पालन करीत असे. त्याची प्रजाही त्याच्याविषयीं

पूज्य बुद्धीनें वागून त्याला पित्याप्रमाणें मानीत असे. त्याचें सैन्य सर्वबाजूंनीं पूर्ण असून नेहमीं सज्ज असे. त्या राजाची राज्यव्यवस्था अत्यंत व्यवस्थित असून बंदोबस्तासाठीं त्यानें राष्ट्रवर्धन, सिद्धार्थ, धृष्टी, विजय, जयवंत, धर्मपाळ, सुमंत आणि अकोप, असे अष्ट प्रधान नेमिले होते. ते अष्ट प्रधानही राजाप्रमाणेंच पापभीरु असून नीतीनें राज्य कारभार करीत असत. या अष्ट प्रधानांसह दशरथ राजा राज्य करीत असतां, एके दिवशीं राजा सहजगत्या आरशांत आपलें मुख पाहूं लागला; तों जरेनें झालेले पांढरे केंस त्याच्या दृष्टीस पडले. ते केंस पाहून राजा आपल्या मनांत ह्मणाला, हा राज्याचा गाडा हांकतां हांकतां वृद्धावस्था आली, तरी अझून ही राज्यतृष्णा नाहींशी होत नाहीं, हें अत्यंत अनुचित आहे. यावेळीं निग्रह करून या भवपाशांतून सुटण्याचा कांहीं तरी प्रयत्न केला पाहिजे. जोंपर्यंत शरीर सुदृढ आहे तोंपर्यंतच आत्म्याच्या उद्धाराचा कांहीं तरी प्रयत्न केला पाहिजे. असा विचार करून राजानें आपल्या सर्व प्रधानांनां जवळ बोलाविलें, व त्यानां म्हणाला; “ प्रधानहो ! माझी आतां वृद्धावस्था झाली आहे, तेव्हां हें राज्य सोडून वानप्रस्थाश्रम ग्रहण करावा, असें मी मनांत आणिलें आहे. तर माझ्या पश्चात या राज्याची कशी व्यवस्था करावयाची याचा तुम्हीं चांगला विचार करून मला सांगा. ” दशरथाचें हें बोलणें ऐकून सर्व प्रधानांचीं मनें उदास झालीं. तेव्हां एक प्रधान म्हणाला; “ महाराज आपण आजपर्यंत पुष्कळ दानधर्म केला, परंतु पुत्र प्राप्तीसाठीं कांहींच प्रयत्न केला नाहीं, तरी विद्वान ब्राह्मण बोलावून त्यांच्याकडून पुत्रकामेष्टी यज्ञ करवा, म्हणजे आपणास पुत्रप्राप्ति होईल व या सांप्रतच्या काळजीपासून आपण दूर व्हाल. ” हें ऐकून राजा म्हणाला; “ प्रधानहो ! माझ्या दैवांत पुत्र नाहीं असें दिसतें, मग निष्कारण त्यासाठीं प्रयत्न करून आयुष्याचे दिवस तरी कां फुकट घालवूं ” तेव्हां सुमंतु नावाचा प्रधान म्हणाला; “ महाराज ! मी यात्रेसाठीं बद्रिकाश्रमीं गेलों असतां तेथें जो ऋषींचा संवाद ऐकला तो आपणांस सांगतों. ”

## ४ हरिणीपासून मनुष्योत्पत्ति.

बद्रिकाश्रमांतील कांहीं ऋषींनीं सनत्कुमारास असा प्रश्न केला किं, अयोध्येच्या दशरथ राजाला पुत्र कसे होतील ? तेव्हां सनत्कुमार म्हणाले; “ अंग देशाचा राजा रोमचरण या नांवाचा आहे, तो अत्यंत उदार असून धर्मकर्मासंबंधानें राजऋषि आहे, परंतु त्या राजाच्या देशांत बारा वर्षे अवर्षण पडल्यामुळें त्याचा देश उद्ध्वस्त होऊन लोक अन्नावांचून मरूं लागले; तेव्हां तो राजा ब्राह्मणांकडे जाऊन त्यांना म्हणाला; “ विप्रहो ! माझ्या राज्यांत बारा वर्षे पाऊस नाहीं, तरी पर्जन्य पडण्यासाठीं काय करावें तें मला सांगा. ” त्या वेळीं एक ब्राह्मण राजाला म्हणाला; “ राजा ! कश्यप ऋषीचा पुत्र

विभांडक आहे, त्या विभांडकाचा पुत्र शृंगी या नावाचा आहे, त्या शृंगी ऋषीला तूं घेऊन आल्यास त्याच्या प्रयत्नामुळें तुझ्या राज्यांत पाऊस पडेल. तसेंच तुझा मित्र जो दशरथ राजा त्यालाही त्या शृंग ऋषीच्या कृपेनें पुत्र होतील." असें त्या विप्रांनीं रोमचरण राजाला सांगितलें आहे. यावरून शृंग ऋषीच्या कृपेनें दशरथ राजाला पुत्र होतील असें वाटतें. हें त्या सनत्कुमारांचें बोलणें मी स्पष्ट ऐकिलें आहे, तेव्हां महाराज! आपण शृंग ऋषीला आणावें किंवा रोमचरण राजाला बोलावून त्याच्याकडून शृंग ऋषीला बोलवावें."

वैशंपायन ऋषी जनमेजय राजाला याप्रमाणें दशरथ राजाची कथा सांगत असतां, मध्यें शृंग ऋषीचा संबंध आला म्हणून त्या ऋषीची हकीकत ऐकण्याची त्याला इच्छा झाली. ती राजाची इच्छा जाणून वैशंपायन ऋषी राजाला शृंग ऋषीची कथा सांगूं लागले. ते म्हणाले, "राजा! विभांडक ऋषी आपल्या दर्भासनावर बसून देवतार्चन वगैरे करीत असतां आश्रमांतील हरिणें मैथुन करूं लागलीं, तो प्रकार पाहून विभांडक ऋषीला कामेच्छा उत्पन्न झाली व त्याचें रेत स्खलन होऊन तें दर्भासनावर पडलें. तेव्हां विभांडक तेथून उठून शुचिर्भूत होण्यासाठीं स्नानाला गेला. तो स्नानाला गेल्यावर इकडे एका ऋतुस्नात हरिणीनें तें दर्भासनावर पडलेलें रेत भक्षण केलें. त्या रेतापासून ती हरिणी गरोदर झाली व पूर्ण दिवस झाल्यावर ती प्रसूत होऊन तिला मनुष्याप्रमाणें मुलगा झाला. तो विलक्षण प्रकार पाहून विभांडक ऋषीला मोठें आश्चर्य वाटलें. नंतर अंतर दृष्टीनें असें होण्याचें कारण काय, तें त्याच्या लक्षांत आलें. मग त्यानें त्या मुलाचें संरक्षण करून त्याला लहानाचें मोठें केलें. तो मुलगा कांहींसा मोठा झाल्यावर त्याच्या मस्तकावर एक शिंग उगवलें, त्यावरून विभांडकानें त्याचें नांव शृंग असें ठेविलें. त्या आश्रमांत मनुष्याचा वास नसल्यामुळें त्या शृंग ऋषीचा सर्व वेळ हरिणांबरोबर खेळण्यांत जात असे. शृंगीचें मौंजीबंधन झाल्यावर विभांडकानें त्याला सर्व विद्या शिकविल्या व आपणच त्याचा गुरु होऊन त्याला गुरूपदेश केला. त्या शृंग ऋषीला तारुण्य प्राप्त होईपर्यंत बापावांचून इतर मनुष्याचें दर्शनहि नव्हतें; यामुळें त्याला मनुष्यांचे कित्येक व्यवहार मुळींच माहीत नव्हते. तो ज्या आश्रमांत रहात होता, तेवढेंच काय तें जग आहे, अशी त्याची समजूत झाली होती."

---

## अध्याय ३ रा.

### १ गलंड ऋषीची कथा.

सुमंत प्रधानानें दशरथ राजाला बद्रिकाश्रमीं ऐकलेली गोष्ट सांगितल्यावर, आपणास पुत्र होतील असा भरंवसा त्याला उत्पन्न झाला, व त्यानें रोमचरण

राजाला आणण्यासाठीं आपल्या दूतांना अंग देशांत पाठवून त्या राजाला मोठ्या सत्कारानें अयोध्येस आणिलें. हा रोमचरण राजा व दशरथ राजा या उभयतांमध्यें अत्यंत स्नेह होता. दशरथ राजाला ऐन तारुण्यांत कौसल्ये-पासून शांता या नांवाची एक मुलगी झाली होती; ती मुलगी मूळ नक्षत्रावर झाल्यामुळें दशरथानें रोमचरण राजाला दिली होती. रोमचरणास कांहींच मूलबाळ नसल्यामुळें त्यानें त्या मुलीचा स्वीकार मोठ्या आनंदानें केला व तो त्या मुलीचें लालनपालन जन्मदात्या आईबापाप्रमाणें करीत होता. त्या रोमचरणाला आपल्या घरीं बोलावून आणल्यावर दशरथ म्हणाला; " राजा रोमचरणा! आपणास ब्राह्मणांनीं असें सांगितलें आहे किं, आपण शृंग ऋषीला आणल्यास त्यांच्याकडून आपले देशांत पाऊस पडून मला पुत्रप्राप्ति होईल. तर हें खरें आहे काय ? " तेव्हां रोमचरण राजा म्हणाला; " दशरथ महाराज! मला ब्राह्मणांनीं याप्रमाणें सांगितलें आहे, हें खरें; पण त्या शृंग ऋषीला आणावें कसें; हाच मला मोठा विचार पडला आहे; कारण तो ऋषी लहानपणापासून अरण्यांत असल्यामुळें त्यास मनुष्याची ओळख नाहीं व मनुष्याचे व्यवहारही माहीत नाहींत; अशी त्या शृंग ऋषीची स्थिति आहे. " हें ऐकून दशरथ राजाचा सुमंत प्रधान ह्मणाला; " त्या ऋषीला आणण्या-साठीं सुंदर व तरुण अशा गणिका पाठवाव्या, म्हणजे तो सहज नगरांत येईल. येथें आल्यावर त्यास रोमपादांनीं पाळलेली दशरथाची कन्या देऊन प्रसन्न करावें, व कार्यभाग साधून घ्यावा. " ती सुमंत प्रधानाची योजना सर्वांना पसंत पडली, व दशरथानें त्या कामीं सुमंताचीच नेमणूक केली; मग सुमंतानें नगरांतल्या चार सुंदर व तरुण गणिका बोलावून आणून त्यांना शृंग ऋषीकडे जाण्यास सांगितलें, व तेथें कशा रीतीनें वागावयाचें तें समजावून दिलें. त्याप्रमाणें त्या गणिका उत्तम पोषाख करून, व बरोबर वाद्यें, व पक्वान्नें वगैरे विलासद्रव्यें घेऊन, मार्ग क्रमीत क्रमीत शृंग ऋषीच्या आश्रमा-जवळ आल्या. आश्रमांत शृंग ऋषि बसला असून त्याच्याजवळ अनेक हरिणें बसलीं होतीं. त्या ऋषीला पाहिल्यावर गणिकांनीं पायांत नुपुरें बांधिलीं व वाद्यें वगैरे जुळवून नाचण्यास व गाण्यास आरंभ केला. तो सुंदर नाच पाहून व तें मधुर गाणें ऐकून शृंगऋषि अगदीं मुग्ध होऊन गेला; परंतु तो प्रकार त्यानें कधींच पाहिला नसल्यामुळें त्याला तें काय आहे तें बरोबर कळेना. याप्रमाणें ऋषीचें मन आकर्षण करून घेतल्यावर त्या गणिका अगदीं ऋषीच्या सन्निध आल्या व त्यांनीं ऋषीपुढें पंचपक्वान्नांचीं ताटें ठेवून ऋषीस नमस्कार केला; तेव्हां शृंगऋषीनें 'नारायण' नामाचा घोष करून त्या चारही गणिकांना सत्काराच्या उद्देशानें आलिंगनें दिलीं; पण त्या वेळीं हृदयावर गणिकांचे उन्नत व कठिण स्तन आपटल्यामुळें त्याचें मन भ्रमित झालें. अग्नीवर तूप पडल्यानें तो जसा

अधिक प्रदीप्त होतो, त्याप्रमाणें शृंग ऋषीचा काम अधिक बलवत्तर झाला, परंतु असें कां होत आहे, हें त्याला कांहींच कळेना. त्यानें त्या गणिकांना आपल्या सन्निध बसविलें, व तुम्हीं कोण ऋषि आहां, म्हणून विचारिलें; तो शृंग-ऋषीचा प्रश्न ऐकून गणिकांना मोठें आश्चर्य वाटलें; तेव्हां गणिका म्हणाल्या; "ऋषि! आम्हीं गलंड ऋषि आहोंत, सर्व तीर्थें भ्रमण करीत करीत आज आपल्या दर्शनाला आलों; आपलें दर्शन झाल्यामुळें आम्हांस अत्यंत आनंद झाला आहे." नंतर त्या गणिकांनीं बरोबर आणलेलीं पक्वान्नें, फळें, वगैरे खाण्याविषयीं शृंगऋषीस विनंति केली, सदोदित कंदमूलांवर निर्वाह करणाऱ्या शृंगऋषीला इतके दिवसपर्यंत गोड, खारट, तिखट, वगैरे पदार्थांची रुचि मुळींच माहित नव्हती, आणि त्यामुळें त्याला कधीं कामवासनाहि होत नव्हती; परंतु तीं निरनिराळीं पक्वान्नें, व द्राक्ष, डाळिंब, फणस वगैरे फळें खाल्ल्यावर व ऊंसाचा गोड रस प्याल्यावर त्याचें मन साहजिक विकारयुक्त झालें; तो गणिकांना म्हणाला; "गलंड ऋषीहो! हें तुमचें अन्न, हें गोड पाणी व हीं मधुर फळें खाऊन माझी चित्तवृत्ति फार प्रसन्न झाली आहे. तुम्हीं आपल्या आश्रमांत हेंच अन्न रोज खातां काय?" तेव्हां त्या गणिका ह्मणाल्या, "ऋषि! आमच्या आश्रमांत आम्हीं याच अन्नाचा नेहमीं उपयोग करतों. आमच्या आश्रमाजवळ इक्षुरसाची नदी असून तिची वाळू साखरेची आहे. आश्रमांतील झाडांनाही अशीं सुंदर व मधुर फळें बाराहि महिने असतात. सुगंधी द्रव्याचे तर कूपच्या कूप भरलेले आहेत."

त्या गणिकांच्या आश्रमाचें तें विलक्षण वर्णन ऐकून शृंगऋषीला तो आश्रम पाहण्याची इच्छा झाली; तो गणिकांना म्हणाला; "गलंड ऋषीहो! त्या तुमच्या रम्य आश्रमांत तुमच्या सहवासांत राहून कांहीं देहाचें सार्थक करावें, अशी माझी इच्छा आहे; तरी तुमचें उपास्य दैवत कोण, तुमचें तप कोणतें, व्रत कोणतें, तुमचें समाधिलक्षण कसें आहे, तुमचें प्रणवसाधन कोणत्या प्रकारचें आहे, वगैरे मला कृपा करून सांगावें." तेव्हां त्या गणिका म्हणाल्या; "शृंगऋषे! आमच्या आश्रमधर्माविषयीं योग्य रीतीनें माहिती करून देण्यास हें स्थळ अगदींच अयोग्य आहे, जेथें कोणीहि येणार नाहीं, अशा एखाद्या स्थळीं आपण याल, तर आम्हीं आमच्या आश्रमधर्माची आपणास खरीखरी माहिती देऊं. गणिकांनीं असें सांगितल्यावर तो शृंगऋषि त्या गणिकांना घेऊन दूर अशा एका निबिड अरण्यांत आला, व तेथें एकांत अशा ठिकाणीं बसून त्या गणिकांना त्यांचे आश्रमधर्म विचारूं लागला. तेव्हां एक गणिका शृंग-ऋषीच्या सन्निध बसून म्हणाली; "ऋषी! आमची मुख्य उपासना आलिंगन ही आहे, ज्या देवतेचें आम्हीं निरंतर ध्यान करतों ती प्रत्यक्ष लिंगरूपानें प्रगट होते, आमच्या हृदयावर आह्मीं या दोन शाळुंका स्थापन केल्या आहेत; ह्यांच्या

दर्शनानें लोक, सर्व कांहीं विसरून जातात, व जो याना हस्तस्पर्श करतो, त्याच्या पातकाचा नाश होतो; आम्हीं भस्माऐवजीं अंगाला चंदन लावितों, त्रिपुंड्राऐवजीं कुंकुमतिलक लावितों, जटाभार मस्तकावर न ठेवितां केसांची वेणी गुंफून ती पाठीवर मोकळी सोडितों. आमचें आसन पद्मासन हें होय." असें ह्मणून त्या गणिकेनें पद्मासन घातलें व शृंगऋषीला शरीरासन्निध घेऊन त्याला कामसुखाचा लाभ दिला. तेव्हां शृंगऋषीला अष्टभाव उत्पन्न झाले व त्याच्या नेत्रांतून त्या सुखप्राप्तीमुळें आनंदाश्र पडले. तो त्या गणिकांना म्हणाला; "हा तुमचा आश्रमधर्म आमच्या आश्रमधर्मापेक्षां फार चांगला आहे. या धर्मांचा मला माझ्या बापानें कांहीं उपदेश केला नाहीं. मी आतां हा तुमचाच धर्म स्वीकारून तुमच्या आश्रमांत येतों." याप्रमाणें शृंगऋषीनें सांगितल्यावर त्या गणिकांनीं त्या ऋषीला मोठ्या सत्कारानें अंग देशांत आणिलें.

## २ दुष्काळनिवृत्ति.

अशा रीतीनें त्या शृंगऋषीला गणिकांनीं फसवून आणल्यावर त्यांनीं ती बातमी दूताकडून राजाला कळविली; त्या वेळीं राजाला अत्यंत आनंद झाला. मग राजा आपणाबरोबर रथ, पालख्या, वगैरे घेऊन येऊन त्या शृंगऋषीला सामोरा आला, त्या ऋषीच्या आगमनामुळें अवर्षणानें त्रासलेल्या प्रजाजनांनाहि अत्यंत हर्ष झाला, व तो व्यक्त करण्यासाठीं त्यांनीं गुढ्या तोरणें उभारून ऋषीवर फुलें व गुलाल उधळला. राजानें ऋषीला अनेक वाद्यांच्या गजरामध्यें आपल्या राजधानींत आणून सिंहासनावर बसविलें. त्याची पूजा केली, व त्याला अशा रीतीनें फसवून आणल्याबद्दल त्याची अनन्यभावानें क्षमा मागितली. याप्रमाणें ऋषीला प्रसन्न करून घेतल्यावर त्या रोमचरण राजानें आपली तरुण व परम रूपवती अशी शांता नांवाची राजकन्या त्याला अर्पण करून त्यास गृहस्थ केलें. शृंगऋषि गृहस्थ झाल्यामुळें स्वर्गांतील इंद्र, यम, वगैरे देवांना मोठा संतोष होऊन त्यांनींहि त्या प्रसंगीं आनंददर्शक वाद्यें वाजविलीं. मग त्या रोमचरण राजानें शृंग ऋषीचा बाप जो विभांडक ऋषि, त्याच्याकडे आपले प्रधानास पाठवून त्यास बोलाविलें; त्या विभांडकाची योग्य सत्कारानें पूजा करून रोमचरण राजा म्हणाला; "ऋषि! मी आपल्या मुलास कुटिलनीतीनें फसविलें, या अपराधा-बद्दल मला क्षमा करावी; हें कृत्य मी केवळ मजकरितां केलें नसून सर्व प्रजाज-नांचें संरक्षणासाठीं केलें. आपल्या पुत्राच्या हस्तानें यज्ञ झाल्यास पृथ्वीवर पर्जन्य पडेल असें मला बद्रिकाश्रमींच्या ब्राम्हणांनीं सांगितलें आहे. त्या यज्ञ-कार्यासाठीं मी आपली स्वतःची कन्या आपल्या मुलाला देऊन गृहस्थ केलें आहे, व माझ्या पश्चात् हें राज्यहि आतां त्याचेंच आहे; यावरून असें करण्यांत माझा कांहीं पापहेतु नाहीं, हें आपणास सहज दिसून येईल." याप्रमाणें त्या रोमचरण राजानें विभांडक ऋषीची प्रार्थना केल्यावर, विभांडकानें आपले

मनांतला राग सोडून दिला व तो आपल्या मुलाला व सुनेला प्रेमानें जाऊन भेटला. नंतर यज्ञाची तयारी करून होमहवनास आरंभ केला; त्या शृंग ऋषीनें अग्नींत दिलेल्या अवदानानें देवता तेव्हांच प्रसन्न झाल्या, व पृथ्वीवर योग्य असा पर्जन्य पडूं लागला. तो अंग देश बारा वर्षें पर्जन्य नसल्यामुळें अगदीं रुक्ष झाला होता, लोक निस्तेज झाले होते, व राजा काळजीनें ग्रस्त झाला होता; अशा स्थितींत जसा पाहिजे होता तसा पर्जन्य पडूं लागल्यावर सर्वांच्या आनंदास सीमा उरली नाहीं. चोहोंकडून शृंग ऋषीला धन्यवाद मिळूं लागले. अंग देश धनधान्यांनीं समृद्ध दिसूं लागला, व लोकांचे चेहरे प्रफुल्लित झाले.

## ३ पुत्रकामेष्टि यज्ञ.

हा प्रकार दशरथाचे कानावर गेल्यानंतर त्यासही अत्यंत आनंद झाला, व त्या ऋषीनें कृपा केल्यास आपणासही पुत्र होतील असा भरवंसा त्याला उत्पन्न झाला. मग त्यानें रथ, पालख्या, सैन्य, वाजंत्रीवाले वगैरे लवाजमा सज्ज करून त्यासह तो व सुमंत प्रधान अंग देशांत शृंग ऋषीला आमंत्रण देण्यासाठीं आले. बहुमूल्य अशा वस्त्रालंकारांनीं ऋषीचा सत्कार करून त्याची पूजा केली, व त्याच्या चरणावर मस्तक ठेवून दशरथ राजा म्हणाला; "शृंगऋषे! या रोमचरण राजावर कृपा करून त्याला जसें सुखी केलें, तसें या दासालाही सुखी करावें; आपल्या चरणाचे रजःकण त्या अयोध्येंत पडल्यास मी व माझे प्रजाजन धन्य होतील, आणि आपण जर कांहीं प्रयत्न कराल तर मला पुत्रप्राप्ति होऊन सूर्यवंश कायम राहील." दशरथानें शृंग ऋषीची अशी विनंति केल्यावर शांतेनेंहि आपल्या पतीला विनंति केली. ती म्हणाली; "स्वामी! माझा खरा पिता दशरथच आहे, रोमचरण हा माझा पालक पिता आहे; तर माझ्या खऱ्या पित्यासाठीं कांहीं प्रयत्न करून त्याच्या वंशाची वृद्धि आपण अवश्य करावी." याप्रमाणें दोघांनीं शृंग ऋषीची विनंति केल्यावर तो आपले स्त्रियेसह राजाबरोबर मोठ्या समारंभानें अयोध्येस आला. शृंग ऋषी आल्याचें ऐकून अयोध्येंतील सर्व आबालवृद्धांनां आनंद झाला, व त्यांनीं तो आनंद सर्व शहर शृंगारून व्यक्त केला. मग त्या शृंग ऋषीनें सुमुहूर्त पाहून पवित्र अशा शरयू नदीचे कांठीं राजाकडून यज्ञासाठीं मंडप बांधविला; यज्ञकुंडें तयार करविलीं, यज्ञासाठीं लागणारी सर्व प्रकारची यज्ञसामुग्री मिळविली; व विद्वान् अशा ऋषींना निमंत्रणें पाठवून यज्ञासाठीं बोलावून घेतलें. यज्ञ पाहण्यासाठीं म्हणून कित्येक देशचे राजेही आले होते. वामदेव, जाबाली, शातातप, संजय, वसिष्ठ, कश्यप, कौंडिण्य, कण्व, गौरमुख, पाराशर, बकदाल्भ्य, शतानंद, सुमंतु, सौभरी, वेदविद, गार्ग्य, मार्कंडेय, नारद, कौशिक याप्रमाणें अनेक ऋषि आल्यावर सुमुहूर्तावर शृंग ऋषीनें यज्ञास आरंभ केला. शृंग ऋषी म्हणाला, "हा यज्ञ निर्विघ्नपणें पार पडल्यास दशरथ राजाला

महापराक्रमी व कीर्तिशाली असे चार पुत्र होतील." नंतर दशरथ, रोमचरण, जनक, काशीश्वर, वगैरे राजांनीं एक उत्तम श्यामकर्ण मिळवून तो पृथ्वीवरून हिंडवून आणिला. श्यामकर्ण आल्यावर शृंग ऋषीनें दशरथास यज्ञदीक्षा देऊन ऋत्विजांस वरिलें व वसंत काळ लागल्याबरोबर दक्षिणाग्नि, गार्हपत्य व आहवनीय, या तिनही अग्नींची स्थापना करून होमास आरंभ केला. राजानें त्या वेळीं सर्व ब्राह्मणांनां इच्छादान व इच्छाभोजन देण्याचा क्रम ठेविला होता. श्यामकर्णाच्या सर्व अवयवांची आहुती दिल्यावर शेवटीं पूर्णाहुतीचे वेळीं मस्तकाची आहुती दिली. व याग पुरा केला. त्यावेळीं दशरथ राजानें सर्व पृथ्वी ब्राह्मणांस दान करण्याचा विचार केला व तशा संकल्पानें हातांत उदक घेतलें, परंतु ब्राह्मण ह्मणाले; "राजा! पृथ्वीचें संरक्षण आह्मांस करितां येणार नाहीं. वेदाचें पठण करून षट्कर्माचें संरक्षण करणें हेंच आमचें कर्तव्य आहे. ब्राह्मणास गाय दिली असतां पृथ्वीदानाचें पुण्य लागतें, तेव्हां आम्हांस तूं गायी दान दें ह्मणजे झालें." मग दशरथ राजानें त्याप्रमाणें ब्राह्मणांना सवत्स व सालंकृत एक लक्ष गायी दान दिल्या.

या यज्ञसमाप्तीनंतर शृंगऋषि दशरथराजाला ह्मणाला; "राजा! या यज्ञाच्या योगानें तुझें व तुझ्या प्रजाजनांचें संपूर्ण पातक नाहींसें झालें आहे. आतां पुत्रप्राप्तीसाठीं पुत्रकामेष्टी यज्ञ केला पाहिजे. तो यज्ञ पूर्ण झाल्यावर तुला पराक्रमी, धनुर्धर, पुण्यशील व शत्रूरूपवृक्षांस कुठाररूप असे चार पुत्र होतील. असें सांगून शृंगऋषीनें पुन्हां शरयू नदीचे कांठीं पुत्रकामेष्टी यज्ञाची तयारी केली. यज्ञासाठीं शृंगऋषीनें देवांना मंत्रानें आह्वान केल्याबरोबर गण, गंधर्व, विद्याधर, यक्ष, किन्नर, सनत्कुमार, ब्रह्मा, इंद्र, महादेव, विष्णु, वगैरे सर्व अयोध्येस प्रत्यक्ष आले. त्या सर्वांना दशरथराजानें साष्टांग नमस्कार घालून त्यांची षोडशोपचारांनीं पूजा केली. शृंगऋषीची मंत्रशक्ति कांहीं विलक्षण होती. ज्या देवतेस आव्हान करावें ती ती देवता प्रत्यक्ष येऊन आपला हविर्भाग घेत असे. ती विलक्षण मंत्रशक्ति पाहून देवांनां परम संतोष झाला, व इतरांनां आश्चर्य वाटून त्यांची शृंग ऋषीविषयींची पूज्यबुद्धि वाढली.

इकडे रावण व कुंभकर्ण शंकराच्या वरदानानें उन्मत्त होऊन त्यांनीं सर्वांनां त्राही भगवान करून सोडलें होतें. तेव्हां सर्व देवांसह ब्रह्मदेव क्षीरसागरीं जाऊन प्रभूला ह्मणाला; "हे अनंता नारायणा! रुद्राच्या वरदानानें रावण व कुंभकर्ण उन्मत्त होऊन लोकांनां अत्यंत त्रास देत आहेत, तरी आपण अवतार घेऊन त्या दुष्टांचा संहार करावा. आपणास अवतार घेण्यास योग्य असें स्थळ अयोध्येंत दशरथराजाकडे आहे. आम्हींहि आपल्या साह्यासाठीं पृथ्वीवर वानरजन्म घेऊन आपलें दास्यत्व करूं." देवांची ही विनंति मान्य करून भगवान् म्हणाले. "मी तुमच्या इच्छेप्रमाणें अयोध्येंत लवकरच कौसल्येच्या

उदरीं जन्म घेईन, त्यासंबंधानें तुम्हीं कांहींही काळजी करूं नये; व तुम्हीं वानर व्हा.'' याप्रमाणें देवांना आश्वासन मिळाल्यावर देव आपआपले स्थानीं निघून गेले.

आयोध्येस पुत्रकामेष्टी यज्ञ चालला असतां पूर्णाहुतीचा समय आला, तेव्हां शृंगऋषींनीं मंत्रोच्चार करून राजाचे हातांत स्रुवा देऊन, श्रीहरीच्या प्राप्तीसाठीं यज्ञकुंडांत पूर्णाहुती टाकण्यास सांगितलें. त्याप्रमाणें राजानें यज्ञकुंडांत पूर्णाहुती टाकिल्याबरोबर कुंडांतून महाअद्भुत अशी प्रजापति या नांवाची देवता निघाली. ती देवता कृष्णवस्त्र परिधान केलेली असून कृष्णवर्णाचीच होती; परंतु त्या देवतेचें तेज कोटी सूर्यांप्रमाणें आरक्त होतें. वाहन मेंढ्याचें असून त्या देवतेला दोन तोंडें होतीं. त्या देवतेच्या हातांत सुवर्णपात्र असून त्या पात्रांत कामधेनूच्या दुधाची क्षीर होती. ती देवता शृंगऋषीला म्हणाली; "हे शृंगऋषे ! तुझ्या मंत्रशक्तीनें मी तुला प्रसन्न होऊन हा प्रसाद देत आहें; याची तूं आपल्या इच्छेप्रमाणें व्यवस्था कर. हें क्षीरयुक्त दिव्यान्न असून तें जी स्त्री भक्षण करील तिला सुलक्षणी व महापराक्रमी असे पुत्र होतील. असें म्हणून ती प्रजापतिदेवता तत्काल विजेप्रमाणें नाहींशी झाली. नंतर शृंगऋषीनें ती क्षीर दशरथाजवळ देऊन 'आपल्या स्त्रियांना भक्षण करण्यासाठीं दे' म्हणून सांगितलें, दशरथानें त्या अन्नाचें दोन भाग करून एक भाग कौशल्येला दिला व एका भागांतील अर्धा भाग सुमित्रेला दिला; बाकी राहिलें होतें त्याचे दोन भाग करून एक कैकयीला दिला व राहिलेला राजानें सुमित्रेवर अधिक प्रीति म्हणून तिलाच दिला. प्रत्येकीनें आपआपला पिंड भक्षण केल्यावर मागून मिळालेल्या भागाचें काय करावें, या विचारांत सुमित्रा होती, तोंच तिच्या हातांतला पिंड घारीनें उचलून नेला; तो त्रिकूट पर्वतावर पडल्यावर तो विश्रव्याच्या स्त्रीनें भक्षण केला, तेव्हां तिला त्यापासून विभीषण व त्रिजटा अशीं दोन अपत्यें झालीं. असो, दशरथाचे घरीं यज्ञयागादि कृत्यें यथासांग पार पडल्यावर शृंगऋषीनें अंगदेशीं जाण्याची इच्छा दर्शविली; तेव्हां दशरथ राजानें सर्व ऋषींचा सत्कार करून व त्यांना भोजनदक्षिणा वगैरे देऊन आपल्या वाहनांतून त्यांच्या घरीं त्यांना पोहोंचतें करून दिलें. त्याप्रमाणें शृंगऋषींनाहि वस्त्रें, अलंकार वगैरे देऊन त्यांच्या स्त्रियेसह त्यांना पोहोंचतें केलें.

## ४ दशरथाला पुत्रप्राप्ति.

दशरथाच्या तीनही स्त्रियांना त्या अन्नप्रसादामुळें गर्भ राहून त्यांच्या शरीरावर गर्भतेज दिसूं लागलें. तिघींना त्या गर्भावस्थेंत निरनिराळे डोहाळे होऊं लागले. कथाकीर्तनें ऐकावींत, देवांच्या व विप्रांच्या पूजा कराव्यात, सडासंमार्जन करून तुलसीवृंदावनास रंग द्यावा, नेहमीं आनंदानें रहावें, सर्वत्र उत्सव करावा, अशा-प्रकारचे उत्तम डोहाळे कौशल्येला होत होते; त्यामुळें कौशल्येला ती गरोदरा-

वस्था मुळींच जड गेली नाहीं. तिचे दिवस पूर्ण झाल्यावर चैत्र शुद्ध नवमीचे दिवशीं चौदा घटकांनीं पुनर्वसु नक्षत्र असतां ती प्रसूत होऊन तिला पुत्र झाला, तोच प्रभु श्रीरामचंद्र होय. श्रीरामचंद्राचा जन्म त्रेतायुगांत झाला. त्या प्रभूच्या तेजानें सूर्याचे किरण फिकट दिसूं लागले. नगरांतील लोकांना त्या आनंददायक वार्तेमुळें अत्यंत हर्ष झाला; जिकडे तिकडे ध्वजापताका उभारून सर्व शहर शृंगारून काढिलें, स्वर्गांत देव तर त्या आनंदामुळें नाचावयाला लागले; दुंदुभी वाजावयाला लागल्या; आकाशांतून पुष्पवृष्टि होऊं लागली; दशरथानें विप्रांना व गोरगरीब प्रजाजनांना भोजन देऊन अनेक दानें दिलीं. पुत्रप्राप्तीमुळें आज आपण पितृऋणांतून मुक्त झालों, या आनंदानें दशरथाचें मन प्रफुल्लित झालें होतें. प्रसूतिगृहांत जाऊन त्यानें मोठ्या प्रेमानें पुत्रमुखावलोकन केलें; व वसिष्ठास त्या मुलाची पत्रिका करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें वसिष्ठानें पत्रिका तयार करून त्यांत असें वर्तविलें किं, ‘ याला दोन पुत्र होतील, हा एकपत्नीव्रतानें राहील, हा एकछत्री राज्य करील, हा सज्जनांचें संरक्षण करून दुर्जनांचा संहार करील, हा अत्यंत पितृभक्त असा होईल, सामुद्रिक लक्षणांवरून हा साक्षात् ईश्वर आहे. ’ कौसल्या प्रसूत झाल्यावर कैकयी प्रसूत झाली, तिलाही पुत्रच झाला. त्याचें नांव भरत असें ठेविलें. सुमित्रा प्रसूत झाली तेव्हां तिला दोन पुत्र झाले; त्यांचीं नांवें लक्ष्मण व शत्रुघ्न अशीं ठेविलीं. याप्रमाणें पुत्र नसल्यामुळें राज्य-कारभार सोडून वानप्रस्थाश्रम घेणाऱ्या दशरथराजाला शृंगऋषीचे कृपेमुळें चार पुत्र झाले; व तो पुढें त्या पुत्रांसमवेत आनंदानें राज्यकारभार करूं लागला. वाल्मीकि रामायणांत यासंबंधानें थोडी वेगळी कथा आहे, तींत सुमित्रेस एक पुत्र व कैकयीस दोन पुत्र झाल्याचें वर्तमान आहे.

“ याप्रमाणें प्रभु श्रीरामचंद्रांनीं रावण, कुंभकर्णाच्या हननासाठीं अवतार घेतल्यावर त्यांच्या साह्यासाठीं देवांनीं पृथ्वीवर वानर जातींत जन्म घेतला. सूर्य सुग्रीव झाला, इंद्र वाली झाला, शंकर हनुमान् झाला, ब्रह्मदेव जांबुवंत झाला, बृहस्पतीचा मुलगा अंगद झाला, कुबेर गंधमादन झाला, अग्नि नीळ झाला, याप्रमाणें निरनिराळ्या देवांनीं निरनिराळ्या भूमिका घेऊन ते पृथ्वीवर प्रभूच्या साह्यासाठीं अवतीर्ण झाले.”

---

## अध्याय ४ था.

### १ रावण व वेदवती.

वैशंपायन ऋषि म्हणाले; “ राजा जनमेजया! प्रभु श्रीरामचंद्राचें ज्या जानकीबरोबर पुढें लग्न झालें, त्या जानकीची कथा तुला सांगतों. सुतश्रवा या नावाचा एक विद्वान्, सदाचारी व सुशील असा ब्राह्मण होता; त्याची व त्याच्या स्त्रियेची इच्छा होती कीं, विष्णूच्या वामांकावर शोभेल, अशी आपणास एक

कन्या व्हावी. सदिच्छा करून तो आपलें कार्य जें वेदपठण तें करितां करितां त्याच्या मुखांतून एक सुंदर कन्या बाहेर पडली. त्या मनोहर मुलीची अशा-रीतीनें प्राप्ती झालेली पाहून सुतश्रवा ब्राह्मणाला फार आनंद झाला. तो आपल्या स्त्रियेला म्हणाला; 'आपण ज्या कन्येची इतके दिवस इच्छा करीत होतों, ती कन्या अशारीतीनें आपणास प्राप्त झाली आहे.' त्या कन्येच्या प्राप्तीमुळें त्या ब्राम्हणाच्या स्त्रियेलाहि फार आनंद झाला, वेदपठण करीत असतां तिची प्राप्ति झाली म्हणून त्यांनीं तिचें नांव 'वेदवती' असें ठेवून दोघेंहि त्या मुलीचें परमप्रीतीनें संगोपन करूं लागलीं. परंतु त्या मुलीला विष्णूची प्राप्ति झालेली पाहण्याचें त्या दोघांचे नशिबी नव्हतें. त्या मुलीला तारुण्य प्राप्त होतें न होतें तोंच सुतश्रवा ब्राह्मण मृत्युवश झाला; तेव्हां त्याच्या स्त्रियेनें अग्नि-प्रवेश केला. याप्रमाणें त्या वेदवतीला अल्पवयांत तिच्या आईबापांनीं सोडलें. तरी तिनें आईबापांचा हेतु मनांत धरून प्रयत्न चालविला होता. लग्न श्रीपती-बरोबरच करावयाचें असा तिनें निश्चय केला होता. प्रभूंची प्राप्ति व्हावी; म्हणून तिनें मिथिला नगरास जाऊन क्षिप्रानदीचे कांठीं तप करण्यास आरंभ केला; चार बाजूला चार कुंडें तयार केलीं, त्यांत काष्ठें घालून तीं प्रदीप्त केलीं; व त्या चारही कुंडांच्या मध्यभागीं बसून ती ईश्वराराधना करूं लागली. याप्रमाणें ती वेदवती प्रभूचें चिंतन करीत तेथें बसली असतां, एके दिवशीं रावण दिग्विजय करून लंकेस परत जात असतां तेथें आला. त्याच्या दृष्टीस ती अनुपमेय रुपवती अशी 'वेदवती' पडल्यावर तिच्याविषयीं त्याचे मनांत पापवासना आली. तो त्या वेदवतीजवळ जाऊन म्हणाला; "हे तरुण स्त्रिये ! तूं आपलें हें सुंदर शरीर या अग्नीच्या तापानें निष्कारण कां कष्टवीत आहेस, तें मला कळत नाहीं. हें तूं कोणतें तप करीत आहेस, आणि तें कशासाठीं करीत आहेस, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे." तेव्हां ती वेदवती म्हणाली; "अरे ! मी हा प्रयत्न वैकुंठ-पतीच्या प्राप्तीसाठीं करीत आहें; त्यानें येऊन माझा स्वीकार करावा; म्हणून मी हें तप करीत आहे." हें ऐकून रावण म्हणाला; "हे स्त्रिये ! हा तुझा प्रयत्न वेडेपणाचा आहे. माझ्या भीतीनें विष्णु पळून जाऊन क्षीरसागरीं लपून बसला आहे, तेव्हां मी असतां त्या नारायणाची प्राप्ति तुला होणें मुळींच शक्य नाहीं. अमरावतीचे सर्व देव मी जिंकून त्यांना आपले दास केले आहेत, मी आपलीं सर्व कामें त्यांच्याचकडून करवून घेतों. पृथ्वीवर छत्रचामरें माझ्याच मस्तकावर ढळत आहेत, अनेक सुंदर स्त्रिया माझा अभिलाष धरून ह्या रावणाची पट्टराणी होण्याचा प्रयत्न करीत आहेत, तेव्हां तूं जर माझा स्वीकार करशील तर त्यांत तुझें कल्याण असून मलाही मोठा संतोष होणार आहे. मी तुला आपली पट्टराणी करीन, आणि तुझ्या सांगण्याप्रमाणें वागत जाईन." रावणाचा तो उन्मत्तपणा पाहून वेदवतीला राग आला. ती म्हणाली; "रावणा !

श्रीविष्णूवांचून सर्व पुरुष माझे बंधु आहेत. श्रीपतीलाच वरण्याचा माझा विचार झाला आहे, तो निश्चय मी कधींही मोडणार नाहीं." वेदवतीचें तें निग्रहाचें बोलणें ऐकून रावणानें तिला बलात्कारानें लंकेस नेण्याचा विचार मनांत आणिला; व तो तिचा हात धरूं लागला. तेव्हां वेदवतीनें रावणाला शाप दिला किं. 'तुला या नीच वासनेबद्दल नरक प्राप्त होईल.' असा शाप देऊन वेदवतीनें एका अग्निकुंडांत उडी टाकली; व त्यांत ती तत्काल अदृश्य झाली. तो विलक्षण प्रकार पाहून रावणाला फार आश्चर्य वाटलें, व त्याला आपल्या अविचारी कृत्याबद्दल फार पश्चात्ताप होऊं लागला; तेव्हां त्यानें पाणी आणून तें कुंड विझविलें व त्यांत त्या वेदवतीचा शोध करूं लागला; परंतु वेदवती न सांपडता त्या कुंडांत त्याला एक अत्यंत तेजस्वी असें रत्न सांपडलें. तें रत्न घेऊन तो लंकेस परत आला; व त्यानें तें रत्न एका पेटींत घालून मंदोदरीकडे पाठवून दिलें. मंदोदरीनें ती पेटी रात्रीं उघडून पाहिली, तों त्यांत रत्न नसून एक सुंदर कन्या आहे; तो प्रकार पाहून तिचे अंतःकरणांत भीति उत्पन्न झाली, व या कन्येला आपल्या घरांत ठेवल्यास आपलें कांहीं तरी अनिष्ट होईल, असें वाटून तिनें ती पेटी बंद केली, व आपल्या पतीकडे ती पाठवून देऊन तें रत्न पूर्वठिकाणीं नेऊन ठेवण्यास सांगितलेल्याप्रमाणें रावणानें ती पेटी पुन्हां मिथिला नगरीस परत पाठविली; व यज्ञकुंडाचे जागीं पुरून ठेविली.

## २ जमिनींत सांपडलेली मुलगी.

या गोष्टीस कांहीं वर्षें गेल्यानंतर मिथिलानगराच्या जनकराजानें पुत्रप्राप्तीसाठीं यज्ञ करण्याचें मनांत आणिलें. त्याचा गुरु शतानंद या नावाचा होता; त्याला त्या जनकराजानें आपला मानस कळवून यज्ञाची तयारी करण्यास सांगितलें. राजानें सांगितल्याप्रमाणें यज्ञासाठीं चांगली भूमि शोधित असतां तो शतानंद क्षिप्रेच्या कांठीं आला, व जेथें वेदवतीनें अग्निसाधन केलें होतें, तीच भूमि त्यानें यज्ञासाठीं पसंत केली. वेदवतीच्या अग्निसाधनाला कित्येक वर्षें झाल्यामुळें त्या भूमीवर शेतकरी लोक शेती करीत होते. ती जागा शतानंदानें राजदूतांना सारखी करण्यास सांगितल्यावर राजदूत नांगर घेऊन ती जागा सारखी करूं लागले; तेव्हां एका नांगराच्या फाळाला ती पेटी लागून वर आली. राजदूतांना ती पेटी पाहून मोठें आश्चर्य वाटलें. पेटींत काय आहे, तें पाहण्याची त्यांना जिज्ञासा झाली. जमीन उकरून त्यांनीं पेटी बाहेर काढली;व उघडून पाहतात तों आंत एक हास्यमुखी सुंदर कन्या खेळत आहे, असें दिसलें. ती विलक्षण सुंदर मुलगी त्या पेटींत कशी आली, व ती पेटी तेथें त्या कन्येसह किती दिवस होती, याचा उलगडा त्यांना मुळीच करितां येईना. त्यांनीं ती पेटी जनकराजापुढें नेऊन ठेविली, व ती कशी सांपडली, वगैरे सर्व हकीगत राजाला सांगितली. राजाला ती हकीकत ऐकून फार आश्चर्य वाटलें. त्यानें ती पेटी उघडून त्या मुलीला बाहेर काढिलें; व तिला

आपल्या मांडीवर घेऊन, तो तिचें कौतुक करूं लागला; आपण पुत्रप्राप्तीसाठीं प्रयत्न करणार होतों; पण परमेश्वरानें प्रसन्न होऊन, आपणास ही कन्या दिली आहे. तेव्हां हिचें संगोपन पोटच्या मुलीप्रमाणें करणें हें आपलें कर्तव्य होय; असें म्हणून त्या जनकराजानें ती मुलगी आपली कन्या आहे; असें सर्वांना कळविलें. अशारीतीनें राजाला त्या अत्यंत सुंदर मुलीचा लाभ झाल्याबद्दल, नगरांतील लोकांना फार आनंद झाला; व त्यासाठीं त्यांनीं सर्व नगर शृंगारून मोठा उत्सव केला. नांगरानें भूमीवर काढिलेल्या रेषेला 'सीता' असें म्हणतात; व ती मुलगी नांगराच्या रेषेंत सांपडली, म्हणून राजानें तिचें नांव 'सीता' असें ठेविलें. जनकानें तिचें संरक्षण केलें, म्हणून कित्येक तिला जानकी असेंही म्हणूं लागले. मिथिला नगरींत ती सांपडली, म्हणून मैथिली असेंही कोणी म्हणतात. क्रमाक्रमानें ती सीता जनकराजाचे घरीं वाढत असतां, एके दिवशीं त्या जनकराजाचे घरांत एक मोठें अजस्र धनुष्य असलेलें तिच्या दृष्टीस पडलें. जनकराजाचे कोणी पूर्वजानें शंकरास प्रसन्न करून घेऊन तें मिळविलें होतें; परंतु त्या मोठ्या धनुष्याचा कोणास कांहीं उपयोग नसल्यामुळें, त्यानें तें एका पेटींत घालून एका बाजूस ठेविलें होतें. तो राजा वर्षांतून एक वेळ त्या धनुष्याची पूजा करीत असे; त्या वेळीं नऊशें टोणगे जुंपून तें अंगणांत आणीत; व पूजा झाल्यावर पुन्हां टोणग्यांकडून नेऊन ठेवीत. तें धनुष्य जानकीच्या दृष्टीस पडल्यावर तिनें त्या पेटींतून बाहेर काढिलें; व त्याचा काठीप्रमाणें घोडा करून ती अंगणांत खेळूं लागली. तो प्रकार पाहून सर्व लोक थक्क होऊन गेले, ही मुलगी सामान्य नसून कोणीतरी विलक्षण शक्तिशाली देवता आहे; आपलें महद्भाग्य म्हणून आपणास कन्यारूपानें ही लाधली आहे; असें जनकराजाला वाटलें. त्यानें त्याच वेळीं सर्व मंत्रीमंडळाच्या अनुमतीनें असें ठरविलें कीं, जो हें धनुष्य उचलील त्यालाच ही सीता अर्पण करावयाची.

### ३ त्राटिकेचा मृत्यु.

इकडे रामलक्ष्मणांचा व्रतबंध वगैरे होऊन, ते सोळा वर्षांचे झाल्यावर महातपोनिधि व उग्र असे विश्वामित्रऋषि दशरथराजाकडे आले; दशरथानें त्यांचा योग्य सत्कार करून त्यांना सिंहासनावर बसविलें व त्यांची पूजा वगैरे करून कोणीकडे येणें झालें? म्हणून दशरथानें भीत भीत विचारिलें. विश्वामित्र म्हणाले, "राजा! ईश्वराच्या दयेनें सर्व कांहीं आहे; परंतु एक मोठें विघ्न उत्पन्न झालें आहे. आमचे यज्ञयागाचे वेळीं राक्षस रक्त, मांस, व हाडें वगैरे अमंगल पदार्थ यज्ञभूमीवर टाकून यज्ञाचा विध्वंस करितात. त्या दुष्टांच्या नाशासाठीं तुझा रामचंद्र व लक्ष्मण मला दहा दिवस दे. मी त्या राक्षसांस शाप देऊन नाहींसें केलें असतें; परंतु शापानें तपाचा नाश होतो; म्हणून तुजकडे रामचंद्रास मागण्यासाठीं आलों आहे."

विश्वामित्रऋषीची ती मागणी ऐकून, दशरथराजाला मस्तकावर वज्रघात झाला; अथवा प्रळयकाळ जवळ आला कीं काय असें वाटलें. वृद्धपणीं मोठ्या सायासानें आपणास पुत्र झाले, ते अद्यापि लहान असून त्यांना शस्त्रास्त्रविद्या मुळींच माहीत नाहीं; अशा लहान बालकांस दिलें असतां न जाणो कदाचित् भलताच प्रसंग ओढावयाचा. बरें, न द्यावें तर विश्वामित्रऋषीचा स्वभावही दशरथाला माहीत होता. ते शाप देऊन भलतेंच कांहीं तरी करतील, अशीही भीति होती. अशा अडचणींत दशरथ सांपडल्यावर त्याला काय करावें तें कळेना. तो नम्रतेनें विश्वामित्राला, म्हणाला, "ऋषे। रामलक्ष्मण अद्यापि अज्ञान आहेत; त्यांना नेऊन आपला कार्यभाग होईल; असें मला वाटत नाहीं. तुमच्या कार्यासाठीं मी आपलें सर्व सैन्य व सेनापतीला देतों; पाहिजे असल्यास बरोबर अष्टप्रधान देतों, किंवा मीं स्वतः बरोबर येतों; परंतु रामलक्ष्मणांस घेऊन जाऊं नये. ते युद्धविद्येंत अज्ञान असल्यामुळें त्या दुष्ट राक्षसांबरोबर त्यांचा मुळींच निभाव लागणार नाहीं." दशरथांचें हें भाषण ऐकून विश्वामित्रऋषि म्हणाले, "राजा! तूं आपणास चक्रवर्ती असें म्हणवितोस; परंतु श्रीरामचंद्रासंबंधानें तूं फारच अज्ञानी आहेस. अरे! तो साक्षात् प्रभु: श्रीवैकुंठपति दुष्टाच्या संहारासाठीं तुझ्या पोटीं या स्वरूपानें आला आहे. त्याला अज्ञानी व युद्धविद्या न जाणणारा असें कसें म्हणतोस? त्याच्या सर्व विद्या पूर्ण आहेत. त्याच्याच हातानें यज्ञसंहारक दुष्टांचा नाश होणार आहे; म्हणून तूं यासंबंधानें कांहींएक काळजी न करितां त्याला मजबरोबर दे." मग वसिष्ठानेंही दशरथराजाला, श्रीरामचंद्राला लक्ष्मणासह देण्यास सांगितलें; नाहीं तर हा विश्वामित्र रागावल्यास भलताच परिणाम होईल, असेंही दशरथाला बजाविलें. तेव्हां दशरथानें श्रीरामचंद्रास व लक्ष्मणास बोलावून आणून ऋषीबरोबर जाण्यास सांगितलें. मग त्यांनीं दशरथाला, गुरुला व मातोश्रींना वंदन करून आपआपलीं शस्त्रास्त्रें घेतलीं आणि ते विश्वामित्राबरोबर जाण्यास निघाले.

विश्वामित्र त्या दोघांना बरोबर घेऊन अयोध्येंतून चालला; तेव्हां हजारों लोक त्याच्या दर्शनासाठीं जमले होते. लोकांनीं त्यांचा फार जयजयकार केला, स्वर्गांतून देवांनीं पुष्पवृष्टि केली; व दुंदुभी वाजविल्या. याप्रमाणें रामलक्ष्मणास घेऊन विश्वामित्रऋषि शरयू नदीवर आला. तेथें तिघांनीं स्नानें वगैरे केल्यावर विश्वामित्रानें रामाला बला व अतिबला अशा दोन विद्या दिल्या, त्या विद्यांच्या योगानें पंधरा दिवसपर्यंत अन्नपाण्यावांचून रहातां येतें. पुढें विश्वामित्र त्या दोघांना बरोबर घेऊन शरयू व भागिरथी यांच्या संगमावर आले. तेथें पाण्याच्या आघातामुळें मोठा ध्वनि होत होता, तो ध्वनि ऐकून रामचंद्र विश्वामित्रास म्हणाला, "ऋषे! हा कसला ध्वनि होत आहे, व हें स्थान कोणाचें आहे!" तेव्हां विश्वामित्र म्हणाले, "रामा, कैलासपर्वतावर विरिंचीनें एक संवत्सरपर्यंत तप केलें,

आणि तेथें त्यानें एक सरोवर मनाच्या लहरीनें निर्माण केलें; म्हणून त्या सरोवराला मानससरोवर असें ह्मणतत. त्या सरोवरापासून निघालेल्या या नदीला शरयू असें ह्मणतात. या शरयूनदीचा व भागिरथीचा तेथें संगम झाल्यामुळें हा पाण्याचा कल्लोळ ऐकूं येत आहे. पूर्वी या देशांत मदन सर्व अंगांसह राहून राज्य करीत होता; म्हणून या देशाला अंगदेश असें म्हणतात. त्या मदनानें आपल्या पराक्रमानें शंकरासहि बद्ध केलें होतें; म्हणून शंकरानें आपला तृतीयनेत्र उघडून त्यास दग्ध केलें. हल्लीं याठिकाणीं मोठे मोठे तपोनिधी तपःसाधनासाठीं राहतात; आपण आतां आज रात्रीं त्यांच्याच आश्रमांत जाऊन राहूं. " असें सांगून विश्वामित्रानें त्या दोघांना तेथील ऋषींच्या आश्रमांत आणिलें. तेथें रामचंद्र व लक्ष्मण आल्यामुळें ऋषींना फार आनंद झाला; व त्यांनीं रामलक्ष्मणांचा योग्य असा सत्कार केला. रामलक्ष्मणांनीं त्या सर्व ऋषींना साष्टांग नमस्कार करून त्यांचा अशीर्वाद मिळविला. तेथें रात्रभर राहून सकाळीं प्रातर्विधि आटोपल्यावर ते तिघेहि मार्ग क्रमूं लागले. बराच मार्ग क्रमिल्यावर एक अत्यंत विस्तीर्ण, निबिड व भयंकर अरण्य लागलें. तें अरण्य पाहून रामचंद्र विश्वामित्राला म्हणाला; " ऋषे ! हें एवढें भयंकर अरण्य कोणाचें आहे, व हें अगदीं निर्जन दिसत आहे, त्याचें कारण काय ? तें मला कृपा करून सागावें. "

श्रीरामचंद्राचा तो प्रश्न ऐकून विश्वामित्र म्हणाले, " रामा ! या अरण्यास ' भैरववन ' असें म्हणतात. पूर्वी हें अरण्य अत्यंत पवित्र असून तेथें अनेक ऋषि वगैरे पुण्यवान् लोक रहात होते. इंद्रानें वृत्रासुराचा जेव्हां वध केला, तेव्हां इंद्राकडून दधीची ऋषीची हत्या झाली; ती त्याची ब्रह्महत्त्या या अरण्यांतील उदकानें स्नान केल्यानें नाहींशी झाली; इतकें हें अरण्य पवित्र होतें. अरण्यांत अनेक शहरें होतीं; आणि पशुपक्ष्यांनींहि तेथें वास्तव्य करून या अरण्यास शोभा आणिली होती, परंतु त्राटिकानांवाच्या राक्षसीनें हें अरण्य निर्जन करून टाकिलें आहे. ती यावत्प्राणिमात्रांचा संहार करते. गायी, म्हशी, वाघ, सिंह, मनुष्यें, पक्षी या सर्वांना भक्षण करून तिनें हें अरण्य आपल्या ताब्यांत घेतलें आहे. या अरण्यांत त्या राक्षसीच्या भीतीनें कोणीहि प्रवेश करीत नाहीं, आणि कोणी चुकून आल्यास ती निर्दय त्याला खाऊन टाकिते. रामा ती राक्षसी पूर्वजन्मीं यक्षिणी होती. ती शापानें राक्षसीण झाली आहे. ती कथा अशी आहे कीं, सुकेतु या नावाचा कोणी यक्ष होता, त्यानें ब्रह्म-देवाला प्रसन्न करून घेऊन नऊ सहस्र नागांचें जिला बल आहे, अशी एक कन्या व्हावी, म्हणून वर मिळविला. त्याप्रमाणें त्या यक्षाला कांहीं दिवसांनीं मुलगी झाली, तिचें नाव त्यानें ताटिका असें ठेविलें, व ती उपवर झाल्यावर सुंद-नावाच्या राक्षसाबरोबर तिचें लग्न करून दिलें. पुढें ती यक्षिणी अग-

स्तीला वाटेंत आडवी होऊन आपल्या विक्राळ स्वरूपानें भीति दाखवूं लागली, तो यक्षिणीचा मूर्खपणा पाहून आगस्ती ऋषीला फार राग आला व त्यानें तिला शाप दिला कीं, तूं मृत्युलोकीं राक्षसीण होशील. त्या शापाप्रमाणें ती हल्लीं या अरण्यांत राक्षसीण होऊन राहिली आहे. आपण आतां या अरण्यांत प्रवेश केल्यावर ती आपल्या अंगावर धांवून येईल; त्या वेळीं तूं आपल्या बाणानें तिचा संहार कर. ती स्त्री आहे, तेव्हां तिचा नाश कसा करावा, ही शंका तूं मनांत मुळींच आणूं नकोस, जर स्त्री दुष्ट आचरणाची असेल तर तिचा वध केला असतां कांहीं दोष न लागतां उलट पुण्यच जोडलें जातें. पूर्वी मंथरा या नांवाची अशीच एक दुष्ट राक्षसीण होती, तिचा इंद्रानें नाश केला; त्याप्रमाणें तूंहि या ताटिकेचा नाश कर.' विश्वामित्रानें असें सांगितल्यावर तिघांनीं त्या अरण्यांत प्रवेश केला व ते मार्ग क्रमूं लागले. अरण्यांत मनुष्याचा संचार झाला, असें पाहून त्या ताटिकेच्या दासी तिला ती गोष्ट कळविण्यासाठीं गेल्या. त्यावेळीं ताटिका झोंप घेत होती. तिची झोंप घालविण्यासाठीं त्या दासींना हजारों वृक्ष ताटिकेच्या कानाजवळ आपटावे लागले; तेव्हां ती जागी झाली. आपल्या वनांत मनुष्यें आलीं आहेत, असें वर्तमान दासींकडू कळतांच ती मोठ्या आनंदानें भक्ष्याच्या आशेनें श्रीरामचंद्राकडे धांवूं लागली. तेव्हां रामचंद्रानें आकर्ण धनुष्य ओढून एकाच बाणानें त्या त्या विक्राळवदनी ताटिकेचा नाश केला.

## ४ विश्वामित्राचा यज्ञ.

त्या दुष्ट व नीच राक्षसिणीचा श्रीरामचंद्रानें नाश केल्यावर पृथ्वीवरील सर्व लोकांना फार आनंद झाला. स्वर्गांतून देवांनीं श्रीरामचंद्रावर पुष्पवृष्टि केली. मग रात्रभर तेथेंच सर्वांनीं मुक्काम केला. सकाळीं सूर्योदय झाल्यावर तिघेही स्नानसंध्या उरकून पुढें जावयास निघाले. त्यावेळीं श्रीरामचंद्राचा तो पराक्रम पाहून विश्वामित्र ऋषि अत्यंत प्रसन्न झाले; व त्यांनीं अनेक शस्त्रास्त्रविद्या रामचंद्रास देण्याचा विचार केला. ते रामाला म्हणाले; " रामा ! मला ज्या अनेक शस्त्रास्त्रविद्या माहीत आहेत, त्या देण्याला योग्य असा आजवर मला कोणी शिष्य आढळला नाहीं, परंतु त्या तुला दिल्या असतां, तूं त्यांचें योग्य चीज करून, सांभाळही चांगल्या-रीतीनें करशील.' विश्वामित्राचें तें भाषण ऐकून श्रीरामचंद्रास फार आनंद झाला; व तो विश्वामित्रास वंदन करून म्हणाला, "शस्त्रास्त्रविद्येंत आपण माझे गुरू आहांत, आपण त्या विद्या मला याव्यात.' मग विश्वामित्रानें रामचंद्राला धर्मचक्र, कालचक्र, ब्रह्मास्त्र, रुद्राक्ष, धर्मपाश, कालपाश, शिवशूल, रुद्रास्त्र, ब्रह्मशिरास्त्र, आग्नेयास्त्र, क्रौंचास्त्र, मुसळ, कापाल, दोन सहस्र धनुष्यें, महाशक्ति, शिखरी, मोद-कीची मुष्टि, संहारास्त्र, परिघास्त्र, किंकिणी, विद्याधरा, वरुणास्त्र, अग्निअस्त्र, मानवास्त्र,

मोहास्त्र, घातास्त्र, पतनास्त्र, सौरास्त्र, धैर्यास्त्र, निद्रास्त्र, दिव्यास्त्राचे दोन भाते, उद्कास्त्र, पर्वतास्त्र, पर्जन्यास्त्र, राक्षसास्त्र, नारायणास्त्र, शोषणास्त्र, मदनास्त्र, वाय्वस्त्र, प्रशमनास्त्र, चतुरंग सैन्य जिंकण्याची विद्या, महावीर विद्या, वगैरे अनेक विद्या विश्वामित्रांनीं रामाला दिल्या. त्या विद्यांची कांहीं प्रचीति पहावी, म्हणून रामानीं महावीर मंत्राचा उपयोग केला; त्याबरोबर पर्वताप्रमाणें शंभर महावीर रामचंद्रापुढें येऊन उभे राहिले; व काय आज्ञा आहे; असें म्हणाले. तो प्रकार पाहून, श्रीरामचंद्राला फार आश्चर्य वाटलें. मग श्रीरामचंद्र म्हणाले, "मी जेव्हां जेव्हां तुम्हांला बोलावीन; तेव्हां तेव्हां तुम्हीं येऊन मी सांगेन तें कार्य करावें, असें सांगितल्यावर ते महावीर रामचंद्राला वंदन करून निघून गेले."

पुढें मार्ग क्रमीत क्रमीत हे तिघेही सिद्धाश्रमाजवळ आले. तेथें असलेलें मनोहर अरण्य, त्या अरण्याच्या कांठानें वाहणारी विपुलवारियक्त नदी, सुंदर पशु, लहान लहान रम्य अशीं सरोवरें, वगैरे पाहून रामलक्ष्मणांस अत्यंत आनंद झाला. राम विश्वामित्राला म्हणाला, "ऋषे! हें अरण्य अत्यंत मनोहर दिसत आहे; तेव्हां याविषयींची माहिती आपणाकडून ऐकावी अशी इच्छा आहे." विश्वामित्र म्हणाले, रामा! या आश्रमाला सिद्धाश्रम असें म्हणतात. विरोचनाचा मुलगा बळी यानें येथें यज्ञ केला होता; आणि याच ठिकाणीं परमेश्वरानें वामन अवतार धारण करून बळीला पाताळांत घातलें, व देवांना त्यांची अमरावती परत दिली; तेव्हांपासून या स्थळाला सिद्धाश्रम असें म्हणतात.' मग रामचंद्र म्हणाले, "ऋषि! तर ही जागा यज्ञयागाला मोठी चांगली आहे असें मला वाटतें. आपली कांहीं हरकत नसल्यास आपणही आपला याग येथेंच करावा.' विश्वामित्रालाही ती गोष्ट मानवली, व त्यानें यज्ञाची सामग्री गोळा करून यज्ञकुंडें तयार केलीं, व अनेक ऋषींना बोलावून यज्ञास आरंभ केला. होमहवनास आरंभ झाल्यावर विश्वामित्र रामाला म्हणाले; "रामा! आतां ते दुष्ट राक्षस आकाशमार्गानें येऊन येथें रक्त, मांस, हाडें वगैरे अमंगल पदार्थ टाकतील; तर सावध राहून त्यांचा नाश कर." त्याप्रमाणें रामलक्ष्मण दोघेही आपआपलीं धनुष्यें सज्ज करून, राक्षसांची टेहळणी करूं लागले; ते दुष्ट राक्षस आकाशांत दिसूं लागले; ते यज्ञमंडपाचे वर येण्यापूर्वीच रामानें एका बाणानें मारीच राक्षस वरच्यावर मारला, व दुसऱ्या बाणानें सुबाहूला मारलें. [रामायणांत अशी कथा आहे कीं, रामानें एक बाणानें मारीचास चारशें योजनें लांब उडविलें]. तेव्हां त्या दोघांचें सैन्य रामलक्ष्मणांवर धांवून आलें, परंतु रामलक्ष्मणानीं क्षणार्धांत त्या सर्व सैन्याचा नाश करून टाकला. याप्रमाणें त्या संकटाचें निवारण त्या दोघांनीं केल्यावर सर्व ऋषींना आनंद झाला. विश्वामित्र म्हणाले, "रामा! तुला जी मी शस्त्रास्त्रविद्या शिकविली, त्याची गुरुदक्षिणा मला

चांगल्या रीतीनें मिळाली." मग विश्वामित्रानें सहा दिवसांत आपला यज्ञ मोठ्या समारंभानें पुरा केला. सर्व ऋषींना भोजनदक्षिणा वगैरे दिल्यावर त्यानें रामलक्ष्मणांसहि दिव्य वस्त्रें व अलंकार दिले. सर्वांना प्रेमानें निरोप दिला, व विश्वामित्रऋषि आपणाबरोबर रामलक्ष्मणांस घेऊन अयोध्येस येण्यास निघाला."

---

## अध्याय ५ वा.

### १ कुशनाभाच्या शंभर मुली.

वैशंपायनऋषि जनमेजयाला म्हणाले,–हे राजा! विश्वामित्रऋषि, रामलक्ष्मणांस बरोबर घेऊन निघाला असतां; तेथें जनकराजाचा दूत आला, व त्यानें जानकीच्या स्वयंवराची आमंत्रणपत्रिका विश्वामित्राला दिली; तेव्हां विश्वामित्रांनीं "सर्व ऋषींना जनकराजाचा स्वयंवरसमारंभ पाहण्यासाठीं बोलावणें आलें आहे, तर आतां आपण सर्वजण मिथिला नगरीस जाऊं; आणि तेथून मग ज्यानें त्यानें आपल्या आश्रमाला जावें." असें सांगून, विश्वामित्र अयोध्येचा रस्ता सोडून सर्व ऋषींसमवेत मिथिला नगरीला जाण्यासाठीं निघाले. ते श्रीरामचंद्राला म्हणाले, "रामचंद्रा! तुम्हीं दोघेही आम्हांबरोबर मिथिलेस स्वयंवर पाहण्यासाठीं चला; आणि मग तेथून मी तुम्हांला अयोध्येस पोहोंचतें करीन. जनकराजाजवळ त्र्यंबक या नांवाचें एक फार मोठें धनुष्य आहे, तें धनुष्य जो उचलील त्याला जनकराजा आपली मुलगी देणार आहे; तेव्हां तूंच तें धनुष्य उचलून जानकी मिळीव." याप्रमाणें बोलत बोलत सर्व ऋषींसमवेत, हिमालयपर्वताला उजवी घालून विश्वामित्रऋषि गंगेच्या उत्तर तीराला आले. विश्वामित्र म्हणाले, "रामा! येथें पूर्वी कुश या नावाचा पराक्रमी राजा होऊन गेला. त्याला विदर्भजा, या नावाची स्त्री होती, त्या स्त्रियेपासून त्या राजाला चार पुत्र झाले. त्यांचीं नावें; कुशांब, कुशनाभ, अमूर्तरजस, व वसु हीं होत. कुशांबानें कौशांबीपुरी वसविली, कुशनाभानें महोदय नगरी वसविली; परंतु या महोदय नगरीचें नांव कान्यकुब्जपट्टण असेंच जें पूर्वीपासून चालू आहे, तें अद्यापपावेतों तसेंच आहे." त्या कान्यकुब्ज नगरास आल्यावर श्रीरामचंद्र विश्वामित्राला म्हणाले, "ऋषे! या नगराला कान्यकुब्ज असें नाव कां पडलें! तें मला सांगा.' तेव्हां विश्वामित्रऋषि म्हणाले, "रामा! कुशनाभ, या नावाचा जो राजऋषि होऊन गेला, त्या कुशनाभाला शंभर मुली होत्या. त्या मुली आपल्या तारुण्यावस्थेंत एका बागेंत खेळण्यासाठीं गेल्या असतां, तेथें मलयगिरीवर राहणारा वायु ब्राह्मणाचें रूप धरून तेथें आला; व त्या कन्यांना तुम्हीं माझा स्वीकार करा, असें म्हणाला; परंतु त्या मुलींनीं बापाच्या अनुमतीवांचून विवाह करणें हें अनुचित होय; असें जाणून त्या वायूला त्यांनीं आम्हीं

तुझा स्वीकार करीत नाहीं, असें सांगितलें. तेव्हां वायूस फार राग आला व त्यानें त्या सर्वांना कुरूप केलें; त्या वायूच्या शापामुळें त्यानें शरीर थरथर कापूं लागलें, व त्या अत्यंत विद्रूप दिसूं लागल्या. मग त्या बागेंतून नगरांत परत आल्या, व त्यांनीं झालेली सर्व हकीकत बापाला सांगितली. कुशनाभाला, ती हकीकत ऐकून व त्या विद्रूप मुली पाहून फार वाईट वाटलें, परंतु झालेल्या गोष्टीस कांहीं उपाय नाहीं, असें जाणून तो स्वस्थ बसला.

इकडे चूली या नावाचा एक तपस्वी तप करीत बसला होता. त्याच्याकडे सोमदा या नावाची एक गंधर्वाची स्त्री आली; व तिनें त्या मुनीची सेवाशुश्रूषा करून त्याला प्रसन्न करून घेतलें. तो तपस्वी प्रसन्न झाल्यावर सोमदा त्याला म्हणाली; "मुने! आपणापासून मला एक पुत्र व्हावा अशी इच्छा आहे, तर तेवढ्यापुरता माझा स्वीकार करून मला भोगदान द्यावें." मुनीनें ती तिची विनंति मान्य केली; व तिला संभोगसुख दिलें. त्या सोमदा गंधर्विणीला पुढें एक पुत्र झाला, त्याचें नांव तिनें तो ब्राह्मणापासून झाला, म्हणून ब्रह्मदत्त असें ठेविलें. तो ब्रह्मदत्तही ब्रह्मबीज असल्यामुळें चूली मुनीप्रमाणेंच महा तपस्वी झाला. तो ब्रह्मदत्त एके दिवशीं कुशनाभ राजाकडे आला व त्याला तुझ्या शंभर मुली मला दे, म्हणून म्हणाला. मुली विद्रूप झाल्यामुळें त्या मुलींचा कोणीही स्वीकार करीना, यामुळें कुशनाभ राजा मोठ्या काळजींत पडला होता; अशा प्रसंगीं ब्रह्मदत्तानें त्या सर्व कन्यांची मागणी केल्यामुळें राजाला मोठा आनंद झाला, व त्यानें मोठ्या समारंभानें त्या मुली ब्रह्मदत्ताला अर्पण केल्या. ब्रह्मदत्तानें आपल्या मंत्रशक्तीनें त्या सर्व मुलींना पूर्वीप्रमाणें सुंदर व तरूण केलें, व त्यासहवर्तमान तो आनंदानें राहूं लागला. त्या कन्या वायूच्या शापानें विद्रूप ( कुब्जा ) झाल्या म्हणून या नगराला कान्यकुब्ज असें नांव पडलें. पुढें त्या मुली शापमुक्त होऊन सुस्वरूप झाल्या तरी या नगराचें कान्यकुब्ज हे नांव कायम राहिलें आहे. तें नगर कुशनाभानें आपल्या गाधिपुत्राला दिलें, व आपण तपश्चर्येला निघून गेला. तोच गाधिराजा माझा पिता होय. त्या गाधीनें संपूर्ण मगधदेश जिंकून आपलें एकछत्री राज्य चालविलें होतें.

## २ साठ हजार मुलांची गोष्ट.

कान्यकुब्ज नगरास एक रात्र मुक्काम करून दुसरें दिवशीं गंगेंत स्नानादिक क्रिया करून सर्व ऋषि, विश्वामित्र, राम व लक्ष्मण असे पुढें मार्ग क्रमूं लागले. कांहीं रस्ता चालल्यावर कौशिकी नावाची नदी लागली, तेव्हां विश्वामित्र रामाला म्हणाले:—"रामा ! ही कौशिकी नदी माझी बहीण आहे. गाधि राजाला सत्यवती या नांवाची एक मुलगी होती, ती मुलगी माझ्या पित्यानें ऋचिक ऋषीला दिली होती; जमदग्नी हा तिचाच पुत्र होय. ती माझी बहीण सत्यवती मरण पावल्यावर तिची ही नदी झाली आहे." कौशिकीविषयींची ही कथा

ऐकिल्यावर श्रीरामचंद्रास गंगेची कथा ऐकण्याची इच्छा झाली; म्हणून त्यांनीं ती कथा सांगण्याविषयीं विश्वामित्राची प्रार्थना केली. तेव्हां विश्वामित्र म्हणाले; "रामा! मेरुपर्वताची मेनिका नांवाची मुलगी हिमालयपर्वताला दिली आहे. त्या मेनिकेला हिमालयापासून, गंगा व पार्वती अशा दोन मुली झाल्या; पैकीं पार्वती ही महादेवास दिली असून गंगेला देवांनीं पवित्रपणासाठीं पृथ्वीवरून स्वर्गात नेलें. तेथें तिचें नांव महादेवानें मंदाकिनी असें ठेविलें. आतां ती स्वर्गातून परत पृथ्वीवर कशी आली, तें तुला सांगतों. पूर्वीं सूर्यवंशांत पराक्रमी व पुण्यशील, असा सगर नांवाचा राजा होऊन गेला; त्या राजाला सर्व कांहीं अनुकुलता होती, परंतु पुत्र नसल्यामुळें तो अत्यंत कष्टी होता. त्या सगर राजाला एक वैदर्भ देशाच्या राजाची मुलगी केशिनी आणि दुसरी कश्यप ऋषीची कन्या सुमती, या नांवाच्या दोन स्त्रिया होत्या. त्या दोन्ही स्त्रियांना घेऊन तो सगर राजा हिमालयपर्वतावर जाऊन पुत्रप्राप्तीसाठीं तपश्चर्या करीत बसला. कांहीं दिवसांनीं त्याच्या तपश्चर्येनें भृगुऋषि प्रसन्न होऊन म्हणाले; " हे सगर राजा! तुला साठ हजार पुत्र होतील." असें वरप्रदान मिळाल्यावर तो सगरराजा आपल्या राजधानीस परत आला. नंतर त्या राजाची स्त्री सुमती कांहीं दिवसांनीं प्रसूत होऊन तिला एक तुंबीफला ( भोपळ्या ) एवढें अंडें झालें; त्या अंड्यामध्यें साठहजार घरे असून त्या लहान लहान घरांत सूक्ष्म मुलें होतीं. कांहीं दिवसपर्यंत त्या अंड्याचें योग्यप्रकारें संरक्षण केल्यावर तें फुटून त्यांतून साठहजार मुलें बाहेर पडलीं. नंतर कांहीं दिवसांनीं त्या सुमतीला सुरसा या नांवाची मुलगी झाली. त्याप्रमाणें केशिनीला असमंज या नावाचा एक मुलगा झाला. त्या असमंजाला असीमान ( अंशुमान ) या नावाचा मुलगा झाला. अशा रीतीनें त्या सगर राजाचा संसार वाढला, परंतु दुर्दैवानें त्याचे साठहजार पुत्र क्षणार्धांत नाहींसे होऊन नातु असीमान तेवढा कायम राहिला. तो प्रकार असाः- ते साठसहस्र पुत्र तरुण झाल्यावर एकमेकाच्या बळानें अत्यंत उन्मत्त झाले; व सर्व पृथ्वी जिंकण्याचा त्यांनीं विचार करून अश्वमेधास आरंभ केला. श्यामकर्ण अश्व पृथ्वीवर सोडला व त्याच्या संरक्षणासाठीं ते त्याच्या मागें हिंडू लागले. तेव्हां सगरांचा अश्वमेध पुरा झाल्यास हे फार प्रबळ होतील; व आपणास त्रास देतील, अशी भीति इंद्राला वाटल्यामुळें इंद्रानें तो घोडा त्या साठसहस्र सगरांची नजर चुकवून पाताळांत नेला; व कपीलमुनीचे आश्रमांत जाऊन ते ध्यानस्थ बसले असतां त्यांच्या एका बाजूला नेऊन बांधला. असा प्रकार करून इंद्र अमरावतीस निघून गेला.

इकडे घोडा नाहींसा झालेला पाहून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें; व ते चोहोंकडे घोड्याचा शोध करूं लागले. अनेक अरण्यें, गिरिकंदरें त्यांनीं धुंडाळलीं, परंतु त्यांना घोडा कोठेंही सांपडेना. तेव्हां ते परत बापाकडे आले; व

घोडा नाहींसा झाल्याची हकीगत सांगू लागले, तेव्हां सगरानें त्यांना ब्रह्मदेवाकडे घोड्याचा शोध करण्यास पाठविलें. त्याप्रमाणें ते सर्व सत्यलोकीं ब्रह्मदेवाकडे गेले; व ब्रह्मदेवाला त्यांनीं घोड्यासंबंधानें विचारिलें; ब्रह्मदेवानें अंतर्दृष्टीनें घोड्याविषयीं सर्व वर्तमान जाणून तें त्या सगरराजाच्या मुलांना सांगितलें. तेव्हां ते सगर सत्यलोकाहून निघून पाताळांत जाण्याचा मार्ग शोधूं लागले, परंतु मार्ग न सांपडल्यामुळें त्या सगरांनीं पृथ्वी खणून पाताळांत प्रवेश केला. पृथ्वी खणल्यामुळें पृथ्वीवर सर्वत्र पाणी होऊन गेलें. तो एवढा जलसंचय सगरांनीं आणला; म्हणून त्या जलसंचयास सागर असें म्हणतात, ते सगर पाताळांत जाऊन पाहतात तों चाऱ्ही दिशांना चार हत्ती उभे असून त्यांनीं आपल्या शुंडावर पृथ्वी तोलून धरली आहे. पूर्व दिशेला सुमौन, दक्षिणेला महापद्म, पश्चिमेला विरुपाक्ष आणि उत्तर दिशेला हिमपांडुर उभा होता. त्या चार हत्तींना वंदन करून सगरसुत कपिल ऋषीच्या आश्रमांत घोड्याचा शोध करण्यासाठीं आले. पृथ्वीवर जेव्हां फार पाप होतें, तेव्हां त्या हत्तींना वसुंधरेचा भार असह्य होतो व त्यामुळें ते आपल्या शुंडा हालवितात, व मोठमोठ्यानें किंकाळ्या फोडून गर्जना करितात. पृथ्वीवर धरणीकंप होऊन भूमींत जो मोठा गडगडाट होतो, त्याचें कारण हेंच होय. असो. सगरसुतांनीं कपिलमुनीच्या आश्रमांत घोडा पाहिल्यावर त्यांना मोठा आनंद झाला; व त्यांनीं उन्मत्तपणें कपिलमुनीचा वाटेल तसा अपमान केला, तेव्हां कपिलमुनीनें क्रोधदृष्टीनें त्या सगरसुतांकडे पाहिल्याबरोबर ते जळूं लागले. इकडे बरेच दिवसपर्यंत घोडाही परत येत नाहीं; व सगरसुतही परत येत नाहींत, असें पाहून सगरराजानें आपल्या असिमान नातवाला त्यांच्या शोधाकरितां पाठविलें. तो शोध करीत करीत पाताळांत आला. तेथें सगर जळत आहेत, असें पाहून तो शोकाकुल झाला; आणि अग्नि शांत करण्यासाठीं तो पाणी शोधूं लागला, परंतु पाणी कोठेंही मिळेना. इतक्यांत त्याला गरुड भेटला व तो त्याला म्हणाला, "असिमान! या पितृगणावर जर गंगोदक घालशील तर यांचा उद्धार होईल." तेव्हां गंगेच्या प्राप्तीसाठीं असिमानानें तीस सहस्र वर्षें व त्याच्या मागून दिलीपराजानें तेरा वर्षें मरण येईपर्यंत तपश्चर्या केली, परंतु गंगेची प्राप्ति झाली नाहीं. ती तिची प्राप्ति दिलीप राजाचा पुत्र भगीरथ याला पांच हजार वर्षें तप केल्यावर झाली. शंकरानें भगीरथ राजाला एक जटा दिली होती. त्या जटेच्या सात नद्या निर्माण झाल्या. नलिनी, पावनी, ह्लादिनी ह्या पूर्वेस गेल्या, अलकनंदा, सुभद्रका व सुचक्षुषा या पश्चिमेकडे गेल्या; आणि गंगा उत्तरेकडे गेली. ती भगीरथ राजानें आणली; म्हणून तिला भागीरथी असेंही

म्हणतात, रामचंद्रा । याप्रमाणें ही गंगा भगीरथराजानें आणली आहे." हीच कथा संक्षेपरूपानें दुसऱ्या स्तबकांत सांगितली आहे.

---

# अध्याय ६ वा.

## १ यमुनानदीची उत्पत्ति.

भागीरथीची कथा ऐल्यावर श्रीरामचंद्राला व लक्ष्मणाला, यमुनेचीही कथा ऐकण्याची इच्छा झाली. श्रीरामचंद्र विश्वामित्र ऋषीला म्हणाले, "हे ऋषिवर्य! यमुना पृथ्वीवर कशी आली, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे." तेव्हां विश्वामित्रऋषि मार्ग क्रमित असतां यमुनेची कथा सांगूं लागले. ते म्हणाले, "रामचंद्रा! त्वंचू या नावाचा एक प्रजापती होता, त्या प्रजापतीला संज्ञा या नांवाची एक अत्यंत रूपवती कन्या होती, ती त्यानें सूर्याला दिली. त्या उभयतांपासून यम व शनि असे दोन पुत्र झाले. या दोन पुत्रांनंतर संज्ञेला यमुना या नांवाची एक मुलगी झाली. तिघांचें जन्म अस्तमानाचे वेळीं झालें. याप्रमाणें संतति झाल्यावर सूर्याची स्त्री संज्ञा अत्यंत त्रस्त होऊन गेली. तिला सूर्याचें तेज मुळींच सहन होत नसे. मोठ्या कष्टानें तिनें सूर्याशीं सहवास जोडून घेऊन तीन मुलांना जन्म दिला होता. मग तिनें आपल्या छायेपासून एक आपल्यासारखी सुंदर स्त्री निर्माण केली; व तिचें नांव सुवर्णा असें ठेवून तिला सूर्याची स्त्री, या नात्यानें सूर्याच्या घरांतील सर्व व्यवहार पाहण्यास सांगितलें. आणि कदाचित् प्रसंग आल्यास घडलेली सर्व हकीकत सांग, असें त्या सुवर्णेला सांगून संज्ञा आपल्या बापाचे घरीं गेली; परंतु सूर्य रागावेल या भीतीनें त्यानें संज्ञेला आपल्या घरांत आश्रय दिला नाहीं, तेव्हां ती अरण्यांत गेली; व तेथें घोडीचें रूप धारण करून तपश्चर्या करूं लागली. संज्ञा गेल्यावर सुवर्णेला सूर्यापासून सावर्णिमनु, व्यतिपात, भद्रा, वैधृती, कुलीक, अर्धयाम. अशी मुलें झालीं. याप्रमाणें सुवर्णा सूर्याचा संसार चालवीत होती, परंतु सूर्याला त्यांत कांहींच उणें दिसून आलें नाहीं. पुढें एके दिवशीं, प्रातःकाळीं शनीला भूक लागली; म्हणून तो आपल्या आईकडे जाऊन खाण्यास मागूं लागला तेव्हां सुवर्णा म्हणाली, "देवांना नैवेद्य समर्पण केल्यावांचून खाण्यास मिळणार नाहीं." आईचें हें बोलणें ऐकून शनीला राग आला, व तो तिला मारण्यासाठीं तिच्या अंगावर धावून येऊं लागला, तेव्हां सुवर्णेनें शनीला शाप दिला किं, 'तुझे पाय भंग पावतील." तो आईचा शाप ऐकून शनीला फार वाईट वाटलें; व तो सूर्याकडे येऊन त्यानें झालेली सर्व हकीकत सूर्याला सांगितली. तें ऐकून सूर्याला फार आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, "मुलांनीं कितीही भयंकर अपराध केला, तरी आई त्याला कधींही अशाप्रकारचा शाप देणार नाहीं. यावरून तुला

शाप देणारी तुझी खरी आई नसावी [illegible]' असें म्हणून सूर्य सुवर्णेकडे आला; व तिजवर क्रुद्ध होऊन म्हणा[illegible], "[illegible] खरोखर कोण आहेस तें सांग." तेव्हां सुवर्णा म्हणाली, "हे सूर्या! मी संज्ञेची छाया आहे; अर्थात् मी तिचीच अंशभूत असल्यामुळें मीहि तुझी अर्धांगी आहे, तेव्हां यांत माझा कोणताच अपराध नाहीं." मग सूर्य शनीला म्हणाला, "शनि! हीपण तुझी आईच आहे, तेव्हां हिचा शाप बाधल्यावांचून तुला राहणार नाहीं." सूर्यानें असें सांगितल्यावर शनीचे पाय किंचित् वांकडे झाले.

## २. यमुनेची कथा.

सुवर्णेनें तो एकंदर प्रकार सूर्याला सांगितल्यावर, संज्ञा पृथ्वीवर गेल्याचें समजलें. मग त्यानें अंतरदृष्टीनें पाहिलें, तेव्हां त्याच्या असें लक्ष्यांत आलें कीं, संज्ञा घोडीचें रूप धारण करून तपश्चर्या करीत आहे. मग सूर्यानेंही घोड्याचें रूप धारण केलें; व त्या स्थितींत तो संज्ञेजवळ येऊन कामचेष्टा करूं लागला. त्या वेळीं संज्ञा ऋतुस्नात असल्यामुळें, ती गरोदर झाली, व पुढें तिला अश्विनीदेव या नांवाचे दोन मुलगे झाले. तेच पुढें स्वर्गलोकांत प्रसिद्ध वैद्य झाले; नंतर कांहीं दिवस गेल्यावर त्या संज्ञेला वैवस्वत मनु या नावाचा आणखी एक मुलगा. नंतर संज्ञा व सूर्य दोघेही पृथ्वीवरून उदयाचलाशीं गेले; तेथें यमुना खेळत होती. आपल्या आईबापांना एकदम आलेले पाहून तिला फार आनंद झाला व तिनें आपल्या मोठमोठ्या लहरींनी आनंद प्रदर्शित केला. तीच ही यमुना नदी होय. ह्या महानदीचा उगम अस्ताचळापासून झाला, अशी कथा पद्मपुराणांतील प्रयागमहात्म्यांत आहे.

ही यमुना पाताळांत कूर्माच्या पृष्ठावर व पृथ्वीच्या पोटांत वाहणारी होऊन पुढें अष्ट दिशांना व्यापून पश्चिम समुद्राला भिडून निघाली, तें कलिंद पर्वताला समजलें, तेव्हां तो मार्गांत आडवा आला, व पळमात्र त्यानें तिला अडवून धरिलें, त्यावेळीं यमुना कलिंदपर्वताला भोंक पाडून बाहेर पडली, व वाहूं लागली. कलिंदपर्वताला भोंक पाडून निघाल्यामुळें यमुनेला कालिंदी हें नांव प्राप्त झालें, व तो डोंगर काजळाचा होता त्याचा भेद करून यमुना निघाली म्हणून तिचें पाणी काळें झालें. पुढें ती पूर्वदिशेकडे सात समुद्रांचा भेद करून उदयाचळाला गेली. तेथेंही तिचा वेग कमी होईना, तेव्हां सूर्यानें तिला आकाशमार्गानें नेलें व तेथें तिला पश्चिमवाहिनी केली. तिच्या पाण्याचे ओघ रेषारूपानें दिसतात. ही यमुना नदी गंगा, गोदावरी, कृष्णा, यांच्या पूर्वीची आहे. याप्रमाणें ही यमुना पृथ्वीवर अस्ताचलापासून उदयाचलापर्यंत व आकाशमार्गानें उदयाचलापासून अस्ताचलापर्यंत, अशी माळेतील मण्याप्रमाणें फिरत आहे."

हें वैशंपायनऋषीचें बोलणें ऐकून जनमेजय म्हणाला, "मला हें खरें वाटत नाहीं; कारण प्रयागाच्या पुढें यमुना मुळींच दिसत नाहीं." तेव्हां वैशंपायन म्हणाले; "राजा तुझी शंका योग्य आहे. प्रयागापुढें यमुना न दिसण्याचें कारण असें आहे कीं, पूर्वी भगीरथराजानें महान् प्रयत्न करून गंगा प्रयागाला आणिली, त्या वेळीं गंगेनें पुढें काळीभोर महान् यमुना आहिल्याबरोबर, मी हिच्यापुढें,-सूर्यापुढें जसा काजवा-तशी आहें असें जाणून, गंगा पाताळांत जाऊं लागली. तेव्हां देवांनीं यमुनेची प्रार्थना करून सांगितलें कीं, 'भगीरथराजानें महान् प्रयत्न करून लोकांवर उपकार करण्याकरितां गंगेला पृथ्वीवर आणिलें आहे, करितां तूं भागीरथीमध्यें मिळून जा." त्यावेळीं यमुना म्हणाली; "हे गंगे ! तूं संपूर्ण चराचरामध्यें पवित्र आहेस, याकरितां हे गंगे ! मीं तुझ्या उदरांतून शंभर योजनेंपर्यंत राहीन, व व तेथपर्यंत तुला मी मातेसमान मानीन; परंतु सागराला मिळण्याचे वेळीं मी निराळी होईन." त्यावेळीं भागीरथीनें तिचें म्हणणें कबूल करून ती वर निघाली व यमुनाही तिच्यामध्यें मिळून निघाली. याप्रमाणें त्या पवित्र दोन्ही नद्या शंभर योजनें जाऊन नंतर निराळ्या झाल्या. भागीरथी सहस्र मुखांनीं पूर्वसमुद्राला मिळाली, व यमुना उदयाचलाला गेली. जनमेजय म्हणाला; "हे ऋषिवर्य ! भागीरथी पूर्वसमुद्राला मिळाल्यावर यमुना निराळी गेलेली दिसत नाहीं." तेव्हां वैशंपायन म्हणाले; "राजा ! ज्याप्रमाणें ब्रह्मगिरीच्या पाठारावर सोन्याच्या खाणी आहेत, असें पुराणांत आहे, परंतु त्या दिव्यचक्षूंशिवाय दिसत नाहींत, जसें एकरूप झालेलें उदक आणि दूध, हंसपक्ष्याशिवाय दुसऱ्याला निराळें करितां येत नाहीं, त्याप्रमाणें सूर्याच्या किरणांनीं नेलेलें यमुनेचें उदक सामान्य मनुष्याला दिसणें अशक्य आहे." याप्रमाणें यमुनेची कथा पद्मपुराणांत प्रयागमाहात्म्यांत आहे.

## ३. अहिल्येची कथा.

याप्रमाणें यमुनेची कथा सांगितल्यावर जनमेजय राजाला वैशंपायन ऋषि पुढें श्रीरामचंद्राची कथा सांगूं लागले. श्रीरामचंद्र विश्वामित्राच्या यज्ञसंरक्षणाकरितां जात असतां श्रीरामानें आपल्या चरणस्पर्शानें-पतीच्या शापवचनानें शिळा झालेली-स्त्री अर्ध्या क्षणांत उद्धरिली. तेव्हां जनमेजय म्हणाला; "ती स्त्री शिळा कां झाली ? ती कोणाची मुलगी ? तिचा पति कोण ? व तो तिच्यावर कां रागावला ? ती कथा सांगा." तेव्हां वैशंपायन म्हणाले; "हिमालयाजवळ सिद्धाश्रम या नावाचें महातपोवन आहे, तेथें गौतमऋषि रहात होते. त्या ठिकाणीं ब्रह्मदेव आपली कन्या अहिल्या हिला बरोबर घेऊन आला; आणि म्हणाला; "अहो वेदमूर्ति ! ही माझी लाडकी लहान मुलगी आहे, हिचें तूं उत्तमरीतीनें पालन करावें, व तुझ्या मानानें ही प्रौढ झाली म्हणजे तूं मला परत आणून द्यावीस." याप्रमाणें सांगून, मुलीला गौतमाजवळ ठेऊन ब्रह्मदेव निघून गेला. गौतमऋ-

षीनें तिचें उत्तम रीतीनें पालन केलें. पुढें ती कन्या पूर्ण तारुण्याच्याभरांत आल्यावर गौतमऋषि तिला घेऊन ब्रह्मदेवाकडे गेला, व तिला ब्रह्मदेवाच्या स्वाधीन केलें. तारुण्यभरांत आलेली आपली कन्या अहिल्या गौतमानें परत आणून दिलेली पाहून ब्रह्मदेव, आश्चर्ययुक्त होऊन ह्मणाला; "हे गौतमा! तूं इंद्रियांनां जिंकणारा, महातपस्वी ऋषि आहेस, तुला उपमा देण्याला दुसरा कोणी नाहीं." अहिल्या रूपानें व गुणांनीं पार्वती समान आहे असें ऐकून इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, वायु, सोम, सूर्य, ईशान, वगैरे सर्व देव आपआपल्या वाहनावर बसून अहिल्येकरितां ब्रह्मदेवाजवळ आले, व कन्येची मागणी करूं लागले. तेव्हां ब्रह्मदेव ह्मणाला; "जो अगोदर पृथ्वीप्रदक्षिणा करून येईल त्याला मी अहिल्या देईन." तेव्हां सर्व देव आपआपल्या वाहनावर बसून पृथ्वी प्रदक्षिणा करण्याकरितां निघाले; व गौतमऋषिहि पृथ्वीप्रदक्षिणा करण्याकरितां निघाला, परंतु आपणाजवळ वाहन नसल्यामुळें आपल्या हातून पृथ्वीप्रदक्षिणा कशी होणार या विवंचनेंत तो होता, इतक्यांत पुढें वीणारी गाय त्याच्या दृष्टीस पडली. बाहेर दोन खूर व मुख आलें आहे असें पाहून त्या उभयतोमुखी गाईला डाव्याबाजूनें व उजव्याबाजूनें अशा तीन प्रदक्षिणा केल्या. ह्या तीन प्रदक्षिणा शंकराच्या शतपूजांच्या बरोबर आहेत, आणि तें शिवलिंगाचें एक पूजन पृथ्वीप्रदक्षिणेसमान आहे. याप्रमाणें गौतम ऋषि पृथ्वीप्रदक्षिणाकरून ब्रह्मदेवाकडे गेला. ब्रह्मदेवानें याला पृथ्वीप्रदक्षिणेचें पुण्य घडलें आहे असें जाणून आपली अहिल्याकन्या त्यास दिली. दुसरे दिवशीं इंद्र पृथ्वी प्रदक्षिणा करून आला आणि पाहतो तो गौतम अहिल्येला वरून बसला आहे. असें पाहून इंद्राला राग आला व तो ब्रह्मदेवाला ह्मणाला; "जर तूं गौतमाला वर निश्चित केला होतास तर आह्मां देवांनां पृथ्वीप्रदक्षिणा करण्याचा विनाकारण त्रास कां दिला?" तेव्हां ब्रह्मदेव ह्मणाला; "माझी वाणी कधींही असत्य बोलत नाहीं. गौतमाला पृथ्वीप्रदक्षिणा घडली ह्मणून ही कन्या त्याला दिली. नाहीं तर तुह्मां देवांनां सोडून मनुष्याला कां दिली असती?" तें ऐकून इंद्र दुःखोद्गारानें ह्मणाला, हें रत्न भिक्षुकाला मिळालें, परंतु मी व्यभिचारानें हिला छळीन, असें ह्मणून देवांसहित इंद्र निघून गेला. पुढें गौतमऋषि गृहस्थाश्रम करून सिद्धाश्रमीं राहूं लागला. कांहीं दिवस लोटल्यावर, गौतम एके दिवशीं अहिल्येला घरामध्यें ठेवून समिधा आणण्याकरितां वनामध्यें गेला होता ती संधी साधून इंद्र गौतमाचें रूप धारण करून अहिल्येच्या आश्रमांत आला. आणि अहल्या जलपात्र घेऊन बाहेर येतांच त्यानें तिचा हात धरून 'मी मदनाधीन झालों आहे मला रतिदान दे ह्मणून सांगितलें. त्यावेळीं अहल्या ह्मणाली; "आतां सूर्यनारायण विद्यमान आहे, अद्यापि अस्ताचलाला गेला नाहीं, तुह्मी ज्ञानी अहांत, आपणाला सर्व माहीत आहेत, आपण सतीचे धर्म जाणतां, दिवामैथुनाला धर्मशास्त्रांत

आहे, असें असतां आपण हें काय ह्मणतां ?" त्यावेळीं तो कुटिल गौतमरूपी इंद्र ह्मणाला; "तुझ्या विरहाग्नीनें व कामज्वरानें हा देह व्यापून गेला आहे, याकरितां धर्मशास्त्राच्या गोष्टी सांगत बसलीस तर हा देह मुळींच राहणार नाहीं" याप्रमाणें अनेक प्रयत्नांनीं अहिल्या इंद्रानें भोगिली. इंद्राचा व अहिल्येचा रतिविलास पुरा होत आहे तोंच गौतम आश्रमांत आला. त्यावेळीं त्यानें तो अहिल्येचा बीभत्स प्रकार पाहिला व आपलें स्वरूप धारण करणाऱ्या इंद्राला ओळखून त्याला शाप दिला कीं, "तूं माझें स्वरूप धारण करून ब्राह्मणस्त्री भोगिलीस यामुळें तुझा वृषणगोल भूमीवर पडेल आणि तूं निर्फळ होशील. व अहिल्येला शाप दिला कीं, तूं सहस्र वर्षे शिला होशील, परंतु इंद्रानें तुला फसवून भ्रष्ट केलें, ह्मणून असा उःशाप देतों कीं, ज्या वेळीं तुला श्रीरामाच्या चरणाचा स्पर्श होईल त्यावेळीं तूं शापमुक्त होशील." याप्रमाणें शाप दिल्यावर अहिल्या सिद्धाश्रमांत शिळा झाली आणि त्यावेळेपासून त्या आश्रमाला घोरवन असें ह्मणूं लागले. असें वाल्मीकि रामायणांत आहे. इंद्राला शाप झाल्यानंतर त्यानें ती सर्व हकीकत देवांना सांगितली. त्यावेळीं सर्व देवांनीं गौतमाची प्रार्थना केल्यावर गौतमानें उःशाप दिला कीं, "मेंढ्याचा वृषण इंद्राला लाविला असतां त्याची विटंबना दूर होईल." त्यावेळीं अग्नि, ब्राह्मण व देव या सर्वांनीं मेंढ्याचा वृषण आणून इंद्राला लावितांच त्याची विटंबना दूर झाली, व तेव्हांपासून इंद्राला मेषवृषण असें ह्मणूं लागले, व अजूनहि इंद्राला यज्ञांमध्यें मेषवृषणाची आहुती देतात. ब्रह्मपुराणांत अशी कथा आहे किं, ब्रह्मगिरीवर शिला होशील, असा गौतमानें अहिल्येला शाप दिला. व गौतमानें इंद्र मांजराच्या रूपानें पाहिला आणि त्याला शाप दिला किं, तुझ्या शरीरावर शंभर भगें उत्पन्न होतील. असा शाप दिल्याबरोबर त्याच्या सर्वांगावर भगें उत्पन्न झालीं. तेव्हां इंद्रानें ती हकीकत देवांनां सांगितली, त्यावेळीं देव इंद्राला घेऊन गौतमाजवळ आले व गौतमाची प्रार्थना करून ह्मणाले; "हा देवांचा राजा इंद्र आहे, याकरितां त्याच्यावर कृपाकरून याला शापमुक्त करावें." त्यावेळीं गौतम ह्मणाला "माझा ब्राह्मणाचा शाप असत्य होणार नाहीं, परंतु मी असा उःशाप देतों कीं, याच्या भगाच्या जागीं नेत्र होतील. तेव्हां सर्व देव व इंद्र आपल्या स्थानीं गेले व गौतम सिद्धाश्रमीं राहिला. पुढें एक हजार वर्षांनीं श्रीरामचंद्र व विश्वामित्र बरोबर जात असतां वाटेंत ती महाशिला पाहून विश्वामित्राला फार आनंद झाला व ह्मणाला; "हे श्रीरामा ! या शिलेला तूं पाय लाव." त्यावेळीं श्रीरामानें गुरुवचनावर विश्वास ठेऊन त्या शिलेला चरण लाविला. त्याबरोबर शिलेपासून दिव्य स्वरूप धारण करणारी सुंदर अहिल्या उत्पन्न झाली. [illegible]ीं पूर्वीप्रमाणेंच हा कोणीतरी तोतिया असेल असें तिला वाटून भीति [illegible]ली. त्यावेळीं विश्वामित्रानें सांगितलें किं, हे मातोश्री ! हा श्रीराम

दाशरथी तुला शापमुक्त करण्याकरितां आला आहे. हा दीनांचा स्वामी, जगताचा उद्धार करणारा, पतितांनां पवित्र करणारा, शत्रुरूपी हत्तींनां सिंहरूप, असा हा श्रीराम आहे. " असें विश्वामित्राचें भाषण ऐकून अहिल्येला ज्ञान झालें. पुढें ब्रह्मगिरीवरून विश्वामित्र, राम, लक्ष्मण व अहिल्या सिद्धाश्रमीं परत आले. विश्वामित्रानें अहिल्येला गौतमाचे स्वाधीन केलें. श्रीराम लक्ष्मणानीं गौतमाला नमस्कार केला, अहिल्येला मोठा आनंद झाला. देवांनीं पुष्पवृष्टी केली. नगारे वाजूं लागले. तीन्हीं लोकीं रामकथा गाऊं लागले.

---

# अध्याय ७ वा.

## १ मरुतांची कथा.

वैशंपायन ऋषि राजा जनमेजयाला अहिल्येची कथा सांगून पुन्हा रामाची कथा सांगूं लागले. " विश्वामित्र ऋषि पुढें व मागें राम लक्ष्मण चालले असतां रामानें विश्वामित्राला विचारिलें किं, " हे ऋषे ! या सिद्धाश्रमाला घोरवन असें नाव प्राप्त होण्याचें कारण काय झालें तें सांगा. " तेव्हां विश्वामित्र ह्मणाला; " पूर्वी देवदैत्यांनीं समुद्रमंथन केल्यावर परस्परांमध्यें युद्ध होऊन देवांनीं दैत्यांनां जिंकिलें. तेव्हां दितीला वाईट वाटून ती कश्यपाला ह्मणाली, "देवांना जिंकील असा पुत्र मला द्यावा. " तेव्हां कश्यपानें देवांनां जिंकणारा पुत्र तुला होईल असा वर दिला. पुढें दितीला गर्भ राहिला असतां, एक दिवस चुकून दिती दक्षिणेस पाय, उत्तरेस शिर व आकाशाकडे मुख करून निजली. ती संधी साधून इंद्रानें सूक्ष्म रूप धारण करून दितीच्या योनिमार्गानें तिच्या उदरांत प्रवेश केला आणि त्या गर्भाचे सात तुकडे केले; त्यावेळीं तो गर्भ आक्रोश करूं लागला. त्यावेळीं इंद्र म्हणाला मा रुत रडूं नको; तरी तो रडावयाचा राहीना म्हणून आणखी त्या प्रत्येकाचे सात याप्रमाणें एकुणपन्नास तुकडे केले. तरी तो गर्भ रडावयाचा राहीना. इतक्यांत दिती जागी झाली, व इंद्र बाहेर आला, तों दितीनें त्यास ओळखिलें, व शाप देणार इतक्यांत इंद्र म्हणाला किं, " मी वज्रानें याचे एकुणपन्नास तुकडे केले आहेत याकरितां हे एकुणपन्नास मरुद्गण होतील, व वायव्य दिशेचे अधिपति होतील. " याप्रमाणें सांगून इंद्र आपल्या स्थानीं निघून गेला. इंद्रानें हें घोराचरण या सिद्धाश्रमांत केलें म्हणून यास घोरवन म्हणूं लागले.

## २ त्रिशंकूची कथा.

पुढें विश्वामित्र रामलक्ष्मणांसह मिथिला नगरीला आले. त्यावेळीं जनकराजा आपल्या कुलगुरु शतानंदाला घेऊन विश्वामित्राला सामोरा आला. सर्वांच्या यथायोग्य भेटी झाल्यानंतर शतानंद विश्वामित्राची कीर्ति जनकाला सांगूं लागला.

शतानंद म्हणाला; " राजा जनका ! हा विश्वामित्र प्रतिसूर्य आहे. याची कीर्ति त्रिभुवनांत राहाणार नाहीं अशी आहे." तेव्हां जनकानें ती ऐकण्याविषयीं प्रेम दाखविल्यामुळें शतानंद सांगूं लागला: "पूर्वीं सूर्यवंशीं त्रिशंकु नावाचा राजा होता, त्यानें नैमिषारण्यामध्यें यज्ञ करण्यास आरंभ केला. त्यानें आपल्या कुलगुरु वसिष्ठपुत्रांची प्रार्थना केली किं, तुम्हीं असें हवन करा किं, ज्या योगानें मी शरीरासह स्वर्गीं जाईन." त्यावेळीं वसिष्ठपुत्र म्हणाले; "राजा ! हें तुझें म्हणणें अज्ञानाचें आहे. राजा ! सदेह स्वर्गीं जाण्याचा तुझा प्रयत्न व्यर्थ आहे. सूर्य पश्चिमेस उगवेल, परंतु सदेह स्वर्गीं जाणें होणार नाहीं." तेव्हां त्रिशंकु म्हणाला; " तुम्हांला यागाची माहिती नाहीं. बरें मी आतां दुसरा आचार्य आणून त्याकडून याग करवितों." हें त्रिशंकूचें बोलणें ऐकून ऋषिपुत्रांनां फार राग आला व त्यांनीं त्रिशंकूला शाप दिला किं, " तूं चांडाळ होशील " ऋषींनीं शाप दिल्याबरोबर त्याचें शरीर चांडाळाचें झालें व त्यामुळें त्याचा याग राहिला. नंतर त्रिशंकु राजा विश्वामित्राला शरण आला, आणि त्यानें झालेली सर्व हकीकत सांगितली. तेव्हां विश्वामित्र म्हणाला; " हे राजा ! मी तुला निर्दोष करून याच देहानें तुला स्वर्ग दाखवीन. नंतर विश्वामित्रानें त्रिशंकु सशरीर स्वर्गीं जाण्याकरितां बीजमंत्रानें यागाला आरंभ केला. यज्ञाची पूर्णाहुति देतांक्षणींच यज्ञनारायण प्रसन्न झाला व त्यानें त्रिशंकूला सदेह स्वर्गीं नेलें. तेव्हां सर्व देव धांवत आले, व त्यांनीं, हा गुरुशापामुळें अपवित्र आहे याकरितां सदेह स्वर्गीं येण्याला योग्य नाहीं, असें म्हणून त्याचें डोकें खालीं केलें व पाय वर करून त्यास खालीं लोटून दिला. त्यावेळीं त्रिशंकूनें आर्त स्वरानें विश्वामित्राला हाक मारून सांगितलें किं, माझें रक्षण करावें. तें ऐकून विश्वामित्राला फार राग आला व त्यानें आपल्या मंत्रसामर्थ्यानें त्रिशंकूला आकाशांत दक्षिण दिशेचा ध्रुव करून ठेविलें. आणि सांगितलें किं, " जोंपर्यंत उत्तरध्रुव, नक्षत्रें, चंद्र व सूर्य आहेत तोंपर्यंत तूं आकाशांत स्थिर रहा." नंतर प्रतिसृष्टि करण्याकरितां विश्वामित्रानें हातांत उदक घेतलें, त्यावेळीं सर्व देव विश्वामित्राची प्रार्थना करून म्हणाले, आपण असें करूं नका. आम्हीं त्रिशंकूला स्वर्गांत नेतों. नंतर देवांनीं त्रिशंकूला विमानांत घालून स्वर्गीं नेलें. याप्रमाणें विश्वामित्राची ख्याती त्रिभुवनांत आहे. शतानंद जनकाला विश्वामित्राची आणखी कीर्ति सांगूं लागला. तो म्हणाला— " पूर्वीं सूर्यवंशीं अंबरीष म्हणून राजा होता. त्यानें वसिष्ठपुत्राची प्रार्थना केली किं, मला पुत्र नाहीं तर काय केलें असतां पुत्र होतील." त्यावेळीं वसिष्ठपुत्रानें सांगितलें " हे राजा ! नरयाग केला असतां तुला पुत्र होतील." तें गुरुपुत्राचें भाषण ऐकून राजाला धन्यता वाटली, आणि पुरोहिताला सांगितलें किं, एक हजार सालंकृत गाई देऊन मनुष्य आणावा. त्यावेळीं पुरोहितानें एक दूत मनुष्याच्या शोधाकरितां पाठविला. नंतर पृथ्वीवर शोध करितां, केकय देशांमध्यें एक

दुराचारी, दैवहत, वेदवेत्ता अजीगर्त नावाचा ब्राह्मण भेटला. त्याला राजदूतानें सांगितलें किं, जर तूं आपला पुत्र हवनाकरितां देशील तर एक हजार सालंकृत गाई मिळतील. ब्राह्मणानें ती हकीकत आपल्या स्त्रीला सांगितली. आणि ह्मणाला, ' एक हजार गाई मिळाल्यावर आपलें सर्व दरिद्र दूर होईल व तुलाही आणखी पुष्कळ चांगले चांगले अलंकार धारण करण्यास मिळतील. आपणांस तीन पुत्र आहेत, त्यांतील एक दिला तरी आपणांस दोन शिल्लक आहेतच. कालानें जर एकादा नेला तर आपण त्यास काय करणार ? शिवाय ईश्वरकृपेनें आणखी पुत्र होणार नाहींत हें तरी कशावरून ? " तेव्हां स्त्री म्हणाली; " आपलें ह्मणणें मला कबूल आहे, परंतु मी आपला कनिष्ठ पुत्र देणार नाहीं " व अजीगर्तानें सांगितलें किं, ' ज्येष्ठ पुत्रानें मी पुत्रवान् असल्यामुळें ज्येष्ठपुत्र मला देतां येत नाहीं. ' तेव्हां मधला पुत्र शुनःशेप देण्याचा संकल्प केला. त्यावेळीं राजदूतानें सहस्र गाई अजीगर्ताला दिल्या व तो पुत्र घेऊन निघाला. त्या नष्ट अजीगर्तानें पुत्र विकून द्रव्य मिळविलें. सर्पानें जसें बेडकास तोंडांत धरावें तरी तो माशी खात असतो, त्याप्रमाणें अजीगर्त मुलाला विकून आपण जगण्याची इच्छा करित आहे. देह हा काळाचें खाद्य आहे, देह माझा असें म्हणून तो आपला होत नाहीं. या मृत्युलोकीं राजांचा व रंकांचा सर्वांचा संहार झाला आहे. तो अजीगर्त मृत झाल्यावर त्याला यमदूतांनीं यमलोकीं नेलें. व नाना प्रकारांनीं पुष्कळ जाचणी केली. इकडे राजदूतानें शुनःशेपाला आणून अंबरीष राजाच्या पुढें उभें केलें. राजानें तो विकत आणिलेला द्विजपुत्र पाहिला, त्याच्या अंगाला चंदनाची उटी लाविली, गळ्यांत पुष्पमाळा घातल्या, व यज्ञस्तंभाशीं बांधिलें. त्या वेळीं शुनःशेपानें आपला मरणकाळ जवळ आला आहे असें जाणून विश्वामित्राची प्रार्थना केली. कौशिक यागाकरितां तेथें आला होता त्यानें तो बालक कथश स्तंभाला बांधिलेला पाहिला. त्याचा कंठ कापून इंद्रादिक दिक्पतींनां आहुती देणार इतक्यांत विश्वामित्रानें त्यांनां सांगितलें किं, " तुह्मी राजाला असें सांगा किं, आह्मी तृप्त झालों. तुला ह्या यज्ञाचें फल मिळेल आणि हा तुमचा भाग शुनःशेप मला द्या; या प्रमाणें तुह्मी कबूल न केल्यास तुह्माला शाप देईन " त्यावेळीं त्या विश्वामित्राच्या भीतीनें देव राजाला ह्मणाले; हे राजा ! आह्मी तृप्त झालों व नरयागाचें फल तुला दिलें. ह्या यागाच्या योगानें तुला दोन पुत्र होतील आतां ह्या ब्राह्मणपुत्राचें कंठबंधन सोड " असें सांगून देव आपल्या स्थानाला निघून गेले. हे जनक राजा ! अशा रीतीनें विश्वामित्रानें शुनःशेप सोडविला अशी याची अगाध कीर्ति आहे. हे जनका ! या विश्वामित्राची आणखी तिसरी ख्याति सांगतों. पूर्वी इंद्रानें विश्वामित्राच्या तपश्चर्येचा भंग करण्याकरितां रंभा नांवाच्या अप्सरेला पाठविलें; तें विश्वामित्रानें जाणून तिला शाप दिला किं, " हे रंभे !

तूं दहाहजार वर्षें शिळा होशील, व ज्या वेळीं या वाटेनें ऋषी येतील व त्यांचे चरणरजांचा तुला स्पर्श होईल त्या वेळीं तुझा ह्या शापापासून उद्धार होईल. " विश्वामित्राचा याप्रमाणें शाप झाल्यावर रंभा शिळा झाली व शाप दिल्यामुळें विश्वामित्राच्या तपाचा भंग झाला. नंतर हे विश्वामित्र ऋषी फिरून तप करण्यास लागले. लोखंडाचा गोखुरकरून त्यावर मस्तक टेकून, ऊर्ध्वचरण करून, निराहार एक हजार वर्षें तप केलें. पंचाग्निसाधन, धूम्रपान, निराहार, मौन, अशा प्रकारचे नियम धारण करून एकहजार वर्षें तप केलें, नंतर पद्मासन घालून, ब्रह्माचे ठिकाणीं लक्ष लावून, वायूचा निरोध करून, देहाचा त्याग करण्याकरितां तप केलें. त्यायोगें मस्तकांतून धूम निघाला. त्यामुळें काल काम आणि संपूर्ण देव भिऊन गेले; पर्वत डोलूं लागले; सप्तसमुद्र उचंबळूं लागले; पाताळांत पृथ्वीला धारण करणारे हत्ती पृथ्वीचा त्याग करण्याविषयीं प्रयत्न करूं लागले; सारांश विश्वामित्राच्या उग्र तपाच्या योगानें त्रिभुवन संतप्त झालें; प्रलयकाल प्राप्त झाला किं काय, असें झाल्यामुळें इंद्रादिक देव त्याला शरण आले. आणि प्रार्थना करून तप पुरे करण्यास सांगितलें. त्यावेळीं विश्वामित्र ह्मणाले; " जर वसिष्ठ ऋषि मला आजपासून ब्रह्मर्षि ह्मणतील तर मी तप पुरें करीन." त्यावेळीं वसिष्ठानीं ह्यांनां ब्रह्मर्षिश्रेष्ठ असें ह्मटलें, तेव्हां ह्यांनीं तपाची समाप्ति केली. याप्रमाणें हा वेदमूर्ति विश्वामित्र आहे. ह्याचें दर्शन होतांच महापापांचा नाश होतो. नंतर जनकानें विश्वामित्राला नमस्कार केला, आणि गौरव करून नाना प्रकारांनीं पूजा केली. आणि प्रार्थना केली किं, 'आपल्या दर्शनानें माझीं पातकें नाश झालीं. हें नगर आपल्या आगमनानें धन्य झालें आहे. हे ऋषि ! हे दोन पुत्र आपल्याबरोबर आहेत ते कोण ? ह्यांनां घडीत असतां भवानी निश्चळ होती किं काय ? ह्यांची जननी धन्य आहे किं, जी अशा प्रकारचीं रत्नें प्रसवली, ज्याच्या घरीं ह्यांचा जन्म झाला तो पिता ही धन्य आहे, हे अत्यंत सुलक्षणी आहेत; मला वाटतें हें मदनाचें स्थान आहे, ह्यांना हें कन्यारत्न द्यावें; परंतु मी दुष्ट पण केला आहे किं, या त्र्यंबकधनुष्याला जो गुण लावील त्यालाच सीतारत्न द्यावयाचें. जर या पणाला सोडून ही सीता रामाला दिली तर हे सर्व राजे मला हांसतील; परंतु हे कोणाचे कोण, आणि येथें कसे आले, तें मला सांगा.' त्या वेळीं विश्वामित्र ह्मणाले; " सूर्यवंशी राजा दशरथाचा हा पुत्र राम व दुसरा लक्ष्मण होय. " तें विश्वामित्राचें भाषण ऐकून जनकानें रामाला व लक्ष्मणाला आलिंगन दिलें, व पूजा केली. मग विश्वामित्र मुनि म्हणाले; "हे राजा ! तुझें धनुष्य पाहण्याकरितां उत्कंठित होऊन श्रीरामचंद्र आला आहे." त्यावेळीं जनक म्हणाला; "ज्या वेळीं वीरभद्रानें यज्ञांत दक्षाचा वध केला, त्या वेळीं हें त्र्यंबक धनुष्य शंकरांनीं धारण केलें होतें. शंकराशिवाय याला कोणीही धारण करूं शकत नाहीं. निमी म्हणून आमचा-

पूर्वज होता, त्यानें शंकराची सेवा केली त्याबद्दल शंकरांनीं त्याला हें बक्षिस दिलें. या धनुष्याला एक महादेवाशिवाय दुसरा कोणताही राजा उचलावयाला समर्थ नाहीं. याकरितां हें पेटींत पडून राहिलें आहे. ह्याची बारा महिन्यांनीं एकदां पूजा होते. त्या वेळीं नऊशें टोणगे लावून हें सभेंत आणितों. असें हें धनुष्य देवांनां व मनुष्यानां न हालणारें आहे, परंतु एके वेळीं तें धनुष्य पूजेकरितां आणिलें होतें, त्या वेळीं सीतेनें बालपणच्या स्वभावाप्रमाणें तें धनुष्य त्या पेटींतून काढून त्याचा घोडा केला, व ती अगदीं लीलेनें तो इकडे तिकडे फिरवूं लागली. तो चमत्कार पाहून आम्हां सर्वांनां फार आश्चर्य वाटलें, व आम्ही त्याच वेळीं असा निश्चय केला किं, जो कोणी हें धनुष्य उचलील, त्यालाच जानकी अर्पण करावयाची. हे विश्वामित्र मुने! याप्रमाणें त्या धनुष्याचा इतिहास असून अशा प्रकारचा मी पण केलेला आहे. तेव्हां पुढें कसें करावें तें आपणच सुचवा." जनक राजाचें तें बोलणें ऐकून विश्वामित्र म्हणाले; "राजा! तूं त्या संबंधानें मुळींच काळजी करूं नकोस. तुला आपला पण बदलण्याचें कांहींच कारण नाहीं. स्वयंवराचे दिवशीं तें तुझें त्र्यंबक धनुष्य श्रीरामचंद्रच उचलील."

नंतर ठरविलेला स्वयंवराचा दिवस लवकरच आला, त्या दिवशीं देशोदेशींचे अनेक राजे महाराजे जानकीच्या प्राप्तीसाठीं स्वयंवराला आले होते. लंकेचा राजा रावण हाही जानकीची लालसा मनांत बाळगून मिथिलेला आला होता. समारंभाचे वेळीं सर्व आपआपल्या आसनावर येऊन बसल्यावर त प्रचंड धनुष्य जनकानें नऊशें टोणग्यांकडून स्वयंवर मंडपांत आणून ठेविलें. माडीवर स्त्रिया बसल्या होत्या, त्यांत जानकीही बसली होती. तिनें श्रीरामचंद्रास अगोदरच पाहिलें होतें. त्या अत्यंत सुंदर श्रीरामचंद्रानें आपणास वरावें अशी तिची इच्छा होती, परंतु तें प्रचंड धनुष्य मंडपांत आल्याबरोबर जानकीचें धैर्य खचलें. हें विलक्षण जड धनुष्य श्रीरामचंद्रास उचलणार नाहीं, असें वाटून ती अत्यंत निराश झाली. तें धनुष्य नसून शत्रूच आहे असें तिला वाटूं लागलें. तिनें तें धनुष्य रामाला उचलण्यास सोपें जावें, ह्मणून शंकराची कळकळीनें प्रार्थना केली. मंडपांत तें भयंकर धनुष्य आल्याबरोबर कित्येक राजे जागच्या जागींच थंड झाले. उचलण्यासाठीं कोणीही उठेना. तेव्हां लंकेचा राजा रावण हा उठून त्या धनुष्याजवळ आला, व तो तें धनुष्य उचलण्याचा प्रयत्न करूं लागला. त्यानें तें धनुष्य हातांत मोठ्या कष्टानें तोलून धरून वर उचलूं लागला. तो प्रकार पाहून जानकीची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. या रावणानें धनुष्य उचलल्यास पणाप्रमाणें आपणास याच्या गळ्यांत माळ घालावी लागेल, या विचारानें ती मोठ्या काळजींत पडली, मग तिनें शंकराची प्रार्थना करून त्यास तें संकट निवारण करण्यास सांगितलें.

तेव्हां शंकरांनीं आपला भार त्या धनुष्यावर घातला. अशा रीतीनें एकदम धनुष्य जड झाल्यामुळें रावणाला त्याचा भार सहन न होऊन तो खालीं पडला व त्याच्या अंगावर तें प्रचंड धनुष्य पडलें. त्या धनुष्याच्या भारानें त्याची फार त्रेधा उडाली, व ती त्याची झालेली फजीती पाहून मंडपांतील सर्व लोक हसूं लागले. छातीवर पडलेलें तें धनुष्य दूर करून उठण्याचा प्रयत्न रावण आपली सर्व शक्ति खर्च करून करीत होता, पण त्याला तें धनुष्य दूर करून मुळींच उठतां येईना. धनुष्यभारानें त्याचा प्राण अगदीं कासावीस झाला. कोणाला साह्याला बोलावून प्राण वांचवावा, तर तसें करण्यास त्यास शरम वाटूं लागली. अशा अडचणींत तो सांपडल्यावर विश्वामित्रानें रामाला उठण्याविषयीं खूण केली. त्या बरोबर श्रीरामचंद्र उठून त्यानें विश्वामित्राला वंदन केलें, व रावणाजवळ जाऊन त्यानें त्याच्या अंगावरील धनुष्य सहज लीलेनें उचलून त्याची त्या संकटांतून सुटका केली. मग श्रीरामचंद्रानें त्या धनुष्याला वंदन केलें, व तें सज्ज करून त्याला बाण लावणार इतक्यांत तें धनुष्य मोडून त्याचे दोन तुकडे झाले. तें धनुष्य रामानें मोडल्याबरोबर मंडपांत सर्वत्र जयध्वनि झाला; व जनक, जानकी, विश्वामित्र वगैरे सर्वांनां अत्यंत आनंद झाला. देवांनींहि आदिमाया जानकी व प्रभु श्रीरामचंद्र यांचा योग अशा रीतीनें घडून आला, ह्मणून आकाशांतून रामावर पुष्पवृष्टि केली. विशेषतः जानकीला त्या वेळीं जो आनंद झाला होता, त्याचें वर्णनहि करणें अशक्य होय. सूर्योदय प्रसंगीं सरोवरांतील कमलिनीला जसा आनंद होतो. किंवा चंद्राच्या आगमनानें रोहिणीला जसा हर्ष वाटतो, त्याप्रमाणें जानकीच्या हृदयांतील हर्षसागराला भरती आली होती. धनुष्याचा भंग झाल्याबरोबर जनकानें जानकीच्या हातांत पुष्पांची माळ दिली व ती श्रीरामचंद्राच्या गळ्यांत घालण्यास सांगितलें. त्या प्रमाणें ती सौंदर्यलतिका हातांत पुष्पमाला धारण करून मंद मंद पावलें टाकित मंडपांत आली, व तिनें श्रीरामचंद्राच्या गळ्यांत माळ घातली. तो प्रकार पाहून सदाचरणी राजांना मोठा आनंद झाला. अहंकारी जे होते त्यांनां लज्जा उत्पन्न झाली, व दुष्ट होते त्यांच्या मनांत राग उत्पन्न झाला. या प्रमाणें स्वयंवर झाल्यावर जनक राजानें यथाविधी लग्न करण्याचें ठरविलें, व त्या प्रमाणें त्यानें तयारी चालविली.

## ६ श्रीरामचंद्राला जानकीची प्राप्ति.

लग्नाचा समारंभ अपूर्व असा करण्यासाठीं जनक राजाचे सेवक सारखा प्रयत्न करीत होते. जनक राजानें आलेल्या सर्व राजांनां लग्नसमारंभासाठीं ठेवून घेतलें व जे राजे आले नव्हते, त्यांनां लग्नाच्या कुंकुमपत्रिका पाठवून बोलाविलें. दशरथराजाकडे तर रथ, प्रधान वगैरे पाठवून त्यांना बोलाविलें. त्याप्रमाणें दशरथ राजा, भरत, शत्रुघ्न व आपल्या पत्न्या, कुलगुरु वसिष्ठ मुनि व

नागरिकजन, अशा सहपरिवारानें मिथिला नगरीला आला. त्या वेळीं राजानें त्याचा मोठा जयजयकार करून त्याला नगरांत मिरवित आणिलें. तसेंच गौड, मलबार, गांधार, बेगाळ, कालिंग, कांभोज, कुंतल, हिमालय, अंग, वंग, चीन, भाट, माळवा, कन्होज, महाराष्ट्र, तैलंगण, गंगातट वगैरे अनेक देशांतले राजे त्या लग्नसमारंभासाठीं आले होते. तसेंच विद्वान् ब्राह्मण, सर्व शास्त्रविद्या कोविद असे ऋषी यांनाहि जनकानें बोलाविलें होतें. तो ऋषीब्राह्मणांचा समुदाय अठ्यायशीं हजार होता. त्या वेळीं ती मिथिला नगरी वसंत ऋतूंत फुललेल्या उद्यानाप्रमाणें बहुजनसमूहानें प्रफुल्ल दिसत होती. रामलक्ष्मणास दशरथानें मोठ्या संकटानें आपणापासून दूर केलें होतें, व त्याला त्या संबंधानें रात्रंदिवस काळजी लागली होती. परंतु अशा रीतीनें परस्परांची भेट झाल्यामुळें फार आनंद झाला. शत्रुघ्न व भरत, रामलक्ष्मणाला कडकडून भेटले, व कौसल्या, सुमित्रा आणि कैकेयी यांनीं त्यांना कुरवाळिलें. मिथिला नगरांतील लोकांना त्या वेळीं अत्यंत आनंद झाला होता. त्यांनीं आपआपलीं घरें फार कुशलतेनें शृंगारून घरापुढील रस्ता सडासंमार्जन करून व त्यावर रांगोळ्या वगैरे काढून अत्यंत सुशोभित केला होता. अशा रीतीनें सर्व शहर शृंगारल्यामुळें तो समारंभ पाहून डोळ्यांचें सार्थक झालें असें वाटे. लग्नमंडपांत जी कांहीं आरास व रोषणाई केली होती, ती पाहून देवेंद्रास आपल्या अमरावतीचें विस्मरण व्हावें अशी ती अपूर्व होती. सीतारामाचा विवाह होऊन त्यांस बोहल्यावर आणून बसविल्यानंतर जनकानें आपली स्वतःची मुलगी मांडवी या नावाची होती, ती भरताला दिली, व आपला भाऊ कुशध्वज याच्या श्रुतकीर्ति आणि उर्मिळा अशा दोन मुली होत्या, त्या पैकीं ऊर्मिळा लक्ष्मणाला दिली व श्रुतकीर्ति शत्रुघ्नाला दिली. याप्रमाणें चौघांचें चार कन्यांबरोबर जनक राजानें मोठ्या समारंभानें लग्नें लाविलीं. त्या लग्नसोहाळ्याचें वर्णन करण्यास कोण समर्थ आहे ? देवांनाहि दुर्लभ अशीं नानाप्रकारचीं पक्वान्नें अत्यंत दीन दरिद्रीहि कित्येक दिवसपर्यंत खात होते. जनकानें चांगलीं वस्त्रें सर्वांनां व द्रव्य देऊन संतुष्ट केलें. त्या प्रमाणें ब्राह्मण व ऋषी यांचाहि योग्य असा सत्कार केला. लहान थोर सर्व राजांना वस्त्रें अलंकार वगैरे देऊन त्यांचा योग्य सन्मान केला. त्याप्रमाणें त्या वेळीं वधुवरानांहि ब्राह्मणांचे आशीर्वाद, गरीबांचा दुवा, व राजेरजवाड्यांच्या अनेक देणग्या मिळाल्या. यथासांग लग्नसोहळा पुरा झाल्यावर दशरथानें जनकाचा निरोप घेतला, व आपले चार पुत्र, त्यांच्या स्त्रिया, आपल्या स्त्रिया, प्रधान, सैन्य, रथ वगैरे आपला सर्व परिवार बरोबर घेऊन तो अयोध्येस येण्यास निघाला. ज्या विश्वामित्र ऋषींच्या कृपाप्रसादानें श्रीरामचंद्र वगैरे मुलांचा एवढा जयजयकार झाला, त्या ऋषींनाहि त्यानें आपणाबरोबर घेतलें होतें. कुलगुरु वसिष्ठ हेहि बरोबर होतेच.

या सर्व मंडळीसह दशरथराजा मार्ग क्रमित असतां मार्गांत श्रीरामचंद्राची व परशुरामाची भेट झाली. लग्नमंडपांत रामानें जेव्हां शिवधनुष्याचा भंग केला होता, तेव्हां तो नाद दशदिशांत पसरला होता. सहस्र विजांचा कडकडाट एकदम व्हावा, त्याप्रमाणें तो भयंकर नाद ऐकून सर्व लोक भयभीत झाले होते; तो आवाज ऐकून परशुरामानें त्र्यंबक धनुष्य कोणीतरी मोडिलें असें लागलेंच ओळखिलें. तें अवाढव्य धनुष्य मोडणारा वीर कोणीतरी क्षत्रियच असला पाहिजे, असें परशुरामानें तेव्हांच जाणिलें, व तो क्षत्रिय आपण निःक्षत्रिय केलेल्या पृथ्वीवर कोठून आला, याचा शोध करूं लागला. ज्यानें त्र्यंबक धनुष्य मोडिलें, तो वीर खरोखर धन्य असला पाहिजे. तेव्हां आपण आपली शक्ति त्याला देऊन त्याच्याजवळून शांति घ्यावी व अवताराची समाप्ति करावी, असा विचार करून परशुराम मार्ग क्रमित असतां मार्गांत त्याची व श्रीरामचंद्राची भेट झाली. भार्गवरामास पाहिल्याबरोबर वशिष्ठ ऋषि व विश्वामित्र ऋषि रथांतून खालीं उतरले, व परशुरामाला वंदन करून ह्मणाले; " हे पितृभक्ता ! उदार पुरुषा ! भार्गवरामा ! हे करुणाकरा ! हे दीनवत्सला ! हे परशुधरा ! तुझी शक्ति अगम्य आहे. आह्मीं तुला शरण आहोंत, आह्मांवर अशीच कृपा असूं दे" मग परशुराम वसिष्ठाला ह्मणाला, " अहो वेदमूर्ति, तुह्मांबरोबर हा जो सुरम्य सुंदर कुमार आहे, तो कोण, तें मला कथन करा." तेव्हां वसिष्ठ ऋषि ह्मणाले; " भार्गवरामा ! या कुमाराचें नांव श्रीरामचंद्र असें असून हा या दशरथाचा पुत्र आहे. जनक राजाची मुलगी जानकी, शिवधनुष्याचा भंग करून यानें मिळविली आहे. " परशुरामाची ती तेजःपुंज व प्रशांतमूर्ति, ते सतेज डोळे, तो मस्तकावरील चिक्कण केशांचा जटाभार, अंगावरील भस्माचे पुंड्र, कंठांतील रुद्राक्षमाळा, काखेंत सहज रुळत असलेलें वैष्णव धनुष्य, हातांतील परशु, हीं पाहिल्यावर श्रीरामचंद्राचे मनांत परशुरामाविषयीं पूज्य बुद्धि उत्पन्न झाली, व त्यानें परशुरामास वंदन केलें. तेव्हां परशुरामानेंहि रामास नमस्कार केला व तो त्याला ह्मणाला, " रामचंद्रा ! हें वैष्णव धनुष्य ब्रह्मदेवानें त्रिपुरासुराचा नाश करण्यासाठीं महादेवाला दिलें होतें. तें महादेवानें प्रसन्न होऊन मला दिलें आहे, हें वागविण्याची जर तुला शक्ति असेल तर हें घेऊन याचा गुण चढवून दाखीव, ह्मणजे या धनुष्याचा तुला फार उपयोग होत जाईल. या धनुष्यानें मी सहस्रार्जुनाचा वंश छेदन केला आहे. हें धनुष्य तूं वागविल्यास मी तुला द्वंद्व युद्धाचा मंत्र देईन, आणि जर हें धनुष्य तूं वागविण्यास समर्थ नसशील, तर मी तुला अयोध्येस जाऊं देणार नाहीं, तुला मजबरोबर युद्ध करावयाला लावीन." हें परशुरामाचें बोलणें ऐकून श्रीरामचंद्र ह्मणाला; " हे परशुरामा ! तूं प्रत्यक्ष वेदमूर्ति आहेस, तुज बरोबर युद्ध करणें हें मला शोभणारें नसून त्यानें आपल्या कीर्तीतहि कांहीं भर पडणार नाहीं, तथापि आपली आज्ञा शिरसावंद्य करणें

हेंहि माझें कर्तव्य आहे. ह्मणून मी आपल्या वैष्णव धनुष्याला गुण चढवून दाख-वितों." असें ह्मणून रामानें आपल्या हातांत धनुष्य घेतलें. तें सज्ज करून व आकर्ण ओढून त्याला बाण लाविला. तेव्हां परशुराम रामाला—' शाबास शाबास '—असें ह्मणाला; परंतु तिकडे लक्ष न देतां श्रीरामचंद्र ह्मणाला; " भार्गवा! आतां हा लाविलेला बाण मी परत घेणार नाहीं, व तो मी निरर्थक सोडणार नाहीं, एक तुजवर सोडीन किंवा तुझा स्वर्गमार्ग मोडून टाकीन, यापैकीं काय करूं तें सांग" तेव्हां भार्गवानें आपला स्वर्गपंथ मोडून टाकण्यास सांगितलें. त्याप्रमाणें रामानें बाण सोडल्याबरोबर परशुरामाचा स्वर्गमार्ग खुंटला व तो बाण यमाकडे जाऊन पोहोंचला. तेव्हां परशुराम रामाला ह्मणाला; " रामचंद्रा! तुझ्या या अवतार मूर्तीची प्रचीती पाहण्यासाठींच मी तुजकडे आलों होतों. तुझा हा विलक्षण पराक्रम पाहून मी अत्यंत प्रसन्न झालों आहे. मी हें धनुष्य तुला दिलेंच आहे. तूं मला आलिंगन दे, ह्मणजे मी आपल्या शरिरांतील तेज व शक्ति हीं तुला देतों. त्याप्रमाणें श्रीरामचंद्रानें भार्गवरामाला आलिंगन दिल्यावर परशुरामाचे मुखांतून एक ज्योती निघाली व ती रामाचे मुखांत गेली; त्याप्रमाणें शरीरांतील शक्तीहि रामाचे शरीरांत प्रविष्ट झाली. अशा रीतीनें परशुरामानें रामचंद्राचा गौरव करून तो आपल्या स्थानाप्रत निघून गेला. नंतर दशरथ राजा सर्व परिवारासह अयो-ध्येस आला, व त्यानें सुमुहूर्तावर नगरांत प्रवेश केला. राजा आपल्या पुत्रांचीं लग्नें करून निर्विघ्नपणें अयोध्येस परत आलेला पाहून नगरांतील लोकांस आनंदाचें भरतें आलें होतें. त्या वेळीं लोकांनीं नगर शृंगारण्याकरितां द्रव्याचा व्यय व श्रम याकडे मुळींच पाहिलें नाहीं. सागराला पाहून नदीला जसा हर्ष होतो, किंवा पतीला पाहून स्त्रियेला जसा आनंद वाटतो, अथवा वसंताच्या आगमनानें वनश्री जशी टवटवीत होते, त्याप्रमाणें श्रीरामचंद्राच्या आगमनामुळें अयोध्या नगरी हर्षातिभरानें डोलूं लागल्याप्रमाणें दिसूं लागली. घरांपुढें केळीचे स्तंभ बांधिले होते, मखरें घातलीं होतीं, रस्ते सडासंमार्जन करून रंगवल्ल्यांनीं रंगविले होते, ठिकठिकाणीं तोरणें व पताका उभारल्या होत्या, दिव्याच्या पंक्तीच्या पंक्ति लावून सर्व शहर प्रकाशित केलें होतें, स्त्रिया माडीवर पंचारती घेऊन उभ्या होत्या, पुष्पवृष्टी करण्यासाठीं ठिकठिकाणीं फुलांचे ढीग घालून ठेविले होते, अशा त्या रम्य नगरीमध्यें पुढें अनेक प्रकारचे वाजंत्री आपआपलीं वाद्यें मनोहर व उंच स्वरानें वाजवित आहेत, त्या मागून भाट व बंदीजन स्तुति करित आहेत, त्यांच्या मागें सुंदर कलावंतिणी अनेक रागांत आलापदार गातगात चालल्या आहेत, त्यांच्या मागें अनेक प्रधान, सेनापति, दरकदार वगैरे मानकरी चालले आहेत, त्यांच्या मागें ब्राह्मण व ऋषि वेदमंत्रांचा घोष करीत चालले आहेत, अशा मोठ्या थाटानें दशरथानें नगरांत प्रवेश केला. प्रथम घोड्याचा रिसाला नगरांत शिरला, सुंदर व उमदे घोडे, त्यांतून त्यांनां वस्त्रालं-

कारांनीं सुशोभित केल्यामुळें व त्यांच्यावरील तरुण व शूर घोडेस्वारांमुळें, तो देखावा नेत्रांनां मोठा मनोहर दिसत होता. घोड्यांच्या मागून रंगविलेले हत्ती चालले होते, त्यांच्या मागें दशरथाचा रथ होता, त्या रथाच्या मागच्या रथांत सीता व राम उभयतां बसले होते. व या क्रमानेंच उर्मिळा व लक्ष्मण, मांडवी व भरत आणि श्रुतकीर्ति व शत्रुघ्न यांचे रथ होते. सर्वांच्या मागें एका रथांत राण्या होत्या, दशरथाचा रथ नगरांत गेल्याबरोबर लोकांनीं त्याचा मोठा जयजयकार केला. त्या मागून श्रीरामाचा रथ नगरांत आल्याबरोबर तर जयजयकारानें आकाश दुमदुमून गेलें. रथावर सारखी पुष्पवृष्टी होत होती. गुलालानें दश दिशा धुंद होऊन गेल्या, स्त्रिया उंच उंच माडीवरच्या दारांतून श्रीरामचंद्राची ती रम्यमूर्ति पाहत होत्या. अशा विलक्षण थाटानें ती भव्य मिरवणूक राजवाड्यांत येऊन पोहोंचली. तो उत्सव पाहून गंधर्व किन्नरांनींहि तोंडांत बोटें घातलीं. स्वर्गांतील देवांनाहि त्या अपूर्व समारंभाबद्दल हेवा वाटला. अशा त्या अभूतपूर्व उत्सवाचें वर्णन करणें, हें मानवी लेखणीच्या शक्तीच्या बाहेरचें कार्य होय.

---

## अध्याय ८ वा.

### १ दक्षाचें शंकराशीं वर्तन.

श्रीरामचंद्राची ती सुरस कथा श्रवण करीत असतां जनमेजय राजाला मध्यंतरीं शंकरानें ज्या धनुष्याचा उपयोग करून दक्षप्रजापतीचा नाश केला होता, त्या धनुष्याची हकीकत ऐकून त्याला दक्षप्रजापतीचा इतिहास जाणण्याची इच्छा झाली, व त्यानें ती कथा सांगण्याविषयीं वैशंपायन ऋषीला विनंति केली, तेव्हां वैशंपायन म्हणाले; "राजा! दक्ष हा ब्रह्मदेवाचा पुत्र होय. त्याची ब्रह्मदेवाचे आंगठ्यापासून उत्पत्ति झाली आहे. त्या दक्षप्रजापतीला साठ मुली होत्या, त्यानें त्यापैकीं सत्तावीस चंद्राला, तेरा कश्यपऋषीला, दोन अग्नीला, दहा यमाला व तीन वरुणाला आणि वायव्य कोनांतल्या वायूला एक दिली होती, दोन नैऋत्य कोनांतल्या वायूला दिल्या होत्या, एक इंद्राला दिली होती, आणि एक दाक्षायणी नावाची होती ती त्यानें महादेवाला दिली होती, आणि त्यामुळें त्यांच्यांत सासरा जांवई असा नात्याचा संबंध आला होता. शंकर म्हणजे साक्षात ईश्वर, त्यांच्याशीं अशाप्रकारचा संबंध घडून आला होता, याबद्दल दक्षानें आपणास भाग्यवान समजावयाला पाहिजे होतें, पण तो हतबुद्धि दक्ष, शंकराशीं विरोध करीत असे, व त्याचा नाश करण्याचाहि त्याचा प्रयत्न चालला होता. श्रीशंकराच्या 'कर्तुमकर्तुम्' शक्तीचा कांहीं एक विचार न

करितां त्याच्याशीं वैर जोडून घेणें हा अत्यंत मूर्खपणा होय. पतंग दिव्यावर उडी मारून जसा दिव्याला न विझवितां स्वतःलाच मारून घेतो; किंवा मासा भक्ष्य म्हणून जसा गळाला चिकटतो, त्याप्रमाणें तो दक्ष शंकराशीं वैर करीत होता. या दोघांमध्यें वैर उत्पन्न होण्याचें कारण असें झालें कीं, एकदां देवांनीं पृथ्वीवर प्रयागाजवळ जान्हवीचें कांठीं यागाला आरंभ केला होता. त्या यज्ञासाठीं इंद्र, यम, वरुण, ब्रह्म, चंद्र, शंकर, अश्विनीदेव, मारुत, अग्नि, वगैरे एक श्रीहरीवांचून सर्व देव आले होते. यज्ञसमारंभासाठीं ऋषि, योगी, राजे, गणगंधर्व, यक्ष, किन्नर वगैरे अनेक लोक होते. नंतर त्या यज्ञमंडपांत दक्षप्रजापति आला, तो आल्याबरोबर त्याच्या सन्मानासाठीं सर्व देव, राजे, ऋषि, यक्ष, किन्नर, वगैरे उभे राहिले, परंतु ब्रह्मदेव व महादेव आपापल्या आसनावरून किंचित् मात्रहि उठले नाहींत. तो प्रकार पाहून दक्षाला या दोघांनीं आपला मोठा अपमान केला, असें वाटलें, व तो त्यांतल्यात्यांत महादेवावर विशेष रागावला. तो क्रुद्ध स्वरानें मोठ्यानें गर्जना करून म्हणाला; "अहो देवहो! हे दोघे पहा किती उन्मत्त झाले आहेत, माझा मान राखण्यासाठीं यांनां नुसतें उभेंहि राहवत नाहीं काय, ब्रह्मदेव उठले नाहीं तर त्यांची गोष्ट निराळी आहे, ते माझे वडील आहेत, पण हा महादेव लोकपाळांतील असून त्यानें मी आल्याबरोबर उठून मला विनीत मस्तकानें प्रणाम करावयास पाहिजे. हा माझा शिष्य असून शिवाय मी याला आपली मुलगी देऊन गृहस्थ केलें आहे; असें असून हा माझ्याशीं किती उन्मत्तपणानें वागत आहे, तें तुम्हीं पहातच आहां. याला ईश्वर, ईश्वर, म्हणून याचें तुम्हीं देवांनीं माहात्म्य वाढविलें आहे. पण याच्या अंगीं तर तशी कांहींच योग्यता नाहीं. यास पुत्र नसून हा आपल्या स्त्रियानां भोगहि देत नाहीं. हा कपटी असून याचें आचरण पिशाचाप्रमाणें आहे. यानें ब्रह्महत्या केलेली असल्यामुळें हा शुद्धही नाहीं, स्नान संध्या करून शुचिर्भूतहि राहत नाहीं; पैसाअडका नसल्यामुळें दानशीलताही याच्या अंगीं नाहीं, हातांत तें नरकपाल नेहमीं असून त्या बैलावर याची मोठी प्रीति; अशा या विलक्षण पुरुषाला मी आपली मुलगी देऊन मोठी चूक केली असें मला वाटतें. शूद्राला जशी श्रुती द्यावी, किंवा चांडाळाला सरस्वती द्यावी, अथवा कृपणाला संपत्ती द्यावी, त्याप्रमाणें मी दाक्षायणी महादेवाला अर्पण करून बसलों आहें. ही त्या दक्षाची क्रुद्धपणांतील बडबड ऐकून महादेवांना फार राग आला व त्यांनीं दक्षाला शाप देण्यासाठीं हातांत पाणी घेतलें. तेव्हां सर्व देवांनां वाटलें कीं, शंकर आतां दक्षाला भस्म करून टाकतील. मग सर्व देवांनीं महादेवांची तसें न करण्याविषयीं प्रार्थना केली, मग महादेवांनीं ती प्रार्थना कबूल करून शाप दिला नाहीं, पण दक्षानें हातांत पाणी घेतलें व तो म्हणाला, जर तुम्हीं हा याग रुद्राला घेऊन कराल, तर तो निष्फळ होईल. याप्रमाणें दक्षानें

शाप दिल्यावर सर्व देव कष्टी झाले. व त्यांनां दक्षाचा फार राग आला आणि कित्येकांना शंकराचा तो अपमान पाहून समाधानहि झालें, परंतु महादेवाला त्याबद्दल कांहींच वाटलें नाहीं. उलट दक्षाच्या त्या वेडपणाच्या वल्गना ऐकून त्यांनां हंसूं येऊं लागलें.

## २ नंदीचा शाप.

थोर प्रकृतीची जीं माणसें असतात त्यांना मूर्ख लोकांनीं केलेल्या निंदेबद्दल कांहीं विषाद वाटत नाहीं; तीं स्वस्थ असतात, त्याप्रमाणें महादेवहि स्वस्थ होते; परंतु नंदीस आपल्या मालकाचा अपमान सहन झाला नाहीं. तो अत्यंत क्रुद्ध झाला व शाप वर्णनानें म्हणाला. "दक्षा ! तूं शंकरांनां निष्कारण शाप दिलास, म्हणून तुला असा शाप देतों किं, तुझें हें मस्तक नाहींसें होऊन शिवनिंदा केलीस, यास्तव तेथें बोकडाचें मस्तक निर्माण होईल, तसेंच भृगुऋषि ! तूं ही निंदा ऐकून हांसलास ! म्हणून तुझ्या मिशा जळून जातील; आणि जे जे ब्राह्मण शंकराला हांसले असतील, त्यांना भिक्षा मागून निर्वाह करावा लागेल. त्यांनीं वेद पुराणांचें कितीहि पठण केलें, तरी ते शापमुक्त होणार नाहींत. ते विषयलंपट होतील, चतुर्वर्णापेक्षांहि त्यांचें आचरण निंद्य होईल, व त्यांची याचक वृत्ति दूर होणार नाहीं. जन्मोजन्मीं त्यानीं भीकच मागितली पाहिजे." नंदीनें असा शाप दिल्यावर भृगुऋषीला राग आला, व त्यानें नंदीला परत शाप दिला किं, "तुझा वंश नपुंसक असा निर्माण होईल; आणि जे या शंकराचे सेवक होतील, ते पाखंडी व मूर्ख होतील. त्यांना नेहमीं प्रवासाचें दुःख भोगावें लागेल, त्यांचा आचार निर्मळ राहणार नाहीं, ते देव व ब्राह्मण यांचा मान ठेवणार नाहींत, व ते सुरापानी व पशुघातकी होतील." तेव्हां नंदी पुन्हां रागानें म्हणाला; "अरे! तूंच आपल्या डोळ्यानें दक्षाला खुणविलेंस, व त्याच्याकडून शिवाची निंदा करविलीस, तर तुझे डोळे नाहींसें होतील. तसेंच, जे विप्र हांसले आहेत त्यांचें दांत पडून जातील. हे दक्ष प्रजापते ! तुला आपल्या उन्मत्तपणाची शिक्षा लवकरच मिळेल. कपटभ्रष्टा ! तूं नीलकंठाला दुखवून आपणावर निष्कारण संकट ओढवून घेतलें आहेस. यज्ञांत शंकराला भाग दिल्यावांचून कोण यज्ञ करतो, तें पहाण्यांत येईल; अरे! जो अनादी, परात्पर, असा असून ज्याचा पार ब्रह्मदेवांसारख्यांनांही लागत नाहीं, त्याच्याशीं वैर जोडून घेणें, हा तुझा मूर्खपणा होय. मुंगीला मरण आलें म्हणजे तिला जसे पांख फुटून ती उडूं लागते, त्या प्रमाणें तुझा हा उन्मत्तपणा होय." असें बोलून नंदी यज्ञमंडपाचे बाहेर पडला, व महादेवाची वाट पाहूं लागला. इतक्यांत महादेवही यज्ञमंडपांतून उठून बाहेर आले व नंदीवर बसून कैलासास निघून गेले.

## ३ यज्ञाची मौज.

महादेव तेथून उठल्याबरोबर सर्व देवही तेथून उठले व आपआपल्या स्थानाप्रत निघून गेले. तो याग तसाच राहिला. दक्ष प्रजापतीला असें वाटलें होतें कि, महादेव गेले तरी याग होईल, परंतु महादेव उठल्याबरोबर सर्व देवही यागकार्य सोडून गेले, असें पाहून त्याला फार वाईट वाटलें व तोही मनांतल्या मनांत चडफडत निघून गेला. त्यानंतर एक हजार वर्षें पर्यंत कोणी यज्ञयागादिक कृत्यें केलीं नाहींत. पुढें एकेवेळीं नारद फिरत फिरत दक्षाकडे आले. तेव्हां दक्षानें त्यांचा योग्य असा गौरव करून त्यांना सिंहासनावर बसविलें, त्यांची षोडशोपचारें पूजा केली, आणि त्यांचे पाय वंदन करून ह्मणाला, "नारदमुने! ज्या पुरुषाला पुत्र नाहीं, त्याचें जिणें व्यर्थ होय. पुत्रावांचून सर्व गृहसंसार अपवित्रच आहे, असें मला वाटतें. मला साठ मुली झाल्या, परंतु पुत्र एकही नसल्यामुळें मनाला अत्यंत उद्विग्नता आली आहे. स्त्रियांनीं आपल्या अंगावर कितीही दागिने घातले, तरी मंगलसूत्रावांचून जशी शोभा नाहीं, त्याप्रमाणें जरी मला साठ मुली आहेत, तरी एक मुलगा नसल्यामुळें मी व माझी स्त्री अमंगळच आहोंत. तरी नारदमुने, आम्हांला पुत्र होईल असा कांहींतरी उपाय सांगा," तेव्हां नारद ह्मणाला. "राजा! पुत्रप्राप्तीला यज्ञावांचून अन्य कांहीं मार्ग नाहीं. तूं सर्व कांहीं जाणतो आहेसच, तेव्हां तूं योग्य अशा पद्धतीनें यज्ञ केल्यास सहज पुत्रप्राप्ति होईल. हे दक्षा! हें राज्य, हाच एक प्रकारचा नरक आहे. याच्या पापक्षोभानें पुण्यनाहींसें होतें, ह्मणून राज्य करणारावर अत्यंत जबाबदारी आहे. ज्यानें धर्माप्रमाणें वागून राज्य केलें असेल, तोच हा नरक चुकवील. जो अधर्मानें वागून राज्य चालवितो, त्याचे प्राक्तनीं अधोगति ही हटकून लिहिलेली आहे. जो उन्मत्तपणानें हरिहरांची पूजा करीत नाहीं, एकादशी सोमवार वगैरे व्रतें करीत नाहीं; जो कधीं कोणावर उपकार करीत नाहीं; कधीं तप करीत नाहीं; कधीं दान करीत नाहीं; त्याला नरक हा हटकून आहे. त्यांतून राजानें तर विशेष सदाचारानें राहिलें पाहिजे. कारण राजाला पदोपदीं पाप मार्गानें जाण्याचा प्रसंग येतो; करितां त्यानें मनाचा निग्रह कायम ठेवून पुण्य मार्गानेंच जावयाचें असा निश्चय ठेवावा; आणि पापक्षालनासाठीं वारंवार सत्कृत्यें करीत असावें. कित्येक राजांना शिकारीचें व्यसन असतें, परंतु निष्कारण पशुवध करणें हा नरकच होय. परस्त्रियेशीं गमन करणें, दुसऱ्याचे द्रव्यावर नजर ठेवणें प्रजेंतील कित्येक लोकांवर निष्कारण आरोप ठेवणें, त्यांचा अपमान करणें, त्यांचें द्रव्य हिरावून घेणें, अल्पकारणासाठींही सर्व प्रजेवर असंतुष्ट होऊन त्यांचा छळ करणें, सुंदर स्त्रियेचा अभिलाष धरणें, विश्वासघात करणें, वडिलांनीं दिलेलीं व स्वतः दिलेलीं वचनें मोडणें, अनेक स्त्रिया करून त्यांच्यावर कमी-

अधिक प्रीति करणें, हीं सर्व नरकाची सामग्री आहे. एवढ्यासाठीं नीतिमार्गानें चालून राजानें नेहमीं पुण्यकर्मे करीत असावें. प्रजेचें पुत्राप्रमाणें पालन करावें, प्रजेचें द्रव्याहरणाची इच्छा बाळगूं नये. साधुसंतांचा गौरव करीत जावा, शरण आलेल्या शत्रूचा छळ करूं नये. याप्रमाणें राज्यकारभार केल्यास तो या नरकाला सहज चुकवील. तेव्हां हे दक्षराजा! तूं नीतिनें वागून पुत्रप्राप्तीसाठीं यज्ञ कर, म्हणजे तुझी मनोवांच्छा तेव्हांच पूर्ण होईल. पृथ्वीवर क्षिप्रा नदीचे कांठीं बृहस्पती या नांवांची एक नगरी आहे, तेथें जवळच नैमिषारण्य आहे, त्या अरण्यांत बृहस्पतीनें यज्ञ केला होता, तेव्हां त्याला प्रत्यक्ष भगवान शेषशायी नारायण येऊन भेटले होते. ती नगरी उत्तानपादाची असून, अत्यंत विस्तृत व पवित्र अशी आहे, तेव्हां तूंही त्याच ठिकाणीं जाऊन यज्ञ कर." नारदानें असें सांगितल्यावर दक्षानें त्यांस सत्कारानें निरोप दिला, व आपण यज्ञाचे तयारीला लागला. क्षिप्रानदीचे कांठीं मंडप वगैरे घालून यज्ञाची तयारी केली; परंतु, दक्षाला अशी शंका आली किं, यज्ञांत आपआपले भाग घेण्यासाठीं ब्रह्मा, विष्णु व शंकर हे येणार नाहींत, आणि ते न आल्यास यज्ञ पुरा होणार नाहीं, तेव्हां यज्ञाची सांगता कशी करावी, या विचारांत तो दक्ष प्रजापति पडला. मग शारंगधराचे मूर्तीवर त्याचें लक्ष गेलें व त्यानें विष्णूच्या पायावर मस्तक ठेवून विष्णूची मनोभावानें प्रार्थना केली, "हे अभयंकर शारंगधरा! हे वज्रपंजरा! हे असुरसंहारका करुणाकरा! हे अनंता! हे लक्ष्मीरमणा!" अशा प्रकारें तो प्रार्थना करूं लागल्यावर त्या स्थितींत त्याला झोंप लागली, व त्या झोंपेंत त्याला असें स्वप्न पडलें किं, एक हरिण जवळ आलें व तें दक्षाला म्हणालें किं, "तुला शस्त्रानें मरण नाहीं, व यागसमाप्तीचे वेळीं मी तुला येऊन भेटेन," असें म्हणून त्यानें दक्षाचे हातांत सुपारी बांधली व तें निघून गेलें. असें स्वप्न पाहून दक्ष जागा झाला. उठून पाहतो तों हरिण वगैरे कांहीं नसून हातांत सुपारी मात्र बांधलेली आहे. ती सुपारी पाहून स्वप्न खरेंच अशी दक्षाची खात्री झाली. व त्यानें शारंगधराच्या मूर्तीची मोठ्या भक्तिभावानें सेवा केली. नंतर यज्ञसाहित्य मिळवून यागाची तयारी केली. अनेक ठिकाणच्या विद्वान् ऋषींनां त्यानें यज्ञासाठीं बोलावून आणिलें. हजारों ब्राह्मण त्या यज्ञाकरितां आले होते; त्याप्रमाणें अन्य लोकही केवळ यज्ञ पाहण्यासाठीं म्हणून आले होते. पशूला मारणारा चांडाळही यज्ञमंडपांत पशूला मारण्याचीं हत्यारें वगैरे घेऊन बसला होता. अशाप्रकारें सर्व तयारी झाल्यावर चांगला दिवस व सुमुहूर्त पाहून प्रथम गणपतीचें पूजन केलें. नंतर दानें वगैरे करून यज्ञसंरक्षणासाठीं अष्टदिशांनां अष्टदिक्पाळ ठेवले; पूर्व दिशेच्या संरक्षणासाठीं देवेंद्राची स्थापना केली; उत्तर दिशेला चंद्राला ठेविलें; पश्चिम दिशेला संरक्षण करण्यास जलधर याला

सांगितलें. दक्षिण दिशेकडे यमाची स्थापना केली. आग्नेय दिशेला अग्नि, वायव्य दिशेला वायु, ईशान्य दिशेला ईशान, आणि नैर्ऋत्य दिशेला निर्ऋति, याप्रमाणें अष्टदिशेला अष्ट दिक्पाळांनां संरक्षणासाठीं ठेविलें. मंडपाला चार भव्य दरवाजे होते. त्या दरवाजांवर ब्रह्मदेव, उद्गाता, वगैरेंना संरक्षक ह्मणून नेमिलें. मग अध्वर्यु आणि होता यांनां वरिलें. चौकोनी कुंड तयार केलें. त्या कुंडांत गार्हपत्य, दक्षिणाग्नि व आह्वनीय अशा तिन्ही अग्नींची स्थापना केली. नानाप्रकारचीं यज्ञाला लागणारीं भांडीं गोळा केलीं. वेद-मंत्रानें गायत्रीदेवीला आव्हान केलें. शंकू, स्रुवा, कृष्णाजिनें, आज्यस्थालीं, दर्भ, फुलें, गोमूत्र, गोमय, सोमवल्लीचा रस व तो पिण्यासाठीं चमस नावाचीं चौकोनी पात्रें, स्रुवे, समिधा वगैरे सर्व साहित्य आणल्यावर मध्यभागीं प्रचंड कुंड तयार करून त्या कुंडाची पूजा केली; नंतर मार्कंडेय ऋषीला ब्रह्मासनावर बसविलें; आचार्यासनावर भृगु ऋषीला बसविलें; आणि यजमानाचे आसनावर स्वतः दक्ष आपली स्त्री प्रसूती हिला घेऊन बसला. भृगूनें त्यांच्याकडून प्रथम कलशपूजा करवून पुण्याहवाचन करविलें. मग सर्व ऋषीब्राह्मणांनां सुपाऱ्या देऊन रत्नें व नारळ दिले, व अग्नि सिद्ध करून होमहवनास आरंभ केला. घृतांनीं भरलेलीं मोठमोठीं आज्यपात्रें जवळ ठेविलीं होतीं, त्यांतून ऋषि अग्नीवर घृत होमूं लागले, मंत्रांचा घोष सुरू झाला, आणि यज्ञास योग्य अशा वस्तूंच्या आहुत्या यज्ञकुंडांत पडूं लागल्या. पुण्याहवाचन संपल्यावर दक्ष-पत्नी प्रसूतीनें सर्व ऋषींना नमस्कार केला; तेव्हां मार्कंडेय ऋषींनीं तिला तूं अखंड सौभाग्यवती होशील ह्मणून आशीर्वाद दिला.

त्या यज्ञसमयीं सर्व ऋषी वगैरे ब्रह्मचर्यव्रतानें राहून फक्त दूध पिऊन निर्वाह करीत होते. कित्येक दिवस यज्ञ चालल्यावर यज्ञमंडपांत अप्सरा व गंधर्व येऊन त्यांनीं नृत्यगायनास आरंभ केला. टाळ, वीणा, मृदंग वगैरे वाद्यें त्यांनीं आपणाबरोबर आणि-लीं व तीं वाजविणारे कुशल असे गंधर्व आले होते; नाचण्यांत निपुण व गाण्यांत गुणी अशा रंभा, मेनका, सुकेशी, मंजुघोषा, उर्वशी, तिलोत्तमा, वगैरे अनेक अप्सरा आल्या होत्या. त्यांचें अनुपमेय सौंदर्य, बहुमूल्य चित्ताकर्षक पोषाख, ठेकेदार नृत्य, व आलापदार गाणें ऐकून यज्ञमंडपांतील प्रेक्षक वगैरे सर्व चित्रा-सारखे तटस्थ होऊन गेले. त्या अप्सरा जेव्हां शृंगार, वीर, बीभत्स, शांत, भयानक, करुण, अद्भुत, रौद्र, हास्य या निरनिराळ्या रसांचें प्रकृतिचित्र हुबेहुब दाखवूं लागल्या, तेव्हां तर सर्वजण गुंग होऊन गेले. याप्रमाणें तो दक्षाचा महायज्ञ, मंत्रघोषा बरोबरच नूपुरांच्या ध्वनींनीं व संगीताच्या आला-पांनीं पहावयाला व ऐकावयाला मनोहर असा झाला होता."

---

# अध्याय ९ वा.

## १ दाक्षायणीदेहदहन कथा.

याप्रमाणें बृहस्पतीनगराचे ठिकाणीं दक्ष-यज्ञ चालला असतां शंकर व दाक्षायणी कैलासपर्वतावर स्वस्थ होतीं, त्या यज्ञासंबंधानें महादेव कधीं विचार-देखील करीत नसत, परंतु एकदां नारद फिरत फिरत तेथें आला, व दाक्षायणी महादेवापासून पुष्कळ दूर आहे, अशी संधि साधून तिला ह्मणाला, "हे आदिशक्ति! आदिमाये! दाक्षायणी! तुझ्या बापानें तिकडे बृहस्पतिनगरामध्यें यज्ञाला आरंभ केला आहे, हें तुला माहित नाहीं असें वाटतें. आहाहा! काय त्या यज्ञाचा थाट! जन्मास येऊन ज्यानें तो यज्ञ पाहिला नाहीं, त्यांचा जन्म व्यर्थ होय. अपर्णे! त्या यज्ञासाठीं, त्रिभुवनांतील सर्व लोक आले आहेत; यज्ञासाठीं अत्यंत विस्तृत व सुंदर असा मंडप घातला आहे; लतापत्रांनीं व इतर अनेक उपकरणांनीं तो मंडप इतका मनोहर शृंगारिला आहे किं, पाहिल्याबरोबर डोळ्यांचें पारणें फिटतें. अस्तमान झाल्यावर दीपपंक्तींनें तर ती शोभा अधिक खुलते. अमरावतीहून इंद्र, चंद्र, वरुण, वगैरे अनेक देव या यज्ञसमारंभाच्या दर्शनासाठीं आले आहेत. अष्टदिशांचे दिक्पाळ, यक्ष, किन्नर, गंधर्व, अप्सरा वगैरे अनेक लोक आले आहेत; पृथ्वीवरील सर्व मांडलिक राजे, विद्वान् विद्वान् ब्राह्मण, मोठमोठाले तेजःपुंज असे ऋषि, वगैरे अनेक लोक यज्ञमंडपांत येऊन बसले आहेत. तुझ्या सर्व बहिणी तो समारंभ पाहण्यासाठीं आल्या आहेत, आणि वर आकाशांत पहा, अजून हे सुरगण विमानांत बसून एकसारखे त्या यज्ञ मंडपाकडे जात आहेत. खरोखर हा अपूर्व समारंभ पाहण्यासारखा असून तो तूं पाहण्यासाठीं जावेंस अशी माझी इच्छा आहे. मी मुद्दाम एवढ्याचसाठीं तुझ्याकडे आलों आहें." नारदाचें तें बोलणें ऐकून पार्वती ह्मणाली; "नारदा! माझा पिता जो दक्ष त्यानें अशा थाटानें यज्ञ चालविला असेल; परंतु आह्माला तर त्यानें यज्ञाला येण्याविषयीं आमंत्रणपत्रिकाहि पाठविली नाहीं, आणि ज्या अर्थी त्यानें आह्मांस बोलावणें नाहीं, त्याअर्थी त्याच्याकडे जाणें अप्रशस्तच होय. मी जर महादेवांनां जाण्याविषयीं विचारीन, तर ते मला पत्रिका आली आहे काय? तसेंच तुला नेण्यासाठीं कोणीं मूळ आलें आहे काय? असें प्रथमच मला विचारतील. त्यांनीं मला असें विचारल्यावर मी त्यांना काय बरें सांगू? त्यांच्या प्रश्नानें तर मला अत्यंत लाजल्यासारखें होईल. बरें, पतीला न विचारतांच निघून जावें तर तें साध्वी स्त्रियांच्या दृष्टीनें मरणापेक्षांहि कठिण होय. तसें केल्यास मला सर्व लोक हांसतील, बहिणी नांवें ठेवितील, आई राग करील, आणि दक्षालाही ती गोष्ट कांहीं पसंत पडणार नाहीं; शिवाय मी माझ्या पतीच्या प्रीतीला अपात्र ठरेन. तेव्हां तो यज्ञसमारंभ कितीही मनोहर असला, तरी

मला तेथें जातां येणार नाहीं. ” पार्वतीचें हें बोलणें ऐकून नारद ह्मणाला; “ स्त्रियेला जाण्यासाठीं पतीची परवानगी पाहिजे ही गोष्ट मलाही कबूल आहे. त्याप्रमाणें तूं महादेवांनां प्रसन्न करून त्यांचें अनुमोदन मिळव ह्मणजे झालें; परंतु बापाकडून मूळ आलें नाहीं, किंवा पत्रिका आली नाहीं, ह्मणून त्याच्या मुलीनें त्याच्याकडे अशा उत्सवप्रसंगीं न जाणें हें अनुचित होय. जो आपल्या आप्ताकडे सुखदुःखाच्या प्रसंगीं न बोलावतां जातो, तोच खरा सखा होय. आणि तेंच खऱ्या प्रीतीचें लक्षण होय. बोलावणें आल्यावर तर परकेही जातात, मग आप्त येतील यांत मोठेंसें नवल तें काय ? तेव्हां दक्षानें तुला बोलावणें पाठविलें नाहीं, तरी तूं या वेळीं त्याच्याकडे जा. हेंच कन्येचें खरें कर्तव्य असून तूं गेल्यानें दक्ष, प्रसूती व तुझ्या बहिणी यांना संतोष होईल. ” याप्रमाणें पार्वतीला सांगून नारद निघून गेला. त्याचें तें बोलणें ऐकून तिला त्या यज्ञसमारंभासाठीं जावें, असें वाटूं लागलें. शंकरांनीं परवानगी दिल्यास जावयाचें असें तिनें ठरविलें व त्याप्रमाणें ती महादेवांची परवागी मिळविण्याचा प्रयत्न करू लागली. शंकर जेथें बसले होते, तेथें ती आली व जवळ खिन्नवदनानें उभी राहिली. शंकरांनीं सहज पार्वतीकडे पाहिलें, तों तिचा चेहरा कष्टी दिसत आहे, डोळ्यांतून गालावर अश्रु पडत आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें, पार्वतीची ती करुण मूर्ति पाहून शंकरांचें हृदय कळवळून आलें व ते आपल्या आसनावरून पार्वतीजवळ गेले. त्यांनीं तिला आपल्या हृदयाशीं कुरवाळून धरिलें, तिचे अश्र आपल्या छातीनें पुसले, आणि तिची हनुवटी धरून ते तिला प्रेमानें ह्मणाले; “ पार्वती ! आज तूं हे असे अश्रू कां गाळतेस ? तुला कांहीं पीडा होत असल्यास ती तूं मला सांग ह्मणजे मी तिचें आतां निवारण करितों. ” तेव्हां पार्वतीचें हृदय अधिकच उचंबळून आलें व तिचे डोळे पुन्हां पाण्यानें भरून आले. ती बोलण्याचा प्रयत्न करी, परंतु भीति, क्षोभ व प्रीति, असे मनोविकार एकवटल्यामुळें तिला शब्द फुटेना. शेवटीं ती मोठ्या कष्टानें व भीत भीत ह्मणाली; “ देवा ! आज माझ्या कानावर एक मोठी अपूर्व वार्ता आली आहे. विमानांत बसून देव आकाशांतून जात असतांना एकमेकांशीं दक्षयज्ञाविषयीं बोलत होते, तें मीं ऐकिलें आहे. माझ्या बापानें क्षिप्रानदीच्या काठीं विस्तीर्ण मंडप घालून मोठ्या समारंभानें यज्ञ चालविला आहे. तो समारंभ पाहण्याची मला इच्छा झाली आहे व मीहि आज कित्येक वर्षांत आपल्या आईबापांनां भेटलें नाहीं. शिवाय या यज्ञाच्या निमित्तानें माझ्या सर्व बहिणी हल्लीं तेथें आलेल्या आहेत त्यांचीहि मला भेट होईल. मी आपणास केव्हांपासून विचारीन ह्मणून ह्मणत होतें, पण बापाकडून मूळ किंवा पत्रिका नसल्यामुळें आपण कोप कराल, या भीतीनें विचारण्यास धैर्य झालें नाहीं. पण देवा ! असें ह्मणतात आप्ताच्या घरीं सुखदुःखाच्या प्रसंगी जो निमंत्रणावांचून जातो, तोच

खरा सखा होय. तेव्हां मला आपण त्या यज्ञासाठीं जाण्याची परवानगी द्याल तर मी मोठ्या संतोषानें जाईन." पार्वतीचें तें बोलणें ऐकून महादेव ह्मणाले; "पार्वती ! तो तुझा बाप दक्ष अत्यंत उन्मत्त झाला आहे. ज्याचा मूळ स्वभाव गर्विष्ठ असतो, तो विद्या, तप, धन, तारुण्य, कुल व यश यामुळें अधिक उन्मत्त होतो. या यज्ञामुळें तर दक्षाला स्वर्ग दीड बोट उरला असेल, अशा उन्मत्त पित्याकडे जाण्यांत शोभा ती काय? शिवाय तुझ्या बापानें देवांनीं यज्ञ केला होता, त्या वेळीं माझा केवढा अपमान केला, हें तुझ्या लक्षांत नाहीं काय ? कोणत्याहि यज्ञप्रसंगीं मला हविर्भाग देऊं नये, असें त्यानें सर्वांनां बजाविलें आहे. मी त्याच वेळीं शाप देऊन त्याला दग्ध करून टाकिलें असतें, पण केवळ तुझा पिता ह्मणून मी आपला राग दाबून टाकिला. त्या वेळीं तो मला मनास वाटेल तें बोलला पण मूर्खांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करणें हा थोरांचा धर्म असल्यामुळें मी स्वस्थ बसलों. तुला याबद्दल खात्रीनें राग यावयाला पाहिजे. असें असून जर तुझी जाण्याची इच्छा असेल, तर माझी कांहीं हरकत नाहीं. पण हें लक्षांत ठेव कीं, तुला तेथें कोणीहि मान देणार नाहीं. आपला हा असा भिक्षूचा पोषाख आणि तुझ्या त्या बहिणी नानाप्रकारच्या रेशमी वस्त्रांनीं व सुवर्ण, मोतीं, रत्नें यांच्या बहुमूल्य अलंकारांनीं सालंकृत अशा असतील, त्या तुला पाहिल्याबरोबर हांसतील, तुझा उपहास करितील आणि तुझी निंदाहि करितील. अकिंचन अशा पुत्रालाहि आईबाप विचारीत नाहींत, मग तूं तर मुलगी आहेस, त्यांतून आतां तर त्या दक्षाचें व माझें वितुष्ट झाल्यामुळें तूं त्यांच्या अप्रीतीला अधिक कारण झाली आहेस. शरिराला पडलेलीं क्षतें बरीं होतात, पण मनाला झालेलीं क्षतें मरणकाळपर्यंत बरीं होत नाहींत, असा स्वभावधर्म असल्यामुळें मी तर त्या दक्षाचा उन्मत्तपणा कधींहि विसरणार नाहीं." शंकरांचें हें भाषण ऐकून पार्वती अत्यंत खिन्न झाली, व निराशवाणीनें म्हणाली; "स्वामी ! आपली इच्छा नसल्यास मी मुळींच जाणार नाहीं, आपण मला सर्वांपेक्षां अधिक आहांत, आईबापापेक्षां स्त्रियेला पति हा अधिक प्रिय व पूज्य असतो. तेव्हां आपला ज्यानें अपमान केला, ज्यानें आपला हविर्भाग बंद केला, त्याचा मलाही राग येणें साहाजिक आहे, परंतु एकवार आईचें दर्शन घ्यावें व बहिणींनां भेटावें अशी इच्छा आहे. या यज्ञसमारंभासाठीं त्या सर्व एका ठिकाणीं जमल्या आहेत, तेव्हां त्या सर्वांची एकाच वेळीं भेट होईल. यज्ञाचे निमित्तानें मला आईकडे जातां तरी येईल, नाहींतर पुढें मी तिला कोणत्या प्रसंगीं भेटणार ! तेव्हां केवळ आईच्या दर्शनासाठीं तरी मला आपण जाण्यास परवानगी द्याल अशी आशा आहे." पार्वतीनें महादेवाची अशी विनंति केल्यावर महादेवास दया आली, व त्यांनीं तिला नंदीवर बसवून व बरोबर कांहीं शिवगण देऊन क्षिप्रातीराकडे मार्गस्थ केलें.

## २ दाक्षायणीचा अपमान.

पार्वती कैलासाहून निघाल्यावर लवकरच बृहस्पतीनगराला येऊन पोहोंचली. दुरूनच तिला त्या विस्तीर्ण यज्ञमंडपाचे सुवर्णाचे कळस दिसले. मोठमोठाल्या ध्वजापताका वाऱ्यानें फडफड करीत आहेत असें पाहून तिला आकाशांत निरनिराळ्या रंगाच्या आकाशगंगाच उत्पन्न झाल्या आहेत कीं काय, असें वाटूं लागलें. जसजशी ती यज्ञमंडपाजवळ येऊं लागली, तसतशी त्या यज्ञाची अधिकाधिक शोभा तिला दृग्गोचर होऊं लागली. रंगवल्लि पताकांनीं अलंकृत केलेले रस्ते, ध्वजापताकांनीं सुशोभित केलेला मंडप, लतापत्रांनीं व केळीच्या स्तंभांनीं शृंगारलेले मंडपाचे दरवाजे, रत्नखचित अलंकारांनीं व शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज असे द्वारपाल, वगैरे प्रकार पाहून तिला नारदाचें बोलणें सर्व खरें आहे असें वाटलें. अगदीं मंडपाजवळ आल्यावर तर ती अगदीं थक्क होऊन गेली. ऋषींनीं उंच स्वरानें चालविलेला मंत्रघोष, मृदंग वीणादि वाद्यांचे कर्णमनोहर ध्वनि, नूपुरांचा छुमछुम असा नाद, आणि चित्ताकर्षक असें अप्सरांचे संगीत ऐकून पार्वती अगदीं गुंग होऊन गेली. मंडपाचे दरवाजाजवळ आल्यावर दाक्षायणी नंदीवरून खालीं उतरली, व तिनें नंदीला शिवगणांच्या स्वाधीन करून मंडपांत प्रवेश केला. पार्वतीला पाहिल्याबरोबर प्रसूतीला प्रेमाचें भरतें आलें, व तिनें धांवत धांवत पार्वतीजवळ येऊन तिला घट्ट आपल्या पोटाशीं धरिलें. दोघी एकमेकींना पुष्कळ दिवसांनीं भेटल्यामुळें त्यांचा कंठ दाटून आला, व दोघींच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. प्रेमभरानें दोघींचे कंठ दाटून आल्यामुळें कोणासही बोलवेना. विशेषतः पार्वतीच्या हातांतील शंखमण्यांचीं कांकणें, स्फटिकमण्याच्या माळा, वेणी न गुंफता मस्तकावर केसांचा असलेला जटाभार, त्यावर रुद्राक्षांच्या माळा, भस्माचे त्रिपुंड्र, भगव्या रंगाचें साधें वस्त्र, असा तो तिचा दरिद्रावस्थेंतील पोषाख पाहून प्रसूतीचें अंतःकरण कळवळून आलें. तिनें पार्वतीच्या गालाचें चुंबन घेऊन तिचे अश्रू पुसले, व आपल्या हातांतील सुवर्णाचीं कांकणें काढून तीं पार्वतीच्या हातांत घातलीं. नंतर प्रसूतीनें तिचा हात धरून यज्ञमंडपांत जेथें आपल्या मुली बसल्या होत्या त्यांच्याकडे घेऊन गेली. प्रसूतीच्या त्या मुलींनीं नानारंगांचीं अनेक प्रकारचीं रेशमी वस्त्रें परिधान केलीं होतीं. सोन्या मोत्यांच्या अलंकारांनीं त्या नक्षत्रांप्रमाणें चमकत होत्या. त्यांचीं लहानमोठीं मुलेंहि चांगल्या प्रकारच्या वस्त्राभरणांनीं अलंकृत होऊन आपआपल्या मातेजवळ बसलीं होती. अशा त्या आपल्या बहिणींना पाहून पार्वतीला मोठें कौतुक वाटलें. प्रसूती आपल्या इतर कन्यांकडे पाहून म्हणाली; "मुलींनो! ही पहा तुमची बहीण दाक्षायणी, आज किती दिवसांनीं तरी तुम्हाला भेटावयाला आली आहे. या तर, हिला आलींगन द्या, व हिचें कुशल विचारा, आणि तुमच्याच

आसनावर हिला बसवून यज्ञसमारंभ दाखवा." प्रसूतीनें असें म्हटल्यावर त्या वस्त्रालंकारांनीं नटलेल्या मुली क्षुद्र दृष्टीनें पार्वतीकडे पाहूं लागल्या, व तो तिचा तापसी जनाला शोभणारा वेष पाहून त्या एकमेकींकडे पाहून हंसू लागल्या; त्यांत जी थोडीशी चणचणीत मुलगी होती, ती तिरस्कारानें पार्वतीकडे पाहून ह्मणाली; "आई! तूं हें काय आह्मांला भलतेंच सांगतेस? या भिक्षुकिणीला जर आह्मीं भेटलों तर हीं आमचीं बहुमूल्य वस्त्रें वाईट होऊन आमचे अलंकारही मळतील. आह्मीं सुस्वरूप लावण्य–लतिका असून या कांटेरी वेलीला तूं आलिंगन देण्यास सांगतेस, यावरून आई! तूं फारच भोळी आहेस असें आह्मांस वाटतें." दुसरी एकजण विशेष शहाणी होती ती ह्मणाली; "आई! ही जर आमची खरोखर बहीण असेल, तर हिला आह्मीं भेटूंदेखील; पण या अशा दरिद्री स्त्रियेला भेट दिल्याचें जर आमच्या पतींना कळेल, तर ते आह्मांस स्पर्शही करणार नाहींत. अशा या भस्मचर्चित स्त्रियेला आलिंगन दिल्यानें आमची ही मृदु व गौर तनु मळून जाईल, तो मळ धुवून तरी निघेल किं नाहीं कोण जाणे?" तिसरी एकजण सर्वांहून हुशार होती, ती ह्मणाली; "अगे! ही आपली बहीण तरी कसली; अशा निष्कांचन स्त्रियेला मी तर आपली बहीण असें कधींही ह्मणणार नाहीं. ही कोणीतरी भिकारीण असून या यज्ञसमारंभाचे वेळीं कांहीं पैसाअडका मिळेल, या उद्देशानें आली आहे;" असें ह्मणून तिनें पार्वतीचा दंड धरला व तिला जोरानें ढकलून ती ह्मणाली; "जा भिकारडे! बाहेर जाऊन भिकाऱ्यांच्या समूहांत बैस; त्यांच्याबरोबर तुलाही कांहीं मिळेल बरें." बिचारी पार्वती बहिणींचीं कटु उत्तरें ऐकून अत्यंत दुःखी झाली. त्या वाग्बाणांनीं तिचें हृदय विव्हल होऊन गेलें. तिला त्या उन्मत्त बहिणींचा अत्यंत राग आला; परंतु त्या मानभंगाबद्दल तिनें एकीलाहि प्रत्युत्तर दिलें नाहीं. बहिणीनें ढकलून दिल्याबरोबर, ती–आई आपणास मोठ्या प्रेमानें भेटली, व तिनें सर्व विचारपूस केली एवढेंच समाधान मानून तेथून निघाली; व यज्ञमंडपांत थेट यज्ञकुंडाजवळ बापाला भेटण्यास आली. परंतु दक्षानें दाक्षायणीला पाहिल्याबरोबर आपल्या कपाळास आंठ्या घातल्या, व तो तिरस्कारानें तिच्याकडे पाहूं लागला, तथापि बापाच्या त्या तिरस्काराकडे लक्ष न देतां पार्वती बापाला नमस्कार करण्याच्या उद्देशानें तशीच जवळ उभी राहिली, परंतु दक्षाला तिचें दर्शनही नकोसें झालें. पार्वतीच्या अंगावरील रुद्राक्ष, भस्म वगैरे शंकरांचीं भूषणें पाहून त्याला मागील यज्ञाची स्मृति झाली, व तो तिजवर क्रुद्ध होऊन दुसरे बाजूस तोंड फिरवून बसला. हा वेळपर्यंत पार्वतीनें आपला राग आंवरून धरला होता, परंतु प्रत्यक्ष जन्मदात्या पित्यानें आपली अवहेलना करून इतका मानभंग केला, हें तिला सहन झालें नाहीं. त्यांतून यज्ञकुंडाजवळ सर्व देवांचे हविर्भाग आहेत, परंतु महादेवाचा हविर्भाग नाहीं हें पाहून

ती आदिमाया आदिशक्ति, अत्यंत संतप्त होऊन तप्त कांचनाप्रमाणें लाल दिसाव-याला लागली. डोळे इंगळा प्रमाणें दिसूं लागले, संतापातिरेकानें तिचे ओंठ थरथर कांपावयाला लागले. ती पार्वतीची क्रुद्ध मूर्ति पाहून सर्व ऋषिमंडळी तटस्थ झाली, कित्येक पुढील भीत्युत्पादक विचारांनीं साशंक झाले, कित्येकांचीं हृदयें धडधड करूं लागलीं. पार्वती क्रुद्ध पण गंभीर स्वरानें ह्मणाली; "हे दक्ष प्रजापते! तुझा विनाशकाळ जवळ आला आहे ह्मणून तुला ही अशी विपरीत बुद्धि होत आहे. अरे मतिमंदा! जसा मूर्ख पाण्यावांचून वृक्ष लावण्याचा प्रयत्न करितो, त्याप्रमाणें तूं शंकराला हविर्भाग दिल्यावांचून हा यज्ञ करीत आहेस. बेडूक सर्पाच्या तोंडांत बळेंच जाऊन पडावा किंवा सिंहावर लांडग्यानें उडी मारावी, त्याप्रमाणें तूं शंकरास हविर्भाग न ठेविल्यामुळें आपल्या मृत्यूची तयारी करून ठेविली आहेस. तुला या अपराधाबद्दल आपल्या स्वतःच्या मस्तकाचा हविर्भाग महादेवांनां द्यावा लागेल. महादेवांनां सर्व देवही आपलें दैवत मानितात, तेव्हां त्यांनां हविर्भाग दिल्यावांचून हे देव तरी तुझीं अवदानें ग्रहण करितील काय? तो ईश्वर सर्वांभूतीं सर्वत्र असून ब्रह्मदेव व विष्णु यानांदेखील ज्याचा पार लागत नाहीं, सूक्ष्म कीटकापासून तों हत्तीसारख्या प्रचंड प्राण्यापर्यंत सर्वांची उत्पत्ति, स्थिति व लय ज्याच्या हातांत आहे; त्या महादे-वांशीं वैर जोडून घेऊन तूं आपणावर संकट मात्र ओढवून घेतलें आहेस. सर्व प्राणिमात्रांचे मुखाचे ठिकाणीं महादेव, हृदयाचे ठिकाणीं विष्णु व कटिस्थानीं ब्रह्मदेव असतो; तेव्हां महादेवांचा अपमान करून तूं आपल्या मस्तकाचाच नाश करून घेतला आहेस. तूं माझा पिता नसून माझा वैरी आहेस. शंकराच्या स्त्रियेचा बाप इतका नीच असावा, याबद्दल मला फार लाज वाटते. अशा उन्मत्ताला यमपुरीं पाठविणें हेंच प्रशस्त होय, परंतु तूं श्वशुर म्हणून शंकरांनीं जसें तुझ्या मूर्खपणाकडे दुर्लक्ष केलें, त्याप्रमाणें मीही माझा पिता, म्हणून तुझ्या उन्मत्तपणाकडे दुर्लक्ष करितें. पण इतकी विलक्षण मानखंडना पार्वतीनें कशी सहन करून घेतली, असें कोणी म्हणूं नये, म्हणून मीच आपला देह जाळून टाकतें. मी इकडे येतेवेळीं शंकरांनीं मला असें सांगितलें होतें कीं-तुझा बाप दक्ष अत्यंत नीच, उन्मत्त व मूर्ख आहे, त्याच्याकडे तूं जाऊं नकोस;-पण मी आपल्या पतीचें न ऐकतां केवळ कर्तव्य म्हणून या यज्ञप्रसंगीं आलें. आपल्या निष्कांचन मुलीवर हा पाषाणहृदयी बाप इतकी वक्रदृष्टि करील अशी माझी कल्पनाही नव्हती; परंतु याच्या मूर्खपणाचा अनुभव आज मला पूर्ण आला. पित्याकडून अशी अप-मानित झालेली ही पार्वती आपलें तोंड महादेवांनां दाखविण्यास मुळींच योग्य नाहीं. मी पतीची आज्ञा उल्लंघिली, म्हणून मला देहदहनाची शिक्षा ही पाहिजेच."

## ३ शिवगणावर अग्निवृष्टि.

याप्रमाणें दक्षाला सांगून ती योगमाया पार्वती पूर्व दिशेकडे तोंड करून यज्ञकुंडाजवळ पद्मासन घालून बसली. तिनें आचमन केलें, व योगमार्गानें देह दहन करण्यासाठीं प्राणायामाला आरंभ केला. ऊर्ध्व भागीं असलेला वायु प्रथम खालीं नेला. नंतर व्यान व अपान हे दोन वायु एके ठिकाणीं करून त्यांच्या शक्तीनें सहा चक्रांचा भेद केला. मग वैकुंठाच्या द्वारानें सुषुप्त्यावस्थेंत प्रवेश केला. आधारचक्रांतील अपानवायु त्रिवेणी मार्गानें मणिपुरीं आणून त्याची समान वायूची भेट करविली. मग स्वाधिष्ठान कर्म करून प्राण मंदिरांत प्रवेश केला. तेथें चक्रस्थान जिंकून मग तिनें विशुद्ध चक्राचे मंदिरांत प्रवेश केला. तेथें उदान वायूला तिनें जिंकिलें. नंतर त्या वायूसह मस्तकांत तिनें व्यान व अपान हे वायु आणिले आणि त्या तिनही वायूंना जिंकून तिनें अग्निचक्रांत प्रवेश केला. तेथें तिची व परमात्मा परब्रह्म अति सूक्ष्म जो ईश्वर त्याची भेट झाली. तेव्हां ती ईश्वराला म्हणाली; "हे सर्व व्यापका! आदिपुरुषा! जन्मोजन्मीं मला तूंच पति मिळावास अशी तुला माझी विनंति आहे." 'याप्रमाणें ईश्वराची प्रार्थना करून तिनें जटराग्नि प्रदीप्त केला, आणि जठराग्नि व चक्राग्नि या दोन्हीं अग्नींनां एकत्र करून त्यांच्या शक्तीनें देह जाळण्यास आरंभ केला, आणि थोडक्याच वेळांत कापूर जसा कोणताही अंश न राहतां जळून जातो, त्याप्रमाणें पार्वतीचा देह अस्थि व रक्षा वगैरे कांहीं एक शेष न राहतां जळून गेला. शेवटच्या ज्वाळेपासून कोकिलपक्षी निर्माण झाला, व तो यज्ञमंडपांतून भरारी मारून निमिषार्धांत निघून गेला.

याप्रमाणें दाक्षायणीनें आपल्या शरिराचें दहन करून घेतल्यावर सर्व प्रेक्षक व ऋषि वगैरे हताश झाले. पुत्रप्राप्तीसाठीं यज्ञाला आरंभ केला, तो हा भलताच अनर्थ झाला, याबद्दल प्रत्येकास हळहळ वाटूं लागली. यज्ञ मंडपाबाहेर नंदी व शिवगण पार्वतीची वाट पहात बसले होते; बराच वेळ झाला तरी पार्वती अद्यापि बाहेर येत नाहीं, असें पाहून शिवगण आंत पार्वतीच्या शोधाला गेले; तेव्हां तो त्यांना झालेला प्रकार कळला. तेव्हां नंदीला व इतर शिवगणांना अत्यंत क्रोध आला, व त्यांनीं मंडपांत शिरून जो हातीं लागेल त्याला मारण्यास आरंभ केला. नंदीनें सर्व यज्ञसामग्री इकडे तिकडे उधळून दिली. मणिमंतानें मंडप मोडून टाकिला, भुतें हीं ब्राह्मणांच्या मागें लागलीं. असा सर्व एकच गोंधळ उडाला, व तो भव्य समारंभ विस्कळित होऊन जो तो आपापला जीव घेऊन पळत सुटला. शिवगणांच्या भीतीनें पळतां पळतां ब्राह्मणांची अत्यंत त्रेधा उडाली. कित्येकांची नेसावयाचीं धोतरें गळून पडलीं, कित्येक वाटेंत ठेंचाळले, आणि कित्येकांनीं शिवगणांचें भयंकर स्वरूप पाहून

आपले डोळे झांकून घेतले. कित्येक आपसांत हळूहळू म्हणूं लागेल; अहो! आह्मीं दोन पैशांच्या आशेनें येथें आलों, पण प्राक्तन बरोबर नसल्यामुळें येथें हें असें संकट ओढवलें. शिवगणांच्या त्या धुमाकळीनें तेथून सर्वजण निघून गेले, परंतु भृगु वगैरे मोठमोठाले ऋषि आपापल्या आसनावरून मुळींच उठले नाहींत. तसेंच अष्टदिशांच्या दिक्पाळांनींही लवकरच युद्धाची तयारी केली, व ते शिवगणांनां तेथून घालवून देऊं लागले. परंतु शिवगण व नंदी त्यांनां मुळींच आटोपेनात, तेव्हां भृगुऋषींनीं यज्ञकुंडांत बीजमंत्रानें उदक टाकून एक सहस्र शरभ निर्माण केले. त्यांच्या हातांत अग्नीचेच भाले होते. त्या भाल्यांनीं त्यांनीं सर्व शिवगणांना व नंदीला डाग देण्यास सुरवात केली. तेव्हां त्या आगीपुढें निरुपाय होऊन नंदी व शिवगण कैलासाकडे पळत सुटले. अशा रीतीनें आलेल्या संकटाचें निवारण केल्यावर दक्ष प्रजापतीनें पुन्हा यज्ञाची सर्व सामग्री मिळविली, मंडप वगैरे घातला, व फिरून यज्ञाला आरंभ केला.

---

## अध्याय १० वा.

### १ वीरभद्राची उत्पत्ति.

वैशंपायन ऋषि ह्मणाले; "राजा जनमेजया! तो एकंदर प्रकार पाहून कलह-प्रिय नारदमुनि आनंदानें नाचूं लागले. महादेवांना हा प्रकार कळविल्यास या युद्धाला चांगलाच रंग येईल व पुढें आपणास मोटी मौज पहावयास सांप-डेल, असा विचार करून तो नारद क्षिप्रातिराहून निघून कैलासास गेला, परंतु तेथें महादेव नसल्यामुळें तो चित्ररथ अरण्यांत गेला. तेथें महादेव ध्यानस्थ बसले होते. महादेवांचें ध्यान केव्हां संपेल व आपण त्यांनां तो प्रकार केव्हा सांगूं, असें नारदाला झालें होतें. पण महादेवाचें ध्यान लवकर संपेना, तेव्हां त्यानें मोठ्यानें शंखध्वनि केला. तो ध्वनि ऐकून शंकरांनीं आपलें ध्यान विसर्जन केलें. ते डोळे उघडून पाहतात तों जवळ नारद उभा असून त्याचा चेहरा खिन्न झालला आहे व डोळे अश्रूंनीं भरून आलेले आहेत. अशी ती नारदाची मूर्ति पाहून महादेव ह्मणाले, " नारदा! असा दुःखी कां दिस-तोस तुला कोणी पीडा केली असल्यास मला सांग, ह्मणजे मी तिचें आतां निवारण करितों." नारद ह्मणाला; " देवाधिदेवा! कैलासपते! मी आपणाला एक अशुभ वार्ता सांगावयाला आलों आहें. एक मोठा अनर्थ घडून आला. देवी पार्वती, दक्ष प्रजापतीकडे यज्ञ समारंभ पाहण्यासाटीं व आईबाप–बहिणी वगैरेंनां भेटण्या-साटीं ह्मणून गेली होती, परंतु त्या तिच्या क्षुद्र बहिणींनीं व त्या उन्मत्त दक्ष प्रजापतीनें तिचा फार अपमान केला व अत्यंत मानभंग केला. तरी पार्वती

विशेष क्रुद्ध झाली नाहीं; परंतु यज्ञ-कुंडाजवळ तुमचा हविर्भाग नाहीं, हें पाहून तर देवी अत्यंत क्रुद्ध झाली , " मी दक्ष प्रजापतीची मुलगी असें म्हणून घ्यावयाला मला लाज वाटते " असें बोलून पार्वतीनें यज्ञ कुंडाजवळ पद्मासन घातलें व योगबलानें स्वतःचा देह जाळून घेतला, तेव्हां नंदी व शिवगण यांनां संताप आला, व त्यांनीं मंडपांत शिरून सर्व यज्ञ मंडपाचा विध्वंस करून टाकिला, अनेक ऋषींनां व राजांनां पळवून लाविलें, यज्ञ सामुग्री उधळून मातींत मिळवून दिली, परंतु इतक्यांत भृगु ऋषींनीं यज्ञ-कुंडांतून मंत्रशक्तीनें शरभ निर्माण केले व त्यांच्याकडून शिवगण व नंदी यांनां पळवून लाविलें. आतां त्यांनीं फिरून मंडप वगैरे घातला असून यज्ञाला आरंभ केला आहे." नारदमुनि याप्रमाणें महादेवाला हकीकत सांगत आहेत, तोंच शस्त्रांच्या मारानें विव्हळ झालेले नंदी व शिवगण तेथें आले. त्यांची ती स्थिति पाहून महादेवांनां अनिवार राग आला. प्रथम त्यांनीं नंदी व शिवगण यांचीं शरीरें पूर्ववत् केलीं व झालेल्या एकंदर प्रकाराविषयीं विचार करीत बसले. त्या विचारानें प्रत्येकक्षणीं त्यांचा कोप वाढत चालला होता. शेवटीं त्यांची अशी स्थिति झाली कीं, त्यांनीं आपल्या शरीरांत त्रिभुवनांतला कोप सांठविला आहे असें दिसूं लागलें. तमोगुणाचा समुद्र उचंबळावा त्याप्रमाणें त्यांची मूर्ति दिसूं लागली. प्रळय काळाच्या वेळीं जें महादेवांचें स्वरूप असतें, तेंच या वेळींहि दिसूं लागलें. रागानें त्यांची हनुवटी कांपावयाला लागली, डोळे अग्नीप्रमाणें लाल होऊन ते गरगर फिरवूं लागले, त्यांनां संतापाच्या भरामुळें आसनावर स्वस्थ बसतां येईना, बाहू स्फुरण पावूं लागले, दांत करकरां वाजूं लागले, अंगाला दरदरून घाम सुटला, त्यांनीं भस्म उधळून दिलें, त्यांचा हात थरथर कांपत असल्यामुळें कमंडलू हालूं लागला, डमरु आणि डौर ( समेळ ) फोडून टाकिला, कौपीन फाडून टाकिलें, जटा मोकळ्या सोडल्या, पाशुपत व त्रिशूळ हीं टाकून दिलीं, धनुष्य फेंकून दिलें, कमरेचा करगोटा तोडून टाकिला आणि छाटी दूर झुगारून दिली. तें शंकरांचें भयंकर क्रुद्ध स्वरूप पाहून नारद तर भीतीनें दूर पळून गेला. त्या क्रुद्धावस्थेंत शंकरांनीं आपल्या मस्तकावरील जटेंतून एक जटा उपटून ती रागानें भूमीवर आपटली. त्या आपटण्याबरोबर सहस्र प्रचंड मेघांचा एकच वेळीं गडगडाट व्हावा त्याप्रमाणें मोठा आवाज झाला. संपूर्ण त्रिभुवन हालावयाला लागलें, मेदिनीला कंप सुटला, लोकपाळ भिऊन गेले, नादानें आकाश दुमदुमून गेलें, समुद्र विलक्षण उचंबळूं लागला, या सर्व गोष्टींमुळें प्रळयकाळ जवळ आला, असें वाटावयाला लागलें. आकाश कोसळून पडतें किं काय म्हणून लोक साशंक झाले. ह्या विलक्षण प्रकारानें पाताळांत शेष घाबरून जाऊन तो आपल्या सहस्र फणा हालवूं लागला. ती जटा भूमीवर पडल्याबरोबर विजेप्रमाणें आकाश मार्गानें निघून गेली. व त्या

भूमीवर शामवर्णाचा एक विशाल देहधारी, अत्यंत शक्तिसंपन्न असा 'वीर-भद्र जटादांत' नावाचा शंकराचा बाहुनंदन निर्माण झाला. त्या वीरभद्राचे दांत भयंकर होते, तो सर्व शस्त्रास्त्रांनीं परिपूर्ण असा होता. त्याच्या हातांत डमरु त्रिशूळ, गदा, सुरी, मुसळ, भेरी, काळपाश, धनुष्य, बाण, तलवार, शंख, चक्र, परशु अशीं अनेक सोज्वळ शस्त्रें होतीं. मस्तकावर पिंगट जटा असून त्यावर मुकुट होता. कपाळास भस्म लाविलें असून त्यावर शेंदुराचा टिळा होता. आंगावर हत्तीचें कातडें होतें. गळ्यांत हाडांच्या माळा होत्या. व ठिकठिकाणीं रुद्राक्षांचीं भूषणें होतीं. तो महादेवाला साष्टांग नमस्कार करून ह्मणाला, "हे नीलकंठा हे शूलपाणे! या सेवकाला काय आज्ञा आहे ती निवेदन करावी" शं-कर त्या वीरभद्राला पाहून हर्षभरित झाले व ह्मणाले "अरे! तूं माझ्या जटे-पासून झालेला माझा पुत्र आहेस, मी तुझें नांव वीरभद्र असें ठेवितों. तुला मी आपल्या सर्व शस्त्रास्त्रविद्या शिकवून सर्व त्रिभुवनांत अजिंक्य असा करितों. त्या दक्ष प्रजापतीचा नाश करण्यासाठीं मी तुला निर्माण केलें आहे, तर तूं बृहस्पति नगराचे ठिकाणीं जाऊन सर्व देवांचे हविर्भाग हरण कर, व य-ज्ञाचा आणि यज्ञमंडपाचा नाश करून त्या उन्मत्त दक्षराजाचें मस्तक धडापासून कापून टाक." या प्रमाणें महादेवांनीं वीरभद्राला सांगितल्यावर त्याला सर्व शस्त्रास्त्रविद्या व जारणमारण वगैरे अनंत कला शिकविल्या. नंतर महाशक्ति कुठार वगैरे शस्त्रें दिलीं, व त्याला रणांत विजय मिळविशील असा आशिर्वाद देऊन, जाण्यासाठीं निरोप दिला.

## २ चंडीश–शिष्टाई.

वीरभद्रास निरोप मिळाल्यावर त्यानें शंकरांस वंदन करून प्रदक्षिणा केली, व तो आपणाबरोबर शिवसैन्य घेऊन निघाला. त्याच्या बरोबर नंदी, मणिमंत, भद्र, भैरव, शृंगी, भृंगी, चंडीश वगैरे अनेक युद्धविद्या विशारद असे वीर होते. चौसष्ट योगिनी, नऊकोटी कात्यायनी, छपन्न कोटी चामुंडा, नऊ नरसिंह, चौदाशें मायावी राक्षस, पंधराशें झोटिंग, आठ कोटी भुतें, आठ कोटी भैरव, शिवाय यक्ष, ब्रह्मराक्षस, शंखिनी, वेताळ, डंखिणी, पिसाटे, लावा, क्षेत्रपाळ वगैरे वीरही कित्येक होते. शिवाय हत्ती, घोडे, रथ, हींहि असंख्य होतीं. न-गारे, नौबती, भेरी, तुतार्‍या, कर्णे, शिंगें, वगैरे प्रचंड वाद्यें वाजविणारे वाजंत्री; निशाणें घेऊन पळणारे घोडेस्वार यांचे ताफेच्या ताफे होते. हा सर्व सैन्यभार घेऊन वीरभद्र निघाल्यावर भव्य देखावा दिसूं लागला. रण वाद्याच्या ध्वनींनीं आकाश दुमदुमून गेलें, धुळीमुळें दिशा धुंद झाल्या; मेदिनी पुढील भयानें डळमळूं लागली; आकाशांत गृध्रादि पक्षी लवकरच मोठी मेजवानी मिळणार ह्मणून भरार्‍या मारूं लागले; मृतवीरांची गर्दी होणार म्हणून स्वर्गाचीं द्वारें अगो-दरच उघडून ठेविलीं, व अप्सरा पुष्पांच्या माळा गुंफूं लागल्या. हळू हळू

वीरभद्राचें हें प्रचंड सैन्य महेंद्र नावाच्या नदीच्या काठीं असलेल्या भद्रावती नगरजावळ आलें.तेथें वीरभद्रानें मुक्काम करून, नंदी,मणिमंत, चंडीश,भद्र वगैरे प्रमुख वीरांनां आपणाजवळ बोलावून घेऊन तो चंडीशाला म्हणाला; "हे चंडीशा! तूं दक्षप्रजापतीकडे जाऊन तो सामोपचारानें शंकरास हविर्भाग देण्यास तयार आहे किंवा नाहीं तें पहा, तो सामोपचारानें ऐकत नसल्यास आम्हीं युद्धाला येत आहों, तेव्हां तूं सावध रहा, अशी त्याला सूचना दे. एकदम कोणाला युद्धाला प्रवृत्त करणें हा वीरांचा धर्म नव्हे, ह्मणून त्याला सूचित करून युद्धाची तयारी करण्यास सांग." वीरभद्रानें याप्रमाणें चंडीशाला सांगितल्यावर चंडीश तेथून निघाला, व दक्षप्रजापतीचे यज्ञमंडपाजवळ आला. त्यानें द्वारपाळास शंकराचा दूत आला आहे, असें दक्षास कळविण्यास सांगितलें. तो चंडीशाचा निरोप दूतानें दक्षप्रजापतीचे कानावर घातल्याबरोबर दक्षाचे हृदयांत एकाएकीं भीति उत्पन्न झाली, व त्याचा चेहरा म्लान होऊन गेला; तथापि शंकराकडून आलेला दूत काय म्हणतो हें ऐकून घेण्याकरितां त्यानें आपल्या दूताकडून चंडीशाला आपणाजवळ बोलाविलें व शंकराचें काय म्हणणें आहे तें त्याला विचारिलें. तेव्हां चंडीश म्हणाला; "राजा दक्षप्रजापते! शंकरांनीं दाक्षायणीला परत मागितलें असून, शंकराचा हविर्भाग यज्ञांत टाकिल्यास बरें आहे, नाहीं तर ते आपलें प्रचंड सैन्य तुझ्या विटंबनेसाठीं पाठवून देतील." हें ऐकून दक्षप्रजापति म्हणाला; "अरे चंडीशा! तुला काय कोठें बोलावें हें मुळींच कळत नाहीं असें दिसतें, तो तुझा स्वामी शंकर नेहमीं दरीखोऱ्यांत रहात असल्यामुळें त्याला आचार, व्यवहार व नीति कांहींहि माहीत नाहीं, तेव्हां त्याच्या सेवकांनां तरी व्यवहार कोठला माहीत असणार? ती दाक्षायणी देह दहन करून नाहींशी झाली, याबद्दल मी महादेवावर रागवावयाचें, तर महादेवच मजवर रागावला आहे, याबद्दल मोठें आश्चर्य वाटतें! माझ्या सर्व मुली बहुमूल्य अशा वस्त्राभरणांनीं अलंकृत आहेत, असें पाहून त्या भिकार महादेवानें दिलेल्या आपल्या शंखमण्यांच्या अलंकाराबद्दल तिला फार वाईट वाटलें, आणि आपल्या बहिणींनां पुत्र असून आपणास पुत्रसंतति नाहीं, या विचारानें तर तिला फारच दुःख झालें, आणि केवळ आपल्या पतीवर संतापून तिनें आपला देह जाळून घेतला; अशी वस्तुस्थिति असतां, महादेव पार्वतीला मजजवळ परत मागतो, हा त्याचा वेडेपणा नव्हे काय?" दक्षप्रजापतीचें हें खोटें भाषण ऐकून चंडीशाला फार राग आला, व तो म्हणाला; "अरे दक्षा! अपराध करून आणखी असत्य बोलतोस हा तुझा मूर्खपणा होय. अरे ज्याचा द्रव्यनिधि सांभाळण्यासाठीं कुबेर आहे, त्याच्या घरीं रत्नांना व सुवर्णाला कांहीं कमी आहे असें समजण्याइतकी पार्वती कांहीं अज्ञानी नव्हती. परंतु द्रव्य हें प्रति नरक होय, म्हणून पार्वती त्याला मुळींच शिवत नसे. माशा जशा दुर्गंधींत पडून त्यांतच सुख मानतात त्याप्रमाणें

मूर्ख लोक रत्नकांचनासाठीं रात्रंदिवस धडपड करीत असतात. द्रव्य हें कलिस्वरूप असल्यामुळें शिव त्याकडे कधीं ढुंकूनहि पहात नाहींत. त्या कलिस्वरूप लक्ष्मीचा विष्णूनीं स्वीकार केला आहे. विष्णूची स्त्री लक्ष्मी ही चंचल, केव्हां कोणाकडे जाईल याचा नियम नाहीं, म्हणून शंकरानीं परम पवित्र अशा पार्वतीचा स्वीकार केला. मोक्षाच्या प्राप्तीसाठीं लक्ष्मी उपयोगी पडत नसून शंखादि मण्यांनींच मन निर्विकार रहातें, म्हणून रुद्राक्ष व शंखमणी यांची किंमत ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें फार मोठी आहे. अशा पवित्र अलंकाराला टाकून त्या रत्नकांचनरूपी नरकाच्या सामग्रीची आशा पार्वती कधींही करणार नाहीं. आतां पार्वतीला पुत्र नाहींत म्हणून तिनें देह दहन केला, हें तुझें म्हणणें साफ खोटें आहे. अरे! जी या साऱ्या विश्वाची जननी, सर्व प्राणिमात्र जिनें निर्माण केले आहेत, मनांत आल्याबरोबर मानसपुत्र निर्माण करण्याची शक्ति जिच्या अंगीं आहे, त्या आदिमातेला पुत्र नाहींत म्हणून तिनें देह दहन केला, असें मूर्ख व कपटी यावांचून कोणीही म्हणणार नाहीं. ती आपल्या पतीवर राग करील, असें कधींहि होणार नाहीं. ती महासाध्वी शंकरावर इतकें प्रेम करीत असे किं, तिनें त्यांच्या अर्ध्या शरिरांत वास केला होता. पार्वती ही माया असून शंकर हे ब्रह्म आहेत, तेव्हां माया ही ब्रह्मावर रागावेल असें कधीं तरी होईल काय? पार्वती ही श्रुति असून शंकर हे ओंकार आहेत. एखादे वेळीं सूर्य पश्चिमेला उदय पावेल, प्रकाश व छाया हीं एखादे वेळीं दूर होतील, पण पार्वती शंकरावर कधीं रागावणार नाहीं. हे दक्ष प्रजापते! तूं फारच अज्ञानी आहेस, निंद्य कृत्य करून आणखी तें जिरविण्याचा प्रयत्न करीत आहेस. तूं जर शंकरांना प्रसन्न करण्याचा प्रयत्न न केलास, तर तुझ्या विटंबनेस पारावार उरणार नाहीं. शंकरांनीं वीरभद्राबरोबर प्रचंड सैन्य देऊन त्यास तुझ्या पारिपत्त्यासाठीं पाठविलें आहे. तेव्हां त्या शंकरांनां मुकाट्यानें शरण जाऊन त्यांनां हविर्भाग दे, आणि त्यांची क्षमा माग. आणखी तसें करण्याची इच्छा नसल्यास युद्धाला तयार हो."

## ३ दक्षप्रजापति व वीरभद्राचें युद्ध.

अनेक कारणांमुळें उन्मत्तपणा प्राप्त झालेल्या पुरुषाला उपदेश रुचत नाहीं. व त्याला अशा उपदेशानें कांहीं बोध न होतां तो उलट अधिक क्रुद्ध होऊन अविचारी कृत्याला मात्र प्रवृत्त होतो; तशी दक्षाची स्थिति झाली होती. चंडीशाच्या उपदेशाचा दक्षावर असाच परिणाम झाला. त्यानें आपला अपराध कबूल न करितां उलट तो चंडीशावर रागावला, व त्याला ह्मणाला; "चंडीशा सिंह स्वस्थ बसलेला आहे असें पाहून जंबुकांनीं त्याच्यापुढें वेडेचार करणें हें अप्रशस्त होय. वीरभद्रासारखीं घुंगुरडीं केवळ आपला प्राण देण्यासाठीं व्यर्थ युद्धाला येत आहेत. मी आपला शब्द कधींही मागें घेणार नाहीं. मजकडून

शंकराला कधींहि हविर्भाग मिळणार नाहीं. प्रत्यक्ष शंकरानें येऊन माझी कितीहि विनवणी केली, तरी हविर्भाग मिळणार नाहीं. तुमची युद्ध करण्याची इच्छा असल्यास माझीहि तयारी आहे, पण तुम्हीं व्यर्थ मराल, याचा विचार करा." दक्षानें अशी गर्जना केल्यावर चंडीश तेथून निघाला, व भद्रावतीस येऊन त्यानें झालेली हकीकत वीरभद्राला सांगितली. तो त्या दक्षाचा उन्मत्तपणा ऐकून वीरभद्राला साहजिक फार क्रोध आला, व त्यानें नौबत वाजवून सैन्यास कूच करण्याचा हुकूम दिला. शिवगणांनीं आपापलीं शिंगें फुंकल्याबरोबर सर्व सैनिक आपआपलीं शस्त्रें व वाहनें घेऊन सज्ज झाले, व त्यांनीं कूच करण्यास आरंभ केला. तिकडे दक्षानेंहि आपलें सर्व सैन्य तयार केलें व 'पूपा' याला सेनापति नेमून युद्धाकरितां त्याची रवानगी करून दिली, परंतु दक्षाचे सैन्याला शुभ शकून न होतां, अशुभ शकून होऊं लागले. कोल्हे दिवसा ओरडूं लागले, कावळे करकर करूं लागले, व छाया शिरावांचून दिसूं लागली. या अपशकुनांमुळें दक्षाच्या सैन्याचें धैर्य खचून गेलें, तथापि तसेच पुढें कुच करून त्यांनीं वीरभद्राचे सैन्याला गांठलें. दक्षप्रजापतीचें सैन्य पाहिल्याबरोबर वीरभद्राचे सैन्याला विलक्षण स्फुरण चढलें. व तें प्रजापतीचे सैन्यावर मोठ्या वेगानें विजेप्रमाणें जाऊन पडलें. त्या वेळीं, उभय सैन्याच्या धुमाकुळीनें ब्रह्मांडाचा प्रळय होतो किं काय, असा भास झाला. धुळीनें दिशा धुंद होऊन सूर्य दिसेनासा झाला. काळोख पडल्यामुळें एकमेकांचे वीरहि ओळखूं येईनात. शंखाच्या नादानें आकाश दुमदुमून गेलें. परस्परांच्या शस्त्रांचे शस्त्रांवर आघात झाल्यामुळें ठिणग्या निघून त्या अंधारांत चमकूं लागल्या. शिववीरांनीं पहिल्याच चकमकींत दक्षाचे हजारों वीर मारून, रणक्षेत्रावर मांसाचा चिखल करून टाकला. त्यांतून रक्त नदीप्रमाणें वाहूं लागलें, व हाडांचें चूर्ण त्या नदींतील वाळूच आहे किं काय असें वाटूं लागलें. शिवसैन्याचा तो पराक्रम पाहून दक्षाचे मांडलिक राजे, गंधर्व, दिक्पाळ मोठ्या त्वेषानें शिवसैन्यावर धांवून आले, तो प्रकार पाहून नंदी त्या सर्वांवर वेगानें धांवून गेला, तेव्हां त्याला भग्नवीर आडवा होऊन म्हणाला; "अरे नंदीबैला! तुझें काम भार वाहण्याचें आहे, तें तूं सोडून या युद्धाच्या गर्दींत कशाला आलास? बाहेर रानांत जाऊन गवत खाऊन स्वस्थ बसावयाचें टाकून ही लढाईची बुद्धि तुला कोठून सुचली." मग नंदी म्हणाला; "अरे भग्नवीरा! तूं खरा वीर असल्यास बोलण्यांत वेळ न घालवितां युद्धालाच आरंभ करशील." असें म्हणून नंदीनें मस्तकाची धडक मारून भग्नवीराचे कित्येक हत्ती व घोडेस्वार लांब फेंकून दिले. तें नंदीचें कृत्य पाहून भग्नवीरानें आपला रथ नंदीचे आंगावर घातला, व आपली गदा गरगर फिरवून ती नंदीचे मस्तकावर मारिली, परंतु नंदीनें तो घाव सहन करून मस्तकाची

धडक भग्नवीराचे रथावर मारिली त्याबरोबर भग्नवीराचा रथ घोड्यासह पालथा होऊन भग्नवीर मोठ्या कष्टानें रथाखालून बाहेर पडला. इतक्यांत मणिमंत भग्नवीरवर धावून आला, परंतु त्यास अडवून नंदी ह्मणाला; "मणिमंता! या भग्नवीराबरोबर मी युद्ध करीत आहें, तेव्हां तूं दुसरे वीराबरोबर युद्ध कर, एकाच वीरावर दोघं [illegible] युद्ध करूं नये, अशी युद्धनीति आहे, असें म्हणून नंदीनें मणिमंताला [illegible]न दिलें, व आपण भग्नवीराबरोबर युद्ध करूं लागला. नंदीनें पुन्हां [illegible] मारली व भग्नवीराला मूर्छित केलें; तथापि तो भग्नवीर [illegible] सांवरून तसाच उठला, व त्यानें चंद्रबाण नंदीवर सोडला [illegible] तो सहज चुकविला. तेव्हां भग्नवीर वाघ झाला व तो नंदीचे [illegible] धावून आला, व त्याला आपल्या तीक्ष्ण नखाच्या पंजानें चपेटा मारूं [illegible]ला. नंदीचें त्या वाघापुढें कांहींहि चालेना. हा प्रकार दुरून वीरभद्रानें [illegible]हून त्यानें तेथूनच भग्नवीरावर मंत्र टाकिला, व त्याचें तें व्याघ्रस्वरूप नाहींसें करून टाकिलें. भग्नवीराला पूर्व स्थितींत पाहिल्याबरोबर नंदीला अत्यंत त्वेष आला, व त्यानें भग्नवीराला धडका मार मारून अगदीं हैराण केलें, आणखी कांहीं धडका नंदीनें मारल्या असत्या तर तो भग्नवीर मरून गेला असता. पण तो नंदीला शरण गेला, व मला जीवदान दे असें म्हणाला. तेव्हां नंदीनें त्याला आपल्या पुच्छानें बांधून आपल्या पाठीवर बसविलें व तो त्याला घेऊन निघाला. तेव्हां शिवगणांनीं नंदीचा मोठा जयजयकार करून शंख वाजविले, व इत्यादि रणाणून सोडिल्या. [illegible]राला अशारीतीनें पकडल्यावर दक्षाचे सैन्यांत एकच हाहाःकार उडाला. भग्नवीर पकडल्याबरोबर त्यानें सैन्य रणभूमीला पाठ दाखवून जिवाच्या आशेनें पळत सुटलें, तेव्हां दक्ष सैन्याचा मुख्य सेनापति पूषा तेथें धावून आला व त्यानें आपल्या सैन्याला माग[illegible] [illegible]ळांच्या मस्तकावर बसून [illegible] वर निकराचा हल्ला केला, पण तो हल्ला चं[illegible] घेऊन ते फेंकून [illegible] पूषाला आव्हान करून त्याच्याबरोबर युद्ध करूं लागला. दोघेहि सारखेच पराक्रमी होते, शस्त्रास्त्रविद्येंत दोघेही निपुण होते, दोघेही सारखेच शक्तिसंपन्न होते. [illegible] दोघांचा युद्धचमत्कार पाहून सर्व सैन्य थक होऊन गेलें. परस्परांच्या बाणांनीं विंधिल्यामुळें दोघांचींही धनुष्यें निरुपयोगी झालीं, परस्परांचीं तलवारीचें युद्ध चालल्यावर त्या तलवारीहि निरुपयोगी झाल्या, तेव्हां गदायुद्धाला आरंभ झाला, परंतु दोघेहि गदायुद्धांत निपुण असल्यामुळें गदेचे प्रहार चुकवून प्रहार गदेवर घेत; यामुळें दोघांच्या गदा मोडून गेल्या. तेव्हां चंडिशानें पूषाचे तोंडावर मुद्गल मारला; पण पूषानें तत्काळ त्या मुद्गलाचे दोन तुकडे करून टाकिले. मग चंडिशानें पूषावर चक्र फेंकलें, पण पूषानें वाटेंतच त्याचा भेद केला. अशा रीतीनें दोघेही निःशस्त्र झाल्यावर एकमेकांवर ते दगड फेकावयाला लागले; पण दोघेही दगडानें दगडांचा नाश करूं लागले. तेव्हां दोघांनीं

मल्लयुद्ध करण्यास आरंभ केला. पेंचावर पेंच लढवून एकमेक मोकळे होऊं लागले, तेव्हां चंडीशानें नागपेंच घालून पूषाला चीत केलें, व त्याला जिवंत धरून तो आपल्या सैन्यांत घेऊन चालला. याप्रमाणें दक्षाच्या सैन्याचा मुख्य सेनापति शिव सैन्यानें पकडल्यावर शिवगणांनीं चंडीशाचा जयजयकार क[illegible] आकाशमंडप दणाणून टाकिला. सर्वांना मोठा आनंद झाला, [illegible] चंडीशाला आलिंगन देऊन त्याचा मोठा गौरव केला. तिकडे पू[illegible] त्याबरोबर दक्षाचें सैन्य भयानें व्याकूळ झालें व जो तो आपापला [illegible] रणक्षेत्रांतून पळून गेला. अशा रीतीनें दक्षसैन्य निघून गेल्यावर [illegible] त्यांचा गजर करित मोठ्या जयजयकारानें मागें परतलें; आणि रण[illegible] लेल्या मेदमांसावर गृध्रादि पक्ष्यांची मेजवानी सुरू झाली.

---

## अध्याय ११ वा.

### १ वीरभद्र व दक्ष यांचें युद्ध.

वीरभद्रानें रात्रभर आपल्या सैन्याला विश्रांति दिली, दुसरे दिवशीं सूर्योदय झाल्यावर त्यानें आपलें सैन्य सज्ज करून, बृहस्पति नगराकडे दक्षप्रजापतीचा नाश करण्यासाठीं कूच केलें. इकडे यज्ञमंडपांत रणभूमीवरून पळून आलेल्या सैनिकांनीं घडलेली एकंदर दुःखकहाणी कथन केल्यावर सर्वांचीं तोंडें कलाहीन होऊन गेलीं, आणि या संकटांचें निवारण आतां कसें करावयाचें याचा सर्वजण विचार करूं लागले. दक्षाला तर काय करावें तें समजेना. भग व पूषा या पराक्रमी सेनापतींना वीरभद्रानें जिवंत पकडल्याचें वर्तमान ऐकून त्याला अत्यंत व[illegible] तो फार क्रुद्ध झाला. हलकाऱ्याकडून त्यानें तत्क्षणी [illegible] सैन्याला भाजूळ, इंद्र, यम, चंद्र, वरुण, वगैरे देवांना बोलावून युद्ध करण्याचा विचार चालविला. तो ह्मणाला, "देवेंद्रादि लोकपालहो, मी हा यज्ञ केवळ तुह्मांस हविर्भाग मिळावा ह्मणून व ब्राह्मणांना संतोषित करावें ह्मणून करित आहें. अशा प्रकारचें सत्कृत्य कितीहि विघ्नें आलीं तरी पूर्ण करणें हा वीरांचा धर्म होय; त्याप्रमाणें मी हा यज्ञ, शंकरानें कितीही मोडण्याचा प्रयत्न केला, तरी शेवटास नेणारच. तुह्मां सर्वांचें साह्य असल्यास आपण आतां त्या वीरभद्राचा नाश करून व भग व पूषा यांना सोडवून आणून यज्ञ पूर्ण करूं." दक्ष प्रजापती यज्ञमंडपांत बसून याप्रमाणें भाषण करित आहे, तोंच वीरभद्राचें सैन्य क्षिप्रा नदीचे कांठीं येऊन थडकलें, व त्याच्या रणवाद्यांचा ध्वनि यज्ञमंडपांत स्पष्ट ऐकूं येऊं लागला; तेव्हां दिक्पाळांनीं दक्षप्रजापतीला यज्ञमंडपांत बसावयाला सांगून, आपणाबरोबर रथ, हत्ती, घोडे, वगैरे असंख्य चतुरंग सेना घेतली; व ते वीरभद्राला अडवून धरण्यासाठीं बृहस्पतिनगराचे बाहेर पडले.

भृगुऋषी, व अन्य अनेक मंत्रविद्या जाणणारे ब्राह्मणही दक्षिणेसाठीं दक्षाचा अभिमान धरून यज्ञमंडपांतून बाहेर पडले; व मंत्रशक्तीनें वीरभद्राच्या सैन्याचा नाश करण्याच्या उद्देशानें ते वीरभद्राकडे हातांत दर्भाच्या काड्या घेऊन धांवूं लागले. तो मंत्रशक्तिसंपन्न ब्राह्मणसमुदाय व युद्धविद्याविशारद असा सैन्यभार पाहून, शिवगणांनीं शंख वाजवून आपल्या सैन्यास सूचित केलें. तत्काळ दोन्ही सैन्यें एकमेकांस भिडलीं, व अत्यंत भयंकर अशा युद्धाला आरंभ होऊन एकमेकांच्या शरभारांनीं सूर्य दिसेनासा झाला. क्षिप्रानदीला रक्ताची नदी जाऊन मिळाली, त्यांत शिरकमळें व अन्य अवयव वहात चालले. खड्गांच्या खणखणाटांनीं ठिणग्यांचा वर्षाव होऊन पटापट वीरांचे अवयव शतखंड होऊं लागले. कित्येक वीरांचीं कबंधें शिरावांचूनच धांवत सुटलीं. नंदी व मणिमंत यांनीं दक्षाच्या सैन्यावर निकराचे हल्ले करून सर्व सैन्याची दाणादाण करून टाकिली. तेव्हां इंद्रानें व वरुणानें आपआपले हत्ती व घोडे त्या दोघांच्या अंगावर घालून नंदीला व मणिमंताला मागें रेटीत रेटीत नेलें. घोडयांच्या टापांनीं व हत्तींच्या शुंडांनीं वीरभद्राचें सैन्य हैराण होऊन तें मागें परतूं लागलें; परंतु वीरभद्रानें त्यास थांबवून धरून झोटिंग जखिणी दक्षसैन्यावर सोडून दिल्या. त्या झोटिंग जखिणींनीं दक्षसैन्याची दाणादाण करून अनेक वीरांचीं मस्तकें धडापासून निराळीं केलीं. त्या सैनिकांचे रिकामे झालेले घोडे व हत्ती सैरावैरा धांवूं लागले, रणांगणावर एकच गर्दी होऊन गेली, वीरांच्या जयसूचक ध्वनींनीं दिशा कोंदून गेल्या, आणि जणूं काय रणदेवता प्रसन्न होऊन वीरभद्राला आशीरवादच देत आहे असें वाटलें. अशा त्या उत्साहजनक प्रसंगामुळें शिवसैन्यांतील वीरांनां विलक्षण स्फुरण चढलें व त्यांनीं ज्याप्रमाणें कोयत्यानें केळी कापाव्या त्याप्रमाणें शस्त्रांनां दक्षवीर कापून काढले. झोटिंग व जखिणी दिक[illegible]नां प्रकारच्या चेष्टा करूं लगल्या. कोणाचे मुकुट [illegible] घ्यावे, [illegible]वीं वस्त्रें घेऊन तीं फाडून टाकावीं, दोघांदोघांना एकाच ठिकाणीं बांधावें, कोणाचे पाय बांधून त्याला फरफरा ओढावें किंवा उफराटें टांगावें, अशा चेष्टा करून त्यांनीं दक्षाच्या मृतवीरांचीं शस्त्रें घेतलीं व त्यांच्याच वाहनावर बसून दक्षवीरांनां सळो की पळो करून सोडिलें. त्या भयंकर प्रकारानें दक्षसैन्य भयभीत होऊन मोठ्या विवंचनेंत पडलें, इतक्यांत महेंद्र रथाखालीं पडला. प्रत्यक्ष देवेंद्राची जेव्हां अशी स्थिति झाली तेव्हां हा वीरभद्र नसून काळच आमचे प्राण हरण करण्यासाठीं आला आहे असें वाटून दक्षसैन्य वाट सांपडेल तिकडे पळत सुटलें. त्या गर्दींत असंख्य घोडे, हत्ती, रथ वगैरे शिवदूतांनीं लुटून आणिले ती खेदकारक पराजयाची वार्ता दक्षप्रजापतीचे कानावर गेल्याबरोबर तो हताश झाला, आपला काळ फिरला असें त्याला वाटूं लागलें. तो भृगुऋषीला ह्मणाला “ अहो भृगुऋषी ! आह्मीं शार्ङ्गधरासाठीं हा यज्ञ करित असून त्या शार्ङ्ग-

धराला आमची लाज राखण्याची कांहींच काळजी नाहीं हें कसें ? अहो ! हा तर सर्वच प्रकार उलटा होत आहे. काचमण्याचा प्रकाश रत्नापेक्षां अधिक पडावा, किंवा काजव्यानें सूर्याला लाजवावें, मातीनें सुवर्णाला फिकें ठरवावें, किंवा रंकानेंच राजाचा पराजय करावा, किंवा उंदरानें सिंहाला धरावें, त्या प्रमाणें त्या पिशाचांनीं दिक्पाळांचा नाश केला, झोटिंगांनीं महेंद्राला जिंकिलें, अहो भृगुऋषि ! हें अपमानाचें दुःख मरणापेक्षांहि अधिक तापद होय. या वेळीं काय करावें तें मला तर कांहींहि सुचत नाहीं. मी आपलें शरीर, संपत्ति व सैन्य यज्ञासाठीं खर्च करण्याचें योजिलें आहे. त्याप्रमाणें पैसा तर मी खर्च केलाच आहे, सैन्याचाहि उपयोग केला आहे, आतां हें शरीर खर्ची घालून हा याग पुरा केला पाहिजे. " दक्षप्रजापति असें ह्मणाल्यावर भृगुऋषि ह्मणाले; " राजा ! तूं मुळींच काळजी करूं नको, मी मंत्रशक्तीनें आतां सर्व शिवसैन्याचा नाश करून टाकितों. " असें ह्मणून भृगूनें आपल्या हातांत उदक घेतलें व तें मंत्रून अग्नीवर टाकिलें. त्याबरोबर असंख्य विक्राळ वदनाचे ऋषभ हातांत अग्निशस्त्रें घेऊन निर्माण झाले व ते भृगूला काय आज्ञा आहे, ह्मणून विचारूं लागले. तेव्हां भृगूनें त्यांना शिवसैन्य दाखविलें व त्यांचा नाश करण्यास सांगीतलें. परंतु मातीच्या कच्या घड्यामध्यें पाणी ठेवण्याचा प्रयत्न केल्यास पाणी जसें घटाचा नाश करून बाहेर पडतें, त्याप्रमाणें झोटिंग आदि भूतांनीं ऋषभांचा नाश केला. तो प्रकार पाहून भृगूनें नरसिंहाची प्रार्थना केली, व बीजमंत्रानें आवाहान करून बाण सोडिला. त्याबरोबर अनेक नरसिंह निर्माण झाले व ते भूतांनां नाहींसे करूं लागले. त्यांच्या पुढें आपलें कांहीं चालणार नाहीं असें जाणून भूतें रणांगणांवरून पळालीं व तीं पिंपळाचे झाडावर जाऊन बसलीं. भूतें पळाल्या[illegible] पुनः ऋषभ रणांगणावर आले व ते आपल्या तप्त अस्त्रांनीं वीरभद्राच्या [illegible] लागले. तेव्हां सर्वांच्या पुढें असलेलें चंडीशाचें सैन्य फार त्रस्त झालें, व तें त्या अग्नीच्या भीतीनें पळून गेलें व त्यांनीं नदीचा आश्रय केला. ऋषभांनीं याप्रमाणें चंडीशाच्या सैन्याला पळविल्यावर दक्षाचे सैन्याला पुनः धैर्य आलें व ते रथ, घोडे, हत्ती, सज्ज करून त्वेषानें वीरभद्राचे सैन्यावर येऊं लागले. त्या वेळीं नंदीनें शिवाच्या चकोरांचें स्मरण केलें. त्याबरोबर तेथें शिवचकोर प्राप्त होऊन त्यांनीं त्या ऋषभांचीं सर्व अग्न्यस्त्रें खाऊन टाकिलीं. जोंपर्यंत दक्षाकडे भृगुऋषी आहे, तोंपर्यंत आपणास जय प्राप्त होणार नाहीं, असें ओळखून मणिमंत भृगूवर अत्यंत क्रुद्ध झाला व तो भृगूच्या नाशाचा प्रयत्न करूं लागला. ब्राह्मण हा सर्वांना वंद्य असून त्याची हत्या कोणीही करूं नये, परंतु तो जर अविचारी व दुर्जन असेल, तर तो निंद्य ठरवून त्याचा खुशाल नाश करावा, असें शास्त्र आहे. त्या प्रमाणें तो भृगुऋषी ब्राह्मण खरा, परंतु दुष्टांचा सहायक असल्यामुळें मणिमंतानें आपली शुंडा त्याच्याकडे

वळविली. जीवजंतूवर दया करावी असा मनुष्याचा स्वभाव आहे, परंतु पोटांत जंत झाल्यास त्याचें कोणी संरक्षण न करितां औषधाच्या योगानें त्यांचा नाश करितात. त्या प्रमाणें भृगुऋषि शिवसैन्याला त्रास देत असल्यामुळें मणिमंत क्रुद्ध होऊन भृगूवर धांवून गेला व त्यानें भृगूला क्षणार्धांत शुंडेनें धरून शिवसैन्यांत झुगारून दिलें. शिवगणांनीं त्याला पकडून दरभाच्या दोरखंडांनीं गच बांधिलें.

## २. वीरभद्राचा पराक्रम.

दक्ष प्रजापतीला भृगूऋषीचा मोटा भरंवसा होता, आणि तशी भृगुऋषीच्या अंगीं शक्तिही होती. केवळ मंत्रानें ज्यानें हजारों शरभ व ऋषभ निर्माण केले, त्या भृगूला मणिमंतानें धरल्याचें ऐकून दक्षाचें धैर्य खचून गेलें, तथापि तो पुरा प्रयत्नवादी होता, कितीही संकटें आलीं तरी, आयुष्याच्या शेवटच्या निमिषार्धापर्यंतहि प्रयत्न करावयाचा, असा तो विलक्षण दृढ निश्चयाचा होता. त्या वेळीं कसें करूं काय करूं, याचा विचार न करितां त्यानें शक्य तितकें सैन्य गोळा करून एकदम युद्धाची तयारी केली. त्या राजाचा सुमति नावाचा प्रधान होता, तो आपल्या नावाप्रमाणेंच सुमति होता. तो राजाला ह्मणाला: " महाराज ! विपत्तिकाळ हा केव्हां कोणावर येईल याचा कांहीं देखील नियम नाहीं, तथापि प्रसंगीं धैर्य न सोडतां कांहीं धनाचा व्यय करून दानधर्म करावा. कारण असें ह्मटलें आहे किं—

आपदर्थे धनं रक्षेद्दारान् रक्षेद्धनैरपि ॥
आत्मानं सततं रक्षे दारैरपि धनैरपि ॥ १ ॥

तसेंच शक्य तितका प्रयत्न करून स्वतःच्या शरिराचेंहि संरक्षण करावें. जों पर्यंत आपणाजवळ आपले सेवकजन आहेत, जोंपर्यंत आपला परिवार आहे, तोंपर्यंत आपण स्वतः युद्धाला जाऊं नये, पुत्र व कन्या यांना देऊनहि स्वतःच्या शरिराचें संरक्षण करावें, असें शास्त्र आहे. मग आपणाजवळ तर अद्यापि पुष्कळ सैन्य असून आपला परिवारहि आहे, तेव्हां आपण स्वतः युद्धाला जाऊं नये. राजनीति अशी आहे किं, अगोदर संधि करण्याचा प्रयत्न करावा, त्यानें कार्यभाग न झाल्यास भेदाचें अवलंबन करावें, आणि मग दान करून पराक्रमही करावा. शरीर सुरक्षित राहिल्यास राज्य, संतति व संपत्तिहीं फिरून मिळवितां येते, परंतु शरीर गेल्यास तें फिरून मिळत नाहीं. ह्मणून जोंपर्यंत आपणाजवळ आह्मांसारख्या सेवकजनांचा परिवार आहे, तोंपर्यंत आपणास याबद्दल कांहींच चिंता करण्याचें कारण नाहीं. आपल्या धन्यावर संकट आलें असतां जे सेवक आपलें स्वतःचें रक्षण करण्याचा प्रयत्न करितात ते नरकाला जातात. " सुमति प्रधानाचें हें बोलणें ऐकून दक्षाला फार संतोष

झाला, परंतु युद्धाला स्वत: जाण्याचाच त्यानें शेवटीं निश्चय केला, तो आपल्या सुमति प्रधानाला ह्मणाला, "सुमति! तुझें म्हणणें खरें आहे; परंतु सेवकांना पाठवून निभाव लागेल असें वाटत नाहीं. तो वीरभद्र महाप्रबळ असून आपणाबरोबर कित्येक अक्षौहिणी सैन्य घेऊन आला आहे. त्याचें निर्मुलन करण्यासाठीं मला स्वत:लाच गेलें पाहिजे. मागें प्रसूती, कन्या व त्यांचा परिवार आहे त्यांचें आपण संरक्षण करा, तसेंच यज्ञ व यज्ञमंडप याचाहि सांभाळ करा, युद्धांत देह पतन होणें या सारखें दुसरें श्रेयस्कर असें कांहींच नाहीं. शरिराचें संरक्षण करण्याचा प्रयत्न करावयाचा ह्मणजे तें कांहीं पुरुषाचें खरें कर्तव्य नव्हे. शरिराचें संरक्षण व युद्धांत देहपतन हें अमृत व मोक्ष याप्रमाणें आहे. अमृत हें सर्वांनां प्रियकर खरें, परंतु मोक्षाची योग्यता अमृताहून अधिक आहे. त्या मोक्षाच्या प्राप्तीला सोडून मूर्ख असेल तोच शरीरसंरक्षण करण्याचा प्रयत्न करील. याप्रमाणें सुमतीला सांगून दक्षानें युद्धाची तयारी केली व तो रणभेरी वाजत असतां मोठ्या त्वेषानें वीरभद्राचे सैन्यावर चालून गेला. दक्ष येत आहे असें पाहिल्याबरोबर सैन्यानें मोटा जयघोष करून दुंदुभी वाजविल्या. त्यांच्या महानादानें आकाश भरून गेलें, त्रिभुवन डळमळूं लागलें, घोडे किंकाळूं लागले, व हत्ती किंकाळ्या फोडूं लागले. आपआपलीं शस्त्रास्त्रें सांवरून सैनिक सज्ज झाले. याप्रमाणें तयारी झाल्यावर वीरभद्रानें आपल्या सैन्याला सूचना केली. त्याबरोबर सैन्य मोठ्या वेगानें दक्षसैन्यावर धावूं लागलें. दोन्हीं सैन्यें भिडल्यावर वीरभद्र दक्षावर क्रुद्ध होऊन ह्मणाला; "दक्षा! या युद्धाचे भानगडींत पडण्यापेक्षां तूं महादेवांना हविर्भाग देण्याचें कबूल कर, किंवा तसें करावयाचें नसल्यास यज्ञमंडप आमचे स्वाधीन कर, ह्मणजे त्यांत आह्मीं तुझाच हविर्भाग टाकून महादेवांनां संतोषित करूं." तेव्हां दक्ष ह्मणाला, "वीरभद्रा! रणांत जाऊन युद्ध करणें हा तुमचा विषय नव्हे. तुम्हीं त्या शंकराबरोबर हिंडून भीक मागत देशाटण करावें, किंवा स्मशानांत त्याच्या सन्निध बसून तो जें देईल तें भक्षण करावें, गिरिकंदरांत नागवें उघडें हिंडावें, अशा प्रकारचा जो तुमचा अमानुष व्यवसाय, तो सोडून तुला हें मरणाचे डोहाळे कां आठवले, तें मला कळत नाहीं. अरे वीरभद्रा! मजबरोबर युद्ध करून जय मिळविण्याची जर कांहीं आशा असती तर शंकरच स्वत: युद्धाला आला असता, पण मरणाच्या भीतीनें तो तिकडे गिरिकंदरांत बसून तुह्मां पोरासोरांना केवळ मृत्यूच्या स्वाधीन करण्यासाठीं त्यानें पाठविलें आहे. वीरभद्रा! तूं नुकताच काल जन्मलेला पोर, तुला ही युद्धविद्या कोठून माहित असणार? तुला आपल्या अज्ञानावस्थेमुळें युद्धांतले काठिण्य अद्यापि माहित झालेलें नाहीं; ती एक मौज आहे असें तुला वाटत असेल, पण विचार कर, माझ्या शस्त्रांनीं विव्हल झाल्यावर तुला अत्यंत पश्चात्ताप होईल, त्यापेक्षां युद्ध न करितां परत जा, मी तुला जिवंत

सोडतों." हें दक्षाचें बोलणें ऐकून वीरभद्र म्हणाला; "प्रजापते! तूं युद्ध-विद्येपेक्षां बोलण्यांतच अधिक कुशल आहेस असें मला वाटतें. मला जर प्राणाचा मोह असता तर मी इतक्या लांब आलोंच नसतों, प्राणाचा मोह सोडून मग मी युद्धासाठीं आलों आहें. कदाचित् युद्धांत मला तूं जिंकल्यास, मज पोरावर जय मिळविल्याबद्दल तुला कांहीं मोठीशी धन्यता वाटणार नाहीं. परंतु जर मी तुला जिंकिलें तर तुझ्या विटंबनेला पारावारहि उरणार नाहीं, तेव्हां ती विटंबना होऊं नये अशी इच्छा असल्यास शंकरांनां हविर्भाग देऊन मुकाट्यानें परत जा, अथवा तसें करावयाचें नसल्यास, बोलण्यांत वेळ न घालवितां एकदम युद्धास आरंभ कर. सावध ऐस, माझे वीर तुझ्यावर आक्रमण करितील त्यांचें निवारण करण्याचा प्रयत्न कर, बेसावध राहून व्यर्थ प्राण गमावूं नकोस."

कैलासपति महादेवांचा जटानंदन जो वीरभद्र त्यानें याप्रमाणें दक्ष प्रजापतीला आव्हान करून, आपलें शिवधनुष्य आकर्ण ओढिलें, व महाशक्ति प्रजापतीवर सोडिली, परंतु प्रजापतीनें त्या शक्तीचें निवारण न करितां पर्वताप्रमाणें स्थिर उभा राहून त्यानें ती महाशक्ति लीलेनें सहन केली. प्रजापतीची ती विलक्षण शक्ति पाहून वीरभद्र थक्क होऊन गेला. मग त्यानें दोनहजार बाण मोठ्या क्रोधानें दक्षावर सोडले, पण दक्षानें तत्काल ते बाण तोडून, वीरभद्राचे रथावर त्यानें सात बाण सोडिले, वीरभद्र त्या बाणांचें निवारण करणार इतक्यांत ते बाण रथावर आदळून वीरभद्राचा सारथि व घोडे निरुपयोगी झाले. त्यानंतर पुन्हां आठ बाण सोडून प्रजापतीनें वीरभद्राचा रथ मोडून टाकून वीरभद्राला रथाखालीं आणिलें. वीरभद्राच्या रथाचा नाश झाल्याबरोबर शिवसैन्यांत हाहा:कार उडाला व दक्षसैन्य जयजयकार करित वीरभद्राचे अंगावर धावून आलें. परंतु वीरभद्राच्या सैन्यानें त्या वेळीं दक्षसैन्यावर जोराचा हल्ला केला व हजारों दक्षाचे वीर कापून काढिले. दोन्हीं सैन्यें निकरानें लढूं लागलीं, शेंकडों वीर प्रत्येक क्षणीं मरूं लागले, प्रेतांचा पर्वत झाला, रक्ताचें सरोवर झालें, आणि त्यांत कमळाप्रमाणें वीरांचीं मस्तकें दिसूं लागलीं. त्वेषानें जो तो आपआपलें देहावसान विसरून गेला. प्रत्येकजण केवळ क्रूरतेच्या प्रत्यक्ष मूर्तीप्रमाणें दिसूं लागला. त्या वीरांचीं शस्त्रें यंत्राप्रमाणें चाललीं होतीं, घायाळ होऊन पडलेले वीर पाणी पाणी म्हणून टाहो फोडीत होते, गृध्रादि पक्षी झडप मारून मासाचे गोळे उचलून आकाशांत नेत होते, तें भयंकर युद्ध पाहून प्रत्यक्ष रणदेवता रणांगणावर थै थै नाचत आहे असें वाटत होतें. दक्षाचा तो विलक्षण पराक्रम पाहून वीरभद्र प्रजापतीवर अत्यंत खवळला व हातांत त्रिशूळ घेऊन, त्याच्या अंगावर धांवला. त्याला वाटेंत थांबवून धरण्याचा दक्षवीरांनीं फार प्रयत्न केला, परंतु सिंह जसा हत्तीचीं गंडस्थळें

फोडित जातो त्याप्रमाणें वीरभद्र, दक्षसैन्यांतील वीरांचीं डोकीं उडवीत उडवित प्रजापतीजवळ येऊन थडकला, आणि त्यानें दक्षाचा रथ उलथून पाडून त्याला रथाखालीं आणिलें. त्याबरोबर दक्षानें वीरभद्रावर सात बाण टाकून वीरभद्राला घायाळ केलें. त्या बाणघातामुळें वीरभद्राच्या शरीरांतून रक्त बाहेर पडून तो अरण्यांतल्या फुललेल्या पळसाप्रमाणें लाल दिसूं लागला. वीरभद्र मोठ्या त्वेषानें त्रिशूळानें प्रजापतीला मारित होता, पण प्रजापतीचे शरिरावर शस्त्राचा एक व्रणहि वठेना. मग वीरभद्रानें शंकराची स्तुति करून प्रजापतीवर अग्नि-चक्र टाकिलें. तें विजेप्रमाणें भयंकर चक्र प्रजापतीकडे येण्याबरोबर प्रजापतीनें पर्जन्यास्त्र सोडून त्या अग्निचक्राची गति खुंटवून टाकिली. तेव्हां वीरभद्रानें वायव्यास्त्र सोडिलें, तें अस्त्र सुटण्याबरोबर प्रलयकाळच्या वाऱ्याप्रमाणें भयंकर वारा सुटला व दक्षावर दगडधोंडे व वृक्ष यांची वृष्टि होऊं लागली, परंतु इतक्यांत दक्षानें पर्वतास्त्र निर्माण करून वायव्यास्त्राची गति खुंटविली. प्रजापती, याप्रमाणें तोडीला तोड भिडवित आहे, असें पाहून वीरभद्रानें शस्त्रास्त्रें टाकून दिलीं, व तो दक्षाबरोबर मल्लयुद्ध करूं लागला. दोघेहि सारखे शक्ति-संपन्न असल्यामुळें कोणीहि हार जाईना. एकदां तर दक्षानें वीरभद्राला आपल्या आंगाखालीं घातलें होतें, पण मोठी चपलता करून वीरभद्रानें तो पेंच सोडविला, व त्यानें दक्षाला आपल्या आंगाखालीं घातलें. वीरभद्र त्याच्या विशाल छातीवर बसून त्याला जोरानें बुक्या मारूं लागला, परंतु त्याचा प्रजापतीवर कांहींच परिणाम झाला नाहीं. मग वीरभद्रानें कमरेची कट्यार काढून तिनें तो दक्ष प्रजापतीचा कंठ कापूं लागला, परंतु दगडावर हत्यार जसें बोंथट होतें, त्या प्रमाणें ती सुरी निरुपयोगी होऊन, दक्षाचें मस्तक चक्राप्रमाणें गरगर फिरूं लागलें! त्या विलक्षण प्रकारामुळें वीरभद्र अत्यंत विस्मित झाला. त्यानें मस्तक कापण्यासाठीं अनंत उपाय केले, परंतु एकहि लागू पडेना, मग वीरभद्राचे असें लक्षांत आलें कीं, याच्या उदरांत अमृत असल्यामुळें हा मरत नसावा; तेव्हां वीरभद्रानें पायाच्या भारानें त्याचें हृदय दाबून धरलें व नंतर दोन्हीं हातांनीं प्रजापतीचें शिर पिळवटून धडापासून उपटून काढिलें.

### ३. यज्ञकुंडांत दक्षशिराची आहुति.

याप्रमाणें वीरभद्रानें तो प्रतापशाली वीर दक्ष मारल्यावर दक्ष सैन्यांत एकच हाहाःकार उडाला. दक्षवीर अश्रु गाळित गाळित रणांगणावरून पळून गेले, त्यावेळीं रणक्षेत्रांत वीरभद्राची मूर्ति अत्यंत भयप्रद अशी दिसत होती. दक्षप्रजा-पतीचें मस्तक पिळवटून उपटल्यामुळें दक्षाचे शरिरांतून रक्ताचे फवारे उडाले, व त्यामुळें वीरभद्र रक्तगंगेंत स्नान केल्याप्रमाणें दिसूं लागला. मस्तकावरील कृष्ण वर्णाचे केंस रक्तानें लाल होऊन ते त्याच्या पाठीवर पडले होते. त्याचा सर्व

पोषाक रक्तवर्णाचा होऊन मुखहि रक्तानें लाल झालें होतें. एका हातांत दक्षाचें शिर असून दुसरे हातांत रक्तानें भरलेली कटयार होती. अशी ती वीरभद्राची भयंकर मूर्ति पाहून सर्वांचीं हृदयें थरथर कांपूं लागलीं. दक्षप्रजापती मेल्याबरोबर सर्व शिवसैन्याला मोठा आनंद झाला. भुतें आनंदानें नाचून रणक्षेत्रांवरील मांसाचा चिखल एकमेकांच्या अंगावर फेंकित होतीं, दुंदुभी वाजत होत्या, जयजयकारानें आकाश दुमदुमून गेलें होतें, त्यावेळीं वीरभद्र आपणाबरोबर आपलें सैन्य घेऊन वाद्यांच्या गजरांत मोठ्या थाटानें दक्षप्रजापतीच्या यज्ञमंडपांत आला. तेथें यज्ञकुंड प्रदीप्त असून कांहीं ब्राह्मण त्या यज्ञकुंडांत आहुत्या देत होते, पण ती वीरभद्राची विलक्षण मूर्ति व तें त्याचें प्रचंड सैन्य पाहिल्याबरोबर ते ब्राह्मण यज्ञमंडपाच्या बाहेर पडून वाट फुटेल तिकडे पळत सुटले. परंतु झोटिंग जखिणी त्यांना आडव्या झाल्या व त्यांनीं त्यांची अत्यंत विटंबना केली. त्या त्यांच्या मस्तकावर बसून त्यानां चावूं लागल्या, त्यांचीं वस्त्रें फाडिलीं, पात्रें फोडून टाकिलीं, आणि परिधान केलेलीं वस्त्रें सोडून घेऊन तीं दूर झुगारून दिलीं. इकडे यज्ञमंडपांत यज्ञाजवळ वीरभद्र दक्षाचें शिर घेऊन बसला, व त्यानें भग्नवीराला पुढें बोलावून तो त्याला ह्मणाला, "नीचा! या सर्व प्रकारास मूळ तूं आहेस. दक्षप्रजापतीला पाहून महादेव उभे राहिले नाहींत, ह्मणून तूंच दक्षाला खुणावून चिथविलेंस. ज्या डोळ्यांनीं तूं खुण केलीस ते तुझे डोळे काढून त्याची प्रथम यज्ञकुंडांत आहुती देतों. असें ह्मणून वीरभद्रानें दूताकडून भग्नाचे डोळे काढिले व ते यज्ञकुंडांत टाकून दिले. नंतर भृगु ऋषीला त्याचप्रमाणें बोलून त्याच्या दोन्हीं मिशा काढल्या व यज्ञकुंडांत टाकून दिल्या. जे ब्राह्मण शंकराची विटंबना पाहून हांसले होते, त्यांचे दांत पाडून ते यज्ञकुंडांत टाकून दिले. नंतर दक्षप्रजापतीचें शिर टाकिलें. याप्रमाणें त्या यज्ञाची दुर्दशा झाल्यावर यज्ञकुंडांतून यज्ञपुरुष हरिणाचें रूप घेऊन बाहेर पडला व तो तेथून पळूं लागला. त्याला धरण्यासाठीं शिवसैन्य त्याच्यामागें लागलें होतें, परंतु त्यानें मार्गांत बद्रिका पर्वत टाकून दिला. पुढें वीरभद्रानें यज्ञमंडपाला आग लावून दिली व तो इंद्रवरुणादि देवांजवळ हविर्भाग परत मागूं लागला. देवांनीं त्याचा तो पराक्रम पाहून मुकाट्यानें आपआपले हविर्भाग त्याच्या स्वाधीन करून आपली सुटका करून घेतली. यज्ञकुंडांतून यज्ञपुरुष निघून गेल्यावर भूतांनीं मलमूत्रांनीं ते यज्ञाचे अग्नि विझवून टाकिले, नंतर वीरभद्र रणक्षेत्रावर आला व त्यानें आपल्या अंगांतील रक्त रणक्षेत्रावर शिंपून दोन्ही सैन्याचे वीर जिवंत केले. हे वीर जिवंत होण्याचें कारण असें होतें किं, वीरभद्राच्या शरीरांत सर्व अमृत होतें. त्यावेळीं फक्त दक्षप्रजापति व यज्ञाचा बोकड हे दोघे सजीवन झाले नाहींत; कारण दक्षाचें शिर यज्ञकुंडांत जळालें होतें व आहुतीसाठीं आणलेल्या बोकडाचें

मस्तक कायम असून शरीर हवनासाठीं नाहींसें झालें होतें. असो, मग वीरभद्रानें सर्व दक्षसैन्याला सोडून दिलें व तो रणवाद्यांच्या गजरांत मोठ्या समारंभानें कैलास पर्वतावर निघून गेला."

---

# अध्याय १२ वा.

## १ प्रसूतीचा अग्निप्रवेश.

दक्षप्रजापति रणांत पडल्यावर त्याचे राहिलेले सैनिक रणांगणावरून पळाले व राजवाड्यांत निघून आले. त्या दक्षप्रजापतीचा परिवार मोठा होता. प्रसूती नावाची त्याची स्त्री असून, त्याच्या एकुणसाठ मुली व त्या मुलींचे कन्यापुत्र वगैरे त्याच्या परिवारांत अनेक लोक होते. ती स्त्री व त्या मुली वगैरे रणक्षेत्रावरून काय बातमी येते याची अगदीं वाट पहात बसल्या होत्या. मनुष्याच्या स्वभावधर्माप्रमाणें मन चिंती तें वैरी न चिंती, याप्रमाणें त्यांच्या मनांत त्या युद्धाविषयीं अनेक विचार घोळत होते, या सर्व अनर्थाचें मूळ त्या मुलींनीं दाक्षायणीला दरिद्रावस्थेंत पाहून तिची अवहेलना केली होती हें होतें. तो विचार त्या मुलींच्या लक्षांत आला ह्मणजे त्यांनां अगदीं मरणप्राय दुःख होत होतें. आपल्या पित्याच्या सैन्याचा, द्रव्याचा, काळाचा, व स्वतःच्या शरीराचा दुरुपयोग केवळ आपण दाक्षायणीचा मानभंग केला ह्मणून होत आहे, तेव्हां पित्याला अशा रीतीनें त्रास देण्यास आपण कारणीभूत झालों आहों, हें त्या मुलांच्या क्षणोक्षणीं मनांत येऊन त्यांनां फार वाईट वाटत असे. अशाप्रकारें दक्षप्रजापतीचा परिवार काय होतें आणि नाहीं, या फिकिरींत असतां राजवाड्यांत एकाएकीं रणक्षेत्रावरून कांहीं राजदूत पळून आले. ते काळवंडलेले, चेहरे दुःखी असलेले, वाड्यांत पाऊल टाकल्यावरोवर डोळे अश्रूंनीं भरून आलेले, असे राजदूत पाहिल्यावर त्या मुलींचीं अंतःकरणें चूर होऊन गेलीं, व आकाशांत मेघांचें तुफान चाललें असतां वरून वीज पडण्याची जशी भीति वाटते त्याप्रमाणें आतां आपल्या कानावर कांहीं तरी अशुभ वार्ता पडणार, अशी त्यांनां भीति वाटूं लागली; ते सैनिक मोठ्या कष्टानें एकेक पाऊल टाकित टाकित दुःखभारानें क्लांत होऊन मध्येंच थबकत थबकत जेथें राणी बसली होती तेथें आले. त्यावेळीं तो राजाचा एकंदर परिवार पाहून त्या दूतांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या आणि त्यांच्यापैकीं, कोणाच्याच तोंडांतून एक शब्दही निघेना. अशा स्थितींत असलेले ते राजदूत आपणास कोणती बातमी सांगणार याचें अनुमान प्रसूतीला व त्या राजकन्यांना सहज करितां आलें. त्यांचीं हृदयें दुःखानीं दाटून आलीं, डोळे अश्रूनीं भरून आले, आणि त्या हताश दृष्टीनें राजदू-

तांकडे पाहूं लागल्या. एक राजदूत मोठ्या कष्टानें अश्रू गाळित आर्त स्वरानें ह्मणाला; "राणीसाहेब ! आपल्या कानावर एक अत्यंत अशुभ वार्ता घालण्या-सार्टी आह्मीं आलों आहींत; ती दुःखकारक बातमी सांगण्यास जीभ हालत नाहीं, परंतु सांगितल्या वाचूनहि इलाज नाहीं; त्या वीरभद्रानें दक्षप्रजापति महा-राजांनां मल्लयुद्धांत चित केलें; तो निर्दय शस्त्रांनीं त्याचें मस्तक कापूं लागला पण तें कापेना, ह्मणून त्यानें तें पिळवटून तोडलें व यज्ञमंडपांतील यज्ञ-कुंडांत टाकून दिलें. अशा रीतीनें दक्षप्रजापति महाराज आपणा सर्वांनां सोडून परलोकीं गेले." त्या राजदूतांनीं ही अशुभ वार्ता, राणी व राजाचा अन्य परि-वार, यांच्या कानावर घातल्यावर त्या राजवाड्यांत जो आकांत उडाला त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. राणी शोकविव्हल होऊन दुःखानें वेडी झाली. तिला काय करावें हें सुचेना, परंतु आतां सर्व जबाबदारी आपणावरच आहे, आतां सर्वांची समजूत आपणासच केली पाहिजे, असा विचार करून त्या धैर्य-शाली स्त्रियेनें एकदम आपलें दुःख गिळून टाकिलें, आणि ती आपल्या कन्यांची समजूत करूं लागली. बापाच्या मृत्युमुळें त्या सर्व मुली व तो एकंदर परिवार त्या दुःखभारानें जेव्हां आक्रोश करूं लागला, तेव्हां तो शोकस्वर आकाश-मंडळ भेदून स्वर्गांत प्रजापतीचे कानावरच जात आहे किं काय, असें वाटूं लागलें. त्या मुली तर अश्रूंनीं वसुंधरेला अभिषेकच करित होत्या. मस्तकावर ताडण करून त्या प्रजापती प्रमाणेंच आपलें मस्तक नाहींसें करीत आहेत किंवा काय असें वाटूं लागलें. प्रसूतीला त्या सर्वांची समजूत करितां करितां पुरे होऊन गेलें. मोठ्या कष्टानें सर्वांना शांत करून ती ह्मणाली, उत्पत्ति आणि मरण हीं या शरीराला आहेतच, मरण हें जीवांची प्रकृति ह्मणजे मूळ व उत्पत्ति ह्मणजे जीवांची विकृति ह्मणजे विकार आहे, याकरितां त्याबद्दल हर्ष किंवा शोक करणें हें अज्ञ जनाचें काम होय. असो, झालें तें झालें. परमेश्वराला जी गोष्ट आवडली त्याबद्दल खेद न मानतां मला आतां पुढच्या तयारीला लागलें पाहिजे. शरीराचा जो योग्य उपयोग करितो तोच जन्माला आल्याचें सार्थक करितो; त्या प्रमाणें माझ्या पतीनें रणांत केवळ यज्ञयागासाठीं आपला देह गमावून आपल्या देहाचें सार्थक करून घेतलें आहे. तेव्हां मलाही सतीच्या धर्माप्रमाणें पतीबरोबर सहगमन करून या शरीराचा योग्य असाच विनियोग केला पाहिजे.

## २ प्रसूतीचा निश्चय.

प्रसूतीनें आपला मनोदय स्पष्टपणें सर्वांना कळवून कोणाच्या पसंती ना पसं-तीकडे लक्ष न देतां तिनें स्वतःच सतीची तयारी चालविली. पाणी आणवून तिनें प्रथम स्नान केलें, नंतर ज्या सुताच्या पातळाचे कांठ व पदर हळदीच्या रंगानें पिंवळे केले होते असें वस्त्र ती नेसली. व तशाच पिंवळ्या वस्त्राची तिनें अंगांत चोळी घातली, गळ्यांत गळसरी बांधली, हातांत कांकणें भरलीं, मस्तका-

वरील केश पाठीवर मोकळे सोडून दिले, भांगांत शेंदूर भरला, डोळ्यांत काजळ घातलें, कपाळाला कस्तूरी लावून वर कुंकुमाचा टिळक लाविला, हातापायाला हळद लावून पायांत जोडवीं घातलीं, अशा प्रकारें प्रसूतीनें तो वेष धारण केल्यावर तिची मूर्ति अत्यंत करुणामय दिसूं लागली. नगरवासीलोक, प्रधान, सैनिक, मुली, वगैरे सर्वांचे डोळे अश्रूंनीं भरून आले. प्रसूतीला त्या संबंधानें प्रतिबंध करावा असें प्रत्येकाला वाटूं लागलें. परंतु तसें करण्याचें कोणासच धैर्य होईना. सर्व तयारी झाल्यावर प्रसूति लोकांच्या उद्विग्न मुखाकडे लक्ष न देतां राजवाड्याच्या बाहेर पडूं लागली तेव्हां मात्र तिच्या मुलींनां स्वस्थ बसवेना. त्यांनीं आपापलीं मुलें प्रसूतीच्या पायावर लोटिलीं, व आपणहि मार्गांत आडव्या पडून मोठ्यानें आक्रोश करूं लागल्या. एक मुलगी ह्मणाली; " आई! बाबानें आह्मांला सोडून जाऊन उघडें केलें आणि आतां तूंहि आह्मांला दूर लोटून निघून जात आहेस, मग आह्मीं आतां आश्रय तरी कोणाचा करावयाचा! आह्मांला तुझ्या वांचून आतां कोण आहे? आह्मीं 'आई' अशी कोणाला हाक मारणार! आह्मांला प्रीतीनें जवळ बोलावून आमचें कुशल कोण विचारणार! आई! तूं या वेळीं आमच्या डोळ्यांतील अश्रू पुसावयाचे, पण तें तूं सोडून देऊन आह्मांला दुःखसमुद्रांत बुडवित आहेस. आई! आह्मांवर दया कर, निदान या आमच्या बालकांसाठीं तरी सती जाऊं नकोस." हें ऐकून प्रसूती ह्मणाली; "मुलींनो! तुह्मीं प्रजापती सारख्या शूर वीराच्या मुली आहांत, हें या दुःखकारक प्रसंगांत विसरूं नका. प्रजापतीची स्त्री प्राणाचा मोह धरून सती गेली नाहीं, असें पुढें लोक ह्मणतील तें ऐकण्याची माझी इच्छा नाहीं. तसेंच आपली आई सती जात असतां तिची पाठवणी न करितां तिला अडविणाऱ्या मुलीहि लोकांच्या निंदेला पात्र होतील हें लक्षांत ठेवा." प्रसूतीनें असें सांगितल्यावर सर्व मुलीनीं आपआपलें दुःख आवरून धरिलें व आईनें सांगितल्याप्रमाणें तिची पाठवणी करण्यास त्या तयार झाल्या. पुढें प्रसूति राजवाड्याच्या अंगणांत आल्यावर तेथें सुमति प्रधान प्रजाजनांनां घेऊन उभा होता. तो प्रसूतीच्या चरणावर मस्तक ठेऊन अश्रू गाळूं लागला. तो रडत रडत ह्मणाला; " राणीसाहेब! आपण आपल्या कन्यांचें समाधान केलेंत, पण या आपल्या प्रजेला कोणाच्या स्वाधीन करून चाललांत; या प्रजेला तर आपणावांचून कोणीहि नाहीं. आपल्या सतीजाण्यास प्रतिबंध करावा अशी माझी इच्छा नाहीं, परंतु या प्रजेला कोणी त्राता नाहीं, याचा आपण कांहींच विचार केला नाहीं; आपण या सर्व प्रजाजनाच्या मातुश्री आहांत, यांनां उघडें टाकिल्यास मागें अनर्थ होतील, याचा विचार करा; एकवेळ पुत्र कन्यांची अवहेलना केली तरी चालेल, परंतु प्रजेकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. यांचें प्रतिपालन न करितां आपण सती गेल्यास हें पाप आपल्या शिरावर तसेंच राहील;" सुमति प्रधानाचें हें भाषण ऐकून प्रसूती ह्मं-

णाली; "सुमते ! तुझे ह्मणणें खरें आहे, परंतु स्त्रीयांनीं राज्य करणें ही एकप्रकारची विटंबना होय. भ्रताराचांचून स्त्रियांची कांहींहि शोभा नाहीं. नदीचें पाणी संपल्यावर बंधाऱ्याचा जसा उपयोग नाहीं, सूर्य मावळल्यावर छत्रीचा जसा उपयोग नाहीं, त्याचप्रमाणें पति निवर्तल्यावर स्त्रियेनें जिवंत राहण्यांत कांहीं अर्थ नाहीं. स्त्री गरोदर असेल अथवा पुत्र लहान ह्मणजे मातृस्तनाचें पान करणारा असेल तर त्याच्या संरक्षणासाठीं स्त्रीनें रहावें, असें धर्मशास्त्र आहे. पण मला तर पुत्र वगैरे कांहीं नाहीं, तेव्हां हें जड शरीर निष्कारण ठेवण्यांत कांहीं अर्थ नाहीं. या राज्याची व्यवस्था तूं पहा व या प्रजेचें संरक्षण तूं कर, तूं आमचा धर्मपुत्र आहेस. तुझ्या स्वाधीन मी हें सर्व राज्य केलें आहे. आतां अधिक वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं. मी आपल्या पतीला केव्हां जाऊन भेटेन असें मला झालें आहे, तर सती जाण्याची तयारी लवकर करा."

## ३ प्रसूतीचा शोक.

प्रसूतीचा निश्चय कांहीं केल्या ढळत नाहीं असें पाहून सर्वांनीं तिच्या त्या कृत्यावद्दल अनुमति दर्शविली. मोठ्या थाटाची अशी सतीची तयारी केली. शुभ्र रंगाची उत्तम अशी घोडी आणून त्या घोडीला प्रसूतीनें वंदन केलें व तीवर ती बसून रणक्षेत्राकडे निघाली. पुढें वाद्यें वाजूं लागलीं, मागें प्रधान वगैरे मंडळी सतीचें साहित्य घेऊन चालूं लागली, नगरवासी लोक त्या प्रत्यक्ष अंबिकेचें दर्शन घेऊं लागले, कोणी तिच्यावर फुलें तुळसी उधळूं लागले, तर कोणी तिची खणानारळांनीं ओंटी भरूं लागले. धन्य प्रसूती, धन्य तिचें धर्माचरण, आणि धन्य तिची पतिभक्ति परायणता, असा तिचा सर्वत्र जयजयकार होऊं लागला. नगराच्या बाहेर निघाल्यावर तिनें आपणाबरोबर जरुरीपुरते लोक घेतले व बाकी नगरवासी प्रजाजनांनां मोठ्या प्रेमानें परत लाविलें. मग ती प्रधान वगैरे बरोबरच्या लोकांसह रणांगणावर आली व तेथें आपल्या पतीच्या धडाचा शोध करूं लागली, तेव्हां तें तिला क्षिप्रा नदीच्या वाळवंटांत पडलेलें सांपडलें. आपल्या पतीचें धड वाळवंटावर पडलेलें असून शरिराखालीं रक्त सांचलें आहे, घोट्यापर्यंतचे पाय पाण्यांत बुडाले आहेत, असें तें पतीचें धड दृष्टीस पडल्याबरोबर प्रसूती घोडीवरून उतरली व धांवत धांवत जाऊन तिनें त्या धडाला हृदालिंगन दिलें. पतीच्या दर्शनाबरोबर प्रसूतीचा चेहरा अत्यंत प्रभावशाली असा दिसूं लागला. तिनें त्या धडाला वंदन केल्यावर तिचें हृदय दुःखानें भरून आलें, व तिच्या डोळ्यांत अश्रु दिसूं लागले. तिनें आपल्या डोळ्यांतले अश्रु पुसले व ती ह्मणाली; " अहो ! दक्ष प्रजापति महाराज ! प्रजवर आपलें इतकें प्रेम असून आज या दासीला मागें ठेवून एकटेच आपण स्वर्गांत कसें गेलां ! आपणांविषयीं एकपत्नीव्रताबद्दल मी मोठा अभिमान बाळगीत असे, पण आज आपणास मजपेक्षां स्वर्गांगना अधिक रुचलीं

असें वाटतें. आपणास मखमलशय्याहि घरीं रुचत नसे, तीहि अंगास त्रासदायक होत असे, आणि आज आपणास ही कंटकमय वाळू आवडली काय ? अभ्यंग-स्नान केल्यावांचून व अंगाला कस्तूरी लावल्यावांचून तुह्माला झोंप येत नव्हती, पण आज या रुधिराच्या स्नानानें कशी झोंप लागली ! भूमीची शेज तयार करून आणि आकाशरूप वस्त्र पांघरावयाला घेऊन ही अखंड झोंप या दासीच्या कोणत्या अपराधामुळें रागावून घेत आहां ! " या प्रमाणें प्रसूतीनें त्या वेळीं शोक केला, परंतु कितीहि दुःखोद्गार काढिले तरी त्यामुळें झालेल्या प्रकाराचा कांहींच प्रतिकार होणारा नसल्यामुळें तिनें अज्ञानी जनाला शोभणारें कृत्य संपविलें, व ती पुढील तयारीला लागली. प्रधानाला तिनें सूचना केल्याबरोबर सुमति प्रधानानें, त्या प्रेताला क्षिप्रा नदींत स्नान घालून स्वच्छ केलें, व त्याला चंदन लावलें. प्रसूतीनेंहि स्नान केलें व प्रेताला अग्निसंस्कारासाठीं ती जागा शोधूं लागली. ती सुमति प्रधानाला ह्मणाली; " सुमते, माझ्या पतीचें या वाळवंटांत दहन करणें हें मला प्रशस्त वाटत नाहीं, तर जेथें माझ्या पतीचें शिर वीरभद्रानें जाळलें, त्याच यज्ञकुंडाजवळ दहन क्रिया करावी असें मला वाटतें. " सुमति व इतर लोकांनां प्रसूतीचें तें ह्मणणें पसंत पडलें, व त्या प्रमाणें त्यांनीं दक्षाचें प्रेत यज्ञमंडपांत यज्ञकुंडाजवळ नेऊन ठेविलें.

इकडे दक्षाच्या प्रेताच्या दहनाची या प्रमाणें तयारी चालली असतां, तिकडे शार्ङ्गधरानें तो सर्व प्रकार अंतरदृष्टीनें जाणून, मेघाला बोलाविलें व त्याला तो ह्मणाला " हे मेघा ! दक्षप्रजापति हा माझा परमप्रियभक्त आहे, त्याला आतां चितेवर ठेवितील, तर तूं सावध राहून, काष्ठांनां अग्नि लाविल्याबरोबर पर्जन्य-वृष्टि कर, व चिता विझवून टाक. जर त्याच्या शरिरावरचा अग्नीमुळें एक केस जळेल तर मी तुला शाप देईन. "

## ४ कोकिला कथन.

प्रसूतीच्या सेवकांनीं सर्व तयारी केल्यावर यज्ञकुंडाजवळ काष्ठें एकावर एक रचून चिता तयार केली. प्रेताला त्रिपुंड्र लाविले, गळ्यांत तुळशीच्या माळा घातल्या, व जवळ धर्मशिळा आणून ठेविली. याप्रमाणें सर्व प्रकारची तयारी चालली आहे तों वर आकाशांत मेघ उत्पन्न झाले व त्यांचा गडगडाट सुरू झाला. इकडे वेदमंत्रांच्या घोषांत दक्षाचें प्रेत उचललें व तें चितेवर ठेवून वर चंद-नाचीं वगैरे लांकडें ठेविलीं, आणि त्यास अग्नि लावून दिला. त्यावर तुपाची धार धरल्यावर तो अग्नि अधिक प्रदीप्त झाला. अग्नि चांगला प्रदीप्त झाल्यावर प्रसूतीनें पश्चिमदिशेला शिला ठेविली व त्या चितेला ह्मणजे पति, याग व अग्नि अशी तिघांनां प्रदक्षिणा घालून ती त्या शिळेवर उभी राहिली. भूमि व सूर्य यांस तिनें वंदन केलें. नंतर ती हात जोडून ह्मणाली; " हे दक्षप्रजापति ! जन्मोजन्मीं तूंच मला पति मिळावास अशी माझी इच्छा आहे. " असें ह्मणून

तिनें हातांत नारळ घेतला व तो अग्नींत टाकिला, आणि स्वतः अग्नींत उडी टाकण्यासाठीं तिनें आपलें शरीर किंचित उचललें, तोंच तेथें एक कोकिला आली व ती आकाशांतून मोठ्यानें म्हणाली; " हे प्रसूती ! तूं अग्निप्रवेश करूं नकोस, तुझा पति प्रजापति तुला लवकरच परत मिळेल, आणि माझें हें म्हणणें न ऐकतां तूं जर हट्टानें अग्निप्रवेश करशील, तर तुला आत्महत्येचें पातक लागून तूं अधोगतीला जाशील. तूं आपली मुलगी जी पार्वती हिच्या हातांत, ती तुला येऊन भेटली त्या वेळीं कांकणें घातलीं होतींस. जी साध्वी पार्वतीचें हातांत कांकणें घालिते, तिचे चुडे कधींहि भंग पावत नाहींत. त्या गौरीला ज्या स्त्रिया सौभाग्यतंतु म्हणजे गळसरी, कांकणें, कुंकु, वगैरे अर्पण करितात त्यांचें सौभाग्य कधींहि जात नाहीं, त्याप्रमाणें तुझेंहि सौभाग्य नाहींसें व्हावयाचें नाहीं. तसेंच यज्ञकर्माचे वेळीं पुण्याहवाचन झाल्यावर तूं मार्कंडेय ऋषीला नमस्कार केलास त्या वेळींहि त्यांनीं तुला सौभाग्यवती होशील असा आशीर्वाद दिला आहे, तेव्हां तुझें सौभाग्य कधींहि नाहींसें होणार नाहीं." त्या कोकिलेचें बोलणें ऐकून प्रसूती त्या दगडावर स्थीर झाली, ती कोकिलेला म्हणाली; "बाई कोकिले यावेळीं अस्खलित मनुष्य वाणीनें तूं जें कांहीं मला सांगितलेंस यावरून तुझी शक्ति कांहीं विलक्षण असून, तुझें म्हणणें खरें असावें, असें मला वाटतें. तथापि आम्हीं अज्ञानी लोक असल्यामुळें तुझ्या बोलण्यावर एकाएकीं विश्वास बसत नाहीं, जर तुझें म्हणणें खरें असेल, तर मी अग्नींत टाकलेला नारळ मला परत दे, म्हणजे मी तुझ्या बोलण्यावर विश्वास ठेवीन." प्रसूती असें म्हणाल्याबरोबर अग्नींतून नारळ बाहेर पडला. त्या नारळाला कोठें किंचित् अग्नीचा डाग देखील नव्हता. तो प्रकार पाहून सर्व लोक आश्चर्यचकित झाले व त्यांचा कोकिलेच्या बोलण्यावर विश्वास बसला. प्रसूती कोकिलेला म्हणाली; "बाई कोकिले ! तुझें म्हणणें खरें दिसतें. या प्रसंगीं तूं ही गोष्ट सुचविलीस हे तुझे माझ्यावर अनंत उपकार झाले आहेत, मी तुझे उपकार कधींहि विसरणार नाहीं. मी तुझी सुवर्णाची मूर्ति करून तिची पूजा करीत जाईन. नदीच्या शीतळ पाण्यानें स्नान करीन, त्यादिवशीं निरशन करीन, ब्रह्मचर्य व्रतानें राहीन, आणि भूमीवर शयन करीन, ब्राह्मणांना बोलावून दानव्रतें करीन, कोकिले ! माझ्या प्रमाणेंच ज्या स्त्रिया तुझें हें कोकिलाव्रत करितील त्यांच्या कपाळाचें कुंकूंहि कायम राहून त्यांनां संतती व संपत्ति प्राप्त होईल असें कर." प्रसूतीनें कोकिलेची अशी प्रार्थना केल्यावर कोकीळा तेथून निघून गेली, नंतर आकाशांतून जोरानें पाऊस पडला व त्यामुळें भूमीवर पेटविलेली चिता क्षणार्धांत विझून गेली. तो प्रकार पाहून सर्वांचा कोकिलेच्या बोलण्यावर अधिक विश्वास बसला. मग त्यांनीं प्रजापतीच्या शरिरावरील चंदनाचीं लांकडें काढून टाकून, तें कलेवर भूमीवर काढिलें, आणि पाहतात तों अग्नीनें एक केंसहि जळालेला नाहीं. मग प्रसूती सुमती

प्रधानाला म्हणाली; " सुमते! एकवार सती जाण्यासाठीं निघालेल्या स्त्रियेनें नगरांत प्रवेश करूं नये, असें शास्त्र आहे, तसेंच प्रेतहि नगरांत नेतां येत नाहीं. म्हणून मी येथेंच या प्रेताचें संरक्षण करित बसतें, आणि तुम्हीं सर्वजण नगरांत परत जाऊन आपआपले व्यवसायाला लागा. त्या कोकिलेचें म्हणणें खरें होईपर्यंत मी येथेंच या प्रेताच्या सन्निध तपश्चर्या करित बसतें." प्रसूतीनें असें सांगितल्यावर सर्वलोक आपआपले घरीं निघून गेले, व प्रसूती कलेवराजवळ बसून कलेवराचें संरक्षण व तपश्चर्या करूं लागली."

---

## अध्याय १३ वा.

### १ नंदिकेश्वरोत्पत्तिकथा.

वैशंपायन ऋषि याप्रमाणें प्रसूतीची कथा सांगून जनमेजय राजाला म्हणाले; "राजा! वीरभद्राच्या सैन्यानें दक्षप्रजापतीची कशी विटंबना केली हें तुला समजलेंच आहे. आतां तुला पुढें दक्ष जिवंत कसा झाला तें सांगतों. वीरभद्राचें सैन्य अशा रीतीनें विजय मिळवून कैलासास परत गेल्यावर वीरभद्रानें कसा पराक्रम गाजविला तें शंकरानां कथन केलें. तो सर्व इतिहास ऐकल्यावर महादेवांचे मनाला अत्यंत उद्विग्नता वाटूं लागली. खऱ्या वीराला न शोभण्यासारखीं कांहीं कृत्यें त्या युद्धांत नंदी व वीरभद्र यांनीं केल्यामुळें महादेवांनां त्या दोघांचा पुरा राग आला, व महादेव त्या दोघांनां सोडून दूर अरण्यांत निघून गेले, आणि मनाला समाधान वाटावें ह्मणून तपश्चर्या करीत बसले."

वैशंपायन ऋषि जनमेजय राजाला दक्षप्रजापतीची कथा सांगत असतां त्याला त्या नंदीची माहिती ऐकण्याची इच्छा झाली. तो वैशंपायन ऋषीला ह्मणाला; "मुनीवर्य! नंदी म्हणजे साधारण एक पशु, त्याच्या अंगीं एवढी विलक्षण शक्ति होती व त्याचें प्रत्यक्ष ईश्वर जे महादेव त्यानीं एवढें संगोपन केलें होतें, याबद्दल मला मोठें आश्चर्य वाटतें, तर या नंदीची उत्पत्ति कशी झाली तें मला आपण कृपा करून सांगावें. वैशंपायन ऋषि म्हणाले; " राजा! पूर्वी शिखी या नावाचा एक महातपोनिधि ऋषि होऊन गेला. तो एके दिवशीं इंद्रलोकीं गेला व इंद्र राजवाड्याच्या महालांत बसला होता तेथें जाऊन उभा राहिला. तोंपर्यंत इंद्राच्या सेवकांनीं कांहींच सत्कार केला नाहीं, आणि इंद्रानेंहि त्या ऋषीकडे लक्ष दिलें नाहीं. तो गंधर्वांच्या व अप्सरांच्या नाच गाण्यांतच गुंग होता, ऋषीनें इंद्राला आशीर्वाद देऊन त्याचें आपणाकडे लक्ष वेधून घेण्याचा प्रयत्न केला, पण इंद्रानें नुसतें त्याच्याकडे पाहिलें देखील नाहीं. मग त्याच्या

आशीर्वादाकडे तरी लक्ष कसें जाणार? शिखी ऋषीला इंद्रानें आपला असा अपमान केला याबद्दल मरणप्राय दुःख झालें, व त्याला इंद्राचा फार राग आला; परंतु इंद्राला योग्य शिक्षा लावण्याचें त्याच्या हातीं कांहीं साधन नसल्यामुळें तो खिन्न होऊन मुकाट्यानें अमरावतीहून परत आला. शिखीनें इंद्राला त्याच्या उन्मत्तपणाबद्दल चांगलें शासन केलें पाहिजे असें ठरवून तो त्या प्रयत्नाला लागला. ऋषीचा प्रयत्न म्हणजे तपश्चर्या हा होय. तो शिखी एका प्रशांत अरण्यांत आला व इंद्राला आपल्या सिंहासनावरून उचलून दूर फेंकून देईल अशा शक्तिशाली पुत्राची मनांत इच्छा धरून तपश्चर्येला बसला. त्या ऋषानें एक हजार वर्षें पर्यंत निरशन करून ब्रह्मचर्य व्रतानें राहून धूम्रपान व पंचाग्निसाधन केल्यावर त्याला ब्रह्मदेव प्रसन्न झाले, व काय मागावयाचें असेल तें माग, म्हणून ह्मणाले. तेव्हां तो शिखीऋषि ह्मणाला; "हे ब्रह्मदेवा! मला असा पुत्र दे, किं जो आपल्या पराक्रमानें इंद्राला जिंकून अमरावतीचें राज्य घेईल." शिखीची ती मागणी ऐकल्यावर ब्रह्मदेव ह्मणाले; "शिखी! तुझे ह्मणण्याप्रमाणें तुला पुत्र होईल, परंतु इंद्राला चौदा मनुपर्यंत सिंहासन दिलेलें आहे, तोंपर्यंत अमरावतीचें राज्य दूसरे कोणाला मिळणार नाहीं, तथापि तुझा पुत्र इंद्राला जिंकूं शकेल, असा मी तुला वर देतों." असें म्हणून ब्रह्मदेवानें शिखी ऋषीच्या मस्तकावर हात ठेविला, व त्याच्या शेंडीवर कांहीं मंत्राक्षता टाकिल्या. मंत्राक्षता टाकणें झाल्यावर, ब्रह्मदेव ह्मणाले; "शिखी! तुला या शेंडीपासूनच पुत्र होईल. तो त्रिभुवन जिंकून इंद्र, शेषशाई भगवान् व महादेव यांच्यापेक्षांही पराक्रमी असा होईल." असें म्हणून ब्रह्मदेवानें वरुणाची प्रार्थना करून त्याच्याजवळून त्याची अर्धी शक्ति मागून घेतली, अग्नीजवळून तितकीच शक्ति मागून घेतली व वायूचीही प्रार्थना करून त्याची अर्धी शक्ति मागून घेतली. त्या तिन्हीं शक्ति एकत्र करून त्याचा पुतळा निर्माण केला व तो शिखी ऋषीच्या शिखेंत ठेवून ब्रह्मदेव निघून गेला.

## २ नंदी व विष्णु यांचें युद्ध.

ब्रह्मदेवानें सांगितल्याप्रमाणें शिखी ऋषीनें आपली शेंडी सोडून झटकली, तों अत्यंत तेजस्वी असा वत्स भूमीवर पडला. तो चतुष्पाद पुत्र पाहून शिखी ऋषीला फार आनंद झाला. त्या वत्साच्या मस्तकाला सूर्यानें दिलेला पीतांबर होता. तोंड लाल रंगाचें असून त्याचे डोळे इंगळाप्रमाणें तप्त होते, कमरेचा भाग सुवर्णाप्रमाणें चमकत होता, त्याची अंगकांति मेघाप्रमाणें होती, मस्तकावर दोन शिंगे असून कटिप्रदेशीं एक पुच्छ होतें. याप्रमाणें तो वत्स, शिखी ऋषीच्या शेंडींतून पडल्यावर ब्रह्मदेव तेथें आले व त्यांनीं त्या वत्साचें नांव नंदिकेश्वर असें ठेविलें. नंदिकेश्वर असें नांव ठेवण्याचें कारण असें किं नकार ह्मणजे विष्णु, दकार ह्मणजे अग्नि, आणि ककार ह्मणजे वरुण होय. अशा ह्या तीन देवांची मूर्ति अस-

त्यामुळें ब्रह्मदेवानें त्याचें नांव नंदिकेश्वर असें ठेविलें. याप्रमाणें ब्रह्मदेवानें नंदीचें नामकरण वगैरे केल्यावर तो सत्यलोकीं निघून गेला. मग तो नंदी आपल्या बापाला ह्मणाला; " हे तात ! मला भूक लागली आहे तर पवित्र असा आहार द्या. तेव्हां ऋषीनें नंदीला क्षीरसागर दाखविला, व त्यांतील दूध तुला वाटेल तितकें पी ह्मणून सांगितलें." त्याप्रमाणें नंदी क्षीरसमुद्रांत गेला व तेथील दूध पिऊं लागला. क्षीरसमुद्राचे संरक्षणासाठीं जे विष्णु दूत होते, ते तो प्रकार पाहून नंदीवर अत्यंत क्रुद्ध झाले व त्यास ताडण करूं लागले; परंतु नंदी त्या सर्वांना आपल्या शक्तीनें दूर करून दूध पीत होता. त्या क्षीरसागरींचें दूध प्याल्यामुळें नंदीच्या शरीराच्या रंग पांढरा सफेत झाला. कितीहि ताडण केलें तरी नंदी मुळींच ऐकत नाहीं, असें पाहून एक विष्णुदूत नंदीला ह्मणाला; "अरे वत्सा ! हा क्षीरसागर विष्णूचा आहे. यांतील दूध प्याल्याचें जर विष्णूला समजेल तर ते तुला क्षणार्धांत यमाकडे पाठवून देतील. तेव्हां तूं लवकर येथून आपल्या घरीं निघून जा." विष्णुदूताचें तें बोलणें ऐकूण नंदीला राग आला. व त्यानें त्या दूताला धरून दूर वैकुंठांत झुगारून दिलें. वैकुंठांत विष्णूपुढें तो एकाएकीं येऊन पडल्यावर विष्णूला मोठें आश्चर्य वाटलें. विष्णूनें त्या दूताला असें होण्याचें कारण विचारलें, तेव्हां दूतानें झालेली सर्व हकीकत सांगितली. ती नंदीविषयींची हकीकत ऐकून विष्णूला मोठें आश्चर्य वाटलें. त्यानां त्या नंदीचा फार राग आला व ते तत्काल क्षीरसमुद्राचे कांठीं आले. प्रत्यक्ष विष्णु आले तरी नंदी निर्भयपणें दूध पीत होता. तो त्या नंदीचा दांडगेपणा पाहून विष्णूंनीं नंदीवर बाण सोडण्यास आरंभ केला. एकामागून एक हजारों बाण सोडून विष्णु अगदीं थकले, परंतु नंदीनें त्या बाणाकडे लक्षहि दिलें नाहीं. आकाशांतून पर्जन्यवृष्टि होत आहे असें वाटून त्यानें एकदां आकाशाकडे पाहिलें पण आकाशांत मेघ वगैरे कांहीं नसून आपल्या अंगावर काय पडत आहे हें पाहण्यासाठीं तो इकडे तिकडे पाहूं लागला, तेव्हां विष्णु आपणावर बाण सोडीत आहेत असें त्याला दिसलें. त्या बाणापासून नंदीला कांहींहि त्रास होत नव्हता; अंगावर गवत पडावें त्याप्रमाणें त्याला ते बाण वाटत होते. पण विष्णु बाण सोडून निष्कारण श्रम घेत आहेत असें वाटून त्यानें मोठ्या जोरानें श्वास सोडला. त्याबरोबर विष्णु उडून वैकुंठांत गेले ! नंदीनें पुन्हां श्वास आकर्षण केला त्याबरोबर विष्णु नंदीच्या नाकांत शिरले. ज्याप्रमाणें माता मुलास पाळण्यांत घालून झोंका देते, त्याप्रमाणें नंदीकेश्वरानें आपल्या श्वासाबरोबर विष्णूस आकाशांत न्यावें व उच्छ्वासाबरोबर नाकांत आणावें. याप्रमाणें विष्णु क्षणांत वैकुंठांत तर क्षणांत नंदीच्या नासापुटांत, असे हेलकावे खाऊं लागले. उंच आकाशांत विष्णु उडाले ह्मणजे त्यांची विटंबना पहावी व हंसावें असा त्या नंदीनें क्रम चालविला होता. विष्णूला नंदीच्या ह्या कृतीबद्दल फार राग आला, व त्यांनीं उडतां उडतां नंदीच्या

दांतावर गदा मारली. तेव्हां नंदीचे कांहीं दांत उडाले व ते सागरांत पडले, त्या दंतांपासूनच शंख उत्पन्न झाले. नंदीला गदेचा आघात झाल्या-बरोबर नंदीजवळ जीं चवदा रत्नें होतीं तीं त्यानें समुद्रांत टाकून दिलीं. त्यानें मुखांतून लक्ष्मी टाकिली, दक्षिण हस्तानें ऐरावताला टाकून दिलें, दक्षिण चरणानें सप्तमुखी घोड्याला टाकिलें, शेंपटीच्या गोंड्यांतून कल्पतरु पडला, त्याच्या जिभेंतून अमृत पडलें, डोळ्यांतून कौस्तुभ पडला, हृदयांतून चंद्र पडला, लिंगांतून कामधेनु पडली, घामांतून मदिरा पडली, नाकांतून धन्वंतरी, शिंगांतून धनुष्य, तोंडाच्या फेंसांतून विष, डाव्या पायांतून अप्सरा व डाव्या हातांतून दुर्दशा पडली. हीं चवदा रत्नें नंदीजवळ असण्याचें कारण असें होतें कीं, वरुणा-जवळ तीं रत्नें देवांनीं ठेवावयाला दिलीं होतीं, आणि नंदी हा वरुणाचा अर्धा अवतार असल्यामुळें तीं नंदीजवळ होतीं. तीं या प्रसंगीं विष्णूच्या गदा प्रहारा-मुळें नंदीजवळून समुद्रांत पडलीं. राजा जनमेजया! हीं रत्नें पुढें समुद्रांतून कशीं निघालीं ती कथा तुला माहित आहेच. तसेंच नंदीच्या दांतातून जें रक्त समुद्रांत पडलें त्या पासून मासे कासव वगैरे जलचर प्राणी निर्माण झाले. त्या नंदीचें व विष्णूचें साठ दिवसपर्यंत युद्ध चाललें होतें, परंतु विष्णूला नंदी मुळींच आ-टोपेना; त्यानें अगदीं शिकस्त केली शेवटीं नंदीनें मस्तकाच्या धडकीनें विष्णूला भूमीवर पाडिलें व त्याच्या छातीवर तो उजवा पाय ठेवून उभा राहिला, तेव्हां विष्णु त्या नंदीला ह्मणाला; "अरे! तूं कोणाचा कोण आहेस तें मला सांग, मी तुला प्रसन्न झालों आहें. तुझी इच्छा असेल तें तुला देण्यास तयार आहें." तेव्हां नंदी विष्णूच्या छातीवरून खालीं उतरून ह्मणाला; 'मी शिखीऋषीचा पुत्र असून माझें नाव नंदिकेश्वर आहे." तो नंदीचा इतिहास ऐकून विष्णूनें त्याला नमस्कार केला. तेव्हां नंदी विष्णूला ह्मणाला; "हे श्रीहरि! तूं मला प्रसन्न झाला आहेस, तर माझें पालन कर, एवढेंच मी तुजजवळ मागतों." मग विष्णु ह्मणाला; "नंदिकेश्वरा! ही तुझी मागणी मी द्वापारयुगांत पुरी करीन. तूं गोवर्धन आदि अवतार ह्मणून मी तुझी पूजा करीन, आणि माझ्या हृदयावर तूं जो आपला दक्षिण चरण ठेविला आहेस, ती खूण मी आज पासून माझें भूषण असें मानीन; व त्या भूषणामुळें मी माझ्या शत्रूंनां सहज जिंकीन. नंदिकेश्वरा! तूं शिखीऋषीचा पुत्र, तेव्हां तुझा अधिकार फार मोठा आहे, मजवर उपकार कर-ण्याच्या हेतूनेंच तूं येथें आला होतास, या स्मरणासाठीं मी श्रीवत्सलांछन असें नाव धारण करितों, तुझ्या दातांवर गदा मारून ते मी पाडले याबद्दल मला फार वाईट वाटतें, परंतु या माझ्या प्रमादाबद्दल तुझ्या दातांपासून जे शंख उत्पन्न होतील त्या शंखांची पूजा लोक माझ्या अगोदर करितील. त्या *शंखाला मी

* शंखासुराला मारलें त्या वेळीं विष्णूनें हातांत शंख धारण केला, असें कित्येक पुराणांत आहे, शंखासुर हें नांव त्या राक्षसाला तो शंखांत लपला म्हणून मिळालें

आपल्या हातांत नेहमीं धारण करीन, व त्या शंखोदकानें मला स्नान घालून माझी जे पूजा करितील त्यांचे मनोरथ पूर्ण होतील. " विष्णूचें हें भाषण ऐकून नंदी प्रसन्न झाला व विष्णूला ह्मणाला; " हे वैकुंठपते ! माझा इतका सन्मान केल्यामुळें मी ही तुला प्रसन्न झालों आहें, तर तुझी जी इच्छा असेल तें माग, मी तें तुला आनंदानें देईन," तेव्हां विष्णूनें नंदीजवळ पीतांबर मागितला. जो पीतांबर नंदीला अग्नीनें दिला होता, तो नंदीनें विष्णूला तत्काल अर्पण केला, व त्या वस्तूचा स्वीकार केल्याबद्दल संतोष दर्शविला. नंतर नंदी क्षीरसागराहून निघून आपला पिता जो शिखी ऋषि त्याच्याकडे आला व त्याला झालेलें सर्व वर्तमान कथन केलें. ती हकीकत ऐकून शिखीला फार आनंद झाला व त्यानें नंदीला प्रेमानें कुरवाळिलें. मग नंदी पित्याला ह्मणाला; " तात ! मी क्षीरसागराचें दूध तृप्ति होईपर्यंत प्यालों आहें, आतां तृणपल्लवें खाण्याची इच्छा झाली आहे, तर तीं खाण्यासाठीं कोठें जाऊं तें मला सांगा. "

## ३ सिंहासनच्युत इंद्र.

शिखी ह्मणाला; " नंदी ! तूं आतां अमरावतीस जा आणि तेथील इंद्राच्या नंदनवनांतील तुला वाटतील त्या तृणलतादि वनस्पती खाऊन टाक. " शिखीनें या प्रमाणें नंदीला सांगितल्यावर नंदी तत्काल आपल्या बापाला नमस्कार करून तेथून निघाला व अमरावतीस आला. नंदीला तें नंदनवन पाहिल्यावर मोठें समाधान वाटलें व त्यानें आपल्या शिंगानें त्याचा दरवाजा मोडून प्रवेश केला. तेथें तो हिंडत असतां वाटेंत जें जें आडवें येईल त्याचा तो नाश करूं लागला. अमरावतीच्या त्या नंदनवनांतील जाई, जुई, चमेली, मोगरा, चांफा, द्राक्ष, केळी वगैरे अनंत फलपुष्पयुक्त लतावृक्षांचा नंदीनें फार नाश केला. नंदी ह्मणजे साक्षात् अग्नीचा अवतार, तेव्हां त्यानें कितीही खाल्लें तरी त्याची तृप्ती होणें अशक्यच होतें. मनाला वाटेल तीं फळें खावींत, पुष्पें खावींत, लता खाव्यात, मधून मधून दांडगाई करावी, मोठमोठाले वृक्ष उन्मळून पाडावेत, असा त्या नंदीनें नंदनवनाचा नाश चालविल्यावर त्याच्या संरक्षणासाठीं ठेवलेले सेवक बागेंत गेले व तो काय प्रकार आहे तें पाहूं लागले. नंदीनें नंदनवनाची ती केलेली नासाडी पाहून ते इंद्रदूत अत्यंत क्रुद्ध झाले व नंदीला ताडण करूं लागले. कोणी दगड मारूं लागला, कोणी काठ्या मारूं लागला, कोणी चाबूक मारूं लागला, तथापि नंदीवर त्याचा कांहींच परिणाम होईना. पर्वतावर कापूस पडावा त्याप्रमाणें नंदी तें ताडण सहन करीत होता. आपला कांहींच इलाज

---

होतें, ज्या शंखांतून त्या राक्षसाला बाहेर काढिलें तोच शंख विष्णु आपल्या हातांत बाळगूं लागला.

चालत नाहीं असें पाहून एक सेवक इंद्राकडे आला व त्याला त्यानें झालेली सर्व हकीकत सांगितली. ती सर्व हकीकत ऐकून घेतल्यावर इंद्राला वाटलें किं, हा कोणीतरी राक्षस उन्मत्त होऊन पशु रूपानें आपल्या बागेचा नाश करण्यासाठीं आलेला आहे, अशी कल्पना करून इंद्रानें युद्धाची सर्व तयारी केली, व तो रणवाद्यांच्या गजरांत आपल्या नंदन वनांत आला. नंदनवनाचा तो नाश पाहून इंद्र अत्यंत संतप्त झाला व त्यानें आपल्या सैन्याला त्या उन्मत्त पशूला सहस्र खंड करण्यास सांगितलें. इंद्राचा हुकूम होण्याबरोबर हजारों वीर आपलीं शस्त्रें नंदीवर चालवूं लागले. कोणी बाण सोडूं लागला, कोणी तलवार मारूं लागला, कोणी परशु मारूं लागला, कोणी गदेनें बडवूं लागला, कोणी त्रिशूळानें टोचूं लागला, याप्रमाणें देवांनीं शस्त्रप्रहारांचा नंदीवर सारखा वर्षाव केला, परंतु नंदीच्या शरिरावर त्या शस्त्रांचा कांहींच परिणाम झाला नाहीं. ज्याप्रमाणें सूर्य मेघमंडलाच्या आड येतो, त्याप्रमाणें नंदी बाणाच्या वृष्टीमुळें दिसेनासा झाला, परंतु नंदीला हे देव आपल्या अंगावर शस्त्ररूपी पुष्पें वाहून आपली पूजाच करित आहेत असें वाटलें. नंदीनें बराच वेळपर्यंत ती देवांची युद्धलीला सहन करून मग त्यांच्याकडे आपला मोर्चा फिरविला. व एक जोरानें श्वास सोडून त्या सैन्याला दशदिशांनां उडवून टाकिलें. कित्येकांनां मुखांत धरून दुखंड केलें, कित्येकांनां शिंगावर घेऊन लांब झुगारून दिलें, मस्तकाची धडक मारून कित्येकांनां मारून टाकिलें, शेंपटीला बांधून कित्येकांनां गिरिकंदरांत फेंकून दिलें; कित्येकांनां पायांखालीं तुडविलें. तो त्या नंदीचा पराक्रम पाहून इंद्राचें सैन्य अत्यंत भयभीत झालें. यक्ष, गंधर्व हे तर त्या भीतीमुळें रणांतून पळून गेले, इंद्रालाहि नंदीच्या त्या विलक्षण शक्तीचा मोठा विस्मय वाटला, व तो अत्यंत क्रुद्ध होऊन नंदीवर बाण टाकूं लागला. परंतु ज्याप्रमाणें शिवपूजेच्या वेळीं महादेवाला कमळें वहावींत त्याप्रमाणें ते बाण नंदीच्या पृष्ठभागावर पडूं लागले. तेव्हां इंद्रानें आपलें वज्र काढिलें व नंदीच्या अंगावर त्वेषानें धावत जाऊन मारिलें. त्या वज्राच्या आघातानें नंदी मूर्च्छित पडला, व त्याच्या मुखांतून रक्त वाहूं लागलें; तें रक्त पूर्व दिशेकडे वहात जाऊन त्याचें लोखंड झालें. नंदीची ती मूर्छा तत्काल गेली व तोहि इंद्रावर अत्यंत क्रुद्ध झाला. त्यानें आपल्या शेंपटीच्या एका झटक्याबरोबर इंद्राला बांधिलें, व इतकें लांब झुगारून दिलें कीं, तो कैलासांत जाऊन शंकराच्या सभामंडपांत आपटला. शंकर त्या वेळीं तेथेंच बसले होते. सभामंडपांत एकाएकीं कोणी येऊन पडल्याचें पाहून त्यांना मोठें आश्चर्य वाटलें. पडलेला पुरुष त्या विलक्षण आघातामुळें मूर्छित झाला होता, म्हणून शंकरांनीं त्याला वारा घालून सावध केलें. इकडे नंदीनें इंद्रभुवनांत प्रवेश करून इंद्राचें रत्नखचित सिंहासन मस्तकाच्या आघातानें चूर्ण करून बापाची इच्छा पुरी केली, व तेथें जीं रत्नें

पडलीं होतीं तीं त्यानें दशादिशानां फेंकून दिलीं. त्या रत्नांपासून पुढें रत्नांच्या खाणी निर्माण झाल्या. तिकडे शंकर इंद्राला सावध करून 'तूं इकडे कसा आलास' म्हणून विचारूं लागले. तेव्हां इंद्रानें घडलेली सर्व हकीकत महादेवाला सांगितली व या आलेल्या संकटाचें निवारण करण्याविषयीं शंकराची विनंति केली. शंकरानें इंद्राची ती विनंति मान्य केली व तो तत्काळ आपणाबरोबर आपलें सैन्य घेऊन अमरावतीस आला.

## ४ शंकर व नंदी यांचा योग.

शंकराबरोबर भूतभैरव वगैरे असंख्य सैन्य होतें. या सर्व सैन्याला घेऊन महादेव अमरावतीस आल्यावर त्यांनीं नंदीला पाहिलें व मोठ्यानें शंख वाजवून आपल्या सैन्याला तो नंदी मारून टाकण्याविषयीं सुचविलें. शंखध्वनि होण्याबरोबर शिवगण नंदीवर आपआपल्या अस्त्रांचा भडिमार करूं लागले. कोणी मोठमोठाल्या शिळा नंदीवर टाकूं लागला, कोणी निकरानें बाण मारूं लागला, कोणी मुद्गल मारू लागला, कोणी त्रिशूल टोंचूं लागला; याप्रमाणें जो तो आपआपलें सर्व बळ खर्च करून नंदीला त्रस्त करूं लागला. शिवगणांचें तें कौतुक कांहीं वेळ सहन करून नंदीनें आपलें शैथिल्य सोडिलें, व तो क्रुद्ध होऊन एकवार त्यानें सर्व सैन्याकडे व महादेवाकडे अवलोकन केलें. नंतर त्यानें आपल्या दीर्घ पुच्छानें सर्व शस्त्रांचा प्रतीकार करीत करीत रणांगणावर चाल केली. नंदीचें तें प्रचंड शरीर जेव्हां शिवसैन्याकडे येऊं लागलें, तेव्हां पर्वताला पाय फुटून तो पर्वतच आपणाकडे चालत येत आहे असें शिवसैन्याला वाटलें. तो पर्वताप्रमाणें नंदी जेव्हां वेगानें धावूं लागला तेव्हां हजारों शिवगण त्याच्या नुसत्या शरिराच्या आघातानेंच मेले, कित्येक पायाखालीं तुडविले गेले, कित्येकांना नंदीनें आपल्या शेंपटीनें बांधून दूर झुगारून दिलें, कित्येकांच्या हृदयांत शिंगें टोंचून त्यांनां मारिलें. त्या नंदीचा हा विलक्षण पराक्रम पाहून शिवसैन्य भिऊन गेलें व तें शिवाच्या आड लपूं लागलें. महादेवांनांही नंदीची ती विलक्षण शक्ति पाहून मोठें आश्चर्य वाटलें. मग महादेवानीं हातांत धनुष्य घेऊन नंदीवर बाणांची वृष्टि करण्यास आरंभ केला. पर्जन्याच्या वृष्टीप्रमाणें नंदीवर बाण पडूं लागले, परंतु नंदीनें नुसता श्वास सोडिला कीं, ते बाण वाऱ्याच्या जोरानें झाडांचा वाळलेला पाला उडावा त्याप्रमाणें उडून जात. मग शंकरानीं आपला त्रिशूळ व सुनाभ चक्र मोठ्या वेगानें नंदीवर फेंकून मारिलें, पण नंदीनें त्रिशूळ व चक्र आल्याबरोबर आ करून गिळून टाकिलें. आतां पुढें कोणत्या अस्त्राची योजना करावी या विचारांत महादेव आहेत तोंच नंदी महादेवांच्या अगदीं अंगाजवळ आला व धडक मारून त्यानें महादेवाला खालीं पाडलें; आणि शिंगांनीं उचलून एक योजन लांब फेंकून दिलें. त्यावेळीं महादेवाच्या कंठाला नंदीच्या शिंगामुळें काळा डाग पडला, म्हणून तेव्हांपासून शंकराला नीलकंठ असें ह्मणतात.

ही कथा भविष्योत्तर पुराणांत आहे. हालाहल विष प्राशन केल्यामुळें नीलकंट झाला, ही कथा भागवतांत आहे. इंद्राच्या खड्गानें निलकंठ झाला असें पद्म-पुराणांत आहे. ज्याप्रमाणें कर्मानें देह धारण करणारा आत्मा भिन्न आहे असा भासतो, त्याप्रमाणें युगपरत्वानें ह्या सर्व कथा खऱ्या आहेत. नंदीनें दूर फेंकून दिल्यामुळें महादेव अत्यंत संतप्त झाले, व ते नंदीजवळ येऊन त्याला जाळून टाकण्याच्या उद्देशानें त्यांनीं आपला तिसरा डोळा उघडिला; तिसरा नेत्र उघडिल्याबरोबर भयंकर ऊष्णता उत्पन्न झाली व त्या भीतीनें इंद्र पळूं लागला; परंतु नंदी हा अग्नीचाच अवतार असल्यामुळें त्याला लवमात्रही त्रास झाला नाहीं. मग शंकरानीं नंदीला उडवून फेंकून देण्यासाठीं पवनास्त्र त्याच्या अंगावर सोडलें. त्या योगानें वृक्ष उडूं लागले, परंतु नंदी हा वायूचा अवतार असल्यामुळें त्याला त्या पवनास्त्रापासून कांहीं देखील त्रास झाला नाहीं. आपल्या पवनास्त्रानें नंदीच्या अंगावरील एक केंसहि उडाला नाहीं, असें पाहून महादेव अत्यंत क्रुद्ध झाले व त्यानीं नंदीवर पर्जन्यास्त्र टाकिलें; परंतु नंदीला त्यापासून कांहींच पीडा झाली नाहीं. हा प्रकार पाहून महादेव अत्यंत विस्मित झाले व ते स्वस्थ उभे राहिले. तेव्हां नंदी ह्मणाला; " महादेवा ! आपण यावेळीं निःशस्त्र झाल्यामुळें युद्ध करण्याला अगदीं असमर्थ असे झालां आहांत, म्हणून मी आपलीं शस्त्रें आपणास फिरून देतों, आपण तीं पाजळून मग माझ्या-बरोबर युद्ध करा." असें म्हणून नंदीनें मुखांतून त्रिशूळ व सुनाभचक्र काढून महादेवाला दिलें.

## ५ सुनाभचक्र व सुदर्शनचक्राची उत्पत्ति, व नंदीला आद्यपूजेचा अधिकार.

इतकें ऐकून जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला ह्मणाला; "ऋषि ! सुदर्शन चक्राविषयीं पुष्कळ वेळां ऐकिलें आहे, पण या सुनाभ चक्राची कांहींच माहिती नाहीं तेव्हां ती मला सांगावी." तेव्हां वैशंपायन ऋषि ह्मणाले; " राजा ! वृत्रासुराचा वध करण्यासाठीं, इंद्रानें कामधेनूकडून दधीची ऋषीच्या अस्थी त्याच्या शरिरांतून काढिल्या, त्या अस्थींचें वज्र तयार केल्यावर त्याला धार देण्यासाठीं तेहतीस कोटी देवांनीं तें सूर्यचक्रावर धरिलें होतें. त्यावेळीं तें वज्र सूर्यचक्रावर घांशीत असतां जो चुरा खालीं पडला होता, त्या चुऱ्याचें देवांनीं सुनाभचक्र तयार केलें. त्या चक्राला सहस्र पाकळ्या असून त्या प्रत्येक पाक-ळीला अत्यंत तीक्ष्ण अशी धार सूर्यचक्रावर दिली होती. नंतर तें चक्र सर्व देवांनीं महादेवाला अर्पण केलें होतें. सुदर्शनचक्र हें तर प्रत्यक्ष सूर्यतेजच होतें. सूर्याची स्त्री संज्ञा हिला जेव्हां सूर्यतेज सहन होईना, तेव्हां देवांनीं सूर्यचक्र कापिलें व त्या कापिलेल्या भागाचें सुदर्शनचक्र तयार करून तें विष्णूला दिलें. याप्रमाणें सुनाभ व सुदर्शन चक्राची उत्पत्ति आहे." इकडे नंदीनें महादेवाला शस्त्रें परत दिल्यावर महादेव त्याला ह्मणाले; " बा नंदी ! तूं खरा वीर आहेस,

तुझ्या शक्तीचा पार मला लागत नाहीं, तुझ्यासारख्या बलसागराशीं युद्ध करणें हें निरर्थक होय, तूं महा तेजस्वी असल्यामुळें पवित्र असाहि आहेस. तुझें नांव मी बसवेश्वर असें ठेवितों, तुला मी प्रसन्न झालों आहें, तुझी इच्छा असेल तें माग, मी तें तुला संतोषानें देईन. तूं आमच्याजवळ मागावेंस अशी आमची योग्यता नाहीं, आणि आह्मीं तुझ्या योग्य असें तुला देण्यासहि असमर्थ आहोंत. नदी सागराला काय देणार? अथवा खद्योत सूर्याला काय देणार? किंवा चातक मेघावर प्रसन्न झाला तरी त्याला काय देणार? त्या चातकासारखाच मी तुला प्रसन्न झालों आहें." तेव्हां नंदी ह्मणाला; "हे जगन्नाथा! तुझी इच्छा असेल तें तूंच मजजवळ माग, आज मला तुझ्यासारखा याचक भेटला याबद्दलच संतोष वाटतो." मग शंकर त्याला ह्मणाले, "नंदिकेश्वरा! तूं मला मागितलेलें देण्यास तयार झाला आहेस, तर तूं माझें वाहन हो, मी तुझ्यामुळें हें सर्व त्रिभुवन जिंकीन." शंकराची ती मागणी नंदीनें मोठ्या संतोषानें मान्य करून तो महादेवाला ह्मणाला; "हे कैलासपते! मी आजपासून आपला सेवक झालों असून आपण माझे स्वामी झालां आहांत. आतां माझें मागणें एवढेंच आहे किं, "आपण अक्षय्य या सेवकाच्या सन्निध असावें." महादेव ह्मणाले; "नंदिकेश्वरा! ही तुझी मागणी मी मोठ्या आनंदानें मान्य केली आहे; इतकेंच नव्हे तर मी माझ्या अगोदर दर्शनाचा व पूजेचा मानही तुला देतों. जे कोणी तुझें दर्शन घेतल्यावांचून व तुझी पूजा केल्यावांचून माझें दर्शन घेतील व पूजा करितील त्यांची ती पूजा निर्फल होईल. तुला जरी मी आपलें वाहन केलें आहे, तरी मी तुला आपल्या मस्तकावर ध्वजस्तंभीं धारण करीन; आणि तुला आपल्या दृष्टीपासून क्षणभरहि दूर करणार नाहीं. तूं आपल्या उदरांत क्षीरसागरांतील दूध, नंदनवनांतील गवत व महातेजस्वी अशीं शस्त्रें सांठविलींस म्हणून मी तुझें शेण अत्यंत पवित्र मानून त्याचें भस्म तयार करीन व तें सर्व शरिराला लावित जाईन." याप्रमाणें शंकराचा व नंदीचा सहवास घडून आल्याबद्दल देवांना फार आनंद झाला, व सर्व देव तेथें येऊन त्यांनीं महादेवांचें नांव पशुपति असें ठेविलें. शिखी ऋषीला तें वर्तमान कळल्यावर त्यालाहि फार आनंद झाला. नंतर शंकर नंदीवर बसून वाद्यांच्या गजरांत कैलासीं निघून गेले.

---

## अध्याय १४ वा.

### १ दक्षप्रजापतीला जीवनप्राप्ति.

जनमेजय राजा नंदीची कथा ऐकून ह्मणाला; "वैशंपायन महाराज! आपण सांगितलेल्या या कथेवरून महादेवांच्या अगोदर नंदीची पूजा कां करितात

तें मला समजलें; पण शंकराचे मंदिरांत गेल्यावर प्रथम नंदीचे वृषणाला हात लावितात याचें कारण काय, तें मला माहीत नाहीं, तर ती कथाहि कृपा करून सांगावी." तेव्हां वैशंपायन ह्मणाले; "राजा! एकदां श्रीविष्णूंनीं गरुडाला बोलाविलें व त्याला ते ह्मणाले; गरुडा! विष्णुगण तुला अत्यंत पवित्र असें मानितात, तुझा मोठा मानमरातब ठेवतात व तूं अत्यंत शक्तिसंपन्न म्हणून तुझा फार धाक बाळगितात, तर तुझी अशी शक्ति तरी किती आहे तें मला एकदां कथन कर." तेव्हां गरुड ह्मणाला, "देवाधिदेवा अनंता! मी या त्रिभुवनाला देखील अजिंक्य असा आहें, मी रागावल्यावर कृतांत देखील माझ्या समोरून पळून जाईल, हे सप्तसमुद्र मी मनांत आणीन तर क्षणार्धांत पिऊन टाकीन, अष्ट कुलाचलांनां पाहिजे तर पोटांत ठेवून देईन, ही सर्व सृष्टि पृष्ठभागावर घेऊन मी सहज आकाशांत उडेन, इंद्रादिक सुरगण यांनां तर मी झाडपाल्याप्रमाणें समजतों. माझी शक्ति अशी अतुलनीय आहे कीं नाहीं, याचा अनुभव स्वामीला अनेक प्रसंगीं आलेला आहेच, तेव्हां माझ्या शक्तीविषयीं आपणास अधिक कांहीं सांगावयाला पाहिजे असें नाहीं." गरुडाची ती गर्वोक्ति ऐकून विष्णु मनांतल्या मनांत हांसले व गरुडाला ह्मणाले; "गरुडा! तुझ्यासारखा वीर साऱ्या त्रिभुवनांत नाहीं, ह्मणून मी तुला आपल्या ध्वजस्तंभावर ठेवितों; तसेंच तुला आतां मी एक सांगतों कीं, कैलास पर्वतावर नंदी शिवमंदिराचे दरवाजांत बसलेला आहे, त्याला मजकडे घेऊन ये, तो जर न येईल तर त्याला तूं आपली शक्ति खर्च करून घेऊन ये, पण घेतल्यावांचून परत येऊं नकोस."

## २ वृषभवृषणमाहात्म्य.

विष्णूंनीं याप्रमाणें गरुडाला कार्य सांगितल्यावर गरुड तेथून तत्काल निघाला व कैलासास जाऊन त्यानें नंदीला आपणाबरोबर येण्याविषयीं सांगितलें, परंतु नंदी त्यावेळीं ध्यानस्थ असल्यामुळें त्याला गरुडाचें बोलणें मुळींच ऐकूं गेलें नाहीं. गरुडाचे अंगीं उन्मत्तपणा असल्यामुळें त्याला नंदी आपलें बोलणें मुद्दामच ऐकत नाहीं असें वाटलें, व त्यानें जोरानें नंदीला हालवून तुला विष्णु बोलावीत आहेत ह्मणून सांगितलें. तो त्या गरुडाचा दांडगेपणा पाहून नंदीला फार राग आला, तो ह्मणाला; "अरे दुर्जना! मी शंकराचें ध्यान करीत असतां तूं निष्कारण माझी समाधी मोडलीस, या अपराधाबद्दल तुला चांगली शिक्षा केली पाहिजे, असें ह्मणून नंदीनें जोरानें श्वास सोडिला, त्याबरोबर जसें वाऱ्यानें झाडाचें पान उडून जावें, त्याप्रमाणें गरुड शंभर योजनें लांब उडून गेला. तो पुन्हा नंदीनें उच्छ्वासाबरोबर आकर्षण करून घेतला व त्याला पुन्हा श्वासशक्तीनें दूर झुगारून दिलें. योगी ज्याप्रमाणें धूम्रपान करितो त्याप्रमाणें गरुड नंदीच्या श्वासशक्तीनें आकाशांतून भूमीवर व भूमीवरून आकाशांत जात येत होता. अशा प्रकारें नंदीनें गरुडाला हजार वेळां आकाशांत फेंकून अगदीं जर्जर केलें.

आपली आतां या नंदीच्या श्वासशक्तीपासून सुटका नाहीं असें जाणून गरुड श्रीहरीची प्रार्थना करूं लागला व तो ह्मणाला; "हे हृषीकेशी ! हे अनंता ! मला ही तूं चांगली कामगिरी सांगितलीस. आतां या संकटांतून माझी लवकर मुटका कर, नाहीं तर हा तुझा सेवक या नंदीच्या हातानें मृत्यु पावेल. नंदीच्या श्वासोच्छ्वासामुळें मी आकाशांत खेपा घालून, अगदीं मरणोन्मुख झालों आहें, तेव्हां शरिरांत प्राण आहे तोंच धावून येऊन माझें संरक्षण कर." ती गरुडाची हाक ऐकून विष्णु तत्काल वैकुंठाहून निघाले व बरोबर इंद्र वगैरे देव घेऊन कैलासास आले. तेथें गरुडाची ती अवस्था पाहून विष्णूला फार वाईट वाटलें व त्यानें इंद्राला गरुडास धरण्याविषयीं सांगितलें, त्याप्रमाणें इंद्र गरुडाला धरूं लागला तों, तोही गरुडाबरोबर नंदीचे नाकपुडींत जाऊं लागला. तेव्हां इंद्रानें गरुडाला जलदीनें सोडून दिलें व तो चटकन दूर झाला. मग विष्णु व सर्व देव, गरुड नंदीचे नाकांतू बाहेर पडल्याबरोबर त्याला धरूं लागले तों तेही आकाशांत उडूं लागले. तेव्हां देवांनीं गरुडाला सोडून दिलें व ते बाजूला झाले. विष्णु व सर्व देव यांनीं जेव्हां हात टेंकले तेव्हां गरुडास आतां आपला यांतच अंत आहे असें कळून चुकलें. मग ब्रह्मदेव सर्व देवांनां असें ह्मणाला किं, या नंदीचा वृषण आपण सर्वजण धरून पिळूं, ह्मणजे याला श्वासोच्छ्वास जोरानें करितां येणार नाहीं, व तसें झालें ह्मणजे गरुडानें तत्काळ पळून जावें. ही ब्रह्मदेवानें सांगितलेली युक्ति सर्व देवांनां पसंत पडली व ते सर्वजण नंदीचा वृषण धरून ओढूं लागले. त्यामुळें नंदीला अत्यंत पीडा होऊं लागली व त्यानें गरुडास सोडून दिलें. गरुड ती संधि साधून हजारों कोस लांब पळून गेला. मग सर्व देवांनीं नंदीचा जयजयकार करून त्याला वंदन केलें. विष्णु नंदीला ह्मणाले; "बा नंदीश्वरा ! तूं कृपा केलीस ह्मणून आज गरुड वांचला, नाहीं तर तो केव्हांच मरण पावला असता. आह्मीं तुझा वृषण धरला हें अनुचित केलें खरें; परंतु आजपासून लोक प्रथम तुझ्या वृषणाला हात लावून नंतर तुझी पूजा करतील व त्या नंतर शंकराची पूजा करतील." याप्रमाणें देवांनीं नंदीला वर दिला, पण गरुडानें नंदीला असा शाप दिला किं; "तुझ्या वृषणाला पीडा होईल, व त्या पीडेमुळें तुझा मदभंग होईल." मग देव गरुडाला ह्मणाले किं; अरे! तूं नंदीला व्यर्थ शाप दिलास. तेव्हां मग गरुडानें नंदीला उःशाप दिला किं, याच्या वृषणाला पीडा न होतां याच्या वंशाच्या वृषणाला पीडा होईल. राजा जनमेजया ! याप्रमाणें नंदीच्या वृषणाला प्रथम हस्त स्पर्श कां करावयाचा तें मी तुला कथन केलें. आतां दक्षप्रजापति पुढें कसा जिवंत झाला तें तुला सांगतों.

### ३ विष्णूचा निरोप.

प्रसूतीला कोकिलेनें सांगितल्याप्रमाणें तिनें तिच्या बोलण्यावर विश्वास ठेवून सती जाण्याचें रहित केलें, मग तिनें बरोबरच्या सर्व लोकांनां नगरांत जाण्यास

सागून आपण आपल्या पतीच प्रेत हृदयाशीं धरून तपश्चर्या करण्यास आरंभ केला. इकडे इंद्र वगैरे सर्व देव ब्रह्मदेवाकडे गेले व त्याला सांगू लागले किं, "हे देवा चतुरानना! शिवगणांनीं त्या दक्षाचे यज्ञप्रसंगीं आमची विटंबना केली. हे पहा, अद्यापि शरीरावर व्रण तसेच आहेत. दक्षाला वीरभद्रानें ठार मारिलें व त्याचें मस्तक यज्ञकुंडांत जाळून टाकिलें; आणि सर्व यज्ञयागाचा विध्वंस केला." ती हकीकत ऐकून ब्रह्मदेवाला फार वाईट वाटलें, मग ब्रह्मदेव आपणाबरोबर सर्व देवांनां घेऊन वैकुंठास गेले, तेथें इंद्र विष्णूला ह्मणाला; "हे भगवंता! शिवगणांनीं अत्यंत अनुचित असें कार्य केलें. दक्षप्रजापति यज्ञ करीत असतां त्याला मारून त्याचें शीर यज्ञकुंडांत टाकिलें व त्यांनीं देव, ब्राह्मण व ऋषि यांची फारच विटंबना केली. यज्ञ चालला असतां प्रथम पार्वती तेथें आली व तिनें त्या यज्ञांत रुद्राला भाग नाहीं असें पाहून, रागानें आपला देह योगशक्तीनें दहन केला. यज्ञाचा यजमान दक्ष नाहींसा झाल्यामुळें यज्ञयागादि कर्में बंद पडलीं आहेत, तर हे प्रभो अनंता! आपण कृपा करून दक्ष जिवंत होईल अशी कांहीं तजवीज करावी;" ती इंद्राची विनंति ऐकून विष्णूला करुणा न येतां क्रोध उत्पन्न झाला. तो ह्मणाला; "जशी कृति करावी तशीं त्याचीं फळें मिळत असतात. दक्षानें महादेवाची जर निर्भर्त्सना केली नसती, तर त्याची अशी दशा झाली नसती, परंतु त्याचा विनाशकाल आल्यामुळें त्याला विपरीत बुद्धि झाली व त्या बुद्धीप्रमाणें तो वागला. ती महासती दाक्षायणी आपण होऊन त्याच्या घरीं यज्ञसमारंभासाठीं आली; पण त्या उन्मत्तानें तिची विचारपूस देखील केली नाहीं. आपल्या एकूणसाठ कन्या श्रीमंत ह्मणून त्यानें त्यांचें कौतुक केलें, आणि दाक्षायणीचा तिरस्कार केला. अरे! त्या दाक्षायणीची योग्यता तुह्मांपैकीं एकाला देखील कळत नाहीं. अजाच्या कंठालाही स्तन असतात आणि हृदयालाही स्तन असतात. पण खरें दूध देणारे जसे हृदयाचे स्तन त्याप्रमाणें ती दाक्षायणी, दक्षाची मुलगी होती; पण त्या मूर्खानें कंठाच्या स्तनाला महत्व दिलें, व दूध देणाऱ्या स्तनाकडे पाहिलेंहि नाहीं. ती दाक्षायणी मक्षिकांमध्यें मधुमक्षिकेप्रमाणें होती. तो दक्ष उन्मत्तपणानें महादेवांनां वाटेल तसें बोलूं लागला; त्यावेळीं तुह्मीं कोणीहि त्याचा प्रतिकार कां केला नाहीं? तो महादेव ह्मणजे अनादि ईश्वर, त्याचा पार कोणालाहि लागला नाहीं. त्याची शक्ति केवढी, त्याचें इंद्रिय-दमन केवढें, त्याची शांतता केवढी, त्याची तपश्चर्या केवढी, याची तुह्मांला कल्पनाच नाहीं. ज्याप्रमाणें मासा गळाला जाऊन धरितो, किंवा पतंग दिव्यावर उडी मारितो, त्याप्रमाणें दक्षप्रजापतीनें आपल्या हातानें आपली विटंबना करून घेतली. ज्यावेळीं दाक्षायणी रागावून देह दहन करूं लागली, त्यावेळीं तुह्मांपैकीं कोणी एकानेंहि तिची समजूत कां केली नाहीं? एकानेंहि तिची क्षमा मागितली नाहीं, किंवा योग्य अशी सल्ला दक्षालाही दिली नाहीं! त्यावेळीं

तुम्हीं सर्व अभिमानानें प्रेरित होऊन वागलांत आणि आतां विटंबनेच्या वेळीं कसें करावें ह्मणून विचारण्यासाठीं मजकडे आलांत. वीरभद्रानें जी तुह्मां सर्वांची विटंबना केली, ती योग्य अशीच केली असें मला वाटतें. तुह्मां सारख्या अविचाऱ्यांनां मी सल्ला द्यावयाला असमर्थ आहें. त्या वेळीं जर तेथें नंदी नसता तर तुह्मां सर्वांनां त्या वीरभद्रानें मृत्युपुरीला पाठविलें असतें, पण त्याच्या दयेमुळें तुह्मीं सर्वजण जिवंत राहिला अहांत. तुमच्या विनंतीचा विचार मला मुळींच करितां येत नाहीं." विष्णूनीं जेव्हां रागावून सर्व देवांनां याप्रमाणें स्पष्ट कळविलें, तेव्हां ते देव निराश होऊन आपल्या स्थानाप्रत निघून गेले.

## ४ वैजयन्ती मालेची प्राप्ति.

दक्षयज्ञाचा विध्वंस झाल्यानंतर त्रिभुवनांत कोणीहि यज्ञ करीना. जो तो यज्ञ करण्यास भिऊं लागला. शंकराला हविर्भाग देऊन यज्ञ करावा तर त्या संबंधानें दक्षानें असा शाप दिला होता किं, जो शंकराला हविर्भाग देऊन यज्ञ करील, तो यज्ञ निष्फळ होईल. बरें हविर्भाग न देतां यज्ञ करावा तर शिवगण येऊन विटंबना करितील; अशा अडचणींत सांपडल्यामुळें जरी यज्ञ करण्याची पुष्कळांनां इच्छा व शक्ति होती, तरी यज्ञ करण्याचें कोणास धैर्य होईना. अशा रीतीनें त्रिभुवनांतील यज्ञयागादि कर्में बंद पडल्यामुळें ब्राह्मण उपाशीं मरूं लागले, देवगणांनां हविर्भाग मिळेनासे झाले, आणि यजमान स्वस्थ बसल्यामुळें ऋषींचे मंत्रघोषहि बंद झाले. अशा प्रकारचीं एक हजार वर्षें गेल्यानंतर नारद संचार करण्यासाठीं निघाला व तो फिरत फिरत, दक्षाची स्त्री प्रसूती जेथें पतीचें प्रेत घेऊन तप करीत बसली होती तेथें आला. त्या साध्वीची ती तपश्चर्या पाहून नारदमुनि अगदीं थक्क होऊन गेला. त्या प्रसूतीचें सर्व मांस झडून जाऊन हाडांत कायतो प्राण राहिला होता, पतीला तिनें आपल्या बाहुपाशानें हृदयाशीं घट्ट धरिलें होतें, आणि मुखानें रामनामाचा सारखा जप चालविला होता. एखादें लहान मूल पांढऱ्या गारेचे बारिक खडे गोळा करून तें तांदूळ म्हणून जसें शिजवीत बसतें, त्याप्रमाणें पतीचा लाभ आपणास होईल अशा दृष्टीनें प्रसूती पतीला घेऊन बसली आहे असें नारदाला वाटलें. तें लहान मूल ते खडे लवकर शिजत नाहींत असें पाहून फेंकून देतें, व दुसरा कांहीं तरी खेळ खेळूं लागतें, परंतु प्रसूतीची कोकिळेनें सांगितलेल्या गोष्टीवर दृढ भावना होती. ती शरीरांतील मांस नाहींसे झालें तरी आपल्या पतीला जिवंत करण्याकरितां तपश्चर्या करित होती, आणि तेवढ्यानें कार्यभाग न झाल्यास तिनें आपल्या शरिरांतील अस्थि देखील गमावण्याचा निश्चय केला होता. तो तिचा निश्चय पाहून नारदाला तिची फार धन्यता वाटली व त्याला तिची फार दया आली. तो तसाच तेथून निघाला व विष्णुलोकीं जाऊन विष्णूला भेटला. विष्णूला नमस्कार करून तो ह्मणाला;

" हे वैकुंठपते ! मी पृथ्वीवर फिरत असतां माझ्या दृष्टीस एक मोठा चमत्कार पडला, तो सांगण्याकरितां मुद्दाम तुझ्याकडे आलों आहें. क्षिप्रा नदीचे कांठीं जेथें दक्ष प्रजापतीनें यज्ञ केला होता, तेथें त्या दक्षाची स्त्री प्रसूती पतीच्या प्राप्तीसाठीं तपश्चर्या करीत बसली आहे. पतीच्या कलेवराला हृदयाशीं धरून रामनामाचा जप करीत बसली आहे. त्या तिच्या तपश्चर्येमुळें तिच्या शरीरांतील सर्व मांस नाहींसें होऊन फक्त अस्थि राहिल्या आहेत. अशा रीतीनें ती एक हजार वर्षेपर्यंत तप करीत बसली आहे. तिच्या शरिरावर मृत्तिकेचा डोंगर बनलेला आहे. हे अनंता ! आतां त्या साध्वीचा अंत पाहूं नकोस, ती साध्वी जोंपर्यंत रागावली नाहीं तोंपर्यंत ठीक आहे, नाहीं तर तूं आणि शंकर या दोघानांहि शाप देण्यास ती आतां समर्थ झाली आहे. " नारदानें असें सांगितल्यावर विष्णु ह्मणाले. " नारदा ! तूं ह्मणतोस हें खरें, पण या कामीं शंकराचें साह्य घेतल्यावांचून हें कार्य कांहीं होणार नाहीं. महादेव हा माझा ईश्वर आहे. त्याच्या आज्ञेवांचून कांहीं करणें हें बरें नव्हे, आणि त्याच्या आज्ञेवांचून कांहींहि करण्याची माझी योग्यताहि नाहीं. त्यानें मला हें सुदर्शनचक्र देऊन दुष्टांचा संहार करण्यासाठीं ठेविलें आहे, आपण स्वतः सर्व भोगविलास सोडून लक्ष्मीसारखें रत्न त्यानें मला दिलें आणि आपण तापसी होऊन माझ्या कल्याणासाठीं नेहमी तपश्चर्या करीत आहे. त्या नीलकंठानें ध्यान करून मला श्यामलत्व दिलें; अशा त्या शंकरावांचून हें कार्य करण्यास कोणींहि समर्थ नाहीं. तर तूं शंकराकडे जाऊन त्याची विनंति कर. " विष्णूनें असें सांगितल्यावर नारद तेथून निघून ब्रह्मदेवाकडे गेला, आणि ब्रह्मदेवाला ह्मणाला; " हे चतुरानना ! आतां स्वस्थ बसण्यांत अर्थ नाहीं, तुह्मीं आणि श्रीहरि महादेवांकडे जा, व त्यांची विनवणी करून त्यांना प्रसन्न करून प्रसूतीला दक्ष मिळेल असें करा. नाहीं तर ती सती सर्व देवांवर क्रुद्ध होईल, व मोठा अनर्थ उडेल." नारदानें असें सांगितल्यावर ब्रह्मदेव आपणाबरोबर इंद्रादि लोकपाल घेऊन वैकुंटास गेला, व पुन्हां विष्णूची प्रार्थना करून ह्मणाला; "हे श्रीहरि ! हे लक्ष्मीरमणा ! हे अनंता ! आतां आम्हां देवांची कांहीं तुला करुणा येऊं दे, एक हजार वर्षेपर्यंत इंद्र, वरुण, यम वगैरे कोणत्याही देवतांनां कोणाकडूनहि हविर्भाग न मिळाल्यामुळें सर्वांचे अंतरात्मे तळमळत आहेत. तुझे घरीं कामधेनु असल्यामुळें तुला कोणत्याहि गोष्टीचें उणें नाहीं; परंतु आह्मीं सर्व यज्ञयागाच्या हविर्भागावर अवलंबून असल्यामुळें आमचे फारच हाल होत आहेत. तूं सांगितल्याप्रमाणें आह्मींच महादेवांकडे गेलों असतों, पण ते कदाचित् आह्मांवर क्रुद्ध होतील अशी आह्मांस भीति वाटते; तुजवर त्यांचें फार प्रेम आहे, तेव्हां तूंच त्यांची प्रार्थना केल्यास सहज कार्यभाग होईल." ब्रह्मदेवानें अशी विनंति केल्यावर विष्णूला सर्वांची दया आली, व ते महादेवांकडे जाण्यास निघाले.

बरोबर ब्रह्मदेव, इंद्र, चंद्र, वरुण, अग्नि, वायु, रवि, कुबेर, निर्ऋति, यम, गंधर्व, विद्याधर, यक्ष, सिद्ध, सनत्कुमार, प्रजापति, किन्नर, ग्रह, वेताळ, वगैरे ज्यानां ज्यानां यज्ञयागाचे वेळीं हविर्भाग मिळत असे ते सर्व होते. त्यांच्या समवेत विष्णु विमानांत बसून निघाले ते प्रथम मेरुपर्वताच्या पलीकडे सिद्ध सरोवर होतें, त्या सरोवराजवळ मुक्काम करण्यास उतरले. तें सरोवर अत्यंत रम्य असून सर्व प्रकारच्या कमलपुष्पांनीं व हंसादि पक्ष्यांनीं अत्यंत रमणीय होतें. अशा त्या मनोहर सरोवराच्या दर्शनानें लक्ष्मीरमण विष्णूला फार आनंद झाला. तो सरोवरांतील उदक घेण्याकरितां निघाला; तों तेथें एक शिळा असून त्या शिळेवर एक सोन्याच्या कमलपुष्पांची वैजयन्ती माला होती, ती पाहून श्रीहरिला फार समाधान झालें. त्यानें ती माला गळ्यांत घातली. त्या दिवसापासून ती माला विष्णु अक्षय्य गळ्यांत धारण करूं लागला; ती वैजयंती माळा गळ्यांत घातल्यावर विष्णु ज्या कार्यासाठीं ब्रह्मदेव वगैरे देवांबरोबर आले होते, त्या कार्याला जाऊं नये असें त्यानां वाटलें. ते ब्रह्मदेवाला ह्मणाले; “ ब्रह्मदेवा ! तूंच या सर्व देवांनां घेऊन महादेवांकडे जा, मी गेलों असतां ते मजवर क्रुद्ध होतील; दाक्षायणीसाठीं ते अत्यंत दुःखी झालेले आहेत. तेव्हां मी त्यांना कांहीं सुचविल्यास ते माझ्या दुःखावर डागण्या देण्यासाठीं तूं आला आहेस, असें मला दूषण देतील; आणि खरें संकट तुह्मांवर आहे, तेव्हां तुह्मींच त्यांची विनवणी करणें हें बरें.” असें म्हणून विष्णूनीं ज्या शिळेवर वैजयंती माळा होती, त्या शिळेचा उद्धार केला व ते तेथून निघून वैकुंठास परत आले.

## ५ महादेवाचा आश्रम.

विष्णु याप्रमाणें सांगून तेथून निघून गेल्यावर ब्रह्मादि सर्व देवांनां पुढें कसें करावें हा मोठा विचार पडला. शेषशाई भगवान् केवळ आपणाबरोबर त्या शिळेचा उद्धार करण्यासाठीं व ती वैजयंती माला धारण करण्यासाठीं आले होते असें सर्वांच्या लक्षांत आलें. महादेवांकडे जावें किंवा जाऊं नये, याचा सर्वांनां विचार पडला होता, परंतु क्षुधेनें सर्वांचे प्राण कासावीस झालेले असल्यामुळें त्यानां एकदांचा कांहीं तरी सोक्षमोक्ष करून घेण्यासाठीं महादेवांकडे जाणें जरूर झालें होतें; मग तसेच सर्व देव धैर्य धरून त्या सिद्ध सरोवरापासून निघाले व पुढें मार्ग क्रमूं लागले. मार्ग क्रमित असतां, वाटेंत अलकापूर नावाची कुबेराची नगरी लागली; तेथें त्या दिवशीं सर्व देवांनीं मुक्काम केला. तें महादेवाचें अपूर्व संपत्तिशाली मोठें शहर पाहून सर्व देव आश्चर्यानें थक्क होऊन गेले. तेथील मंदिरें सुवर्णाचीं असून त्या मंदिरांनां ठिकठिकाणीं रत्नें बसविलीं होतीं. सुवर्णाच्या व रत्नांच्या कांतीनें तें नगर नेहमीं दैदीप्यमान असे. त्या शहरांतील रस्ते, चौक, कारंजीं वगैरे सर्व सुवर्णाचीं होतीं; तेथील स्त्रिया व पुरुष अत्यंत सुंदर असून त्यांची अंगकांति दिव्य अशी होती. प्रत्येक स्त्रीपुरुष धर्मरत असून

घरोघर शिवपूजन, शंकराचें ध्यान, भजन, कीर्तन, स्तवन करीत असत. योगी, तापसी, ब्रह्मचारी वगैरे समाधी लावून शंकरांची आराधना करीत होते; ब्राह्मण तेथील पवित्र नदीतिरीं स्नानसंध्या करीत होते; शिवमंदिरांत भेरी, नौबती, कर्णे, तुताऱ्या, टाळ वगैरे वाद्यांच्या गजरांत शंकरांची आरती चालली होती, असें तें नयनरम्य अलकापूर पाहून सर्व देवांना आज आपल्या डोळ्यांचें पारणें फिटल्यासारखें वाटलें. या अलकापुरीच्या पुढें शंकर तपश्चर्या करीत बसले होते, त्यांच्याकडे जावयाचें ह्मणजे शुचिर्भूत होऊनच गेलें पाहिजे; असा विचार करून देवांनीं त्या अलकावतीजवळ वहात असलेल्या नदींत स्नानसंध्या वगैरे कृत्यें आटोपून ते शुचिर्भूत झाले व त्यांनीं पुढें मार्ग क्रमण्यास आरंभ केला. अलकावती सोडून कांहीं मार्ग क्रमिल्यावर एक मोटा वटवृक्ष दिसूं लागला. तो वटवृक्ष शंभर योजनें उंच असून त्याचा विस्तार ऐशीं योजनांचा होता; त्या वटवृक्षाला अनंत शाखा असून सहस्र पारंब्या होत्या; त्या वटवृक्षाखालीं महादेव तप करित बसले होते; तपामुळें अत्यंत दैदीप्यमान अशी महादेवांची मूर्ति पाहून सर्व देवांच्या अंतःकरणांत भीति उत्पन्न झाली. सर्व देव ब्रह्मदेवाला पुढें करून त्याच्या आश्रयानें मागून हळू हळू जाऊं लागले. त्या वृक्षाखालीं कित्येक महान महान् तपस्वी तप करीत बसले होते व त्यांच्या मध्यभागीं शंकर तपश्चर्या करीत होते. तो एकंदर तापसीजनांचा समूह पाहून आकाशांतील नक्षत्रमंडळ भूमीवरच आलें आहे असें वाटूं लागलें. ते अनेक ऋषि तारकांप्रमाणें व शंकर चंद्राप्रमाणें दिसत होते. जसा सोन्याच्या कोंदणांत बसविलेला हिरा शोभतो त्याप्रमाणें त्या ऋषिसमूहांत महादेव शोभत होते. अशा त्या परम तेजस्वी महादेवाला पाहून सर्व देव अत्यंत नम्र झाले व शंकरापुढें हात जोडून उभे राहिले. शंकराची ती सतेज शुभ्र मूर्ति त्या वेळीं फारच शांत दिसत होती. व समाधी लाविलेली असल्यामुळें ती स्फटिकमूर्तिप्रमाणें स्थीर दिसत होती. सर्वांगाला भस्म लाविलें होतें, बसण्यासाठीं दर्भासन घेतलें होतें, कंठांत रुद्राक्षांच्या माळांची गर्दी झाली होती, हातांत अक्षमण्यांची माळ होती, विशाळ कपाळावर चंद्राची कोर प्रकाशमान झाली होती, पिंगट झालेल्या जटा पाठीवर रुळत होत्या, काखेंत दंड धरून त्यावर भार टाकिला होता, व्याघ्रांबरानें शरीर आच्छादन केलें होतें, मस्तकावरून पवित्र गंगा वहात होती, हृदयावर माळेंतील रुंडमणी लोळत होते, सर्पांचीं भूषणें ठिकठिकाणीं घातलीं होतीं, खड्ग, त्रिशूळ, परशु, शस्त्र, डमरु, नानाशक्तींचे बीजमंत्रांनीं युक्त सुनाभचक्र, धनुष्य, पाशुपतास्त्र, अक्षमाळा, नागपाश व वीरघंटा, अशीं आयुधें वगैरे हातांत होतीं, आणि भगवान नीलकंठ, पांचहि मुखांनीं रामनामाचा जप करीत होते. त्यांनीं त्यावेळीं सिद्धासन घातलें होतें. कंबर नागबंधनानें आंवळलेली असून तर्कमुद्रा धारण केली होती. इडा पिंगळेचा वायु त्यांनीं सुषुम्नेंत नेऊन त्या योगानें

षट्चक्रें भरून टाकिलीं होतीं आणि त्यामुळें सर्पिणीनें ऊंच मस्तक केलें होतें. पश्चिमेकडून सूतिला मार्गानें बहात्तर हजार नदींचे रस आणून त्यांनीं एकवीस स्वर्ग भिजविले होते. सोहं श्वासानें पन्नास स्वर्ग बुडून गेले होते. अग्नि चक्राचे ठिकाणीं श्रीअनंतास आणून तेथें शंकर त्याला स्नान घालीत होते. त्या ध्यानावस्थेंत कांहीं ध्येयहि नव्हतें व कोणी ध्याताहि नव्हता. तेथें चंद्र नव्हता, तारे नव्हते, आणि सूर्यहि नव्हता, परंतु ज्योत होती. ती ज्योत पाहून महादेव आपणा स्वतःस विसरले होते. तो परमानंद फक्त योग्यानांच माहित. महादेव ज्याप्रमाणें समाधि लावून बसले होते, त्याप्रमाणें नंदी, कुबेर, मणिमंत, वीरभद्र, चंडीश, भृंगी वगैरे महादेवांचे सेवकहि महादेवांजवळ आपआपल्या शक्तीप्रमाणें समाधि लावून बसले होते. कोणी शून्य तारा अवलोकन करीत होता, कोणी ईश्वराला अंतःकरणांत पहात होता, कोणी प्राणवायू नासिकाग्रीं आणिला होता, तर कोणीं डोळ्यांत आणिला होता. असा तो योग्यांचा दिव्य आश्रम पाहून सर्व देवांनां आज आपण पवित्र झालों असें वाटूं लागलें. तेथें जो ऋषिसमूह होता तोहि शंकराप्रमाणेंच योगानंदांत मग्न झाला होता. कित्येक अंतःकरणांतील ज्ञानदीप पाजळून शंकराला पहात होते, कित्येक उलटी दृष्टि करून जोतिर्लिंग स्थापित होते, कित्येक निश्चळ मनानें स्तंभाप्रमाणें स्थिर बसून संसारसृष्टि व स्वतः या सर्वांस विसरले होते, कित्येक तद्रूपता पावले होते, कित्येकांनीं देहाला सोडून दिलें होतें, कित्येक ऋषि धर्मचर्चा करीत होते, कित्येक वेदपठण करीत होते, कित्येक शास्त्रांची मिमांसा करीत बसले होते, कित्येक शंकराचें नामस्मरण करीत होते, व कित्येक सगुणभक्ति करीत होते तर कित्येक निर्गुणभक्ति करीत होते.

अशा त्या भक्तजनसमूहांत बसलेल्या महादेवाला आपली प्रार्थना कशी कळवावी याचें ब्रह्मदेवाला देखील गूढ पडलें. मग ब्रह्मदेव अत्यंत करुणाजनक अशा वाणीनें महादेवाला म्हणाला; "हे उत्पत्तिस्थितिलयकरा! परात्पर परमेश्वरा! हे महारुद्रा जगन्नाथा! हे सगुणा निर्गुणा! हे भक्तवत्सला नीळकंठा! तूं आद्यमूर्ति आहेस. तुझ्या शक्तीचा पार कोणालाहि लागला नाहीं. कोळी नावाचा किटक आपल्या पोटांतून तंतु काढून त्याचें निमिषार्धांत जाळें तयार करितो व तें पुन्हां निमिषार्धांत पोटांत सामावितो, त्याप्रमाणें हे प्रभो! तूं ही सृष्टि क्षणांत निर्माण करितोस व क्षणांत तिचें निर्मूलनही करितोस. स्वर्ग व नरक, हीं पुण्यवान् व पापी यांच्यासाठीं तूं निर्माण केलीं आहेस. हे देवाधिदेवा! हे कैलासपते! तूं आपल्या भक्तांचे अपराध पोटांत घालून त्यांचें संरक्षण करण्यास समर्थ आहेस. हे पशुपति! आम्हीं तुझी प्रार्थना करित आहों तर आम्हांवर दया कर व आमचें म्हणणें ऐकून घे." ब्रह्मदेवानें याप्रमाणें अंतःकरणपूर्वक करुणा भाकिल्यावर महादेवांनीं आपले डोळे उघडिले व ते सप्रेम दृष्टीनें

ब्रह्मदेवांकडे पाहूं लागले. तेव्हां सर्व देवांनीं महादेवांनां साष्टांग नमस्कार केला. मग ब्रह्मदेवाला शंकर म्हणाले; “ हे चतुरानना ! तुझ्यावर माझा अत्यंत लोभ आहे, सर्व भक्तांमध्यें मला तूं फार आवडतोस, तुला इतकें भिण्याचें कांहींहि कारण नाहीं. दक्षयज्ञाचे वेळीं तूं माझा अभिमान धरून यज्ञाला गेला नाहींस हें माझ्या लक्षांत आहे, पण हे बाकीचे सर्व देव मला त्यावेळीं निर्माल्यवत् समजून उन्मत्त झाले, व तो अज्ञानी दक्ष जसें सांगू लागला तसें हे वागले. यज्ञांत मिळणाऱ्या थोड्याश्या हविर्भागाच्या आशेनें यांनीं आपला अभिमान सोडून दिला, आपलें ब्रीद सोडिलें, व तेज गमावून त्या मंडपांत लांगूलचालन करूं लागले. शंकराला हविर्भाग न दिल्यास आम्हींहि कोणी हविर्भाग घेणार नाहीं, असें जर त्यावेळीं यांनीं त्या उन्मत्त दक्षाला बजाविलें असतें, तर हा एवढा अनर्थ मुळींच ओढवला नसता. ” शंकरांचें तें भाषण ऐकून, ब्रह्मदेव म्हणाला; “ हे कैलासपते ! ही या देवांकडून मोठी चूक झाली, परंतु ती सती प्रसूती अगदीं निर्दोष असून तिला या कामीं निष्कारण दंड मिळाला. आतां तरी तिला तिचा पति परत मिळावा अशी विनंति आहे. ती आज एक हजार वर्षेपर्यंत पतिप्राप्तीसाठीं पतीचें कलेवर हृदयाशीं धरून एकनिष्ठपणें तपश्चर्या करीत आहे. व तपश्चर्या करीत असतां तिचें मांस सर्व झडून जाऊन फक्त अस्थि राहिल्या आहेत. तसेंच या देवांवरहि आतां कृपा झाली पाहिजे. आजवर त्रिभुवनांत कोणीहि यज्ञयागादिक कर्मे केलीं नसल्यामुळें यांनां हविर्भाग असा मुळींच मिळाला नाहीं, आणि तूं दक्षाला जिवंत न केल्यास पुढेंहि यज्ञ होण्याची कांहीं आशा नाहीं; तसें झाल्यास हे बिचारे अन्नावांचून मरण पावतील. हे मोठे अपराधी आहेत, परंतु त्या अपराधाचें फळ ह्यांनां आजवर चांगलें मिळालें आहे, तेव्हां ह्यांनां आतां क्षमा करून ह्यांच्यावर कृपा कर; हे केवळ अज्ञानामुळें फसले तेव्हां ह्यांचे अपराध पोटांत घातले पाहिजेत; ह्यांचें संरक्षण आपण स्वतः न केलें, तर यांनां जगांत कोणी संरक्षक राहिला नाहीं असें होईल. म्हणून हे देवाधिदेवा ! पृथ्वीवर पुन्हां यज्ञयागादि कर्मे होतील अशी तजवीज आपणासच केली पाहिजे. नाहींतर धर्माचा क्षय होऊन मोठा अनर्थ होईल. तुझा हा हविर्भाग वर्ज केल्यामुळें दक्षाचा वीरभद्रानें नाश केला, पण हे पशुपते ! यापुढें सर्वांआधीं तुला हविर्भाग आम्ही देत जाऊं. शिवद्वेष धरून जो यज्ञयागादि कर्मे करील त्याला त्या कर्मापासून पुण्यप्राप्ति तर होणार नाहींच, पण उलट नरकाची मात्र प्राप्ति होईल. हे भूतनाथा ! तूं सर्वांत श्रेष्ठ आहेस; तुझी सर्वांवर पित्याप्रमाणें दया पाहिजे, व ती तशी आहेहि; तसें नसतें तर तूं समुद्रमंथनाचे वेळीं विष घेतलें नसतेंस, तूं वडिलपणाच्या नात्यानें हलाहल विषाचा स्वीकार करून इतर सर्व देवांचें संरक्षण केलेंस

च त्यांनां अन्य रत्नें दिलींस. हे जगज्जनका ! त्याप्रमाणें या वेळींहि तूं हीं यज्ञयागादि कर्मे चालतील असें करून आपला हविर्भाग सर्वांचे मागून घेत जा. कारण वडील या दृष्टीनें अगोदर सर्व देवांनां हविर्भाग देऊन मग तूं घेतला पाहिजेस; परंतु तूं देवाधीदेव जगदीश्वर आहेस, तुला उच्छिष्ट हविर्भाग देणें हेंहि बरें नव्हे, म्हणून तुला आम्हीं सोमपानापूर्वी अनुच्छिष्ट असा हविर्भाग देऊं, व यज्ञांत सर्व देवांनां हविर्भाग देणें झाल्यावर उरलेला सर्व हविर्भाग तुला देऊं. हे जगन्नाथा ! एखादा दाता अन्नदान करितेवेळीं ज्याप्रमाणें सर्व याचकांनां संतोषित करून नंतर आपण अन्न ग्रहण करितो त्याप्रमाणें तूं आमचा पिता आहेस, तेव्हां आपल्या या सर्व मुलांबाळांनां हविर्भाग मिळाल्यावर आपण हविर्भाग ग्रहण करित जावा अशी आपणास विनंति आहे. हे नीलकंठा ! आम्हीं सर्व आतां कोणत्या संकटांत आहोंत हें तूं जाणत आहेसच, तर आम्हांवर दया कर व या संकटाचें निवारण कर."

## ६ दक्षाचा पुनर्जन्म.

याप्रमाणें ब्रह्मदेवानें महादेवांची अनन्य भावानें स्तुति केल्यावर ते प्रसन्न झाले व सर्व देवांनां त्यांनीं तुमच्या संकटाचें निवारण करितों म्हणून आश्वासन दिलें. तेव्हां सर्व देवांचीं हृदयें गहिंवरून आलीं व त्यांनीं शंकरांच्या पायांवर लोटांगण घातलें. शंकरांनीं तत्काल यागभूमीवर जाण्याचीं तयारी केली. ते नंदीवर आरूढ झाले व बरोबर शिवगण व इतर देवांनां घेऊन मोठया समारंभानें तेथून निघाले. शंकर निघाले, असें पाहून हविर्भागावांचून तळमळ करणाऱ्या देवांनां अत्यंत आनंद झाला. दुंदुभी वाजूं लागल्या, शंखाचे ध्वनि होऊं लागले, निशाणें फडफड उडूं लागलीं आणि देव शंकरांचा जयजयकार करूं लागले. अशा थाटानें शंकरांची स्वारी मोठया वेगानें क्षिप्रानदीकडे चालली होती. रानांतून गाय वांसरासाठीं जशी धावून येते, त्याप्रमाणें शंकर प्रसूतीकरितां मोठया त्वरेनें चालले होते. त्या विलक्षण वेगानें चालणाऱ्या नंदीनें महादेवांची ती इच्छा जाणून तो फार जलद चालूं लागला, व त्यानें लवकरच महादेवांनां यागभूमीवर आणून सोडलें. प्रशांत स्रोतवाहिनी क्षिप्रा व तिला येऊन मिळणारी वृंदा या उभय नद्यांचा संगम पाहून महादेवांनां मोठा संतोष झाला. संगमावर शारंगधराची मूर्ति होती, तिचें शंकरांनीं भक्तिपूर्वक दर्शन घेतलें. नंतर त्यांनीं ज्यामध्यें वीरभद्रानें दक्षाचें शिर जाळिलें होतें तें यागकुंड अवलोकन केलें. तेथें त्यानां प्रसूती कोठें दिसेना, तेव्हां ते नारदाला म्हणाले; " नारदा ! रणक्षेत्र कोणतें तें मुळींच कळत नाहीं; आणि प्रसूती कोठें आहे तेंहि दिसत नाहीं. " तेव्हां नारद म्हणाला; " पशुपते ! रणक्षेत्रावरील सर्व चिन्हें नाहींशीं झाल्यामुळें तें ओळखूं येणें अशक्य आहे, परंतु पलीकडच्या बाजूला मृत्तिका उधळलेली असल्यामुळें हें रणक्षेत्र असावें असें

वाटतें." असें नारदानें सांगितल्यावर त्या ठिकाणीं देवांनीं शोधून पाहिलें तों त्या वेळीं प्रसूती दक्षाचें प्रेत घेऊन बसलेली आहे असें दिसलें. महादेव त्या मृत्तिकेच्या ढिगाजवळ गेले व त्यांनीं ती तिच्या अंगावर सांचलेली सर्व मृत्तिका काढिली. पाहतात तों प्रसूतीचें प्राण अस्थिगत होऊन गेले असून मांस सर्व झडून गेलें होतें. त्या हाडकांच्या सांपळ्यावर तिनें आपल्या पतिला हृदयाशीं घट्ट धरिलें होतें, मुखानें एकसारखें खोल गेलेल्या आवाजानें 'राम राम' असें नामस्मरण चाललें होतें. ती त्या साध्वीची मूर्ति व तिची पतिभक्ति पाहून महादेवांचें अंतःकरण दयेनें दाटून आलें. ते ह्मणाले; "या सतीच्या तपाचा पार कळण्यास मी देखील असमर्थ आहें. तप करीत असतांनां प्रसूतीची तशी स्थिति झाली होती, परंतु दक्ष प्रजापतीचें कलेवर तसेंच पूर्ववत होतें. तो प्रकार पाहून सर्वांनां अत्यंत आश्चर्य वाटलें. शंकरांनीं आपल्या जवळची थोडी विभूति घेतली व कृपादृष्टीनें प्रसूतीकडे पाहून ती तिच्या मुखांत घातली, त्याबरोबर ती महासाध्वी पूर्वीपेक्षांहि सुंदर व दिव्य दिसूं लागली. तिचें कृशत्व जाऊन तिची तनु मांसल, सुकोमल व सुंदर दिसूं लागली, तिच्या अंगावर रत्नाचे अलंकार चमकूं लागले व तिच्या जीर्ण वस्त्राचें सुंदर वस्त्र झालें. त्या प्रसूतीला अशी सर्वांगसुंदर व सालंकृत झालेली पाहतांच सर्व देवांना आनंद झाला व त्यांनीं हर्षातिरेकानें महादेवांचा मोठ्यानें जयजयकार केला. प्रसूतीनें डोळे उघडून पाहिलें, तों समोर महादेव उभे आहेत. कैलासपतीची ती प्रशांत, पवित्र व दिव्य मूर्ति पाहिल्यावर तिचें हृदय गहिंवरून आलें; कंठ दाटून आला, आणि डोळे अश्रूंनीं भरून आले. अंतःकरणांत सात्विक भाव उत्पन्न होऊन ती एकाग्र दृष्टीनें शंकराकडे पाहूं लागली. तिला आतां आपले दुर्दिन संपले असें वाटून अत्यंत आनंद झाला. त्या आनंदानें तिचें शरीर थरथर कांपूं लागलें व अंगाला घाम सुटला. ती बोलण्याचा प्रयत्न करूं लागली, परंतु कंठ दाटून आल्यामुळें तिला बोलवेना. तेव्हां ब्रह्मदेव तिला ह्मणाला; "हे प्रसूती! तुझ्या पतीला पशुपति महादेव आतां सजीव करितील, तुझ्या तपश्चर्येला प्रसन्न होऊन ते येथें आले आहेत. तूं आपल्या या विलक्षण पतिभक्तीमुळें उभय कुळाचा उद्धार केला आहेस. तुझ्या सारखी साध्वी आजपर्यंत साऱ्या त्रिभुवनांतही कोणी झाली नाहीं. प्रसूती! तूं आतां या पतीच्या कलेवराला भूमीवर ठेवून उठून उभी रहा." ब्रह्मदेवानें असें सांगितल्यावर प्रसूतीनें आपल्या हृदयावरील कलेवर खालीं ठेविलें, व तिनें उठून महादेव व ब्रह्मदेव या दोघांनां साष्टांग नमस्कार केला. महादेव तिला आशिर्वाद देऊन ह्मणाले; "प्रसूती! तुझ्या पतीला जिवंत करावयाचें खरें, परंतु एक मोठी पंचाईत पडली आहे. तुझ्या पतीचें शिर यज्ञकुंडांत जळून गेल्यामुळें, या कलेवरावर दुसरें कोणाचें तरी शिर बसविलें पाहिजे. तर तूं रणक्षेत्रावर जा अथवा

अन्य कुठूनही चांगलें निर्मळ असें एक शिर घेऊन ये; ह्मणजे तें या कलेवरावर ठेवून मी तुझ्या पतीला जिवंत करितों. " प्रसूतीला ते शंकराचे शब्द ऐकून मोठा हर्ष झाला व ती तत्काल तेथून निघून जेथें युद्ध झालें होतें तेथें आली, व कोणाचें तरी शिर शोधूं लागली. तिनें तें सर्व रणक्षेत्र अनेक वेळां धुंडाळिलें, पण तिला एकहि चांगलें अथवा वाईट शीर मिळालें नाहीं.

दक्षप्रजापति व वीरभद्र यांचें युद्ध होऊन एकहजार वर्षे झालीं होतीं. इतका मोठा काळ गेल्यामुळें रणभूमीवर युद्धाची कोणतींही चिन्हें राहिलेलीं नव्हतीं. मग युद्धांत मृत झालेल्या वीरांचे हस्त, पाद, शिर इत्यादि अवयव मिळणें तर दुरापास्त होतें. पण महादेवांचे आज्ञेवरून ती त्या रणक्षेत्रांत येऊन पाहूं लागली तों थोड्या वेळापूर्वी जें रणक्षेत्र कृषिक्षेत्राप्रमाणें दिसत होतें, तेंच क्षेत्र रक्तमांसांनीं भरून गेलेलें तिला दिसूं लागलें. तो प्रकार पाहून तिला मोठा आनंद झाला व आतां आपणास कोणाचें तरी शिर मिळेल अशी तिला आशा उत्पन्न झाली; परंतु तिची लवकरच निराशा झाली. तिनें ती सर्व रणभूमि सूक्ष्म दृष्टीनें पाहिली, परंतु तिला मनुष्याचें शिर कोठेंहि दृष्टीस पडलें नाहीं, इतकेंच नव्हे तर घोडा, हत्ती, अथवा अन्य कोणत्याहि पशूचें देखील शिर दृष्टीस पडेना. कोठेंहि मस्तक दृष्टीस पडत नाहीं असें पाहून प्रसूती अत्यंत हताश झाली व आतां आपण काय करावें हें तिला सुचेना. ती त्या रणक्षेत्रावर बसली व आतां आपणास सौभाग्य परत मिळत नाहीं, असें जाणून मस्तक पिटून घेऊन आक्रोश करूं लागली. ती त्या विलक्षण कल्पनेनें वेडी होऊन गेली व आपणाशीं ह्मणूं लागली किं, माझें प्राक्तनच फुटकें आहे असें दिसतें. माझ्या दैवांत वैधव्य लिहिलेलें असल्यामुळेंच मला शिर सांपडत नाहीं कीं काय कोण जाणें. माझ्या करुणेला भाक देऊन कैलासपति पार्वतीरमण मला सौभाग्यभिक्षा घालण्यासाठीं आले, परंतु या अभागिणीची कर्मरेषा तितकी कोठें उंच आहे, दुर्दैव ओढवलें ह्मणजे चोहींकडूनच ओढवतें. इतके हजारों वीर या रणक्षेत्रांत मृत झाले, परंतु मला कोणाएकाचेंहि शिर सांपडत नाहीं ! क्षेत्रावर ( शेतावर ) आलेला मेघ वाऱ्यानें दूर करावा, मरणोन्मुखासाठीं त्रैलोक्यचिंतामणी मात्रा मिळाली असतां ती मध्येंच पक्ष्यानें उचलून न्यावी, किंवा क्षुधिताला पंचपक्वान्नाचें ताट मिळालें असतां त्यावर तितक्यांत गरळ पडावें, त्याप्रमाणें माझी अवस्था झाली आहे. महादेवासारखा जगत्पिता सौभाग्यभिक्षा घालावयाला आला, पण माझ्या दुर्दैवानें सर्व मस्तकें अदृश्य करून ठेविलीं आहेत. मनुष्याचें नाहीं तर नाहीं पण कोणा पशूचें देखील शिर मिळूं नये यावरून मी फारच फुटक्या नशिबाची आहे. एखाद्या पशूच्या मस्तकानें माझा पति मिळाला असता, तरी मी अत्यंत सुखी झालें असतें. माझ्या पतीची ती विलक्षण मूर्ति पाहून लोक हांसले असते, परंतु मला होणाऱ्या पतिसेवेच्या सुखापुढें त्या उपहासाचा

किती टिकाव लागला असता ? परंतु माझ्या नशीबीं पतिसेवा नाहीं, हेंच खास. याप्रमाणें प्रसूती त्या रणांगणावर कांहींवेळ विचार करीत बसल्यावर तिला असें वाटलें कि, मस्तक मिळत नाहीं, ह्मणून येथें रडत बसण्यापेक्षां शंकरांनां आहे ही स्थिति कळवावी, ह्मणजे ते दुसरा कांहीं तरी उपाय योजितील. असें वाटल्यावर ती तेथून उठली व हळूहळू पावलें टाकित टाकित निराशदृष्टीनें भूमीकडे पहात पहात यज्ञभूमीकडे येऊं लागली. पूर्वीच्या यज्ञमंडपाच्या जवळ आल्यावर तिच्या दृष्टिस एक बोकडाचें मस्तक पडलें. तें मस्तक पाहिल्याबरोबर प्रसूतीला जो आनंद झाला, त्याचें वर्णन करणें मनुष्यमात्रास अशक्य होय. जसा पुष्कळ दिवसांचा क्षुधित मनुष्य अन्नावर झडप घालतो त्या प्रमाणें तिनें तत्काल त्या मस्तकावर झडप घालून तें उचलून घेतलें, व त्याचें चुंबन घेऊन तें आपल्या हृदयाशीं घट्ट आंवळून धरिलें. बोकडाच्या मस्तकाचा कां असेना पण आपणास आतां आपला पति मिळणार, या विचारानें तिचें हृदय हर्षानें उचंबळून आलें. ती घाईघाईनें तें मस्तक घेऊन शंकर बसले होते तेथें येऊं लागली, परंतु जशीजशी ती शंकराजवळ येऊं लागली तशीतशी तिला हें बोकडाचें मस्तक पाहून सर्व हांसतील याबद्दल लाज उत्पन्न होऊं लागली, तथापि तिनें तें मस्तक टाकून न देतां आपल्या पदराखालीं झांकून घेतलें व नंतर ती महादेवाजवळ खिन्न वदनानें येऊन उभी राहिली. ती अश्रु गाळित गाळित शंकरानां ह्मणाली; "हे पशुपति ! मी तुह्मीं सांगितल्याप्रमाणें सर्व रणक्षेत्र धुंडाळिलें, परंतु मनुष्याचें शिर मिळालें नाहीं." तेव्हां महादेव ह्मणाले; "प्रसूती! मनुष्याचें नाहींतर नाहीं, कोणा पशूचें असलें तरी कार्य होईल. पशूचें शिर कसें लावावें याबद्दल तूं मुळीं देखील काळजी करूं नको." शंकरानीं याप्रमाणें आश्वासन दिल्यावर प्रसूती ह्मणाली; "हे देवाधिदेवा जगन्नाथा ! यज्ञासाठीं बोकड आणिला होता, त्या बोकडाचें शिर सांपडलें आहे, पण आपण सर्व हांसाल ह्मणून मी तें आपल्या पदराखालीं झांकून आणिलें आहे. हे विश्वनाथा ! नदी आपलें पात्र भरून जरी वहात असली, तरी पक्ष्याला जसें चोंचीत मावेल तितकेंच पाणी मिळतें, त्याप्रमाणें रणांत हजारों वीर मेले होते, तरी माझ्या नशीबीं हें बोकडाचें मस्तकच होतें. असो, त्या मस्तकानें जरी माझा पति मला मिळाला तरी मला त्यांत आनंदच आहे." असें ह्मणून प्रसूतीनें आपल्या पदराखालीं लपवून आणिलेलें तें बोकडाचें मस्तक महादेवांचे हातीं दिलें. तें मस्तक हातांत घेऊन महादेव ह्मणाले; "प्रसूती ! या संबंधानें तूं मुळींच कष्टी होऊं नकोस, हें बस्तमस्तक अत्यंत पवित्र असें आहे." असें ह्मणून तें बोकडाचें डोकें महादेवांनीं ब्रह्मदेवाचे हातीं दिलें व त्याला तें दक्षप्रजापतीचे कलेवरावर ठेवण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ब्रह्मदेवानें तें शिर दक्षाचे कलेवरावर ठेविलें व महादेवांनीं विभूति मंत्रून ती त्या दक्ष प्रजा-

पतीवर सिंचन केली व जीवास आवाहन केलें. त्या बरोबर पंचप्राणांनीं दक्षाचे हृदयांत प्रवेश केला व तो सर्वावयवांनीं सजीव झाला. इतक्यांत महादेवांनीं, आपल्या अंगावरील व्याघ्रांबर काढून त्यानें दक्षप्रजापतीचा सर्व देह मस्तकासह आच्छादन केला. नंतर कांहीं मंत्र प्रयोग केल्यावर दक्षाचें शरीरांत सर्व धातुरस, ज्ञान व शक्ति हीं निर्माण होऊन त्याचें तें बस्तमस्तक नाहींसें झालें व तेथें त्याचें पूर्वीचें अत्यंत सुंदर असें मुख येऊं लागलें. इतकें झाल्यावर महादेवांनीं त्याच्या आंगावर घातलेलें व्याघ्रांबर काढून घेतलें. तेव्हां सर्व देवांनां व प्रसूतीला पूर्वीप्रमाणें सर्वांग सुंदर, तेजस्वी व तसाच शक्तिसंपन्न दक्ष पाहून अत्यंत आश्चर्य वाटलें, व सर्वांनां महदानंद झाला. सर्वांनीं महादेवांचा जयजयकार केला."

## ७. पुनः यज्ञसमारंभ.

दक्षराजा जेव्हां डोळे उघडून पाहूं लागला, तेव्हां त्याला नीलकंठाची कर्पूरगौर नागभूषित अत्यंत तेजस्वी अशी मूर्ति दिसली. शंकराला समोर पाहिल्याबरोबर दक्षाचे हृदयांत सात्विक मनोवृत्ति उत्पन्न झाल्या व अंतःकरणांतील पूर्वीचा उन्मत्तपणा, अहंमान्यता, मत्सर, कपटत्व, निर्दयत्व, असहिष्णुत्व वगैरे दोष नाहींसे झाले. पूर्वी हातून झालेल्या अपराधाबद्दल त्याला अत्यंत पश्चात्ताप होऊं लागला. त्या पश्चात्तापामुळें आपण अत्यंत नीचप्रकृति आहों असें त्याला वाटूं लागलें. आपण इतका द्वेष केला तरी महादेवांनीं आपले सर्व अपराध पोटांत घालून आपणास परत प्राणदान दिलें याबद्दल त्याला लाज वाटूं लागली. महादेवांचा तो अनुपमेय मोठेपणा पाहून आपलें क्षुद्रत्व दक्षाच्या लक्षांत आलें. दाक्षायणीचा नाश होण्यास सर्वस्वी आपण कारण असून, तें सर्व महादेव विसरून गेले व आपणास प्राणदान देण्यासाठीं येथवर आले याबद्दल त्यांचे उपकार कोणत्या शब्दानें मानावेत हें त्याला कळेना. त्याच्या अंतःकरणांत गहिंवर उत्पन्न झाला. प्रेम दाटून आलें, कंठ भरून आला, आणि डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. सर्व अंगावर रोमांच उभे राहून शरीर थरथर कांपूं लागलें. महादेवांनां साष्टांग प्रणाम करून व हात जोडून तो गद्गद स्वरानें ह्मणाला; " हे कैलासपते विश्वनाथा ! तूं दयेचा सागर आहेस असें मला वाटतें. मी मोठा अपराधी आहें, उन्मत्तपणामुळें मी तुजबरोबर केवळ पशुप्रमाणें वागलों, परंतु ते सर्व अपराध तूं विसरून जाऊन मला पुनः हें विश्व दाखविलेंस. हे जगन्नाथा ! हे विश्वव्यापक विश्वेश्वरा ! हे करुणानिधे ! हे उमारमणा ! हे महारुद्रा ! हे पशुपते ! हे चंद्रमौळी ! तुझी अगम्य अपरंपारता मी पूर्वी अहंमान्यतेमुळें ओळखिली नाहीं. हे ईश्वरा ! तूं परमब्रह्म असून तुझें अविनाशित्व मला अभिमानामुळें जाणतां आलें नाहीं. सर्वांचे प्राणलिंग तो तूं, सर्वांचे कुळदैवत तो तूं, सर्वांचा आत्मा तो तूं, मी अज्ञानी, मतिमंद, मूर्ख, असल्यामुळें तुझी

शक्ति न ओळखून तुला वाटेल तसें बोललों त्याचें मला योग्य असेंच प्रायश्चित्त मिळालें. मी आपणापाशीं इतका नीचपणानें वागलों, परंतु आपण मला कृपादृष्टीनेंच वागविलें. आपणांस तृतीय नेत्र उघडून संपूर्ण त्रिभुवनही भस्म करून टाकितां आलें असतें; मग मजसारख्या मशकाला चिरडून टाकावयाला किती वेळ लागला असता. हे परमात्मन् ! हे गंगाधरा ! नंदी व वीरभद्र आदिकांनीं माझी जी विटंबना केली ती योग्य अशी केली, माझा अहंकार, माझा अभिमान, माझा दुर्मद व माझें अज्ञान, त्यामुळें नाहींसें झालें, हे त्यांचे मजवर उपकारच झाले आहेत. हे अविनाशी अभंगा ! या सृष्टींतील सुखदुःखाचे प्रकार हे केवळ तुझे इच्छातरंग होत. सर्वांना कार्यकारण तूंच आहेस. हे विश्वनाथा ! मजवर कृपा करून मला जसें उःशापिलेंस त्याप्रमाणें भृगुऋषि व पूषापानांहि उःशाप देऊन त्यांची विटंबना दूर करावी. त्यांच्या अपराधाचेंहि त्यांनां पुरें प्रायश्चित्त मिळालें आहे, त्यांच्यावर दया करावी." दक्षप्रजापतीनें याप्रमाणें शंकराची प्रार्थना केल्यावर भृगु व पूषा महादेवापुढें येऊन उभे राहिले व त्यांनींहि शंकराची अंतःकरणपूर्वक स्तुति केली. तेव्हां शंकर प्रसन्न झाले व त्यांनीं दोघांनां उःशाप देऊन भृगु ऋषीच्या ओंठाला बोकडाची मिशी लाविली, व पूषाला बोकडाचेच डोळे बसविले. याप्रमाणें सर्वांना शापमुक्त केल्यावर शंकर म्हणाले; "हे प्रजापति! आतां तूं पुनः यागाचें साहित्य मिळवून यागाला आरंभ कर."

महादेवांनीं यज्ञाची आज्ञा दिल्यावर सर्व ऋषि, देव, यक्ष, किन्नर, यांनां अत्यंत हर्ष झाला. दक्षानें पूर्वीपेक्षां या यज्ञाची तयारी अधिक थाटाची केली. सर्वांचा उत्साह द्विगुणित झाला होता. यज्ञमंडप अत्यंत भव्य व विस्तीर्ण घातला होता. ध्वजा, पताका, तोरणें व लतापत्रें इत्यादिकांनीं मंडप पूर्वीपेक्षांहि अधिक शृंगारिला होता. संरक्षणाचें कामीं दिक्पाळांची नेमणूक केल्यावर पूर्वींचेच ऋत्विज वगैरे यज्ञाला बसविले. यज्ञपुरुष मृगाच्या वेषानें यज्ञकुंडांतून पळून गेला होता म्हणून त्यास आणण्यासाठीं भृगु वगैरे गेले होते, परंतु तो न येतां पुढें पळूं लागला. पळतां पळतां तो तारकामंडळांत गेला. शेवटीं देवांनीं मोठी शिकस्त करून त्याचें कातडें धरलें, परंतु तो मृग कातडें टाकून तसाच पुढें पळून गेला. तेव्हां देवांनीं त्वचा व त्वचेला असलेलीं त्याचीं शिंगें असें घेऊन ते यज्ञमंडपांत आले. मग महादेवांनीं यज्ञकुंडाजवळ दक्षप्रजापति व प्रसूती यांनां बसवून त्यांच्याकडून पुण्याहवाचन करविलें व यज्ञास आरंभ केला. ऋषींचे चेहरे पुनः आनंदित होऊन त्यांनीं हर्षभरानें वेदघोष करण्यास आरंभ केला. ऋत्विज यज्ञकुंड प्रदीप्त करून आहुत्या देऊं लागले, देव आकाशांतून पुष्पवृष्टि करूं लागले, दुंदुभी वाजूं लागल्या, होमाच्या धुरानें दशदिशा भरून गेल्या, वाद्यांच्या गजरानें आकाशमंडळ दुमदुमून गेलें; आणि पुनः पूर्वीप्रमाणें त्या दक्षप्रजापतीचा तो याग सुरू झाला. या वेळीं इतकाच

फरक होता कीं, त्याच्या हृदयांत शंकराविषयीं द्वेष नसून प्रेम होतें. शंकराच्या प्रेमानें आरंभिलेल्या कार्याचें फळहि नेहमीं चांगलें असेंच मिळावयाचें."

---

## अध्याय १९ वा.

---

### १ यज्ञकुंडांतून शेषशाई भगवान निघाले, ती कथा.

शंकरांनीं दक्षास प्राणदान दिल्याची कथा ऐकून जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; "मुनिवर्य! आपण दक्ष राजाची कथा सांगितली ती ऐकून फार आनंद झाला. दक्षानें यज्ञाला आरंभ करण्यापूर्वी त्यानें शार्ङ्गधराची प्रार्थना करून त्यानां प्रसन्न करून घेतलें होतें. त्यावेळीं शार्ङ्गधरानें मी तुझे यज्ञांत पूर्णाहुतीचे वेळीं प्रत्यक्ष येईन म्हणून दक्षाला आश्वासन दिलें होतें, त्याप्रमाणें विष्णु पूर्णाहुतीचे वेळीं प्रगट झाले किंवा नाहीं, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे; तर कृपा करून मला दक्षयज्ञाची पुढील कथा सांगावी." राजाची ती इच्छा जाणून वैशंपायन ऋषि ह्मणाले; "राजा! महादेवांनीं दक्षाला प्राण देऊन यज्ञ करण्याची परवानगी दिल्यावर दक्षानें यज्ञास आरंभ केला व त्या यज्ञाचें कार्य त्यानें मोठ्या उत्साहानें चालविलें होतें. त्यानें आपल्या एकूणसाठ कन्या, त्यांचे पुत्र, पति, वगैरे अनेक आप्तांना त्या यज्ञासाठीं बोलाविलें होतें. त्याच्या राज्यांत जे मांडलिक राजे होते ते त्याची आज्ञा झाल्याबरोबर यज्ञमंडपांत येऊन राजाला साह्य करीत होते, अन्य देशांतल्या मोठमोठ्या राजांनां मुद्दाम निमंत्रणें पाठवून त्यांना यज्ञ समारंभासाठीं आणविलें होतें. त्यांनीं आपल्या राज्यांतील प्रजाजनांनाहि बोलाविलें होतें. यागपात्रें, समिधा, घृत व यज्ञासाठीं लागणारें अन्य साहित्य सिद्ध झाल्यावर सुमुहूर्त पाहून यज्ञाला आरंभ केला, यज्ञ समाप्तीचे वेळीं त्याला जें कांहीं दान करावयाचें होतें तें सर्व त्यानें यज्ञमंडपांत आणून ठेविलें होतें. ब्रह्मदेव, अध्वर्यु, होता, आचार्य, उद्गाता वगैरे ऋत्विजांच्या हातांत यज्ञकंकणें बांधिलीं. पुण्याहवाचन झाल्यावर दक्षराजानें सर्व ब्राह्मणांना नमस्कार केला व तो यज्ञकुंडाजवळ बसला. ऋत्विजांनीं अग्नीस आवाहन करून मंत्रानें अग्नि सिद्ध केला. अग्नि सिद्ध झाल्यावर हवनास आरंभ झाला. यज्ञयागाचे पद्धतिप्रमाणें वेदमंत्रांनीं देवदिक्पाळांना आहुत्या यज्ञकुंडांत जेव्हां ऋत्विज टाकूं लागले तेव्हां सर्व देवदिक्पाळांना अत्यंत आनंद झाला. पूषाला दांत नव्हते म्हणून त्याला सातूच्या पिठाची आहुती दिली. मद्य, मांस, क्षीर, घृत, पुष्पें, पंचामृत वगैरे सर्व साहित्य तेथें असल्यामुळें त्या यज्ञांत उणें कांहींच भासत नव्हतें. महादेव तो यज्ञसमारंभ मोठ्या कौतुकानें पहात होते. शंकराला हविर्भाग देण्याची जेव्हां पाळी आली तेव्हां तो हविर्भाग दक्षानें

अत्यंत प्रीतीनें व भक्तिभावानें अर्पण केला. शंकरांनीं हविर्भाग ग्रहण केल्यावर सर्व देवांनां मोठें समाधान वाटलें. त्या आनंदाचें सूचक ह्मणून सर्वांनीं सोमरसाचें यथेच्छ पान केलें. नंतर पूर्णाहुती देण्याची दक्षप्रजापतीनें तयारी केली. ऋत्विज मंत्रोच्चार करीत असतां दक्षानें बोकडाचें कापून ठेवलेलें मस्तक घेऊन तें सुवर्णाचे ताटांत ठेविलें. त्या शिराला चंदन, कस्तूरी, केशर वगैरे सुवासिक द्रव्यें चोळलीं, व अन्य योग्य अशा वस्तूंनीं तें अलंकृत करून एका रेशमी वस्त्रांत तें गुंडाळलें व यज्ञकुंडांत टाकण्यासाठीं दक्ष तें आपले हातांत घेऊन यज्ञकुंडाजवळ उभा राहिला. पूर्णाहुतीच्या वेळचे मंत्र ऋषि विशेष उत्साहानें ह्मणूं लागले. दक्षप्रजापति तें मस्तक आपल्या हातांत घेऊन यज्ञकुंडाजवळ उभा राहिला व अनन्यभावानें म्हणाला; " हे नारायणा ! तुझ्या कृपेमुळें मी आज तुला या बस्तशिराचा हविर्भाग देत आहें, याबद्दल मला जो आनंद झाला आहे तो माझ्या अंतःकरणांत मावेनासा झाला आहे. हे देवाधिदेवा ! मी हें शरीर जरी तुह्मांला अर्पण केलें, तरी तें थोडेंच आहे, हा जो मी तुला हविर्भाग देत आहें, तो तुला मी अर्पण करीत आहें असें ह्मणणें हें अज्ञान होय; कारण या विश्वांतील सर्व वस्तूंवर जर तुझी सत्ता आहे, तर तुला मी अर्पण करितों असें ह्मणण्यांत तरी काय अर्थ ! हें तुझेंच आहे, आणि तुलाच अर्पण करीत आहें. या माझ्या शरिरावरहि तुझीच सत्ता आहे. मग ' मी मी ' असें ह्मणण्यास तरी मला कोठें स्वत्व आहे, हे अनंता ! यज्ञपद्धतीप्रमाणें मी हें जें तुला अर्पण करित आहे तें स्वीकारून आह्मां पतितांना दर्शन दे. " दक्षप्रजापतीनें याप्रमाणें अनंताची स्तुति करून दक्षानें तें बोकडाचें शिर परमप्रीतीनें यज्ञकुंडांत टाकून दिलें. तें बस्तशिर यज्ञकुंडांत पडल्याबरोबर दक्षप्रजापतीची श्रद्धा व सत्व जाणून कुंडांतून प्रत्यक्ष शेषशाई भगवान् लक्ष्मीसह प्रगट झाले.

## २ परमेश्वराचें यज्ञकुंडांतून प्रकट होणें.

दक्षप्रजापतीची दृढ भक्ति पाहून परमेश्वर त्याला दर्शन देण्यासाठीं तेथें स्वतः अवतीर्ण झाला व त्यानें दक्षानें दिलेला हविर्भाग त्याच्या समक्ष भक्षण केला. भगवंताची मूर्ति प्रगट झाल्यावर यज्ञमंडपांत विलक्षण प्रकाश पडला. आकाशांत कोटि सूर्य एकदम प्रकाशमान व्हावेत किंवा कोट्यावधि विजांचें तेज एकाठिकाणीं व्हावें, त्याप्रमाणें दैदीप्यमान प्रभूची मूर्ति कुंडांतून निघाल्यावर त्या यज्ञमंडपांत प्रकाश पडला. त्या प्रकाशामुळें शंकराचेहि डोळे दिपून गेले. ऋत्विज तर डोळ्यावर हात ठेवून बसले. नंतर कांहीं वेळानें तें तेज सहन करित करित सर्वांनीं प्रभु श्रीहरीचें दर्शन घेतलें. भगवंताची श्यामलमूर्ति अर्धांगीं लक्ष्मीसह असून आठ हस्तांमध्यें शंख, चक्र, गदा, पद्म, धनुष्य, खड्ग, सुदर्शन व खेटक अशीं आयुधें होतीं. गळ्यांत वैजयंतीमाळा रुळत होती, भृगुऋषीनें मारलेल्या लत्ताप्रहारानें हृदयावर उठलेलें विप्रपादकमळचिन्ह झळकत होतें,

कानांत कुंडलें डुलत होतीं, मस्तकाला कस्तूरी लाविली होती, शेषानें आपली फणा उभारून छत्र धरिलें होतें; अशी ती प्रभूची मूर्ति यज्ञकुंडांतून प्रकट झाल्यावर शंकर, ब्रह्मदेव व प्रजापति हे अनंतास नमस्कार करून त्याची प्रार्थना करूं लागले. दक्षप्रजापति आपल्या हातांत पूजेचें सर्व साहित्य घेऊन उभा राहिला व विष्णूला ह्मणाला. " हे देवाधिदेवा ! तुझी आज पर्यंत कीर्ति ऐकत होतों, परंतु तुझी मूर्ति दृष्टीस पडली नव्हती; ही मूर्ति दृष्टीस पडावी ह्मणून महान महान तपस्वी अनंत कालपर्यंत तपश्चर्या करितात, परंतु त्यांनां दर्शन होत नाहीं. पण या दासाला दर्शन घडलें हें याचें महद्भाग्य होय. हे लक्ष्मीरमणा भगवंता ! तूं अगम्य आहेस, तूं निर्गुण ब्रह्म आहेस, तुझी योग्यता जाणण्यास आह्मी अज्ञानी असमर्थ आहोंत. तुझ्या दर्शनामुळें माझ्या सर्व पातकांचा नाश झाला. तुझ्या कृपाकटाक्षानें माझा उद्धार झाला. मला योग्य असें फल मिळालें असें वाटतें. हे श्रीपती ! हे विश्वनाथा ! आतां माझी आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक या तीन प्रकारच्या तापांतून सुटका कर. स्त्री पुत्र व अन्य आप्त यांचें मरण डोळ्यांनीं पाहणें हा जो आधिदैविक ताप, भूत, भैरव, जखिणी, या दुष्टांपासून पीडा होणें हा जो आधि भौतिक ताप, व द्रव्यापहरण, गोत्रवध, श्वान-भक्षण व जीवांपासन पीडा वगैरे जो आध्यात्मिक ताप, हे तीन ताप अत्यंत जाचक आहेत, मला त्यांची फार भीति वाटते; तुझ्या प्रत्यक्ष दर्शनानें माझी या तापत्रयांतून सुटका झाली अशी मला खात्री वाटते. माझें जन्ममरण आतां खास चुकलें. याग कर्माचे आरंभीं माझे स्वप्नांत येऊन तुला पूर्णाहुतीचे वेळीं दर्शन देईन म्हणून आश्वासन दिलें होतें, तें आश्वासन जसें पुरें केलें; तसेंच हे प्रभो ! मला पुत्रदान देऊन या संसारबंधनांतून माझी सुटका करावी. "

दक्षप्रजापतीनें श्रीअनंताची याप्रमाणें प्रार्थना केल्यावर भगवान लक्ष्मी-रमण म्हणाले; " हे दक्षप्रजापते ! तुझ्या निःसीम भक्तीमुळें मी तुला प्रसन्न झालों आहें. तुझी माझ्यावर श्रद्धा किती ऊज्ज्वल आहे हें पाहण्यासाठीं मीच तुझ्या या यज्ञांत विघ्न आणिलें होतें; मी, ब्रह्मदेव व महारुद्र या तिघांमध्यें जो भेद-भाव ठेवील त्याची कशी दुर्गति होते हें तुझ्या चरित्रावरून लोकांनां चांगलें कळून येणार आहे. हे दक्षा ! आम्हीं तिघेहि एकच आहोंत. तेज, गार व पैलू या तिहींनीं हिरा होतो, पण त्यापैकीं कोणा एकाचा स्वीकार करून जसा कांहीं फायदा नाहीं, त्याप्रमाणें आम्हांपैकीं एकाची सेवा करून एकाचा द्वेष करण्यापासून फल तर कांहीं नाहींच, पण तसें करणें हा पापमार्ग होय. दुधांतून तूप काढण्याचा कोणी प्रयत्न केल्यास तूप मिळतें पण दूध फुकट जातें. म्हणजे तूप व दूध एकच आहे. दुधावांचून तूप मिळणार नाहीं, पण हें न कळतां जो आम्हां हरिहरापैकीं एकाची सेवा व दुसऱ्याचा द्वेष करितो तो खरोखर पाप-मार्गानें जात असतो आणि शेवटीं नरकास जाऊन पोहोंचतो. हरिहरांस निर-

निराळे अवयव आहेत व त्यांचे व्यापारहि निरनिराळे चालतात, परंतु ते सर्व एकच शरीर आहे. त्याप्रमाणें आम्हीं तिघे एक व निरनिराळेहि आहोंत. उत्पत्ति, स्थिति व लय या तीन कार्यासाठीं आम्हीं तिघे भिन्न आहोंत, बाकी सर्व एकच आहोंत. परमात्मा हा एकच आहे. तो निराकार, अविकारी, स्वयंज्योति असा आहे, तो आमचा मूळ आहे. आम्ही त्याचे अंशभूत आहोंत. त्याला रूप नाहीं, कर्म नाहीं, नाव नाहीं असा तो आहे. तेव्हां आम्हां तिघांनां भिन्न मानून जो आमची सेवा करील, त्याला पुण्यफलाची प्राप्ति होणार नाहीं. हरिहरांमध्यें भेद मानून जो वागतो त्याला कोटि ब्रह्महत्येचें व कोटि गोहत्येचें पातक लागतें. तूं असाच भेद मानलास म्हणून तुझी अशी विटंबना झाली. शिर नाहींसें होऊन हजार वर्षेपर्यंत तुझें धड मृत्तिकेवर पडलें. मी व शंकर एकरूप असल्यामुळें तूं मला जो हविर्भाग दिलास तो शंकरानां मिळाला व शंकरानां जो दिलास तो मला मिळाला आणि ब्रह्मदेव हा माझ्या नाभिस्थानीं असल्यामुळें तो नेहमीं मजजवळ असतोच ह्मणून आह्मां दोघांची सेवा करणारांनां तिघांचीहि सेवा करण्याचें पुण्य लागतें. तूं या यज्ञ प्रसंगीं आमच्यामध्यें भेदभाव न ठेवितां सेवा केलीस ह्मणून मी तुला प्रसन्न झालों आहें. तुला तुझ्या इच्छेप्रमाणें या योगाचें फल मिळून तुला एक लक्ष पुत्र होतील. भगवंतांनीं दक्षप्रजापतीला याप्रमाणें सांगितल्यावर, त्यांचीं सर्व देव, दिक्पाळ व ऋषि यानीं पूजा व प्रार्थना केली. नंतर ब्रह्मा, विष्णु व महेश हे तिघेहि तेथून अदृश्य झाले."

## ३ दक्षाचे एक लक्ष पुत्र.

वैशंपायन ऋषि ह्मणाले " हे राजा! याप्रमाणें त्या दक्ष राजाचा यज्ञ यथासांग पूर्ण झाल्यावर, त्यानें यज्ञासाठीं जे ऋषि, देव, दिक्पाळ, ब्राह्मण, मांडलिक राजे वगैरे आले होते त्या सर्वांनां भोजनाला बसविलें. भोजनाची तयारी दक्षानें सर्वोत्कृष्ट केली होती. मंडप सुंदर शृंगारिला होता, मंडपांतील भूमि सडासंमार्जन करून स्वच्छ केली होती, सुवर्णाचे पाट रांगेनें मांडले होते, पाटासमोर सुवर्णाची ताटें ठेविलीं होतीं, अनेक रंगांच्या रांगोळ्या घातल्या होत्या, सुवर्णाच्या वाट्या पानापुढें ठेविलेल्या होत्या, नाना प्रकारच्या चटण्या, कोशिंबिरी, भाज्या, भात, रायतीं, शिखरिणी व लाडू, जिलब्या, अनारसे, करंज्या, श्रीखंड, बासुंदी केसरीभात, मोहनभोग, मांडे, फेण्या, घीवर वगैरे पक्वान्नांनीं ताटें भरल्यावर दक्षानें सर्वांनां बोलावून ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें व वर्णाश्रम धर्माप्रमाणें पाटांवर बसवून संकल्प केला व जेवावयाला बसण्याविषयीं विनंति केली. त्या बरोबर सर्वांनीं—हरहर महादेव—असा ध्वनी करून जेवण्यास आरंभ केला; तें अमृताप्रमाणें मधुर व रुचकर पदार्थ सर्वांनीं आकंठ भक्षण केले. सर्वांचीं भोजनें झाल्यावर दक्षानें आपलें सर्व द्रव्यभांडार ब्राह्मणाकडून लुटविलें. त्यानें ब्राह्मणांनां पांच लक्ष सुवर्णाचीं हरणें, एक लक्ष सुवर्णाचे घोडे, दहा हजार सुवर्णाचे

हत्ती, व अठ्यायशीं हजार निरनिराळे सुवर्णांचे अलंकार सारखे वाटून दिले. याशिवाय रत्नें, बैल, रथ, गाड्या, गायी, म्हशी, जमीनी, घरें, वस्त्रें हीं किती दिलीं याची तर गणतीच नाहीं. राजा जनमेजया! याप्रमाणें त्या दक्षराजानें तो याग यथासांग पूर्ण केला. पुढें कांहीं दिवसांनीं त्या दक्षाला एक लक्ष पुत्र झाले. त्या-दक्षप्रजापतीला एक लक्ष पुत्रांची प्राप्ति झाली, परंतु त्याचा उपयोग त्या राजाला कांहींहि झाला नाहीं. हे एक लक्ष पुत्र मोठे झाल्यावर सर्व त्रिभुवन जिंकतील व इंद्राला पदच्युत करितील अशी देवांनां भीति पडली, ह्मणून त्यांनीं नारदाला दक्षप्रजापतीकडे पाठवून एक निराळीच युक्ति योजिली. नारद दक्षराजाकडे गेला व त्याला ह्मणाला, मी तुझ्या सर्व मुलांनां विद्येंत निपुण करितों, तूं आपलीं मुलें माझ्या आश्रमांत पाठवून दे. नारदाचें तें ह्मणणें प्रजापतीला रुचलें व त्यानें आपल्या सर्व मुलांनां नारदाचे स्वाधीन करून त्याचे आश्रमांत पाठवून दिलें. तेथें नारदानें त्यांनां ब्रह्मश्रुति निरूपण केली. ती ऐकून त्या सर्व मुलांचे मनावर निराळा परिणाम झाला व ते विरक्त होऊन मोक्षमार्गाला गेले. या प्रमाणें नारदानें त्या दक्षाच्या एक लक्ष पुत्रांनां संसारापासून निराळें केल्यामुळें दक्षाला फार राग आला व त्यानें नारदाला शाप दिला, किं, "तुझें आसन तीन घटिकांपेक्षां अधिक असें एके ठिकाणीं राहणार नाहीं." नारदाला असा शाप मिळाल्यापासून तो एकसारखा त्रिभुवनांत हिंडत असतो. असो, हे जनमेजय राजा! ही दक्षप्रजापतीची कथा पुष्कळच मोठी आहे, ती मी तुला संक्षेपानें सांगितली. असें सांगून वैशंपायन ऋषींनीं कथा पूर्ण केली."

---

## अध्याय १६ वा.

### १ कांतीनगराचें वैकुंठास गमन.

जनमेजय राजा, वैशंपायन ऋषीला ह्मणाला; "हे ऋषेश्वरा! दक्षप्रजापतीचीं ज्या प्रमाणें प्रसूतीशीं सहस्र वर्षें ताटातूट झाली होती, त्याप्रमाणें प्रत्यक्ष भगवंताची व लक्ष्मीचीहि बारा वर्षें ताटातूट झाली होती असें मी ऐकितों, तर ती संपूर्ण कथा आपण मला कृपाकरून सांगावी." वैशंपायन ऋषि जनमेजयाची विनंति ऐकून राजाला ती कथा सांगूं लागले. ते ह्मणाले; "राजा! देवांनीं व राक्षसांनीं समुद्राचें मंथन करून चौदा रत्नें काढिल्यावर नंतर मंथन केलें, तेव्हां एकशेंआठ व्याधी निघाल्या. समुद्रांतून निघाल्यावर त्या व्याधींनीं ब्रह्मदेवाला नमस्कार केला व आह्मांस राहण्यासाठीं जागा मिळावी ह्मणून ब्रह्मदेवाची विनंति केली. तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला; " जो दोषी असेल, जो पातकी असेल, त्याच्या शरिरांत तुह्मीं आश्रय करावा. " या प्रमाणें ब्रह्मदेवानें त्या व्याधींना जागा दाखविल्यावर

त्या एकशेंआठ व्याधी अनेक पातक्यांच्या शरिरांत प्रवेश करून राहूं लागल्या. जेथें आपणास दुःख दृष्टीस पडतें, जेथें रोगयुक्त लोक दृष्टीस पडतात, तेथें पातक अवश्य आहे, असें समजावें. कारण पातकावांचून व्याधीचा संचार होत नाहीं. जेव्हां कोणी आपला आचार सोडितो, आपलें कर्तव्य विसरतो, आपल्या धर्माला सोडितो, तेव्हां तो व्याधींनीं ग्रस्त होतो. जो पुत्र आईबापांच्या वचनाप्रमाणें वागत नाहीं, जो शिष्य गुरूची आज्ञा मान्य करीत नाहीं, जी स्त्री पतीची सेवा करीत नाहीं, जो परनिंदा करितो, जो दुसऱ्याचें द्रव्य हरण करितो, जो परस्त्रीगमन करितो, जो स्नानसंध्या करीत नाहीं, जो मृत पितरांचें तर्पण करीत नाहीं, जो देवतार्चनावांचून भोजन करितो, तो निश्चयानें व्याधिग्रस्त होतो, व अत्यंत दुःखें भोगितो. जेथें जेथें निंद्याचरण घडत असेल तेथें तेथें व्याधींना राहण्यासाठीं ब्रह्मदेवानें जागा दिली व त्यांना असें बजाविलें किं, जेथें धर्माचरण होत असेल तेथें तुह्मीं क्षणभरही वास करूं नये. यानंतर पुनः समुद्रमंथन केलें, तेव्हां समुद्रांतून एकशेंसात औषधी निघाल्या. त्या अत्यंत सतेज व ऋषींच्या स्त्रियांप्रमाणें पवित्र व देदीप्यमान दिसत होत्या. त्यांनीं ब्रह्मदेवाला साष्टांग प्रणाम केला, व राहण्यासाठीं स्थान मागितलें. तेव्हां त्या अत्यंत कल्याणकारक आहेत असें जाणून ब्रह्मदेवानें त्यांना हिमालय पर्वत राहण्यासाठीं दिला, व मेघ हे तुमच्या संरक्षणासाठीं तुम्हांवर वारंवार वर्षाव करितील, असें त्यांना सांगून त्यांची हिमालयावर रवानगी केली. पुढें या सर्व औषधींचें ज्ञान स्वर्गांवरील वैद्य अश्विनीकुमार यांनीं मिळवून ते अनेकांच्या अनेक व्याधी दूर करूं लागले.

## २ अश्विनीकुमारांचें वैकुंठास गमन.

एकदां अश्विनीकुमार हे आपलें परम दैवत अशा महाविष्णूच्या दर्शनासाठीं स्वर्गाहून निघून वैकुंठीं येऊं लागले. या वेळीं विष्णु शेषावर स्वस्थपणें निजले होते; लक्ष्मी पायांजवळ बसून विष्णूचें संरक्षण करीत होती; झोंपीं जातेवेळीं विष्णूनीं लक्ष्मीला असें सांगितलें होतें किं, "मी झोपेंत असतां कोणी राक्षस अथवा अन्य दुष्ट प्रकृतीचा कोणी मला त्रास देण्यासाठीं आल्यास त्याचा तूं या सुदर्शन चक्रानें नाश कर." असें सांगून विष्णूंनीं सुदर्शन चक्र लक्ष्मीच्या स्वाधीन केलें व ते स्वस्थपणें झोंप घेऊं लागले. इकडे लक्ष्मी विष्णूच्या पायांजवळ बसून त्यांचें संरक्षण करीत असतां अश्विनीकुमार हे ज्या अश्वाला पक्ष आहेत अशा अश्वाचें रूप धारण करून आकाशांतून वैकुंठांत येऊं लागले; तें विलक्षण कधींहि न पाहिलेलें रूप पाहून लक्ष्मीला हे कोणी तरी कपटवेषधारी राक्षस असून ते मुद्दाम विष्णूला त्रास देण्यासाठीं वैकुंठभुवनांत येत आहेत असें वाटलें, व त्यांचा नाश करण्यासाठीं तिनें सुदर्शनचक्र त्यांच्यावर टाकिलें; त्याबरोबर अश्विनीकुमार आसन्नमरण होऊन भूमीवर पडले व श्रीहरी श्रीहरी असा नामो-

च्चार करूं लागले. आपल्या प्रिय भक्ताचें तें नामस्मरण ऐकून भगवान् विष्णु एकदम जागे झाले, व लक्ष्मीला रागावून ह्मणाले; दुराचारिणी ! तूं मोठा अनर्थ केलास. ते माझे परमभक्त असून माझ्या दर्शनासाठीं येत असतां तूं त्यांचा निष्कारण नाश केलास. मला माझे भक्त किती प्रिय वाटतात हें तुला माहीत नाहीं. मी आपल्या भक्तांनां आपला प्राण किंवा आपलें सर्वस्व समजतों. असलीं कित्येक वैकुंठें, कित्येक स्वर्ग, कित्येक सहस्र क्षीरसागर, असें माझें मोठें वैभव आहे, परंतु या सर्वांपेक्षां भक्त मला अधिक थोर वाटतात व मी त्यांचा फार अभिमान बाळगितों. ते मला आपली बुद्धि, मन, शरीर, संपत्ति, सर्व कांहीं अर्पण करितात व एकनिष्ठपणें माझी सेवा करितात. केवळ माझ्या प्राप्तीसाठीं आपला संसार सोडतात, अनेक सुखांनां तिळांजली देतात, आणि अनेक दुःखें सोसून मला प्राप्त करून घेतात. हे अश्विनीकुमार माझे अत्यंत प्रिय भक्त होते. पापिणी ! तूं त्यांचा विनाकारण वध केलास; तुम्हां स्त्रियांची जातच अत्यंत नीच, तुम्हीं स्वतःच्या लाभासाठीं अधीर होऊन वाटेल तें निंद्य कृत्य करितां, पतीशीं कपट करितां, आणि पतीच्या सुखाची तुम्हीं मुळींच काळजी घेत नाहीं, कारणापुरतें पतीशीं गोड गोड बोलून आपलें कार्य साधून घेतां, आणि तो दृष्टीआड झाला म्हणजे त्याची वाटेल तशी निंदा करितां; त्याच्याशीं अंतःकरणांत वैर धरून वरवर कार्य साधण्यासाठीं मोठ्या प्रेमानें वागतां. स्त्रियांना थोरपण द्यावयाचें, त्यांचा सन्मान ठेवावयाचा, त्यांचा गौरव करावयाचा म्हणजे कुत्र्याचे स्वाधीन सिंहासन करण्यासारखें होय. श्वानाचा गौरव करणें आणि स्त्रियांचा गौरव करणें सारखेंच होय. श्वानाला तरी अन्नाची कांहीं ओळख असते, पण तितकी देखील तुम्हां स्त्रियांना असत नाहीं. त्या मूर्खपणानें वागून पतीचें मुळींच ऐकत नाहींत. पतीच्या खाण्यापिण्याची मुळींच काळजी घेत नाहींत, आणि त्यांचा कोणी आप्त आला म्हणजे त्याचा वाटेल तसा पाहुणचार करितात. एकंदरींत स्त्रीजात ही अत्यंत नीच, कपटी व मूर्ख अशी आहे, यांच्यावर विश्वास ठेवून जो राहील, त्याची व त्याच्या संसाराची दुर्दशा होईल. याप्रमाणें श्रीहरि लक्ष्मीला बोलल्यावर लक्ष्मीची अवस्था मोठी कठीण झाली. तिला त्या कटुवचनांनीं फार वाईट वाटलें व त्यामुळें तिचें अंतःकरण विव्हल होऊन गेलें. सूर्याच्या तापानें कमलिनी जशी कोमेजून जाते, पौर्णिमेची सुखकर रजनी संपल्यावर चंद्रिका जशी निस्तेज होते, त्याप्रमाणें लक्ष्मी विष्णूच्या वाग्बाणांनीं अत्यंत क्लांत झाली. तिचें हृदय दुःखानें दाटून आलें, व डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. ती अति नम्रपणानें विष्णूला म्हणाली; “अहो ! मी या अश्विनीकुमारांचा वध केवळ तुमच्या सांगण्यावरून केला. हे पंखासह अश्वरूप असल्यामुळें ते तुमचे भक्त आहेत असें मला न वाटतां ते कोणी तरी कपटी असावे असें मला वाटलें व मी

तुमच्या सांगण्याप्रमाणें त्यांच्यावर चक्र टाकिलें. न समजून मजकडून ही गोष्ट झाली तर मला या अपराधाबद्दल क्षमा करा." लक्ष्मीचें तें नम्र भाषण ऐकून विष्णु शांत झाले व त्यांनीं अश्विनीकुमारांवर अमृत सिंचन करून त्यांना सजीव केलें, व परम प्रीतीनें आलिंगन देऊन, स्वर्गी मार्गस्थ केलें.

## ३ विष्णु व लक्ष्मीचे शाप.

वर सांगितलेल्या प्रसंगाचे वेळीं विष्णूचें मन कलुषित होण्यासारखा दुसरा एक प्रकार असा घडून आला. कीं, उच्चैःश्रवा नांवाचा सुंदर घोडा आपल्या पाठीवर सूर्याला घेऊन आकाश पंथानें वेगानें चालला असतां त्याला विष्णुच्या वाग्बाणांनीं विव्हल झालेली लक्ष्मी दिसली. लक्ष्मीला त्या स्थितींत पाहून उच्चैःश्रव्याला फार वाईट वाटलें व तो तिची अवस्था पहात क्षणभर आकाशांत उभा राहिला. तेव्हां सूर्यानें आपला प्रतोद (चाबुक) जोरानें उच्चैःश्रव्याच्या पाठीवर ओढला. त्या बरोबर त्या घोड्याची पाठ फुटली व त्यांतून रक्त वाहूं लागलें. त्या आघातामुळें त्या घोड्याला फार पीडा झाली व तो मोठ्यानें किंकाळला. तें किंकाळणें ऐकून लक्ष्मीचें लक्ष त्याच्याकडे गेलें व ती त्या घोड्याची शोचनीय अवस्था पाहून तिला फार वाईट वाटलें व तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. तो प्रकार पाहून विष्णूनां लक्ष्मीचा अधिक तिटकारा आला व ते तिला म्हणाले; " जेव्हां तूं माझ्या भक्तांचा वध केलास तेव्हां तुझ्या डोळ्यांतून एक अश्रु देखील पडला नाहीं, आणि आतां परपुरुषाचें दुःख पाहून तुला इतकी हळहळ वाटते, यावरून तुझें अंतःकरण मला फार कलुषित दिसतें. तुझें माझ्या ठिकाणीं प्रेम नसून तें परपुरुषाचे ठिकाणीं आहे असें वाटतें. तूं चंचल आहेस हें मला पूर्वीपासून माहित आहे. तुला लहान थोराची ओळख नाहीं. राव, रंक, बंधु, दीर, यांची ओळख नाहीं. उचनीचपणाकडे तुझी दृष्टि नाहीं. तुला जातीचा विचार नाहीं, तुला धर्म नाहीं, अधर्म नाहीं, तुला कसलाहि विचार नाहीं. जो तुला वश करितो त्याचें तूं आंगणहि सोडित नाहींस. एकाला फसवून एकाला संतोषित करणें हा तुझा प्रकृति धर्म आहे. तूं महा कपटी असून मला तृणासमान मानतेस; तूं उच्चैःश्रव्याला मनानें चिंतिलेस हा तुजकडून मोठा अधर्म झाला आहे, ह्मणून मी तुला असा शाप देतों किं, तूं घोडी होऊन भूमीवर फिरशील आणि त्या अवस्थेंत बारा वर्षे घातल्यावर तूं शाप मुक्त होशील." विष्णूची ही शापवाणी ऐकून लक्ष्मीला अत्यंत वाईट वाटलें. आणि अत्यंत दुःखभरानें ती भगवंतास ह्मणाली; " वैकुंठनिवासी माधवा ! आपली वृति अत्यंत सात्विक आहे, आपण अत्यंत दयावंत अहांत, आपण सर्व कांहीं जाणतां अशी माझी समजूत होती, परंतु आज माझा तो भ्रम दूर झाला. भृगुऋषीनें तुह्मांला लाथ मारली होती, तें दुःख तुह्मी विसरून जाऊन उलट त्या लत्ताप्रहराचा व्रण तुह्मांला शोभादायकच वाटूं लागला. विरोचनाच्या घरीं तुह्मी स्वतः स्त्री झालां होतां, व त्या अवस्थेंत तुह्माला

बळी झाला, पण तें सर्व विसरून तुह्मीं बळीच्या द्वारीं सेवक होऊन उभे राहिलांत. असो; याप्रमाणें तुमचे दोष अनेक आहेत, पण तुमचे दोष तेच माझे दोष तेव्हां ते काढण्यांत अर्थ तो काय ? स्त्रियेला पती पासून कितीहि त्रास झाला तरी तो तिला प्रियच असतो. मेघां कडून चातक पक्ष्याला फारच क्वचित जलबिंदु मिळत असतात, तथापि तो मेघावर कधीं रागावत नाहीं. त्याप्रमाणें स्त्रिया ह्या पतीच्या आधीन आहेत, त्यांच्याकडून सुखाची प्राप्ति थोडी असो अथवा फार असो त्या पतीवर कधींहि रागावत नाहींत; असें असतां, आपण माझा अपराध नसतां मला निष्कारण शाप दिलात. अपराधावांचून जो, शेजेवर निजलेल्या स्त्रियेचा त्याग करितो, त्याला भ्रूण ( बाल ) हत्येचें पातक लागतें. अपराधावांचून, केवळ लोकवार्तेवर लक्ष देऊन जो पति, स्त्रियेला निष्कारण छळितो त्याला सहस्र क्षतें पडतात; अहो अनंता ! आपण जो मला निष्कारण शाप दिलात, याचा दोष आपणाकडे कांहीं देखील नाहीं, हा सगळा संगतीचा दोष आहे. त्या विषारी सर्पावर आपण नित्य शयन करितां त्यामुळें आपल्या अंतःकरणांतहि तें गरळ उत्पन्न झालें आहे; आणि त्या कारणानें आपलें मन विषयुक्त झाल्यामुळें आपण मला शाप दिलात. " लक्ष्मीचें हें भाषण ऐकून विष्णूला फार पश्चात्ताप वाटूं लागला व ते लक्ष्मीला ह्मणाले; " हे सिंधुतनये ! तुला मी निष्कारण शाप दिला आहे, तर या दोषासाठीं मलाहि तूं शाप दे; " तेव्हां लक्ष्मी ह्मणाली; " ज्या सर्पाच्या संगतीनें आपण मला शाप दिलात, त्याच सर्पावस्थेंत तुह्मांला बारा वर्षें काढावीं लागतील. अहो श्रीधरा ! मी आपण दिलेल्या शापाप्रमाणें घोडी होऊन राहीन, त्यावेळें आपणहि सर्प होऊन माझ्या सन्निधच रहावें; कारण, आपला वियोग मला मुळींच सहन होणार नाहीं. कमलिनी चंद्राला ज्याप्रमाणें विसंबत नाहीं, अथवा छाया वस्तूला सोडून जशी दूर होत नाहीं, किंवा प्रकाश व ज्योति ह्या भिन्न होत नाहींत, त्याप्रमाणें हे श्रीहरि ! आपण मजपासून दूर होऊं नका. " विष्णूंनीं तें तिचें ह्मणणें मान्य केल्यावर लक्ष्मी घोडी झाली व विष्णु सर्प झाले. लक्ष्मी पृथ्वीवर पंपासरोवराजवळील कलिंगवनांत येऊन राहिली, व विष्णु सर्प झाल्याबरोबर एकदम पाताळांत गेले. तेथें त्यांनां वासुकी सर्प भेटला, त्यानें विष्णूला ओळखून त्याची अनन्यभावानें प्रार्थना केली व तो त्यांना पाताळांतच रहा ह्मणून आग्रह करूं लागला. विष्णु ह्मणाले; " वासुकी ! मी लक्ष्मीला तुझ्या सन्निध राहीन ह्मणून अभिवचन दिलेलें आहे, तेव्हां मला पृथ्वीवर राहिलें पाहिजे. " असें ह्मणून विष्णु पृथ्वीवर आले व मलयागिरीवर राहूं लागले. अकरा वर्षें व तीन महिने मलयागिरीवर काढिल्यावर विष्णूला शापकाल संपत आल्याचें स्मरण झालें व ते तेथून निघून पंपासरोवराचे कांठीं आले. तेथें त्यांनीं एक वारूळ होतें त्या वारुळांत प्रवेश करून राहण्यासाठीं चांगली अशी जागा मिळविली. भगवान्

विष्णु अशा रीतीनें कलिंगवनांत येऊन राहिल्यावर त्या अरण्याची शोभा एका-एकीं शतपट वाढली. वसंतकाल नसतांही वृक्ष टवटवीत दिसूं लागले, पुष्पांनीं लता डोलूं लागल्या, फलभारांनीं वृक्ष लीन झाले, वृक्ष मोहरल्यामुळें सर्वत्र परिमळ सुटला, कोकिला मोठ्या प्रेमानें गाऊं लागल्या, सरोवरांत राजहंस आनंदानें पोहूं लागले, याप्रमाणें त्या अरण्यानें एकदम नवा रंग धारण केलेला पाहून लक्ष्मीला विष्णु या अरण्यांत आले असें खात्रीनें वाटलें. त्यांचा शोध करीत करीत ती त्या पंपासरोवराचे कांठीं आल्यावर तिच्या दृष्टीस तेथें जवळच एक मोठें वारूळ पडलें. तें वारूळ पाहून लक्ष्मीला अत्यंत आनंद झाला. त्या आनंदभरानें ती तें वारूळ आपल्या पायाच्या टापांनीं खणूं लागली, तेव्हां सर्व पृथ्वी डळमळूं लागली. नंतर वारुळांतून विष्णु सर्पस्वरूपानें बाहेर आले, व ते लक्ष्मीला पाहून अत्यंत प्रसन्न झाले. त्या वेळीं अश्विनीस्वरूप लक्ष्मी ऋतुस्नात होती. कामातुराप्रमाणें होत असलेल्या त्या घोडीच्या चेष्टांनीं सर्पस्वरूप विष्णूहि कामातुर झाले. तेव्हां विष्णूच्या डोळ्यांतून ऊर्ध्वरेत स्खलन झालें, व तें लक्ष्मीनें जिभेनें चाटून भक्षण केलें. त्या दिवशीं मार्गशीर्ष महिन्याची शुद्ध पंचमी तिथी होती; व त्या शुभ दिवशीं लक्ष्मीचा व विष्णूचा संयोग होऊन लक्ष्मीला गर्भ राहिला, म्हणून देवांना अत्यंत आनंद झाला. देवांनीं आकाशांतून उभयतां-पुष्पवृष्टि केली व वाद्यांचा गजर केला. त्या वेळीं लक्ष्मी म्हणाली: " विष्णूंनीं गर्भोत्पत्ति केल्यामुळें आजचा दिवस अत्यंत शुभ असा झाला आहे. या तिथीला जो वारूळाची व सर्पाची भक्तिभावानें तुळशीपत्रानें पूजा करील, नागाची मूर्ति करून जो पूजा करील, मंगल दीप लावून जो आरती करील, त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होऊन त्याला कधींही सर्पबाधा होणार नाहीं. " लक्ष्मीनें अशाप्रकारें दिलेला आशीर्वाद ऐकून सर्व लोकांना मोठा संतोष झाला. नंतर नऊ महिनेपर्यंत लक्ष्मी व विष्णु तेथें त्या कलिंग-अरण्यांतच राहिले. लक्ष्मीला पूर्ण दिवस झाल्यावर ती प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. त्या आनंददायक दिवशीं देवांना अत्यंत हर्ष झाला. जि-कडेतिकडे मंगल वाद्यें वाजूं लागलीं, आकाशांतून नूतन अर्भकावर व विष्णूवर व लक्ष्मीवर पुष्पांची व गुलालाची वृष्टि होऊं लागली. पुष्पांच्या सुवासानें दिशा भरून गेल्या, व गुलालानें आकाश लाल दिसूं लागलें. नंतर विष्णु व लक्ष्मी दोघेंहि शापमुक्त होऊन पूर्वीप्रमाणें सर्वांगसुंदर झाले, व एक-मेकांच्या मनांतील किल्मिष नाहींसें झाल्यामुळें दोघेंहि एकमेकांना कडकडून*

*मार्गशीर्ष शुद्ध पंचमीपासून श्रावण शुद्ध चतुर्थीपर्यंत आठ महिने होतात, पण मूळ ग्रंथांत नऊ महिने आहेत, याकरितां श्रावण शुद्ध पंचमीचे दिवशीं नववा मास लागल्यावर लक्ष्मी प्रसूत झाली, असें धरिलें ह्मणजे दोष येत नाहीं.

भेटले. त्या मंगलकारक व अत्यंत आनंदकारक दिवशीं श्रावणशुद्ध पंचमी तिथी होती. ज्या वारुळांत विष्णु इतके दिवस राहिले होते, त्या वारुळाला लक्ष्मीनें असा वर दिला कीं, या वारुळाची श्रावणशुद्ध पंचमीचे दिवशीं जो पूजा करील, नागाची आकृति करून जो त्याची आराधना करील, त्याच्या सर्व आधिव्याधि नाहींशा होऊन त्याचे मनोरथ पूर्ण होतील, व तो सर्व सुखाचा उपभोग घेईल.

## ४ पुरूरवा राजाला पुत्रप्राप्ति.

लक्ष्मीला झालेल्या पुत्राचें मुखावलोकन करण्यासाठीं त्यावेळीं स्वर्गांतून देव आले होते. त्या पुत्राला कामधेनूनें दूध दिलें व ब्रह्मदेवानें त्याच्या कंठांत यज्ञोपवीत घातलें. नंतर लक्ष्मी विष्णूला ह्मणाली; "अनंता; या पुत्राला विमानांत घाला व वैकुंठीं घेऊन चला," तेव्हां विष्णु ह्मणाले; "याचा जन्म मृत्युलोकीं झालेला असल्यामुळें याला वैकुंठीं घेऊन जातां येणार नाहीं." असें म्हणून विष्णूंनीं त्याचें नाव एकवीर असें ठेविलें आणि त्या अर्भकाला कमळाच्या पानामध्यें गुंडाळून पंपासरोवराचे कांठीं ठेवून दिलें. विष्णु, लक्ष्मी व सर्व देव असे आपआपल्या विमानांत बसून आपआपल्या स्थानीं गेले. इकडे काशीपुरीचा राजा पुरूरवा पुत्र नसल्यामुळें अत्यंत उदासीन झाला होता. त्या राजाला त्याची स्त्री एके दिवशीं म्हणाली, स्वामी, मला काल रात्रीं चांगलें स्वप्न पडलें असें वाटतें. आपण शिकारीसाठीं कलिंगवनांत गेले असतां आपणास पंपासरोवराचे कांठीं एक सुंदर पुत्र मिळाला असें मी काल स्वप्नांत पाहिलें. तर ह्या स्वप्नाची प्रचीति पाहण्यासाठीं आपण शिकारीची तयारी करावी. आपल्या स्त्रियेनें सांगितल्याप्रमाणें पुरूरवा राजानें लागलीच तयारी केली, व तो आपल्या स्त्रियेसह पंपासरोवराचे कांठीं आला. पाहतो तों तेथें खरोखरच एक सर्वांगसुंदर लहान अर्भक आहे. तें अर्भक पाहिल्यावर राजाला अत्यंत आनंद झाला, व त्याला प्रेमाचें भरतें येऊन त्यानें त्या मुलाला हृदयापाशीं कुरवाळून धरिलें. त्याच्या बाहूकडे पाहिलें तों एकवीर असें नांव लिहिलेलें दृष्टीस पडलें. तेव्हां राजानें त्या बालकाचें एकवीर असेंच नांव ठेविलें व तें बालक राणीच्या स्वाधीन केलें. राणीला त्या अवचित पुत्रप्राप्तीमुळें साहजिक फार आनंद झाला, व तिनें प्रेमानें त्या बालकाला आपल्या हृदयापाशीं घट्ट धरून त्याचें चुंबन घेतलें. नंतर राजा मोठ्या समारंभानें त्या मुलाला घेऊन नगरांत आला.

याप्रमाणें वैशंपायन ऋषि जनमेजय राजाला कथा सांगत असतांना जनमेजय राजा म्हणाला, "वैशंपायन ऋषि ! या पुरूरव्याची उत्पत्ति कशी झाली व त्याचा पुढें वंशविस्तार कसा झाला हें कृपा करून सांगा." राजाची ती उत्कंठा पाहून वैशंपायन म्हणाले; "राजा ! या सर्वांचा मूळपुरुष भगवान् श्री-

विष्णु होत, विष्णूपासून विरंचीची उत्पत्ति झाली आहे. या विरंचीला म्हणजे ब्रह्मदेवाला अत्रि, दक्ष, पुलस्ति, कश्यप, नारद, अंगिरापति, भृगु, पुलह, क्रतु व सुमति वसिष्ठ असे दहा पुत्र झाले. अत्रीचे नेत्रापासून चंद्राची उत्पत्ति झाली; चंद्रापासून बृहस्पतीचे स्त्रियेचे ठिकाणीं बुधाचा जन्म झाला; बुधापासून पुरूरव्याचा जन्म झाला. ह्या पुरूरवाराजाला एकवीस पुत्रांची प्राप्ति झाल्यावर, त्याच्या पायगुणानें दुसरे चार पुत्र झाले. त्यांचीं नांवें अनुक्रमें वेन, दक्षकर्ण, रुरुशी व चौथा एकवीर होय. आतां या चार पुत्रांचा पुढें कसा विस्तार झाला; तो तुला सांगतों.

## ५ पुरूरव्याचा वंशविस्तार.

वेनराजाचा पणतू नहुष राजा हा होय. ह्या नहुषराजाला सहा पुत्र झाले. त्या सहा पुत्रांपैकीं ययातीराजापासून यदू, यदूराजापासून एकरथी, एकरथीपासून भीमरथी, भीमरथीपासून देवदत्त, देवदत्तापासून शूरसेन, शूरसेनापासून वसुदेव पुत्र झाला. वसुदेवाच्या पोटीं श्रीकृष्णपरमात्म्यानें अवतार घेतला होता. श्रीकृष्णाला एकलक्ष साठहजार पुत्र होते. श्रीकृष्णाला १६१०८ स्त्रिया होत्या; या प्रत्येक स्त्रियेक दहा पुत्र व एक कन्या अशीं* अपत्यें होतीं. त्यांत श्रीकृष्णाचा सर्वांत वडील मुलगा जो मदन, त्या मदनाला अनिरुद्ध या नांवाचा पुत्र होता. त्या अनिरुद्धाचा पुत्र वज्रनाभ हा होय. प्रभासक्षेत्रीं यादवांचा जेव्हां नाश झाला; तेव्हां पार्थानें वज्राला तेथून पळविलें; व त्याची मथुरेच्या राज्यावर स्थापना केली. हा यादववंशाचा विस्तार वेनराजापासून कसा झाला, तें तुला सांगितलें. आतां पुरूरवाराजाचा दुसरा पुत्र जो दक्षकर्ण त्याचा वंशविस्तार तुला सांगतों.

दक्षकर्णाचा पुत्र सूर्यवंश, सूर्यवंशाचा पुत्र मनुराव, मनुरावाचा पुत्र येळराजा, येळराजाचा आहुती, आहुतीपासून नहुष, नहुषापासून ययाती, ययातीचा पुरुशती, पुरुशतीचा जनमेजय, जनमेजयाचा श्वेती, श्वेतीचा सार्वभौम, सार्वभौमाचा महाभीम, महाभीमाचा अतिआय, अतिआयाचा अक्रोध, अक्रोधराजाचा रुचिक, रुचिकाचा पुत्र मतिनार, मतिनाराचा दुष्यंत, दुष्यंताचा भरत, भरताचा अभिभानु, व अभिभानुचा सहस्रतनु पुत्र होय. हस्तिनापूर शहर वसविणारा प्रसिद्ध हस्तिराजा हा याच सहस्रतनूचा पुत्र होय. या हस्तिराजाचा अजामेळ, अजामेळाचा श्रावण, श्रावणाचा सौभाग्यनंदन, सौभाग्यनंदनाचा परीक्षिती, परीक्षितीचा भीममंत्र, भीममंत्राचा परदीप, परदीपाचा शंतनु, शंतनुराजाचा विचित्रवीर्य, विचित्रवीर्याचा धृतराष्ट्र, धृतराष्ट्राचे दुर्योधनादि शंभर पुत्र होते. ते सर्व कुरुक्षेत्रीं जें कौरवपांडवांचें युद्ध झालें, त्या युद्धांत मृत झाले. धृतराष्ट्राला विदुर; आणि पंडू

---

* हिशोब केल्यास ही अपत्यसंख्या १७०७८८ इतकी होते.

असे दोन बंधु होते. त्यांपैकीं पंडूला धर्म, भीम, अर्जुन, नकुल व सहदेव असे पांच पुत्र होते. त्यांत अर्जुनाला अभिमन्यु या नांवाचा पुत्र होता; कुरुक्षेत्रावर झालेल्या युद्धांत हा अभिमन्यु चक्रव्यूहांत सांपडून मृत झाला. या अभिमन्यूला परीक्षिति नांवाचा महावैष्णव पुत्र झाला, आणि हे जनमेजय राजा! त्या परीक्षिति राजाचा तूं पुत्र होय. हे जनमेजया! आतां तुला पुरूरवाराजाचा तिसरा पुत्र जो रुरुशी त्याचा वंशविस्तार सांगतों.

या पुरूरवाराजाचा जो तिसरा पुत्र रुरुशी या नांवाचा होता, त्याला जयंत पुत्र झाला होता. जयंताचा देवश्रम, व देवश्रमाचा प्रसिद्ध शिबी या नांवाचा पुत्र होता. तो चक्रवर्ती राजा असून, त्यानें आपल्या भक्तिबळानें आपलें सर्व कांतीनगर वैकुंठास नेलें होतें. हा राजा सर्व परिवारासह वैकुंठास गेल्यामुळें, त्याचा वंशविस्तार पुढें मुळींच झाला नाहीं. पुरूरवाराजाचा चवथा पुत्र जो एकवीर, त्या एकवीराला कोण कोण पुत्र होते, व त्याचा पुढें वंशविस्तार कसा झाला, हें सांगण्यापूर्वीं; राजा! तुला शिबीराजा आपल्या सर्व परिवारासह, व कांतीनगरासह वैकुंठास कसा गेला, ही कथा तुला सांगतों.

## ६ कपोत व ससाणा पक्षी.

पुरूरवाराजानें आपल्या चौघां पुत्रांना चार ठिकाणचीं राज्यें दिलीं होतीं; एकवीराला मल्लिकावतीचें राज्य दिलें होतें. रुरुशीला विष्णुकांतीचें राज्य दिलें होतें; दक्षकर्णाला इंद्रप्रस्थाचें राज्य दिलें होतें व यदूला मथुराकांतीचें राज्य दिलें होतें. स्वतः पुरूरवा हा पाटणा शहरीं राज्य करीत होता; शिबीराजा हा विष्णुकांती येथें राज्य करीत होता. तो राज्य करीत असतां, त्यानें एकदां नव्याण्णव यज्ञ करून शंभरावा यज्ञ करण्याचा संकल्प केला; व तो त्या उद्योगाला लागला. त्यानें यज्ञाला आरंभ केल्यावर असा निश्चय केला होता कीं, जो कोणी जें कांहीं मागेल तें त्याला नाहीं न म्हणतां संतोषानें द्यावयाचें. त्यानें यज्ञासाठीं मोठा मंडप घालून यज्ञाचें कार्य मोठ्या उत्साहानें व थाटानें चालविलें होतें. यज्ञासाठीं वसिष्ठ, वामदेव, शतानंद, कश्यप, पाराशर, कौंडिण्य, कर्व, गौररूप, बक्रदाल्भ्य, भृगु, सुमंत, मार्कण्डेय वगैरे विद्वान् पवित्र व महातपोनिधि असे ऋषि ऋत्विज होते. अशा विद्वान् ऋत्विजाकडून त्या शिबीराजाच्या यज्ञाचें कार्य चाललें असतां, नारद अमरावतीस इंद्राकडे गेला, व त्याला म्हणाला, "अरे सुरपति! पृथ्वीवर शिबी नांवाचा राजा शंभरावा यज्ञ करीत आहे; या यज्ञप्रसंगीं जो कोणी कांहीं मागेल, तें त्याला देऊन त्याला संतोषित करावयाचें, असा त्या राजानें संकल्प केला असून, त्याच्या निश्चयाप्रमाणें त्यानें नव्याण्णव यज्ञ पूर्ण केले आहेत. आतां एक राहिला आहे, तो पूर्ण झाला म्हणजे तुझें तेजबळ सर्व नाहींसें होऊन त्याला प्राप्त होईल, व तो या अमरावतीचा इंद्र होईल." नारदानें ती सांगितलेली हकी-

कत ऐकून, इंद्र मोठ्या काळजींत पडला. तो नारदाला म्हणाला, "नारदा! या संकटाचें निवारण कसें करावें, तें मला तर कांहीं समजत नाहीं; पण तूं जर कांहीं युक्ति सांगशील तर मजवर मोठे उपकार होतील." तेव्हां नारद म्हणाला, "इंद्रा! तूं आतां कपोत पक्षी हो; आणि अग्नीला ससाणा पक्षी कर, अग्नीनें तुझे मागें लागावें; व तूं प्राणसंरक्षणासाठीं म्हणून पळत पळत शिबी-राजाकडे जाऊन आश्रय मागावा. मग अग्नीनें शिबी राजाकडे येऊन कपोत पक्षी मागावा, किंवा तितक्याच वजनाचें राजाचें मांस मागावें; म्हणजे त्या राजाचें सत्त्व सहज नाहींसें होईल; व त्याला शतयागांचें फळ मिळणार नाहीं. याप्रमाणें नारदानें दिलेली सल्ला इंद्राला पसंत पडली; व त्याप्रमाणें तो कपोत झाला, व अग्नीला ससाणा करून अमरावतीहून निघाला. दोघेही मोठ्या वेगानें आकाशपंथ आक्रमण करून पृथ्वीवर कांतीनगराजवळ आले.

इकडे राजा शिबी यज्ञकुंडाजवळ बसून ऋत्विज् सांगतील त्याप्रमाणें यज्ञकुंडांत आहुत्या देत होता. इतक्यांत कपोतपक्षी भरारी मारून त्या यज्ञमंडपांत आला, व राजाचे हातावर जाऊन बसला. त्या मनोहर व गोजिरवाण्या पक्ष्याला पाहून राजाला फार आनंद झाला. तो त्या पक्ष्याला गोंजारींत असतां तो पक्षी म्हणाला, "राजा! माझ्यामागें एक ससाणा पक्षी लागल्यामुळें मी पळत पळत प्राणसंरक्षणासाठीं तुजकडे आलों आहे." असें कपोतपक्षी राजाला जो सांगत आहे, तोंच तेथें एक मोठा ससाणापक्षी भरारी मारून आला; व त्या कपोतावर झडप घालूं लागला; तेव्हां सर्व लोक 'हाणा हाणा' म्हणून ओरडूं लागले. मग तो ससाणा पक्षी मंडपांत एका उंच जागीं जाऊन बसला व राजाला म्हणाला; "हे राजा! मी आज तीन दिवस उपाशीं आहें, आज मोठ्या कष्टानें मला हा कपोत मिळाला, तों तूं त्याला आश्रय दिलास. ही शिकार माझी आहे, तेव्हां ही तूं मला दिली पाहिजे. तूं या यज्ञप्रसंगीं जें कांहीं कोणीं मागेल तें त्याला देतोस, असें मीं ऐकिलें आहे, तेव्हां ही वस्तु तर माझीच आहे, ती मला द्यावयाला कांहींच हरकत नाहीं." ससाणा असें ह्मणाल्यावर कपोतपक्षी राजाला ह्मणाला; "राजा! मी तुला शरण आलों आहें, तेव्हां माझें संरक्षण करणें तुझें कर्तव्य आहे. धेनु जशी कोणी वाघाचे स्वाधीन करीत नाहीं, त्याप्रमाणेंच तूं मला या ससाण्याच्या स्वाधीन करूं नको. तूं जर याच्या स्वाधीन मला करशील, तर तुझ्या सत्त्वाचा नाश होईल, आणि तुझा हा शंभरावा यज्ञही फुकट जाईल." कपोत असें ह्मणाल्यावर ससाणा ह्मणाला; "राजा! याच्या बोलण्यावर तूं विश्वास ठेवूं नकोस, मी नेहमीं मांसाहार करणारा प्राणी आहें; आज तीन दिवस मला खावयाला मिळालें नाहीं. आज मोठ्या कष्टानें शिकार मिळाली; पण तूं त्या कपोताला आश्रय दिलास. मी आतां उपाशीं तरफडून मरणार दुसरें काय!" असें म्हणून ससाणा तत्काल खालीं पडला, व मूर्च्छना आल्याप्रमाणें करूं लागला. वारंवार चोंच

उघडी, डोळे गरगर फिरवी व पंख फडफड करूं लागला. ती त्या ससाण्याची भुकेवांचून होणारी स्थिति पाहून राजाला फार वाईट वाटलें, व तो आपल्या आसनावरून उठून त्या पक्ष्याला वारा घालूं लागला; त्याच्या चोंचींत पाणी घालूं लागला, तेव्हां तो ससाणा राजाला म्हणाला, ' हे राजा! वारा घालून काय व्हावयाचें आहे? भूक लागल्यामुळें माझे पंचप्राण कासावीस होत आहेत. आणखी थोडा वेळ जर मला त्या कपोतपक्ष्याचा मांसाहार न मिळाला, तर मी पचत्वाला पावेन; राजा! तूं इच्छादान देण्याचा संकल्प केला आहेस; पण तूं तर माझें मला देखील परत देत नाहींस." त्या ससाण्याचें तें बोलणें ऐकून राजाला काय करावें तें समजेना. तो त्या ससाण्याला ह्मणाला; अरे! मी तुला तुझी इच्छा असेल तितकें मांस खाण्याला देतों; पण ह्या पक्ष्याला मागूं नकोस, त्याचा प्राण घेतल्यावांचून जर तुझी क्षुधा शांत होणार आहे तर मग विनाकारण त्याला मारून तरी काय फायदा?" तेव्हां तो ससाणा ह्मणाला; "राजा! मी अमंगळ पशूंचें, शिळें, कोणी तरी कापलेलें मांस कधींहि खात नाहीं. तुझी इच्छाच असेल तर मी उत्तम सोज्ज्वल मनुष्याचें या पक्ष्याच्या भारंभार ताजें मांस घेऊन संतोषित होईन." ससाण्याची ही चमत्कारिक मागणी ऐकून राजाला मोठा विचार पडला. या यज्ञप्रसंगीं मनुष्याचा वध करून त्याचें मांस देणें हें अनुचित होय; आणि कदाचित् मनुष्यवध करण्याचें मनांत आणिलें, तरी मनुष्य कोठून मिळणार! तेव्हां प्रधान ह्मणाला; "महाराज! आपल्या तुरुंगांत पुष्कळ कैदी आहेत, त्यापैकीं जो महान् अपराधी असेल, ज्याला देहदंड हीच शिक्षा द्यावयाची असेल, त्याला कापावें; आणि त्याचें मांस या ससाण्याला देऊन हें संकट निवारण करावें." हें त्या प्रधानाचें भाषण ऐकून ससाणा ह्मणाला; "राजा! हा तुझा प्रधान अत्यंत अज्ञानी आहे, हा तुला भलतीच सल्ला देऊन पापपथ दाखवीत आहे. जो दोषी ठरला असेल, ज्यानें अनंत पातकें केलीं असतील, त्याचें मांसहि अत्यंत अमंगळ व उच्छिष्ट समजतात; असें मांस यागकाळीं याचकाला देणें हें अधोगतीस कारण होय. राजा! या वेळीं तूं माझी मागणी अमान्य केल्यास तुझा हा शंभराव्या यागाचा सर्व प्रयत्न फुकट जाईल, तुझें सत्त्व नाहींसें होईल, आणि याचकाला तूं विन्मुख लाविलेंस ही तुझी अपकीर्ति अक्षय्य राहील." ससाण्याचे ते शब्द ऐकून राजाला फार वाईट वाटलें, परंतु जो कोणी येईल त्याला मी इच्छादान देईन, हे शब्द परत घ्यावयाचे नाहींत, असा त्यानें संकल्प केला व तो ससाण्याला म्हणाला; "हे ससाण्या! मी कपोताला आश्रय दिला आहे, तुझें संरक्षण करतों; म्हणून त्याला मी भाष्यदान दिलें आहे, तेव्हा तो कपोत पक्षी मला तुझे स्वाधीन करितां येत नाहीं, त्याच्याऐवजीं तुला मी तुझ्या ह्मणण्याप्रमाणें मनुष्याचें मांस देतों. तूं ह्मणतोस त्याप्रमाणें सोज्ज्वल, पवित्र असा कोण आहे, तें मला माहित नाहीं; व दुसरा कोणी असल्यास

त्याचा वध करणें हेंहि पाप होय. म्हणून मी आपल्या शरीरांतलें कपोतपक्ष्याच्या वजनाइतकें मांस देतों. " राजाचे ते उद्गार ऐकून ससाण्याला मोठा आनंद झाला; परंतु यज्ञमंडपांतील सर्व लोकांनां अत्यंत वाईट वाटलें, व त्यांना त्या ससाण्याचा फार राग आला. ते म्हणाले; " अहो ! या ससाण्यालाच येथून हुसकून द्या, किंवा तो कपोत त्याला देऊन टाकून तेथून घालवून द्या. यःकश्चित् पक्ष्यासाठीं आपल्या प्रणाचा नाश करून घेण्याची एवढी काय आवश्यकता आहे ?" तेव्हां राजा सर्व लोकांना शांत करून म्हणाला; " लोकहो ! असें कांहीं कोणी अविचाराचें कृत्य करूं नका. पक्षी असो अथवा कोणीहि असो, त्याची इच्छा वचनाप्रमाणें पुरी करणें हें माझें कर्तव्य होय. " असें म्हणून राजानें धर्मसेन नांवाच्या आपल्या पुत्राला बोलावून प्रासादांतील अंगणांत तराजू बांधविला, नंतर एका ताजव्यांत कपोत पक्षी घातला व दुसऱ्या ताजव्यांत राजा आपल्या शरीरातलें मांस स्वतः हातानें कापून घालूं लागला. प्रथम राजानें आपलें दैवत जें श्रीनरहरि, त्या श्रीनरहरींचें नामस्मरण केलें; व अत्यंत तीक्ष्ण अशी सुरी घेऊन जंघेंतील मांस कापून तें तराजूंत घातलें. कपोतपक्ष्याच्या वजनापेक्षां दुप्पट भरेल इतकें मांस राजानें प्रथमच जंघेतून काढून तराजूंत घातलें; परंतु ज्या पारड्यांत कपोतपक्षी बसला होता तें पारडें जमिनीपासून एक केंसभरही वर उचललें नाहीं. मग राजानें दुसऱ्या जंघेतलें मांस काढून तें तराजूंत घातलें; तरी ताजवा खालीं मुळींच येईना. नंतर राजानें पोटऱ्या, दंड वगैरे अवयवांतून मांस काढून तें तराजूंत घातलें; परंतु कपोतपक्ष्याचें वजन मुळींच पुरें होईना. शरीरांत तर कोठें मांस राहिलें नाहीं, असा विचार करून राजानें सुरी घेतली. व तो ती पोटांत घालूं लागला, तेव्हां ससाणा म्हणाला; " राजा ! तुझ्या पोटांतलें मांस मी मुळींच घेणार नाहीं, कारण जठर हें मलमूत्राचें कोठार होय. अशा ठिकाणचें अमंगल मांस मला मुळींच नको. " हें ससाण्याचें बोलणें ऐकून शिबी राजाची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. शरीरांतून ठिकठिकाणचें मांस काढल्यामुळें सर्व अंगांतून रक्त वहात होतें, शरिरांतून रक्त व मांस गेल्यामुळें शक्ति नाहींशी झाली होती, अशा स्थितींत ससाण्याचे ते उद्गार ऐकून राजाला फार वाईट वाटलें, त्याला मूर्च्छा आली; व तो जमिनीवर निश्चेष्ट होऊन पडला. ती त्या राजाची स्थिति पाहून सर्व कांतीनगरचे लोक शोकाकूल झाले. लोक त्या दुष्ट ससाण्यावर फार क्रुद्ध झाले, परंतु त्या राजाची राणी सत्यवती व मुलगा धर्मसेन यांनीं त्या पक्ष्यावर राग न करण्याविषयीं लोकांस विनंति केली. कांहीं वेळानें राजा सावध झाल्यावर राणी सत्यवती म्हणाली, ' महाराज ! आपण आपल्या शरीरांतलें बहुतेक मांस दिलें आहे, आतां शरिराला अधिक त्रास दिल्यास, आपली अवस्था कठीण होऊन मजवर भलताच प्रसंग येईल, तर आपण आतां माझ्या शरीरांतलें मांस

घालून या ससाण्याला संतुष्ट करा. मी मृत झालें तर कांहीं हरकत नाहीं. आपलें शरीर कायम असल्यावर आपणास अनेक स्त्रिया मिळतील; व आपला संसार होईल." परंतु त्यापुढें सत्यवतीला बोलूं न देतां त्या राजाचा मुलगा धर्मसेन म्हणाला; "बाबा! आपण व आई कुशल रहाल तर आपणास मजप्रमाणें अनेक पुत्र होतील, याकरितां आपण आईचें मांस न देतां या पक्ष्याला माझ्या शरीरांतील मांस द्यावें." सत्यवती व धर्मसेन या उभयतांचें तें बोलणें ऐकून शिबी राजाच्या अंतःकरणाची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. नगरवासी लोक अश्रु गाळूं लागले; परंतु तो ससाणा धर्मसेनाचें तें बोलणें ऐकून म्हणाला, "राजा! स्त्रियांची जातच मुळीं अपवित्र आहे, मी आजपर्यंत कधींहि पक्ष्यांतील मादीदेखील मारून खाल्ली नाहीं, मनुष्ययोनींतील स्त्री तर त्याहीपेक्षां अपवित्र, तिच्या मांसाचा तर मी कधींहि स्वीकार करणार नाहीं. तसेंच हा तुझा पुत्र धर्मसेन व्रतबंध झालेला नसल्यामुळें शूद्र आहे, याचें मांसहि मला सेवन करितां येणार नाहीं, आणि राजा! स्त्री असो व पुत्र असो, तीं परकीं अशींच आहेत, त्यांना पीडा करून त्यांच्या मांसानें माझा संतोष करूं पाहणें, हा खऱ्या दात्याचा धर्म नव्हे; म्हणून तुला जर आपलें सत्त्व राखावयाचें असेल, तर स्वतःचेंच मांस दे. अश्ववृषभांना त्रास देऊन तीर्थयात्रा करण्यांत जसें पुण्य नाहीं, चोरी केलेल्या द्रव्यानें अतिथींना भोजन घालण्यांत जशी कीर्ति नाहीं, किंवा दुसऱ्याची हत्या करून वैभव भोगण्यांत जसा पुरुषार्थ नाहीं, त्याप्रमाणें स्त्रीपुत्रांचें मांस देणें हेंहि तुला शोभणार नाहीं. राजा! तूं नव्याण्णव याग केले आहेस, त्यांचें सुकृत राखावयाचें असल्यास प्राण दे, पण असत्यवादी होऊं नकोस. वचनभंग केल्यास नव्याण्णव याग फुकट जाऊन शिवाय अपकीर्ति होईल."

## ७ शिबी राजाचा निश्चय.

त्या ससाण्याचें तें भाषण ऐकून राजा म्हणाला, "बा ससाण्या! तुझें भाषण सत्य आहे, मला त्या सत्याची चाड आहे; म्हणूनच मी तुला आपलें मांस देण्यास तयार झालों आहें. माझ्या शरीरांत तर आतां मांस राहिलें नाहीं, जठरांतील मांस घेण्याची तुझी इच्छा नाहीं, तेव्हां मी आतां माझें मस्तक कापून त्याचें मांस मी तुला देतों. त्या मस्तकानें जर कपोत पक्ष्याचें वजन झालें, तर बरेंच आहे, कदाचित् न झाल्यास जें मांस मिळेल त्यांतच संतोष मानून मला तुझ्या ऋणांतून मुक्त कर, आणि या कपोतपक्ष्याला सोडून दे. असें म्हणून राजानें पुत्र व स्त्री यांना जवळ बोलावून त्यांच्या साह्यानें तो मोठ्या कष्टानें उठला; व हातांत तीक्ष्ण सुरी घेऊन ती आपल्या मानेवर फिरवूं लागला. सुरी मानेवर ठेवण्याच्या अगोदर तो आपल्या प्रधानाकडे दीन दृष्टिपात करून म्हणाला, "प्रधान व लोकहो! माझ्या पश्चात् या धर्मसेनाला गादीवर बसवून त्याच्या-

कडून राज्य चालवा. माझ्यावर जसा लोभ होता, तसाच याच्यावर व राणी सत्यवतीवर ठेवा. मजकडून जर कांहीं अन्याय किंवा अपराध झाले असतील, तर त्यांची मला क्षमा करा." असें म्हणून राजानें सुरी घेतली, व ती आपल्या मानेवर ठेविली; आणि तो ती आपल्या मानेवर फिरविणार इतक्यांत कोणी मागून येऊन त्यांचा हात धरला. राजा मागें वळून पाहतो तों, भगवान् विष्णूची शंखचक्रगदापद्मधारी चतुर्भुज सुंदर श्याममूर्ति मागें उभी आहे. तसेंच पुढें पाहतो तों एका पारड्यांत कपोतपक्ष्याऐवजीं इंद्र असून, दुसऱ्या पारड्यांत जें बिंदुमात्र रक्त पडलें होतें, त्यामुळें दोन्हींहि पारडीं समतोल झालीं आहेत, तसेंच ससाणापक्षी नाहींसा होऊन; तेथें अग्नीची दैदीप्यमान मूर्ति उभी आहे. असा प्रकार राजा पहात आहे, तोंच तो चमत्कार पाहण्यासाठीं देवांच्या विमानांनीं सर्व आकाशमंडल भरून गेलेलें दिसलें; आणि क्षणांत ते सर्व देव शिबीराजाचे राजवाड्यांत येऊन उतरले; व त्यांनीं भगवान् विष्णूचा व शिबीराजाचा जयजयकार केला. विष्णूचा हस्तस्पर्श झाल्याबरोबर शिबीराजाच्या सर्व जखमा भरून येऊन, त्याचें शरीर पूर्वीपेक्षांहि सुंदर; व दिव्य दिसूं लागलें. तो विष्णुला साष्टांग नमस्कार करून, म्हणाला,–" हे भक्तवत्सला ! हे कृपानिधे ! हे शार्ङ्गधरा ! हे अपरंपारा ! हे भक्तजनवज्रपंजरा ! हे कुलदैवता नृसिंहा ! सहस्र याग केले असतांहि ज्यांना तुझें दर्शन होत नाहीं, तो तूं मला नव्याण्णव योगाचे अंतीच भेटलास ! हे कृपानिधे ! माझें थोर भाग्य, मजवर तुझी अनंत कृपादृष्टि म्हणून तूं आज मला व मजबरोबर माझ्या सर्व प्रजाजनांना दर्शन दिलेंस.' याप्रमाणें शिबीराजानें भगवंताची स्तुति केल्यावर विष्णूनें व लक्ष्मीनें त्या राजाला त्याच्या स्त्रीपुत्रासह सुवर्णाचे पाटावर बसवून त्यांचा गौरव केला. लक्ष्मीनें त्याच्यावरून दीप ओवाळिले; मग विष्णु त्याला म्हणाले, " हे शिबीराजा ! माझ्या ठिकाणीं तुझें निस्सीम असलेलें प्रेम पाहून मीं अत्यंत प्रसन्न झालों आहें. महान् महान् तपस्व्यांनाहि जें दुर्लभ तें वैकुंठभुवन तुला तुझ्या या भक्तीमुळें प्राप्त झालें आहे, तर विमानांत बसून वैकुंठास चल." हें भगवंताचे शब्द ऐकून शिबीराजाला अत्यंत आनंद झाला. तो भगवंताला म्हणाला, " हे देवाधिदेवा ! तूं प्रसन्न होऊन मला वैकुंठास नेत आहेस; पण हे माझे नगरवासी लोक मला आपल्या स्त्रीपुत्रांपेक्षांहि प्रिय आहेत. या प्रजेचें मी आजपर्यंत पुत्रवत् पालन केलें असून त्यांनींहि मला आपल्या पित्याप्रमाणें पूज्य मानिलें आहे. तेव्हां या सर्व प्रजाजनांनाहि तूं वैकुंठास घेऊन जावेंस, अशी आपणाला माझी अनन्यभावानें प्रार्थना आहे." तेव्हां विष्णु म्हणाले; " राजा ! या सर्वांना विष्णुलोक दुष्प्राप्य होय. यांत अनंत प्रकृतीचे लोक असतील, त्या सर्वांना वैकुंठीं नेतां येणार नाहीं.' तेव्हां शिबी म्हणाला; " हे श्रीधरा ! ज्याप्रमाणें सूर्योदय झाल्यावर चोरांना राहण्यास

थारा मिळत नाहीं, त्याप्रमाणें तुझें प्रत्यक्ष दर्शन या सर्वांनां झाल्यावर यांचें पाप राहिलें कोठें ? किंवा मेदिनी आपल्या अंकावर आपल्या सुष्टदुष्ट सर्व बाळकांनां खेळविते, त्याप्रमाणें तुझें दर्शन झाल्यावर या माझ्या प्रजेलाहि वैकुंठाचा लाभ झाला पाहिजे. भोंपळा पाण्यावर स्वतः तरतो, यांत कोणी कांहीं मोठेंसें नवल मानीत नाहीं, परंतु दुसऱ्यालाहि पाण्यावर तरवितो; ह्मणून त्याची लोकांत प्रसिद्धी आहे. सुवर्णाचा देव केल्यास त्याच्याबरोबर जशी लाखेलाहि पूजा मिळते, त्याप्रमाणें माझ्याबरोबर माझे प्रजाजनहि वैकुंठीं यावेत, अशी माझी इच्छा आहे. " शेवटीं भगवंतांनीं शिबी राजाची ती विनंति मान्य केली, व दूतांकडून विमानें आणवून सर्व कांतीनगर विमानांत घातलें; व सर्वांनां वैकुंठास घेऊन गेले. याप्रमाणें त्या शिबी राजानें आपल्या भक्तिबळानें स्वतःचा उद्धार करून आपणाबरोबर आपले स्त्रीपुत्र, आप्तसोयरे, नोकरचाकर, लष्कर, प्रजाजन, गायी, ह्मशी, अश्व, हत्ती, इतकेंच नव्हे तर कुत्र्यामांजरासारख्या क्षुद्र प्राण्यांचा देखील उद्धार केला. अशा शिबी राजाच्या भक्तीचें कौतुक कितीहि केलें तरी तें थोडेंच आहे.'

---

## अध्याय १७ वा.

### १ एकवीराचा वंशविस्तार.

वैशंपायन ऋषींनीं जनमेजयाला शिबीची कथा सांगितल्यावर ते त्याला पुरूरव्याचा चौथा पुत्र जो एकवीर त्याचा वंशविस्तार सांगू लागले. ते ह्मणाले; "राजा जनमेजया ! हा एकवीर राजा काशी नांवाच्या नगरीं ( महिकावती )त राज्य करीत असतां एकदां वैकुंठास जाऊन लक्ष्मीला भेटण्याची त्याला इच्छा झाली. लक्ष्मीनें तें आणून एकवीराला वैकुंठांत घेऊन येण्याविषयीं विष्णूची विनंती केली; जन्म दिलेल्या पुत्राला एकवार भेटण्याची इच्छा झाली, हें आईच्या दृष्टीनें योग्यच असल्यामुळें विष्णूंनीं लक्ष्मीची विनंति मान्य केली; व तत्काळ विमानांत बसून ते काशीस आले. तेथें आल्यावर विष्णु एकवीराला भेटले व तो शस्त्रास्त्रविद्येंत किती प्रवीण झाला आहे, हे पाहण्याच्या उद्देशानें त्याला ह्मणाले; "एकवीरा ! महींद्र नांवाच्या दैत्यानें इंद्राच्या आठ मुली पळवून आणिल्या आहेत तर तूं त्या महींद्राचा वध करून त्या आठ मुलींची सोडवणूक कर." एकवीरानें विष्णूची ती आज्ञा तत्काल मान्य केली, व तो आपणाबरोबर सैन्य घेऊन जेथें महींद्र होता तेथें उत्तम सरोवर असून त्या सरोवराचे कांठीं इंद्राच्या आठही मुली त्या विलक्षण आपत्तींत असल्यामुळें अश्रू गाळीत बसल्या होत्या, आणि तो महींद्र नांवाचा असुर डुकराचें रूप घेऊन तेथें हिंडत होता. इतक्यांत तेथें सैन्यासह एकवीर येत आहे,

असें पाहून महींद्र डुकराचें रूप टाकून ब्राह्मण झाला. कारण ब्राह्मणावर कोणी शस्त्र टाकीत नाहीं, परंतु एकवीरानें त्याची ती कपटता ओळखून त्याला युद्धाला आव्हान केलें. तेव्हां त्या उभयतांमध्यें भयंकर युद्ध होऊन एकवीरानें महींद्र राक्षसाचा नाश केला; व त्यानें त्या इंद्राच्या आठ मुलींची सुटका केली. मग एकवीरानें त्या मुलींना आणून विष्णूचे स्वाधीन केलें, व विष्णूच्या कृपेमुळेंच युद्धांत जय मिळाला ह्मणून विष्णूच्या चरणावर मस्तक ठेविलें. विष्णूस एकवीराचा तो पराक्रम पाहून फार आनंद झाला; व त्यांनीं त्याला प्रेमानें कुरवाळिलें, इतक्यांत तेथें स्वर्गांतून देवेंद्रही आला. त्यानेंही तो एकवीराचा पराक्रम पाहून त्याला आलिंगन दिलें; व नंतर तो आपल्या जयंती, मालती; कुमोदिका, सुशीला, भानुमती, उन्नतिका, पुष्पावती व चंद्रिका ह्या आठ मुलींना भेटला. मग इंद्र विष्णूला ह्मणाला, "भगवान्! हा एकवीर आपला पुत्र आहे, तेव्हां याला मृत्युलोकीं ठेवण्यापेक्षां स्वर्गांत घेऊन जावें, हें बरें." तेव्हां त्या कन्या ह्मणाल्या "आह्मीं या एकवीराला मनानें वरिलें आहे. तेव्हां आह्मांसह याला स्वर्गांत घेऊन चलावें; किंवा आह्मांला नेणें नसल्यास याला तरी घेऊन जाऊं नये." मग विष्णूंनीं त्या मुलींबरोबर एकवीराचा विवाह केला; व त्यांना काशीला पाठवून देऊन असें सांगितलें कीं, 'आह्मीं या एकवीराला वैकुंठांत नेऊन तेथें लक्ष्मीला भेटवून तत्काल तुह्मांकडे पाठवून देतों,' असें सांगून विष्णु व इंद्र एकवीराला वैकुंठांत घेऊन गेले. तेथें लक्ष्मीची व एकवीराची भेट झाल्यावर एकवीराला परत काशीला पाठवून दिलें. त्या एकवीरानें बत्तीस हजार वर्षेंपर्यंत सुखानें राज्य करून देह सोडिला. त्या एकवीराचा कृतवीर्य या नांवाचा एक पुत्र होता; त्याचा कार्तवीर्य अथवा ज्याला सहस्रार्जुन ह्मणतात तो पुत्र होय. राजा जन्मेजया! या सहस्रार्जुनाची कथा तुला सांगितली आहेच. हा जरी सोमवंशीय होता, तरी हा असुरप्रकृति होता. कारण कृतवीर्यानें आपल्या स्त्रियेशीं भलत्याच वेळीं संभोग केला होता. अशा कांहीं वेळा असतात कीं, त्यावेळीं स्त्रियांना रतिदान दिल्यास गर्भकोशामध्यें वाईट जीव प्रवेश करितात. त्याचप्रमाणें कृतवीर्याच्या स्त्रियेनें कृतवीर्याबरोबर सायंकाळचे वेळीं संभोग केला; ह्मणून तिच्या वीर्याबरोबर मधु नांवाच्या राक्षसानें प्रवेश केला होता. या मधु दैत्यानें पार्वतीच्या सहस्र पार्थिवपूजा मोडल्या होत्या; ह्मणून पार्वतीनें त्याला जन्मोजन्मीं हस्तावयवावांचून जन्म पावशील; ह्मणून शाप दिला होता. पुढें मधु दैत्यानें शंकराला प्रसन्न करून सहस्रभुजा होतील, असा वर मिळविला होता, पण पार्वतीनें पुन्हां त्याला असा शाप दिला कीं, "त्या तुझ्या सहस्र भुजा नारायण अवतार घेऊन तोडून टाकील." तो मधु दैत्य कृतवीर्याच्या स्त्रियेचे उदरांत प्रवेश करून राहिला होता. त्या कृतवीर्याची स्त्री पूर्ण दिवस झाल्यावर

प्रसूत होऊन मुलगा झाला, पण पाहतात तों त्याला हात मुळींच नाहींत. अशा त्या थोट्या मुलाच्या प्राप्तीमुळें त्याच्या आईबापाला आनंद न होतां वाईट मात्र वाटलें. कार्तवीर्य मोठा झाल्यावर त्याला स्वतःलाहि आपल्या व्यंगपणाबद्दल फार वाईट वाटूं लागलें. पुढें त्याचा पिता मृत झाल्यावर प्रधान वगैरे त्याला राज्याभिषेक करूं लागले, परंतु कार्तवीर्यानें त्या थोटेपणाच्या अवस्थेमुळें राज्यावर बसण्याचें नाकारिलें; व तो आयुष्याचा विनियोग ईश्वरसेवेंत करावा, या उद्देशानें राज्य सोडून बाहेरदेशीं निघून गेला.

## २ सहस्रार्जुनाला दत्तात्रेयाचा वर.

कार्तवीर्य आपली महिकावती नगरी सोडून इकडे तिकडे भ्रमण करीत असतां सह्याद्रिपर्वताचे एका गुहेमध्यें त्याला दत्तात्रयाचें दर्शन झालें. दत्तात्रेयाची ती तीन मुखी सहा हातांची प्रशांत पवित्र व प्रभावशील मूर्ति पाहिल्यावर कार्तवीर्याचे अंतःकरणांत त्यांचेविषयीं पूज्यभाव उत्पन्न झाला; व यांची सेवा केली असतां आपला उद्धार होईल, असा त्याला भरंवसा उत्पन्न झाला, तेव्हां तो तेथेंच दत्तात्रेयाची परवानगी घेऊन त्यांची भक्तिभावानें सेवा शुश्रूषा करूं लागला. तेथें कित्येक दिवस दत्तात्रेयाची सेवा करीत असतां एके दिवशीं त्याला दत्तात्रेय ह्मणाले; "कार्तवीर्या! माझी स्नानाची वेळ झाली आहे, तर स्नानासाठीं पाणी घेऊन ये." गुरूची आज्ञा झाल्याबरोबर कार्तवीर्य पाणी आणण्यासाठीं गेला, परंतु हात नसल्यामुळें पाणी कसें न्यावें, याचा मोठा विचार पडला. शेवटीं त्यानें पाण्याचें भांडें दातांनीं धरून तें दत्तात्रयाकडे आणिलें, कार्तवीर्याची ती विलक्षण गुरुभक्ति पाहून दत्तात्रेय प्रसन्न झाले व ह्मणाले; "अरे कार्तवीर्या! तुझी ही एकनिष्ठ भक्ति पाहून मी तुला प्रसन्न झालों आहें. तुला सहस्र हात प्राप्त होवोत." दत्तात्रेय असें ह्मणाल्याबरोबर सहस्रार्जुनाला एकदम सहस्र भुजा प्राप्त झाल्या. त्या सहस्र बाहूंनीं त्यानें दत्तात्रेयाला नमस्कार केल्यावर दत्तात्रेय ह्मणाले, "हे कार्तवीर्या! तूं ब्राह्मणाशिवाय सर्वांना अजिंक्य होशील. तूं आतां आपल्या नगरास जाऊन खुशाल राज्य कर." याप्रमाणें, श्रीदत्तात्रेयाचा आशीर्वाद मिळाल्यावर कार्तवीर्य तेथून निघून महादेवाकडे गेला; व त्यांजपासून वरप्रदान मिळवून महिकावतीस जाऊन राज्य करूं लागला. पुढें या सहस्रार्जुनाचा भार्गवरामानीं कसा नाश केला, वगैरे हकिकत तुला माहित आहेच. हा कार्तवीर्य ज्या वेळीं मृत झाला, त्या वेळीं त्याच्या चारही स्त्रिया गरोदर होत्या. निःक्षत्रिय पृथ्वी करावयाची असा परशुरामाचा निश्चय असल्यामुळें सहस्रार्जुनाचा प्रधान त्या चौघी स्त्रियांनां घेऊन पळाला; व बद्रिकाश्रमी जाऊन बकदाल्भ्य ऋषीचे आश्रयानें राहिला. तेथें त्या स्त्रिया प्रसूत होऊन चौघींनां पुत्र झाले. ऋषीनें त्यांचीं नांवें इंद्रसेन, भद्रसेन, रुद्रसेन व धर्मपाळ अशीं

ठेविलीं, व त्यांना सर्व क्षत्रियधर्माची दीक्षा देऊन चांगल्याप्रकारची युद्धविद्याहि शिकविली. पुढें तेथें पृथ्वीप्रदक्षिणा करीत असतां परशुराम आले, त्यांनीं त्या सुंदर व चपळ मुलांना पाहून ऋषींना हे कोण ? म्हणून प्रश्न केला. ऋषींनीं हे आमचे नातू आहेत म्हणून सांगितलें. मुलांच्या गळ्यांत यज्ञोपवीत व ते ब्रह्मकर्मनिपुण आहेत, असें पाहून परशुरामानें ऋषींच्या बोलण्यावर विश्वास ठेवला, व ते तेथून निघून गेले.

## ३ कार्तवीर्याचे पुत्र व चंद्रगुप्त.

राजा जनमेजया ! पुढें तीं मुलें मोठीं झाल्यावर, त्यांना आपल्या बापाविषयीं साहजिक जिज्ञासा उत्पन्न झाली, व त्यांच्यापैकीं, इंद्रसेनानें एके दिवशीं आपल्या आईला विचारिलें कीं, " आई ! आमचा पीता कोण, तें आम्हांला साग. तेव्हां त्या चौघांना इंद्रसेनाचे आईनें कार्तवीर्याची सर्व हकीकत सांगितली. ती हकीकत ऐकून चौघांचेहि मनांत परशुरामाचा सूड घेण्याचें आलें; व त्याप्रमाणें ते उद्योगाला लागले. एकदां ते सर्व अरण्यांत शिकार करीत असतां त्यांच्या दृष्टीस दूर एक चकाकणारा पदार्थ पडला. तेव्हां त्यांनीं त्यावरच बाण सोडले, तथापि तो नाहींसा झाला नाहीं. हें पाहून त्या चौघांनाहि फार आश्चर्य वाटलें; व ते चौघेहि त्या वस्तूच्या धोरणानें तेथें आले. पाहतात तों ती चकाकणारी वस्तु आरसा आहे, असें त्यांना वाटलें, परंतु तो आरसा नसून चकाकणारा दगड होता. त्या अरण्यांत एक दुर्गेचें देऊळ असून तेथें तो आरसा त्या दुर्गादेवीच्या पादतलाशीं होता. शंकरानीं जेव्हां त्रिपुरसुराचा नाश केला, तेव्हां तो राक्षस त्या शिळेमध्यें नाहींसा झाला होता, व त्या राक्षसाचें तेज त्या दगडांत मुरल्यामुळें तो दगड आरशाप्रमाणें दिसत होता. तो आरसा आपण घेऊन शंकरांना नेऊन दिल्यास ते प्रसन्न होतील; व आपण परशुरामाचे संहारासाठीं जें मागूं तें आपणास देतील; असें त्या चौघांहि राजपुत्रांना वाटलें. त्याप्रमाणें ते तो आरसा घेऊन कैलासीं गेले, आणि त्यांनीं तो आरसा महादेवाला अर्पण केला. तो आरसा पाहून महादेवाला फार आनंद झाला, व हे कार्तवीर्याचे पुत्र आपणाकडे कोणत्या उद्देशानें आले आहेत हें त्यांनीं जाणलें. परशुराम म्हणजे प्रत्यक्ष नारायण, केवळ दुष्टाचा नाश करण्यासाठीं त्यांनीं माझ्या सांगण्यावरून अवतार घेतला, तेव्हां त्याच्या नाशासाठीं या राजपुत्रांनां कांहीं साधन देणें हें उचित नव्हे, असें जाणून महादेव त्यांस म्हणाले; " राजपुत्र हो ! हा आरसा पार्वतीला नेऊन द्या, म्हणजे ती तुमचे इच्छित मनोरथ पूर्ण करील.' शंकरानीं असें सांगितल्यावर राजपुत्र तेथून निघाले, व पार्वतीकडे येऊन तिला त्यांनीं तो आरसा अर्पण केला. तो आरसा पाहून पार्वती प्रसन्न झाली व–तुम्हाला काय पाहिजे ?–म्हणून तिनें प्रश्न केला. तेव्हां ते राजपुत्र म्हणाले; " हे अंबिके ! तूं

आमच्या साह्यासाठीं नेहमीं आमच्याजवळ असावेंस, आणि आम्हांला असा व्यवसाय द्यावा कीं, तो अखंड चालावा.'' पार्वती त्या वेळीं त्यांना प्रसन्न चित्तानें म्हणाली, तुमचे मनोरथ पूर्ण होतील. तुम्हीं कांसें, पितळ, यांची पूजा करून त्या धातूचा रस करून त्यांच्या निरनिराळ्या वस्तु तयार कराव्यात. त्या वस्तु बाजारांत फार किंमतीला विकल्या जातील; व तुम्हांला विपुल पैसा मिळेल. तुम्हीं आतां आपल्या नगराला जाऊन शाळा घाला; व तेथें धातूंचीं पात्रें तयार करा.'' पार्वतीनें असें सांगितल्यावर ते राजपुत्र आपल्या नगरास परत आले; व पार्वतीनें सांगितल्याप्रमाणें शाळा घातल्या. प्रथम लोहशाळा घातली, ती शाळा घातल्यावर त्या राजपुत्रांनां हत्यारांची अडचण पडली; म्हणून त्यांनीं पार्वतीचें स्मरण केलें. तेव्हां पार्वतीनें हजारों सर्प त्या शाळेंत पाठवून दिले. कांहीं सर्प अग्नि फुंकूं लागले, कांहीं सर्प ऐरणीप्रमाणें बसले, कांहीं हतोडे झाले, कांहीं कातरी, कांहीं सांडस वगैरे अनेक सर्पांनीं अनेक हत्यारांचीं रूपें धारण केलीं. मग त्या हत्यारांच्या साह्यानें त्या राजपुत्रांनीं तलवारी वगैरे अनेक उत्तम उत्तम वस्तु निर्माण केल्या. नंतर त्यांनीं तांबें, पितळ, कांसें वगैरे धातू आणून त्यांचीं अनेक सुंदर पात्रें तयार केलीं. याप्रमाणें ते राजपुत्र आपल्या शाळेंत अनेकप्रकारचीं पात्रें तयार करीत असतां, तेथें कांतीपूरचा शंकरभट्ट या नांवाचा एक विद्वान् ब्राह्मण आला. तो तीं सुंदर पात्रें पाहून म्हणाला, ''अहो कारागिरहो! तुम्हीं हीं सुंदर पात्रें जर कांतीपूरच्या राजाला दाखवाल-तर तो प्रसन्न होऊन तुम्हांला या पात्रांच्या भारंभार सुवर्ण देईल.'' तें त्या ब्राह्मणाचें बोलणें ऐकून राजपुत्रांना तीं भांडीं विकण्याची इच्छा झाली, व त्यांनीं अनेक उंटावर तीं भांडीं घालून तीं कांतीपुरास आणलीं. त्या शहरांत आल्यावर चौघांनीं भांड्यांचीं दुकानें घातलीं; व तेथें भांडीं विकीत बसले.

त्या वेळीं कांतीपूर येथें चोल या नांवाचा राजा असून, त्या राजाला चंद्रगुप्ता या नावाची एक मुलगी होती. त्या मुलीला आपल्या शहरांत कांहीं कारागीर भांडीं विकण्यासाठीं आले आहेत, असें समजल्यावर ती बरोबर कांहीं शिपाई वगैरे लोक घेऊन, त्या भांड्यांच्या दुकानावर आली. तेथें तो दिव्य आरसा पाहून त्या राजकन्येला तो आरसा घेण्याची इच्छा झाली; व तिनें त्याची किंमत वगैरे कांहीं एक न विचारितां सत्तेच्या घमेंडीवर तो आरसा त्या दुकानांतून उचलिला, व निर्धास्तपणें तेथून ती आपल्या वाड्याकडे परतली. त्या राजकन्येचा तो दांडगेपणा पाहून इंद्रसेन वगैरे राजपुत्रांना फार राग आला, व इंद्रसेन तत्काल दुकानावरून उठून त्यानें त्या राजकन्येच्या हातांतील आरसा जोरानें एकदम काढून घेतला अशारीतीनें राजकन्येचा अपमान झालेला पाहून, तिच्या बरोबरच्या शिपायांनीं क्रुद्ध होऊन इंद्रसेनावर तलवारी उपसल्या, पण इतक्यांत इंद्रसेनाच्या तिघां भावांनीं पार्वतीचें स्मरण करून दुकांतील तारेंच त्या

शिपायांवर फेंकिली. तीं ताटें चक्राप्रमाणें गरगर फिरूं लागलीं; व त्यांनीं त्या सर्व शिपायांना कंठस्नान घालून इहलोकच्या तापत्रयांतून मोकळें केलें. तें वर्तमान राजाला कळल्यावर तो चोलराजा आपणाबरोबर सैन्य घेऊन त्या चौघां राजपुत्रांना पकडण्यासाठीं आला, तेव्हां ते चौघे राजपुत्र आपल्या ताटांचीं चक्रें करून राजाबरोबर युद्ध करूं लागले, परंतु राजाबरोबर पुष्कळ सैन्य असल्यामुळें त्या चौघांचा निभाव लागेना; ह्मणून त्यांनीं पार्वतीचें स्मरण केलें. पार्वतीचें स्मरण करण्याबरोबर ती आदीमाता तेथें प्रगट झाली; व तिनें मंत्रोच्चार केल्याबरोबर त्या राजपुत्रांचीं भांडीं आपोआप उडालीं; व अत्यंत वेगानें गरगर फिरून सर्व सैन्याचा नाश करूं लागलीं. इतकेंच नव्हे तर तीं भांडीं सर्व नगरांत फिरूं लागलीं व त्यामुळें असंख्य लोकांना इजा झाली. तेव्हां त्या राजाला शंकरभट्ट जाऊन भेटला व म्हणाला; "राजा ! हे कारागीर महाशक्तिशाली व मंत्रविद्येमध्यें प्रवीण असे दिसतात, तर त्यांच्याबरोबर युद्ध करून तुला जय मिळणार नाहीं, त्यांच्या हातानें नाश करून घेण्यापेक्षां त्यांना शरण जा; व आपलें संरक्षण करून घे." राजानें शंकरभट्टाचा तो सल्ला मान्य केला; व त्या राजपुत्रांची क्षमा मागून सर्वत्र शांतता केली. नंतर त्या चौघांना राजा आपल्या घरीं घेऊन आला; व ह्मणाला, "हे कुमारहो ! तुमचे नियमधर्म वगैरे काय आहेत, ते मला कृपा करून सांगा." तेव्हां ते राजपुत्र ह्मणाले; "राजा ! आमचा मुख्य धर्म मौनव्रत आहे. विशेषतः दाल्भ्य ऋषींनीं सांगितल्याप्रमाणें आह्मीं जेव्हां जप करीत बसतों, त्यावेळीं बोलतहि नाहीं, व जप पुरा होईपर्यंत उठतहि नाहीं." तें त्या राजपुत्राचें भाषण ऐकून राजाचे मनांत वाईट बुद्धि उत्पन्न झाली; व त्यानें त्या चौघांचा नाश करून सर्व भांडीं लुबाडण्याचा विचार ठरविला. मग त्यानें राजपुत्रांनीं सांगितल्याप्रमाणें त्यांना आसनें देऊन जप करावयास बसविलें. ते राजपुत्र जप करावयास बसल्यावर त्या कपटी चोल राजानें तलवार आणून ती इंद्रसेनाचे मानेवर मारिली. त्याबरोबर इंद्रसेनाचें शीर धडापासून तुटलें; व त्याच्याच ओंजळींत पडलें. जरी मस्तक तुटून पडलें तरी इंद्रसेनाचें धड तसेंच पूर्व स्थितींत आसनावर बसलें होतें. इंद्रसेनानें आपलें शीर आपल्या ओंजळींत पडल्यावर शेजारी आपला भाऊ जप करीत बसला होता, त्या भद्रसेनाचे ओंजळींत घातलें. भद्रसेनाचें ओंजळींत अशा रीतीनें इंद्रसेनाचें मस्तक आल्यावर तें मस्तक ह्मणालें, "भद्रसेना ! तुजवरहि असाच प्रसंग येईल, परंतु भीतीनें तूं व्रत मोडूं नको." इतक्यांत राजानें भद्रसेनाचेंही मस्तक कापिलें; व तेंही त्याच्या ओंजळींत पडलें. तेव्हां भद्रसेनानें तीं दोन्हीं मस्तकें रुद्रसेनाच्या हातांत दिलीं भद्रसेनाचे मस्तकानेंही इंद्रसेनाप्रमाणेंच रुद्रसेनाला सांगितलें, मग चोल राजानें रुद्रसेनाचे मानेवर तलवार चालवून त्याचें मस्तक तोडिलें, तेंही त्याच्याच ओंजळींत पडलें, व त्यानें तीं

तिन्हीं मस्तकें धर्मपाळाचे ओंजळींत घातलीं. रुद्रसेनाचे मस्तकानेंही धर्मपाळाला तेंच सांगितलें. आतां तो राजा त्या धर्मपाळाचाही वध करणार इतक्यांत हा प्रकार शंकरभट्टास कळला; व तो उदकानें भरलेलें एक पात्र घेऊन तेथें आला. तें उदक शिंपडून मंत्रशक्तीनें त्यांना जिवंत करण्याचा त्याचा विचार होता; पण राजदूतांनीं त्या शंकरभट्टाच्या हातांतील उदकपात्र उडवून दिलें, त्यामुळें शंकरभट्टाचा इलाज खुंटला, परंतु राजदूतांनीं जेव्हां पाणी उडविलें तेव्हां कांहीं पाणी धर्मपाळानें आचमन केलें; व मनोमय पार्वतीची प्रार्थना केली. ती त्या धर्मपाळाची प्रार्थना पार्वतीनें तेव्हांच अंतर्दृष्टीनें जाणली, व ती निमिषार्धांत गदा त्रिशूळ खेटक चक्रें वगैरे आयुधें घेऊन आपल्या वीर वेताळ डांकिनीशांकिनी वगैरेसह त्या चोलराजाचे राजवाड्यांत आली; तिनें धर्मपाळाला खुणविल्याबरोबर तो रागानें आसनावरून उठला; व दाराची अर्गळा काढून राजदूतांचा संहार करूं लागला. धर्मपाळ, पार्वती व पार्वतीचें सैन्य या सर्वांनीं जिकडें तिकडें थोडक्याच वेळांत रक्तमांसाचा पसारा करून टाकिला, शर्वत्र हाहाःकार झाला. तेव्हां शंकरभट्टानें राजास सांगितलें कीं, " राजा ! तूं त्या धर्मपाळाला खऱ्या अंतःकरणानें लवकर शरण जा, नाहीं तर तो धर्मपाळ सर्वांचा संहार करून टाकील." तेव्हां राजानें धर्मपाळाच्या चरणावर मस्तक ठेवून क्षमा मागितली. " तेव्हां धर्मपाळानें त्याला क्षमा केली; व अभय दिलें. त्यावेळीं पार्वती धर्मपाळाला ह्मणाली; " अरे ! या बंधुघातक्याला कां अभय दिलेंस, हा महाविश्वासघातकी असून अत्यंत नीच आहे." धर्मपाळ ह्मणाला ; " माते ! अंबिके ! हा शरण आलेला आहे, तेव्हां क्षत्रिय धर्मप्रमाणें याचें संरक्षण करणें हें कर्तव्य होय." धर्मपाळाचें ते औदार्य पाहून पार्वतीला फार आनंद झाला. ती ह्मणाली; " धर्मपाळा ! तूं माझी हंसवाहिनी मूर्ति करून त्या मूर्तीची नित्य पूजा करीत जा, तसेंच तुझ्या वंशांतील माझी हंसवाहिनी मूर्ति करून जे त्या मूर्तीची पूजा अर्चा करतील, त्यांना कोणत्याहि गोष्टीचें उणें न पडतां त्यांनां कोणतीहि बाधा होणार नाहीं." याप्रमाणें धर्मपाळाला सांगून पार्वती स्वस्थानीं निघून गेली. मग धर्मपाळ शंकरभट्टाला ह्मणाला; " शंकरभट्टजी ! आपण आज माझा प्राण वांचविलात; ह्मणून मी आपणांस कुळपुरुष समजेन; व मी व माझे वंशज आपली परम प्रीतीनें पूजा करीत जाऊं." नंतर त्या चोल राजानें आपली मुलगी चंद्रगुप्ता धर्मपाळाला अर्पण करून मोठ्या समारंभानें विवाह केला. या धर्मपाळाला शंभर पुत्र झाले होते, ते सर्व कांसेकार झाले. त्यांनीं ती धातूंचीं भांडीं करण्याची विद्या देशोदेशीं शिष्य करून पसरविली. त्या सर्व कांसेकारांचे गोत्र दत्तात्रि असें आहे; व हे कांसेकार किंवा कासार एकवीराचे वंशज आहेत. राजा जनमेजया ! याप्रमाणें पुरूरवा राजाच्या चार पुत्रांचा वंशविस्तार आहे, तो तुला संक्षेपानें कथन केला."

## तिसरा स्तबक संपूर्ण.

---

# कथाकल्पतरु.

———:०:———

## स्तबक ४ था.

## अध्याय १ ला.

### मंगलाचरण.

हे देवाधिदेवा गजानना! तुला मी अनन्यभावानें साष्टांग नमस्कार करितों, हे वाग्देवी सरस्वती! तुलाहि मी अनन्य शरण येऊन वंदन करितों. यानंतर सर्व देव व गुरु यांना वंदन करून मी रसिक व विद्वान् श्रोते संतसज्जनांना वंदन करितों. संत जनहो; तुमची हरिकथेची आवड पाहून मी हा गोड असा ब्रह्मकथारस मुद्दाम तयार करीत आहे. हा माझा प्रयत्न यशस्वी होणें, हें केवळ ईश्वरी कृपेस अवलंबून आहे. हे आदिपुरुषा! हे परमहंसा अनंता! हे शेषशयना नारायणा! मी तुला अनन्य शरण आलों आहे. मी तुला साष्टांग प्रणाम करितों. हे दयाघना! तूं या तुझ्या अज्ञानी भक्तांवर कृपा करून याचें अज्ञान दूर कर. माझ्या हृदयांतील ज्ञानदीप प्रज्वलित कर. हे मंगल महंस गुणरूप अद्वैता! हे जन्मजराविवर्जित अच्युता! हे विश्वंभरा परम पुरुषा परात्परा! हे वेदगर्भाक्षर विश्वलिंगा! तुझा जयजयकार असो. हे रूपविलास पुराणभरित अव्यक्ता! सगुण व निर्गुण अशा दोन्ही स्थितींत असणाऱ्या परमेश्वरा! तूं ब्रह्मरूप योगेश्वर असून आपल्या लीलालाघवानें हें चराचर जगत् निर्माण करीत आहेस, व याचा लयहि करीत आहेस. हे मोक्षदात्या अनंता! हे मंगलधाम चिंतामणी! हे गदाधरा सारंगपाणी! तूं आपल्या भक्तजनांना वज्रपंजराप्रमाणें असून, त्यांच्या सर्व विघ्नांचा नाश करण्यास तत्पर असा आहेस. हे अपरंपरा आदिकुमरा श्रीमुकुंदा! हे ज्योतिर्लिंग परमपुरुषा! हे आनंदमूर्ति श्रीरंगा! तुझा जयजयकार असो! हे देवाधिदेवा अनंता! तुझी स्तुति कितीहि केली तरी ती थोडीच आहे. या ग्रंथांत जरी मी निरनिराळ्या कथा सांगितल्या आहेत, तरी हें तुझेंच सर्व संकलित केलेलें चरित्र आहे. ती सर्व तुझीच स्तुति आहे. तेव्हां या मंगलाचरणांतच तुझी विशेष स्तुति करण्यांत कांहीं मोठेपणा आहे, असें नाहीं.

हे सच्चिदानंदा! तुझें चरित्र वर्णन करण्यास ज्ञानाचा प्रकाशही पाहिजे. तो असल्यावांचून मी तुझें कीर्तन करण्यास असमर्थ आहें. ज्याप्रमाणें डोळसे मनुष्य अंध मनुष्यास वागवितो, त्याप्रमाणें तूं आम्हां अज्ञानांधकारांत सांपडलेल्यांचा मार्ग-

दर्शक आहेस. ज्याप्रमाणें सूत्रधार सूत्र चालवून बाहुली नाचवितो, त्याप्रमाणें तूं आमचा सूत्रधार आहेस. तेव्हां हे प्रभो वाग्विलासा ! या ग्रंथांत नवरस चांगल्या-प्रकारें खुलवीत म्हणून तूंच मजकडून जें कांय वदवावयाचें असेल तें वदव. श्रोते-जनहो ! हा ग्रंथ आपणांस आवडता व्हावा, म्हणून मी यथाशक्ति प्रयत्न करीत आहें, परंतु कोणाहि ग्रंथांत काठिण्य हें असणारच; एवढ्यासाठीं ज्ञान, विज्ञान, वैराग्य आणि रूप यांचा नौकारूप जो गुरु त्या गुरूचें साह्य घ्या; ह्मणजे हा ग्रंथ तुह्माला केव्हांच समजेल. मजकडून हा ग्रंथ लिहिला जात आहे, ही केवळ गुरुकृपाच होय. असो. पुनः एकदां श्रीचरणीं वंदन करून हें मंगलाचरण पुरें करितों.

---

## अध्याय २ रा.

### १ श्रीकृष्णजन्मकथा व पापभारानें पृथ्वीचें ब्रह्मदेवाकडे जाणें.

एके दिवशीं जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला ह्मणाला; "अहो मुनिवर्य, गोकुळामध्यें ईश्वरानें श्रीकृष्णावतार कां घेतला ? तसेंच या अवतारांत विष्णूनें आपलें पूर्व स्वरूप कायम कां ठेविलें होतें ? आणि आयुधेंहि शंख, चक्र, गदा व पद्म हींच कायम होतीं, पीतांबरहि तोच होता, गळ्यांत वैजयंतीची माळहि होती, हृदयावर तें श्रीवत्सलांछनहि होतें; सारांश या अवतारांत विष्णूचें पूर्वरूपच कायम होतें, तर भगवंतानें अशातऱ्हेनें अवतार कां घेतला ? तसेंच भगवंताला गरुडवाहनहि कसें प्राप्त झालें ? वगैरे माहिती आपण आज मला कृपा करून सांगा." राजानें वैशंपायन ऋषीची याप्रमाणें प्रार्थना केल्यावर वैशंपायन ऋषि ह्मणाले; "राजा जनमेजया ! पूर्वी जेव्हां राक्षसांनीं पृथ्वीवरील लोकांना त्रास देऊन जिकडे तिकडे अधर्म प्रवृत्त केला होता, त्या वेळीं प्रभूनेंहि श्रीराम अवतार धारण करून दुष्टांचा संहार करून सर्वत्र धर्माची स्थापना केली; व नाश केलेल्या राक्षसांना स्वर्गांत नेऊन ठेविलें. या गोष्टीस कांहीं वर्षे लोटल्यावर पृथ्वीवर पुन्हां दुष्ट निर्माण झाले; व त्यांनीं लोकांना त्रास देण्यास आरंभ केला. यज्ञयागादि कर्मांना प्रतिबंध करावा, ब्राह्मणांना छळावें, लोकांचा द्रव्यापहार करावा, स्त्रियांना भ्रष्ट करावें, याप्रमाणें त्या राक्षसांनीं जेव्हां पृथ्वीवर उत्पात मांडिला, तेव्हां सर्व लोक त्रस्त झाले; व पृथ्वी पापभारानें अत्यंत क्लेश पावूं लागली. पृथ्वीला जेव्हां तो पापभार सहन होईना, तेव्हां ती सत्यलोकीं ब्रह्मदेवाकडे गेली; व ब्रह्मदेवाची प्रार्थना करून ह्मणाली; "हे चतुरानना ! सांप्रत मजवर दुष्ट लोक फार झाले असून त्यांच्या पापभारानें मी फार क्लांत झालें आहे, मला तो पापभार मुळींच सहन होत नाहीं; यज्ञयागादि कर्मे बंद पडलीं आहेत, दुष्टांकडून ब्राह्मणांना फार त्रास होत असल्यामुळें तेहि स्वस्थ बसले आहेत, हे ब्रह्मदेवा !

राक्षस हे किती दुष्ट स्वभावाचे असतात हें तुला माहित आहेच. या राक्षसांसारखे अभिमानी, मूर्ख, क्रोधी, दुष्ट, कपटी, त्रिभुवनांतहि कोणी नाहीं. त्यांच्या नीच कृत्यामुळें धर्माचार सर्व प्रकारें बंद पडला असून असत् व्यवहार मात्र वाढत चालले आहेत. मजवरील पाप कोणत्याहि अंशानें कमी न होतां प्रत्यहीं वाढत चाललें आहे. ब्रह्मदेवा ! या पापपीडेनें मला फार क्लेश होत आहेत. या संकटांतून माझी सोडवणूक करणारा तुझ्यावांचून कोणी नसल्यामुळें मी तुला अनन्य भावानें शरण आलेली आहें. तर मजवरचें हें संकट शक्य तितक्या लवकर दूर कर, व पुन्हां पूर्वीप्रमाणें लोक धर्माचरणानें वागतील असें कर.'' पृथ्वीनें याप्रमाणें ब्रह्मदेवाची प्रार्थना केल्यावर ब्रह्मदेव म्हणाला; " हे वसुमती ! तुजवर आलेलें हे संकट दूर करण्यास मी असमर्थच आहें. क्षीरसागरांत राहणारे जे शेषशाई भगवान् विष्णु तें या तुझ्या संकटाचें निवारण करतील. तेव्हां मी आतां त्यांच्याकडे सर्व देवांसह त्यांची प्रार्थना करण्यासाठीं जातों; तूं आपल्या स्थानीं जाऊन स्वस्थ ऐस. आलेलें संकट लवकरच दूर होईल. त्या संबंधानें तूं मुळींदेखील काळजी करूं नको. " ब्रह्मदेवानें याप्रमाणें सांगितल्यावर पृथ्वी सत्यलोकाहून निघून गेली.

### २ ब्रह्मदेवकृत विष्णुप्रार्थना, व विष्णूचें देवांस वरदान.

पृथ्वी गेल्यावर ब्रह्मदेव सर्व देवांकडे गेला व त्यांनां पृथ्वीवर आलेल्या संकटाची माहिती देऊन त्यांच्यासह क्षीरसागरीं श्री विष्णूकडे गेला. त्या वेळीं विष्णु योगनिद्रेंत असून द्वाराशीं गरुड उभा होता. योग्याला अत्यानंद देणारी जी उन्मनी मुद्रा त्या उन्मनी मुद्रेनें भगवान् शेषावर निजलेले होते. त्यांच्या चरणाजवळ लक्ष्मी त्यांची पादसेवा करीत बसली होती. तेथें गेल्यावर सर्व देवांच्या पुढें होऊन ब्रह्मदेव विष्णूला म्हणाला; हे परब्रह्म नारायणा! गुणनिधाना, हे अजरामरा! निर्गुणा! हे देवाधिदेवा! तूं सर्व विश्वाचा कार्यकारणकर्ता आहेस. हे अनंता ! पृथ्वीवर पाप अत्यंत वाढल्यामुळें वसुंधरा फार त्रस्त झाली आहे. राक्षसांच्या प्रळयानें धर्माचा एकसारखा क्षय होत असून यज्ञयागादि कर्में बंद पडलीं आहेत व ब्राह्मण दुष्टांच्या पीडेनें धर्माचरण सोडून बसले आहेत. तर हे प्रभो! अनादि अनंता! आतां अवतार धारण करून दुष्टांचा संहार करावा आणि पृथ्वीवरील पापभार नाहींसा करावा.'' ब्रह्मदेवानें याप्रमाणें भगवंताची प्रार्थना केल्यावर भगवान् ह्मणाले; " ब्रह्मदेवा ! मी वृंदेला अभिवचन दिल्याप्रमाणें लवकरच मथुरेस अवतार घेईन व दैत्यांचा संहार करून पापाचा नाश करीन व पुन्हा धर्माची स्थापना करीन. तर मला साह्यभूत होण्याकरितां तुह्मी पृथ्वीवर जाऊन मनुष्य जन्म धारण करा. " भगवंतानें ब्रह्मदेवाला याप्रमाणें सांगितल्यावर सर्व देवांसह ब्रह्मदेव तेथून निघाला व त्या सर्वांनीं पृथ्वीवर मथुरा, वृंदावन, गोकुळ, वगैरे ठिकाणच्या सच्चरित्र लोकांच्या उदरीं जन्म घेतले.

इकडे भगवान् शेषाला ह्मणाले; " हे शेषा ! तुजवर माझा अत्यंत लोभ आहे, तूं क्षणभर नसलास ह्मणजे मला चैन पडत नाहीं, तर इतर अवतारां-प्रमाणें या अवताराचे वेळींहि तूं पृथ्वीवर जाऊन वसुदेव देवकीचे उदरीं जन्म घेऊन नंद व यशोदा यांचे घरीं जाऊन रहा. यावेळीं तूं माझा वडील बंधु हो, मी तुझा धाकटा बंधु होईन. तूं जन्म घेतल्यावर मीहि लवकरच वसुदेव देवकीच्या उदरीं जन्म घेईन, तथापि तुझ्याच सहवासाला येऊन राहीन." भगवंतानीं शेषाला असें सांगितल्यावर शेष ह्मणाला; " हे प्रभो ! नारायणा ! त्या वसुदेवाचे उदरीं तूं जन्म घेणार आहेस, तेव्हां त्या वसुदेवाची अशी काय योग्यता आहे, किं प्रत्यक्ष भगवंतानें त्याच्या पोटीं जन्म घ्यावा? महान महान तपोनिधी तुझ्या प्राप्तीसाठीं सहस्र वर्षें तपश्चर्या करितात, योगी तुझें हृदय-कमलांत ध्यान करितात, परंतु त्या कोणाला तुझें दर्शनहि होत नाहीं, आणि या यःकश्चित् वसुदेवाचे पोटीं तूं जन्म घेणार हें ऐकून मला फार आश्चर्य वाटतें; तर या वसुदेवाची अशी काय योग्यता आहे तें मला ऐकण्याची इच्छा आहे." शेषानें अशी शंका घेतल्यावर भगवान लक्ष्मीरमण म्हणाले; " हे शेषा ! स्वयंभू या नांवाचा जो मनु तोच सुतपा या नांवाचा ब्राह्मण होय. या सुतपा ब्राह्मणाला प्रौणी या नांवाची स्त्री होती. हे दोघेहि स्त्रीपुरुष अत्यंत सच्चरित्र असून त्यांनीं पुत्रासाठीं तपश्चर्या केली होती. त्या सुतपानें धूम्रपान व पंचाग्नि साधन एक हजार वर्षेंपर्यंत करून माझी आराधना केली होती, तसेंच त्या सुतपाची स्त्री प्रौणी हिनेंहि सहस्रवर्षेंपर्यंत मौन व्रत धरून व ब्रह्मचर्यानें राहून माझी सेवा केली होती. ती त्या उभयतांची भक्ति पाहून मी अत्यंत प्रसन्न झालों व त्या उभयतांनां दर्शन देऊन ह्मणालों; " हे स्त्रीपुरुषहो ! मी तुह्मां उभयतांच्या सेवेनें प्रसन्न झालों आहें, तर तुमची काय इच्छा आहे तें मला कथन करावें." तेव्हां तो सुतपा ब्राह्मण मला ह्मणाला; " हे देवाधिदेवा ! तूं आमचे उदरीं तीन जन्म घ्यावेस अशी आमची इच्छा आहे." मी त्यांनां प्रसन्न चित्तानें तथास्तु ह्मणून ह्मणालों, व त्याचे मनोरथ पूर्ण करीत आलों आहे. ज्या-प्रमाणें त्यांनीं तपश्चर्येनें मला प्रसन्न करून घेतलें, त्याप्रमाणें त्यांनीं शंकरांनाहि प्रसन्न करून घेतलें आहे. हे शेषा ! कश्यप आणि अदिती हींच ती सुतपा व प्रौणी होत." हें ऐकून शेष ह्मणाला; " हे भगवंता ! आपण एकंदर दहा अवतार घेणार असें ऐकतों. तर यांपैकीं कोणत्या तीन अवतारीं आपण कश्यपाचे उदरीं जन्म घेतला तें मला सांगावें." तेव्हां भगवान ह्मणाले; " शेषा ! मागें कश्यपाचे उदरीं वामन अवतार घेतला होता. तसेंच जमदग्नीचे उदरीं परशुराम अवतार घेतला होता, तो जमदग्नि कश्यपच होय. आणि आतां तोच कश्यप भूमीवर वसुदेव व अदिती देवकी आहेत. त्यांचे उदरीं मी आतां कृष्ण अवतार घेणार आहें. तसेंच मी ज्या नंदयशोदाचे घरीं तुझे सहवासाला येऊन राहणार

आहे, तो नंद व यशोदा कोण हेंहि तुला सांगतो. पूर्वी द्रोण या नांवाचा कोणी एक महा तपस्वी ब्राह्मण होता. त्याची प्रणिता या नांवाची एक स्त्री होती, तिला धरा असेंही ह्मणत असत. त्या द्रोणानें व प्रणितीनें पुत्र प्राप्तीसाठीं, असेंच अनंत वर्षें माझें तप केलें होतें. त्यांच्या तपश्चर्येनें मी त्यांना प्रसन्न झालों व तुमचें जें इच्छित असेल तें तुह्मांला द्यावयाला तयार आहें ह्मणून ह्मणालों. तेव्हां ते उभयतां मला ह्मणाले; "हे शार्ङ्गधरा ! तूं आमचा पुत्र ह्मणून आमचे घरीं राहावेंस." याप्रमाणें त्यांनीं वर मागितल्यावर, मीं त्यांना मोठ्या आनंदानें वर दिला. तो द्रोण व ती प्रणिता ( धरा ) हीच नंद यशोदा होत. त्यांना दिलेलें वचन या वेळीं मी पूर्ण करणार आहें." याप्रमाणें विष्णूनीं शेषाला सांगून त्याला पुढें अवतार घेण्याकरितां पाठवून दिलें.

हे जन्मेजय राजा ! आतां तुला वसुदेव हा कोठील कोण, ती सर्व कथा सांगतो. "वसुदेव हा सोमवंशातील शूरसेन राजाचा पुत्र होता. उग्रसेन या नांवाचा राजा होता, त्याला कंस व देवकी अशीं अपत्यें होतीं. देवकी ही वसुदेवाला दिली होती. वसुदेव देवकीचें लग्न पूर्ण झाल्यावर उग्रसेन राजानें उभयतांनां रथांत बसविलें, व रथ हाकण्यासाठीं कंसाला बरोबर देऊन त्यांना त्यांच्या नगरीकडे मार्गस्थ केलें. कंस मोठ्या उत्साहानें रथ हाकीत होता, कारण रथांत त्याची बहिण व तिचा पति होता, तेव्हां त्या नूतन विवाहित बहिणीचा रथ हाकणें याचा त्याला उत्साह वाटत होता. याप्रमाणें मोठ्या आनंदानें ही सर्व मंडळी मार्ग क्रमित असतां, एकाएकीं अशी आकाशवाणी झाली किं, "हे कंसा ! या देवकीच्या उदरीं जो आठवा गर्भ येईल त्या पासून तुझा प्राणनाश होईल." या प्रमाणें ती विलक्षण आकाशवाणी ऐकून सर्वजण चकित झाले. कंसाला तर त्यावेळीं काय करावें तें सुचेना. शेवटीं त्यानें असा विचार केला किं, जिच्या पोटीं आठवा गर्भ येऊन त्या गर्भाकडून आपला नाश होणार आहे, ती आपली बहिण देवकी हिलाच मारून टाकावें ह्मणजे हा विषवृक्ष तोडला जाऊन याला पुढें वाईट फळेंहि येणार नाहींत, आणि आपला नाशहि होणार नाहीं. आपल्या मनाशीं असा विचार ठरविल्यावर त्यानें म्यानांतून तरवार काढली व ती एकदम देवकीच्या मानेवर मारूं लागला. तेव्हां वसुदेव त्याची विनवणी करून ह्मणाला; "हे कंसा ! या देवकीचा निष्कारण छळ करून तुला काय फायदा आहे ? शरीर हें पंचभूतांचें असून आत्मा हा अविनाशी आहे. तूं हिला मारशील तर ती अन्य ठिकाणीं जन्म घेईल व तेथें हिला संतति होईल. अरे जें प्राक्तनांत लिहिलेलें असतें तें कधींहि टळावयाचें नाहीं. तेव्हां निष्कारण तूं आपल्या बहिणीला मारून पाप व अपकीर्ति कां जोडून घेतोस ?" अशी वसुदेवानें कंसाची पुष्कळ विनंति

केली, परंतु कंसाला स्वतःच्या प्राणाचा मोह अधिक सुटल्यामुळें तो वसुदेवाच्या विनंतीकडे मुळींच लक्ष देईना. तेव्हां वसुदेव ह्मणाला; " कंसा! हिला तूं मारूं नको; कारण ही मग दुसरा जन्म धारण करील व तेथें तुझा नाश करणारा गर्भ उत्पन्न होईल. त्यापेक्षां तूं असें कर किं, हिच्या पोटीं जो आठवा गर्भ उत्पन्न होईल त्याचा तूं नाश कर, ह्मणजे झालें. मला होणारें मूल लहान आहे तोंच मी तें तुझ्या स्वाधीन करीन." वसुदेवानें सांगितलेली ही गोष्ट कंसाला पसंत पडली, परंतु हे आपल्या स्वाधीन आठवा गर्भ करतील असा त्याला त्यांचा विश्वास नसल्यामुळें त्यानें त्या उभयतांसह तो रथ मागें फिरविला व आपल्या प्रधानाची वगैरे सल्ला घेऊन त्या दोघांनां तुरुंगांत ठेवून दिलें.

याप्रमाणें त्या दोघांनां तुरुंगांत ठेवून दिल्यावर कंसाच्या मनाला कांहींशी स्वस्थता वाटू लागली; या प्रकारास कांहीं दिवस झाल्यावर नारद मुनींची स्वारी आली. तेव्हां कंसानें नारदाला आकाशवाणीची हकीकत सांगून तें संकट टळावें ह्मणून वसुदेव देवकीला तुरुंगांत ठेवल्याचेंही सांगितलें. ती सर्व हकीकत ऐकून नारदमुनि ह्मणाले; " कंसा! तूं ही व्यवस्था केली आहेस ती बरी केली आहेस, परंतु आठवा गर्भ कोणता हें ठरविणें मोठें कठिण आहे. कारण उलट मोजल्यास पहिलाहि आठवा येईल; कदाचित् दुसराहि आठवा असेल; सारांश आठवा गर्भ कोणता हें समजावयाला कांहीं मार्ग नाहीं. तर आतां तूं असें कर कीं, या वसुदेव देवकीच्या उदरीं जीं मुलें होतील तीं सर्व मारून टाक; आणि याप्रमाणें आठ गर्भांचा संहार केल्यावर या दोघांना सोडून दे, ह्मणजे तूं संकटांतून मुक्त होशील. नाहीं तर कोणत्या गर्भाकडून तुझा नाश होईल हें कांहीं मला सांगता येत नाहीं. याप्रमाणें सांगून नारद तेथून गेल्यावर वसुदेव देवकीला कांहीं दिवसांनीं एक सुंदर मुलगा झाला. तुरुंगावरील पाहरेकऱ्यांनीं तो प्रकार तत्काल कंसाला जाऊन कळविला, त्या बरोबर कंस तुरुंगांत आला, व त्यानें देवकीच्या मांडीवरून तो सुंदर बालक हिसकून घेऊन बाहेर दगडावर जोरानें आपटला, त्या बरोबर तें मूल शतखंड होऊन त्याचे पंचप्राण पंचभूतांत मिळाले. त्या दुःखकारक प्रसंगानें वसुदेव व देवकी उभयतांहीं अत्यंत शोकाकुल झालें. पूर्व जन्मीच्या दारुण पातकामुळें हें विलक्षण दुःख आह्मीं भोगीत आहों, असें त्यांना वाटूं लागलें. त्या दुःखानें त्या दोघांना अत्यंत क्लेश होऊं लागले, परंतु कांहीं उपाय नसल्यामुळें बिचारे निमूटपणें त्या तुरुंगांत आयुष्याचे दिवस कंठित राहिले. त्यानंतर देवकीला दुसरा मुलगा झाला, तोही कंसानें मारिला. याप्रमाणें कंसानें देवकीचे सहा पुत्र मारले. या सहा मुलांच्या वधामुळें कंसानें तप करून जें कांहीं थोडेंफार पुण्य संचय केलें होतें, तें सर्व नाहींसें होऊन त्याच्या मस्तकावर पापाचा डोंगर मात्र तयार झाला. कंसानें ज्या सहा मुलांचा नाश केला, ते पूर्वजन्मीं मरीचीचे बंधु होते. ब्रह्मदेव सरस्वतीचा अभिलाष धरून जेव्हां कामा-

तुर झाले, तेव्हां हे मरीचीचे बंधु ब्रह्मदेवाला हंसले होते ह्मणून ब्रह्मदेवानीं त्यांना असा शाप दिला किं, " तुह्माला मृत्युलोकीं जन्म येऊन दारूण दुःख भोगावें लागेल. " याप्रमाणें ब्रह्मदेवानें त्यांना शाप दिल्यावर ते नारदाला शरण गेले, व आमची ही अधःपतनअवस्था चुकीव ह्मणून त्यांनीं त्याची विनंति केली. तेव्हां नारदानें त्यांनां अभय दिलें व तुह्मीं पृथ्वीवर जन्म घेतल्याबरोबर तुमची सुटका करीन, ह्मणून सांगितलें. याप्रमाणें त्या मरीची बंधूंना अभिवचन दिल्यावर नारद कंसाकडे आला व त्याला वर सांगितल्याप्रमाणें सल्ला देऊन त्याच्याकडून सहाहि मुलांचा नाश करविला. अशा रीतीनें सहा मुलांचा नाश झाल्यावर विष्णूनीं शेषाला देवकीच्या उदरीं जन्म घेण्यास सांगितलें. त्याप्रमाणें शेषानीं देवकीच्या उदरीं जन्म घेतल्यावर विष्णु मायेला ह्मणाले;—"हे माये! तूं देवकीकडे जाऊन तिच्या उदरांतील गर्भ रोहिणीच्या उदरांत नेऊन घाल, आणि तूं यशोदेच्या उदरीं प्रवेश करून रहा." भगवंतानीं मायेला असें सांगितल्यावर ती तेथून निघाली व देवकीला ज्या तुरुंगांत ठेविलें होतें त्या तुरुंगांत तिनें प्रवेश करून तिच्या उदरांतील शेषाचा गर्भ सर्वांवर माया घालून कोणाला नकळत काढला व नंदाचे घरीं रोहिणी निद्रिस्त असताना तिचे उदरांत नेऊन ठेविला, आणि आपण स्वतः यशोदेचे उदरीं प्रवेश करून राहिली. याप्रमाणें मायेनें व्यवस्था केल्यावर देवकी जागी होऊन पाहते तों उदरांत गर्भ नाहीं. गर्भ उदरांतून कोणी काढला असें ह्मणावें तर तशी कांहीं चिन्हेंहि दिसत नाहींत; तो प्रकार पाहून देवकी व वसुदेव दोघेहि अत्यंत शोकाकुल झाले; परंतु झालेल्या गोष्टीला कांहीं इलाज नाहीं असें जाणून निमूटपणें त्या तुरुंगांत ते कष्टकारक दिवस कंठित राहिले. इकडे रोहिणी जागी होऊन पाहूं लागली तों तिचें पोट मोठें दिसूं लागलें व आपण गरोदर आहों असें तिला कळून चुकलें. एकाएकीं मी गरोदर कशी झालें हें माहित नसल्यामुळें ती फार भयभीत झाली व या विलक्षण प्रकाराबद्दल लोक काय ह्मणतील याचीहि तिला फार लाज वाटूं लागली, परंतु झालेल्या प्रकारास इलाज नाहीं असें जाणून तीहि स्वस्थ होती. इकडे कंस, देवकी अद्यापि कशी प्रसूत होत नाहीं या चिंतेत होता, तों त्याला देवकीचा सातवा गर्भ नाहींसा झाल्याचें समजलें. देवकीचा सातवा गर्भ नाहींसा होऊन थोडे दिवस गेल्यावर ती पुन्हा गरोदर झाली. यावेळीं तिच्या गर्भांत प्रत्यक्ष श्रीहरीनें प्रवेश केला होता. यामुळें ती अत्यंत दिव्य व उल्हासित दिसूं लागली. वसुदेवाची स्थितीहि तशीच आनंददायक झाली. विष्णूच्या आगमनामुळें त्या उभयतांच्या चित्तवृत्तींत बदल झाला होता. दोघेहि तुरुंगांत होते तरी मागील सर्व दुःख विसरून जाऊन मोठ्या आनंदानें त्या तुरुंगांत दिवस घालवूं लागले. भगवंतानें देवकीच्या उदरीं प्रवेश केल्यावर स्वर्गांत देवांनां अत्यंत आनंद झाला, व त्यांनीं मोठ्या

उत्साहानें वसुदेवदेवकीवर पुष्पवृष्टि केली. त्या आनंदभरामुळें देवकीला गर्भावस्थेचें दुःख मुळीं न होतां ते नऊ महिने केव्हांच संपून गेले. योग्य समय प्राप्त झाल्यावर श्रावण वद्य अष्टमी बुधवारीं रात्रीं प्रभूनें जन्म घेतला. त्यावेळीं रोहिणी नक्षत्र असून पाऊस सारखा पडत होता. देवकी व वसुदेव या दोघांनां निद्रा लागलेली होती. दोघेहि निद्रिस्त आहेत असें पाहून प्रभूनीं देवकीचे उदरांतून बाहेर प्रवेश केला; व नंतर देवकीला जागें केलें. प्रभूची ती रम्य बाल मूर्ति पाहून देवकीला अत्यानंद झाला व तिनें आपल्या पतीला जागें केलें. वसुदेव जागा होऊन पाहतो तों पुढें प्रभूची सुंदर श्यामल बालमूर्ति उभी आहे. प्रभूला चार भुजा असून शंख, चक्र, गदा व पद्म हीं आयुधें धारण केलीं आहेत, कंबरेला दिव्य पितांबर परिधान केला आहे, गळ्यांत वैजयंती माळा धारण केली आहे, अशी ती इंद्रनील मण्याप्रमाणें प्रभूची सतेज व सर्वांगसुंदर मूर्ति पाहून दोघेहि आनंदानें तन्मय होऊन गेले; परंतु मागील सहा मुलांच्या दुःखाचें स्मरण होऊन ते खिन्न झाले. कारण आतां कंस मागच्या मुलांप्रमाणें या मुलाचीही व्यवस्था करील या विचारानें दोघांनांही फार वाईट वाटलें व पुढें कसें करावें, या काळजीनें दोघेहि व्याकुळ झाले. तेव्हां श्रीकृष्ण त्यांस ह्मणाला; "गोकुळामध्यें नंदाचे घरीं यशोदेच्या उदरीं योगमायेनें आतांच जन्म घेतला आहे. तेव्हां तुह्मांला माझ्यासंबंधानें काळजी करण्याचें कांहींहि कारण नाहीं. हे वसुदेवा! तूं मला घेऊन त्या यशोदेच्या घरीं नेऊन ठेव व यशोदेच्या त्या मुलीला तूं येथें घेऊन ये. हे वसुदेवा! तूं पूर्व जन्मीचा सुतपा नावाचा ब्राह्मण असून तुझ्या तपश्चर्येमुळें प्रसन्न होऊन मी तुला असा वर दिला होता किं, मी तुझे उदरीं तीन वेळां जन्म घेईन, त्याप्रमाणें तूं कश्यप असतानां मी तुझे उदरीं वामन अवतार घेतला होता, तसेंच तूं जमदग्नि असतांना मी परशुरामाचा जन्म घेतला होता, आणि आतां तुझ्या उदरीं श्रीकृष्णावतार घेऊन मी तुझ्या ऋणांतून मुक्त झालों आहें. तुला आतां मोक्षाची प्राप्ति होईल. तुह्मा उभयतांनां माझें लालनपालन करण्याची इच्छा आहे हें मला माहित आहे, ह्मणून मी गोकुळांत क्रीडा खेळून व कंसाचा नाश करून लवकरच तुह्मांकडे येईन." असें कृष्णानें वसुदेवाला सांगितल्यावर तेथें स्वर्गांतून सर्व देवांसह ब्रह्मदेव आले, त्यांनीं प्रभूची अनन्यभावानें स्तुति केली, व ते स्वस्थानीं निघून गेले. वसुदेवाची रोहिणी ही वडील स्त्री होय. वसुदेवानें कंसाच्या भीतीनें तिला नंदाकडे कोणाला नकळत पाठविलें होतें. तेथें ती प्रसूत होऊन तिला मुलगा झाला तोच बलराम हा होय. श्रीकृष्ण हे बलरामापेक्षां वयानें सहा महिन्यांनीं लहान होते."

---

# अध्याय ३ रा.

## १ श्रीकृष्णाच्या बालक्रीडा.

श्रीकृष्णानें वसुदेव व देवकी या उभयतांनां—आपणास गोकुळांत यशोदेच्या घरीं नेऊन ठेवण्यास—सांगितल्यावर, श्रीकृष्णानें आपलें तें स्वरूप टाकून ते नुकत्याच जन्मलेल्या मुलाप्रमाणें लहान झाले. तीं हातांतील शंखचक्र वगैरे आयुधें नाहींशीं झालीं, पीतांबर दिसेनासा झाला, व चार भुजा होत्या त्या ऐवजीं दोनच भुजा दिसूं लागल्या. याप्रमाणें कृष्णानें बाळरूप धारण केल्यावर देवकीला प्रेमाचें भरतें आलें व तिनें त्या आपल्या बालकाला पोटाशीं घट्ट धरिलें. नंतर जवळ असलेल्या फडक्यानें कृष्णाचा देह आच्छादन करून तें मूल तिनें वसुदेवाजवळ दिलें. त्याचें संरक्षण सर्व देवांनीं करावें, त्याला कोणापासून पीडा होऊं नये, म्हणून तिनें त्यावेळीं आदिमाता जी अंबिका तिची अत्यंत करुणा भाकिली. या मुलाला येथून घेऊन कसें जातां येईल याचा वसुदेवाला मोटा विचार पडला होता, परंतु बालस्वरूप प्रभूचा स्पर्श त्याच्या हातांस होतांच त्यास एकदम हुशारी आली व तो श्रीकृष्णाला घेऊन तत्काळ उठला व दरवाजाजवळ आला. दरवाजा भक्कम असून त्याला मोठालीं कुलपें घातलीं होतीं. तेव्हां हा दरवाजा उघडून आपण बाहेर कसे पडूं याची वसुदेवाला पुन्हा काळजी वाटूं लागली, परंतु त्याचा स्पर्श दरवाजाला झाल्याबरोबर तो मोठा थोरला दरवाजा बिलकूल आवाज न होतां उघडला. दरवाजावर असलेले पाहारेकरी अडवितील असें वसुदेवाला वाटलें होतें; पण पाहतो तों ते पाहारेकरी स्वस्थ घोरत पडले होते; त्यामुळें वसुदेवाला रस्त्याला लागेपर्यंत कोणीही अडविलें नाहीं. बाहेर डोळ्यांत बोट घातलें तरी दिसणार नाहीं असा घनदाट विलक्षण काळोख पडला होता, आकाश मेघानें आच्छादिलेलें होतें व पाऊस मुसळधार पडत होता. अशा स्थितींत मार्ग काढावयाचा ह्मणजे खरोखरच अत्यंत कठिण असें काय होतें, परंतु कंसाची भीति व अपत्यप्रेम या दोहोंमुळें वसुदेव त्या अंधारांतून घाईघाईनें मार्ग क्रमित होता. श्रीकृष्ण भगवान् पावसानें भिजतील ह्मणून शेष त्यांच्यावर आपली फणा पसरून त्यांच्याबरोबर चालला होता; पण हा प्रकार वसुदेवाला मुळींच माहित झाला नाहीं. या प्रमाणें वसुदेव मार्ग क्रमित आहे तों पुढें यमुना नदी लागली. पर्जन्य कालचे दिवस असल्यामुळें त्या विशाल यमुना नदीला फार पाणी आलें होतें व पूराच्या लाटांनीं ती गर्जना करीत वहात होती. ती नदी उतरून पलीकडे कसें जावें अशी वसुदेवाला पुन्हा काळजी पडली, परंतु इतक्यांत मार्गाचे ठिकाणीं यमुना दुभंग झाली व वसुदेव श्रीकृष्णाला घेऊन पुढें गेला. त्यावेळीं गोकुळांतील नंदाच्या घरचा दरवाजा

उघडाच होता. वसुदेव कृष्णाला घेऊन निःशंकपणें नंदाच्या घरांत शिरला; व जेथें यशोदा निजली होती त्या खोलींत गेला. पाहतो तो पलंगावर यशोदा निद्रिस्थ असून ती नुकतीच प्रसूत झाल्यामुळें जवळ योगमाया खेळत होती. त्यावेळीं वसुदेवानें कृष्णाला तेथें ठेवलें व योगमायेला घेऊन तो तसाच परत आपल्या तुरुंगात येऊन दाखल झाला. तो तुरुंगांत आल्यावर दरवाजा पूर्वीप्रमाणें बंद झाला व त्या पाहरेकऱ्यांची निद्रा दूर होऊन तेही हुशारीनें पाहरा करूं लागले. पाहरेकरी सावध झाले असें पाहून योगमाया मोठमोठ्यानें रडूं लागली. त्याबरोबर देवकी बाळंतीण झाली हें वर्तमान कंसदूत कंसाला कळविण्यासाटीं त्याकडे गेले. कंसाच्या कानावर तीं अक्षरें पडल्याबरोबर तो तेथून निघाला व हा आठवा गर्भ असल्यामुळें मोठ्या घाइघाईनें व उत्कंठेनें तुरुंगांत आला. पाहतो तों देवकीच्या मांडीवर सुंदर कन्या आहे. तेव्हां आपल्या मनांत ह्मणाला ही कन्या माझा काय नाश करणार ? पण हिची उत्पत्ति आठव्या गर्भापासून आहे. तेव्हां हिचा नाश आपल्याला केलाच पाहिजे. असा विचार करून त्यानें ती मुलगी देवकीच्या मांडीवरून ओढून घेतली व तो तिचे पाय धरून तिला दगडावर आपटण्यासाठीं गरगर फिरवूं लागला, इतक्यांत ती योगमाया हातांतून निसटली व आकाशांत निघून गेली. ती आकाशांत जातां जातां कंसाला म्हणाली; “अरे दुष्टा पाप्या कंसा ! या बालहत्येच्या पातकामुळें तुझ्या पापाचा घडा पुरा भरला आहे. आतां तुझा नाश होण्याला मुळींच अवकाश लागणार नाहीं. तूं आपल्या बहिणीच्या वंशछेदनाचा प्रयत्न केलास पण या तुझ्या कृत्यानें तुझ्याच वंशाचा नाश होईल. अरे वृक्षाच्या मुळावर अग्नि ठेवून मूर्ख जशी फलांची व पुष्पाची इच्छा करितो, त्याप्रमाणें तूं आपल्या हितासाटीं दुसऱ्याला त्रास दिला आहेस. जो आपल्या आईबापांचा अपमान करितो, जो गुरूचा द्रोह करितो, श्वशूर व जामात यांनां त्रास देतो, बहिणीचा छळ करितो, तो निश्चयानें नरकाचा अधिकारी होतो. तूं आपल्या बहिणीचा व मेहुण्याचा छळ करून आपल्या मस्तकावर पापाचा पर्वत तयार करून घेतला आहेस. त्याचें फल तुला लवकरच मिळेल. तुझा नाश करणारा राहूं नये, म्हणून तूं येवढा प्रयत्न केलास, पण तो तुझा शत्रू सुखानें अन्यत्र नांदत असून त्याच्या हातानें तुझा लवकरच नाश होईल.” याप्रमाणें त्या योगमायेनें आकाशां-तून गर्जना केली व ती वीजेप्रमाणें आकाशांत निघून गेली. ती योगमायेची वाणी ऐकून कंसाची अवस्था मोठी चमत्कारिक झाली. त्याला पुढें काय करावें तें समजेना. मागें जी आकाशवाणी झाली होती, त्या आकाशवाणीवर मी विश्वास ठेवून निष्कारण या बालहत्या केल्या, असें त्याला वाटूं लागलें. आपण आपल्या बहिणीचा विनाकारण छळ केला याबद्दल त्याला फार पश्चात्ताप वाटू

लागला, व त्यानें वसुदेव व देवकी या उभयतांनां कारागृहांतून मुक्त केलें व त्यांची पुष्कळ समजूत केली.

## २. पूतनेचा नाश.

योगमायेच्या वाणीचा कंसावर अत्यंत विलक्षण परिणाम झाला, व त्यामुळें त्याला फार काळजी उत्पन्न झाली. मग त्यानें आपल्या अष्ट प्रधानास बोलावून झालेला सर्व प्रकार सांगितला व पुढें काय करावें, असा प्रश्न सर्वांपुढें ठेविला; कंसाच्या प्रधानमंडळीनीं या गोष्टीचा पुष्कळ खल करून असें ठरविलें कीं, या सुमाराला ज्या स्त्रिया प्रसूत झाल्या असतील त्यांचा शोध करून त्या सर्वांचीं लहान मुलें मारून टाकावीं. ही सल्ला सर्वांनां एकदम पसंत पडली व त्याप्रमाणें त्या कार्यावर अनेक दुष्ट राक्षसांची योजना झाली. पूतनेनें गोकुळांत जाऊन बालहत्या करण्याचा विडा उचलिला. त्या वेळीं गोकुळांत नंद हा विशेष प्रसिद्ध असून त्याची सांपत्तिक स्थिति चांगली होती. त्याला वृद्धपणीं बहुत दिवसांनीं पुत्र झाल्यामुळें त्याला स्वतःला फार आनंद झाला होता, तसाच गोकुळांतील सर्व आबालवृद्ध स्त्रीपुरुषांनांही आनंद होऊन त्यांनीं त्यासंबंधानें मोठा उत्सव आरंभिला होता. घरोघर सडासंमार्जन करून रस्ते रंगवल्लिकांनीं रंगविले होते; घरोघर ध्वजा, पताका, तोरणें लाविलीं होतीं; ब्राह्मणांनां दानें देऊन संतोषित केलें होतें; घरोघर यशोदेनें वाणें दिलीं; सर्वांकडून नंदाच्या घरीं बाळंतविडे आले; व नाना प्रकारचीं पक्वान्नें करून लोकांनीं भोजनें केलीं. नंदानें आपले गुरु गर्गाचार्य यांनां बोलावून त्यांच्याकडून मुलाची पत्रिका वर्तविली. गर्गाचार्य ह्मणाले; " हे नंदा ! हा तुझा मुलगा अत्यंत कीर्तिशाली व पराक्रमी असा होईल. हा साधुसंतांचा सन्मान करून ब्राह्मणांचा प्रतिपाळ करील, आणि दुष्टांचा संहार करील. याला सोळा हजार स्त्रिया मिळतील व लक्षावधी कन्यापुत्र होतील. हे नंदा ! याचें नांव तूं श्रीकृष्ण असें ठेव." याप्रमाणें गर्गाचार्यांनें सांगितल्यावर नंदानें मुलाचें नांव श्रीकृष्ण असें ठेविलें व गर्गाचार्यांचा योग्य गौरव करून त्यांनां निरोप दिला. आपणास पुत्र झाला ही गोष्ट राजाला कळवून त्याला संतोषित करावें या उद्देशानें नंद, गोकुळांत उत्सव चालू असतांनां कंसाला भेट देण्यासाठीं दूध, दहीं, लोणी, असें आपणाबरोबर घेऊन कंसाकडे आला. तेथें त्यास देवकी व वसुदेव भेटले. त्यांनीं रोहिणीचा मुलगा व यशोदेचा मुलगा कुशल आहेना, ह्मणून विचारिलें. तेव्हां नंदानें दोघेहि कुशल असून रोहिणीच्या मुलाचें नांव बलराम ठेविलें आहे व मीं आपल्या मुलाचें नांव श्रीकृष्ण असें ठेविलें आहे, वगैरे हकीकत त्यांना कळविली. त वर्तमान ऐकून वसुदेवदेवकीला फार आनंद झाला व प्रेमामुळें त्या उभयतांच्या डोळ्यांतून प्रेमाश्रु वाहूं लागले. नंदाला तो प्रकार कांहींच माहीत नसल्यामुळें त्याला कांहीं विशेष वाटलें नाहीं नंतर. नंदानें कंसाची भेट घेतली

व त्यास पुत्र झाल्याचें कळवून दहीं, दूध, वगैरेचा कंसाला नजराणा दिला. ती हकीकत ऐकून पूतना लागलीच तेथून निघाली व सुंदर स्त्रीचें रूप धारण करून गोकुळांत आली. इतर स्त्रियांप्रमाणें तिनें आपणाबरोबर यशोदेला देण्यासाठीं बाळंतविडा आणिला होता; तिनें कपटबुद्धीनें आपल्या स्तनाला जालीम विष लाविलेलें होतें. प्रेमाचा भाव आणून श्रीकृष्णाला जवळ घ्यावयाचें व त्याला स्तनाला लावून त्याचा नाश करावयाचा असा तिनें व्यूह रचिला होता. पूतना प्रसूतिगृहांत आल्याबरोबर बालमुकुंदांनीं तिचें तें कपट तेव्हांच जाणलें व ते मोठ्यानें रूदन करू लागले. यशोदेनें कृष्ण रडताना रहावा, म्हणून पुष्कळ प्रयत्न केला; दुसऱ्या स्त्रियांनींहि त्याला कडेखांद्यावर घेऊन पाहिलें, पण त्याचें रडणें बंद होईना; तेव्हां पूतना म्हणाली, जरा मी या मुलाला घेऊन पाहतें, माझ्याजवळ द्या. असें म्हणून त्या कपटी पूतनेनें कृष्णाला जवळ घेतलें; त्याबरोबर श्रीकृष्ण रडावयाचा राहिला व तिच्या मुखाकडे पाहून हंसूं लागला. तो प्रकार पाहून सर्व स्त्रियांनां पूतनेबद्दल मोठें आश्चर्य वाटलें. मग त्या कपटी पूतनेनें आपला विषयुक्त स्तन कंचुकींतून बाहेर काढून कृष्णाच्या मुखांत दिला. तेव्हां श्रीकृष्णानें एखाद्या शक्तिसंपन्न विशाल अजगराप्रमाणें तिच्या स्तनांतलें दूध पिण्यास आरंभ केला; व बालस्वभावाप्रमाणें दूध पीत असतां भगवान आपल्या लाथा तिच्या हृदयावर मारू लागले. इतर स्त्रियांनां त्याबद्दल कांहींच वाटलें नाहीं, परंतु प्रभूच्या विलक्षण शक्तीमुळें पूतनेचे पंचप्राण व्याकुळ झाले. तिनें कृष्णाला आपल्या स्तनापासून दूर करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु त्याचा कांहींएक उपयोग होईना. ती तडफडत असतांच कृष्णानें क्षणार्धांत तिचे पंचप्राण आकर्षण केले; व गतप्राण होऊन ती जमिनीवर धाडकन् पडली ! पण पूतनेला प्रभूचा शरीरस्पर्श झाल्यामुळें तिचा उद्धार झाला. मरणकालीं त्या मायाविनीचें तें सुंदर स्वरूप नाहींसें होऊन सहा कोस लांब असें तिचें मूळचें राक्षसी विक्राळ स्वरूप झालें. तें तिचें भयंकर राक्षसी स्वरूप पाहून यशोदेनें व इतर स्त्रियांनीं घाईघाईनें कृष्णाला पूतनेच्या विशाल कलेवरावरून उचलून घेतलें व पोराच्या जिवावरचें मोठें संकट टळलें म्हणून त्यावरून लिंबलोण उतरूं लागल्या. इतक्यांत नंद कंसाकडे गेला होता, तोहि घरीं आला. तो विलक्षण प्रकार पाहून हें सर्व कंसाचेंच कृत्य आहे असें त्याच्या लक्षांत आलें. मग नगरांतील सर्व गवळी नंदाच्या घरीं आले, व त्यांनीं त्या राक्षसिणीचे तुकडे करून ते नगराबाहेर नेऊन जाळले.

### ३ शकटासुराचा नाश.

एके दिवशीं श्रीकृष्णाचें जन्मनक्षत्र असल्यामुळें त्या दिवशीं श्रीकृष्णाचा वाढदिवस होता, व त्या उत्साहाकरितां नंदाचे घरीं सर्व गवळी लोक आले होते; त्यावेळीं श्रीकृष्ण, यशोदा व इतर स्त्रिया यांसह गाडयांत बसून दूर गेले व तेथें

उतरले. नंतर श्रीकृष्णाला एका गाडीच्या खालच्या मार्गी वस्त्राची झोळी करून त्यांत ठेविलें. इतक्यांत एका असुरानें येऊन कृष्णाचा नाश करण्याच्या हेतूनें त्या गाडींत प्रवेश केला. तेव्हां श्रीकृष्ण तोंडांत पायाचा आंगुठा घालून रडूं लागला. तें त्याचें रुदन कोणीहि न ऐकिल्यामुळें श्रीकृष्णानें सहज लीलेनें त्या गाड्यावर लाथ मारिली, त्याबरोबर त्या गाड्याचा चुरा होऊन त्या शकटासुराचा नाश झाला. अशी कथा श्रीमद्भागवतांत आहे.

### ४. तृणावर्ताचा नाश.

या गोष्टीस कांहीं दिवस झाल्यावर श्रीकृष्णाचा नाश करण्यासाठीं, तृणावर्त या नांवाचा एक राक्षस आला होता. त्यावेळीं अंगणामध्यें यशोदा श्रीकृष्णाला आपल्या कडेवर घेऊन खेळवीत होती. श्रीकृष्णानें अंतरदृष्टीनें तृणावर्त राक्षस आपला नाश करण्यासाठीं आकाशमार्गानें येत आहे असें जाणून यशोदेच्या कंबरेवर थोडा अधिक भार घातला. तेव्हां यशोदेनें कृष्णाला सहज खालीं अंगणावर मोकळें खेळण्यासाठीं सोडिलें. ती संधी साधून त्या तृणावर्त राक्षसानें मोठा धुंधुवात निर्माण केला. त्या वादळामुळें वृक्ष डोलूं लागले, लहान लहान वस्तु सैरावैरां उडूं लागल्या आणि भूमीवरील धूळ तर आकाशांत इतकी कांहीं भरली किं, सूर्य दिसेनासा होऊन पृथ्वीवर अंधार पडला. इतकी तयारी केल्यावर त्या तृणावर्त राक्षसानें भूमीवर येऊन कृष्णाला सहज उचलिलें, व त्याला घेऊन तो फिरून आकाशांत गेला. इकडे वादळ शांत झाल्यावर यशोदा अंगणांत पाहते तों कृष्ण नाहीं; तेव्हां तिच्या पोटांत धस्स झालें व ती चोहोंकडे कृष्णाला शोधूं लागली. तिनें ती हकीकत नंदाला सांगितल्यावर नंदहि अत्यंत शोकाकुल झाला व तो सगळ्या गवळ्यांना बरोबर घेऊन ठिकठिकाणीं कृष्णाचा शोध करूं लागला. इतक्यांत नंदाच्या अंगणांत तो तृणावर्त राक्षस मरून पडला व त्याबरोबर श्रीकृष्णहि अंगणांत येऊन यशोदेपुढें खेळूं लागला. तो प्रकार पाहून यशोदा आश्चर्यचकित झाली व तिनें कृष्णाला आपल्या पोटाशीं घट्ट धरिलें. कृष्ण सांपडल्याबद्दल सर्वांना आनंद झाला. यशोदेनें अंबिकेची स्तुति करून कृष्णाचें निरंतर संरक्षण करण्याविषयीं तिची प्रार्थना केली.

### ५. श्रीकृष्णाचें मृत्तिकाभक्षण.

कृष्णाची अर्भकावस्था संपून तो थोडा मोठा झाल्यावर बरोबरीच्या लहान मुलांबरोबर तो खेळावयास जाऊं लागला. तो बरोबरीच्या मुलांबरोबर खेळत असतां एके दिवशीं त्यानें माती भक्षण केली. तेव्हां इतर मुलांनीं, कृष्णानें माती खाल्ली, असें यशोदेला येऊन सांगितलें. तें ऐकून यशोदा कृष्णावर रागावली, व तूं माती कां खालीस म्हणून त्याला विचारूं लागली. तेव्हां कृष्ण म्हणाला; “ आई! अटराजण मुलें उगीच कांहींतरी खोटें सांगतात, तसेंच

तीं चार मुलें जें सांगतात त्यावर तूं विश्वास ठेवूं नकोस, आणि तीं सद्दा मुलें तर मीं खातों एक तर तुला सांगतात भलतेंच, तूं त्या कोणाचेंहि बोलणें खरें मानूं नकोस. माझ्या तोंडांत काय आहे, हें तुला पहावयाचें असल्यास पहा." असें म्हणून कृष्णानें आपलें तोंड उघडिलें व तो यशोदेपुढें उभा राहिला. यशोदा त्याच्या तोंडांत पाहूं लागली तों तिला श्रीकृष्णाच्या मुखांत चवदा भुवनें दिसूं लागलीं. संपूर्ण विश्व श्रीकृष्णाचे मुखांत तिला दिसूं लागलें, इतकेंच नव्हे तर गोकुळहि दिसलें व त्या गोकुळांत यशोदा कृष्णाला खेळवित आहे असेंहि तिनें पाहिलें. तो विलक्षण प्रकार पाहून यशोदा आश्चर्यानें थक्क होऊन गेली; परंतु कृष्णानें तत्काल यशोदेचें मन आपल्या मनोहर बाललीलांनीं दुसरीकडे वळविलें.

## ६. दामबंधनलीला.

एके दिवशीं यशोदा ताक करीत असतां कृष्ण बाहेरून आंत आला व खाण्यासाठीं लोणी मागूं लागला, परंतु यशोदा कृष्णाला लोणी देईना; इतक्यांत चुलीवर दूध तापत ठेविलें होतें तें उतूं जावयाला लागलें म्हणून यशोदा तिकडे गेली. ती संधी साधून कृष्ण माथणींतून लोणी घेऊं लागला. परंतु माथणी खोल असल्यामुळें त्याचा हात पुरेना, म्हणून कृष्णानें माथणी सांडून दिली व माथणींतील सर्व लोणी खाऊन टाकलें. इकडे यशोदा येऊन पाहते तों कृष्णानें माथणी पालथी केली असून लोण्यानें भरलेलीं बोटें चाटित बसला आहे. तो कृष्णाचा दांडगेपणा पाहून यशोदा कृष्णावर रागावली व त्याला धरूं लागली; परंतु कृष्ण इकडून तिकडे व तिकडून इकडे पळत असल्यामुळें तो यशोदेच्या हातीं लागेना. त्याच्या मागें धांवतां धांवतां यशोदा थकून गेली. शेवटीं आपली आई आपल्या मागें धांवतां धांवतां थकली असें जाणून कृष्णच उभे राहिले. तेव्हां यशोदेनें कृष्णाला धरलें व त्याला ती गुराच्या दाव्यानें बांधूं लागली; परंतु तें दावें कृष्णाच्या कंबरेलाच पुरेना, म्हणून यशोदेनें आणखी एकदोन दावीं आणिलीं आणि त्याला जोडलीं तरी देखील तें कृष्णाच्या कंबरेला पुरेना. शेवटीं यशोदेला अगदीं कंटाळा आला व ती त्याला सोडून द्यावयाला लागली. इतक्यांत कृष्णानें आपली कंबर बारीक केली, तेव्हां यशोदेनें गुराच्या दाव्याचा एक पदर कृष्णाच्या कंबरेला बांधिला, व दुसरा आंगणामध्यें उखळी होती त्याला बांधिला. आतां कृष्ण कांहीं दांडगाई करणार नाहीं, असें वाटून यशोदा स्वस्थ चित्तानें घरांत आली व गृहकृत्यें करूं लागली. इकडे श्रीकृष्णानें ती लांकडाची प्रचंड उखळी आंगणांतून सहज लीलेनें ओढीत ओढीत बाहेर नेली व रस्त्यामध्यें दोन प्रचंड वृक्ष जवळ जवळ उभे होते त्या दोन्हीं वृक्षांमधून ती उखळी ओढली. त्या बरोबर ते दोन्ही प्रचंड वृक्ष उन्मळून पृथ्वीवर पडले, व त्यांतून दोन दिव्य पुरुष निघाले. ते मणिग्रीव व नलकुबेर असे दोन गंधर्व नारदाच्या शापानें यमलार्जुन नावाचे

वृक्ष होऊन बहुत कालपर्यंत तेथें होते. ही कथा प्रथम स्तबकांत अकराव्या अध्यायांत सांगितली आहे. ) तो प्रकार पाहून लोक श्रीकृष्णाकडे धांवले, व त्याला उचलून यशोदेजवळ नेऊन दिलें, आणि झालेली हकीकत सांगितली. तेव्हां यशोदेनें कृष्णाला आपल्या हृदयाशीं घट्ट धरून त्याचें चुंबन घेतलें.

## ७ वत्सासुर, बकासुर व आघासुरचा वध.

एके दिवशीं कृष्ण व इतर गवळ्यांचीं मुलें यमुना नदीच्या काठीं गायी चारीत असतां तेथें वत्सासूर या नावाचा राक्षस बैलाचें रूप धरून आला. तो कंसाचा गुप्त हेर असून कपटानें कृष्णाचा नाश करावा या उद्देशानें आला होता, परंतु कृष्णानें त्याला तेव्हांच ओळखिलें व त्याचे मागचे पाय धरून त्याला खूप गरगर फिरविलें आणि नंतर एका शिलेवर जोरानें आपटून त्याला मारून टाकलें. त्या प्रमाणेंच एकदां बकासुर या नावाचा राक्षस बगळ्याचें रूप धारण करून आकाश मार्गानें एकदम आला व कृष्णावर झडप घालून त्यानें त्याला आपल्या प्रचंड चोंचीनें धरून घशांत गिळण्यासाठीं घेतलें. तेव्हां कृष्णानें आपल्या अंगांत विलक्षण उष्णता उत्पन्न केली. त्या उष्णतेमुळें बकासुराचें तोंड होरपळलें व त्यानें घाईघाईनें कृष्णाला जमिनीवर सोडून दिलें. मग कृष्णानें त्या बगळ्याची चोंच दोन्ही हातानें धरून त्याला उभाचा उभाच चिरून फेंकून दिलें. बकासुराची ती दशा झालेली पाहून अघासुर या नावाचा एक राक्षस अत्यंत संतप्त झाला व कृष्णाचा नाश करण्यासाठीं प्रचंड अजगराचें रूप धरून तेथें आला. इकडे कृष्ण व गवळ्याचीं मुलें दहीभात खात असतां त्या अजगरानें एकावर एक वेटाळीं घालून आपल्या शरिराचा एक पर्वतच तयार केला, व पर्वतांतील दरीप्रमाणें तोंड पसरून तो तेथें बसला. गोपाळांचा दहीभात खाणें झाल्यावर ते उठले व इकडे तिकडे खेळूं लागले, तेव्हां कित्येक मुलें सहजगत्या (तो अजगर हा एक डोंगरच आहे असें जाणून) त्याच्यावर चढलीं. कांहीं मुलें चढल्यावर बाकीच्या मुलांनांहि चढ-ण्याची इच्छा झाली व तींही त्या अजगराच्या शरिरावर चढलीं. तो सर्व प्रकार कृष्णाच्या लक्षांत आला, आणि हा अजगर आपला नाश करण्यासाठीं आला आहे असें त्यानें ओळखिलें; परंतु सर्व गोपाळ त्या अजगराच्या शरिरावर चढल्यामुळें त्यांच्या संरक्षणासाठीं कृष्णालाहि अजगराच्या शरिरावर चढावें लागलें. पुढें तीं मुलें अजगराच्या मुखाजवळ गेलीं, व अजगर आपला प्रचंड जबडा पसरून बसल्यामुळें मुलांनां ती एक दरीच आहे असें वाटलें व कसलाहि विचार न करितां तीं त्या अजगराच्या मुखांत शिरलीं, तेव्हां त्यांच्या संरक्षणा-साठीं कृष्णहि अजगराच्या मुखांत गेला. कृष्ण आपल्या उदरांत आला आहे असें जाणून त्या अजगरानें आपलें तोंड बंद केलें व तो त्या सर्वांनां मारण्याचा प्रयत्न करूं लागला. तेव्हां सर्व गोपाळ घाबरले व या संकटाचें निवारण करण्या-

विषयीं कृष्णास विनवूं लागले. तेव्हां श्रीकृष्णानें प्रचंड स्वरूप धारण करून त्या अजगराचे पोट फाडलें व त्याचे तुकडे तुकडे केले व सर्व गोपाळ सुरक्षितपणें बाहेर पडले. तो अजगर जेव्हां मेला तेव्हां त्याच्या शरीरांतून तेजाची जोत बाहेर पडली ती कृष्णानें गिळली. त्या अघासुराचें मरण कसें होईल याची सर्व देवांनां मोठी काळजी पडली होती, परंतु अशा रीतीनें त्या अघासुराचा कृष्णानें नाश केल्यामुळें देवांनां फार आनंद झाला. व त्यांनीं कृष्ण व बलराम यांवर पुष्पवृष्टि केली. श्रीकृष्णाच्या हातानें अघासुराचा मृत्यु झाल्यामुळें त्याचा उद्धार होऊन त्याला मोक्षाची प्राप्ति झाली. नंतर तेथून कृष्ण, बलराम व गोपाळ निघाले व यमुनेच्या कांठीं वृंदावनांत आले. तें वृंदावन अत्यंत रम्य असून श्रीकृष्णाच्या क्रीडाभुवनामुळें तर त्या वृंदावनाला अधिकच मनोहरपणा आला होता. पवित्रसलिला यमुना त्या वृंदावनाच्या कांठाकांठानेंच गेलेली आहे. त्या यमुनेचें तें कौतुकप्रद पाणी पाहून सर्व गोपाळांनां मोठा आनंद झाला व आपआपल्या शिधोऱ्या यमुनेच्या कांठावर ठेवून त्या सर्वांनीं श्रीकृष्णासह यथेच्छ जलविहार केला. नंतर सर्वांनीं आपलीं कांबळीं आंथरून त्यावर कृष्णाला बसविलें व निरनिराळ्या झाडांचीं मोठमोठीं पानें आणून तीं सर्वांनीं जेवण्यासाठीं घेतलीं. नंतर कृष्णानें सर्वांच्या शिदोऱ्या सोडून त्यांतील भाकरी, दहीं, पोहे, एके ठिकाणीं केले व तो काला सर्वांना सारखा वांटून देऊन भोजनाला आरंभ केला. तो विलक्षण प्रकार पाहून देवांनां देखील तो काला खाण्यासाठीं गोपाळ व्हावें असें वाटलें, परंतु श्रीकृष्णाबरोबर भोजन करण्याचा अधिकार त्या देवांना नसल्यामुळें ते बिचारे फारच कष्टी झाले.

## ८ ब्रह्मदेवकृत गोवत्सहरण.

श्रीकृष्ण भगवान ज्याला त्याला मोक्षदान देत आहेत, दुष्टांचा देखील उद्धार करित आहेत, हें पाहून ब्रह्मदेवाला फार आश्चर्य वाटलें. भगवंताचे जे इतर अवतार झाले त्यापेक्षां हा अवतार विशेष गूढ तत्वांनीं भरलेला आहे, असें ब्रह्मदेवाला वाटूं लागलें, व केवळ मनुष्याप्रमाणेंच संसारालिप्त झालेल्या कृष्णाची शक्ति तरी किती आहे हें पाहण्याचें ब्रह्मदेवानें मनांत आणिलें. एके दिवशीं श्रीकृष्ण, बलराम व गोपाळ दहीकाला खात बसलेले आहेत व त्यांच्या गायी चरत चरत रानांत बऱ्याच दूरवर गेल्या आहेत असें पाहून ब्रह्मदेव तेथें आला व त्यानें सर्वांची नजर चुकवून त्या सर्व गायी सत्यलोकीं नेऊन ठेविल्या. बऱ्याच लांबपर्यंत गायी दिसत नाहींत असें पाहून गोपाळ ह्मणाले; “ कृष्णा ! गायी कोठें दिसत नाहींत, त्या लांब गेल्या तर सांपडणार नाहींत, तेव्हां आपण गायींना इकडे हांकून आणू व नंतर पुन्हां खावयाला बसूं. ” तेव्हां श्रीकृष्ण ह्मणाले, “तुह्मी येथेंच खात बसा, मी सर्व गुरांना इकडे घेऊन येतों,” असें सांगून श्रीकृष्ण व बलराम असे उभयतां गायींच्या शोधासाठीं गेले. भगवान गवळ्यांच्या

मुलांपासून पुष्कळ दूर गेले आहेत असें पाहून ब्रह्मदेव त्या मुलांकडे आला व त्यांनाहि सत्यलोकीं घेऊन गेला, व आतां पुढें काय होतें तें पहात बसला. इकडे गायी सांपडत नाहींत असें पाहून श्रीकृष्ण मागें परतला व गोपाळ भोजन करीत बसले होते तेथें आला, पण तेथें पाहतो तों कोणीहि गोपाळ नाहीं. तो प्रकार पाहून बलराम फारच विस्मित झाला, परंतु श्रीकृष्णाचे लक्षांत तो सर्व प्रकार येऊन हें कृत्य ब्रह्मदेवाचें आहे असें त्यानें ओळखिलें. तेव्हां कृष्णानें जितक्या गायी व जितकीं वासरें नाहींशीं झालीं होतीं तितकीं सर्व पूर्वीप्रमाणें तयार केलीं. कांहीं गायी लंगड्या होत्या, कांहीं आंधळ्या, कांहीं एक डोळ्या, कांहीं लांड्या, कांहीं खुज्या, तसेंच काळ्या, पांढऱ्या, पिंवळ्या, भुरक्या वगैरे अनेक प्रकारच्या व अनेक रंगाच्या गायी व वासरें थेट पूर्वींप्रमाणें तयार केलीं. व त्याचप्रमाणें कांहीं काळे, कांहीं सांवळे, कांहीं गोरे, कोणी खुजे, कोणी लंगडे, कांहीं रोडके, कांहीं लठ्ठ, कांहीं सुरुप, कांहीं कुरुप, याप्रमाणें अनेक गोपाळ पहिल्यासारखेच तयार केले, व त्या सर्वांसह श्रीकृष्ण गोकुळांत परत आला. गायी, वासरें व गोपाळ या सर्वांत आतां श्रीकृष्णाचा अंश असल्यामुळें, गोकुळांत घरोघर श्रीकृष्ण अवतीर्ण झाल्यासारखें झालें. पूर्वी यशोदा व नंद हे दोघेच कृष्णाचें कौतुक करीत होते, परंतु ब्रह्मदेवाच्या या कृतीमुळें आतां सर्वांनांच श्रीकृष्णाचें लालन पालन करण्याचा योग आला; परंतु गोकुळांतील त्या अज्ञानी लोकांनां श्रीकृष्णाची ती अघटीत लीला कांहींच माहित नसल्यामुळें आपण इतके भाग्यवान आहोंत हें कोणाचेंहि लक्षांत आलें नाहीं. तसेंच ती सर्व कृति प्रत्यक्ष श्रीकृष्णाचीच असल्यामुळें त्यांत काडीइतकाही उणेपणा कधीं कोणाच्या लक्षांत आला नाहीं. याप्रमाणें एक संवत्सर गेल्यावर ब्रह्मदेवाला वाटलें कीं आपण केलेल्या प्रकारामुळें गोकुळांत मोठा घोटाळा झाला असेल, तेव्हां एकदां पृथ्वीवर जाऊन ती मौज अवलोकन करावी. असा हेतू धरून ब्रह्मदेव गोकुळांत आला, आणि पाहतो तों पूर्वींप्रमाणें सर्व गायी गोपाळ जसेच्या तसे असून त्यांचे व्यवसाय आनंदानें चालले आहेत. तो प्रकार पाहून ब्रह्मदेव अगदीं आश्चर्यचकित झाला, व आपण सृष्टिकर्ते असा जो त्याला अभिमान होता, तो त्याचा अभिमान क्षणाधांत पार नाहींसा झाला. त्याला वाटलें कीं,आपण इकडे आल्यावर कदाचित् कृष्णानें सत्यलोकाहून हीं आणलीं असतील म्हणून तो सत्यलोकीं जाऊन पाहूं लागला. तो तेथेंही गायी गोपाळ आहेतच. पुन्हां पृथ्वीवर पाहूं लागला तों पृथ्वीवर तशाच गायी व गोपाळ आहेत, तो प्रकार पाहून ब्रह्मदेवाला आपण सत्यलोकीं आहोंत किं मृत्युलोकीं आहोंत, अशी भ्रांति उत्पन्न झाली. मग ब्रह्मदेवाला आपल्या त्या कृतीबद्दल फार अनुताप वाटूं लागला व त्यानें प्रभूची क्षमा मागण्याचें मनांत आणिलें. याप्रमाणें तो प्रभूची क्षमा मागण्यासाठीं श्रीकृष्णाजवळ जाऊं लागला, तों त्याला सर्व गोपाळ श्रीकृष्णाप्रमाणें दिसू

लागले. तेव्हां तो प्रकार पाहून ब्रह्मदेव मोठया घोटाळ्यांत पडला. कोणत्या कृष्णाला शरण जावें हें त्याला मुळींच समजेना. सर्व चतुर्भुज असून सर्वांच्याच हातांत शंख चक्र गदा पद्म हीं आयुधें होतीं. सर्वांच्या कंबरेला पीतांबर असून सर्व इंद्रनीलाप्रमाणें सतेज होते. प्रत्येकाच्या गळ्यांत वैजयंती माळा असून सर्वांच्या कंठांत कौस्तुभमणि शोभत होता. सर्वांच्या मस्तकावर मुकुट असून प्रत्येकाच्या कानांत मकराकार कुंडलें डुलत होतीं. असे ते अनंत कृष्ण पाहून ब्रह्मदेव अत्यंत विस्मत झाला व अंतःकरणांत परमेश्वराची झालेल्या प्रमादाबद्दल क्षमा मागूं लागला. ब्रह्मदेवाची ती अनुकंपनीय स्थिति पाहून श्रीकृष्णास त्याची दया आली व भगवंतांनीं आपली अनंतरूपें नाहींशी करून ते एकटे गोप समुहांत दिसू लागले. तेव्हां ब्रह्मदेवाला कांहीं धैर्य उत्पन्न झालें, परंतु प्रत्यक्ष कृष्णाजवळ जाऊन त्याची क्षमा मागण्याचें धैर्य होईना. तेव्हां तेथें नारद आला, व नारदानें ब्रह्मदेवासाठीं श्रीकृष्णाजवळ क्षमा मागितली. मग श्रीकृष्ण संतोषित होऊन म्हणाले, " नारदा! ब्रह्मदेवाला वृद्धपणामुळें आतां थोडी थोडी भ्रांति पडूं लागली आहे असें वाटतें, त्याला तुझ्यासारख्या योग्याची सुसंगति आहे म्हणून ही लवकरच सुबुद्धि झाली. " मग ब्रह्मदेव अत्यंत अनुताप दर्शवून भगवंताला म्हणाला, " हे अनादि परब्रह्म पुरुषा! मीं खद्योतानें तुला सूर्याला आपला पराक्रम दाखविण्याचा प्रयत्न करून चांगला फजित मात्र पावलों. हे निराकार निर्गुणा! आज तुझ्या सगूण स्वरूपाचीही मला चांगली ओळख पडली. तूं हें असें सगूण स्वरूप धारण न करितास तर या अनंत पतितांचा उद्धार तरी कसा झाला असता? तूं जर असे अवतार धारण न करितास तर या भूमीचा भार तरी कोणी हलका केला असता? हे करुणानिधे! तूं दुष्टांच्या संहारासाठीं आणि साधूंच्या संरक्षणासाठीं सदैव तयार आहेस. तुझे अवतार किती आहेत हें जाणावयाला कोणीही समर्थ नाहीं. तूं परब्रह्म ओंकार व नामत्रयाचें जीवित असा आहेस. हे भगवंता! जो मी केवळ तुझ्या कृपाबळानें हें एवढें विश्व निर्माण करितों त्या तुला मी पामर जिंकावयास पूर्णपणें असमर्थ आहे. मला अपराधाची क्षमा कर. तुझी अतर्क्य शक्ति, विलक्षण लीलालाघव व अभाधित सत्ता, आज मला चांगली कळून आली. याप्रमाणें ब्रह्मदेवानें श्रीकृष्णाची अनन्य भावानें प्रार्थना करून भगवंताचे चरणावर मस्तक ठेविलें. नंतर कृष्णानें त्याच्या मस्तकावर अभयकर ठेवून त्याला उठविलें व सत्यलोकीं जाण्यास परवानगी दिली. मग ब्रह्मदेवानें कृष्णाचे स्वाधीन पूर्वीच्या गायी, वांसरें व गोपाळ केले व तेथून निघून गेला. नंतर श्रीकृष्णानें आपल्या अंशापासून उत्पन्न केलेलीं वांसरें, गायी व गोपाळ नाहींसे केले, व ब्रह्मदेवांकडून आलेल्या गोपाळांना गायीगुरांसह आपणाबरोबर घेऊन तो गोकुळांत गेला. ते गोपाळ घरीं गेल्याबरोबर आपल्या आईबापांनां सांगूं लागले कीं,

आज आह्मीं खेळत असतांना, ही एक डोंगरांतील दरी आहे असें समजून अघासुर नांवाच्या अजगराच्या पोटांत गेलों होतों, परंतु कृष्णानें त्या राक्षसाचा नाश करून आह्मांला वांचविलें; नाहींतर आज आह्मीं सर्वजण मेलों असतों. नंतर तेथें एक चार तोंडांचा ब्राह्मण आला व तो आह्मां सर्वांनां व गायींनां आपल्या गांवाला घेऊन गेला. त्या गांवचे सर्वच लोक अमृत पिऊन राहतात, वगैरे हकीकत ते गोपाळ सांगू लागले. ती हकीकत ऐकून गवळ्यांनां आपलीं मुलें वेडीं झालीं आहेत असें वाटूं लागलें, परंतु श्रीकृष्णानें तो सर्वांचा गैरसमज लवकरच दूर केला."

---

## अध्याय ४ था.

### धेनुकासुर वध.

एके दिवशीं श्रीकृष्ण, बलराम व गोपाळ वृंदावनांत जाऊन एका वट-वृक्षाखालीं बसले; चालतांना बलरामाचे पाय दुखूं लागले ह्मणून श्रीकृष्ण भगवान् त्याचे पाय स्वतः चेपूं लागला. रामअवताराचे वेळीं भगवंतानें रामाचा अवतार घेतला होता, व शेषानें लक्ष्मणाचा अवतार घेतला होता; त्या अवतारांत लक्ष्मणानें रामाची फार सेवा शुश्रुषा केली होती; तेव्हां कृष्णअवतार घेतेवेळीं शेष ह्मणाला; " देवा ! मी या वेळीं वडील बंधु होईन आणि तूं धाकटा बंधु हो. " भगवान् भक्तांचे भक्तीमुळें बांधलेला असल्यामुळें श्रीकृष्ण धाकटा बंधु झाला व शेष वडील बंधु झाला, व वडील या दृष्टीनें श्रीकृष्ण बलरामाला 'दादा कसें काय' ह्मणून मोठेपणा देऊन सल्लामसलत विचारीत असे, पण बलरामाला श्रीकृष्णाची कर्तुमकर्तुं शक्ति माहित असल्यामुळें तो बहुतेक कृष्णाच्याच अनुमतीनें वागत असे. असो; त्या वृक्षाखालीं कांहीं वेळ सर्व गोपाळांनीं विश्रांति घेतल्यावर नवळच ताडाच्या वृक्षांचें एक मोठें वन होतें, त्या वनांत सर्वजण गेले. तो ऋतु ताडांना फळें येण्याचा असल्यामुळें त्यावेळीं त्या ताडांनां खूप ताडगोळे आले होते. गोपाळांनीं तीं मधूर फळें भराभरा झाडावर चढून यथास्थित काढिलीं व मनसोक्त खाल्लीं. याप्रमाणें श्रीकृष्ण व बलराम, गोपाळांमध्यें खेळण्यांत दंग झाले आहेत असें पाहून तेथें धेनुकासुर या नांवाचा दुष्ट राक्षस बरोबर बैलांचा परिवार घेऊन आला, व गोपाळांनां शिंगानीं व लाथांनीं मारूं लागला. तो धेनुकासुराचा दुष्टपणा पाहून बलरामाला फार राग आला व त्यानें त्या धेनुकासुराचे पाय धरिले व त्याचें मस्तक त्याचा प्राण जाईपर्यंत ताडाच्या वृक्षावर हापटून त्याचा नाश केला. इकडे कृष्णानें त्या राक्षसाचा जो बैलाचा परिवार होता, तो गदेनें नाहींसा करून टाकिला.

## २ कालिया–मर्दन.

पुढें कांहीं दिवसांनीं श्रीकृष्ण गोपाळांसहवर्तमान यमुना नदीचे कांठीं खेळत असतां गोपाळांनां फार तहान लागली ह्मणून ते बरोबर सर्व गायी घेऊन यमुनेवर गेले व त्यांनां पाणी पाजून आपणहि यथेच्छ प्यायले; परंतु त्या पाण्यांत भयंकर विप असल्यामुळें तें पाणी पोटांत गेल्याबरोबर क्षणार्धांत सर्व गोपाळ, गायी व वासरें मरून पडलीं. इकडे बराच वेळ झाला तरी गोपाळ येत नाहींत असें पाहून कृष्ण व बलराम तेथून उठले व यमुनेच्या सन्निध आले. तेथें येऊन पाहतात तों सर्व गोपाळ व गायी मरून पडल्या आहेत. तो प्रकार पाहून श्रीकृष्ण अत्यंत विस्मित झाले. एका रात्रींत यमुनेच्या पाण्यांत एवढा मोठा फरक कां झाला, तें त्यांच्या लक्षांत येईना. या यमूना नदीचे आसमंत भागीं या नदीचें पाणी अत्यंत निर्मल असल्यामुळें ऋषि राहतात, असें असून या पाण्यांत एवढा अवगुण एकाएकीं कां निर्माण झाला? याप्रमाणें श्रीकृष्णानें त्या गोष्टीचा बराच वेळ विचार केला; नंतर त्यानें यमुनेचें पाणी घेतलें व तें अभिमंत्रून सर्व गोपाळ व गायींवर शिंपडलें, तेव्हां जसा झोंपेंतून मनुष्य जागा होतो त्याप्रमाणें सर्व गायी व गोपाळ जागे झाले. मग पुन्हां गोपाळ, कृष्ण व बलराम चेंडूफळी खेळूं लागले. इतक्यांत खेळतां खेळतां चेंडू यमूनेंत जाऊन पडला, तेव्हां श्रीकृष्ण एका कळंब वृक्षाच्या फांदीवर चढला व तेथून त्यानें यमुनेंत उडी टाकली. तो चेंडू पाण्यांत पडल्यावर सहज भिजला व पाण्यांत बुडाला; तेव्हां कृष्णानें चेंडू शोधण्यासाठीं पाण्यांत बुडी मारली. त्या यमुनेमध्यें कालिया नांवाचा एक प्रचंड सर्प येऊन राहिला होता. त्याला एकशेंएक मुखें होतीं. तो पूर्वीं रमणक नांवाच्या द्वीपांत रहात होता, पण गरुडाच्या भीतीनें त्याला तेथें राहणें कठीण जाऊं लागलें. म्हणून तो यमुनेंत येऊन राहिला. या ठिकाणीं यमुनेंत गरुडाची भीति नव्हती. कारण, एके वेळीं यमुनेंतील जलचरांनां गरुड फारच त्रास देऊं लागला तेव्हां त्यांनीं सौभरीची प्रार्थना केली किं, "हे सौभरी! तूं परम पवित्र असून आह्मीं तुझ्या परिवारांतले आहोंत, तो गरुडपक्षी येथें नित्य येऊन आमचा संहार करितो, तर आमचें संरक्षण होईल अशी कांहीं तजवीज कर." तेव्हां सौभरीनें त्यांनां यमुनेमध्यें एक योजनांत राहावयाला सांगितलें व जर या भागांत गरुड त्रास देण्यास येईल तर तो उदकस्पर्श झाल्याबरोबर नाश पावेल, असा शाप दिला. कालिया सर्पालाहि गरुडाचा फार त्रास होत असे. त्याला जेव्हां यमुनेंतील एक योजनभाग निर्भय झाल्याची गोष्ट कळली, तेव्हां तोही रमणकद्वीप सोडून आपल्या परिवारासह तेथून निघाला व यमुनेंत येऊन राहिला. त्या भयंकर सर्पाचें विष यमुनेंत पसरल्यामुळें तिचें पाणी स्पर्श करणेंही भयावह झालें होतें. अशा त्या पाण्यांत श्रीकृष्णानें निर्भयपणें उडी टाकिली व पाण्यांत बुडी मारून चेंडू शोधूं लागला. इतक्यांत श्रीकृष्णावर कालिया सर्पाच्या स्त्रियांची दृष्टि गेली. त्यांनीं ती सुकुमार सर्वांग-

सुंदर अशी कृष्णाची मूर्ति पाहिल्यावर त्यांना त्याची फार दया आली व त्या त्याच्याजवळ येऊन ह्मणाल्या; "मुला! तुझी ही सुरूपसंपन्नता पाहून आह्मांला फार दया येते, तर त्वरा करून तूं पाण्यांतून बाहेर निघून जा. जर आमच्या पतीला येथें तूं आल्याचें कळेल तर तो तुझा तेव्हांच नाश करून टाकील." कृष्णानें त्यांच्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं. त्यानें पाण्यांत चेंडू शोधण्याचें काम तसेंच चालविलें. तेव्हां त्या कालियाचे संरक्षक जे अन्य सर्प होते ते कृष्णावर धांवले व त्यांनीं कृष्णाला वेढून टाकिलें, परंतु कृष्णानें त्या सर्व सर्पांना क्षणार्धांत पायाखालीं तुडवून टाकिलें व तो तसाच समोर चालला; तेव्हां कालीया कृष्णावर फूत्कार टाकीत धांवून आला. तेव्हां श्रीकृष्ण त्याच्या मस्तकावर चढला, व एखाद्या जलद गमन करणाऱ्या नौकेप्रमाणें त्याला इकडून तिकडे, तिकडून इकडे, फिरवूं लागला. ती त्या कालियाची विटंबना पाहून त्याच्या स्त्रिया कृष्णाजवळ आल्या व त्याला ह्मणाल्या; "हे देवाधिदेवा अनंता! तुझी शक्ति अतर्क्य आहे, आह्मीं तुझ्या धर्माच्या बहिणी आहोंत, तर आमच्यावर कृपा कर व आह्मांला चुडेदान दे. हे प्रभो! आमचे अपराध पोटांत घाल. हे करुणाकरा! तूं शरणागताचें संरक्षण करतोस अशी तुझी कीर्ति आहे. आह्मीं तुला शरण आल्या आहोंत. आम्हांला एवढी सौभाग्यभिक्षा दे." तेव्हां श्रीकृष्णाला त्या स्त्रियांची दया आली, व तो त्या कालियाला म्हणाला; "हे कालिया! तूं ब्रह्मदेवाचा पणतू असल्यामुळें तुझा वध मला करितां येत नाहीं; परंतु तूं या पाण्यांत आपलें विष कालवून मोठा अपराध केला आहेस, माझे सर्व गोपाळ व गायी हें पाणी पिऊन मरून पडले होते; आणि त्यांच्याप्रमाणेंच पुष्कळ लोक मेले असतील, तर तूं हें विष नाहींसें करून आतांच्या आतां येथून निघून जा." तेव्हां तो कालिया म्हणाला; "अनंता! गरुड मला अत्यंत त्रास देतो, त्याच्या भितीनें मी येथें येऊन राहिलों होतों; आतां मी येथून दुसरीकडे गेल्यास तो पुन्हां मला त्रास देऊं लागेल." श्रीकृष्ण म्हणाले; "कालिया! माझ्या पायाचें चिन्ह तुझ्या मस्तकावर आहे, तें चिन्ह पाहिल्यावर तो तुला मुळींच त्रास देणार नाहीं." या प्रमाणें इकडे पाण्यांत श्रीकृष्ण व कालिया यांचा संवाद चालला आहे, तों यमुनेच्या बाहेर श्रीकृष्ण पाण्यांत बुडाला अशी बातमी गोकुळांत पसरली आणि गोकुळांतील सर्व लोक यमुनेच्या कांठीं येऊन दुःख करीत बसले होते. धीवर ठिकठिकाणीं जाळीं टाकून कृष्णाचा शोध करीत होते. यमुनेचीं दोन्हीं तीरें शोधलीं, परंतु श्रीकृष्णाचा शोध लागेना, तेव्हां सर्व आबाल-वृद्ध शोकाकुल होऊन अश्रु गाळूं लागले! कृष्णाबरोबर खेळणारे गोपाळ तर धाय मोकलून रडूं लागले. नंद व यशोदा यांच्या शोकास तर पारावारच राहिला नाहीं. नंद तर ती दुःखकारकवार्ता कानावर पडल्याबरोबर गतधैर्य होऊन दुःखानें वेडा झाला, आणि यशोदेच्या शोकावस्थेला तर सीमाच उरली

नव्हती. एखादा वृक्ष विजेच्या आघातानें जसा मुळासकट उन्मळून पडतो त्या प्रमाणें कृष्णाविषयीं तें दुःखकारक वर्तमान ऐकून यशोदा भूमीवर पडली आणि त्या दुःखभरांत तिनें आपलें मस्तक बडवून ती आपल्या प्राक्तनाला दोष देऊं लागली. ती म्हणाली; "मी अशी हतभागी म्हणून असें पुत्ररत्न हारवलें. ज्यानीं जन्मांतरीं अनेक पातकें केलीं असतील त्याला पुत्रशोक होतो असें शास्त्रकारांनीं सांगितलें आहे, त्यावरून मला असें वाटतें किं, मी पूर्वजन्मीं अनंत पातकें केलीं असावींत. जे ब्रह्मद्वेष करितात त्याचा वंश वाढत नाहीं असें म्हणतात. ज्यांनीं गायी, सोनें, रत्नें, यांची चोरी केली असेल; ज्यांनीं गुरूची निंदा केली असेल, जी स्त्री पतीचा द्वेष करिते, जो पंक्तिप्रपंच करितो; जो विष्णु व शंकर यांत भेद मानितो; त्याला पुत्रशोक होतो असें ह्मणतात. यावरून माझ्या हातून हीं सर्व पातकें घडलीं असावींत असें वाटतें. अशी मी पापीण या जगांत जिवंत राहावयाला मुळींच योग्य नाहीं. मला आतां संसार नको, घर नको, कांहीं नको. ज्या यमुनेंत बुडून माझा कृष्ण नाहींसा झाला, त्याच यमुनेंत मीहि उडी टाकून, कृष्णावांचून शून्य दिसणाऱ्या या जगाचा निरोप घेतें. असें ह्मणून यशोदा आत्महत्या करण्याला प्रवृत्त झाली. गोकुळांतील लोक तिची पुष्कळ समजूत करूं लागले पण ती मुळींच ऐकेना. याप्रमाणें सर्व आबाल-वृद्ध दारुण शोकाग्नीनें करपून गेले होते, परंतु बलराम आपला निश्चित मनानें बसून तो सर्व प्रकार पहात होता. शेवटीं जेव्हां यशोदा आत्महत्या करण्यास प्रवृत्त झाली, तेव्हां बलरामानें आपल्या मानसिक शक्तीनें कृष्णाला यमुनेच्या तिरावरील एकंदर प्रकार कळवून त्याला लवकर बाहेर येण्याची सूचना केली. तेव्हां श्रीकृष्ण भगवान् त्या कालिया सर्पावर बसून पाण्यांतून वर आले. श्रीकृष्णाला पाहिल्याबरोबर सर्वांचीं मुखें आनंदयुक्त झालीं व त्यांच्या नेत्रांतून आनंदाश्रु वाहूं लागले. नंद व यशोदा या उभयतांनीं धांवत जाऊन कृष्णाला दृढ आलिंगन दिलें, व ईश्वरानें या संकटांतून कृष्णाची सुटका केली ह्मणून तिनें त्याची स्तुति केली. नंतर कृष्णानें त्या कालिया सर्पाला समुद्रांत पाठवून दिलें व पवित्रसलीला यमुनेला विषरहित केलें.

## ३. श्रीकृष्णाचें दावाग्निभक्षण.

श्रीकृष्णाची प्राप्ति झाल्यावर नंद, यशोदा व गोपाळ वगैरे तेथून निघाले व गोकुळांत येऊं लागले. कृष्णासाठीं सबंध एक दिवसभर लोक उपाशीं बसल्यामुळें त्यांनां क्षुधा लागली होती. परंतु रात्र बरीच झाली असल्यामुळें सर्वांनीं वाटेंत मुक्काम केला. सर्वजण झोंपेंत असतां तेथें एकाएकीं दावाग्नि पेटला व त्यानें सर्व जंगल व्यापून टाकिलें. त्या विलक्षण उष्णतेनें सर्व लोक खडबडून जागे झाले व त्या दावाग्नींतून बाहेर पडण्यासाठीं मार्ग शोधूं लागले; पण चारही दिशांनां अग्नि पसरलेला असल्यामुळें त्यांचा निरुपाय झाला. कोणालाच कांहीं युक्ति

सुचेना, तेव्हां आतां आपण या अग्नींत सांपडून जळून खाक होणार, असें सर्वांना कळून चुकलें व त्या भयंकर कल्पनेमुळें सर्व गवळी भगवंताला शरण गेले. तेव्हां कृष्णाला सर्वांची दया आली व तो त्यांनां ह्मणाला, तुह्मीं सर्व-जण नेत्र झांका ह्मणजे मी या अग्नीचें निवारण करितों. कृष्णाच्या सांगण्याप्रमाणें सर्वांनीं डोळे मिटल्यावर श्रीकृष्णानें तो सर्व अग्नि भक्षण केला; व सर्वांनां त्या संकटांतून मुक्त केलें. नंतर सूर्योदय झाल्यावर सर्व गोपाळ गोकुळांत गेले.

## ४. प्रलंबासुरवध.

या गोष्टीस कांहीं दिवस झाल्यावर श्रीकृष्ण गोपाळांसह भांडीरवडाच्या झाडा-खालीं कुरघोडी या नावाचा खेळ खेळत असतां, तेथें प्रलंब या नावाचा एक राक्षस गोपाळाचा वेष धरून आला. त्या कपट अवस्थेंत तो कोणालाहि ओळखूं आला नाहीं. पुढें खेळतांना प्रलंबावर डाव आला, तेव्हां बलराम त्या राक्षसावर बसला, ती संधि साधून तो जेव्हां राक्षस बलरामाला घेऊन दूर जाण्याचा विचार करूं लागला, परंतु तें त्याचें कपट बलरामानें ओळखून त्याच्यावर इतका भार घातला कीं, त्या भारानें तो राक्षस एकदम भूमीवर पडला व मृत झाला. नंतर कांहीं दिवसांनीं श्रीकृष्ण आपल्या खेळगड्यांसह रानांत गुरें चारीत असतां संध्याकाळ झाली ह्मणून सर्व गोपाळांनां व गुरांनां गोवर्धन पर्वतावर घेऊन गेला व तेथेंच रात्रभर मुक्काम केला. तेव्हां तेथें संवर्त या नावाचा राक्षस आला. त्या राक्षसाला अग्निशक्ति अवगत होती. त्यानें सर्व गोपाळ निद्रावश झाले आहेत असें जाणून त्या पर्वतावरील गवताला आग लावून दिली. तो वणवा जेव्हां चोहींकडे भडकला, तेव्हां सर्व गोपाळ जागे झाले व तो भयंकर प्रकार पाहून रडूं लागले, गायी मोठ्यानें हंबरडा फोडूं लागल्या. मग श्रीकृष्णानें आपलें मुख विशाळ करून उघडलें व तो सर्व अग्नि गिळून टाकिला. नंतर तेथून सर्व गोपाळ, गायी गुरांसह निघाले व आनंदानें गोकुळांत आले.

## ५ गोपीवस्त्रहरण.

पुढें एके दिवशीं गोकुळांतील कांहीं तरुण मुली गौरीच्या पूजेसाठीं यमु-नेच्याकांठीं आल्या होत्या. त्यांनीं गौरीची यथासांग पूजा केल्यावर, यमुनेचें तें निर्मळ पाणी पाहून त्यांनां जलक्रीडा करण्याची इच्छा झाली. तेव्हां सर्व मुलींनीं इकडे तिकडे कोणीं नाहीं असें पाहून एका कदंब वृक्षाचे खालीं आपलीं नेसावयाचीं वस्त्रें व अंगांतील चोळ्या काढून ठेविल्या व त्या जलक्रीडा करूं लागल्या. त्या जलक्रीडा करण्याच्या नादांत गुंग झाल्या असतां श्रीकृष्णभगवान् तेथें आला व तीं सर्व वस्त्रें घेऊन तो त्या कदंब वृक्षावर चढून बसला. इकडे बराच वेळ जलक्रीडा केल्यावर त्या स्त्रियांनां घरीं जाण्याची आठवण झाली व घाईघाईनें पाण्यांतून निघून वृक्षाखालीं आपलीं वस्त्रें नेसण्या-साठीं आल्या; पण तेथें पाहतात तों एकही वस्त्र किंवा कंचुकी नाहीं. तो

विलक्षण प्रकार पाहून त्या स्त्रिया आश्चर्यचकित झाल्या व त्यांनां आपल्या अवस्थेची अत्यंत लज्जा उत्पन्न होऊन मोठी भीति वाटूं लागली. मग लज्जासंरक्षणासाठीं उरस्थल पाण्यांत बुडून जाईल इतक्या खोल पाण्यांत जाऊन उभ्या राहिल्या. वस्त्रें कशीं व केव्हां नाहींशीं झाली याबद्दल त्यांनां कांहींच अनुमान करितां येईना. आतूर दृष्टीनें त्या चोहींकडे पाहूं लागल्या तेव्हां कदंब वृक्षावर वस्त्रें फडफड उडत असलेलीं त्यांनां दिसलीं व जवळच एका शाखेवर श्रीकृष्ण भगवान् बसले आहेत असें त्यांनीं पाहिलें. मग आपलीं वस्त्रें कदंबवृक्षावर कोणीं नेऊन टेविलीं हें त्यांच्या लक्षांत तेव्हांच आलें. हा नंदाचा खोडकर मुलगा येथें आपणा सर्वांची नजर चुकवून केव्हां व कसा आला, व त्यानें हीं वस्त्रें झाडावर कशीं नेऊन ठेविलीं, याबद्दल त्यांनां कृष्णाचें फार कौतुक वाटलें; पण ही अशी भलतीच थट्टा केल्याबद्दल त्यांना कृष्णाचा रागहि आला, आणि तो कदाचित् घरीं जाऊन आमच्या पतींजवळ या आमच्या नग्न जलक्रीडेची हकीकत सांगेल किं काय अशी त्यांना भीतीही वाटूं लागली. मग त्या सर्वजणी श्रीकृष्णाला हात जोडून ह्मणाल्या; ‘ हे कृष्णा ! आह्मीं परक्यांच्या स्त्रिया असून आह्मांला तूं नग्नावस्थेंत पाहण्यासाटीं येथें मुद्दाम आलास, हें आह्मीं तुझ्या घरीं सांगूं. तूं आमचीं वस्त्रें दे, नाहींतर आह्मीं हें वर्तमान नंदाला कळवूं व त्याच्याकडून तुला शिक्षा करवूं. आपलें वय, नातें वगैरे गोष्टींचा कांहीं विचार न करितां आमची अशी थट्टा करितोस हें चांगलें नव्हे. ’ तें बोलणें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाला; ‘तुह्मीं पाण्याचे बाहेर या ह्मणजे मी तुमचीं वस्त्रें तुह्मांला देतों. तुह्मीं निःशंक मनानें कोणाची लाज मर्यादा न ठेवतां येथें येऊन खुशाल नागव्यानें स्नानें करितां याबद्दल तुम्हांला शिक्षा पाहिजेच.’ हें कृष्णाचें बोलणें ऐकून त्या स्त्रियांनां काय करावें तें समजेना, शेवटीं निरुपाय जाणून त्या दोन्हीं हातांनीं गुह्यभाग झांकून यमुनेंतून बाहेर आल्या व वस्त्रें मागूं लागल्या. परंतु श्रीकृष्ण म्हणाला; “ तुम्हीं या अपराधाबद्दल दोन्हीं हात जोडून सूर्याला नमस्कार करा, म्हणजे तुमचीं वस्त्रें तुम्हांला देतों.” पण तसें करावयाला त्यांना फारच लाज वाटूं लागली, व त्या नमस्कार करण्याचें टाळूं लागल्या. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले; “ देहभाव सोडून सूर्याला नमस्कार करा, म्हणजे तुम्हीं या अपराधापासून खरोखर मुक्त व्हाल. ” शेवटीं नाइलाजास्तव त्या स्त्रियांनीं दोन्हीं हात जोडून सूर्याला नमस्कार केला व अनन्यभावानें क्षमा मागितली. मग श्रीकृष्णानें सर्वांचीं वस्त्रें व अलंकार त्यांचे त्यानां दिलें व श्रीकृष्ण गोपाळांत खेळण्यासाटीं निघून गेला. इकडे त्या स्त्रियाहि कृष्णाच्या त्या चमत्कारिक कृत्याबद्दल कौतुक करीत आपआपल्या घरीं निघून गेल्या.

---

# अध्याय ५ वा.

## १ ऋषिपत्न्यांची कथा.

वैशंपायन ऋषि म्हणाले; " हे जनमेजय राजा! पुढें श्रीकृष्णानें काय काय लीला केल्या तें तुला सांगतों. एके दिवशीं सर्व गोपाळांनीं सकाळीं उठल्याबरोबर आपआपल्या आईजवळून शिदोरी घेतली व ते खेळण्यासाठीं गायींना घेऊन गांवाबाहेर गेले. यमुनेच्या कांठीं जाऊन त्यांनीं गायी वासरांना स्वैर चरण्यासाठीं सोडून दिलें, व त्यांनीं खेळण्यास आरंभ केला. थोडा वेळ खेळल्यावर भूक लागली म्हणून सर्वांनीं आपल्या शिदोऱ्या काढिल्या, त्यांतील भाकरी वगैरे एके ठिकाणीं केल्या व सर्वजण खात बसले. सर्वांनां भूक फार लागली होती त्यांनीं त्या शिदोऱ्यांतून दुपारासाठीं कांहीं न ठेवितां सर्व अन्न त्याच वेळीं खाऊन टाकिलें; व पुन्हां खेळण्यास आरंभ केला. पुढें तिसरा प्रहर झाल्यावर सर्वांनां भूक लागली, तेव्हां ते गोपाळ कृष्णाला ह्मणाले; " कृष्णा! आतां आह्माला फार भूक लागली आहे, सकाळीं आपण सर्व शिदोऱ्या खाऊन टाकल्यामुळें आतां खावयाला तर जवळ कांहीं नाहीं, बरें घरीं शिदोरी मागावयाला जावें तर तुह्मीं असे राक्षसासारखे खाणें खातां तरी किती, असें म्हणून आई शिदोऱ्या ऐवजीं मार मात्र देईल; तेव्हां आतां भूक शमविण्यासाठीं काय करावें तें आह्मांला समजत नाहीं, आणि पोटांत भूक तर फार लागली आहे. तेव्हां कृष्ण म्हणाला. "तुह्मीं आतां ऋषींच्या आश्रमांत जा व त्यांना सांगा कीं, श्रीकृष्ण व बलराम गोपाळांसह गायी चारण्यासाठीं या अरण्यांत आले आहेत, त्यांनां भूक फार लागल्यामुळें ते तुमच्याजवळ खाण्यासाठीं अन्न मागत आहेत, ह्मणजे ते तुह्माला अन्न देतील; मग तें अन्न आणल्यावर आपण सर्व भोजन करूं." याप्रमाणें कृष्णानें सांगितल्यावर सर्व गोपाळ ऋषींच्या आश्रमांत गेले व ते ऋषींनां कृष्णाचा निरोप सांगून त्यांच्याजवळ अन्न मागूं लागले. तेव्हां ते ऋषि त्यांना झिडकारून ह्मणाले; "चला जा! अद्यापि आमचें देवार्चन चाललें आहे, तें पुरें झाल्या नंतर आह्मीं देवांनां नैवेद्य समर्पण करूं, व नंतर तुह्मांला अन्न मिळेल, त्याच्या अगोदर कांहीं मिळणार नाहीं." याप्रमाणें ऋषींनीं सांगितल्यावर सर्व गोपाळ विन्मुख होऊन कृष्णाकडे परत आले व झालेली कची हकीकत त्यांनीं कृष्णाला सांगितली. तेव्हां कृष्ण ह्मणाला; " तुह्मीं आतां ऋषींच्या स्त्रियांकडे जाऊन अन्न मागा ह्मणजे त्या तुह्मांला अन्न देतील." त्याप्रमाणें फिरून गोपाळ निघाले, व ऋषींच्या स्त्रियांकडे येऊन अन्न मागूं लागले. तो कृष्णाचा निरोप ऐकून त्या स्त्रियांनां फार संतोष झाला. त्या ह्मणाल्या; " आमचें थोर भाग्य, ह्मणून श्रीकृष्णानें आज आह्मांला अन्न घेऊन

बोलाविलें आहे. त्या भगवंताचें आज आह्मांला दर्शन तरी होईल." या प्रमाणें त्या ऋषींच्या स्त्रियांना फार आनंद झाला व त्या आपल्या पतीकडे जाऊन त्यांच्याजवळ कृष्णाकडे अन्न नेण्याची परवानगी मागूं लागल्या. तेव्हां ते ऋषि रागावून ह्मणाले; "देवतांची तृप्ति झाल्यावांचून कोणाला अन्न देणें हें अनुचित होय, आणि हें शास्त्र तुह्मांला माहीत असतांना हें भलतेंच विचारण्यासाठीं तुह्मीं आलांत, याबद्दल तुमच्या मनाला कांहींच शंका वाटत नाहीं" ऋषींनीं असें सांगितल्यावर त्या स्त्रिया ह्मणाल्या; "अहो! तो प्रत्यक्ष श्रीकृष्ण भगवान् देवाधिदेव या पृथ्वीवर अज्ञजनांच्या उद्धारासाठीं अवतीर्ण झाला आहे आणि तुह्मीं ही स्नानसंध्या आणि ही पाषाणाची पूजा करितां कशाला? तो परब्रह्म निराकार परमेश्वर साकार स्वरूपानें पतितांनां पावन करण्यासाठीं आला आहे, पण या अविद्येमुळें त्याची ओळख तुह्मांला होत नाहीं. कृष्णानें जन्म घेतल्याबरोबर वसुदेवाला आपल्या चतुर्भुज मूर्तीचें दर्शन दिलें, तुरुंगाचें दरवाजे उघडले, यमुना दुभंग झाली; तें काय कृष्णाच्या आंगीं ईश्वरी शक्ति असल्यावांचून झालें? पांच दिवसांच्या कृष्णानें पूतनेचा नाश केला, अनेक राक्षस लहानपणीं मारले, एकदां नंद पूजेला बसला असतां कृष्ण तेथें आला व तेथील सर्व साहित्य त्यानें गिळून टाकलें, व देवांच्या आसनावर आपण बसला, तेव्हां यशोदा रागावली व त्याला मारण्यासाठीं आली, पण पाहतें तों आसनावर कृष्णाचीच शंख, चक्र, गदा व पद्म अशीं चार भूषणें धारण केलेली चतुर्भुज मूर्ति आहे. याप्रमाणें त्या कृष्णानें जे चमत्कार केले आहेत, ते वर्णन करितांना सरस्वतीचीही मति कुंठित होईल, मग आमचा पाड काय? तो साक्षात् जगदीश्वर आपण होऊन आमचे जवळ अन्न मागत आहे; यापेक्षां आमचें थोर भाग्य तें कोणतें?" याप्रमाणें त्या स्त्रियांनीं ऋषींनां सांगितल्यावर ऋषींनीं स्त्रियांनां अन्न घेऊन जाण्याची परवानगी दिली. परंतु त्यांच्यांत एक ऋषि फार चमत्कारिक स्वभावाचा होता. कृष्ण हा साधारण मनुष्याप्रमाणेंच असून त्याचें या लोकांनीं निष्कारण थोतांड माजविलें आहे असा त्याचा समज होता. त्याची स्त्री जेव्हां कृष्णाकडे अन्न घेऊन निघाली, तेव्हां तो तिला कठोर शब्दांनीं पुष्कळ बोलला व इतर स्त्रियांतून तिला ओढून काढून एका झाडाला बांधलें व आपण आश्रमांत आपलें कर्म करण्याकरितां निघून गेला. इकडे बाकीच्या स्त्रिया आपल्या सोबतिणीबद्दल खेद करून अन्न घेऊन निघाल्या, व श्रीकृष्णाकडे आल्या. श्रीकृष्णाची व बलरामाची ती प्रसन्न मुद्रा पाहून सर्व स्त्रियांना फार आनंद झाला व त्यांनीं आणिलेली अन्नसामुग्री कृष्णापुढें ठेवून कृष्णाला नमस्कार केला. त्या स्त्रिया तेथें पाहतात तों ज्या स्त्रियेला ऋषीनें झाडाला बांधून ठेविलें होतें ती स्त्री सर्वांपुढें येऊन कृष्णाजवळ उभी आहे. तो प्रकार पाहून त्या सर्व स्त्रियांनां

मोठें आश्चर्य वाटलें. मग त्या सर्व स्त्रियांनीं परब्रह्मस्वरूप श्रीकृष्णाला आसनावर बसविलें, त्याचें चरण धुतले, त्याच्या अंगाला चंदनाची उटी लाविली, आणि नंतर ताटें मांडून त्यांत कृष्णासाठीं मुद्दाम तयार केलेलें अन्न वाढून सर्व गोपाळांसह कृष्णाला जेवावयाला बसविलें. सर्वांचीं पोटभर जेवणें झाल्यावर त्या स्त्रियांनीं सर्वांनां तांबूल दिलें. तांबूल भक्षण केल्यावर कृष्णानें सर्व स्त्रियांनां आपआपल्या आश्रमांत जाण्याची परवानगी दिली. तेव्हां त्या स्त्रिया म्हणाल्या; "हे श्रीकृष्णा आह्मीं मुद्दाम तुझ्या प्राप्तीसाठीं घर सोडून येथें आलों. आतां तूं आह्मांला आपल्या चरणाजवळून दूर करूं नकोस. तूं शरणांगतांचें संरक्षण करितोस मग आह्मीं शरण आलों असतां आमचाच कां अव्हेर करितोस ? हा भवसागर तरून जाण्यासाठीं तूंच एक नौकारूप आहेस, तेव्हां तुला सोडून घरीं जाण्यांत अर्थ तो काय ? तूं हीन जनांचा उद्धार करितोस, हीं भवबंधनें तोडण्यास तूंच एक समर्थ आहेस. कित्येक लोक सहस्र जन्म तप करितात. कित्येक लोक अनंत वर्षे योगसाधन, पंचाग्नि साधन, अनुष्ठान, सगुण उपासना, निर्गुण उपासना, मौन व्रत, अहर्निश ध्यान करितात; कित्येकांनीं तुझ्या प्राप्तीसाठीं प्रपंच सोडला, राज्याचा त्याग केला, परमप्रिय अशा स्त्री-पुत्रांचा त्याग केला; तथापि त्यांनां सुद्धां तुझी प्राप्ति होत नाहीं, तो तूं आह्मांला आनायासें प्रत्यक्ष भेटल्यावर तुला सोडून जाणें आतां दुरापास्त होय. हे हृषीकेशा ! तूं आतां आह्मांला आपल्या पायाजवळून दूर करूं नकोस." ती त्या स्त्रियांची करुणावाणी ऐकून श्रीकृष्ण ह्मणाले; "स्त्रियांनो ! तुह्मीं ऋषींबरोबर विवाहसंबंधानें बद्ध झालेल्या असल्यामुळें त्यांच्यापासून तुह्मांला दूर करणें हें इहलोकच्या दृष्टीनें मोठें पाप होय. एवढ्यासाठीं तुम्हीं आपल्या आश्रमांत राहून पतिसेवा करा, व माझें चिंतन करीत जा, माझे भक्त मजपासून कितीही दूर असले तरी मी अहर्निश यांच्या जवळच असतों." श्रीकृष्णानें असें सांगितल्यावर सर्व स्त्रियांनीं कृष्णाला साष्टांग नमस्कार केला व त्या अत्यंत कष्टी मनानें कृष्णा जवळून परतल्या. श्रीकृष्णानें आपणास जवळ ठेवून न घेतां परत लाविलें, याबद्दल प्रत्येकीला फार वाईट वाटलें व त्या अश्रु गाळित गाळित आपल्या आश्रमांत येऊन पोहोंचल्या. तेव्हां ज्या ऋषीनें आपल्या स्त्रियेला झाडाला बांधून ठेविलें होतें तो त्या स्त्रियांकडे आला व त्यांचा उपहास करून ह्मणाला; "तुह्मीं सर्वजणीं त्या गवळ्याच्या मुलाचा सत्कार करण्यासाठीं गेलां होतां, पण मला वाटतें त्यानें तुह्मांला त्याचा मोबदला कांहींच दिला नाहीं, आणि ह्मणूनच मला वाटतें तुमचे चेहरे खिन्न दिसत आहेत. अहो ! तो गवळ्याचा मुलगा, मनुष्यासारखा मनुष्य, तो तुह्मांला काय देणार ?" हें ऐकून त्या ऋषींच्या स्त्रिया ह्मणाल्या; "अहो ! तो जगदीश्वर सर्व कांहीं देण्यास समर्थ आहे. आमची तितकी भक्ति नाहीं ह्मणून त्यानें आह्मांला

कांहीं दिलें नाहीं. तुमच्या स्त्रियेचें भाग्य थोर, तिची भक्ति मोठी ह्मणून कृष्णानें तिला आपल्याजवळ ठेवून घेतलें आणि आह्मां सर्वांनां जाण्यास निरोप दिला. त्या स्त्रियांचें तें बोलणें ऐकून त्या ऋषीला फार आश्चर्य वाटलें. तो ह्मणाला; "तुह्मीं कांहीं तरी खोटें सांगतां, मी तर माझ्या स्त्रियेला झाडाला बांधून ठेविलें आहे." तेव्हां त्या स्त्रिया ह्मणाल्या; "आह्मांला खोटें सांगून काय करावयाचें आहे, आह्मीं तेथें प्रत्यक्ष जें पाहिलें तेंच आपणास सांगितलें." हें ऐकून तो ऋषी ज्या झाडाला बायकोस बांधली होती त्या झाडा जवळ जाऊन पाहूं लागला तों बायको प्रेतवत् झालेली दिसली. त्यानें तिला झाडाची सोडली व सर्व ऋषींनां बोलावून तिची स्थिति दाखविली. तेव्हां सर्व ऋषींनीं—तुझी बायको मेली—असें सांगितलें. आपल्या स्त्रियेची ती स्थिति पाहून त्याला कृष्णाची निंदा केल्याबद्दल फार पश्चात्ताप होऊं लागला. या सर्व स्त्रियांनीं आपल्या स्त्रियेला कृष्णाकडे जातांनां पाहिलें, तेव्हां तिचा लिंगदेह तेथें गेला असून येथें फक्त शरीर आहे, असें त्यानें जाणलें, व तो आपणाबरोबर सर्व ऋषींनां घेऊन कृष्णाकडे गेला व साष्टांग प्रणिपात करून ह्मणाला; "हे दयानिधे ! आह्मीं अत्यंत पापी असून शास्त्राच्या अभिमानामुळें अंध झालेले आहोंत. तूं निर्विकल्प निराकार असून वेळोवेळीं आपल्या भक्तांसाठीं साकार स्वरूप धारण करित आहेस. तुला जाणावयाला वेदांचाहि अधिकार नाहीं. मग आह्मीं मूढ तुला कोठून ओळखणार! हे पुरुषोत्तमा! हे मेघश्यामा! आह्मीं अनंत अपराधी असून ते अपराध पोटांत घालणारा तुझ्यावांचून कोणीही कृपावंत नाहीं. हे कृपानिधे ! आमच्या अपराधाची आह्मांला क्षमा कर, व आमचें संरक्षण कर." त्या ऋषींची ती प्रार्थना ऐकून श्रीकृष्ण म्हणाला, "अहो द्विजोत्तम! आह्मीं गौळी असून आपणा द्विजांचे आज्ञाधारक दास आहोंत. मला भगवान् भगवान् असें ह्मणून निष्कारण माझें नांव लोकांत करूं नका. आपली काय आज्ञा असेल ती मला सांगा, मी आपलें कार्य करण्यास तयार आहें." तेव्हां तो ऋषि ह्मणाला; "हे प्रभो नारायणा! माझी स्त्री मृत्यु पावली आहे, ती जिवंत होऊन माझी मला मिळावी, एवढीच आपणास माझी विनंति आहे." ती ब्राह्मणाची विनंति ऐकून श्रीकृष्ण ह्मणाले; "ऋषिमहाराज! आपण आपले आश्रमांत जा ह्मणजे आपली स्त्री आश्रमांत कामकाज करीत आहे असें आपणास दिसून येईल." त्याप्रमाणें तो ऋषि आश्रमांत येऊन पाहतो, तों आपली स्त्री रोजच्याप्रमाणें कामकाज करीत आहे. तें पाहून त्या ऋषीला फार आनंद झाला. हे जनमेजय राजा! त्या ऋषीला श्रीकृष्ण भगवान् प्रसन्न झाले होते, तेव्हां त्यानें असें मागणें मागावयाला पाहिजे होतें किं, ज्यायोगानें जन्ममृत्यूची कटकट चुकून मोक्षाची प्राप्ति होईल. परंतु तितकें ज्ञान नसल्यामुळें किंवा प्राक्तनांत तो योग नसल्यामुळें, बिचाऱ्यानें स्त्री परत मागितली. हे जनमेजया! एकदां

असेंच एका गृहस्थाला कल्पवृक्षाचें दर्शन झालें होतें, परंतु प्राक्तन बरोबर नसल्यामुळें त्याला त्यापासून आपला खरा फायदा करून घेतां आला नाहीं. तो गृहस्थ रानांत जूं आणण्यासाठीं गेला होता. वाटेंत उन्हानें फार श्रांत झाला म्हणून एका वृक्षाखालीं निजला, व तेथें जुंवाची चिंता करूं लागला. इतक्यांत तो वृक्ष कल्पवृक्ष असल्यामुळें त्या वृक्षाच्या एका शाखेंतून चटकन एक जूं पडलें. तें जूं पाहून त्या गृहस्थाला हा कल्पवृक्ष आहे असें कळून चुकलें, पण कांहीं अमूल्य असें न मागतां फिरून जुंआची अडचण पडूं नये म्हणून आणखी एक जूं मागितलें, व तें जूं घेऊन तो दरिद्री मनुष्य त्या कल्पवृक्षाजवळून निष्कांचन अवस्थेंत आपल्या घरीं निघून गेला, त्याप्रमाणेंच प्रत्यक्ष श्रीकृष्ण भगवंताची भेट झाली असतां मोक्षाची प्राप्ती करून घेण्याचे ऐवजीं सर्वशक्तीमान परमात्म्याजवळ फक्त स्त्री मागितली व तो ऋषि परत आला !

## २ गोवर्धनोद्धरण.

हे जनमेजय राजा ! तो नंद प्रतिवर्षी इंद्रानें यथासमयीं यथायोग्य अशी वृष्टि करावी ह्मणून त्याच्या प्रसन्नतेसाटीं होमहवन करीत असे. त्याप्रमाणें एके वर्षी नंद गवळ्यांच्या घरोघर हिंडून दही, दूध, तूप वगैरे होमाची सामुग्री गोळा करून होमाची तयारी करूं लागला. तेव्हां कृष्ण नंदाला ह्मणाला; “ बाबा ! ही सामग्री गोळा करून तुह्मीं काय करणार ?” कृष्णाचा तो प्रश्न ऐकून नंद म्हणाला; “ कृष्णा ! या सामुग्रीचा उपयोग होमासाठीं करावयाचा आहे. हा होम केला ह्मणजे इंद्र प्रसन्न होतो, व तो मग पृथ्वीवर यथाकाळीं पर्जन्यवृष्टि करून धनधान्याची समृद्धि करितो. इंद्र हा देवांचा राजा आहे, तेव्हां तो मनुष्यांनां सर्व देवांपेक्षांहि अधिक पूज्य आहे. त्याची आराधना ही अवश्य केलीच पाहिजे. त्यावांचून पृथ्वीवरील पर्जन्यादि व्यवहार सुरळीत चालणार नाहींत.” हें नंदाचें बोलणें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाला; “ पर्जन्यादि सृष्टीचे व्यापार असून त्याच्याशीं इंद्राचा कांहींहि संबंध नाहीं. ज्या त्या ऋतूंत जे ते व्यापार होतात, आणि ते अष्ट दिशांचे दिक्पाळ घडवून आणितात. पश्चिम दिशेला वरुण या नांवाचा दिक्पाळ आहे त्याच्या जवळ पण द्रोण, पवन, पांगूळ वगैरे अठ्याण्णव कोटी मेघ आहेत. त्या मेघांकडून तो पर्जन्यवृष्टि करून पृथ्वीवर धनधान्य निर्माण करितो. त्यांत इंद्राचा कांहींहि संबंध नाहीं. अमुक देव अमुक कार्य करितो, ही ज्याची त्याची भावना असून जो तो त्याप्रमाणें आपल्या देवतेला प्रमुख समजतो. शैव जे असतात त्यांनां शंकर काय तो सर्वस्व वाटतो, वैष्णव विष्णुशिवाय, शाक्त देवीशिवाय, गणेश गणपतीशिवाय, व सौर सूर्यावांचून कोणाला ओळखीत नाहींत. याप्रमाणें अनेक पंथ असून त्या त्या पंथांतले लोक आपआपल्या देवतेचें स्तोम माजवितात. वस्तुतः जगदात्मा हा सर्व एकच असून तो आपल्या भक्तांच्या इच्छेप्रमाणें निरनिराळे

अवतार घेऊन आपल्या भक्तांचे मनोरथ पूर्ण करीत असतो. तेथें इंद्र, देवांचा राजा कसला, किंवा ब्रह्मा, विष्णु, महेश यांचें तरी महत्व कसलें ? जशी ज्याची इच्छा असेल तशी त्यानें आपली देवता कल्पून त्याची खुशाल आराधना करावी, परंतु वास्तविक पृथ्वीला पर्वताचा आधार असून त्याच्या शक्तीमुळें पर्जन्याची वृष्टि होते. अष्टकुलाचल जो मेरूपर्वत तो तर सर्वांनां आधार आहे. त्या मेरूपर्वताच्या मस्तकावर ब्रह्मा, विष्णु, महेश, तसेंच अष्ट दिशांचे अष्ट दिक्पाळ, इंद्र, वगैरे सर्व राहतात. तेव्हां या सर्वांनां आश्रयभूत जो मेरुपर्वत तोच सर्वांत अधिक वंद्य होय. गोवर्धन हा त्या मेरूचाच वंशज आहे; तेव्हां गोवर्धन पर्वताची उपासना करणें हें अत्यंत श्रेयस्कर होय. आजपर्यंत तुह्मीं इंद्राला नसतें महत्व देऊन गोवर्धन पर्वताची अत्यंत अवहेलना केली आहे, तरी आतां यापुढें तरी त्या पर्वताची उपासना करा. ” कृष्णानें याप्रमाणें नंदाला सांगितल्यावर तें कृष्णाचें ह्मणणें नंदाला व इतर सर्व गवळ्यांनां पसंत पडलें व आजपर्यंत कृष्णासारखा खरें सांगणारा न भेटल्यामुळें पर्वताची अवहेलना झाली, याबद्दल त्यांनां फार पश्चात्ताप वाटू लागला. मग त्या सर्व गोपाळांनीं इंद्रयागाची जी तयारी केली होती, ती मोडून टाकिली व पर्वताच्या यात्रेची तयारी चालविली. प्रत्येकानें आपआपल्या शक्तीप्रमाणें अन्न शिजविलें व तें गाडींत घालून अनेक गवळी आपल्या अन्नानें भरलेल्या गाड्या घेऊन यात्रेला निघाले. दही, दूध, तूप, यांचींहि लोकांनीं भांडीं भरून घेतलीं. याप्रमाणें सर्व साहित्य घेतल्यावर नंद व गवळी त्या गोवर्धन पर्वताच्या पायथ्याशीं आले व तेथें मांडव वगैरे घालून पर्वताची पूजा करण्याची तयारी करूं लागले. इतक्यांत तो पर्वत आपलें स्वरूप धारण करून मनुष्याप्रमाणें बोलूं लागला. तेव्हां गवळ्यांनीं त्या पर्वतावर दही, दूध व तूप यांच्या घागरीच्या घागरी ओतून पर्वताला स्नान घातलें. केशर, गंध, वगैरे वाहिलें, फुलांच्या माळा घातल्या, आणि सर्वांच्या शेवटीं नैवेद्य समर्पण केला. तेव्हां त्या पर्वतानें आपलें भयंकर तोंड उघडिलें व तें सर्व अन्न भक्षण केलें; परंतु तेवढ्यानें पर्वताची तृप्ति झाली आहे असें कोणालाही वाटलें नाहीं. तेव्हां सर्व गवळी घरीं आले व घरांत जें शिल्लक अन्न होतें तें घेऊन पुन्हां पर्वतावर आले व त्यांनीं तें आणिलेलें अन्न पर्वताच्या मुखांत घातलें. त्या गोवर्धनानें तेंहि क्षणार्धांत खाल्लें. मग ते सर्व गवळी विचार करूं लागले किं, घरीं जाऊन पुन्हां अन्न शिजवूं आणि तें गोवर्धनाच्या तृप्तीसाठीं घेऊन येऊं. असा जों ते विचार करीत आहेत तों तो पर्वत मोठ्यानें म्हणाला; “ हे नंदादि गवळ्यांनों ! तुमच्या या भक्तीनें मी प्रसन्न झालों आहें व तुह्मीं जे जे मनोरथ कराल ते ते तुमचे मनोरथ पूर्ण होतील. ” ते त्या पर्वताचे शब्द ऐकून सर्वांनां मोठें आश्चर्य वाटलें व आज आपणास कृष्णानें खरा देव दाखविला. याबद्दल सर्वांनां फार आनंद झाला.

मग ते सर्व गवळी मोठ्या समारंभानें गोकुळांत परत आले. हळू हळू हें वर्तमान सर्व देशांत पसरलें, व प्रत्यक्ष पर्वत पूजेचा स्वीकार करितो हें ऐकून लोकांनां फार आश्चर्य वाटूं लागलें. मग सर्व देशोदेशींचे लोक इंद्राचें होमहवन सोडून देऊन त्या गोवर्धन पर्वतालाच भजूं लागले. पुढें हें वर्तमान नारदानें इंद्राला कळविलें. ती गोष्ट ऐकून इंद्राला कृष्णाचा फार राग आला, व माझा हविर्भाग बंद करून त्या पर्वताला दिला याबद्दल कृष्णाची चांगली खोड मोडावयाची, असा इंद्रानें विचार केला, व त्यानें चार मेघ व अष्टदिक्पाळ यानां बोलावून असें सांगितलें किं, तुह्मीं पृथ्वीवर जाऊन गोवर्धन पर्वताला तेथून हलवून दूर नेऊन टाकावें. तेव्हां ते मेघ वगैरे ह्मणाले; "सांप्रत तो गोवर्धन पर्वत कृष्णाचे स्वाधीन आहे; तेव्हां त्या पर्वताला हलवावयाला आह्मीं असमर्थ आहोंत." मग इंद्र मेघांनां ह्मणाला; "मेघांनों, त्या कृष्णानें माझा फारच मानभंग केला आहे, सर्व गोपाळ व नंद तो कृष्ण सांगेल तसें ऐकत आहेत; आह्मां सारखे देव सोडून त्या सर्व गवळ्यांनीं तो मोठा थोरला पाषाणमय गोवर्धन पर्वत त्याची पूजा केली, व आतां त्या गवळ्याचें ते कृत्य पाहून सर्व देशांतील लोक त्या पर्वताचीच पूजा अर्चा करीत आहेत. हे मेघानों ! तुम्हांवर माझी सत्ता असून त्या कृष्णानें पर्जन्य हा केवळ पर्वताच्या प्रसन्नतेमुळें पडतो असें सांगितलें आहे. तर तुह्मीं आतांच्या आतां गोकुळावर जा, व अशी जोरानें वृष्टि करा किं, सर्वत्र जलप्रलय होऊन जाईल." मेघांनां याप्रमाणें इंद्राचा हुकूम झाल्यावर ते गोकुळावर आले व इंद्राच्या आज्ञेप्रमाणें गोकुळावर मुसळधार वृष्टि करूं लागले; कित्येक मेघ मोठमोठ्या गारांची वृष्टि करूं लागले. याप्रमाणें त्या मेघांनीं अनर्थ सुरू केल्यावर गायी, गोपाळ व गवळी यांची अत्यंत त्रेधा उडाली. जिकडे तिकडे पाणी होऊन गेलें, कित्येकांचीं घरें धडाधड पडूं लागलीं, घरांच्या बाहेर निघावें तर वरून गारांचा मारा होई. अशा स्थितींत लोक अत्यंत दुःखी झाले व आतां जलप्रळय होऊन सर्व वहात जाणार या कल्पनेनें सर्व एकत्र मिळून आपआपल्या मुलांबाळांनां घेऊन बसले कित्येक कृष्णाला ह्मणाले:—— "कृष्णा, तूं त्या इंद्राचें होमहवन बंद करविलेंस त्याचा हा सारा परिणाम दिसतो." तेव्हां कृष्ण म्हणाला; "तसें असेल तर ज्या पर्वतानें आपणाजवळून पूजा घेतली, तो पर्वत आपलें संरक्षण करील, तर चला आपण त्या पर्वताकडे जाऊं." असें कृष्णानें सांगितल्यावर सर्व आबालवृद्ध कृष्णाच्या मागें त्या पर्वता जवळ आले. तेथें आल्यावर कृष्णानें गोवर्धन पर्वत उचलिला व तो करांगुलीवर धरला, आणि त्या खालीं सर्व लोकांनां बसविलें. त्या पर्वताचे खालीं बसल्यावर पाऊस व गारा या पासून कोणालाहि त्रास होईनासा झाला. त्या गवळ्यांनां त्या पर्वताखालीं

जणूं काय आपण आपल्या घरींच आहोंत, असें वाटलें; व ते आपल्या गायी गुरांसह आपापले व्यवसाय करूं लागले. सर्व गवळी तेथें एके ठिकाणीं असल्यामुळें त्यांचा तो काळ फारच आनंदानें जात असे. त्या पर्वतानें आश्रय दिल्यामुळें प्रलय कालापासून आपलें रक्षण झालें, असें वाटून सर्व गौळी तो पर्वत हाच खरा ईश्वर आहे, व याचा अधिकार इंद्रापेक्षांहि मोठा आहे, असें मानूं लागले. आपल्या भक्तांसाठीं हा पर्वत आकाशाला चिकटला व आपल्या तळाखालीं त्यानें वीज, वारा, पाऊस, गारा यापासून आपलें संरक्षण केलें अशी त्या गवळ्यांची दृढ भावना झाली. कृष्णानें हा मार्ग दाखविल्यामुळें कृष्णाचे तर ते फार उपकार मानूं लागले. याप्रमाणें सात दिवस त्या पर्वताखालीं राहिल्यावर आकाशांत जमलेले मेघ नाहींसे झाले व त्यामुळें पर्जन्यहि नाहींसा झाला. इकडे मेघ इंद्रलोकीं गेले व ते इंद्राला सांगूं लागले किं, "हे देवेंद्रा! तुझ्या आज्ञेप्रमाणें आह्मीं सात दिवसपर्यंत अहोरात्र गोकुळावर वृष्टि केली, परंतु तो गोवर्धन पर्वत गोकुळावर छत्रीप्रमाणें राहिल्यामुळें आमच्या वृष्टीचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. गोकुळावर एक थेंब किंवा एखादि गारहि पडली नाहीं. तो पर्वत तेथें कोणाच्या बळानें आकाशांत तरंगत आहे तें आह्मांला तर कांहीं समजलें नाहीं." तें त्या मेघांचें भाषण ऐकून इंद्राला अत्यंत आश्चर्य वाटलें व तो आपल्या सेवकांसह गोकुळांत आला. तेथें येऊन पाहतो तों, श्रीकृष्ण भगवान आपल्या वामकरांगुलीवर गोवर्धन पर्वत उचलून उभे राहिले आहेत. ती भगवंताची विलक्षण शक्ति पाहून इंद्राचा गर्व पार नाहींसा झाला. तो कृष्णाला अनन्यभावें साष्टांग नमस्कार करून म्हणाला; "हे देवाधिदेवा अनंता! हे अव्यक्तव्यक्ता पुराण पुरुषा! तूं मोक्षाचें निधान असून तूंच या त्रैलोक्याचा आधार आहेस. आम्हां सर्व देवांनां तुझाच आधार असून तूंच आमचें संरक्षण कराति आहेस. तुझी माया विक्षलण आहे, तुझी शक्ति आम्हाला कळत नाहीं, तुला पूर्णपणें ओळखावयाला आह्मी असमर्थ आहों. सर्व प्राणीमात्रांना कर्मबंधनांनीं बांधून, तूं हें सर्व विश्व मोहून टाकिलें आहेस. तूं त्रिगुणाचें यंत्र तयार करून हीं अनंत जीवरूप बाहुलीं नाचवीत आहेस, मी अभिमानानें अंध होऊन तुझ्या शक्तीचा विचार न करितां मेघांनां पाठविलें, याबद्दल क्षमाकर. माझी इंद्रपदावर तूंच स्थापना केली आहेस, आणि तुझ्याच कृपेमुळें मी त्या इंद्रपदाचा उपभोग घेत आहें. हे श्रीकृष्णा! त्या पदाचा अभिमान तूं न बाळगूं लागल्यास मला या त्रिभुवनांत मग कोणींहि विचारणार नाहीं." या प्रमाणें इंद्रानें श्रीकृष्णाची प्रार्थना करून श्रीकृष्णाला साष्टांग नमस्कार घातला, व हात जोडून पुढें उभा राहिला. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला; "हे इंद्रा! तूं माझ्या शक्तीचा विचार न करितां वागलास म्हणून तुला हें मानभंगाचें फळ मिळालें. आम्हीं वेळोवेळीं अवतार घेऊन अहंकार,

पाप व दुष्ट या सर्वांचा नाश करीत असतों. वास्तविक माझें राजसाबरोबर वैर नाहीं, व देवाबरोबर भिन्नत्वही नाहीं. मी हें सर्व चराचर निर्माण केलें आहे, त्यांत अमुक आवडतें हा भेदभाव माझ्याजवळ मुळींच नाहीं. फक्त राजस, तामस व सत्व या गुणांवर माझा सर्व खेळ चालला आहे. तामस मला अप्रिय होतात व राजस मला प्रिय वाटतात. जेव्हां तामसी प्रकृतीचे लोक अत्यंत निंद्याचरणानें वागतात तेव्हांच मी अवतार घेऊन दुष्टांचा नाश करितों व साधूंचा प्रतिपाळ करितों. तूं आतां आपल्या अमरावतीला सुखानें जा, व गर्व सोडून वागत जा, तुला आपला भाग मिळेल अशी मी व्यवस्था करितों. दिपवाळींत चतुर्दशीचें दिवशीं स्नान करून जे लोक दान देतील तें तुला प्राप्त होईल, अमावास्येच्या दिवशीं केलेलें दान पितरांना मिळेल, व प्रतीपदेच्या दिवशीं केलेलें दान गोवर्धनाला मिळेल. " याप्रमाणें कृष्णानें सांगितल्यावर इंद्रानें कृष्णाच्या चरणावर मस्तक ठेविलें व तो कृष्णाचा अशिर्वाद घेऊन अमरावतीस निघून गेला. त्या वेळीं इंद्रानें बरोबर कामधेनु आणिली होती, तिनें कृष्णाला अभिषेक करून कृष्णाचें गोविंद असें नांव ठेविलें.

### ३. गवळ्यांनां वैकुंठाचें दर्शन.

याप्रमाणें गोकुळांत श्रीकृष्णाच्या अनंत लीला चालल्या होत्या. नंतर एके कार्तिक शुद्ध एकादशीचे दिवशीं नंद व इतर गवळी हरिजागरण करीत बसले. रात्रभर भजन-कीर्तन झाल्यावर पहाटेस पारणें सोडण्याची तयारी करण्याकरितां नंद यमूनेवर स्नानला गेला. त्यावेळीं सूर्योदय झाला नसल्यामुळें पाण्यावर वरुणाची सत्ता होती, शिवाय नंदानें पाय धुतले नव्हते. तो पाण्यांत हरिनामोच्चारण न करितांच गेला त्यामुळें जलदेवता त्यावर रागावली व तिनें त्याला ओढून पाताळांत नेलें. पाताळांत गेल्यावर त्या जलदेवतेनें नंदाला वरुणापुढें उभें केलें. वरुणाची ती भव्य नगरी व त्याचे तें अपार वैभव पाहून नंद थक्क होऊन गेला. इकडे नंद पाण्यांत बुडालेला पाहून सर्व गवळी घाबरले व त्यांनीं तो प्रकार तत्काल कृष्णाला कळविला. ती हकीकत ऐकून गोकुळांतील सर्व लोक अत्यंत दुःखी झाले व श्रीकृष्णासह यमुनेच्या कांठीं आले. कृष्णानें तेथें आल्याबरोबर पाण्यांत बुडीमारली व तो नंदाचा शोध काढीत काढीत पाताळांत वरुणलोकीं गेला, व जेथें वरुण व नंद बसला होता तेथें जाऊन उभा राहिला. ती कोटि सूर्याप्रमाणें श्रीकृष्णप्रभूची दैदिप्यमान मूर्ति पाहून वरुणानें कृष्णाला ओळखिलें व लगेच साष्टांग नमस्कार करून तो म्हणाला; " हे वैकुंठनाथा! तुझें आज दर्शन झालें हें माझें महत् भाग्य होय. या पामराला तुझें दर्शन घडावें अशी याची मुळींच योग्यता नाहीं, म्हणून मला असें वाटतें किं, माझ्या आईबापांच्या सुकृतामुळेंच तुझें मला दर्शन झालें." याप्रमाणें वरुणानें कृष्णाची स्तुति केल्यावर कृष्ण म्हणाला; " हे

वरुणा! मी आपला पिता जो नंद त्याला नेण्यासाठीं येथें आलों आहे; तर नंदाला माझे स्वाधीन कर, व त्याला येथें कां आणिलें, तें सांग." तेव्हां वरुण म्हणाला; "हे श्रीकृष्णा! नंदानें शौचायमन केलें नाहीं, पाय धुतले नाहींत, आणि दंतधावन विधीहि केला नाहीं, शिवाय श्रीहरीचें स्मरण न करितां हा सूर्योदयापूर्वी तसाच पाण्यांत शिरला, म्हणून मी त्याला येथें आणिलें. आणि हे देवाधिदेवा, अशा कारणानें तरी तुझें दर्शन व्हावें असाहि माझा हेतु होता. हे जगदीश्वरा; मला तूं दिक्पाळ केलेंस व एवढी सत्ता मला दिलीस ही सर्व तुझीच संपत्ति आहे. आम्हीं केवळ तुझे दासानुदास असून तुझ्या आज्ञेप्रमाणें वागत अहोंत." असें सांगून वरुणानें नंदाला कृष्णाच्या स्वाधीन केलें व मोठ्या सत्कारानें त्या दोघांनां गोकुळांत पोहोंचतें केलें. नंतर घरीं येऊन नंदानें मोठ्या समारंभानें द्वादशीचें पारणें सोडिलें. नंदानें वरुण लोकीं घडलेली हकीकत सर्व गवळ्यांनां सांगितल्यावर त्या सर्वांना वरुण-लोक पाहण्याची इच्छा झाली. तेव्हां कृष्णानें त्या सर्वांना एकदां यमूनेवर स्नानाला नेलें, व ते स्नान करीत असतां त्यांनां तेथून एकदम विष्णु लोकीं नेलें. तेथें पाहतात तों विष्णु लक्ष्मीसह आपल्या सिंहासनावर बसले असून अनेक देव विष्णूपुढें हात जोडून स्तुति करीत होते. त्या देवांमध्यें वरुणहि उभा होता. तो प्रकार पाहिल्यावर ते गवळी पुन्हां यमूनेंत आले व स्नान वगैरे करून घरोघर गेले. विष्णु लोकीं श्रीकृष्णाला सिंहासनावर बसलेला, व सर्व देव त्याच्या समोर हात जोडून प्रार्थना करीत आहेत असा प्रकार पाहून त्यांनां वरुण लोक पाहण्याची इच्छा राहिली नाहीं. आपणास श्रीकृष्ण हा प्रत्यक्ष परमात्मा मिळाला आहे अशी त्यांची खात्री झाली.

## ४. रासक्रीडा.

पुढें शरदृतु संपून वसंत ऋतूला आरंभ झाला असतांना श्रीकृष्ण कुंज-वनांत जाऊन मुरली वादन करीत बसले, त्यावेळीं कुंजवनांतील वनश्री कांहीं अपूर्व अशी होती. मोगरा, जाई, जुई, चमेली वगैरे वेलींना त्या त्या फुलांचा बहार आला होता. त्या फुलांच्या सुवासानें गुंग झालेले भ्रमर सर्वत्र गुंजारव करीत होते. सुवासानें सर्व अरण्य भरून गेलें होतें. त्या दिवशीं फाल्गुन शुद्ध पौर्णिमा असल्यामुळें सर्वत्र स्फटिकाप्रमाणें स्वच्छ चांदणें पडलें होतें. गोकुळांत घरोघर वसंतपूजा करून लोक आपल्या शयनावर आपापल्या स्त्रियेसह आनंदानें क्रीडा करीत होते, इतक्यांत कुंजवनांत श्रीकृष्णाचें चाललेलें मुरलीवादन ऐकून गोकुळांतील सर्व लोक तल्लीन होऊन गेले. त्या मधुर व चित्ताकर्षक वेणुनादानें स्त्रिया आपलें देहभान विसरून गेल्या. श्रीकृष्णाच्या जवळ जाऊन ती मुरली ऐ-कावी असें त्यांना वाटलें व त्या आपल्या पतींना शय्येवर निजवून टेवून कुंजवनांत आल्या. कित्येक स्त्रिया मुलांना पाजीत होत्या, त्या आपल्या मुलाला ठेऊन तशाच कृष्णाकडे आल्या; कित्येक गृहकृत्यें तशींच टाकून आल्या.

स्त्रियांप्रमाणेंच गोपाळ, गाई, वनांतील पक्षी, वगैरे सर्वांची तशीच चमत्कारिक अवस्था झाली. सर्व कुंजवनांत कृष्णाजवळ येऊन उभे राहिले. त्या आलापदार सुस्वर वेणूनादानें दशदिशांना फिरणारा वायुही स्थिर झाला होता, व यमुनेचें पाणीही स्तब्ध झालें होतें. इतकी विलक्षण चित्ताकर्षकता त्या वेणुनादांत होती. अधिक काय ? पण स्वर्गांतून देव, गंधर्व व अप्सरागणही त्या मुरलीच्या नादानें तल्लीन होऊन आकाशांत आपल्या विमानांत बसून आले होते. त्या वेणुनादानें देहभान विसरून गेलेल्या गोपीनीं मुरलीच्या स्वराबरोबरच नाचण्यास आरंभ केला. तें नृत्य पाहून अप्सरांनींही तोंडांत बोटें घातलीं, मग इतर लोक त्या नृत्यानें थक्क झाले असतील यांत मोटेसें नवल तें काय ? श्रीकृष्ण अनेक रूपें धारण करून एक गोपी व एक आपण या प्रमाणें फेर धरून, सुंदर गाणी म्हणून नाचूं लागले व मध्यभागींही आपणच वेणु वाजवूं लागले. तीं निरनिराळ्या सुरांची सुस्वर गाणीं व तें सुंदर नृत्य पाहून सर्व आपआपलें वैर विसरून जाऊन तल्लीन झाले, गाय व सिंह, हरिण व वाघ, लांडगा व बकरी, याप्रमाणें जन्मापासून ज्या प्राण्यांमध्यें वैर असतें ते प्राणी देखील वैर विसरून जाऊन तेथें आनंदानें डोलूं लागले. ते अनेक कृष्ण व त्या अनेक गोपी यांची ती अनुपमेय क्रीडा पाहून सर्व आश्चर्यचकित झाले. कृष्णाचें तें कौतुक पाहण्यासाठीं इंद्र आपला सारथी जो मातली त्यासह ऐरावतावर बसून आला होता. त्याच्यावर मेघरूपी छत्री होती; व त्याच्या हातांत प्रखर धारेचें वज्र होतें. आग्नेयदिशेकडील अधिपति जो अग्नि तो मेंढयावर बसून आला होता, त्याची अंगकांति कुंकुमासारखी दैदीप्यमान असून त्याला सात जिव्हा होत्या, दक्षिणदिशेचा राजा यम हा तेथें काळ्या टोणग्यावर बसून व कृष्णवसनें परिधान करून आला होता; काळपाश व काळदंड हीं त्याचीं दोन्हीं आयुधें त्याच्या हातांतच होतीं. नैऋत्यदिशेकडील नैर्ऋत डुकरावर बसून आला होता, पश्चिमेचा राजा वरुण मृगावर बसून आला होता, वायव्यदिशेचा राजा पवन हाहि आला होता, उत्तरेचा सोम राजा मृगावर बसून आला होता, ईशान्यदिशेचा राजा ईशान हा बैलावर बसून आला होता, त्याला पांच तोंडें असून दहा हात होते, पाशुपत, त्रिशूळ, डमरु, शंख, चक्र, नागपाश वगैरे आयुधें त्याच्या हातांत होतीं. हे सर्व देव श्रीकृष्णाला नमस्कार करून ती कृष्णाची लीला अवलोकन करीत होते. ती कृष्णाची लीला पाहून त्यांनां त्याबद्दल हेवा वाटूं लागला व आपण गोपाळ होऊन त्या सुखाचा लाभ घ्यावा असें त्यांनां वाटूं लागलें, परंतु बिचाऱ्या देवांचें प्राक्तन तितकें थोर नव्हतें. असो, श्रीकृष्णानें तेथें बराच वेळ क्रीडा केल्यावर ते त्यांतील एका गोपीला आपल्या कडेवर उचलून घेऊन तेथून निघून आणखी दूर त्याच वृंदावनांत गेले, ज्या गोपीला कृष्णानें उचलून नेलें

होतें तिला सर्व गोपींमधून इकडे एका बाजूला आणण्यासाठीं कृष्णानें आपली निवड केली, यावरून आपलें स्वरूप विशेष सुंदर आहे, असा तिला अभिमान उत्पन्न झाला; पुढें एक वृक्ष फुलांच्या बहारानें फारच प्रफुल्लित झाला होता; तेव्हां तीं फुलें तोडून घेण्याची त्या स्त्रियेला इच्छा झाली. तिची ती इच्छा जाणून कृष्णानें तिला आपल्या खांद्यावर उभें केलें व फुलें तोडण्यास सांगितलें, त्या वेळीं तर त्या स्त्रियेला अत्यंतच गर्व झाला. ती तिची अहंकारी मुद्रा पाहून कृष्णाला तिचा फार तिटकारा आला व त्यानें तिला त्या वनांत एकटीलाच टाकून तो दुसरीकडे निघून गेला. इकडे गोपी, आपणांमधून श्रीकृष्ण निघून गेल्यावर त्याचा शोध करीत करीत त्या वृंदावनांत आल्या, पाहतात तों तेथें कृष्ण नसून एकटीच एक गोपी बसली आहे. तिला त्या गोपी म्हणाल्या; "अगे! तुला सोडून श्रीकृष्ण कोणीकडे निघून गेला ?" तो त्यांचा प्रश्न ऐकून तिला अधिक वाईट वाटलें, व तिला आपल्या अहंकाराबद्दल अधिक पश्चात्ताप वाटूं लागला. तिचे डोळे अश्रूंनीं भरून आले, व ती करुणवाणीनें कृष्णाचा धावा करूं लागली. ती म्हणाली; "हे श्रीकृष्णा! हे करुणानिधे! मी मनांत प्रापंचिकाप्रमाणें अहंकार धरिला, अभिमानानें तुला विसरून मीच आपले गुण गाऊं लागलें, म्हणून माझ्यावर रुसून कोणीकडे निघून गेलास? पण हे गोविंदा! तुझ्या ठिकाणीं माझें जर खरें प्रेम नसतें तर मी आपला पति–पुत्र–सासू सासरा या सर्वांनां सोडून तुझ्याकडे आलें नसतें. तुझ्यासाठीं मी आपलें घरदार सोडलें, सर्व प्रपंच सोडला, व तुझ्या लीला पाहण्यासाठीं मी तुझ्याजवळ आलें, आणि तूं मला एकटीलाच टाकून कोणीकडे निघून गेलास ?" याप्रमाणें ती स्त्री कृष्णाची करुणा भाकूं लागल्यावर कृष्णाला तिची दया आली व तो तेथें एकदम प्रकट झाला. श्रीकृष्णाची ती श्यामसुंदर मूर्ति प्रगट होण्याबरोबर सर्व गोपींनां अत्यानंद झाला, व त्यांनीं कृष्णाच्या चरणावर मस्तकें ठेविलीं. त्या सर्वजणी कृष्णाला हात जोडून म्हणाल्या; "हे कृष्णा! हे अनंता! हे वासुदेवा! आम्हीं सर्वजणी तुझ्या चरणाच्या दासी झालों असून तूं आमचा क्षणोक्षणीं अव्हेर करितोस हें बरें नव्हे. तूंच आम्हाला तुझ्याजवळून दूर केल्यास आम्हीं शरण तरी कोणाला जाणार? हे देवाधिदेवा! तुझ्या प्रेमसंपादनाकरितां व तुझ्या प्रसन्नते करितां आह्मीं तुझी करुणा तरी कशी भाकावयाची? तुझी शुश्रूषा कशी करावयाची ? तें एकदां आम्हांला सांग, म्हणजे आम्हीं त्याप्रमाणें वागत जाऊं. आपलें जो भजनपूजन करील, त्याचें आपणही भजनपूजन करावें, ही एक प्रकारची भक्ति आहे, जरी आपलें कोणीं भजनपूजन केलें नाहीं, तरी दुसऱ्याचें भजनपूजन करावें, हाहि एक मार्ग आहे. कित्येक आपलें भजनपूजन करितात त्यांचें भजनपूजन जे करीतहि नाहींत, अशा प्रकारचे लोक कृतघ्न होत. त्याप्रमाणें आम्हीं तुझ्या चरणरजाचे किंकर होऊन तुझी भक्ति करितों, पण तूं

आम्हांशीं कृतघ्नपणानें वागत आहेस." गोपींचें तें भाषण ऐकून श्रीकृष्ण भगवान् प्रसन्न झाला व प्रसन्न चित्तानें म्हणाला; "तुह्मीं अहर्निश माझें भजनपूजन करीत जा, ह्मणजे मी नेहमीं तुमच्या जवळच आहें, मी आपल्या भक्तांपासून क्षणभरहि दूर होत नाहीं; इतकेंच नव्हे, तर भक्त जसे माझे दास होतात, त्याप्रमाणें मीहि आपल्या भक्तांचा दासानुदास होऊन त्यांचें कार्य करतों." याप्रमाणें कृष्णासह त्या गोपींनीं त्या वृंदावनांत रात्री आनंदानें घालविल्यावर त्या गोपी गोकुळांत परत आल्या. त्या गोपी जेव्हां गोकुळांत परत येऊं लागल्या, तेव्हां त्या आनंदभरानें गाणीं ह्मणूं लागल्या व नाचूं लागल्या; त्यांच्या आगमनानें सर्व गोकुळांत सुवास सुटला. तो चमत्कार पाहून सर्व गवळी आश्चर्य करूं लागले व त्यांनां हा कांहीं सुखाचा प्रसंग आहे किंवा हें कांहीं संकट येत आहे तें कळेना. नंदानें घरांत जाऊन प्रथम कृष्णाचा शोध केला, तों कृष्ण व बलराम शय्येवर स्वस्थ निजले आहेत; त्याप्रमाणें त्या गवळ्यांच्या स्त्रिया व गोपाळहि स्वस्थ निजले आहेत असें गवळ्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. तेव्हां तो काय प्रकार आहे याची कोणासच कांहीं कल्पना होईना. हें कांहींतरी अरिष्टच आहे अशी सर्वांची समजूत झाली व त्या अरिष्टाच्या शांतीसाठीं नंद, गोपाळ, स्त्रिया, कृष्ण व बलराम वगैरे सर्व अंबिकेच्या यात्रेला जाण्याची तयारी करूं लागले. हल्लीं आपणास दिवस बरोबर नाहींत अशी त्या गवळ्यांची समजूत झाली. मागें अतिवृष्टि झाली, नंदाला वरुणानें नेलें, वगैरे अनेक संकटें एकामागून एक आलीं, यावरून दिवसच वाईट आले आहेत असें वाटतें, तर या अरिष्टांची शांति व्हावी म्हणून सर्व अंबिकेच्या मंदिरांत आले. तेथें यथाविधिपूर्वक अंबिकेची पूजाअर्चा करून अंबिकेला नैवेद्य समर्पण केला व सर्वजण भोजन करून आनंदानें तेथें निजले. सर्वजण गाढ झोंपी गेल्यावर तेथें एक मोठा सर्प आला व तो नंदाच्या पायाला चावला; त्या सर्पाच्या दंशानें नंद जागा झाला व व्याकुळ होऊन कृष्णा! कृष्णा! म्हणून हांका मारूं लागला. त्याबरोबर तेथें कृष्ण आला व त्यानें त्या सर्पाला लाथ मारून तेथून दूर केलें. परंतु सर्पाला कृष्णाचा पाय लागल्याबरोबर तो शापमुक्त झाला व तेथें सर्पाच्या ऐवजीं एक सर्वांग सुंदर मनुष्य निर्माण झाला. तो कृष्णाला नमस्कार करून म्हणाला; "हे पतितपावना नारायणा! आज तुझ्या चरणस्पर्शानें मी शापमुक्त झालों. मी सुदर्शन नांवाचा गंधर्व आहें. अंगिरा ऋषीला नग्न पाहून हंसलों म्हणून त्यांनीं मला सर्प होशील असा शाप दिला. त्यांची प्रार्थना करून क्षमा मागितल्यावर त्यांनीं कृष्णाचा पाय लागल्यावर तूं शापमुक्त होशील असा मला उःशाप दिला होता; त्याप्रमाणें मी आज शापमुक्त झालों." असें म्हणून त्या गंधर्वानें कृष्णाच्या चरणांवर मस्तक ठेविलें व तो गंधर्वलोकीं निघून गेला. कृष्णाचें तें विलक्षण सामर्थ्य पाहून सर्व गवळ्यांनां मोठें आश्चर्य वाटलें, व प्रत्यक्ष परमात्मा

आपले सन्निध असून आपण निष्कारण देवांनां शोधित फिरतों असें त्यांनां वाटूं लागलें.

## ५. शंखचूडवध व अरिष्टासुरवध.

एके दिवशीं श्रीकृष्ण भगवान् आपल्या खेळगड्यांसह यमुनेच्या कांठीं खेळत असतां, तेथें शंखचूड नांवाचा एक राक्षस आला. तो शंखचूड कुबेराचा सेवक असून नाचतांना ताल चुकला होता, म्हणून कुबेरानें त्याला राक्षस होशील असा शाप दिला होता; त्याप्रमाणें तो राक्षस होऊन पृथ्वीवर संचार करीत होता. तो कंसाचा मोठा स्नेही असून सहज एके दिवशीं कृष्णाची लीला पहावयास आला होता; पाहतो तों श्रीकृष्ण भगवान् स्वर्गांगना व अनेक सुंदर अप्सरा यांच्याबरोबर खेळत आहे. तो प्रकार पाहून त्या शंखचूड राक्षसाला कृष्णाचा व त्या देवांगनांचा फार राग आला. ह्या स्वर्गांगना असून या मनुष्याबरोबर खेळत आहेत, ह्याबद्दल तो त्या सर्वांवर क्रुद्ध झाला व त्या सर्वांना मृत्युपुरीला पाठविण्याच्या तयारीनें त्यांच्या अंगावर धावून गेला. त्यानें सर्व अप्सरांनां व देवांगनांनां एके ठिकाणीं बांधलें व नंतर तो कृष्णाच्या अंगावर चालून गेला, तेव्हां कृष्णानें सहज लीलेनें त्या शंखचूडाला धरलें व गरगर फिरवून जमिनीवर आपटून मारिलें. त्या राक्षसाजवळ एक दिव्यमणी होता, तो मणी कृष्णानें घेऊन त्याचें भूषण केलें. नंतर त्या स्वर्गांगना स्वर्गलोकीं गेल्या. व श्रीकृष्ण गोपाळांसह गोकुळांत परत आला. पुढें कंसानें श्रीकृष्णाच्या नाशासाठीं अरिष्ट या नांवाचा एक महापराक्रमी राक्षस पाठविला होता. हा राक्षस अत्यंत पराक्रमी असून शरिरानें फारच विक्राळ होता. तो गोकुळांत आला व त्यानें आपला जबडा पसरून सर्व गोकुळ गिळून टाकण्याचा विचार केला. तो भयंकर प्रकार पाहून गोकुळांतील सर्व लोक अत्यंत भयभीत झाले व आज सर्व एकदम मरण पावणार या चिंतेनें ग्रस्त होऊन त्यांनीं कृष्णाचा धांवा केला. तेव्हां श्रीकृष्ण भगवान् हळूच त्या राक्षसाच्या मागें गेले, व त्याचे पाय धरून गरगर फिरवून पृथ्वीवर आपटलें तरी तो राक्षस मरण पावला नाहीं. म्हणून कृष्णानें त्याला पुन्हां गरगर फिरविलें व जमिनीवर आपटलें; याप्रमाणें सात वेळां त्या अरिष्ट राक्षसाला आपटलें; तेव्हां तो दुष्ट राक्षस मरण पावला. अशा रीतीनें त्या भयंकर अरिष्टाचें निवारण झाल्यावर सर्व गवळी शांत झाले, व त्यांची श्रीकृष्णाच्या सामर्थ्याविषयीं दिवसेंदिवस अधिकाधिक खात्री होऊन श्रीकृष्ण हा प्रत्यक्ष भगवान् आहे अशी त्यांची दृढ समजूत झाली.

---

# अध्याय ६ वा.

## १. कंसनारदसंवाद.

गोकुळांत श्रीकृष्ण ज्या कांहीं क्रीडा करीत असे त्याची हकीकत गुप्त दूतांकडून कंसाला प्रत्यहीं कळत असे. त्या लीलालाघवानें कंसाच्या पायाची आग मस्तकाला जात असे व त्याची स्थिति मोठी चमत्कारिक होत असे. श्रीकृष्णाच्या पराक्रमाच्या अनेक गोष्टी ऐकून कंसाची अशी दृढ भावना झाली होती किं, हाच आपला शत्रु आहे व याच्याच हातानें आपला मृत्यु होणार. आकाशवाणीनें सुचविलेला व आपल्या हातांतून निसटून गेलेल्या मुलीनें सांगितलेला शत्रु तो हाच असावा अशी त्याची पक्की समजूत झाली होती. तो कृष्णाच्या नाशासाठीं जो जो प्रयत्न करीत असे तो तो समूळ फसून उलट त्याचीच फजिती व नुकसान होत असे. पूतनेपासून तों अरिष्ट राक्षसापर्यंत जेवढे चांगले चांगले पराक्रमी व हुषार दैत्य त्यानें पाठविले होते त्या सर्वांनां कृष्णानें यमलोकीं पाठविल्यामुळें कंसाला पुढें काय करावें तें अगदीं सुचेनासें झालें होतें; इतक्यांत तेथें नारदमुनि फिरत फिरत आले. कंसानें नारदाचें सत्कारपूर्वक स्वागत केलें, व त्यांनां सांप्रत आपण कोणत्या विवंचनेंत आहों तें विदित केलें. तें ऐकून नारद म्हणाले; " कंसा ! ज्या वेळीं आकाशवाणीनें तुला तुझ्या मृत्युबद्दलचें भविष्य सांगितलें त्याच वेळीं जर तूं आपली बहीण देवकी, हिचा नाश केला असतास तर तुला इतकी काळजी करण्याचें कांहींच कारण पडलें नसतें; परंतु त्या वेळीं वसुदेवाच्या बोलण्यावर विश्वास ठेवून तूं सर्वतोपरी फसलास. त्या वसुदेवाला तुरुंगांत असतांनां बलराम व कृष्ण अशीं दोन मुलें झालीं तीं त्यानें तुला कळूं न देतां मोठ्या युक्तीनें गोकुळांत नंदाचे घरीं नेऊन ठेविलीं, त्याचा हा सर्व परिणाम आहे. कंसा ! ती देवकी तुझी बहीण नसून तुझी वैरीण आहे. " नारदाचें तें भाषण ऐकून कंसाला देवकीचा व वसुदेवाचा अत्यंत राग आला व तो तरवार घेऊन त्यानां मारण्याकरितां त्यांच्या अंगावर धावून गेला. तेव्हां नारद कंसाचा हात धरून म्हणाला; " कंसा ! आतां या देवकीला व वसुदेवाला मारून काय फायदा आहे ? जें व्हावयाचें तें तर होऊन गेलें. तेव्हां यांना मारून आतां निष्कारण अपकीर्ति तरी कां करून घेतोस ? सर्प विवरांतून निघून गेल्यावर विवर उकरण्यांत जसा कांहीं फायदा नाहीं त्याप्रमाणेंच श्रीकृष्ण गोकुळांत निघून गेल्यावर या वसुदेव–देवकीला मारण्यांत कांहीं फायदा नाहीं. तुझा जो खरा शत्रु आहे त्याचा नाश कर, म्हणजे या काळजींतून तूं मुक्त होशील."

कंसाचा बाप उग्रसेन हा त्या वेळीं तेथें जवळच होता. तो वृद्ध असून अत्यंत सत्वशील होता; त्याला तो नारदाचा सल्ला पंसत पडला नाहीं. तो कंसाला

ह्मणाला; "बा कंसा! तुला हे चार लोक चार प्रकारची सल्ला देतात पण यावर तूं विश्वास ठेवूं नकोस. जन्म, जरा व मृत्यु या तीन अवस्था सर्व प्राणिमात्रांनां आहेत; त्या अवस्था चुकविण्याचा प्रयत्न करणें हें मुळींच कोणाच्याहि स्वाधीन नाहीं; जसें कर्म करावें तसें त्याचें फल मिळत असतें. मनुष्य हा आपल्या कृतीनेंच आपला शत्रु व मित्र होतो; तूं आपल्या निंद्य, नीच व निर्दय अशा आचरणांनीं आपणा स्वतःचाच शत्रु झाला आहेस, मग तुला दुसरे अनेक शत्रु निर्माण होतील यांत मोठेसें नवल तें काय? बंध व मोक्ष हीं दोन्हीं ज्याच्या त्याच्या आचरणाचीं फळें असून मनुष्य निष्कारण दुसऱ्याला दूषण देत असतो. तूं आपल्या हातानें अनेक पापकर्मे केलीं आहेस त्यामुळें तुला समाधान न वाटतां आपला कोणी येऊन नाश करील कीं काय, ही भीति तूं स्वतःच उत्पन्न करून घेऊन निष्कारण काळजींत पडला आहेस. अजूनही त्या निंद्य आचरणापासून दूर हो, घडलेल्या पापकृतीबद्दल पश्चात्ताप व्यक्त कर व ज्यांनां दुःख दिलें असशील त्यांची मोकळ्या अंतःकरणानें क्षमा माग, ह्मणजे या काळजींतून व भीतींतून मुक्त होऊन तुला समाधानानें राहतां येईल." हा उग्रसेनाचा सल्ला अत्यंत फायद्याचा होता, पण तो त्या कंसाला पसंत पडला नाहीं; इतकेंच नव्हे, तर असा उपदेश केल्याबद्दल त्याला आपल्या बापाचा फार राग आला व तो बापावर क्रुद्ध होऊन म्हणाला; "मला मारून राज्यावर बसण्याची तुह्मांला आतां ह्मातारपणीं विशेष हांव सुटली आहे, आणि तेवढ्याचसाठीं तुमचा हा सारा प्रयत्न चालला आहे. मला उपदेशाच्या लांब लांब गोष्टी सांगून माझ्या शत्रूला जिवंत ठेवण्याचा तुमचा विचार आहे. जो बाप आपल्या मुलाचें इतकें अकल्याण चिंतून त्याला मारून त्याचें राज्य घेण्यास तयार होतो, तो खरोखर पिता नसून त्या मुलाचा काळच होय. प्रत्यक्ष घरांतल्या घरांत बाप जर मुलाशीं इतकें वैर करितो, तर मग मला बाहेर जे इतके शत्रु निर्माण झाले आहेत, ते आपणच निर्माण केले आहेत असें ह्मणावयाला काय प्रत्यवाय आहे?"

## २. केशी व व्योमासुरवध.

तो दुष्टबुद्धि कंस आपल्या बापाला याप्रमाणें मनास वाटेल तें बोलून स्वस्थ न बसतां त्यानें दूतांकडून त्याला लोहशृंखलांनीं बद्ध करविलें व तुरुंगांत नेऊन ठेविलें; त्याप्रमाणें वसुदेव व देवकी या दोघांनांहि पकडून आणून बंदिशाळेंत नेऊन ठेविलें. याप्रमाणें व्यवस्था केल्यावर कंसानें केशी नांवाच्या एका प्रबल वीराला बोलावून त्याला कृष्णाच्या नाशासाठीं गोकुळांत पाठविलें. तो केशी राक्षस गोकुळांत जेथें गोपाळांसह कृष्ण खेळत होता, तेथें घोड्याचें रूप धरून गेला व गोपाळांना टापा मारण्याचा व चावण्याचा त्यानें प्रयत्न सुरू केला. तो प्रकार पाहून हा कोणीतरी कपटी राक्षस आहे असें कृष्णानें

तेव्हांच ओळखिलें. व त्याचे मागील पाय धरून गरगर फिरविलें व एका पाषाणा-वर आपटून त्याची जन्ममृत्यूच्या भवबंधनांतून सुटका केली. तेव्हां गोपाळांनां अत्यानंद झाला व ते त्या आनंदाच्या भरांत कृष्णाचा जयजयकार करून कृष्णावरून आपल्या घोंगड्या ओंवाळूं लागले. केशी राक्षसाची झालेली दुर्दशा कंसाला कळल्यावर त्याला कृष्णाचा अधिक संताप आला व त्यानें कृष्णाच्या नाशासाठीं व्योमासुर नांवाचा दुसरा राक्षस पाठविला. हा व्योमासुर राक्षस महा पराक्रमी असून कपटविद्येंत निपुण होता. गोकुळांत आल्यावर त्यानें एके दिवशीं संधि साधून गोपाळ, गायी व वांसरें यानां एका विवरांत नेऊन ठेविलें; कृष्ण येऊन पाहतो तों तेथें गायी, गोपाळ कोणीही नाहीं. मग विचार करतां असें होण्याचें कारण त्याच्या लक्षात आलें. मग कपटाशीं कपटच केलें पाहिजे, असें योजून श्रीकृष्ण भगवान् झोंपेचें मिष करून स्वस्थ निजले. श्रीकृष्ण स्वस्थ निजले आहेत असें पाहतांच तो कपटी व्योमासुर राक्षस तेथें आला व त्यानें कृष्णाला उचलून त्या विवरांत नेऊन ठेविलें व सर्वांस कोंडून मारावें या उद्देशानें तो त्या विवराचा मार्ग बंद करूं लागला; इतक्यांत कृष्णानें त्याला पकडून आकाशांत गरगर फिरवून दगडावर आपटून ठार मारिलें व सर्व गाईगोपाळांची त्या विवरांतून सुटका केली.

## ३. श्रीकृष्णनारदसंवाद.

एके दिवशीं श्रीकृष्ण भगवान् स्वस्थ बसले असतां तेथें नारद आला. तो कृष्णाला नमस्कार करून म्हणाला; "हे श्रीकृष्णा ! तूं केवळ दुष्टांच्या संहारा-साठीं व साधूंच्या संरक्षणासाठीं अवतार घेतला आहेस, आजपर्यंत अनेक राक्षस मारून तूं या सर्व लोकांवर व पृथ्वीवर अनंत उपकार केले आहेस, व या आपल्या कृतीनें सर्वांनां पूजार्ह व वंद्य झाला आहेस. कृष्णा ! तूं सर्व कांहीं जाणत आहेसच; तुला मीं सांगावयाला पाहिजे असें नाहीं, परंतु तूं आपल्या अनेक भक्तांच्या संकटाचें निवारण करीत असून प्रत्यक्ष ज्यांनीं तुला जन्म दिला, त्या आईबापांच्या सुटकेचा कांहींच प्रयत्न न करितां खुशाल गोकुळांत क्रीडा करीत आहेस याचें मला फार आश्चर्य वाटतें. कृष्ण आपले कष्ट दूर करील, असा त्या वसुदेवदेवकीला तुझा मोठा भरंवसा, परंतु तूं तर आपला स्वस्थ आहेस. कृष्णा ! त्या देवकीचे सुकुमार हातपाय शृंखलांनीं काचून गेले आहेत, वसुदेव त्या अत्यंत जड अशा शृंखलाभारानें असह्य यातना भोगीत आहे. तो दुष्ट कंस त्या दोघांचे निर्दयपणें अमानुष हाल करीत आहे, त्या आपल्या आई-बापांसाठीं कांहीं प्रयत्न करून त्या दुष्टाचा नाश कर. त्यानें सर्व लोकांनां अत्यंत दुःखी केलें आहे, असा क्रूर व मूर्ख राजा आह्माला मिळाला म्हणून त्याची प्रजा सारखा टाहो फोडित आहे. हे देवाधिदेवा! जो कंस प्रत्यक्ष बापाला तुरुंगांत ठेवून त्याचे हाल करीत आहे, तो आपल्या प्रजेवर किती

जुलूम करीत असेल याचा विचार कर, व आतां आपल्या भक्तांचा अधिक अंत पाहूं नकोस." नारदानें कृष्णाला याप्रमाणें सांगितल्यावर श्रीकृष्ण न समजल्यासारखें करून नारदाला ह्मणाले; "नारदा! तूं ह्मणतोस तें सर्व खरें, पण त्या दुष्टाचा नाश कसा करावा, तें मला तर कांहीं कळत नाहीं." तेव्हां नारद ह्मणाला; "हे श्रीकृष्णा! त्या कंसानें आतां तुझ्या नाशाची निराळीच योजना केली आहे. त्यानें धनुर्यागाला आरंभ केला असून त्या यागासाठीं ठिकठिकाणचे धनुर्धारी, कुस्ती खेळणारे मल्ल, टकरी मारणारे हत्ती, वगैरे गोळा केले आहेत. चाणुर व मुष्टिक या नावाच्या प्रसिद्ध मल्लांनीं तुझा वध करण्याचा विडा उचलिला आहे. तुला त्या यागासाठीं लवकरच कंसाकडून निमंत्रण येईल, त्या वेळीं तूं तेथें जा, व कंसाचा नाश करून सर्वांनां सुखी कर." नारदानें याप्रमाणें कृष्णाला सांगितल्यावर श्रीकृष्णानें नारदाचा अत्यंत गौरव करून त्याला निरोप दिला.

## ४. कंस व अक्रूर यांचा संवाद.

नारदानें कृष्णाला सांगितल्याप्रमाणें कंसानें मथुरेस धनुर्यागाची मोठी तयारी केली होती; त्या समारंभाला कृष्णानें नंदगोपाळांसह यावें ह्मणून कंसानें अक्रूराला नंदाकडे पाठविण्याचें ठरविलें. अक्रूराला जवळ बोलावून त्याला कंस ह्मणाला; "हे अक्रूरा! तूं अत्यंत थोर अंतःकरणाचा उदार व बुद्धिवान् आहेस; सर्व यादवांमध्यें मला तूं विशेष दक्ष दिसतोस; शिवाय माझ्या हिताची तुला विशेष काळजीहि आहे; तर तूं गोकुळांत जा व नंदाला त्याच्या परिवारासह या धनुर्यागाच्या समारंभासाठीं घेऊन ये. विशेषतः कृष्ण व बलराम हे दोघे या समारंभासाठीं येतील अशी तूं अवश्य खटपट कर. कृष्णानें आजपर्यंत माझें किती नुकसान केलें आहे, त्यानें मला किती त्रास दिला आहे, माझे मोठे बलाढ्य वीर नाहींसे करून मला कसें भंडावून सोडिलें आहे, हें तुला माहित आहेच; त्या कृष्णाला युक्तीनें नाहींसा करण्याचा माझा विचार आहे.' ही गोष्ट तूं माझा सुहृद ह्मणून तुला मुद्दाम कळविली आहे. तूं माझा हा उद्देश कोणालाहि कळविणार नाहींस असा मला भरंवसा आहे." कंसाचें भाषण ऐकून अक्रूर कंसाला ह्मणाला; "महाराज! आपलें हित व्हावें अशी माझी खरोखर इच्छा आहे, आपल्या कल्याणाविषयीं माझा नेहमीं प्रयत्न असतो; परंतु या सेवकाच्या प्रयत्नाकडे स्वामीचें लक्ष नाहीं. याबद्दल फार खेद वाटतो. महाराज! आपण त्या कृष्णाला व बलरामाला येथें आणून त्यांचा नाश करण्याचें योजिलें आहे, परंतु या कार्यांत आपणाला यश येईल असें मला वाटत नाहीं. इतकेंच नव्हे, तर कदाचित् आपला नाशहि होण्याची मला भीति वाटत आहे; ह्मणून त्या दोघांनां आपण येथें आणण्याचें न कराल तर बरें असें मला वाटतें. आह्मीं आपले दास आहोंत, आपली आज्ञा मला शिरसा वंद्य आहे, आपण सांगतां त्याप्रमाणें मी

त्यांनां येथें घेऊन येण्यास तयार आहें, परंतु धन्याचें हिताहित पाहणें हें सेवकाचें कर्तव्य असल्यामुळें मी आपणास माझा अभिप्राय कळविला आहे. आपण कृष्णाच्या नाशाची तयारी जशी करावयाला पाहिजे होती तशी केली आहे, हें खरें, पण आपण आजपर्यंत जे रथीमहारथी वीर कृष्णाच्या नाशासाठीं पाठविले होते, त्या सर्वांचा विध्वंस कृष्णानें आपल्या बाहुबलानें सहज करून टाकिला. हें लक्षांत आणिलें म्हणजे त्या कृष्णाची शक्ति, त्याचें विलक्षण सामर्थ्य व अभूतपूर्व युद्धनैपुण्य याबद्दल कोणासहि संशय राहणार नाहीं; तेव्हां आपल्या या तयारीचा कांहींहि उपयोग होणार नाहीं. याउपर आपली मर्जी, मी आपला हुकूम मानण्यास तयार आहें. " अक्रूराचें तें भाषण ऐकून कंसाला कांहीं विशेष वाटलें नाहीं. तो अक्रूराला म्हणाला; " अक्रूरा ! तुझें म्हणणें कदाचित् खरेंहि असेल, तथापि मी प्रयत्नवादी आहें. प्रयत्न करीत असतांना त्यांत मला अपयश आलें तरी हरकत नाहीं. जे वीर आहेत ते सोक्ष किंवा मोक्ष यावांचून तिसरा मार्ग शोधीत नाहींत. तर तूं गोकुळांत जा व कृष्ण आणि बलराम यानां घेऊन ये. "

## ५. अक्रूराचें गोकुळांत आगमन.

कंसानें याप्रमाणें निकरानें सांगितल्यावर अक्रूराचा नाइलाज होऊन तो निमूटपणें स्वामिकार्याला उद्युक्त झाला; पण त्या वेळीं त्याच्या मनाची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. तो जरी कंसाचा ताबेदार होता, तरी श्रीकृष्णाचा भक्त होता. अशा नीच कार्यासाठीं श्रीकृष्णाला निमंत्रण करण्याचा प्रसंग आपणावर आला याबद्दल त्याला मरणप्राय दुःख होऊं लागलें. त्या वेळीं कोणता मार्ग स्वीकारावा हें त्याला कळेना. शेवटीं तो आपल्या स्त्रियेकडे गेला व तिला त्यासंबंधानें विचारूं लागला. तेव्हां ती म्हणाली; " श्रीकृष्ण भगवंताला सर्व हकीकत कळवून निमंत्रण करावें हें बरें " परंतु तसें केल्यास स्वामिद्रोह केल्यासारखें होईल अशी अक्रूराला भीति वाटूं लागली; तेव्हां त्याची स्त्री हंसून म्हणाली; " अहो तो जगदीश्वर सर्व कांहीं जाणतो आहे. तुम्ही व मी याप्रमाणें येथें बोलत आहों तें देखील सूक्ष्मदृष्टीनें श्रीकृष्ण भगवान् पहात आहे; मग कंसाचा तो नीच मनोदय भगवंतास कळला नसेल काय ? स्वामीकार्यास अनुसरून वागणें, व सज्जनांचा सांभाळ करणें हें मानवी प्राण्याचें मुख्य कर्तव्य आहे. त्यास अनुसरून खरी हकीकत कृष्णास कळविणें हेंच उक्त होय." अक्रूराच्या स्त्रीनें दिलेली ही सल्ला अक्रूराला पसंत पडली व तो आपला रथ सज्ज करून मथुरेहून गोकुळास जाण्यासाठीं निघाला. आज आपणास श्रीकृष्ण भगवंताचें दर्शन होणार या विचारानें अक्रूराला अत्यानंद झाला होता; त्या विचारामुळें अक्रूराला तें कार्य आनंदप्रद वाटूं लागलें, आणि श्रीकृष्णाचे दर्शनानें आपल्या देहाचें सार्थक होणार, असा त्यास

भरंवसा उत्पन्न झाला. तो रथांत बसून चालला असतां वाटेंत त्याला शकुनहि चांगले होऊं लागले. कृष्णाची भेट झाल्यावर त्याच्या चरणीं अशा रीतीनें मस्तक ठेवीन, त्याला अशा रीतीनें आलिंगन देईन, त्याची अशी पूजा करीन, वगैरे विचार सगळ्या रस्त्यानें त्याच्या मनांत चालले होते. कृष्णाच्या भेटीला उत्सुक झालेल्या अक्रूरानें आपला रथ वास्तविक मोठ्या वेगानें चालवावयाला पाहिजे होता, परंतु त्याचें अंतःकरण कृष्णमय झालें असल्यानें रथ हाकण्याकडे त्याचें लक्षच नव्हतें. केव्हां केव्हां तर तो कृष्ण-चिंतनांत ध्यानस्थ होऊन स्वस्थ बसे; तेव्हां त्याचे घोडेहि खुशाल स्वस्थ उभे रहात. जणूं काय अक्रूराचे ध्यानाचा भंग होऊं नये अशी तेही काळजी घेत होते. अशा प्रकारें मार्ग आक्रमीत सायंकाळच्या वेळीं अक्रूर गोकुळांत येऊन पोहोंचला. या वेळीं गोपी व गोपाळ रानांतून परत आल्याचीं पावलें रस्त्यावर उमटलीं होतीं. तीं पाहून अक्रूरास अत्यंत आनंद झाला व तो रथाखालीं उतरून श्रीकृष्णाचीं पावलें ज्या भूमीवर उमटलीं होतीं, त्या भूमीवर गडबडां लोळूं लागला; श्रीकृष्णाच्या नुसत्या चरणधूलीनेंच आपण पवित्र झालों असें त्याला वाटूं लागलें. अशा प्रकारें कृष्णमय झालेला अक्रूर नंदाच्या वाड्यांत येऊन पोहोंचला. अक्रूर आल्याचें ऐकून नंदाचे घरांतील सर्व माणसांनां मोठा आनंद झाला. नंदानें त्याचा मोठा सत्कार करून त्याचें कुशल विचारिलें. आपला एवढा आदरसत्कार केल्याबद्दल अक्रूरानें नंदाजवळ कृतज्ञता व्यक्त केली व कृष्णाच्या भेटीची इच्छा दर्शविली. त्या वेळीं कृष्ण गायींचें दूध काढीत होता, तेथें नंदाचा एक दूत अक्रूराला घेऊन गेला. तेथें जातांच अक्रूरास भगवंताची चतुर्भुज मूर्ति शंखचक्रगदापद्म यांनीं युक्त अशी दिसली. महायोग्यांसही दुर्मिळ अशी ती प्रभूची मूर्ति पाहून अक्रूराचे नेत्र प्रेमाश्रूंनीं भरून आले; त्याचें अंतःकरण सद्गदित झालें व त्यानें श्रीकृष्णाचे चरणावर मस्तक ठेवून त्याचे पाय घट्ट धरले.

आपला प्रेमळ भक्त भेटल्यानें भगवान् श्रीकृष्णालाही प्रेमाचें भरतें आलें. त्यांनीं अक्रूराच्या मस्तकावर हात ठेवून त्याला वर उठविलें व घट्ट आलिंगन दिलें. नंतर अक्रूरानें बलरामाला नमस्कार करून आलिंगन दिलें; आज आपल्या घरीं अक्रूरासारख्या पवित्र ब्राह्मणाचे पाय लागले, म्हणून नंदानें अक्रूराची पूजा करण्याचें योजिलें, यशोदा ऊष्णोदक आणून तें अक्रूराचे पायांवर ओतूं लागली व नंद अक्रूराचे पाय घासूं लागला. पादप्रक्षालन झाल्यावर नंदानें अक्रूराची षोडशोपचारें पूजा करून त्यास पंचपक्वान्नांचें भोजन घातलें व दक्षणा देऊन आज कां येणें झालें, असा प्रश्न केला. तेव्हां अक्रूरानें धनुर्यागाची सर्व हकीकत सांगून त्या यागासाठीं कंसानें तुम्हां सर्वांनां बोलाविलें आहे, व तें निमंत्रण करण्यासाठीं त्यानें मला मुद्दाम तुमच्याकडे

पाठविलें आहे. विशेषतः या यागासाठीं श्रीकृष्णानें व बलरामानें आलेंच पाहिजे अशी कंसाची फार इच्छा आहे असें कळविलें. अक्रूराचें तें भाषण ऐकून कृष्ण व बलराम यांना फार आनंद झाला. त्यांनीं नंदाबरोबर जाण्याची इच्छा दर्शविली. तेव्हां नंद म्हणाला; "कृष्णा! आह्मीं सर्व तिकडे गेल्यावर मागें ह्या आपल्या परिवाराचें संरक्षण कोण करील? तेव्हां तूं व बलराम येथें रहा व ह्या परिवाराचें संरक्षण करा; आम्हीं धनुर्यागाला जाऊन लवकरच परत येतों." नंदाचें बोलणें ऐकून श्रीकृष्ण ह्मणाला; "आपण सांगतां तें खरें, पण या अक्रूराची इच्छा आम्हीं एकदां मथुरेस यावें अशी आहे. अक्रूराचें मजवर अत्यंत प्रेम आहे व त्याचे मनोरथ पूर्ण करणें हें माझें कर्तव्य आहे. शिवाय कंसाची इच्छाहि पूर्ण करणेंही जरूर आहे; कारण शत्रु असो अथवा मित्र असो, तो वैरभावानें किंवा प्रेमभावानें माझें चिंतन नेहमीं करीत असतोच; तेव्हां त्याची इच्छाहि पूर्ण करणें अवश्य आहे." याप्रमाणें कृष्णाची इच्छा पाहून नंदानें श्रीकृष्ण व बलराम यांसह मथुरेस जाण्याची तयारी केली. श्रीकृष्ण मथुरेस जाणार ही गोष्ट हां हां ह्मणतां सर्वांनां समजली. तें वर्तमान ऐकून गोकुळांतील लोक कृष्णवियोगामुळें दुःखी झाले, विशेषतः स्त्रियांनां फार दुःख होऊं लागलें. त्या म्हणाल्या; "हा कंसाचा दूत नांवानें अक्रूर आहे, पण कृतीनें अत्यंत क्रूर आहे. हा निष्ठुर येथें कशाला आला? गोकुळाचें भूषण असा कृष्ण, ज्यानें गोकुळावरील अनेक संकटें निवारण केलीं, त्या आमच्या संरक्षणकर्त्याला नेण्यासाठीं हा काळ कोठून आला? कंस अत्यंत दुष्ट, घातकी व कपटी आहे, तो कृष्णाचा नाश केल्यावांचून कधींहि रहाणार नाहीं." अशा अनेक प्रकारच्या कुशंका गोकुळांतील स्त्रीपुरुषांच्या मनांत येऊन त्यांचीं मनें भीति, वियोग व दुःख यांनीं विव्हल झालीं. कृष्णानें जाऊं नये म्हणून त्यांनीं फार खटपट केली, परंतु कृष्ण व बलराम हे कोणाचेंहि न ऐकतां जाण्यास तयार झाले. तेव्हां सर्व लोक हताश होऊन अश्रु गाळूं लागले, व अक्रूराला शिव्याशाप देऊं लागले. कृष्णानें त्यांची समजूत करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु त्याचा कांहीं उपयोग होईना; प्रभुमायेनें सर्वजण इतके मोहून गेले होते कीं, त्यांस कृष्णाचा वियोग असह्य वाटून अनेक स्त्रिया रथाखालीं आडव्या पडल्या; तेव्हां श्रीकृष्ण रथ उभा करून रथाखालीं उतरले व त्यांनीं सर्वांनां आत्मप्रतीति दाखवून त्यांची भीति दूर केली. भक्ताजवळ श्रीकृष्ण नेहमीं वास करितो अशी समजूत पडतांच सर्व लोक समाधानानें परत फिरले व श्रीकृष्ण, बलराम, नंद, अक्रूर वगैरे सर्व मथुरेस निघून गेले.

मथुरेच्या मार्गाला लागल्यावर अक्रूरानें कृष्णाला कंसाचें सर्व कपट कथन केलें. व कंसाच्या कृतीबद्दल आपणास फार दुःख होत असल्याचें दर्शविलें. अक्रूराची ती निःसीम भक्ति पाहून कृष्णाला आनंद झाला. परंतु त्यास आपली खरी शक्ति माहीत नसल्यामुळें वाईट वाटत आहे, हें लक्षांत घेऊन

श्रीकृष्णानें अक्रूरावरील भ्रमपटल दूर करून त्यास आपलें खरें रूप दाखविलें. त्यावेळीं अक्रूराला सर्व जग कृष्णमय दिसूं लागलें. सर्वत्र दिसणारी कृष्णाची ती अनुपमेय सर्वांगसुंदर इंद्र नीलमण्याप्रमाणें सतेज श्यामल मूर्ति पाहून अक्रूर आश्चर्यचकित झाला. शंख, चक्र, गदा, पद्म हीं चार आयुधें चारही हातांत असून गळ्यांत कौस्तुभमणि व हृदयावर वैजयंतीमाला रुळत आहे, कटिप्रदेशीं पितांबर आहे, कानांत कुंडलें डुलत आहेत, असें तें प्रभूचें रम्य रूप पाहून अक्रूर आपली काळजी पार विसरून गेला व प्रभूच्या त्या स्वरूपांतच मग्न झाला. याप्रमाणें हळूहळू मार्ग क्रमित नंदादिक सर्व मंडळी यमुनेच्या कांठीं येऊन पोहोंचली. यमुनेचें तें निर्मल व विपुल पाणी पाहून सर्वांनीं प्रातर्विधि आटोपून स्नानसंध्येला आरंभ केला. अक्रूरानेंहि पाण्यांत बुडी मारून ईश्वराचें स्मरण केलें; तों त्याला पाण्यांत सर्वत्र श्रीकृष्णाची मूर्ति दिसूं लागली. तो प्रकार पाहून अक्रूर अत्यंत विस्मित झाला, व तो मनांत म्हणाला, आतां मी पूजा व संध्या कोणाची करूं, नैवेद्य कोणाला दाखवूं, नमस्कार कोणाला करूं, तें मला तर आतां समजेनासें झालें आहे. सर्वच कृष्ण दिसतात तेव्हां कोणत्या कृष्णाची आराधना करावी, हें कळावयाला कठिण आहे. याप्रमाणें विस्मित होऊन अक्रूर यमुनेंतून बाहेर निघाल्यावर श्रीकृष्ण हंसूं लागला. तो अक्रूराला जवळ बोलावून घेऊन ह्मणाला; " अक्रूरा ! तूं मथुरेंतून निघालास तेव्हांपासूनची सर्व हकीकत मला माहीत आहे. कंसासंबंधानें तूं मुळींदेखील काळजी करूं नको. त्याच्या वधाची मी सर्वप्रकारें तयारी केली असून हा धनुर्याग हें माझ्याच प्रयत्नाचें फल आहे." याप्रमाणें अक्रूराची भीति दूर केल्यावर ही सर्व मंडळी पुढें निघाली व मथुरेजवळ एक उपवन होतें त्या उपवनांत उतरली. कृष्णानें व बलरामानें आपल्या घरीं उतरावयाला यावें, ह्मणून अक्रूरानें, कृष्णाची फार विनंति केली, परंतु तो प्रसंग तसें करावयाला अनुकूल नसल्यामुळें कृष्णानें ती त्याची विनंति अमान्य केली व त्याला नगरांत जाण्याला निरोप दिला. इकडे श्रीकृष्ण व बलराम आतां नगरांत कसा प्रवेश करावयाचा याचा विचार करीत असतां, राजाचा परीट कपडे धुवून येतानां त्यांच्या दृष्टीस पडला, तेव्हां ते कपडे अंगावर घालून राजवाड्यांत प्रवेश करावा असें त्यांनीं ठरविलें. ते राजाचे कपडे मिळावेत म्हणून त्यांनीं त्या परिटाची पुष्कळ विनवणी केली; परंतु तो ऐकेना तेव्हां उभयतां रामकृष्णांनीं त्या परिटाला ठार मारिलें व त्याचे कपडे घेऊन तेथून पलायन केलें; नंतर गोपाळांनां ते कपडे घालण्यास देऊन रामकृष्णांनींहि योग्य असे कपडे आपल्या अंगांत घातले.

याप्रमाणें जनमेजय राजाला वैशंपायन ऋषि श्रीकृष्णाची कथा सांगत असतां, जनमेजय मध्येंच म्हणाला; " वैशंपायन ऋषि ! श्रीकृष्ण भगवान् ह्मणजे सर्व कांहीं जाणते, असें असता त्या गरीब बिचाऱ्या परिटाचा त्यांनीं वध

वध केला ? ” ही जनमेजय राजाची शंका ऐकून वैशंपायन ह्मणाले; “ राजा ! भगवान् कारणावांचून कोणाचाहि नाश करणार नाहींत. या परिटाचा नाश करण्याचें कारण असें होतें कीं, रामअवतारामध्यें, रावणानें सीतेला बलात्कारानें अरण्यांतून नेऊन लंकेंत आपल्या घरीं बरेच दिवस ठेविलें होतें. पुढें रामानें रावणाचा नाश करून तिला तेथून परत आणिलें. यानंतर शहरांत लोक काय म्हणतात, तें ऐकण्यासाठीं रामचंद्राचे हेर रात्रीचे गुप्त वेषानें हिंडत असतां एका परिटाचे घराजवळ उभे राहिले, त्या परिटाची स्त्री पळून बरेच दिवस आपल्या माहेरीं निघून गेली होती, ती त्या दिवशीं परत आपल्या पतीकडे आली होती. तेव्हां त्या स्त्रीयेची सासू परिटाला ह्मणाली; “ अरे ! ही कौटाळीण नेहमीं अशीच बाहेर जाते हिला आतां तूं मुळींच घरांत घेऊं नकोस; ” आपल्या आईचें तें बोलणें ऐकून त्या परिटानें आपल्या स्त्रियेला घराच्या बाहेर घालवून दिलें व ह्मणाला; “ लोकांच्या घरांत पुष्कळ दिवस राहिलेल्या सीतेला घरांत घेणारा मी तो रामराजा नाहीं. ” त्या परिटाचे ते शब्द ऐकून दूतांनीं ती हकीकत रामाला सांगितली. तें ऐकून रामाला फार वाईट वाटलें व रामानें जनापवादास्तव सीतेला शुद्धीसाठीं अरण्यांत पाठवून दिलें. तो पूर्वसंबंध असल्यामुळें या वेळीं त्या दुष्ट परिटाचा कृष्णानें नाश केला.

याप्रमाणें कृष्णानें परिटाचा नाश केल्यावर कृष्ण, बलराम व गोपाळ यांनीं नगरांत प्रवेश केला. मथुरा शहरांतून हे सर्व गोपाळ चालले असतांनां वाटेंत सुदामा माळी राजाकडे फुलें घेऊन जात असतांना भेटला. तो श्रीकृष्णाचा परमभक्त होता. कृष्णानें त्याच्याजवळ फुलें मागितल्यावर तीं त्या सुदामा माळ्यानें कृष्णाला मोठ्या संतोषानें अर्पण केलीं, व ह्मणाला; “ हे नारायणा ! तुझें प्रत्यक्ष दर्शन घडावें व तुझी पूजा करून तुला दोन फुलें वहावींत ह्मणून मोठमोठे तपोनिधी कित्येक वर्षे तुझी तपश्चर्या करितात तरी तुझें दर्शन होत नाहीं. तो तूं परब्रह्म आदिपुरुष प्रत्यक्ष मला भेटून स्वतः मजजवळ फुलें मागत आहेस यापेक्षां अधिक तें काय पाहिजे ? ” असें ह्मणून सुदामा माळ्यानें कृष्णाच्या चरणांवर मस्तक ठेविलें. व तो कृष्णाचा निरोप घेऊन तेथून निघून गेला. नंतर श्रीकृष्ण व बलराम गोपाळांसह पुढें चालले असतांनां त्यांना कुब्जा ( रामावतारांतील मंथरा, ) भेटली. ती शापामुळें कुब्जा झाली होती. ती त्यावेळीं राजवाड्यांत चंदन उगाळून घेऊन जात होती, तिला अडवून कृष्णानें चंदन मागितलें, तेव्हां त्या कुरूप स्त्रियेनें आपल्या हातानें तें चंदन कृष्णाच्या अंगाला मर्दन केलें, व कृष्णानें आपणाजवळ चंदन मागितलें याबद्दल संतोष प्रदर्शित केला. त्या कुब्जेची ती भक्ति पाहून श्रीकृष्ण प्रसन्न झाला व त्यानें तिच्या पायाच्या अंगठ्यावर पाय ठेविला व डाव्या हातानें हनुवटी धरून तिला वर उचलून सरळ केलें. त्या-

बरोबर ती कुरूप कुब्जा एखाद्या सर्वांगसुंदर देवांगनेप्रमाणें दिसूं लागली. ती सुखकारक अवस्था तिला प्राप्त झाल्यावर त्या कुब्जेला कामवासना उत्पन्न झाली व ती कृष्णाचा हात धरून माझा स्वीकार कर, असें ह्मणाली." तेव्हां श्रीकृष्ण भगवान् ह्मणाला; "कुब्जे! मी कांहीं कार्यासाठीं कंसाकडे जात असल्यामुळें ब्रह्मचर्यव्रताचा स्वीकार केला आहे. तेव्हां मी ज्या कार्याला जात आहें तें कार्य होईपर्यंत मला तुझा स्वीकार करितां येत नाहीं. कंसाकडून परत आल्यावर मग तुझा स्वीकार करीन." याप्रमाणें कुब्जेला सांगून श्रीकृष्ण भगवान् व बलराम, गोपाळांनां मागें ठेवून धनुर्यागमंडपांत आले. तो मंडप अत्यंत विस्तृत असून अनेक प्रकारच्या सुंदर सुंदर वस्तूंनीं शृंगारिला होता. तेथें अनेक प्रकारची कसरत करणारे असंख्य मल्ल लोक आले होते. त्या मल्लसमूहांत रामकृष्ण आल्याबरोबर त्यांच्या प्रशांत व सतेज मूर्ति पाहून सर्व मल्ल भयभीत होऊन गेले. मंडपाच्या मध्यभागीं अनेक प्रकारची खेळण्याची सामग्री ठेविली होती. त्यांत दोन प्रचंड धनुष्यें होतीं, तीं दोन्हीं धनुष्यें कृष्णानें एक व बलरामानें एक अशीं गुण चढवून पहिल्या धडाक्यालाच मोडून टाकिलीं. तीं प्रचंड धनुष्यें मोडल्यामुळें मेघांच्या गडगडाटाप्रमाणें मोठा आवाज झाला. तो रामकृष्णांचा पराक्रम पाहून सर्व लोक चकित झाले व कंसानें तेथें जे कांहीं मल्ल कृष्णाच्या नाशासाठीं टेविले होते ते कृष्णाच्या व बलरामाच्या अंगावर धांवून गेले. तेव्हां कृष्णानें व बलरामानें मंडपाचे स्तंभ उपटून सर्व मंडप पाडून टाकिला; त्या मंडपाखालींच कंसाचे कित्येक लोक मेले. जे कांहीं थोडे फार कृष्णाचा नाश करण्यास तयार झाले होते, त्यांनां बलरामानें मंडपाच्या स्तंभानें ठार केलें. जे कांहीं थोडे जिवंत राहिले, ते राजवाड्यांत कंसाकडे धांवत धांवत गेले व त्याला घडलेली सर्व हकीकत सांगू लागले. ते ह्मणाले; "हे कंसा! कोणी दोन तरुण कुमार यागमंडपांत येऊन त्यांनीं सर्व यागाचा विध्वंस करून मंडप मोडून टाकिला आणि मल्लसमूह मारून टाकिला." इतक्यांत तेथें कांहीं परीट आले व तें सांगूं लागले किं, "हे कंसा! आमच्या मधील मुख्य परिटाला दोन तरुण मुलांनीं मारून राजघराण्यांतील अमूल्य वस्त्रें घेतलीं. इतक्यांत सुदामा माळी फुलें गेल्याचें सांगूं लागला व कुब्जा उटी गेल्याचें सांगू लागली. ती सर्व हकीकत ऐकून कंस मोठ्या विचारांत पडला, व पुढें काय करावें याचा तो सचिंत अंतःकरणानें विचार करूं लागला.

---

# अध्याय ७ वा.

## १. कंसवध कथा.

वैशंपायन ऋषि जनमेजय राजाला ह्मणाले; "हे राजा! कृष्णाचा तो पराक्रम ऐकून कंस मनांत भीतीनें व्यग्र होऊन गेला. अक्रूराला पाठवून कृष्णाला आपण निष्कारण पाचारण केलें असें त्याला वाटूं लागलें. त्यानें आपल्या प्रधानास बोलावून या संकटांतून पार पडण्याचा मार्ग काय असें विचारिलें. कंसाचें प्रधानमंडळहि कंसाप्रमाणेंच अप्रबुद्ध व धन्याचें धोरण पाहून वागणारें होतें. त्यांनीं कंसाला अशी सल्ला दिली कीं, नंद, बलराम व कृष्ण हे हल्लीं येथें आहेत, तेव्हां आपलें सैन्य गोकुळावर पाठवून सर्व गोकुळाचा विध्वंस करून टाकावा; तेथील स्त्रियांनां अत्यंत त्रास द्यावा, व गायी, गुरें वगैरे चोरून आणावीं, वसुदेव व देवकी यांनां ठार मारावें; ह्मणजे नंद व कृष्ण वगैरे सर्व आपणास शरण येतील. शिवाय कृष्णाला इकडेच गुंतवून धरण्यासाठीं उद्यां राजवाड्यांत मल्लांनां बोलवावें व साधल्यास त्याच वेळीं युक्तीप्रयुक्तीनें कृष्णाचा नाश करावा." प्रधानांनीं ही दिलेली सल्ला कंसाला पसंत पडली व त्याप्रमाणें करण्याचें त्यानें ठरविलें.

दुसरे दिवशीं उजाडल्यावर कंसानें मल्लांच्या नायकाला बोलावून आणून राजवाड्यांत सर्व तयारी करण्यास सांगितलें व कांहीं सैन्याला गोकुळावर जाण्याचा हुकूम केला. इकडे हें वर्तमान श्रीकृष्णाला ताबडतोब कळलें. त्यांनीं गोकुळाच्या संरक्षणाची व्यवस्था गोपाळांकडे सोंपवून स्वतः कंसाच्या राजवाड्यांत जाण्याची तयारी केली. श्रीकृष्ण व बलराम दोघेहि नंदाला नमस्कार करून मथुरेंतील कंसाचे राजवाड्यांत जावयास निघाले. श्रीकृष्ण व बलराम असे उभयतां जेव्हां मथुरा नगरीच्या भव्य रस्त्यानें राजवाड्याकडे जाऊं लागले, तेव्हां त्या दोघां सुंदर तरुणांना पाहून नगरवासी लोक हळहळूं लागले. कित्येक स्त्रीपुरुष कंसाला शिव्याशाप देऊं लागले, कित्येक त्या बालकांवरील संकट टळावें म्हणून ईश्वराची करुणा भाकूं लागले, कित्येक त्यांनां आशीर्वाद देऊं लागले. याप्रमाणें सर्व नगरवासी जनांकडून बलरामाचें व कृष्णांचें अभीष्टचिंतन होत होतें. बलराम व कृष्ण ज्या मार्गानें जात होते, त्याच मार्गावर सुदामा माळ्याचें घर होतें. श्रीकृष्ण भगवान् जात आहेत असें पहातांच सुदामानें धावत येऊन श्रीकृष्णाचे चरणावर लोटांगण घातलें. व आपल्या घरीं यावें अशी त्यानें विनंति केली. तेव्हां कृष्णानें त्याची विनंति मान्य करून ते दोघे त्याच्या घरीं गेले. तेथें सुदामा माळ्यानें व त्याच्या स्त्रीयेनें दोघांची पूजा करून त्यांचा यथाशक्ति गौरव केला. नंतर श्रीकृष्ण व बलराम तेथून राजवाड्याकडे जावयास निघाले.

## २. मुष्टिक–चाणूरांचा संहार.

राजवाड्याजवळ रामकृष्णांच्या दर्शनासाठीं हजारों प्रेक्षक जमले होते. त्या दोघां तरुणांनां पाहून त्या लोकांनां मोठें कौतुक वाटलें. ते लोक जरी कंसाचे प्रजाजन होते, तरी त्याच्या जुलमाला ते त्रस्त झाले होते. कृष्णाला पाहिल्या-बरोबर साहजिक त्यांनीं कृष्णाचा जयजयकार केला. तेथें अनंत प्रकृतीचे लोक होते. त्या प्रत्येकाला बलरामकृष्णाची मूर्ति त्यांच्या त्यांच्या हेतूप्रमाणें दिसत होती. चाणुर–मुष्टिक वगैरे जे मल्ल कृष्णाचे द्वेष्टे होते त्यांनां श्रीकृष्ण व बलराम पर्वताप्रमाणें विशाल दिसूं लागले, साधूंना ते दोघे शांत दिसूं लागले, स्त्रियांनां मदनाप्रमाणें, मुनिवृंदांनां विश्वरूप आदिपुरुषाप्रमाणें, गौळ्यांनां गोपांप्रमाणें, वृद्धांनां लहान मुलांप्रमाणें, दुष्टांनां प्रत्यक्ष काळाप्रमाणें, योग्यांनां ध्यानांतील योगमूर्तीप्रमाणें अशाप्रकारें ज्यांना त्यांना वेगवेगळे दिसूं लागले, सांख्य मतानुवादी होते त्यांना ते सर्वत्र दिसूं लागले, व भक्तांनां परमेश्वराप्रमाणें, दिसूं लागले. कित्येक अज्ञ लोक ह्या सुकुमार बालकांचा कंस आतां नाश करणार अशी कल्पना मनांत आणून दुःख करूं लागले. याप्रमाणें श्रीकृष्ण व बलराम असे उभयतां लोकांस दर्शन देत देत राजवाड्याच्या भव्य दरवाजा-जवळ येऊन दाखल झाले. तेथें एक महात प्रचंड हत्ती घेऊन उभा होता. त्याला श्रीकृष्ण म्हणाला; "अरे महाता! हत्ती जरा बाजूला घे, आम्हाला राजवा-ड्यांत जावयाचें आहे." तेव्हां महात उपहासदृष्टीनें हंसून ह्मणाला; "अरे गवळ्याच्या पोरांनों! रानांत गोट्या खेळावयाच्या टाकून तुम्हाला या मल्लां-बरोबर खेळण्याची दुर्बुद्धि कोठून आठवली? तुह्मी या हत्तीला जर येवढे भ्यालांत तर पुढें काय करणार, तें येथेंच दिसतें आहे." असें ह्मणून त्या महातानें आपला हत्ती उभयतां रामकृष्णांच्या अंगावर घातला. तेव्हां कृष्णानें महाताला खालीं ओढलें व एका ठोशानें त्याला यमसदनाला पाठविलें. इकडे हत्ती आपल्या शुंडेनें बलरामाला कवटाळण्याकरितां पाहूं लागला, तेव्हां बलराम त्याची सोंड धरून त्याला खेळवूं लागला. बळरामाची ती लीला पाहून कृष्ण ह्मणाला; "रामा! ही खेळत बसण्याची वेळ नाहीं, जो आडवा येईल त्याला पहिल्या धडाक्याला यमसदनाला पाठवावें व पुढें मार्ग काढावा." असें ह्मणून कृष्णानें त्या हत्तीची सोंड धरली व त्याला खालीं पाडलें. ज्यानें गोवर्धनासारखा प्रचंड पर्वत वामकरांगुलीवर उचलून धरिला होता त्याला हत्तीला उचलून फेंकून द्यावयाला किती वेळ लागणार? कृष्णानें हत्तीला खालीं पाडल्यावर बळ-रामानें त्या हत्तीचे दोन्ही दांत उपटून काढिले. दांत उपटतांच हत्तीच्या मस्तकांतून मोठा रक्तप्रवाह वाहूं लागला व जिकडे तिकडे रक्त होऊन गेलें. दोघां-च्याहि हातांत कांहीं हत्यारें नव्हतीं तेव्हां हत्तीनें आपले दांत देऊन आमच्यावर उपकारच केले असें समजून कृष्णानें व बलरामानें आपल्या हातांत हत्तीचे प्रचंड

दांत घेतले व राजवाड्यांत प्रवेश केला. तेथें चाणूर, मुष्टिक, कपट, जेटी, सकुळ वगैरे कंसाचे दुष्ट मल्ल कृष्णाची वाट पहातच बसले होते. रामकृष्ण आल्याबरोबर चाणूर उठून मध्यभागीं आला व त्यानें कृष्णाला मल्लयुद्धासाठीं पाचारण केलें. तो म्हणाला; " कृष्णा ! इतके दिवस तुझी मल्लविद्येंत कीर्ति ऐकत होतों, तो तूं आज प्रत्यक्ष मजबरोबर युद्ध खेळावयास ये. आमच्याकडच्या क्षुद्र क्षुद्र मल्लांनां तूं मारिलें व त्यामुळें, आपण मोठे बलवान् आहों असें तुला वाटत असेल, पण आज माझ्याशीं गांठ आहे. आंब्याच्या फळाप्रमाणें तुम्हां दोघांनां गिळून टाकीन, किंवा हरभरे दांतांखालीं जसे चावून खातात त्याप्रमाणें तुम्हां दोघांनां चावून टाकीन. तुम्हीं दोघे अद्यापि लहान मुलें अहांत, तुमची मला फार दया येते, निष्कारण माझ्या हातानें मरण्यापेक्षां कंसाच्या बंदिशाळेंत राहून सुखानें जिवंत रहा." चाणुराचें हें भाषण ऐकून श्रीकृष्ण म्हणाले. " चाणुरा ! तूं बोलण्यांत मोठा चतुर आहेस, आम्हीं डोंगरावर राहणारे रानटी भिल्ल आहोंत, आम्हांला हें असें बोसावयाचें माहीत नाहीं, थोडी फार मल्लविद्या जाणतों, तर तूं आतां बोलण्यांत वेळ न घालवितां एकदम युद्धालाच आरंभ कर." असें म्हणून श्रीकृष्णानें त्या चाणुरावर मुष्टीचा आघात केला, त्याबरोबर तो मदमत्त चाणूर गतप्राण झाला. हा प्रकार पहातांच बाकीचे मल्ल मनांत भयभीत होऊन चकित झाले. मग मुष्टिक नांवाचा मल्ल बलरामाशीं मल्लयुद्ध खेळण्यासाठीं उठला, तोहि बलरामाला चाणूराप्रमाणें वीरश्रीच्या लांबलांब गोष्टी सांगूं लागला, तेव्हां बलरामानें त्याचे दोन पाय धरून त्याला उभा चिरून फेंकून दिला. तें भयंकर कृत्य पाहून तर सर्व वीर गर्भगलितच होऊन गेले. तथापि धीर धरून शल, तोशल, कट, याप्रमाणें तिघे वीर एकदम उठले, व त्या दोघांवर धावून आले. तेव्हां कृष्णानें एक बुक्की मारून शलाला भूमीवर पाडलें, परंतु पुनः तो तसाच उठून कृष्णावर धावून आला, त्याबरोबर दुसरी बुक्की मारली. त्या आघातानें तो उन्मळून पडणाऱ्या एखाद्या वृक्षाप्रमाणें जमनीवर पडला. व त्याच्या मुखांतून रक्त वाहूं लागलें. शेवटीं थोडा वेळ तरफड करून त्यानें प्राण सोडिला. शलाचा याप्रमाणें नाश झाल्यावर त्या शलाचा बंधु तोशल ह्मणून होता, तो कृष्णाचे अंगावर धावून आला, तेव्हां कृष्णानें त्याला धरून जवळ उभें केलें व-" आतां कसा वांचशील-ह्मणून त्याला प्रश्न केला." तोशल कृष्णाच्या अंगावर जोरानें मुष्टिप्रहार करूं लागला, परंतु पर्वतावर मुष्टीचा आघात केला असतां जशी स्थिति होते, त्याप्रमाणें त्या तोशलाच्या हातालाच इजा झाली, व श्रीकृष्ण मात्र स्वस्थ उभे राहून मौजेनें हंसूं लागले. तेव्हां बलराम कृष्णाला ह्मणाला; " कृष्णा ! असें खेळत बसून चालणार नाहीं, आपणास हजारों दुष्टांचा संहार करावयाचा आहे, तेव्हां पटापट प्रत्येकाचा

निकाल लावला पाहिजे." हें बलरामाचें भाषण ऐकतांच कृष्णानें तोशलाच्या मस्तकावर हत्तीचा दांत मारला, त्याबरोबर त्याच्या मस्तकाचा चेंदामेंदा होऊन त्यानें प्राण सोडला. इकडे कूट त्वेषानें धावून येऊन त्यानें बलरामाचे अंगाला मिठी मारली. त्याबरोबर बलरामानें त्याला भूमीवर पाडून छातीवर लत्ताप्रहार केला. त्यासरशें कूटाच्या मुखांतून भडभडां रक्त वाहूं लागलें; व हृदय विदारल्यामुळें सर्व आंतडीं बाहेर पडून तो मरण पावला. तेथें अनेक वीर मरून पडले, व तें स्थान अत्यंत भयंकर दिसूं लागलें. तो रामकृष्णाचा विलक्षण पराक्रम पाहून तेथें जमलेले हजारों मल्ल गर्भगळित झाले व येथें बसण्यापेक्षां पळून जाणें बरें, असा विचार करून ज्याला जिकडून वाट मिळेल तिकडून तो पळ काढूं लागला. तेव्हां कृष्ण व बलराम दोघेजण दोन द्वारें अडवून उभे राहिले. एका महाद्वाराजवळ कृष्ण उभा राहिला, व दुसऱ्या महाद्वाराजवळ बलराम उभा राहिला, आणि दोघांनीं हातांतील हत्तीच्या दातांनीं त्यांस झोडपण्यास आरंभ केला. जे मल्ल जिवाची आशा धरून रस्त्यानें पळत चालले होते, त्यांनां शहरांतील लोक विचारूं लागले; "अहो मल्ल हो! तुह्मीं असे कां पळतां?" तेव्हां ते ह्मणाले; "अहो राजवाड्यांत प्रत्यक्ष महामारीच उत्पन्न झाली आहे, त्या गोकुळांतल्या दोन पोरांनीं शेंकडों मल्ल मारिले, त्यांच्या धाकानें आह्मी पळत आहोंत." ती त्या मल्लांची विटंबना पाहून नगरवासी लोक खदखदां हंसूं लागले. इकडे राजवाड्यांत रामकृष्णांनीं थोडक्याच वेळांत हजारों मल्लांचा संहार केला. तो भयंकर प्रकार पाहून कंस गतधैर्य झाला. तरी उसनें अवसान आणून सिंहासनावर बसल्या बसल्या मोठ्यानें ओरडून तो आपल्या सैनिकांना म्हणाला; "अहो वीर हो! पाहतां काय? तुम्हीं इतकेजण अजिंक्य वीर असतां या पोरांची बिशाद काय? तुम्हीं सर्वजण एकत्र होऊन त्या दोघांवर एकदम हल्ला करा." असे बोलत आहे तोंच कृष्ण व बलराम दोघेहि कंसावर रोख धरून आले. त्यांना वाटेंत जे वीर आडवे आले त्यांनां त्यांनीं क्षणार्धांत यमपुरीला पाठविलें. तेव्हां कंस मोठ्यानें गर्जना करून म्हणाला; "अहो वीरहो, धांवा धांवा, ह्या दुष्टांनां अगोदर धरा आणि ज्या बंदिशाळेंत वसुदेवदेवकीला ठेविलें आहे, तेथें नेऊन यांचा वध करा. नंदासह सर्व गोपाळांनां धरून त्यांनां ठार मारा. या गोकुळांतल्या लोकांचा मी गौरव करून धनुर्यागाच्या समारंभासाठीं यांनां बोलाविलें, तर हे माझ्यावरच उलटून माझा नाश करण्यास प्रवृत्त झाले! हे अशा प्रकृतीचे लोक मी निष्कारण मथुरेंत बोलावून त्यांनां पोशिलें. माझें खाऊन, माझा पाहुणचार घेऊन आणि माझ्या नगरांत राहून हे माझ्या जिवावर उठले आहेत. हे वीर हो! या कृतघ्नांचा आतांच्या आतां नाश करा. गोकुळां-

तला जो कोणी हातीं सांपडेल, त्याचा नाश करा, गोकुळाला आग लावा, त्या गवळ्यांची सर्व संपत्ति लुटून आणा." याप्रमाणें कंस गर्जना करून बोलत होता, पण त्याचें बोलणें ऐकून कोणालाही स्फुरण चढेना. सर्व वीर कृष्ण बलरामाचा अपूर्व पराक्रम पाहून गर्भगलित झाले होते, परंतु जे अवसान धरून पुढें आले त्यांचा रामकृष्णानीं तत्काल नाश केला. कित्येक पळून गेले व कित्येक घायाळ होऊन तेथेंच तळमळत पडले. याप्रमाणें रस्ता मोकळा करून श्रीकृष्ण व बलराम दोघेहि कंसाच्या सिंहासनाजवळ जाऊन उभे राहिले.

## ३. कंसवध.

कृष्ण जवळ आला असें पाहून सिंहासनावर बसलेला कंस, भीतीनें, दुःखानें, व संतापानें वेडा झाला. तो सिंहासनावरून उतरून सुरक्षितपणासाठीं मार्ग शोधूं लागला, परंतु काय करावें तें त्याला सुचेना. पळून जाण्याकरितां तो मार्ग शोधूं लागला, पण जिकडे तिकडे त्याला श्रीकृष्ण दिसूं लागला. शेवटीं श्रीकृष्णानें त्याचे केश आपल्या हातांत धरून 'कोणीकडे पळून जातोस' म्हणून त्याला प्रश्न केला. तो प्रसंग पाहून कंस अभिमानानें आपली सुटका करण्याचा प्रयत्न करीत ह्मणाला; "कृष्णा! विचार कर, माझी अप्रतिष्ठा करून निष्कारण अग्नीवर तूप ओतीस आहेस. आजपर्यंत तूं गोकुळांतील गुरें चारणारा गवळी ह्मणून मी तुला जिवंत ठेविलें; पण तें जीवित तुला आज नकोसें झालें आहे असें वाटतें. आणि म्हणूनच तूं माझ्याशीं एवढी दांडगाई करीत आहेस, परंतु मशका! गांठ सिंहाशीं आहे हें कसें तुला ओळखितां येत नाहीं?" याप्रमाणें कंस तोंडानें बाष्कळ प्रलाप करीत केश सोडण्याचा प्रयत्न करूं लागला; परंतु कृष्णाच्या हातांतील शेंडी त्याच्यानें सोडवेना; शेवटीं श्रीकृष्णानेंच वीराची अशी अप्रतिष्ठा करणें बरोबर नव्हे असें जाणून त्याची शेंडी सोडून त्याला मोकळें केलें व तो कंसाला ह्मणाला; "कंसा! तुझे हे नुसते केश आकर्षण करूनही मी तुझा प्राण घेतला असता, परंतु अशा रीतीनें तुझा नाश करणें हें वीराचें खरें कर्तव्य नव्हे, ह्मणून मी तुला मोकळा सोडून दिला आहे, तर नीट तयारी कर. आपली सर्व शक्ति एके ठिकाणीं कर, आणि तुला ज्या कांहीं युक्तिप्रयुक्तीनें माझा नाश करावयाचा असेल त्याची योजना कर." श्रीकृष्णाचे ते उद्गार ऐकून कंसाला अत्यंत संताप आला व एखाद्या पिसाळलेल्या सिंहाप्रमाणें तो कृष्णावर धांवला. तेव्हां कृष्णानें सहज लीलेनें त्याच्या छातींत एक बुक्की मारली; त्याबरोबर कंस लांब जाऊन पडला. परंतु तो पुन्हा उठला व हातांत तलवार घेऊन कृष्णाच्या अंगावर धांवून आला. तेव्हां कृष्णानें त्याचा हात धरून तलवार काढून घेतली व त्याला ह्मणाला; "कंसा! ही तलवार तूं आणून दिलीस हें फार चांगलें केलेंस, ही तुझीच तलवार आतां तुझाच प्राण घेण्यास तयार होईल. पण या अशा निर्जन स्थळीं तुझा वध करणें बरें नव्हे, ह्मणून आतां तुला

रस्त्यावर ओढून नेतों, आणि हजारों लोकांसमक्ष इहलोकांतून कायमचा नाहींसा करितों. '' असें ह्मणून कृष्णानें कंसाला राजवाड्याबाहेर भररस्त्यावर ओढीत नेऊन मोकळें सोडलें. कंस मोकळा होतांच पुन्हां कृष्णाच्या अंगावर धावून गेला. तेव्हां कृष्णानें आपले हातांतील तलवार बलरामाचे हातांत दिली व आपण निःशस्त्र झाला. आणि कंसाचे दोन्ही हात धरून त्यास दूर ढकलून दिलें. याप्रमाणें दोन तीन वेळ ढकलिलें. नंतर कृष्ण अचळ उभा राहिला व कंसाला आपल्या शक्तीची पराकाष्ठा करण्याला मोकळीक दिली. कंस आपली पराकाष्ठा करून कृष्णाला खालीं पाडण्याचा प्रयत्न करीत होता, परंतु एकाद्या मुलाला खेळवावें त्याप्रमाणें कृष्ण त्याच्या प्रत्येक तोडीला तोड देऊन त्याला खेळवूं लागला. तेव्हां तो युद्धचमत्कार पहाण्यासाठीं आकाशांत देवांच्या विमानांची गर्दी झाली. बराच वेळ याप्रमाणें कृष्णानें कंसाला खेळविल्यावर त्याला खालीं पाडिलें व त्याच्या छातीवर बसून त्याचा कंठनाळ कापून, मस्तक दूर फेंकून दिलें. याप्रमाणें कंस मृत्यु पावल्यावर सर्वांनीं कृष्णाचा जयजयकार केला. कंसासारखा दुष्ट, जुलमी व प्रजेला छळणारा राजा मृत्यु पावल्यामुळें सर्व लोकांना साहजिक मोठा आनंद झाला. स्वर्गांत दुंदुभी वाजूं लागल्या. यक्ष, गंधर्व जयघोष करूं लागले, व देव आकाशांतून कृष्णावर पुष्पवृष्टि करूं लागले. अशा प्रकारें कंसाचा वध केल्यावर त्याचे सहा प्रधान होते ते कृष्ण व बलराम यांच्या अंगावर धावून आले. तेव्हां कृष्णानें व बलरामानें गजदंताच्या आघातानें त्यांस ठार केलें. कंसाप्रमाणेंच त्याच्या सर्व प्रधानांचा निकाल लागलेला पाहतांच नगरांतील लोकांना अत्यानंद झाला. या दुष्टांच्या जुलमापासून कृष्णानें आपली सुटका केली असें वाटून हजारों लोक कृष्णाचा गौरव करण्यासाठीं एकत्र जमले. कित्येक हातांत पताका घेऊन नाचूं लागले; कित्येक नौबती, तुताऱ्या, शिंगें वगैरे वाद्यें वाजवूं लागले. त्या वाद्यगजराच्या मिरवणुकींतून श्रीकृष्ण व बलराम,—त्यांच्या शरिरावरील सर्व कपडे रक्तानें भिजल्यामुळें—उदयकाळच्या आरक्त सूर्यबिंबाप्रमाणें भासत होते. याप्रमाणें इकडे लोकसमूह आनंदांत मग्न झाला असतां तेथें कंसाच्या राण्या आक्रोश करीत आल्या. कंसाचा छिन्नभिन्न झालेला देह पाहून त्यांनीं मोठ्यानें हंबरडा फोडिला व आपलीं शरीरें धाडकन पृथ्वीवर टाकून त्या मस्तक बडवून घेऊं लागल्या. त्यांच्या दुःखास पारावार राहिला नाहीं. आपला सौभाग्यतिलक नष्ट झाला म्हणून त्या कंसाचे गुणानुवाद गाऊन शोक करूं लागल्या व आपल्या प्राक्तनाला दोष देऊं लागल्या. कंसाच्या प्रेताला कवटाळून त्या म्हणाल्या; "प्राणनाथ ! आतां आपल्या पश्चात् आह्मीं कसे दिवस कंठावेत? आपणाला वैकुंठाची प्राप्ती झाली, पण आह्मांला तर आतां इहलोक हाच नरकाप्रमाणें भासत आहे. आपण गेल्यामुळें हें सर्व जग आह्मांला शून्य दिसत

आहे. आमचा सौभाग्यसूर्य मावळला, आतां आह्मांस या जगांत राहून काय करावयाचें आहे ! ” याप्रमाणें विलाप करून त्या क्षणोक्षणीं मूर्छित होऊं लागल्या. त्या स्त्रियांची ती पतिनिष्ठा पाहून कृष्णाला त्यांची दया आली. त्यानें त्या स्त्रियांना योग्य असा उपदेश करून त्यांचें दुःख कमी केलें. मग कृष्णानें त्या स्त्रियांकडून कंसाची और्ध्वदेहिक क्रिया करविली. कंसाला श्रीकृष्णाच्या हातानें मृत्यु आलेला असल्यामुळें त्याला मोक्षाची प्राप्ति झाली, हें निराळें सांगावयास नको.

## ४. वसुदेव देवकीची तुरुंगांतून सुटका.

योग्य सत्कारानें कंसाची दहनक्रिया पूर्ण झाल्यावर श्रीकृष्ण व बलराम नागरिकजनांसह जेथें वसुदेव–देवकीला तुरुंगांत ठेविलें होतें तेथें गेले. आणि त्यांच्या हातापायांतील शृंखला काढून टाकून, कृष्ण व बलराम त्यांना कडकडून भेटले. शृंखलांनीं कांचलेले हात कृष्णाचा स्पर्श झाल्याबरोबर क्षणार्धांत पूर्ववत् झाले. प्रेमभरानें सर्वांचीं हृदयें भरून येऊन डोळ्यांतून प्रेमाश्रु वाहूं लागले. त्या वेळच्या त्या स्थितीचें वर्णन करणें हें मानवी शक्तीच्या बाहेरचें कार्य होय. जन्म दिल्यापासून आजतागाईत ज्या मुलांनां कधीं न्हावूं घातलें नाहीं, कधीं स्तनाला लावून पाजिलें नाहीं, कधीं मांडीवर घेऊन खेळविलें नाहीं, कधीं पाळण्यांत निजवून झोंके दिले नाहींत, कधीं कडेवर घेऊन हिंडविलें नाहीं, कधीं जेवावयाला घातलें नाहीं, कधीं कोणत्याहि प्रकारचे चोज पुरविण्यास आजपर्यंत ज्यांना अवसर मिळाला नाहीं, अशा आपल्या मुलांचीं एकाएकीं भेट झाल्यावर त्यांना काय वाटलें असेल याची कल्पना करणें अशक्य होय. वात्सल्याच्या प्रेमभरांत वसुदेव-देवकींनीं त्या दोघांना वारंवार कुरवाळून त्यांचें चुंबन घेतलें. देवकी म्हणाली; “ बाळांनों ! आह्मीं तुमचे नांवाचे मात्र आईबाप आहोंत, तुमचें लालनपालन करण्याचा योग आम्हां हतभाग्यांच्या नशीबीं नव्हता. जे आईबाप मुलाचें योग्य लालनपालन करीत नाहींत ते पितृऋणांतून मुक्त होत नाहींत असें सांगतात. ” आपल्या प्रिय मातेचे ते उद्गार ऐकून श्रीकृष्ण व बलराम यांच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. श्रीकृष्ण म्हणाला; “ जे आपल्या पुत्राचें अहर्निश कल्याण चिंतितात त्यांचा सर्व पातकांपासून उद्धार होतो व ते सर्व ऋणांतून मुक्त होतात. त्याप्रमाणें तुम्हीं उभयतां निष्काम बुद्धीनें माझें कल्याण चिंतीत होतां म्हणूनच माझ्या हातून एवढ्या महत्वाचें कार्य घडून आलें आहे. तुमची निःस्वार्थ प्रीति हीच माझी सर्व शक्ति होय. त्याच शक्तीमुळें मी दुष्टांचा संहार करूं शकलों व ही सर्व कृपा तुमचीच होय. ” याप्रमाणें श्रीकृष्णानें वसुदेव–देवकीचें शांतवन करून त्यांच्या चरणावर मस्तक ठेविलें व आपल्या नयनाश्रूंनीं त्यांचें पादप्रक्षालन केलें. बलरामानेंहि आपल्या आईबापांनां

याचप्रमाणें वंदन केलें. नंतर श्रीकृष्ण आपल्या सर्व परिवारासह उग्रसेनाला ज्या तुरुंगांत ठेविलें होतें तेथें गेले.

कंसानें राज्यतृष्णेच्या भरीं पडून आपल्या जन्मदात्या पित्याला तुरुंगांत ठेविलें होतें. इतकेंच नव्हे, तर त्या नीच कंसानें तुरुंगांतही उग्रसेनाचे बेसुमार हाल मांडिले होते. त्याचे हातपाय भयंकर शृंखलांनीं बद्ध केले होते व कंसाचे निर्दय सेवक त्याचे अमानुष हाल करीत होते,तथापि उग्रसेन सत्वशील ईश्वरभक्त असल्यामुळें त्यास आपल्या हालांचें दुःख वाटत नसे. तो उलट आपल्या मुलाच्या कल्याणासाठीं त्याला उपदेशपर निरोप पाठवित असे. आपला या तुरुंगांतच कंसाच्या हातानें अंत होणार अशी त्याची दृढ भावना होती, व त्या दुःसह स्थितींतच तो एकेक दिवस कष्टानें कंठित होता. अशा स्थितींत उग्रसेन असतां एकाएकीं तुरुंगाचा दरवाजा उघडून मथुरेंतील लोकांनीं 'उग्रसेनाचें कुशल असो' असा जयध्वनि केला; तो आनंददायक ध्वनि ऐकून उग्रसेनाला मोठें आश्चर्य वाटलें व मृत देहांत नवीन जीव प्राप्त व्हावा त्याप्रमाणें उत्साहजनक दृष्टीनें तो पाहूं लागला. इतक्यांत कृष्ण व बलराम त्याच्याजवळ गेले व त्यांनीं त्याच्या शृंखला तोडून त्याला बंधापासून मुक्त केलें. कृष्ण बलरामास पाहतांच उग्रसेनाचें हृदय भरून आलें व त्यानें त्यांस आलिंगन दिलें. कृष्ण म्हणाला; " उग्रसेना! तुला सर्व संकटांतून मुक्त केलें आहे. केवळ साधूंच्या संरक्षणाठीं मला कंसाचा नाश करावा लागला, मी त्यांत आपला कोणताहि स्वार्थ साधिला नाहीं. कंसाच्या राज्याची मला काडीमात्रहि अपेक्षा नाहीं. तूं आपल्या सिंहासनावर बसावें व आनंदानें राज्य चालवावें; अशी माझी इच्छा आहे. " मग कृष्णानें कंसाच्या राज्यांतले सदाचारी मुत्सद्दी बोलावून त्यांच्याकडून उग्रसेनाला मोठ्या समारंभानें सिंहासनावर बसविलें, व उद्धव आणि अक्रूर यांनां प्रधानपद दिलें. त्या दोघांनीं मथुरेचें राज्य उत्तम प्रकारें चालवून प्रजाजनांनां संतुष्ट केलें. आपल्या प्रजेचें आपण पुत्रवत् पालन करावें ही उग्रसेनाची पुष्कळ दिवसांची इच्छा होती; ती श्रीकृष्णानें अशा रीतीनें पूर्ण केल्याबद्दल उग्रसेनाला अत्यंत समाधान वाटूं लागलें. उग्रसेनाच्या विनंतीवरून पुढें श्रीकृष्ण, नंद, यशोदा, वसुदेव, देवकी, बलराम, वगैरे परिवारासह मथुरेंतच राहिले. श्रीकृष्णाच्या समागमामुळें मथुरेंतील लोक प्रत्यक्ष वैकुंठवासाचें सुख भोगूं लागले. ज्या लोकांनां उग्रसेनासारखा राजा, उद्धव व अक्रुरासारखे प्रधान व कृष्णासारखा मित्र लाधला, ते खरोखर फार भाग्यवान् होत.

---

# अध्याय ८ वा.

## १ बलराम–रेवती विवाह.

वैशंपायन ऋषि जनमेजय राजाला म्हणाले; “हे राजा! श्रीकृष्ण मथुरेंत राहिल्यावर त्यानें आपल्या भक्तांच्या इच्छा पूर्ण करण्यास आरंभ केला. प्रथम कुब्जेची इच्छा पूर्ण केली. नंतर अक्रूरानें श्रीकृष्णाला आपल्या घरीं बोलावून परम प्रीतीनें त्याची यथाविधि पूजा केली व पंचपक्वान्नांचें त्याला भोजन घालून तृप्त केलें. त्या आनंददायक प्रसंगीं अक्रूरानें मोठा उत्सव केला व सहस्र ब्राह्मणांनां सहस्र गायी दान दिल्या. अक्रूराला आज आपलें घर व आपण स्वतः श्रीकृष्णाच्या आगमनामुळें पवित्र झाल्याप्रमाणें वाटलें. याप्रमाणें मथुरेंत प्रत्यहीं अनेक भक्तांकडून श्रीकृष्णाचा सत्कार होत असे. हे जनमेजय राजा! कंस मृत्यु पावल्यावर त्याच्या राण्या आपला पिता जो जरासंध त्याच्याकडे गेल्या व त्यांनीं घडलेली सर्व हकीकत जरासंधाला सांगितली. ती हकीकत ऐकून जरासंधाला कृष्णाचा सूड घेण्याची इच्छा झाली व कृष्णाच्या नाशासाठीं त्यानें मथुरेवर सत्रा वेळ स्वाऱ्या केल्या. पण प्रत्येक वेळीं त्याचा कृष्णानें पराभव केला. जरासंधाच्या या सत्रा स्वाऱ्यांमुळें मथुरेंतील लोक त्रस्त झाले होते. तशांत जरासंध पुन्हां काळयवन नांवाच्या एका प्रबल वीराला प्रचंड सेनेसह आपणाबरोबर घेऊन येत आहे असें कृष्णाला कळलें, तेव्हां कृष्णानें मथुरा नगरी सोडून दिली व द्वारका नांवाची नवीन नगरी निर्माण करून तेथें तो सर्व लोकांसह राहूं लागला. श्रीकृष्णानें त्या काळयवनाचा मुचुकुंद राजाकडून कसा नाश करविला, गोमाचल पर्वत उंच मस्तक करून सूर्याच्या रथाला कसा आडवा येत असे, त्याला खालीं पाडून जमीनींत कसा घातला, तसेंच कुश राक्षसाचा नाश करून व कुशस्थळी अथवा द्वारका कशी स्थापन केली, वगैरे कथा हे जनमेजया, मी तुला द्वितीय स्तबकांत सांगितल्या आहेतच.

श्रीकृष्ण भगवान् द्वारकेस राहूं लागल्यानंतर प्रथम बलरामाचा रेवती नांवाच्या राजकन्येबरोबर विवाह झाला. ही रेवती रैवत राजाची मुलगी होती. त्या रैवत राजानें शंकराची पुष्कळ दिवस तपश्चर्या करून त्यांनां प्रसन्न करून घेतलें व एक सर्वांगसुंदर मुलगी आपणास व्हावी असा त्यानें त्यांजकडून वर मिळविला. त्याप्रमाणें त्या रैवत राजाला शंकरांच्या कृपाप्रसादानें थोडक्याच दिवसांत एक अनुपमेय सुंदर अशी कन्या झाली. ती मुलगी स्वरूपानें जशी सुंदर होती तशी स्वभावानें व गुणानेंहि अद्वितीय अशी होती. त्या मुलीला जसजशी तारुण्यावस्था प्राप्त होत चालली, तसतशी राजाला तिच्या विवाहाची काळजी अधिक वाटूं लागली. राजानें सर्व जग धुंडाळलें, पण तिच्या योग्य असा पति त्याला

कोठेंहि आढळून आला नाहीं. तेव्हां त्यानें असा विचार केला किं, ज्या ब्रह्मदेवानें या मुलीला निर्माण केलें त्यानेंच हिच्या वराची कांहीं योजना केली असेल. तो वर कोणता तें त्यालाच जाऊन विचारावें ह्मणजे झालें. असें ठरवून तो रैवत राजा एके दिवशीं रेवतीला बरोबर घेऊन सत्यलोकीं ब्रह्मदेवाकडे गेला. ब्रह्मदेवाचे मंदिराजवळ रैवत राजा येऊन पाहतो तों मंदिरांत घनदाट सभा जमली असून तेथें मोठा उत्सव चालला होता. अप्सरा नृत्य करीत आहेत, सरस्वती षड्ज स्वरानें गात आहे, नारद, तुंबर यांचे विण्याच्या स्वराबरोबर गाणें चाललें आहे, गणगंधर्व त्या संगीतांत तल्लीन झाले आहेत व इंद्रादिक देव ब्रह्मदेवाजवळ बसून आनंदानें बोलत आहेत. असा प्रकार पाहून रैवत राजा स्थिर झाला. अशा स्थितींत ब्रह्मदेवाजवळ जाऊन आपली दाद लावून घेण्याचें धैर्य त्याला होईना; म्हणून सभा विसर्जन होईपर्यंत तो दाराजवळ उभा राहिला. चार घटकांनंतर ती सभा विसर्जन झाली व यक्षगण, गंधर्व व इंद्रादिक देव आपआपले स्थानीं निघून गेले. नंतर ब्रह्मदेव एकटाच बसला आहे असें पाहून रैवत राजा रेवतीला घेऊन ब्रह्मदेवाजवळ गेला व त्यानें तिच्या लग्नासंबंधानें आपण कसे काळजींत पडलों आहों तें सांगितलें. ती त्याची हकीकत ऐकून ब्रह्मदेव ह्मणाले; "रैवता! शेषानें पृथ्वीवर यदुकुलांत बलरामाचा अवतार घेतला आहे, त्या बलरामाला तूं आपली कन्या अर्पण कर. तो महापराक्रमी, सत्वशील व दीनजनांचा संरक्षक आहे; तसाच तो तुझ्या रेवतीप्रमाणेंच किंबहुना तिच्यापेक्षां अधिक सुंदर आहे. तोच पति रेवतीला योग्य आहे." याप्रमाणें ब्रह्मदेवानें सांगितल्यावर तो रैवत राजा रेवतीला बरोबर घेऊन पृथ्वीवर परत आला. परंतु ह्या वेळीं त्याला सर्व जग नवीन दिसूं लागलें. त्याचे ओळखीचें असें त्याला कांहींच दिसेना. त्याचें राज्य, त्याचा परिवार, सर्व कांहीं नाहींसें झालें. कारण तो चार घटका सत्यलोकीं होता, तितक्या अवकाशांत मृत्युलोकीं बत्तीस युगांचा काळ निघून गेला होता. तेव्हां अर्थातच सर्व प्रकारें सर्व बाबतींचें स्थित्यंतर झालें होतें. रैवत राजा रेवतीला घेऊन सत्य लोकाहून आपल्या नगरांत आला, त्या वेळीं द्वापारयुग असून बलरामानें व श्रीकृष्णानें अवतार घेतला होता. मग तो रैवत राजा रेवतीला बरोबर घेऊन बलरामाचा शोध करीत करीत द्वारकेला गेला व वसुदेवाला भेटून त्यानें आपली सर्व हकीकत सांगितली. ती हकीकत ऐकून वसुदेवानें रेवतीबरोबर बलरामाचा मोठ्या समारंभानें विवाह केला. इच्छेप्रमाणें रेवतीला वर मिळाल्याबद्दल रैवताला फार समाधान झालें व तो वानप्रस्थाश्रम स्वीकारून ईश्वरभजनांत आपला वेळ घालवूं लागला.

## २ श्रीकृष्ण–रुक्मिणी विवाह.

या बलदेवाप्रमाणेंच पुढें कांहीं दिवसांनीं श्रीकृष्णाचा रुक्मिणीबरोबर विवाह झाला. राजा जनमेजया! हा विवाह कसा झाला तें तुला आतां सांगतों.

"वैदर्भ देशामध्यें कौंडण्यपूर या नांवाचें एक विशाल नगर असून तेथें भीमक या नांवाचा प्रतापशाली व प्रजावत्सल राजा राज्य करीत होता. तो अत्यंत पुण्यशील असून त्याच्या राज्याचा विस्तार फार मोठा होता. सर्व राजांना त्याचा धाक असून त्याचे शत्रु त्याला भीत असत. तो क्षत्रियकुलावतंस असून परस्त्री व परद्रव्य यांनां कधीं शिवत देखील नसे. तसेंच तो ईश्वरनिष्ठ असून आपल्या प्रजेनें सदाचारानें वागावें म्हणून अहर्निश प्रयत्न करीत असे. त्या राजाला रुक्मी, रुक्मरथ, रुक्मबाहु, रुक्मकेश व रुक्ममाली असे पांच पुत्र व रुक्मिणी नांवाची कन्या अशीं सहा अपत्यें होतीं. राजाचे हे पांच पुत्र अत्यंत सुस्वरूप होते, परंतु त्या सवांत रुक्मिणी अत्यंत सुंदर होती. राजा जनमेजया! ती प्रत्यक्ष त्रिभुवनमोहिनी आदिमाता लक्ष्मी, रुक्मिणीच्या रूपानें त्या भीमक राजाच्या उदरीं अवतीर्ण झाली होती, इतकें सांगितलें म्हणजे तिच्या सौंदर्याचें अधिक वर्णन करण्याची जरूरच राहत नाहीं. त्या रुक्मिणीला जेव्हां तारुण्य प्राप्त झालें तेव्हां तर ती स्वभावतःच अतीशय सुंदर दिसूं लागली. अगोदर प्रत्येक अवयव रेखलेला, तशांत तारुण्यामुळें प्रत्येक अवयवाला पूर्णता आलेली, मग काय? ती अप्रतीम सुंदर दिसूं लागली. रुक्मिणीला तारुण्य प्राप्त झाल्यावर राजा भीमक तिच्या लग्नाच्या काळजीनें व्यग्र झाला.

एके दिवशीं राजा दरबारांत सिंहासनावर बसला असतां त्यानें रुक्मिणीला पाचारण केलें. त्या वेळीं सुंदर वस्त्रालंकार परिधान करून पायांतील नूपुरांचा झणत्कार करीत करीत रुक्मिणी बापाजवळ येऊन बसली. त्यावेळीं रुक्मिणीला पाहून भीमक राजाला ती पूर्ण तारुण्य अवस्थेंत दिसूं लागली व आतां यापुढें रुक्मिणीचे लग्न लांबणीवर टाकणें बरोबर नाहीं असें त्याला वाटलें, परंतु तिच्या योग्य सौंदर्यशाली वर कसा मिळेल याचा त्याला विचार पडला. इतक्यांत तेथें कांहीं बंदीजन आले व ते आपआपल्या गुणांनीं राजाला प्रसन्न करूं लागले. एकानें राजाची स्तुति केली, एकानें राजाच्या वैभवाचें वर्णन केलें, एकानें राजाचा राज्यविस्तार वर्णन करून सांगितला. याप्रमाणें ते भाट कवनें करून आपली विद्वत्ता दाखवित होते. त्यांत चंड नांवाचा एक भाट पृथ्वीवरील त्या वेळच्या अनेक राजांचीं नांवें घेऊन त्यांचें गुण वर्णन करूं लागला. तो ह्मणाला,–

"शिंदे साळोखी पद्दवळ ॥ रांगड राइके वाघोळ ॥ मोरिये माहाळे सुरवे गोळ ॥ सूर्यवंशी ॥ १ ॥ देवल डोडीय बागुल ॥ चव्हाण चाडये रणशिंगळ ॥ गरूड साळोंखी जंघोळ ॥ थोरात गुंजाळ पैं ॥ २ ॥ ढोकण बिरारी बोढरे ॥ विषई जाईत डेविरे ॥ गौळी गोळहात वाघचवरे ॥ जगताप गंगड ॥ ३ ॥ मुरकुटे मोरे महावडे ॥ चिते दोरीख घोरपडे ॥ डुबे ढोनी माळमहिडे ॥ जनमोहित पैं ॥ ४ ॥ ढोंकण नळवाडे तोवर ॥ सुखे जाविये कुंवर ॥ वोशिवे रणदिवे पंवार ॥ कुंभकडे चांदेड पैं ॥ ५ ॥ झोळे सोनवणी निकुंभ ॥ काठी

प्रमाडी वैरकुंभ ॥ खडपवार रणस्तंभ ॥ आहीर राये ॥ ६ ॥ वाघ बोरिसे पडि-हार ॥ शंखपाळ क्षेत्रीमगर ॥ बाराइपे रणहल थोर ॥ ब्रह्मसाळूंखे ॥ ७ ॥ अंगवंग चीनभोट ॥ माळवी बाहार मऱ्हाट ॥ तेलंगण गौड गंगातट ॥ आणि कर्नाटक ॥ ८ ॥ साडे गौड माळेवाळ ॥ द्राविड गांधार बंगाल ॥ कलिंग कांबोज कोतुळ ॥ आणि हिमगिरी ॥ ९ ॥ आतां ऐकणें द्वारावती ॥ मथुरा मारवाड गुजराथी ॥ सौराटराज कल्याणकीर्ति ॥ मंगळमूर्ति गोविंद ॥ १० ॥ जोअरि राया गजकेसरी ॥ अदट रुळताती नेपुरीं ॥ शरणागतां वज्रपंजरी ॥ नित्याचारीं यादव ॥ ११ ॥ सुरेख सांवळा सुंदर ॥ प्रथम वयसा निमासुर ॥ दानखड्ग अति उदार ॥ तो पवित्र सोमवंशी ॥ १२ ॥ वसुदेवाचा आत्मज ॥ पीतांबरधारी गरुडध्वज ॥ पवाडे वानिती वंशज ॥ दोहींपक्षीं ॥ १३ ॥ राये थिल्लर तो सागर ॥ राय दर्दुर तो भ्रमर ॥ राव मशक तो कुंजर ॥ पृथ्वीपती ॥ १४ ॥ तो हंस येर वायस ॥ येर सविकार तो अस्पर्श ॥ तो अविनाश येर मनुष्य ॥ नाशिवंत ॥ १५ ॥ तो परीस येर लोष्ट ॥ तो अमृत येर काळकूट ॥ तो चंदन येर काष्ट ॥ इंधनाचे ॥ १६ ॥ येर खद्योत तो तरणी ॥ राजे खुबट तो महामुनी ॥ येर मागते तो दानी ॥ भुक्तिमुक्तींचा ॥ १७ ॥ ”

याप्रमाणें त्या चंड भाटानें अनेक देशांतल्या अनेक राजांचें वर्णन केल्यावर राजा भीमक प्रसन्न झाला व त्यानें त्याला पारितोषक देऊन मार्गस्थ केलें. त्या चंड भाटानें सर्व राजांमध्यें श्रीकृष्णाची विशेष स्तुति करून त्याच्या गुणांचें जें वर्णन केलें तें ऐकून राजाला व राजकन्येला कृष्णाविषयीं जिज्ञासा उत्पन्न झाली. रुक्मिणीनें तर त्याच वेळीं श्रीकृष्णाला मनानें वरिलें व श्रीकृष्ण आपणांस पति मिळावा म्हणून अंबिकेची मानसिक पूजाहि केली. भीमक राजानेंहि श्रीकृष्णालाच रुक्मिणी देण्याचें स्वतः ठरविलें; परंतु त्यानें तो विचार रुक्मिणीला न सांगतां तिला अन्य प्रश्न विचारून घरांत पाठविलें. नंतर भीमक राजानें देशोदेशींच्या राजा-महाराजांना निमंत्रणपत्रिका पाठविल्या. त्याप्रमाणें अनेक राजे कौंडण्यपुरीं स्वयंवरासाठीं आले. त्या स्वयंवराची हकीकत नारदानें कृष्णाला कळविली. तेव्हां श्रीकृष्णहि गरुडावर बसून कौंडण्यपुरीं आले. तेथें जमलेले राजे आपणां-बरोबर अगणित लष्कर घेऊन आले होते व मोठमोठाले तंबू डेरे ठोकून राहिले होते. कौंडण्यपुराचा आसमंतात भाग बहुतेक राजांच्या तंबुडेऱ्यांनीं व्यापून गेला असल्यामुळें श्रीकृष्ण तेथें आल्यावर त्यांनीं एका झाडाखालीं आपलें बिऱ्हाड टेवलें व स्वयंवर पहाण्यास त्यांनीं आरंभ केला. कृष्णाचें तें अद्वितीय स्वरूप पाहून सर्व राजे महाराजे आश्चर्यचकित झाले, व या कृष्णाला सोडून रुक्मिणी आपणास कसली वरते, असें प्रत्येकाला वाटूं लागलें. परंतु श्रीकृष्ण अत्यंत दरि-द्रावस्थेंत आहे, असें समजल्यावर सर्वांना समाधान वाटूं लागलें. कारण रुक्मिणी अशा निष्कांचन कृष्णाला वरणार नाहीं अशी त्यांची समजूत होती.

सर्व राजे महाराजे वगैरे जमल्यावर भीमक राजानें सर्वांना स्वयंवराचे अगोदर एक दिवस भोजनासाठीं बोलाविलें. त्या वेळीं कृष्णाला पाहून त्यालाच माळ घालावयाची असा रुक्मिणीनें ठाम निश्चय ठरविला. भीमक राजानें कृष्णाला पाहिल्यावर त्यालाहि तोच वर निश्चित करावा असें वाटलें; परंतु इतरांप्रमाणें कृष्णाजवळ दासदासी व छत्रचामरें वगैरे ऐश्वर्य कांहीं नव्हतें. तेव्हां अशा दरिद्री मनुष्याला आपली मुलगी कशी द्यावी, याचा राजाला विचार पडला.

तो स्वयंवरसमारंभ पाहण्यासाठीं नारदहि आला होता. श्रीकृष्णाचा तो विलक्षण साधेपणा पाहून त्याला त्याबद्दल फार आश्चर्य वाटलें, व तो भीमक राजा श्रीकृष्णाच्या दारिद्र्यामुळें कदाचित् त्याला स्वयंवर मंडपांतही येऊं देणार नाहीं अशी नारदाला भीति वाटूं लागली; तेव्हां नारद अमरपुरींत इंद्राकडे गेला व त्याला ह्मणाला, " इंद्रा! कौंडण्यपुरीं रुक्मिणीचें स्वयंवर चाललें आहे, त्या स्वयंवरासाठीं अनेक लहान मोठे राजे आपआपल्या वैभवाप्रमाणें लवाजमा घेऊन आले आहेत, परंतु श्रीकृष्ण भगवान् त्या स्वयंवरासाठीं स्वतः एकटेच आले आहेत. त्यांच्याबरोबर लवाजमा असा मुळींच नाहीं. तो कृष्णाचा उणेपणा दूर करून सर्व राजांची फजिती करावी, ह्मणून मी तुझ्याकडे आलों आहें. तर तूं आपलें सिंहासन व छत्रचामरें कृष्णाकडे पाठवून दे. " ती नारदाची विनंति इंद्रानें मान्य केली व तो आपणाबरोबर हत्ती, घोडे, रथ, पालख्या, छत्रचामरें, तंबू, डेरे वगैरे सामान व लष्कर, शिपाई, दासदासी वगैरे लोक घेऊन कौंडण्यपुरीस आला व तें सर्व कृष्णाला अर्पण करून त्याला ह्मणाला; कृष्णा ! मीं हें आपलें आपणासच देत आहें, त्याचा आपण स्वीकार करावा. आमचें वैभव वगैरे सर्व तुझी कृपा आहे. विश्वांतील सर्व घटना तुझ्या स्वाधीन आहेत. मग माझ्या अमरावतीच्या राज्याची कथा ती काय. श्रीकृष्णा ! तूं सर्व कांहीं व्यापून उरला आहेस, मग या सर्व जमलेल्या राजामध्यें मुकुटमण्याप्रमाणें दिसशील यांत मोठेंसें नवल तें काय ? " याप्रमाणें इंद्रानें कृष्णाची स्तुति करून त्याला सिंहासनावर बसविलें व त्याच्यावर छत्रचामरें वारावयाला सुंदर दासी उभ्या केल्या. शिपाई शागीर्द सेवेला उभे केले. तंबूच्या बाहेर लष्कर ठेविलें, तंबूच्या भोंवतीं जिकडे तिकडे हत्ती घोडे दिसूं लागले, वाद्यें वाजूं लागलीं. कृष्णाकडे अशी तयारी झाल्यावर तो थाट व देखावा कांहीं अपूर्व दिसूं लागला. ज्या राजांनां पूर्वी कृष्ण दरिद्री ह्मणून रुक्मिणी त्याचा स्वीकार करणार नाहीं असा भरंवसा होता, तो त्यांचा भरंवसा कृष्णाचें तें नवीन वैभव पाहून पार नाहींसा झाला व त्यांनीं रुक्मिणीची बहुतेक आशा सोडून दिली. इंद्रानें भीमक राजाला बोलावून घेतलें; व तो त्याला ह्मणाला, "भीमका! तूं आपली रुक्मिणी कृष्णाला अर्पण कर. ती रुक्मिणी अनंत कालापासून या आदिपुरुषाची स्त्री आहे; या सर्व जमलेल्या राजांमध्यें श्रीकृष्ण अमृताप्रमाणें

असून हे राजे हालाहल विषाप्रमाणें आहेत.'' याप्रमाणें भीमक राजाला सांगून इंद्र अमरावतीस निघून गेला.

भीमक राजाचे मनांतून श्रीकृष्णालाच रुक्मिणी अर्पण करावयाची होती, परंतु तो दरिद्री आहे या समजुतीनें तो विचारांत पडला होता. इतक्यांत श्रीकृष्णाच्या चरणाजवळ इंद्रानें आपलें सर्व वैभव आणून अर्पण केल्याचें पाहून त्याला श्रीकृष्ण हे कोण तें चांगलें कळून आलें, व त्यानें कृष्णालाच रुक्मिणी देण्याचें ठरविलें. मग त्याच वेळीं त्यानें श्रीकृष्णाला रुक्मिणीचा स्वीकार करावा ह्मणून विनंति केली. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले; "भीमका! मला इतक्यांत रुक्मिणीचा स्वीकार करितां येत नाहीं, कांहीं दुष्ट राक्षसांचा नाश करावयाचा आहे. तो करून मी लवकरच आपल्या आप्त बंधुजनांसह येथें येईन व रुक्मिणीचा स्वीकार करीन.'' असें सांगून श्रीकृष्ण तेथून निघून गेले. राजा भीमकहि परत येऊन त्यानें सर्व राजांना या वेळीं रुक्मिणीला ग्रह बरोबर नसल्यामुळें स्वयंवर करणें इष्ट नाहीं, असें सांगून निरोप दिला. श्रीकृष्ण परत मथुरेस गेल्यावर जरासंधानें मथुरेवर सत्रा स्वाऱ्या केल्या. त्यांचें निवारण करून त्यानें कालयवनाचा नाश केला, व पुढें श्रीकृष्ण द्वारकेस रहावयास गेले. या कृत्याला बराच काळ गेला असल्यामुळें भीमकराजाला रुक्मिणीच्या विवाहाची पुन्हां काळजी पडली. स्वतः रुक्मिणी व भीमक या दोघांचा विचार कृष्णालाच वर निश्चित करण्याचा होता. बरेच दिवस झाले तरी कृष्ण येत नाहीं, असें पाहून भीमक राजा आपला वडील मुलगा रुक्मि यास कृष्णाला घेऊन येण्याविषयीं सांगूं लागला. तेव्हां रुक्मी ह्मणाला; "बाबा! त्या श्रीकृष्णाला रुक्मिणी देण्याचा आमचा मुळींच विचार नाहीं. रुक्मिणीचा स्वीकार करितों असें सांगून तो कृष्ण जो एकदां गेला तो गेलाच. यावरून तो स्वतः दारिद्री ह्मणून आपणाशीं शरीरसंबंध करण्यास धजत नाहीं, मग आपण तरी कां त्याची इच्छा धरावी. शिवाय तो किती स्त्रीलंपट आहे हें तुह्मांला माहित आहेच. तसेंच ज्यानें प्रत्यक्ष आपल्या मामाला मारिलें तो स्वभावानें किती दुष्ट असेल हें सहज दिसून येतें. जात नाहीं, धर्म नाहीं, देव नाहीं, असा जो निंद्याचरणी त्याला आपली मुलगी दिल्यास मुलीचें जन्माचें अकल्याण होईल व सर्व राजे आपणाला हांसतील; तो कोणाचा मुलगा आहे याचा अद्यापि पत्ता लागत नाहीं. कोणी ह्मणतात नंदाचा, तर कोणी म्हणतात वसुदेवाचा; बरें रूपानें तरी सुंदर आहे ह्मणावें तर तसेंहि नाहीं. अगदीं काळाकुळकुळीत दिसतो; संपत्ति ह्मणावी तर जवळ काठी कांबळ्यावांचून कांहीं दिसत नाहीं. विद्या ह्मणावी तर गवळ्यांमध्यें हुंबरी घालण्यांत कुशल आहे. आधीं वाटेल तसा व्यभिचार केला, मग मौंजीबंधन करून ब्रह्मचारीही ह्मणवूं लागला. युद्धकलेंत विशारद ह्मणावें तर झाला त्याच वेळीं मथुरेंतून गोकुळांत पळून गेला. अशा कृष्णाला रुक्मिणी देण्याची

आमची मुळींच इच्छा नाहीं. पृथ्वीवर सर्वगुण संपन्न, वैभवशाली, सौंदर्यवान असे अनेक राजे महाराजे आहेत, त्यांतून कोणी एखादा चांगला पाहून आणावा व त्याला रुक्मिणी अर्पण करावी, असा आह्मां सर्वांचा विचार आहे." रुक्म्याचें तें बोलणें ऐकून व श्रीकृष्णास जाऊनही पुष्कळ दिवस झाल्यामुळें भीमक राजाला मुलाचें ह्मणणें कांहीं अंशीं खरें वाटूं लागलें, आणि मुख्यतः रुक्मिणी उपवर झाल्यामुळें तर त्याला स्वस्थ बसणें मुळींच शक्य नव्हतें; ह्मणून त्यानें मुलाच्या ह्मणण्याला रुकार दिला व सर्व लग्नाचा भार मुलावरच टाकिला. अशी कथा हरिवंशांत आहे. श्रीमद्भागवतांत अशी कथा आहे कीं, त्या रुक्म्याचे मनांतून चैद्य देशाच्या दमघोष राजाचा पुत्र शिशुपाळ याला रुक्मिणी द्यावयाची होती, त्याप्रमाणें रुक्म्यानें दमघोषाला दूतांकडून संदेश पाठवून शिशुपाळाचें टिप्पण मागविलें तें शिशुपाळाचें टिप्पण पाहिल्यावर लग्न जुळत नाहीं, असें रुक्म्याच्या लक्षांत आलें; तथापि त्यानें तिकडे दुर्लक्ष करून खोटीं टिपणें तयार करविलीं व तें लग्न जमविलें. व देशोदेशींच्या राजांनां लग्नपत्रिका पाठवून, मोठ्या थाटानें लग्नाची तयारी केली. रुक्मिणीनें मनोमय श्रीकृष्णाला वरिलें होतें व त्या वांचून ती इतर सर्व पुरुषांनां बापाप्रमाणें व बंधूप्रमाणें समजत होती. श्रीकृष्ण अद्यापि न आल्यामुळें आपला बंधु आपणास शिशुपाळाला देत आहे, याबद्दल तिला फार वाईट वाटलें; व या संकटांतून आपण मुक्त होऊन श्रीकृष्णाला कसे भेटूं याची तिला मोठी काळजी लागली. इकडे लग्नाचा मुहूर्त तर एकेक दिवसानें जवळ जवळ येऊं लागला. शाल्व, भगदत्त, दंतवक्र, विदूरथ, जरासंध वगैरे अनेक राजे आपल्या लव्याजम्यानिशीं त्या लग्नसमारंभासाठीं आले. लग्नाला चार पांच दिवस शिल्लक राहिल्यावर चैद्यदेशचा राजाहि बरोबर शिशुपाळाला घेऊन मोठ्या थाटानें कौंडण्यपुरीं आला. भीमक राजानें व इतर अन्य राजांनीं त्याला सामोरे जाऊन वाजत गाजत मोठ्या समारंभानें नगरांत आणिलें व एक स्वतंत्र राजवाडा राहण्यासाठीं दिला. जिकडे तिकडे लग्नाची धांदल सुरू झाली. इतकी तयारी झाल्यावर रुक्मिणीची अवस्था अधिकच कठिण झाली, व तिला काय करावें तें सुचेना.

अशा घोर अडचणींत रुक्मिणी सांपडल्यावर तिनें कृष्णाला पत्र पाठवून बोलाविण्याचें ठरविलें, व त्याप्रमाणें श्रीकृष्णाला येण्याविषयीं तिनें पुढीलप्रमाणें पत्र लिहिलें.

"हे श्रीकृष्णा, तूं माझा स्वीकार करण्याचें कबूल करून आतां वेळेवर कोठें दिसत नाहींस याबद्दल अत्यंत दुःख वाटतें. मी तुला मनानें वरिलें असून आतां माझे बाप व बंधु मला शिशुपाळाला देत आहेत, तर हे यादवकुलावतंसा! हें पत्र मिळतांच येथें ये व माझा स्वीकार कर. तूं आपल्या भक्तांचें संकटसमयीं संरक्षण करितोस अशी तुझी कीर्ति आहे. तर या प्रसंगीं लवकर

घेऊन माझें संरक्षण कर. परवां सात घटिकेचा मुहूर्त आहे. त्या अगोदर मी नगराबाहेरील अंबिकेच्या देवळांत अंबिकेची पूजा करण्यासाठीं जाईन, तेथून तूं मला घेऊन जा, अथवा अन्य कोणत्याहि युक्तीनें माझी या संकटांतून सुटका कर."

याप्रमाणें रुक्मिणीनें पत्र लिहून तें आपला अत्यंत विश्वासु अशा सुदेव नांवाच्या ब्राह्मणाजवळ दिलें व त्याला द्वारकेस पाठविलें. तो सुदेव ब्राह्मणहि श्रीकृष्णाचा भक्त असून रुक्मिणीचा व श्रीकृष्णाचा विवाह व्हावा अशी त्याची इच्छा होती. त्याच्या हातीं तें रुक्मिणीचे पत्र पडल्याबरोबर तो मोठ्या तांतडीनें निघाला व त्याच दिवशीं द्वारकेस जाऊन श्रीकृष्णाला त्यानें तें पत्र दिलें. तें रुक्मिणीचें पत्र पाहून श्रीकृष्णाचे डोळे प्रेमाश्रूंनीं भरून आले. त्यानें सुदेव ब्राह्मणाचा योग्य सत्कार करून त्याची पूजा केली, त्याला उत्तम प्रकारचें भोजन दिलें व आपणासाठीं फार श्रम झाले असें जाणून श्रीकृष्णानें त्याला पलंगावर निजवून त्याचे पाय चुरिले. दुसरे दिवशीं श्रीकृष्णानें स्नान संध्या भोजन वगैरे आटोपून आपला रथ तयार करविला व आपण कोठें व कां जात आहों, तें न कळवितां त्या सुदेव ब्राह्मणाला बरोबर घेऊन ते मोठ्या त्वरेनें कौंडण्यपुरीं आले. श्रीकृष्ण तेथें येऊन पाहतात, तो लग्नसमारंभाची अपूर्व तयारी झाली असून जिकडे तिकडे मनोहर वाद्यांचा गजर चालला आहे. श्रीकृष्णानें शोध केला तेव्हां त्यानां असें समजलें कीं, आतां दमघोषाला भीमक राजाकडून अहेर होत असून आणखी थोड्या वेळानें शिशुपाळ व रुक्मिणी यांचा विवाह होईल. तें वर्तमान ऐकून श्रीकृष्णाला आपण वेळेवरच आल्याबद्दल फार आनंद झाला, व तो पुढील तयारीला लागला.

---

## अध्याय ९ वा.

### १ रुक्मिणीहरण–कथा.

श्रीकृष्ण द्वारकेंतून निघून गेल्यावर इकडे थोड्या वेळानें बलराम उग्रसेनाच्या सभेंत पित्याला नमस्कार करण्याकरितां आला. त्या वेळीं तेथें पहातो तों कृष्ण नाहीं, तेव्हां बलरामानें द्वारपाळाजवळ त्याची चवकशी केली. द्वारपाळ म्हणाला, "महाराज! श्रीकृष्ण महाराजांकडे एक ब्राह्मण कोणाचें पत्र घेऊन आला होता, तें पत्र वाचून पाहिल्याबरोबर त्यांनीं रथ सिद्ध करविला व ते कोणीकडे निघून गेले." द्वारपाळानें सांगितलेलें तें वर्तमान ऐकून बलरामाला मोठें आश्चर्य वाटलें. श्रीकृष्ण कोणीकडे गेला याचें त्याला कांहींच अनुमान करितां येईना. कोण ब्राह्मण आला होता, आणि त्यानें कसलें पत्र आणिलें होतें व हें काय गौडबंगाल आहे, तें बलरामाला कांहींच कळेना; परंतु असें कांहीं

विशेष गुप्त असल्यास कृष्ण मला सांगून गेला असता. पण मला न सांगण्यासारखा असा कोणता प्रकार असावा, याचा बलराम बराच वेळ विचार करीत बसला; कांहीं वेळ विचार केल्यावर व रथ कोणत्या दिशेनें गेला वगैरे माहिती मिळाल्यावर बलरामाचे मनांत आलें कीं, श्रीकृष्णाची स्वारी कौंडण्यपुरीं रुक्मिणीसाठीं गेली असावी. रुक्मिणीचा विवाह शिशुपाळाबरोबर होत आहे, तेव्हां अशा वेळीं तेथें जाण्याची वसुदेव व बलराम आपणास परवानगी देणार नाहींत, असा विचार करून श्रीकृष्णाची स्वारी कोणाला न विचारितां सडीच निघून गेली असावी, असें बलरामानें अनुमान ठरविलें. तो आपल्या मनाशीं म्हणाला;—श्रीकृष्ण तेथें जाऊन रुक्मिणीला कोणत्यातरी युक्तीनें हरण करील, परंतु असें झालें असतां भीमकराजा कृष्णावर क्रुद्ध होईल व शिवाय शिशुपाळ, जरासंध, हेहि कृष्णाचा नाश करण्यास त्यावेळीं कमी करणार नाहींत. तेव्हां कसेंहि करून कौंडण्यपुरीं आपणहि आजच्याआज गेलें पाहिजे. जरी कदाचित् तेथें स्वयंवर होण्याचें ठरलें, तरी युद्धाचा प्रसंग हा येणारच; कारण स्वयंवर प्रसंगीं रुक्मिणी कृष्णाच्याच गळ्यांत माळ घालील व तसें झालें म्हणजे जरासंध वगैरे कृष्णाचा निष्कारण द्वेष करून त्याच्या अनिष्टाचा प्रयत्न करितील. श्रीकृष्णाचे गद, सात्यकी, वगैरे बंधु होते. त्यांनांहि तसेंच वाटूं लागलें व त्या सर्वांनीं श्रीकृष्णाच्या संरक्षणासाठीं कौंडण्यपुरास जाण्याची तयारी केली. बलरामानें सैन्यांतील शिंगाड्याला बोलावून आणून आतांच्या आतां सर्व सैन्य तयार होईल अशा प्रकारचें शिंग वाजविण्यास सांगितलें. त्या शिंगाड्यानें शिंग फुंकल्यावर बलरामाचें सर्व सैन्य क्षणार्धांत तयार झालें, व कोणीकडे जावयाचें त्या हुकमाची वाट पाहूं लागलें. त्या सैन्यांत एक लक्ष ऐशीं हजार हत्ती होते, प्रत्येक हत्तीच्या पाठीवर सोन्याच्या चांदीच्या पितळेच्या अशा अनेक धातूंच्या अंबाऱ्या होत्या, त्यांच्या गळ्यांत घंटा घणघण वाजत होत्या, हत्तींच्या मागून चार चार घोड्यांचे दोन दोन घोड्यांचे रथ तयार होऊन चालले होते. त्या रथांत अनेक युद्धविद्या विशारद असे वीर होते. याप्रमाणें सर्व तयारी करून बलरामाची स्वारी कौंडण्यपुरास येऊन दाखल झाली. तेथें श्रीकृष्णाला पाहिल्यावर सर्वांना मोठा आनंद झाला व सर्वांनीं श्रीकृष्णाचा जयजयकार केला. नंतर बलराम कृष्णाला ह्मणाला, "कृष्णा! तूं आह्मां कोणाला कांहींएक न कळवितां येथें एवढ्या घाईनें कां निघून आलास? मोठमोठे योगी तापसी तूं भेटावास ह्मणून तुझी अहर्निश प्रार्थना करितात, पण त्यांना तुझी प्राप्ती होत नाहीं, असें असतां केवळ रुक्मिणीसाठीं एवढ्या त्वरेनें तूं येथें आलास, हें विलक्षण आश्चर्य नव्हे काय? तुला यावयाचें होतें तर आह्मांला तसें सुचवावयाचें होतें, ह्मणजे तुझ्याबरोबर हेंच लष्कर दिलें असतें." हें भाषण ऐकून घेतल्यावर रुक्मिणीच्या पत्राची वगैरे सर्व हकीकत

बलरामाला कळवून एकटें येण्याचें स्पष्टीकरण कृष्णानें केलें. ती हकीकत ऐकून बलरामानें व कृष्णानें पुढें कोणत्या रीतीनें वागावयाचें तें ठरवून कृष्णाबरोबरच्या वसुदेव ब्राह्मणाला रुक्मिणीकडे पाठवून दिलें.

इकडे रुक्मिणी मोठ्या काळजींत पडली होती. आपलें पत्र घेऊन सुदेव ब्राह्मण वेळेवर द्वारकेस पोहोंचतो किंवा नाहीं, त्या पत्राप्रमाणें श्रीकृष्ण येतात किंवा नाहीं, आणि येथें आल्यावर आपली सुटका करितील किंवा नाहीं, वगैरे काळजीनें ती अगदीं वेडी झाली होती. अशा काळजींत ती असतांच लग्नाचा दिवस उजाडला. सूर्योदय होऊन जिकडे तिकडे स्वच्छ सूर्य–प्रकाश पडला. तो प्रकाश पाहून रुक्मिणीला सर्वत्र अंधार दिसूं लागला ! सुदेव ब्राह्मण परत येण्याच्या पूर्वींच सूर्य क्षितिजावर आला ह्मणून ती फार रागावली. जसजसा सूर्य वर जाऊं लागला, तसतशी तिची निराशा वाढत चालली व आपला व श्रीकृष्णाचा विवाहसंबंध घडून यावा असा योग आतां दिसत नाहीं असें तिला वाटूं लागलें. ती आपल्या एका जिवलग सखीला ह्मणाली; “ सखे ! तूं माझी खरी मैत्रीण आहेस, अंतःकरणांतील खरी गोष्ट तुला सांगावयास कांहीं हरकत आहे असें वाटत नाहीं. तूं माझें हें हृद्गत कोणाजवळहि सांगणार नाहींस अशी माझी खात्री आहे. मी हल्लीं माझ्या विवाहाच्या काळजीनें अगदीं त्रस्त झालें आहें, मी आपल्या मनानें श्रीकृष्णाला वरिलें आहे, त्याच्या-वांचून मला सर्व पुरुष सहोदराप्रमाणें आहेत. असें असतां, आज शिशुपाळाशीं विवाह करण्याचा प्रसंग मजवर येणार याबद्दल मला मरणप्राय दुःख होत आहे. त्या कृष्णाची प्राप्ति व्हावी म्हणून मी सुदेव ब्राह्मणाला पत्र देऊन मुद्दाम कृष्णाकडे पाठविलें आहे, परंतु अद्यापि तो परत आला नाहीं. यावरून तो कार्य करून येईल असें आतां कांहीं वाटत नाहीं. आणि आतां त्याची वाट पहा-ण्याचा अवकाश उरला नाहीं. आतां आणखी थोड्या वेळानें मंगलवाद्यें वाजा-वयाला लागतील व विवाहकर्माला आरंभ होईल. तेव्हां ती विटंबना होण्याच्या अगोदर मी ह्या संकटांतून मुक्त होईन अशी एखादी युक्ति मला सांग. जर तसें होणें तुला अशक्य वाटत असेल, तर मग मी योगमार्गानें श्रीकृष्णाची प्राप्ति करून घेईन. हें शरीर पंचभूतात्मक आहे. आत्माच काय तो अविनाशी व अक्षय असा आहे. तो मी श्रीकृष्णाच्या आत्म्याशीं मिळवून हें कलेवर सोडून देईन म्हणजे झालें. तो विश्वमोहन जगदीश्वर सर्व कांहीं जाणतो असें म्हणतात; मग त्याला माझी ही स्थिति कशी समजली नाहीं ? तो करुणाकर परमेश्वर अत्यंत दयाळू आहे असें म्हणतात, मग त्याला माझी दया कशी येत नाहीं ? भक्ताच्या संरक्षणासाठीं तो जगजेठी मोठ्या त्वरेनें धावून येतो असें सांगतात, मग माझ्याच वेळीं कसा येत नाहीं ? हे गोपाळा ! तूं या दासीचा अव्हेर केलास असें वाटतें. या अभागिनीवर इतका निष्ठुर कां

झालास तेंहि कळत नाहीं. सखे ! मी अशा विलक्षण आपत्तींत सांपडलें आहें. ही दूर करण्याचा कांहीं मार्ग सांगशील तर मजवर तुझे अनंत उपकार होतील. रुक्मिणीचें हें निग्रहाचें भाषण ऐकून तिच्या सखीनें तिची पुष्कळ समजूत केली, व तुझा स्वीकार करण्याला श्रीकृष्ण खात्रीनें लवकरच येतील असें सांगून तिला धीर दिला. रुक्मिणी पुनः म्हणाली; "सखे ! तुझे हे शब्द खरे झाले म्हणजे मी तुला संतोषित करीन. मी जरी आज या विवाहचिंतेनें व्यग्र झालें आहें तरी, मला आज सकाळपासून शुभ शकून होत आहेत; माझा डावा डोळा लवत आहे, व वाम बाहू व वाम मांडीही स्फुरण पावत आहे. यावरून तो दयाघन श्रीकृष्ण आल्यावांचून राहणार नाहीं असें वाटतें. पण सखे ! वेळेवर आले तर त्याचा उपयोग, नाहींतर मागाहून येऊन काय फायदा ?" याप्रमाणें त्या दोघी जणी एकांतांत विचार करीत आहेत तोंच सुदेव ब्राह्मण प्रसन्न वदनानें तेथें येऊन उभा राहिला. त्याला पहातांच रुक्मिणीला अत्यानंद झाला. व तिनें धांवत जाऊन त्या ब्राह्मणाच्या चरणावर लोटांगण घातलें. त्या सुदेव ब्राह्मणानें तिला दोन्हीं हातांनीं उचलून उभें केलें, व तो तिच्या मस्तकावर आशीर्वादपूर्वक हात ठेऊन म्हणाला; "रुक्मिणी तूं खरोखर फार थोर भाग्याची आहेस. प्रत्यक्ष प्रभु द्वारकाधिशाची तूं इच्छा धरलीस यावरून तूं मोठी सूज्ञ आहेस. तो प्रभु श्रीहरि तुझें पत्र पाहिल्याबरोबर अत्यंत वेगानें चालणाऱ्या रथांत बसून येथें देवीच्या देवळाजवळील उपवनांत येऊन राहिला आहे."

सुदेव ब्राह्मणाच्या मुखांतून निघालेले ते शब्द ऐकतांच रुक्मिणीला जो आनंद झाला तो वर्णन करणें कठिण होय. आज आपण श्रीकृष्णाला प्रत्यक्ष पाहूं या विचारानें तिचें हृदय हर्षानें उंचबळून आलें. ती म्हणाली; "इतके दिवस मी श्रीकृष्णाच्या प्राप्तीसाठीं शंकरपार्वतीची जी सेवा केली, ब्राह्मणांनां जीं भोजनें घातलीं, गरिबांनां जीं दानें दिलीं, त्याचें फल मला आज मिळालें." त्या सुदेव ब्राह्मणाचे त्या वेळीं किती उपकार मानावेत तें तिला कळेना, ती त्याला म्हणाली; "सुदेवा ! तुझे माझ्यावर अनंत उपकार झाले आहेत. त्या उपकारांची फेड मी कांहीं केलें तरी होणार नाहीं. मला पतिभिक्षा घालणारा तूं यावेळीं दाताच भेटलास. मृताला अमृत मिळावें, अनेक दिवसाच्या क्षुधिताला पंचपक्वान्नें मिळावींत, किंवा तप्त झालेल्या भूमीवर पर्जन्यवृष्टि व्हावी, अथवा कोमेजून गेलेल्या कमलिनीला एकाएकीं चंद्राचें दर्शन व्हावें, त्याप्रमाणें तूं आज माझी या संकटांतून सुटका करून श्रीकृष्णभेटीचा योग जुळवून आणिलास." असें म्हणून रुक्मिणीनें सुदेव ब्राह्मणाला वस्त्रें, अलंकार, रत्नें, वगैरे देऊन त्याचा यथोचित असा गौरव केला. त्या वस्त्रालंकाराचा स्वीकार करून सुदेव ब्राह्मण म्हणाला, "रुक्मिणी ! श्रीकृष्णाची ज्या स्त्रियेला प्राप्ति होईल

ती खरोखर अत्यंत पवित्र अशी असली पाहिजे. तूं आज इतके दिवस जी गुरु-भक्ति केलीस त्या गुरुभक्तिमुळेंच हा आज योग आला आहे. तुझी कृष्णाच्या ठिकाणीं असलेली भक्ति पाहून मला मोठा आनंद झाला. त्या कृष्णाचीहि तुझ्यावर तशीच प्रीति आहे. तुझें पत्र पाहिल्याबरोबर त्याला मोठा आनंद झाला व त्याच्या डोळ्यांतून प्रेमाश्रु बाहेर आले. कृष्णानें माझी पूजा केली, मला उत्तम प्रकारचें भोजन दिलें आणि मला पलंगावर निजवून माझे पाय स्वतः चुरिले; असा माझा सत्कार त्यानें केवळ तुझ्या प्रीतिमुळें केला. ज्या भगवंताच्या दर्शनासाठीं हजारों तापसी तपश्चर्या करितात, त्यांनांही जो भेटत नाहीं त्या भगवंताचे पाय केवळ तुझ्याकृपेमुळें माझ्या दृष्टीस पडले. रुक्मिणी ! तूं आतां त्या भगवंताचें चिंतन करून पुढील कार्याला लाग, ह्मणजे त्यांत यशस्वी होशील. " असें सांगून तो सुदेव ब्राह्मण तेथून निघून गेला.

सुदेव ब्राह्मण निघून गेल्यावर, त्यानें सांगितल्याप्रमाणें ती श्रीकृष्णाचें चिंतन करीत बसली. तों तिला तिच्या अंतःकरणांत श्रीकृष्णाची निराळीच मूर्ति दिसूं लागली. नीलमण्या प्रमाणें सतेज अंगकांती, आजानु असे चार बाहू, शंख चक्र गदा पद्म अशीं सुंदर आयुधें, दिव्य पीतांबर, गळ्यांत रुळत असलेली वैजयंती माळा, कानांत डुलत असलेलीं मकराकार कुंडलें; कमला प्रमाणें डोळे, रत्नजडित मुकुट, गळ्यांत कौस्तुभ मणि, सुहास्य वदन, अशी ती श्रीकृष्णाची प्रशांत मूर्ति पाहून रुक्मिणीला फार आनंद झाला. इकडे भीमक राजानें शिशुपाळाला मिरवित मिरवित आपल्या राजवाड्यांत आणिलें व त्यास अहेर वगैरे दिला. इतक्यांत श्रीकृष्ण आल्याचें ऐकून भीमकराजानें त्यानां आमंत्रण पाठविलें. तेव्हां श्रीकृष्ण अंबिकेच्या देवळा जवळ एकटेच बसले होते. त्यानीं त्या आमंत्रणाचा स्वीकार केल्यावर राजानें त्यानांहि वाजत गाजत नगरांत आणिलें. कृष्णाची ती रम्य मूर्ति पाहून नगरांतील लोक यालाच भीमकानें मुलगी द्यावी असें ह्मणूं लागले, परंतु शिशुपाळाला राजानें मुलगी देण्याचें नक्की ठरविलेलें ऐकून त्यांना फार वाईट वाटलें. राजानें कृष्णाला अहेर वगैरे केला त्याचा त्यांनीं स्वीकार केला व ते पुन्हां आपल्या देवीच्या देवळा जवळील बागेंत येऊन बसले. इकडे रुक्मिणीनें प्रसंगास योग्य अशी तयारी केली व ती आपल्या भावाला व आईला ह्मणाली कीं, योग्य पति मिळावा ह्मणून मी देवीला नवस केला होता, त्याप्रमाणें मला अंबेच्या कृपेनें लवकरच योग्य पति मिळणार आहे, तर मला देवीच्या दर्शनाला जाण्याची परवानगी द्या. राणीनें मोठ्या आनंदानें रुक्मिणीला देवीच्या देवळांत जाण्याची परवानगी दिली. ती परवानगी मिळाल्यावर रुक्मिणी पूजासाहित्य व हजारों दासींनां बरोबर घेऊन पालखींत बसून देवीच्या मंदिरांत गेली. रुक्मिणी मंदिरांत आली आहे असें पाहून कृष्णानें आपला रथ

देवळा जवळ आणून उभा केला, व तो रुक्मिणीची मार्गप्रतीक्षा करूं लागला. रुक्मिणीनें देवीची भक्तिभावानें पूजा केली व योजिलेलें कार्य निर्विघ्न-पणें पार पडावें ह्मणून तिची प्रार्थना केली. नंतर बाहेर येऊन तिनें तोच सुमुहूर्त जाणून कृष्णाच्या गळ्यांत माळ घातली व त्याच्या चरणावर मस्तक ठेवलें. तेव्हां कृष्णानें तिला आलिंगन दिलें व रथांत बसविलें. श्रीकृष्ण व रुक्मिणी रथांत बसल्यावर सारथ्यानें मोठ्या वेगानें द्वारकेचा रस्ता आक्रमण्यास आरंभ केला. श्रीकृष्णानें रुक्मिणी पळविल्याची बातमी ताबडतोब शहरांत पसरली. त्यावेळीं शिशुपाळ, दंतवक्र, जरासंध, वगैरे सर्व राजे यादव सैन्यावर चालून आले, व त्यांचें घनघोर युद्ध झालें. पण यादवांनीं सर्व राजांचा पराभव केला.

## २. रुक्म्याची विटंबना.

या प्रमाणें बलरामानें शिशुपाळ, दमघोष, कलिंगपति जरासंध, वगैरे वीरांनां जर्जर करून त्यांनां मागें पिटाळून लाविलें होतें, परंतु भीमकराजाचा पुत्र रुक्मी कांहीं निवडक घोडेस्वार बरोबर घेऊन रुक्मिणी नाहींशी झाल्याचें ऐकिल्याबरोबर द्वारकेच्या मार्गाला लागला होता. कृष्णाचा रथहि मोठ्या वेगानें चालला होता, परंतु रुक्म्याचे घोडे नव्या दमाचे असल्यामुळें त्यानें कांहीं वेळानें श्रीकृष्णाचा रथ गांठून त्यावर शरवृष्टी करण्यास आरंभ केला. रथांत श्रीकृष्ण व रुक्मिणी या दोघांना पाहून तो अत्यंत संतप्त झाला. तो मोठ्यानें गर्जना करून ह्मणाला; "कृष्णा! तूं रुक्मिणीची चोरी करून पळून आलास, पण आतां माझ्या हातीं चांगला सांपडला आहेस. तुझ्यासारख्या कृष्णवर्ण व भीरु मनुष्याला हें स्त्रीरत्न मुळींच पचावयाचें नाहीं. आपली योग्यता, आपली जात, आपला धर्म, आपली शक्ति, आपली संपत्ति, आपलें सौंदर्य, याचा कांहींएक विचार न करितां भलत्याच स्त्रियेची तूं अभिलाषा धरिलीस याबद्दल तुला आतां चांगली शिक्षा करितों." हें रुक्म्याचे उद्गार ऐकून श्रीकृष्णाला त्याचा साहजिक संताप आला व त्यानें आपल्या रथाचें तोंड फिरवून रुक्म्याबरोबर युद्ध करण्यास आरंभ केला. तो प्रकार पाहून रुक्मिणीची अवस्था मोठी कठीण झाली. एकीकडे पति व दुसरीकडे बंधु तेव्हां या दोहोंपैकीं कोणाचाहि पराजय झाला तरी तिच्या दृष्टीने तें अनिष्ठच होतें. तिच्या मनाची ही स्थिति कृष्णानीं तेव्हांच ओळखिली व ते तशाच दृष्टीनें रुक्म्याबरोबर युद्ध करूं लागले. त्याच्या बाणांचें निवारण करून कृष्णानें त्याच्या घोडेस्वारास यमसदनास पाठविलें. नंतर रुक्म्याच्या रथाचे घोडे मारिले, त्याचा सारथी दूर झुगारून दिला, आणि बाणानीं त्याला विद्ध केलें. नंतर श्रीकृष्ण आपल्या रथाखालीं उतरून रुक्म्या जवळ गेले व खड्गानें त्याचे पांच पाट काढून त्याला आपल्या रथांत आणून एका खांबाला बांधिलें. आपल्या भावाची ती विटंबना पाहून

रुक्मिणीला फार वाईट वाटलें, व तिच्या दोन्हीं डोळ्यांतून दुःखाश्रु वाहूं लागले. श्रीकृष्ण याप्रमाणें जय मिळवून आपला रथ हाकारीत आहे, तोंच बलराम आपल्या सैन्यासह विजयी होऊन तेथें आला. पति व पतिकडील वीर विजयी झाल्यामुळें रुक्मीणीला हर्ष झाला होता, परंतु बंधूची विटंबना पाहून तिला फार दुःख झालें होतें. रुक्मिणीची ती स्थिति पाहून बलराम तिला म्हणाला; "रुक्मिणी! तूं या अज्ञानांत सांपडून व्यर्थ शोक करीत आहेस, तूं आपणास विसरलीस, त्यामुळें तूं स्वतः कोण आहेस याची तुला स्मृति राहिली नाहीं. अगे! कृष्ण हा परब्रह्म आदि देव असून तूं आदिशक्ति आदिमाया लक्ष्मी आहेस. मी तुम्हां दोघांचा दासानुदास शेष आहे. केवळ तुम्हां दोघांची कृपा म्हणून या अवतारांत मला तुम्ही वडीलपणाचा मान दिला आहे. हा पूर्व-संबंध लक्षांत घे, व अज्ञजनाप्रमाणें व्यर्थ शोक करूं नकोस" बलरामाच्या उप-देशानें रुक्मिणीच्या मनावरील भ्रम दूर होऊन तिला समाधान वाटलें. मग बलराम कृष्णाला म्हणाला; "कृष्णा! या रुक्म्याला झाली इतकी शिक्षा पुरे झाली. हा आतां आपला सोयरा झाला आहे, तेव्हां याची अशी विटंबना करणें योग्य नाहीं." असें म्हणून बलरामानें रुक्म्याला सोडून दिलें.

तो अपमानित झालेला रुक्मी तेथून सुटल्यावर उघडाबोडका खालीं मान घालून लज्जेनें दीन झालेला असा त्या बलरामाच्या सेनासमुद्रांतून बाहेर पडला व पायींपायींच कौंडण्यपुरास येण्यास निघाला. नगरास परत येत असतां वाटेंत दमघोष, जरासंध, शिशुपाळ वगैरे त्याला भेटले. त्यांनां पाहतांच रुक्म्याला रडें कोसळलें. शिशुपाळाची अवस्थाहि तशीच झाली. शिशुपाळ म्हणाला, "रुक्मिया! त्या कृष्णानें तुझ्या बहिणीला हरण करून आपणा सर्वांच्या तोंडाला काळें लावावें, आम्हासारख्या जातीवंत शूर क्षत्रियांना त्या गवळ्याच्या पोरानें जिंकावें, ही गोष्ट अत्यंत लांछनास्पद होय. ह्या अपमानकारक स्थितींत जिवंत राहण्यापेक्षां मरण बरें." शिशुपाळाचें असें हें भाषण ऐकून रुक्मीहि त्याच्याचप्रमाणें रडगाणें गाऊं लागला. तेव्हां जरासंध तेथें आला; व तो सर्वांनां धैर्य देऊन ह्मणाला; "वीरहो! रणसंबंध हा असाच चमत्कारिक आहे. युद्धांत समोरासमोर उभे राहिल्यावर कोणाचा जय होईल याचा कांहीं नियम नाहीं. जे खरे वीर आहेत ते याबद्दल खेद न मानितां उलट अधिक उत्साह धरून तयारी करतात व शत्रूचा नाश करण्याचा प्रयत्न करितात. जयापजय होणें हें केवळ प्राक्तनाधीन आहे. काळ अनुकूळ असला ह्मणजे मोठालीं कार्यें देखील सहज होतात, आणि तोच प्रतिकूळ झाला ह्मणजे सहज होणारें कार्यहि होत नाहीं. या वेळीं आपला पराजय झाला तर झाला. आपण सर्वजण पुन्हां तयारी करूं व कृष्णाबरोबर युद्ध करूं. मी याप्रमाणें मागें कृष्णावर सत्रावेळ स्वाऱ्या केल्या त्या वेळीं कृष्णानें माझा पराभव

केला आहे. पुढें मीहि एखादे वेळीं त्याचा चांगला पराभव करीन.” याप्रमाणें जरासंधानें अनेक धीराच्या गोष्टी सांगून त्यांचें समाधान केलें. नंतर सर्व राजे आपआपल्या देशांत निघून गेले; परंतु रुक्मी मात्र आपल्या नगरांत गेला नाहीं. कारण त्यानें आपल्या बापाचें न ऐकतां रुक्मिणीचें शिशुपाळाबरोबर लग्न करण्याचें ठरविलें होतें त्यामुळें; व तशांत कृष्णानें केलेल्या विटंबनेमुळें, त्याचें मन त्याला खात होतें. तो नगराबाहेर अरण्यांतच राहिला.

बलरामानें रुक्म्याला सोडून दिल्यावर यादवांचें सैन्य मोठ्या हर्षभरानें मार्ग क्रमीत क्रमीत सरस्वतीनदीच्या कांठीं येऊन उतरलें. मग तेथेंच बलरामानें सर्वांचा विचार घेऊन कृष्णाचें व रुक्मिणीचें योग्य सुमुहूर्त पाहून लग्न लावण्याचें ठरविलें. सर्वांनां ती गोष्ट पसंत पडल्यावर तेथें मोठमोठाले मंडप वगैरे घालून अशी शोभा आणिली कीं, ती प्रती द्वारकाच आहे असें वाटूं लागलें. ध्वजा, पताका, तोरणें, लता, पत्रें, पुष्पें, कर्दळीचे स्तंभ, यांनीं व अनेक वाद्यांनीं तेथें अपूर्व शोभा आली होती. ठिकठिकाणचे ब्राह्मण त्या लग्नासाठीं जमले होते, सर्व राजानांहि निमंत्रणें पाठवून बोलाविलं होतें, परंतु शिशुपाळ, दमघोष, जरासंध, भीमक, रुक्मी, वगैरे राजे अपमानित झालेले असल्यामुळें तेथें आले नाहींत. तेव्हां बलरामानें वरपक्षाकडील व वधूपक्षाकडील अशीं दोन्हीं कार्यें स्वतःच केलीं. पुरोहितांनीं योग्य सुमुहूर्तीं उभयतांचा विवाह लावला. नंतर चार दिवस तेथें बलरामानें अपूर्व असा लग्नसोहळा केला. याचकांना अनेक वस्तु दिल्या, ब्राह्मणांनां अलंकार वस्त्रें वगैरे दिलीं, राजेरजवाड्यांनां नजराणे दिले, पंचपक्वान्नांचीं भोजनें तर रोज एकसारखीं चाललीं होतीं. याप्रमाणें मोठ्या थाटानें तो लग्नसमारंभ पार पडल्यावर ही सर्व वरात द्वारकेस जाण्याला निघाली. श्रीकृष्णरुक्मिणीसह येत आहेत असें द्वारकेंतील लोकांनां कळतांच त्यांनां फार आनंद झाला, व त्यांनीं कृष्णरुक्मीणीच्या स्वागतार्थ सर्व नगर शृंगारिलें. तेव्हां इंद्राच्या अमरावतीप्रमाणें द्वारका दिसूं लागली. मेरुपर्वताप्रमाणें उंच उंच मंदिरावर निशाणें फडकूं लागलीं. भेरी, नौबती वगैरे वाद्यें वाजूं लागलीं. गच्चीवर लावलेल्या दीपपंक्तीमुळें सर्व शहर प्रकाशमान होऊन पुरुष आपआपल्या दारापुढें कृष्णाचा जयजयकार करण्यासाठीं व स्त्रिया पंचारती घेऊन श्रीकृष्णाला ओंवाळण्याकरितां उभ्या राहिल्या. श्रीकृष्णाची स्वारी रुक्मिणीसह हत्तीवर बसून नगरांत आली त्या वेळीं लोकांनीं हर्षभरानें कृष्णाचा जयघोष केला व त्यावर फुलें गुलाल वगैरे उधळिला. वरात मंदिराजवळ आल्यावर वसुदेवदेवकीनें कृष्णाला व सुनेला उतरून घेऊन त्यांनां कुरवाळिलें, व–सुखानें नांदा–असा आशीरवाद दिला.

---

# अध्याय १० वा.

## १. स्यमंतक मण्याची कथा.

जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला ह्मणाला; " ऋषि ! श्रीकृष्णाचा व जांबवतीचा विवाह झाल्याचें मीं ऐकिलेलें आहे, परंतु ती कथा संपूर्ण माहित नाहीं, ती मला सांगावी." जनमेजयराजाची ती इच्छा जाणून वैशंपायन ह्मणाले; " राजा ! जांबवती ही जांबवंताची मुलगी होय. हा जांबवंत रामभक्त असून त्यानें रामअवतारामध्यें रामाची पुष्कळ सेवा केली होती. रावणाचा वध करून श्रीरामचंद्र जेव्हां अयोध्येस परत आले, तेव्हां रामानें आपणास ज्यांनीं साह्य केलें त्यांचें कांहीं उतराई व्हावें ह्मणून त्या सर्वांना बोलावून ज्याची जी इच्छा असेल तें त्यानें मागावें, असें सर्वांना सांगितलें. त्या वेळीं अनेकांनीं आपल्या इच्छेप्रमाणें मागून घेतलें. त्याप्रसंगीं जांबवंताला, 'तुला काय पाहिजे' ह्मणून रामानें विचारिलें. तेव्हां तो ह्मणाला; " तुझ्या कृपेनें सर्व कांहीं मिळालें, परंतु एक मनोरथ पूर्ण झाला नाहीं. मला माझी शक्ति अजमावून पहावयाला अद्यापपर्यंत कोणी वीर मिळाला नाहीं, तर हे रामचंद्रा ! मजबरोबर युद्ध करण्यासाठीं मला एक महावीर मिळावा, व जेव्हां इच्छा होईल तेव्हां तुझें दर्शन व्हावें, अशी इच्छा आहे." तें त्या जांबवंताचें मागणें ऐकून श्रीरामचंद्र त्याला ह्मणाले; "जांबवंता ही तुझी इच्छा द्वापारयुगांत पूर्ण होईल."

या प्रमाणें त्या जांबवंताला रामचंद्रांनीं सांगितल्यावर तो तेथून निघाला व आपल्या अरण्यांतील विवरांत येऊन राहिला. द्वापार युगाला आरंभ झाल्यावर त्या जांबवंताला एक मुलगी झाली. त्या सर्वांगसुंदर मुलीचें नांव त्यानें जांबवंती असें ठेवलें. ती अत्यंत सुंदर असून फार सद्गुणी व सत्वशील अशी होती. जांबवंताचें तिच्यावर फार प्रेम होतें. तो तिचें मोठ्या काळजीनें संरक्षण करीत असे. असो, इकडे द्वारकानगरामध्यें सत्राजित या नांवाचा एक धर्मशील यादव रहात होता. त्या सत्राजितानें एक संवत्सरपर्यंत सूर्याची उपासना करून, सूर्याला प्रसन्न करून घेतलें होतें. श्रीसूर्यनारायण प्रसन्न झाल्यावर त्यानें त्या सत्राजिताला स्यमंतक या नांवाचा एक अत्यंत तेजस्वी मणी दिला. त्या मण्याचे अंगीं असा गुण होता कीं, तो मणी प्रत्यहीं प्रभात काळीं एक भार, ह्मणजे आठ हजार तोळे सोनें देत असे. सत्राजित त्या सोन्याचा उपयोग दानधर्माकडे करीत असे. ब्राह्मणांना भोजन घालावें, त्यांना विपुल दक्षिणा द्यावी, गरिबांना अन्नवस्त्र द्यावें, व कोणीही अतिथि अभ्यागत आल्यास त्याची इच्छा पूर्ण करून त्याला मार्गस्थ करावें, असा क्रम त्या सत्राजितानें तो मणी मिळाल्यापासून आरंभिला होता. थोडक्याच दिवसांत द्वारकेंत व द्वारकेच्या

आसमंतभागीं सत्राजिताची दानशूरपणाबद्दल कीर्ति पसरली व लांबलांबचे याचक त्याच्या घरीं येऊन संतोषित होऊं लागले. द्वारकेंतील एक साधारण मनुष्य एवढा दानधर्म करीत आहे, याबद्दल लोकांना फार आश्चर्य वाटूं लागलें. व त्यांनां सत्राजितानें एवढी संपत्ति कोठून आणिली याचें मोठें गूढ पडलें. पुढें कांहीं दिवसांनीं सत्राजिताजवळ स्यमंतक मणी आहे व तो त्यास दररोज आठ हजार तोळे सोनें देतो, असें लोकांनां समजलें. ती गोष्ट कृष्णाच्याही कानावर गेली. तेव्हां श्रीकृष्णानें त्या सत्राजिताला बोलावून सांगितलें कीं, "सत्राजिता! तुझ्या जवळ जो स्यमंतक मणी आहे तो येथील उग्रसेन राजाला दे. असें अद्वितीय रत्न ग्राम्यजनांजवळ ठेवूं नये; कारण तें दिव्य रत्न त्याला सांभाळितां येत नाहीं, व त्यामुळें त्याचा नाश होऊन रत्न भलत्याच मनुष्याच्या हातीं पडतें. परीस दुर्बळाला सांपडला असतां जसा त्यामुळें त्याचा नाश होतो, अश्वा केळीच्या पोटीं गर्भ आल्यास जसा तीचा नाश होतो, किंवा कस्तुरीसाठीं मृगाचा व मोत्यासाठीं शिंपेतल्या किडयांचा जसा नाश होतो, त्याप्रमाणेंच या मण्यापासून तुझा नाश होईल; म्हणून हा मणी तूं उग्रसेन राजाला दे. त्याला त्या मण्याचें संरक्षण करण्याची शक्ति असून तो त्यापासून मिळणाऱ्या सोन्याचा योग्य असाच विनियोग करील." कृष्णाचें हें भाषण सत्राजिताला पसंत पडलें नाहीं. तो ऐकत नाहीं असें पाहून कृष्णानें त्याला आपल्या घरीं जाण्यास निरोप दिला. या गोष्टीस कांहीं दिवस झाल्यावर त्या सत्राजिताचा बंधु प्रसेन एकेदिवशीं आपल्या गळयांत तो स्यमंतकमणी बांधून रानांत शिकारीसाठीं गेला. तेथें त्यानें सायंकाळ पर्यंत शिकार केल्यावर तो फारच श्रांत झाला, व तेथेंच विश्रांति घेण्याचे उद्देशानें निजला. रात्रीं काळोख पडल्यावर त्या अरण्यांत प्रसेनाच्या गळयांतील स्यमंतक मण्याचा दैदीप्यमान प्रकाश पडला. तो प्रकाश पाहून त्या अरण्यांतील एक सिंह तेथें आला व तो मणि पाहून त्या सिंहाला त्या तेजस्वी मण्याची इच्छा झाली. त्यानें त्या प्रसेनाला ठार मारिलें व तो मणी घेऊन तेथून निघून गेला. मणी तोंडांत धरून सिंह जात असतां वाटेंत त्याला जांबवंत भेटला, तेव्हां जांबवंताला तो मणी घेण्याची इच्छा झाली व त्यानें त्या सिंहाला मारून तो मणी त्याजपासून घेतला व आपल्या विवरांत नेऊन आपल्या मुलीला खेळण्याकरितां तिच्या पाळण्यावर बांधून ठेविला. मण्याच्या योगानें त्या विवरांत सूर्योदया प्रमाणें प्रकाश पडला.

इकडे द्वारकानगरामध्यें अद्यापि प्रसेन घरीं कां येत नाहीं म्हणून सत्राजित काळजींत पडला होता. सर्व रात्र गेली तरी तो घरीं आला नाहीं असें पाहून सत्राजितानें प्रसेनाचा शोध करण्यासाठीं आपले दूत अरण्यांत पाठविले. तेव्हां त्या अरण्यांत त्या दूतांनां प्रसेनाचें व त्याच्या घोड्याचें प्रेत आढळून आलें. मग ते दूत नगरांत परत आले व त्यांनीं अरण्यांत पाहिलेली सर्व हकीकत सत्रा-

जिताला सांगितली. ती हकीकत ऐकून सत्राजिताला अत्यंत दुःख झालें. मणीही गेला आणि त्या मण्यामुळें बंधूही गेला. अशा दुहेरी दुःखानें तो सत्राजित अगदीं वेडा झाला. श्रीकृष्ण आपणाजवळ मणी मागत होता, तो त्याला दिला नाहीं, ह्मणून त्यानेंच तो अशा प्रकारें घेतला असावा, अशी त्याची समजूत झाली, व लोकांजवळ तो तसें स्पष्ट बोलूं लागला. श्रीकृष्ण सत्राजिताजवळ मणी मागत होता, ही गोष्ट ज्यांना ज्यांना माहित होती, त्यांनां त्यांनां प्रसेनाचा वध व मण्याची चोरीहि कृष्णानेंच केली असें वाटूं लागलें. पुढें ती हकीकत सर्वत्र पसरून कृष्णाचेहि कानावर गेली. तें चमत्कारिक वर्तमान ऐकून लोक आपणावर वृथा आरोप करीत आहेत याबद्दल त्याला फार वाईट वाटलें. हा लोकापवाद घालविण्याला काय करावें याचा बराच वेळ विचार करून शेवटीं मण्याचा शोध लावण्याचें कृष्णानें ठरविलें व आपणाबरोबर कांहीं लोक घेऊन ज्या अरण्यांत तो प्रसेन मेला होता त्या अरण्यांत तो गेला, आणि बारीक नजरेनें प्रसेनाच्या वधाचा शोध केला. तेव्हां त्यास असें दिसून आलें कीं, प्रसेनाचा नाश सिंहानें केला असावा. मग श्रीकृष्ण सिंहाच्या पावलांचा माग काढीत काढीत अरण्यांत गेला, तों पुढें सिंहहि मेलेला दृष्टीस पडला, व तेथें अस्वलाचीं पावलें उठलेलीं दिसलीं. त्यावरून सिंहाचा नाश कोणी अस्वलानें केला आहे असें श्रीकृष्णानें तेव्हांच ओळखिलें. मग श्रीकृष्ण आपल्या बरोबरच्या लोकांसह त्या अस्वलाचा माग काढीत काढीत त्याच्या विवराजवळ येऊन पोहोंचला. बरोबर आणलेले लोकांस विवराच्या द्वाराजवळ उभे करून कृष्ण एकटाच विवरांत शिरला. आंत जाऊन पाहतो तों पाळण्याला तो स्यमंतकमणी बांधलेला असून त्याचा दिव्य प्रकाश त्या विवरांत सर्वत्र पडला आहे. मणी पाहतांच कृष्णाला आनंद झाला व आपण या लोकापवादांतून आतां मुक्त होऊं असा त्याला भरंवसा उत्पन्न झाला. जांबवंत अस्वल तेथें जवळच श्रीरामचंद्राचें नामोच्चारण करीत निजला होता. त्याची श्रीरामभक्ति पाहून श्रीकृष्ण संतुष्ट झाला व हळूच पाळण्याजवळ जाऊन मणी घेऊं लागला; तें पाहतांच जांबवंताची स्त्री ओरडली. त्याबरोबर जांबवंत श्रीकृष्णाचे अंगावर धावून आला. तेव्हां श्रीकृष्ण ह्मणाले; " अरे जांबवंता! तूं मुकाट्यानें हा मणी माझे स्वाधीन कर नाहींतर मजबरोबर युद्ध कर." कृष्णाचे इच्छेप्रमाणें जांबवंत युद्धास तयार झाला व कृष्णाबरोबर मोठ्या आवेशानें युद्ध करूं लागला. जांबवंत रामभक्त असून महा प्रतापशाली होता, त्यामुळें श्रीकृष्ण जरी आपली शिकस्त करीत होता तरी तो त्याला आटोपेना. एकसारखें बारा दिवसपर्यंत दोघांचें युद्ध चालूं होतें. शेवटीं श्रीकृष्णानें जांबवंताला जेरीस आणिलें तथापि जांबवंतानें श्रीकृष्णाबरोबर अठावीस दिवसपर्यंत युद्ध केलें. तेव्हां तो फार थकला आणि कृष्णाचा तो पराक्रम पाहून हा पराक्रमी पुरुष श्रीरामचंद्रच असावा असें त्याला वाटूं लागलें. तो या-

प्रमाणें मनांत श्रीरामचंद्राविषयीं विचार करीत आहे, तोंच त्याला ती कृष्ण-मूर्ति श्रीरामचंद्राप्रमाणें दिसूं लागली. ती रामाची रम्य मूर्ति पाहून जांबुवंताला फार आनंद झाला व तो कृष्णाच्या चरणावर मस्तक ठेवून ह्मणाला; " हे करुणानिधे ! हे दाशरथे ! हे रामचंद्रा ! हे भक्तजनसंरक्षका ! तुझा जयजयकार असो. हे जानकीरमणा ! हे अयोध्याधीशा ! मला पूर्वी अभिवचन दिल्याप्रमाणें तूं स्वतः माझी इच्छा पूर्ण केलीस व मला दर्शन दिलेंस. हे देवाधिदेवा ! तुझें हें प्रेम पाहून मला फार आनंद वाटतो, हे श्रीकृष्णा ! मी तुला न समजून युद्धांत लाथाबुक्या मारल्या त्याची मला क्षमा कर. हे द्वारकाधीशा ! आतां माझी इतकीच विनंति आहे कीं, माझ्या मुलीचा तूं स्वीकार करून मला धन्य करावें. श्रीकृष्णानें जांबवंताची ती विनंति मान्य केली व जांबवंतानें परम प्रीतीनें आपली कन्या कृष्णास अर्पण केली. जांबवंतीची सौंदर्यशालीनता पाहून श्रीकृष्ण प्रसन्न झाला व त्यानें तिचा मोठ्या आनंदानें स्वीकार केला. त्या दोघांचें गांधर्वविधीनें लग्न झाल्यावर जांबवंतानें श्रीकृष्णाला तो स्यमंतक मणी आंदण दिला. याप्रमाणें श्रीकृष्ण जांबवंतापासून मणी व जांबवती मिळवून विवराच्या बाहेर आला. बाहेर येऊन पाहतो तों बरोबर आणलेले लोक कोणीहि नाहींत ! मग श्रीकृष्ण तसाच द्वारकेच्या मार्गाला लागला.

श्रीकृष्णानें विवराच्या बाहेर जे लोक ठेविले होते, ते—कृष्ण अद्यापि येत नाहीं—असें पाहून भयभीत झाले, व त्यांनां अनेक प्रकारच्या वाईट शंका येऊं लागल्या. त्या विवरांत श्रीकृष्ण नाहींसा झाला असें वाटून ते सर्व दुःखी झाले व त्यांनीं तें वर्तमान द्वारकेंत जाऊन बलरामाला सांगितलें. ती दुःखवार्ता ऐकून बलराम, वसुदेव, देवकी, नंद, यशोदा, उग्रसेन, वगैरे सर्वजण मोठ्या काळजींत पडले व पुढें काय करावें त्यांनां तें सुचेना. हळू हळू ती बातमी सर्व द्वारकेंत पसरली व त्यामुळें सर्व लोक हताश व दुःखी दिसूं लागले. सर्व द्वारका नगरींत मूर्तिमंत औदासिन्य दिसूं लागलें. द्वारकेंतील सर्व लोकांनां श्रीकृष्ण जीव किं प्राण वाटत असे. त्या कृष्णाविषयीं तें अशुभ वर्तमान ऐकून सर्वजणांनां फार वाईट वाटूं लागलें, व हा एवढा प्रकार सत्राजितामुळें घडून आला म्हणून जो तो त्याचा तिरस्कार करूं लागला. सत्राजितालाहि आपण कृष्णावर निष्कारण आरोप केल्याबद्दल फार वाईट वाटूं लागलें. पुढें वसुदेव, देवकी, बलराम वगैरे मंडळी, हा काय प्रकार आहे तें समजून घेण्यासाठीं द्वारकेच्या बाहेर अंबिकेचें देऊळ होतें त्या देवळांत गेले व तेथें वसुदेवानें देवीची पूजा करून तो हात जोडून ह्मणाला; "हे महामाये ! हे त्रिभुवनजननी ! श्रीकृष्णासंबंधानें आम्हीं घोर काळजींत पडलों आहों, तर हे अंबिके ! श्रीकृष्ण हल्लीं कोठें आहे व कोणत्या स्थितींत आहे तें आम्हाला सांग. " वसुदेवानें याप्रमाणें देवीची प्रार्थना केल्यावर आकाशवाणी

झाली कीं, " तो गोविंद कुशल आहे, व लवकरच एक नवरी मिळवून द्वारकेस येईल, तुम्हीं सर्वांनीं द्वारका शृंगारून त्याचें स्वागत करावें." याप्रमाणें आकाशवाणी ऐकून सर्वांना फार आनंद झाला, व त्यांनीं द्वारकानगरी उत्तमप्रकारें शृंगारिली. इकडे बलराम वगैरे नगराबाहेर येऊन श्रीकृष्णाची मार्गप्रतिक्षा करीत होते, इतक्यांत श्रीकृष्ण बरोबर जांबवतीला घेऊन येतानां दिसला. श्रीकृष्णाला पाहून लोकांना फार आनंद झाला; व त्यांनीं कृष्णाचा जयजयकार केला. बलरामानें कृष्णाला कडकडून आलिंगन दिलें. नंतर सर्व लोकांनीं कृष्णाची मोठी मिरवणूक काढून त्यास वाड्यांत आणलें. तेथें आल्यावर कृष्णानें सत्राजिताला उग्रसेनाच्या सभेमध्यें बोलावून सर्वांच्या देखत त्याचा मणी त्याला देऊन झालेली सर्व हकीकत सांगितली. श्रीकृष्ण सत्राजिताला म्हणाला; " सत्राजिता ! तूं मजवर वृथा आरोप केलास म्हणून मला प्रयत्न करून मणी आणावा लागला. शहाण्या माणसाला जगांत रहाण्याचें फार कठीण आहे, केव्हां केव्हां लोकापवाद टाळण्यासाठींच त्यांनां भगीरथ प्रयत्न करावे लागतात. " श्रीकृष्णाचें तें भाषण ऐकून सत्राजिताला आपल्या चुकीबद्दल फार पश्चात्ताप झाला. त्यानें कृष्णाच्या चरणावर अनन्य भावानें मस्तक ठेवून त्याची क्षमा मागितली.

## ३. श्रीकृष्णसत्यभामाविवाह.

मनुष्याकडून कांहीं अपराध घडला असतां, त्याच्या मनाला मोठी चुटपूट लागून रहाते. अशा वेळीं मनाला समाधान वाटावें म्हणून तो अनेक प्रयत्न करितो, परंतु खरें समाधान होत नाहीं. तें समाधान प्राप्त करून घेण्याचा खरा उपाय म्हटला म्हणजे, ज्याचा आपण अपराध केला असेल त्याची क्षमा मागणें हा होय. त्या उपायाचें अवलंबन सत्राजितानें केल्यामुळें त्याला समाधान वाटूं लागलें; व त्याच्या अंतःकरणांत श्रीकृष्णाविषयीं पूज्य बुद्धि उत्पन्न झाली. त्या सत्राजिताला सत्यभामा या नांवाची एक अत्यंत सुंदर मुलगी होती. ती मुलगी तरुण झाल्यावर तिच्या लग्नाची काळजी सत्राजिताला उत्पन्न झाली. इतक्यांत वरील प्रकार घडून आल्यामुळें सत्राजितानें उद्धवाला मध्यस्थी घालून श्रीकृष्णाजवळ सत्यभामेच्या लग्नाविषयींची गोष्ट काढिली. सत्राजिताचें म्हणणें श्रीकृष्णानें मोठ्या आनंदानें कबूल केलें. मग सत्राजितानें व बलरामानें लग्नाची मोठी तयारी केली. देशोदेशींच्या राजेरजवाड्यांनां बोलावून मोठ्या समारंभानें सुमुहूर्तावर उभयतांचें लग्न लाविलें. पांच दिवस थाटाचा उत्सव झाला. पांचव्या दिवशीं मोठ्या थाटानें वरात काढून नवरानवरीस सत्राजितानें त्यांच्या घरीं नेऊन पोहोंचविलें, व आपल्या शक्तीप्रमाणें जांवयाला घोडे, हत्ती, रथ, दासदासी व अनेक द्रव्याचीं भांडारें देऊन शिवाय त्यानें श्रीकृष्णाची अनन्यभावानें क्षमा मागितली, व तो स्यमंतकमणीहि कृष्णाला अर्पण केला. परंतु कृष्णानें मण्याचा स्वीकार केला नाहीं. कृष्ण म्हणाला; "सत्रा-

जिता ! हा मणी मीं तुला दिलेला आहे, तेव्हां एकदां दिलेली वस्तु परत घेणें हा धर्म नव्हे. तो मणी तूं आपणाजवळच ठेव." कृष्णाचें म्हणणें सत्राजितानें मान्य केलें. याप्रमाणें जांबवती व सत्यभामा यांचा श्रीकृष्णाबरोबर विवाह झाल्यानें त्या धन्य झाल्या.

### ४. सत्राजिताचा व शतधन्व्याचा वध.

ही सत्यभामा सत्राजितानें पूर्वी कृतवर्म्याला देऊं केली होती; परंतु त्यानंतर मण्याची भानगड झाल्यामुळें व स्वत: सत्यभामेची इच्छा श्रीकृष्णालाच वरण्याची असल्यामुळें, सत्राजितानें ती कृष्णाला दिली. त्यामुळें कृतवर्म्याला साहजिकच राग आला, व तो सत्राजिताचा नाश करण्यासाठीं संधि पाहूं लागला. पुढें कांहीं दिवसांनीं लाक्षागृहामध्यें पांडव जळाले असें वर्तमान द्वारकेंत आल्यावरून, श्रीकृष्ण त्यांच्या समाचाराकरितां हस्तिनापुरास गेले. ती संधि साधून कृतवर्मा अक्रूराकडे गेला व त्याला ह्मणाला; " अक्रूरा ! ह्या सत्राजितानें मला सत्यभामा देण्याचें कबूल केलें असून, ती कृष्णाला दिली, यामुळें मला त्याचा फार राग आला आहे, व मी त्याचा नाश करण्याचा विचार केला आहे. तेव्हां तूं मला या कामीं साहाय्य कर. ह्मणजे आपण त्याचा तो मणी घेऊन दूर देशीं निघून जाऊं व तेथें सुखानें कालक्रमणा करूं." कृतवर्म्याचा हा विचार अक्रूराला पसंत पडला व त्या दोघांनीं सत्राजिताचा नाश करण्याचा प्रयत्न चालविला. त्यांनीं आपल्या कटांत शतधन्वा नांवाचा एक मनुष्य घेतला. तो अत्यंत साहसी होता. एके दिवशीं संधि साधून तो सत्राजिताचे घरीं गेला व सत्राजित निद्रिस्त असतां त्याचा खून करून व मणी घेऊन तेथून निघून आला, व तो मणी त्यानें अक्रूराजवळ दिला. याप्रमाणें मणी हस्तगत होतांच अक्रूर व कृतवर्मा काशीला निघून गेले; व शतधन्वा द्वारकेंतच राहिला. दुसरे दिवशीं सकाळीं सत्राजित मृत झालेला पाहून त्याच्या दूतांनीं तें वर्तमान तावडतोब उग्रसेन राजाला व सत्यभामेला कळविलें. ती दु:खकारक वार्ता ऐकून सत्यभामा अत्यंत शोकाकुल होऊन मूर्च्छित पडली. तिच्या दासींनीं तिला मोठ्या कष्टानें सावध करून तिची पुष्कळ प्रकारें समजूत केली; परंतु सत्यभामेचा शोक मुळींच राहीना. कोणी दुष्टानें मण्याच्या अभिलाषानें आपल्या पित्याचा खून केला असावा असें तिच्या मनानें ठरविलें. आणि आपल्या बापाचें प्रेत तैल द्रोणींत ठेवून श्रीकृष्णास भेटण्याकरितां ती हस्तिनापुरास येण्यास निघाली. तों श्रीकृष्णाची गांठ वाटेंतच पडली. तेव्हां तिनें कृष्णाला घडलेली सर्व हकीकत सांगितली. ती हकीकत ऐकून कृष्णालाहि फार वाईट वाटलें व तो सत्यभामेसह द्वारकेस आला, व सत्राजिताच्या प्रेताला त्यांनीं प्रथम अग्निसंस्कार केला. श्रीकृष्ण द्वारकेंत आल्याची बातमी शतधन्व्याला समज-ल्याबरोबर तो फार भयभीत झाला, व मोठ्या वेगवान् घोड्यावर बसून

द्वारकेंतून पळाला. ही बातमी श्रीकृष्णाला समजतांच श्रीकृष्ण बलरामासह रथांत बसून शतधन्व्याच्या मागोमाग निघाला. त्या शतधन्व्याचा घोडा अत्यंत वेगवान् असल्यामुळें तो कृष्णाला मुळींच आटेपेना; परंतु जनकराजाच्या मिथिला नगरीजवळ आल्यावर त्याचा घोडा फार थकला व तेथेंच मरून पडला. तेव्हां शतधन्वा पायानें पळूं लागला, तेव्हां श्रीकृष्णानें रथाखालीं उतरून त्याला धरिलें आणि मस्तकांत गदा घालून त्याचा प्राण घेतला. नंतर श्रीकृष्ण त्याच्याजवळ मणी शोधूं लागला, परंतु तो मिळाला नाहीं. तेव्हां तो तसाच परत येऊन रथांत बसला व सारथ्याला द्वारकेकडे रथ हांकण्यास सांगितलें. श्रीकृष्ण रथांत बसल्यावर बलराम त्याच्याजवळ स्यमंतक मणी पाहण्यासाठीं मागूं लागला. तेव्हां श्रीकृष्ण बलरामाला ह्मणाला; "दादा! मी त्या शतधन्व्याला निष्कारण मारिलें असें मला वाटतें; कारण मी त्याच्याजवळ पुष्कळ शोध केला, परंतु मणी मुळींच मिळाला नाहीं." कृष्णाचें भाषण ऐकून बलरामाला त्याचा संशय आला व तो आपणास मुद्दाम मणी दाखवीत नाहीं, असें त्याला वाटलें. व अशा भेदभावानें वागणाऱ्या भावाजवळ राहण्यापेक्षां देशांतर करणें चांगलें असें बलरामाला वाटलें. तो रागानें रथाखालीं उतरला, व मिथिला नगरीस निघून गेला. तेथें जनक राजाकडे जाऊन तो त्याचा आश्रित म्हणून सात वर्षें राहिला. त्या जनक राजाजवळ असतांनां बलरामानें गदायुद्धांत नैपुण्य संपादन केलें. दुर्योधनही त्याच वेळीं मिथिला नगरास बलरामाजवळ गदायुद्ध शिकत होता.

श्रीकृष्ण तेथून निघाला तो द्वारकेस आला व त्यानें घडलेली सर्व हकीकत सत्यभामेला सांगितली. मणी मिळाला नाहीं, हें कृष्णाचें म्हणणें सत्यभामेलाहि खरें वाटलें नाहीं. मण्याचा अभिलाष धरून कृष्णानें तो आपणाजवळ ठेविला व आपणास कांहींतरी सांगत आहे असें तिला वाटलें, व ती कृष्णाशीं तुसडेपणानें वागूं लागली. प्रत्यक्ष भावाला व स्त्रियेला आपला असा संशय आला, याबद्दल श्रीकृष्णाला फार आश्चर्य वाटलें, व आतां मण्याचा पुरता शोध लावल्यावांचून इलाज नाहीं असें त्यानें ठरविलें. इकडे बलराम मिथिलेस सात वर्षें राहिल्यावर जनक राजाचा निरोप घेऊन निघाला व हिंडत हिंडत श्री काशीक्षेत्रीं आला. तेथें आल्यावर बलरामानें असें ऐकिलें किं, येथें कोणी दोन सधन गृहस्थ आले असून ते या क्षेत्रांत एकसारखा दानधर्म करीत आहेत. कोणीहि याचक त्यांच्याकडे गेला तरी तो विन्मुख जात नाहीं. तें वर्तमान ऐकून बलरामाला मोठें आश्चर्य वाटलें व त्यांनां पाहण्याची त्याला इच्छा उत्पन्न झाली. त्याप्रमाणें तो शोध करीत त्यांच्याकडे गेला. तेथें जाऊन पाहतो तों ते अक्रूर व कृतवर्मा आहेत. मग बलरामाला स्यमंतकमण्याची आठवण झाली व त्या मण्याच्याच योगानें हे एवढा दानधर्म करीत आहेत अशी त्याची खात्री झाली.

व आपण श्रीकृष्णाबद्दल निष्कारण संशय घेतला, याबद्दल त्याला फार वाईट वाटूं लागलें. मग त्यानें तें वर्तमान द्वारकेस दूत पाठवून श्रीकृष्णाला कळविलें. तेव्हां श्रीकृष्णानें अक्रूराला बलरामासह द्वारकेस येण्याविषयीं पत्र लिहिलें. त्या पत्राप्रमाणें बलराम, अक्रूर व कृतवर्मा हे द्वारकेस निघून आले. द्वारकेस आल्यावर अक्रूर श्रीकृष्णाच्या चरणावर मस्तक ठेवून म्हणाला; "हे श्रीकृष्णा! मी अनंत अपराधी आहें, मला क्षमा कर. सत्राजिताचा मणी मजजवळ आहे, परंतु तो मी त्याचा खून करून मिळविला नसून मला तो शतधन्व्यानें दिला आहे." असें म्हणून त्यानें तो स्यमंतक मणी कृष्णापुढें ठेविला. तो मणी सर्व यादवांनां व बलराम व सत्यभामा यांनां दाखवून श्रीकृष्ण म्हणाले; "तुम्हीं दोघांनीं माझा संशय घेऊन माझ्याशीं व्यर्थ अबोला धरिला होता;" तें कृष्णाचें बोलणें ऐकून सत्यभामा व बलराम दोघेंही ओशाळल्यासारखीं झालीं व त्यांनीं कृष्णाची अनन्य भावानें क्षमा मागितली. मग श्रीकृष्णानें तो मणी अक्रूराला दिला व द्वारकेंत राहून तूं या मण्यापासून मिळणाऱ्या सुवर्णाचा योग्य विनियोग कर, असें त्याला सांगितलें.

ही कथा ऐकून जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; "ऋषि! श्रीकृष्ण म्हणजे साक्षात् परमेश्वर असून त्याच्यावर देखील अशा रीतीनें चोरीचा आळ आला होता, याबद्दल मला मोठें आश्चर्य वाटतें. असें होण्याचें कारण काय, तें जर आपण मला कृपा करून सांगाल, तर मजवर आपले अनंत उपकार होतील." जनमेजय राजाची ती विनंति ऐकून वैशंपायन ऋषि म्हणाला; "राजा! पूर्वीं शंकराच्या सभेमध्यें शंकर व पार्वतीच्या आज्ञेवरून गणपति त्यांच्यासमोर नृत्य करीत असतां, त्याचें पाऊल घसरलें व तो पडला. ती त्या गणपतीची फजीती पाहून चंद्र मोठ्यानें हंसला. तेव्हां गणपतीला चंद्राचा फार राग आला व त्यानें चंद्राला असा शाप दिला किं, "आजपासून तुझें जे कोणीं मुखावलोकन करतील त्यांनां भयंकर पातक लागेल व ते त्या पातकापासून आजन्म मुक्त होणार नाहींत." तो गणपतीचा शाप ऐकून चंद्र अत्यंत भयभीत झाला व घरीं जाऊन बसला. त्या दिवशीं चंद्र क्षितीजावर न आल्यामुळें सर्वत्र अंधार पडला. तेव्हां सर्व देव अत्यंत काळजींत पडले, आणि मग ते सर्व मिळून गणपतीकडे गेले व त्याची स्तुति करून म्हणाले; "हे देवा देवा गजानना! तुझ्या शापामुळें चंद्र उदयास येत नाहीं. तो वनस्पतींचा पोषक आहे. तो पृथ्वीवर न आल्यास सर्व वनस्पती नाहींशा होतील. तसें झालें म्हणजे ब्राह्मणांनां होमहवन करण्यास समिधा मिळणार नाहींत, व ब्राह्मणांनीं होमहवनें न केल्यास देवांनां हविर्भाग मिळणार नाहीं. करितां त्याच्यावर दया करून त्याला क्षमा कर, व उश्शाप दे. नाहींतर तो कलंकित राहिल्यास प्राणिमात्रांचे सर्व व्यवहार खुंटतील व मोठा

हाहाःकार होऊन जाईल." देवांची ती प्रार्थना ऐकून गणपति म्हणाला; "देवहो! त्या चंद्रानें माझा मोठा अपराध केला आहे, म्हणून मी दिलेला शाप त्यानें वर्षांतून एक दिवस तरी भोगला पाहिजे. भाद्रपद शुद्ध ४ चे दिवशीं जे चंद्राचें दर्शन घेतील त्यांच्यावर कसला तरी आळ येईल."

वैशंपायनऋषि म्हणाले:—"हे राजा जनमेजया! याप्रमाणें त्या चंद्राला गणपतीचा शाप असल्यामुळें भाद्रपद शुद्ध चतुर्थीचे दिवशीं त्याचें मुख कोणी पहात नाहींत. एकदां तो भाद्रपद शुद्ध चतुर्थीचा चंद्र श्रीकृष्णानें चिखलांत गायीचा खूर उमटला होता त्या खुरांतील पाण्यांत पाहिला होता; त्यामुळें श्रीकृष्णासारख्या साक्षात् भगवानावर चोरीचा आळ आला होता. मग त्या दिवशीं प्रत्यक्ष चंद्रदर्शन केल्यानें इतर लोकांवर कोणते भयंकर आळ येत असतील, ते त्या गणपतीलाच माहीत, आपणास तें कळणें अशक्य होय."

---

# अध्याय ११ वा.

## १. श्रीकृष्ण–कालिंदी–विवाह.

स्यमंतकमण्याची कथा ऐकल्यावर जनमेजय राजा ह्मणाला; "ऋषिवर्य! सत्यभामेचा व श्रीकृष्णाचा विवाह झाल्यानंतर श्रीकृष्णाचे आणखी कोणकोणत्या स्त्रियांशीं विवाह झाले तें मला सांगा." जनमेजय राजाची ती इच्छा जाणून वैशंपायन ऋषि जनमेजयाला ह्मणाले; "राजा! श्रीकृष्णाचा व सत्यभामेचा विवाह झाल्यानंतर प्रथम श्रीकृष्णाचा कालिंदी नांवाच्या स्त्रियेबरोबर विवाह झाला. ही कालिंदी सूर्याची मुलगी होय. ती अत्यंत सौंदर्यवान् होती व उपवर झाल्यावर श्रीकृष्ण पति मिळावा ह्मणून ती यमुना नदीच्या कांठीं एका अंगठ्यावर उभी राहून अन्नपाण्यावांचून तपश्चर्या करीत होती. तें ठिकाण इंद्रप्रस्थ शहरापासून जवळच होतें. ह्याच सुमारास पांडव लाक्षागृहांत जळाल्याचें ऐकून श्रीकृष्ण हस्तिनापुरीं गेला होता, व तेथें कांहीं दिवस पांडवांच्या आग्रहास्तव राहिला. नंतर तेथें पांडवांचा व द्रौपदीचा मोठ्या समारंभानें विवाह झाला. त्या हस्तिनापुरीं असतांना एके दिवशीं श्रीकृष्ण व अर्जुन इंद्रप्रस्थाच्या बाजूला एका अरण्यांत आपला रथ घेऊन शिकारीसाठीं गेले. बराच वेळ शिकार केल्यावर श्रीकृष्ण अत्यंत तृषाक्रांत झाला व त्यानें अर्जुनाला पिण्यासाठीं पाणी आणण्यास सांगितलें. अर्जुन पाण्याचा शोध करीत यमुनेच्या कांठीं आला व तेथून पाणी घेऊन परत येऊं लागला तों तपश्चर्या करीत असलेली कालिंदी त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां अर्जुनानें ती हकीकत कृष्णाला येऊन सांगितली. अर्जुन ह्मणाला; "कृष्णा! यमुनेच्या कांठीं एक सर्वांगसुंदर स्त्री तपश्चर्या करीत आहे. मी तिला तपश्चर्याकरण्याचें कारण विचारिलें, तेव्हां तिनें आपलें नांव का-

लिंदी असें सांगितलें व 'आपण सूर्याची मुलगी असून श्रीकृष्णाच्या प्राप्तीसाठीं तपश्चर्या करीत आहें, असें ती ह्मणाली.'' ती हकीकत ऐकून श्रीकृष्णाला तिच्याकडे जाण्याची इच्छा झाली, व त्याप्रमाणें ते यमुनेच्या कांठीं आले. मग श्रीकृष्ण त्या कालिंदीसमोर जाऊन परब्रह्म स्वरूपानें उभे राहिले. शंखचक्रगदापद्मधारी व पीतांबर नेसलेली ती श्रीकृष्णाची श्यामसुंदर चतुर्भुज मूर्ति पाहून कालिंदीला अत्यंत आनंद झाला, व तिनें श्रीकृष्णाच्या चरणावर आपलें मस्तक ठेविलें. कालिंदीची निःसीम भक्ति पाहून श्रीकृष्णानें तिला उचलून आपल्या हृदयापाशीं धरिलें व तिचा मोठ्या आनंदानें स्वीकार केला. श्रीकृष्णाचा व कालिंदीचा गांधर्वपद्धतीनें विवाह झाला. याप्रमाणें श्रीकृष्ण सूर्याची मुलगी कालिंदी मिळवून तिच्यासहवर्तमान इंद्रप्रस्थाला आला. पुढें कुंतीनें कृष्णाला आपल्या घरीं राहण्याचा फार आग्रह केल्यामुळें श्रीकृष्ण भगवान् कांहीं दिवस तेथेंच राहिला.

## २ खांडववन–दाह.

श्रीकृष्ण कुंतीचे घरीं असतां, एके दिवशीं कृष्णाकडे यज्ञनारायण आला. पोट खूब मोठें झालें आहे व हातापायांच्या काड्या झाल्या आहेत, अशी त्या यज्ञनारायणाची मूर्ति पाहून कृष्णाला मोठें आश्चर्य वाटलें व तो त्यास ह्मणाला; "अरे गार्हपते! तुझी ही अशी शोचनीय दशा कशानें झाली ?" तेव्हां तो ह्मणाला; "कृष्णा ! माझी ही अशी दशा अधाशीपणामुळें झाली आहे. जितकें पचेल त्या पेक्षां अधिक खाल्ल्यामुळें माझें हें पोट फार फुगलें व तें वागविण्याच्या त्रासामुळें माझे हे हातपाय रोडावून शरीरांतील तेज नाहींसें झालें आहे. हे श्रीकृष्णा! श्वेतकेतु राजानें जो मोठा यज्ञ केला, तो यज्ञ एकसारखा साठ वर्षें चालला होता. त्या श्वेतकेतु राजानें यज्ञाग्नीवर तुपाची मुसळाएवढी धार सतत धरिली होती. इतकें तूप एकसारखें साठ वर्षें खातांखातां माझ्या या पोटाची अशी अवस्था झाली आहे. या रोगांतून मुक्त होण्यासाठीं मी स्वर्गांत स्ववैद्य अश्विनी कुमारांकडे औषध घेण्यासाठीं गेलों होतों. त्यांनीं माझी प्रकृति पाहून मला सांगितलें कीं, इंद्राच्या खांडववनांत जाऊन तेथल्या सर्व वनस्पती खा, म्हणजे तुझा रोग बरा होईल. त्याप्रमाणें मी खांडव वनांत जाऊन तेथील वनस्पती खाऊं लागलों, परंतु इंद्राला तें वर्तमान समजतांच त्यानें मेघाला पाठवून पर्जन्यवृष्टि केली, आणि मला घालवून दिलें. त्या वनस्पति मला मिळवून द्याव्या म्हणून मी पुष्कळांकडे याचना केली, पण कोणीहि मला साह्य केलें नाहीं. यामुळें मी निरुपाय होऊन शेवटीं तुझ्याकडे आलों आहे. तर तूं कृपा करून मला त्या वनस्पती मिळवून दे."

अग्नीची ती शोचनीय दशा पाहून कृष्णाला त्याची दया आली व त्यानें त्या औषधी मिळवून देण्याचें त्याला आश्वासन दिलें. नंतर श्रीकृष्ण अर्जुनाला

म्हणाला; " अर्जुना ! या यज्ञनारायणाबरोबर खांडववनांत जा व त्याला त्या सर्व वनस्पती भक्षण करितां येतील असें कर." तेव्हां अर्जुन कृष्णाला म्हणाला; " देवा ! मी एकटा तेथें जाऊन काय करणार ? तो इंद्र मजवर निष्कारण क्रुद्ध होईल व त्याच्या सैन्याकडून माझा फुकट नाश होईल. शिवाय आपणाजवळ योग्य अशीं शस्त्रास्त्रेंहि नाहींत." मग श्रीकृष्ण अग्नीला म्हणाला; " अग्नी ! आम्हीं तुझें संकट निवारण करितों, पण इंद्राबरोबर टिकाव धरतील अशीं शस्त्रास्त्रें आम्हाला दे." कृष्णाची इच्छा जाणून यज्ञनारायण वरुणलोकीं गेला व तेथून त्यानें, रुद्रास्त्र, वज्रनाभचक्र, गदा, गांडीव धनुष्य, अक्षयभाते, दिव्यरथ, वगैरे युद्धोपयोगीं उपकरणें आणून दिलीं. तीं दिव्य अस्त्रें पाहतांच अर्जुनाचे बाहू स्फुरण पावूं लागले. त्यानें तत्काल सारथ्याला बोलावून रथ तयार करविला व त्या रथांत बसून अग्नि, अर्जुन व श्रीकृष्ण असे तिघे खांडववनांत आले. तें खांडववन मेरुपर्वताच्या पृष्ठभागीं होतें. त्या वनांत आल्यावर अग्नीनें वनस्पती खाण्यास आरंभ केला. प्रत्यक्ष अग्निनारायण अरण्यांत शिरल्यावर मग काय विचारितां, सर्व अग्निमय झालें. अग्नीच्या तापानें अरण्यांतील श्वापदें बाहेर पडून सैरावैरा धावूं लागलीं व अनंत पक्षी खालीं पडून जळूं लागले. गवतापासून तों वट पिंपळादि मोठमोठया झाडांपर्यंत सर्वांनीं पेट घेतला व अग्नीच्या उंच उंच जाणाऱ्या ज्वाळा आतां आकाशालाहि जाळून टाकतात कीं काय, असें वाटूं लागलें. अशाप्रकारें त्या खांडववनांतील दिव्यौषधी, पाणी व जिवजंतु सरोवरांतील तो अग्नि स्वाहा करूं लागला, त्यावेळीं पाणी तप्त होऊन उसळूं लागलें व मासे, मगर वगैरे जलचर प्राणीही तडफडून प्राण सोडूं लागले. त्या अरण्यांत तक्षक नांवाचा सर्प रहात असे, तो अरण्याला आग लागल्याबरोबर तेथून निघून कुरुक्षेत्राला गेला. त्या तक्षकाचा लहान मुलगा अश्वधनु नांवाचा होता; त्याला त्या अग्नींतून निघतां येईना, तेव्हा त्याच्या आईनें त्याला आपल्या पोटांत घेतलें व त्याच्यासह ती त्या अरण्यांतून उडी मारून जाऊं लागली, इतक्यांत अर्जुनानें तिच्यावर बाण सोडला. त्या बाणानें तिचें शेपूट तुटून पडलें. अशाप्रकारें तें खांडववन जळूं लागल्यावर चोहोंकडे मोठा हाहा:कार उडाला, व तें वर्तमान इंद्राला समजलें. तेव्हां इंद्र तेथें आला व मेघांनां बोलावून पर्जन्यवृष्टि करण्याची त्यानें आज्ञा दिली. त्याप्रमाणें मेघ त्या अग्नीवर मुसळधारा वर्षाव करूं लागले, पाऊस पडत आहे असें पाहतांच अर्जुनानें त्या वनावर बाणांचें आच्छादन केलें. त्याबरोबर अरण्यावर पाऊस पडण्याचें बंद झालें. अर्जुनानें बाणांचें आच्छादन करून मेघास प्रतिबंध केला असें पाहून इंद्रानें मंदराचल पर्वताचें शिखर उचलून त्या बाणावर टाकिलें, परंतु अर्जुनानें बाणांचा मारा करून शिखराचें चूर्ण केलें. मग इंद्रानें, यक्ष राक्षस, गण गंधर्व यांनां बोलावून अर्जुनाशीं युद्ध सुरूं केलें. तेव्हां इंद्राचे हजारों

वीर अर्जुनावर बाणांचा पाऊस पाडूं लागले, परंतु अर्जुनानें त्या सर्वांचे बाण तोडून आपल्या शरवृष्टीनें अष्टदिक्पती व अन्य देव यांस रणांतून पळवून लाविलें. याप्रमाणें महातुंबळ रणकंदन सुरू झाल्यावर आकाशवाणी झाली किं, " तक्षक या वनांतून निघून गेला असून तो कुरुक्षेत्रीं सुखरूप आहे. " ती वाणी ऐकून इंद्रानें युद्ध बंद केलें, व तो तेथून निघून गेला. त्या खांडववनांत मयासुर नांवाचा राक्षस रहात होता. तो राक्षस शिल्पकलेमध्यें इतका निपुण होता कीं, त्याच्या कारागिरीनें लोक अगदीं आश्चर्यचकित होत असत. तो अर्जुनाला म्हणाला; " अर्जुना ! मी या अग्नींत सांपडून आतां व्यर्थ मरेन करितां माझी सुटका कर, मी तुझे उपकार कधीं विसरणार नाहीं. " तेव्हां अर्जुनानें त्याला आश्रय देऊन बाहेर काढिलें. अर्जुनाचे हे उपकार पुढें त्या राक्षसानें पांडवांनां अनेक प्रसंगीं साह्य करून फेडले. पांडवांची मयसभा याच राक्षसानें केली होती. तसेंच त्या खांडववनांत सारंग नांवाचे चार पक्षी वांचले. त्यांची कथा ऋषि जनमेजय राजाला सांगू लागले.

## ३. चार सारंगांची कथा.

पूर्वी मंदपाळ नांवाचा एक ऋषि होऊन गेला. तो अत्यंत पुण्यवान् व पवित्र असून महातापसी होता. तो नेहमीं दिगंबरावस्थेंत रहात असे. त्यानें ब्रह्मचर्यव्रताचें उल्लंघन कधीं मनानें देखील केलें नाहीं. अशा रीतीनें त्यानें कितीएक वर्षे तपश्चर्या केल्यावर देहत्याग करून पितृलोकीं गमन केलें. तेथें जाऊन नंतर तो ब्रह्मलोकीं जाऊं लागला, परंतु ब्रह्मलोकींचा दिव्य मार्ग त्याला आक्रमण करितां येईना. त्यानें जरी इतकें पुण्य संपादन केलें होतें, तरी तें ब्रह्मलोकींचा मार्ग आक्रमण करण्यास अपुरेंच होतें, मग तो पुन्हां पितृलोकीं परत आला व आपल्या पितरांनां म्हणाला; "अहो पितृगणहो ! मला ब्रह्मलोकचा मार्ग आक्रमण करितां येत नाहीं, तर याचें कारण काय, व मी कोणत्या उपायानें ब्रह्मलोकीं जाईन तें मला सांगा. " तेव्हां त्याचे पितर त्याला म्हणाले; " अरे मंदपाळा ! तूं तपसाधनानें पुण्य संपादन केलेंस, परंतु धर्मसाधनानें मिळणारें पुण्य मुळींच संपादन केलें नाहींस. तें पुण्य पदरीं असल्यावांचून ब्रह्मलोकीं प्रवेश करितां येत नाहीं. तूं गृहस्थाश्रमी होऊन आपल्या अस्थी उजविल्या नाहींस व संतती निर्माण केली नाहींस, यामुळें पितृऋणांतून मुक्त झाला नाहींस. ज्याला पुत्र कन्या होत नाहीं, तो या ऋणांतून मुक्त होत नाहीं. त्याप्रमाणें तूं पितृऋणानें बद्ध आहेस म्हणून तुला ब्रह्मलोकीं जातां येत नाहीं; तुला ब्रह्मलोकीं जावयाचें असल्यास गृहस्थाश्रम कर व पुत्र कन्या समवेत संसार करून मग देहत्याग कर." पितरांचें हें भाषण ऐकून त्या मंदपाळ ऋषीनें सारंग पक्ष्याच्या शरिरांत प्रवेश केला. व जरिता, लपिता व शुकसारिका अशा तीन सारंग पक्षिणींशीं विवाह केला. या तीन स्त्रियांपासून त्या मंदपाळ ऋषीला चार पुत्र

झाले. ते चार सारंग पक्षी घरट्यांत ठेवून मंदपाळ बाहेर जात असतां त्याला पवित्र अशा यज्ञनारायणाचें दर्शन झालें. तेव्हां तो त्या यज्ञनारायणाला नमस्कार करून म्हणाला; "हे अग्नी ! खांडव वनांत माझीं चार पिलें आहेत त्यांचें तूं संरक्षण कर." त्याप्रमाणें अग्नीनें तीं सारंग पक्ष्याचीं पिलें संभाळलीं होतीं. खांडव वनांतील दिव्य औषधी अग्नीनें भक्षण केल्यावर तो सर्व रोगांपासून मुक्त झाला, व पूर्वीप्रमाणें सतेज दिसूं लागला. हे सर्व उपकार अर्जुनाचे आहेत असें जाणून अग्नीनें अर्जुनाला, या उपकाराबद्दल श्वेतअश्वांचा दिव्य रथ दिला, व अग्नि तेथून पूर्व स्थळीं निघून गेला. त्या वेळीं इंद्रानेंही अर्जुनाचा फार गौरव केला, व पुढें तुला दिव्य अस्त्रें देईन असें त्यानें अभिवचन दिलें. नंतर श्रीकृष्ण व अर्जुन तेथून इंद्रप्रस्थाला परत आले व श्रीकृष्ण कालिंदीला घेऊन द्वारकेस निघून गेला. कालिंदी नांवाच्या सूर्यकन्येला श्रीकृष्ण वरून द्वारकेंत येत आहे, असें ऐकून द्वारकेच्या लोकांनां फार आनंद झाला व त्यांनीं त्या वेळीं नगर शृंगारून मोठ्या समारंभानें श्रीकृष्णाला मिरवीत मिरवीत नगरांत आणिलें. द्वारकेस आल्यावर वसुदेवानें सुमुहूर्त पाहून श्रीकृष्णाचा कालिंदीबरोबर योग्य रीतीनें विवाह लाविला व चार दिवस मोठा उत्सव केला.

## ४. श्रीकृष्ण–मित्रवृंदाविवाह.

वसुदेवाला जरादेवी या नांवाची एक अत्यंत सुंदर व सुशील बहीण होती. ती अवंतीपूर येथील राजाला दिलेली होती. त्या जरादेवीला विंदु व यदु असे दोन पुत्र व मित्रवृंदा नांवाची एक कन्या अशीं तीन अपत्यें होतीं. हीं मुलें मोठीं झाल्यावर त्यांचा पिता मरण पावला. त्याच्या पश्चात् सर्व राज्यकारभार विंदु व यदु हेच पहात होते. पुढें मित्रवृंदेला तारुण्यावस्था प्राप्त झाली. ती मुळचीच सुंदर होती तशांत तारुण्यावस्था प्राप्त झाल्यानें अधिक रूपवान् दिसूं लागली. ती उपवर झाल्यामुळें तिच्या आईला व भावांनां तिच्या लग्नाची साहजिक काळजी लागली. जरादेवी आपल्या मुलांनां म्हणाली, मुलांनों ! ही मित्रवृंदा श्रीकृष्णाला द्यावी असें मला वाटतें, परंतु मुलांना आईचा विचार पसंत पडला नाहीं. त्यांनीं मित्रवृंदेचें स्वयंवर करण्याचें ठरविलें व देशोदेशींच्या राजांनां निमंत्रणपत्रिका पाठवून स्वयंवरासाठीं बोलाविलें. मित्रवृंदेच्या मनांतून श्रीकृष्णालाच वरावयाचें होतें. ती श्रीकृष्णाचें अहर्निश चिंतन करित होती. मित्रवृंदेची भक्ति पाहून श्रीकृष्णाला जरी आमंत्रण नव्हतें तरी ते स्वयंवराला येण्यासाठीं निघाले. इकडे स्वयंवर मंडपांत सर्व राजे-महाराजे येऊन बसल्यावर विंदूनें व यदूनें मित्रवृंदेला वस्त्रालंकारांनीं उत्तम शृंगारून तिच्या हातांत सुवासिक पुष्पांची माळ दिली व तिला मंडपांत घेऊन आले. त्यावेळीं तिच्या मनाची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. पण इतक्यांत तेथें कृष्णाचा रथ येऊन दाखल झाला. कृष्णाचा रथ पाहतांच मित्रवृंदेनें आपल्या हातांतील पुष्पमाला दुरूनच

त्या रथावर फेंकून दिली. त्याबरोबर श्रीकृष्ण रथाखालीं उतरले व मित्रवृंदेला रथांत बसवून मोठ्या वेगानें द्वारकेकडे निघाले. हा प्रकार पाहून जमलेल्या राजेमहाराजांनां कृष्णाचा फार संताप आला व ते आपलें सैन्य घेऊन श्रीकृष्णाच्या रथामागें लागले; परंतु श्रीकृष्णानें त्या सर्वांनां जर्जर करून मागें परतविलें, व मित्रवृंदेला घेऊन मोठ्या जयश्रीनें ते द्वारकेंत आले. नंतर वसुदेवानें मोठ्या समारंभानें त्यांचा विवाह केला. याप्रमाणें मित्रवृंदा-विवाहाची हकीक सांगितल्याबर ऋषी याज्ञजितीची कथा सांगू लागले. ते म्हणाले.

## ५. याज्ञजितीविवाह.

यज्ञजित या नांवाचा सूर्यवंशी महापराक्रमी असा एक राजा अयोध्येस राज्य करीत होता. त्या राजाला अत्यंत रूपवान याज्ञजिती नांवाची एक कन्या होती. ती याज्ञजिती रूपानें सुंदर, कांतीनें सतेज, शरीरानें गोंडस, वर्तनानें सुशील व स्वभावानें प्रेमळ अशी होती. ती उपवर झाल्यावर सहाजिकच अधिक रमणीय दिसूं लागली. जो जो तिला पाही त्याला विधिरचनेची कमाल झाली असें वाटे. तिच्या बापानें तिला सर्व कला शिकविल्या होत्या. त्या सौंदर्यवान् व गुणवान् राजकन्येच्या प्राप्तीसाठीं मोठमोठे राजपुत्र भगीरथ प्रयत्न करीत होते. परंतु श्रीकृष्णाला वरण्याचा तिनें निश्चय केलेला असल्यामुळें ती प्रत्येकाला नकारार्थी जबाब देत होती., आपणास श्रीकृष्ण पति मिळावा म्हणून ती श्रीकृष्णाची अहर्निश भक्ति करीत होती, व तुळशीची सेवा करीत असे. सर्वसाक्षात् प्रभूला ही तिची मनिषा अंतरदृष्टीनें कळली. त्याबरोबर भक्तवत्सल प्रभु आपला रथ तयार करून अयोध्येला आला. श्रीकृष्ण भगवान् आल्याचें वर्तमान ऐकून तेथील राजाला मोठा आनंद झाला, व सामोरें जाऊन त्यानें श्रीकृष्णाला मोठ्या समारंभानें राजवाड्यांत आणिलें. तेव्हां श्रीकृष्ण त्या राजाला म्हणाले; " राजा! मी तुझ्याकडे कांहीं याचना करावयाला आलों आहें. याचना करणें हें ब्राह्मणाचें कार्य होय, परंतु केव्हां केव्हां याचें अवलंबन दुसऱ्यासही करावें लागतें. त्याप्रमाणें मी तुजकडे तुझ्या मुलीची याचना करावयाला आलों आहें, तर तूं आपली मुलगी याज्ञजिती मला दे. " हें ऐकून राजा म्हणाला, श्रीकृष्णा! तूं माझ्या घरीं याचक होऊन आलास हें माझें थोर भाग्य आहे. तुझ्या चरणाच्या दर्शनासाठीं व तूं पुष्पपत्र स्वीकारावें म्हणून अनेक वर्षे तप करावें लागतें, तरी तुझ्या चरणाचें दर्शन होत नाहीं. तो तूं साक्षात् मजकडे येऊन माझ्या कन्येचा स्वीकार करीत आहेस, याबद्दल मला फार आनंद वाटतो. परंतु श्रीकृष्णा! मी एक दुर्धर पण केला आहे. माझ्याजवळ सात अत्यंत मस्त बैल आहेत. त्या बैलांनां जो एकाच वेळीं वेसण घालील, त्याला मी आपली मुलगी देण्याचा निश्चय केला आहे. आजपर्यंत कित्येक राजपुत्र त्या बैलांनीं मारिले, तेव्हां हें अवघड कार्य तूं कसें

करशील याबद्दल मला मोठी काळजी वाटते. " श्रीकृष्ण ह्मणाले; " राजा ! तूं त्यासंबंधानें मुळींच काळजी करूं नको. मी तुझा पण जिंकल्यास ठीकच आहे, न जिंकल्यास आलों तसा परत जाईन, किंवा जें होईल तें निमुटपणें भोगीन. तूं आपल्या सेवकांकडून येथें बैल घेऊन ये. " कृष्णाचें भाषण ऐकून राजानें आपल्या दूतांकडून तेथें ते बैल आणविले. बैल येण्याबरोबर तेथें सात कृष्ण निर्माण झाले व त्यांनीं एकाच वेळीं सातहि बैलांनां वेसणी घातल्या. कृष्णाचें तें अतुल्य सामर्थ्य पाहून सर्वांनां अत्यंत आनंद झाला. राजानें कृष्णाला आलिंगन दिलें व मोठया समारंभानें याज्ञजितीचें कृष्णाबरोबर लग्न लावलें. आणि दहा हजार सालंकृत गायी, नऊ हजार हत्ती, नऊ कोटी घोडे, याशिवाय रथ, पालख्या, वस्त्रें, रत्नें वगैरे विपुल आंदण दिलें, शिवाय दासदासीहि पुष्कळ दिल्या. हें आंदण मिळालेलें लष्कर घेऊन श्रीकृष्ण मार्ग क्रमित असतां त्या राजकन्येच्या प्राप्तीसाठीं पूर्वीं ज्या राजपुत्रांनीं प्रयत्न केला होता, ते सर्व आपआपली फौज घेऊन श्रीकृष्णावर तुटून पडले. त्यावेळीं श्रीकृष्णाचें व त्या फौजेचें मोठें युद्ध सुरू झालें. तें वर्तमान अर्जुनाला कळतांच तो कृष्णाचे साह्याला आला, व त्यानें शत्रूच्या सैन्याची दाणादाण केली. सूर्योदय झाल्यावर आंधार जसा नाहींसा व्हावा, अथवा गरुडाला पाहून सर्प जसे पळत सुटावे, किंवा सिंहाला पाहिल्याबरोबर हत्तीचा समुदाय जसा पळून जावा, त्याप्रमाणें तें सैन्य अर्जुनाचा अनिवार मारा पाहून दहा दिशेस पळत सुटलें; याप्रमाणें श्रीकृष्ण व अर्जुन विजयी झाल्यावर ते मोठ्या थाटानें द्वारकेंत आले.

## ६. श्रीकृष्णभद्राविवाह.

यानंतर श्रीकृष्णानें भद्रादेवी नांवाची एक स्त्री मिळविली. वसुदेवाला श्रुतकीर्ति या नांवाची आणखी एक बहिण होती, ती कैकेयनगराच्या राजाला दिली होती. त्या श्रुतकीर्तीची भद्रादेवी ही मुलगी होय. ती लहान असतां तिचा बाप मृत झाला होता. त्याच्या पश्चात राज्याची सर्व जबाबदारी व मुलीच्या संरक्षणाचा भार श्रुतकीर्तीवरच होता. श्रुतकीर्तीची भद्रादेवीवर अत्यंत प्रीति होती. ती भद्रादेवी स्वर्गांगनेप्रमाणें सुंदर होती. तिचें विशाळ कपाळ, वक्र, भुंवया, सतेज डोळे, सरळ नाक, आरक्त गाल, लाल ओंठ, शुभ्र दांत, चिंचोळी हनु, गोंडस भुजदंड, उन्नत ऊरस्थल व सिंह कटी, यामुळें तर ती विलक्षण रम्य दिसत असे. मुलगी जसजसी मोठी होऊं लागली तसतशी तिच्या लग्नाची श्रुतकीर्तीला काळजी वाटूं लागली; श्रुतकीर्तीनें पुष्कळ विचार करून शेवटीं आपली मुलगी श्रीकृष्णालाच देण्याचें ठरविलें. श्रुतकीर्तीनें आपला विचार मुलीला कळविला. आपणास श्रीकृष्ण पति मिळावा ह्मणून भद्रादेवी नित्य तुळशीची व शंकरपार्वतीची पूजा करीत असे. भद्रादेवीची आपल्या ठिकाणीं असलेली निस्सीम भक्ति पाहून श्रीकृष्ण कैकयपुराला आला. श्रीकृष्ण आल्याचें वर्तमान

समजतांच श्रुतकीर्तीला फार आनंद झाला, व तिनें कृष्णाला मोठ्या सत्कारानें आपल्या राजवाड्यांत आणिलें. नंतर आपला हेतु कळवून तिनें व भद्रादेवीनें श्रीकृष्णाला सुगंधी उटणी लावून मंगलस्नान घातलें. दोघींनीं श्रीकृष्णाचें भक्तीनें पाद्यपूजन करून तीर्थ प्राशन केलें. त्यावेळीं त्या दोघींनां आज आपला उद्धार झाला असें वाटूं लागलें. अनेक प्रकारचीं पक्वान्नें करून त्यांनीं कृष्णाला भोजनाला बसविलें. भोजन झाल्यावर श्रुतकीर्तीनें कृष्णाला बहुमोल पोशाक देऊन, पुरोहिताकडून सुमुहूर्त पाहून त्याच दिवशीं आपली लावण्यलतिका भद्रादेवी कृष्णाला अर्पण केली. त्या अनुपमेय सुंदरीचा श्रीकृष्णानें मोठ्या आनंदानें स्वीकार केला. श्रुतकीर्तीनें त्यावेळीं नगरांत मोठा उत्सव करून आपल्या प्रजाजनांना संतुष्ट केलें. चार दिवस यथाविधी लग्न सोहळा झाल्यावर श्रुतकीर्तीनें कृष्णाला अनेक बहुमूल्य वस्तु आंदण देऊन, भद्रादेवीसह द्वारकेला मार्गस्थ केले. श्रीकृष्ण द्वारकेंत आल्यावर द्वारकेच्या लोकांनींहि मोठा उत्सव केला, व वसुदेव देवकीनें आपल्या नूतन स्नुषेला व कृष्णाला आलिंगन दिलें, आणि तुला अशाच अनंत स्त्रिया मिळोत असा कृष्णाला आशीरवाद दिला.

### ६. श्रीकृष्ण लक्ष्मणा विवाह.

वैशंपायन ऋषि जनमेजय राजाला ह्मणाले; " राजा ! त्यानंतर श्रीकृष्णानें लक्ष्मणा नांवाची स्त्री कशी मिळविली तें तुला सांगतों. महेंद्र नांवाचा विशाल समृद्ध देश होता. त्या देशाचा महेंद्रनाथ नांवाचा राजा होता. तो राजा अत्यंत पराक्रमी, प्रजावत्सल, दयाळू, पुण्यशील व धर्मभिरू असा होता; परंतु संतति नव्हती म्हणून त्या राजानें पुष्कळ दिवस शंकराची भक्ति करून त्यास प्रसन्न करून घेतलें व आपणास सर्वगुणसंपन्न मुलगी व्हावी अशी विनंति केली. त्याप्रमाणें पुढें त्या राजाला एक अत्यंत रूपवती अशी कन्या झाली. तिचें नांव त्यानें लक्ष्मणा असें ठेविलें. त्या लक्ष्मणेचें सौंदर्य अपूर्व होतें. तिचें मुख चंद्राला, भुंवया धनुष्याला, केशकलाप भ्रमरांनां, भुजदंड मस्त सर्पिणीला, दंत हिरकण्यांना, ओंठ पिकलेल्या तोंडल्यांनां, गाल गुलाबाच्या फुलांनां, उरस्थळ चक्रवाक पक्ष्यांना, कटी सिंहाला, जंघा कर्दली स्तंभांनां व तळपाय रक्तकमळांनां लाजविणारे होते. ती लक्ष्मणा उपवर होऊन सर्व अवयवांनीं पूर्ण झाल्यावर अप्सरेपेक्षांहि अधिक सुंदर दिसूं लागली. असलें हें सुंदर कन्यारत्न कोणत्या पुरुषाला अर्पण करावें याचा त्या महेंद्रनाथाला मोठा विचार पडला. आणि त्यानें असा पण लाविला कीं—मंडपाच्या छताला अत्यंत वेगानें फिरणारा एक कृतीचा मत्स्य बांधावयाचा व त्या मत्स्याची प्रतिमा पाण्यांत पाहून एका बाणानें त्याचा डोळा जो छेदील त्याला लक्ष्मणा द्यावयाची.—याप्रमाणें ठरवून त्यानें त्या स्वयंवराची तयारी केली व सर्वांस आमंत्रण केलें.

लक्ष्मणेचा वास्तविक मनोदय श्रीकृष्णालाच वरण्याचा होता, परंतु बापानें केलेला हा विलक्षण पण पाहून तिला फार काळजी उत्पन्न झाली. व न जाणो या भलत्याच पणामुळें कदाचित् एखाद्या अगदीं क्षुल्लक मनुष्याच्या गळ्यांतही आपणास माळ घालण्याचा प्रसंग येईल किं काय, अशी तिला भीति वाटूं लागली. तिची कृष्णावर अढळ भक्ति असून ती अहर्निश त्याचें चिंतन करीत होती. व इच्छित वर मिळावा म्हणून ती तुळशीची नित्य पूजा करी, व शंकराला कमळें वाही. शिवाय अनाथ अपंगावर उपकार करून त्यांचे आशीर्वाद घेई. ती तिची भक्ति पाहून श्रीकृष्णाला तिची दया आली, व स्वयंवर समारंभाचे दिवशीं बरोबर अर्जुन व भीम यांना घेऊन श्रीकृष्ण महेंद्रपुरीस आले. तेथें त्या लक्ष्मणेची इच्छा मनांत धरून हजारों धनुर्धर आले होते. सर्व लोक जमल्यावर राजानें आपला पण सर्वांनां सांगितला व कारागिराला मत्स्य बांधण्यास सांगितलें. त्या कुशल कारागिरानें मंडपाच्या मध्यभागीं छताला तो मत्स्य बांधून त्याला गति दिली, त्याबरोबर तो वेगानें गरगर फिरूं लागला. माशाचें प्रतिबिंब खालीं पाण्यांत दिसावें म्हणून एका मोठ्या पात्रांत पाणी भरून तें पात्र खालीं ठेवलें होतें. अशी तयारी झाल्यावर राजानें धनुर्धरांनां पण जिंकण्याविषयीं विनंति केली, परंतु तो विलक्षण प्रकार पाहून मोठमोठे धनुर्धर जागच्याजागींच थंड झाले. कोणीच उठत नाहीं असें पाहून श्रीकृष्ण स्वतः उठले व हातांत धनुष्य घेऊन त्यांनीं त्या पाण्यांतल्या प्रतिबिंबाकडे पाहून माशाचा डोळा फोडला; नंतर दुसरा बाण सोडून तो मासा खालीं पाडला. तेव्हां सर्व प्रेक्षकांनीं कृष्णाचा जयजयकार केला. राजानें तत्काल लक्ष्मणेच्या हातांत माळ देऊन तिला सभामंडपांत आणिलें, व तिचा विवाह मोठ्या समारंभानें कृष्णाबरोबर लाविला. चार दिवस हा समारंभ थाटानें झाला; राजानें जांवयाला अगणित संपत्ती आंदण दिली; व श्रीकृष्ण लक्ष्मणेला घेऊन द्वारकेंत आल्यावर, द्वारकेंतल्या लोकांनीं कृष्णाची मिरवणूक काढून त्याचा मोठा सत्कार केला.

---

# अध्याय १२ वा.

## १. सोळा सहस्र स्त्रियांचा कृष्णाशीं विवाह.

श्रीकृष्णाला आठ स्त्रिया कशा प्राप्त झाल्या ती कथा ऐकल्यावर जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला ह्मणाला; " मुनीवर्य ! श्रीकृष्णाला आठ स्त्रिया कशा प्राप्त झाल्या ती कथा आपण मला सांगितली, परंतु श्रीकृष्णाला सोळा हजार स्त्रिया कशा मिळाल्या, त्यांचीं लग्नें केव्हां झालीं, त्यांच्याशीं कृष्णाला लग्न करण्याचें कारण काय झालें, वगैरे सर्व हकीकत आपण मला सांगा. " तेव्हां वैशंपायन

ऋषि ती कथा सांगूं लागले. ते ह्मणाले; "राजा! ह्या सोळा हजार स्त्रिया श्रीकृष्णानें एकाच वेळीं मिळविल्या. ती कथा अशी आहे कीं, पूर्वी भौमासुर या नांवाचा एक राक्षस अत्यंत मदमस्त झाला होता. तो विष्णूचा मुलगा होता याकरितां त्याची वृत्ती वास्तविक सात्विक असावयाला पाहिजे होती, परंतु त्याच्या अंगीं तामसवृत्तीचे सर्व गुण भरले होते. याचें कारण असें होतें कीं, एकदां विष्णूजवळ भूमीनें सायंकाळच्या अशुभ वेळीं संभोगदानाची इच्छा प्रदर्शित केली. स्त्रियेची कामेच्छा पुरी न करणें हें पाप असल्यामुळें विष्णूनें तिला त्यावेळीं रतिदान दान दिलें. त्या वेळच्या संभोगापासून भूमीला हा भौमासुर पुत्र झाला. कृष्ण अवताराचे वेळीं कृष्णाची स्त्री सत्यभामा हीच भूमीरूप होय. असो, भौमासुर आपल्या तामसी स्वभावाप्रमाणें सर्व जगावर प्रलय करूं लागला. पृथ्वीवरील प्रत्येक देशाच्या राजावर स्वारी करून त्याचें राज्य घ्यावें व राजकन्येला हरण करून आपल्या घरीं आणावें, असा त्यानें सपाटा चालविला. मात्र कोणाही कन्येशीं त्यानें विवाह संबंध घडवून आणला नव्हता. कारण त्याची अशी महत्त्वाकांक्षा होती कीं, सोळा हजार राजकन्या जमल्या ह्मणजे मग त्या सर्वांबरोबर एका दिवशीं विवाह करावयाचा. ही विलक्षण महत्वकांक्षा पूर्ण करण्याकरितां त्यानें राजकन्या गोळा करण्याचा क्रम सारखा चालविला होता. असा तो उन्मत्त झालेला भौमसुर एकदां स्वर्गांत गेला व देवांची माता जी आदिती तिच्या कानांतील कुंडलें व इंद्राचें छत्र असें त्यानें बलात्कारानें हरण केलें. तेव्हां इंद्र श्रीकृष्णाकडे आला व त्याला सर्व हकीकत सांगून ह्मणाला; "हे श्रीकृष्णा! त्या भौमासुराचा लवकर नाश नाहीं झाला तर मोठा अनर्थ उडून सर्वत्र हाहाःकार होईल" इंद्राची हकीकत ऐकून श्रीकृष्णानें त्याला आश्वासन दिलें व त्याची रवानगी केली.

इकडे भौमासुरानें अनेक राजकन्या पकडून आणून एका मोठ्या बंदीशाळेंत बंदोबस्तानें ठेविल्या होत्या. त्या सर्वजणी अत्यंत दुःखी होऊन आपल्या सुटकेचा विचार करीत; परंतु बंदीवासांतच राहून मरणें किंवा त्या भौमासुराच्या गळ्यांत माळ घालून त्याची दासी होणें, या व्यतिरिक्त गती नाहीं, असें पाहून त्या राजकन्या अत्यंत दुःख करीत असत. व अशा संकट काळीं आपणाला साह्य करण्यास ईश्वरावांचून कोणीहि समर्थ नाहीं असें वाटून त्या भक्तिभावानें श्रीकृष्णाची प्रार्थना करीत असत. जी राजकन्या तेथें येई ती सर्वांत मिळून सुटकेसाठीं कृष्णाचा धांवा करी. याप्रमाणें होतां होतां त्या भौमासुराच्या बंदीशाळेंत सोळा हजार राजकन्यांची संख्या पुरी होत आली. तेव्हां त्या राजकन्या अगदीं गतधैर्य झाल्या व अनन्य भावानें त्यांनीं कृष्णाची आराधना सुरू केली. भक्तवत्सल प्रभु आपल्या भक्तांवरील संकट पहातांच सत्यभामेसह गरुडावर बसून भौमासुराच्या प्राग्जोतीषपुरास आले. तेथें पहातात तों हत्तीचे सात पाय

एकेठिकाणीं होतील अशा जाडीचे व सात ताड उंचीचे लक्षावधी लोहस्तंभ असून त्या स्तंभावर भौमासुरानें आपलें मंदीर, व सभागृह वगैरे बांधलें आहे, व सभेमध्यें भौमासुर प्रधान मंडळीसह बसला असून त्याचें अपार सैन्य युद्धास तयार होऊन बंदोबस्ताचें काम करीत आहे. श्रीकृष्णानें ती सर्व व्यवस्था पाहिल्यावर पांचजन्य शंख मोठ्यानें वाजविला, तो शंखांचा नाद ऐकून भौमासुराचा प्रधान मत्तहस्तीप्रमाणें श्रीकृष्णाच्या अंगावर धावून आला. त्याबरोबर श्रीकृष्णानें सुदर्शन चक्र सोडून त्याचा नाश केला. त्या प्रधानाला ताम्र, अंतरिक्ष, श्रवण, नभ, विश्वावसु, अरुण व नभस्वान असे सात पुत्र होते. ते महापराक्रमी असून त्यांचीं शरीरें पर्वताप्रमाणें विशाल होतीं. आपला पिता कृष्णानें मारलेला पाहतांच ते सातहि कृष्णावर एकदम धावून आले. कृष्णानें सुदर्शन चक्र सोडून त्यांचाहि नाश केला. तेव्हां त्या भौमासुराचा विष्णु या नांवाचा एक सेनापती होता, तो आपली गदा घेऊन गरुडावर चालून गेला. तेव्हां गरुडानें त्याला खालीं पाडून आपल्या नखांनीं त्याचीं आंतडीं बाहेर काढिलीं. कोणाचेंच कांहीं चालत नाहीं, असें पाहून शेवटीं भौमासुर आपले हत्तीचें प्रचंड सैन्य घेऊन कृष्णावर धावून गेला. त्यावेळीं श्रीकृष्णानें आपल्या सुदर्शन चक्रानें भौमासुराचें मस्तक तोडून पृथ्वीवर पाडिलें. याप्रमाणें त्या दुष्ट राक्षसाचा नाश होतांच देव आदिकरून सर्वांना आनंद झाला, व त्यानीं कृष्णाचा जयजयकार केला. त्यावेळीं पृथ्वी मूर्तिमंत तेथें प्रगट होऊन तिनें कृष्णाची स्तुति केली. भौमासुराच्या स्त्रीनें श्रीकृष्णाच्या चरणावर मस्तक ठेवून अभय मागितलें; व अदितीचीं कुंडलें, इंद्राचें छत्र, वैजयंती माळा वगैरे अनेक दिव्य वस्तु आणि त्या सोळाहजार राजकन्या श्रीकृष्णाला अर्पण केल्या. त्या सोळा हजार राजकन्यांसह सर्व वस्तूंचा श्रीकृष्णानें स्वीकार केला. व मोठ्या समारंभानें राजकन्यांच्या परिवारासह श्रीकृष्ण द्वारकेस परत आले. नंतर स्वर्गीं जाऊन कृष्णानें तीं कुंडलें अदितीला दिलीं व छत्र इंद्राला दिलें, अशी हरिवंशांत कथा आहे. स्वर्गाहून येतांनां पारिजातक वृक्ष आणिला असें श्रीमद्भागवतांत आहे. असो, श्रीकृष्ण द्वारकेस आल्यावर त्यानें सोळाहजार मंडप व सोळाहजार बोहलीं घालून आपणही सोळाहजार स्वरूपें धारण केलीं, आणि सुमुहूर्तावर त्या सर्व स्त्रियांबरोबर एकाच वेळीं कृष्णानें विवाह केला.

## २. वैजयंती मालेची कथा.

ही कथा ऐकून जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला; "वैशंपायनऋषि! श्रीकृष्णाला भौमासुराच्या स्त्रीनें जी वैजयंती माला दिली होती, ती माला कशी निर्माण झाली हें ऐकण्याची इच्छा आहे, तर त्या मालेची उत्पत्ति मला सांगा." तेव्हां वैशंपायनऋषि राजाला ती कथा सांगू लागले. ते म्हणाले; "राजा! पूर्वी विष्णुलोकीं विष्णूच्या दाराशीं जय आणि विजय असे दोघे सख्खे भाऊ द्वार-

पाळ होते. त्यांचा पिता सुशील या नांवानें प्रसिद्ध होता. तो आपल्या नांवा-प्रमाणेंच सुशील, सदाचारी व हरिसेवातत्पर असा होता. प्रत्यहीं प्रभातकाळीं उठून सूर्योदयापूर्वी शुचिर्भूत व्हावें, स्नानसंध्या करावी व श्रीहरीची पूजा करून देवाला नैवेद्य समर्पण करावा, व नंतर भोजन करावें, असा त्याचा नियम होता. त्याचा नैवेद्य दररोज विष्णुलोकीं जात असे, व तो भक्तवत्सल प्रभु त्या ब्राह्मणाचा तो नैवेद्य मोठ्या आवडीनें सेवन करीत असे. तो ब्राह्मण नित्य अनेक पक्वान्नें तयार करवून प्रभूला नैवेद्य समर्पण करीत असे, व स्वयंपाक त्याच्या सुना म्हणजे जय व विजय यांच्या स्त्रिया करीत असत. सुशीलाची पूजा आटोपत आली म्हणजे त्या दोघी सुनांपैकीं कोणी तरी सुवर्णाच्या ताटांत शुचिर्भूत नैवेद्य वाढून तें ताट त्या सुशीलाजवळ आणून ठेवीत. पूजा झाल्यावर नैवेद्य समर्पण केला म्हणजे तें ताट आपोआप उडून विष्णुलोकीं जात असे. याप्रमाणें त्या ब्राह्मणाचा कित्येक वर्षे सारखा क्रम चालला होता. एके दिवशीं त्याच्या जयंती नांवाच्या सुनेनें स्वयंपाकाचे वेळीं भाजीला मीठ घातलें किं नाहीं, असा संशय धरून भाजी चाखून पाहिली, त्यामुळें तो सर्व स्वयंपाक साहजिक अपवित्र झाला व त्यामुळें त्या दिवशीं नैवेद्याचें ताट विष्णुलोकीं जाईना. नेहमींप्रमाणें नैवेद्य श्रीहरीकडे जावा म्हणून सुशीलानें श्रीहरीची करुणस्वरानें पुष्कळ प्रार्थना केली, पण तें ताट बोटभरही वर होईना. तेव्हां त्यास संशय आला व त्यानें विजयाच्या स्त्रीला बोलावून कांहीं अपवित्रतेचें कारण घडलें काय, म्हणून विचारिलें. तेव्हां तिनें घडलेली सर्व हकिकत आपल्या सासऱ्याला सांगितली. तें ऐकून त्या सुशील ब्राह्मणाला फार वाईट वाटलें व जयंतीच्या कृत्याबद्दल राग आला. आणि त्या रागाच्या भरांत त्यानें सुनेला ' तूं शिळा होऊन सरोवरांत अनंत वर्षे पडून राहशील ' असा शाप दिला. श्वशुराचा शाप ऐकून जयंती अत्यंत शोकाकुल झाली व सुशीलाच्या पायांवर मस्तक ठेवून उःशाप मागूं लागली. तेव्हां सुशीलाला तिची दया आली व ' श्रीहरीचा हात लागून तुझा उद्धार होईल ' असा त्यानें उःशाप दिला. नंतर त्या शापाप्रमाणें जयंती मेरुपर्वताच्या माथ्यावर असलेल्या सिद्धसरोवरांत शिला होऊन पडली.

जयंतीची हकीकत विजयाला समजतांच त्यास अनिवार दुःख झालें. विजयाला जयंतीवांचून एकेक क्षण युगाप्रमाणें वाटूं लागला. शेवटीं तो स्त्रीविरहानें वेडा होऊन तेथून निघाला व ज्या सरोवरांत जयंती शिला होऊन पडली होती त्या सरोवराच्या कांठीं ब्रह्मचर्यव्रतानें सूर्याचें अनुष्ठान करीत बसला. एक हजार वर्षे त्याचें सारखें तप चाललें होतें; तेव्हां एके दिवशीं त्याच्यापुढें एक सुवर्णाचें अत्यंत तेजवान् असें कमल येऊन पडलें. तें सुरम्य कमल पाहून जयंताचे मनामध्यें अनेक विचार येऊं लागले. तें सुवर्णकमळ पाताळांतील अमृतकुंडांत शंभर वर्षांनीं एकदां उत्पन्न होत असे, आणि तें उत्पन्न झालें म्हणजे

शेष, सूर्याला तें पूजेच्या वेळीं अर्पण करीत असे. विजय सूर्याची एकनिष्ठपणें सेवा करीत असल्यामुळें सूर्य प्रसन्न झाला व शेषाकडून मिळालेलें सुवर्णकमल त्यानें विजयास दिलें. तें सुवर्णकमल पाहून विजयाला जयंतीची स्मृति झाली. तो ह्मणाला, आज जर माझी स्त्री असती तर तिला मीं हें सुंदर सुवर्णकमल किती प्रेमानें अर्पण केलें असतें! आणि माझ्या प्रीयपत्नीला तरी ह्या कमला-पासून किती आनंद झाला असता! तिनें हें कमल कुरवाळिलें असतें, हुंगिलें असतें आणि मस्तकावर आपल्या केशकलापांत खोवून तो शोभविला असता. तें तिचें सुवर्णकमलविलसित मुखकमल पाहून मला किती तरी आनंद झाला असता! पण तितकें या अभाग्याच्या नशिबीं कोठें आहे! त्या चारुगात्रीवांचून मी कसा हताश झालों आहें, मला सर्व जग शून्य दिसत आहे, माझी रमणी गेल्यामुळें या जगांतील सगळी रमणीयता नाहींशी झाल्याप्रमाणें मला वाटते. ज्या घरांत सौभाग्यवती सुंदरी नाहीं तें घर व स्मशान यांची योग्यता सारखीच. माझी परम प्रिय कांता मला ज्या दिवशीं सोडून गेली त्याच दिवशीं मी सर्व सुखाला अंतरलों. मला आतां हीं सुवर्णकमळें काय करावयाचीं आहेत! मला माझ्या शरिरापेक्षां माझ्या प्रियेचा दगड अधिक प्रिय वाटतो. त्या दगडालाच मी हें कमळ अर्पण करितों.'' असें ह्मणून त्यानें तें कमळ सरोवरांतील शिलेवर नेऊन ठेविलें. याप्रमाणें त्यानें सूर्याकडून मिळालेलीं एकशें आठ सुवर्णकमळें दगडावर नेऊन ठेविलीं. ती एकशेंआठ भरल्यावर त्यानें त्या कमळांचे देंठ एकांतएक गुंफून सुंदर माला तयार केली, आणि ती परम प्रीतीनें पत्निरूपी त्या शीलेवर घातली.

राजा जनमेजया! तुला हें सांगितलेलें आठवत असेलच, कीं दक्षानें शंक-राला हविर्भाग दिला नाहीं, व त्यामुळें दाक्षायणीनें देहत्याग केला. या दोन कारणांमुळें शंकरांनीं वीरभद्राला पाठवून दक्षाचा नाश करविला. दक्ष मृत झाल्यावर त्याची स्त्री प्रसूती आपल्या पतीचें प्रेत एकहजार वर्षेंपर्यंत घेऊन तपश्चर्या करीत होती, त्या एकहजार वर्षांत यज्ञयागादि कृत्यें कोणी न केल्या-मुळें देव हविर्भागावांचून तळमळूं लागले, म्हणून देव दक्षाला जिवंत करण्याचा प्रयत्न करूं लागले, परंतु तो प्रयत्न सर्वतोपरी शंकराच्या स्वाधीन असल्यामुळें सर्व देव शंकरांनां शरण गेले. त्यावेळीं शंकराची समजूत करण्यासाठीं विष्णूला घेऊन जावें असा विचार करून देव विष्णुलोकीं आले व विष्णूला घेऊन शंकराकडे जाण्यासाठीं निघाले. त्यावेळीं मार्ग क्रमित असतां, सिद्धसरो-वरावर आले. तेथें ती सुवर्णकमलांची माला विष्णूच्या दृष्टीस पडली. ती मनोहर माला मिळावी अशी विष्णूला साहजिक इच्छा झाली. ते त्या सरोवरांत गेले व त्यांनीं त्या शिलेवरील माला घेतली. माला उचलतांना त्यांचा हात शिलेला लागला. त्याबरोबर ती शिला नाहींशी होऊन तेथें एक सर्वांगसुंदर स्त्री निर्माण झाली. त्या स्त्रियेनें विष्णूला साष्टांग प्रणाम करून आपली सर्व हकीकत

कळविलीं. इतक्यांत तपश्चर्या करीत बसलेल्या विजयाचें तिकडे लक्ष गेलें. त्यास परमानंद होऊन त्यानें विष्णूला साष्टांग प्रणिपात केला व आपल्या स्त्रियेला प्रेमानें भेटला. विष्णूनें ती जयंती विजयाच्या हातीं देऊन, आतां सुखानें संसार करा, असा त्यांस आशीर्वाद दिला; व ती वैजयंती माला त्या दोघांचें स्मृतिचिन्ह म्हणून विष्णूनें आपल्या गळ्यांत धारण केली. वास्तविक ती माला सुवर्णाच्या कमलांची होती, पण विष्णूनें विजय व जयंती यांपासून ती माला उत्पन्न झाली असल्यामुळें तिचें नांव वैजयंती असें ठेविलें, व आपल्या भक्ताची ती स्मृति म्हणून गळ्यांत वागविली.

---

## अध्याय १३ वा.

### १ विष्णूला शंख–चक्र–गदा यांची प्राप्ति.

वैजयंतीमाला व सुवर्णपद्म ह्यांची प्राप्ति विष्णूला कशी झाली ही कथा ऐकल्यानंतर जनमेजय राजा ऋषींना म्हणाला ? " ऋषि! शंख, चक्र, व गदा हीं आयुधें विष्णूला कशीं प्राप्त झालीं ती हकीकत मला सांगा " तेव्हां ती कथा वैशंपायन ऋषि राजाला सांगूं लागले. ते म्हणाले; " राजा! पूर्वी त्रिपुरासुर या नांवाचा एक राक्षस अत्यंत प्रबळ झाला होता. तो गंगा व सागर या उभयतांचा पुत्र असून विलक्षण शक्तिसंपन्न होता. त्यानें आपल्या बाहुबलानें त्रैलोक्य जिंकून सुरासुर व लोक या सर्वांना त्राहि त्राहि केलें होतें. तेव्हां महादेवांनीं त्या त्रिपुरासुराचा नाश करण्याचा प्रयत्न चालविला. त्यांनीं सर्व देव, तीर्थें, पंचभूतें व दिव्य औषधी या सर्वांपासून त्यांच्या शक्ति मागून घेऊन त्या सर्व शक्तींचें 'सुदर्शन' या नांवाचें एक चक्र तयार केलें, त्या चक्राला सहस्र धारा केल्या, आणि त्या चक्राच्या सहाय्यानें त्यानीं त्या राक्षसाचा नाश केला. तेव्हांपासून शंकरांनां त्रिपुरारि असें नांव पडलें. त्रिपुरासुराचा नाश केल्यावर शंकरांनीं तें सुदर्शनचक्र आपल्या मस्तकावर धारण केलें. महादेव ही विष्णूची उपास्य देवता होय. प्रस्थापित केलेल्या प्राणलिंगाची विष्णु नित्य पूजा करीत असत. विष्णूचा असा नियम होता कीं, प्रत्यहीं पाताळांतून एकहजार सुवर्णकमळें आणून त्यांनीं शंकराची पूजा करावयाची. याप्रमाणें कित्येक वर्षें विष्णूचा हा नियम चालला. एके दिवशीं महादेवांनीं विष्णूची भक्ति कसोटीला लावण्यासाठीं त्या सहस्र कमळांतील एक कमळ विष्णूला नकळत लपवून ठेविलें. इकडे पूजासमयीं रोजच्या नियमाप्रमाणें विष्णु महादेवाला कमळें वहात असतां त्यांत एक कमळ कमी आहे, असें त्याला

आढळून आलें. कित्येक वर्षें चालविलेला नियम भंग होणार असें पाहून विष्णूला अत्यंत हळहळ लागली. पूजा करतांना उठणें हेंहि चांगलें नव्हे आणि उठून तरी पाताळांत जाऊन कमळ घेऊन येण्यास अवसर नव्हता. तेव्हां सुवर्ण-कमळाच्या ऐवजीं नेत्रकमळ वाहून पूजा पूर्ण करावी असा त्यानें विचार केला व त्याप्रमाणें आपला एक डोळा काढून शंकराला अर्पण केला. विष्णूची विलक्षण भक्ति पाहून महादेव प्रसन्न झाले व 'जी इच्छा असेल तें माग' असें ते विष्णूला म्हणाले. तेव्हां विष्णूनें आपणास सुदर्शन चक्र मिळावें अशी इच्छा दर्शविली. तेव्हां महादेवांनीं मोठ्या संतोषानें तें चक्र विष्णूच्या स्वाधीन केलें.

ऋषि म्हणाले; हे जनमेजय राजा! आतां विष्णूनें गदा कशी मिळविली ती कथा तुला सांगतों. पूर्वी लवणासुर या नांवाचा एक अत्यंत पराक्रमी पण फार दुष्ट असा राक्षस होता. त्याच्या जुलमानें लोक अत्यंत त्रस्त झाल्यामुळें विष्णनें त्या लवणासुराला जमिनीबरोबर चिरडून टाकिला. त्या लवणासुराला 'गद' नांवाचा एक लहान मुलगा होता. तो मोठा झाल्यावर त्यानें आपल्या आईज-वळ आपल्या बापाची चौकशी केली, तेव्हां त्याची आई म्हणाली; "बाळा गदा! तुझ्या पित्याचें नांव लवणासुर होय. तूं माझ्या गर्भवासांत असतानां विष्णूनें तुझ्या पित्याला मारिलें." आईचें भाषण ऐकून गदाला विष्णूचा अत्यंत राग आला व आपल्या पित्याचा सूड उगविण्याचा त्यानें निश्चय केला. त्यानें सहस्रवर्षें धूम्रपान साधन करून महादेवांची तपश्चर्या केली. त्या तपश्चर्येनें महादेव त्यावर प्रसन्न झाले व इच्छित वर माग असें म्हणाले. तेव्हां तो शंकराला म्हणाला; "हे देवाधिदेवा! ज्यानें माझ्या पित्याचा प्राण घेतला आहे, त्या विष्णूचा माझ्या हातानें पराभव व्हावा, व त्रिभुवनभाराचें शस्त्र जो आपल्या हातांत वागवील, त्याच्याचकडून माझा नाश व्हावा; बाकी सर्वांवर माझी सत्ता चालावी" असा वर मागितला. त्यावेळीं प्रसन्न झालेल्या शंकरांनीं 'तथास्तु' म्हणून वर दिला. वरप्रदान मिळाल्यावर तो गदासुर विष्णूचा शोध करीत गयेस आला. तेथें विष्णूची गांठ घेऊन तो विष्णूला म्हणाला; "हे विष्णू! तूं माझा पिता जो लवणासुर त्याचा वध केला आहेस, त्याचा सूड घेण्यासाठीं मी येथें आलों आहें, तर युद्धाला तयार हो." असें म्हणून त्या गदासुरानें आपल्या हातांतील त्रिशूळानें विष्णूवर प्रहार केला. त्या वेळीं विष्णु सुदर्शनचक्र अभिमंत्रून त्या गदासुरावर सोडूं लागले; इतक्यांत तेथें ब्रह्मदेव आला व तो विष्णूला म्हणाला; "हे अनंता! हें चक्र या राक्षसावर सोडूं नकोस, तें व्यर्थ जाईल. कारण या गदासुराला महादेवाचा असा वर आहे कीं, जो त्रिभुवनभाराचें शस्त्र वागवील त्याशिवाय व त्या शस्त्राशिवाय याचा नाश कोणाकडूनहि होणार नाहीं." ब्रह्मदेवानें असें सांगितल्यावर विष्णूनें तें चक्र परत घेतलें व एक लांब देंठाचें कमल तोडून घेऊन त्या कमलपुष्पांत त्रिभुवनांतील शक्ति सांठविली, व त्या

कमलानें त्या राक्षसाचा नाश केला. त्या लांब देंठाच्या कमलानें गदासुर मारला, म्हणून विष्णूनें त्या कमलाचें नांव गदा असें ठेविलें व त्यांत त्रिभुवनांतील शक्ति एकवटलेली असल्यामुळें तें आयुध आपल्या हातांत अक्षय वागवूं लागले. याकरितां तेव्हांपासून विष्णूला गदाधर असेंहि म्हणतात.

ऋषि म्हणाले; हे जनमेजया ! विष्णूनें चक्र व गदा हीं कशी मिळविलीं तें तुला सांगितलें. आतां शंख कसा मिळविला, तें सांगतों. पूर्वी एकदां सर्व राक्षस एका ठिकाणीं मिळून पाताळांत हयग्रीवासुराकडे गेले व त्याला ह्मणाले; " हे असुरपते हयग्रीवा ! ब्राह्मणांच्या होमहवनांचा बींमोड केल्यावांचून राक्षसांच्या उन्नतीचे दिवस कधींहि येणार नाहींत. या होमहवनांमुळें इंद्रादि देव प्रबल होतात व राक्षसांनां बिलकूल वर डोकें काढूं देत नाहींत. हीं होमहवनादि कृत्यें बंद करण्यासाठीं वेदांचा नाश केला पाहिजे. " राक्षसांनीं दिलेली सल्ला हयग्रीवाला पसंत पडली व तो शंखाचें रूप धारण करून ब्रह्मलोकीं गेला. तो प्रचंड शंख आपल्याकडे गडबडत येत आहे, असें पाहून ब्रह्मदेव घाबरून गेला. इतक्यांत त्या विशाल शंखाचा असा प्रचंड ध्वनि झाला कीं, त्या नादानें ब्रह्मदेव मूर्च्छित होऊन क्षणभर निश्चेष्ट पडला. ती संधि साधून हयग्रीव ब्रह्मदेवाजवळचे वेद घेऊन समुद्रांत जाऊन लपून बसला. इकडे ब्रह्मदेव सावध होऊन पाहतों तो वेद नाहींत. वेद नाहींसे झाल्यामुळें होमहवनादि कृत्यें बंद पडलीं व देव हविर्भागावांचून तळमळूं लागले. वेदांच्या अभावामुळें थोडक्याच दिवसांत जिकडे तिकडे मोठा हाहाःकार उडाला. देव दिवसेंदिवस निःसत्व होत चालले व राक्षस प्रबल होत चालले. ते देवांनां व लोकांनां वाटेल तसा त्रास देऊं लागले. तेव्हां सर्व देव बृहस्पतीकडे गेले व त्याला हें संकट निवारण करण्याचा मार्ग विचारूं लागले. गुरूनें सर्वांनां क्षीरसागरीं विष्णूकडे जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें सर्व क्षीरसागरीं विष्णूकडे आले. त्यावेळीं विष्णु निद्रिस्त होते. तेव्हां सर्व देवांनीं विष्णूची स्तुति आरंभिली. देवांची करुणवाणी ऐकून विष्णु जागे झाले व त्यांनीं देवांनां आश्वासन देऊन आपआपल्या स्थानीं जाण्यास सांगितलें.

त्यावेळीं द्रविडदेशामध्यें सत्यव्रत या नांवाचा एक मोठा राजा होता. तो राजर्षि असून अत्यंत पवित्र व सदाचरणी होता. एके दिवशीं भागीरथीचे कांठीं तो स्नानसंध्या करीत असतां सूर्याला अर्घ्य देण्यासाठीं हातांत पाणी घेऊन उभा राहिला. तों आकाशांतून एक लहान मत्स्य त्याच्या हातांत पडला. त्यानें तो मत्स्य भागीरथीच्या ओघांत सोडून दिला. तेव्हा तो मासा त्या ऋषीला ह्मणाला; " हे सत्यव्रता ! या भागीरथीमध्यें मोठाले मासे आहेत ते मला खाऊन टाकतील, या करिता ज्या पाण्यांत मासे नसतील अशा पाण्यांत मला सोड. " असें त्या मत्स्याचें बोलणें ऐकून सत्यव्रताला त्याची दया आली व

त्यानें तो मासा आपल्या कमंडलूंत ठेवून तो पुन्हां संध्यातर्पण करूं लागला. थोडा वेळ गेला नाहीं तों तो मासा सत्यव्रताला त्या कमंडलूंतून ह्मणाला; " हे सत्यव्रता! मला हा कमंडलू पुरेनासा झाला आहे, तर लवकर मला मोठ्या पाण्यांत सोड. " सत्यव्रत कमंडलूंत पाहूं लागला तों खरोखरच मासा मोठा झाला असून कदाचित कमंडलूहि फुटेल असें त्याला वाटूं लागलें. तेव्हां सत्यव्रतानें तो मासा कमंडलूंतून काढून एका लहानशा कुंडांत सोडला. पण तेथेंही तो इतका मोठा झाला कीं, तें कुंड त्याला पुरेनासें झालें. तो पुन्हा सत्यव्रताला ह्मणाला, " सत्यव्रता! मला येथून काढून एखाद्या सरोवरांत टाक. " त्याप्रमाणें सत्यव्रतानें तो मासा त्या कुंडांतून उचलला व एका सरोवरांत सोडून दिला. पण तेथेंही तो पूर्वीप्रमाणें मोठा झाला व तें सरोवरही त्यास पुरेनासें झालें. तेव्हां त्यानें मोठ्या सागरांत सोडण्याविषयीं सत्यव्रतास विनंति केली. तेव्हां सत्यव्रत ह्मणाला; " बा मत्स्या! तुझा एवढा प्रचंड देह उचलण्याला मी अगदीं असमर्थ आहें. " हें ऐकून तो मासा ह्मणाला, सत्यव्रता, मला उचललें असतां मी एका कणाप्रमाणें हलका लागेन; मला उचल व समुद्रांत नेऊन टाक. तें त्या माशाचें मनुष्याप्रमाणें अस्खलित बोलणें ऐकून व क्षणांत त्याचा विस्तीर्ण झालेला देह पाहून हा मासा कांहीं विलक्षण शक्तिसंपन्न प्राणी आहे असें सत्यव्रताला वाटलें, व माशाच्या विनंतीप्रमाणें त्यानें त्याला सागरांत नेऊन सोडलें. तेव्हां तो मासा सत्यव्रताला ह्मणाला; " सत्यव्रता! आतां प्रयलकाल अगदीं जवळ आलेला आहे. ही सर्व पृथ्वी सर्व प्राणिमात्रांसह पाण्यांत बुडून जाईल. परंतु सत्यव्रता! मजकरितां तूं फार श्रम घेतले आहेस म्हणून प्रलयकालीं तूं माझें स्मरण कर, ह्मणजे मी तुझें रक्षण करीन." इतकें सांगून तो मासा त्या सागरांत गुप्त झाला. मासा समुद्रांत गुप्त होतांच समुद्राचें पाणी मर्यादा सोडून वाढूं लागलें, व अमर्याद तुफान सुरू झालें. तेव्हां लोक भयाभीत झाले. इकडे तो मासा पाण्यांत गेल्यावर हयग्रीव शंखरूपानें वेद घेऊन लपून बसला होता, त्याचा शोध करूं लागला. त्यावेळीं त्या मत्स्याचा श्वासोच्छ्वासानें सागरांतील पाणी खळबळून गेलें. मत्स्यानें सर्व समुद्र धुंडाळून शंखरासुराला पकडलें व आपल्या तीक्ष्ण दातांनीं त्याचें शरीर क्षतांकित केलें. हयग्रीवही अत्यंत प्रबळ व युद्धविद्येंत निपुण होता. त्या प्रचंड माशाच्या तडाक्यांतून सुटून तो उलट त्याच्यावर प्रहार करूं लागला. याप्रमाणें त्या दोघांचें तुंबळ युद्ध सुरू झालें. शंखासुर आटोपत नाहीं असें पाहून युक्तीनें कार्यभाग साधण्याचा प्रभूनें विचार ठरविला, व तो त्या शंखाला ह्मणाला; " हे हयग्रीवा! तुझें शक्तिसामर्थ्य पाहून मी तुला प्रसन्न झालों आहें तर तुझी जी इच्छा असेल तें माग. " तेव्हां राक्षस ह्मणाला; " अरे दरिद्या! तूं मला काय देणार? मीच तुला तूं मागशील तें देण्यास तयार आहें. तुझी

इच्छा असेल तें माग." मत्स्याला तेंच पाहिजे होतें. त्यानें त्याचें भाष्यदान घेऊन, त्याचें मरण कशांत आहे तें विचारलें. तेव्हां अभिमानानें अंध बनलेला हयग्रीव ह्मणाला; "माझ्या उदराला दांत टोंचला ह्मणजे माझा मृत्यु होईल." तें ऐकतांच माशानें आपला तीक्ष्ण दांत त्याच्या पोटांत टोंचला. त्याबरोबर त्याचें पोट फाटलें व त्यांतून वेद बाहेर पडले. वेद बाहेर पडतांच ते त्या माशाला ह्मणाले; "हे मीना! तूं तर साक्षात् नारायण आहेस. मत्स्यरूप धारण करून तूं आमची सुटका केलीस याबद्दल आह्मी तुझे अत्यंत ऋणी आहोंत." मग विष्णु त्या शंखाला म्हणाले; "शंखा! ह्या वेदांच्या सहवासामुळें तुझे तमोगुण जाऊन तूं ब्राह्मण झाला आहेस. परीस लोखंडाला लागला असतां लोखंडाचें जसें सुवर्ण होतें, किंवा काष्ठें वेदमंत्रानीं अभिमंत्रित केलीं म्हणजे समिधा होतात त्याप्रमाणें तूं वेदांच्या सहवासामुळें पवित्र झाला आहेस, याकरितां तुला तुझ्या या अंतसमयीं कांहीं मागावयाचें असल्यास माग." आपणास मारणारा मासा प्रत्यक्ष प्रभु लक्ष्मीपति आहे, असें पाहून हयग्रीव म्हणाला; "हे देवाधिदेवा श्रीहरी! तूं प्रसन्न झाला आहेस, तर मजकडून प्रत्यहीं सेवा घेत जा. तुला स्नान घालण्याचा अधिकार मला असावा एवढेंच माझें मागणें आहे." शंखासुराचें मागणें श्रीविष्णूनें संतोषानें कबूल केलें, व असा वर दिला कीं, "विष्णूची पूजा करण्यापूर्वी शंखाची पूजा करावी. नंतर शंखपात्रानें देवाला स्नान घालावें. असें जे करणार नाहींत त्यांची पूजा मला पावणार नाहीं. तसेंच मी तुला भूषण समजून नेहमीं आपल्या हातांत वागवीन." नंतर विष्णूनें त्याच्या कंठाजवळची अस्थी काढून हातांत धारण केली.

## २. महाप्रलय.

नंतर विष्णूनें तो शंख वाजविला, तेव्हां पृथ्वीवर मोठा प्रलय झाला. नद्या उलट्या वाहूं लागल्या, पर्वत डळमळूं लागले, व समुद्र खळवळून भयंकर तुफान सुरू झालें. तेव्हां सत्यव्रत राजर्षीनें माशाचें स्मरण केलें. त्या बरोबर विष्णूनें एक मोठी प्रचंड नांव त्याच्याकडे पाठवून दिली. ती नौका पाहून त्याला आनंद झाला, व तो त्या नौकेंत जाऊन बसला. नौकेंत बसल्यावर पाहतो तों नौकेमध्यें पृथ्वीवरील प्राण्यांपैकीं एकेक प्राणी आहे. त्या सर्व प्राण्यांनां पाहून हे पुढील सृष्टीच्या उत्पत्तीसाठीं भगवंतानें राखून ठेविले आहेत, असें पाहून त्या सत्यव्रताला समाधान वाटलें. इतक्यांत समुद्रांत पुन्हा भयंकर तुफान सुरू झालें व ती नाव डगमग डोलूं लागली. तेव्हां सत्यव्रतानें पुन्हा माशाचा धांवा केला. त्यावेळीं मत्स्यानें आपल्या दांतानें ती नाव धरून स्थिर केली, व भगवान् विष्णु चतुर्भुजरूप धारण करून त्या सत्यव्रतापुढें उभे राहिले. तीं

भगवंतांची परम दैदीप्यमान मूर्ति पाहून सत्यव्रताला फार आनंद झाला व त्यानं विष्णुच्या चरणावर अनन्यभावानें लोटांगण घातलें. नंतर विष्णूनें त्यास मत्स्यरूप धारण करण्याचें कारण सांगून त्याचें समाधान केलें व त्यास वैकुंठलोकीं घेऊन गेले.

## अध्याय १४ वा.

### १. विष्णूला पद्माची प्राप्ति.

शंख, चक्र व गदा हीं श्रीविष्णूला कशीं मिळालीं तें वैशंपायनऋषींनीं सांगितल्यावर पद्म, पीतांबर, कौस्तुभमणी व गरुड हीं कशीं प्राप्त झालीं ती कथा सांगू लागले. ते म्हणाले; " राजा ! पूर्वी विष्णूच्या कानांतील मळापासून मधु आणि कैटभ असे दोन राक्षस निर्माण झाले व ते अत्यंत उन्मत्त झाले. एकदां विष्णु क्षीरसागरीं निद्रिस्त असतां तेथें हे दोघे विष्णूला त्रास देण्यासाठीं गेले. त्यांनां पाहून लक्ष्मीनें विष्णूला जागें केलें. तेव्हां विष्णु व राक्षस या उभयतांमध्यें घनघोर युद्ध झालें, परंतु त्या राक्षसांचा नाश होईना; त्या वेळीं विष्णु त्या राक्षसांनां म्हणाले. " मधुकैटभ हो ! तुम्हां उभयतांचें युद्धकौशल्य पाहून मी तुम्हांला प्रसन्न झालों आहें, तर तुमची जी इच्छा असेल ती व्यक्त करा." विष्णूचें भाषण ऐकून ते राक्षस हांसून विष्णूचा उपहास करून म्हणाले; " अरे कृपणा ! तूं प्रसन्न झालास तरी आम्हांला काय देणार ? तूंच पाहिजेतर आमच्याजवळ आपलें इच्छित माग." तेव्हां विष्णु म्हणाले; "तुम्हीं दोघे मला देण्यास तयार अहां तर माझ्या हातानें तुम्हीं मृत व्हा." तेव्हां राक्षस म्हणाले; " तुझ्या हातानें आमचा मृत्यु होऊं दे; पण जेथें पाणी नसेल अशा ठिकाणीं आमचा नाश कर." तेव्हां विष्णूनें त्या दोघांनां आपल्या जंघेवर घेऊन त्यांचा नाश केला. ते दोन्हीं राक्षस जेव्हां छिन्नविछिन्न होऊन पाण्यांत पडले तेव्हां तेथील पाणी नाहींसें होऊन तेथें त्यांच्या मेदाचा पर्वत तयार झाला. तीच ही पृथ्वी होय. त्या राक्षसांच्या मेदापासून पृथ्वीची उत्पत्ति झाली म्हणून तिला मेदिनी असें म्हणतात. या पृथ्वीचा आकार कमलाप्रमाणें असून ब्रह्मदेवानें तिचे आठभाग केले. ते आठ भाग म्हणजे आठ पाकळ्या होत. ब्रह्मदेवानें एकेक पाकळीवर एकेक दिक्पाळ ठेविला, तेच अष्टदिक्पाळ होत. व विष्णु आपल्या हातांत कमलरूपानें पृथ्वीलाच वागवीत आहेत. आदिमाया जी लक्ष्मी तिचें क्रीडाभुवन व आदिस्थान कमळ असल्यामुळें तें विष्णु हातांत वागवितात असेंहि ह्मणतात. तसेंच विष्णूच्या नाभीच्या स्थानीं कमळ आहे ह्मणून विष्णुनें तें हातांत धारण केलें असेंही ह्मणतात. शिवाय जे भक्त विष्णूचें नेहमीं

चिंतन करितात त्यांच्या हृदयकमळांत प्रभु अक्षय आहेत. हें दाखविण्यासाठीं विष्णूनीं हातांत कमळ घेतलें आहे. याप्रमाणें कमळ धारणाची वेगवेगळी कथा आहे.

## २. विष्णूला कौस्तुभमण्याची प्राप्ति.

वैशंपायन म्हणाले; "राजा जनमेजया ! विष्णूनें कौस्तुभमणि कसा मिळविला तें सांगतों. पूर्वीं देवांनीं व असुरांनीं समुद्रमंथन करण्यासाठीं जो दोर आणिला होता, तो समुद्रमंथन केल्यावर पृथ्वीवर टाकून दिला. त्या भारानें पृथ्वी दुभंग झाली व त्यामुळें, पृथ्वीच्या उदरांत असलेलें मुक्ताफळ पृथ्वीपासून सुटून खालीं पाताळांत पडूं लागलें. तें मुक्ताफळ शेषानें धरिलें व आपल्या मस्तकावर धारण केलें. तो मणी अत्यंत तेजस्वी असल्यामुळें, त्याचा सर्वत्र मोठा प्रकाश पडला. तो मणी कौ म्हणजे पृथ्वी व स्तु म्हणजे मंदराचल व भ म्हणजे संयोग यांच्या संयोगापासून झाला म्हणून त्याचें नांव कौस्तुभ असें ठेविलें. पुढें गरूड व शेष यांमध्यें वैर माजलें; तेव्हां शेष गरुडाच्या भीतीनें क्षीरसागरीं पळून गेला, आणि विष्णु निजले आहेत असें पाहून, शेष विष्णूच्या शयनाखालीं लपला. व गरूड गेल्यावर शेषानें विष्णुला वंदन करून कौस्तुभमणी दिला, व आपण पाताळांत निघून गेला."

## ३. गरुडाची उत्पत्ति.

ऋषि म्हणाले; "जनमेजया ! नंदीकेश्वरानें विष्णुला पीतांबर दिला, त्या विषयींची कथा तुला सांगितलीच आहे. आतां गरूडवाहन विष्णुला कसें मिळालें तें तुला सांगतों. दक्षानें आपल्या तेरा मुली कश्यपाला दिल्या होत्या. त्यांपैकीं कद्रू व विनता यांनीं एकदां कश्यपाला अशी विनंति केली कीं, आपण एवढी सृष्टि निर्माण करितां पण आह्मां दोघींना कांहीं संतति नाहीं, तर आह्मांला पुत्र व्हावेत. मग कश्यपानें कद्रूला एक हजार पुत्र दिले व विनतेला दीड पुत्र दिला. कद्रूनें सहस्र अंडीं घातलीं व तीं फोडल्यावर त्यांतून शेष, वासुकी, तक्षक, काळिया, ऐरावत, शंख, वगैरे सहस्र सर्प निघाले. विनतेला दोनच अंडीं झालीं. तेव्हां ती आपला पति जो कश्यप त्याच्याकडे गेली व ह्मणाली, तुह्मीं कद्रूला एक हजार पुत्र दिले आणि मला दोनच दिले, असें कां? मलाही हजार पुत्र होतील असें करावें. तें ऐकून कश्यप म्हणाला; विनते ! तुला जरी दोनच पुत्र होतील तरी ते महाप्रतापवान होतील व ते कद्रूच्या पुत्रांचा नाश करतील. तूं जीं आंडीं घातलीं आहेस तीं तूं हजार वर्षें जतन कर, आणि नंतर फोड. कश्यपाच्या आज्ञेप्रमाणें विनता स्वस्थानीं जाऊन अंड्यांचें संरक्षण करीत बसली. परंतु पांचशें वर्षें झाल्यावर पुत्रमुख-दर्शनाला ती उत्सुक झाली; व तिनें एक अंडें फोडलें. अपूर्णकाळीं अंडें फोडल्यामुळें त्यांतून जें मूल बाहेर पडलें, त्यास कमरेपासून मस्तकापर्यंत सर्व अवयव पूर्ण होते, परंतु कमरेच्याखालीं अवयव नव्हते. तोच अरुण होय. तो पुढें सूर्याचा सारथी झाला.

अपुऱ्या अवस्थेंत अंडें फोडून आपणास बाहेर काढिलें ह्मणून त्यानें आईला 'तूं दुसऱ्याची दासी होशील' असा शाप दिला, व तो जाऊं लागला. तेव्हां त्याच्या आईनें पश्चात्तापपूर्वक उःशाप मागितला. तेव्हां अरुणास मातेची दया येऊन तो म्हणाला; 'तूं हें दुसरें अंडें आतां एक हजार वर्षांनीं फोड, म्हणजे त्यांतून तुला दिव्य पुत्र मिळेल, व तो तुझ्या या शापाचें निरसन करील.' या गोष्टीस कांहीं काळ लोटल्यानंतर एके दिवशीं कद्रू व विनता विनोद करीत बसल्या असतां त्यांचें लक्ष सूर्याच्या घोड्याकडे गेलें; व विनता म्हणाली सूर्याचा घोडा अगदीं पांढरा शुभ्र आहे. पण कद्रू ह्मणाली, 'नाहीं, अगदीं पांढरा शुभ्र नाहीं, त्याचे कान व पुच्छ हीं काळीं आहेत.' याप्रमाणें त्या दोघींचा वाद सुरू झाला व शेवटीं ती गोष्ट पैजेवर आली. त्या पैजेंत जी हरेल तिनें दुसरीचें दास्यत्व करावें असें ठरलें. पुढें कद्रूनें शेषाला विचारलें तेव्हां तो म्हणाला, आई, सूर्याचा घोडा पांढराच आहे. हें ऐकून कद्रू घोंटाळ्यांत पडली व पैज अंगावर येणार असें तिला वाटूं लागलें. तिनें शेषाला पैजेविषयींची सर्व गोष्ट कळविली व सूर्याच्या घोड्याचे कान व शेंपूट हीं काळीं दिसतील अशी कांहीं योजना करण्यास सांगितलें. शेषानें कांहीं सर्प घोड्याच्या कानावर व पुच्छावर बसवून ते अवयव काळे दिसतील असें केलें. इतकें झाल्यावर कद्रू विनतेला म्हणाली; "विनते, ये, तो सूर्याचा घोडा तूं आपल्या डोळ्यांनीं पहा; आणि त्याचे कान व शेंपूट हीं काळीं आहेत किं पांढरीं आहेत तें सांग." विनता घोड्याकडे पाहूं लागली तों कान व शेंपूट हीं तिला काळीं दिसूं लागलीं. तिनें ती गोष्ट स्पष्टपणें कबूल केली, व त्या दिवसांपासून ती कद्रूची दासी झाली. पुढें तिला तें शेषाचें कपट कळून आलें, तेव्हां तिनें त्यांना शाप दिला किं, 'तुम्हीं सर्व जनमेजयाच्या होमकुंडांत सांपडून जळून जाल.' तिचा शाप ऐकून कद्रूला वाईट वाटलें. विनतेचा तिला फार राग आला, व त्या रागाच्या भरांत तिनें विनतेला आपली सेवावृत्ति करावयाला लाविलें. ती म्हणाली; "विनते! तूं मला व माझ्या मुलांना आपल्या खांद्यावर घे आणि समुद्रकांठीं चल." दासीपण स्वीकारलेल्या विनतेनें आज्ञेप्रमाणें त्या सर्वांना आपल्या खांद्यावर घेतलें व ती हळू हळू मार्ग क्रमीत क्रमीत मोठ्या कष्टानें समुद्रतीरीं येऊन पोहोंचली.

विनता समुद्रावर गेल्यावर तिच्या मागें तिच्या अंड्याला सहस्र वर्षें पुरीं झालीं व तें अंडें आपोआप फुटलें. त्यांतून एक अत्यंत प्रचंड, व सूर्याप्रमाणें सतेज पक्षी निघाला. त्याचें नांव गरूड होय. अंड्यांतून बाहेर पडल्याबरोबर तो आपल्या आईला इकडे तिकडे पाहूं लागला; परंतु, त्याला त्याची आई कोठें दिसेना; तेव्हां तो चिंतातूर झाला. इतक्यांत आकाशवाणी झाली किं, "हे पक्षींद्रा! तुझी माता विनता समुद्रकांठीं आहे." आकाशवाणी

ऐकून गरूड मोठ्या वेगानें समुद्रकांठीं आला; व विनतेला पाहून तो तिच्या चरणावर गडबडा लोळूं लागला. मुलाला पाहून विनतेलाही आनंद झाला. तिनें त्याला उचलून प्रेमानें कुरवाळिलें, आणि आपण सांप्रत सेवावृत्तीचे कष्ट कसे सोशीत आहों तें त्याला सांगितलें. आईची ती करुणापर स्थिति पाहून तिच्या खांद्यावरील सर्पाचें ओझें त्यानें आपल्या पाटीवर घेतलें व तो उंच आकाशमार्गानें मार्ग क्रमूं लागला. आकाशांत त्या सर्पांना सूर्याचा ताप लागून ते होरपळून निघाले, तेव्हां गरूडानें त्यांना जंबुवनांत खालीं उतरविलें. मग कद्रूनें मेघांना बोलावून आपल्या मुलांचा दाह शांत केला. त्या वेळीं गरूड कद्रूला म्हणाला; "हे कद्रू! काय केलें म्हणजे तूं माझ्या आईला दास्यत्वांतून सोडशील तें सांग?" तेव्हां कद्रू म्हणाली; "माझ्या मुलांना अमृत आणून देशील तर मी तुझ्या आईला दास्यत्वांतून सोडून देईन." गरुडानें तें ऐकून घेतलें. पुढें सर्व मंडळी स्वस्थानीं आल्यावर गरुडास भूक लागली. त्यानें आपल्या आईजवळ खावयास मागितलें. वनितेनें सांगितलें; 'तूं एक सहस्र कोळी खा, म्हणजे तुझी तृप्ति होईल. परंतु त्यांत जो विप्र असेल तो मात्र खाऊं नको." "विप्र कसा ओळखावा?" असा गरुडानें प्रश्न केला; तेव्हां ती म्हणाली; "जो खातांना तुझा गळा भाजेल त्याला सोडून दे." याप्रमाणें आईची आज्ञा मान्य करून गरुडानें कोळी खाण्याचा सपाटा चालविला. त्यांत एका कोळ्याला खातांना त्याचा घसा भाजला; तेव्हां तो विप्र आहे, असें ओळखून त्याला सोडून दिलें. तो ब्राह्मणच होता पण कोळ्याचा जांवई होऊन तो त्या कोळ्यांच्या समूहांत होता. तसेंच एक स्त्री गिळीत असतांना त्याचा कंठ भाजला; तेव्हां तिलाही त्यानें सोडून दिलें. ती कोळ्याची स्त्री होती; परंतु, तिच्या पोटांत ब्राह्मणाचा गर्भ होता. असो; मातेच्या आज्ञेप्रमाणें सहस्र कोळी गरुडानें भक्षण केले; परंतु त्याची उदरपूर्ति झाली नाहीं; तेव्हां तो आपला पिता जो कश्यप त्याजकडे गेला. मुलास पाहून कश्यप ऋषींनां आनंद झाला. गरुडानें बापाला नमस्कार करून पोटांत भुकेनें कल्होळ उडाल्याचें कळविलें. कश्यपानें गरुडास प्रेमानें कुरवाळून सांगितलें, सुवर्ण नांवाच्या सरोवरावर एक मोठा हत्ती व एक मोठा कांसव आहे, त्या उभयतांनां मारून त्यांनां भक्षण कर. कारण ते नित्य कलह करतात, त्यामुळें त्या सरोवराजवळ राहणाऱ्या ऋषींनां फार त्रास होतो. हें ऐकून गरुडानें त्यांची मूळकथा ऐकण्याची इच्छा दर्शविली.

### ४. हत्तीची व कांसवाची कथा.

गरुडाची ती इच्छा जाणून कश्यप म्हणाले; "पूर्वीं धनदत्त या नांवाचा एक मोठा व्यापारी होता. त्यानें शंकराला प्रसन्न करून दोन पुत्रांचा वर मिळविला. त्याप्रमाणें त्याला दोन पुत्र झाले. त्यानें वडील मुलाचें नांव वसुनिक व धाकट्याचें नांव सुप्रतिक असें ठेविलें. ते पुत्र जाणते झाल्यावर त्यांचा बाप

मरण पावला. ते दोघेही दुष्ट बुद्धीचे असल्यामुळें द्रव्यासाठीं रोज भांडूं लागले. शेवटीं गांवांतील चार सभ्य लोकांनीं त्यांच्या संपत्तीचे सारखे दोन भाग करून दिले, परंतु त्या वांटण्या दोघांनाही पसंत पडल्या नाहींत व त्यांचें भांडण मिटलें नाहीं. एके दिवशीं ते भांडतांना क्रोधाच्या भरांत, वडील भावानें धाकट्या भावाला,–तूं कांसव होशील–असा शाप दिला. तेव्हां धाकट्या भावानें वडील भावाला–तूं हत्ती होशील–असा शाप दिला. त्याप्रमाणें एक कांसव व एक हत्ती होऊन सुवर्णसरोवरांत राहिले आहेत, व दोघेहि नित्य भांडत आहेत.

याप्रमाणें त्यांची कथा ऐकून गरूड तेथून निघाला व सुवर्णसरोवरावर आला. यावेळीं ते दोघे एकमेकांशीं मारामारी करीत होते. गरूडानें झडप मारून त्या दोघांनाहि पायांत धरिलें, व तो आकाशांत उडाला. आकाशांत भ्रमण करीत असतां एक मोठा वृक्ष त्याच्या दृष्टीस पडला. त्या वृक्षाची वायव्य कोणाची फांदी फार लांब होती, त्या शाखेवर बसून शिकार खावी अशा हेतूनें गरूड त्या शाखेवर येऊन बसला. त्याबरोबर ती शाखा कडकन मोडली. त्या शाखेवर ब्रह्मदेवाचे वालखिल्य वगैरे पुत्र तपश्चर्या करीत होते. शाखा खालीं पडल्यास मोठा अनर्थ होईल असें जाणून गरुडानें ती फांदी तोंडांत धरली व त्या सर्वांसह तो आकाशांत उडाला, व कश्यपाजवळ येऊन भक्ष्य खाण्यासाठीं जागा कोणती तें विचारूं लागला. तेव्हां कश्यप ह्मणाले; "येथून शंभर योजने दूर महेंद्र नांवाचा पर्वत आहे; त्या पर्वतावर जाऊन तूं आपलें भक्ष्य खात बैस." त्याप्रमाणें महेंद्र पर्वतावर जाऊन गरुडानें कांसवाला व हत्तीला मारून खाल्लें, व त्यांचे कांहीं शेष अवयव राहिले होते ते घेऊन उडत उडत तो एका जंबुवृक्षाच्या शाखेवर येऊन बसला. तों ती शाखाहि मोडली. तेव्हां ती शाखा चोंचींत धरून तेथून गरुड उडाला व दक्षिण दिशेला असलेल्या लंका बेटांत जाऊन तेथें त्यानें ते अवयव खाऊन टाकिले; व ती जंबुवृक्षाची फांदी तेथें टाकिली. तेणेंकरून तो सर्व पर्वत सुवर्णाचा झाला. गरुडाच्या भारानें तो पर्वत भंगून त्याचे तीन भाग झाले, ह्मणून त्या पर्वताला त्रिकूट पर्वत असें म्हणतात.

### ५. विष्णूला गरुडाची प्राप्ति.

पुराणांत असें लिहून ठेविलें आहे कीं, गरुडाचा एकेक पंख बारा हजार योजनांचा होता. ह्मणजे दोन्ही पंख चोवीस हजार योजनांचे होते. असो, भुकेचें शांतवन झाल्यावर गरुड, आपल्या आईला दास्यत्वांतून सोडविण्यासाठीं अमृत मिळविण्याकरितां इंद्राच्या अमरावतीस गेला, व अमृताचा शोध करूं लागला. इतक्यांत अशी आकाशवाणी झाली कीं,–"पलीकडे जें एक अग्नीनें वेष्टिलेलें कुंड आहे, तेंच अमृतकुंड होय. त्या कुंडांत अमृताचा कलश असून, त्याच्या सभोंवताली प्रखर अग्नी पेटविलेला आहे."–हें ऐकतांच गरुड त्या अग्नीकुंडाजवळ आला. तेथें अमृताच्या संरक्षणासाठीं इंद्रानें भौम

या नांवाचा दूत ठेविला होता. तो गरुडाला प्रतिबंध करूं लागला. तेव्हां गरुडानें झटक्याबरोबर त्याला मारून टाकिलें. तो प्रकार पाहतांच इतर दूत भयभीत होऊन इंद्राकडे धांवत गेले. दूतांचें वर्तमान ऐकून इंद्र आपलें अफाट सैन्य घेऊन गरुडाबरोबर युद्ध करण्यासाठीं आला. त्यावेळीं गरुड व इंद्र या उभयतांमध्यें घनघोर युद्ध झालें. देवांनीं शस्त्रास्त्राच्या माऱ्याची शिकस्त केली पण त्याचा कांहीं उपयोग होईना. तेव्हां इंद्रानें आपलें भयानक वज्र गरुडाच्या अंगावर सोडलें, पण तें महाअस्त्र गरुडाला पुष्पाप्रमाणें वाटलें. तथापि तें वज्र दधीच ऋषीच्या अस्थींचें केलें होतें. अर्थात् तें ब्रह्मास्त्र होतें. त्या अस्त्राचा अपमान होऊं नये ह्मणून गरूडानें आपल्या पंखाचें एक बारीक पीस त्या अस्त्राचें प्रहारचिन्ह ह्मणून काढून टाकिलें. गरुडानें आपल्या पंखाचें एक पीस काढून टाकिलें, ह्मणून तेव्हांपासून गरुडाला सुपर्ण असें नांव पडलें आहे. असो, देवेंद्र देवांसह गरुडाशीं युद्ध करीत असतां, गरुडानें सहज आपले दोन्ही पंख हालविले. त्याबरोबर सर्व देव व इंद्र वाहनासह दूर जाऊन पडले व त्यांची दाणादाण उडाली !

यात्रमाणें सर्वांची दाणादाण उडवून गरुड अमृतकलशाजवळ गेला. पण अमृतकलशासभोंवतालचा अग्नि अत्यंत प्रज्वलित असल्यामुळें, त्याला त्या अग्नींत झडप मारवेना. मग गरुडानें सागराचें पाणी आणून तो अग्नि विझविला. हा प्रकार पाहून इंद्र गतधैर्य झाला व आतां अमृत खास जाणार असें त्याला वाटलें. तो देवगुरु बृहस्पतीला ह्मणाला; "अहो बृहस्पती ! हा पक्षी कोण आहे, व हा एवढा बलवान् कशामुळें झाला ?" तेव्हां बृहस्पति ह्मणाला; "देवेंद्रा, पूर्वी कश्यपानें पुत्रप्राप्तीसाठीं यज्ञ आरंभिला होता. त्या यज्ञासाठीं अनेक ऋषि किन्नर वगैरे कश्यपाचे पुत्र, वालखिल्य वगैरे ब्रह्मदेवाचे पुत्र, याप्रमाणें हजारों ऋषि, देव, गंधर्व वगैरे आले होते. त्यांनां कश्यपानें एकदां समिधा आणण्यासाठीं पाठविलें. ते सर्वजण अरण्यांतून समिधा घेऊन येत असतांना, वाटेंत चिखलांत गायींचीं पावलें रुतलीं होतीं व त्या पावलांत पाणी सांचलें होतें; तें गाईच्या खुराचें पाणी अत्यंत पवित्र असें जाणून सर्व ऋषि तेथें थांबले व त्यांनीं समिधा वगैरे खालीं ठेवून त्या गायींच्या खुरांतल्या पाण्यानें मार्जन केलें. तो प्रकार पाहून हे इंद्रा ! तुला मोठें आश्चर्य वाटलें व तूं हांसलास. तो तुझा उन्मत्तपणा पाहून विरंची पुत्रांनीं व ऋषींनीं तुला त्याबद्दल शिक्षा लावण्याचा निश्चय केला, व ते तेथें ब्रह्मदेवाच्या प्रसन्नतेसाठीं तपश्चर्या करीत बसले व ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतलें; आणि इंद्राचा गर्व हरण करील असा पुत्र कश्यपाला व्हावा असा वर मागून घेतला. त्या वरदानाप्रमाणें झालेला कश्यपाचा हा पुत्र गरुड आहे व तो पक्षांत इंद्र आहे. तो तुझ्याच्यानें आटोपणार नाहीं. करितां तूं विष्णूला शरण जा."
देवगुरु, बृहस्पती यांनीं सांगितलेली ही हकीकत ऐकून देवेंद्र फार चिंतातूर

झाला. इतक्यांत गरुडानें अग्नि विझवून, कलशापर्यंतचा मार्ग निष्कंटक केला. त्या अमृतकलशावर एक अत्यंत वेगवान चक्र फिरत होतें व जवळ दोन मोठाले सर्प बसले होते. गरुडानें ते सर्प मारिले व तें चक्र मोडून अमृताचा कलश उचलला. इतक्यांत तेथें विष्णु आले व त्यांनीं गरुडाच्या मस्तकावर आपली गदा मारली; परंतु त्या आघाताचा गरुडावर कांहींहि परिणाम झाला नाहीं. दोघांचें युद्ध सुरू झालें. विष्णूनीं पराकाष्ठा केली पण गरुड आटोपेना. तेव्हां युक्तीनें त्याला अंकित करण्याचा विचार विष्णूनें ठरविला. व ते ह्मणाले; " गरुडा ! तुझें युद्धपटुत्व पाहून मी संतुष्ट झालों; तर तुझी इच्छा असेल तें माग, मी तें तुला मोठ्या संतोषानें देतों." हें विष्णूचें भाषण ऐकून गरुड हांसला व ह्मणाला; " अरे खद्योता; तूं सूर्याला काय देणार? सिंहानें मृगाजवळ कधीं याचना केली आहे काय? तूंच मजजवळ तुझी जी इच्छा असेल तें माग, मी तुझी इच्छा पूर्ण करण्यास तयार आहें." तेव्हां विष्णु ह्मणाले; " गरुडा ! खरोखर तूंच दाता शोभतोस. तूं जर मला देण्यास तयार आहेस, तर तूं माझें वाहन होऊन मला आपल्या स्कंदावर अक्षय वागवीत जा. तुझ्या सहवासानें मला आनंद होईल." विष्णूची ही मागणी गरुडानें मोठ्या संतोषानें कबूल केली, परंतु तो ह्मणाला, देवा, माझ्या आईला दास्यत्वांतून मुक्त केल्यानंतर मी तुझ्या सेवेंत हजर होईन. इतकें सांगून गरुड अमृतकलश घेऊन जाऊं लागला; तेव्हां इंद्र त्याची प्रार्थना करून ह्मणाला; " हे सुपर्णा ! अमृत हें स्वर्गाचें भूषण आहे, हें तूं मृतलोकीं घेऊन गेलास तर त्याची योग्यता कमी होईल व सर्व प्राणी अमर होतील." गरुड ह्मणाला, ' इंद्रा ! मी हें अमृत नेऊन कद्रूला देतों, ह्मणजे माझी आई तिच्या दास्यत्वांतून मुक्त होईल; व तूं तेथें काक वेष धरून ये व हा अमृतकलश उचलून आण. ह्मणजे आपलें दोघांचेंही कार्य होईल." ही युक्ति इंद्राला पसंत पडली. गरुडानें तो अमृतकलश कद्रू पुढें नेऊन ठेवला व आपल्या आईची त्यानें दास्यत्वांतून मुक्तता केली. इतक्यांत तेथें काकरूपानें इंद्र आला व त्यानें तो अमृतकलश उचलला. उचलतांना कलश हालला त्यामुळें त्यांतील थोडें अमृत दर्भावर सांडलें, तें अमृत सर्प चाटूं लागले, तेव्हां त्यांच्या जिभा कापल्या व त्याचे दोन भाग झाले. पुढें गरुड व सर्प या उभयतांमध्यें वैर वाढत चाललें; आणि गरुडाकडून सर्पांना फार त्रास होऊं लागला. तेव्हां शेषानें ब्रह्मदेवाला प्रसन्न करून आपल्या बचावाचा मार्ग विचारिला. ब्रह्मदेव ह्मणाले; " शेषा ! तुह्मीं लपून बसल्यावांचून आतां तुह्माला सुरक्षितपणा नाहीं. करितां काळीयानें जंबुवनांत, तक्षकानें खांडववनांत, वासुकीनें महादेवाजवळ, ऐरावतानें मलयगिरीवर आणि तूं पाताळांत पृथ्वीचा भार शिरावर घेऊन रहावें, व तुमच्या बांधवांनीं जमिनींत बिळें करून रहावें." ब्रह्म

देवाच्या आज्ञेप्रमाणें ते सर्प आपआपल्या स्थानीं गेले व जमीनींत बिळें करून राहिले. पुढें शेषही विष्णूचा अत्यंत जिवलग भक्त झाला, व विष्णूनें त्याचें नांव अनंत ठेविलें. गरुडाप्रमाणेंच शेषालाही विष्णु घटकाभरही विसंबेनासे झाले. गरुडानें जरी विष्णूचें वाहकत्व स्वीकारिलें होतें तरी विष्णूनें गरुडाला आपल्या रथाच्या ध्वजस्तंभावर बसवून त्याचा बहुमान केला.

---

# अध्याय १५ वा.

## १. श्रीवत्सलांच्छन व बलरामकीर्ति.

एके दिवशीं जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला, " ऋषि! श्रीवत्सलांच्छन विषयींची कथा ऐकण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां " वैशंपायन ऋषि राजाला ती कथा सांगू लागले. ते म्हणाले; " राजा! पूर्वीं एकदां सर्व ऋषींमध्यें असा वाद निघाला कीं, ब्रह्मा, विष्णु व महेश या तिघांमध्यें विशेष सात्विक गुणी असा कोण? तेव्हां कोणी ब्रह्मदेवाला, कोणी शंकराला, तर कोणी विष्णूला, सात्विक म्हणूं लागले. ज्याला जी देवता प्रिय होती तो तिला सात्विक म्हणूं लागला. यामुळें खरा निर्णय मुळींच होईना. शेवटीं ऋषींनीं असें ठरविलें कीं, आपल्यापैकीं कोणी एकानें जाऊन प्रत्येक देवाला लत्ताप्रहार करावा आणि तसें केल्यावर जो रागावणार नाहीं त्याला सात्विक असें म्हणावें. ही सल्ला सर्व ऋषींना पसंत पडली व त्याप्रमाणें त्यांनीं ब्रह्मदेवाचा पुत्र भृगु ऋषि त्याला तें कार्य करण्यासाटीं पाठविलें. तो प्रथम निघाला तो ब्रह्मदेवाचे मंदिरांत गेला, व ब्रह्मदेवाच्या अगदीं जवळ जाऊन त्याला लाथ मारणार तोंच ब्रह्मदेवाच्या दूतांनीं भृगूला मागें ओढिलें व तेथून घालवून दिलें. त्यानंतर भृगु ऋषि शिवलोकीं गेला. तेथेंही तो संधि साधून महादेवाच्या जवळ गेला; व लाथ मारणार इतक्यांत त्याला शिवगणांनीं मागें ओढून मंदिराच्या बाहेर घालवून दिलें. मग तो भृगु ऋषि क्षीरसागरीं विष्णुकडे गेला. विष्णूच्या मंदिराच्या दाराशीं जे द्वारपाळ होते, त्यांनीं भृगुऋषींना पाहिल्याबरोबर त्यांना वंदन करून, प्रेमानें आंत सोडिलें. मंदिरामध्यें जे दूत होते, त्यांनींही त्याचा गौरव करून थेट विष्णूपर्यंत नेऊन सोडलें. विष्णु शेष–शय्येवर निद्रिस्त होते व लक्ष्मी पाय चुरीत बसली होती. भृगुऋषीस पहातांच लक्ष्मीनें त्यांस नमस्कार केला व आसनावर बसावयास सांगितलें. परंतु भृगुऋषि आसनावर न बसतां–विष्णूला जागें कर–असें रागानें म्हणाले. तेव्हां लक्ष्मी म्हणाली; " ऋषि! निद्रिस्ताची निद्रा भंग करणें हें पाप आहे. " हें ऐकून भृगुऋषि अधिक क्रुद्ध झाला व त्यानें विष्णूचा पितांबर हिसकून त्याच्या हृदयावर जोरानें एक लाथ मारिली. त्याबरोबर विष्णु जागे झाले व उठून बसले. समोर पांहतांत

तो भृगुऋषि डोळे वटारून उभा आहे. त्यांस पहातांच विष्णु शय्येवरून उठले व साष्टांग नमस्कार करून परमप्रीतीनें त्यांस आसनावर आणून बसविलें व त्यांची यथाविधि पूजा करून ते ह्मणाले; "भृगुऋषि ! आज आपण या अभाग्याचे घरीं आलांत ही मोठी कृपा झाली; विशेषतः आपल्या लत्ताप्रहारानें तर मजवर आपले अनंत उपकार झाले आहेत. दुष्टांचा संहार करण्याच्या कष्टानें मी अत्यंत शिणलों होतों. लक्ष्मी पाय चुरीत असे व कमलफुलांचा लेप हृदयाला लावीत असे; परंतु शीण कमी झाला नव्हता तो आज आपल्या लत्ताप्रहारानें माझा सर्व शीण उतरला. ऋषि ! तुमचें हें ऋण माझ्यानें कसें फिटेल? लाथ मारल्यानें आपला पाय दुखावला असेल. पाषाणासारख्या माझ्या कठीण हृदयावर लत्ताप्रहार करतांना त्यास इजा झाली असेल. याकरितां मी तुमचे पाय चेंपतों, " असें ह्मणून विष्णु भृगुऋषीचे पाय चेपूं लागले. विष्णूची ती शांतवृत्ति पाहून भृगुऋषि अगदीं थक्क झाला; त्याला आपल्या कृतीबद्दल फार पश्चात्ताप वाटूं लागला; व त्यानें त्याबद्दल अनन्यभावानें विष्णुजवळ क्षमा मागितली. परंतु विष्णु म्हणाले; " ऋषि ! यांत तुमची कांहींही चूक नाहीं. या कामीं तुमचेच उलट मजवर उपकार झाले आहेत. माझ्या हृदयावर जें तुमचें चरणचिन्ह वठलें आहे तें मी मोठें भूषण समजतों, व त्याला मी श्रीवत्सलांच्छन असें म्हणतों. " याप्रमाणें विष्णूला वत्सलांच्छनाचें भूषण प्राप्त झालें आहे. अशी कथा श्रीमद्भागवतांत सांगितली आहे.

वत्सलांच्छनासंबंधानें दुसरी अशी कथा आहे कीं, नं[illegible]वा खुर विष्णूला लागला म्हणून त्या हृदयस्थ व्रणाला वत्सलांच्छन असें म्हणतात. यासंबंधानें तिसरे स्तबकांत कथा आली आहेच. तिसरी एक कथा यासंबंधानें अशी आहे कीं, श्राद्धदेवाचा श्रीवत्स या नांवाचा एक पुत्र होता; त्याचें व एका स्त्रीचें लग्न व्हावयाचें ठरलें होतें; परंतु, त्यावेळीं चातुर्मास असल्यामुळें विवाहादि मंगलकार्याला दिवस नव्हते. कारण चातुर्मासांत भगवान् श्रीविष्णु निद्रिस्त असतात. इकडे श्रीवत्साला तर विवाहाची अत्यंत घाई झाली होती. तेव्हां त्यानें विष्णूला जागें करून विवाह करण्याचें ठरविलें; व त्याप्रमाणें क्षीरसागरीं जाऊन, त्यानें विष्णूला लाथ मारून जागें केलें व विवाहकार्य उरकून घेतलें. त्या श्रीवत्स ब्राह्मणानें लाथ मारली म्हणून, ' श्रीवत्सलांच्छन ' असें म्हणतात. अशी कथा ब्रह्मपुराणांत आहे. याप्रमाणें श्रीवत्सलांच्छनाविषयींच्या कथा आहेत.

हें ऐकून जनमेजय राजा म्हणाला; " वैशंपायनऋषि ! यावरून सर्व देवांमध्यें विष्णूची योग्यता जास्त दिसते. कारण, ब्रह्मदेव व महादेव या दोहोंपेक्षां सत्वगुण विष्णूंत अधिक आहे. परंतु, विष्णूंत सत्वगुण अधिक आहे असें म्हणावें तर विष्णूचा वर्ण काळा म्हणजे तामसीवृत्तीचा; आणि शंकराचा वर्ण कापुराप्रमाणें गौर म्हणजे सत्वगुणाचा दर्शक आहे. तर असें असण्याचें कारण काय ? "

तेव्हां वैशंपायनऋषि म्हणाले; " विष्णु हे तामसीवृत्तीच्या शंकराची नित्य पूजा करितात व आपल्या हृदयांत त्यांची मूर्ति अक्षय बाळगितात, यामुळें ते कृष्णवर्णाचे झाले आहेत. तसेंच महादेव विष्णूचें अहर्निश ध्यान करितात, यामुळें त्यांचा वर्ण कर्पूराप्रमाणें शुभ्र झाला आहे."

नंतर जनमेजय राजा वैशंपायनऋषीला ह्मणाला, " ऋषि ! आपण कृष्णाच्या पराक्रमाविषयीं अनेक कथा सांगितल्या; परंतु बलरामाविषयीं कांहींच सांगितलें नाहीं; तर बलरामाच्या पराक्रमाच्या कांहीं गोष्टी मला सांगाव्यात." ती जनमेजय राजाची विनंति ऐकून वैशंपायन ऋषि ह्मणाले; " राजा तो बलराम अत्यंत पराक्रमी होता. त्याला नऊ हजार नागांचें बळ होतें; आणि ह्मणूनच त्याला बलराम असें ह्मणत असत. श्रीकृष्ण द्वारकेंत राहूं लागल्यावर एकदां बलराम, यशोदा, नंद वगैरे गोकुळांतील लोकांना भेटण्यासाठीं गोकुळांत गेला होता. त्यावेळीं यमुनेचा ओघ गोकुळापासून बराच लांबून वहात होता. तो ओघ गांवासन्निध आणण्याविषयीं लोकांनीं बलरामास विनंति केली. तेव्हां बलराम आपला नांगर घेऊन यमुनेवर गेला, व तिच्या पात्रांत नांगर घालून तिला गोकुळाकडे ओढूं लागला. तेव्हां यमुना अत्यंत कासावीस झाली व ती प्रत्यक्ष बलरामापुढें हात जोडून उभी राहून बलरामाला ह्मणाली, "हे शक्तिसागरा, अष्टम अवतारा बलरामा ! माझी अशी अवहेलना करूं नकोस. मी गंगेला मिळून पूर्वसागराला मिळण्यासाठीं जात आहें. तेव्हां मला सोडून दे." यमूनेची विनंति ऐकून बलरामाला तिची दया आली व त्यानें तिला सोडून दिलें; परंतु गोकुळाजवळ अद्यापि या गोष्टीची खूण आहे.

पूर्वीं द्विविध या नांवाचा वानर अत्यंत शक्तिसंपन्न असून त्याला दहा हजार हत्तीचें बळ होतें. तो भौमासुमारचा अत्यंत जिवलग मित्र होता. भौमसुराच्या मृत्यूची गोष्ट समजतांच तो, कृष्ण व बलराम या उभयतांवर अत्यंत संतप्त झाला व आपल्या पराक्रमानें त्यानें सारा सौराष्ट्र देश हालवून सोडिला. एकदां बलराम मद्य पीत असतां तेथें हा द्विविध वानर गेला व त्यानें बलरामाचा मद्याचा घट फोडून टाकिला. त्यावेळीं बलरामाला अत्यंत क्रोध आला व त्यानें त्या द्विविध वानराला धरून क्षणार्धांत ठार मारिलें.

एकदां बलराम यात्रा करीत नैमिषारण्यांत आला. तेथें त्यावेळीं ऋषींनीं सत्राला आरंभ केला होता. तो समारंभ पाहण्याकरितां बलराम त्या यज्ञमंडपांत गेला. बलरामाला पाहून सर्व ऋषि उभे राहिले; परंतु, पुराण सांगण्यासाठीं व्यासासनावर रोमहर्षण या नांवाचा एक ऋषि बसला होता तो उठला नाहीं; बलरामाला पुराणिकाचें तें वर्तन उन्मत्तपणाचें वाटून त्यानें त्याला रागानें ताडन केलें, त्यामुळें तो मरण पावला. तेव्हां सर्व ऋषि हाहाःकार करून बलरामाला ब्रह्महत्येचा दोष देऊं लागले. त्यावेळीं बलरामानें त्याबद्दल प्रायश्चित विचारलें.

तेव्हां ऋषि ह्मणाले; "बलरामा ! बाष्कल या नांवाचा इल्वलराक्षसाचा पुत्र अत्यंत दुष्ट असून, तो यज्ञयागाचे वेळीं विष्टा व मूत्र टाकून सर्व यज्ञस्थान अपवित्र करितो, व यागाला वारंवार विघ्न करितो, तर तूं येथें दहा रात्रीं राहून आमचा यज्ञसमारंभ निर्विघ्नपणें पार पडेल असें कर, ह्मणजे यज्ञनारायण संतुष्ट होतील आणि या ब्रह्महत्येच्या पातकापासून तुझी सुटका होईल." ती गोष्ट बलरामानें कबूल केली, व तो तेथें दहा दिवस राहिला. ऋषींनीं यज्ञाला सुमुहूर्त पाहून आरंभ केला. यज्ञाला आरंभ होण्याबरोबर तो बाष्कलराक्षस यज्ञाला विघ्न करण्यासाठीं आला; परंतु, बलरामानें त्याला तत्काल आपल्या मुसळानें ठार मारिलें, तेव्हां ऋषींनीं बलरामाचा जयजयकार करून ब्रह्महत्येच्या पातकापासून त्याला मुक्त केलें.

'बलराम यात्रेला कां निघाला होता तें सांगा,' असें राजानें विचारलें; तेव्हां वैशंपायन म्हणाले; "राजा, जनमेजया ! पूर्वीं कौरव आणि पांडव यांचें–राज्यासाठीं–मोठें युद्ध झालें. त्यावेळीं पांडवांनीं आपल्या साह्यासाठीं श्रीकृष्णाला व कौरवांनीं बलरामाला घेतलें. श्रीकृष्णापेक्षां बलराम हा अत्यंत पराक्रमी आहे, अशी दुर्योधनाची समजूत होती. शिवाय बलराम हा गदायुद्धामध्यें दुर्योधनाचा गुरु होता. म्हणून दुर्योधनानें बलरामाला आपल्या साह्याला बोलाविलें. त्याप्रमाणें बलराम दुर्योधनाचें साह्यासाठीं गेला. परंतु, श्रीकृष्णाशीं युद्ध करून जय मिळविणें दुरापास्त आहे, हें लक्षांत आणून त्यानें यात्रेचें निमित्त केलें व आजपासून अठरावे दिवशीं परत येईन, असें दुर्योधनाला सांगून तो यात्रेला निघून गेला. हीच यात्रा करीत असतां नैमिषारण्यांत बलरामाचे हातून वरील ब्रह्महत्या झाली. बलराम तीर्थयात्रेला गेल्यावर श्रीकृष्णानें अर्जुनाकडून युद्ध करण्याची त्वरा करविली व तो यात्रेहून परत येण्यापूर्वींच सर्व कौरवसैन्याचा नाश करून टाकिला. बलराम तीर्थयात्रा करीत प्रभास येथें आल्यावर तेथें त्याला कौरवपांडवांच्या लढाईची हकीकत समजली व दुर्योधनाच्या साह्याला जावें असें त्याला वाटलें, व त्याप्रमाणें तो कुरुक्षेत्रावर आला. बलरामास पाहून दुर्योधनाला फार समाधान वाटलें व धैर्यही आलें. त्यावेळीं कौरवाकडील कृपाचार्य व अश्वत्थामा हे दोनच वीर राहिले होते. या सर्वांनीं पुढें युद्ध कसें केलें वगैरे हकीकत कौरवपांडवांच्या कथेंत सांगेन, असें ऋषि ह्मणाले, व ते बलरामाची कथा पुढें सांगू लागले. ते ह्मणाले, कृष्णानें रुक्मिणीचें हरण केल्यावर रुक्मि व यादव यांच्यामध्यें वैर उत्पन्न झालें होतें. तें वैर नाहींसें करावें ह्मणून कृष्णानें बराच सोयरेसंबंध वाढविला होता. रुक्मिणीची कन्या चारूमती ह्मणून होती ती कृष्णानें सुमनकीर्ति नांवांचा रुक्म्याच्या एका नातेवाईकाला दिली. तसेंच रुक्म्याची मुलगी रोचना नांवाची होती ती कृष्णानें आपला मुलगा अनिरुद्ध याला केली. तथापि रुक्म्याच्या मनांत धुमसत असलेलें वैर तिळ-

भरही कमी झालें नव्हतें, व श्रीकृष्णादिकांचा नाश करण्याला तो अगदीं संधि पहात होता. एका विवाहप्रसंगीं श्रीकृष्ण सर्व मंडळीसह कौंडण्यपुरीं आले आहेत, अशी संधि साधून रुक्म्यानें बलरामाला आपल्या घरीं करमणुकीसाठीं ह्मणून सोंगट्या खेळण्याकरितां बोलाविलें. त्याप्रमाणें बलराम त्याजकडे गेला. तेथें शिशुपाळ, कलिंगपति वगैरे बलरामाकडून पूर्वी पराभव पावलेले बरेच राजे खेळण्यासाठीं आले होते. कपट रीतीनें खेळून बलरामाला जिंकावयाचें असा त्या सर्वांनीं विचार केला होता. सर्व आपापल्य जागीं बसल्यावर रुक्म्यानें कपट फांसे आणून व पण लावून खेळण्यास आरंभ केला. ते कपट फांसे असल्यामुळें त्यांत प्रत्येक वेळीं बलरामाचा डाव फसूं लागला व बाजू अंगावर येऊं लागली. तेव्हां बलराम विचारांत पडला. त्याचा सारथी जवळ होता. त्यानें हा सर्व प्रकार जाणून ते फांसे, कृष्णाचें नामस्मरण करून टाकण्यास बलरामाला सांगितलें. त्याप्रमाणें बलरामानें डाव टाकतांच बळरामाचा जय झाला. परंतु ते सर्व कपटी राजे त्या डावाची तकरार करूं लागले, तेव्हां बलरामाला रुक्मयाचा फार राग आला व त्यानें एक बुक्की मारून त्याला ठार केलें. राजा जनमेजया ! याप्रमाणें हा बलराम अनंत शक्तिशाली होता. त्याच्या पराक्रमाच्या अनेक कथा आहेत त्यापैकीं ह्या थोड्या तुला सांगितल्या.

---

## अध्याय १६ वा.

### १. श्रीकृष्णरुक्मिणी विनोद.

एकदां उन्हाळ्याचे दिवसांत श्रीकृष्ण पुष्पशय्येवर निजले होते व रुक्मिणी जवळ उभी राहून वाळ्याच्या पंख्यानें वारा घालीत होती. त्यावेळीं रुक्मिणीच्या हातांतील सुवर्णकंकणांचा किणकिण नाद होऊं लागला. तो नाद ऐकून रुक्मिणीचें लक्ष आपल्या सौंदर्याकडे गेलें व आपण अनुपमेय सौंदर्यवान् आहों असें तिला वाटलें. त्या विचारांत तिचा हात थांबला. तेव्हां कृष्णाचें लक्ष सहज रुक्मिणीकडे गेलें. पाहतात तों रुक्मिणी आपल्या सौंदर्याचे विचारांत गर्क झाली आहे. तेव्हां श्रीकृष्णानें विनोदानें ह्मटलें—मी रंगानें काळा असून मला राज्यछत्र वगैरे नसल्यामुळें तुला मी आवडत नाहीं असें वाटतें.—कृष्णाचें हें भाषण ऐकून रुक्मिणीस अत्यंत दुःख झालें; व तिनें कृष्णाची क्षमा मागितला. रुक्मिणीस झालेला सौंदर्याचा अभिमान गेला असें पाहून कृष्णानें प्रेमालिंगन देऊन रुक्मिणीचें समाधान केलें.

## २. सुदामचरित्र.

सुदामा या नांवाचा श्रीकृष्णाचा एक मित्र होता. लहानपणीं श्रीकृष्ण व सुदामा असे दोघे सांदीपनि ऋषिजवळ विद्याभ्यास करण्यासाठीं होते, तेथें या दोघांचा अत्यंत स्नेह जमला. परंतु पुढें कृष्ण वैभवसंपन्न झाला, आणि सुदामाची स्थिति पूर्वीसारखीच राहिली. तो चांगला विद्वान, कर्मनिष्ठ, वेद व षडशास्त्रें यांत अगदीं निष्णांत होता, परंतु दरीद्रानें पूर्ण पिडलेला होता. श्रीकृष्ण वैभवसंपन्न झाल्यावर एकेवेळीं सुदामाची स्त्री सुदामाला म्हणाली; " अहो ! तुमचा बालमित्र श्रीकृष्ण आतां प्रतिराजा झाला आहे, तर त्याच्याकडे जा आणि कांहीं मागून आणा, म्हणजे आपला प्रपंच सुरळीत चालेल. " स्त्रियेचें तें बोलणें ऐकून सुदामाला श्रीकृष्णाकडे जाण्याची इच्छा झाली, परंतु आपण अशा दरिद्रावस्थेंत त्याच्याकडे कसें जावें व भेट काय न्यावी, याची त्याला पंचाइत पडली. शेवटीं त्यानें मोठ्या कष्टानें तीन मुटी पोहे इकडून तिकडून मिळवून बरोबर घेतले. द्वारकेंत गेला व दूताकडून सुदामा आल्याचा निरोप कृष्णाला पाठविला. सुदाम्याची ती भिकार स्थिति पाहून, हा कृष्णाचा मित्र ह्मणतो, याबद्दल दूतांना आश्चर्य वाटलें. त्यांनीं सुदाम्याची थट्टाही केली; पण सुदाम्याचा आग्रह पाहून त्यांनीं कृष्णाला त्याचा निरोप कळविला. दूतांचा निरोप ऐकतांच कृष्ण चटकन उठला व धांवत जाऊन सुदामाला कडकडून भेटला व मोठ्या आदरानें मंदिरांत आणून आसनावर बसविलें. रुक्मिणीनें उष्णोदकानें त्याला स्नान घातलें, कृष्णानें शोडषोपचारें पूजा केली, व अल्पदक्षिणाहि दिली. नंतर उत्तम पक्वानाचें सर्वांचें भोजन झालें व तांबूल देऊन देवांनीं सुदामाला उत्तम शय्येवर निजविलें व त्याचे पाय स्वत: चेपून दिले. तो सर्व प्रकार पाहून सुदामाला अत्यंत धन्यता वाटली. विश्रांतीनंतर कृष्ण व सुदामा गोष्टी बोलत बसले. श्रीकृष्ण ह्मणाले;सुदामा! एकदां आपणा दोघांना सांदीपनि ऋषीच्या पत्नीनें जळाऊ लांकडें आणण्यासाठीं रानांत पाठविलें होतें. तेथें लांकडें गोळा करितां करितां रात्र झाली ह्मणून आपण दोघे एका वडाच्या झाडाखालीं निजलों. त्यावेळीं मजजवळ पांघरावयाला कांहीं नव्हतें, ह्मणून तूं आपलें अर्धें धोतर मला पांघरावयाला दिलेस व अर्धें तूं पांघरलास. तसेंच एकदां पाऊस पडूं लागला तेव्हां तूं आपलें शरीर मजवर धरून मला पाऊस लागूं दिला नाहींस. एकदां पाण्याची कावड आणितांना मी थकलों ह्मणून ती तूं आणलीस. एकदां क्षिप्रानदींतून तूं मला आपल्या कंबरेवर घेऊन पलीकडे नेलेंस. सुदामा असे किती तरी लहानपणचे सुखाचे दिवस आपण घालविले, पण ते दिवस भराभर संपून हे असे खडतर दिवस आतां आले आहेत. तें ऐकून सुदामा ह्मणाला; " श्रीकृष्णा ! बाबा खडतर दिवस आह्माला आले आहेत. तूं तर राजाप्रमाणें वैभव संपादन करून हजारों स्त्रियांसह ऐष आराम भोगीत आहेस. मला मात्र पोटभर खावयाला देखील मिळत नाहीं. चार वेद,

सहाशास्त्रें, अठरा पुराणें, मुखोद्गत आहेत, पण उपयोग काय? एक पैसा सुद्धां पदरीं नाहीं !" श्रीकृष्ण ह्मणाले; "सुदामा! तुझे विद्याधन हें माझ्या या वैभवापेक्षां अधिक किंमतीचें आहे. त्यामुळेंच तुझी व माझी भेट झाली, व मला तूं अत्यंत पूज्य वाटत आहेस. असो; हें मागील सर्व राहूं दे, पण माझ्यासाठीं तूं काय खाऊं आणला आहेस तो काढ पाहूं?" खाऊचें नांव काढतांच सुदामा काळजींत पडला. अशा वैभवशाली मनुष्यापुढें आपले पोहे कसे ठेवावे, याची त्याला लाज वाटूं लागली. तो टाळाटाळ करूं लागला, तेव्हां श्रीकृष्णानें स्वतःच त्याचे जवळील तें फाटक्या चिंधींत बांधलेलें पोह्याचें गाठोडें घेतलें व त्यांतील पोहे मोठ्या आवडीनें तो खाऊं लागला. जवळ रुक्मिणी वगैरे स्त्रिया होत्या त्यांनाही ते पोहे कृष्णानीं वाटून दिले; व सर्वांनीं ती सुदामाची तीन मुठी पोह्याची भेट मोठ्या प्रेमानें खाल्ली. चार दिवस याप्रमाणें कृष्णाचा पाहुणचार घेतल्यावर सुदाम्याला घरची काळजी उत्पन्न झाली, व त्यानें घरी जाण्याकरितां श्रीकृष्णाचा निरोप विचारला. कृष्णानें सुदामास आनंदानें निरोप दिला. कृष्णासारख्या वैभवसंपन्न मित्रानें आपणास कांहींच दिलें नाहीं, हें पाहून सुदामा खिन्न झाला. आपण कृष्णाच्या भेटीला गेलों नसतो तरी बर झालें असतें असेंहि त्याला वाटूं लागलें. स्त्रियेनें विचारिलें तर तिला काय सांगावें, अशा चिंतेनें व्यग्र झालेला तो सुदामा मार्ग क्रमीत आपल्या गांवाजवळ येऊन दाखल झाला. त्याचें गांव ह्मणजे एक लहान खेडें होतें; पण पहातो तों तें द्वारकेप्रमाणें दिसूं लागलें. तेव्हां आपण चुकून पुनः द्वारकेला परत जात आहों, असें सुदामाला वाटलें, पण इतक्यांत त्याला शहरांतून येणारे कांहीं लोक भेटले. त्यांना सुदाम्यानें हें कोणतें शहर, म्हणून विचारलें. तेव्हां ते लोक म्हणाले, या शहराचें नांव सुदामनगर असें आहे. सुदामा हा श्रीकृष्णाचा मित्र असल्यामुळें श्रीकृष्णानें तें त्याला बांधून दिलें आहे. हें ऐकून सुदाम्याला फार आश्चर्य वाटलें. नंतर तो शहराजवळ आला. तेथें अनेक दूत सुदामाची वाट पहात उभे होते. सुदामा आल्याबरोबर त्यांनीं मुजरे केले व मोठ्या वैभवानें घरीं आणिलें. घरीं त्याची बायको शृंगार करून राणीप्रमाणें बसली होती, तिनें सुदामा येण्याबरोबर त्याला नमस्कार करून, श्रीकृष्णामुळें आपणाला एवढें वैभव मिळालें, वगैरे सर्व हकीकत सांगितली. हा सर्व अपूर्व प्रकार पाहून सुदामा थक्क झाला, व प्रभूच्या गुप्त देणगीचें त्यास मोठें कौतुक वाटून त्यानें अनन्यभावें देवाची प्रार्थना केली.

## ३. जरासंधाची कथा.

वैशंपायनऋषि ह्मणाले—' राजा आतां तुला जरासंधाची राहिलेली कथा सांगतों. श्रीकृष्णानें जरासंधाच्या भीतीनें मथुरा सोडून द्वारकानगरी वसविल्यानंतर त्या जरासंधानें फारच प्रळय मांडला. पृथ्वीवरील अनेक देश जिंकून तेथील राजांना त्यानें आपल्या बंदीशाळेंत आणून ठेविलें. त्याच्या

त्रासानें सर्व जन त्रस्त झाले, व या संकटांतून मुक्त करण्याकरितां ते कृष्णाचा धांवा करूं लागले. जरासंध हा ब्रहद्रथ राजाचा मुलगा होता. तो राज्य करीत असतां त्याच्याकडे एकेवेळीं एक ब्राह्मण आला व त्यानें राजाला एक फळ दिलें, व स्त्री ऋतुस्नात असतां तिला हें खावयाला दे, ह्मणजे अत्यंत पराक्रमी असा पुत्र होईल, असें सांगितलें. त्या ब्रहद्रथ राजाला दोन स्त्रिया होत्या. त्या दोघी ऋतुस्नात आहेत असें पाहून राजानें तें फळ कापून दोघींनां अर्धें अर्धें खाण्यास दिलें. पुढें नवमास पूर्ण झाल्यावर त्या दोघी प्रसूत झाल्या. परंतु प्रत्येक स्त्रियेला अर्धा अर्धा मुलगा झाला. तो प्रकार पाहून राजा व त्याच्या दोघी राण्या फार दुःखी झाल्या, व राजानें ते दोन्ही भाग नगराबाहेर अरण्यांत नेऊन टाकविले. ज्या रात्रीं ते भाग अरण्यांत टाकिले त्याच रात्रीं त्या अरण्यांत जरा या नांवाची एक राक्षसी फिरत फिरत तेथें आली. व ते दोन भाग पाहून तिला मोठें आश्चर्य वाटलें. तिनें ते दोन्ही भाग एकाला एक चिकटवून कसे दिसतात तें पाहिलें, तों ते दोन्ही भाग एकमेकाला चिकटले व त्याचें मूल तयार झालें; आणि त्या मुलांत चैतन्य उत्पन्न होऊन तें हसूं खेळूं लागलें. तेव्हां त्या राक्षसीला फार आनंद झाला. तिनें त्या मुलाचें नांव जरासंध असें ठेविलें. आणि तुझा कोणत्याही शस्त्रानें मृत्यु होणार नाहीं, असा तिनें त्याला वर देऊन तें मूल ब्रहद्रथ राजाला आणून दिलें व सर्व हकीकत सांगितली. पुढें हा जरासंध जाणता झाल्यावर त्यानें शंकराची आराधना करून त्याला प्रसन्न करून घेतलें, व युद्धामध्यें मी सर्वेश्वर जो विष्णु त्यालाहि जिंकावें, असा वर मिळविला. असा तो जरासंध उन्मत्त झाल्यावर त्याचा नाश कोणत्या उपायानें करावा, याचा श्रीकृष्णाला विचार पडला होता.

पुढें श्रीकृष्णानें एक युक्ती योजिली व भीम व अर्जुन या उभयतांना बरोबर घेऊन विप्रवेषानें ते जरासंधाकडे आले. जो कोणी अतिथि येईल त्याची इच्छा पुरी करावयाची, असा जरासंधाचा नियम होता. त्याप्रमाणें हजारों ब्राह्मण येऊन तेथून इच्छादान घेऊन जात असत. कृष्ण, अर्जुन व भीम हे तिघे तेथें ब्राह्मण होऊन आल्यावर, जरासंधानें त्यांचा योग्य गौरव करून त्यांना असनावर बसविलें—व काय इच्छा आहे—ह्मणून विचारिलें. तेव्हां आह्मां तिघांतून एकाला संग्रामभिक्षा द्यावी असें त्यांनीं कळविलें. त्यांचें तें मागणें ऐकून जरासंधाला मोठें आश्चर्य वाटलें व हे अतिथि ब्राह्मण नसून वेषधारी क्षत्रिय आहेत असें त्यानें ओळखिलें. तो ह्मणाला; " तुह्मीं खरे याचक नसून क्षत्रिय आहांत व क्षत्रियत्वाला उचित अशीच भिक्षा तुह्मी मागितली आहे. तर जो मजबरोबर युद्ध करण्यास समर्थ असेल त्यानें तयार व्हावें." जरासंधानें असें म्हटल्याबरोबर भीम मांडी थोपटून उभा राहिला, व त्यांचें मल्लयुद्ध सुरूं झालें. दोघेहि मल्लयुद्धामध्यें निपूण व शक्तिसंपन्न असल्यामुळें कोणी कोणालाच हार जाईना. परंतु भीम हा त्याच्यापेक्षां

सरस असल्यामुळें त्यानें मल्लयुद्धांत जरासंधाला खालीं आणिलें व त्याच्या एका पायावर गुडघा ठेवून दुसरा पाय हातानें ओढून त्या जरासंधाची दोन शकलें केलीं व तीं फेंकून दिलीं; परंतु फेंकल्याबरोबर तीं दोन शकलें पुन्हा एकत्र होऊन जरासंध जिवंत झाला व भीमाबरोबर युद्ध करूं लागला. भीमानें त्याला पुन्हां पूर्वीप्रमाणें चिरून फेंकून दिलें. याप्रमाणें पांच सहा वेळां केलें, तरी तो पुनःपुन्हा जिवंत होऊं लागला. तेव्हां श्रीकृष्णानें भीमाला खुणावलें, व एक गवताची काडी दोन्हीं हातांनीं उभी चिरून आपल्या डाव्या हातांतील गवताचा तुकडा उजवीकडे व उजव्या हातांतील तुकडा डावीकडे फेंकून दिला. ती खूण पाहून भीमानें जरासंधाला पुन्हा खालीं पाडून चिरलें, व कृष्णानें दाखविल्याप्रमाणें डावी बाजू उजवीकडे व उजवी बाजू डावीकडे लांब फेंकून दिली. ते दोन्ही भाग विरुद्ध दिशेला पडल्यामुळें पुन्हा ते एकत्र झाले नाहींत. अशा रीतीनें श्रीकृष्णानें भीमाकडून जरासंधाचा वध करविला व त्याच्या सर्व प्रजेला दुःखांतून मुक्त केलें. नंतर तुरुंगांत पडलेल्या राजांनां सोडून दिलें, व जरासंधाचा सहदेव नांवाचा पुत्र होता त्याला गादीवर बसवून सर्व हास्तनापुरास परत आले.

त्यावेळीं धर्मराजाचे घरीं राजसूययज्ञाची मोठी तयारी चालली होती. त्या यज्ञासाठीं इंद्रप्रस्थ येथें मोठमोठाले मांडव घातले होते, व देशोदेशींचे मोठमोठाले राजे महाराजे आले होते. तसेंच दुर्योधन, दुःशासन वगैरेही आपआपल्या परिवारासह तेथें आले होते. श्रीकृष्णाचाहि सर्व परिवार आला होता, आणि द्वारकेच्या संरक्षणासाठीं बळराम व प्रद्युम्न असे दोघे मात्र मागें राहिले होते. सर्व तयारी झाल्यावर मोठ्या थाटानें यज्ञमंडपांत पूजा साहित्याचें ताट आणिलें, व अग्रपूजेचा मान कोणाला द्यावा, म्हणून विचारिलें. तेव्हां कृष्णानें भीष्माला मान द्यावा, अशी सूचना केली; परंतु ही कृष्णाची सूचना शिशुपाळानें नापसंत केली. तो म्हणाला, भीष्माला पुत्र किंवा कन्या कोणतीच संतती नाहीं, अर्थात हा गृहस्थ नाहीं. यती म्हणावा तर तसें याचें कांहीं तपसामर्थ्यहि दिसत नाहीं. मग याला अग्रपूजेचा मान काय म्हणून द्यावयाचा? वडील म्हणून द्यावयाचा असेल तर हा कांहीं खरोखर वडील नाहीं. तो म्हणाला, शूद्र वृद्धाला मान देतात; ब्राह्मण, ज्ञान्याला वृद्ध समजतात; वैश्य, श्रीमंत असेल त्याला वृद्ध समजतात; आणि जो सर्व क्षात्रधर्म जाणित असेल त्याला क्षत्रीय वृद्ध समजतात. त्या प्रमाणें या भीष्माच्या आंगीं क्षात्रधर्माची कांहींच चिन्हें नाहींत; अर्थात याला अग्रपूजेचा मान केव्हांहि देतां येणार नाहीं; या प्रमाणें शिशुपाळानें सभेमध्यें गडगडाट केला. तेव्हां सर्व सभासद शिशुपाळावर प्रक्षुब्ध झाले. भीमतर जागेवरून मुठी आवळून उठला, परंतु भीष्मानें त्याला मागें ओढलें व शांत करून जागेवर बसविलें. मग जरासंधाचा मुलगा सहदेव यानें कृष्णाला अग्र पूजेचा मान द्यावा, अशी सूचना केली. परंतु शिशुपाळाला गोपा-

ळकृष्णहि पसंत पडले नाहींत. त्यानें कृष्णाची सारखी निंदा सुरू केली. तेव्हां त्याची प्रत्येक शिवी श्रीकृष्ण बोटें घालून मोजूं लागले. एक दोन तीन याप्रमाणें मोजतां मोजतां एकशें एक संख्या पुरी झाली, त्याबरोबर श्रीकृष्णांनीं शिशुपाळावर सुदर्शन चक्र सोडून त्याचा नाश केला. शिशुपाळाचा नाश होताच शिशुपाळाचा बंधु दंतवक्र भावाचा सूड घेण्यासाठीं कृष्णाच्या अंगावर धांवून गेला. परंतु त्याचाहि श्रीकृष्णांनीं सुदर्शन चक्र सोडून नाश केला. त्या दोघांचा मित्र विदूरथ ह्मणून होता तो आपली गदा सरसावून श्रीकृष्णाच्या अंगावर गेला, परंतु श्रीकृष्णांनीं त्याच्या हातांतील गदा घेऊन त्याच गदेनें त्याचा नाश केला.

वैशंपायन ऋषि जनमेजय राजाला ही कथा सांगत असतां जनमेजय राजानें ऋषीला मध्येंच प्रश्न केला कीं, श्रीकृष्णानीं शिशुपाळाचे शंभर अपराध कां मोजले ? तेव्हां वैशंपायन ऋषि ह्मणाले, राजा, पूर्वी एकदां चौघे सनत्कुमार विष्णूच्या दर्शनासाठीं जात असतां त्यांना दरवाजावरील जय विजयांनीं निष्कारण त्रास दिला, तेव्हां त्यांनीं तुह्माला पृथ्वीवर सात जन्म प्राप्त होतील, व प्रत्येक जन्मांत अपकीर्ति संपादन कराल, व या सात जन्मांत तुमची व श्रीहरीची भेट होणार नाहीं, असा त्या दोघांना शाप देऊन ते सनत्कुमार तेथून गेले. शाप ऐकून जय विजय दीन झाले व या शापापासून मुक्त करण्याविषयीं त्यांनीं विष्णूची प्रार्थना केली. तेव्हां विष्णु ह्मणाले: जयविजयहो, या शापापासून तुमची सुटका होणार नाहीं. परंतु तुह्मांला मी प्रत्येक जन्मीं भेट देईन. मात्र ती भेट केव्हां विरोध भक्तीनें होईल व केव्हां प्रेम भक्तीनें होईल.

इकडे कश्यप व त्याची स्त्री दिती सायंकाळच्या वेळीं होम शाळेंत होम करीत असतांना दितीला कामेच्छा झाली, व तिनें ती इच्छा कश्यपाला कळवून त्याच्या जवळ रतिदान मागितलें. कश्यपानें ती वेळ संभोगाला योग्य नाहीं असें जाणून दितीला पुष्कळ सांगितलें; परंतु दितीनें न ऐकतां होम कुंडाजवळच कश्यपाकडून कामेच्छा पुरी करून घेतली. त्यावेळीं जयविजयांनीं तिच्या गर्भात प्रवेश केला. पुढें दिती प्रसूत होऊन एकाच वेळीं ती दोन मुलें प्रसवली. तेच दोघे हिरण्याक्ष व हिरण्यकश्यप होत. रावण, कुंभकर्ण ते हेच जयविजय होत. आणि कृष्ण आवतारांतले शिशुपाळ व दंतवक्र हेच जयविजय होत. शिशुपाळ जेव्हां जन्मास आला तेव्हां त्याला चार भुजा होत्या. व ज्योतिषांनीं असें सांगितलें होतें कीं, ज्याला बघून याचे दोन हात नाहींसे होतील, त्याच्याच हातानें याचा मृत्यु होईल. त्याप्रमाणें शिशुपाळ कृष्णाच्या दृष्टीस पडला त्याचवेळीं त्याचे दोन हात नाहींसे झाले. तेव्हां कृष्णाच्या हातानें शिशुपाळाचा नाश होईल असें त्याच्या आईनें जाणलें होतें. ती वसुदेवाची बहीण होती. ती कृष्णाला ह्मणाली, कृष्णा, तुझ्या हातानें शिशुपाळाचा नाश होणार आहे. तूं अपराधावांचून त्याचा नाश करणार नाहींस हें मी जाणून आहे,

पण मजवर एवढी दया कर कीं, त्याला शंभर अपराधांची क्षमा कर आणि त्यावर त्यानें तुझा अपराध केला तर मग तूं काय शिक्षा करावयाची ती कर. शिशुपाळाच्या आईची ही विनंति कृष्णानें मान्य केली होती. ह्मणून त्यानें या वेळीं शिशुपाळाचे शंभर अपराध सहन केले.

शिशुपाळ, दंतवक्र, वगैरे मृत्यू पावल्यावर शिशुपाळाच्या बाजूस असलेले लोक अधीक संतप्त झाले व कृष्णाचा नाश करण्याचा प्रयत्न करूं लागले. एकदा श्रीकृष्ण व बळराम असे दोघेहि द्वारकेंत नाहींत असें पाहून शाल्व नांवाचा शिशुपाळाचा स्नेही आपलें सैन्य घेऊन द्वारकेवर आला. तो महा पराक्रमी असून कपटविद्येंत निपूण होता. व शंकराला त्यानें प्रसन्न करून घेतलें होतें. सौम्य या नांवाचे त्रिलोकगामी बारा योजनें विस्तीर्ण असें एक अजस्र विमान त्याजवळ होतें व त्यांत त्याची सर्व सेना रहात असे. एके दिवशीं शाल्व आपल्या अफाट सैन्यासह विमानांत बसून द्वारकेवर आला आणि वेढा घालून त्यानें शहरावर शस्त्रास्त्रांचा भडिमार सुरू केला; त्यावेळीं सांब, अक्रूर, रुद्र, विष्णु, गद, सात्यकी, मदन वगैरे द्वारकेंतले सर्व वीर आपआपलें सैन्य घेऊन शाल्वाचा वेढा उठविण्याचा निकरानें प्रयत्न करीत होते, परंतु त्यांचा उपाय न चालतां शाल्वाच्या मारानें यादवसैन्याचा नाश होऊं लागला. हें वर्तमान श्रीकृष्णाला समजतांच ते द्वारकेस आले. श्रीकृष्ण येत आहेत असें समजतांच शाल्वानें आपला एक दूत कृष्णाकडे पाठवून कळविलें कीं, वसुदेवाला पकडून शाल्वानें विमानावर ठेविलें आहे. कृष्ण तेथें जाऊन पाहतात तों खरोखरच वसुदेव विमानांत असून त्यांचे हाल हाल करीत आहेत. असें पाहत आहे तोंच विमानांतून वसुदेवाचें छिन्नविछिन्न झालेलें प्रेत कृष्णाच्या रथावर पडलें. तो प्रकार पाहतांच कृष्ण दुःखाकुल होऊन शोक करूं लागले. इतक्यांत तेथें नारद आला व तो ह्मणाला, ‘ कृष्णा, ही सर्व दैत्याची माया आहे. त्या शाल्वानें हा खोटा वसुदेव करून तुला घोटाळ्यांत घातलें आहे.’ नारदाचें भाषण ऐकून कृष्णाला धैर्य आलें व त्यांनीं सुदर्शन चक्र सोडून सर्वांचा नाश केला. शाल्वाचा नाश झाल्याचें वर्तमान समजतांच शंकराला फार क्रोध आला. व त्यांनीं अग्नीला द्वारका जाळण्यासाठीं पाठविलें. परंतु कृष्णानीं अग्नीला पिटाळून काशीला पाठविलें.

---

# अध्याय १७ वा.

## १. पारिजातक पुष्प.

एकदां श्रीकृष्ण, सर्व परिवारासह रैवत पर्वतावर कांहीं व्रतउद्यापनासाठीं गेले होते. नगरांतील सर्व स्त्रीपुरुषहि उत्तम वस्त्रालंकार परिधान करून जमले होते. त्यामुळें तो पर्वत मोटा रमणीय दिसूं लागला. त्याच दिवशीं नारद स्वर्ग लोकांहून इंद्राची पूजा ग्रहण करून पृथ्वीवर येत होते. ते तो अपूर्व प्रकार पाहून तेथें आले. श्रीकृष्णानीं त्यांचें स्वागत केलें. नारदानें कृष्णास इंद्राकडून मिळालेलें पारिजातकपुष्प अर्पण केले व ते ह्मणाले, श्रीकृष्णा हें पुष्प स्वर्गांतल्या पारिजातक वृक्षाचें असून याचा वास-रंग-रूप सर्वच कांहीं अपूर्व आहे. हे कधीं सुकत नाहीं, व याचा सुवासही कधीं नाहींसा होत नाहीं. तें सहस्र पाकळ्यांचें पारिजातक सुमन पाहून कृष्णालाहि आनंद झाला, व त्यानें तें फुल रुक्मिणीला दिलें. रुक्मिणीनें मोठ्या प्रेमानें तें पुष्प आपल्या वेणींत घातलें. त्या वेळीं नारद रुक्मिणीकडे पाहून म्हणाला, "रुक्मिणी, तूं या फुलानें फारच सुंदर दिसतेस. हें फूल तुला दिलें यावरून श्रीकृष्णाचें सर्वांपेक्षां तुजवर अधिक प्रेम आहे हेंहि दिसून आलें. मला इतके दिवस असें वाटत होतें कीं, श्रीकृष्णाची खरी प्रीति सत्यभामेवर आहे. परंतु आजच्या या प्रकारानें कृष्णाची खरी प्रीति तुजवरच आहे असें दिसून आलें." इतर स्त्रियांनींही रुक्मिणीची त्या वेळीं पुष्कळ स्तुति केली. पण सत्यभामेच्या दासींना तें आवडलें नाहीं. ती सर्व हकिकत केव्हां सत्यभामेला सांगूं असें त्यांनां झालें.

## २. सत्यभामा–नारद संवाद.

इकडे नारद तेथून निघाले ते सत्यभामेच्या मंदिरांत आले. सत्यभामा आपल्या मंचकावर श्रीकृष्णाचें चिंतन करीत बसली होती. नारदमुनीस पाहतांच तिनें त्याला सत्कारपूर्वक आसनावर बसविलें, व श्रीकृष्ण कांहीं व्रतोद्यापनासाठीं रैवतक पर्वतावर गेले आहेत, असें तिनें कळविलें. नारद म्हणाले, 'सत्यभामे, मी येतानां रैवतक पर्वतावरूनच आलों, माझी व श्रीकृष्णाची भेट झाली. मी इकडे केवळ तुझ्या भेटीसाठींच आलों आहे. मी तुला एक व्रत सांगणार आहे, तें व्रत तूं यथासांग केल्यास तुला जन्मोजन्मीं श्रीकृष्णपति मिळेल. त्या व्रताला पतिदानव्रत असें म्हणतात. या व्रताच्या पुण्याला पारावार नाहीं. तर तूं कोणा सत्पात्र ब्राह्मणाला श्रीकृष्णाचें दान दे, व त्यावर पारिजातकाची दक्षणा दे. असें केल्यास तुला प्रत्येक जन्मीं भगवान श्रीकृष्णच पति मिळतील. हें व्रत पूर्वी पासून चालत आलेलें आहे. पूर्वी अदीतीनें आपला पति कश्यप, एका ब्राह्मणाला

दान दिला होता. इंद्रशक्तीनें इंद्र दान दिला होता. कुबेरीनें कुबेर दान दिला होता. रोहीणींनें चंद्र दान दिला होता. त्या प्रमाणेंच तूंहि श्रीकृष्ण ब्राह्मणास दान दे. या दानाचे वेळीं तुला देण्याकरितां म्हणून मी आज स्वर्गाहून पारिजातक पुष्प आणलें होतें, परंतु तें फूल कृष्णानें घेतलें व रुक्मिणीला दिलें." नारदाचें भाषण ऐकून सत्यभामेला फार खेद झाला. ती म्हणाली, 'असो झालें तें झालें. त्याला काय करणार? मी तो पारिजातक वृक्ष एकदां पाहिलेला आहे. अदितीचीं कुंडलें तिला देण्यासाठीं आह्मी अमरावतीस गेलों होतों, त्यावेळीं तेथें तो पारिजातक वृक्ष मी पाहिला. हें व्रत जर मला त्या वेळीं माहित असतें तर परत येतांना मी तो वृक्ष आणला असता. आतां तो वृक्ष किंवा त्या वृक्षाचें फूल मिळणें दुरापास्तच दिसतें, तेव्हां तें व्रत मला कसें करितां येईल? अर्थात त्या व्रताची आशाच सोडली पाहिजे.' तेव्हां नारद म्हणाला,—'सत्यभामे तूं अगदींच भोळी आहेस असें वाटतें. तूं रुपानें व गुणानें अशी सुंदर असून कृष्णानें तुला घरीं ठेवलें आणि रुक्मिणीला व त्या सोळा हजार स्त्रियांनां बरोबर नेलें. यावरून श्रीकृष्णाचें तुझ्यावर किती प्रेम आहे हें उघड दिसतें. पारिजातक पुष्प वास्तविक तुला द्यावयास पाहिजे होतें तें त्यांनीं रुक्मिणीला दिलें. याबद्दल मला सुद्धां श्रीकृष्णाचा राग आला; आणि तुला त्याबद्दल कांहींच वाटत नाहीं, हें आश्चर्य आहे. सत्यभामे तूं जर हट्ट घेशील तर श्रीकृष्ण पारिजातकाचें फूलच काय, पण पारिजातक वृक्ष देखील तुला स्वर्गातून आणून देतील.' नारद असें सांगत आहे, इतक्यांत तेथें सत्यभामेच्या परिचारिका आल्या व त्यांनींहि तो प्रकार सत्यभामेला तिखटमीट लावून सांगितला. तेव्हां सत्यभामेची चित्तवृत्ती चंचल झाली, व ती विचार करीत बसली. सत्यभामेच्या स्थितींत फेर झालेला दिसतांच, आतां आपला कार्यभाग बहुतेक होईल, असें जाणून नारदमुनी तेथून निघून गेले. सत्यभामेच्या डोक्यांत द्वेष, अहंकार व क्रोध यांनीं पूर्ण संचार केला, व ती त्या संतापाच्या भरांत कृष्णाला व रुक्मिणीला वाटेल तसें बोलूं लागली. ती म्हणाली,—'कृष्णाची खरी विवाहित स्त्री मी असून सर्व स्त्रियांमध्यें रूपानें व गुणानेंहि मीच अधिक आहे. असें असतां कृष्णानें तें फूल रुक्मिणीला द्यावें काय? आईबापाला न विचारतां पळून आलेल्या पळपुटीचें एवढें स्तोम कशाला हवें?' अशाप्रकारें अनेक मर्मभेदक शब्दांनीं तिनें कृष्णाची व रुक्मिणीची निर्भत्सना चालविली. होतां होतां तो संताप फारच वाढला. रडून रडून तिनें आपले डोळे सुजविले, केंस मोकळे सोडले, दागीने काढून फेंकून दिले, भरजरी शालू दूर टाकून एक जीर्ण वस्त्र अंगाभोंवतीं गुंडाळलें व मोठमोठ्यानें आक्रोश करीत ती पलंगावर पडली. तिच्या सख्या तिची पुष्कळ समजूत करीत, परंतु ती कोणाच्याच बोलण्याकडे लक्ष देईना. हा प्रकार चालू आहे तोंच श्रीकृष्णहि तेथें आले, व पाहतात तों सत्यभामा संता-

### ३. पारिजातक हरण.

यात्रमाणें श्रीकृष्णाचा निरोप घेऊन नारद इंद्राकडे गेला. एकमेकाचें क्षेम-कुशल विचारणें झाल्यावर इंद्रानें नारदाला आज कोणीकडे येणें केलेंत म्हणून प्रश्न केला. तेव्हां नारद ह्मणाले, 'देवेंद्रा, सत्यभामा–ब्राह्मणाला श्रीकृष्णाचें दान करण्याचें–व्रत करणार आहे व त्या दानावर पारिजातक वृक्षाची दक्षणा देण्याचा त्या भामेनें संकल्प केला आहे. म्हणून श्रीकृष्णानीं मला तुजकडे तो वृक्ष मागण्यासाठीं पाठविलें आहे.' नारदाचें भाषण ऐकून इंद्रास राग आला, व त्यानें कृष्णाचा उपहास करून वृक्ष मिळणार नाहीं, असा जबाब दिला. नारदानें घडलेलें वर्तमान परत द्वारकेस येऊन श्रीकृष्णास कळविलें. इंद्राचा उद्धटपणाचा निरोप ऐकून कृष्णास राग आला; व मदन, दारूक, गरूड यांसह ते इंद्राकडे जाण्यास निघाले. इकडे इंद्रसभेंतून नारद निघून गेल्यावर इंद्राला पाठविलेल्या निरोपाबद्दल मोठी चुटपूट लागली व तो देवगुरु बृहस्पती यांच्या-कडे जाऊन पुढें काय करावें, तें विचारूं लागला. देवगुरु म्हणाले, इंद्रा, तूं कृष्णाच्या निरोपाप्रमाणें पारिजातक वृक्ष त्याला दिला असतास तर त्यांत तुझें कल्याणच झालें असतें. असो; आतां झालें तें झालें. श्रीकृष्ण आतां युद्ध करून वृक्ष नेल्यावांचून राहणार नाहींत. तूं आतां कश्यपाकडे जा, व या संकटाचें निवारण कसें करावयाचें तें त्यांस विचार. यात्रमाणें इंद्र विचार करीत आहे तोंच कृष्णाचा रथ तेथें येऊन दाखल झाला; व पांचजन्य शंख वाजवून त्यानें इंद्रास युद्धास पाचारण केलें. शंखाच्या आवाजानें सर्व पृथ्वी डळमळूं लागली; तेव्हां इंद्रा-सह सर्व देव घाबरले. इतक्यांत गरुडानें आपल्या पंखानें वृक्षाच्या संरक्षणाकरितां ठेविलेले सर्व सैनिक उडवून दिले, व तो खालीं उतरला. श्रीकृष्णानीं लागलींच तो वृक्ष उपटला व ते गरुडाच्या पाठीवर बसले. त्याबरोबर गरूड त्या वृक्षा-सह श्रीकृष्णाला घेऊन तेथून उडाला व द्वारकेचा मार्ग आक्रमण करूं लागला.

---

## अध्याय १८ वा.

### १. इंद्र व श्रीकृष्ण यांचें युद्ध.

श्रीकृष्ण गरुडावर बसून वृक्ष घेऊन निघाल्याचें पहातांच इंद्रही त्यांच्या मागें आपलें वज्र घेऊन धावूं लागला. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, ' इंद्रा, कशाला निष्कारण धांवतोस ! तुझ्या वहिनीनें हा पारिजातक वृक्ष मागितला आहे म्हणून घेऊन जात आहें. यांत तुला रागावण्याचें कांहींही कारण नाहीं. मी कांहीं हा लोकांना नेऊन देत नाहीं. तुझ्याच धाकट्या बंधूच्या घरीं नेत आहे.' यात्र-

माणें कृष्णानीं इंद्राला विनोदानें सांगितलें, परंतु इंद्राला तें रुचलें नाहीं. तेव्हां घनघोर युद्ध सुरू झालें. मदनानें इंद्राचा पुत्र जयंत व सेनानी प्रवीर यांच्याशीं युद्ध सुरू केलें. ते दोघे युद्धविद्येंत अत्यंत प्रवीण होते. त्यांनीं शरवृष्टीनीं मदनाला अगदीं बद्ध करून टाकिलें. त्यावेळीं दारुकानें मदनाला साह्य करून त्याची बाजू सांभाळून घेतली. शेवटीं मदनानें जयंतास रणक्षेत्रांतून पळवून लावलें, व गरुडानें सेनानीसह सर्वांची दाणादाण उडविली. इकडे श्रीकृष्ण व इंद्र यांचेंहि विलक्षण युद्ध सुरू झालें. इंद्रानें आपल्या ऐरावतासह मोठ्या नेटानें मारा सुरू केला; परंतु गरुडानें आपल्या चंचू आघातानें ऐरावतास घायाळ करून जमिनीवर पाडलें. तेव्हां इंद्रानें क्रोधाच्या आवेशांत श्रीकृष्णावर वज्राचा प्रहर केला. त्यायोगें श्रीकृष्ण क्षणमात्र मूर्च्छित पडले. त्या वेळीं गरुडानें वारा घालून श्रीकृष्णास सावध केलें. इंद्र बेफाम झाला आहे, असें पाहून श्रीकृष्णानीं आपली गदा इंद्राच्या हृदयावर मारली व त्या आघातानें इंद्र धाडकन जमिनीवर निचेष्ट पडला.

## २. हरिहर भेट.

हा अनिष्ट प्रकार पहातांच सर्व देव चिंतातूर झाले. बृहस्पती कश्यपाकडे गेले व सर्व वर्तमान त्यांनीं त्यांस कळविलें. तेव्हां कश्यप म्हणाला, बृहस्पती हा सर्व परस्त्रीगमनाचा परिणाम होय. त्या अहिल्या सतीला जर इंद्रानें त्रास दिला नसता तर हा असा प्रसंग खचित आला नसता. असो; आतां आलेल्या संकटाचें परिमार्जन शंकरावांचून करण्यास कोणी समर्थ नाहीं. आपण उभयतां कैलास पर्वतावर जाऊं व महादेवाची विनंति करून त्यांनां श्रीकृष्णाकडे घेऊन येऊं. बृहस्पतीनें त्या गोष्टीला आपली अनुमति दर्शविली, व ते दोघे कैलास पर्वतावर गेले. उभयतांनीं महादेवाला वंदन करून घडलेली इत्थंभूत हकीकत सांगितली; व आपण लवकर येऊन त्या दोघांची समजूत करावी नाहीं तर मोठा अनर्थ ओढवेल, अशी विनंति केली. कश्यपाची प्रार्थना ऐकून शंकर म्हणाले, कश्यपा, इंद्रानें अहिल्येच्या सतीत्वाचा नाश केला, त्या पातकाचें फळ हें इंद्राला मिळत आहे. तूं श्रीकृष्णाची शक्ति जाणून आहेसच, तेव्हां तो पारिजातक वृक्ष नेल्यावांचून राहणार नाहीं. असो; तथापि कांहीं तरी तजवीज करून तंटा तोडला पाहिजे, एवढी गोष्ट खरी. असें म्हणून शंकर नंदीवर बसून श्रीकृष्णाजवळ गेले, व म्हणाले; 'कृष्णा तूं जगाच्या उपकारासाठीं हा अवतार घेतला आहेस, असें असून तूंच तुझ्या हातानें अमरावतीचा नाश करतोस हें बरें नव्हे. तूं सर्वेश्वर, सर्वव्यापक व सर्वज्ञ आहेस. तूंच जर इंद्रावर हत्यार घेऊन उठलास तर त्याचें रक्षण तरी कोण करणार? इंद्राची इंद्रपदावर तूंच स्थापना केली आहेस, तेव्हां त्याची अशी अप्रतिष्ठा करूं नकोस. प्राण जर शरीरावर रुसला, तर त्या शरीरानें काय करावें? पृथ्वी जर धान्य-

प्रसवेनाशी झाली, सूर्य वृष्टि करीनासा झाला, सागर मर्यादा सोडूं लागला, तर त्यांचें निवारण तरी कोणी करावयाचें ? आईच जर मुलाला वीष पाजूं लागली, तर त्यानें रडावें तरी कोणाजवळ ? भ्रतारच जर स्त्रीची छळणूक करूं लागला, तर तिनें सुखाची आशा तरी कशी बाळगावयाची ? बापच जर मुलीचा विक्रय करूं लागला, तर त्या विचारीनें पाय तरी कोणाचे धरावयाचे ? राजाच जर आपल्या प्रजेला लुटूं लागला, तर त्या दीन प्रजेनें दाद तरी कोणाजवळ मागावयाची ? त्याप्रमाणें तूंच जर त्या इंद्राची अशी अप्रतिष्ठा करूं लागलास तर त्यानें करुणा तरी कोणाजवळ भाकावयाची ? हे कृष्णा, त्या इंद्रासाठीं मी आतां तुझी विनवणी करतों. झालें तें झालें, त्याला माझ्यासाठीं क्षमा कर, व तूं हा सुरतरु खुशाल घेऊन जा. पण तो सुरतरु आहे, स्वर्गाचें भूषण आहे, तो पृथ्वीवर राहिल्यास त्याचें सर्व महत्व नाहींसें होईल, म्हणून तो एक वर्षभरच पृथ्वीवर ठेव आणि तुझा कार्यभाग झाल्यावर स्वर्गांत पोहोंचता कर;' याप्रमाणें महादेवांनीं कृष्णास विनंती करून दोघांची समजूत घातली. मग देवगुरूनें श्रीकृष्णाला शंकराच्या हातीं दिलें, व इंद्राला कश्यपाचे हातीं दिलें, व एकमेकांनीं एकमेकाला क्षेमालिंगनें दिलीं. अशा रीतीनें त्या भयंकर लढाईचा समाधानकारक निकाल लागला.

### ३. बिल्वोदकेश्वराची स्थापना.

त्या वेळीं झालेली हरिहराची भेट पाहून सर्वांनां मोठें कौतुक वाटलें. स्वतः शंकर व श्रीकृष्ण या उभयतांनांही त्याबद्दल फार समाधान वाटलें. ज्या ठिकाणीं हरिहरांची भेट झाली, त्या स्थलाची स्मृति रहावी ह्मणून शंकरांनीं तेथें लिंग स्थापन केलें. त्या लिंगाचें नांव 'बिल्वोदकेश्वर' असें ठेविलें. कृष्णानें तेथें भोगावती आणली, व सर्वांनीं स्नानें करून त्या लिंगाची पूजा केली. त्या वेळीं सुरवरांनीं आकाशांतून हरिहरावर पुष्पवृष्टी केली. पूजा वगैरे झाल्यावर महादेव कृष्णाला ह्मणाले, कृष्णा या पवित्र स्थळाचें संरक्षण व्हावें ह्मणून आसमंत भागीं असलेल्या दुष्टांचा नाश करून टाक; ह्मणजे सज्जनांचा येथें वास होईल व हें स्थळ असेंच पवित्र राहील. असें सांगून महादेव कैलासीं निघून गेले. इंद्र, कश्यप व गुरु यांनींहि कृष्णचरणावर मस्तक ठेवून कृष्णाचा निरोप घेतला व ते इंद्रलोकीं निघून गेले. व श्रीकृष्ण पारिजातक वृक्ष घेऊन मोठ्या आनंदानें द्वारकेस येण्यास निघाले. श्रीकृष्ण युद्धांत विजयी होऊन सुरतरु पारिजातक घेऊन येत आहेत, हें वर्तमान ऐकून सर्वांना आनंद झाला. सर्व नगर शृंगारून लोकांनीं मोठ्या थाटानें श्रीकृष्णाचें स्वागत केलें. सत्यभामेच्या आनंदास तर पारावारच राहिला नाहीं. तो अभूतपूर्व पारिजातक वृक्ष लोकांना पहावयाला मिळावा ह्मणून कृष्णानीं तीन दिवसपर्यंत तो नगराबाहेरच ठेविला, व त्याच्या संरक्षणासाठीं कांहीं रक्षक ठेवून, त्यावर सुदर्शनचक्र फिरतें ठेविलें.

## ४. श्रीकृष्णाचें दान.

पारिजातक वृक्ष आल्यावर कृष्णाचें दान देण्याची तयारी सत्यभामेनें चालविली. तिनें ज्योतिषाला बोलावून आणून या दानव्रताला सुमुहूर्त विचारला. ज्योतिषानें—माघ शुद्ध एकादशी हा दिवस पारिजातक वृक्ष गांवांत आणण्यास चांगला आहे, तेव्हां त्या दिवशीं वृक्ष आणून तूं आपल्या घरीं ठेव, आणि पंधरा दिवसांनीं ह्मणजे माघ वद्य एकादशीचे दिवशीं श्रीकृष्णाचें दान कर,—असें सांगितलें. त्याप्रमाणें सत्यभामेनें दानाची तयारी केली व सत्पात्र ब्राह्मण ह्मणून नारदाला निवडून काढलें. माघ शुद्ध द्वादशीचे दिवशीं सत्यभामा आपल्या परिवारासह वृक्ष आणण्याकरितां मोठ्या समारंभानें निघाली; व नगराबाहेर जाऊन, त्या वृक्षाला तिनें साष्टांग नमस्कार करून ब्राह्मणाकडून त्याची यथासांग पूजा केली. ती हात जोडून ह्मणाली, ‘हे सिंधु कुमारा पारिजातका, हे स्वर्गरत्नाकरा, तुझ्या प्रसादामुळें मी हें व्रत करीत आहे. हे तरुवरा तुझी दक्षणा मी आपल्या हातानें ब्राह्मणाला देणार आहें, तर तूं माझ्या हातांत राहशील असा लहान हो.’ सत्यभामेनें याप्रमाणें त्या वृक्षाची प्रार्थना करतांच तो बारा योजनें विस्तीर्ण असलेला पारिजातकवृक्ष आपलें विशाळ स्वरूप टाकून तुळशीच्या रोपाप्रमाणें लहान झाला. तेव्हां सत्यभामेनें तो रोपा रत्नखचित सुवर्णाच्या ताटांत ठेवून मंगलवाद्यांच्या गजरांत मिरवित मिरवित आपल्या घरीं आणला, व मोठ्या समारंभानें तो आपल्या दाराशीं लावला.

सत्यभामा ब्राह्मणास श्रीकृष्णाला दान देणार आहे, हें वर्तमान ऐकून पुष्कळ लोकांना फार आश्चर्य वाटलें; व तो समारंभ पाहण्यासाठीं हजारों लोक माघ वद्य एकादशीचे दिवशीं द्वारकेस जमले. त्या दिवशीं सत्यभामेनें श्रीकृष्णाला सुगंधी उटणीं लावून उष्णोदकानें अभ्यंगस्नान घातलें. त्यांचा पिंवळा पितांबर त्यांनां नेसावयाला दिला. अंगाला चंदन लावून बहुमूल्य अशीं वस्त्रेंभूषणें त्यांच्या अंगावर घातलीं. पारिजातक वृक्ष लावला होता त्याच्या जवळ सुवर्णाचा एक सहस्रमुखी नाग करून बसविला, व त्या नगाची फणा वृक्षाला बांधून क्षीरसागरांत शेषच बसला आहे असें तिनें दाखविलें. आणि त्या नागावर तिनें श्रीकृष्णाला आणून बसविलें. नंतर नारदाला दान घेण्यासाठीं बोलाविलें. नारद आल्यावर त्याला सुवर्णाचे आसनावर बसविलें व ब्राह्मणांनां बोलावून आणून यथाविधी संकल्प केला, व त्या कनकशेषासह सत्यभामेनें श्रीकृष्ण नारदाला दान दिला. त्यावर दक्षणा ह्मणून तो पारिजातक वृक्ष स्वाधीन केला. याप्रमाणें तिनें तें व्रत यथासांग पूर्ण करून नारदाला नमस्कार केला. तेव्हां, नारदांनीं—‘तुला जन्मोजन्मीं श्रीकृष्ण पति मिळेल’ असा तिला आशीर्वाद दिला. नंतर नारद आपली पूजेची समळी, तो पारिजातक वृक्ष व तो कनकनाग, असें कृष्णाच्या मस्तकावर देऊन त्याला आपणाबरोबर घेऊन रस्तोरस्तीं फिरवूं लागला. पुढें नारदमुनी

व मागें श्रीकृष्ण भारवाहकाप्रमाणें नारदाचें सामान घेऊन चालले आहेत, असा तो प्रकार बघून नगरांतील सर्व लोक विस्मित झाले.

कृष्णाच्या सर्व स्त्रिया तर हा प्रकार पाहून फार दुःखी झाल्या, व त्या विलक्षण व्रताबद्दल सत्यभामेचा त्यांना फार राग आला. लोक अनेक प्रकारची चर्चा करूं लागले. लोकांचें मर्मोतिक बोलणें ऐकून कृष्णस्त्रियांची अवस्था मोठी कठीण झाली, व काय करावें तें त्यांस सुचेनासें झालें. कृष्णाचें तें सोंग द्वारकेंतल्या सर्व रस्त्यांनीं हिंडविल्यावर नारद कृष्णाला नगराबाहेर घेऊन गेला, व तेथून दुसरीकडे जाण्याचा त्यानें आपला विचार लोकांनां दर्शविला.

## ५. श्रीकृष्णाची तूला.

नारद श्रीकृष्णाला घेऊन जाणार, हें ऐकून द्वारकेंतल्या लोकांनां अत्यंत वाईट वाटलें. कृष्णाच्या सोळा हजार स्त्रिया शोकाकुल झाल्या. त्या सर्वजणी एकत्र होऊन सत्यभामेच्या मंदिरांत गेल्या व तिला त्या, रागानें नाहीं नाहीं तें बोलूं लागल्या. त्या म्हणाल्या, ' सत्यभामे, तूं आम्हां कोणाला न विचारतां श्रीकृष्णाला दान दिलेंस अशी त्याच्यावर तुझी काय एकटीचीच सत्ता होती ? श्रीकृष्णानीं केवळ तुझ्याशीं त्या स्यमंतक मण्यासाठीं विवाह केला, तें तूं विसरून आमचा प्राण, आमचा आत्मा, असा जो श्रीकृष्ण, तो नारदाला दान देऊन आम्हाला दुःखांत लोटून दिलें आहेस. तूं मोठी दुष्ट, घातकी व मूर्ख आहेस. स्वतः पतिवंचित होऊन आमचीहि त्याच्याशी ताटातूट केलीस.' त्यावर सत्यभामा म्हणाली, ' स्त्रियांनों, कृष्णाची खरी आवडती स्त्री मीच आहें. माझ्यावर खरें प्रेम म्हणून स्वर्गांतून सुरतरु आणला. तुम्हीं सर्वजणी कृष्णाच्या मागें लागून आलां आहांत. ही कालिंदी तर कृष्णासाठीं तपच करीत होती. रुक्मिणी तर आईबापांना न विचारतां पळून आली. आणि तुम्ही सर्वजणी तर भौमासुराच्या बंदीशाळेंत खितपत पडलां होतां तेथून मींच तुमची सुटका केली. कृष्णाची खरी अर्धांगी मीच आहें. माझी त्याच्यावर सत्ता होती, म्हणूनच मीं त्याला दान दिलें. आतां तुम्हाला कृष्ण परत पाहिजे असेल तर नारदाकडे जा व त्याची प्रार्थना करून कृष्णाला परत आणा.' सत्यभामेनें याप्रमाणें झिडकारून सांगितल्यावर रुक्मिणीशिवाय सर्व स्त्रिया नगराबाहेर नारदाकडे गेल्या व त्याच्या भोंवेता गर्दी करून म्हणाल्या,–' नारदा, सत्यभामा कांहीं एकटी या श्रीकृष्णाची मालकीण नाहीं. आमचीहि पण त्याच्यावर कांहीं थोडी फार सत्ता आहेच. तेव्हां तूं हा आम्हां सर्वांचा जो प्राण तो कृष्ण घेऊन जाऊं नकोस. याबद्दल तूं सांगशील तें आम्हीं तुला देऊं. पण आमचें पतिरत्न नेऊं नकोस.' अशाप्रकारें त्या सोळा हजार स्त्रिया नारदाभोंवतीं गोळा होऊन नारदाची विनवणी करूं लागल्या. त्यांच्या गडबडीनें नारद गोंधळून गेला व तो कासाविस होऊन श्रीहरीकडे पाहूं लागला. नारदाची धांदल उडालेली पाहून श्रीकृष्ण हंसूं लागले. शेवटीं नारद

म्हणाले, ' हा कृष्ण त्या सत्यभामेचा आहे कीं तुम्हां सर्वांचा आहे, तें मला काय माहीत? मला तिनें दान दिला म्हणून मी त्याला घेऊन जात आहें, तिनें एकटीनें कां दान दिला, तें तिला विचारा. आतां, तुम्हाला जर श्रीकृष्ण पाहिजे असेल तर कृष्णाचे भारंभार सुवर्ण देऊन त्याला तुम्हीं खुशाल घेऊन जा.' नारदाचे हे शब्द ऐकून सर्व स्त्रियांनां फार आनंद झाला व त्यांनीं ती नारदाची अट कबूल केली. त्या सर्वजणी घाईघाईनें नगरांत आल्या व सत्यभामेला ती गोष्ट कळवून त्यांनीं तिलाहि आपणांबरोबर घेतलें. सर्व स्त्रियांनीं आपआपले सुवर्णाचे अलंकार घेतले व त्या नगराबाहेर आल्या. एका झाडाला मोठा तराजू बांधला, व त्याच्या एका पारड्यांत श्रीकृष्णाला बसवून दुसऱ्या पारड्यांत त्या स्त्रिया आपआपले अलंकार घालूं लागल्या. परंतु श्रीकृष्णाचें पारडें मुळींच जमिनीपासून हालेना. सर्वांनीं आपल्या जवळ होतें नव्हतें तेवढें सर्व सोनें त्या ताजव्यांत घातलें, परंतु सुवर्णभाराचें ताजवें वरच्यावर तरंगत होतें. तो प्रकार बघून सर्व स्त्रिया निराश झाल्या. कृष्णाच्या शतपट सुवर्ण ताजव्यांत घातलें तरी श्रीकृष्णाचें पारडें हालत नाहीं, असें पाहून सर्व जणी मोठ्या विचारांत पडल्या. मग त्यांनीं त्यांच्या पुरोहिताला विनंति केली व त्याच्याजवळून उसनें सोनें घेऊन तें पारड्यांत घातलें. तथापि पारडें वर उचलेना. इतकें सोनें ताजव्यांत घातलें तरी ताजवें वर उचलत नाहीं असें पाहून सर्व स्त्रिया निराश झाल्या. सत्यभामेला मोठा अभिमान होता कीं, सर्व स्त्रियांपेक्षां मजजवळ सुवर्णालंकार अधिक आहेत; तेव्हां मी कृष्णाची तूला सहज पुरी करीन. परंतु अंगावरील सर्व अलंकार घालूनहि जेव्हां कांहींच उपयोग झाला नाहीं, तेव्हां तिचा अभिमान पार नाहींसा झाला; व कार्यसिद्धि कशानें होईल याचा ती विचार करूं लागली. ह्या सर्व स्त्रियांच्या समाजांत रुक्मिणी मात्र नव्हती. ती आपल्या मंदिरांतच श्रीहरीच्या भजनांत मग्न होती. अर्थात् श्रीहरि तिच्या जवळच होते. श्रीहरि नारदानें नेले आहेत असें तिच्या ध्यानींमनींही नव्हतें. रुक्मिणी येथें आलेली नाहीं असें पाहून सत्यभामेला वाटलें कीं, रुक्मिणीला बोलावून आणावें व तिच्याकडून तिचे अलंकार तुळेंत घालावे, म्हणजे कदाचित् तुळा पुरी होईल. असा विचार करून ती रुक्मिणीच्या मंदिरांत आली व विनयानें तिला सर्व हकिकत सांगून म्हणाली,–बाई रुक्मिणी, आतां तूं तरी येऊन कृष्णाची सोडवणूक कर. आम्ही सर्व जणींनीं आपणांजवळ होतें नव्हतें तेवढें सुवर्ण ताजव्यांत घातलें, परंतु ताजवें मुळींच हालत नाहीं.–सत्यभामेची विनंति ऐकून रुक्मिणी विचारांत पडली. ती मनांत म्हणाली, ज्याच्या उदरांत सर्व विश्व सामावलें आहे, त्याची तूला अशा सुवर्णाच्या अलंकारांनीं कधींही होणार नाहीं. भक्तीवांचून त्याचें वजन करण्यास कांहींहि समर्थ नाहीं. असें मनांत आणून रुक्मिणीनें सचैल स्नान केलें, व परमेश्वराचें चिंतन करून तुळ-

शीची प्रार्थना केली आणि एक तुळशीपत्र तोडून घेतलें; व जेथें श्रीकृष्णाची तूला चालली होती तेथें आली. तेथें आल्यावर प्रथम तिनें नारदाला व श्रीकृष्णाला प्रदक्षणा करून वंदन केलें, व पदराखालीं झांकून आणलेलें तुळशीपत्र अंतः-करणपूर्वक ताजव्यांत घातलें. त्याबरोबर तुळशीपत्र घातलेला ताजवा खालीं बसला व श्रीकृष्णाचा ताजवा उंच गेला. तो चमत्कार पाहून सर्वांना अत्यंत आश्चर्य वाटलें. व जी ती रुक्मिणीला धन्यवाद देऊं लागली. नारदाला कृष्णाच्या भारंभार सुवर्ण देऊन सोडवून घ्यावयाचें होतें, परंतु ताजव्यांत तुळशीपत्र पडल्यामुळें अलंकारांचा ताजवा कृष्णापेक्षांहि जड झाला होता; म्हणून कृष्णाच्या स्त्रिया कृष्णाचें समतोल वजन करण्यासाठीं आपआपले अलंकार त्या ताजव्यांतून काढून घेऊं लागल्या. होतां होतां सर्वांनीं आपले अलंकार काढून घेतले; व ताजव्यांत एक तुलसीपत्र फक्त राहिलें. तेव्हां कृष्णाचें वजन बरोबर झालें. तो प्रकार बघून सोळा हजार स्त्रियांनां दिसून आलें कीं, आपणा सर्वांपेक्षां रुक्मिणीची योग्यता फार मोठी आहे. सत्यभामेलाहि वाटलें कीं, आपला अभिमान फुकट होता. याप्रमाणें सर्वांच्या गर्वाचें हरण झालें. तेव्हां नारद ह्मणाला,–कृष्णहि गेला, सुवर्णहि गेलें आणि माझ्या हातीं तुळशीपत्र आलें!–हे श्रीकृष्णा, तुझें लीला-लाघव अतर्क्य आहे. तें जाणावयाला कोण समर्थ आहे? असें म्हणून नारदानें कृष्णाचे चरणांवर मस्तक टेविलें. त्याप्रमाणें सत्यभामेसह सर्व स्त्रियांनीं अभिमा-नाचा त्याग करून कृष्णास अनन्यभावें नमस्कार केला.

## ६. पारिजातकाची उत्पत्ति.

पारिजातक वृक्षाच्या उत्पत्तीविषयीं अशी कथा आहे कीं, दक्षप्रजापतीनें आपल्या तेरा कन्या कश्यपाला दिल्या होत्या. त्यापैकीं अदिती ही सर्वांत वडील असून अत्यंत सुंदर होती. तिच्यावर कश्यप ऋषीचें फार प्रेम होतें. कश्यपाचा आश्रमधर्म तीच संभाळित असे. धर्मविहित जो धर्म, अर्थ, काम, वगैरे गृहधर्म, तो ते उभयता चांगल्या रीतीनें चालवीत असत. ऋतुकाळ प्राप्त झाल्यावांचून ते कधींहि संभोगक्रिया करीत नसत. एकदां कश्यप सिद्धासनावर बसून होमहवन करीत असतांना सिद्धिमंत्र अव्हाहन करून त्यांनीं होमकुंडांत अवदान टाकलें. त्याबरोबर होमकुंडांतून एक वृक्ष निघाला. तोच पारिजातक होय. त्या वृक्षाच्या सावलींत कश्यप व अदिती अनेक प्रकारच्या क्रीडा करीत असत. ती अदिती महापतिव्रता होती व ती पतीलाच आपलें मुख्य दैवत व सर्वस्व समजत असे. तिच्या दर्शनासाठीं अनुसूया, अरुंधती, लोपामुद्रा, तारामती, वगैरे ऋषि-भार्या नित्य येत असत. पुढें अदितीला इंद्र हा मुलगा झाला. त्याला जेव्हां त्यांनीं अमरावतीचें राज्य दिलें, त्या वेळीं तो पारिजातक वृक्षहि दिला. व तेव्हां-पासून तो वृक्ष अमरावतीस होता.

## ७. पार्वतीभ्रमनिरसन.

एकदां शंकर व पार्वती असे उभयतां कैलास पर्वताच्या रत्नगिरी शिखरावर सोमकांत शिळेवर बसले होते. पार्वतीच्या सख्या नृत्यगान करून दोघांची करमणूक करीत होत्या. या नाचरंगांत शंकर तल्लीन झाले आहेत असें पाहून पार्वती शंकरास ह्मणाली, 'अहो कैलासपते; तुमची एवढी कर्तुमाकर्तुम शक्ति, पण तो कश्यप यःकश्चित मनुष्य असून त्याचें सामर्थ्य कांहीं विलक्षण दिसतें. आपल्या तपोबलानें तो प्रति ईश्वरच झाला आहे. त्यानें जो पारिजातक वृक्ष निर्माण केला आहे, त्याचा सुगंध, रंग, रूप, सर्वच कांहीं अपूर्व आहे असें म्हणतात. तेव्हां तो पारिजातक वृक्ष एकवार पहावा अशी माझी इच्छा आहे.' पार्वतीची विनंति ऐकून शंकरानें तिचा हात धरला व कैलास पर्वताच्या एका भागावर आणलें. तेथें गेल्यावर पार्वती पाहूं लागली, तों अत्यंत प्रचंड व सुंदर असा बाग असून त्या बागेंत हजारों पारिजातक वृक्ष आहेत. तो बाग शंभर योजनें विस्तीर्ण होता. त्यांत कल्पवृक्ष व पारिजातक वृक्ष कुंपणासारखे बागेच्या सभोंवतीं लावले होते व त्या पेक्षांहि सुंदर, मनोहर व सुगंधी अशीं अनेक झाडें बागेंत होतीं. सुंदर व निर्मळ पाण्याचे पाट सर्व बागेंत सारखे झुळझुळ वहात होते. बागेंत इकडे तिकडे फिरण्यासाठीं स्फटिकाचे रस्ते होते. बागेच्या मध्यभागीं एक रत्नखचित प्रचंड प्रासाद होता. त्याच्या चारी बाजूला चार शोभिवंत दरवाजे असून ते रत्नाप्रमाणें लकलकत होते. प्रासादाचें शिखर गगनचुंबित असून, त्यावरील कळस सूर्याला लाजवीत होता. असा तो मनोहर बाग व हजारों पारिजातकाचे वृक्ष आणि त्यामधील सुंदर प्रासाद पाहून पार्वती अगदीं थक्क होऊन गेली. त्या प्रासादांत रत्नांच्या सुंदर पुतळ्या जागोजाग उभ्या होत्या. त्यांच्या हातांत वीणा-मृदुंगादि अनेक प्रकारचीं वाद्यें होतीं. महादेव व पार्वती यांनां पहातांच त्या रत्नाच्या पुतळ्या सुस्वर वाद्यें वाजवून मधूर अलापानें गावूं लागल्या. तें बघून पार्वती अधिकच मुग्ध झाली. महादेव तिला बरोबर घेऊन एकेक प्रासाद महाल दाखवूं लागले. अगदीं वरच्या मजल्यावर अष्टदिशेला आठ मनोरे हस्तीदंताचे होते त्या मनोऱ्यांत बसून पार्वती जेव्हां बागेचें निरीक्षण करूं लागली, तेव्हां तो अपूर्व देखावा पाहून तिची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. ज्या पारिजातक वृक्षासाठीं आपण कश्यपाची वाखाणणी करीत होतों, तशा प्रकारचे वृक्ष या बागेंत लक्षावधि असून त्यांची योग्यता कुंपणाइतकी आहे, हें पाहून तिला आपल्या स्वतःच्या वैभवाची कल्पना करितां आली. संपूर्ण विश्व निर्माण करण्याची ज्या प्रभूच्या अंगीं शक्ति आहे तो परात्पर महेश्वर आपणास लाधला असतांनां आपण अविचारी स्त्रियांप्रमाणें पारिजातक वृक्ष पाहण्याकरितां अमरावतीस जाण्याची इच्छा दर्शविली, याबद्दल तिला फार वाईट वाटलें. व आपण आपल्या पतीची योग्यता जाणली नाहीं याबद्दल तिला अनुताप होऊन, तिनें शंकराची अनन्यभावें क्षमा मागितली.

# अध्याय १९ वा.

## १. हंस व डिंभक यांची कथा.

एके दिवशीं जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला, ऋषि, हंस व डिंभक या राक्षसांचा मृत्यु शस्त्रांवांचून झाला असें सांगतात, तर त्या उभयतां राक्षसांनां कोणी व कां मारलें, तें मला कृपा करून सांगावें. तेव्हां वैशंपायन ऋषि राजाला ती कथा सांगूं लागले. ते म्हणाले, "राजा, पूर्वी शाल्वदेशामध्यें एक ब्राह्मण रहात होता. त्या ब्राह्मणाला दोन मुलें होतीं. वडील मुलाचें नांव हंस व धाकट्याचें नांव डिंभक असें होतें. हीं दोन्हीं मुलें मोठीं झाल्यावर अरण्यांत गेलीं व त्यांनीं शंकराची उग्र तपश्चर्या करून शंकरास प्रसन्न करून घेतलें. शंकर प्रसन्न झाल्यावर त्या दोघांनीं शंकरापासून अक्षय कवच, त्रिशूळ व पाशुपतास्त्रें मिळविलीं. या आस्त्रांची प्राप्ती झाल्यावर ते अत्यंत उन्मत्त झाले. व त्यांनीं अनेक देशचीं राज्यें जिंकून ते सत्ताधीश झाले. ते दोघे बंधु एकदां रानांत शिकार करीत दुर्वास ऋषीच्या आश्रमांत गेले. त्यावेळीं ऋषि ईश्वरचिंतन करीत बसले होते. त्यांस पाहून ते म्हणाले,—अहो ऋषि, तुम्हीं हें काय ढोंग माजविलें आहे ? घरदार सोडून अशा या वैराग्यावस्थेंत येथें रहाण्यांत फायदा काय ? वगैरे प्रकारें उपहासास्पद बडबड करूं लागले. त्याच्या बडबडीकडे ऋषींनीं मुळींदेखील लक्ष दिलें नाहीं. दुर्वास ऋषि आपल्या ध्यानांत मग्न होते. दुर्वास ऋषि कांहींच बोलत नाहींत असें पाहून ते हंस व डिंभक दुर्वास ऋषींनां अधिक त्रास देऊं लागले. एकानें त्यांचा कमंडलू फोडला, दुसऱ्यानें त्यांचें यज्ञपात्र लांब फेंकून दिलें, एकानें दंड मोडला तर दुसऱ्यानें छाट्या फाडून टाकल्या. इतकें झालें तरी दुर्वास ऋषि एक अक्षरही बोलले नाहींत. तेव्हां त्या दुष्टांनीं एक पशु मारला व त्याचें रक्त दुर्वास ऋषीच्या अंगाला चोपडून त्यांनां असनावरून ढकलून दिलें, व शेवटीं लाथाबुक्या मारूं लागले. तेव्हां दुर्वास ऋषि म्हणाले, अरे मूर्खानों, माझा निष्कारण छळ करतां याचा परिणाम चांगला व्हावयाचा नाहीं. यामुळें तुमचा कुळक्षय होईल. तुम्हीं आपले वैभव वाढविण्यासाठीं हा प्रयत्न करीत असाल, परंतु हा तुमचा प्रयत्न अगदीं चुकीचा आहे. वृक्षाच्या मुळावर विस्तवाचें खत घालून मूर्ख मनुष्य जसा फल–पुष्पाची आशा करतो, अथवा सुखाच्या आशेनें पतंग ज्याप्रमाणें दिव्यावर उडी मारतो, त्याप्रमाणें तुमचा हा प्रयत्न आहे. यापासून तुमचा फायदा न होतां नाश मात्र होईल. दुर्वास ऋषि याप्रमाणें त्या राक्षसांना समजावून सांगू लागले, परंतु ते दुष्ट त्यांच्या म्हणण्याकडे लक्ष न देतां त्यांना अधिक लाथा बुक्यांनीं मारूं लागले. दुर्वासाच्या अंगीं शाप देण्याचा अधिकार होता व त्याप्रमाणें त्यांनीं शाप दिला असता तर त्या दोघां दुष्टांचा क्षणार्धांत नाश झाला असता. परंतु तपाचा क्षय होईल या

प्रीतीनें त्यांनीं त्यांनां शाप दिला नाहीं. दुर्वास ऋषि त्या दुष्टांचा कांहींच प्रतिकार करीत नाहींत असें पाहून आश्रमांतील त्यांचे शिष्य तेथून निघाले व तें वर्तमान सांगण्यासाठीं द्वारकेस श्रीकृष्णाकडे गेले. इकडे बराच वेळपर्यंत दुर्वासाचा छळ केल्यावर ते हंस व डिंभक त्या आश्रमास आग लावून आपल्या गांवीं निघून गेले. श्रीकृष्णाला तें वर्तमान समजतांच ते लागलीच दुर्वासऋषीच्या आश्रमांत आले. तेथें येऊन पाहतात तों दुर्वासऋषि दुःखानें क्लांत होऊन रुदत आहेत, व आग लावल्यामुळें ऋषीचें आश्रमांतील सर्व सामान जळून गेलें आहे. असा प्रकार पाहून श्रीकृष्णांनीं तेथें एक चांगला आश्रम बांधून दिला व ऋषींनां वस्त्रें, भांडीं, वगैरे सर्व देऊन त्यांची व्यवस्था लावली.

२. इकडे हंस व डिंभक हे उभयतां राजसूययज्ञ करण्याचा विचार करूं लागले. ते आपला पिता जो ब्रह्मदत्त त्याला ह्मणाले, 'हे ब्रह्मदत्ता आम्हासारखे पराक्रमी पुत्र तुला असतां तूं राजसूययज्ञ कां करीत नाहींस? तूं हा यज्ञ करावास अशी आमची इच्छा आहे. या यज्ञप्रसंगीं आह्मीं पृथ्वीवरील सर्व राजे जिंकू, व त्यांचे करभार तुला आणून देऊं.' मुलांचा तो विचार ब्रह्मदत्तालाहि पसंत पडला व त्यानें तो यज्ञ करण्याविषयीं आपल्या मुलांनां परवानगी दिली. त्या ब्रह्मदत्ताचा जनार्दन या नांवाचा एक मित्र होता. तो ब्राह्मण असून विष्णुभक्त होता. यज्ञाला आरंभ करणें हितावह होणार नाहीं, असें त्यानें ब्रह्मदत्ताला सांगितलें. परंतु जनार्दन ब्राह्मणाचा उपदेश त्यांनां रुचला नाहीं व त्यांनीं तो राजसूययज्ञ करण्याचें ठरविलें. यज्ञाला लागणाऱ्या सामानापैकीं कापड, मीठ, घोडा व सुवर्ण हें त्यांनीं द्वारकेहून कृष्णाकडून आणविण्याचें ठरविलें, व तें मागण्यासाठीं जनार्दन ब्राह्मणालाच द्वारकेस पाठवून दिलें. जनार्दन ब्राह्मण द्वारकेस गेला. त्यानें श्रीकृष्णाला सर्व हकीकत कळवून कापड, मीठ, अश्व व सोनें यांची मागणी केली. कृष्ण ह्मणाले; 'जोंपर्यंत बलराम जिवंत आहे, तोंपर्यंत यादवांकडून कोणालाहि कर मिळावयाचा नाहीं. सत्तेच्या बळावर वाटेल त्याच्याजवळ वाटेल तें कर ह्मणून हक्कानें मागणें हा अत्यंत निंद्य प्रकार होय. त्यांची युद्ध करण्याची तयारी असल्यास आह्मींहि युद्ध करावयाला तयार आहोंत.' याप्रमाणें कृष्णानें सांगितल्यावर जनार्दन ब्राह्मण ब्रह्मदत्ताकडे परत आला व त्यानें त्याला कृष्णाचा निरोप कळविला. निरोप ऐकतांच हंस व डिंभक अत्यंत क्रुद्ध झाले व त्यांनीं पुष्कर येथें कृष्णाला युद्धासाठीं आव्हाहन केलें. निरोपाप्रमाणें कृष्ण, बलराम व यादव वीर सैन्यांसह पुष्कर येथें आले; व दुर्वासऋषीचें दर्शन घेऊन खवळलेल्या सिंहाप्रमाणें ते दोघे हंस व डिंभक यांच्या सैन्यावर तुटून पडले. बलरामानें आपल्या विलक्षण युद्ध कौशल्यानें क्षणार्धांत शत्रूचे हजारों वीर कापून काढले. बलरामाचा तो विलक्षण पराक्रम पाहून हंस त्याच्यावर अत्यंत क्रुद्ध झाला व तो बलरामावर धावून गेला. चक्रवीर कृष्णावर धांवून गेला.

डिंभक सात्यकीवर धांवून गेला. व हिडिंब वसुदेव उग्रसेनावर धांवून गेला. याप्रमाणें ते वीर धांवून गेल्यावर मोठें तुमूल रणकंदन सुरू झालें. त्यावेळीं तें विलक्षण युद्ध पाहण्यासाठीं आकाशांत सुरगणांच्या विमानांची गर्दी झाली. कृष्णानें शत्रूच्या वीरांनां कांहीं वेळ आपला पराक्रम गाजविण्यास अवकाश दिल्यावर आपलें सुदर्शन चक्र सोडलें. त्याबरोबर हंस व डिंभक यांच्या सैन्यांतील हजारों वीर पटापट मरून पडले. तो प्रकार पाहून ते दोघेहि अत्यंत भयभीत झाले; परंतु त्यांनीं युक्ती योजून, ते वसुदेव व उग्रसेन यांच्या अंगावर धांवून गेले. पण इतक्यांत श्रीकृष्ण त्यांच्यामागें धांवले व त्यांच्यापैकीं हिडींबास त्यांनीं ठार केलें. हिडींब मरण पावतांच हंस व डिंभक गतधैर्य होऊन रणक्षेत्रावरून पळाले. हंस गोवर्धन पर्वतावर गेला व डिंभक यमूनेच्या पाण्यांत जाऊन लपला. श्रीकृष्णहि त्याचे मागोमाग यमूनेवर गेले, व त्यांनीं पाण्यांत बुडी मारून डिंभकाला पकडून जोरानें एक लाथ मारली. त्याबरोबर त्याचें शरीर शतखंड झालें. याप्रमाणें डिंभकाची व्यवस्था लावल्यावर श्रीकृष्ण यमुनेच्या बाहेर येऊन हंस राक्षसाचा शोध करण्यास निघून गेले. इतक्यांत डिंभकाचा शोध करीत हंस यमूनेच्या कांठीं आला, व बंधूचा तो शोचनीय मृत्यु बघून तो अत्यंत शोक करूं लागला. शेवटीं त्यानें त्या शोकभरांत आपली जीभ आसडून आत्महत्या करून घेतली. याप्रमाणें हंस व डिंभक यांचा शस्त्रांवांचून नाश झाला.

## २. श्रीकृष्ण ब्रह्मचारी कसे ?

३. एकदां दुर्वास ऋषि चातुर्मासांत गोमतीच्या काठीं येऊन राहिले होते. त्यांची पूजा करण्याकरितां कृष्णाच्या सोळाहजार आणि आठ स्त्रिया निरनिराळें पूजा साहित्य घेऊन निघाल्या. परंतु मार्गांत गोमती पाण्यानें तुडुंब भरून फूंफू वहात असल्यामुळें पलीकडे जाणें अशक्य होतें; म्हणून त्या सर्व कृष्णाकडे परत आल्या व आपणांस पलीकडे पोहोंचतें करण्याविषयीं त्यांनीं श्रीकृष्णाची विनंती केली. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, 'तुम्हीं सर्वजणीं गोमतीला असें सांगा कीं, जर श्रीकृष्ण ब्रह्मचारी असेल व आम्हीहि जर कुमारी व्रतस्थ असूं, तर तूं दुभंग होऊन आम्हाला मार्ग दे.' कृष्णाचें बोलणें ऐकून त्यांनां फार आश्चर्य वाटलें. परंतु त्यांनीं त्यासंबंधानें शंका न घेतां त्या तशाच गोमतीवर आल्या व गोमतीला म्हणाल्या, 'जर श्रीकृष्ण ब्रह्मचारी असेल व आम्हीहि व्रतस्थ असूं, तर तूं दुभंग हो व आम्हांला पलीकडे जाऊं दे' याप्रमाणें त्या स्त्रियांनीं गोमतीला म्हटल्याबरोबर ती दुभंग झाली. तो प्रकार पाहून सर्व स्त्रिया फार विस्मित झाल्या व पलीकडे निघून गेल्या. नंतर त्या सर्व स्त्रियांनीं दुर्वासाची यथाविधी पूजा केली, व आपआपले नैवेद्य समर्पण केले. प्रत्येकीनें पंचपक्वानांनीं भरलेलें सुवर्णाचें ताट आणलें होतें. दुर्वासानीं सर्वांची इच्छा जाणून तें सर्व अन्न खाऊन टाकलें. सोळा हजार आठ ताटांतलें पक्वान्न एकटयानें खाल्लें

पाहून त्या स्त्रियांनां मोठें आश्चर्य वाटलें. भोजन झाल्यावर त्या स्त्रियांनां दुर्वासांनीं आशीर्वाद दिला व जाण्यास परवानगी दिली. तेव्हां त्या दुर्वासाला म्हणाल्या; "ऋषि, गोमतीला पाणी फार आलेलें आहे, पलीकडे जाण्यास मार्ग नाहीं, तेव्हां आम्ही पलीकडे कसें जावें?" तेव्हां दुर्वासांनीं त्यांना,–'तुम्ही येथें कशां आलांत'–असें विचारलें. त्यांनीं घडलेली सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून दुर्वास ऋषि म्हणाले, असें असेल तर तुह्मीं गोमतीला माझा असा निरोप कळवा कीं, 'दुर्वासऋषि जर खरोखर निराहारी असेल तर तूं दुभंग हो' याप्रमाणें दुर्वासानीं सांगितल्यावर त्या स्त्रिया तेथून निघाल्या व गोमतीवर येऊन त्यांनीं गोमतीला दुर्वासाचा तो निरोप कळविला. त्याबरोबर गोमती दुभंग झाली, व सर्व स्त्रिया पलीकडे गेल्या. त्यांनां या झालेल्या प्रकाराबद्दल फारच आश्चर्य वाटूं लागलें. सोळा हजार आठ स्त्रियांबरोबर रममाण होणारा कृष्ण ब्रह्मचारी, व तितक्याच ताटांतलें अन्न खाणारा दुर्वास निराहारी, हें संभवेल तरी कसें? याचें त्यांस मोठें गूढ पडलें. एक स्त्री म्हणाली, 'काल रात्रींचीच गोष्ट. सायंकाळ होण्याबरोबर श्रीकृष्ण एखाद्या कामातुरा प्रमाणें माझ्या मंदिरांत आले. मग मी उत्तम प्रकारची शय्या तयार केली, व त्यांनां रात्रभर आपल्याच महालांत ठेवून घेतलें. कालची रात्र आम्ही उभयतांनीं किती तरी मौजेनें घालविली.' दुसरी स्त्री म्हणाली, 'बाई, तूं खोटें सांगतेस, श्रीकृष्ण तर कालरात्रीं माझ्या मंदिरांत होते. कालरात्रीं आह्मीं दोघे जण सारीपाट खेळत होतों.' तिसरी म्हणाली, 'अगदीं खोटें. तुम्हीं हीं हकीकत स्वप्नांतली सांगत असाल. कालरात्रीं तर श्रीकृष्ण माझ्या महालांत होते. रात्रीच्या भोजनापासून तों सकाळच्या मोहनभोगापर्यंत त्यांची सर्व सुश्रुषा मीच माझ्या हातानें ठेविली होती.' याप्रमाणें त्या कृष्णस्त्रिया सांगूं लागल्या. प्रत्येकीला सर्वांचें बोलणें खोटें वाटूं लागलें, व सर्वच घोंटाळ्यांत पडल्या. त्या ह्मणाल्या एक श्रीकृष्ण एकाच वेळीं सर्व स्त्रियांकडे असूं शकतील तरी कसे? तेव्हां रुक्मिणीला हंसूं आलें. ती ह्मणाली, अहो, तुह्मीं सर्व जणीं अज्ञानांत शिरून अगदीं फसत अहांत. श्रीकृष्ण भगवान प्रत्यहीं सर्वांच्या महालांत असतात हेंच खरें आहे. आणि प्रभु श्रीकृष्ण आपल्याच महालांत असतात असें नाहीं, तर यावत् विश्वांतील प्रत्येकाजवळ ते आहेत. सुष्टाजवळ सात्विक वृत्तीनें आहेत व दुष्टांजवळ तामसी वृत्तीनें आहेत. सर्व प्राणिमात्र जीं कांहीं कर्मे करीत आहेत, त्या कर्मांचें फळ देण्यासाटीं प्रभु सर्वांजवळ सर्वदां असतात, आणि ह्मणूनच प्राणिमात्राला चांगल्या कर्मांचें फळ चांगलें व वाईट कर्मांचें फळ वाईट असें तत्काल मिळतें. आपणाजवळ प्रभु सगुण स्वरूपानें एकाच वेळीं सगळीकडे राहतात यांत अशक्य असें कांहींच नाहीं. सर्वांजवळ असून ते अलिप्त आहेत ह्मणूनच ते ब्रह्मचारी आहेत. तसेंच दुर्वास ऋषि हे रुद्ररूप आहेत. ते संपूर्ण विश्वहि खाऊन टाक-

ण्यास समर्थ आहेत, तेथें आपणा सर्वांच्या अन्नाचा हिशेब काय? याप्रमाणें रुक्मिणीनें त्या सर्व स्त्रियांनां समजावून सांगून त्यांची शंका दूर केली.

वैशंपायन ऋषि जनमेजयाला ह्मणाले:—'श्रीकृष्ण सोळाहजार स्त्रियांकडे एकाच वेळीं कसे असतात याची शंका, नारदासारखा त्रिकालज्ञ त्यालाहि आली, व तो कृष्णचरित्र पाहण्यासाठीं द्वारकेंत कृष्णस्त्रियांच्या घरोघर हिंडूं लागला. तेव्हां प्रत्येक घरीं श्रीकृष्ण आहेत असें त्याला दिसून आलें. आणि श्रीकृष्ण पिंडीं, ब्रह्मांडीं सर्वत्र भरून उरलेला आहे अशी खातरी होऊन त्याची शंका दूर झाली.

## आदिपुरुषाचें विराट स्वरूप.

ऋषि ह्मणाले, 'राजा, आतां एका ब्राह्मणाचीं मुलें चोरीस जात असत ती कथा तुला सांगतों. त्या ब्राह्मणाची स्त्री प्रसूत झाल्याबरोबर मूल दिसे, परंतु इतक्यांत तें नाहींसें होत असे. या क्रमानें त्या ब्राह्मणाचीं कित्येक मुलें नाहींशीं झालीं. तेव्हां आपली सर्व हकीकत कळवून त्यानें कृष्णाचें साह्य मागितलें. कृष्णानीं ब्राह्मणाच्या गरोदर स्त्रीचें संरक्षण करण्यासाठीं अर्जुनाला त्याच्याबरोबर पाठविलें. पुढें त्या ब्राह्मणाची स्त्री यथासमयीं प्रसूत होऊन तिला मुलगा झाला; परंतु तो होतांच नाहींसा झाला. तो प्रकार बघून अर्जुन फार विस्मित झाला. मुलगा कसा नाहींसा झाला, हें त्यालाहि कळलें नाहीं. मुलगा नाहींसा झाल्यामुळें ब्राह्मण स्त्री अत्यंत शोकाकुल झाली व त्या शोकभरांत तिनें अर्जुनाचीही निर्भत्सना केली. ती म्हणाली, प्रत्येक वेळीं माझें मूल क्षणभर तरी मजजवळ रहात होतें; परंतु या पाळीला तुझ्यासारखा पातकी जवळ असल्यामुळें तें क्षणभर देखील राहिलें नाहीं. तें भाषण ऐकून अर्जुन खिन्न झाला व अशा स्थितींत जिवंत राहण्यापेक्षां मरण बरें, असा विचार करून त्यानें आत्महत्येची तयारी केली. इतक्यांत कृष्ण तेथें आले व त्यांनीं त्याचें निवारण करून ब्राह्मणांस त्याचीं मुलें परत आणून देण्याचें अश्वासन दिलें. नंतर कृष्ण, अर्जुनासह रथांत बसून उत्तरदिशेस निघाले. कांहीं मार्ग आक्रमण केल्यावर मोठाले पर्वत त्यांस आडवे आले, परंतु अर्जुनानें मोठ्या कुशलतेनें रथ हांकून तो मार्ग आक्रमण केला. पुढें महासागर आडवा आला तेव्हां अर्जुनानानें रथ उभा केला, व पुढें रथ चालणें शक्य नाहीं, असें कळविलें. तेव्हां कृष्णानें तो सर्व समुद्र गोठवून टाकला व त्यावरून रथ हांकण्यास अर्जुनाला सांगितलें. त्याप्रमाणें अर्जुनानें बर्फावरून रथ भरधांव चालविला. तो गोठलेला समुद्र संपल्यावर एक मोठा पर्वत अग्नीनें व्याप्त झालेला असा दिसला. तें विलक्षण दृश्य बघून अर्जुन आश्चर्यचकित झाला. मग कृष्णानीं अर्जुनाला रथ थांबविण्यास सांगितलें व ते दोघे रथांतून खालीं उतरून पायींपायींच त्या अग्नीपर्वतावर चालले. त्या भयंकर अग्नींत आपण कसा प्रवेश करूं, याचा अर्जुनाला प्रथम मोठा विचार पडला होता; परंतु श्रीकृष्णानीं त्याला दिव्यशक्ति दिली, तेव्हां अर्जुन कृष्णाबरोबर चालूं लागला,

मध्यवर्ती गेल्यावर–जो सर्वभूतीं असतो, जो सर्व व्यापून उरला आहे, ज्याचा आकार अनंत ब्रह्मांडाहूनही मोठा आहे, जो सूक्ष्माहूनही सूक्ष्म आहे,–असा आदिपुरुष त्यांच्या दृष्टीस पडला. त्या आदिपुरुषाला पाहून दोघांनींही साष्टांग प्रणाम केला. तो आदिपुरुष कृष्णाला म्हणाला, 'कृष्णा, अवतारकार्य आतां पूर्ण झालें आहे, तेव्हां परत येण्याचें करावें.' ती आदिपुरुषाची आज्ञा कृष्णानीं शिरसावंद्य केली, व त्यांच्याजवळ त्या ब्राह्मणाचीं मुलें परत मागितलीं. तीं त्या आदिपुरुषानं कृष्णाजवळ दिलीं. त्या मुलांना घेऊन कृष्ण व अर्जुन असे उभयतां परत आले, व तीं ब्राह्मणाचीं दहा मुलें अर्जुनानें ब्राह्मणाला नेऊन दिलीं. ज्याला ब्रह्मांडनायक म्हणतात, विश्वाची उत्पत्ति व लय ज्याच्या इच्छेनें होतो, आदिभूत सर्व व अनंत असा जो परमेश्वर, तोच तो आदिपुरुष होय. श्रीकृष्ण व बलराम हे त्या आदिपुरुषाच्या अंगावरचे रोमांकुर होत. त्या विराट पुरुषाचें वर्णन करणें अशक्य होय. सगुण ब्रह्म हें त्या आदिपुरुषाचें वस्त्र होय. त्याचें मन हाच चंद्रमा; अंतःकरण हेंच वैकुंठ, दिशा हेच त्याचे कान; वायु हीच त्याची वाचा; सूर्य हेच त्याचे चक्षु; वरुण हीच त्याची जिव्हा; अश्विनौदेव हेच त्याचे प्राण होय; वन्ही हीच त्याची वाचा होय; सुरपति हेच त्याचे हात; वामनमूर्ती हेच त्याचे तळपाय; आणि प्रजापति हें त्याचें शिष्ण होय. त्या आदिपुरुषाच्या शरीरावरील दोन रोमांकुर यापासून श्रीकृष्ण व बलराम हे उत्पन्न झाले होते.

## ४. पांच इंद्रांची कथा.

याप्रमाणें विराट स्वरूपाचें वर्णन ऐकल्यावर जनमेजय राजा म्हणाला, 'ऋषि! कृष्णअवतारामध्यें पांडवाचें प्राधान्य दिसतें. तेव्हां हे पांच पांडव व द्रौपदी ही कोण?' तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले, 'राजा, पूर्वी एकदां यमानें नैमिषारण्यांत सरस्वतीच्या कांठीं यज्ञाला प्रारंभ केला होता. त्या यज्ञ-समारंभासाठीं अमरवतीहून इंद्र हा मुद्दाम आला होता. तो एके दिवशीं सरस्वती नदीच्या कांठीं बसून रम्य शोभा पहात होता. इतक्यांत त्या पाण्यांत वरून वहात वहात एक सुवर्णकमळ आलें. तें अपूर्व सतेज असें सुवर्णकमळ पाहून इंद्राला आश्चर्य वाटलें. त्यानें तें कमळ पाण्यांतून उचलून घेतलें. त्या सुंदर कमळाविषयीं इंद्र कांहीं विचार करीत आहे, तोंच वरून दुसरें तसेंच कमळ वहात आलें. तेव्हां इंद्राला वाटलें, वरच्या बाजूला कमळांचा वृक्ष असावा व त्या वृक्षापासून हीं पाण्यांत पडत असावींत. अशी कल्पना येतांच तें झाड पहाण्याची इंद्राला इच्छा झाली व तो सरस्वतीच्या कांठाकांठानें वर चालला. मार्गानें जाताना जें कमळ वरून वहात येई तें तो आपणाजवळ घेई. असा त्याचा क्रम चालला होता. याप्रमाणें कमळें वेंचतां वेंचतां त्याच्याजवळ एक-हजार कमळें झालीं. इतक्यांत एक सर्वांगसुंदर अशी तरुण स्त्री सरस्वतीचे

कांठीं एका पाषाणावर सचिंत बसून अश्रु गाळीत आहे; व कमलापेक्षांही सुंदर अशा तिच्या नेत्रांतून जे अश्रुबिंदू सरस्वतींत पडत आहेत त्यांचीं सुवर्णकमळें उत्पन्न होऊन तीं खालीं वहात जात आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्या स्त्रीचें अनुपमेय सौंदर्य पाहून इंद्र कामातुर झाला, व तिला ह्मणाला, 'हे सौंदर्यशालिने, तुझें हें देवांनांही दुर्लभ असें सौंदर्य बघून मला पंचबाणानें अगदीं विव्हल केलें आहे. तर तूं माझा स्वीकार कर.' इंद्राचें भाषण ऐकून ती स्त्री म्हणाली; मी एका महामुनीच्या आधीन आहें. त्याच्या आज्ञेबाहेर मला कांहीं करतां येत नाहीं. मजबरोबर आपण त्या महापुरुषाकडे चला, म्हणजे त्याच्या अनुमतीनें कायतें ठरवूं. इंद्रानें त्या स्त्रीच्या म्हणण्याला तत्काल रुकार दिला, व तो तिच्या मागें मागें जाऊं लागला. अनंत योजनें मार्ग क्रमिल्यावर त्यांनां एक दिगंबरावस्थेंत असलेला महामुनी दिसला; परंतु तो या उभयतांनां पाहून आणखी लांब जाऊं लागला. इंद्र अज्ञानानें व कामानलानें व्यथित झालेला असल्यामुळें त्याला त्या महापुरुषाची ओळख पटली नाहीं. मुनी उभा रहात नाहीं, असें पाहून इंद्र संतप्त झाला व वाईट बोलूं लागला. तेव्हां तो महापुरुष स्थिर झाला, व इंद्राला एका हातानें धरून तो ह्मणाला,-'इंद्रा तूं कामातूर होऊन फार उद्धट झाला आहेस ह्मणून तुला या विवरांत टाकून देतों,' असें ह्मणून त्या महापुरुषानें इंद्राला एका खोल विवरांत ढकलून दिलें. इंद्र त्या विवरांत पडल्यावर पाहूं लागला तों, सभोंवती आपणाप्रमाणेंच चार इंद्र आहेत. त्यांचें स्वरूप व आयुधेंही सर्व आपणाप्रमाणेंच आहेत. हें पाहून इंद्र त्यांस ह्मणाला; तुह्मीं चौघे कोण आहांत व या विवरांत कसे पडलांत? तेव्हां ते ह्मणाले;-'अरे, आह्मीं चौघेही इंद्र आहोंत; इंद्रपदाचा उपभोग घेत असतांना आह्मीं व्रताचें छेदन केलें ह्मणून परब्रह्म जो आदिपुरुष त्यानें आह्मांला या विवरांत कोंडून ठेविलें आहे.'-चौघांचें तें भाषण ऐकून नवा इंद्र अत्यंत शोकाकुल झाला, व तो आदिपुरुषाची करूणा भाकूं लागला. तेव्हां आदिपुरुषाला त्याची दया आली व तो त्या इंद्राजवळ जाऊन उभा राहिला. त्या पुरुषाला पाहून सर्वांनीं त्याला वंदन केलें, व या विवरांतून आह्मांला सोडीव अशी विनंति केली. तेव्हां तो आदिपुरुष त्या पांचही इंद्राला आश्वासन देऊन ह्मणाला; "माझ्या कांहीं कार्यासाठीं मी तुह्मां सर्वांना पृथ्वीवर पाठवितों. पृथ्वीवर श्रीकृष्णानीं अवतार घेतला ह्मणजे तुह्मीही अवतार धारण करून त्याच्या आज्ञेप्रमाणें वागावें." असें ह्मणून त्या परब्रह्म पुरुषानें आपल्या उजव्या काखेंतून एक कृष्णवर्णाचा केस उपटला व तो श्रीकृष्ण म्हणून टाकला. व डाव्या काखेंतून एक श्वेत केस उपटून तो संकर्षण (बलराम) म्हणून टाकला. त्याबरोबर रोहिणी व देवकी यांनां गर्भधारण होऊन रोहिणीला बळराम झाला व देवकीला श्रीकृष्ण झाला. नंतर या पांचही इंद्रांना-यम, इंद्र, वरुण, अश्विनौदेव, व

पवन—या पांचांची शक्ति देऊन त्यांनां कुंतीच्या उदरीं जन्मास घातलें. तेच हे पांडव होत. त्या पांचांचीही इच्छा, ती सुवर्णकमळें नेत्राच्या अश्रूपासून प्रसवणारी स्त्री मिळावी अशी होती. त्याप्रमाणें त्यांनां ती स्त्री मिळेल असा आदिपुरुषानें आशिर्वाद दिला होता. ती स्त्री स्वर्गलक्ष्मी होय. ती स्वर्गलक्ष्मी कांहीं अपराधामुळें एका ब्राह्मणस्त्रीच्या उदरीं आली होती. ती तरुण होऊन जाणती झाल्यावर पतिप्राप्तीसाठीं ईश्वरसेवा करूं लागली, तेव्हां ईश्वर तिला प्रसन्न झाले. त्या आनंदभरांत तिनें ईश्वराजवळ मला कीर्तिशाली व सुंदर असा पति मिळावा, असें पांच वेळां उच्चारलें. शंकरांनीं तिला तितक्याही वेळां तथास्तु, असें म्हटलें होतें. पुढें ती ब्राह्मण स्त्री तप करीत असतांना तिनें आपला देह सोडला. मग ती द्रुपदराजाचे घरी द्वापारीं जन्मास आली. द्रुपदानें तिचें नांव द्रौपदी असें ठेविलें होतें. ती स्वयंवरांत पार्थानें जिंकली होती, पण कुंतीनें ती पांचही मुलाला स्त्री म्हणून अर्पण केली. तेव्हां द्रुपदराजाला मोठी काळजी वाटूं लागली, व लोकलज्जेलाही तो फार भिऊं लागला, परंतु व्यासानें येऊन त्याचें समाधान केलें.

## ५. देवकीस सहा मुलांची भेट.

असो, त्या आदिपुरुषाजवळून श्रीकृष्णांनीं ब्राह्मणांचीं मुलें आणून दिलीं, ही गोष्ट जेव्हां देवकीला समजली, तेव्हां देवकी कृष्णाला म्हणाली, कृष्णा, माझे सहा पुत्र असेच झाल्याबरोबर कंसानें मारून टाकले. ते जर तूं परत आणून माझे स्तनाला लावशील तर मला अत्यंत आनंद होईल. आईच्या आज्ञेप्रमाणें श्रीकृष्ण पाताळांत विष्णूकडे गेले व त्यांनीं तीं सहाहीं मुलें विष्णु जवळून मागून घेऊन देवकीला आणून दिलीं. त्या वेळीं देवकीला जो आनंद झाला त्याचें वर्णन करणें अशक्य होय. तिनें त्या मुलांनां पोटाशीं कुरवाळून धरलें, तेव्हां तिच्या स्तनाला पान्हा फुटून त्यांतून दूध वाहूं लागलें. ज्या श्रीकृष्णाच्या कृपाप्रसादानें एवढें हें कार्य झालें त्या प्रभूचे स्तुतिस्तोत्र पूर्णपणें रेखाटण्यास मानवी लेखणी अगदीं असमर्थ होय.



# कथाकल्पतरु.

## स्तबक ५ वा.

### अध्याय १ ला.

#### मंगलाचरण.

हे वक्रतुंड मूषकवाहना, हे गणनाथा, तुला मी अनन्य भावें शरण येऊन प्रेमपूर्वक वंदन करितों. हे विद्यासुंदरी सरस्वती, तुला मी साष्टांग प्रणाम करितों, तसेंच हा ग्रंथ लिहिण्यास ज्या गुरूनें मला समर्थ केलें, त्या गुरूला नमस्कार करितों. हे आद्यपुरुषा, मी या सर्वांना केलेलें वंदन तुला पावलें आहेच; कारण तूं सर्वांभूतीं असून सर्व तुझेच अंश आहेत. हे अनंता, हे लक्ष्मीरमण—कैवल्यदायी परमहंसा, हे पुरुषोत्तमा, तुझ्या कृपामृतामुळें हा माझा कल्पतरु इतका वाढीला आला आहे, तें कृपामृत असेंच सिंचनकर, ह्मणजे हा कल्पतरू सुमनोहर कथासुमनांनीं गजबजून जाईल. हे सच्चिदानंदा, तुझें स्तवन करण्यास सहस्रमुखी शेषहि असमर्थ आहे, तेथें मी यःकश्चित पामर तुझें लीलाचरित्र किती वर्णन करणार ! हे परात्पर परमेश्वरा, तूं बाह्यांतरीं परिपूर्ण असून अचेतनास चैतन्य देण्यास व अज्ञानीयांस ज्ञान देण्यास समर्थ आहेस. हे मंगलधाम आत्मारामा, तुझा अक्षय जयजयकार असो. हे पुरूषोत्तमा, हे करुणाकर भक्तवत्सल मुकुंदा, हे विश्वांकुर अजरामरा, तुझा जयजयकार असो. हे ओंकारबीज विश्वव्यापका, कैवल्यदान देण्यास तूंच एक समर्थ आहेस. हे ज्योतिर्लिंग महाभागा, महासिद्ध अभंगा, तूं या विश्वाच्या आदि असून अंतीहि आहेसच. तूं सर्वांत असून सर्वांपासून निराळा आहेस. हे शुद्धबुद्ध आदि ईश्वरा, तूं या चराचरांत असून अभेद्य असा आहेस. हे विश्वकंदनारायणा, तूं ज्ञानमूळ असून तत्व, ज्ञान, व बुद्धि यांचा विधीच आहेस. तूं सर्व देवांचा देव असून विश्वांतील सर्व प्राणिमात्र व वस्तुआदिभांडार तूंच निर्माण केलें आहेस, परंतु त्यांतील कोणतीहि उपाधि तुला नाहीं. पद्मपत्राप्रमाणें तूं या विश्वांत असून विश्वापासून निराळा आहेस. हे विश्वनाथा, तूं जीवनाला जीवन देणारा असून चैतन्याला चैतन्य देणारा आहेस. तूं मनमोक्षाचें सुमन असून, मोक्षगर्भींचें अंजन स्वरूप आहेस. हे नारायणा, हे धर्मश्रुतिप्रतिपालका, हे कृपाळु भक्तवत्सला, तुझी स्तुति किती केली तरीं ती थोडीच होणार आहे ! आकाश मोजावयाला जसें कठीण; त्याप्रमाणेंच

तुझें स्वरूप वर्णन करणें हें दुष्कर होय. परंतु पक्षी आकाशाचा अंत न कळताहि जसे आकाशांत विहार करितात, त्या प्रमाणें मी तुझें गुणानुवाद गाण्याचा प्रयत्न करीत आहे. आपल्या लहान मुलाचे बोबडे बोल ऐकून आईबापांनां जसें कौतुक वाटतें, त्या प्रमाणें या अज्ञान लेंकराची स्तुति तुला गोड वाटेल असा भरंवसा आहे. हे ज्ञानसागरा श्रोता वक्ता, गुरूशिष्य सर्व कांहीं तूंच असून तुझ्याच शक्तीनें व इच्छेनें सर्व कांहीं होत आहे. हे अनंता, तुला पुन्हा वंदन करून हें मंगलाचरण पुरें करितों, व पुढील कथेला आरंभ करितों.

---

## अध्याय २ रा.

### १. गुणवती स्त्रीचें चरित्र.

एकदां जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला ह्मणाला, "वैशंपायन महाराज, श्रीकृष्णाला सोळा हजार आणि आठ स्त्रिया होत्या, त्यांत रुक्मिणी ही मुख्य स्त्री होती. तथापि श्रीकृष्णाची विशेष प्रीति सत्यभामेवर होती असें दिसतें. कारण सत्यभामेचे जितके चोज श्रीकृष्णांनीं पुरविले, तितके कोणाचेहि पुरविले नाहींत. श्रीकृष्णाला दान देण्याचें ठरविलें, तरी श्रीकृष्णानीं तिची ती विलक्षण इच्छा बिनहरकत पुरविली. सत्यभामेवर श्रीकृष्णाचें इतकें विलक्षण प्रेम कां होतें तें आपण स्पष्ट करून सांगाल तर माझ्या मनाचें समाधान होईल. जनमेजय राजाची प्रार्थना ऐकून वैशंपायन ऋषि म्हणाले—"राजा, एके दिवशीं श्रीकृष्ण व सत्यभामा आपल्या पलंगावर बसून परम प्रीतीनें एकमेकांना तांबूल देत होते. त्यावेळीं सत्यभामा कृष्णाला ह्मणाली, हे प्रियतमा, तुझें मजवर जें अकृत्रिम प्रेम आहे, त्याबद्दल मला मोठा अभिमान वाटतो. पण हे पुरुषोतमा, मला असें आश्चर्य वाटतें कीं, जो तूं मोठ्या मोठ्या योग्यांना, मोठ्या मोठ्या तपस्व्यांना हजारों वर्षांच्या प्रयत्नानेंहि मिळत नाहींस, तो तूं मजवर इतकें प्रेम करीत आहेस, याचें कारण काय? व मी पूर्वजन्मी एवढें पुण्य तरी कोणतें संपादन केलें होतें तें ऐकण्याची इच्छा आहे. सत्यभामेची ती इच्छा पाहून श्रीकृष्ण तिला बागेंत घेऊन गेले व तेथें एकांत स्थळीं पारिजातक वृक्षाखालीं बसले; नंतर श्रीकृष्ण म्हणाले, 'तुला सर्व कथा सांगतों, ती चित्त देऊन ऐक. देवशर्मा या नांवाचा पूर्वी एक महातपोनिधी कर्मनिष्ठ व सत्वशील असा ब्राह्मण होऊन गेला. तो सूर्यवंशी असून वेदशास्त्रांदि विद्येंत पूर्ण निपुण होता. त्यानें पुत्रप्राप्तीचा फार प्रयत्न केला, पण बिचाऱ्यास पुत्र न होतां तूंच एक कन्या झालीस. तुजवर तुझ्या आईबापाची अत्यंत प्रीति होती. ते उभयतां तुझें मोठ्या प्रीतीनें लालनपालन करीत असतां तुझी आई मरण पावली. तेव्हां तुला

तुझ्या बापानेंच लहानाचें मोठें केलें. तुझें जन्मनांव मायावती असें होतें, पण तुझ्या वडिलांनीं तुझें नांव गुणवंती असें ठेविलें. तूं उपवर झाल्यावर तुझ्या पित्याला तुझ्या लग्नाचा मोठा विचार पडला. तुझ्या बापाजवळ चंद्र नांवांचा एक ब्राह्मणाचा मुलगा वेदपठण करीत होता. तो चांगला सुशिक्षित, सुशील व सुस्वरूप असल्यानें तुझ्या बापानें तुझा विवाह त्या चंद्राबरोबरच केला. पुढें कांहीं दिवसांनीं तुझा पति व तुझा पिता असे उभयतां अरण्यांत समिधा आणण्यासाठीं गेले असतानां त्या दोघांनां वनपशूंनीं मारून टाकिलें. त्यावेळीं तूं अत्यंत शोक केलास व त्या शोकभरानें तूं अगदीं वेडी झालीस. शेवटीं झालेल्या प्रकारास कांहीं इलाज नाहीं, असें जाणून तूं आपल्या मनाचें समाधान करून घेतलेंस, व पति व बाप यांची और्ध्वदैहिकक्रिया पूर्ण केलीस. पुढें तूं संसाराविषयीं अत्यंत विरक्त झालीस व आपल्या आयुष्याचें प्रत्येक क्षण ईश्वरभजनांत घालवूं लागलीस. अनेक प्रकारचीं व्रतें करावींत, अनेक दानें द्यावींत, उपवास करावेत, कार्तिकस्नान, माघस्नान, वगैरे स्नानें करावींत; तुळशी लावून त्यांची पूजाअर्चा करावी, देवांची सेवा करावी, साधुसंताची सुश्रूषा करावी; देवळांतून दिवे लावावेत, प्रातःकाळीं उठून सडासंमार्जन करावें, देवापुढें व तुळशीपुढें नानारंगाच्या सुंदर रांगोळ्या घालाव्यात; दीन व अनाथ यांना अन्न द्यावें; अतीतांचा सत्कार करावा, पृथ्वीची पूजा करावी, वृक्षांच्या छायेंत बसून भोजनें करावीं; हरिकीर्तन श्रवण करून, जागरण करावें, एकादशी, सोमवार, हीं व्रतें करावीं, याप्रमाणें तुझा सारखा क्रम चालला होता. हें सर्व तूं निष्कामबुद्धीनें करून पतिस्वरूपी ईश्वरास अर्पण करीत होतीस. हा तुझा क्रम सारखा कित्येक वर्षें चालला होता. अशा सत्कृत्यांत तूं काळ घालवीत असतां एका कार्तिक महिन्यांत तूं शीत ज्वरानें आजारी झालीस. तरी तूं आपला स्नानाचा व अन्य व्रताचा वगैरे नियम सारखा चालूच ठेविला होता; त्यामुळें तुझा ज्वर हळू हळू वाढूं लागला. आणि एके दिवशीं प्रभातकाळीं नदींत स्नान करीत असतांनाच तूं मरण पावलीस. पुण्यकर्मामुळें तुला विष्णु दूतांनीं वैकुंठांत नेलें. पुढें द्वापारयुगाला आरंभ झाल्यावर पृथ्वीवर दुष्टांचा फार प्रलय झाला, म्हणून मी पृथ्वीवर श्रीकृष्ण-स्वरूपानें अवतीर्ण झालों. त्यावेळीं तूंहि पृथ्वीवर सत्राजिताचे पोटीं आलीस. पूर्वीची जी गुणवंती ती तूंच होय. तुझा बाप सत्राजित तो पूर्वीचा देवशर्मा ब्राह्मण होय. चंद्र हा अक्रूर होय. पूर्वजन्मीं तूं आपल्या दाराशीं तुळशी लाविल्या होत्यास, म्हणून या जन्मीं तुला हा स्वर्गतरु पारिजातक मिळाला. पूर्वी तूं दीपदान दिलेंस, म्हणून या जन्मीं अत्यंत सुंदर स्वरूप पावलीस, आणि पूर्वजन्मीं प्रत्येक पुण्यकर्माचें फळ भर्तारस्वरूपीं ईश्वरास अर्पण केलेंस, म्हणून तूं या जन्मीं माझी स्त्री झालीस, तूं कार्तिक व माघस्नानें केलीस, त्याच्या

पुण्याला कशाचीहि उपमा नाहीं. त्या तुझ्या पुण्यामुळें मी तुझा जन्मोजन्मीं ऋणी झालों आहे. " या प्रमाणें सत्यभामेला श्रीकृष्ण कथा सांगत असतांनां, सूर्यास्त होऊन गेला. तेव्हां श्रीकृष्ण व सत्यभामा त्या पारिजातक वृक्षाखालून उठले व आपल्या मंदिरांत परत आले.

## २. कार्तिकमास स्नानमहात्म्य.

वैशंपायन ऋषि जन्मेजय राजाला म्हणाले, ' राजा, या कार्तिकस्नानाच्या पुण्याला कशाचीहि उपमा नाहीं. कितीहि दुराचारी मनुष्य असला, तरी तो देखील या स्नानाच्या पुण्यानें उद्धरून जातो. असा या स्नानपुण्याचा चमत्कारिक महिमा आहे. या कार्तिक स्नानाचें महात्म्य लिहिण्याला सर्व पृथ्वीचा कागद केला, तरी तोहि अपुराच होईल. हे जनमेजय राजा, पूर्वीं या कार्तिकस्नान पुण्यासंबंधानें एक चमत्कार झाला, तो तुला सांगतों. कलहा या नांवाची एक राक्षसीण अत्यंत दुष्ट, नीच व पापी होती. ती कलहा पूर्वीं ब्राह्मण स्त्री होती. व सोरट देशामध्यें ती राहत असे. तिचा पति फार सज्जन व विद्वान् ब्राह्मण होता; पण त्याला ही कलहा फार ताप देत असे. ती आपल्या पतीशीं भांडली नाहीं, अशी एक घटका देखील जात नसे. नवऱ्याला कोंड्याच्या भाकरी खावयाला घालून, आपण दुधाबरोबर रोज मांडे खात असे. पतीच्या स्नानाची कांहींच व्यवस्था न करितां, आपण मात्र दररोज इच्छापूर्ण निद्रा घेऊन उठे व अंगाला उटणीं वगैरे लावून ऊनऊन पाण्यानें स्नान करीत असे. देवधर्माला तर ती मुळींच ओळखीत नसे. चांगले चांगले पदार्थ करावेत, ते पतीला न कळवितां खाऊन टाकावे, असा तिचा क्रम होता. पतीच्या कोणत्याच कामाची ती काळजी घेत नसे. एखादे प्रसंगीं पति कांहीं बोलला, तर ती त्याच्यावर फार संताप करी व त्याला वाटेल तें बोले, आणि उलट त्याच्यावरच त्रागा करून दोन दोन चार चार दिवस ती रुसून बसे. अशा वेळीं तिच्या पतीला तिची समजूत करितां करितां पुरेसें होत असे. घरीं कोणी पाहुणा आल्यास पोट दुखण्याचें किंवा कपाळ दुखण्याचें निमित्त करून आंथरुणावर स्वस्थपणें जाऊन निजे. आप्त–इष्ट, शेजारी–पाजारी सर्वांबरोबर तिचें वर्तन उद्धट असे. क्षुल्लक कारणावरूनसुद्धां ती कटु शब्दानें सर्वांचें मन दुखवीत असे. पतीचा तर ती क्षणोक्षणीं अपमान करीत असे. अशा त्या कजाग पत्नीच्या सहवासांत दिवस काढतां काढतां तो ब्राह्मण अगदीं कंटाळून गेला व त्याला तो संसार, ती स्त्री व तें कष्टकारक जिणें नकोसें झालें. तो जरी अत्यंत शांत स्वभावाचा व सहनशील होता, तरी त्या कजाग स्त्रीच्या सहवासानें हताश होऊन तो तिला म्हणाला, ' तुझ्या या त्रासदायक सहवासामुळें मला माझा जीव अगदीं नकोसा झाला आहे. आत्महत्या करावी असें क्षणोक्षणीं मनांत येतें; परंतु आत्महत्या करणें हें पाप असल्यामुळें तसें करण्यास धैर्य होत नाहीं, बरें जिवंत राहून पितृऋणांतून

मुक्त होण्यासाठीं दुसरें लग्न करून गृहस्थाश्रमधर्मानें वागेन म्हणावें तर तुझ्या भीतीनें तसें करण्यासही धैर्य होत नाहीं.' पतीचें हें भाषण ऐकून ती ब्राह्मणी अत्यंत संतप्त झाली, व त्या राक्षसिणीनें रागाच्या भरांत आपल्या पूज्य पतीस अद्वातद्वा शब्दांनीं ताडन करून स्वत: एका विहिरींत जाऊन जीव दिला. याप्रमाणें पतीछळाचें पातक शिरावर घेऊन आत्महत्या करून ती ब्राह्मणाची स्त्री मृत झाल्यावर तिला यमदूतांनीं नर्कलोकीं नेलें. तेथें त्यांनीं तिचे अत्यंत हाल केले, व एक हजार वर्षेपर्यंत तिला नर्कांत ठेविलें. एक हजार वर्षेपर्यंत ह्या पतिद्रोही स्त्रीनें नर्कलोकीं अनेक असह्य यातना भोगिल्यानंतर यमदूतांनीं तिला पृथ्वीवर निरनिराळ्या नीच योनींमध्यें जन्म घेण्यासाठीं ढकलून दिलें. कीडा, मुंगी, अळी, असे निरनिराळे जन्म घेत घेत ती वटवाघूळाचे जन्मास आली; आणि खालीं डोकें वर पाय अशा उलट्या अवस्थेंत तिनें कित्येक वर्षें काढिलीं. ती वाघुळीच्या जन्मांत असतां तिची विष्ठा तिच्याच मुखांत पडूं लागली. या जन्मानंतर तिला मांजरीचा जन्म मिळाला. मनुष्यजन्मांत तिनें सर्वांबरोबर कलह करून सर्वांना दु:ख दिलें, म्हणून दुसरीं मांजरें तिच्याशीं नित्य भांडत व तिला आपल्या नखांनीं ओरबाडित व तिचे हाल हाल करीत. या जन्मांत कित्येक वर्षें घालविल्यानंतर तिला डुकरीचा जन्म प्राप्त झाला. पतीला कदान्न घालून आपण मिष्टान्न खाल्लें म्हणून त्या अवस्थेंत असतांना तिला गांवाभोंवतालच्या घाण पाण्यावांचून कांहींच खायाला मिळेना, त्यामुळें विष्ठा मूत्र खाऊन तिला तो जन्म पुरा करावा लागला. नंतर तिला राक्षसिणीचा जन्म मिळाला. ती ब्राह्मण स्त्री मारवाड देशांत राक्षसिणीच्या जन्मास आल्यानंतर अन्नपाण्यावांचून तळमळत पंधरा वर्षें रानोरान भटकत असतां एकदां संधि साधून तिनें एका मारवाड्याच्या शरीरांत प्रवेश केला. राक्षिसिणीचा प्रवेश शरीरांत होतांच तो वैश्य अनाचारी झाला, व नानाप्रकारचे वेडेचार करूं लागला; तेव्हां त्याच्या आप्तांनीं त्याला कृष्णा व वेणी या नद्यांचे संगमावर आणून त्याला स्नान घातलें. त्याबरोबर विष्णुदूतांनीं त्या निशाचरीला वैश्याच्या शरीरांतून बाहेर काढलें व लांब पिटाळून दिलें. तेव्हां ती चांडाळ राक्षसी तशीच उत्तरेच्या मार्गानें कावेरी पट्टण येथें आली. या कावेरी–पट्टणास धर्मदत्त या नांवाचा एक विद्यासंपन्न विद्वान् व सत्शील असा ब्राह्मण राहत होता. तो ब्राह्मण अत्यंत उदार, पुण्यशील व विष्णुभक्त होता. त्याचा कार्तिक स्नानाचा नियम होता. प्रत्यहीं प्रभातकाळीं उठून सूर्योदयापूर्वीं स्नान करून विष्णूची पूजा करावी, असा त्याचा कित्येक वर्षें सारखा क्रम चालला होता. त्या ब्राह्मणाला दोन स्त्रिया होत्या, व त्याहि आपल्या पतीप्रमाणेंच सुशील व पवित्र होत्या. पति आणि देव यांस समान मानून त्या पतीची सेवा मनोभावानें करीत असत. एके दिवशीं तो ब्राह्मण कार्तिक महिन्यांत सकाळीं स्नान करून शंकराची व विष्णूची पूजा करण्यास

जात असतां वाटेंत त्याला ती निशाचरी आडवी झाली. त्या राक्षसिणीचा तो विशाल देह, ते भयंकर दांत, तो मोठा थोरला जबडा, असें भयंकर स्वरूप पाहून त्या दुष्टेचा आपणास विटाळ होऊं नये; म्हणून तो सत्वस्थ ब्राह्मण घाईनें बाजूस सरला. त्याबरोबर त्याच्या हातांतल्या कळशींतून थोडें उदक त्या राक्षसिणीच्या अंगावर उडालें ते पवित्र उदक त्या पवित्र ब्राह्मणाच्या हांतून तिच्या अंगावर पडतांच तिला मागील जन्मांचीं स्मृति झाली; व त्याबरोबर तिच्या हृदयांत प्रकाश पडून तिला फार पश्चात्ताप झाला. ती आपल्या मनाशी ह्मणाली, अरेरे! कोण मी हे कष्ट भोगीत आहे? मी पूर्वी ब्राह्मण स्त्री असतां पतीला त्रास दिल्यामुळें नाना प्रकारच्या योनींत जन्म घेऊन असह्य यातना भोगिल्या, आणि आत्महत्येच्या पातकामुळें शेवटीं राक्षसीण झालें! अशाप्रकारें मनांत उपरती होताच त्या राक्षसिणीच्या स्वरूपांत बदल झाला. ती शांत व संचित झालेली पाहून तो ब्राह्मण म्हणाला,—'अगे राक्षसिणी, तूं येथें कोणत्या हेतूनें आलीस आणि कशाचा विचार करीत बसली आहेस?' ब्राह्मणाचा प्रश्न ऐकून त्या कलहा राक्षसिणीनें आपला मागील सर्व वृत्तांत त्या ब्राह्मणास सांगितला व हात जोडून ती त्या ब्राह्मणाला म्हणाली,–हे द्विजवरा, तुझ्या कळशींतील किंचित उदक माझ्या अंगावर पडल्यानें मला पूर्व जन्माची स्मृति झालीं व पूर्व जन्मी मी जीं निंद्य कृत्यें केलीं होतीं त्या संबंधानें मला पूर्ण पश्चात्ताप वाटूं लागला. महाराज यावरून आपण फार पुण्यवान दिसता, तेव्हां मज पापिणीवर अनुग्रह करून माझा उद्धार करण्यास आपण समर्थ आहां असें मला वाटतें.–पूर्ण पश्चात्तापयुक्त त्या राक्षिसिणीची ती दीन वाणी ऐकून त्या ब्राह्मणाला तिची दया आली, व त्यानें तिला आपल्या कार्तिक स्नानाचें अर्धें पुण्य अर्पण केलें. अर्ध्यापुण्याचें उदक हातांवर पडतांच ती राक्षसीण दिव्यांगना झाली. व तिला नेण्यासाठीं वैकुंठांतून पुष्पक विमान आलें. विमानांतील विष्णुदूत त्या ब्राह्मणाला म्हणाले; अरे धर्मदत्ता, या महापातकी स्त्रीचा कधींहि उद्धार झाला नसता, परंतु केवळ तूं कार्तिक स्नानाचें अर्धे पुण्य हिला दिलेंस म्हणून हिचा उद्धार झाला. तूं हें परोपकाराचें कृत्य केलेंस म्हणून तुझें कार्तिक स्नानाचें पुण्य कमी न होतां उलट शंभरपट वाढेल. या कार्तिक स्नानाच्या पुण्याला कसलीहि उपमा नाहीं. तुझ्या या पुण्यामुळें श्रीहरी तुझें अत्यंत ऋणि झालेले आहेत. आणि म्हणून ते पुढील जन्मीं तुझ्या स्त्रीच्या उदरीं जन्म घेतील. तूं दशरथ राजा होशील, व तुझ्या दोन्ही स्त्रिया, कौसल्या आणि सुमित्रा होतील आणि ही स्त्री तुझी कैकेई या नांवाची स्त्री होईल. असें सांगून ते विष्णुदूत त्या ब्राह्मणस्त्रीला विमानांत बसवून घेऊन गेले.

---

# अध्याय ३ रा.

## १. विष्णुदूत व अवदशा यांची कथा.

जे दोन विष्णुदूत कलहाराक्षसिणीला नेण्यासाठीं पुष्पक विमान घेऊन आले होते, त्या विष्णु दुतांनीं पुढील भविष्य वर्तविल्यावर धर्मदत्त ब्राह्मणाला त्यांच्या विषयीं मोटी पूज्यता वाटली व तो त्यांना म्हणाला, 'अहो विष्णु दूतहो, तुम्ही पुढील भविष्य जाणलेंत व तुम्हीं विष्णुचे दूत झालां आहांत, या वरून तुम्हां दोघांचीहि पुण्यसामग्री मोठी विलक्षण दिसते. तर तुम्हीं पूर्वजन्मीं कोण होतां, व कोणत्या पुण्यामुळें तुम्हाला विष्णुभूवन लाभलें, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे, तर मजवर कृपा करावी व मला तेवढी तुम्हां उभयतांची हकीकत कळवावी.' ब्राह्मणाची इच्छा जाणून ते पुष्पकविमानवाहक विष्णु-दूत त्या धर्मदत्त ब्राह्मणाला आपली पूर्व जन्मीची हकीकत सांगू लागले. त्यांच्या पैकीं एक विष्णुदूत म्हणाला,—"हे ब्राह्मणा, मी पूर्वीं कांतो नगरींत 'चोल' या नांवाचा सार्वभौम राजा होतों. माझ्या राज्यांत ताम्रपर्णी नदीच्याकांठीं एक विष्णु मंदीर होतें. तेथें जाऊन मी प्रत्यहीं प्रभातकाळीं स्नान करून विष्णूची पूजा करीत असे; व पूजेच्या वेळीं मी विष्णुला फुलांच्या ऐवजीं उत्तम उत्तम रत्नें वहात असे. एके दिवशीं मी विष्णूची पूजा करून त्या मंदिरांतून निघून गेल्यावर माझ्या पश्चात हा दुसरा विष्णुदूत ज्याचें नांव त्यावेळीं विष्णुदास ब्राह्मण असें होतें, तो त्या विष्णुमंदिरांत आला व त्यानें विष्णूची पुजा करून विष्णूवर पुष्कळ तुळशी व फुलें वाहिलीं. त्यामुळें मीं वाहिलेलीं रत्नें झांकून गेलीं. सायंकाळच्यावेळीं मी पुन्हा विष्णु मंदीरांत विष्णूच्या दर्शनासाठीं गेलों तेव्हां ती गोष्ट माझ्या लक्षांत आली. तो प्रकार पाहून मला फार वाईट वाटलें, व ज्यानें आपल्या फुलातुळशींनीं माझी रत्नें झांकून टाकिलीं त्याचा मला साहजिक राग आला. हा विष्णुशर्मा ब्राह्मण रोज या प्रमाणें माझ्या मागून येऊन माझी रत्नपूजा तुळशीनें झांकून टाकतो, असें मला समजल्यावर मी एके दिवशीं विष्णुमंदिरांत हा विष्णुदास येईपर्यंत थांबलों. रोजच्या नियमाप्रमाणें हा मंदिरांत आला व यानें देवावर पुष्कळ फुलें व तुळशी वाहून माझीं रत्नें झांकून टाकिलीं, तेव्हां मी या ब्राह्मणावर रागावलों व त्याला म्हणालों-'अरे, रत्नानें देवाची पूजा केली असतां त्यावर तूं तुळशीचा भार टाकतोस ही अशी तुझी पूजा तरी कोठली,? ईश्वराची भक्ति कशी करावयाची, देवाला प्रिय काय, अप्रिय काय, याचा कांहींएक विचार न करितां हा झाडाचा पाला वाटेल तितका आणलास व त्याचा भार विष्णूवर टाकलास हें तुझें करणें गैर आहे. तूं ब्राह्मण आहेस म्हणून तुला या अपराधाची क्षमा केली आहे, नाहीं तर तुला चांगलीच शिक्षा केली असती.".

माझें भाषण ऐकून हा विष्णुदास म्हणाला,—"हे राजा, देवाला माझ्या तुळशी आणि तुझीं रत्नें हीं सारखींच आहेत, देव रत्न किंवा झाडाचा पाला याला ओळखीत नसून तो फक्त भावाचा भुकेला आहे. ईश्वर जर रत्नांनीं किंवा तुळशींनीं प्राप्त होता तर तो पुष्कळांनां सहज प्राप्त करून घेतां आला असता. राव आणि रंक हे दोघे देवाला सारखेच असून रत्नें व तुळशीहि सारखींच आहेत. गंगेचें महात्म्य ती सागराला जाऊन मिळाली नाहीं तों पर्यंत. तसेंच अलंकाराचा निराळेपणा ते मुशींत घातले नाहींत तों पर्यंत. त्याप्रमाणें हीं रत्नें किंवा ह्या तुळशी हा भेदभाव तुम्हां आम्हांला आहे. देवाला त्याची मुळींच किंमत नाहीं. त्याला फक्त भक्तीची आवश्यकता आहे. देवाला रत्नें वाहणें ही तर दांभिक भक्ति होय. तुळशी वाहून विष्णूची पूजा करणें हीच खरी पूजा होय. लोकांत आपली कीर्ति व्हावी या उद्देशानें तूं देवाला रत्नें वहात आहेस. खऱ्या भक्तीचा लवलेश तुझ्या जवळ नाहीं." ह्या विष्णुदासाचें असें भाषण ऐकून त्याचा मला अधिक राग आला व मी ह्याला म्हणालों:—

"अरे तुझीच भक्ति मला खोटी दिसते. रत्न आणि गारगोटी यांतील भेद ज्याला ओळखतां येत नाहीं, त्याला खरी भक्ति कोणती हें तरी कसें ओळखतां येणार ? रत्न आणि तुळस, कर्दळी आणि चंदन, माती आणि सोनें, हीं कोठें सारखींच असतात काय? हे ब्राह्मणा तूं अगदींच मंदबुद्धि दिसतोस. तुला देवाची सेवा कशी करावयाची हे मुळींच माहित नाहीं. या चमत्कारिक विचारानें तूं अधोगतीला मात्र जाशील. असो. आज पासून तूं या मंदिरांत येऊन माझी रत्नपूजा झांकीत जाऊं नकोस आणि हें माझें न ऐकतां तूं जर माझी आज्ञा मोडलीस तर मी तुला चांगली शिक्षा करीन."

या प्रमाणें मी या विष्णु शर्माला ह्मणाल्यावर हा माझी भक्ति खोटी आहे, असें म्हणूं लागला व मी याची भक्ति खोटी आहे असें म्हणूं लागलों. शेवटी आह्मी दोघे भांडतां भांडतां पैजेवर आलों, व आपल्या भक्तीनें विष्णुला कोण अगोदर प्रसन्न करतो तें पहावयाचें ठरलें. असें आमचें ठरल्यावर आह्मीं दोघेहि आमच्या समजुतीप्रमाणें विष्णूची सेवा करूं लागलों. मजजवळ मुद्गल या नांवाचा माझा कुलगुरु होता. त्याला मी झालेली सर्व हकिकत सांगून विष्णूची प्राप्ती लवकर कशानें होईल तें विचारिलें. त्यानें विष्णुछत्रयाग करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें मी विष्णुछत्रयागाची तयारी केली, व पुष्कळ विद्वान ब्राह्मण बोलावून त्यांच्याकडून होमहवनास आरंभ केला. मी आपल्या पूर्वींच्या नियमाप्रमाणें रत्नांनीं विष्णूची पूजा करीत होतों, व ब्राह्मण वगैरे जो कोणी येईल त्याला पंचपक्वान्नाचें भोजन घालीत होतों. इकडे माझा असा क्रम चालला होता त्याचवेळीं एकादशीं, सोमवार, वगैरे व्रतें करण्याचा व पूर्वीप्रमाणें तुळशीं पत्रांनीं विष्णूची पूजा करण्याचा नियम या विष्णुदत्ताचा चालला होता. द्वाद-

शीचें पारणें तो अगदीं व्रतस्थ राहून सोडीत असे. याप्रमाणें हा अत्यंत भक्ति-भावानें विष्णूची सेवा करीत असतां, त्याची भक्ति कितपत खरी आहे हें पाहण्याचें विष्णूनीं मनांत आणलें, व ते स्वत: एके द्वादशीला भिकाऱ्याचा वेश धारण करून ब्राह्मणाचे घरीं आले. त्या दिवशी या विष्णुदास ब्राह्मणानें आपल्या शक्तीप्रमाणें स्वयंपाक तयार करून विष्णूला नैवेद्य समर्पण करण्याची तयारी केली होती; परंतु इतक्यांत विष्णुरूपी त्या भिकाऱ्यानें त्या ब्राह्मणाची नजर चुकवून तें सर्व अन्न खाऊन टाकलें. नैवेद्य समर्पण करण्याचे वेळीं विष्णुदास ताटाकडे पाहतों, तों ताटांत अन्नाचें एक शीत देखील नाहीं. तो प्रकार पाहून विष्णुदास अत्यंत आश्चर्यचकित झाला व आज श्रीहरीला नैवेद्य समर्पण होत नाहीं, हें पाहून त्याला फार वाईट वाटलें. जर श्रीहरीला नैवेद्य नाहीं तर आज आपणहि अन्न ग्रहण करावयाचें नाहीं, असा विष्णुदासानें निश्चय केला, व तो दिवस यानें उपाशी राहून श्रीहरीच्या भजनांत घालविला. नंतर दुसरे दिवशीं स्नानसंध्या झाल्यावर त्यानें पुन्हां स्वयंपाक तयार केला व नैवेद्य समर्पण करण्याची तयारी केली. तों त्या दिवशींहि भिकाऱ्यानें विष्णुदासाची नजर चुकवून नैवेद्य खाऊन टाकला. तो प्रकार पाहून विष्णुदासाला पुन्हा फार वाईट वाटलें, व त्यानें त्या दिवशींहि लंघन करून श्रीहरीच्या भजनांत दिवस घालविला. याप्रमाणें सात दिवस झालें. विष्णुदास नैवेद्य तयार करी व देव भिकाऱ्याच्या वेशानें येऊन त्याला नकळत तो खाऊन टाकी. सतत सात दिवसांत विष्णूस नैवेद्य समर्पण करण्याचा योग न आल्यामुळें विष्णुदासाला त्या संबंधानें फार वाईट वाटूं लागलें. मी अत्यंत पातकी आहे म्हणून देवाला नैवेद्य समर्पण करण्याचा योग मला येत नाहीं अशी त्याच्या मनाची समजूत झाली. व त्यानें आठव्या दिवशीं पुन्हा नैवेद्याची तयारी मोठ्या काळजीकाळ्यानें केली व तूप आणण्यासाठीं तो जरा बाजूला झाला. इतक्यांत विष्णुरूपी भिकारी तेथें आला, व त्या ताटांतील अन्न आतां खाणार इतक्यांत विष्णुदास तेथें आला. विष्णुदास तेथें येण्याबरोबर भिखारी तें अन्नाचें ताट घेऊन तेथून पळूं लागला. तेव्हां त्या अन्नावर तूप घातलेलें नाहीं, आणि हा भिखारी तें अन्न तसेंच खाईल, ह्मणून विष्णुदास त्याच्या मागें तुपाची वाटी घेऊन धावूं लागला; व ह्मणूं लागला:—'अरे बाबा, उभा रहा. त्या अन्नावर तूप घालूं दे, आणि मग तें खा.' पण तो भिकारी एकसारखा पळत होता. शेवटीं एका खाचाडांत त्या भिकाऱ्याचा पाय मुरगळून तो पडला. त्या भिकाऱ्याची ती शोचनीय स्थिति बघून विष्णुदासाला फार वाईट वाटलें व आपण याच्या मागें लागलों नसतों तर या बिचाऱ्यानें हें एवढें अन्न तरी खाल्लें असतें, असें वाटून तो तरमळूं लागला. त्यानें त्याच्या पायाची जखम बांधली, थोडें पाणी त्याच्या तोंडांत घातलें व तो वारा घालीत बसला. विष्णु-

दासाची ती सहिष्णुता पाहून भगवंतास आपल्या भक्ताची अत्यंत धन्यता वाटली. त्यांनीं तो भिकाऱ्याचा वेश टाकून दिला व ते पूर्ण स्वरूपानें विष्णुदासापुढें उभे राहिले. ती शंख-चक्र-गदा-पद्म-धारी भगवंताची सुंदर शामळ चतुर्भूज मूर्ति पाहून विष्णुदासाला मोठा आनंद झाला. मग हा विष्णुदास भगवंताच्या चरणावर अनन्यभावानें मस्तक ठेवून ह्मणाला; 'हे कृपानिधे नारायणा, या पामराचा नैवेद्य तूं तुपावांचून भक्षण केलास याबद्दल फार खेद वाटतो. या दीनाची भाजीभाकर, देवा तुला इतकी आवडली हे माझे महत्भाग्य होय. हे अनंता, आतां या दासाला तुझ्या चरणापासून दूर करूं नकोस.' विष्णुदासाची प्रार्थना भगवंतांनीं मोठ्या संतोषानें मान्य केली, व आपल्या भक्ताला विमानांत बसवून श्रीहरि वैकुंठधामाला निघून गेले.

ही कथा सांगून तो विष्णुदूत धर्मदत्त ब्राह्मणाला म्हणाला, "हे धर्मदत्ता याप्रमाणें हा विष्णुदास वैकुंठी गेल्याचें वर्तमान मला समजलें तेव्हां माझ्या रत्नांपेक्षां तुळशीदलें विष्णूला अधिक प्रिय आहेत अशाबद्दल माझी पूर्ण खातरी झाली. माझ्यापेक्षां विष्णुदत्ताचा देवावर विश्वास अधिक, त्याचा भाव अधिक, विष्णुचरणावर त्याचें लक्ष अधिक, ह्मणूनच श्रीहरी त्याला अगोदर प्रसन्न झाले. विष्णुची सेवा कशी करावी हे मला कळत नाहीं, आज्ञानांत पडून मी श्रीमंतीचा डौल घातला, याबद्दल मला फार अनुताप होऊं लागला. लोक आतां माझी निंदा करतील याची मला फार लाज वाटूं लागली, आणि अशा अपमानित स्थितींत राहण्यापेक्षां मरण बरें, असें मला वाटूं लागलें. मग मी विष्णुस्मरण करीत होमकुंडाजवळ गेलों, व श्रीहरीच्या नामाचा गजर करून त्या प्रखर अग्नीनें प्रज्वलित झालेल्या होमकुंडांत उडी टाकिली. माझा कुलगुरु मुद्गल त्यावेळीं जवळच होता. मी उडी टाकीत आहे असें पाहतांच तो धावून आला व त्यानें माझी शेंडी धरली. माझ्या उडीचा वेग जोराचा असल्यामुळें माझी शेंडी त्या मुद्गलाचे हातीं आली व मी खालीं अग्निकुंडांत पडलों. तेव्हां मुद्गलानें शेंडीहि कुंडांत टाकून दिली. याप्रमाणें मी अग्निकुंडांत पडल्यावर एक क्षणही लोटला नाहीं तों भगवान श्रीहरि तेथें प्रकट झाले, व त्यांनीं मला आपल्या अंकावर घेतलें. प्रभूंनीं मला प्रेमालिंगन दिलें व तूं माझा खरा भक्त आहेस, अशी माझी प्रशंसा केली. मग लागलीच विष्णुदूत पुष्पक विमान घेऊन आले, व त्यांत मला बसवून वैकुंठांत घेऊन गेले. हे धर्मदत्ता आह्मां उभयतांचा असा हा वृतांत तुला संक्षेपानें कथन केला आहे." असें सांगून ते दोघे विष्णुदूत कलहा राक्षसिणीला घेऊन तेथून वैकुंठास निघून गेले.

वैशंपायनऋषि जनमेजय राजाला सांगतात, 'हे जनमेजयराजा! याप्रमाणें या विष्णुभक्तीचा महीमा आहे. कार्तिक महिन्यांत जो प्रभातकाळीं गंगेवर जाऊन स्नान करील त्याच्या पुण्याला सीमा नाहीं. या महिन्यांत जो स्नान

करून विष्णूची तुळशीपत्रानें पूजा करितो त्याच्या पुण्याची महती ब्रह्मदेवाला-देखील कळत नाहीं. एकादशीचे दिवशीं जो रात्रीं जागरण करून श्रीहरीचें भजन करतो, त्याला शत यागाचें पुण्य लाभतें. जो श्रीहरीचें भजन, कीर्तन, व नामस्मरण यांत तल्लीन असतो व अहर्निश भगवंताची कथा श्रवण व मनन करण्यांत काळ घालवितो, तो निश्चयेंकरून अंतसमयीं वैकुंठास जातो. जो देवा-जवळ दिवा लावतो, देवापुढें वीणा वाजवून कीर्तन करतो, जो कार्तिक महि-न्यामध्यें हरिहरांची पूजा करतो, अनाथांना अन्न देतो, त्याच्या पुण्याला गणती नाहीं. हरिहराच्या मूर्ति न मिळाल्या तर वड, पिंपळ व पळस या तीन वृक्षांची पूजा करावी, त्यांच्याजवळ कीर्तन करावें, त्यांचें अर्चन करावें, म्हणजे अनंत पातकाचा नाश होऊन विपूल पुण्याचा सहज संग्रह होतो." वैशंपायनऋषीचें भाषण ऐकून जनमेजय राजा म्हणाला; ऋषि, आपण सांगितलेल्या वृक्षांच्या ठिकाणीं देवांचा वास असतो, हें ऐकून मला फार आश्चर्य वाटतें. तर कृपा करून मला ती कथा सांगावी. याप्रमाणें जनमेजय राजानें इच्छा दर्शविल्यावर वैशंपायनऋषि राजाला ती कथा सांगू लागले.

## २. उद्दालिकऋषिबरोबर अवदशेचा विवाह.

वैशंपायनऋषि ह्मणाले:-"राजा जनमेजया, पूर्वी शंकर आणि पार्वती एकदां आपल्या उपवनांत एकांत-सुखाचा अनुभव घेत असतां तेथें एकएकी देवा-कडून कांहीं कामासाठीं अग्नि आला. अग्नीला पाहतांच अर्थातच संभोग-कार्य तसेंच राहिलें. महादेवाला त्यासंबंधानें कांहीं वाटलें नाहीं, परंतु पार्वतीला त्या वेळीं अग्नीचा व सर्व देवांचा व त्याबरोबरच महादेवाचाही फार राग आला व तिनें सर्वांना, ज्या अवस्थेंत काम-सुखाचा अनुभव मिळत नाहीं, अशा उद्भिज अवस्थेंत तुम्हीं जन्म धारण कराल, म्हणून शाप दिला. हा आदिमाया पार्व-तीचा शाप ऐकून सर्व देव चिंतातूर झाले व तिची प्रार्थना करून तिला म्हणाले; 'हे आदिमाये! आम्हीं सर्व वनस्पती झाल्यास अनेक देवकार्यें राहतील व त्यामुळें सृष्टीच्या घटनेंत मोठा घोटाळा होऊन जाईल; तर आम्हाला तूं उःशाप दे' तेव्हां पार्वती म्हणाली; 'माझा शाप भोगल्यावांचून तुम्हांस सुटका नाहीं. ह्मणून तुम्हीं निदान अंशरूपानें तरी वृक्षांत वास करावा.' पार्वतीच्या आज्ञेप्रमाणें सर्व देव तेव्हांपासून अंशानें वृक्षांत राहिले. वटवृक्षाचे ठिकाणीं शंकरांनीं वास केला, पिंपळाचे वृक्षांत विष्णूनीं वास केला, ब्रह्मदेवानें पळसाचे वृक्षांत वास केला, इंद्रानें आंब्याचे वृक्षांत वास केला, व निंबाचे वृक्षांत लक्ष्मीनें वास केला. या-प्रमाणें अनेक देवांनीं अनेक वृक्षांत वास केला व म्हणूनच या वृक्षांनां ईश्वरा-प्रमाणें पवित्र मानतात व भाविक लोक त्यांची भक्तिभावानें पूजा-अर्चा करि-तात." याप्रमाणें वैशंपायन कथा सांगत असतांना जनमेजय राजा मध्येंच म्हणाला, "ऋषि, पिंपळाचे वृक्षांत जर विष्णूचा वास आहे, तर त्या वृक्षाला

अपवित्र कां मानतात ? " राजाची शंका श्रवण करून वैशंपायनऋषि म्हणाले; " राजा, ज्यावेळीं समुद्रमंथन करून चौदा रत्नें निघालीं त्या वेळीं लक्ष्मी कोणाला अर्पण करावी असा सर्वांना विचार पडला. मग सर्वांनीं असें ठरविलें कीं, लक्ष्मी विष्णूला अर्पण करावयाची. ती गोष्ट लक्ष्मीनेंहि कबूल केली. परंतु ती विष्णूला म्हणाली; कीं, माझी वडील बहीण अवदशा या नांवाची आहे, तिचें लग्न झाल्यावांचून मी आपल्या गळ्यांत गळसरी बांधणार नाहीं, असा माझा निश्चय आहे. तेव्हां तिला अगोदर कोणा योग्य पतीच्या स्वाधीन करा, आणि नंतर मजबरोबर आपण विवाह करा. लक्ष्मीनें असें सांगितल्यावर विष्णूनीं त्या अवदशेला बोलावून आणलें व तिला बरोबर घेऊन तिच्या योग्य पतीचा ते शोध करीत चालले. परंतु त्या अवदशेचा स्वीकार करण्यास कोणीहि कबूल होईना. मग विष्णु उद्दालकऋषीकडे गेले व त्याची प्रार्थना करून म्हणाले;—'अरे उद्दालका ! तुझ्याकरितां योग्य अशी ही नवरी मी आणिली आहे, तर आतां ब्रह्मचर्याश्रम पुरा करून या स्त्रीबरोबर तूं लग्न कर, व गृहस्थाश्रमी हो. ही लक्ष्मीची वडील बहीण असून फार सुंदर आहे. मी तिला तुझ्यासाठीं मुद्दाम सालंकृत करून आणलें आहे.' त्या वेळीं उद्दालकऋषीला गृहस्थाश्रम म्हणजे केवळ स्वर्ग–सुख असें वाटलें, व तो बिचारा भोळा उद्दालक त्या अवदशेबरोबर लग्न करण्यास तयार झाला. त्यानें आपल्या ब्रह्मचर्याश्रमाला लागलीच तिलांजली दिली व अवदशेबरोबर लग्न करून तो गृहस्थाश्रमी झाला. अवदशेचा विवाह झाल्यावर लक्ष्मीचा व विष्णूचा विवाह झाला, व विष्णु लक्ष्मीला घेऊन क्षीर-सागरीं निघून गेले. इकडे उद्दालकहि आपणाबरोबर अवदशेला घेऊन आपल्या आश्रमांत आला. तेथें अन्य ऋषींच्या स्त्रिया होत्या; त्या ह्या अवदशाबाईला पाहून आश्चर्यचकित झाल्या. ज्या स्त्रिया धीट होत्या त्यांना तें विलक्षण रूप पाहून हंसूं आलें, व ज्या धीट नव्हत्या त्यांना त्या अवदशेची भीति वाटूं लागली. तिचे स्तन ऊर्ध्व असून ते तिच्या कंठाला लागत होते. डोळे भोकराप्रमाणें बटबटीत, ओठ बाबराप्रमाणें जाड, कपाळ अरुंद, दांत नांगराच्या फाळाप्रमाणें पुढें आलेले व पोट घागरीप्रमाणें विशाळ; अशी ती अवदशेची मूर्ति होती. तिच्या कपाळावर कुंकुम चिन्ह तर मुळींच नव्हतें. सौभाग्यलंकाराची तिला विशेष पूज्यता वाटत नव्हती. ती त्या आश्रमांत आली तेव्हां सकाळची वेळ होती. त्या वेळीं कित्येक स्त्रिया सडासंमार्जन करीत होत्या, कित्येक तुळशीची पूजा करून प्रदक्षणा घालीत होत्या, कित्येक पतीला आश्रमधर्माची सामुग्री देत होत्या, कित्येक ऋषि होम हवन करीत होते, कित्येक स्नानसंध्या जपतप करीत होते, व कित्येक वेदघोष करीत होते. अशी ती प्रभुभक्तीची रम्य वेळा असल्यानें तो आश्रम विशेष रमणीय बनला होता, व तो पाहून कोणासहि समाधान झालें असतें. पण त्या अवदशेला तो प्रकार पाहून तिरस्कार उत्पन्न झाला. तिनें

कपाळाला सत्रा आंठ्या घातल्या व ती त्रासिक स्वरानें आपल्या पतीला म्हणाली: अहो, ही कोण कटकट या आश्रमांत आहे? या ऋषींनीं आपल्या मंत्रगर्जनेनें जणुंकाय बाजारच भरविला आहे. तशाच या स्त्रियाहि हा काय रिकामा उद्योग करीत बसल्या आहेत? असलें हें मूर्ख माणसांनीं गजबजलेलें स्थान मला बिलकुल आवडत नाहीं. चला, आपण अन्य एकांत स्थलीं जाऊन राहूं, आणि तेथें आनंदानें संसार करूं. बिचाऱ्या उद्दालकऋषीला त्या अवदशेचा अनुभव नसल्यामुळें तो तिच्या म्हणण्याला कबूल झाला व ती नेईल तिकडे तिच्या मागें मागें हिंडूं लागला. परंतु त्या अवदशेला तिच्या मनाजोगतें कोठेंहि स्थान मिळेना. ती जेथें जाई तेथें तिला तिच्या मनाविरुद्ध असा कांहींतरी प्रकार दिसून येई. कोठें ईश्वराची उपासना चालली आहे, कोठें कीर्तन होत आहे, कोठें श्रीहरीचें भजन होत आहे, कोठें शंकराचें स्तवन होत आहे, कोठें वेदाध्ययन होत आहे, कोठें शास्त्राचें चर्वितचर्वण होत आहे, कोठें योगी प्रभूचें चिंतन करीत आहेत, कोठें तापसी तपसाधन करीत आहेत, याप्रमाणें जेथें जावें तेथें कांहींना कांहीं ईश्वराची ध्यानधारणा चालली आहे, असें दृष्टीस पडे. याप्रमाणें ती स्त्री देशोदेश हिंडूं लागली, पण तिला तिच्या मनासारखें स्थल आढळेना. तो उदालकऋषि तिच्या मागें हिंडतां हिंडतां अगदीं थकून गेला. पोटांत अन्न नाहीं, घटकाभर विसावा नाहीं, स्नान नाहीं, संध्या नाहीं, अशा स्थितींत कित्येक दिवस तो हिंडल्यावर फारच थकला व त्या चमत्कारिक स्थितीला तो फारच वैतागून गेला. तो आपल्या मनांत म्हणाला, ‘ विष्णूनें ही मला स्त्री दिली नसून मूर्तिमंत कृत्याच माझ्यामागें लावून दिली आहे. ही स्त्री नसून माझ्यामागें व्याघ्रमुखाची राक्षसीणच लागली आहे. असल्या स्त्रीच्या सहवासांत मला कसलें संसारसुख होणार आहे?’ असें विचार मनांत येऊन तो पश्चात्ताप पावला, व त्या अवदसेला ह्मणाला, अगे, तूं एवढा देश फिरलीस तरी तुझ्या मनाजोगतें स्थान तुला मिळत नाहीं याचें मला फार आश्चर्य वाटतें, तुला कोणत्या प्रकारचें स्थान पाहिजे तें मला तरी सांग, ह्मणजे मी तसलें स्थान शोधण्याचा प्रयत्न करितों.’ पतीचें भाषण ऐकून ती स्त्री ह्मणाली, ‘अहो पतिराज, ज्या नगरींत विशेष अनाचार होत असेल त्या नगरींत राहणें मला फार आवडतें. ज्या ठिकाणच्या लोकांची पापमार्गाकडे विशेष प्रवृत्ति असते; स्त्रीपुरुषांचें पितापुत्रांचें जेथें नित्य भांडण होतें, जेथें न्याय नाहीं, ज्या देशांतला राजा जुलमी व कपटी आहे, जेथले लोक कपटी व कृतघ्न आहेत, ज्या शहरांत नास्तिक व स्वामिद्रोही लोक पुष्कळ आहेत, ज्या घरांत धर्माचार नाहीं, ज्या ठिकाणीं होमहवन होत नाहीं, जेथें भूतदयेचा वास नाहीं, जेथें हरिकीर्तन नाहीं, ज्या घरांत स्नानसंध्या करण्याचा प्रघात नाहीं, जें घर नेहमीं अमंगळ असतें; अशा ठिकाणीं मला राहणें आवडतें. तर असें ठिकाण मजकरितां आपण लवकर शोधून काढा.’ त्या

अवदशेचें असें हें अमंगल भाषण ऐकून, मस्तकावर वज्र पडावें त्याप्रमाणें उद्दालकऋषीला दुःख झालें. दुर्वासऋषीच्या मागें जसें सुदर्शनचक्र लागलें होतें किंवा शंकराच्या मागें जसें ब्रह्मकपाट लागलें होतें, त्याप्रमाणें माझ्यामागें ही अवदशा लागली आहे असें त्याला वाटूं लागलें. तो उद्दालकऋषि अत्यंत सात्विक व शांत वृत्तीचा होता. अशा मनुष्यास अवदशेसारखी स्त्री मिळावी हा केवळ दैवाचा खेळ होय. विस्तव आणि पाणी, अथवा मृग आणि महाव्याघ्र किंवा सूर्य आणि अंधार ही जशी एकमेकांपासून लांब असतात, त्याप्रमाणें तो उद्दालकऋषी त्या अवदशेपासून दूर होण्याचा विचार करूं लागला. व बराच वेळ विचार करून त्यानें आपल्या स्त्रीला एका पिंपळाचे झाडाजवळ बसविलें, व आपण नदीवर आंघोळीस जातों असें सांगून तेथून जो पळाला तो आपल्या पूर्व आश्रमांत धांवपळ करीत आला; व आज आपण मोठ्या संकटांतून सुटलों असें त्याला वाटूं लागलें.

इकडे उद्दालकऋषीची स्त्री अवदशा त्या पिंपळाच्या वृक्षाजवळ पतीची वाट पहात बसली होती. पुष्कळ वेळ झाला तरी पति येत नाहीं असें पाहून तिला भीति वाटूं लागली. हळूहळू सूर्यास्त होऊन सर्वत्र अंधार पडला तरी पतीचा मुळींच पत्ता नाहीं. तेव्हां आपला पति आपणास टाकून गेला असें तिला पक्कें वाटलें व ती तेथें मोठ्यानें रुदन करूं लागली. तें तिचें भयंकर रडणें ऐकून लोक भयभीत झाले. तिचा तो रोदनस्वर इतका मोठा होता कीं, वैकुंठांत लक्ष्मी श्रीहरीची चरणसेवा करीत बसली होती तिच्या कानावर तो गेला. तेव्हां लक्ष्मीनें तो लगेच ओळखला व ही आपली बहीण कां रडते याचें तिला मोठें गूढ पडलें. तेव्हां ती विष्णूला जागें करून म्हणाली, अहो, माझी बहीण आक्रोश करीत आहे, तर चला, आपण पृथ्वीवर जाऊं आणि तिची काय अवस्था आहे तें पाहूं. लक्ष्मीच्या इच्छेप्रमाणें विष्णु लक्ष्मीला घेऊन त्या अवदशेजवळ आले. त्या दोघांना पाहून अवदशेनें आपणास पति सोडून गेला वगैरे सर्व हकिकत त्यांना सांगितली. ती विष्णूला म्हणाली,—हे श्रीहरि! माझी इच्छा आतां तुझ्याजवळच राहण्याची आहे. तेव्हां विष्णूला तिची दया आली व ते तिला म्हणाले, 'माझा वास या पिंपळाच्या वृक्षांत नेहमीं असतो तर तूं या पिंपळाच्या वृक्षांत रहा म्हणजे माझें सान्निध्य तुला अक्षय्य होईल.' विष्णूंनीं याप्रमाणें सांगतांच त्या अवदशेनें पिंपळाच्या वृक्षांत वास केला. अशा रीतीनें अवदशेचा स्वीकार विष्णूनें केला, हें वर्तमान सर्व देवांना समजल्यावर त्यांना मोठी काळजी उत्पन्न झाली, व त्या दोघांची ताटातूट कशी करावी याचा सर्व देव विचार करूं लागले. मग सर्व देव अवदशेकडे आले व तिची प्रार्थना करून म्हणाले, हे अवदशे! तूं या पिंपळाच्या वृक्षांत सुखानें वास कर, पण श्रीहरीला सोडून दे. तो तुजजवळ शनिवाराचे दिवशीं मात्र येऊन रहात जाईल.' देवांची

विनंति ऐकून अवदशेनें ती गोष्ट कबूल केली. तेव्हांपासून पिंपळाच्या वृक्षांत अवदशेचा वास आहे. म्हणून तो वृक्ष अपवित्र मानतात, व शनिवारीं त्या वृक्षांत विष्णूचा वास असतो म्हणून त्या दिवशीं त्या वृक्षाला लोक पवित्र मानून त्याची पूजाअर्चा करितात.

---

# अध्याय ४ था.

## १. जालंधर जन्मवृत्तान्त.

पिंपळाच्या वृक्षाप्रमाणेंच तुळशीविषयीं जी आपणास माहिती असेल, ती मला कथन करावी, अशी जनमेजय राजानें वैशंपायन ऋषींची प्रार्थना कल्यावर वैशंपायन ऋषि ती कथा जनमेजय राजाला सांगूं लागले.

" पूर्वी एकदां कैलास भुवनांत आदीशक्ति जी पार्वती तिच्या दर्शनासाटीं इंद्र गेला होता. त्यावेळीं स्वतः शंकर मृत्यूचें रूप धारण करून मंदिराच्या दरवाजाजवळ द्वारपाळाचें कार्य करीत होते. त्यांनीं इंद्रास मंदिरांत जाण्याचा प्रतिबंध केला. इंद्राला तो प्रकार कांहींच माहीत नसल्यामुळें तो त्या द्वारपाळावर अत्यंत क्रुद्ध झाला व त्यानें आपलें वज्र शंकराच्या मानेवर मारलें. त्या भयंकर वज्राच्या आघातानें पर्वताचेंहि चूर्ण व्हावयाचें, परंतु शंकर हे असामान्य पुरुष असल्यामुळें त्यांच्यावर त्या वज्राचा कांहींच परिणाम झाला नाहीं. मात्र त्या आघातामुळें कंठाला निळा डाग पडला. अशा रीतीनें शंकराचा कंठ नील वर्णाचा झाला म्हणून शंकरास तेव्हांपासून नीलकंठ असेंहि म्हणतात. इंद्रानें असा उन्मत्तपणा केल्यावर महादेव त्यास म्हणाले, अरे उन्मता इंद्रा, तुझ्या या उद्दामपणाचें तुला लवकरच प्रायश्चित्त मिळेल. तूं व तुझ्याबरोबरच साऱ्या अमरावतीची मी आतां क्षणार्धात राखरांगोळी करून टाकतो.' असें म्हणून शंकरानें आपला तृतीय नेत्र उघडला व ते इंद्राकडे रागानें पाहूं लागले. शंकराचें तें रौद्र स्वरूप पाहून इंद्र भीतीनें घाबरून गेला व आपला विनाशकाळ जवळ आला असें त्याला वाटूं लागलें. त्यावेळीं इंद्र खरोखर जळून भस्म झाला असता ? परंतु तितक्यांत देवगुरु बृहस्पती पुढें झाले व ते शंकराला प्रणाम करून विनत भावानें म्हणाले; हे देवाधिदेवा कैलासपते, क्षमाकर, या तुझ्या इंद्राचें संरक्षण कर. हा अज्ञान मतिमंद आहे. न समजून याच्याकडून अपराध घडला आहे. तर याच्यावर दया कर. हे पशुपते, या इंद्राची अमरावतींत तूंच स्थापना केली आहेस, तेव्हां त्याला नाहींसा करणें यांत तुला कांहीं अवघड आहे असें नाहीं; पण हातानें लावलेला तरू तोडणें हें बरें नव्हे. हें सकळ चराचर

तुझेंच आहे. आम्हीं केवळ तुझ्या कृपेमुळें अमर आहोंत. तूं जर आमच्यावर क्रुद्ध झालास तर आम्ही या अमरत्वाचा अभिमान तरी कसा बाळगणार! हे कैलासपते, याकरितां या इंद्राचे अपराध पोटांत घाल व त्याला क्षमा कर '—बृहस्पतीनें याप्रमाणें शंकराची प्रार्थना केल्यावर शंकर शांत झाले व त्यांनीं आपला क्रोधाग्नि आवरून धरला. शंकर शांत झाले असें पाहतांच इंद्र व बृहस्पती तेथून निघून गेले, आणि शंकरानें हातांत धरलेला आपला क्रोधाग्नी समुद्रांत फेंकून दिला.

शंकराचा तो क्रोधाग्नी समुद्रांत पडल्यावर तेथें एक विशाल मूल जन्माला आलें. त्याचा रुदनध्वनि इतका भयंकर निघाला कीं, त्या योगें त्रिभुवन थरारून मेदिनी डळमळूं लागली. तो विलक्षण ध्वनि ऐकून ब्रह्मदेवालाहि भीति वाटली व हा काय प्रकार आहे तें पाहण्यासाठीं तो समुद्रकांठीं आला. तेव्हां समुद्रानें ब्रह्मदेवाचा सत्कार करून त्याला बसण्यासाठीं आसन दिलें, व आपल्या नूतन अर्भकास ब्रह्मदेवाजवळ देऊन समुद्रानें ब्रह्मदेवास त्याची जन्मपत्रिका तयार करण्यास सांगितलें. मुलाला पाहून ब्रह्मदेवाला मोठें कौतुक वाटलें व त्यानें मोठ्या आवडीनें त्याला आपल्या मांडीवर बसविलें. मुलानें मांडीवर बसल्या बसल्या सहजलीलेनें ब्रह्मदेवाची दाढी धरली व तिच्याबरोबर तें खेळूं लागलें. त्या बाळाच्या लीलेनें ब्रह्मदेवाला पीडा होऊं लागली, व तो त्या मुलाचा हात दाढीपासून दूर करूं लागला, परंतु मूल दाढी मुळींच सोडीना. ब्रह्मदेवानें आपली शिकस्त केली, परंतु मुलाच्या हातून दाढी सुटेना. केसाला सारखी ओढ बसल्यानें ब्रह्मदेवाच्या दोन्हीं डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. तेव्हां त्या मुलानें ब्रह्मदेवाची दाढी सोडून दिली. मुलाची ही विलक्षण परिस्थिति पाहून ब्रह्मदेवानें त्या मुलाचें नांव जालंदर असें ठेविलें. व तो समुद्राला म्हणाला.— ' समुद्रा, हा तुझा मुलगा फार पराक्रमी होईल. हा सुरवरांना जिंकून अमरावतीचें राज्य करील. युद्धामध्यें हा शंकर व विष्णु यांचा सुद्धां पराभव करील.' या प्रमाणें भविष्य वर्तवून ब्रह्मदेव सत्यलोकीं निघून गेले. पुढें हा जालंधर मोठा झाल्यावर समुद्रानें त्याच्यासाठीं नवीन नगर वसविलें व त्यास जालंधरपूर असें नांव ठेवून तेथील राज्य जालंधरास दिलें; आणि दैत्य गुरु जो शुक्र त्याला त्याचे प्रधान नेमिलें.

## २. इंद्रपराजय व अमरावती हरण.

जालंधरास राज्य प्राप्त झाल्यावर त्यानें शुक्राचार्याला सांगून त्रिभुवनांतील सर्व दैत्यांनां बोलावून घेतलें. त्यावेळीं सर्व दैत्याबरोबर राहू हि आला होता, राहूला मस्तकाशिवाय सर्व अवयव होते. तथापि तशा स्थितींत तो सर्व प्रकारचे व्यवहार करीत आहे हें पाहून जालंधराला फार आश्चर्य वाटलें व त्यानें त्या संबंधाची हकीकत शुक्राचार्याला विचारिली. तेव्हां शुक्राचार्य म्हणाले,

हे जालंधरा, पूर्वी देव आणि राक्षस यांनीं समुद्रमंथन करून चौदा रत्नें काढिलीं त्यांत अमृत निघालें. तें कोणीं घ्यावें याचा वाद पडला असतां, देवांनीं कपट करून तें अमृत आपल्या वाटणीला घेतलें. त्यावेळीं राहूनें संधी साधून देवांच्या पंक्तींत जागा मिळविली व अमृत ग्रहण केलें. तो प्रकार विष्णूच्या लक्षांत येण्याबरोबर विष्णूनीं आपलें सुदर्शन चक्र सोडून राहूचें मस्तक धडापासून निराळें केलें. तें मस्तक आकाशांत उडून गेलें. व तेव्हांपासून हा अशा स्थितींत हिंडत आहे. शुक्राचार्य पुढें म्हणाले, 'त्यावेळीं देवांनीं कपट करून सर्व चांगलीं चांगलीं रत्नें आपण घेतलीं व राक्षसांच्या वाट्याला फक्त सुरा दिली.' शुक्राचार्यांनें सांगितलेली हकीकत ऐकून जालंधराला सर्व देवांचा व विष्णूचा फार राग आला. तो म्हणाला; 'ज्या विष्णूनें येवढें कपट केलें त्याचा चांगला सूड उगविला पाहिजे. तीं रत्नें खरीं म्हटलीं असतां, माझ्या मालकीचीं आहेत. समुद्र हा माझा पिता आहे व त्याचींच तीं रत्नें होतीं. तेव्हां त्या रत्नावर देवांची काडीइतकी देखील सत्ता पोहोंचत नाहीं. असें असून देवांनीं माझ्या पित्याला व्यर्थ त्रास दिला, व तीं रत्नें चोरून नेलीं. तेव्हां तीं रत्नें परत मिळवून देवांना याबद्दल चांगलें प्रायश्चित दिलें पाहिजे.' असें म्हणून जालंधरानें आपल्या घस्मरु नांवाच्या दूताला बोलावून असें सांगितलें कीं, "तूं आतांचे आतां अमरावतीस जा व इंद्राला माझा असा निरोप कळीव कीं, जालंधराला सर्व रत्नें देऊन त्याला तूं शरण जा; तसें न करशील तर तुजबरोबर युद्ध करून जालंधर अमरावती घेईल व तुझी दुर्दशा करील. आपणास कोणीं साह्य करील असा जर तुझा भरंवसा असेल तर तो वृथा आहे. तुला कोणीही साह्य करण्यासाठीं आला, तरी त्याचा पराभव करण्याची शक्ति जालंधराचे ठायीं आहे असें त्याला सांग." जालंधराचे आज्ञेप्रमाणें घस्मरु तेथून निघाला व अमरावतीस येऊन इंद्रसभेंत इंद्रासमोर उभा राहिला, व इंद्राला म्हणाला,—'हे सुरेश्वरा! मी जालंधराचा दूत असून त्यानें मला तुजकडे रत्नें मागण्यासाठीं पाठविलें आहे. समुद्र हा जालंधराचा पिता आहे, तेव्हां अर्थात समुद्रापासून मिळालेलीं रत्नें जालंधराच्या मालकीचीं आहेत. तुम्हीं तीं चोराप्रमाणें लुबाडून आणलीं आहेत. तर तीं सर्व रत्नें तूं जालंधराला नेऊन दे, व त्याची या अपराधाबद्दल क्षमा माग. आणि तुला असें करावयाचें नसल्यास तुझें काय ह्मणणें आहे तें मला सांग, ह्मणजे मी तो निरोप जालंधराला जाऊन सांगतों.'—याप्रमाणें दूताचा तो निरोप ऐकून इंद्र मोठ्या काळजींत पडला. जालंधर हा शंकराचा मानसपुत्र आहे, तेव्हां त्याच्याबरोबर युद्धांत जय मिळेल किंवा नाहीं याचा इंद्राला संशय होता; व रत्नें देणेंही त्याला इष्ट नव्हतें. तेव्हां इंद्रानें कांहींतरी सांगून, जालंधराची समजूत घालण्याचा विचार केला. तो त्या घस्मर दूताला ह्मणाला, 'रे आह्मीं समुद्रमंथन केलें ही गोष्ट खरी, पण तो रत्नासाठीं मुळींच मंथन

केला नाहीं. पूर्वी पर्वताला पंख होते, ते तोडून टाकून त्यांचा आह्मांला नाश करावयाचा होता, ह्मणून आम्हीं पंख तोडीत असतांना कांहीं पर्वत समुद्रांत गेले. तसेंच शंखासुरानें वेदांचें हरण करून तोही समुद्रांत जाऊन लपला; त्या दोघांना जालंधराचे पित्यानें आश्रय दिला ह्मणून, आह्मीं समुद्राचें मंथन केलें. तेव्हां अर्थातच आह्मीं या बाबतींत अपराधी नाहीं. मग आह्मांबरोबर युद्ध करणें न्यायसंमत होणार नाहीं; म्हणून जालंधराला तूं माझा असा निरोप सांग कीं, या बाबतींत युद्ध करण्याचें कांहींच कारण नाहीं.' इंद्राचा निरोप घेऊन घस्मर तेथून निघाला व जालंधराकडे परत येऊन त्यानें घडलेली सर्व हकीकत त्याला कथन केली. इंद्राचा तो लपंडाव पाहून जालंधर क्रुद्ध झाला व त्यानें अमरावतीवर स्वारी करून इंद्राचा सूड उगविण्याचा विचार ठरविला. सर्व राक्षसांना ससैन्य येण्याविषयीं दूतांबरोबर लागलींच त्यानें पत्रें पाठविलीं, आणि युद्धाची विलक्षण तयारी केली. जालंधराच्या पत्राप्रमाणें ठिकठिकाणचे रथी महारथी राक्षस आपआपल्या सैन्यानिशीं येऊन दाखल झाले. सर्व सैन्य गोळा झाल्यावर जालंधरानें शुंभ व निशुंभ या दोन युद्धविद्याविशारद राक्षसांची सेनापतींच्या जागेवर नेमणूक केली व सर्वांना अमरावतीकडे कूच करण्याचा हुकूम सोडला.

जालंधराची आज्ञा होतांच ते शक्तिशाली शुंभ निशुंभ सेनापति आपली प्रचंड सेना घेऊन, इंद्राचे अमरातीवर चाल करून गेले, व त्यांनीं आपलीं रणवाद्यें वाजविलीं. त्या गर्जनेनें संपूर्ण त्रिजगत डळमळूं लागलें, इंद्रलोकीं येतांच राक्षससैन्यानें नंदनवन आपल्या ताब्यांत घेतलें, व तेथें आपली विशाल छावणी उभारली. राक्षसांचे तें भयंकर शिबिर अवलोकन करून कलहप्रिय नारदाच्या हृदयांत गुदगुल्या होऊं लागल्या. तो धांवत धांवत इंद्राकडे गेला व त्याला त्यानें ती दैत्यसेनेची सर्व हकीकत सांगितली. तें वर्तमान ऐकतांच इंद्रानेंही सर्व देवांना आपआपला सैन्यभार घेऊन बोलाविलें, व आपलें प्रचंड सैन्य घेऊन राक्षसांबरोबर युद्ध करण्यासाठीं तो सिद्ध झाला. रणवाद्यांच्या गर्जनेंत दोन्हीं सैन्यें सज्ज होऊन रणक्षेत्रांत समोरासमोर उभीं राहिलीं, व एकमेकांवर आपआपल्या शस्त्रास्त्रांचा प्रयोग करूं लागलीं. रणधुमाकुळीनें आकाशांत धुळीचा कल्लोळ उडून सूर्य दिसेनासा झाला. दोन्ही पक्षांकडील सैनिक पक्के लढवय्ये असल्यामुळें त्या युद्धास विलक्षण स्वरूप आलें. रणक्षेत्रांतून रक्तगंगेचा प्रवाह जोरानें वाहूं लागला, व जयापजयाचीं चिन्हें दोन्हींकडे सारखींच दिसूं लागलीं. रणदेवता जयाची माळ राक्षसांच्या गळ्यांत घालणार कीं देवांच्या गळ्यांत घालणार तें कांहींच सांगतां येईना. देवांकडे जो कोणी मृत होऊन पडे त्याला देवगुरु बृहस्पती दिव्य औषधींच्या योगानें पुन्हा जिवंत करीत असत. इकडे दैत्याकडे शुक्राचार्याला संजीवनीविद्या माहीत असल्यामुळें जो कोणी राक्षस

मरे त्याला शुक्राचार्य जिवंत करीत असे. असा प्रकार दोहोंकडे असल्यामुळें जयापजयाचा निकाल लागणें दुरापास्त झालें होतें. देवांचा पाडाव होत नाहीं, असें पाहून जालंधर शुक्राचार्याला ह्मणाला, "गुरु,हे देव पुन्हा पुन्हा जिवंत होत आहेत, तेव्हां यांच्याबरोबर युद्ध करून जय कसा मिळणार? तेव्हां दैत्य-गुरु म्हणाला, जालंधरा, हा देवगुरु बृहस्पती द्रोणागिरी नांवाच्या पर्वतावरून दिव्यौषधि आणून देवांना जिवंत करतो. तर तो पर्वत तुम्हीं नाहींसा करा, म्हणजे राक्षसांचा जय होईल. शुक्राचार्यानें असें सांगितल्यावर जालंधर द्रोणागिरी पर्वताजवळ गेला व त्यानें तो विशाळ पर्वत उचलून समुद्रांत फेंकून दिला. इकडे बृहस्पती तेथें येऊन पाहतो तों, तेथें पर्वतच नाहीं. मग औषधी त्या कोठल्या मिळणार? तो प्रकार पाहून बृहस्पतीचे हातपाय गळाले. तो देवांकडे परत येऊन देवांना म्हणाला,–'देवहो, आतां तुम्हांला युद्धांत जय मिळेल असें मला वाटत नाहीं. कारण, राक्षसांनीं द्रोणागिरी पर्वतच समुद्रांत टाकून दिला आहे. यामुळें औषधी मिळावयाच्या नाहींत. औषधी नसल्या-मुळें मला तुम्हांला जिवंतही करितां येणार नाहीं. तेव्हां तुम्हीं आतां युद्ध न करितां येथून पळून जा. त्यावांचून दुसरा कांहीं उपाय नाहीं.' बृहस्पतीनें असें सांगितल्यावर देवांनीं युद्ध बंद केलें व ते आपआपला परिवार घेऊन हेमगिरी पर्वतावर पळून गेले. देव पळून गेल्यावर अर्थातच सर्व अमरावती राक्षसांच्या हातीं पडली. इंद्राच्या सिंहासनावर जालंधर अधिष्ठित झाला; अमरावतीच्या राज्यकारभाराचीं सूत्रें त्यानें आपल्या हातांत घेतली; व अमरा-वतीच्या लोकांना लुटून व त्यांच्यावर जुलूम करून सर्व अमरावतीची दुर्दशा करून टाकिली. याप्रमाणें शंकरानें दिलेला अभिशाप शेवटीं खरा झाला.

इंद्रादि सर्व सुरवर हेमगिरीवर आल्यावर पुढें कसें करावें याचा सर्वांना विचार पडला. तेव्हां बृहस्पती म्हणाले, "देवहो, तुम्हाला आतां फक्त वैकुंठधाम-निवासी श्रीहरीचा आश्रय उरला आहे. त्याचें चिंतन करा म्हणजे तो तुमच्या साह्याला येईल व तुमचें हें संकट दूर करील. बृहस्पतीची सूचना सर्वांस मान्य झाली व त्याप्रमाणें सर्व देव श्रीहरीची करुणा भाकूं लागले. ते म्हणाले, 'हे वैकुंटनिवासी लक्ष्मीरमणा, हे भक्तवत्सल शारंगधरा, हे कृपानिधे, या वेळीं तुझ्यावांचून आमचें संरक्षण करण्यास कोणी समर्थ नाहीं. या संकटाचें निवारण करण्यास तुझ्यावांचून कोणीही शक्तिशाली नाहीं. हे अनंता, आम्हीं जालंधराच्या जुलमानें फार गांजलों आहों. तर हे दयानिधे, त्वरित ये व या तुझ्या दासांचें संरक्षण कर. सुरवरांच्या त्या करुणवाणीनें श्रीहरीच्या दयाघन हृदयांत लवकरच प्रवेश केला. त्या वेळीं भगवान् श्रीहरी वैकुंठांत सुखशय्येवर लक्ष्मीबरोबर विनोद करीत बसले होते. देवांची करुणावाणी कानीं पडतांच ते तिला ह्मणाले. " लक्ष्मी, स्वर्गांतील देव दीनवाणीनें माझा धांवा करीत आहेत;

ते मोठ्या संकटांत पडले आहेत; जालंधरानें सर्व अमरावती जिंकून देवांना घालवून दिलें आहे. तर आतां अमरावतीस जाऊन त्या जालंधराचा पराभव करितों आणि देवांची अमरावती देवांना देऊन मी लवकरच परत येतों." विष्णूचें भाषण ऐकून लक्ष्मी विनतभावानें म्हणाली, 'अहो, तो जालंधर माझा बंधू आहे. मी समुद्राची मुलगी असून तो माझ्याच पित्याचा मुलगा आहे. तुम्हीं त्याच्याकडून अमरावती घेऊन ती इंद्राला द्या; त्याचा पाहिजे तर युद्धांत पराजय करा; पण त्याचा वध करूं नका.' लक्ष्मीची विनंती विष्णूनीं मान्य केली व गरुडावर बसून ते मोठ्या वेगानें अमरावतीस आले. आल्याबरोबर त्यांनीं शंख वाजविला व जालंधराला युद्धासाठीं आवाहन केलें. तो शंखध्वनि ऐकल्याबरोबर जालंधरही युद्धाला तयार झाला व रथांत बसून तो विष्णूसमोर आला. तेव्हां विष्णु ह्मणाले, 'जालंधरा, तूं उन्मत्त होऊन हें भलतेंच साहस केलें आहेस. इंद्राला पादाक्रांत करून एकदम अमरावतीचा राजा झाला आहेस, पण याचें प्रतिफळ तुला लवकरच मिळेल.' असें ह्मणून विष्णूनीं जालंधरावर शरवृष्टी करण्यास आरंभ केला. भयंकर विषारी सर्पांप्रमाणें शंभर बाण त्यांनीं एकदम जालंधराचे अंगावर टाकले. जालंधरानें त्या बाणांचा तेव्हांच नाश केला. मग जालंधरानें विष्णूवर सहस्र बाण सोडले. ते विष्णूनीं तेव्हांच तोडले. याप्रमाणें ते दोघे एकमेकांवर भयंकर शरवृष्टी करूं लागले, तेव्हां सर्व आकाशमंडळ बाणांनीं व्यापून गेलें. इतक्यांत विष्णूनीं आपल्या विलक्षण हस्तनैपुण्यानें जालंधराची ध्वजा मोडली; त्यामागून छत्र मोडलें, मग धनुष्य आणि तरवार हीं मोडून टाकलीं; आणि शेवटीं रथाचे घोडे मारून, सारथ्याला लांब उडविलें व रथही मोडून टाकला. याप्रमाणें जालंधर विरथ झाल्यावर अत्यंत संतप्त झाला व विष्णूच्या अंगावर धांवून जाऊन आपलें खड्ग तो त्याच्या अंगावर जोरानें मारूं लागला. तेव्हां विष्णूनें तो आघात आपल्या गदेवर घेऊन त्या खड्गाचा नाश करून टाकला. मग जालंधरानें एक प्रहार गरुडाच्या मस्तकावर जोरानें केला; त्याबरोबर गरुड मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला, आणि त्या सरसे विष्णूही खालीं जमिनीवर आले.

गरुडासारखा प्रचंड पक्षी जालंधराच्या आघातानें मूर्च्छित झालेला पाहून, विष्णूला त्याच्या शक्तीची चांगली कल्पना करितां आली व जालंधराला नाहींसे करण्यासाठीं काय करावें याचा विष्णूला क्षणभर विचारच करावा लागला. मग विष्णूनीं एक प्रचंड शिला उचलली व ती जालंधराच्या मस्तकावर फेंकली, परंतु इतक्यांत जालंधरानेंही तशीच एक शिला उचलून त्या शिलेवर फेंकली. त्याबरोबर त्या दोन्ही शिला एकमेकांवर आपटल्या व शतखंड होऊन भूमीवर पडल्या. नंतर विष्णूनीं एक डोंगरच उचलून जालंधरावर फेंकला, पण जालंधरानें पूर्व कृतीनेंच त्या डोंगराचें चूर्ण करून टाकिलें. एकमेक एकमेकांचीं

शस्त्रास्त्रें छेदित असल्यामुळें कांहीं वेळानें दोघेही निःशस्त्र झाले. मग अर्थात दोघेही मल्लयुद्ध करण्यास तयार झाले. दोघेही सारखेच शक्तिसंपन्न असल्यामुळें त्या मल्लयुद्धाला भयंकर रंग आला. त्या दोघांच्या मुष्टीआघातानें सारें ब्रह्मांड थरारूं लागलें. दोन पर्वतांचेंच युद्ध चाललें आहे, असें त्या वेळीं वाटूं लागलें. एकमेकांच्या मस्तकांच्या टणत्कारानें मेघगर्जनेंप्रमाणें गडगडाट होऊं लागला. केव्हां विष्णु खालीं येत तर केव्हां जालंधर खालीं येई. जय कोणाचा होणार याचें अनुमान कोणालाच करितां येईना. असें त्या दोघांचें घनघोर मल्लयुद्ध एक हजार वर्षेंपर्यंत सारखें चाललें होतें. इतकें दिवस युद्ध केल्यामुळें विष्णु अत्यंत क्लांत झाले व ते त्या जालंधराला म्हणाले, "जालंधरा, तुझी शक्ति व तुझें युद्धनैपुण्य पाहून मी तुला प्रसन्न झालों आहे. तर तुझी जी इच्छा असेल ती मला सांग. मी तुझें इच्छित मोठ्या संतोषानें देईन." विष्णूचें भाषण ऐकून जालंधर म्हणाला; 'हे लक्ष्मीरमणा, तूं माझा मेव्हणा आहेस, तेव्हां माझ्या बहिणीसह तूं आमचे घरीं येऊन रहावें एवढेंच माझें मागणें आहे.' विष्णूनी जालंधराचें मागणें कबूल केलें व ते लक्ष्मीसहित जालंधरपुरास जाऊन राहिले. याप्रमाणें या युद्धांत जालंधराचा जय झाल्यावर जालंधरानें अमरावतीचें रक्षण करण्यासाठीं कांहीं असुरांची नेमणूक केली. नंतर जालंधरानें शुंभनिशुंभांस बरोबर घेऊन सर्व पृथ्वी पादाक्रांत केली व सर्वत्र आपल्या नांवाची ध्वजा फडकाविली. ठिकठिकाणच्या राज्यांच्या संरक्षणासाठीं राक्षसांना मांडलिकत्व दिलें व आपण सार्वभौम चक्रवर्ती राजा म्हणून, जालंधरपुरास राहून राज्यकारभार करूं लागला. व भगवंतानीं तेव्हांपासून क्षीरसागरीं म्हणजे सासऱ्याचें घरीं वास केला.

## ३. कीर्तिमुखाची उत्पत्ति.

तो जालंधर चक्रवर्ती राजा ह्मणून प्रसिद्ध झाल्यावर आपल्या प्रजेला मोठ्या प्रेमानें वागवूं लागला. वृंदा या नांवाची काळनेमी राजाची कन्या होती, ती अत्यंत सुशील व सुस्वरूप होती. तिला उपवर दशा प्राप्त झाल्यावर ती काळनेमी राजानें जालंधराला अर्पण केली होती. ती महापतिव्रता असून आपल्या आश्रितांचें संरक्षण पुत्राप्रमाणें करीत असे. तिनें पुष्कळ दिवस दुर्वास ऋषीची सेवा करून त्यांना प्रसन्न करून घेतलें होतें. इच्छित वरप्रदान देण्याची दुर्वासानें इच्छा दर्शविल्यावर वृंदा ह्मणाली, हे ऋषी-श्वरा, मला असा वर द्या कीं, त्यायोगानें कधींही वैधव्यदशा प्राप्त होऊं नये. तेव्हां ऋषी ह्मणाले, हे वृंदे, तुझें मंगळसूत्र कधींही तुटणार नाहीं. परंतु जर तूं परपुरुषा-बरोबर एकांत करशील तर तुला तत्काल वैधव्यदशा प्राप्त होईल. यावरून सौभाग्य-संरक्षण करणें किंवा गमाविणें हें तुझ्याच स्वाधीन ठेविलें आहे. तूं अत्यंत दक्षतेनें रहा व आपल्या पातिव्रत्याचें संरक्षण कर. ह्मणजे तुला कधींहि वैधव्य प्राप्त होणार नाहीं. दुर्वासानें वृंदेला असें सांगितलें असल्यामुळें ती अत्यंत दक्षतेनें राहून पतीची सेवा व शुश्रुषा एकनिष्ठपणें करीत असे.

जालंधर सर्व देवावर जय मिळवून स्वस्थपणें राज्यकारभार चालवूं लागला; तेव्हां नारदाला मोटी चुटपुट लागली. कोणती तरी युक्तीप्रयुक्ती योजून राक्षसांचें व देवांचें भांडण लावण्याचा त्याचा विचार चालला होता. बराच विचार करून त्यानें एक योजना पसंत केली, व तो हिंडत हिंडत जालंधराचे दरबारांत आला. नारदमुनीला अवलोकन करून जालंधराला फार आनंद झाला. त्यानें नारदाचा सन्मान करून त्याला आपल्या सिंहासनावर बसवून घेतलें व आपले अवलोकनांत कांहीं अपूर्व असें आलें असल्यास मला कृपा करून सांगा, अशी विनंति केली. तेव्हां नारदमुनि त्याची खोटी प्रशंसा करून ह्मणाले; ' हे जालंधरा, तुझें हें अमर्याद वैभव, चतुरंग सैन्य, पराक्रमी सेनापती, तुझे मुत्सद्दी प्रधान, शूर सरदार, पुष्कळ खजिना, विशाल राज्य हीं पाहून मला मोठा आनंद वाटतो. देव, दानव आणि मानव या सर्वांना तूं जिंकून आपले गुलाम केले आहेस, याबद्दल मला मोठी धन्यता वाटते. तुझ्या या विलक्षण वैभवाचा कीर्तिध्वज चोहोंकडे सारखा फडकत आहे. तुझ्या घरीं कांहीं न्यूनता असेल असं मला मुळींच वाटत नाहीं. परंतु एका गोष्टीची मात्र न्यूनता दिसते. या तुझ्या वैभवाप्रमाणें व तुझ्या स्वरूपशालीनतेप्रमाणें तुला सुंदर स्त्रीची आवश्यकता आहे, आणि ती उणीव जर दूर होईल तर तुझ्या या वैभवाला पूर्णता येऊन तुझा कीर्तिरव त्रिभुवनांत जाऊन सर्वांच्या कानांवर आदळेल. तुझी वृंदा ही स्त्री सुस्वरूप आहे, परंतु ती तुला योग्य अशी नाहीं. तुला सर्व प्रकारें योग्य अशी स्त्री माझ्या अवलोकनांत आली आहे. तूं जर प्रयत्न करशील तर ती तुला सहज मिळेल. कैलासपर्वतावर हिमप्रासादांत महादेव राहतात त्यांची पार्वती नांवाची स्त्री अत्यंत रूपवती आहे. तिच्या स्वरूपाचें यथायोग्य वर्णन करण्यास शेषही असमर्थ आहे, मग मी तिचें काय वर्णन करणार ? तिचें स्वरूप, तिची अंगकांति, तिच्या शरीराची ठेवण, हीं सर्वच कांहीं अपूर्व अशीं आहेत. अरे, तिला नुसतें पाहिल्याबरोबर ब्रह्मदेव देखील वेडा झाला होता, मग तुझी ती कथा काय ? अशी ती अपूर्व सुंदर पार्वती तुला सहज प्राप्त होईल. कारण तिच्या सौंदर्याप्रमाणें तिला पति मिळालेला नाहीं. तो महादेव अगदीं दरिद्री आहे. भस्म, लंगोटी, व्याघ्रांबर, त्रिशूल, शंख; डमरु, सर्प व कांहीं शंखमण्याचे अलंकार एवढेंच कायतें त्याचें वैभव आहे. तेव्हां अशा भिकार मनुष्याजवळ रहाण्यापेक्षां ती पार्वती तुझ्या आश्रयाला सहज येऊन राहील. तुझ्या घरच्या या बहुमूल्य वस्त्रालंकारांनीं तर ती अधिक सुस्वरूप दिसेल; आणि तुझ्या या वैभवाला शोभा आणील. ' याप्रमाणें नारद जालंधराजवळ पार्वतीचें पुष्कळ वर्णन करून तेथून निघून गेला. जालंधराचे मनावर त्या गोष्टीचा ताबडतोब परिणाम झाला. आपण एवढें वैभव व शक्तियुक्त असतां पार्वती मिळविणें सहज आहे, असें त्याला वाटलें. कारण हातांत सत्ता असली ह्मणजे राज्यांतलि अपूर्व अशा वस्तु बलात्कारानें मिळविण्याची दुष्ट राजांना साहजिकच इच्छा होते. जालंधराची अवस्थाही तशीच झाली. त्याला पार्वती कव्हां मिळवीन असें झालें. हा सर्व परिणाम नारदाच्या अमिषाचा होता. अमिषामुळें जसा

मासा गळाला चिकटतो, त्याप्रमाणें जालंधर पापबुद्धीनें प्रेरीत होऊन विषयांध बनला. पार्वती ह्मणजे एक प्रकारच्या गळासारखी आहे हें त्याला त्यावेळीं मुळींच समजलें नाहीं.

जालंधरानें पार्वती मिळविण्याचा कृतसंकल्प केल्यावर त्यानें राहूला बोलावून आणिलें व त्याला सांगितलें, 'हे राहू, तूं आतांच्या आतां कैलासपर्वतावर जा, व तेथें महादेवाला भेटून माझ्यासाठीं पार्वती मागून आण. महादेवाला माझा असा निरोप सांग कीं, 'पार्वतीसारखी सुंदर स्त्री तुजसारख्या गोसाव्याजवळ असणें हें अत्यंत अनुचित होय. एवढ्यासाठीं तें स्त्रीरत्न तूं माझ्या स्वाधीन कर आणि तसें करशील तरच तूं सुरक्षित राहशील; नाहींतर तुझा माझ्याकडून केव्हां नाश होईल याचा नियम नाहीं. जी वस्तु आपणास शोभत नाहीं, ज्या वस्तूचें संरक्षण करण्याची आपणास शक्ति नाहीं, ती वस्तु आपल्याजवळ कधीं ठेवूं नये; ठेवल्यास तिचा उपयोग होण्याच्या ऐवजीं ठेवणाराचा नाश मात्र होतो. मस्तकावरील मण्यामुळें सर्पाचा जसा नाश होतो, किंवा कस्तुरीमुळें मृग जसा मरण पावतो, त्याप्रमाणें तूं पार्वतीला आपणाजवळ ठेवल्यास तुझा नाश होईल. आणखी त्याला असें सांग कीं, कावळ्याचे गळ्यांत ज्याप्रमाणें माणिक शोभत नाहीं, त्याप्रमाणें तुला पार्वती शोभत नाहीं; तेव्हां ती माझ्याकडे पोहोंचती कर. आणि तसें जर न करशील तर मी जालंधर कैलासांत येऊन बलात्कारानें त्या पार्वतीला घेऊन जाईन. तुला आपल्या जीविताची जर आशा असेल तर माझें मागणें मान्य कर" याप्रमाणें जालंधरानें राहूला निरोप सांगितल्यावर राहू तेथून मोठ्या वेगानें निघून कैलासावर गेला. त्या बिनशिराच्या राहूला अवलोकन करून नंदीला मोठें आश्चर्य वाटलें व त्यानें राहूला तूं कोण, कोठून आलास, काय काम आहे, असे प्रश्न केले. तेव्हां राहू ह्मणाला, मला राहू असें ह्मणतात. मी जालंधराचा दूत असून कांहीं कार्यासाठीं शंकराकडे आलों आहे. सबब माझी व शंकराची भेट करीव. राहूनें असें सांगितल्यावर नंदीनें राहूला हिमप्रासादांत नेऊन शंकरापुढें उभें केलें. शंकरानें त्याला तूं कोण व कशासाठीं आला आहेस, असा प्रश्न केला. तेव्हां राहूनें सर्व वृत्तांत निवेदन करून पार्वतीविषयींचा जालंधराचा निरोप कळविला. तो निरोप सांगत असतांना राहूनें शंकराची अतिशय निंदा केली व जालंधराच्या वैभवाचें स्तुतिस्तोत्र यथास्थित गाईलें. जालंधराचा असा उन्मत्तपणाचा निरोप ऐकून शंकर अत्यंत संतप्त झाले. ते ह्मणाले, "अरे मर्कटांनों, तुह्मांला लवकरच दुर्बुद्धि आठवली हें एक प्रकारें बरें झालें. मरण जवळ आलें ह्मणजे पतंग जसा दिव्यावर जाऊन उडी मारतो, किंवा कर्दली जशी मरणसमयीं प्रसवते; अथवा विनाशकाळ आला ह्मणजे मुंगीला जसे पंख फुटून ती आकाशांत उडते; त्याप्रमाणें तुह्मां राक्षसांना आतां मरणाचे डोहाळे होऊं लागले आहेत. अरे, जो ब्राह्मणाला मर्मभेदक बोलतो; जो तपस्व्याला दुखवितो; व जो साध्वीला त्रास देतो, त्यानें आपला विनाशकाळ जवळ आला असें निश्चयानें समजावें. हे जालंधरदूता, या उन्मत्तपणाबद्दल तुझा मी आतांच नाश केला असता, परंतु तुजसारख्या कीटकाला मारण्यांत अर्थ नाहीं."

असें ह्मणून शंकर स्तब्ध बसले. क्रोधातिरेकामुळें ते तप्त कांचनाप्रमाणें लाल झाले. त्यांचे ओंठ थरथर कांपूं लागले. त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. ते डोळे गरगर फिरवूं लागले. सर्व राक्षसांचा एकाचवेळीं निःपात करावा असें त्यांस वाटूं लागलें. जो उन्मत्त प्राणी मातृगमनाची इच्छा करीत आहे, त्याचा कोणत्या उपायानें नाश करावा या विचारानें त्यांना अगदीं भंडावून सोडलें. प्रत्येकक्षणीं त्यांचा संताप सारखा वाढत चालला. शेवटीं संतापाचा अतिरेक होऊन त्यांच्या ललाट प्रदेशापासून एक पुत्र निर्माण झाला. त्याचा वर्ण गौर होता, देह विशाल होता व त्यानें आपल्या जटा पाटीवर मोकळ्या सोडल्या होत्या. त्याचे डोळे विशाल असून वित्तवाप्रमाणें लाल होते. असा तो वीर पुरुष आरक्त डोळ्यानें राहूकडे पाहूं लागल्यावर राहूची घाबरगुंडी उडाली व तो तेथून पळूं लागला. तेव्हां त्या वीर पुरुषानें लागलेंच त्यास पकडलें. व मुष्टीघातानें त्याचा नाश करणार, इतक्यांत शंकर ह्मणाले, ‘अरे याचा नाश करूं नकोस. तो फक्त निरोप सांगणारा आहे. खरा अपराधी दुसराच आहे. त्याच्या नाशासाठीं मीं तुला निर्माण केलें आहे. तर याला सोडून दे.’ शंकराच्या आज्ञेप्रमाणें त्या वीर पुरुषानें राहूला उचललें व बर्बर देशांत फेंकून दिलें. मग तो वीरपुरुष महादेवाला ह्मणाला; बाबा, मला अत्यंत भूक लागली आहे तर कांहीं खावयास दे. तेव्हां महादेव ह्मणाले, वीरा तुझे तूंच आपले हस्तपादादि अवयव खा आणि क्षुधा शांत कर. महादेवांच्या आज्ञेप्रमाणें त्या मानसपुत्रानें आपले अवयव तोडले व ते खाऊन टाकिले. त्या वीरपुरुषाचें तें साहस पाहून महादेव त्याच्यावर अत्यंत प्रसन्न झाले. त्यांनीं त्याला पुन्हां हस्तपादादि अवयवयुक्त करून त्याचें नांव कीर्तिमुख असें ठेविलें.

इकडे राहू बर्बरदेशामध्यें पडल्यानंतर तो तेथून उठून कसाबसा जालंधरपुरास आला. आणि जालंधराला भेटून तो ह्मणाला, ‘हे जालंधरा, तुझा निरोप ऐकून महादेवानें माझी फार दुर्दशा केली. त्या कीर्तिमुखाच्या हातानें मी आज खात्रीनें मेलों होतों, परंतु महादेवांनीं मला जीवदान दिलें. मीं तुझा निरोप महादेवाला सांगितल्यावर ते अत्यंत संतप्त होऊन ह्मणाले, डोळ्यांतली बाहुली जशी कोणाला मिळणें शक्य नाहीं; किंवा वस्तूची छाया जशी वस्तूला सोडून जात नाहीं, त्याप्रमाणें पार्वती ही मजपासून दूर व्हावयाची नाहीं, व ती कोणाला मिळावयाचीही नाहीं.’ ते आणखी ह्मणाले, तुह्मीं आदिमायेसंबंधानें पापबुद्धि धारण केली, या तुमच्या उद्दामपणाबद्दल तुह्मास प्रायश्चित लवकरच देण्यांत येईल. आपला निरोप ऐकून महादेव फार संतप्त झाले व त्यांच्या मस्तकांतून एक वीरपुरुष उत्पन्न झाला. त्याचें नांव त्यांनीं कीर्तिमुख असें ठेविलें आहे. त्या कीर्तिमुखानें मला बर्बर देशांत फेंकून दिलें व तेथून मी मोठ्या कष्टानें तुला हा निरोप सांगण्यासाठीं येथें आलों आहें.

---

# अध्याय ५ वा.

## १. महादेव व जालंधर यांचें युद्ध.

मागें सांगितल्याप्रमाणें राहूनें सांगितलेली हकीकत ऐकून जालंधर अतीशय क्रुद्ध झाला आणि म्हणाला, ' आज त्रिभुवनांत माझी एवढी सत्ता, एवढें वैभव, आणि एवढें प्रचंड सैन्य माझ्याजवळ असून त्या यःकश्चित भिकाऱ्यानें माझी मागणी अमान्य केली काय? बरें आहे, मी आतां जाऊन तें सुंदर स्त्रीरत्न महादेवापासून बलात्कारानें आणितों. अशा सुंदर स्त्रीवर जर आमची सत्ता असूं नये, किंवा मागणी केल्याबरोबर जर ती आह्मांस मिळूं नये, तर आह्मी राजे कसले, व आमचा सत्ताधीशपणा तो कसला ? ज्या महादेवानें माझा शब्द अमान्य केला, माझ्या दूताची ज्यानें अवहेलना केली, आणि उद्दामपणानें ज्यानें मला उलट धमकीचा निरोप पाठविला, त्याला आतांच्या आतां शासन दिलें पाहिजे.' असें ह्मणून जालंधरानें आपल्या सेनापतीला बोलावून कैलासावर स्वारी करण्याची तयारी करण्यास सांगितलें. जालंधराचा हुकूम झाल्याबरोबर युद्धाची तयारी होऊं लागली. ढोल, नौबती, नगारे, कर्णे, तुताऱ्या वगैरे युद्धसूचक रणवाद्यें वाजूं लागलीं. त्या भयंकर आवाजांनीं दशदिशा दणाणून गेल्या; आकाश दुमदुमूं लागलें; व पृथ्वी कंपायमान झाली. वाद्यें वाजण्याबरोबर हत्ती, घोडे, उंट, रथ, पायदळ वगैरे सैन्य तयार होऊन एका ठिकाणीं जमूं लागलें. जालंधराजवळ अगणित सैन्य होतें. शिवाय त्याचे मांडलिक राजेही आपआपला प्रचंड सैन्यभार घेऊन युद्धाला आले होते. असें हें लक्षावधि अक्षौहणी सैन्य कैलासाच्या मार्गानें चालूं लागल्यावर तो देखावा मोठा प्रेक्षणीय व मनास थक्क करून सोडणारा दिसूं लागला. या उत्साहपूर्ण सैन्याच्या थयथयाटानें भूमीवरील धूळ आकाशांत उडाली, व त्यामुळें नीलवर्ण आकाशानें धूसर रंगाचें वस्त्र धारण केलें आहे किंवा सैन्याला सूर्यकिरणांपासून त्रास होऊं नये, ह्मणून तें एक धूलीमय छत्रच निर्माण झालें आहे असें वाटूं लागलें. सैन्याच्या रणवाद्यांचा गजर इतका प्रचंड होता कीं, जणूं काय तो महादेवाला युद्धाची सूचनाच देत आहे. वाद्यांचा ध्वनि ऐकूं आला नाहीं, तोंच सैन्याच्या चालण्यानें उडालेली धूळही निशाणाप्रमाणें दृष्टीस पडूं लागली. जालंधराबरोबर कोणत्या रितीनें युद्ध करावयाचें तें शंकरांनीं अगोदरच ठरवून आपलें सैन्य तयार केलें; व त्यावर नंदी, गणपती, वीरभद्र, कार्तिकस्वामी, वगैरे सेनानींची योजना केली. आणि उत्साहजनक असा आपला डमरु मोठ्यानें वाजविला, व जोरानें शंखनाद केला. त्या दोन्ही वाद्यांचा ध्वनि इतका प्रचंड झाला कीं, त्यानें संपूर्ण त्रैलोक्य भयभीत झालें; समुद्र खळबळूं लागला, मेरूपर्वत डळमळूं लागला, शत्रु गर्भगळित झाले; जालंधरही आपल्या रथांत दचकला व त्यासरसें त्याचा मुकुट खालीं पडला. इकडे शिवसैन्यांत त्या वाद्यध्वनीनें निराळाच परिणाम झाला. वीरांचे बाहू

स्फुरण पावूं लागले, कित्येक शस्त्रें पाजळूं लागले, कित्येकांची सूड उगवण्याची इच्छा प्रबल झाली; घोडे चौफेर धावूं लागले, हत्ती शुंडा वर करून शत्रूंकडे टवकारून बघूं लागले. याप्रमाणें शिवसैन्य सज्ज होऊन शत्रूंची येण्याची वाट पाहूं लागलें. मग शत्रुसैन्य जसजसें जवळ येऊं लागलें, तसतसा शिवसैन्याचा उत्साह अधिकाधिक वाढूं लागला. जालंधराचें सैन्य अगदीं आटोक्यांत आलें असें पहातांच त्यावर निकराचा हल्ला करण्याचा वीरभद्रानें आपले सैन्यास इशारा केला. त्याबरोबर शिवसैन्य जालंधराच्या सैन्यावर तुटून पडलें. पहिल्याच हल्ल्यांत जालंधराचे हजारों सैनिक मृत झाले; घोडे सैरावैरा पळूं लागले; हत्ती 'चीं, चीं' करीत मागें वळूं लागले; रथांचा चूर झाला; व सेनापती घाबरून मागें परतूं लागले. आपल्या सैन्याची अशी दाणादाण झालेली पाहून जालंधर भयभीत झाला. शुंभनिशुंभ यांनीं त्याला धीर दिला व पायदळाचें पायदळाशीं, घोडेस्वारांचें घोडेस्वाराशीं, हत्तीवर बसणाराचें हत्तीवर बसणाराशीं, आणि रथांत बसणारांचें रथांत बसलेल्यांशीं निकराचें द्वन्द्व युद्ध सुरू झालें. प्रत्येक सैनिक वीरश्रीनें आपआपलें देहभान विसरून युद्ध करूं लागला.

याप्रमाणें हें भयंकर युद्ध सुरू झाल्यावर दोहोंपक्षांकडील वीर पटापट मरूं लागले. शिवसैन्यांत वीरभद्र, कार्तिकस्वामी, गणपती, वगैरे सेनापती विशेष युद्धकुशल असल्यामुळें, ते क्षणोक्षणीं राक्षसांवर हल्ला करीत व त्यांचे हजारों वीर कापून काढीत. याप्रमाणें ते आपली शिकस्त करीत होते; पण दैत्यसेना मुळींच कमी झालेली दिसेना. याबद्दल त्यांना मोठें आश्चर्य वाटूं लागलें. ते ह्मणाले; हरक्षणीं आपण राक्षसांचे हजारों वीर कापून काढीत आहों, तरी त्यांचें सैन्य कायमच! शेवटीं शोध करतां त्यांना असें समजलें कीं, शुक्राचार्यांच्या संजीवनी मंत्राचा हा प्रभाव आहे. दैत्याकडचा जो कोणी मृत होतो, त्याला शुक्राचार्य मंत्रानें सजीव करितात. ही माहिती मिळाल्यावर वीरभद्र वगैरे सेनानी मोठ्या विचारांत पडले, व त्यांनीं ती गोष्ट शंकराच्या कानावर घातली. तेव्हां शंकरास फार राग आला. ते ह्मणाले, शुक्राचार्य जर ब्राह्मण नसता तर त्याला आतांच मारून टाकिलें असतें. त्या दुष्टाला मी आतां एका स्त्रीकडून पकडून आणवितों, ह्मणजे त्याची अप्रतिष्ठा होऊन तो गप्प बसेल, व आपलाही कार्यभाग साधेल. असें ह्मणून शंकरांनीं कृत्या नांवाची एक स्त्री निर्माण केली. उत्पन्न होण्याबरोबर त्या स्त्रीनें राक्षसांच्या सैन्यांत प्रवेश केला व हजारों वीर शुक्राचार्यांचें संरक्षण करीत असतांही त्यांना न जुमानतां शुक्राचार्याला तिनें बांधून नेलें. अशा रितीनें शुक्राचार्यांची राक्षससैन्यांतून उचलबांगडी झाल्यावर राक्षसांचे हजारों वीर रणांगणावर मृत होऊन पडूं लागले. तो प्रकार जालंधरास कळल्यावर तो अत्यंत संतप्त झाला. त्यानें आपला रथ थेट शंकराच्या अंगावर चालविला, परंतु शंकरानीं त्यास आपल्या शरवृष्टीनीं दूरच थोपवून धरिलें. शंकर जालंधरास पुढें सरकूं देत नाहींत असें पाहून त्यास साह्य करण्यासाठीं त्याचा सासरा काळनेमी शंकरावर धांवून येऊं लागला, पण त्यास नंदीनें मध्येंच

अडविलें. नंदीचें व काळनेमीचें निकराचें युद्ध झालें. नंदी हा साधारण पशु आहे! त्याला आपण तेव्हांच मारूं, या घमेंडीनें काळनेमी त्याच्यावर गेला; परंतु नंदीच्या विलक्षण शक्तीपुढें त्याचें कांहीं चालेना. नंदीनें थोडयाच वेळांत त्याला जर्जर करून खालीं पाडिलें आणि आपण त्याचे छातीवर उभा राहिला. हें पाहून शुंभवीर रथाखालीं उतरून काळनेमीच्या साह्यासाठीं नंदीवर वेगानें चाल करून गेला. परंतु त्यास गणपतीनें मध्येंच अडविलें. दोघे समानशक्ति असल्यामुळें त्यांचें घनघोर युद्ध झालें. दोघेही रक्तानें न्हाऊन निघाले. शेवटीं गणपतीनें त्या शुंभवीराला अगदीं जेरीला आणिलें. तेव्हां गणपतीच्यापुढें आपला टिकाव लागणार नाहीं असें पाहून तो रणांतून दूर पळाला. मग गणपतीवर निशुंभ नांवाचा राक्षस चालून आला. गणपती युद्ध करून थकला आहे, तेव्हां त्याला आपण क्षणार्धांत नाहींसा करूं, असा त्या निशुंभाला मोठा भरंवसा वाटून तो आपला रथ पुढें घालतो आहे, तोंच कार्तिकस्वामीची व त्याची गांठ पडली. क्रूर पशूप्रमाणें ते एकमेकांचा कंठनाळ छेदण्यासाठीं एकमेकांच्या अंगावर धांवून गेले. कार्तिकस्वामीनें त्या वेळीं आपला विलक्षण पराक्रम दाखविला. त्यांचें युद्धविशारदत्व पाहून सगळ्यांनीं तोंडांत बोटें घातलीं. निशुंभास कार्तिकस्वामी यमस्वरूपीच वाटून त्यानें रणक्षेत्रास पाठ दाखविली. इकडे काळनेमी नंदीच्या तडाख्यांतून थोडी विश्रांति घेऊन ताजातवाना झाल्यावर आपल्या सैन्याची झालेली दुर्दशा बघून फार क्रुद्ध झाला. रागाच्या आवेशांत तो एकदम सेनापति वीरभद्र याच्या अंगावर चालून गेला. वीरभद्राला तो काळनेमी एखाद्या क्षुद्र कीटकाप्रमाणें वाटला. त्याच्याबरोबर युद्ध करण्याची देखील वीरभद्राला लाज वाटूं लागली. वीरभद्रानें आपलें खड्ग त्याला मारण्याकरितां उचलण्याबरोबर काळनेमी घाबरून वेगानें रणांतून पळाला. अशा रितीनें शिवसैन्याचा एकसारखा विजय होत चालला आहे, हें पाहून स्वर्गांत देवांना फार आनंद झाला. त्या आनंदभरांत ते आपलीं सुस्वर वाद्यें वाजवूं लागले. त्यामुळें शिवसैन्यास अधिक उत्साह वाटूं लागला. आपल्या सैन्याची दुर्दशा झालेली पाहून जालंधर मोठ्या विचारांत पडला, व त्यास काय करावें तें सुचेना. त्यानें एकदम महादेवांवर हल्ला करण्याचें टरविलें आणि आपले महाप्रतापी योद्धे अश्वमुख, घस्मर, गळहाक, प्रचंड खड्गरोम व पांडर यांना एकदम महादेवांवर हल्ला करण्यास सांगितलें. जालंधराची आज्ञा झाल्याबरोबर ते सहा वीर आपआपला सैन्यभार घेऊन महादेवांवर एकदम तुटून पडले. एकाचवेळीं सर्वांनीं महादेवांवर भयंकर शरवृष्टि केल्यामुळें महादेव आच्छादित होऊन गेले; परंतु सूर्योदयाबरोबर जसा अंधार पळून जातो, त्याप्रमाणें महादेवांनीं आपल्या प्रचंड शंखरवानेंच ते लक्षावधि बाण हवेमध्यें उडवून लाविले. मग शंकरांनीं रागानें त्रिशूल अभिमंत्रून त्या राक्षसांवर सोडला. त्याबरोबर राक्षसांकडील हजारों वीर मृत्युमुखीं पडूं लागले. त्या त्रिशूळाचा नाश करावा म्हणून राक्षस सैन्यानें आपली शिकस्त केली, परंतु त्या त्रिशूळानें मागें न परततां राक्षसांचा संहारक्रम सुरूं ठेविला. त्रिशूळ आटोपत नाहीं असें पाहून

ते सर्व वीर मागें परतूं लागले, परंतु त्यांस मागेंही जातां येईना. कारण राक्षससेनापतींनीं शंकरावर हल्ला केला आहे, असें समजल्यावर वीरभद्र मोठ्या वेगानें शंकराच्या साह्यासाठीं आला होता. याप्रमाणें एकीकडून शंकर व एकीकडून वीरभद्र या दोघांच्या तडाख्यांत तें राक्षससैन्य सांपडल्यामुळें त्यांच्या फजीतीला पारावार उरला नाहीं. क्षणार्धांत हजारों राक्षस मृत होऊन पडले.

शंकरानें राक्षसांचा याप्रमाणें संहार केल्यामुळें देवांना अत्यंत हर्ष झाला. त्यांनीं शंकरावर पुष्पवृष्टि केली. जालंधराचा इतका मोड झाला तरी तो डगमगला नाहीं. अजूनही आपण शंकराचा मोड करूं, व शेवटीं पार्वतीला हरण करूं असा त्याला भरंवसा वाटत होता. त्यानें आपणाबरोबर निवडक लोक घेतले व शिवसैन्याची फळी फोडीत तो थेट शंकराजवळ आला. जालंधराचें तें असामान्य शौर्य पाहून शिवसैन्यानें थक्क होऊन 'शाबास जालंधर' ह्मणून उद्गार काढिले. महादेव व जालंधर यांच्या युद्धाचा चमत्कार पाहण्यासाठीं आकाशांत देवांच्या विमानांची दाटी होऊन गेली. कोणाचा जय होणार याविषयीं कोणासही निश्चय होईना. रणक्षेत्रावर दोन्ही रुद्रच युद्ध करीत आहेत कीं काय, असें त्या दोघांच्या युद्धकौशल्यावरून दिसूं लागलें. ऐरण आणि घण या दोघांचें युद्ध सुरू झाल्यावर ऐरण फुटणार कीं घण फुटणार, हें जसें ठरवितां येत नाहीं, त्याप्रमाणें शंकर व जालंधर रणक्षेत्रांत सारखेच शक्तिसंपन्न दिसूं लागले. दोघांच्या युद्धास गंभीररूप आलें. नंतर जालंधर मोठ्यानें गर्जना करून ह्मणाला, 'अरे दिगंबर जोगड्या, स्मशानांत बसून पिशाच्चलीला करणें हा आपला व्यवसाय सोडून तूं या रणक्षेत्रावर येऊन युद्धाच्या भानगडींत कशाला पडतोस? मी आपल्या बाहुबलानें तुझीं तीं पांचही मुखें आणि ते दहा हात आतांच नाहींसे करून टाकितों पहा! आपली अशी विटंबना करून घ्यावयाची जर नसेल तर, पार्वतीला माझ्या स्वाधीन कर, ह्मणजे मी तुला जिवदान देईन.' जालंधराचे हे निरर्गल प्रलाप ऐकून शंकरास हंसूं आलें. पर्वत जशी तृणाची पर्वा करीत नाहीं, किंवा सिंह जसा श्वान–सूकराकडे लक्ष देत नाहीं, अथवा कुत्र्याच्या भुंकण्याकडे हत्ती जसा बघत नाहीं, त्याप्रमाणें शंकरानीं त्याच्या बोलण्याकडे लक्षच दिलें नाहीं. त्यामुळें जालंधर अधिक संतप्त झाला व त्यानें एकाच वेळीं शंकरावर शंभर बाण टाकिले. परंतु कमळांच्या मारांनीं पर्वताला जशी इजा होत नाहीं, त्याप्रमाणें त्या शतबाणांनीं शंकरास कांहीं झालें नाहीं. मग शंकरांनीं आपलें धनुष्य हातीं घेऊन जालंधरावर बारा बाण सोडिले, परंतु ते जालंधरानें मध्येंच तोडून टाकून शंकरावर सहस्रबाणांची वृष्टि केली. ते बाण शंकरानीं सहज तोडून टाकिले. जालंधर हा धनुर्विद्येंत फारच कुशल होता. शंकर जरी त्याचे बाण मोठ्या त्वरेनें तोडीत होते, तरी त्यानें आपल्या शरवृष्टीनें शंकरास लवकरच आच्छादित केलें. कोट्यावधि बाणांच्या प्रहारानें क्षणेक विव्हल होऊन नंदीच्या पाठीवरून शंकर खालीं घसरले, परंतु लागलीच सावध होऊन त्यांनीं त्या सर्व बाणांचे तुकडे केले व तीन बाण सोडून, पहिल्या बाणानें

जालंधराचे घोडे मारिले; दुसऱ्या बाणानें सारथी मारिला; आणि तिसऱ्या बाणानें जालंधराचा रथ मोडून चूर केला. रथ मोडतांच जालंधरानें रथाखालीं उडी टाकिली आणि हातीं खड्ग घेऊन तो शंकरावर चालून गेला. तेव्हां महादेवांनीं त्याच्या हृदयावर त्रिशूल प्रहार केला. त्या भयंकर त्रिशूळानें जालंधराच्या शरीरावर एक क्षतही पडलें नाहीं. तो चमत्कार बघून शंकर आश्चर्यचकित झाले, व या राक्षसाचा नाश कोणत्या उपायानें करावा याचा विचार करूं लागले. मग त्यांनीं सर्व देवांच्या शक्ति मागून घेऊन, सुदर्शन नांवाचें चक्र तयार केलें, व तें जालंधरावर सोडिलें. त्रिभुवनाचा क्षणार्धांत नाश करणाऱ्या सुदर्शनचक्रानेंही जालंधराच्या शरीरावर कांहींच परिणाम झाला नाहीं. असो; असें युद्ध चाललें असतां जालंधरानें शस्त्रास्त्रांनीं शंकर आटोपत नाहीं, असें पाहून आसुरी माया योजण्याचा विचार केला.

## २ वृंदेचें पातिव्रत्यहरण.

जालंधर हा युद्धविद्येंत जसा निपुण होता, तसा तो मायावी विद्येंतही प्रवीण होता. त्यानें आपला कार्यभाग साधण्यासाठीं निराळीच योजना केली. त्यानें शंकराच्या सभोंवतीं अनेक सुस्वर वाद्यें वाजविणारे मायावी पुरुष निर्माण केले व त्यांच्याकडून शंकरास मोहित करून टाकिलें. तीं मंजूळ वाद्यें वाजूं लागल्यावर आपण रणांत आहोंत कीं विलासभुवनांत आहोंत, हें विसरून जाऊन महादेवांनीं आपलीं शस्त्रास्त्रें खालीं ठेविलीं व वाद्यध्वनि ऐकत ते स्वस्थ बसले. महादेवांना याप्रमाणें भूल पडतांच, जालंधर खोटीं भूषणें धारण करून कपटी शंकर बनला व कृत्रिम नंदीवर बसून हिमप्रासादांत गेला. प्रासादांत पार्वती, युद्धाचा काय परिणाम होतो याची चिंता करीत बसली होती. एकाएकीं महादेवांना तेथें आलेले पाहून तिला मोठें आश्चर्य वाटलें. ती त्या कपटी जालंधराला शंकरच समजून त्याच्यापुढें विनतभावानें उभी राहिली. पार्वतीचें तें भुवनमोहक सौंदर्य पाहून जालंधर अगदीं थक्क होऊन गेला, आणि मनांत ह्मणूं लागला, आपण धन्य आहों. नारदानें पार्वतीचें वर्णन केलें तें यथार्थ केलें. अशी लावण्यलतिका स्त्री जर आपल्या अंकावर बसेल तर आपल्या जन्माचें सार्थक होईल, व आपल्या येथें असलेल्या रत्नांत या स्त्रीरत्नाची भर पडेल. आपलें कपट पार्वतीला समजणार नाहीं, आणि आपण आपला कार्यभाग सहज साधूं, असा त्याला भरंवसा उत्पन्न झाला. तो पार्वतीपुढें उभा राहून कामातुराप्रमाणें ह्मणाला, 'पार्वती, मी रणांत युद्ध करीत असतांना कामानें अत्यंत विव्हल झालों, ह्मणून युद्ध सोडून तुजकडे आलों आहें, तरी माझी इच्छा पूर्ण कर.' त्या कपटी शंकराचें तें चमत्कारिक भाषण ऐकून पार्वतीला मोठें आश्चर्य वाटलें, व ती त्याकडे साशंकदृष्टीनें पाहूं लागली. ती आपल्या मनांत ह्मणाली, रणांत युद्ध करणाऱ्या योद्ध्याला कामवासना उत्पन्न होईल तरी कशी ? आणि जो खरा वीर असतो तो युद्धसमयीं स्त्रियांच्या अंगावरील वाऱ्यालादेखाल स्पर्श करीत नाहीं. मग स्त्रीशीं बोलणें आणि संभोग तर दूरच. याप्रमाणें पार्वती साशंकदृष्टीनें

त्याकडे पाहात त्या गोष्टीचा विचार करीत आहे, इतक्यांत त्या कपटी शंकराचें वीर्य स्खलन झालें. तो प्रकार पाहून पार्वती अधिक शंकित झाली, व हा शंकर नसून दुसरा कोणी तरी कपटी दुराचारी आहे, असें तिनें तात्काळ ओळखिलें. पार्वती अत्यंत रूपवती होती, तिच्या लावण्यांत विलक्षण मोहकता होती. जिचें सौंदर्य पाहून ब्रह्मदेवही मोहित झाला होता, त्या पार्वतीला बघून जालंधराची अशी अवस्था झाली यांत मोठेंसें नवल तें काय ? पार्वतीला शंकराचा अक्षय सहवास होता. शंकरानें कामाला जिंकल्यामुळें ते तिच्याशीं कधींही उच्छृंखलपणें वागत नसत. शंकराच्या मानसिक धैर्याची पार्वतीला पूर्ण ओळख होती. ह्मणून तिनें जालंधराचें तें अविचारीपणाचें वर्तन पाहून हा कोणी तरी कपटी राक्षस आहे, व माझ्या पातिव्रत्याचा नाश करण्यासाठीं शंकराचें रूप घेऊन आला आहे, असें जाणलें. ही कल्पना पार्वतीच्या मनांत येतांच तिला त्या दुष्टाची फार भीति वाटूं लागली; व ती अंतःकरणपूर्वक श्रीहरीचा धांवा करूं लागली. आपलें कापट्य पार्वतीनें ओळखिलें असें पाहून जालंधर लागलीच तेथून निघून गेला. पार्वती एकसारखा मधुसुदनाचा धांवा करीतच होती. ती ह्मणाली,-हे भक्तजनांचे कैवाऱ्या, हे मुकुंदा, तूं भक्तांचें दुःख नाश करणारा आहेस, तुझें नांव दीनवत्सल आहे. अनाथाचा आधार तूंच आहेस. हे देवा, या दुष्टाच्या तडाक्यांतून मला सोडीव.-पार्वतीनें अशी प्रार्थना करण्याबरोबर विष्णु तेथें येऊन दाखल झाले. पार्वतीनें जालंधराची सर्व हकीकत त्यांस कळवून त्याचा नाश करण्याविषयीं सांगितलें. तेव्हां विष्णु ह्मणाले, हे पार्वती, हा जालंधर मला अवध्य आहे. त्याचें मरण शंकराच्या हातूनच आहे, पण जोंपर्यंत त्याच्या स्त्रीचें पातिव्रत्य भंग पावणार नाहीं, तोंपर्यंत जालंधर मरणार नाहीं, असा जालंधराच्या स्त्रीला दुर्वासऋषींनीं वर दिलेला आहे. तेव्हां मी प्रथम वृंदेकडे जाऊन तिचें सतीत्व भग्न करितों, ह्मणजे शंकराकडून जालंधराचा सहज नाश होईल. असें पार्वतीला सांगून विष्णु तेथून निघाले व जालंधरपुरास येऊन शृंगारवाटिकेंत बसले. त्यांनीं आपल्याबरोबर शेषाला आणिलें होतें. आपण गुरु झाले, व शेषाला त्यांनीं आपला शिष्य बनविला. याप्रमाणें ते दोघे गुरुशिष्य तपस्व्याचा वेष धारण करून शृंगारवाटिकेंत बसले. ते ज्या दिवशीं तेथें येऊन राहिले, त्याच दिवशीं रात्रीं जालंधराची स्त्री वृंदा हिला भयंकर स्वप्न पडलें. स्वप्नदर्शनानें ती झोपेंतून दचकून जागी झाली व तिला अत्यंत भीति वाटूं लागली. वृंदेची ती चमत्कारिक स्थिति पाहून तिच्या सख्यांना फार आश्चर्य वाटलें; व त्यांनीं तिला असें होण्याचें कारण विचारिलें. तेव्हां वृंदा ह्मणाली,-'रात्रीं मला एक भयंकर स्वप्न पडलें. त्या स्वप्नांत मी असें पाहिलें कीं, माझा पति रेड्यावर बसून दक्षिण दिशेला चालला आहे. त्यानें आपलें केंस पाठीवर मोकळे सोडले असून त्याच्या अंगाला कित्येक स्त्रिया तेल लावीत आहेत. सख्यांनो, असें स्वप्न पाहिल्यापासून मला फार हुरहुर लागली आहे, माझ्या पतीची काय अवस्था असेल या काळजीनें मी अगदीं वेडी झालें आहें, आतां माझ्यानें या राजवाड्यांत राह-

वणार नाहीं. तर तुह्मी सर्वजणी मजबरोबर शृंगारवाटिकेंत चला, आणि आपण सर्वजणी युद्धवार्ता समजेपर्यंत तेथेंच राहूं; ह्मणजे मनाला कांहीं तरी बरें वाटेल.' वृंदेनें तशी इच्छा दर्शवितांच तिच्या सख्यांनीं बागेंत जाण्याची तयारी केली व सर्वजणी लागलीच शृंगारवाटिकेंत आल्या. तेथें आल्यानंतर वृंदा इकडे तिकडे हिंडूं लागली, व तिच्या सख्या भोजनाची वगैरे तयारी करूं लागल्या. वृंदा बागेंत फिरत फिरत आपल्या सखीजनापासून बरीच दूर गेल्यावर विष्णूनीं दोन कपटी राक्षस निर्माण केले, व त्यांना वृंदेला त्रास देण्याविषयीं आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें ते राक्षस वृंदेजवळ येऊन तिला भीति दाखवूं लागले. ते भयंकर राक्षस आणि त्यांच्या विचित्र लीला पाहून अगोदरच रात्रीच्या स्वप्नानें भयाकुल झालेली वृंदा फारच गर्भगळीत झाली, व संरक्षणासाठीं आपल्या सखीजनांकडे पळूं लागली. इतक्यांत दोन तपस्वी तिच्या दृष्टीस पडले. ते तपस्वी ह्मणजे वेषधारी विष्णु व शेष होत. त्या दोघां पूज्य तपस्व्यांना पाहून वृंदेला कांहीं धैर्य उत्पन्न झालें, व ती त्यांना शरण गेली आणि त्या दुष्टांपासून संरक्षण करण्याविषयीं प्रार्थना करूं लागली. तेव्हां विष्णूनीं आपला दंड फेंकून त्या दोन्ही राक्षसांचा नाश केला. तें त्या तपस्व्यांचें विलक्षण सामर्थ्य पाहून वृंदेच्या हृदयांत त्यांच्याविषयीं अधिक पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. ती त्या तपस्व्यांनां साष्टांग प्रणाम करून नम्रपणें ह्मणाली, 'अहो सत्पुरुषहो, तुमच्या अंगीं कांहीं विलक्षण सामर्थ्य आहे असें वाटतें; तुह्मी जर अंतरदृष्टीनें माझ्या पतीचें वर्तमान कळवाल तर मजवर तुमचे अगणित उपकार होतील. कैलासपर्वतावर एक सहस्र वर्षांपासून माझा पति जालंधर याचें व महादेवाचें घनघोर युद्ध चाललें आहे. त्या युद्धाच्या जयापजयाविषयीं आह्मांस कांहींच कळत नाहीं. तुह्माला अंतर दृष्टीनें त्यासंबंधानें जर कांहीं समजण्यासारखें असेल तर तें मला सांगावें; मी त्या जालंधराची स्त्री वृंदा आहें. ती युद्धवार्ता ऐकण्याविषयीं मी किती उत्सुक झालें असेन हें निदान तुह्मांला तरी सांगावयास नको.' वृंदेनें अशी प्रार्थना केल्यावर विष्णु तिला सहानुभूति दर्शवून ह्मणाले, वृंदे, तूं येथें स्वस्थ चित्तानें बैस. क्षणार्धांत युद्धवार्ता तुला समजेल. असें विष्णु वृंदेला सांगतात तोंच तेथें दोन विष्णुनिर्मित कपटी वानर आले व त्यांनीं वृंदेच्यापुढें जालंधराचें खोटें शीर टाकून दिलें. धडापासून नुकतेंच वेगळें केलें असल्यामुळें तें शिर रक्तानें लडबडलें होतें. तें शीर वृंदेपुढें टाकून तीं माकडें म्हणालीं, वृंदे, तुझा पति युद्धांत मरण पावला. युद्धांत शंकराला जय आला, त्यांनीं आपल्या त्रिशुळानें जालंधराचें शिर धडापासून वेगळें केलें. तूं त्याची सहधर्मिणी म्हणून आह्मीं हें शिर रणक्षेत्रांतून मुद्दाम तुजकडे आणिलें आहे. ती अशुभ वार्ता ऐकून व समोर पडलेलें तें पतीचें शिर पाहून तिच्या शोकास पारावार उरला नाहीं. ती दुःखानें वेडी होऊन गेली. ती आपलें मस्तक आपल्या करतलानें बडवून घेऊं लागली ! व हाय हाय ह्मणून क्षणोक्षणीं टाहो फोडूं लागली ! ती मोठ्या स्वरानें आक्रंदून म्हणाली,—हे प्राणेश्वरा, हे जीवितेश्वरा जालंधरा, तूं एवढा महा प्रतापवान् असून तुझी ही अशी अवस्था

व्हावी ना ? हे शृंगारसागरा, एकहजार वर्षांपासून जी आपली ताटातूट झाली ती कायमचीच झाली ना ? तरी मी म्हणत होतें कीं, अहो, परस्त्रीचा अभिलाष धरूं नका, सतीचा छळ करूं नका, साध्वी स्त्रियांना त्रास देऊं नका, परंतु माझें ऐकणें झालें नाहीं. पार्वतीचा अभिलाष धरला नसता, तर तुमची अशी अवस्था कां झाली असती ?—याप्रमाणें वृंदा अत्यंत शोक करीत असतां, त्या तपस्व्यानें तिची पुष्कळ समजूत केली; परंतु पतिनिधनासारख्या दुःखप्रसंगीं स्त्रीची समजूत तरी काय सांगून करणार ? वृंदा त्या शोकाकुल अवस्थतच तपस्व्यांना ह्मणाली, 'अहो साधुजनहो, तुमच्या अंगीं मोठें विलक्षण सामर्थ्य आहे असें मला मागील प्रकारावरून दिसून आलें आहे, तर तुह्मी मजवर कृपा करा, माझ्या पतीला जिवन्त करा आणि मला चुडेदान द्या. जर मला एवढी सौभाग्यभिक्षा घालाल तर मी तुमची अत्यंत ऋणी होईन. मला आपली धर्माची कन्या समजा, आणि या तुमच्या मुलीला हें पतिरत्न मिळवून द्या.' वृंदेचे ते दुःखोद्गार ऐकून वेषधारी विष्णूनें आपणास दया आली असें दाखवून ते तिला ह्मणाले, 'वृंदे, मी प्रयत्न करून बघतों. तुझ्या नशीबानें पति जिवंत झाल्यास बरेंच आहे, तथापि तुझा पति तुला खात्रीनें मिळेल असें मला वाटतें.' याप्रमाणें विष्णूनीं त्या वृंदेला आश्वासन देऊन ते जालंधराचें कृत्रिम शिर घेऊन वृंदेच्या दृष्टिआड झाले, व थोड्या वेळानें स्वतःच जालंधराप्रमाणें स्वरूप धारण करून वृंदेपुढें येऊन उभे राहिले. आपल्या पतीला सजीवावस्थेंत डोळे भरून पाहतांक्षणीं वृंदेला परमानंद झाला व तिनें त्या वेषधारी जालंधराच्या शरीराला कडकडून मिठी मारिली. प्रत्यक्ष भगवान् विष्णूनीं जालंधराचें स्वरूप धारण केल्यामुळें तिला हा खोटा जालंधर आहे, असा लवमात्रही संशय आला नाहीं. वृंदेनें जालंधराला आलिंगन दिल्यावर त्या कपटी जालंधरानें तिच्या कोमल गालाचें चुंबन घेऊन, तिचें कुशल विचारिलें. नंतर तो तिला एकांतांत नेऊन ह्मणाला, सखे वृंदे, तुझी व माझी गांठ आज हजार वर्षांनीं पडली आहे. यामुळें तुला पाहिल्याबरोबर मला कामेच्छा उत्पन्न झाली आहे; तर ती माझी इच्छा पूर्ण कर. वृंदेला त्या कपटी जालंधराचें तें ह्मणणें खरें वाटून पतीच्या प्रसन्नतेसाठीं तिनें त्यास संभोग दिला. त्यानंतर ती जों आपल्या पतीकडे पाहूं लागली तों तिला पतीचें स्वरूप कांहीं निराळें दिसूं लागलें. शंख, चक्र, गदा, पद्मधारी अशी ती विष्णूची चतुर्भुज मूर्ति बघून, तिला फार वाईट वाटलें; व तिनें तें विष्णूचें कपट तेव्हांच ओळखिलें. ती विष्णुवर अत्यंत क्रुद्ध झाली व त्याला रागानें म्हणाली, 'अरे कर्मभ्रष्टा वैकुंठपते, तूं मला फसवून माझ्या सतीत्वाचा निष्कारण नाश केलास. जे दोन राक्षस निर्माण करून तूं मला फसविलेंस. तेच पुढें तुझ्या स्त्रीला चोरून नेतील. तुला वैकुंठ अंतरेल, आणि ज्या माकडांकडून तूं कृत्रिम शीर आणविलेंस, त्या माकडांचेंच पुढें तुला साह्य मिळवावें लागेल. हा माझा साध्वीचा शाप भोगिल्याबांचून तुझी मुळींच सुटका नाहीं.' याप्रमाणें विष्णूस शाप दिल्यानंतर वृंदा मनांत

विचार करूं लागली कीं, मला विष्णूनें फसवून भ्रष्ट केलें. तेव्हां अशा स्थितींत जिवंत राहण्यापेक्षां मरण बरें. ज्या स्त्रिया परपुरुषाचा समागम घडवून आणतात, ज्या परपुरुषाचा अभिलाष धरितात, त्या महा पातकी होत. त्यांच्या पातकाला गणती नाहीं. सहस्रावधी वर्षें त्या नरकांत पडतात. असो; याप्रमाणें वृंदेच्या मनांत त्या व्यभिचाराविषयीं अनेक कल्पना येऊं लागल्या. तिनें आपल्या सख्यांना झालेली सर्व हकीकत मोकळ्या मनानें सांगितली, व या अशा अपमानकारक स्थितींत जिवंत न राहतां देहदहन करून घेण्याचा आपला विचार त्यांनां कळविला. तिच्या सख्यांनीं तिला तसें न करण्याविषयीं विनविलें, परंतु तिनें कोणाचेंहि न ऐकतां अग्नि तयार करून देहदहनाची पूर्ण तयारी केली. सर्व तयारी झाल्यावर वृंदेनें चितेला आपल्या हातानें अग्नि लावला व चिता प्रज्वलित झाल्यावर त्या भयंकर अग्नींत उडी टाकून तिनें आपला नाश करून घेतला. वृंदेची ती विलक्षण पतिभक्ति पाहून भगवान् विष्णु अत्यंत प्रसन्न झाले; व ते त्या चितेजवळ उभे राहून म्हणाले, हे वृंदे तुझी ही विलक्षण पतिभक्ति पाहून मी तुला प्रसन्न झालों आहें, तर तुझी इच्छा असेल तें माग. मी तुझें मागणें मोठ्या संतोषानें मान्य करीन. विष्णु असें म्हणाल्यावर त्या स्मशान भूमींतून असा शब्द निघाला कीं, हे गोविंदा, मीं तुळस या नांवाच्या वृक्षरूपानें पृथ्वीवर अवतीर्ण होईन तेव्हां तूं माझ्या ठिकाणीं निरंतर वास कर; म्हणजे लोक मला पवित्र मानतील. हा शब्द ऐकल्यावर विष्णु तेथें स्मशानांतच तुळस उगवेपर्यंत बसले.

## ३. जालंधराचा शेवट.

आपलें कपट पार्वतीनें ओळखिलें असें जाणून जालंधर हिमप्रासादांतून निघाला व रणक्षेत्रावर आला. तेथें जालंधरानें एक कृत्रिम पार्वती तयार केली, आणि शंकरासमोर ओढून आणून तिची तो विटंबना करूं लागला. ती मायावी पार्वती त्यावेळीं शंकराला वाईट वाटावें म्हणून मोठ्यानें आक्रोश करीत म्हणाली, अहो कैलासपते, धांवा धांवा! हा दुष्ट जालंधर तुमच्या समक्ष माझी विटंबना करीत आहे, याची कांहीं तरी लाज बाळगा. याप्रमाणें त्या मायावी पार्वतीचें ओरडणें ऐकून शंकरांना फार वाईट वाटलें. जालंधरानें आपणास आपल्या पराक्रमानें सर्वतोपरी नागविलें असें त्यांना वाटलें, परंतु त्या कृत्रिम पार्वतीचा विलाप ऐकून शंकरांना संशय उत्पन्न झाला, व ते ज्ञानदृष्टीनें त्या सर्व प्रकाराकडे पाहूं लागले. तेव्हां त्यांना तें जालंधराचें कपट स्पष्टपणें दिसून आलें. हा कपटप्रकार पहातांच शंकर अत्यंत क्रोधाविष्ट झाले; व आपल्या भयंकर शस्त्रांनीं राक्षसांचा एकसारखा संहार करूं लागले. त्यांचा प्रचंड शंखरव ऐकून शिवसैन्यही पुन्हा युद्धाला तयार झालें; व वीरभद्र, कार्तिकस्वामी, गणपती, वगैरे सेनापतींनीं आपआपला सैन्यभार घेऊन राक्षससैन्यावर चोहोंकडून निकराचा हल्ला केला. अगोदरच राक्षससैन्य टेंकीस आलेलें, त्यांत हा असा निकराचा हल्ला झाल्यावर तर त्यांच्या विटंबनेला सीमाच राहिली नाहीं. शिवसैन्याच्या प्रत्येक हल्यानें क्षणोक्षणीं राक्षसांचें त विशाल सैन्य हां हां म्हणतां नाहींसें होऊं लागलें. पळून जावें तर रस्ता

नाहीं. जिकडे नजर फेंकावी तिकडे शिववीर दृष्टीस पडत. असा क्रम चालल्यावर थोडक्याच वेळांत लक्षावधी राक्षस रणांत मरून पडले, रथ मोडून चूर झाले, हत्ती घोडे यांचीं प्रचंड शरीरें प्राण निघून गेल्यामुळें जमिनीवर लोळूं लागलीं व रणक्षेत्रावर जिकडेतिकडे रक्त व मांस यांचा चिखल होऊन गेला. एकाद्या विशाल नदीप्रमाणें रक्ताचा प्रवाह वाहूं लागला. त्या रक्तनदीमध्यें घोडे व हत्ती मोठ्या जलचराप्रमाणें दिसूं लागले. त्या प्रवाहांत वाहणारे हस्तपादादि अवयव हेच मीन–मगरासारखे दिसूं लागले. त्या रक्तगंगेचा असा विलक्षण प्रवाह पाहून गृध्रादि पक्षांना मोठा आनंद झाला, व त्या गृध्ररूपी ब्राह्मणांना स्नान, संध्या, तर्पण इत्यादिकाप्रमाणें सर्व कृत्यें करण्यास योग्य गंगा मिळाल्याबद्दल मोठें समाधान वाटूं लागलें. याप्रमाणें तें घन-घोर युद्ध चाललें होतें; राक्षसांवर चोहोंकडून शस्त्रवृष्टि होत होती; तरी जालंधर, शुंभ, निशुंभ वगैरे राक्षसवीर धैर्यानें युद्ध करीत होते. तिघेहि महादेवावर रोख धरून आपल्या शस्त्रास्त्रांचा उपयोग करीत होते; परंतु त्या वेळीं महादेवांनीं आपल्या युद्ध-नैपुण्यानें तिघांनांहि पराभूत करून टाकिलें. मग महादेवांनीं सुदर्शनचक्र हातांत घेऊन मोठ्या वेगानें जालंधरावर सोडिलें, त्याबरोबर फळीनें चेंडू जसा आकाशांत उडावा त्याप्रमाणें जालंधराचें शिर आकाशांत उडून खालीं पडलें; व जालंधराचें धड धांवत येऊन शंकराच्या चरणावर धाडकन हापटलें. त्याच्या शरीरांतून जी आत्मज्योति निघाली ती महादेवांच्या मुखांत प्रविष्ट झाली. जालंधर मेल्यावर राक्षससैन्य सैरावैरां पळूं लागलें. शुंभनिशुंभ हे दोघे महासेनानींहि रणांतून पळून गेले. त्यांनां पळतांनां पाहून महादेवांनीं शाप दिला कीं, तुम्हीं रणांतून पळालांत म्हणून तुम्हाला स्त्रीच्या ( आदीमाता ) हातानें मृत्यु येईल.

युद्धांत याप्रमाणें शंकरास जय आल्यामुळें सर्व देव, यक्षगण गंधर्वांसुद्धां कैलासावर येऊन शंकराचा जयजयकार करूं लागले. त्यांनीं शंकरावर पुष्पवृष्टि केली, व शंकराचा विलक्षण गौरव केला. त्यावेळीं तेथें सर्व देवांत विष्णु नाहींत असें पाहून महादेवांनीं त्यांची चवकशी केली. तेव्हां वृंदेची सर्व हकीकत सांगून इन्द्र म्हणाला, हे कैलासपते, वृंदेला अभिवचन दिल्याप्रमाणें भगवंत वैकुंठधाम सोडून स्मशानांत बसले आहेत. तुळशीचें दर्शन झाल्यावांचून उठणार नाहीं, असें प्रभूनीं सांगितलें आहे, विष्णूनीं तेथून उठावें म्हणून आम्हीं पुष्कळ विनवणी केली, परंतु ते आमचें मुळींच ऐकत नाहींत. मग त्यासंबंधानें स्वतःशी थोडा विचार करून महादेव म्हणाले; आपण सर्वजण आदिशक्ति जी मूळमाया अंबिका तिची स्तुति करूं म्हणजे ती आपणास प्रसन्न होईल. विष्णु स्मशानांतून कोणत्या उपायानें उठतील तें ती सांगेल. असें महादेवांनीं सांगितल्यावर सर्व देवांनीं मनोभावें करून आदिशक्तीची प्रार्थना केली. त्याबरोबर आदिमाया प्रगट झाली. देवीची ती दिव्यमूर्ती अवलोकन करून तिला सर्वांनीं वंदन केलें. मग शंकर तिला म्हणाले, ' हे देवी, श्रीहरी वृंदेला अभिवचन दिल्याप्रमाणें स्मशानांत बसले आहेत, ते कोणत्या उपायानें तेथून उठतील तें

आम्हांस सांग.' तेव्हां ती शक्ति म्हणाली, 'देवहो, तुम्हीं लक्ष्मी, पार्वती आणि सरस्वती यांजकडे जाऊन त्या देतील तें बी स्मशानांत पेरलें असतां तेथें तीन वृक्ष उत्पन्न होतील. त्यांचें दर्शन होतांच विष्णु स्मशानांतून उठेल.' असें सांगून ती आदिशक्ति अंतर्धान पावली. मग सर्व देव तेथून निघून बीजाकरतां पार्वतीकडे गेले पार्वतीनें त्यांस तुळशीचें बीं दिलें. तें घेऊन देव लक्ष्मीकडे गेले, तेव्हां तिनें मालतीचें (कोणी बेलाचें असें ह्मणतात.) बीं दिलें, आणि तेथून सावित्रीकडे गेले तेव्हां तिनें आंवळीचें बीं दिलें. अशीं तिन्हीं बीजें मिळाल्यावर देव स्मशानांत गेले, व त्यांनीं तेथें तीं तिन्हीं बीजें पेरलीं. नंतर योग्यकालीं त्या बीजांपासून तयार झालेल्या तिन्ही झाडांना अवलोकन करून विष्णूला फार आनंद झाला व त्यांनीं त्या झाडांच्या लहान लहान शाखा तोडून आपल्या मस्तकावर धारण केल्या. विष्णु म्हणाले, देवहो, ही तुळस म्हणजे साक्षात् वृंदा आहे. ही महापतिव्रता आहे. हिच्या दर्शनानें मला आनंद झाला. माझी भ्रांति नाहींशी झाली व माझें किल्मिष दूर झालें. एवढ्याकरितां मी असा वर देतों कीं, जो कोणी आपल्या दाराशीं बेलाचें, आंवळीचें किंवा तुळसीचें झाड लावील, त्याच्या घरीं मी सदैव वास करीन, व त्याला जन्ममरणांतून मुक्त करीन. जो कोणी मला एक तुळसीपत्र वाहील त्यांचीं हजारों जन्मीचीं पातकें नष्ट होतील. जे तुळशीच्या काष्ठाच्या माळा गळ्यांत घालतील त्यांना यमाचा विटाळ कधींहि होणार नाहीं. याप्रमाणें विष्णूनीं वर दिला व नंतर सर्व देवांसह ते वैकुंठधामीं गेले"

---

## अध्याय ६ वा.

### ऋतुध्वज आणि मदालसा आख्यान.

वैशंपायनऋषींनीं वृंदेची कथा सांगितल्यावर जनमेजय राजाला मदालसेची कथा ऐकण्याची इच्छा उत्पन्न होऊन तो वैशंपायनऋषीला म्हणाला, ऋषि या वृंदेप्रमाणेंच मदालसाही महासाध्वी होती असें मीं ऐकिलें आहे. तेव्हां तिची संपूर्ण कथा ऐकावी अशी इच्छा आहे. याकरतां ती मला निवेदन करावी. वैशंपायनऋषींनीं राजाची ती विनंति मान्य केली, व ते त्याला मदालसेची कथा सांगू लागले. ते म्हणाले, "राजा! पूर्वीं गंधर्वलोकीं विश्वावसु या नांवाचा एक पराक्रमी, औदार्यशील व सदाचारी असा पुण्यश्लोक राजा होऊन गेला. मदालसा ही त्या राजाची कन्या होय. ती कन्या विष्णूचा अंश होती असें व्यासानें लिहून ठेविलें आहे. त्या गंधर्वलोकांत वज्रपाद नांवाच्या एका प्रसिद्ध गंधर्वाचा पुष्करमाळी नांवाचा मुलगा होता. त्याला कुंडला नांवाची कन्या होती. त्या कन्येचा व मदालसेचा विलक्षण स्नेह होता. दोघी समवयस्क होत्या. लहानपणापासून दोघी एके ठिकाणीं राहत असल्यामुळें त्यांचा विलक्षण स्नेह वाढला होता. एक-

मेकीला एकमेकीवांचून क्षणभरदेखील करमत नसे. त्या दोघी एकमेकीस सोडून कधीं दूर जात नसत. खाण्यापिण्याचे वेळींसुद्धां एकमेकीचा वियोग त्यांस खपत नसे. त्या एकेच ठिकाणीं स्नान करीत व एकाच अंथरुणावर शयन करीत. तात्पर्य, त्यांचें सर्व व्यवहार एकत्र होत असत. फार तर काय, त्यांचें फक्त शरीर काय तें भिन्न, बाकी त्यांचा विचार व कृति हीं सर्व एकच असत. नेहमीं लोकांस दोघी एकत्र दृष्टीस पडत असल्यामुळें ते नेहमीं म्हणत कीं, जेथें कुंडला तेथें मदालसा ही असावयाची आणि जेथें मदालसा तेथें कुंडला ही असावयाचीच. तात्पर्य, त्या दोघींचा स्नेह, त्यांची एकमेकीविषयींची ममता, एकमेकीवरील प्रेम हें कांहीं अपूर्व असें होतें.

त्या दोघींचा स्नेह जसा अपूर्व होता, तशाच त्या दोघी सौंदर्यानेंही अपूर्व होत्या. त्यांचा प्रत्येक अवयव जेथल्या तेथें अगदीं रेखल्यासारखा होता. त्यांची अंगकांति सतेज व गौरवर्ण होती. त्या उपवर झाल्यावर तर अधिकच सुंदर दिसूं लागल्या. त्या दोघी जशा स्वरूपानें अद्वितीय होत्या, तशाच गुणानेंहीं अप्रतिम होत्या. त्यांचा स्वभाव प्रेमळ व मनमिळाऊ असे. त्या सुशील व नम्र होत्या. अशा त्या अलौकिक कन्याद्वयाची बातमी पाताळांत पाताळकेतु नांवाच्या राक्षसाला लागल्यावर त्या दोघी कन्या मिळविण्याची त्यास इच्छा उत्पन्न झाली. तो राक्षस मायावीविद्येंत फार प्रवीण असल्यामुळें त्यानें गंधर्व नगरांत येऊन सर्व लोकांस मोहिनी घालून बेशुद्ध केलें, आणि राजवाड्यांत जाऊन मदालसा व कुंडला या दोघींना उचलून पाताळांत नेलें. इकडे गंधर्वनगरांतील लोक शुद्धीवर येऊन पाहतात तों राजकन्या व कुंडला दोघींचा पत्ता नाहीं. दोघी नाहींशा झाल्याचें पाहून सर्वांना अत्यंत दुःख झालें. त्यांनीं त्या दोघींचा पुष्कळ शोध केला, परंतु कांहीं तपास लागेना. इकडे पातालकेतूनें दोघींना पाताळांत आणून एका उध्वस्त झालेल्या गांवांतील एका मोठ्या वाड्यांत कोंडून ठेविलें, आणि आपली इच्छा त्यांस सांगितली. त्या कबूल होत नाहींत असें पाहून त्यानें त्यांजवर बलात्कार करण्याचें मनांत आणिलें. परंतु दोघींनींही—आमच्या अंगास स्पर्श करशील तर आम्हीं जीव देऊं—असें सांगून आपलें कौमार्य भ्रष्ट होऊं दिलें नाहीं. शेवटीं तो राक्षस कंटाळला, व त्या दोघींना त्या वाड्यांत मोठ्या बंदोबस्तानें कोंडून ठेवून निघून गेला. त्यावेळीं त्या दोघी तरुणींची जी अवस्था झाली असेल तें सांगणें फार कठीण आहे. सुखशय्येवर अहर्निश लोळणाऱ्या त्या सकुमार कन्या एकाएकीं अशा भयंकर विपदावस्थेंत सांपडल्यामुळें त्यांना काय करावें तें सुचेना. त्या भीतीनें गांगरून जाऊन सारख्या रडूं लागल्या. कांहीं वेळानें शोकवेग थोडा कमी झाल्यावर आपल्या सुटकेचा मार्ग शोधूं लागल्या; परंतु सुटून जाण्यास त्यांनां एकही रस्ता दिसेना. शेवटीं निराश होऊन भगवानाशिवाय आतां आपला वाली कोणी

नाहीं, असें समजून त्या दोघीजणी एकसारखी भगवंताची करुणा भाकूं लागल्या. त्या म्हणाल्या; 'हे देवा, अनाथनाथा, भक्तरक्षका, दीनांचें रक्षण करणारा तुजशिवाय दुसरा कोणी नाहीं. देवा, आम्ही ह्या दुष्टाच्या हातांत सांपडून अतिशय त्रास पावत आहों. आमची या दुःखांतून मुक्तता कर.' त्यांची दीनवाणी श्रवण करून वैकुंठनिवासी लक्ष्मीरमणास दया आली व त्यांनीं त्या दोघींनां धीर देण्यासाठीं त्यांच्याकडे कामधेनूला पाठवून दिलें. कामधेनू प्रभूच्या आज्ञेप्रमाणें तेथें गेली, व त्या दोघींना पुष्कळ धीराच्या गोष्टी सांगून ती म्हणाली, 'हे राजकन्ये! थोड्या दिवसांत तुझी या वाड्यांतून सुटका होऊन तूं सुखी होशील. लवकरच येथें एक वीर पुरुष येईल, आणि पाताळकेतूचा नाश करून तुझी सुटका करील. त्या वीर पुरुषालाच तूं आपला पति समज व त्याच्या गळ्यांत माळ घाल.' याप्रमाणें त्या कामधेनूनें मदालसेला धीर देऊन ती निघून गेली.

## २. पातालकेतूचा संहार.

याच सुमारास यमुनेच्या कांठीं राहणाऱ्या गाल्व या नांवाच्या एका ऋषीनें आपल्या घरीं हजारों ब्राह्मण बोलावून एका यज्ञाला प्रारंभ केला होता. तेथें तो पातालकेतु राक्षस डुकराचें रूप घेऊन गेला, व त्यानें सर्व यज्ञस्थान रक्तमांसादिकांनीं भ्रष्ट करून टाकिलें. तें पाहून गाल्व वगैरे ऋषींना फार वाईट वाटलें, व त्यांनीं तें स्थान शुद्ध करून पुन्हा पूर्वकार्यास आरंभ केला. तेव्हां त्या राक्षसानें पुन्हा डुकराचें रूप धारण करून तेथें येऊन विघ्न केलें. असे बरेच वेळ झालें, तेव्हां गाल्वऋषीनें कंटाळून यज्ञ बंद केला व ब्राह्मणांना निरोप दिला. आणि आपण यज्ञसिद्धीसाठीं सूर्याची उपासना करण्यास आरंभ केला. तो एकाग्रदृष्टीनें सूर्याकडे अवलोकन करीत सूर्यमंत्राचा जप करूं लागला. याप्रमाणें सूर्यानुष्ठान झाल्यावर श्रीसूर्यनारायण गाल्वऋषीस प्रसन्न झाले व त्यांनीं त्याला एक अत्यंत वेगवान घोडा देऊन सांगितलें कीं, हे ऋषे, मी तुझ्या या अनुष्ठानानें प्रसन्न होऊन तुला हा घोडा दिला आहे. या घोड्याचें नांव कुवलयाश्व असें आहे. त्रैलोक्यांत याची बरोबरी करणारा दुसरा घोडा मिळणार नाहीं. याची गति अप्रतिहत अशी आहे. या अश्वाच्या साह्यानें तुझा यज्ञ पूर्ण होईल. याप्रमाणें गाल्वऋषीला अश्व देऊन सूर्यनारायण अंतर्धान पावले. अशा रीतीनें सूर्याचा प्रसाद मिळालेला पाहून गाल्वऋषीला फार आनंद झाला; परंतु आपण ब्राह्मण आहों, तेव्हां या घोड्याचा आपणाला काय उपयोग व याच्या साह्यानें आपण यज्ञ तरी कसा पूर्ण करणार, ह्याचें त्या ऋषीला मोठें कोडें पडलें. शेवटीं आपणासारख्यास या घोड्याचें संरक्षण करणेंही कठीण आहे; तेव्हां हा घोडा कोणा तरी राजाला नेऊन द्यावा, व त्याचें साह्य मिळवावें, असा गाल्वऋषीनें विचार केला; आणि तो घोडा घेऊन तो सूर्यवंशांतल्या शत्रुजित नांवाच्या राजाकडे गेला. तो राजा पराक्रमी असून अत्यंत उदार होता. गाल्व-

ऋषीला पाहून त्या राजाला फार संतोष झाला. त्यानें ऋषीचा मोठा सत्कार करून त्यांना आसनावर आणून बसविलें, व पूजा वगैरे केल्यावर कोणीकडे येणें केलेंत, म्हणून विचारिलें. तेव्हां गाल्वऋषी राजाला तो घोडा अर्पण करून म्हणाले, हे राजा, हा घोडा मला सूर्याकडून मिळाला आहे, तो तुला देण्यासाटीं आलों आहें; आणि माझी तुला अशी विनंती आहे कीं, पातालकेतू नांवाचा एक राक्षस आमच्या यज्ञांत नेहमीं विघ्न करीत असतो, त्याचा नाश करून आमचा यज्ञ निर्विघ्नपणें पार पडावा म्हणून तूं आपल्या ऋतुध्वज नांवाचा मुलगा माझ्याबरोबर पाठीव, म्हणजे माझा यज्ञ पूर्ण होईल. शत्रुजित राजा ती गाल्वऋषीची विनंति मोठ्या आनंदानें मान्य करून म्हणाला, महाराज, हा अश्व मला अर्पण करून आपण मजवर अनंत उपकार केले आहेत. अशा प्रकारचें सुंदर अश्वरत्न जवळ असणें हें क्षत्रियांस मोठें भूषणास्पद आहे. मी आपल्या ऋतुध्वजाला तुमच्या बरोबर यज्ञसंरक्षणासाटीं मोठ्या आनंदानें पाठवितों. ब्राह्मणाच्या योग्य कार्याला मदत करणें हा आह्मां क्षत्रियांचा धर्मच आहे. असें सांगून शत्रुजितानें ऋतुध्वजास बोलावून ऋषीबरोबर जाण्यास सांगितलें. ऋतुध्वजानें पित्याची आज्ञा शिरसामान्य केली; व तो कुवलयाश्वावर बसून मोठ्या उत्साहानें कालिंदी तटाकीं गाल्व ऋषीच्या आश्रमांत आला. याप्रमाणें यज्ञसंरक्षणाची काळजी दूर झाल्यावर गाल्वऋषीनें ब्राह्मणांस बोलावून पुन्हा यज्ञाला आरंभ केला. तेव्हां पाताळकेतु पुन्हां डुकराचें सोंग घेऊन आला व यज्ञकार्याला विघ्न करूं लागला, तें पाहातांच ऋतुध्वजानें त्याच्यावर एक बाण सोडिला. तो बाण त्या डुकराच्या हृदयांत शिरला व वेदनेनें तो सूकर कासावीस होऊन पळत सुटला. तेव्हां त्या राक्षसाचा नाश करण्याच्या इच्छेनें ऋतुध्वजानें आपला घोडा त्याच्या मागें लाविला. डुकर पुढें आणि ऋतुध्वज मागें याप्रमाणें ते दोघे पळत असतांना पाताळांत त्या उध्वस्त गांवाजवळ येऊन पोंचले. तेथें पोंचतांच तो मायावी राक्षस अदृश्य होऊन पळून गेला. राक्षस एकदम नाहींसा झालेला पाहून ऋतुध्वजाला फार आश्चर्य वाटलें. मग तो राक्षसाचा पिछा सोडून देऊन त्या शहरांत गेला. तें निर्जन शहर पाहून त्यास मोठें आश्चर्य वाटलें, व हा काय प्रकार आहे, तें जाणण्याची त्यास जिज्ञासा उत्पन्न होऊन चौकस बुद्धीनें त्या शहरांत तो हिंडूं लागला. तों मदालसा व कुंडला राहात असलेल्या वाडयाकडे त्याची नजर गेली. त्या वाडयाच्या उंच भागीं एका गवाक्षांत एक अत्यंत सुंदर स्त्री उभी असून ती आपणाकडे उत्सुकतेनें पहात आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. अशा निर्जन गांवांतील वाड्यांत त्या स्त्रीस पाहून राजपुत्र बुचकळ्यांत पडला; व त्या वाडयाजवळ जाऊन तो त्या स्त्रीला म्हणाला; हे स्त्रिये तूं कोण आहेस? आणि या अशा भयाण निर्जन वाड्यांत एकटी

कां राहतेस? तसेंच या शहरांत कोणी मनुष्य दिसत नाहीं, याचें कारण काय?' ऋतुध्वजाचा प्रश्न ऐकून ती स्त्री गंभीरतेनें म्हणाली, हे वीरपुरुषा, माझें नांव कुंडला आहे. गंधर्व लोकांत पुष्कर माळी म्हणून एक गंधर्व आहे, त्याची मी मुलगी आहे. मी मदालसेची सखी आहे. आतां तूं कोण, कोठील व येथें कशाकरितां आला, हें सांगशील तर आम्हीही आपली सर्व हकीकत तुला सांगू. कुंडलेचें भाषण ऐकून ऋतुध्वज म्हणाला, मला ऋतुध्वज असें म्हणतात. मी शत्रुजित नांवाच्या चक्रवर्ती राजाचा पुत्र आहे. मी गाल्व-ऋषीच्या आश्रमांत यज्ञ संरक्षणाकरितां आलों असतां, तेथें पातालकेतु राक्षस यज्ञास विघ्न करूं लागला, म्हणून त्याचा नाश करण्यासाठीं पाठलाग करीत येथें आलों आहे.' ऋतुध्वजानें सांगितलेली हकीकत ऐकून कुंडलेला फार आनंद झाला, व तिनें राजपुत्राला वाड्यांत येण्याविषयीं विनंती केली. विनंतीप्रमाणें ऋतुध्वज वाड्यांत गेला, तों तेथें मदालसा त्याच्या दृष्टीस पडली. या उभयतांची नजरानजर होतांच दोघेहि एकमेकांच्या अतुल सौंदर्यश्रीनें चकित झालीं. कुंडलेनें राजपुत्राला बसण्यासाठीं आसन देऊन त्याला मदलसेची सर्व हकीकत सांगितली. तसेंच तिनें मदालसेलाही ऋतुध्वजाची हकीकत निवेदन केली. ती हकीकत ऐकून मदालसेला कामधेनूच्या बोलण्याची स्मृति झाली व तिनें मनानें ऋतुध्वजास वरिलें. त्या तरुण राजपुत्रास पाहून मदालसेची अवस्था चमत्कारिक झाली. तिच्यावर मदनाचा पूर्ण पगडा बसला, व ती कामशरानें विव्हल होऊन गेली. तिचें हृद्गत जाणून कुंडला ऋतुध्वजाची प्रार्थना करून ह्मणाली, हे राजपुत्रा! ऋतुध्वजा, माझ्या सखीची तुला वरण्याची इच्छा आहे तर तिला तूं पदरांत घे. त्या नीच पातालकेतु राक्षसानें आम्हांला येथें आणून ठेविल्यावर, आम्हीं शोकाकुल होऊन विष्णूचा धांवा करूं लागलों असतां कामधेनूनें येथें येऊन आमचें शांतवन करून सांगितलें कीं, 'लवकरच एक राजपुत्र तुमची सुटका करील, व त्यासच मदालसेनें वरावें.' कामधेनूच्या सांगण्याप्रमाणें आपण आमची सुटका केली त्या अर्थीं मदालसेचा हेतू पूर्ण करणें आतां आपल्याकडे आहे. ऋतुध्वजानें ती गोष्ट मोठ्या आनंदानें कबूल केली. ती सौंदर्यवती आपणास प्राप्त व्हावी असें ऋतुध्वजास तिला पाहिल्यापासून झालें होतें. मदालसेच्या स्वीकाराविषयीं कुंडलेची विनंति ऐकून तर त्यास फारच आनंद झाला. व त्याची संमती मिळतांच कुंडलेनें त्या दोघांच्या गांधर्वविवाहाची तयारी करून त्या दोघांचें लग्न लावून दिलें.*

याप्रमाणें ऋतुध्वज व मदालसा यांचा विवाह झाल्यावर ऋतुध्वज त्या वाड्यांत मदालसेसह मोठ्या आनंदानें राहूं लागला. इकडे पातालकेतु राक्षसाला तें वर्त-

---

* मूळ ग्रंथांत कुंडला व मदालसा या दोघींचाही विवाह ऋतुध्वजाबरोबर झाला असें आहे. परंतु कुंडलेचा संबंध पुढें कोठेंहि आलेला नाहीं.

मान समजलें तेव्हां ता अत्यंत क्रुद्ध होऊन, त्या सर्वांना मारण्यासाठीं वाड्याकडे येऊं लागला. राक्षस येत आहे असें पाहतांच आपल्या तीक्ष्ण बाणानें त्यास ठार केलें. पाताळकेतूचा ऋतुध्वजानें वध केला असें पाहतांच त्याचें सैन्य अत्यंत खवळलें व तें एकदम वाड्यावर चालून आलें. तें पाहून मदालसा व कुंडला अत्यंत भयभीत झाल्या, व आपल्यामुळें ऋतुध्वज धोक्यांत सांपडला याबद्दल तर त्यांनां फारच वाईट वाटूं लागलें. त्यावेळीं ऋतुध्वज त्यांना धीर देऊन म्हणाला तुम्हीं स्वस्थ असा, तुम्हाला भिण्याचें मुळींच कारण नाहीं. राक्षस कितीहि असले तरी मी त्या सर्वांचा नाश करण्यास समर्थ आहे. असें म्हणून ऋतुध्वज वाड्याच्या बाहेर पडला व त्यानें आपल्या पराक्रमानें त्या सर्व राक्षसांचा क्षणार्धांत संहार करून टाकिला. याप्रमाणें विघ्न टळलेलें पाहून दोघींना फार आनंद झाला. पतीचें तें युद्धनैपुण्य पाहून मदालसेला तर मोठी धन्यता वाटूं लागली. मग ऋतुध्वज त्या दोघींना बरोबर घेऊन आपल्या नगरांत परत आला. शत्रुजित राजाला आपला मुलगा विजयी होऊन पत्नीसहित येत आहे असें समजतांच फार हर्ष झाला. त्यानें त्याचा गौरव करण्यासाठीं नगर शृंगारिलें; व आपण सरदार, सेनापती, अमीर, उमराव, वगैरे बरोबर घेऊन ऋतुध्वजाला सामोरा आला. आपल्या विजयी मुलाला पाहून शत्रुजित राजाचें हृदय प्रेमानें उचंबळूं लागलें, डोळे अश्रूंनीं भरून आले, व त्याचा आनंद गगनांत मावेनासा झाला. मग शत्रुजितानें या सर्वांना मंगल वाद्यांच्या गजरांत शहरांतून मिरवीत मिरवीत राजवाड्यांत आणलें; आणि यथाशास्त्र रीतीनें मुलाचा लग्नविधि केला. चार दिवस मोठा सोहळा करून राजानें अतीत अभ्यागत व आपले सर्व प्रजाजन यांनां संतुष्ट केलें. चार दिवस राहून कुंडला मदालसेचा निरोप घेऊन गंधर्वलोकीं निघून गेली.

## ३. मदालसा अग्निकाष्ठ भक्षण.

राजपुत्र ऋतुध्वजानें नगरांत आल्यावर मदालसेसाठीं एक सुंदर महाल तयार करविला आणि मदालसेसह त्या नव्या वाड्यांत तो आनंदानें राहूं लागला. त्या उभयतांचें एकमेकांवर इतकें विलक्षण प्रेम जडलें कीं, त्यांनां एकमेकांवांचून घटकाभरहि करमेनासें झालें. जसें एखाद्या वस्तूला तिची सावली सोडून राहत नाहीं, किंवा ब्रह्माला जशी प्रकृति सोडून राहत नाहीं, त्याप्रमाणें ते दोघे एकमेकांस सोडून राहत नसत. कमलिनींत जसा भुंगा सांपडावा त्याप्रमाणें ऋतुध्वज तिच्या प्रेमांत गुंतून गेला होता. त्याचें राज्यकारभारांतलें लक्ष नाहीसें झालें. बापाची व त्याची गांठही पडेनाशी झाली. राजपुत्राचा तो स्त्रीलंपटपणा पाहून शत्रुजिताला फार वाईट वाटलें, व मुलाच्या वर्तनाकडे आतांच दुर्लक्ष केल्यास त्याला पुढें राज्यसूत्रें मुळींच हालवितां येणार नाहींत अशी त्याला भीति वाटूं लागली. त्यानें एके दिवशीं दूत पाठवून ऋतुध्वजाला बोलावून

आणलें व त्याला तो म्हणाला, 'ऋतुध्वजा, या पृथ्वीवर अनेक ऋषि यज्ञयागादि कृत्यें करीत असतात; त्यांचें संरक्षण करणें राजाचें कर्तव्य आहे, कारण ते जें कांहीं तप किंवा यज्ञयागादि कृत्यें करितात, त्या पुण्यांचा षष्ठांश राजाला अनायासें मिळतो. एवढ्याकरितां तूं प्रत्यहीं सर्वत्र फिरून कोणाला कांहीं त्रास होतो किंवा काय याचा शोध करीत जा.' बापाच्या आज्ञेप्रमाणें राजपुत्र दररोज कुवलयाश्वावर बसून ऋषींच्या समाचारास जाऊं लागला. तो घोडा अत्यंत वेगवान् असल्यामुळें ऋतुध्वज सकाळीं सूर्योदयाबरोबर निघे तो सर्व पृथ्वी फिरून दुपारीं भोजनासाठीं परत घरीं येई. व नंतर पुन्हां सूर्योदय होईपर्यंत मदालसेच्या महालांत जाऊन राहत असे. याप्रमाणें त्याचा नित्यक्रम सुरू असतां एके दिवशीं प्रातःकाळीं तो यमूना नदीच्या तटाकीं आला. तों तेथें त्याला एक ऋषी भेटला. वास्तविक तो ऋषी नसून एक मायावी राक्षस होता. त्याचें नांव तालकेतु असें होतें. तो पातालकेतूचा पुत्र असून ऋतुध्वजानें बापाचा नाश केल्यामुळें त्याला ऋतुध्वजाचा फार राग आला होता, व कोणत्या तरी उपायानें ऋतुध्वजाचा नाश करण्यासाठीं त्याचा प्रयत्न चालला होता. तो मायावी ऋषी ऋतुध्वजाला म्हणाला, हे राजपुत्रा, मला वरुणानें भेटण्याकरितां बोलाविलें आहे, एवढ्याकरितां तुझ्या गळ्यांतील मोत्याचा कंठा क्षणभर दे. मी वरुणास भेटून परत आल्यावर तुझा कंठा तुला परत देईन. मी परत येईपर्यंत तूं येथेंच बसून माझ्या या आश्रमाचें संरक्षण कर. नाहीं तर दुष्ट असुर येतील व आश्रमांत कोणीच नाहीं असें पाहून त्यास ते अपवित्र करतील. ऋतुध्वजानें ऋषीचें तें म्हणणें मोठ्या आनंदानें मान्य केलें व आपल्या गळ्यांतील कंठा काढून ऋषीच्या स्वाधीन केला. ऋषीनें तो मोत्यांचा हार गळ्यांत घातला आणि पाण्यांत बुडी मारून दुसरीकडे निघून गेला. व ऋतुध्वज ऋषीच्या सूचनेप्रमाणें आश्रमाचें संरक्षण करीत बसला.

तो दुष्ट तालकेतु राक्षस याप्रमाणें ऋतुध्वजाला फसवून तेथून निघाला तो क्षणार्धांत शत्रुजित राजाचे नगरांत त्याच ऋषीवेषानें आला. तेथें तो कंठा हातांत धरून अश्रु गाळीत राजाकडे गेला. ऋषीला दुःखित पाहून राजाला फार वाईट वाटलें. त्यानें ऋषीचें सांत्वन करून त्यास आसनावर बसविलें; व दुःखाचें कारण विचारिलें. तेव्हां तो दुष्ट तालकेतु प्रेमाचा खोटा आव आणून अत्यंत दुःख करीत आर्त स्वरानें म्हणाला, राजा काय सांगूं! माझ्या दुर्दैवानें दुःखकारक वर्तमान कथन करणें माझ्या कपाळीं आलें आहे. तुझा पुत्र ऋतुध्वज आमच्या आश्रमांचें संरक्षण करीत असतां, कांहीं राक्षस तेथें आले, व आम्हांला फार त्रास देऊं लागले. आमच्या यज्ञाचें सर्व साहित्य त्यांनीं फोडून टाकलें व पोथ्यापुस्तकें जाळूं लागले. अशा रीतीनें आम्हांस अति त्रास देऊं लागले, तेव्हां ऋतुध्वज त्यांच्याशीं युद्ध करूं लागला, परंतु ऋतुध्वज एकटा व

राक्षस पुष्कळ असल्यानें तो त्यांच्या तडाक्यांत सांपडून शस्त्रप्रहारांनीं मूर्छित पडला, तेव्हां मी त्याच्याजवळ जाऊन सावध करूं लागलों; पण तो पुष्कळ घायाळ झाल्यामुळें अगदीं मरण्याच्या बेतांत आला होता. मी जवळ आलों आहें असें पाहून प्राण सोडतेवेळीं तो मला म्हणाला, 'हे ऋषे, हा माझ्या गळ्यांतील कंठा माझ्या बापाला नेऊन द्या, व त्याला माझी ही सर्व हकीकत कळवा.' त्याच्या मरणानंतर आम्हीं सर्व ऋषींनीं मिळून तुझ्या पुत्राला वेदमंत्रांनीं दहन केलें आणि मी ही दुःखकारक हकीकत सांगण्याकरितां तुजकडे आलों आहे. राजा, प्रसंग वाईट तर खराच, पण त्याला कोणाचा उपाय आहे ? मृत्यूपुढें कोण काय करणार! असो. झालें तें झालें! आतां तूं हा हार मदालसेला दे व त्याबरोबर मदालसेचें सहगमन करीव, म्हणजे परलोकीं तें ऋतुध्वजाच्या सुखाला कारण होईल. असें सांगून तो दुष्ट तालकेतु तेथून निघून गेला. राजा त्या शोकवार्तेनें अत्यंत दुःखित झाला. एकुलता एक सद्गुणी मुलगा मेल्यामुळें त्याला आपलें सर्वस्व नाहींसें झालें असें वाटून सर्व जग शून्य दिसूं लागलें. तें दुःखकारक वर्तमान मदालसेला कसें सांगावें, याचा त्याला मोठा विचार पडला. शेवटीं सांगितल्यावांचून इलाज नाहीं असें पाहून तो मदालसेच्या महालांत गेला, व मोठ्या कष्टानें ती सर्व हकीकत त्यानें तिला सांगितली. ती हकिकत ऐकतांच मदालसेला मस्तकावर वीज कडाडून पडावी याप्रमाणें झालें; कारण पति म्हटला म्हणजे साध्वी स्त्रियांचें दैवत असतें. त्या पतीला आपलें वर्चस्व समजतात. तेव्हां अशा प्रसंगीं त्यांना किती दुःख होत असेल याची कल्पनाच करणें कठीण आहे. मदालसेचें ऋतुध्वजावर विलक्षण प्रेम होतें. ती आपल्या पतीला घटकाभरही विसंबत नसे. ती शोकवार्ता ऐकतांच तिचे पंचप्राण नष्ट झाले, व भूमीवर निचेष्ट पडली. शत्राजित राजानें तिला सावध करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु त्यांत त्याला यश आलें नाहीं. आपल्या आवडत्या स्नुषेला एकाएकीं मृत झालेली पाहून शत्राजित राजाचा शोकावेग फारच वाढला. पुरोहितांनीं पुष्कळ धीराच्या गोष्टी सांगून राजाचें सांत्वन केलें, व तो कंठा व मदलसा यांचें दहन करविलें. त्या वेळीं त्या अग्निज्वालाकडे पाहून शत्राजिताच्या डोळ्यांतून एकसारखे अश्रु वाहूं लागले. त्याच्या हृदयांतील दुःखाग्नी बाहेरच्या ज्वाळांपेक्षांहि अधिक भडकून गेला होता. तो शोकाकुल होऊन म्हणाला, 'बा, ऋतुध्वजा! तूं वीरांमध्यें खरोखर धन्य आहेस. आपला प्राण ऋषींच्या संरक्षणासाठीं खर्च केला हें तूं मोठें सत्कृत्य केलेंस. तशीच ही मदालसाहि महासाध्वी होय. केवढें हें हिचें पतीवरील प्रेम! जिनें पतीच्या नुसत्या निधनवार्तेनें आपला प्राण सोडला!' याप्रमाणें त्या दोघांचे गुण आठवून त्या राजानें पुष्कळ शोक केला. दहनविधी पुरा करून सर्व लोक परत आल्यावर राजानें राज्यकारभारांतील आपलें लक्ष काढून घेतलें, आणि सर्वसंगपरित्याग करून वानप्रस्थाश्रम ग्रहण केला.

इकडे यमुनेच्या कांठीं राजपुत्र ऋतुध्वज, ऋषीच्या आश्रमाचें संरक्षण करीत ऋषीची वाट पाहत बसला होता. आपला कार्यभाग झाल्यावर तो तालकेतु एक कृत्रिम मोत्याचा कंठा घेऊन तेथें आला, आणि तो ऋतुध्वजाला देऊन, खरोखर तूं धन्य आहेस, तूं खरा क्षत्रिय असून ऋषींचें संरक्षण करण्यांत अगदीं तत्पर आहेस, तुला मजसाठीं फार त्रास सोसावा लागला, आतां तूं आपल्या नगरांत खुशाल परत जा, व आनंदानें कालक्रमण कर. असें म्हणाला. ऋषीची आज्ञा होताच ऋतुध्वज आपल्या घोडयावर बसला व आपल्या नगरांत येण्यासाठीं तेथून निघाला. नगराच्याजवळ येऊन पाहतो तों नगराचें स्वरूप कांहीं निराळेंच त्याच्या दृष्टीस पडलें. नगराची पूर्वीची मनोरमता नाहींशी होऊन तें एखाद्या स्मशानाप्रमाणें त्याला दिसूं लागलें. मंगलवाद्यांचा गजर ऐकूं येईना; व शहरासभोंवती संरक्षणाकरितां पूर्वीप्रमाणें सैन्य वगैरे कांहींच दिसेना; हा विपरीत प्रकार पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें. व नगरांत जिकडे तिकडे सामसुम पाहून भीति व आश्चर्य यांनीं त्याच्या मनांत अनेक कल्पना येऊं लागल्या. अशा स्थितींत तो राजवाडयाकडे चालला असतां त्याला पाहून लोक फार आश्चर्यचकित झाले. कोणासही त्याचे बरोबर बोलण्याचें धैर्य होईना. जो तो स्तब्ध दृष्टीनें त्याजकडे टक लावून पाहूं लागला. ऋतुध्वज राजवाडयापुढें येऊन उभा राहिला तेव्हां द्वारपाळांनीं तें वर्तमान राजाला जाऊन सांगितलें. तें ऐकून राजाला किती आश्चर्य वाटलें असेल व प्रत्यक्ष मुलाला पाहून त्याला किती आनंद झाला असेल, याची कल्पना करणेंहि कठीण होय. परंतु त्या राजाला झालेला तो आनंद लवकरच मावळून गेला. मदालसेचें वर्तमान ऋतुध्वजाला कळल्यावर त्याची समजूत कशी करावी, या काळजींत शत्राजित राजा चूर होऊन गेला. तो ऋषि कोणी तरी कपटी राक्षस असावा व त्यानें खोटें वर्तमान सांगून मदालसा व ऋतुध्वज यांची मुद्दाम ताटातूट केली असावी असें राजानें जाणलें. राजाची ती चिंताग्रस्तमुद्रा, व तो राजचिन्हविरहित वेष पाहून ऋतुध्वज अधिक घोटाळ्यांत पडला, व हें काय गौडबंगाल आहे हें त्याला कांहींच कळेना. त्यानें आल्याबरोबर बापाच्या चरणावर मस्तक ठेविलें, व हा काय प्रकार आहे, असें त्यास विचारिलें. तेव्हां शत्राजित राजानें पुत्रास हृदयीं धरून आरंभापासून घडलेली व मदालसेची सर्व हकिकत त्यास सांगितली.

तें वर्तमान ऐकून ऋतुध्वज अतिशय दुःख करूं लागला. तेव्हां राजा अनेक प्रकारें त्याचें शांतवन करूं लागला. तो म्हणाला, ' झालेल्या गोष्टीस कोणाचा उपाय आहे ! तुझा कंठा घेऊन आलेला तो ऋषि कोणीतरी कपटी राक्षस असावा. त्यानें खोटें सांगून हा सर्व नाश करविला. तूं मृत झाल्याचें ऐकून नगरांतील सर्व लोकांनांही अत्यंत दुःख झालें; व त्यांनीं तुझ्यासाठीं आपले सुखविलास सोडून देऊन वैराग्यावस्था धारण केली आहे. तुला सुखरूप परत आलेला पाहून

मला व या नगरवासी जनांला किती आनंद झाला आहे, हें तूं प्रत्यक्ष पहात आहेसच. झालेल्या गोष्टीबद्दल तूं मुळींहि चिंता करूं नकोस. तुझ्यासारख्या राजपुत्राला मदालसेपेक्षांहि अनेक सुंदर स्त्रिया मिळतील.' याप्रमाणें बापाचें भाषण ऐकून ऋतुध्वज ह्मणाला, बाबा, एक स्त्री मृत झाल्यावर दुसरी स्त्री करणें हा मनाचा खरोखर निष्ठुरपणा होय. जो मनुष्य स्त्री ह्मणजे बाजारांत विकत मिळणारी वस्तु आहे असें समजतो; अशा असंमजस मनुष्यास अनेक स्त्रिया करणें योग्य वाटेल. परंतु जिला मी आपला जीव कीं प्राण समजत होतों, जिचें माझ्यावर निस्सीम प्रेम होतें, आणि मी मृत झाल्याचें ऐकल्याबरोबर जिनें आपला प्राण सोडला, अशा स्त्रीच्या पश्चात् मी दुसऱ्या स्त्रीबरोबर विवाह करून संसारसुखाचा उपभोग घ्यावा, हें खचित अनुचित होय. पशुपक्षीदेखील आपल्या स्त्रीच्या पश्चात् विरहावस्थेंत दिवस कंठितात, मग मनुष्यानें आपल्या आवडत्या स्त्रीच्या पश्चात् दुसऱ्या स्त्रीबरोबर विवाह करणें हें पशुपेक्षांहि नीच-पणाचें कृत्य नव्हे काय? आतां मला मदालसेशिवाय अन्य सर्व स्त्रिया आई-बहिणीप्रमाणें आहेत. स्त्रिया या पुरुषापेक्षां अधिक प्रेमळ असल्यामुळें अशा दुःखाच्या प्रसंगीं त्या अधिक वेड्या होतात व त्यांच्या कोंवळ्या हृदयावर कांहीं भलताच परिणाम होऊन त्या प्राणत्याग करितात, किंवा सहगमन करितात. परंतु पुरुषानें या मार्गाचें अवलंबन करणें हें खास अनुचित होय. मी यापुढें यावजीव ब्रह्मचर्यावस्थेंत राहून आयुष्याचा विनियोग ईश्वर सेवेंत करणार." याप्रमाणें बापाला स्पष्ट कळवून तो ऋतुध्वज, ब्रह्मचर्यव्रतानें राहूं लागला. राज-पुत्राचा कृतनिश्चय पाहून शत्रुजितानें त्याच्याजवळ विवाहासंबंधानें पुढें कधींहि गोष्ट काढली नाहीं.

## ४. कंबल व अश्वतर यांची कथा.

पाताळांत कंबल व अश्वतर या नांवाचे दोन नागऋषि शेषाजवळ होते. ते महा तपस्वी, पवित्र व पुण्यशील होते. त्यांचें तपसामर्थ्य कांहीं विलक्षण होतें. त्यांना दोन पुत्र होते, ते पुत्र समवयस्क व समव्यवसायी असल्यामुळें त्या दोघांचा फार स्नेह होता. ते एकमेकांनां कधींहि विसंबत नसत. त्या दोघां ऋषिपुत्रांचा असा नियम होता कीं, प्रत्यहीं प्रभातकाळीं शुचिर्भूत होऊन पाताळांतून निघून कैलासांत जावयाचें; व तेथें शंकराची यथासांग पूजा कराव-याची; आणि परत येतांनां पृथ्वीवर राजपुत्र ऋतुध्वज याच्याकडे दोनप्रहरचें भोजन करून नंतर सूर्याला अर्घ्य द्यावयाकरितां सायंकाळाचे आंत पाताळांत परत यावयाचें. असा त्यांचा क्रम कित्येक वर्षें सारखा चालला होता; व ऋतु-ध्वजाचा व ऋषिपुत्रांचा फार स्नेह जमला होता. पुढें कांहीं दिवस गेल्यावर वरील प्रसंग घडून आला. तेव्हां त्याबद्दल त्या दोघां ऋषिपुत्रांना फार वाईट वाटलें, व ते ऋतुध्वजाला ह्मणाले, 'ऋतुध्वजा, तूं या दुःखकारक प्रसंगामुळें फारच

उदासीन झाला आहेस. तर आह्मांबरोबर पाताळांत चल; आणि आमच्या आश्रमांत चार दिवस रहा, म्हणजे तुझ्या मनाला कांहीं बरें वाटेल.' परंतु ऋतुध्वजानें ऋषिपुत्रांची ती विनंति मान्य केली नाहीं. तेव्हां ऋषिपुत्रांचा नाइलाज होऊन ते पाताळांत निघून गेले. त्यादिवशीं त्या दोघांनीं आपल्या पित्यांना ती मदालसेची गोष्ट सांगितली; आणि ते म्हणाले, 'ऋतुध्वजाचा व आमचा फार दिवसांचा स्नेह असल्यामुळें आम्हांला यासंबंधानें फार वाईट वाटतें; त्याच्या मित्रऋणांतून अंशतः तरी मुक्त व्हावें म्हणून आम्ही त्याला चार दिवस पाताळांत राहण्यास बोलाविलें, परंतु तो अत्यंत उदासीन झालेला असल्यामुळें त्यानें आमची विनंति मुळींच मान्य केली नाहीं.' पुत्रांचें भाषण ऐकून नागऋषि म्हणाले, 'पुत्रहो, तुमचें हें मित्रप्रेम, आणि मित्रऋणांतून मुक्त होण्याची तुमची इच्छा पाहून आम्हांला फार आनंद वाटतो. तुम्हाला या मित्रोपकारांतून मुक्त करण्यासाठीं आम्हीं आतां योग्य तो प्रयत्न करूं व ऋतुध्वजाला त्याची मदालसा देऊन त्याच्या ऋणांतून तुम्हांला मुक्त करूं.' असें सांगून ते दोघे नागऋषि कैलासपर्वतावर गेले; व गणपतीचें स्तवन करूं लागले. गणपतीची प्रार्थना केल्यावर त्यांनीं सरस्वतीच्या स्तवनास आरंभ केला. त्यांच्या निस्सीम स्तवनानें सरस्वती प्रसन्न होऊन प्रगट झाली व तिनें त्यांना इच्छित वर मागण्यास सांगितलें. ऋषी सरस्वतीला वंदन करून म्हणाले, हे ब्रम्हतनये तूं संगीत विद्येचें माहेरघर आहेस; म्हणून आम्हां दोघांना गायननृत्यवादनामध्यें प्रवीण कर. तें असें कीं, ज्या गायनादिकांनीं महादेव संतुष्ट होतील. तेव्हां सरस्वती म्हणाली, 'तुमचें मनोरथ पूर्ण होईल, गायन नर्तन व वादन या तिन्हीं कलांत तुमचा कोणींहि हात धरूं शकणार नाहीं, व तुमचें गायन वगैरे पाहून महादेव संतुष्ट होतील.' असा वर देऊन ती अदृश्य झाली. नंतर हे नागऋषी तेथून निघून शंकराच्या प्रासादांत आले, आणि शंकरास प्रणाम करून त्या दोघांनीं गायन करण्यास आरंभ केला. दोघांचें तें संगीत विद्येतील नैपुण्य पाहून महादेव अत्यंत प्रसन्न झाले; व आपला हस्त उंच करून म्हणाले, 'ऋषी हो, तुमच्या या संगीतानें मी अत्यंत संतुष्ट झालों आहें. तुमची जी इच्छा असेल ती निःशंकमनानें कळवा. मी तुमची इच्छा मोठ्या संतोषानें पूर्ण करीन.' याप्रमाणें महादेवाचें प्रसन्नतेचें भाषण ऐकून ऋषी विनत भावानें म्हणाले, 'हे देवाधिदेवा, कैलासपते, ऋतुध्वज नांवाच्या राजपुत्राची मदालसा नांवाची स्त्री अकस्मात मृत झाली. ती पुन्हां त्या राजपुत्राला मिळावी एवढेंच आमचें मागणें आहे.' शंकर म्हणाले, ऋषीहो, तुम्हीं उभयतां पाताळांत आपल्या आश्रमीं जाऊन पितृश्राद्ध करा, व मधला पिंड भक्षण करा; म्हणजे तुमच्या फणेपासून मदालसा उत्पन्न होईल.' याप्रमाणें महादेवांनीं सांगितल्यावर ते कंबल व अश्वतर कैलासाहून निघून पाताळांत परत आले. नंतर

त्यांनीं योग्य दिवस पाहून पितृश्राद्ध केलें; आणि मधला पिंड भक्षण केला. त्याबरोबर त्यांचे फणापासून मदालसा उत्पन्न झाली. ती तरुण असून विशेष सौंदर्यवान् होती, तिच्या अंगावर मौल्यवान् भूषणें होतीं, तिनें कपाळावर कुंकुमाचा मळवट भरला होता, नुकत्याच न्हालेल्या स्त्रीप्रमाणें तिनें आपले केंस पाठीवर मोकळे सोडले होते, तिचे स्तन उन्नत होते, तिचें मुखारविंद चंद्राप्रमाणें दिसत होतें. उत्पन्न झाल्याबरोबर तिला आपण कोण होतों व हल्लीं कोठें आहों, वगैरे सर्व वृत्तान्त समजला. ती त्या दोघां ऋषींना नमस्कार करून म्हणाली, ऋषिहो! मजवर आपले अनंत उपकार झाले आहेत. आतां मला आपली धर्मकन्या समजून माझें संरक्षण करा. तिचें भाषण ऐकून ऋषींनीं तिला आशीर्वाद दिला; व आपल्या आश्रमांत ठेवून घेतलें.

## ५. मदालसेची पुनः भेट.

मदालसेची अशा रीतीनें प्राप्ती झाल्यावर त्या ऋषिपुत्रांना फार आनंद झाला, व आपण आतां अंशतःतरी मित्राचें ऋणांतून मुक्त होऊं असा त्यांना भरंवसा उत्पन्न झाला. त्या ऋषिपुत्रांचा पूर्वीप्रमाणें अद्यापही कैलासावर शंकराच्या पूजेला जाण्याचा क्रम चाललाच होता. ज्या दिवशीं मदालसेची प्राप्ति झाली त्याच्या दुसऱ्या दिवशीं नेहमींप्रमाणें दोन प्रहरच्या वेळेला ते दोघेही ऋषिपुत्र ऋतुध्वजाकडे आले. भोजन वगैरे झाल्यावर ते ऋतुध्वजाला म्हणाले, राजपुत्रा! आमच्या आश्रमांत येण्याविषयीं तुला आम्ही अनेकवार विनंति केली, परंतु आमचें म्हणणें तूं मुळींच मान्य केलें नाहींस, याबद्दल आम्हांला फार खेद वाटतो. आज तूं आमच्या आश्रमांत अवश्य आलें पाहिजे. त्या दोघां ऋषिपुत्रांचें तें भाषण श्रवण करून ऋतुध्वज म्हणाला, मित्रहो! तुमची विनंति अमान्य केली त्याचें कारण असें आहे कीं, मी स्त्रीविरहित असल्यामुळें तुमच्या त्या पवित्र आश्रमांत येण्यास मला धैर्य होत नाहीं. जो पुरुष स्त्रीविरहित असतो, तो अपवित्र असतो असें म्हणतात. तुह्मां उभयतांचें मजवर प्रेम आहे म्हणून मी तुम्हांस आवडतों; पण आश्रमांतील इतरांना माझ्या आगमनापासून सुख न होतां उलट त्रास मात्र होईल. ऋतुध्वजाचें हें बोलणें ऐकून ते ऋषिपुत्र म्हणाले, राजपुत्रा! तूं स्त्रीची निष्कारण चिंता करीत आहेस; जसें विधिसूत्र असतें तसें घडून येतें, त्यासंबंधानें वारंवार विचार व दुःख करणें हा असंमजसपणा होय. तूं आपणास निष्कारण अपवित्र म्हणवून घेत आहेस. आम्हांस तर असें वाटतें कीं, तूं आमच्या आश्रमांत आल्यानें आमचा आश्रम पावन होऊन जाईल. तुला एकवार पहावें अशी आमच्या पित्यांची फार इच्छा आहे. तुला आज घेऊन येण्याविषयीं त्यांनीं आम्हांस बजावून सांगितलें आहे, तर आज तूं कसेंही करून आम्हांबरोबर येण्याचें कर. याप्रमाणें ऋषिपुत्रांनीं ऋतुध्वजाला पुष्कळ आग्रह केल्यामुळें त्यास त्यांचा शब्द मोडवेना. तो मोठ्या कष्टानें त्यांच्याबरोबर निघून

पाताळांत गेला. राजपुत्र आलेला पाहून कंबल आणि अश्वतर या दोघांना फार आनंद झाला. त्यांनीं राजपुत्राला अंतःकरणपूर्वक आशिर्वाद दिला व बसण्यास आसन दिलें. राजपुत्र त्या दोघांना साष्टांग प्रणाम करून त्या आसनावर जाऊन बसला. नंतर ऋषी राजपुत्राला ह्मणाले; ऋतुध्वजा, आज तूं आमचा पाहुणा आहेस, आमचे घरीं तूं यावेंस अशी आमची फार दिवसांपासून इच्छा होती, ती आज तुझे येण्यानें पुरी झाली, याबद्दल फार समाधान वाटतें. पाहुण्याच्या मनाप्रमाणें त्याचें आदरातिथ्य करावें अशी नीति आहे. तर तूं आपलें मनोगत आम्हांस निःशंकपणें कथन कर म्हणजे त्याप्रमाणें आम्ही व्यवस्था करूं. हें ऋषींचें भाषण ऐकून ऋतुध्वज म्हणाला, ऋषीहो, आपल्या व ईश्वराच्या कृपेनें मला कोण-त्याही गोष्टीची कमतरता नाहीं; त्यांतही स्त्री निवर्तल्यापासून मी भोगविलास सर्व सोडिले आहेत, तेव्हां आतां कोणतीही इच्छा उरली नाहीं. आपल्या दर्शनानें मला सर्व कांहीं मिळालें आहे. आपण माझ्या आदरातिथ्याबद्दल विशेष तसदी घेऊं नये; अशी माझी इच्छा आहे. ऋतुध्वजाची ती शालीनता पाहून ऋषींना फार समाधान वाटलें. ते म्हणाले राजपुत्रा, तूं स्त्रीसंबंधानें फारच दुःख करितोस, असें दिसतें. अरे, त्यांत एवढें दुःख करण्यासारखें काय आहे ? ईश्वराची दया होईल तर पुन्हा तुझी मदालसा तुला परत मिळेल. हें त्या ऋषींचें आशाजनक वाक्य ऐकून ऋतुध्वज उत्सुकतेनें म्हणाला, 'काय ह्मणतां ? ईश्वराची दया होईल तर पुन्हा मदालसा मिळेल ? छे, असें होणें कधीं शक्य नाहीं. ती मला अंतरली ती अंतरलीच. जिचें दहन केलें ती मला आतां कोठून मिळणार ?' ऋतुध्वजाचे ते निराशेचे उद्गार ऐकून ऋषी म्हणाले, 'राजपुत्रा, असा निराश कां होतोस ? ईश्वराची कृपा होईल तर तुझी व मदालसेची खरोखर पुन्हा भेट होईल.' तेव्हां ऋतुध्वज म्हणाला, ऋषीहो, मी तर अज्ञ आहे. ईश्वराची कृपा कशी संपादन करावयाची तें मला मुळींच कळत नाहीं. जर तुम्हांस एवढी खात्री असेल तर तुम्हांलाच मी अशी विनंती करतों कीं, तुम्ही माझी व मदालसेची भेट करवा; अथवा शक्य असल्यास कोणत्या मार्गानें होईल तो मार्ग मला दाखवा. ऋषि, मी स्त्रीसाठीं आपणाजवळ एवढी विनंती करीत आहें, यावरून आपण मला स्त्रीलंपट म्हणत असाल, परंतु खरोखर तसें नाहीं. मदालसेचें मजवर अकृत्रिम प्रेम होतें, व त्या प्रेमासाठीं मी तिच्या भेटीची इच्छा करीत आहे. तर मजवर दया करा; आणि त्या चारुगात्रीची व माझी भेट करवा.' राजपुत्राच्या अंतः-करणाचा तो सरळपणा पाहून ऋषींना त्याच्याविषयीं अधिक कौतुक वाटलें. मग त्यांनीं अंतःपुराकडे तोंड करून 'मदालसे, मदालसे,' म्हणून हाक मारली; त्या-बरोबर आंतून ती नवोढा वस्त्राभरणांनीं विभूषित होऊन नूपुरांचा झणत्कार करीत बाहेर आली. त्या लावण्यलतिकेला पाहून ऋतुध्वज हर्षातिरेकानें प्रफुल्ल

झाला. त्याचें कोमल अंतःकरण प्रेमानें उचंबळून आलें. तो तिला आलिंगन देण्यासाठीं उठला; व तिच्या अगदीं जवळ गेला. पण इतक्यांत त्याला कांहीं संशय येऊन तो दूर सरला, आणि म्हणाला, हा कांहीं तरी मायावी प्रकार असावा. मृत झालेली स्त्री एकदम उत्पन्न व्हावी यांत कांहीं तरी मायाजाळ आहे. यांत संशय नाहीं. याप्रमाणें ऋतुध्वज शंकित झालेला पाहून त्या ऋषींनीं त्याला मदालसेविषयींची सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून त्याचा सर्व भ्रम नाहींसा झाला, व तो उत्सुकतेनें मदालसेकडे पाहूं लागला. त्या वेळीं मदालसेलाही अत्यंत आनंद झाला. ती आपलें मस्तक पतीच्या चरणांवर ठेवून म्हणाली, प्राणनाथ, आपली मृत्युवार्ता ऐकिल्याबरोबर मीं प्राणत्याग केला, हे मीं स्त्रीधर्मास अनुसरून केलें, पण आपण मजसाठीं इतके कष्ट सोसले हें पाहून मला आपल्या प्रेमाची चांगली ओळख पटली. आतां या दासीचा स्वीकार करावा. याप्रमाणें मदालसेचें भाषण ऐकून ऋतुध्वजानें तिला आलिंगन दिलें. मग त्या ऋषींनीं दुसऱ्या ऋषींस व त्यांचे स्त्रियांना बोलावून आणून मोठा उत्सव केला. चौक भरून त्यावर सुवर्णाचा पाट ठेविला; व त्यावर ऋतुध्वज व मदालसा या उभयतांना बसवून मंत्र घोषांत त्या दोघांचें यथाविधि लग्न लाविलें. याप्रमाणें एकाच स्त्रीचा एकाच पतिबरोबर दोनदां विवाह झाला. ऋषींनीं आपल्या शक्तीप्रमाणें उभयतां वधुवरांना वस्त्रें भूषणें दिलीं. या प्रमाणें चार दिवस ऋषीच्या घरीं पाहुणचार घेतल्यावर ऋतुध्वज मदालसेला बरोबर घेऊन आपल्या नगरांत जाण्यासाठीं निघाला. ऋषिपुत्रांनीं त्याला मोठ्या आनंदानें निरोप दिला; व ते दोघे त्यांना पोहोंचविण्यासाठीं ऋतुध्वजाच्या नगरापर्यंत गेले. शत्रुजित राजाला तें आनंददायक वर्तमान समजतांच तो आनंद लहरींनीं अगदीं वेडा झाला. त्यानें त्या वेळीं पाण्यासारखा पैसा खर्च करून आपल्या प्रजाजनांना सर्व प्रकारें संतुष्ट केलें; व मोठा उत्सव करून ऋतुध्वजाला राज्यावर बसविलें. त्या वेळीं शत्रुजितानें जो राज्याभिषेकोत्सव केला त्याचें वर्णन करणें अशक्य होय. पुत्रानें राज्यसूत्रें आपल्या हातांत घेतलेलीं पाहून शत्रुजित वानप्रस्थाश्रमांत सुखानें राहूं लागला.

---

## अध्याय ७ वा.

### माया, ब्रह्म, आत्मा, देह वगैरे निरूपण.

वैशंपायन ऋषि म्हणतात, जनमेजया, राजपुत्र ऋतुध्वज आणि मदालसा हे दोघे आनंदानें आपली संसारयात्रा आक्रमित असतांना त्यांना चार पुत्र झाले; प्रथम सुबाहू या नांवाचा पुत्र झाला. नंतर दुसरा मुलगा झाला त्याचें नांव ऋतुध्वजानें शत्रुमर्दन असें ठेविलें. तिसऱ्या मुलाचें शुभकीर्ति असें नांव

ठेविलें; आणि शेवटीं जो मुलगा झाला त्याचें नांव अलर्क असें ठेविलें. प्रथम मुलाच्या नामकरणाचे वेळेस मदालसा आपल्या पतीला म्हणाली, ‘अहो, या नश्वर देहाला नांव ठेवून काय करावयाचें आहे ? मृत्तिका आणि हें शरीर या दोहोंची योग्यता सारखीच आहे.’ तें ऐकून ऋतुध्वज म्हणाला, मदालसे, शरीर हें जरी मृत्तिकेसमान आहे तरी जोंपर्यंत त्यांत प्राण—म्हणजे चैतन्य—आहे, तोंपर्यंत तें मृत्तिका असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. आत्म्याच्या उद्धारासाठीं, आत्म्याच्या उन्नतीसाठीं, शरीराची अत्यंत आवश्यकता आहे. आत्मा हा जरी स्वयंसिद्ध, अगोचर, अलिप्त, असा आहे, तरी शरीरावांचून त्याची उन्नति होणें शक्य नाहीं; आणि एवढ्याचसाठीं शरीर हें मृत्तिकेसमान आहे असें सत्पुरुषांना जरी माहीत असतें, तरी ते शरीराची योग्यता फार मोटी समजतात; आणि म्हणूनच शरीरास नामकरण हें अवश्य केलें पाहिजे. आपण नांव वास्तविक शरीरास देत नसून आत्म्यास देतों. शरीर हें जसें नश्वर आहे, त्याप्रमाणें नांव हें नश्वर नाहीं. कित्येक नांवें लोकांच्या स्मरणांतून जातात हें खरें; पण जे आत्म्याचा उद्धार करितात, त्यांचीं नांवें आत्म्याप्रमाणेंच चिरकाल कीर्ति रूपानें राहातात. याप्रमाणें मदालसेला ऋतुध्वजानें नामकरण व आत्मोन्नती याविषयीं माहिती सांगितली, त्याचा परिणाम मदालसेच्या मनावर निराळाच झाला. आपल्या मुलांनीं राज्यशकट हांकण्यापेक्षां—म्हणजे संसारसागरांत पडण्यापेक्षां—आत्मोद्धाराचा प्रयत्न करावा, असें तिला वाटूं लागलें. सुबाहू लहान असतां ती त्याला पाळण्यांत घालून झोके देण्याचे वेळीं निवृत्ति विषयक ओव्या म्हणून त्याला रिझवीत असे. एके दिवशीं ऋतुध्वजराजा शिकारीला गेला असतां ती आपल्या मुलाच्या पाळण्याजवळ बसून ओव्या म्हणूं लागली. ती म्हणाली—‘बाळा सुबाहू उगा; रडूं नकोस. आपणच आपल्याला बांधून घेतलेलें आहे, तेव्हां उगीच रडून कां शिणतोस बरें ! कीटक जसा कोश तयार करून त्यांत सांपडतो, त्याप्रमाणें मनुष्य हा आपल्या पूर्वजन्मींच्या संचितानेंच पुन्हापुन्हा स्वतः मायाजाळांत सांपडतो. म्हणून म्हणतें, आतां त्याबद्दल शोक न करितां सावध हो, आणि अंतःकरण स्थीर करून स्वस्थ नीज; पण झोंप घेऊं नकोस. डोळे मिटून घे; पण दृष्टी प्रभूकडे ठेव. शोक करण्याचें वास्तविक कांहींच कारण नाहीं. कारण तूं स्वतः ( आत्मा ) मुक्तच आहेस. शुकनलिकेंत पोपट जसे फसतात; अथवा स्वप्नावस्थेंत मनुष्य जसा कूपांत पडतो, त्याप्रमाणें तूं या भवबंधनांत अज्ञानानें सांपडला आहेस. मोह हीं संसारबंधनें अधिक दृढ करितो. हीं मायेचीं बंधनें तुटणें फार कठीण आहे; त्या बंधनांत तूं सांपडला नाहींस तोंच सावध हो. नाहींतर सोन्याला डाक लागला असतां तें जसें अग्नींत घालून वितळावें लागतें, त्याप्रमाणें मनुष्यासही शुद्ध होण्यासाठीं कांहीं निराळ्या भट्टयांतून तावून सुलाखून निघावें लागतें. तूं अद्याप शुद्ध आहेस. पुत्रा, तुझा जन्म

पांच पंचकांचा संबंध होऊन झालेला आहे. बाळा सुबाहू हें तूं पूर्ण लक्षांत ठेव कीं ब्रह्म हें शून्य आहे. ज्याला आपण आकाश म्हणतों, तेंच हें ब्रह्म होय. अर्थात तें सर्वत्र आहे. या ब्रह्मापासून प्रथमतः माया उत्पन्न झाली. त्या मायेनें हें अखिल विश्व निर्माण केलें. पर्वतावर गवत जसें सहज उगवतें, त्याप्रमाणें विश्व हा मायेच्या करतलाचा मळ होय. ( यावरून असें कोणीं समजूं नये कीं, मायेला हात आहेत. ) या आकाशांत प्रथमतः वायु निर्माण झाला. या वायुपासून तेज उत्पन्न झालें; तेज व वायु यांपासून पाणी निर्माण झालें; आणि पाण्यापासून सृष्टी निर्माण झाली.* या सर्वांस विश्व असें म्हणतात. हें एवढें मोठें विश्व मायेचें खेळणें आहे. अंतःकरण, मन, बुद्धि, चित्त व अहंकार हे मायेचे उद्गार असून यांपासून हा सर्व विस्तार उत्पन्न होतो; आणि त्याचा नाशही यांपासूनच होतो. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हीं मुख्य पंचतत्वें असून या पांचाच्या कमीअधिकप्रमाणानें (एकत्र होण्यानें) निरनिराळे गुणभेद प्रकृतीचे ठिकाणीं दृष्टीस पडतात. तसेंच मुख्य वायु पांच आहेत. व्यान, उदान, प्राण, समान व अपान असे हे पांच वायु आहेत. व्यान वायू संधींत वास करतो; उदानवायू कंठांत असतो; प्राणवायू हा हृदयांत असतो; समान नांवाचा वायु नाभीस्थानांत राहतो; आणि पांचवा अपानवायु हा गुदस्थानीं राहतो. यांनांच पंचप्राण असें म्हणतात. या वायूंच्या एकीकरणाचे आणखी पांच प्रकार आहेत. त्यामुळें पंच उपप्राणही झाले आहेत. ज्ञानेंद्रियें पांच आहेत, तीं श्रोत्र, त्वचा, नेत्र, जिव्हा व घ्राण हीं होत. हीं पंचभूतांचीं सूक्ष्म स्थानें आहेत. मुख, हस्त, पाद व लिंग व गुद हीं पांच कर्मेंद्रियें आहेत. पांच कर्मेंद्रियें व पांच ज्ञानेंद्रियें अशीं दहा इंद्रियें असून मनाला अकरावें इंद्रिय समजतात. त्याला ज्ञान आहे व क्रिया आहे म्हणून, त्यास ज्ञानेंद्रियांपेक्षां व कर्मेंद्रियांपेक्षां निराळें इंद्रिय मानितात. मन हें विषयबद्ध असून तें मनुष्याला एकसारखें चालवीत असतें. मनुष्यास जागृती, स्वप्न, निद्रा, गतावृत्ति, व तूर्या अशा पांच अवस्था आहेत. विषय, संसार अथवा आत्मज्ञान यांविषयीं जें कार्य आपण ज्या अवस्थेंत करीत असतों, ती जागृतावस्था होय. जेव्हां आपण जागृतावस्थेंत नसतों; सुषुप्त्यावस्थेंतही नसतों; तेव्हां त्या अवस्थेला स्वप्नावस्था असें म्हणतात. जागृतावस्थाही नाहीं, स्वप्नावस्थाही नाहीं, अशी जी अवस्था तिला सुषुप्त्यावस्था असें म्हणतात. या अवस्थेंत ज्ञान हें मुख्य होय. ही अवस्था श्वासोच्छ्वासाच्या अभ्यासानें प्राप्त होते. तिचा अनुभव योग्यांवाचून इतरांना येत नाहीं. गतावृत्तिअवस्था ही फारच क्वचित् दृष्टीस पडते. शरीरांतून

---

* प्रसिद्ध तत्वज्ञ डार्विन याचेंही मत सृष्टियोजना अशीच असावी असें आहे. प्राण्यासंबंधानें त्याचें मत जलचर प्राण्यापासूनच मनुष्यें निर्माण झालीं असें आहे; पाण्यापासून सर्व सृष्टि निर्माण झाली असें आर्यमत आहे.

पंचतत्वें व पंचप्राण हीं नाहींशी झाल्यावर हें शरीर अर्थात् मृत्तिकें समान होतें. मग ही शरीररूपी माती मातींत मिळवून देतात. जातिधर्माप्रमाणें कित्येक लोक शरीर जाळून त्याची रक्षा करितात; व कित्येक मातींत खड्डा खणून त्यांत पुरतात. सारांश इतकाच कीं, मातींत माती मिळवून द्यावयाची. ही मृतावस्था प्राप्त झाली म्हणजे पुन्हा त्याच शरीरांत पंचतत्वें व पंचप्राण हीं उत्पन्न होत नाहींत; परंतु केव्हां केव्हां असें होतें कीं, हीं तत्वें त्या शरीरांत पुन्हा प्रवेश करितात; व त्या अचेतन शरीरांत चैतन्य उत्पन्न होतें. अशा मृत होऊन सजीव झालेल्या मनुष्यास स्मशानांतून परत आणतात, त्या वेळीं मोठा उत्सव करितात, परंतु ही अवस्था क्वचितच दृष्टीस पडते. या अवस्थेला गतावृत्ति अवस्था असें म्हणतात. मनुष्य मृत झाल्यावर शरीराचा जरी नाश झाला, तरी लिंगदेह हा कायमच असतो. तो अगोचर असा आहे. त्या अत्यंत सूक्ष्म लिंगदेहास कांहीं वेळ सूक्ष्म स्थळीं वास करून कांहीं भोग भोगावे लागतात. ही जी लिंगदेहाची अवस्था तिला तूर्यावस्था असें म्हणतात. या तूर्यावस्थेंत चांगले व वाईट दोन्ही प्रकारचे भोग असतात. भोग चांगले असल्यास त्यांना स्वर्गांतील भोग व वाईट असल्यास नरकांतील भोग असें म्हणतात. हे चांगले अथवा वाईट भोग भोगल्यावर पुन्हा या लिंगदेहाला स्थूल शरीरांत प्रवेश करावा लागतो. पूर्व जन्मांतील संचितावर अवलंबून नवीन देह प्राप्त होतो, व पूर्व जन्मींच्या कर्माचें चांगलें अथवा वाईट फळ या नवीन देहास भोगावें लागतें. अशा प्रकारचें या आत्म्याचें हें रहाटगाडगें सतत सुरू असतें. फिरत्या रहाटाला जसा आरंभ व शेवट हीं नसतात, त्याप्रमाणें लिंगदेह एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत प्रवेश करीत असतो. त्यासही आरंभ व शेवट नाहीं. अशी या लिंगदेहाची स्थिती असल्यामुळें विश्वास ज्या चौऱ्यायशी लक्ष योनि आहेत, (याचा अर्थ अपरिमित). त्या सर्वांच्याही गर्भवासाचें दुःख लिंगदेहास भोगावें लागतें. हें गर्भवासाचें दुःख चुकविण्यासाठीं व वरील पांच अवस्था टाळण्यासाठीं सहावी उन्मनी या नांवाची एक अवस्था आहे. ही अवस्था प्राप्त झाली म्हणजे प्राणी गर्भवासाच्या दुःखांतून सुटतो. ही उन्मनी अवस्था म्हणजेच मुक्ति होय. आत्मा–प्राण–हा परमात्म्याचा अंश आहे. तो अंश परमात्म्यांत जाऊन मिळणें याचेंच नांव मोक्ष होय. मोक्ष प्राप्त झाल्यावर प्राणि जन्ममरणाच्या त्रासांतून अनायासेंच सुटतो.'

'शरीर हें सोळा गुणांचें आहे. पैकीं पंधरा गुण तत्वांचे आहेत व एक गुण मनाचा आहे. या पंधरा गुणांतील पांच गुण पृथ्वींतील–म्हणजे मृत्तिकेंतील आहेत; चार गुण पाण्यांतील आहेत; अग्नीचे तीन, वायूंतील दोन व एक गुण आकाशांतील आहे. तसेंच शरीर हें एक सोळा पाकळ्यांचें पुष्प आहे, असें म्हणतात. अकरा इंद्रियें ह्या अकरा पाकळ्या आहेत; व शब्द, स्पर्श, रूप

रस व गंध ह्या पांच पाकळ्या होत. अशा या शरीराच्या षोडश कला आहेत. जन्मधारणेस व सुखदुःखादि भोगास कर्म हें प्रधान होय. जसें कर्म करावें तसें त्याचें फळ मिळतें. चांगल्या कर्माचें फळ चांगलें मिळतें; व वाईट कर्माचें फळ वाईट मिळतें. कोणी आपल्या कर्मानें राजा होतो तर कोणी आपल्या कर्मानें रंक होतो. स्वर्गाचा लाभ अथवा नरकाची प्राप्ती केवळ कर्मावरच अवलंबून आहेत. मनुष्यास जशी वासना–इच्छा–उत्पन्न होते, त्याप्रमाणें त्याच्या हातून कर्में होतात. इच्छा ही मनापासून उत्पन्न होते. यासाठीं मनास ताब्यांत ठेवावें म्हणजे तें उच्छृंखळ होणार नाहीं, व त्यापासून वाईट वासनाही उत्पन्न होणार नाहीं. वासाच्या मागें लागून पशु जसे त्या त्या मार्गाला जातात; त्याप्रमाणें मनुष्य वासनेच्या अनुरोधानें कर्म करीत असतो. आत्मा–अर्थात चैतन्य हें आपणास दिसत नाहीं, तथापि तें आहे असें मानावें लागतें. कारण चैतन्य हें आपण प्रत्यक्ष अनुभवित असतों. जूं, चक्रें, आंख, साठी वगैरे वस्तु एके ठिकाणीं व्यवस्थितपणें मिळविल्या, तरच गाडी तयार होते. ह्याच वस्तु जर निरनिराळ्या असल्या तर त्यांस आपण गाडी असें म्हणत नाहीं. त्याप्रमाणेंच शरीराचीही स्थिति आहे. चैतन्य हें शरीरांत म्हणजे सर्व अवयवांत असतें, आणि सर्व अवयव मिळून देह झालेला आहे. मनुष्याच्या प्रत्येक अवयवांत चैतन्य असतें, पण हात किंवा पाय शरीरापासून निराळा केल्यास त्यांतही तो चैतन्याचा अंश राहील असें मात्र कोणी समजूं नये. गाडीच्या निरनिराळ्या केलेल्या भागांत जसें शकटत्व रहात नाहीं म्हणजे त्या भागाला गाडी असें जसें आपण समजत नाहीं, त्याप्रमाणें शरीरापासून निराळा केलेला अवयवही शरीर होत नाहीं. चैतन्याचा सांठा म्हणजे आत्मा हा हृदयांत असतो. चैतन्य हें सर्व अवयवांना या साठ्यापासूनच मिळत असतें. पाण्यांत जसा मासा राहतो, त्याप्रमाणें आत्मा हा अंतःकरणांत असतो. तो अत्यंत सूक्ष्म असून माशाप्रमाणें विनाशी नाहीं, हें विशेष लक्षांत ठेवलें पाहिजे. मासा हा केवळ दृष्टांतासाठीं घेतला आहे. ज्या पाण्यांत मासा असतो तें पाणी नाहींसें झाल्यास, अथवा कांहीं कारणानें तें खराब झाल्यास त्यांतून अन्य ठिकाणच्या स्वच्छ पाण्यांत जाण्याचा मासा जसा प्रयत्न करतो, त्याप्रमाणें आत्मा पहिलें शरीर जीर्ण झालें म्हणजे, त्या देहाचा त्याग करून दुसऱ्या नव्या देहांत प्रवेश करितो.'

'आत्मा हा अत्यंत सूक्ष्म आहे; तो अगोचर आहे; व घटांतील आकाशाप्रमाणें लिप्त व अलिप्त असा आहे. आत्मा हा परमात्म्याचा अंश आहे. तो शरीर व लिंगदेह यापासून दूर होऊन परमात्म्याच्या स्वरूपास जाऊन मिळतो. जसें कांहीं रिकामीं मडकीं असल्यास त्यांत कांहीं पोकळी असते. जी पोकळी–आकाश–एका मडक्यांत असते तीच पोकळी दुसऱ्याही मडक्यांत असते हें आपणास स्पष्ट दिसतें. यापैकीं एक मडकें फोडल्यास त्या मडक्यांतील पोकळी कोठें जाते? अर्थात

ती या विश्वांत आकाश म्हणून जी एक पोकळी आहे, त्या पोकळींतच जाऊन मिळते. तसेंच दुसरें मडकें फुटल्यास त्यांतील पोकळीही या अनंत पोकळींतच जाऊन मिळते. नवीन मडकें तयार केल्यास त्यांत पोकळी उत्पन्न होते ती अर्थात या अनंत पोकळी पासूनच उत्पन्न होऊन मडक्यांत येते. हें सर्व आपणास स्पष्टपणें दिसतें. हीच स्थिती आत्म्याची आहे.' मदालसा पुढें म्हणाली, 'बाळा सुबाहू जोंपर्यंत शरीरांत चैतन्य आहे, तोंपर्यंत आत्मा शरीरांत असतो. चैतन्य नाहींसें होण्याबरोबर आत्मा मडक्यांतील पोकळीप्रमाणें निघून परमात्म्याला जाऊन मिळतो. आत्मा हा अत्यंत सूक्ष्म आहे. त्या सूक्ष्म आत्म्यास लिंग देह म्हणून एक घर आहे. तें घरही अत्यंत सूक्ष्म आहे. आपल्या शरीरास जसे अनेक अवयव आहेत; अथवा अनेक अवयव मिळून जसें आपलें शरीर झालें आहे; त्याप्रमाणें पंचवीस अवयव मिळून हा लिंगदेह तयार झालेला आहे. परंतु अवयवांना जसा आकार आहे तसा त्या पंचवीस अवयवांना नाहीं. कारण लिंगदेह निराकार असल्यामुळें त्याच्या अवयवांना आकार नसणारच. लिंगदेहाचे पंचवीस अवयव म्हणजे पंचवीस गुण होत. या गुणसमूहास प्रकृती असें म्हणतात. पानें, सुपारी, कात व चुना या चार वस्तू निरनिराळ्या रंगाच्या असून त्यांच्या एकीकरणानें जसा तांबडा रंग तयार होतो; अथवा पाणी, धान्य, चारा व पानें हीं निराळ्या रंगाचीं असून गायीचें दूध जसें पांढरें असतें; त्याप्रमाणें पंचवीस गुणांच्या कमी अधिक मिश्रणामुळें प्रत्येकाची प्रकृति भिन्न भिन्न होते. प्रकृती संबंधानें सुख अथवा दुःख असणें हेंही पूर्व कर्मावरच अवलंबून असतें. मोक्षाचा प्रयत्न न केल्यास चक्राच्या फेऱ्याप्रमाणें कर्मानुरोधानें पुन्हा पुन्हा आत्म्यास चौऱ्याऐशीं लक्ष योनी हिंडाव्या लागतात, व सुख अथवा दुःख हीं कर्मांचीं फळें प्रकृतीस प्राप्त होतात. तथापि आत्मा हा सुख दुखांपासून अलिप्त असा आहे, व तो अक्षय आहे. आधी, व्याधी, जन्म, जरा, हीं सर्व स्थूलशरीरास आहेत. सूक्ष्म म्हणजे लिंगदेहास मृत्यूचा व कर्मानुरोधानें मिळणाऱ्या सुखदुःखांचा संसर्ग मुळींच होत नाहीं. आत्म्याचा वास सर्व प्राणीमात्रांचे ठिकाणीं आहे. विश्व हें, जसा एखादा आरसा आपल्या समोर धरल्यास त्यांत आपलें प्रतिबिंब दिसतें, व आरसा दूर केल्यास तें नाहींसें होतें; त्या प्रमाणें आहे. त्यांतील सर्व प्राणीमात्र हीं विश्वरूपी आरशांतील प्रतिबिंबें आहेत. क्षणोक्षणीं प्रतिबिंबें नाहींशीं होत असतात, व दुसरीं अनेक उत्पन्नही होत असतात, तथापि आत्मा हा जशाचा तसा अमर आहे. तो अविनाशी आहे. तो केवळ निर्गुण व निराकार आहे. त्याला जन्म नाहीं व मृत्यूही नाहीं. त्याला स्थिति नाहीं यामुळें छाया नाहीं; व छाया नाहीं या मुळें त्याचें दर्शन होत नाहीं. आत्म्याची जर अशी स्थिति आहे; त्याला जर सुखदुःख नाहीं; तर मनुष्यास सुखाच्या वेळीं जो सुखानुभव दिसतो व

दु:खाच्या वेळीं जो दु:खानुभव मिळतो; तो कोणास मिळतो? हाताला कांहीं इजा झाल्यास हात तर दुखत असतोच, पण शिवाय अंत:करणांतही पीडा होत असते; पाय दुखत असला तर पाय दुखून शिवाय अंत:करणांत पीडा होते. तेव्हां ती पीडा कोणाला होते? पुष्कळ प्रसंगीं असें होतें कीं, शरीराच्या एका अवयवाला पीडा असूनही त्यामुळें सर्व शरीर सोडून आत्मा निघून जातो. या सर्वांचें उत्तर असें आहे कीं, अंत:करणांत जीवात्मा म्हणून एक आत्मा आहे. हा आत्मा परमात्म्यापासून निराळा आहे. या जीवात्म्याला सुखदु:खाचा अनुभव होतो. सारांश ज्यास आपण चैतन्य म्हणतों, तें परमात्मा, आत्मा, लिंगदेह व जीव, या चोहोंचें एकीकरण होय. पुनर्जन्माचे वेळीं लिंगदेह हा गर्भाशयांत प्रवेश करतो. तो अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें गर्भाशयांत कसा प्रवेश करतो अशी शंका घेणें हें निरर्थक होय. स्त्रीचें शोणित व पुरुषाचें शुक्र एके ठिकाणीं झाल्यामुळें गर्भ उत्पन्न होतो. ही गर्भधारणशक्ति ईश्वरानें स्त्रियांचे ठिकाणीं ठेविलेली आहे. स्त्रियांचे उदरांत नाभीचे खालचे बाजूला व योनीपासून आठ दहा अंगुळांवर गर्भस्थान आहे. या गर्भस्थानाचे किंचित खालीं मूत्र स्थान आहे. स्त्रियांचें मूत्रस्थान व शोणितस्थान हीं एकच आहेत असें पुष्कळांना वाटतें, परंतु तीं स्थानें एक नाहींत भिन्न आहेत. पुरुषाचे मूत्रमार्गातूनच मूत्र व रेत वाहतें; तथापि या दोहोंचीं स्थानें भिन्न आहेत. गर्भस्थान खोलगट असून त्यांत डाळिंबाच्या फुलाप्रमाणें लाल व तशाच प्रकारच्या पाकळ्यांचें एक कमल आहे. त्या कमलांत पुरुषाचें रेत व स्त्रीचें शोणित एकत्र झालें म्हणजे गर्भ उत्पन्न होतो. दोन भाग रेत व एक भाग शोणित असें ऋतुकालीं या कमलांत पडल्यास पुत्र होतो. आणि जर एक भाग रेत व दोन भाग शोणित असें एकत्र झालें तर कन्या होते. आणि जर दोन भाग रेत व दोन भाग शोणित असें एकत्र झालें तर क्लीब गर्भ उत्पन्न होतो. यांत स्त्रीचें रेत जर कांहीं अधिक असलें तर वांझ कन्या होते; व पुरुषाचें रेत अधिक असलें तर नपुंसक पुत्र होतो. स्त्रियांचा काम पुरुषांपेक्षां आठपट अधिक आहे, परंतु प्रत्येक महिन्याला त्या रजस्वला होतात व त्या रजस्वलावस्थेंत शोणित वाहून जातें, त्यामुळें त्यांचा कामविकार पुरुषांपेक्षांही कमी होतो. स्त्रियांना काम उत्पन्न करणारी पयस्विनी या नांवाची नाडी आहे. त्या नाडीचा व गर्भ कमलाचा संबंध आहे. रजस्वलावस्थेंत या नाडीचें तोंड मोकळें होतें व त्यांत अधिक झालेलें शोणित बाहेर पडून जातें. गर्भकमलांतून हें शोणित विशेष वाहून गेल्यामुळें तें प्रफुल्ल होऊन किंचित विस्तृत होतें व स्वच्छही होतें. पुरुषांसही अशाच प्रकारची एक रेतवाहक नाडी आहे, तिचा संबंध मूत्रमार्गाशीं आहे. शिश्न व वरील योनींतील कमळ यांचें सान्निध्य झालें असतां, त्याच वेळीं

उभयतां स्त्रीपुरुष प्रसन्नावस्थेंत येतात, व स्त्रियांच्या शोणितनाडीचें व पुरुषांच्या रेतनाडीचें तोंड मोकळें होऊन त्यांतून शोणित व रेत त्या गर्भकमळांत पडतें. योग्य ऋतुकाल असल्यास व शोणित आणि रेत प्रमाणांत पडल्यास गर्भकमळाच्या पाकळ्या जवळ जवळ येऊन एकमेकीला चिकटतात व तें गर्भकमळ मिटतें; व त्यांत तो गर्भ हळू हळू वाढूं लागतो. अशा गर्भ धारणेनंतर लागलीच चार दिवसांचे आंत, स्त्री पुरुषांचा पुन्हा समागम झाल्यास क्वचित प्रसंगीं तें गर्भकमळ उमलतें; व त्यांत पूर्वी प्रमाणें शोणित व रेत पडून आणखी गर्भ राहतो. जुळीं मुलें होतात त्याचें कारण हेंच होय. स्त्रियांस गर्भ राहिल्यावर ज्या पयस्विनीनाडींतून प्रति महिन्यानीं शोणित पडत असतें ती नाडी उलट वाहूं लागते, यामुळें स्त्री रजस्वला होत नाहीं. ती नाडी उलटी वाहूं लागल्यामुळें तें शोणित स्तनांत जाऊन सांचतें व त्याचें पुढें दूध बनतें. अशी ही आश्चर्यकारक ईश्वरी योजना आहे.'

'गर्भकोशांत गर्भ राहिल्यापासून दुसरे दिवशीं तो गर्भ पाण्यांतील लहान बुडबुड्याप्रमाणें तयार होतो. आणि सुमारें पंधरा दिवसांनीं तो गर्भ लहान अंड्या एवढा तयार होतो, परंतु तें अंडें पोकळ असतें. एक महिन्यानीं त्या अंड्याला दोडक्याप्रमाणें शिरा उत्पन्न होतात. दुसऱ्या महिन्यांत तो गर्भ पोकळ असतो तो भरीव होतो. तिसऱ्या महिन्यांत, आल्याच्या कुड्याला जसे बारिक बारिक कोंवळें डीर फुटतात, त्याप्रमाणें गर्भाला डीर फुटतात. तेंच हस्तपादादि अवयव होत. चवथ्या महिन्यांत त्या गर्भास चेतना उत्पन्न होते. पांचव्या महिन्यांत केश, नखें व शोणित उत्पन्न होतें. सहाव्या महिन्यांत अस्थी उत्पन्न होतात. सातव्या महिन्यांत मन व वर्ण उत्पन्न होतात. आटव्या महिन्यांत त्वचा आणि बुद्धी उत्पन्न होऊन त्यास पूर्व जन्माचें स्मरण होतें. मग तो गर्भ सोऽहं शब्दाचें चिंतन हृदयांतल्या हृदयांत करूं लागतो. आठव्या महिन्यांत स्त्री प्रसूत झाल्यास तो गर्भ लागलाच मरतो. नवव्या महिन्यांत गर्भाला ओजशक्ती व ज्ञानशक्ती प्राप्त होतात. ही वोजशक्ति गर्भाला मिळाली म्हणजे स्त्रीचे पोटांत गर्भाचें चलनवलन सुरूं होतें; त्यामुळें गरोदर स्त्रीला फार त्रास होतो. स्त्रीचें पोट दुखूं लागतें, अपानवायू पोटांत कोंडला जातो, व त्यामुळें गर्भकोश फुटतो. गर्भकोश फुटल्यावर गर्भ बाहेर पडण्याचा प्रयत्न करतो, त्यास प्रसूतावस्था असें म्हणतात. मूल योनिमार्गांतून येतें त्या वेळीं तें रडतरडतच बाहेर पडतें. मुलाचा वर्ण काळा, गोरा अथवा सांवळा असणें हें स्त्रियांच्या कफवातादि विकारांवर अवलंबून आहे. वाताधिक्य असल्यास मूल गोरें होतें; पित्ताधिक्य असल्यास मूल सांवळें होतें; आणि कफाधिक्य असल्यास मूल कृष्ण वर्णाचें होतें. मनुष्यदेह हा स्वतःच्या हातानें साडेतीन हात असतो. त्यांत यमन हें बारा अंगुळाचें असतें, व फुप्फुस तेरा अंगुळें असतें. जीवलिंगानें हृदयांत

एक अंगुळ जागा व्याप्त केलेली आहे; वातस्थान सात अंगुळाचें आहे; पित्त-स्थान साडेतीन अंगुळाचें आहे; व कफस्थान दोन अंगुळाचें आहे. मूत्र-कोठ्याची जागा नऊ अंगुळाची आहे, मळकोठा हा अठरा अंगुळाचा आहे, मुख चार अंगुळें आहे, व जीभ मुळापासून शेंवटापर्यंत साडेचवदा अंगुळें असते. शरीराचे मुख्य सांधे सोळा असून दुसरे बारिक सांधे दोनशें दहा आहेत, खालचें वरचे मिळून बत्तीस दांत असतात; दात व जिव्हा यामधील अंतर एक बोटाचें असतें. फांसळ्या बावीस आहेत. बारिक नाड्या बहात्तर हजार असून स्थूळ नाडया चवदा आहेत. इडा, पिंगळा, पयस्विनी, कुहू, गांधारी, यशस्विनी, पूषा, सरस्वती, शंखिनी, अलंबुषा, विश्वोदरा, सुषुम्ना, हस्तजिव्हा व वारुणा या चवदा मुख्य नाडया आहेत. या वाहिन्यांना बहात्तर साठे आहेत. शरीरांत तेरा मार्ग अथवा छिद्रें आहेत. त्या तेरा मार्गांपैकीं अकरा मार्ग स्पष्ट आहेत व दोन गुप्त आहेत. त्या द्वारांपैकीं डोळे, कान, नाक, स्तन, नाभी, गुद, लिंग, व मुख हीं स्पष्ट आहेत, व ब्रह्मरंध्र हें गुप्त आहे. रोमरंध्रें हीं साडेतीन कोटी असून तितकेंच केंस आहेत. शरीरांत रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र असे सात धातु आहेत, व दहा चक्रें आहेत. शरीरांत एकंदर साडेतीनशें अस्थि आहेत, व आठशें जंत आहेत, व हातांचीं व पायांचीं बोटें वीस असून तितकींच नखें आहेत. मध्यमंडळाचे ठिकाणीं अग्नि असतो. मनुष्याची श्वाससंख्या एक-वीस हजार सहाशें असते, व ही श्वाससंख्या पुरी झाली म्हणजे मनुष्य मरतो. मुख्य सांधे साडेतीन असून साधारण स्थूल सांधे सोळा आहेत. शिवाय बारीक व न दिसणारे असे सांधे अनेक आहेत. पाठीचा कणा हा अस्थीचे माळेसारखा एकावर एक मणी ठेवून झालेला आहे. हे मणी पोकळ असून सर्व मण्यांची पोकळी एका रेषेंत असते. मणी एकमेकांच्या खोवणींत बसविलेले असल्यामुळें ते तेथून सरकत नाहींत. हा कणा म्हणजे आत्म्याचा उद्धार करून घेण्याची एक प्रकारची शिडीच आहे. मण्यांमध्यें ज्याप्रमाणें दोरी असते त्याप्रमाणें या मण्यांत कांहीं स्नायु आहेत. मण्याच्या वरच्या बाजूला तीन कोठे आहेत, त्यास ब्रह्मशिर असें म्हणतात. तेथें ब्रह्म, विष्णु व महेश यांचीं स्थानें मानितात. शरीरांत नऊ कोठे आहेत. डोळयाचा मागचा भाग याला पश्चिम सागर-स्थान असें म्हणतात. दोन कान हे दोन कोठे आहेत. त्याचप्रमाणें दोन डोळे, व दोन नाकपुड्या हे चार कोठे आहेत. उजव्या नाकपुडीला सूर्यनाकपुडी व डावीला चंद्रनाकपुडी असें म्हणतात. मध्यभागाच्या कोठ्याला वैकुंठ असें म्हणतात. शिवाय सूक्ष्म कोठे बहात्तर आहेत. ते योगाचा अभ्यास करणारा वांचून इतरांना जाणतां येत नाहींत. या सर्व कोठ्यांची यात्रा करण्याचें साधन श्वास हें होय. गुदस्थानीं जें चक्र आहे त्याला चार पाकळ्या आहेत. त्या पाक-ळ्यांना 'व, स, ष, श,' अशीं नांवें दिलेलीं आहेत. लिंगाचे ठिकाणीं स्वाधि-

ष्ठानचक्र आहे; त्यास सहा पाकळ्या आहेत; त्या सहा पाकळ्यांसही नांवें दिलेलीं आहेत. नाभिस्थानास मणिपुर असें म्हणतात. त्या चक्राला दहा पाकळ्या आहेत. हृदयस्थानांत अनाहत चक्र आहे त्या चक्राला बारा पाकळ्या आहेत. कंठाचें ठिकाणीं विशुद्ध नांवाचें चक्र आहे, त्या चक्राला सोळा पाकळ्या आहेत व त्यावर सोळा स्वराची योजना केलेली आहे. कपालाचे ठिकाणीं अग्निचक्र आहे, या चक्राला दोन पाकळ्या आहेत, व त्या पाकळ्यांना 'ह क्ष' अशीं नांवें दिलीं आहेत. मस्तकांत ब्रह्मचक्र आहे, त्या चक्राला सहस्र पाकळ्या आहेत. तें चक्र म्हणजे परमेश्वराचें अधिष्ठान होय. तें चक्र अमृतमयच आहे. आधार चक्राचे ठिकाणीं ब्रह्मशक्ती जी रुद्रायणी, जिला कुंडलिनी असें म्हणतात, ती आहे. स्वाधिष्ठान चक्राचे ठिकाणीं गणपतीची स्थापना केलेली आहे. मणिपुरीं सूर्याची, सोमचक्राचे ठिकाणीं चंद्राची, अनाहतीं ब्रह्मदेवाची, मणिचक्राचे ठिकाणीं लक्ष्मीनारायणाची, व विशुद्ध चक्राचे ठिकाणीं सरस्वतीची, अशा स्थापना केलेल्या आहेत. महादेव व इंद्र हे ऋषि होत, ते अनहात चक्रीं असतात. विशुद्ध चक्रांत अग्नि ऋषि असतो. अग्निचक्राचे ठिकाणीं परमात्मा जो हंसऋषि तो असतो. ललना चक्राचे ठिकाणीं बदग असतो. अग्निचक्राचे ठिकाणीं जे त्रिनयन ऋषी ते असतात. व निरंजन चक्राचे ठिकाणीं अनंत-निरंजन असतो. या सर्व चक्रांचा जप करणारा प्राणी भवबंधनांतून पार पडतो. नाभीचे ठिकाणीं नाभीचक्र म्हणून जें एक चक्र आहे, त्या चक्राच्या एका पाकळीवर जीव असतो. हंसणें, रडणें, वगैरे मनोविकार तेथून उत्पन्न होतात. निरनिराळे मनोधर्म व निरनिराळ्या इच्छा तेथूनच उत्पन्न होतात. मानव देहापासून कृमी, विष्ठा व भस्म उत्पन्न होतें, परंतु लिंगदेहास या अवस्था नाहींत. कर्मबंधन हें मात्र लिंगदेहास आहे. त्या कर्मबंधनाप्रमाणें लिंगदेह, साप जसा कांत टाकतो, त्याप्रमाणें स्थूल देहाला सोडून दुसऱ्या नूतन स्थूल देहांत प्रवेश करतो. जोंपर्यंत हा लिंगदेह कायम असतो तोंपर्यंत जन्ममृत्यूच्या येरझारा चुकत नाहींत. हें दुःख टाळण्यासाठीं व परमात्म्याचें ठिकाणीं लीन होण्यासाठीं लिंगदेहाचा नाश केला पाहिजे. म्हणजे हळू हळू वरच्या पायरीला जाऊन उन्मनी अवस्था प्राप्त करून घेतली पाहिजे. या उन्मनीलाच मोक्ष म्हणतात. मोक्षप्राप्ती झाली म्हणजे आत्मा परमात्म्याच्या स्वरूपांत मिळतो. मनुष्यदेह केवळ या प्रयत्नासाठींच मिळालेला आहे, म्हणून हा देह प्राप्त झाल्यावर प्रत्येकानें अभ्यास करून गुरुच्या साह्यानें मोक्षप्राप्तीचा प्रयत्न करावा. ज्या तत्वांपासून हें स्थूल शरीर झालेलें असतें, तीं तत्वें प्राणोत्क्रमण समयीं विश्वांतील तत्वांत मिळून जातात. कानांतील ऐकण्याची शक्ती दिशा हरण करितात; डोळ्यांतील तेज सूर्य घेऊन जातो, त्वचा स्पर्शांत जाऊन मिळते, जिव्हा प्राचीनाथांत समावते, घ्राण मेदिनींत मिसळते, वाचा वन्हींत मिळते, शत-

पती हे हाताचें हरण करितात, त्रिविक्रमाचे ठिकाणीं चरण जातात. लिंग हे ब्रह्मदेव हरण करतो. गुद नैऋत्य हरण करितो, चंद्रमा मनाचें हरण करतो, ब्रह्मदेव बुद्धीचें हरण करतो, अहंकार आकाशांत मिळतो, चित्त हरिहरांचे ठिकाणीं सामावतें, स्थूल मातींत मिसळून जातें, रक्त पाण्याला जाऊन मिळतें, आणि शेष सर्व आकाशांत नाहींसें होतें. हीं तत्वें याप्रमाणें तत्वांत जाऊन मिळतात; तथापि तत्वांस नाश नाहीं असें नाहीं. कालें करून तत्वेंही नाश पावतात. प्रलय प्रसंगीं सर्व तत्वें नाश पावतात. आकाशतत्व मात्र अक्षय असें आहे. कित्येक आकाशासही नाश आहे असें म्हणतात, व शब्दनाश तोच आकाशनाश असें सांगतात. देहावसानाचे वेळीं तत्वें नाहींशीं होत जातात त्यामुळें अवयवांची शक्ती नाहींशी होते. गंधशक्ती नाहींशी झाली म्हणजे वासाचें ज्ञान राहात नाहीं. रसनेची शक्ती नाहींशी झाली म्हणजे कटु, आम्ल, तिक्त, हें कांहींच कळत नाहीं. डोळ्याची शक्ती नाहींशी झाली म्हणजे कांहीं दिसत नाहीं. त्याप्रमाणेंच कर्णाची शक्ति नाहींशी झाली असतां कांहीं ऐकूं येत नाहीं, जिव्हेची शक्ती नाहींशी झाली म्हणजे कांहीं बोलतां येत नाहीं, नाडींतील वायू नाहींसा झाल म्हणजे शरीरांत शैत्य वाढतें व शेवटीं प्राण दिघून जातो. ब्रह्मपिंड म्हणजे ब्रह्मांड व मनुष्यपिंड या दोहोंतील तत्वें एकच आहेत. ब्रह्मांडप्रळयाचे वेळीं; हीं नत्वें नाहींशीं होतात व मग त्या मागून साहजिक ब्रह्मांडही नाहींसें होतें. हीच स्थिति मनुष्याची आहे. आणि म्हणूनच जें ब्रह्मांडीं तेंच पिंडीं असें ज्ञाते म्हणतात.'

'मनुष्यास जागृती, स्वप्न, निद्रा, गतावृत्ति व तूर्या अशा ज्या पांच अवस्था आहेत; त्या अपान, समान, व्यान, प्राण व उदान या पांच वायूपासून प्राप्त होतात. जागृतावस्था म्हणजे जाणीवता, अहंकारच होय. अंत:करणचतुष्टयाच्या ज्या चेष्टा तो हा अहंकार होय. मी जागा आहे; मी शुद्धीवर आहें; काय करावयाचें तें मी समजून घेऊन करीत आहे; मला ज्ञान आहे; असा अभिमान धरून कार्य करणें तो अहंकार होय. जागृतावस्था तरी हीच. हा अहंकार अपान, वायू व गुदद्वार यानें येणारा पृथ्वीचा जो गंध त्यापासून उत्पन्न होतो. चित्त हें समान वायूंत असतें. या वायूचें व जीवाचें सान्निध्य झाल्यास जी अवस्था निर्माण होते, तिला स्वप्नावस्था असें म्हणतात. बुद्धि व उदानवायु यांच्या समीकरणानें निद्रावस्था प्राप्त होते. मन व उदानवायू यांच्या एकीकारणानें गतावृत्ति अवस्था प्राप्त होते. व्यान, वायू व आकाशतत्व यांपासून तूर्या ही अवस्था प्राप्त होते. शेवटची मोक्ष ही अवस्था प्राण व अग्नी यांच्या संकरानें प्राप्त होते. मनुष्यास अभ्यासानें वर सांगितलेल्या अवस्था, वायु, नाड्या, चक्रें व प्राण वगैरेवर आपली सत्ता चालवितां येते. या अभ्यासाला योग्याभ्यास असें म्हणतात. पद्मासन घालून व तर्क मुद्रा करून

उन्मनीकडे लक्ष लावणें हें योगांतील मुख्य तत्व होय. इडा, पिंगळा वगैरे ज्या स्थूल व सूक्ष्म नाड्या आहेत, त्या स्नायूंची मदत घेऊन योगाचा अभ्यास करावा लागतो. इडा व पिंगळा या दोन नाड्यांतील वायू प्रथम अपान वायूच्या स्थानांत आणतात, व तेथून तो सुषुम्नेच्या स्थानांत आणतात. वायू सुषुम्नेंत आल्यावर षट्चक्रांना गती मिळते. नंतर सर्पिणी जागृत होते, व ती शिर ऊर्ध्व करते. त्यायोगानें पश्चिमेचा मार्ग म्हणजे पाठीचा कणा यांतून बहात्तर हजार नाड्यांतील रस वाहूं लागतात. त्या रसानें एकवीस स्वर्ग म्हणून जें स्थान आहे तें भिजून जातें. नंतर पुढें अभ्यासानें आत्मज्योतीचें दर्शन होतें. या दर्शनानंतर प्रयत्नानें मोक्ष प्राप्त होतो."

वैशंपायन ऋषि, जनमेजय राजाला सांगतात, 'राजा जनमेजया हा आध्यत्म विषय अत्यंत गूढ आहे. तो गुरूच्या कृपेवांचून समजत नाहीं. अशा प्रकारचें हें अध्यात्मज्ञान मदालसा आपल्या मुलाला लहानपणापासून पाजीत गेल्यामुळें तो सुबाहू पुत्र विशाल वैभवाचा मोह न धरितां एकाएकीं योगाभ्यासासाठीं अरण्यांत निघून गेला. याप्रमाणेंच त्या मदालसेचे शत्रुमर्दन व शुभकीर्ति हे दोन्ही पुत्रही मदालसेच्या उपदेशामुळें विरक्त होऊन योगाभ्यासासाठीं राज्य वैभवाचा त्याग करून एकांतांत निघून गेले. त्यानंतर मदालसेला अलर्क या नांवाचा मुलगा झाला. तेव्हां ऋतुध्वज मदालसेला म्हणाला; मदालसे, तूं आपल्या मुलांना अध्यात्म विषयाचा उपदेश करून त्यांना आपणापासून दूर केलेंस; यामुळें आपणां उभयतांवर देव, पितृ व मनुष्य या तिघांच्या ऋणाचें ओझें तसेंच राहिलें आहे. तर आतां जो आपणास अलर्क या नांवाचा मुलगा झाला आहे, त्याला तो उपदेश तूं करूं नकोस. एवढा मुलगा आपणाजवळ असूं दे. आपला एवढा राज्याचा विस्तार पडला आहे त्याला आपल्या पश्चात कोणी योग्य नियता नसल्यास राज्याचा नाश होईल; प्रजेंतील दुर्जन उसृंखल होतील व सज्जनास अत्यंत त्रास होईल; आणि तें पातक आपल्या शिरावर बसेल. एवढ्यासाठीं या अलर्काला तूं राजनीतीचा उपदेश कर; म्हणजे तो आपल्या पश्चात् नीतीनें राज्य चालवून आपल्या प्रजेचें पुत्रवत पालन करील. याप्रमाणें ऋतुध्वज राजानें मदालसेला विनविल्यावर तिनें ती राजाची विनंती मान्य केली; व अलर्काला उत्तम प्रकारची राजनीति शिकविली. त्या राजनीतीचा उपयोग अलर्कास राज्यावर बसल्यावर फारच चांगला झाला.

# अध्याय ७ वा.

## अष्टवसूंची कथा.

मदालसा व ऋतुध्वज यांची कथा ऐकल्यावर जनमेजय राजाला गंगेची कथा ऐकण्याची इच्छा झाली. तो वैशंपायन ऋषीला म्हणाला, वैशंपायन ऋषे, मदालसे प्रमाणेंच गंगेनेंहि आपल्या आठ मुलांची व्यवस्था लाविली असें मी ऐकिलें आहे. परंतु ती संपूर्ण कथा मला माहीत नाहीं, तर ती कथा आपण मला सांगण्याची कृपा करावी. तेव्हां वैशंपायनऋषी म्हणाले, 'राजा, गंगेची कथाही याच प्रमाणें आहे. परंतु मदालसेनें आपल्या तिन्हीं पुत्रांना योग्य उपदेश करून आपणापासून दूर केलें, आणि गंगेनें आपल्या मुलांनां पाण्याच्या ओघांत सोडून दिलें, इतकाच काय तो फरक आहे. असो, ती कथा तुला आतां सविस्तर सांगतों.'

'इक्ष्वाकु नांवाच्या सूर्यवंशी राजाला महाभिष नांवाचा एक पुत्र होता. तो पुण्यशील व प्रतापवान होता. त्या राजानें शंभर हजार अश्वमेध यज्ञ केले होते. तो महाभिष राजा, सागराचा अवतार होता. त्याला मनुष्य जन्म घेण्याचें कारण असें होतें कीं, एकदां समुद्राचे कांठीं इंद्र, ब्रह्मदेव, वगैरे देव दुष्टांचें निर्मूळन कसें करावयाचें याचा विचार करीत बसले होते. परंतु समुद्राच्या लाटा एकमेकांवर जोरानें आपटत असल्यामुळें त्यांचें बोलणें परस्परांना ऐकूं जाईना. सागराचा तो उन्मत्तपणा बघून ब्रम्हदेवाला फार राग आला, व त्यानें सागराला असा शाप दिला कीं, 'तूं फार उन्मत्त झाला आहेस म्हणून या अपराधासाठीं भवबंधनांत सांपडशील.' ब्रह्मदेवाच्या या शापवाणी प्रमाणें सागरानें इक्ष्वाकु राजाच्या पोटीं जन्म घेतला होता. इक्ष्वाकु राजाचा मुलगा जो महाभिष तोच हा सागर होय. असो, हा महाभिष राजा एकदां कांहीं कारणासाठीं सत्यलोकीं ब्रह्मदेवाला भेटावयाला आला; त्यावेळीं ब्रह्मदेवाच्या मंदिरांत अनेक देव, ऋषी, राजे वगैरे बसले होते. त्या मंदिरांत महाभिषराजा गेल्यावर कांहीं वेळानें तेथें स्वर्गगंगा ब्रह्मदेवाला नमस्कार करण्यासाठीं आली. त्या पतितपावनी गंगेचें ब्रह्मदेवाच्या मंदिरांत आगमन झाल्यामुळें तेथील प्रेक्षकांना अत्यंत आनंद झाला. पुढें तेथें एक निराळाच प्रकार घडून आला. त्या मंदिरांत वाऱ्याचा एकाएकी मोठा झोत आला व त्यायोगें गंगेनें परिधान केलेलें वस्त्र उडून भूमीवर पडलें. अशा प्रकारें गंगा नग्न होण्याबरोबर सर्वांनीं आपले डोळे झांकून घेतले. कारण परस्त्रीस नग्नावस्थेंत पाहूं नये; असें शास्त्र आहे. परंतु गंगेचें तें अनुपमेय सौंदर्य बघून महाभिष राजा तिच्याकडे चित्रा सारखा तटस्थ वृत्तीनें पहात होता. तशांत ती नग्न झाल्यावर

वर तो अगदीं मुग्धच होऊन गेला. व तिजकडे अमिमिष नयनानें पाहूं लागला. पुढें गंगेनें घाई घाईनें आपलें वस्त्र परिधान केलें व ब्रह्मदेवाला नमस्कार केला. परंतु वरील प्रकारामुळें ब्रह्मदेव गंगेवर फार रागावला होता, तो तिला शापवाणीनें म्हणाला, गंगे, तूं व हा महाभिष राजा असे तुम्हीं दोघेही या प्रमादामुळें पृथ्वीवर मनुष्य जन्म धारण कराल. त्या दोघांना ब्रह्मदेवाचा याप्रमाणें शाप झाल्यावर महाभिष राजा पृथ्वीवर सोमवंशी क्षत्रिय कुलांत जन्म पावला. प्रसिद्ध शंतनू नांवाचा जो राजा तोच हा महाभिष होय. हा शंतनू राजा पराक्रमी, सत्कर्मरत व सुशील होता.

## २. अष्टवसूंना वसिष्ठाचा शाप.

गंगेला ब्रह्मदेवाचा शाप झाल्यावर ती स्वर्गाहून निघाली व शापमुक्त होण्यासाठीं पृथ्वीवर येऊं लागली. ती पृथ्वीवर येत असतांना तिला अष्टवसु भेटले. त्या अष्टवसूंना वसिष्ठाचा शाप झाला होता. त्यांनां गंगेचें दर्शन झाल्यावर ते शापमुक्त होण्यासाठीं गंगेची प्रार्थना करूं लागले.

याप्रमाणें वैशंपायन ऋषि कथा सांगत असतां जनमेजयराजा म्हणाला, वैशंपायन ऋषे, या अष्टवसूंना वसिष्ठांनीं शाप कां दिला ? तें ऐकण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां वैशंपायन म्हणाले, राजा, तीच कथा तुला प्रथम सांगतों.

'एकदां अष्टवसू व त्यांच्या स्त्रिया असे वसिष्ठाचे आश्रमांत हिंडत हिंडत अतीत म्हणून आले होते. वसिष्ठानें त्यांचा योग्य गौरव केला व त्यांची बरदास्त उत्तम प्रकारें ठेविली. एका साधारण ऋषीनें आपल्या आश्रमांत आपली एवढी विलक्षण व्यवस्था ठेविली असें पाहून त्या वसूंच्या स्त्रियांनां फार आश्चर्य वाटलें. तेव्हां दिव्य नांवाच्या वसूनें आपल्या स्त्रीला कामधेनूकडे नेलें व तिला ती कामधेनु दाखवून तो म्हणाला, हे स्त्रिये, या ऋषीजवळ ही कामधेनू आहे म्हणून याचा हा आश्रमधर्म इतक्या उत्तम प्रकारें चालला आहे. दक्षप्रजापतीला सुरभि या नांवाची एक कन्या होती, ती त्यानें कश्यपाला दिली होती. तिला कश्यपापासून ही कामधेनू झाली व ती त्यानें वसिष्ठाला दिली आहे. या कामधेनूचा असा गुण आहे कीं, तिजजवळ ज्या वस्तूची इच्छा प्रदर्शित करावी ती वस्तु प्राप्त होते. तसेंच या धेनूचें दूध सेवन केलें असतां वृद्धत्व नाहींसें होऊन उत्तम असें तारुण्य प्राप्त होतें, व तें तारुण्य दहा हजार वर्षेपर्यंत राहतें. तसेंच सर्व रोग नाहीसे होऊन पुढें कोणत्याही व्याधी उत्पन्न होत नाहींत. याप्रमाणें त्या दिव्य वसूनें आपल्या स्त्रीला त्या कामधेनूविषयीं सांगितलें. तें त्या कामधेनूचें विलक्षण सामर्थ्य श्रवण करून त्या वसूच्या स्त्रीला ती कामधेनु तेथून घेऊन निघून जावें असें वाटलें. ती आपल्या पतीला म्हणाली, "अहो, अशी ही अलौकिक धेनू आपल्या घरीं घेऊन चला. माझी एक सोबतीण

आहे ती आतां बरीच वृद्ध झाली आहे, तेव्हां तिला आपण या गायीचें दूध देऊन तारुण्यावस्था प्राप्त करून देऊं. शिवाय या कामधेनूचा आपणासही पुष्कळ उपयोग होत जाईल.' हें त्या स्त्रीचें बोलणें ऐकून त्या स्त्रीलंपट दिव्यवसूला ती कामधेनु तेथून घेऊन जाण्याची इच्छा झाली. तो दिव्यवसु स्त्रीबुद्धीनें चालणारा होता. स्त्रीला संतुष्ट ठेवणें हें तो आपलें कर्तव्य समजत असे; म्हणून त्या अविचारी दिव्यवसूनें केवळ स्त्रीकरितां म्हणून चोरीचें साहस केलें; व जवळपास कोणी नाहीं असें पाहून तो तेथून कामधेनू घेऊन निघाला.

इकडे वसिष्ठऋषि येऊन पहातात तों तेथें कामधेनू नाहीं. तेव्हां त्यांनीं कामधेनू संबंधानें अंतरदृष्टीनें विचार केला, तेव्हां त्यांना असें कळून आलें कीं, अष्टवसू ती गाय चोरून नेत आहेत. मग वसिष्ठऋषी लागलेच निघाले व त्या अष्टवसूंना आडवे झाले. वसिष्ठऋषींना आलेले पाहून ते सर्व वसू भयभीत झाले. तो दिव्यवसू तर भीतीनें एकदम काळा ठिक्कर पडला. त्या सर्व वसूंकडे रागानें पाहून वसिष्ठ क्रोधयुक्त स्वरानें म्हणाले, ' अरे मूर्खांनों, माझ्या घरीं अन्न भक्षण करून माझीच चोरी करिता काय? यावरून तुम्हीं अत्यंत दुष्ट आहांत. या अपराधाबद्दल तुम्हाला मृत्युलोकीं मनुष्यजन्म प्राप्त होईल.' वसिष्ठऋषींचा तो शाप ऐकून ते वसू अत्यंत दुःखित झाले, व वसिष्ठाला हात जोडून म्हणाले, ' हे ऋषेश्वरा, आमच्यावर दया करा, आम्हाला आमच्या अपराधाची क्षमा करा, व आम्हांला उःशाप द्या. आम्हीं तुम्हाला शरण आलों आहोंत.' याप्रमाणें त्या वसूंनीं करुणा भाकिल्यावर वसिष्ठास त्यांची दया आली. मग वसिष्ठऋषींनीं त्यांना असा उःशाप दिला कीं, एक वर्षाचे आंत शापापासून तुम्ही मुक्त व्हाल, परंतु या दिव्यवसूला मात्र मी उःशाप देत नाहीं. ह्याला पुष्कळ दिवस पृथ्वीवर रहावें लागेल. त्याला तेथें सांसारिक सुखाचा लाभ मुळींच मिळणार नाहीं. याला स्त्री मिळणार नाहीं व पुत्रही होणार नाहीं. हा केवळ आपल्या भक्तीनेंच मोक्ष पावेल. याप्रमाणें उःशाप देऊन वसिष्ठऋषी कामधेनूला घेऊन आपल्या आश्रमांत परत आले.

### ३ गंगा व शंतनू यांचा विवाह.

अष्टवसूंना उःशाप मिळाल्यावर त्यांची व गंगेची भेट झाली. शापापासून आपली लवकर सुटका व्हावी म्हणून त्यांनीं गंगेची प्रार्थना केली. ते म्हणाले; गंगे, आम्हांस पृथ्वीवर जन्म घेण्याविषयीं वसिष्ठाचा शाप झाला आहे. तो वसिष्ठऋषीचा शाप भोगिल्यावांचून गत्यंतर नाहीं. तर आम्हांस तुझ्या उदरांत स्थान दे, इतर अमंगल ठिकाणीं जन्म घेण्याची आम्हांस फार भीति वाटते; म्हणून तूं आमची जननी हो; आणि जो कोणी उत्पन्न होईल त्यास गर्भपिंडांतून बाहेर पडल्याबरोबर जलांत सोडून दे, म्हणजे आमची

या शापांतून लवकर सुटका होईल. वसूंनीं गंगेला असें सांगितलें असतां, तिनें अष्ट वसूंचें तें म्हणणें कबूल केलें. ती म्हणाली तुमची, याप्रमाणें मी व्यवस्था करीन, पण मी पृथ्वीवरील कोणत्या पुरुषाबरोबर विवाह करूं याचा सध्यां मला मोठा विचार पडला आहे. तेव्हां वसू गंगेला म्हणाले, हे गंगे! प्रतीपराजाचा शंतनू नांवाचा मुलगा आहे, त्याच्याबरोबर तूं विवाह कर, कारण तो मोठ्या राजाचा मुलगा असून सुशील, पराक्रमी व सुंदर असा आहे. शिवाय तो पूर्वजन्मींचा सागरच आहे, तेव्हां त्याच्याबरोबर विवाह करण्यास तुला कांहीं हरकत नाहीं. गंगेला तें वसूंचें म्हणणें मानवलें व त्याप्रमाणें ती पुढील कार्यासाठीं प्रतीपराजाचे राज्यांत गेली.

गंगा प्रतीपराजाचे राज्यांत आल्यावर तिनें मनुष्य वेष धारण केला व ती अरण्यांत बसून राजपुत्र शंतनु याच्याबरोबर विवाहसंबंध कसा जुळवून आणावा याचा विचार करूं लागली. इतक्यांत त्या अरण्यांत हस्तिनापूरचा प्रतीपराजा शिकारीसाठीं आला. बराच वेळ त्यानें त्या अरण्यांत शिकार केल्यावर तो विश्रांतिसाठीं जमिनीवर स्वस्थपणें बसला. ती संधी साधून गंगा पुढें झाली व त्या राजाच्या सव्य अंकावर जाऊन बसली. ती प्रतीपराजाला म्हणाली, हे राजेश्वरा! तूं माझा स्वीकार करावास अशी माझी इच्छा आहे. तेव्हां प्रतीपराजा म्हणाला, हे स्त्रिये! मला तसें करितां येणार नाहीं. तूं माझ्या उजव्या मांडीवर बसली आहेस, तेव्हां मी तुला आपल्या सुनेप्रमाणें किंवा मुलीप्रमाणें समजतों. असा अनाचार करून मी आपल्यास व्यभिचाराचें पातक जोडून घेणार नाहीं. शंतनू नांवाचा माझा मुलगा आहे, तो तुझ्या योग्य असा वर आहे. त्याचे बरोबर विवाह करण्याची तुझी इच्छा असल्यास मी तुम्हां उभयतांचा विवाह करून देईन. गंगेनें प्रतीपराजाच्या म्हणण्यास आपली संमती दिली. ती म्हणाली; राजा, मी तुझ्या पुत्रा बरोबर विवाह करण्यास कबूल आहे, परंतु त्यानें माझ्या अटी कबूल केल्या पाहिजेत. मला माझ्या मर्जीप्रमाणें वागूं दिलें पाहिजे, व मी सांगेन त्या प्रमाणें त्यानें वागलें पाहिजे. हें गंगेचें भाषण ऐकून राजाला मोठें आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, गंगे, मी माझ्या शंतनू पुत्राला इकडे पाठवून देतों. त्यानें तुझें म्हणणें कबूल केल्यास तूं त्याचे बरोबर विवाह कर. असें सांगून प्रतीपराजा हस्तिनापुरांत निघून गेला. त्यानें शंतनूला बोलावून आणून गंगे विषयींची सर्व हकीकत सांगितली. ती हकीकत ऐकून शंतनूला गंगेला पाहण्याची फार उत्सुकता उत्पन्न झाली. तो लागलीच आपल्या घोड्यावर बसून बापानें सांगितलेल्या अरण्यांत गेला. तेथें भागीरथी नदीच्या कांठीं गंगा बसली होती. त्या स्वर्गसुंदरीचें तें अनुपमेय सौंदर्य पाहून शंतनूराजा अगदीं मुग्ध होऊन गेला. ही अशी लावण्यलतिका आपली अर्धांगी झाल्यास आपण खरोखर धन्य होऊं, असें त्यास वाटलें.

तो त्या गंगेजवळ गेला व तिला म्हणाला; हे सुंदरी, तूं कुमारी आहेस अथवा तुझा कोणाबरोबर विवाह झाला आहे, हें मला कथन कर. जर तूं अपरिणित असशील तर तुजबरोबर विवाह करण्याची माझी इच्छा आहे. ही माझी इच्छा तूं पूर्ण केल्यास मी तुझा मोठा ऋणी होईन. शंतनूराजाचें सौंदर्य पाहून गंगेसही त्यास वरण्याची इच्छा झाली. तिनें आपली अनुमती मुग्धावस्थेंत किंचित हंसून व लाजून कळविली. तेव्हां शंतनूराजा तिचा हात धरून म्हणाला, हे स्त्रिये, मला वरण्याची जर तुझी इच्छा असेल तर मला स्पष्ट हो किंवा नाहीं तें सांग. हें ऐकून गंगा म्हणाली, 'राजा, जो मला भाष्यदान देईल त्याचेबरोबर मी विवाह करणार आहे; तूं जर माझे म्हणण्याप्रमाणें वागशील, मला माझ्या स्वतःच्या मर्जीप्रमाणें वागूं देशील, तर मी तुजबरोबर विवाह करीन.' राजपुत्र शंतनू तिच्या सौंदर्यानें मोहित झाला असल्यामुळें त्यानें गंगेचे म्हणणें अक्षरशः कबूल केलें; व त्यानें तिला भाष्यदान दिलें. तो तिला म्हणाला, गंगे, तुझ्यासारखी सर्वांगसुंदर स्त्री, सौंदर्याप्रमाणेंच सुशील व सद्वर्तनी असेल अशी माझी समजूत असल्यामुळें मी तुला भाष्यदान देत आहे. याप्रमाणें राजपुत्र शंतनूनें गंगेचें म्हणणें मान्य केल्यावर गंगेचा व शंतनूचा मोठ्या समारंभानें विवाह झाला. पुढें दोघेही सुखानें कालक्रमणा करीत असतां गंगेस एक पुत्र झाला. पुत्र प्राप्तीमुळें राजाला मोठा आनंद झाला; परंतु तो त्याचा आनंद लागलाच मावळून गेला. कारण, तें नूतन अर्भक गंगेनें लागलेंच भागीरथींत फेंकून दिलें. गंगेचें तें अविचारीपणाचें कृत्य बघून शंतनू राजाला फार वाईट वाटलें; व त्याला तिचा फार राग आला. परंतु तिला भाष्यदान दिलेलें असल्यामुळें त्यास गंगेला एक शब्दही बोलतां आला नाहीं. तो आपला स्वतःच त्यासंबंधानें पुष्कळ हळहळला. पुढें एक संवत्सरानें गंगेला पुन्हा पुत्र झाला. तेव्हां राजाला पूर्वीप्रमाणेंच आनंद झाला, परंतु तोही पुत्र गंगेनें भागीरथींत फेंकून दिला. तें गंगेचें राक्षसी कृत्य बघून शंतनूला फार वाईट वाटलें, परंतु निरुपाय जाणून स्वस्थ बसला. याप्रमाणें त्या गंगेला सात पुत्र झाले व ते सातही तिनें नदींत फेंकून दिले. गंगेचें तें विलक्षण कृत्य पाहून शंतनूची अशी खात्री झाली कीं, ही स्त्री नसून स्वतःचीं मुलें नाहींशीं करणारी राक्षसीच आहे. त्यानंतर गंगेला आठवा पुत्र झाला; तेव्हां मात्र शंतनू राजाला स्वस्थ बसवेना. तो गंगेपुढें पदर पसरून एखाद्या दीन भिक्षेकऱ्याप्रमाणें तिला म्हणाला. गंगे, तूं आपले सात पुत्र नाहींसे केलेस आतां हा पुत्र तरी नाहींसा करूं नकोस. तुला मी भाष्यदान दिलेलें आहे, तेव्हां माझ्या म्हणण्याप्रमाणें तूं वाग असें मी म्हणत नाहीं. परंतु या पुत्राची मी तुजजवळ भिक्षा मागत आहें. कुलवृद्धीसाठीं व माझ्यामागें राज्याला अधिकारी म्हणून एवढा जर मला देशील तर मजवर फार उपकार होतील. याप्रमाणें

शंतनूराजानें गंगेची करूणा भाकिल्यावर तिला त्याची दया आली; व तिनें तो पुत्र राजाच्या स्वाधीन केला. गंगेनें त्या मुलाचें नांव भीष्म असें ठेविलें. गंगेच्या त्या कृत्यामुळें राजाला तिचे मोठे उपकार वाटूं लागले, परंतु एके दिवशीं गंगेनें तोही पुत्र नदींत टाकून दिला. तेव्हां मात्र तो शंतनूराजा भाष्यदान वगैरे सर्व विसरला व गंगेवर क्रुद्ध होऊन तिला पुष्कळ बोलला. राजाचा तो संताप पाहून गंगेला राग आला नाहीं. तिला राजाची फार कींव आली; व तिनें राजाला अष्टवसूंची सर्व कथा सांगितली. ती म्हणाली; राजा, ते अष्टवसू असून त्यांना मी शापमुक्त करण्याचें वचन दिलें होतें; त्या प्रमाणें त्यांची मी शापापासून मुक्तता केली. तसेंच मी पूर्व जन्मीची स्वर्गंगा आणि तूं सागर आहेस. आपणा दोघांस शाप झाल्यामुळें आपण मनुष्य जन्मास आलों आहोंत. तूं पुत्राविषयीं निराश होऊं नकोस. तुला एक पुत्र मिळेल. असें सांगून तिनें राजाचें समाधान केलें. त्यानंतर छत्तीस वर्षेपर्यंत गंगा शंतनूराजाजवळ होती. पुढें ती शापमुक्त झाल्यावर स्वर्गी निघून गेली.

## ४. धीवर कन्या सत्यवती.

शंतनूराजापासून गंगा निघून गेल्यावर तो अत्यंत उदास झाला. मन रमावें म्हणून तो ठिकठिकाणीं शिकार करीत फिरत असे. एकदां तो फिरत फिरत भागीरथीचे कांठीं आला, तेव्हां त्याच्या दृष्टीस नदीचा ओघ उलटा झाला असून पाणी उलट्या दिशेला वाहात आहे, असा विलक्षण चमत्कार पडला. तो चमत्कार पाहून राजाला फार आश्चर्य वाटलें; व त्या गोष्टीचें कारण शोधण्यासाठीं, तो भागीरथीच्या कांठाकांठानें पुढें जाऊं लागला. कांहीं पुढें गेल्यावर त्याच्या असें दृष्टीस पडलें कीं, एक सुंदर व सतेज पुत्र भागीरथीच्या कांठीं बसून त्यानें आपल्या शरप्रहारानें भागीरथीला उलट वळविलें आहे. तें त्या मुलाचें सामर्थ्य पाहून शंतनूराजा थक्क होऊन गेला. त्याला त्या मुलाचा समाचार विचारण्याची जिज्ञासा उत्पन्न झाली. तो त्या मुला जवळ गेला व त्याला म्हणाला, हे वीर पूत्रा, तूं कोणाचा आहेस? आणि या भागीरथीवर शरप्रहार कां करीत आहेस? शंतनूनें असा प्रश्न केल्यावर तो मुलगा त्या प्रश्नाचें उत्तर न देतां चटकन भागीरथींत निघून गेला. तो प्रकार बघून शंतनूराजा अधिक आश्चर्यचकित झाला. इतक्यांत त्या राजाची स्त्री गंगा मनुष्यरूपानें त्या पुत्रासह भागीरथींतून निघाली, आणि त्या पुत्राला राजाजवळ देऊन म्हणाली; 'राजा, हा तुझा पुत्र आहे. याचें नांव भीष्म असें आहे. हा सर्वविद्याविशारद असा होईल. याची पितृभक्ती मोठी राहील. तसेंच हा परमेश्वराचा आवडता भक्त होईल. परशुराम, शुक्र, वसिष्ठ व बृहस्पती यांना हा गुरू करून त्यांच्या जवळून अनेक विद्या संपादन करील. याला तूं आपलें

गृहीं घेऊन जा.' असें सांगून गंगा गुप्त झाली. मग शंतनूराजा भीष्माला बरोबर घेऊन मोठ्या आनंदानें हस्तिनापुरास निघून गेला.

या गोष्टीस चाळीस वर्षे झाल्यानंतर एकदां शंतनूराजा भागीरथीचे कांठीं शिकारीसाठीं गेला, तों तेथें त्यास मनोहर सुगंध येऊं लगला. सुवास कशाचा येत आहे म्हणून तो इकडे तिकडे पाहूं लागला, तों भागीरथींतील एका नांवेंत कोळ्याची एक तरुण व अत्यंत सुंदर मुलगी असून तिच्या अंगावरून वाऱ्याच्या लहरी वाहात असल्यामुळें जिकडे तिकडे सुवास सुटला आहे असें त्यास दिसून आलें. त्या तरुणीचें तें विलक्षण सौंदर्य व तो तिचा अंगावरील सुवास पाहून शंतनूराजा अगदीं मुग्ध होऊन गेला, व त्या तरुणीजवळ जाऊन तो तिला म्हणाला, 'हे धीवर कन्ये, तुझें हें अतुल सौंदर्य बघून तुजबरोबर विवाह करावा अशी इच्छा मला उत्पन्न झाली आहे तर हें माझें म्हणणें तूं कबूल कर. मी हस्तिनापूरचा शंतनू नांवाचा राजा आहे. तूं माझी अर्धांगी झाल्यास मी तुला आपली पट्टराणी करीन.' तेव्हां ती कोळ्याची मुलगी राजाला म्हणाली, राजा ! मी आपल्या बापाच्या आज्ञेवांचून तुला संमति देण्यास असमर्थ आहे: माझा बाप घरीं आहे, त्याच्याकडे तूं जा, आणि त्याची अनुमती मिळीव. त्या मुलीनें असें सांगितल्यावर राजा तेथून निघाला व त्या कोळ्याच्या घरीं गेला. आणि आपण कोण, कोठील वगैरे सर्व हकीकत त्या कोळ्याला सांगून त्यानें त्याच्याजवळ मुलीची मागणी केली. तेव्हां कोळी म्हणाला; राजा ! तुम्ही राजे लोक फार विलासी असतां, जी कोणीं सुंदर स्त्री भेटेल तिजबरोबर तुम्ही विवाह करितां, अशा रीतीनें तुम्हाला पुष्कळ स्त्रिया झाल्या म्हणजे तुम्हाला पुत्रही पुष्कळ होतात. मग त्यांतून तुम्ही आपल्या जो प्रीतीचा असेल त्याला राज्यावर बसवितां; असें तुमचें अविश्वसनीय वर्तन असतें. या करितां तूं जर माझ्या मुलीच्या मुलाला सिंहासनावर बसविण्याचें कबूल करशील, तर मी आपली मुलगी तुला देतों. हें त्या कोळ्याचें भाषण ऐकून राजाला मोठी काळजी पडली; व त्या कोळ्याला काय सांगावें याचा तो विचार करूं लागला. भीष्मासारख्या राज्यकार्यकुशल, रणधुरंधर पराक्रमी पुत्राला सोडून अन्य पुत्राला राज्य दिल्यास भीष्म असंतुष्ट होईल. तेव्हां भीष्माचा विचार घेतल्यावांचून या कोळ्याला हो अथवा नाहीं सांगणें बरें नव्हे, असा विचार करून राजा हस्तिनापुरास परत आला व चिंताक्रांत होऊन बसला. राजाला चिंताक्रांत पाहून भीष्माला फार वाईट वाटलें. तो बापाजवळ आला व बापाला विनत भावानें म्हणाला; बाबा, आज आपलें वदन चिंताक्रांत पाहून मला मोठें वाईट वाटतें. आपण कशाची काळजी करतां, तें मला सांगाल तर मी आपली काळजी दूर करण्याचा प्रयत्न करीन. तेव्हां शंतनूराजा दीर्घश्वास सोडून म्हणाला, पुत्रा ! एक डोळ्याच्या मनुष्याला जसें डोळस म्हणतां येत नाहीं; तसेंच एका

पुत्रानें ही संसारयात्रा पुरी होत नाहीं. मला तूं एकच पुत्र आहेस, याबद्दल फार चिंता वाटते. तुला आणखी सहोदर कसे मिळतील या चिंतेनें माझें मन व्यग्र झालें आहे. क्षत्रियाला बंधुबळ अवश्य असावें. रणांत युद्धाचे वेळीं व अन्यप्रसंगीं बंधूंचा जितका उपयोग होतो, तितका दुसरे कोणाचाही होत नाहीं; म्हणून मी तुला आणखी बंधू कसे मिळतील या विचारांत पडलों आहें. भीष्मा, मी आज शिकारी करितां भागीरथीच्या कांठीं गेलों असतां, तेथें माझ्या दृष्टीस एक सुंदर स्त्री पडली. तिजबरोबर विवाह करण्याचें मीं मनांत आणिलें आहे. आणि तसें केलें म्हणजे या काळजींतून मी अनायासें मुक्त होईन; परंतु ती स्त्री मिळवून देणें सर्वस्वी तुझ्या स्वाधीन आहे. या करितां तूं भागीरथीच्या कांठीं जा; व ती स्त्री मला मिळवून देण्याचा प्रयत्न कर. दास नांवाचा तेथें एक धीवर राहतो, त्याची ती कन्या आहे.

शंतनूराजानें भीष्माला याप्रमाणें सांगितल्यावर भीष्म तेथून निघून त्या दास नांवाच्या धीवराकडे आला, आणि त्यास म्हणाला; हे धीवरा, तूं आपली मुलगी सत्यवती, माझ्या पित्याला दे. तेव्हां तो म्हणाला; भीष्मा, तूं राजाचा वडील मुलगा आहेस, राजाच्या पश्चात राज्याचा मालक तूंच होणार, तेव्हां मी आपली मुलगी तुझ्या बापाला दिल्यास तिला जीं मुलें होतील त्यांना अर्थात तुझे सेवक बनावें लागेल. माझ्या मुलीच्या मुलांनीं सेवा करून राहावें हें मला मुळींच पसंत नाहीं. भीष्म म्हणाला; धीवरा, त्या संबंधानें तूं मुळींच काळजी करूं नकोस. तुझ्या मुलीच्या पोटीं जो पुत्र होईल त्याला मी राज्यावर बसवीन, असें मी तुला वचन देतों; म्हणजे झालें. धीवर म्हणाला;. भीष्मा, तूं म्हणतोस तें खरें; पण तुला जे पुत्र होतील, ते पुढें माझ्या मुलीच्या पुत्राशीं तंटा करून आपलें राज्य परत घेतील याचें मला भय वाटतें. भीष्म म्हणाला; धीवरा, असें असेल तर मी तुला असें वचन देतों कीं,मी आजन्म अविवाहित राहीन. इतकेंच नव्हे तर पृथ्वीवरील सर्व स्त्रिया मी माझ्या मातेसमान मानीन. मी लग्नच केलें नाहीं म्हणजे मला संततीच होणार नाहीं, व तुला राज्यापहरणाचें भय बाळगण्याचेंही कारण उरणार नाहीं. असें भीष्मानें धीवराला वचन दिल्यावर त्याला मोठा आनंद होऊन त्यानें आपली कन्या सत्यवती मोठ्या संतोषानें भीष्माचे स्वाधीन केली. भीष्मानें तिला रथांत बसवून हस्तिनापुरीं आणिलें; व समारंभानें तिचा व शंतनूराजाचा विवाह करविला. वैशंपायन ऋषि जनमेजयराजाला सांगतात; हे जनमेजय राजा, त्या भीष्माची ही विलक्षण पितृभक्ती पाहून इंद्रादि सुरवरांनीं भीष्मावर पुष्पवृष्टी केली. पुढें भीष्मानें प्रतिज्ञा केल्याप्रमाणें सत्यवतीच्या पुत्राला गादीवर बसविलें; व आपण यावज्जीव अविवाहित राहिला.

---

# अध्याय ८ वा.

## १. व्यासऋषीचा जन्म.

एके दिवशीं जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला; ऋषे, कोळ्याच्या मुलीच्या अंगाला एवढा सुगंध कां येत होता? तें ऐकण्याची मला इच्छा झाली आहे, तर ही माझी इच्छा आपण पूर्ण करावी. तेव्हां वैशंपायन म्हणाले पूर्वीं उपरिचर नांवाचा एक राजा होता. त्यानें कांहीं कारणावरून कालाहल नांवाच्या पर्वताला लाथ मारिली. त्या शक्तिसंपन्न राजाच्या लत्ता प्रहारानें त्या पर्वताला छिद्र पडलें, व छिद्रांतून शक्तिमती नांवाची नदी निघाली. पुढें कालाहल पर्वताच्या सहवासापासून त्या शक्तिमतीला गिरिका या नांवाची एक सुंदर मुलगी झाली. ती उपवर झाल्यावर कालाहलानें चैद्यदेशच्या उपरिचर नांवाच्या राजाला अर्पण केली. एकदां तो राजा शिकारीसाठीं दूर प्रदेशीं गेला असतां, मागें त्याची स्त्री गिरिका ही ऋतुस्नात झाली. ऋतुस्नात स्त्रीला पतीनें आपणापासून दूर करणें हें पाप आहे; स्त्री ऋतुस्नात झाल्याचें समजताच पतीनें परदेश सोडून घरीं परत यावें; न आल्यास त्यास दोष लागतो, असें शास्त्र आहे. स्त्रीनेंही या संबंधानें धीरता ठेवून पती जवळ नसल्यास पतीला ऋतुस्नात झाल्याची खबर द्यावी. असो, त्याप्रमाणें गिरिकेनेंही आपल्या पतीला ती गोष्ट कळविण्याचें मनांत आणिलें. तिनें एका कागदावर 'आपण गेल्याचे पश्चात मी ऋतुस्नात झालें आहे. तर उदईक जरूर येण्याचें करावें; आपणास दोष लागूं नये म्हणून हें वर्तमान श्रुत केलें आहे.' असा मजकूर लिहिला, व तो कागद नीट घडी करून, शिकविलेल्या पोपटाच्या गळ्यांत दोरीनें बांधला, आणि त्या पोपटाला कोणत्या दिशेला जावयाचें व तें पत्र कोणाला द्यावयाचें वगैरे सर्व माहिती देऊन, जाण्यास परवानगी दिली. त्याप्रमाणें तो पोपट तेथून वेगानें निघाला व आकाशमार्गानें गिरिकेनें सांगितल्या ठिकाणीं येऊन पोहोंचला. राजानें आपल्या पोपटाला तेव्हांच ओळखिलें, व तो जवळ आल्यावर त्याचे गळ्यांत चिठ्ठी पाहून ती त्यानें सोडून घेतली व वाचून पाहिली. उपरिचरराजानें तें पत्र वाचून पाहिल्यावर, त्यास काय करावें याचा मोठा विचार पडला. कारण त्याला शिकारीचें मोठें व्यसन होतें. ती वेळ शिकारीला मोठी नामी होती. तेव्हां मृगया सोडून जावें हें त्यास बरें वाटेना. बरें ऋतुस्नात स्त्रीच्या निमंत्रणाचा अव्हेर करावा तर तेंही ठीक नव्हे. असा विचार पडल्यावर त्यानें एक निराळीच युक्ती योजिली. ती अशी कीं, त्यानें आपलें रेत स्खलन करून तें एका कागदावर घेतलें, व त्याची पुडी करून ती पुडी पोपटाच्या गळ्यांत बांधली व त्यास आपल्या स्त्रीकडे जाण्याचा इषारा केला.

राजाची आज्ञा झाल्यावर तो पोपट तेथून निघाला. कांहीं मार्ग क्रमण केल्यावर मार्गांत त्याला दुसरा एक पोपट भेटला. या पोपटाचे गळ्यांत कांहीं तरी खाण्याची वस्तू आहे, ती आपण याच्या जवळून हिरावून घ्यावी, असा त्या दुष्ट पोपटानें विचार केला, आणि त्यानें ह्या पोपटावर झडप मारिली. त्या दोन्ही राघूंचें त्या वस्तूसाठीं मोठ्या निकराचें भांडण झालें. शेवटीं दोघांच्या हिसकाहिसकीनें त्या पुडीची दोरी तुटली व ती पुडी दोघांनांही न मिळतां खालीं पाण्यांत पडली. याप्रमाणें वादाचें कारण संपल्यावर दोघेही पोपट आपआपल्या ठिकाणीं निघून गेले. गिरिकेच्या पोपटानें गिरिकेला वाटेंतील सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून तिला फार वाईट वाटलें; पण निरुपाय जाणून ती स्वस्थ राहिली.

इकडे ती पुडी यमुनेच्या पात्रांत पडली, त्यावेळीं यमुनेमध्यें अद्रिका नांवाची अप्सरा ब्रह्मशापानें मत्स्यशरीर धारण करून राहिली होती. तिला ती पुडी सांपडली. आंत कांहीं तरी खाण्याचा पदार्थ आहे असें वाटून तिनें लागलीच ती खाऊन टाकिली. त्यावेळीं ती ऋतुस्नात असल्यामुळें पुडींतील रेतापासून तिला गर्भ राहिला. पुढें कांहीं दिवस गेल्यावर, म्हणजे प्रसूत होण्याच्या समयाला ती एका कोळ्याच्या जाळ्यांत सांपडली. कोळ्यानें सांपडलेले सर्व मासे चिरले, त्यांत वरील गरोदर असलेल्या मासळीलाही चिरलें. त्याबरोबर तिच्या पोटांतून एक मुलगा व एक मुलगी अशी दोन सुंदर मुलें निघालीं. तीं दोन्हीं मुलें आपणास काय करावयाचीं आहेत आपण तीं राजाला नेऊन द्यावींत; असें त्या कोळ्यानें ठरविलें. परंतु त्याची स्त्री म्हणाली, मुलगी आपणाला ठेवून घ्यावी व मुलगा पाहिजे तर राजाला नेऊन द्यावा. स्त्रीच्या इच्छेप्रमाणें कोळ्यानें मुलगी घरीं ठेवून मुलगा उपरिचरराजास नेऊन दिला. राजानें तो माशाच्या पोटांत सांपडला म्हणून, त्याचें नांव, मत्स्येंद्र असें ठेविलें. इकडे कोळ्यानें आपल्या मुलीचें नांव मत्स्योदरी असें ठेविलें होतें. ती मुलगी थोडी मोठी होऊन इकडे तिकडे हिंडूं लागल्यावर आपल्या पोरस्वभावाप्रमाणें कधीं कधीं नावेंत बसून नाव वल्हवीत असे. एके दिवशीं ती नावेंत बसून खेळत असतां, तेथें पाराशर नांवाचे ऋषी आले. ते महान् तपोनिधी असून पवित्र व अत्यंत तेजस्वी होते. त्यांना नदी-पलीकडे जावयाचें असल्यामुळें ते त्या मुलीला म्हणाले; हे मुली, मला नावेंत बसवून पलीकडे नेऊन पोहोंचवशील तर मजवर फार उपकार होतील. तिनें पाराशरऋषीचें म्हणणें कबूल केलें; व त्यांना नावेंत घेऊन ती नांव वल्हवूं लागली. नावेंत बसल्यावर पाराशरऋषीचें लक्ष त्या मुलीकडे गेलें. तेव्हां तिचें अप्रतिम सौंदर्य पाहून त्या महा तपोनिधीसही कामवासना उत्पन्न झाली, व तो तिची विनवणी करूं लागला. तो म्हणाला; हे धीवर कन्ये, तुला पाहून मला कामवासना उत्पन्न झाली आहे, तर माझी इच्छा तूं पूर्ण कर. ऋषीचें तें चमत्कारिक भाषण ऐकून ती कोळ्याची मुलगी ऋषीस म्हणाली; अहो,

अद्याप माझें वय लहान आहे. तुम्ही ऋषी म्हणवितां आणि मला कौमार्या-वस्थेंतून भग्न होण्याची सल्ला कशी देतां ? यावर पाराशरऋषी म्हणाले, हे धीवर-कन्ये ! माझ्या संगापासून तुझी कौमार्यावस्था भग्न होणार नाहीं. उलट हल्लीं तुझ्या अंगाला येत असलेली घाण नाहींशी होऊन मनोहर सुगंध येऊं लागेल. त्या सुगंधाच्या लहरी एक योजनपर्यंत वाहतील. पराशरऋषीचें तें भाषण ऐकून त्या मुलीला सौंदर्यवती होण्याच्या आशेनें ऋषीबरोबर समागम करण्याची इच्छा उत्पन्न झाली. ती म्हणाली, ऋषि, आपण म्हणतां तें खरें; पण मस्तकावर सूर्य आलेला आहे, तेव्हां अशा प्रकाशांत सूर्यासमक्ष असें निंद्य कृत्य करणें अनुचित होय असें मला वाटतें. तें तिचें म्हणणें पाराशरऋषींनाही खरें वाटलें; व त्यांनीं ती अडचण दूर करण्यासाठीं, मुठींत मृत्तिका घेतली व ती अभि-मंत्रून आकाशांत फेंकून दिली. ती अभिमंत्रित केलेली मृत्तिका ऋषीच्या हातां-तून सुटण्याबरोबर तिनें सर्व आकाशमंडळ व्याप्त करून सूर्यास झांकून टाकिलें. त्यामुळें पृथ्वीवर सर्वत्र रात्रीप्रमाणें अंधार पडला. नंतर तेथें पाराशरऋषीनें धीवर कन्येचा उपभोग घेतला. तेव्हां त्या दोघांच्या संगमापासून एक पुत्र उत्पन्न झाला. पाराशर तेथून निघून गेल्यावर धीवरकन्या त्या मुलाला पाहून फार भयभीत झाली. आपल्या बापानें याला पाहिल्यास तो आपणावर रागावेल, व कडक शिक्षा करील, या भीतीनें तिनें तें मूल नावेंतून उचललें, व दाट झाडांझुड-पांच्या बेटांत नेऊन ठेविलें. तेव्हां तें मूल धीवरकन्येस म्हणालें, हे धीवर-कन्ये ! मी जरी अयोनिसंभव आहे, तरी तूं माझी माता आहेस. तुजवर जेव्हां कांहीं संकट येईल, तेव्हां तूं माझें स्मरण कर; म्हणजे मी तूं असशील तेथें येऊन तुझ्या संकटाचें निवारण करीन. प्रसिद्ध नारायणाचा अवतार, त्रिकालज्ञ, कृष्णद्वैपायन वेदव्यास म्हणतात तो हाच मुलगा होय. त्या मुलाला त्या झाडां-झुडपांमध्यें टेवून ती धीवर कन्या तेथून निघून गेली. ती माशाचे पोटांतून निघाली म्हणून तिला मत्स्योदरी, धीवरानें तिचें संरक्षण केलें म्हणून धीवरी, पाराशरानें तिला सुगंध दिला म्हणून योजनगंधा, व्यासानें तिला माता म्हटलें म्हणून सत्यवती याप्रमाणें अनेक नांवें दिलीं गेलीं.

## २. पाराशरऋषीची उत्पत्ति.

ही कथा ऐकिल्यावर जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला, ऋषी, मला पाराशरऋषीची कथा ऐकण्याची इच्छा उत्पन्न झाली आहे, तर कृपा करून ती कथा मला सांगावी. तेव्हां वैशंपायनऋषी ती कथा सांगू लागले. ते म्हणाले, 'राजा, पूर्वी गाधिराजाचा विश्वामित्र नांवाचा एक मुलगा होता. तो फार पराक्रमी, अभिमानी व दुराग्रही होता. तो एकदां सैन्यासहवर्तमान अरण्यांत शिकार करीत असतां, बराच वेळ शिकार केल्यामुळें फार थकला व विश्रांतीसाठीं सैन्यासह वसिष्ठ ऋषींच्या आश्रमांत आला. विश्वामित्राच्या आगमनानें वसिष्ठास मोटा आनंद

झाला; व त्यांनीं राजाचा मोठा सत्कार करून त्यास आपल्या आश्रमांत उतरण्यास जागा दिली. वसिष्ठाचा तो शांत व मनोरम आश्रम पाहून विश्वामित्राला फार आनंद झाला. वसिष्ठानें लागलीच भोजनाची तयारी केली व विश्वामित्रराजाला सर्व मंडळीसह भोजन करण्याविषयीं विनंती केली. आपणाबरोबर हजारों लोक आहेत; इतक्या लोकांची व्यवस्था ठेवण्यास हा वसिष्ठऋषि असमर्थ आहे, अशी विश्वामित्राची समजूत होती. तथापि ऋषिप्रसाद अवश्य ग्रहण केला पाहिजे, असा विचार करून राजा आपल्या परिवारासह वसिष्ठाच्या भोजनशाळेंत गेला. तेथें भोजनाची विलक्षण तयारी पाहून राजा अगदीं चकित होऊन गेला. तेथें बसण्यासाठीं रांगेनें हजारों पाट मांडिले होते, पाटांसमोर सुवर्णाचीं हजारों ताटें ठेविलीं होतीं, जिकडे तिकडे सुवास सुटला होता, उदबत्त्यांच्या सुगंधानें ती सर्व भोजनशाळा दरवळून गेली होती. अशी ती भोजनाची अपूर्व तयारी पाहून राजाला मोठेंच आश्चर्य वाटलें. विश्वामित्रराजा आपल्या परिवारासह भोजनाला बसला असतां, वसिष्ठऋषि त्या सर्वांना आग्रह करून पक्वानें वाढीत होता. ती मधुर व रुचकर पक्वानें खात असतां, विश्वामित्रराजा ऋषीला म्हणाला, ऋषे, जीं पक्वान्नें आह्मा राजेलोकांसही मिळणें दुरापास्त अशीं हीं पक्वानें आपल्या या अरण्यांतील आश्रमांत मिळालेलीं पाहून मला मोठें नवल वाटतें. वसिष्ठऋषि, ही इतकी उत्तम तयारी आपणास थोड्या वेळांत कशी करतां आली, तें आपण सांगितलें असतां मनांत उत्पन्न झालेली जिज्ञासा नाहींशी होईल. वसिष्ठ ऋषि म्हणाले, ‘ राजा, मजजवळ एक गाय आहे, तिला कामधेनु असें ह्मणतात. त्या गायीजवळ जें जें मागावें तें तें प्राप्त होतें. त्या कामधेनूच्या कृपेनें मी तुमचा हा आदरसत्कार करीत आहे.’ कामधेनूचें महत्व ऐकून विश्वामित्राला आपणास ती मिळावी अशी इच्छा उत्पन्न झाली व तो वसिष्ठऋषीला म्हणाला, ऋषींद्र हें पशुरत्न माझ्या राजवाड्यांत असावें अशी माझी इच्छा आहे. तेव्हां ही कामधेनु आपण मला द्यावी. मी तुम्हाला या एका गायीच्या ऐवजीं सर्वोत्कृष्ट सालंकृत अशा सहस्र गाई देतों. विश्वामित्राचें हें मागणें ऐकून वसिष्ठऋषि म्हणाले, राजा या गाईच्या योगानें माझा आश्रमधर्म सुरळीत रीतीनें चालतो तेव्हां ही गाय मला देतां येत नाहीं. या गायीच्या तुपानें मी होमहवन करीत असतों, व हिची योग्यता दुसऱ्या कोणत्याही गायींस येणें शक्य नाहीं. कश्यपानें ही गाय मला केवळ आश्रमधर्मासाठींच दिली आहे, तेव्हां अशी ही गाय देण्यास मी समर्थ नाहीं.

विश्वामित्र राजा फार अभिमानी होता. शिवाय तो राज्यवैभवाच्या धुंदीनें अंध झालेला होता. सत्ताधीश असल्यामुळें त्यास आपलें म्हणणें सर्वांनीं मान्य केलेंच पाहिजे असें वाटत असे. वसिष्ठानें आपला शब्द अशा रीतीनें मोडलेला पाहून त्याला फार राग आला. वसिष्ठानें आपणास आश्रमांत उतरण्यास जागा

दिली; व आपणासर्वांस षड्रस अन्नांचें भोजन घातलें, हें सर्व विसरून जाऊन त्याचें अनिष्ट करण्यास तो प्रवृत्त झाला. वसिष्ठाला धमकी देऊन तो म्हणाला; 'वसिष्ठा, विचार कर. तूं नाहीं म्हणून कोणाला उत्तर देत आहेस ? माझी सत्ता, माझें वैभव, माझा मान, याचा कांहीं तरी विचार कर. तूं जर स्वसंतोषानें ही कामधेनू मला न देशील तर ती मी बलात्कारानें घेऊन जाईन. मजजवळ हजारो सैनिक आहेत, त्यांच्याकडून ती गाय मी सहज घेऊन जाऊं शकेन. इतकें करण्यापेक्षां मी देतों त्या हजार गायी घेऊन ही कामधेनू मुकाट्यानें माझ्या स्वाधीन कर, यांतच तुझें कल्याण आहे.' वसिष्ठ शांतपणें त्यास म्हणाला; हे राजा विश्वामित्रा, ही गाय तुला देण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. तुझी इच्छा असल्यास बलात्कारानें खुशाल घेऊन जा. याप्रमाणें वसिष्ठानें सांगितल्यावर विश्वामित्रराजा अधिक क्रुद्ध झाला, व स्वतः गोशाळेंत जाऊन त्यानें कामधेनू सोडली. त्या वेळीं त्या कामधेनूला हा राजा आपणास घेऊन जाणार म्हणून फार वाईट वाटलें. ती मोठ्यानें हंबरडून वसिष्ठ ऋषीला म्हणाली; अहो वसिष्ठ ऋषे, धांवा धांवा, या राजाच्या हातून मला सोडवा. तुमच्या आश्रमांतून अन्य ठिकाणीं जाण्याची माझी इच्छा नाहीं. वसिष्ठ ऋषि म्हणाले, हे कामधेनो, मी ब्राह्मण तुझें संरक्षण करण्यास असमर्थ आहें, तुझें संरक्षण तूंच स्वतः कर. वसिष्ठानें असें सांगितल्यावर विश्वामित्रास आपला मार्ग अगदीं निष्कंटक झाला असें वाटून तो बलात्कारानें गायीला ओढूं लागला. तेव्हां ती गाय विश्वामित्रावर अत्यंत संतप्त झाली. तिनें आपल्या शरीरांतून विश्वामित्राचा नाश करण्यासाठीं असंख्य सैन्य निर्माण केलें. तिच्या कानापासून कोळी लोक निर्माण झाले, मुखांतल्या फेसांतून तुर्क निर्माण झाले, शेंपटीपासून इंगळ निर्माण झाले, मूत्रापसून पौंड्र लोक उत्पन्न झाले, कानांतून गोकर्णवासी उत्पन्न झाले, नेत्रांतून नैमिषारण्यवासी प्रगट झाले, खुरांतून खुरासनी निर्माण झाले, आणि मलापासून नाना वर्णाचें सैन्य उत्पन्न झालें. त्या गायीपासून उत्पन्न झालेल्या शूर सैनिकांनीं थोड्या वेळांत विश्वामित्राच्या सर्व सैन्याची दाणादाण उडविली व विश्वामित्राला तेथून पळावयाला लाविलें. त्या सैनिकांच्या मारानें विश्वामित्र अत्यंत भयभीत झाला व तीन योजनें दूर पळून गेला. गायीनें अशा रितीनें आपणास पळवून लाविलें; जवळचें सर्व सैन्यही नाहींसें झालें; आणि शिवाय अपमान पदरांत पडला, यावद्दल त्याला अत्यंत दुःख होऊं लागलें. अशा अपमानकारकस्थितींत आपल्या नगरांत परत जाण्याचें मुळींच त्यास धैर्य होईना. तो मोठा खुनशी स्वभावाचा असल्यामुळें वसिष्ठास चांगलें छळल्यावांचून सोडावयाचें नाहीं, अशी त्यानें दृढ प्रतिज्ञा केली. आणि प्रतीज्ञा पूर्ण करण्यासाठीं त्यानें तप साधन करण्याचें ठरविलें. त्या दिवसापासून तो तप करण्याच्या उद्योगाला लागला.

सूड उगविण्याच्या कल्पनेनें प्रेरित होऊन तपसामर्थ्याकरितां विश्वामित्रानें देह कष्टविण्यास आरंभ केला. त्यानें एक हजार वर्षे पाण्यांत उभें राहून मौन मुखानें कोटी लक्ष (एक महापद्म) गायत्रीचा जप केला. त्यामुळें त्याच्या अंगीं विलक्षण सामर्थ्य आलें. त्याचें तें सोज्वळ तपसामर्थ्य पाहून ब्रह्मादिक देवांनांही त्याची भीती वाटूं लागली. तपामुळें संपूर्ण त्रिभुवनाचा नाश करण्याचें सामर्थ्य त्याला प्राप्त झालें. अशा त्या अलौकिक सामर्थ्याचा उपयोग विश्वामित्रास वसिष्ठाच्या छळण्याकडे करावयाचा होता. विश्वामित्राची तयारी झाल्यावर दैवयोगानें तशा प्रकारचा योगही लवकरच जमून आला. एकदां एका अरण्यामध्यें कल्माक्षी नांवाचा राजा शिकारीसाठीं आला होता, व त्याच अरण्यांतून शतकीर्ती नांवाचा वसिष्ठाचा मुलगा कांहीं कामाकरितां जात होता; कल्माक्षी राजा त्याला अडवून म्हणाला; अरे, इकडून जाऊं नको. मी हल्लीं येथें शिकार करीत आहें. तुला इकडून जाऊं दिल्यास माझी शिकार पळून जाईल. शतकीर्ती म्हणाला, राजा, लोकांच्या सोईसाठीं मार्ग आहेत; ते राजे लोकांनीं आपल्या चैनीसाठीं बंद करणें हा अन्याय आहे. शिवाय या मार्गावर तुझी कोणत्याही प्रकारची सत्ता नाहीं, मग हा मार्ग बंद कां करतोस ? माझा या मार्गानें जाण्याचा हक्क आहे, मी इकडून गेल्यावांचून राहणार नाहीं. त्या शतकीर्तीचें तें स्पष्ट व निस्पृह भाषण, राज्यमदानें अंध झालेल्या त्या राजाला न रुचून त्यानें त्या शतकीर्तीच्या पाठीवर हातांतल्या चाबूकानें खूप मारिलें. राजाचा उन्मत्तपणा पाहून शतकीर्तीला राग आला व त्यानें 'तूं निशाचर होशील' असा त्याला शाप दिला. त्या बरोबर तो राजा राक्षस झाला. या सर्व प्रकाराकडे विश्वामित्राचें लक्ष होतेंच. ती संधी आल्याबरोबर तो राक्षसाजवळ जाऊन त्याला म्हणाला; अरे ज्यानें तुला शाप देऊन राक्षस केलें, त्यालाच तूं खाऊन टाक म्हणजे झालें. विश्वामित्रानें असें सांगताच तो कल्माक्षी राक्षस शतकीर्तीच्या अंगावर धांवून गेला; व त्यानें त्यास खाऊन टाकिलें. विश्वामित्रानें आणखी त्यास सांगितलें, अरे कल्मक्षा, या शतकीर्तीला आणखी पुष्कळ बंधू आहेत त्यांनांहीं तूं खाऊन टाक; म्हणजे तूं शापाचा सूड उगविला असें होईल. विश्वामित्राच्या सूचनेप्रमाणें कल्माक्ष राक्षसानें वसिष्ठ ऋषीचे शंभर पुत्र खाऊन टाकिले. तथापि वसिष्ट त्या राक्षसावर किंवा विश्वामित्रावर मुळींच रागावले नाहीं. वसिष्ठाचा तो विलक्षण शांत स्वभाव पाहून विश्वामित्राला फार आश्चर्य वाटलें, व त्यास केलेल्या कृत्याबद्दल फार अनुताप वाटूं लागला.

वसिष्टऋषीचे शंभर पुत्र नाहींसे झाल्यामुळें त्याच्या मनाला फार उद्विग्नता उत्पन्न झाली. ती उद्विग्नता नाहींशी होण्यासाठीं वसिष्ठानीं दुसरे ठिकाणीं जाऊन राहण्याचा विचार केला व त्याप्रमाणें ते आपल्या स्नुषांना बरोबर घेऊन

दुसरीकडे निघून गेले. वाटेनें चालत असतां, वसिष्ठऋषींचे कानावर वेदपठणाचा शब्द येऊं लागला. तो स्वर शतकीर्तीचा आहे, असें त्यांस वाटून ते म्हणाले, शतकीर्तीच्या आवाजासारखा आवाज ऐकूं येत आहे. तेव्हां येथें कोठें शतकीर्ती वेदपठण करीत आहे कीं काय ? शतकीर्तीची स्त्री म्हणाली; माझ्या पोटांत गर्भ आहे तो वेदपठण करीत आहे. स्नुषेचें तें भाषण ऐकून वसिष्ठऋषीला मोठा आनंद झाला. पुढें कांहीं दिवस गेल्यावर योग्य मसयीं ती शतकीर्तीची स्त्री प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. त्याचें नांव ऋषींनीं पाराशर असें ठेविलें. तें वर्तमान त्या कल्माक्षी राक्षसाला समजतांच तो तेथें आला व पाराशराचा नाश करण्याचा प्रयत्न करूं लागला. तेव्हां वसिष्ठऋषींनीं पाणी अभिमंत्रून त्याच्या अंगावर टाकिलें. मंत्राचें पाणी अंगावर पडताच तो पूर्वीप्रमाणें सुंदर मनुष्य बनला व त्यास आपण राजे आहों वगैरे सर्व स्मृती झाली, तो वसिष्ठांना नमस्कार करून म्हणाला; अहो ऋषि, या पाराशर ऋषींना मजबरोबर अयोध्येस पाठवाल तर मजवर फार उपकार होतील. मी अयोध्येचा राजा आहे, पण मला पुत्र संतती मुळींच नाहीं, ती या पाराशर ऋषींच्या कृपा प्रसादानें मिळवावी असें माझ्या मनांत आहे. या करितां यांना मजबरोबर पाठविण्याची कृपा करावी. वसिष्ठऋषीला त्या राजाची दया आली व त्यांनीं त्याची विनंति मान्य करून पाराशरऋषीला त्याच्याबरोबर पाठविलें. अयोध्येस आल्यावर राजानें आपल्या स्त्रियांना पाराशरऋषीस आणण्याचें कारण सांगितलें. त्या तेजस्वी ऋषीला पाहून त्या स्त्रियांना फार आनंद झाला व त्या त्याच्या भजनीं लागल्या. राजाच्या पट्टराणीकडे पाराशरऋषीनें पाहिल्याबरोबर तिला गर्भ राहिला. तो गर्भ बारा वर्षेंपर्यंत तिचे उदरांत होता. गर्भ पोटांत वाढत असल्यामुळें तिला फार त्रास होऊं लागला. सरतेशेवटीं तिनें दगडानें पोटावर प्रहार करून गर्भपात केला. त्या मुलाचें नांव युष्मा असें ठेविलें.

पाराशरऋषीला आपल्या पित्याच्या व चुलत्यांच्या नाशाची सर्व माहिती कळल्यावर त्याच्या मनांत राक्षसजातीविषयीं अत्यंत द्वेष उत्पन्न झाला; व पृथ्वीवरील सर्व राक्षस नाहींसे करण्यासाठीं त्यानें राक्षसांचा होम करण्याला आरंभ केला. मंत्रशक्तीनें राक्षसांस आव्हान करावें व त्यांस होमांत जाळून टाकावें; असा त्याचा क्रम सुरू झाला. त्यामुळें प्रत्यहीं हजारों राक्षस यज्ञांत जळून नाहींसे होऊं लागले. अशा रीतीनें जेव्हां राक्षससत्र सुरू झालें, तेव्हां सर्व राक्षस भयभीत झाले. त्यांना आपल्या सुटकेचा कांहींच मार्ग दिसेना. मग पौलस्ती नांवाच्या राक्षसानें तेथें येऊन पाराशरऋषीच्या चरणावर लोटांगण घातलें, आणि नम्रपणें तो म्हणाला, ‘ऋषि, आपण राक्षसांचा निष्कारण संहार करीत आहां. आम्ही सर्व राक्षस निरपराधी आहोंत. तुमच्या पित्याचा व चुलत्याचा नाश विश्वामित्रानें करविला. खरा अपराधी विश्वामित्रऋषी आहे. विश्वामित्रावरचा

राग आम्हां अनाथांवर काय म्हणून काढितां ? आम्हीं तुम्हांला शरण आहों. आमचें संरक्षण करणें तुमचें कर्तव्य आहे.' पाराशरऋषीला पौलस्तीचें म्हणणें खरें वाटून त्यांनीं तो यज्ञ बंद केला, व त्यांतील विभूतीला रक्षसांचें संरक्षण कर, असें सांगून ती विभूती त्यानें मेरूपर्वतावर फेंकून दिली. पौलस्तीच्या मध्यस्तीमुळें रावणकुंभकर्णादि राक्षस वांचले. नाहीं तर पृथ्वीवरील सर्व राक्षस अग्नींत नाहींसे झाले असते.

### ३. अंबा, अंबिका व अंबालिका.

असो, इकडे शंतनुराजा व सत्यवती आनंदानें संसार-सुखाचा अनुभव घेत-असतां सत्यवतीला प्रथम चित्रांगद नांवाचा मुलगा झाला. नंतर कांहीं दिवसांनीं विचित्रवीर्य नांवाचा दुसरा मुलगा झाला. पुढें वृद्धावस्थेंत शंतनुराजा पंचत्व पावला. मग भीष्मानें मोठया समारंभानें चित्रांगदाला राज्यावर बसविलें. चित्रांगदराजा पापभीरु असून आपलें राज्य मोठया नीतीनें चालवीत असे. त्याच्या राज्यशासनपद्धतीपासून राज्यांतील सर्व लोकांना फार सुख होत असे. त्यानें आपल्या बाहुबलानें अनेक देश जिंकून आपल्या राज्याचा पुष्कळ विस्तार वाढविला. या चित्रांगद राजाच्या पराक्रमाविषयीं सर्वत्र प्रसिद्धी झाली होती. गंधर्वलोकीं चित्रांगद नांवाचा दुसरा राजा राज्य करीत होता, त्याला त्याचा कीर्तिरव ऐकून मोठें वैषम्य वाटलें; व तो युद्धासाठीं हस्तिनापुरीं आला. हिरण्यनदीच्या कांठीं उभयता चित्रांगदांचें घनघोर युद्ध झालें. त्या युद्धांत हस्तनापुरचा चित्रांगद पडला, आणि गंधर्व लोकचा चित्रांगद जय मिळवून गंधर्व लोकीं निघून गेला. चित्रांगदाच्या मृत्यूचें वर्तमान ऐकून सत्यवतीला फार वाईट वाटलें. मग भीष्मानें विचित्रवीर्याला राज्यावर बसवून त्याच्याकडून सर्व राज्यकारभार चालविला. विचित्रवीर्याचा कोणा चांगल्या मुलीबरोबर विवाह करण्याविषयीं सत्यवतीनें भीष्माला सांगितलें होतें; त्याप्रमाणें तो मुलीच्या शोधांत होता. लवकरच काशीश्वरराजाच्या मुलीच्या स्वयंवराची बातमी भीष्मास कळतांच तो आपला रथ तयार करवून स्वयंवराकरितां काशीस गेला. तो स्वयंवर मंडपांत गेला तेव्हां तेथें हजारों प्रेक्षक बसले होते, व त्या काशीराजाच्या अंबा, अंबिका व अंबालिका अशा तिन्ही मुली हातांत माळा घेऊन कोणाच्या गळ्यांत त्या घालाव्यात याचा विचार करीत फिरत होत्या. इतक्यांत भीष्मानें त्या तिघीनांही उचलून रथांत बसविलें व रथ हांकिला. तो प्रकार पाहून काशीराजासुद्धां सर्व राजे भीष्मावर फार क्रुद्ध होऊन आपआपल्या सैन्यानिशीं भीष्माच्या मागें लागले. त्या वेळीं भीष्म एकटा होता; व ते राजे लक्षावधी होते; तथापि भीष्मानें आपल्या धनुर्विद्यानैपुण्यानें शरवृष्टी करून त्या सर्वांना पराभूत केलें. त्या सैन्यांत शाल्व नांवाचा एक फार पराक्रमी राजा होता. त्याला आपल्या पराक्रमाचा फार अभिमान होता. भीष्मानें आपल्या बाणानें त्याचा सारथी व घोडे

मारून टाकिले; व त्याचा रथ उडवून सर्वांप्रमाणें त्याचाही पराभव केला. याप्रमाणें सर्वांचा पराभव करून भीष्म तिन्ही मुलींस घेऊन हस्तिनापुरीं आला. त्या तीन सुंदर मुलींना पाहून सत्यवतीला मोठा आनंद झाला. भीष्मानें तिघींचें विचित्रवीर्याबरोबर लग्न करण्याचें ठरविलें. परंतु त्यांच्यांपैकीं अंबा नांवाची वडील मुलगी विवाहास कबूल होईना. ती भीष्माला म्हणाली; भीष्मा, मीं आपल्या मनानें शाल्व राजास वरिलें आहे. त्याच्यावांचून इतर पुरुष मला बापा-बंधू समान आहेत; याकरितां मला त्याच्याकडे पोंचतें करावें. अंबेची विनंती भीष्मानें मान्य केली; व तिला रथांत बसवून काशीपुरास पाठवून दिलें. नंतर सुमुहूर्त पाहून अंबिका व अंबालिका या दोघींबरोबर विचित्रवीर्याचा मोठ्या समारंभानें भीष्मानें विवाह करविला.

इकडे ती काशीश्वराची मुलगी अंबा काशीपुरास आल्यानंतर शाल्वास भेटली, व म्हणाली; हे शाल्वराजा, मी मनानें आपणांस वरिलें आहे. मी आपला हा निश्चय भीष्माला सांगितल्यावरून त्यानें मला रथांतून आपल्याकडे पोंचतें केलें. याकरितां आपण माझा स्वीकार करावा. शाल्व म्हणाला, 'हे अंबे, ही गोष्ट अत्यंत अनुचित होय. स्वयंवर मंडपांतून आम्हांबरोबर युद्ध करून भीष्मानें तुला जिंकून नेलें आहे. तेव्हां आतां तूं त्याची झाली आहेस. तुजबरोबर विवाह करणें हें लोकांत अपमानकारक असून, शास्त्रदृष्टीनेंही पापकारक आहे.' शाल्वाचें बोलणें ऐकून अंबा अत्यंत चिंताक्रांत झाली. विचित्रवीर्यासही आपण सोडिलें; आणि शाल्वही वरीत नाहीं; अशा स्थितींत ती सांपडल्यावर पुढें काय करावें तें तिला सुचेना. नंतर तिनें भीष्माला वरण्याचा निश्चय केला, व त्याकडे येऊन म्हणाली; हे गंगापुत्रा, मी तुला वरण्याचा निश्चय केला आहे, तूं माझा स्वीकार कर. अंबेचें तें विलक्षण प्रकारचें भाषण ऐकून भीष्माला फार आश्चर्य वाटलें. ते म्हणाले; हे अंबे, तुझें चित्त एका पुरुषावर नाहीं. हें यावरून उघड दिसतें. कसेंही असो, मला मुळीं विवाहच करणें नाहीं. जगांत जेवढ्या स्त्रिया आहेत तेवढ्या मला आईबहिणीप्रमाणें आहेत, तेव्हां दुसऱ्या कोणा पुरुषाबरोबर तूं आपला विवाह कर. भीष्माचें तें निश्चयाचें भाषण ऐकून अंबेला फार वाईट वाटलें, व त्याचा फार रागही आला. आणि विवाह करणें तर तो भीष्माबरोबरच करावयाचा, नाहींतर विवाहच करावयाचा नाहीं, असा तिनें निश्चय केला, व भीष्माला विवाह करणें भाग पाडण्याचा ती प्रयत्न करूं लागली. तिनें वसिष्ठ ऋषीकडे जाऊन त्यास आपली सर्व हकीकत सांगितली, व आपळा भीष्माबरोबर विवाह कसा होईल, तें त्यास विचारिलें. वसिष्ठ म्हणाले; अंबे, भीष्म हा कोणाचेंही ऐकणार नाहीं. परशुराम त्याचा गुरु आहे, त्याकडे तूं जा, व त्याला यासंबंधानें काय सांगावयाचें तें सांग. त्याचें म्हणणें कदाचित् तो ऐकेल. वसिष्ठाच्या सांगण्यावरून अंबा परशुरामाकडे गेली, व तिनें आपली सर्व

हकीकत त्यास सांगितली. परशुरामानें तिला अभयवचन देऊन भीष्माकडे नेलें, व त्याला अंबेबरोबर विवाह करण्याचा पुष्कळ आग्रह केला; परंतु भीष्मानें परशुरामाचेंही म्हणणें मान्य केलें नाहीं. तो म्हणाला, अहो भार्गवरामा, आपण माझे गुरू आहात. गुरू हा शिष्यास पित्यासमान होय. दोन्ही दृष्टीनें पाहिलें तरी आपण मला पूज्य आहांत. याकरितां आपण मला नरकांत लोटण्याचा प्रयत्न करूं नये. मी केलेली प्रतिज्ञा कधींही मोडणार नाहीं. आपणास नाहीं म्हणून सांगावें लागत आहे, त्यास माझा नाइलाज आहे. भीष्मानें असें स्पष्ट सांगितल्यावर परशुराम त्याच्यावर रागावून म्हणाले; भीष्मा, तूं एक तर अंबेबरोबर विवाह कर, अथवा मजबरोबर युद्ध करण्यास तयार हो. तेव्हां भीष्म अभिमानानें म्हणाला ठीक आहे, मी हा आपणाबरोबर युद्ध करण्यास तयारच आहें. युद्धस्वरूपानें आपण आपली गुरूदक्षणाच मजपासून घेत आहां; याबद्दल मला मोठा आनंद वाटत आहे. नंतर ते दोघे युद्ध करूं लागले. एकमेकावर आपआपल्या शस्त्रास्त्रांचा भडिमार करूं लागले. दोघेही सारखेच शक्तिसंपन्न होते. दोघांचेंही युद्धकौशल सारखें होतें. गुरुशिष्यांचें तें विलक्षण युद्ध पाहण्यासाठीं हजारों वीर तेथें जमले होते. आकाशमंडळ देवांच्या विमानांनीं भरून गेलें होतें. त्या वेळीं दोघेही अगदीं निकरानें लढले. त्या दोघांचें भयंकर युद्ध पाहून जणूं काय मेरु आणि मंदराचळ पर्वतांचेंच युद्ध चाललें आहे असें वाटे. जयापजयाविषयीं कांहीं अनुमान करितां येईना. शेवटीं भीष्माच्या बाणानें परशुराम विव्हल होऊन जमिनीवर पडले. तेव्हां भीष्म त्यांच्या जवळ धांवत गेला, व त्यांना आपल्या पदरानें वारा घालूं लागला. याप्रमाणें थोडा वेळ शुश्रूषा केल्यावर ते सावध झाले. भीष्माची ती गुरुभक्ती पाहून ते भीष्मावर प्रसन्न झाले. ते म्हणाले; भीष्मा, तूं या भक्तिमुळें व आपल्या दृढ प्रतिज्ञेमुळें मोक्ष मिळविशील, परंतु माझा शब्द अमान्य केलास म्हणून तुला नपुंसकाच्या हातानें मृत्यु येईल. असें सांगून भार्गवराम तेथून निघून गेले. आपल्या विवाहाच्या संबंधांत भार्गवरामानेंही हात टेंकले, असें पाहून अंबेची अत्यंत निराशा झाली व तिनें अग्नींत उडी टाकून आत्महत्या केली. पुढें द्रुपदराजाला शिखंडी या नांवाचा जो नपुंसक मुलगा झाला तोच ती पूर्वजन्मीची अंबा होय.

## ४. धतराष्ट्र, पंडू व विदूर यांची उत्पत्ती.

भीष्मानें एवढा प्रयत्न करून अंबिका व अंबालिका यांचे बरोबर विचित्रवीर्याचा विवाह केला, परंतु दुर्दैवानें विचित्रवीर्याला त्या स्त्रियांचा फार दिवस लाभ मिळाला नाहीं. लग्नानंतर लवकरच त्याला क्षयाची व्याधि जडली; त्यामुळें तो सात वर्षांनीं मरण पावला. या प्रमाणें दोन्ही पुत्र निपुत्रिक अवस्थेंत निवर्तल्यामुळें सत्यवतीला अत्यंत दुःख झालें. शंतनूचा वंश कसा वाढवावा;

राज्याची व्यवस्था पुढें कशी करावी; याची तिला मोठी काळजी पडली. वंशवृद्धीसाठीं ती भीष्माला म्हणाली; भीष्मा, तूं आतां आपल्या भावजयांना रतिदान दे; म्हणजे त्यास पुत्र होतील. नंतर त्यांचेकडून या राज्याची व्यवस्था आपणास करितां येईल. तेव्हां भीष्म आपल्या सापत्नमातेला म्हणाला; आई, मला या स्त्रिया आणि तूं सारखीच आहेस. मी जगांतील सर्व स्त्रियांना आपल्या आईबहिणीं प्रमाणें मानतों. ब्रम्हचर्यव्रताचा भंग करावयाचा नाहीं, अशी मी प्रतिज्ञा केली आहे. म्हणून तूं या विषयीं मला कांहीं न सांगतां, अन्य सत्पात्र ब्राह्मणास विनंती कर, आणि त्याकडून वंशवृद्धि करीव. तशा रितीनें वंशवृद्धि करण्यास शास्त्राचीही कांहीं हरकत नाहीं.* पूर्वी जेव्हां परशुरामानें निःक्षत्रीय पृथ्वी केली त्या वेळीं क्षत्रियांच्या स्त्रियांनीं ब्राह्मणाकडूनच पुत्रप्राप्ती करून घेतली. तसेंच दीर्घतमा ऋषीपासून बळीराजानें आपणास पुत्रप्राप्ती करून घेतली, त्याप्रमाणें तूंही कोणा चांगल्या ब्राह्मणाला बोलावून आपला कार्यभाग करून घे.

वैशंपायनऋषी ही कथा सांगत असतां, जनमेजयराजा मध्येंच म्हणाला, ऋषि, आपण ज्या दीर्घतमाऋषीविषयीं म्हणालात; त्याची कथा ऐकण्याची मला इच्छा उत्पन्न झाली आहे, तर ती कथा कृपा करून मला सांगावी. तेव्हां वैशंपायनऋषी राजाला ती कथा सांगूं लागले. ते म्हणाले, राजा, बृहस्पती व उतथ्य हे दोघे सखे बंधू होत. बृहस्पतीप्रमाणेंच उतथ्य हाही विद्वान्, सच्छील व उदार असा होता. तो बृहस्पतीचा जेष्ठ बंधू होता. त्या उतथ्यऋषीची ममता नांवाची स्त्री होती. ती गरोदर असतां बृहस्पतीला तिजविषयीं कामवासना उत्पन्न झाली. त्यानें ममतेला एकांतीं गांठून आपला हेतू कळविला. तेव्हां ममता म्हणाली, आपण देवगुरू आहांत, सर्व शास्त्रांत पारंगत आहांत, असें असतां असें अनुचित कर्म कसें करितां ? बृहस्पती म्हणाला, स्त्रीला पती व दीर दोघेही सारखेच आहेत.* तेव्हां माझ्या हातून अनुचित असें कांहीं होत नाहीं व तुलाही दोष नाहीं. याप्रमाणें बृहस्पतीनें तिची समजूत घातल्यावर ती बृहस्पतीला संभोग देण्यास कबूल झाली. परंतु त्या दोघांच्या संयोगामुळें उदरांत असलेल्या गर्भाला फार त्रास होऊं लागला; म्हणून त्या गर्भानें आपला पाय बृहस्पतीच्या लिंगावर मारिला. त्याबरोबर बृहस्पतीचा विरस झाला व त्यांनीं गर्भाला शाप दिला कीं, तूं जन्मांध होशील; व तुला परस्त्रीचा दोष लागेल. पुढें योग्यकालीं ममता प्रसूत होऊन तिला एक आंधळा व कृष्णवर्णाचा मुलगा झाला. त्या विद्रूप मुलाला पाहून ममतेला फार खेद वाटूं लागला. तिनें तो मुलगा नावेंत ठेवून ती नांव गंगेंत सोडून दिली. ती नांव वाहात वाहात दूर देशीं गेली. ती बळी नांवाच्या एका राजानें धरून

---

* हें सर्व कलियुगांत निषिद्ध मानलें आहे. शास्त्रवचनही असेंच आहे.

* हें कलियुगांत निषिद्ध आहे.

या अंध मुलाला बाहेर काढिलें. त्या मुलाला पाहून राजाला मोठें आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, हे मुला, तूं कोण आहेस ? तें मला कथन कर. मुलगा म्हणाला, माझें नांव दीर्घतमा असून मी उतथ्यऋषीचा पुत्र आहे. त्या मुलाची हकीकत ऐकून राजाला मोठा संतोष झाला. त्यानें मुलाला आपल्या घरीं आणून राणीच्या स्वाधीन केलें. त्या बळीराजाला संतती मुळींच नव्हती. म्हणून त्यानें तो मुलगा तरुण झाल्यावर राणीला त्याच्यापासून पुत्रप्राप्ती करून घेण्याविषयीं सांगितलें. परंतु राणीला तो प्रकार अनुचित वाटला. तिनें आपण स्वतः न जातां आपल्या दासीला दीर्घतमा ऋषीकडे पाठविलें. दासीला दीर्घतमापासून मुलें झालीं; पण राजाला त्याबद्दल फार वाईट वाटलें. तो राणीवर फार रागावला. तेव्हां राणी राजाच्या संतोषासाठीं स्वतः त्या दीर्घतमाऋषीकडे गेली. राणीला दीर्घतमाऋषीपासून पांच पुत्र झाले. पुढें ते पांचही मोठे तपोनिधी असे निपजले. ते आपल्या तपसामर्थ्यामुळें सर्वत्र प्रसिद्धीस आले. फार तर काय कीर्ती-रूपानें अद्याप ते जिवंतच आहेत. अद्यापि चीन, भोट, कलिंग, वंग व अंग-हे पांच देश या ऋषींच्या नांवानीं प्रसिद्ध आहेत.

असो, भीष्मानें सत्यवतीला ब्राह्मणाकडून अंबिका व अंबालिका यांचें ठिकाणीं पुत्रप्राप्ती करून घेण्यास सांगितलें असतां, सत्यवती म्हणाली; भीष्मा, मी आपलें एक गुह्यवृत्त तुला सांगतें. लहानपणीं मी कौमार्यावस्थेंत असतां मला पाराशरऋषीपासून व्यास या नांवाचा मुलगा झालेला होता. ती गोष्ट कोणाला कळूं नये म्हणून मी त्याला झाडाझुडपांत नेऊन टाकिलें होतें. तेव्हां तो मला म्हणाला, ' हे माते, जेव्हां तूं माझें स्मरण करशील, तेव्हां मी तुझ्याजवळ येऊन तुझें कार्य करीन.' तो पाराशरऋषीचा मुलगा आहे. प्रसिद्ध कृष्णद्वैपायन वेदव्यास तो तोच होय. भीष्म म्हणाला, वा ! असें असेल तर फारच उत्तम. म्हणजे तो पवित्र सत्वस्थ व तेजस्वी ब्राह्मण असून शिवाय नात्याच्या दृष्टीनेंही तो दीर होतो. तेव्हां त्याच्याकडून पुत्रप्राप्ती करून घेण्यास कांहींच हरकत नाहीं; असें मला वाटतें. याप्रमाणें भीष्मानें अनुमोदन दिल्यावर सत्यवतीनें व्यासाचें स्मरण केलें. त्याबरोबर वेदव्यासाची स्वारी तेथें प्रगट झाली. व्यास सत्यवतीला वंदन करून म्हणाले, हे माते सत्यवती ! एवढ्या काळजींत कां पडली आहेस ? काय काम आहे ? तें मला कथन कर; म्हणजे मी तुझ्या संकटाचें परिमार्जन करीन. सत्यवती म्हणाली, व्यासा, माझे दोन्ही पुत्र निपुत्रिक मृत झाले, भीष्मानें ब्रह्मचर्यव्रतानें राहण्याची प्रतिज्ञा केली आहे, तेव्हां पुढें शंतनूचा वंश कसा राखावा या काळजींत मी पडलें आहे. माझ्या दोन्ही स्नुषा अप्सरेंप्रमाणें सुंदर आहेत; पण त्यांच्या पोटीं संतती नसल्यामळें त्यांची माती होऊन गेली आहे. तर त्वां त्यांचें ठिकाणीं पुत्रोत्पती करावी. तूं यासंबंधानें किमपीही मनांत शंका आणूं नको. तूं जरी मजपासून उत्पन्न झाला आहेस तरी तुझें बीज ब्राह्मणाचें

आहे. वसिष्टऋषीचा नातू जो पाराशरऋषी त्यापासून तुझी उत्पत्ति झालेली आहे. तेव्हां तुला पुत्रदान देण्यास कोणतीही हरकत नाहीं. सत्यवतीनें असें सांगितल्यावर व्यासानें ती गोष्ट कबूल केली. प्रथम अंबिका व्यासाकडे गेली. तेव्हां व्यासाची तेजस्वी मूर्ती पाहून तिनें आपले डोळे झांकून घेतले. त्यामुळें तिला धृतराष्ट्र नांवाचा आंधळा मुलगा झाला. त्याचप्रमाणें अंबालिका मनांत शंकित झाली म्हणून तिला मदनासारखा सुंदर पण पंडू वर्णाचा मुलगा झाला. पांडवांचा जनक पंडू तो तोच होय. अशा रीतीनें स्नुषांस पुत्र झाले. परंतु एक आंधळा व एक पंडू असल्यामुळें सत्यवतीला आपल्या दोन्ही सुनांचा फार राग आला. मग तिनें पुन्हा एकदां व्यासाचें चिंतन करून व्यासाला बोलावून आणिलें, आणि त्यास फिरून पुत्रदान देण्याविषयीं विनंती केली. व्यासाची अनुमति मिळाल्यावर सत्यवतीनें अंबिकेला पुन्हा व्यासाकडे पाठविलें, परंतु अंबिकेनें स्वतः न जातां, आपल्या दासीला पाठविलें. दासीला व्यासापासून विदूर या नांवाचा मुलगा झाला. याप्रमाणें धृतराष्ट्र, पंडू व विदूर यांची व्यासापासून उत्पत्ति झाली.

---

## अध्याय ९ वा.

### कौरवपांडवांची उत्पत्ति.

मागें सांगितल्याप्रमाणें शंतनूराजाला धृतराष्ट्र, पंडू व दासीपुत्र विदूर अशा तीन पुत्रांचा लाभ झाल्यावर सत्यवतीच्या मागची मोठी काळजी दूर झाली. परंतु राज्यावर कोणाला बसवावयाचें याचा सर्वांना मोठा विचार पडला. वडील या दृष्टीनें सिंहासनावर धृतराष्ट्राला बसवावयास पाहिजे होतें, परंतु तो अंध असल्यामुळें भीष्मानें पंडूला सिंहासनावर बसविलें, व विदुराला त्याचा प्रधान केलें. याप्रमाणें राज्याची व्यवस्था लावून तिघांच्या विवाहासंबंधानें भीष्मानें प्रयत्न चालविला. राज्य जरी पंडूला दिलें होतें तरी प्रथम विवाह धृतराष्ट्राचाच करावयाचा असें भीष्मानें ठरविलें होतें. परंतु धृतराष्ट्र अंध असल्यामुळें त्यास कोणी आपली मुलगी देईना. ठिकठिकाणीं ब्राह्मण मुलींचा शोध करीत फिरत होते. त्यावेळीं गांधार देशांत सुबळ नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यास शकुनी या नांवाचा एक पुत्र होता; व गांधारी या नांवाची एक मुलगी होती. त्या मुलीविषयीं ब्राम्हणांनीं त्या राजाची विनंती केली तेव्हां, तो राजा हो म्हणाला. त्याच्या मुलीनें लहानपणीं शंकराची सेवा करून त्यास प्रसन्न केलें होतें. शंकरांनीं तिला 'तुला शंभर पुत्र होतील' म्हणून वर दिला होता. ती मुलगी सुबळराजानें

धृतराष्ट्राला देण्याचें ठरविल्यावर उभयपक्षांकडे लग्नाची मोठी तयारी सुरू झाली व मोठ्या समारंभानें तें लग्न झालें. गांधारीला आपला पति अंध आहे, असें कळल्यावर तिनेंही आपल्या डोळ्याला एक फडकें बांधिलें व जें नेत्रसुख पतीला नाहीं तें मलाही नको, असें ती म्हणाली. धृतराष्ट्राचा विवाह झाल्यावर भीष्मानें पंडूला मुलगी शोधण्यासाठीं ब्राह्मण पाठविले. कुंतिभोज नांवाच्या राजाला कुंती नांवाची एक मुलगी होती, त्या राजाकडे जाऊन ब्राह्मणांनीं पंडूकरितां त्या मुलीची मागणी केली; तेव्हां ती त्यानें पंडूला दिली. वास्तविक ही कुंती शूरसेन राजाची मुलगी होती; म्हणजे वसुदेवाची बहीण होती. परंतु कुंतिभोजराजा निपुत्रिक असल्यामुळें शूरसेनानें आपली लहान मुलगी त्याला दिली होती. तिचें लालनपालन कुंतीभोजानें केल्यामुळें त्या मुलीचें कुंती असें नांव पडलें. कुंतीनें लहानपणीं आपणास उत्तम पति मिळावा व कीर्तिशाली पुत्र व्हावेत म्हणून, दुर्वासऋषीची मनोभावें सेवा केली होती. त्या तिच्या भक्तीमुळें प्रसन्न होऊन दुर्वासऋषीनीं तिला पुत्रबीजाचे पांच मंत्र दिले होते. प्रत्येक मंत्र निरनिराळ्या देवतेचा होता. ‘ ज्या मंत्राचा जप करशील, ती देवता प्रगट होऊन तिजपासून तुला पुत्र मिळेल. ’ असें दुर्वासऋषीनीं कुंतीला सांगितलें होतें. लहानपणीं एकदां कुंती आपल्या पालक पित्याचे घरीं असतां, तिला दुर्वासानें दिलेले मंत्र खरे आहेत कीं खोटे, हें पाहण्याची इच्छा उत्पन्न झाली, व तिनें एकांतीं जाऊन सूर्यमंत्राचा जप केला; त्याबरोबर सूर्यनारायणाची मूर्ति प्रगट झाली; व त्यानें कुंतीला कर्ण या नांवाचा एक वीरपुत्र दिला. जन्मतःच त्या मुलाला सूर्यानें कुंडलें व वज्रकवच दिलें. याप्रमाणें कुंतीला पुत्रप्राप्ती करून दिल्यावर सूर्यनारायण तेथून निघून गेले. तो त्या मंत्राचा प्रभाव पाहून कुंतीला फार आनंद झाला; परंतु तो तिचा आनंद कर्णाकडे पाहून लागलाच नाहींसा झाला. एवढ्या अल्पवयांत पति नसतां पुत्र कसा झाला? असें लोकांनीं विचारल्यास त्यांनां काय सांगावें; याची तिला मोठी काळजी वाटूं लागली. अशा स्थितींत आपणास कोणी पाहील किंवा काय, याचीही तिला फार भीति वाटूं लागली; आणि त्या कौमार्यावस्थेंत घडलेल्या विलक्षण प्रकाराबद्दल तिला फार लाज वाटूं लागली. पोरस्वभावामुळें त्यावेळीं काय करावें हें तिला चांगलें कळेना. शेवटीं तिनें कोणाला कळूं न देतां त्या मुलाला आपणापासून दूर करण्याचा विचार केला. तिनें एक लांकडाची चांगली मजबूत पेटी घेतली व त्यांत त्या कर्णवीराला ठेवून ती पेटी गंगौघांत सोडून दिली. पुढें ती पेटी वाहात वाहात हस्तिनापुराच्या जवळ गेली. त्यावेळीं भागीरथीच्या कांठीं धृतराष्ट्राचा सारथी कांहीं कारणासाठीं आला होता; त्याच्या दृष्टीस ती पेटी पडली. तेव्हां तींत काय आहे, अशी त्यास साहजिक जिज्ञासा उत्पन्न होऊन त्यानें ती पेटी भागीरथींतून काढली. उघडून पाहतो तों, आंत एक अत्यंत सुंदर मूल

त्याच्या दृष्टीस पडलें. त्या मुलाला पाहून त्याला मोठा आनंद झाला. त्या मुलाला ईश्वराचा प्रसाद समजून सारथ्यानें त्यास आपल्या घरीं आणिलें व त्याचें तो मोठ्या प्रेमानें संगोपन करूं लागला. तो कर्ण अत्यंत निग्रही, तेजस्वी व शक्तिशाली होता. त्यानें सूर्याची आराधना करून सूर्यास प्रसन्न करून घेतलें होतें. त्याची निर्मळ भक्ति पाहून सूर्यानें त्यास एक मंत्र दिला. तो मंत्र एक वेळ जपण्याबरोबर एकभार सुवर्ण उत्पन्न होई. कर्ण त्या मंत्राच्या साह्यानें प्रत्यहीं आठशें तोळे सुवर्ण उत्पन्न करी, व अतीत, अभ्यागत, गोरगरीब, यांचा योग्य सत्कार करीत असे.

असो, कुंतीबरोबर पंडूचा विवाह झाल्यानंतर भीष्मानें विदुराचें लग्न केलें. महापार्श्वदेशांत देवक या नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याची लावण्यकलिका या नांवाची एक अत्यंत सुंदर मुलगी होती. तिच्याबरोबर विदुराचा विवाह झाला होता. याप्रमाणें तिघांचे विवाह झाल्यावर भीष्म तिघांविषयीं निष्काळजी झाला. हातांत राज्यसूत्रें व पूर्ण सत्ता आली, तेव्हां स्वस्थ न बसतां आपला पराक्रम गाजवावा अशी इच्छा पंडूस उत्पन्न झाली. त्यानें आपल्या सैन्याची चांगल्या प्रकारची तयारी केली; व निरनिराळे देश जिंकून आपलें राज्य विस्तृत करण्याचा सपाटा चालविला. थोडक्याच दिवसांत त्यानें संपूर्ण पृथ्वी पादाक्रांत केली; व आपण चक्रवर्तीराजा झाला. पंडुराजानें शंभर अश्वमेधयज्ञ केले. अशा रीतीनें शंतनूचे पुत्र वैभव भोगीत असतां तेथें व्यासांचें आगमन झालें. त्या वेळीं सर्वांनीं व्यासाचा फार आदरसत्कार केला. धृतराष्ट्राची स्त्री गांधारी, हिनें पुत्रांची इच्छा धरून व्यासांची चांगल्या प्रकारें सेवा सुश्रुषा करून त्यांना प्रसन्न केलें. तेव्हां व्यासांनीं तिला आशीर्वाद दिला कीं, तुला शंभर पुत्र व एक कन्या अशीं एकशें एक अपत्यें होतील. असा आशीर्वाद देऊन व्यासऋषी तेथून निघून गेले.

व्यासानें आशीर्वाद दिल्यावर गांधारी थोड्याच दिवसांत गरोदर झाली. ती गरोदर असतां पंडुराजा आपल्या कुंती व माद्री अशा दोन्ही स्त्रियांसह हिमालय पर्वतावर शिकारीसाटीं गेला होता. त्यास तिकडे कुंतीपासून धर्म नांवाचा मुलगा झाला. तें आनंददायक वर्तमान त्यानें आपल्या दूताकडून मुद्दाम हस्तिनापुरास कळविलें. तेव्हां राजाला मुलगा झाला हें ऐकून सर्वांना फार आनंद झाला; परंतु ती वार्ता गांधारीला शल्याप्रमाणें वाटली. आपल्या अगोदर कुंती प्रसूत झाली हें ऐकून तिला फार वाईट वाटलें. आतां वडील या दृष्टीनें कुंतीच्या पुत्राला राज्य मिळून माझ्या मुलांना त्यांचें दास्यत्व करावें लागेल, या विचारानें ती वेडी झाली; आणि त्या विचारभरांत तिनें आपल्या पोटावर दगड मारून घेतला. त्याबरोबर तिच्या पोटांत जी गर्भाची पिशवी होती ती बाहेर पडली. त्या पिशवींत अंगुष्ठा एवढालीं एकशें एक मुलें होतीं. तें पाहून गांधारीला अधिक

वाईट वाटलें; व आपण हा काय अविचार केला असें म्हणून ती शोक करूं लागली. शोकभरांत ती म्हणाली; अहो, एवढा मोठा तापसी ब्राह्मण व्यास, त्यानें मला आशीर्वाद दिला कीं, 'तुला एकशें एक मुलें होतील.' पण त्याच्या आशीर्वचनांत कांहीं अर्थ नाहीं असें वाटतें. या प्रमाणें ती त्या शोकावस्थेंत व्यासाविषयीं अनादर प्रदर्शित करीत आहे तोंच व्यास तेथें आले, व गांधारीला आश्वासन देऊन म्हणाले; गांधारी, तूं एकशेंएक मुलांविषयीं मुळी शंका बाळगूं नकोस; लवकरच तुला त्यांची प्राप्ती होईल. असें सांगून व्यासांनीं एकशेंएक कुंडें तयार केलीं व त्या कुंडांत मध व तूप कांठोंकांठ भरलें. मग ती गर्भाची पिशवी आणून त्यांतील एकेक मूल एकेक कुंडांत सोडिलें. याप्रमाणें सर्व कुंडांत ती अंगुष्टमात्र मुलें घातल्यावर, ते गांधारीला म्हणाले; गांधारी, यांतील प्रथम कुंडांतील मूल तूं एक वर्षानें काढ. त्या नंतर एक महिन्यानें दुसऱ्या कुंडांतील काढ. या क्रमानें प्रत्येक महिन्यानें एकेका कुंडांतून एकेक मूल काढीत जा; म्हणजे तुला एकशेंएक मुलांची प्राप्ती होईल. असें सांगून व्यास तेथून निघून गेले.

व्यासाचे आज्ञेप्रमाणें गांधारीनें एक वर्षानंतर पहिल्या कुंडांतील मूल बाहेर काढलें. तें मूल सर्व अवयवांनीं पूर्ण होतें, व तें मदनासारखें सुंदर होतें. त्या सुस्वरूप अर्भकास पाहून गांधारीला मनस्वी आनंद झाला. तिनें या मुलाचें नांव दुर्योधन असें ठेविलें. त्यानंतर एक महिन्यानें दुसऱ्या कुंडांतील मूल काढिलें. तेंही पहिल्याप्रमाणेंच सुंदर होतें. त्याचें नांव तिनें दुःशासन असें ठेविलें. याप्रमाणें गांधारीला शंभर मुलांची प्राप्ती झाली. शेंवटच्या कुंडांतून मुलगी निघाली. तिचें नांव दुःशीला असें तिनें ठेविलें. दुर्योधन हा कलीचा अवतार होता. तो अत्यंत अधर्मी, अनाचारी व अनीतिसंपन्न होता. गांधारीनें जेव्हां त्याला कुंडांतून काढिलें, तेव्हां अनेक दुःश्चिन्हें झालीं. उल्कापात झाला, भूकंप होऊन रक्ताचा पाऊस पडला, कोल्हे कर्कश ओरडूं लागले, आणि कुत्री माणसांप्रमाणें रडूं लागलीं. तीं दुःश्चिन्हें पाहून ब्राह्मणांनीं धृतराष्ट्राला सांगितलें कीं, 'या मुलाचीं लक्षणें वाईट आहेत; याच्यापासून कुलाचा क्षय व कीर्तीचा नाश होईल.' तेव्हां धृतराष्ट्रानें ब्राह्मणांकडून ग्रहांची शांती वगैरे करवून मनाची हुरहुर दूर केली, पुढें त्यानें आपली मुलगी दुःशीला जयद्रथराजाला दिली.

वैशंपायन ऋषी जनमेजय राजाला म्हणतात; राजा, आतां तुला धृतराष्ट्राच्या शंभर मुलांचीं नांवें सांगतों, तीं तूं सावधानपणें ऐक. तीं नांवें अशीं:—

(१) दुर्योधन, (२) दुःशासन, (३) दुःसह, (४) दुःशील, (५) जलसंध, (६) सम, (७) भीमबळ, (८) सुबाहू, (९) सहिष्ण, (१०) चित्रकुंडल, (११) दुर्धर, (१२) दुर्मुख, (१३) बिंदू, (१४) कृप, (१५) चित्र, (१६) दुर्मद, (१७) दुर्मर, (१८) मरुबिंदू, (१९)

चित्ताक्ष, ( २० ) ऊर्णनाभी, ( २१ ) चित्रबाहू, ( २२ ) सुलोचन, ( २३ ) सुवाभ, ( २४ ) चित्रवर्मा, ( २५ ) अश्वसेन, ( २६ ) महाबाहू, ( २७ ) समदुःख, ( २८ ) मोचन, ( २९ ) सुमर्मा, ( ३० ) विवसू, ( ३१ ) विकट, ( ३२ ) चित्रशरासन, ( ३३ ) प्रगाह, ( ३४ ) सोमवर, ( ३५ ) मान, (३६) सत्यसंध, ( ३७ ) विवस, ( ३८ ) विकर्ण, ( ३९ ) उपचित्र, ( ४० ) चित्र-कुंडल, ( ४१ ) भीमबाहू, ( ४२ ) संद, ( ४३ ) बलकी, ( ४४ ) उग्रयोद्धा ( ४५ ) बलावर्ध, ( ४६ ) दृढायू, ( ४७ ) भीमकर्मा, ( ४८ ) उपनंद, ( ४९ ) अनासिंधू, ( ५० ) सोमकीर्ती, ( ५१ ) कुडपाइ, ( ५२ ) अघबाहू, ( ५३ ) घोर, ( ५४ ) रौद्रकर्मा, ( ५५ ) वीरबाहू, ( ५६ ) कनकध्वज, ( ५७ ) कुंडासी, ( ५८ ) दीर्घबाहू, ( ५९ ) विटरूप, ( ६० ) प्रमथ, (६१) प्रमाथी, ( ६२ ) वीर्यनाद, ( ६३ ) दीर्घताल, ( ६४ ) विकटबाहू, ( ६५ ) दृढरथ, ( ६६ ) दुर्मर्षण, ( ६७ ) उग्रश्रवा, ( ६८ ) उग्र, ( ६९ ) अभय, ( ७० ) कुंडभेरी, ( ७१ ) भीमस्थ, ( ७२ ) अपलाप, ( ७३ ) जलसंधी, ( ७४ ) कनकया, ( ७५ ) दृढसंधी, ( ७६ ) बृंहक, ( ७७ ) विशाल, (७८) सुवात, ( ७९ ) नागदंत, ( ८० ) सत्यसंध, ( ८१ ) अनंतरूप, ( ८२ ) अराजित, ( ८३ ) बृहत्क्षेत्र, ( ८३ ) सुदनू, (८४) दृढहस्त, ( ८५ ) उग्राहित, ( ८६ ) कवची, ( ८७ ) कथकुंड, ( ८८ ) अहिकेत, ( ८९ ) कुंडधारी, ( ९० ) दुरोदर, ( ९१ ) शुभहस्त, ( ९२ ) शुभकर्ण, ( ९३ ) सर्पाक्ष, (९४) दुःप्राजित, ( ९५ ) बहुधासी, ( ९६ ) युयुत्सू, ( ९७ ) धनुर्धर, ( ९८ ) वीर, ( ९९ ) सेनानी आणि ( १०० ) हन. याप्रमाणें धृतराष्ट्राच्या शंभर पुत्रांचीं नांवें होती व दुःशीला नांवाची मुलगी होती. यांशिवाय धृतराष्ट्राला एका वैश्यानें आपली मुलगी दिली होती, तिच्यापासून त्यास युत्सव नांवाचा एक पुत्र झाला होता. तो पुढें दुर्योधनाचा प्रधान झाला.

## २. पंडूराजाला पुत्रप्राप्ती.

पंडूराजाबरोबर कुंतीचा विवाह झाल्यानंतर मद्र देशाच्या राजानें 'माद्री' नांवाची आपली मुलगी त्यास दिली होती. दोन्ही स्त्रियांवर त्याची सारखीच प्रीति होती. एकदां तो दोन्ही स्त्रियांस बरोबर घेऊन शिकारीसाठीं हिमालय पर्वतावर गेला होता. पर्वताच्या दक्षिण भागीं आपली छावणी ठोकून तेथून तो रोज निरनिराळ्या भागांत शिकारीसाठीं जात असे. त्याच पर्वतावर एका अरण्यांत कर्दम ऋषी तपश्चर्या करीत होता. तो अत्यंत पवित्र, सदाचारी व नेहमीं ब्रह्मचर्यव्रतानें राहत होता. हजारों वर्षे एकसारखी तपश्चर्या चालली असल्यामुळें त्याचें तपसामर्थ्य विलक्षण वाढलें होतें. तो त्यावेळीं बराच वृद्ध झाला होता. लग्न झाल्यापासून पांचवे दिवशीं एकाएकी उपरती झाल्यामुळें सर्वसंग परित्याग करून अरण्यांत येऊन तो तपश्चर्या करीत बसला होता. त्याची स्त्रीही त्याचे सार-

खीच निर्मल अंतःकरणाची व सुशील होती. ऐन तारुण्यांत पतीनें त्याग केला असतांही तिनें आपल्या पातिव्रत्याचा भंग होऊं दिला नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं ती मेली, तेव्हां तिला स्त्रीचाच दुसरा जन्म मिळाला. पूर्व जन्मीच्या तपसामर्थ्यांमुळें आपण पूर्वजन्मीं कोण होतों याची तिला चांगली स्मृती होती, त्यामुळें तिनें ह्याही जन्मांत असा निश्चय केला होता कीं, कर्दमऋषी शिवाय दुसऱ्याबरोबर विवाह म्हणून करावयाचाच नाहीं, अखेरपर्यंत ब्रह्मचर्यव्रतानें रहावयाचें. तिचा पिता जेव्हां तिचें लग्न करण्यास तयार झाला, तेव्हां तिनें पित्याला, 'माझा पती जिवंत आहे, मला विवाह करणें नाहीं.' असें स्पष्ट कळविलें. तिचें तें चमत्कारिक बोलणें ऐकून तिच्या पित्याला फार आश्चर्य वाटलें. मुलीचा विवाह न करण्याचा निग्रह पाहून त्यानें तिच्या विवाहाचा नाद सोडला. याप्रमाणें सात जन्मपर्यंत त्या स्त्रीनें दुसऱ्याबरोबर विवाह केला नाहीं, व आपल्या ब्रह्मचर्यव्रतापासूनही ती कधीं परावृत्त झाली नाहीं. पुढें ती हरिणी होऊन ज्या अरण्यांत कर्दमऋषि तपश्चर्या करीत बसला होता, त्या अरण्यांत जाऊन राहिली. कर्दमऋषीच्या आश्रमाजवळच मदनाची स्त्री रती ब्रह्मचर्यव्रतानें राहून तपश्चर्या करीत होती. तेथें कांहीं दिवसांनीं एक पराक्रमी पुरुष आला, व रतीचें सौंदर्य पाहून तो तिच्यावर मोहित झाला. मदनानें त्याला अगदीं उन्मत्त केलें होतें. रतीचें संरक्षण करण्यास तेथें कोणी नाहीं, असें पाहून तर त्याची कामेच्छा अनावर झाली व तो रतीला फार त्रास देऊं लागला. रती त्या दुष्ट पुरुषावर क्रुद्ध होऊन म्हणाली; 'अरे मूर्खा, परस्त्रीचा अभिलाष करून निष्कारण आपल्या हातानें आपला नाश कां करून घेत आहेस? शुद्धीवर ये, नाहींतर मी तुला शाप देऊन दग्ध करीन. अरे, पशू देखील सदाचारानें राहतात. हीच पहा या कर्दमऋषीची स्त्री हरिणी झाली असतांही तिनें देखील आपलें पातिव्रत्य नष्ट केलें नाहीं. मग मी तर उच्च अशा मनुष्य योनींतील आहे. तूं कितीही प्रयत्न केलास तरी माझें पातिव्रत्य मी कधींही भग्न होऊं देणार नाहीं. तूं माझा नाद सोडून दे. हें न ऐकतां जर तूं माझा उपमर्द करशील तर कर्दमऋषीप्रमाणें तूंही पातकाचा पुतळा बनशील. हा कर्दमऋषी जरी निश्चलपणें तपश्चर्या करीत बसला आहे, तरी स्त्रीचा त्याग केल्यामुळें तो अनंत पातकी झाला आहे. स्त्री रजस्वला असतां तिला जो ऋतुदान देत नाहीं, त्याला भ्रूणहत्येचें पातक लागतें. त्याप्रमाणें या कर्दमऋषीच्या हातून अनेक सहस्र भ्रूणहत्या झाल्या आहेत. स्त्रीला सोडून देऊन अवधूत दीक्षा घेणें म्हणजे पितृहत्या करणें होय. अशा रीतीनें या कर्दमावर अनेक पातकाचें ओझें झालें आहे. तूं मला जर त्रास दिलास तर तुलाही त्या कर्दमऋषीप्रमाणें ब्रह्महत्येचें पाप लागेल.' याप्रमाणें त्या दुष्ट पुरुषाला क्रोधयुक्त स्वरानें रतीनें सांगितल्यावर त्या अविचारी मनुष्याच्या हृदयांत प्रकाश पडला व तो तेथून मुकाट्यानें निघून गेला.

इकडे कर्दमऋषी तें रतीचें सर्व बोलणें शांत चित्तानें ऐकत होता. आपण स्त्रीचा त्याग केल्यामुळें आपल्या हातून हजारों भ्रूणहत्या झाल्या आहेत, याची त्याला आजवर कल्पनाही नव्हती. परंतु रतीचें तें बोलणें ऐकून त्याला आपल्या अविचारी कृत्याबद्दल फार अनुताप वाटूं लागला. आपली स्त्री हरिणी होऊन याच अरण्यांत राहात आहे, हें त्यानें रतीकडून ऐकिलें होतेंच. तेव्हां त्यानें असा विचार केला कीं, आपण हरीण होऊन स्त्रीला ऋतुदान द्यावें; व तिच्या ऋणांतून मुक्त व्हावें; म्हणजे आपण या भ्रूणहत्येच्या व पितृहत्येच्या पातकांपासून मुक्त होऊं. असा निश्चय करून तपसामर्थ्यानें तो उत्तम हरीण बनला व त्या अरण्यांत स्त्रीचा शोध करीत तिच्या जवळ गेला. हरिणीनें आपल्या पतीला तेव्हांच ओळखिलें. तिनें त्या पशूअवस्थेंतही आपल्या पतीला नमस्कार केला. त्याच्या चरणस्पर्शानें तिला फार आनंद झाला. त्या वेळीं ती हरिणी ऋतुस्नात होती; हरिणानें तिला ऋतुदान देण्याची इच्छा दर्शवून तो तिजबरोबर रममाण झाला. याच वेळीं त्या अरण्यांत पंडुराजा शिकार करीत फिरत होता. त्याची दृष्टी वरील हरिणांकडे गेली. त्या दिवशीं शिकार न मिळाल्यामुळें राजाच्या मनाला चुटपुट लागली होती, इतक्यांत ती हरिणांची जोडी दृष्टीस पडतांच त्याला मोटा आनंद झाला. त्यानें आपलें धनुष्य आकर्ण ओढून एक बाण त्यांच्यावर जोरानें फेंकला; त्याबरोबर तीं रतिरंगांत दंग झालेलीं हरिणें शरविद्ध होऊन भुमीवर पडलीं. आपल्या एकाच बाणानें दोन्ही हरणें भुमीवर विव्हल होऊन पडलेलीं पाहून पंडूराजाला आपल्या मृगयानैपुण्याबद्दल अभिमान वाटला, व व दोन हरिणें एकदम मिळाल्यामुळें आनंद झाला. हरिणें खालीं पडल्याबरोबर राजानें आपला घोडा हरिणांजवळ नेला आणि पाहतो तों दोन्हीं हरिणें बाणानें हत झाल्यामुळें भूमीवर विव्हळ होऊन पडलीं आहेत. राजाला त्यांचीं तरफड पाहून कांहींच वाटलें नाहीं. इतक्यांत तो हरीण क्रुद्ध स्वरानें म्हणाला; राजा, मी वंशवृद्धीकरितां हरिणरूपानें रत असतां तूं बाण सोडून आम्हां उभयतांना विद्ध केलेंस. तुझ्या बाणप्रहारानें आम्हां दोघांचे पंचप्राण व्याकूळ होत असून लवकरच आम्हीं पंचत्वाला पावूं. पण राजा, तूं संभोगसमयीं आम्हांला मारल्यामुळें तुझें शंभर यज्ञाचें पुण्य फुकट जाऊन तुझ्या मस्तकावर पातकाचें ओझें झालें आहे. मृग, पक्षी, मासे, वगैरे प्राणी मृगयेनें जरी वध्य आहेत; तरी ते क्रीडारत असतां त्यांचा वध करणें हें मोटें पातक आहे. नंतर त्या मृगानें आपली स्वतःची व आपल्या स्त्रीची सात जन्माची कथा सांगून तो म्हणाला, 'पंडूराजा, आम्हीं दोघे क्रीडा करीत असतां तूं आमचा नाश केलास म्हणून मी तुला असा शाप देतों कीं, 'तूं स्त्रीशीं रममाण झाला असतां, तुला मृत्यु येईल.' याप्रमाणें शाप देऊन त्या हरिणानें प्राण सोडिला. त्याच्या स्त्रीनें तर त्याच्या अगोदरच प्राण सोडिला होता.

कर्दमऋषीची ती शापवाणी ऐकून पंडूराजा अत्यंत चिंताक्रांत झाला. ऋषीजवळ उःशाप मागावा असें त्याच्या मनांत आलें, परंतु ऋषीनें प्राण सोडिल्यामुळें त्याचा नाइलाज झाला. त्याला काय करावें तें सुचेनासें झालें. दूध पीत असतांना जसा विषकंटक जिभेला रुतावा; अथवा पुण्यमार्गानें जात असतांना पापकूपांत जसा पाय घसरावा, त्याप्रमाणें पंडूराजाची स्थिति झाली. तो तेथून आपल्या शिबिरांत परत आला व त्यानें आपल्या शापाची सर्व हकीकत कुंती व माद्री यांना सांगितली. ती हकीकत ऐकून दोन्ही स्त्रियांना फार वाईट वाटलें. पंडूराजा त्यांस म्हणाला; आतां मी आपलें आयुष्य याच पर्वतावर ईश्वरभजन करण्यांत घालविणार आहे. तेव्हां तुम्ही दोघीजणी सर्व परिवार बरोबर घेऊन हस्तिनापुरास परत जा, आणि वस्त्रें, अलंकार वगैरे जें काय माझें म्हणून आहे तें सर्व ब्राह्मणांना दान द्या. तें ऐकून दोघीही म्हणाल्या; आपणाला सोडून आम्हांला राज्यवैभवाचा उपभोग घेण्यांत फायदा तो कोणता? आम्ही आपली सेवासुश्रुषा करून आपणाजवळच राहतों. कुंती व माद्री यांनीं राजाला आपला असा निश्चय कळविल्यावर राजानें आपलें सर्वस्व ब्राह्मणांना देऊन, नोकरचाकर लोकांस हस्तिनापुरास परत पाठवून दिलें. नोकरांनीं हस्तिनापुरास परत येऊन पंडूच्या शापाची सर्व हकीकत धृतराष्ट्राला सांगितली. ती ऐकून हस्तिनापुरच्या सर्व लोकांस वाईट वाटलें. धृतराष्ट्र तर बंधूच्या शापवार्तेनें अत्यंत शोकाकुल झाला. राज्याच्या व्यवस्थेविषयीं त्याला काळजी वाटूं लागली. झालेल्या गोष्टीला उपाय नाहीं, असें जाणून भीष्मानें विदुर व धृतराष्ट्र या उभयतांकडून पूर्वीप्रमाणें राज्यकारभार चालविला.

इकडे पंडू, कुंती व माद्री यांनीं संसाराचा व ऐषआरामाचा त्याग करून तापसवेष धारण केला. तिघेही गंधमादन पर्वतावर जाऊन ईश्वरचिंतनांत व ऋषिजनांची सेवा करण्यांत कालक्रमण करूं लागले. तेथें एक वर्षभर राहिल्यानंतर पुढें जाण्याचा पंडुराजानें विचार केला. त्याप्रमाणें तो कुंती व माद्री यांना बरोबर घेऊन पुढें मार्ग क्रमूं लागला असतां, ऋषींनीं पंडूराजाला सांगितलें कीं, राजा, तूं निपुत्रिक असल्यामुळें तुला पुढें जातां येणार नाहीं. जे पुत्रवान असतील, जे देव, पितृ व मनुष्य यांच्या ऋणांतून मुक्त झाले असतील, त्यांनांच पुढील मार्गानें जातां येतें. निपुत्रिक मनुष्य पुढें जाऊं लागला असतां जमिनीवर अतिशय बर्फ पडतें, व त्यामुळें मार्ग बंद होऊन जातो. यासाठीं तूं पुढें जाण्याचें साहस करूं नकोस. ऋषींचें भाषण ऐकून पंडूराजाचा नाइलाज होऊन तो मागें परतला. ईश्वराच्या प्राप्तीला देखील आपण सर्व तऱ्हेनें अयोग्य आहों, हें मनांत येऊन त्याला फार वाईट वाटूं लागलें. बरें, पुत्रप्राप्तीचा प्रयत्न करावा, तर कर्दमऋषीचा शाप दत्त म्हणून पुढें उभा होता. अशा अडचणींत सांपडल्यामुळें व ईश्वरप्राप्तीची अत्यंत तृष्णा लागल्यामुळें काय

करावें या काळजीनें तो अगदीं चूर झाला. शेवटीं योग्य उपाय सुचत नाहीं असें पाहून त्यानें आपल्या कुंती नांवाच्या स्त्रीला जवळ बोलाविलें, व तो म्हणाला, हे स्त्रिये ! निपुत्रिकाचें जिणें व्यर्थ होय. आपणास पुत्र नसल्यामुळें आपण एक प्रकारें ऋणी व पातकी आहोंत; त्यामुळें आपणास ईश्वरप्राप्तीचा कोणताही मार्ग खुला नाहीं. तेव्हां या ऋणत्रयांतून व अन्य पातकांतून मुक्त होण्यासाठीं आपणास पुत्रप्राप्तीची अत्यंत आवश्यकता आहे. मला झालेला शाप तुला माहीत आहेच. याकरितां एखाद्या सत्पात्र, पुण्यशील व सतेज ब्राह्मणास ऋतुदान देण्याविषयीं विनंती कर. वंश वृद्धीसाठीं असें करणें अनुचित नाहीं. आमची उत्पत्तीही अशाच रीतीनें महर्षि व्यासाकडून झालेली आहे. या संकटप्रसंगीं तूंही त्याच मार्गाचें अवलंबन करावें, आणि पुत्रप्राप्ती करून घ्यावी, अशी माझी इच्छा आहे.

पंडुराजाचें बोलणें ऐकून कुंती म्हणाली, 'महाराज, पतीच्या आज्ञेप्रमाणें वागणें हें स्त्रीचें कर्तव्य होय. आपली आज्ञा मला शिरसावंद्य आहे; मजजवळ पुत्रप्राप्तीचा एक उपाय आहे. मी लहानपणीं पितृगृहीं असतां दुर्वासऋषींची अनन्यभावानें पुष्कळ दिवस सेवा केली होती. तेव्हां ऋषीनें प्रसन्न होऊन मला पुत्रप्रद असे पांच मंत्र देऊन सांगितलें कीं, ज्या मंत्राचा तूं जप करशील ती देवता स्वतः प्रकट होऊन तुला पुत्र देईल.' त्या मंत्रांचा जप केला असतां पुत्रप्राप्ति अवश्य होईल, असें मला वाटतें. कुंतीचें तें अमृताप्रमाणें सुरस भाषण ऐकून पंडूला परमानंद झाला. तो कुंतीला म्हणाला, स्त्रिये, असें असेल तर प्रथम धर्माची प्रार्थना कर, म्हणजे तो प्रसन्न होऊन अत्यंत धर्मरत, सत्यव्रत व ईश्वरभक्त असा पुत्र आपणास देईल. त्याप्रमाणें कुंती, धर्ममंत्राचा जप करीत बसली. एक वर्षपर्यंत भक्तिभावानें त्या मंत्राचा जप केल्यावर धर्म मूर्तिमंत तेथें प्रकट झाला; व कुंतीला रति देऊन अदृश्य झाला. त्या पासून कुंतीला जो मुलगा झाला तोच धर्मराज होय. त्याचा जन्म झाल्यावर सुरवरांनांही अत्यंत आनंद झाला व त्यांनीं स्वर्गातून धर्मावर पुष्पांची वृष्टि केली. धर्मापासून आपणास प्राप्त झालेला तो मुलगा, म्हणून पंडूनें, मुलाचें नांव धर्म असेंच ठेविलें, व हें आनंदकारक वर्तमान त्यानें हस्तिनापुरीं भीष्मास कळविलें. तेव्हां सर्वास आनंद झाला, पण गांधारीला वैषम्य वाटलें वगैरे हकीकत पूर्वी आलीच आहे. असो. पुढें एक वर्षानंतर कुंतीनें दुसऱ्या मंत्राचा जप करून वायूला प्रसन्न करून घेतलें. वायूपासून कुंतीला जो पुत्र झाला त्याचें नांव पंडूनें भीमसेन असें ठेविलें. तो भीम म्हणजे शक्तीचा केवळ सागरच होता. यानें पुढें पृथ्वीवर शक्तिमान म्हणून प्रसिद्ध असलेले जरासंध, दुःशासन, कीचक, वगैरे वीर आपल्या बाहुबलानें मातींत मिळवून दिले. कुंती या मुलाला दहाव्या दिवशीं कडेवर घेऊन सूर्याच्या पूजेला बाहेर गेली असतां, तेथें सूर्यमंदिराच्या दारांत बस

लेल्या सिंहाला पाहून, भीम भ्याला, व कुंतीच्या कांखेंतून निसटून खालीं पडला. दगडावर आपटण्यानें भीमास कांहीं एक इजा न होतां तो प्रचंड दगड मात्र चूर्ण होऊन गेला. तें पाहून कुंतीला आपल्या मुलाच्या अपूर्व शक्तीचें मोठें कौतुक वाटलें. नंतर कुंतीनें इंद्रमंत्राचा जप केला. तेव्हां इंद्र तेथें प्रगट झाला व त्यानें कुंतीला पुत्र दिला, त्याचें नांव अर्जुन असें ठेविलें. या अर्जुनासारखा धनुर्धारी योद्धा अद्यापपर्यंत कोणीही झाला नाहीं. त्याच्या जन्मसमयींही सुरवरांनीं आनंदित होऊन पुष्पवृष्टी केली. याप्रमाणें कुंतीला तीन पुत्र झाल्यावर पंडू म्हणाला; हे कुंती, तुला तीन पुत्र झाल्यामुळें तूं मातृपदाला पोहोंचली आहेस; पण ही माद्री अद्याप पुत्ररहित आहे, तर हिच्यावर दया करून तिला एकादा पुत्रप्रद मंत्र दे. पंडुराजाचे सांगण्यावरून कुंतीनें माद्रीला अश्विनीकुमारांचे मंत्र दिले. माद्रीनें त्या मंत्राचा जप केल्यावर तिलाही दोन पुत्र झाले. त्यांचीं नांवें नकुळ व सहदेव अशीं ठेविलीं. याप्रमाणें पंडूराजाला पांच पुत्रांचा लाभ झाला. हे पंडूचे पुत्र म्हणून या पांचांना पांडव म्हणतात.

---

## अध्याय १० वा.

### १. पंडू राजाचा शोचनीय मृत्यु.

जनमेजय राजानें पंडूराजाची कथा पुढें सांगण्याविषयीं वैशंपायनऋषीची विनंती केल्यावरून ते पुढें कथा सांगू लागले. ते म्हणाले:—

'राजा, जनमेजया, पंडूराजाला या प्रमाणें पांच पुत्रांची प्राप्ती झाल्यावर त्याला मोठें समाधान वाटूं लागलें. पितृऋणामुळें त्यांस पुढें तपश्चर्या करण्यास जो अडथळा झाला होता, तो अशा रीतीनें दूर झाल्यामुळें तो मोठी धन्यता मानूं लागला; व आतां आपण लवकरच मोक्ष मिळवूं अशी त्याला आशा वाटूं लागली; परंतु पंडूराजाची ती आशा लवकरच नाहींशी झाली. जो पंचबाण आपल्या शरप्रहारानें सर्व जगास क्षणोक्षणीं विव्हल करितो, ज्यानें शंकरासारख्या देवश्रेष्ठांसही आपला प्रभाव दाखविण्यास कमी केलें नाहीं, ज्यानें पराशरासारख्या तपोनिधीसही सहज जिंकिलें, व शंकरानें जाळलें असतांही ज्याचें सामर्थ्य कमी झालें नाहीं, त्या पंचबाणाच्या तडाक्यांतून सुटणें हें फार कठीण काम आहे. अखेर पंडू राजाही त्याचे तावडींत सांपडला. स्वर्गांगने-पेक्षांही सुंदर व तरूण अशा, कुंती व माद्री सारख्या स्त्रिया अक्षय सन्निध असल्यामुळें पंडूराजाला वारंवार कामेच्छा उत्पन्न होत असे; परंतु त्याचें मन चंचल झालें नाहीं तोंच त्याला कर्दमऋषीच्या शापाची स्मृति होत असे, व त्या भयंकर

शापाची कल्पना त्याच्या मनांत आली म्हणजे त्याची कामेच्छा मनांतल्यामनांत पार नाहींशी होऊन जात असे. शिवाय त्यासंबंधानें कुंतीही विशेष जपत असे. ती पतीला त्यासंबंधानें वारंवार सूचना देऊन सावध करीत असे. कुंतीपेक्षां माद्री अधिक तरुण होती, व ती लावण्यानेंही अप्रतिम होती. तिची आणि राजाची गांठ पडल्यास न जाणो, राजा सर्व विसरून जाऊन कामासक्त व्हावयाचा व भलताच प्रसंग ओढवावयाचा; अशी कुंतीला फार भीति वाटत असल्यामुळें ती माद्रीला आपणापासून केव्हांही दूर होऊं देत नसे. कुंती अशा प्रकारें जपत असे, व ज्या प्रसंगास भीत असे, तो प्रसंग अखेर ओढवलाच. एके दिवशीं कांहीं कारणवशात कुंती त्या दोघांपासून दूर गेली होती. ते दिवस वसंत ऋतूचे असल्यामुळें हिमगिरीवर जिकडे तिकडे अपूर्व शोभा पसरली होती. अनेक सुवासिक वृक्ष फुलभारानें लवून गेले होते. मंदमंद वाहणाऱ्या वाऱ्यानें फुलांचा सुवास जिकडे तिकडे पसरून राहिला होता. अशा त्या उपवनांत माद्री ऋतुस्नात असल्यामुळें न्हाऊन आपले केश पाठीवर मोकळे टाकून एका वृक्षस्तंभाला टेंकून बसली होती. त्यावेळीं ती फारच मनोहर दिसत होती. तिची गौरवर्ण तनु, विशाल भालप्रदेश, कमानदार भुंवया, सतेज व चंचल नेत्र, प्रफुल्ल गुलाबाप्रमाणें कपोल, चांफेकळी प्रमाणें नासिका, तोंडल्याच्या फळाप्रमाणें रक्तवर्ण ओंठ, हिऱ्याप्रमाणें दंतपंक्ति, चिंचोळी व आरक्तवर्ण हनुवटी, बारीक मान, मांसल भुजदंड, उन्नत कुच, सिंहाप्रमाणें कटिप्रदेश, कर्दलीस्तंभाप्रमाणें मांड्या, कमलाप्रमाणें चरण, वगैरे रेखल्याप्रमाणें सुंदर अवयवांमुळें ती स्वर्गांतून उतरलेल्या अप्सरे-प्रमाणें दिसत होती. तें तिचें अपूर्व सौंदर्य, व मनोहर स्वरूप पाहून मोठमोठे तापसीही कामातुर होऊन वेडे झाले असते, मग पंडूराजाची तर कथा काय ? तो एक साधारण संसारबद्ध मनुष्य. त्याच्या हृदयांत माद्रीच्या दर्शनाबरोबर कामवासना उत्पन्न झाली. तो आपलें देहभान विसरून गेला. मग त्याला कर्दम ऋषीच्या शापाची स्मृति ती कोठून राहणार! तो अगदीं बेहोष झाला, व त्यानें आपल्या बाहुपाशानें माद्रीला हृदयाशीं घट्ट आंवळून धरिलें. राजाचें तें वर्तन पाहून माद्रीनें त्याला शापाची स्मृति करून शुद्धीवर आणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु अनिवार कामवासनेनें मस्त झालेल्या राजाच्या हृदयावर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. शेवटीं राजानें बलात्कारानें तिचा उपभोग घेतला. त्याबरोबर एका निमिषार्धांत पंडूराजाचा प्राण हृदयकपाटांतून निघून गेला. अशा रीतीनें कर्दमऋषीची शापवाणी शेवटीं खरी झाली.

राजा गतप्राण झालेला पाहून माद्रीची स्थिति कशी झाली असेल याची कल्पना करणेंही कठीण होय. एक निमिषापूर्वीं जी सुंदरी आपल्या पतीसह प्रेमानें रतिसुखांत दंग झाली होती, तीच पतिव्रता-तरूणी निमिषानंतर पतीचें प्रेत पाहून कोणत्या स्थितींत गेली असेल, याची कल्पना करणें देखील अतीशय

दुःखप्रद आहे. एकीकडून पतिनिधनाचें दुःख तिला व्याकूळ करीत होतें, तर दुसरीकडून मला आतां कुंती काय म्हणेल ? ही भीती कालसर्पिणीप्रमाणें तिच्या पुढें फुत्कारे सोडीत होती. अशा दुहेरी कैचींत सांपडलेली माद्री त्या दुःख-भारानें दडपून जाऊन मोठ्यानें टाहो फोडूं लागली. तिच्या शोकध्वनीनें सर्व अरण्य दणाणून गेलें. तो शोक स्वर ऐकून कुंती धाईधाईनें तेथें आली, आणि पाहते तों पंडूराजा मरून पडला आहे. पतीला मृतावस्थेंत अवलोकन करतांच कुंतीचें हृदय करपून गेलें व तीही ऊर बडवून शोक करूं लागली.

पंडुराजा मृत झाल्याचें वर्तमान त्या अरण्यांत तेव्हांच पसरलें, व सर्व ऋषी पंडूच्या आश्रमांत आले. त्यांनीं कुंती व माद्री यांची समजूत केली. ऋषींच्या आज्ञेप्रमाणें पांडव अज्ञानावस्थेंत असल्यामुळें त्यांच्या संरक्षणाचा भार कुंतीनें आपल्या शिरावर घेतला. पण माद्रीनें मात्र पतीबरोबर सहगमन करण्याचा आपला निश्चय फिरूं दिला नाहीं. मग ऋषींनीं पंडूचें प्रेत दहन केलें, व त्या-बरोबर माद्री सती गेली. मग त्यांच्या अस्थी कुंतीबरोबर देऊन तिला मुलांसह हस्तिनापुरास आणून पोंचविलें. हें वर्तमान जेव्हां सर्व लोकांस कळलें तेव्हां त्यांना फार वाईट वाटलें. ऋषींनीं तीं पांच मुलें व कुंती यांना भीष्माच्या स्वाधीन करून ते ऋषि आपल्या आश्रमांत परत निघून गेले. भीष्म, विदूर, धृतराष्ट्र, यांनां पंडूच्या मृत्यूमुळें फारच वाईट वाटलें. भीष्मानें पांडवांकडून पंडूची और्ध्वदैहिक क्रिया यथासांग करविली, व कुंतीला आपल्या पुत्रांसह चांगल्या रीतीनें राहतां येईल अशी तिची व्यवस्था करून दिली.

## २. कौरवपांडवांच्या बाललीला.

धर्म, भीम, अर्जुन, नकुळ व सहदेव हे हस्तिनापुरास आल्यावर बाल स्वभावा-प्रमाणें त्यांची व धृतराष्ट्राच्या दुर्योधनादि शंभर पुत्रांची लवकरच ओळख होऊन ते सर्वजण एका ठिकाणीं खेळूं लागले. दुर्योधन हा लहानपणापासून दुष्ट स्वभावाचा होता. तो जरी पांडवांना आपणाबरोबर खेळावयाला घेत असे, तरी त्याचे मनांत द्वैतभाव सदैव जागृत असे. तो त्या पांचांचा एक, व आपला शंभराचा एक, जसे दोन पक्ष करून पांडवांबरोबर खेळत असे. लहान मुलें खेळ तांना गड्यांची सारखी वांटणी करितात; परंतु दुर्योधन पांच व शंभर अशी वांटणी करीत असे. तथापि कोणत्याही डावांत पांडवांचीच सरशी दिसून येत असे. सर्व पांडव हे दुर्योधनादि कौरवांपेक्षां अधिक चपल, सतेज, मनोहर व शक्तिसंपन्न असे होते. तसेच ते स्वभानें दिलदार असल्यामुळें, जरी त्यांची प्रत्येक डावांत सरशी होत असे, तरी ते दुर्योधनादि कारवांनां खेळण्यासंबंधानें पुन्हा पुन्हा सवलती देत असत. परंतु भीमास तें अगदीं खपत नसे. तो कौरवांना खूप रंजीस आणीत असे. पाण्यांत धोंड मारून लपालपी खेळत असतांना जर कौरव लबाडी करूं लागले, किंवा तक्रार करूं लागले, तर भीम

त्यांनां पाण्यांत बुडवून अगदीं कासावीस करीत असे. सुरकांडी खेळत असतांना कौरव वृक्षांवर चढून बसत, तेव्हां भीम जोरानें झाड हालवून सर्व कौरवांना फळांप्रमाणें धडाधड खालीं पाडी. याप्रमाणें प्रत्येक डावांत पांडवांची सरशी होत असल्यामुळें व कौरव लबाडी करूं लागल्यास भीम त्यांना ठोकीत असल्यामुळें लहानपणासूनच कौरव त्यांचा द्वेष करूं लागले. खेळण्यांत वास्तविक कौरवांचा दोष असून तेच पांडवावर रुसून बसत, तेव्हां पांडव त्या सर्वांचा अप्रबुद्धपणा पाहून त्यांची समजूत करीत, आणि त्यांनां पुन्हा खेळावयास बोलावीत. दुर्योधनाची अशी समजूत झाली होती कीं, पांडवांमध्यें एकटा भीम काय तो शक्तिमान् आहे, तेव्हां याचा युक्तिप्रयुक्तीनें नाश केला पाहिजे. असें नीच व क्षुल्लक विचार लहानपणापासून दुर्योधनाचे असत. एके दिवशीं त्यानें रानांत फराळाचा बेत केला. ठरल्याप्रमाणें कौरव–पांडव फराळाला बसले असतां दुर्योधनानें विष घातलेलीं पक्वानें भीमाच्या पानावर वाढविलीं. बाकीच्यांना दुसरीं वाढविलीं. त्या विषारी पक्वान्नांच्या सेवनानें भीमाला गुंगी आली व तो भूमीवर अचेतन पडला.

भीम निश्चेष्ट पडण्याचें कारण फक्त दुर्योधनालाच माहीत होतें. बाकी सर्वांनां वाटलें कीं, भीमानें खूप पक्वान्नें खाल्लीं असल्यामुळें स्वस्थ निजला आहे. त्याचे असे अघोरी प्रकार धर्मार्जुनास माहीत असल्यामुळें त्यांनां त्याबद्दल कांहीं विशेष वाटलें नाहीं. ते त्याला तसाच टाकून उशीर झाला म्हणून घरीं निघून गेले. पांडव गेल्यावर दुर्योधनानें भीमाला गंगेंत टाकून दिलें; व आपण तेथून निघून गेला. पुढें भीम पाण्यांतून वाहात वाहात नागलोकीं गेला. तेथें त्याच्या अंगावर हजारों सर्प धांवून गेले. सर्पदंशानें पूर्वीचें विष हटलें जाऊन भीम चांगला सावध झाला. वासुकीनें त्याला ओळखून त्यास पिण्यास अमृत दिलें, त्यामुळें त्यास नऊ हजार हत्तींचें बळ आलें, नंतर वासुकीनें आपल्या पद्मावती मुलीबरोबर भीमाचा विवाह लावून दिला; व मग त्यानें भीमाला हस्तिनापुरीं आणून पोंचतें केलें.

इकडे भीम परत न आल्यामुळें कुंतीला त्याच्याविषयीं मोठी काळजी वाटूं लागली. दुसऱ्या दिवशीं कुंतीनें व धर्मार्जुनानीं भीमाचा पुष्कळ शोध केला, परंतु कांहीं शोध लागेना. दुर्योधन त्याच्या विषयींची खरी हकीकत कोणाला सांगेना. अशा स्थितींत कुंती भीमावांचून मोठ्या कष्टानें दिवस कंठीत होती. भीम हा अत्यंत हूड व धाडसी स्वभावाचा असल्यामुळें, तो कोणीकडे व कशासाठीं गेला असेल याची कुंतीला मोठी काळजी वाटत होती. धर्म, अर्जुन, नकुल व सहदेव हेही मोठ्या काळजींत पडले होते. अठराव्या दिवशीं भीम सुखरूपपणें परत आलेला पाहून कुंतीसह सर्वांना परमानंद झाला. भीमानें आपण इतके दिवस कोठें होतों वगैरे हकीकत सांगून दुर्योधनानें आपल्या अन्नांत

विष घातल्यामुळें एवढा अनर्थ झाला तेंही सांगितलें. तो दुर्योधनाचा दुष्टपणा पाहून कौरवांविषयीं पांडवांच्या मनांत तिरस्कार उत्पन्न झाला. कुंतीनें पांडवांना विशेष सावध राहण्यास सांगितलें. भीमास जिवंत परत आलेला पाहून दुर्योधनादि कौरवांचें धाबें दणाणून गेलें. आतां भीम आपणां सर्वांचें उट्टें काढल्यावांचून राहणार नाहीं, अशी त्यांना भीति उत्पन्न झाली, व ती नाहींशी करण्यासाठीं दुर्योधनाचे प्रयत्न सारखे चालू लागले. अशा रितीनें कौरवपांडवांत लहानपणापसूनच द्वेष वाढत चालला. सत्यवती, अंबिका व अंबालिका यांनीं कौरवांचीं दुष्ट चिन्हें तेव्हांच ओळखिली. त्यांना त्या संबंधानें फार वाईट वाटूं लागलें. नंतर व्यासानें येऊन त्यांस कळविलें कीं, तुम्हीं येथें राहिल्यास तुमचा मान राहणार नाहीं. तेव्हां त्या तिघी हस्तिनापूर सोडून दूर अरण्यांत गेल्या व तेथें तपश्चर्या करीत बसल्या. कौरव आपल्या हातानें आपला कुलक्षय करून घेणार अशीं प्राक्चिन्हें लोकांना दिसूं लागलीं. दुर्योधन नांवाप्रमाणें सर्वनाश करील असें स्पष्टपणें लोक म्हणूं लागले.

### ३. कौरव व पांडवांचें शिक्षण.

पांडव व कौरव कांहींसे मोठे झाल्यावर क्षत्रियधर्मास अनुसरून त्यांनां युद्धविद्येंत निपूण करण्यासाठीं भीष्मानें त्यांस कृपाचार्याजवळ विद्याभ्यासासाठीं ठेविलें, कृपाचार्य हे सर्व विद्येंत पारंगत असून, सुशील, सदाचारी व तेजस्वी होते. भीष्म, शंतनू, वगैरे कृपाचार्याजवळच शस्त्रास्त्रविद्या शिकले होते. कृपाचार्य हा ब्राह्मण असून तो गौतम ऋषीचा मुलगा होता. एकदां गौतमऋषी आपल्या आश्रमासन्निध असतां, जालपत्नी नांवाची देवकन्या त्यांच्या दृष्टीस पडली. देवकन्येचें मनोहर सौंदर्य पाहून गौतमऋषीला कामेच्छा उत्पन्न झाली, व त्यांनीं आपलें रेत शरस्तंभावर स्खलन केलें; तेथें त्या रेताचे दोन भाग झाले व त्यापासून कृपाचार्य व कृपिणी अशीं दोन मुलें निर्माण झालीं. ते दोघे बहिणभाऊ अरण्यांत खेळत असतां, शंतनू राजा शिकार करीत तेथें आला, व तीं सुकुमार अशीं दोन सुंदर मुलें पाहून त्याला फार आनंद झाला; त्यानें त्यांचें चांगल्या रितीनें संरक्षण करण्यासाठीं त्यांस आपल्या राजवाड्यांत आणिलें. पुढें कृपी उपवर झाल्यावर ती द्रोणाचार्याला दिली. प्रसिद्ध वीर अश्वत्थामा याचा जन्म याच कृपीच्या पोटीं झाला होता. कृपाचार्य मोठा झाल्यावर गौतमऋषींनीं शंतनूच्या घरीं येऊन त्याला सर्व विद्या शिकविल्या. कृपाचार्याला सर्व विद्या गौतमऋषीपासून प्राप्त झाल्यावर भीष्मानें त्यास सर्वांचे गुरु केलें, व सर्वांनीं त्याच्यापासूनच अनेक विद्या संपादन केल्या. असो, कौरव व पांडव कृपाचार्याजवळ विद्याभ्यास करीत असतां तेथें द्रोणाचार्य आले, तेव्हां द्रोणाचार्यालाही सर्वांनीं आपले गुरु केलें.

कौरव–पांडवांना द्रोणाचार्यांचा लाभ होण्याचें कारण असें झालें कीं, एकदां कौरव व पांडव कृपाचार्यांच्या आश्रमाजवळ चेंडू खेळत असतां, त्यांचा चेंडू एका विहिरींत पडला. मुलांनीं चेंडू बाहेर काढण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु चेंडू बाहेर निघेना. त्यांनीं दोरीला गळ बांधून तो विहिरींत सोडला, परंतु चेंडू बाहेर निघाला नाहीं. तेव्हां तीं सर्व मुलें खिन्न झालीं. चेंडू नाहींसा झाल्यामुळें खेळण्याचा बेरंग झाला, याबद्दल प्रत्येकास वाईट वाटूं लागलें. तीं मुलें याप्रमाणें निराश होऊन विहिरीच्या कांठीं चेंडूकडे पहात उभीं असतां तेथें द्रोणाचार्य आले; व त्या मुलांची ती खिन्नता पाहून द्रोणाचार्य म्हणाले, अरे कृपाचार्यांसारखा धनुर्धर तुमचा गुरू असतां तुम्हांला हा चेंडू बाहेर काढतां येऊं नये, याबद्दल मला फार आश्चर्य वाटतें. माझा जर शिष्य येथें असता तर त्यानें हा चेंडू विहिरींतून तेव्हांच वर काढला असता. द्रोणाचार्यांचें हें भाषण ऐकून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें. खोल विहिरींतील चेंडू बाणानें बाहेर पडेल हें त्यांना खरें वाटेना. तेव्हां तीं मुलें द्रोणाचार्यांला म्हणालीं, अहो, असें जर असेल तर आपणच हा चेंडू बाहेर काढून दाखवा, म्हणजे आम्हीं आपणास गुरु करूं. मुलांनीं असें म्हटल्यावर द्रोणाचार्यांनीं जवळ धनुष्यबाण नसल्यामुळें एक दर्भ अभिमंत्रून जोरानें चेंडूवर टाकला. त्याबरोबर चेंडू पाण्यावरून उडाला व विहिरीच्या बाहेर येऊन पडला. द्रोणाचार्यांचें तें विलक्षण शरसंधान पाहून सर्व मुलें आश्चर्यचकित झालीं. त्यांनीं ती गोष्ट भीष्माला कळविली; व द्रोणाचार्यांस गुरू करण्याविषयींची खटपट करण्यास त्यांस सांगितलें. मुलांची ती इच्छा पाहून भीष्माला फार आनंद झाला, व त्यांनीं द्रोणाचार्यांचा मोठा सत्कार करून मुलांना धनुर्विद्या शिकविण्यासाठीं ठेवून घेतलें. त्याचा योगक्षेम चांगल्याप्रकारें चालावा म्हणून भीष्मानें त्यांना पुष्कळ गांवें इनाम करून दिलीं. द्रोणाचार्यांचा हस्तिनापुरास येण्याचा हेतु कांहीं निराळा असल्यामुळें ते आपला उद्देश सिद्धीस नेण्यासाठीं कौरव–पांडवांना युद्धविद्या फार काळजीपूर्वक शिकवीत होते. त्यांनीं भीम व दुर्योधन यांनां गदायुद्ध शिकविलें, धर्माला रथयुद्ध शिकविलें, पार्थाला धनुर्विद्या शिकविली; आणि नकुळ व सहदेव यांना खड्गविद्या शिकविली; याप्रमाणें कौरव–पांडवांना कृपाचार्य व द्रोणाचार्य या दोघांपासून युद्धविद्या प्राप्त झाली.

## २. एकलव्य कोळ्याची गोष्ट.

द्रोणाचार्य कौरव–पांडवांना युद्धविद्या शिकवीत असतां, त्यांची कीर्ति ऐकून एकलव्य नांवाचा कोळी त्यांच्याकडे आला, व मला तुमच्या शाळेंत घेऊन युद्धविद्या शिकवा असें तो द्रोणाचार्यांला म्हणाला. द्रोणाचार्य त्या कोळ्याविषयीं तिरस्कार दर्शवून म्हणाले; अरे विषादा, तुला मी विद्या शिकविणें हें शास्त्रनिषिद्ध कर्म होय; आणि ही विद्या शिकणें तुलाही श्रेयस्कर नाहीं.

द्रोणाचार्यांनीं याप्रमाणें सांगितल्यावर त्या कोळ्याचा निरुपाय झाला. तथापि विद्या संपादन करण्याचा हव्यास त्याला पुरा लागला होता. वाटेल त्या युक्ति प्रयुक्तीनें विद्या संपादन करावयाची, असा त्यानें अगदीं दृढ निश्चय केला होता. मग तो एका मोठ्या अरण्यांत गेला व तेथें त्यानें द्रोणाचार्यांची मृत्तिकेची मूर्ति तयार करून; ती मूर्ति हाच आपला द्रोणाचार्य व हाच आपला गुरू अशी मनांत दृढभावना धरून, तो धनुर्विद्येचा अभ्यास करूं लागला. गुरूला स्नान घालावें; गंधफुलें वाहावींत; धूपदीप करावा; नैवेद्य दाखवावा; व गुरूचें ध्यान करीत बसावें. असा त्या एकलव्याचा कित्येक वर्षे सारखा क्रम चालला होता. ती एकलव्याची विलक्षण गुरूभक्ति पाहून, गुरूभक्तींतील रहस्य नाहींसें होऊं नये म्हणून प्रत्यक्ष भगवंतांनीं त्या मृत्तिकेच्या मूर्तींत प्रवेश केला; व एकलव्यास सर्व युद्धविद्या शिकविली. एवढ्यासाठीं भाव अवश्य पाहिजे. गुरु, औषधी व देव यांच्या ठिकाणीं भाव असल्यावांचून कार्यसिद्धि केव्हांही होत नाहीं. असो, पुढें कांहीं दिवसांनीं द्रोणाचार्य व त्यांची शिष्यमंडळी यांना, अरण्यांत कोणी महातपस्वी तपसाधन करीत बसला आहे, असें समजलें; त्या वरून त्या सर्वांना त्या तपस्व्याचें दर्शन घेण्याची इच्छा झाली. मग द्रोणाचार्य सर्व शिष्यांना बरोबर घेऊन त्या अरण्यांत गेला. तेथें त्यांनीं पुष्कळ शोध केला, पण त्यांनां ऋषींचा शोध लागला नाहीं. तें अरण्य, विशाळ व दाट होतें. पुष्कळ शोध करून निराश झाल्यावर पांडवांनीं मनुष्याचा शोध लावणारीं कुत्रीं सोडिलीं. कुत्र्यांनीं एकलव्याला शोधून काढिलें. व आपणास शोध लागला हें द्रोणाचार्याला सुचविण्यासाठीं तीं मोठ्यानें भुंकूं लागलीं. कुत्र्यांचें भुंकणें ऐकून एकलव्यानें आपणास कोणी शोधीत आहे, असें जाणून आपलें धनुष्य हातांत घेतलें; व त्या सर्व कुत्र्यांवर अशा कुशलतेनें बाण फेकिले कीं, त्यांना कोणत्याही प्रकारची इजा न होतां, त्यांचीं मुखें मात्र बांधलीं गेलीं. त्यामुळें कुत्र्यांना भुंकतां येईनासें झालें. तीं कुत्रीं तेथून वेगानें निघालीं व द्रोणाचार्याजवळ येऊन उभीं राहिलीं. कुत्र्यांची ती शोचनीय अवस्था पाहून द्रोणाचार्याला व कौरवपांडवांना फार आश्चर्य वाटलें. त्यांनीं कुत्र्यांच्या तोंडावर गुंफलेले बाण युक्तीनें सोडविले. नंतर कुत्र्यांबरोबर ते त्या दाट झाडींत शिरून ऋषीजवळ आले; आणि पाहतात तों तेथें ऋषी वगैरे कांहीं नसून पूर्वीचा एकलव्य कोळी, समोर द्रोणाचार्यांची प्रतिमा ठेवून तिची अनन्यभावानें सेवा करीत बसला आहे. एकलव्याची ती दृढभक्ती व तो दांडगा विद्याव्यासंग पाहून द्रोणाचार्यांचें हृदय गहिंवरून आलें. गुरूला प्रत्यक्ष पाहतांच एकलव्याच्या आनंदाला सीमा राहिली नाहीं. तो द्रोणाचार्यांच्या चरणांवर लोटांगण घालून म्हणाला; गुरु महाराज, आपल्या कृपाप्रसादानें माझी सर्व विद्या पूर्ण झाली. या गरीब विद्यार्थ्यास दर्शन देण्याची आपण कृपा केल्यानें तर आज मी धन्य झालों आहें.

एकलव्याचें विद्यानैपुण्य पाहून कौरव–पांडवांच्या मनात द्रोणाचार्यांविषयीं संशय उत्पन्न झाला. द्रोणाचार्यांनें आम्हांला फसवून या कोळ्याला अधिक विद्या दिली असें त्यांना वाटूं लागलें. तेव्हां कौरव–पांडवांचा तो गैरसमज घालविण्यासाठीं द्रोणाचार्य एकलव्याला म्हणाले; ‘एकलव्या, तूं मला गुरु समजून विद्या संपादन केली आहेस. तेव्हां मला गुरुदक्षिणा देणें हें तुझें कर्तव्य आहे.’ एकलवा म्हणाला; गुरुमहाराज, आपण मागाल ती गुरुदाक्षिणा द्यावयास मी तयार आहे. एकलव्याचें असें भाषण ऐकून द्रोणाचार्य म्हणाले. एकलव्या मला तुझ्या उजव्या हाताचा आंगठा कापून तो गुरुदक्षिणा म्हणून दे. द्रोणाचार्यांची अशी मागणी होण्याबरोबर एकलव्यानें चटकन बाणाच्या टोंकानें आपला अंगठा कापून त्यास दिला. धनुर्विद्येंत आंगठ्याचाच मुख्य उपयोग असतो, तेव्हां अंगठा नाहींसा झाल्यावर एकलव्य त्या विद्येपासून पराङ्मुख होईल असें द्रोणाचार्यांला वाटलें होतें, परंतु तो एकलव्य आंगठा नाहींसा झाला तरी तर्जनीं आणि मध्यमा या दोन बोटांनीं अचुक शरसंधान करीत असे. एकलव्याला भेटल्यानंतर द्रोणाचार्य कौरव पांडवांना घेऊन हस्तिनापुरीं परत आले; व पुन्हां पूर्वीप्रमाणें सर्व मुलांना शिक्षण देण्यास त्यांनीं आरंभ केला.

## ५. द्रुपद राजाचा पराभव.

एकलव्य जातीचा कोळी असून त्यानें धनुर्विद्येंत एवढें प्रावीण्य संपादन केलें याबद्दल पांडवांना फार चुटपुट लागली. ते, आपला अभ्यास विशेष काळजीनें व फार झटून करूं लागले. म्हणून कौरवांपेक्षां ते अधिक हुषार झाले. कौरव–पांडवांना शस्त्रास्त्र विद्या चांगली अवगत झाल्यावर द्रोणाचार्यांनीं प्रत्येकांची परीक्षा घेतली. सर्व विद्यार्थी पूर्ण निष्णात झाले अशी खात्री झाल्यावर द्रोणाचार्यांनें भीष्मास कौरव–पांडवांचें धनुर्विद्या नैपुण्य अवलोकन करण्यासाठीं पाचारण केलें. भीष्मानें राजवाड्यांत सर्व लोकांचा दरबार भरवून तेथेंच द्रोणाचार्यांसह सर्वांस बोलाविलें. द्रोणाचार्यांनीं येऊन सर्वांस शिष्यवर्गाकडून पुष्कळ चमत्कार करून दाखविले. त्यांत भीमाचें गदायुद्ध, अर्जुनाचें शरसंधान व नकुळ सहदेवांचें खड्गसैपुण्य पाहून तर सर्व प्रेक्षक थक्क होऊन गेले. सर्वांनीं द्रोणाचार्यांची वाहवा केली. जो तो ‘गुरू असावा तर असाच असावा’ असें म्हणूं लागला. द्रोणाचार्यांनें मुलांना शस्त्रास्त्रविद्येंत चांगलें हुषार केलें, असें जाणून भीष्म म्हणाला, द्रोणाचार्य, आपण जी विद्या कौरवांना व पांडवांना दिली आहे, तिचा योग्य मोबदला आपणास देण्यास मी खरोखरच असमर्थ आहे. कारण ही विद्या अमूल्य आहे. आपल्या या महदुपकार ऋणांतून मुक्त होणें अशक्य आहे, तथापि अंशतः उत्तीर्ण व्हावें असें माझ्या मनांत आहे. शिवाय गुरूला कांहीं तरी दक्षिणा द्यावी असें शास्त्र आहे. तर आपली जी इच्छा असेल ती मोकळ्या मनानें कळविली असतां मी ती पूर्ण करण्याचा

प्रयत्न करीन. भीष्माचें भाषण ऐकून द्रोणाचार्यांनें मोठा संतोष दर्शविला; व ते म्हणाले; 'भीष्मा, परमेश्वराच्या दयेनें आज मला सर्व कांहीं अनुकूळ आहे; तथापि तुला जर खरोखर गुरुदक्षणा द्यावयाची असेल, तर चार दिवस पांचाळदेशाच्या द्रुपदराजाबरोबर युद्ध करण्यासाठीं पार्थाला मजबरोबर दे. तो लहान आहे, एकटा आहे, वगैरे शंका तूं मनांत मुळींच आणूं नकोस.' द्रोणाचार्यांची विनंती मान्य करून भीष्म म्हणाला; द्रोणाचार्यमहाराज, द्रुपदराजाचा ज्याअर्थी आपण पराभव करण्यासाठीं जात आहां त्या अर्थी त्याच्यावर तुमचा फार राग असावा असें वाटतें, तर कृपाकरून तुम्हां उभयतांमध्यें वैर पडण्याचें कारण काय, तें मला सांगावें. भीष्माचें भाषण ऐकून द्रोणाचार्य म्हणाले; भीष्मा, आम्ही दोघे गुरूबंधु आहोंत. आम्ही लहानपणीं गुरुगृहीं राहून विद्याभ्यास करीत असतां, तेथें आम्हां उभयतांचा फारच स्नेह जमला. त्यावेळीं त्यानें मला असें वचन दिलें कीं, 'मला राज्य प्राप्त झाल्यावर [illegible] अर्धें देइन.' [illegible] वचनाप्रमाणें द्रुपदराज्य [illegible] अशी मला आशा होती, परंतु ती माझी आशा [illegible] [illegible]. [illegible] राज्य देण्याचें तर बाजूला [illegible]च राहिलें, परंतु तो माझें नुसतें क्षेमकुशलही विचारीनासा झाला. तेव्हां शेवटीं मी स्वतःच त्याजकडे गेलों, व त्याच्याजवळ वचनाप्रमाणें अर्धें राज्य मागूं लागलों. तेव्हां तो असत्यवादी द्रुपदराजा मजवर एकदम रागावून मला नाहीं नाहीं तें बोलूं लागला. इतकेंच नव्हे, तर त्यानें आपल्या दूतांकडून धक्के मारून मला आपल्या देशाबाहेर घालवून दिलें. त्या राजाचा हा उन्मत्तपणा पाहून मला अत्यंत संताप आला, व मी त्यास असें बजावून सांगितलें कीं, द्रुपदा, लक्षांत ठेव, या मानभंगाबद्दल तुला चांगली शिक्षा लावून तुझें राज्य मी घेईन तरच हा द्रोणाचार्य! अशी प्रतिज्ञा करून मी तेथून निघालों व परशुरामाचे आश्रमांत येऊन त्यांच्याजवळ शस्त्रास्त्रविद्या शिकूं लागलों. सर्व विद्येंत मी पारंगत झाल्यावर श्वशूरगृहीं कृपाचार्यांनां भेटण्यासाठीं हस्तिनापुरीं आलों; येथें येत असतां, मध्यें कौरवपांडवांचा चेंडूचा खेळ पाहिला, त्याच वेळीं माझ्या असें मनांत आलें कीं, यांतील जीं चांगलीं तैलबुद्धीचीं मुलें असतील त्यांना धनुर्विद्येंत निपुण करून, त्यांच्याकडून द्रुपदराजाचा पराभव करावा. त्याप्रमाणें सर्वांत पार्थ हा धनुर्विद्येंत अत्यंत निष्णात झाला आहे, म्हणून त्याला माझ्याबरोबर पाठविण्यास मी तुम्हांस सांगितलें आहे.

द्रोणाचार्यांच्या इच्छेप्रमाणें भीष्मानें अर्जुनाला त्याच्या स्वाधीन केलें. व अर्जुनाला बरोबर घेऊन द्रोणाचार्य द्रुपदराजाकडे जाण्यास निघाले. यावरून द्रोणाचार्यांची तेजस्विता किती होती हें स्पष्ट दिसून येतें. जनमेजयराजा वैशंपायनास म्हणाला, ऋषिमहाराज, द्रोणाचार्य हा कोणाचा कोण होता, हें ऐकण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां वैशंपायन म्हणाले, राजा, द्रोणाचार्य हा भारद्वाज

ऋषीचा पुत्र होय. भारद्वाजऋषीनें एकदां रंभेला नग्न स्थितींत अवलोकन केलें, तेव्हां त्यांना कामवासना उत्पन्न होऊन त्यांचें रेत स्खलन होऊं लागलें. तें रेत त्यांनीं द्रोणांत धरून घटांत घातलें. त्यापासून पुढें जें मूल उत्पन्न झालें, त्याचें नांव भारद्वाजांनीं द्रोणाचार्य असें ठेविलें. याप्रमाणें द्रोणाचार्यांची उत्पत्ति आहे. असो; द्रोणाचार्य पार्थासह द्रुपदराजाच्या राजधानीजवळ आल्यावर त्यांनीं दूताकडून राजाला निरोप पाठविला कीं, 'द्रोणाचार्य अर्धे राज्य मागण्यास आला आहे, ठरल्याप्रमाणें त्याला राज्य दे अथवा युद्धास तयार हो.' दूतानें सांगितलेला निरोप ऐकून द्रुपदराजाला मोठा राग आला. तो म्हणाला; 'अहो, हा द्रोणाचार्य मूर्ख तर नाहीं! ज्यानें आश्रमांत राहून इकडे तिकडे दर्भ फेंकण्यांत आपलें कौशल्य दाखवावयाचें तें सोडून तो आज मजवर शरसंधान करण्यासाठीं आला आहे; हें आश्चर्य नव्हे काय! [illegible] पर्वताच्या [illegible] पर्वत [illegible] तोडं पहावयाचा अथवा कोल्ह्यानें सिंहास युद्धासाठीं [illegible] ज्या [illegible]र्थी या ब्राह्मणाला [illegible]च्चारण करावयाचें, त्यांतलाच हा प्रकार आहे. असो, [illegible] [illegible] [illegible]ठवली आहे त्या अर्थी तिचें निग[illegible] आपणास [illegible] युद्धीवर आणिलें पाहिजे.' असें म्हणून द्रुपदराजा आपणाबरोबर निवडक सैन्य घेऊन रथांत बसून नगराबाहेर आला; आणि पाहतो तों युद्ध करण्यासाठीं विशेष कोणी आले नसून पार्थ व द्रोणाचार्य असे दोघेच आहेत. मग द्रुपदराजानें दोघांबरोबर सैन्यानिशीं युद्ध करणें हें युद्धशास्त्रास अनुचित होय, असें जाणून तो एकटाच रथ घेऊन पार्थाजवळ आला. तेव्हां द्रोणाचार्य म्हणाले; 'अरे, द्रुपदा, अजून मी तुला सावध करितों कीं, जर तुला सत्यवादी व कीर्तिशाली म्हणून घ्यावयाचें असेल, तर निमुटपणें देऊं केलेलें अर्धे राज्य मला दे. व्यर्थ आपला अपमान करून घेऊं नकोस. वचन दिल्याप्रमाणें वागण्याची अजूनही तुझी इच्छा नसेल तर मी तुला या माझ्या शिष्याकडून जिंकून सगळ्या जगाच्या निंदेला पात्र करीन.' द्रोणाचार्यांचें असें अभिमानयुक्त भाषण ऐकून द्रुपदराजा संतप्त झाला; तो म्हणाला, 'द्रोणा, मला या तुझ्या उन्मत्तपणाबद्दल फार संताप आला आहे. त्याबद्दल तुला देहांत शिक्षा देण्यास मी समर्थ आहे; परंतु तूं ब्राह्मण आहेस म्हणून आह्मां क्षत्रियांस तुजवर हत्यार उचलणें योग्य नव्हे, याकरितां तुला सोडून देतों जा. बरोबर हा जो क्षत्रियाचा मुलगा आणिला आहेस तो अगदीं लहान आहे; याचेबरोबर युद्ध केल्यास सर्व लोक मला हंसतील!' द्रुपदाचें तें भाषण ऐकून पार्थ म्हणाला, 'द्रुपदा, मी पोर आहे या सबबीवर तूं मजबरोबर युद्ध करण्याचें टाळीत आहेस; असें मला वाटतें. तुला मजबरोबर आपण होऊन युद्ध करण्याची लाज वाटत असेल, तर मीच तुझ्यावर अगोदर बाण सोडतों; म्हणजे त्याचें निवारण करण्यासाठीं तुला मजबरोबर युद्ध करणें भाग पडेल.' असें म्हणून अर्जुनानें धनुष्याचा टणत्कार करून त्यावर अर्धचंद्र

बाण योजून तो द्रुपदावर सोडला. अर्जुनाचें तें हस्तचापल्य पाहून द्रुपदराजा चकित झाला. द्रुपदानेंही लागलीच धनुष्यबाण हातीं घेऊन अर्जुनाच्या बाणाचें निवारण केलें. याप्रमाणें युद्धास प्रारंभ झाला. पार्थाकडून होणारी शरवृष्टि भयंकर असल्यामुळें द्रुपदाचा सार... व घोडे यांनीं पहिल्या धडाक्यालाच प्राण सोडिला. द्रुपद विरथ झाला असें पाहून त्याचा सेनापति सैन्यासह अर्जुनावर धांवून आला. अर्जुनानें त्या सर्वांनां रणांतून पळवून लाविलें व विरथ झालेल्या द्रुपदराजास पकडून आपल्या गुरूजवळ ओढीत आणिलें, व गुरूपुढें त्यास उभा करून अर्जुन म्हणाला, ‘ गुरुजी, शिष्यानें आपल्या इच्छेप्रमाणें गुरुदक्षिणा आणिली आहे; तिचा स्वीकार करावा.’ अर्जुनाचें तें विनययुक्त भाषण ऐकून द्रोणाचार्यांनीं संतुष्ट होऊन त्यास शाबासकी दिली. तेव्हां द्रुपदराजा द्रोणाचार्याला साष्टांग नमस्कार करून म्हणाला; ‘ महाराज, मला असत्य बोलण्याचें चांगलें प्रायश्चित मिळालें. असो; मी आतां आपणास अर्धराज्य देण्यास तयार आहें, त्याचा आपण आनंदानें स्वीकार करावा. आपण दोघेही आतां मागील सर्व किल्मिष सोडून देऊं आणि पूर्वीप्रमाणें मित्रत्वानें व आनंदानें राहूं.’ द्रुपदराजानें याप्रमाणें नम्र भाषण ऐकून द्रोणाचार्यांचा सर्व राग नाहींसा झाला. ते म्हणाले; ‘ द्रुपदा, मी हा एवढा प्रयत्न राज्यप्राप्तीसाठीं केला नसून, तूं माझा मानभंग केलास, त्याबद्दल तुला शिक्षा देण्यासाठीं केला होता. मला राज्याची मुळींच आवश्यकता नाहीं. तूं आतां आपल्या राज्याचा सुखानें उपभोग घे. ’ असें सांगून द्रोणाचार्य पार्थासह हस्तिनापुरास परत आले. इतकें जरी झालें तरी द्रुपदराजाचें मन द्रोणाविषयीं वास्तविक शुद्ध झालें नव्हतें. ते मनांत जळफळूं लागला. त्यानें तपश्चर्या करून ईश्वरापासून द्रोणाचार्यांचा नाश करणारा मुलगा मागून घ्यावयाचा व त्याच्याकडून द्रोणाचार्यांचा पुरा सूड उगवावयाचा असा निश्चय केला.

---

## अध्याय ११ वा.

### १. स्वर्गलक्ष्मीचें मर्त्यलोकीं आगमन.

इकडे अर्जुन द्रुपदराजाचा पराभव करून हस्तिनापुरास परत आल्यावर तेथील लोकांनीं पार्थाचा अत्यंत गौरव केला. याप्रमाणें पांडव आपल्या गुणांनीं लोकप्रिय होऊन त्यांचा सर्वत्र जयजयकार होऊं लागल्यामुळें दुष्ट व क्षुद्रबुद्धि कौरवांच्या मनांत त्यांच्याविषयीं अधिक द्वेष उत्पन्न झाला. पांडवांची जसजशी अधिक सरशी होऊं लागली तसतसा त्यांचा द्वेषाग्नि अधिक भडकूं लागला. नंतर कोणत्या उपायानें पांडवांचा नाश करावा याचा दुर्योधन वगैरे धृतराष्ट्राचे सर्व पुत्र सारखा विचार करूं लागले. पंडूच्या पश्चात् बहुतेक सर्व सत्ता धृतराष्ट्राच्या हातांत गेल्यामुळें राज्याचे खरे वारस आपणच आहों असें कौरवांस

वाढून ते त्या मदानें उन्मत्त झाले होते. क्षणोक्षणीं ते पांडवांचा पाणउतारा करीत असत. पण पांडव हे जात्याच सच्चरित्र, बुद्धिवान् व सहनशील असल्यामुळें त्यांनीं क्षुल्लक बाबीचा आपल्या मनास विटाळसुद्धां होऊं दिला नाहीं. या गृहकलहाचीं चिन्हें भीष्म, विदुर व धृतराष्ट्र यांच्या लक्षांत येऊन चुकलीं होतीं; परंतु त्या बाबतींत तिघांनींही मौन धारण केलें होतें. पुढें पांडव व कौरव राज्य करण्यास योग्य झाल्यावर त्यांच्यापैकीं कोणाला राज्यावर बसवावें हा प्रश्न उपस्थित झाला. धृतराष्ट्राचे मनांतून आपल्या पुत्राला राज्य मिळावें असें होतें. भीष्म, विदुर व इतर सर्व नागरिक लोक यांच्या मनांतून धर्माला सिंहासनावर बसवावें असें होतें. या मतभेदामुळें दोन पक्ष निर्माण झाले, व आपसांत तंटेबखेडे वगैरे होऊन त्यास निराळेंच स्वरूप येऊं लागलें. तेव्हां धृतराष्ट्र व त्याचे पुत्र यांनीं असा विचार केला कीं, आपण आग्रहाचे भरीं पडल्यास भीष्म व विदुर हेही आपणास उघडपणें शत्रु उत्पन्न होतील. त्यापेक्षां एकादी चांगलीशी युक्ति योजून तंट्याचें मूळच नाहींसें करावें; म्हणजे कोणाबरोबर वाईटपणा न येतां निष्कंटकपणें राज्याचा उपभोग घेतां येईल. मग धृतराष्ट्रानें असें ठरविलें कीं, कौरव व पांडव एका ठिकाणीं असल्यामुळें निष्कारण तंटे वगैरे होतात. यासाठीं भागीरथीच्या कांठीं वारुणावत नांवाच्या शहरीं पांडवांनीं कुंतीसह राहावें; तेथें त्यांचा इतमाम व बंदोबस्त येथल्याप्रमाणेंच चांगल्या रीतीनें ठेवण्यांत येईल. त्यांना कांहींएक उणें पडूं दिलें जाणार नाहीं. पुढें चार वृद्ध व बुद्धिवान् लोक राज्याची जशी व्यवस्था लावितील, त्याप्रमाणें पांडवांना राज्याचा भाग दिला जाईल. धृतराष्ट्राचा हा विचार पांडवांनाही पसंत पडला. धृतराष्ट्राच्या हातांत सत्ता असल्यामुळें त्याच्या मुलांकडून पांडवांचा वारंवार अपमान होत असे; शिवाय त्यांना तेथें शक्य तितक्या स्वतंत्र रीतीनें राहतां येत नव्हतें. म्हणून पांडवांनीं धृतराष्ट्राची ती गोष्ट संतोषानें कबूल केली, व कुंतीसह ते वारुणावतीस जाण्यास तयार झाले.

पांडवांना वारुणावतीस पाठविण्यांत धृतराष्ट्राचा हेतू अत्यंत वाईट होता. पांडवांना तेथें पाठविण्यापूर्वींच त्यानें त्यांच्या नाशाची तेथें तयारी करून ठेविली होती. पुरोचन नांवाचा धृतराष्ट्राजवळ एक दुष्टबुद्धि मनुष्य होता. त्याला धृतराष्ट्रानें वारुणावतीस पांडवांकरितां असा राजवाडा बांधण्यास सांगितलें होतें कीं, त्या वाड्यांत पांडव राहूं लागल्यावर आपण मनांत आणूं तेव्हां त्यांचा नाश करितां यावा. धृतराष्ट्राच्या इच्छेप्रमाणें पुरोचनानें लाख, राळ, गंधक, सोरा, वगैरे ज्वालाग्राही पदार्थांचें शेणांत मिश्रण करून त्याचा गिलावा तयार केला, तसेंच लवकर पेट घेणारीं लांकडें वगैरे आवश्यक पदार्थ मिळवून विश्वासू कारागिरांकडून तो वाडा बांधून तयार केला. तो वाडा तयार होत असतां, तो कोणासाठीं बांधला जात आहे, वगैरे मजकूर धृतराष्ट्रानें व पुरोचनानें कोणासही कळूं दिला

नाहीं, तथापि ती गोष्ट पांडवांच्या सुदैवानें प्रथम विदुराला कळली. विदुर हा पांडवांचा हितचिंतक असल्यामुळें त्याला धृतराष्ट्राच्या त्या कृत्याबद्दल फार राग आला. पण हल्लींच्या अंधाधुंदींत ही गोष्ट फोडल्यास आपण नाहक चिरडलें जाऊं असा विचार करून बोभाटा न करितां युक्तीनें पांडवांना वांचविण्याचें त्यानें मनांत योजिलें. आणि तो वाडा बांधण्यास लावलेल्या कारागिरांस युक्तीनें लांच देऊन वश करून घेतलें, व त्यांच्याकडून त्या वाड्यांत एक तळघर तयार करविलें. त्या घरांतून बाहेर पडण्याकरितां एक विवर मार्ग तयार करवून त्याचें तोंड भागीरथीच्या पात्रांत आणून पोंचविलें. हा प्रकार धृतराष्ट्र व पुरोचन यांना मुळींच कळला नाहीं. व पांडव तेथें जाईपर्यंत विदुरानें त्यांना हें कळविलें नाहीं. इकडे तो वाडा तयार झाल्यावर धृतराष्ट्रानें पांडवांना निरोप देऊन रथांत बसवून वारुणावतीस पोंचतें केलें. तेथें वाड्यांत नवीन प्रवेश करावयाचा असल्यामुळें त्यांनीं ब्राह्मणांकडून वास्तुशांति करविली, ब्राह्मणांना भोजन व दक्षिणा देऊन संतुष्ट केलें, गोरगरिबांनाही पुष्कळ अन्न दिलें. त्याच दिवशीं एक भिल्लाची वृद्ध स्त्री आपल्या पांच मुलांसह भिक्षा मागावयाला आली होती. तिला धर्मानें पुष्कळ अन्न देऊन रात्र झाल्यामुळें वाड्यांत राहण्यास जागा दिली होती. त्याच सुमारास विदुराकडून एक दूत आला व त्यानें विदुराचें पत्र धर्माला दिलें. तें पत्र वाचून धर्म अत्यंत आश्चर्यचकित झाला. त्या पत्रांत लाक्षागृहाविषयीं व पळून जाण्यास ठेवलेल्या विवराविषयीं मजकूर होता. नंतर धर्मानें वाड्याच्या भिंतीची माती काढून तिचा वास घेऊन पाहिला, तेव्हां त्याची त्यासंबंधानें पूर्ण खात्री झाली. सायंकाळ झाल्यावर पुरोचन अग्नि लावण्याच्या उद्देशानें घरांत लपून राहिला, परंतु दुर्दैवानें त्यास झोंप लागली. दिवसाची सर्व गडबड आटोपल्यावर शांतमनानें धर्मार्जुन वगैरे भोजनास बसले. त्या वेळीं रात्र बरीच झाली होती. भोजन करीत असतां भीम धर्माला म्हणाला, धर्मा, घरांत कसली तरी दुर्गंधि येत आहे, त्यामुळें मला भोजन करवत नाहीं. धर्म म्हणाला, भीमा, जेवण उरकून घ्या. नंतर मी तुम्हाला दुर्गंधि येण्याचें कारण सांगेन. सर्वांचें भोजन झाल्यावर विदुराच्या पत्राप्रमाणें धर्म सर्वांना तळघरांत घेऊन गेला, व तेथील विवर दाखवून म्हणाला; ‘ आपणा सर्वांना या विवरांतून पळून गेलें पाहिजे; नाहीं तर आपण सर्वजण या घरांत जळून जाऊं. आपल्या नाशासाठीं हें ज्वालाग्राही पदार्थांचें घर धृतराष्ट्रानें मुद्दाम बांधविलें आहे. आणि पुरोचन याचसाठीं मुद्दाम आला आहे. ’ धर्माच्या भाषणावरून दुर्गंधीचें कारण सर्वांच्या लक्षांत आलें. तेव्हां भीम म्हणाला; ‘तुम्ही येथेंच असा. मी पुरोचन जेथें निजला आहे त्या भागाला आग लावून येतों; म्हणजे त्या दुष्टाचा अनायासें नाश होईल.’ असें म्हणून भीम तळघरांतून बाहेर आला व त्यानें पुरोचन निद्रिस्त होता तेथें आग लावून दिली, व आपण तळघरांत परत गेला नंतर कुंतीला आपल्या खांद्यावर बसवून

सर्व पांडव त्या विवर मार्गानें भागीरथीच्या पात्रांत आले. इकडे लाक्षागृहाला आग लागल्याबरोबर सर्व शहरांत 'पांडव जळाले, पांडव जळाले.' अशी एकच आरोळी झाली व हजारों लोक आग विझविण्यासाठीं तेथें आले. परंतु तें ज्वालाग्राही पदार्थांचें मंदीर हां हां म्हणतां जळून खाक झालें. आग विझाल्यावर शोध करितां त्यांत सात माणसांच्या अस्थी सांपडल्या. त्यावरून त्या घरांत पांडव जळून मेले, अशी सर्व लोकांची खात्री झाली. नंतर लोकांनीं त्या अस्थी दूतांकडून धृतराष्ट्राकडे पाठवून पांडव, कुंती, पुरोचन, असे सातजण जळून मृत झाल्याचें वर्तमान त्याला कळविलें. तें वर्तमान कळल्यावर हस्तिनापुरांत जिकडे तिकडे मोठा हाहाःकार उडाला; सर्व लोक शोकसागरांत बुडून गेले; पांडवांबद्दल सर्वांना अत्यंत वाईट वाटूं लागलें. दुर्योधनादिकांस मात्र ती गोष्ट ऐकून मोठा आनंद झाला. ते हर्षानें नाचूं लागले. धृतराष्ट्रानें वरपांगी शोकचिन्हें धारण करून पांडवांची उत्तरक्रिया केली.

### २. हेडंबा व भीम यांचा विवाह.

इकडे मध्यरात्रीच्या सुमारास पांडव कुंतीसुद्धां विवरमार्गानें सुरक्षित बाहेर आल्यावर भीमानें कुंतीसह सर्वांना खांद्यावर घेतलें, व आपण अंधारांतून त्या भयंकर जंगलांतील मार्ग क्रमूं लागला. कांहीं मार्ग चालून गेल्यावर कुंतीनें [illegible] विश्रांति घेण्याविषयीं भीमाला सांगितलें. वाटेच्या श्रमामुळें कुंतीला [illegible] तहान लागली होती. तेव्हां भीमानें सर्वांस खालीं उतरून टेविलें. [illegible] जवळ धर्म, पार्थ वगैरे बसले आणि भीम पाणी आणण्यासाटीं गेला. अंधारांत पाणी कोठें आहे तें त्याला बरोबर दिसेना. त्यानें बराच वेळ इकडे तिकडे शोधून मोठ्या कष्टानें पाणी मिळविलें, परंतु तें नेण्यासाठीं भांडें वगैरे कांहीं जवळ नसल्यामुळें त्यास चिंता उत्पन्न झाली. शेवटीं तो आपलें वस्त्र पाण्यांत भिजवून घेऊन आला. इकडे भीमास येण्याला उशीर झाल्यामुळें सर्व झोंपीं गेलीं होतीं. सर्व निद्रेंत निमग्न झाले आहेत असें पाहून त्यांस न उठवितां भीम त्यांचें संरक्षण करण्यासाठीं रात्रभर जागत बसला. त्या अरण्यांत हेडंब या नांवाचा राक्षस आपल्या हेडंबा नांवाच्या बहिणीसुद्धां राहत होता, त्यानें माणसाची चाहूल पाहून आपल्या बहिणीस शोध करण्याकरितां पाठविलें. ती हेडंबा राक्षसीण शोध करीत पांडवांजवळ आली. तेथें पांच माणसें निजलीं असून सहावा त्यांचे संरक्षणार्थ बसला आहे असें पाहून त्या नरमांसलोलुप हेडंबाराक्षसीला मोठा आनंद झाला. ती भीमाच्या जवळ गेली परंतु भीमाचा तो सतेज देह पाहतांच हेडंबेच्या मनातील दुष्टवासना नष्ट होऊन कामविकार उत्पन्न झाला. असा सुंदर पति आपणास मिळेल तर आपण खरोखर धन्य होऊं असें तिला वाटूं लागलें. नंतर ती भीमाला म्हणाली, हे सुंदर पुरुषा, तूं माझा अंगिकार करावास अशी माझी इच्छा आहे.

जर तूं माझी ही विनंति अमान्य करशील तर मी आत्महत्या करून घेईन. राक्षसीचें तें विलक्षण भाषण ऐकून भीमाला मोठें आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, ' असें होणें अशक्य आहे. मी मनुष्य आहें व तूं राक्षसी आहेस. राक्षसी व मनुष्य यांचा विवाह होणें दुरापास्त होय. तितकेंही करून मला वडील बंधु व आई आहे यांच्या आज्ञेशिवाय कोणतीच गोष्ट मला करितां येणार नाहीं.' याप्रमाणें भीम व हेडंबा या दोघांचें बोलणें चाललें असतां बहिणीला उशीर लागलेला पाहून तिच्या शोधासाठीं हेडंबराक्षस तेथें आला. भीमासारखा धष्ट पुष्ट मनुष्य पाहून हेडंबराक्षसाच्या तोंडाला पाणी सुटलें व तो मोठ्या आशेनें भीमावर धांवून गेला. राक्षसाच्या गडबडीनें कुंती वगैरेची झोंप मोडेल असें जाणून, भीमानें हेडंबराक्षसाला उचलून दूर नेलें; व त्याच्या बरोबर मल्लयुद्ध करून त्याला मारून टाकिलें व त्याचें प्रेत धर्मार्जुन निजले होते तेथें ओढीत आणिलें. त्यावेळीं धर्म, अर्जुन, कुंती वगैरे जागे होऊन भीम न दिसल्यामुळें काळजी करीत बसले होते. इतक्यांत भीमाला राक्षसाचें प्रेत घेऊन येतांना पाहून सर्वांना मोठा आनंद झाला. मग भीमानें हेडंबराक्षसाची सर्व हकीकत धर्माला सांगितली. नंतर ती हेडंबाराक्षसीण कुंतीला व धर्माला नमस्कार करून म्हणाली; ' महाराज, भीमाबरोबर माझा विवाह व्हावा अशी माझी इच्छा आहे. आपण मला आपल्या पदरांत घेऊन आपली स्नुषा करावी. आणि जर असें न कराल, तर मी आपले प्राण येथेंच अर्पण करीन. तेव्हां कुंती भीमाला म्हणाली; भीमा, आपण होऊन आलेल्या स्त्रीचा अवमान करूं नये, या स्त्रीचा स्वीकार करण्याविषयीं माझी तुला आज्ञा आहे. कुंतीच्या परवानगीनें भीमानें हेडंबेबरोबर गांधर्वपद्धतीनें विवाह केला. नंतर त्या अरण्यांत हेडंबेनें पांडवाची व्यवस्था उत्तम ठेविल्यामुळें कांहीं दिवस पांडव तेथेंच राहिले. पुढें हेडंबेला भीमापासून घटोत्कच नांवाचा मुलगा झाला. पुत्रप्राप्ती झाल्यावर हेडंबेनें पांडवांना पुढें जाण्यास परवानगी दिली. पांडवांस जातेवेळीं तिनें असें सांगितलें कीं, ' संकटकालीं आमचें स्मरण केलें असतां आम्हीं तेथें हजर होऊं व तुमच्या संकटाचें निवारण करूं. ' इतक्यांत इंद्रानें तेथें येऊन पांडवांना सांगितलें कीं, ' हा घटोत्कच मोठा शूर होईल व हा तुम्हांला अनेक प्रसंगीं उपयोगी पडेल. तसेंच हा प्रसिद्ध वीर जो कर्ण त्यास एक वेळ जिंकील' असें सांगून इंद्र अमरावतीस निघून गेला. नंतर पांडवांना व्यासाची भेट झाली. व्यासानें त्यांना एकचक्र नांवाच्या नगरास एक महिना जाऊन राहण्यास सांगितलें. व्यासाज्ञेप्रमाणें पांडव त्या अरण्यांतून एकचक्र नांवाच्या शहरांत आले.

### ३. बकासुराचा वध.

पांडव कुंतीसह एकचक्र नांवाच्या शहरांत एका ब्राह्मणाचे घरीं बिऱ्हाड करून राहिले. तेथें ते भिक्षा मागून आपला व कुंतीचा निर्वाह करीत असत.

त्या शहराला बक नांवाच्या राक्षसापासून फारच त्रास होत असे. तो राक्षस नित्य शहरांत येऊन पुष्कळ अनर्थ करी व हजारों मनुष्यांचा संहार करून निघून जाई. शहरांतील लोकांनीं सर्वांचा त्रास चुकविण्यासाठीं राक्षसाची गांठ घेऊन त्याच्याशीं असा ठराव केला कीं, ' तुला आम्हीं रोज दोन हेले, एक गाडीभर अन्न व एक मनुष्य याप्रमाणें देत जाऊं. यापुढें तूं शहरांत येऊं नये व कोणाला त्रास देऊं नये ' हा ठराव त्या राक्षसानें कबूल केला. त्या दिवसापासून शहरांतून रोज गाडाभर अन्न, दोन हेले व एक मनुष्य असें राक्षसाच्या भोजनाला जाऊं लागलें. मनुष्य मिळण्याची अडचण पडूं नये म्हणून, राजानें प्रत्येक घरावर पाळी बसविली होती. प्रत्येकास आपल्या घरांतील एक मनुष्य पाळीच्या दिवशीं द्यावा लागे. ज्या दिवशीं पांडव त्या ब्रह्मणाच्या घरीं येऊन राहिले; त्याचे दुसरे दिवशीं ठरावाप्रमाणें क्रमानें प्राप्त झालेली मनुष्य देण्याची पाळी त्या ब्राह्मणाची होती. त्या ब्राह्मणाला एक मुलगा व एक मुलगी अशीं दोनच अपत्यें होतीं. त्या दोघांपैकीं कोणाला द्यावें, याचा विचार तो ब्राह्मण व त्याची स्त्री या उभयतांमध्यें चालला होता. मुलीवर स्त्रीची अत्यंत प्रीति होती, व मुलगा बापाचा अत्यंत लाडका होता. दोघेही दोघांना प्रिय असल्यामुळें कोणाला द्यावें या संबंधानें त्यांना विचार पडला होता. शेवटीं कांहीं. निर्णय न ठरतां दोघेही रुदन करूं लागले. रडण्याचा शब्द ऐकून कुंती त्यांच्याजवळ गेली व तिनें त्यांस रडण्याचें कारण विचारिलें. तेव्हां त्या ब्राह्मण स्त्रीनें आपण कोणत्या प्रसंगांत आहोंत तें कुंतीला सांगितलें. ती हकीकत ऐकून कुंतीला फार वाईट वाटलें, व त्या दोघांचें अपत्यप्रेम पाहून तिला त्यांची फार दया आली. नंतर ती त्यांना म्हणाली; तुम्हीं शोक करूं नका. माझीं मुलें भिक्षा मागण्यासाठीं गेलीं आहेत; तीं आलीं म्हणजे मी त्यांच्यापैकीं एकाला तुमच्या बदला देईन. कुंतीचें असें भाषण ऐकतांच त्या दोघा ब्राह्मण स्त्री-पुरुषांना व त्यांच्या मुलांना अत्यंत आनंद झाला. थोड्या वेळानें पांडव भिक्षा करून परत आले. तेव्हां कुंतीनें त्यांना सर्व हकीकत सांगितली व आपण दिलेलें वचनही कळविलें. तें ऐकून भीमसेनानें बळी जाण्याचें कबूल केलें. इतकें होत आहे तोंच सूर्योदय झाल्यामुळें राजाचा दूत मनुष्य मागण्यासाठीं तेथें आला. ब्राह्मणाच्या सांगण्याप्रमाणें भीम राजदूताबरोबर शहराच्या दरवाजाजवळ गेला. तेथें अन्नसामग्रीचा गाडा हेले जोडून तयार करून ठेविला होताच. ती भरपूर अन्नसामग्री पाहून भीमाला मोठा आनंद झाला. नंतर तो त्या गाड्यावर बसला व राजदूतानें दाखविलेल्या दिशेनें गाडा हाकूं लागला.

भीम गाडा हांकून नेत असतां, वाटेंत त्यांतील पक्वान्नांवर यथेच्छ हात मारीत होता; कांहीं मार्ग क्रमिल्यावर वाटेंत एक नदी लागली. तेथें भीमानें गाडा सोडला,

व निश्चलपणें त्यांतील अन्न खात बसला. इकडे गाडा येण्यास उशीर झाल्यामुळें राक्षस क्रुद्ध होऊन शहराकडे येऊं लागला तों नदींत अन्नाचा गाडा त्याच्या दृष्टीस पडला. बळी जाणारा मनुष्यच त्यांतील अन्न खात आहे असें पाहून तो राक्षस अत्यंत संतप्त झाला व मोठ्या वेगानें भीमाच्या अंगावर धांवून आला. राक्षस जवळ येण्याबरोबर भीमानें त्याला धरून जोरानें जमिनीवर आपटलें त्याबरोबर तो ठार झाला. नंतर भीमानें यथेच्छ भोजन करून नदीचें थंडगार पाणी प्राशन केलें, व त्या दुष्ट राक्षसाचें प्रेत ओढीत शहराच्या वेशीजवळ आणून टाकिलें, व रात्र झाल्यावर तो कोणाला नकळत त्या ब्राह्मणाचे घरीं आला व त्यानें घडलेली सर्व हकीकत भावांना व आईला सांगितली. ती हकीकत ऐकून त्या सर्वांना फार आनंद झाला. या गोष्टीचा आतां सर्वत्र गवगवा होईल तेव्हां येथें न राहतां दुसरीकडे जाणे बरें, असा विचार करून पांडव तेथून त्याच रात्रीं दुसरीकडे निघून गेले. दुसरे दिवशीं शहरांतील लोक शहराबाहेर येऊन पाहतात तों तो राक्षस मरून पडला आहे. त्या दुष्ट राक्षसाला मृत झालेला पाहून सर्वांना मोठा आनंदा झाला. त्यांनीं त्या दिवशीं ज्या ब्राह्मणाची पाळी होती त्यास मोठें इनाम दिलें, व मोठा उत्सव केला. परंतु राक्षसाला कोणी मारिलें याचा शोध कोणालाही लागला नाहीं.

## ४. अंगारपर्ण गंधर्वाशीं पांडवांचा स्नेह.

मागें सांगितल्याप्रमाणें पांडव कुंतीसह एकचक्रनगराहून निघाले ते गंगेच्या कांठीं अंगारपर्ण नांवाच्या गंधर्वाच्या उपवनांत आले. तेथें तो गंधर्व आपल्या कुंभिनी नांवाच्या स्त्रीसह राहात असे. पांडव आले त्या रात्रीं तो गंधर्व आपल्या स्त्रीबरोबर क्रीडा करीत होता. पांडव रात्र झाल्यामुळें उजेडासाठीं चूड पेटवून पुढें निघाले असतां, गंधर्वानें उजेडावरून कोणी येत आहे असा तर्क करून त्यावर बाण सोडिले. तो शरसंधनाचा प्रकार अर्जुनानें तेव्हांच ओळखिला व अग्न्यस्त्राचा प्रयोग करून तो ते बाण वरच्यावर जाळूं लागला. इकडे अंगारपर्ण गंधर्व इतकी शरवृष्टि करण्यानेंही उपवनांतील अग्नि कमी होत नाहीं असें पाहून तेथें आला आणि पाहतो तों अर्जुन आपले बाण अग्न्यस्त्रानें जाळून टाकीत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्याला अर्जुनाचा फार राग येऊन त्यानें त्यास युद्धास पाचारण केलें. तेव्हां अर्जुन व अंगारपर्णगंधर्व या दोघांमध्यें निकराचें युद्ध झालें. त्या युद्धांत अर्जुनानें अंगारपर्णगंधर्वाचा पराजय केला व त्यास धरून धर्माजवळ आणिलें. तेव्हां धर्म म्हणाला, पार्था, त्याची झाली इतकी अप्रतिष्ठा पुरे आहे.; तो शरण आला आहे, शरणागताचें रक्षण करणें आपलें कर्तव्य आहे, त्याला सोडून दे. धर्माच्या सांगण्यावरून पार्थानें त्याला सोडून दिलें. पार्थाचा पराक्रम व सौजन्य पाहून अंगारपर्णाचे मनांत पांडवांविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. तो म्हणाला; हे अर्जुना, माझ्या अपराधाची क्षमा कर; यापुढें

आपण सर्व मित्रत्वानें वागूं. मला चाक्षुषी नांवाची एक विद्या अवगत आहे, ती मी तुला शिकवितों; व तूं मला अग्न्यस्त्र शिकीव. त्याप्रमाणें एकमेकांनीं एकमेकांना आपआपल्या विद्या देऊन परस्परांचा स्नेह संपादन केला. अंगारपर्णाच्या आग्रहावरून पांडव कांहीं दिवस तेथें राहिले. नंतर ते तेथून उत्कतीर्थावर गेले. तेथें धौम्यऋषीची व पांडवांची भेट झाली. धौम्यऋषीची योग्यता जाणून धर्मानें त्यांस आपला गुरु केलें, व त्याच्याजवळून मंत्रोपदेश घेतला. नंतर धौम्यऋषीनें धर्माला कल्याणप्रद असा अभिषेक केला. तेथें पांडव असतांना त्यांना पांचाळ देशाकडे जाणारा ब्राह्मणसमुदाय भेटला. पांचाळदेशच्या द्रुपदराजानें आपल्या मुलीचें स्वयंवर आरंभिलें होतें, व द्रव्याशेनें ते ब्राह्मण पांचाळदेशाकडे चालले होते. द्रौपदीस्वयंवराची वार्ता पांडवांना समजल्यावर त्यांसही पांचाळदेशांत जाण्याची इच्छा उत्पन्न झाली, व त्या ब्राह्मणांबरोबर ते पांचाळदेशांतील द्रुपदराजाची राजधानी कुसुमावती येथें जाण्याकरितां निघाले.

## ५. स्वर्गलक्ष्मीची कथा.

वैशंपायनऋषि जनमेजयराजाला सांगतात; हे राजा जनमेजया, मागें द्रोणाचार्यानें पार्थाकडून द्रुपदराजाचा कसा पराभव केला तें मी तुला सांगितलें आहेच. त्यावेळीं जरी द्रुपदराजानें आपल्या हातून झालेल्या अपराधाबद्दल द्रोणाचार्यांची क्षमा मागितली होती, तरी त्याच्या मनांतील द्रोणाचार्यांविषयींचा द्वेष कमी झाला नव्हता. आपणास असत्यवादी ठरवून द्रोणाचार्यानें जी आपली अप्रतिष्ठा केली त्याचा सूड उगवावयाचा असा त्यानें निश्चय केला होता, हेंही मीं मागें सांगितलेंच आहे. नंतर त्यानें वसिष्ठ ऋषीला पुत्रकामेष्टी यज्ञ करविण्याविषयीं विनंति केली. वसिष्ठऋषींनीं त्यास गंगेच्या कांठीं असलेल्या कल्माक्षीराजाच्या नगरांत राहात असलेल्या, महान तपोनिधि, विलक्षण सामर्थ्ययुक्त याज व उपयाज नांवाच्या ऋषींकडे जाऊन विनंती केली असतां तुझी इच्छा पूर्ण होईल; असें सांगितल्यावरून त्यानें त्या ऋषींकडे येऊन आपली सर्व हकीकत सांगितली; व पुत्रप्राप्त्यर्थ यज्ञ करविण्याविषयीं विनंति केली. त्या दोघां बंधूंनीं राजाचें म्हणणें मान्य केलें, व पुत्रप्राप्तीसाठीं त्याचेकडून एका यज्ञाला आरंभ करविला. पूर्णाहुतीच्या वेळीं यज्ञकुंडांतून एक सुंदर पुत्र निघाला. त्याचा वर्ण तप्त लोखंडाप्रमाणें लाल होता. त्याच्या मस्तकावर मुकुट होता व अंगावर वस्त्रेंभूषणें होतीं. तसेंच तो धनुष्यबाण व गदा वगैरे हत्यारांनीं मंडित होता. त्याचें ऋषींनीं धृष्टद्युम्न असें नांव ठेविलें. नंतर त्या यज्ञकुंडांतून एक सुंदर कन्या निघाली. ती कृष्णवर्णाची असून अत्यंत सुंदर होती. तिचें नांव कृष्णा असें ठेवून तीं दोन्हीं अपत्यें ऋषींनीं राजाच्या स्वाधीन केलीं.

ही कृष्णा म्हणजे स्वर्गलक्ष्मीचाच अवतार होय. स्वर्गलक्ष्मीला शाप झाल्यामुळें तिनें पृथ्वीवर हा मनुष्यजन्म घेतला होता. तिला शाप होण्याचें कारण

असें होतें कीं, ती एकदां पृथ्वीवर आली असतां, सहजगत्या तिची दृष्टि एका गाईकडे गेली. तिच्यामागें पांच बैल लागलेले पाहून स्वर्गलक्ष्मीला हंसू आलें. ती आपल्या मनाशीं म्हणाली, ‘ही गाय मोठी व्यभिचारिणी आहे; म्हणून हिच्यामागें पांच बैल लागले आहेत. स्वर्गलक्ष्मीच्या हंसण्यावरून गायीच्या लक्षांत तो सर्व प्रकार आला, व तिनें स्वर्गलक्ष्मीला असा शाप दिला कीं, तूं मला हंसलीस म्हणून तुझाही पांच पति उपभोग घेतील. तो शाप ऐकून स्वर्गलक्ष्मीला फार वाईट वाटलें. तिच्या नेत्रांतून दुःखाश्रु खालीं असलेल्या नदींत पडूं लागले. त्या स्वर्गलक्ष्मीच्या अश्रूपासून नदींत स्वर्गकमळें निर्माण झालीं व तीं खालीं वाहत गेलीं. पुढें तीं यमाच्या यज्ञसमारंभासाठीं आलेल्या इंद्राला कशीं सांपडलीं; व त्या कमळावरून त्यानें स्वर्गलक्ष्मीचा कसा शोध केला; नंतर इंद्राची व आदिपुरुषाची गांठ पडून पुढें काय प्रकार झाला, ती कथा तुला *मागें सांगितलीच आहे. आदिपुरुषाजवळ जे पांच इंद्र होते तेच हे पांडव व जी स्वर्गलक्ष्मी होती तीच कृष्णा होय. ती कृष्णा द्रुपदराजाची मुलगी असल्यामुळें तिला द्रौपदी असें म्हणूं लागले. यज्ञकुंडांतून धृष्टद्युम्न व द्रौपदी निघाल्यावर कार्य संपलें, असें जाणून ऋषींनीं यज्ञविसर्जन करण्यास आरंभ केला. इतक्यांत त्या यज्ञकुंडांतून आणखी एक मुलगा उत्पन्न झाला. आहुती दिल्यावांचून मुलगा निघालेला पाहून ऋषींना फार आश्चर्य वाटलें. तो मुलगा सर्वावयवसंपन्न होता, परंतु †तृतीयप्रकृति असल्यामुळें ऋषींनीं त्या मुलाचें नांव शिखंडी असें ठेवून तोही राजाच्या स्वाधीन केला. शिखंडी पूर्व जन्मींची अंबा होय. भीष्म आपला स्वीकार करीत नाहीं असें पाहून तिनें द्रुपदाच्या पुत्रकामेष्टी यज्ञाचे वेळीं होमकुंडांत उडी मारिली. त्याच अंबेची पुन्हां शिखंडीरूपानें उत्पत्ति झाली. अंबेचा स्वीकार करण्याविषयींचें परशुरामाचें म्हणणें भीष्मानें अमान्य केल्यावरून परशुरामानें भीष्माला ‘तुला नपुंसकाचे हातून मरण येईल.’ असा शाप दिला होता. तें परशुरामाचें शापवचन पुरें करण्यासाठीं अंबेनें शिखंडीरूपानें हा जन्म ग्रहण केला होता.

स्वर्गलक्ष्मीला पृथ्वीवर येण्याची जी दुर्बुद्धि झाली, त्याचें कारण असें आहे कीं, एकदां दुर्वास ऋषी अनुष्ठानास बसले असतां ऐरावतावर बसून इंद्र तेथें आला. तो दुर्वास ऋषीला नमस्कार वगैरे कांहीं न करितां उन्मत्तपणें तसाच पुढें जाऊं लागला, तेव्हां दुर्वासऋषी इंद्रावर अत्यंत संतप्त झाले. दुर्वास ऋषींची संतप्त मुद्रा पाहून इंद्र मनांत भयभीत होऊन हत्तीवरून खालीं उतरला; आणि त्यानें दुर्वासाला साष्टांग प्रणाम केला. तेव्हां दुर्वास ऋषींनीं प्रसन्न होऊन आपल्या गळ्यांतील सुवासिक फुलांची माळा काढून इंद्राच्या

* ही कथा चौथे स्तबकांत आलेली आहे.

† नपुंसक.

गळ्यांत घातली. इंद्रानें ती माळा हत्तीच्या गंडस्थळावर ठेविली. हत्तीनें सोंडेनें ती माळा भूमीवर फेंकून लीलेनें पायानें तुडवून टाकिली. तो इंद्राचा उन्मत्तपणा पाहून दुर्वास ऋषींनीं इंद्राला शाप दिला कीं, 'तूं उन्मत्त झाला आहेस; तेव्हां तुझी स्वर्गलक्ष्मी पृथ्वीवर जाईल.' त्या शापवचनाप्रमाणें स्वर्गलक्ष्मी पृथ्वीवर द्रौपदीच्या रूपानें अवतीर्ण झाली होती.

---

## अध्याय १२ वा.

### १. द्रौपदीस्वयंवर.

द्रौपदीस्वयंवरासाठीं पांडव कुंतीसह द्रुपदराजाच्या कुसुमावती नांवाच्या नगरांत आले; त्या वेळीं व्यासांची व त्यांची तेथें भेट झाली. व्यासांनीं पार्थाला असें सांगितलें कीं, 'या शहरांत जी भिक्षा मिळेल ती तूं सर्व भावांना वांटून दे.' व कुंतीलाही भिक्षेची समान वांटणी करण्याविषयीं सांगून ते तेथून निघून गेले. पांडवांनीं लाक्षागृहांतून बाहेर पडल्यापासून भिक्षेकऱ्याचा वेष धारण केला होता. त्यामुळें ते कोणालाही ओळखूं येत नसत. व त्यांनाहि त्यावेळीं तेंच श्रेयस्कर होतें. जे पूर्वी राज्यवैभवाचा उपभोग घेत असत, तेच पांडव दैवाच्या फेऱ्यांत सांपडून भिक्षेकरी होऊन भीक्षा मागत फिरत होते! दैवाची गति किती विलक्षण आहे! पांडव जरी इतक्या संकटांत सांपडले होते, तरी ते कधींही गतधैर्य झाले नव्हते, तसेंच अनीतिमार्गानें वैभव मिळविण्याचें त्यांच्या मनांत कधींहि आलें नाहीं. ईश्वरावर भरंवसा ठेवून योगमार्गानें त्यांनीं आपला प्रयत्न सारखा चालू ठेविला होता. त्यांनीं द्रुपदराजाच्या नगरांत प्रवेश केल्यावर एका कुंभाराची ओळख करून घेऊन त्याच्या घरीं आपलें बिऱ्हाड ठेविलें.

द्रुपदराजानें द्रौपदीच्या स्वयंवराची तयारी फार मोठी व अत्यंत मनोरम केली होती. मोठमोठाले शोभिवंत मांडव घालून स्वयंवरासाठीं आलेल्या राजेरजवाड्यांची त्यांत राहण्याची उत्तमप्रकारची व्यवस्था ठेविली होती. सर्व देशांतील राजांना द्रुपदानें पाचारण केलें होतें. त्याप्रमाणें बळिभद्र, सात्यकी, दुर्योधन, शाल्व, शकुनी, श्रीकृष्ण, जयद्रथ, बाल्हीक, कर्ण, विकर्ण, कौरवांचे पुत्र व अंग, वंग, चीन, भोट, मालव, मलय, महाराष्ट्र, तैलंगण, गौड, गंगातट, कर्नाटक, झाडी, मारवाड, द्राविड, गांधार, कलिंग, भोज, कुंतल वगैरे देशांतले राजे स्वयंवरसमारंभासाठीं आपआपल्या सैन्यांनिशीं तेथें आले होते. त्यांचे हत्ती, घोडे व रथ यांची शहरासभोंवतीं विलक्षण गर्दी झाली होती. सर्व शहर मनुष्यांच्या गर्दीनें गजबजून गेलें होतें. शहरांत सर्वत्र मांडव घातले होते, व त्यांत विलासी लोक नाचरंगांत गुंग होऊन जात होते. स्वयंवरापूर्वी

सोळा दिवसपर्यंत द्रुपदराजानें आलेल्या पाहुण्यांना मेजवान्या वगैरे देऊन अगदीं खूप ठेविलें होतें. असा तो विलक्षण स्वयंवरसमारंभ पाहून मोठमोठे राजेही थक्क होऊन गेले. सोळा दिवसपर्यंत उत्सव झाल्यावर सतरावे दिवशीं द्रुपदराजानें द्रौपदीचें स्वयंवर करण्याचें ठरविलें. राजवाड्यापुढें स्वयंवरासाठीं अत्यंत मोठा, कुशलतेनें शृंगारलेला मांडव घातला होता. ध्वजा, तोरणें वगैरेंनीं त्या मंडपाला विशेष शोभा आली होती. स्वयंवरमंडपांत मंगल वाद्यें वाजूं लागल्याबरोबर स्वयंवरासाठीं आलेले राजे उत्तम पोषाख करून आपआपल्या हत्तीवर बसून मोठ्या थाटानें मिरवत मिरवत स्वयंवरमंडपांत येत होते. जो राजा मंडपांत येई, त्यास त्याच्या योग्यतेप्रमाणें द्रुपदराजा बसवीत होता. याप्रमाणें शहरांत स्वयंवराची गर्दी उडालेली पाहून ज्या कुंभाराच्या घरीं पांडव उतरले होते, त्यानें पांडवांना–' आज द्रुपदराजा द्रौपदीचें स्वयंवर झाल्यावर भिकाऱ्यांना पुष्कळ दानधर्म करणार आहे, तर तुम्हींहि तेथें अवश्य जा ' असें सांगितलें. तेव्हां पांडवांना स्वयंवरमंडपांत जाण्याची इच्छा होऊन ते तिकडे निघून गेले. जातेवेळीं त्यांनीं कुंतीची आज्ञा घेतली. तेव्हां कुंतीनें सर्वांना असें सांगितलें कीं, ' आज मिळालेली भिक्षा मी आपल्या हातानें तुम्हां सर्वांस वांटून देईन. ' नंतर पांडव कुंतीला वंदन करून स्वयंवरमंडपांत आले. तेथें त्यांना कोणीही ओळखिलें नाहीं. कृष्णानें मात्र ते भिक्षेकरीवेषांत असतांही मंडपांत आल्याबरोबर त्यांना ओळखिलें. बळराम श्रीकृष्णाजवळच बसला होता. त्याला ते म्हणाले; 'दादा, या भगवीं वस्त्रें परिधान केलेल्या भिकाऱ्यांना तूं ओळखिलेंस काय ! हा सर्वांत पुढचा भिक्षेकरी तो धर्म असून त्याच्या मागचा तो भीम आहे. मधला अर्जुन असून त्याच्या मागें नकुळ व सहदेव आहेत.' याप्रमाणें कृष्णानें बळरामाच्या कानांत हळूच सांगितल्यावर बलरामाला मोठें आश्चर्य वाटलें.

मंडपांत सर्व राजे आल्यावर द्रौपदी उत्तम वस्त्र परिधान करून व अनेक बहुमोल अलंकार घालून मंडपांत येऊन उभी राहिली; तिचें तें अप्रतिम लावण्य पाहून प्रत्येकास द्रौपदीनें आपणास माळ घालावी असें वाटूं लागलें; इतक्यांत द्रौपदीचा बंधु धृष्टद्युम्न तेथें आला, व त्यानें मंडपाचे मध्यभागीं मत्स्ययंत्र तयार करून ठेविलें. मंडपाचे छताला दोरीनें एक मासा बांधला होता; व त्याचे खालचे बाजूस भोंक असलेली एक फळी लावलेली होती. नंतर धृष्टद्युम्नानें एक धनुष्य व पांच बाण तेथें ठेवून–' जो हें धनुष्य घेऊन जमिनीकडे पाहून वर फळीच्या भोंकांतून बाण सोडून माशाला खालीं पाडील त्यालाच द्रौपदी माळ घालील,'–असें सर्वांस सांगितलें, व आपण तेथून निघून गेला. तो विलक्षण पण ऐकून सर्वांची निराशा झाली. पण ऐकण्याचे अगोदर प्रत्येकास आपलें सौंदर्य, आपलें वैभव, आपली कीर्ति, यांनीं मोहित होऊन द्रौपदी

आपणासच माळ घालील असें ज्यांस वाटत होतें; ते सर्व राजे गतधैर्य होऊन निस्तेज झाले. हा विलक्षण पण जिंकून द्रौपदीला कोण मिळवितो या गोष्टीकडे त्या सर्वांचें लक्ष लागून राहिलें. बराच वेळ झाला, तरी ऐटीनें बसलेल्या राजांतून कोणीच उठण्यास धजेना. पण जिंकण्याची आपणास आशा नाहीं, तेव्हां निष्कारण उठून आपली फजिती कां करून घ्यावी, असा विचार करून जो तो आपल्या जागेवर स्वस्थ बसून मौज पहात होता. द्रौपदी हातांत माळ घेऊन सर्व राजांकडे वारंवार पहात होती, परंतु कोणी वर डोकें म्हणून करीना. अशा स्थितींत एक प्रहर गेल्यावर पार्थ धर्माला म्हणाला; ‘दादा, आपण जर आशीर्वाद देऊन मत्स्ययंत्र भेदण्याची मला आज्ञा कराल तर मी हें भेदून द्रौपदी मिळवीन’ तेव्हां धर्मानें अर्जुनास आशीर्वाद देऊन आज्ञा दिली. मग अर्जुन धर्माला व श्रीकृष्णाला वंदन करून मत्स्ययंत्राजवळ आला. भगवीं वस्त्रें परिधान केलेल्या भिकाऱ्याला यंत्र भेदण्यासाठीं उठलेला पाहून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें. कित्येकांची अशी समजूत झाली कीं, हा भिकारी वेडा असावा; कित्येक त्याकडे पाहून उपहास्यस्वरानें हांसत होते; परंतु अर्जुनानें कोणाकडेही लक्ष न देतां चाक्षुषीविद्येच्या योगानें जमिनीकडे पाहून त्या छिद्रांतून बाण सोडून मासा खालीं पाडला. तें त्या भिक्षेकऱ्याचें विलक्षण शरसंधान पाहून जे सरळ प्रकृतीचे लोक होते, त्यांनीं त्याचा जयजयकार केला. सुरवरांनीं याप्रमाणें स्वर्गलक्ष्मी अर्जुनाला मिळालेली पाहून त्याच्यावर पुष्पवृष्टि केली. जिकडे तिकडे मंगल वाद्यें वाजूं लागलीं. नंतर द्रौपदीनें अर्जुनाचे गळ्यांत माळ घातली, त्यामुळें सर्वत्र आनंदीआनंद दिसूं लागला. परंतु द्रौपदी भिकाऱ्यानें मिळविलेली पाहून कित्येक दुष्ट व नीच वृत्तीच्या राजांना द्रुपद राजाचा फार राग आला. आणि द्रुपदराजानें अशा रीतीनें आमची मुद्दाम मानखंडणा केली असें त्यांना वाटूं लागलें. नंतर त्या सर्वांनीं संगनमत करून असें ठरविलें कीं, ‘द्रुपदराजावर हल्ला करून त्याला चांगली शिक्षा लावावयाची व द्रौपदीला पळवून न्यावयाचें!’ संकेताप्रमाणें सर्वांनीं आपलीं सैन्यें एकत्र करून द्रुपदराजावर हल्ला केला. सर्व राजांनीं एकदम हल्ला केल्यामुळें द्रुपद राजा घाबरून गेला; व आपली आतां धडगत लागत नाहीं असें त्यास वाटूं लागलें. शत्रूंचें तें कृत्य पाहून अर्जुनानें आपलें धनुष्य सज्ज केलें, व भीमानें मोठा वृक्ष उपटून घेतला; आणि दोघेजण शत्रुसैन्यांचा संहार करूं लागले. थोड्याच वेळांत त्यांनीं सर्वांचा मोड करून टाकिला. यःकश्चित भिक्षेकऱ्यांचा इतका पराक्रम पाहून कर्णाला फार आश्चर्य वाटलें. आपल्या सैन्याचा नाश झालेला पाहून तो फार क्रुद्ध झाला; व युद्ध करण्यास आला. त्या वेळीं पार्थ व कर्ण या उभयतांमध्यें घनघोर युद्ध झालें. कर्ण धनुर्विद्येंत अत्यंत निष्णात होता, परंतु पार्थानें विलक्षण शरवृष्टि करून त्याला अगदीं त्रस्त करून

सोडिलें. त्याचे घोडे मारून टाकिले; सारथ्यास खालीं पाडिलें; ध्वजस्तंभ मोडून पाडिला; आणि कर्णासही क्षतांकित केलें. तेव्हां कर्ण म्हणाला, हे भिक्षो, इतके दिवस मी असें समजत होतों, कीं, मजबरोबर युद्ध करण्यास परशुराम किंवा इंद्र हे दोघेच समर्थ आहेत. परंतु तुझें युद्धकौशल्य पाहून तो माझा गैरसमज दूर झाला. तूं वास्तविक भिकारी नसून कोणी वीरपुरुष असावास ! याकरितां तूं कोणाचा कोण, तें मला सांग. कर्णाचा प्रश्न ऐकून पार्थ म्हणाला; ' कर्णा, आह्मी ब्राह्मण आहोंत. आह्मी भिक्षा मागून निर्वाह करीत असतों. आज कारण पडलें म्हणून युद्ध करणें भाग पडलें.' पार्थाचें बोलणें ऐकून ब्राह्मणाबरोबर युद्ध करणें अयोग्य समजून कर्णानें आपला रथ मागें वळविला, आणि तो रणक्षेत्रावरून निघून गेला. कर्ण गेलेला पाहून शाल्व अर्जुनावर धांऊन आला. तेव्हां भीमानें त्यास अडविलें. त्या दोघांचें भयंकर युद्ध झालें. भीमानें मोठा वृक्ष उपटून गरगर फिरवून त्याच्या रथावर टाकिला, त्याबरोबर शाल्वाचा रथ, घोडे व सारथी यांसुद्धां चूर होऊन गेला. शाल्व मोठ्या कष्टानें त्यांतून जिवंत बाहेर पडला. शाल्व विरथ झालेला पाहून भीमानें त्याच्याशीं मल्लयुद्ध सुरू केलें. मल्लयुद्धांत भीमानें त्याला तत्कालच खालीं आणिलें व त्याच्या छातीवर बसून तो बुक्या मारूं लागला, तेव्हां शाल्व भडाभड रक्त ओकूं लागला. शाल्वाची दुर्दशा पाहून कौरवादि सर्व मोठे राजे आपआपल्या नगराला पळून गेले. अशा रीतीनें द्रुपदराजाची संकटांतून सुटका केल्यावर, पांडव द्रौपदीला घेऊन कुंभाराच्या घरीं आले.

पांडव भिक्षाटणाहून परत आले त्या वेळीं कुंती त्यांची
पुढें धर्म हे—

व त्यानें हेर पाठवून त्यांना गुप्तरितीनें ते भिक्षुक कोण आहेत त्याचा शोध करण्यास सांगितलें. हेरांनीं त्यांच्या परस्परांत चाललेल्या लढाईच्या गोष्टी ऐकून हे भिक्षुक, ब्राह्मण किंवा देव नसून कोणी तरी क्षत्रिय आहेत असें जाणलें, व तें वर्तमान राजाला जाऊन सांगितलें. दुसरे दिवशीं द्रुपदराजानें त्यांच्याकडे सहा रथ पाठवून पांचांस पांच रथांत आणि कुंती व दौपदी यांना एका रथांत बसवून मंगलवाद्यांच्या गजरामध्यें मिरवीत त्यांस राजवाड्यांत आणविलें. तेथें सर्वांचा सत्कार करून राजानें त्यांना आसनावर बसविलें; आणि धर्माला आपण कोण, कोठील वगैरे प्रश्न विचारिले. तेव्हां धर्मानें आपण पांडव आहोंत, आणि श्रीकृष्ण व बलराम हे आमच्या मातुलपक्षाचे आहेत, असें सांगितलें. ती त्यांची हकीगत ऐकून द्रुपदराजाला आपली मुलगी चांगल्या घराण्यांत पडली, तिला चांगला पति मिळाला, याबद्दल फार आनंद झाला. त्यानें सर्वांना बहुमोल वस्त्रें अलंकार देऊन त्यांचा सन्मान केला. नंतर सुवर्णाच्या पाटावर द्रौपदीला बसवून तिजबरोबर विवाह करण्याकरितां पुरोहितांनीं अर्जुनास बोलाविलें; तेव्हां धर्मराजा म्हणाला, राजा, आम्हां पांचही भावांबरोबर द्रौपदीचा तूं विवाह करून दे. धर्माचें तें चमत्कारिक भाषण ऐकून द्रुपदराजाला फार आश्चर्य वाटलें. तो म्हणाला; धर्मा, एका मुलीचा पांच पतीबरोबर विवाह कसा करितां येईल ? धर्म म्हणाले, द्रुपदा, व्यासांनीं व आमच्या आईनें आम्हांस द्रौपदीची भिक्षा पांच जणांत [illegible] म सांगितलें आहे. पूर्वी जटिल ऋषीनें आपली मनोहरी नांवाची मुलगी [illegible] ची होती; तेव्हां दौपदीचा आम्हां पांचजणांबरोबर विवाह [illegible] माणें धर्मानें द्रुपदराजाला पष्कळ समजावून सांगितलें,

— [illegible] ना.

जप करितील व तुला अत्यंत पूज्य मानतील. अहिल्या, दमयंती, अरुंधती, पार्वती, सीता, तारा, लोपामुद्रा, वगैरे पतिव्रता स्त्रियांमध्यें तुझी गणना होईल.' असा आशीर्वाद दिला. नंतर चार दिवस लग्नोत्सव करून द्रुपदराजानें पांडवांना तेथेंच राहवून घेतलें.

पांडवांच्या विवाहाचें वर्तमान देशोदेशीं पसरून हस्तिनापुरीं कौरवांच्या कानावर गेलें. त्यावेळीं त्यांचे चेहरे लज्जेनें व भीतीनें काळवंडून गेले. लाक्षागृहाचा प्रयत्न फुकट जाऊन लोकांत अपकीर्ति मात्र झाली, असें त्यांनां वाटूं लागलें. ते आपसांत म्हणूं लागले, 'लाक्षागृहांत सातजण जळाले, असें लिहिलें होतें, परंतु तें सर्वच उलट झालें!' कर्ण म्हणाला, ते भिक्षेकरी पांडवच असावेत. युद्धांत ज्यानें माझा पराभव केला, तो अर्जुन असावा आणि शाल्वाबरोबर ज्यानें युद्ध केलें तो भीमसेन असावा. त्या दोघांवांचून एवढा पराक्रम दाखविण्यास कोणीच समर्थ नाहीं. याप्रमाणें त्यांचें पांडवांविषयीं अनेक प्रकारचे तर्कवितर्क चालले; आणि लोकांत पसरलेली अपकीर्ति कशी घालवावी याचा त्यांना मोठा विचार पडला. नंतर दुर्योधन, कर्ण, शकुनी, वगैरे जे स्वार्थी व दुष्ट बुद्धीचे होते, ते म्हणूं लागले कीं, 'पुन्हां कांहीं तरी कपट करून पांडवांचा नाश करावा.' इकडे भीष्म, विदुर, द्रोणाचार्य, यांचें म्हणणें असें पडलें कीं, राज्याचे दोन सारखे भाग करून त्यापैकीं एक पांडवांना द्यावा, व एकाचा उपभोग कौरवांनीं घ्यावा. त्यांच्याशीं वाकडेपणानें वागण्यांत फायदा नसून उलट नुकसान होण्याचा संभव आहे. श्रीकृष्णाचें त्यांना पूर्वीपासून साह्य असून आतां तर आणखी द्रुपदराजाचा त्यांस आश्रय मिळाला आहे. मनांत आणतील तर तुमचा नाश करण्यासही ते आज समर्थ आहेत. तेव्हां दुसरा विचार न करितां पांडवांना सन्मानानें आणून अर्धें राज्य द्यावें, असें सर्वांचें मत पडलें. तेव्हां धृतराष्ट्राला ती गोष्ट निरुपायानें कबूल करावी लागली. तो विदुराला म्हणाला, विदुरा, तूं कुसुमावतीला जा, व पांडवांना हा विचार कळवून त्यांना येथें घेऊन ये. लोक, पांडव लाक्षागृहांत जळाले म्हणून आमची निष्कारण निंदा करीत होते; पण ईश्वराच्या कृपेनें पांडव जिवंत असल्यामुळें आमचा तो अपवाद [illegible]सा झाला हें ठीक झालें. याप्रमाणें आपलें व्यंग झांकण्यासाठीं धृतराष्ट्रानें [illegible]ठ गोडगोड बोलून दाखविलें. आज्ञेप्रमाणें विदूर हस्तिनापुराहून निघून [illegible]सुमावतीस आला. त्यानें द्रुपदराजाला धृतराष्ट्राचा निरोप कळविला. मग द्रुपदराजानें पांडवांना रथांत बसवून अनेक वस्त्रेंभूषणें वगैरे देऊन विदुराबरोबर मार्गस्थ केलें. मार्गांत विदुरानें हस्तिनापुराकडील सर्व हकीकत पांडवांना सांगितली. पांडव नगराजवळ आल्यावर भीष्म, दोणाचार्य, कृपाचार्य, कर्ण, विकर्ण, दुर्योधन, दुःशासन, वगैरे त्यांना सामोरे आले व मोठ्या समारंभानें त्यास शहरांत घेऊन गेले. विदुरानें आपल्या घरीं राहण्याचा

त्यांस फार आग्रह केल्यावरून पांडव तीन दिवसपर्यंत विदुराचे घरीं राहिले. राज्याच्या वांटणीसंबंधानें भवति न भवति होऊन अखेर असें ठरलें कीं, 'राज्याचे दोन सारखे भाग करावेत आणि त्यापैकीं एक भाग कौरवांनीं घेऊन हस्तिनापुरींतच रहावें; व दुसरा भाग पांडवांनीं घेऊन शक्रप्रस्थीं रहावें.' सर्वोच्या इच्छेप्रमाणें पांडवांनीं तें कबूल केलें; आणि ते इंद्रप्रस्थास जाऊन राहिले. नंतर युधिष्ठिरानें आपणास राज्याभिषेक करून घेण्यासाठीं श्रीकृष्ण व बलराम यांना बोलावून आणविलें, आणि व्यासानें सुमुहूर्त पाहून धर्माला राज्यावर बसवून अभिषेक केला; व असा आशीर्वाद दिला कीं, 'तुमची जगतांत कीर्ति वाढेल, तुम्हीं आपलें राज्य नीतीनें चालवाल, तुमच्या प्रजेला तुम्हांपासून फार सुख होईल, व श्रीकृष्णाचें तुम्हांला नेहमीं साह्य मिळेल.' नंतर व्यास तेथून निघून गेले. मग सर्वजण कृष्णास भेटले. कृष्णानें पांडवांना आलिंगन दिलें, तेव्हां सर्वांचीं हृदयें गहींवरून आलीं. नंतर कुंती श्रीकृष्णास म्हणाली, श्रीकृष्णा, तूं आमचें आजपर्यंत अनेक संकटांतून संरक्षण केलें आहेस, तसेंच पुढेंही करावें. कृष्णानें कुंतीची ही विनंति मान्य करून ते द्वारकेस निघून गेले.

## २. सुंदोपसुंद यांची कथा.

पांडव शक्रप्रस्थ येथें राहून आपलें राज्य व्यवस्थितपणें चालवीत होते. त्यांनीं नगरासभोंवतीं खंदक खणले; मोठमोठे किल्ले बांधले, व लोकांच्या संरक्षणासाठीं पुष्कळ सैन्य ठेविलें. त्यांनीं योग्य न्याय मिळण्याकरितां नवीन कायदे करून प्रजाजनांस सुखी केलें. त्यामुळें पांडवांचें राज्य थोड्याच दिवसांत लोकांना सुखकारक होऊन राजा धर्म हा चिरंजीव व्हावा, असें ते सर्व म्हणूं लागले. याप्रमाणें पांडव नीतीनें राज्य चालवूं लागल्यावर एके दिवशीं त्यांच्याकडे नारदमुनीची स्वारी आली. नारदाच्या आगमनामुळें धर्माला फार आनंद झाला. त्यानें त्याचा सत्कार करून बसण्यासाठीं आसन दिलें, व येण्याचें कारण विचारिलें. नारद म्हणाले, 'युधिष्ठिरा, एकाच आमिषावर अनेक टपून ब[illegible] असतां, त्यांचा कलह हटकून व्हावयाचा. त्यांतही स्त्री म्हणजे भांडणाचें [illegible] लोकांमध्यें वस्तुतः विरुद्ध असलेल्या पतिपत्नीभावाचा सध्यां तुम्ही अ[illegible] घेत आहांत. याकरितां तुमच्यामध्यें भांडण होऊं नये, म्हणून चार उपदेशाच्या गोष्टी सांगण्याकरितां मी आलों आहें. पूर्वी सुंद व उपसुंद नांवाच्या दोघां बंधूंची एकच स्त्री होती. त्यांनीं आपसामध्यें कांहीं नियम न केल्यामुळें त्यांचा नाश झाला. नारदाचें हें भाषण ऐकून धर्म म्हणाला, नारदमुने, आपण सुंदोपसुंदांचा स्त्रीमुळें नाश झाला म्हणून म्हणता, तर त्यांची सर्व हकीकत कृपा-करून मला सांगावी. तेव्हां नारदमुनी म्हणाले:—

'राजा धर्मा, पूर्वी हिरण्यकशिपू नांवाचा जो प्रसिद्ध राक्षस राजा होऊन गेला, त्याला निकुंभ नांवाचा एक पुत्र होता. तो फार पराक्रमी होता. सुंद व उपसुंद हे त्या निकुंभाचे पुत्र होत. ते दोघेही आपल्या पित्याप्रमाणेंच शूर, पराक्रमी व दृढनिश्चयी होते. त्या दोघांनीं अंगुष्ठावर उभे राहून ऊर्ध्वदृष्टीनें व ऊर्ध्वकरानें कित्येक वर्षेपर्यंत तपश्चर्या केली होती. तसेंच होमहवन समयीं ते स्वतःच्या मांसाच्या आहुत्या देत असत. अशा त्यांच्या उग्र तपश्चर्येमुळें ब्रह्मदेव प्रसन्न होऊन, वर मागा म्हणून म्हणाले. तेव्हां—'आम्हांकडून संपूर्ण त्रिभुवन जिंकिलें जावें, व आम्हांस कोणाच्याही हातून मृत्यु येऊं नये.'—असा त्यांनीं वर मागितला. तेव्हां ब्रह्मदेव तथास्तु म्हणून आपला वरदहस्त उभयतांच्या मस्तकांवर ठेवून, सत्यलोकीं निघून गेले. नंतर त्या दोघां भावांनीं सैन्य गोळा करून एकेक देश जिंकण्यास आरंभ केला. थोड्याच दिवसाच्या अवधींत त्यांनीं आपल्या पराक्रमानें सर्व पृथ्वी पादाक्रांत केली. त्यांनीं पाताळ व स्वर्ग या दोन्ही लोकांवरही आपलें निशाण फडकाविलें. तिन्ही लोकांचें राज्य प्राप्त झाल्यावर त्यांनीं आपल्या अनन्वित कृत्यांनीं लोकांना त्रास देण्यास आरंभ केला. ऋषि, ब्राह्मण, देव, गायी व साध्वी स्त्रिया यांचा ते दुष्ट वाटेल तसा छळ करूं लागले. इंद्र, चंद्र, वरुण, अग्नि, यम, वगैरे देवांना त्यांनीं जिंकून बंदींत टाकिलें. देवांना हविर्भाग मिळूं नयेत म्हणून ते होमहवनांचा नाश करीत असत. होमहवन करणारास ते भयंकर शिक्षा करीत. असा त्यांनीं सर्व त्रिभुवनांत प्रळय मांडिल्यामुळें लोक अत्यंत त्रस्त होऊन ब्रह्मदेवाकडे जाऊन म्हणाले; 'हे ब्रह्मदेवा, तुझ्या वरप्रदानानें उन्मत्त होऊन सुंदोपसुंदांनीं सर्व त्रिभुवन त्रस्त केलें आहे. सज्जनांचा छळ होत आहे, गायी ब्राह्मणावर जुलूम होत आहे, साध्वी स्त्रियांना आपली लज्जा संरक्षण करणें दुरापास्त झालें आहे, होमहवनादि कर्में बंद पडलीं आहेत, देवांना हविर्भाग मिळेनासे झाले आहेत, पृथ्वीवर दुष्कर्में अधिकाधिक होत असून पाप वाढत चाललें आहे, एवढ्यासाठीं या राक्षसांच्या नाशाची कांहींतरी तजवीज कर.' हें ऐकून ब्रह्मदेवाला राक्षसांचा फार राग आला. त्यानें त्यांच्या नाशाची युक्ति मनांत योजून विश्वकर्म्याला बोलावून असें सांगितलें कीं, 'तूं सर्व देवांपासून तिळ तिळ तेज मागून घे; व त्यापासून एक सुंदर स्त्री निर्माण कर' विश्वकर्म्यानें ब्रह्मदेवाचे आज्ञेप्रमाणें एक सुंदर स्त्री निर्माण केली, व तिचें नांव तिलोत्तमा असें ठेविलें. ती अतीशय सौंदर्यवान होती. तिला पाहून देवही मुग्ध होऊन गेले. मग ब्रह्मदेवानें तिला सुंदोपसुंद राहत होते त्या विंध्याचल पर्वतावर तिला पाठवून दिलें. ते दोघे राक्षस मौजेनें उपवनांत बसून पुष्पवाटिकेची मौज पहात होते, अशावेळीं तिलोत्तमा तेथें आली व आपल्या अपूर्व अभिनयानें त्यांचें चित्त आकर्षण करूं लागली. ती सौंदर्यलतिका त्यांचे दृष्टीस पडतांच ते दोघेही आपल्या आसना-

वरून उठले, व मोठ्या उत्सुकतेनें तिच्याजवळ जाऊन एकानें तिचा डावा हात धरला व दुसऱ्यानें उजवा हात धरिला. ते दोघेही अतिशय कामातुर झाले, व प्रत्येकजण तिला आपली स्त्री होण्याविषयीं म्हणूं लागला. तेव्हां तिनें सांगितलें कीं, 'तुम्ही दोघांनीं एकाच वेळीं माझे हात धरिले आहेत, तेव्हां मी कोणाचा स्वीकार करावा हें मला समजत नाहीं. तुम्हींच आपसांत निकाल करा म्हणजे ठीक होईल.' दोघांनांही ती स्त्री आपणास असावी असें वाटत होतें. वडील बंधु सुंद धाकट्या भावाला म्हणाला; 'अरे, हिच्यावर माझें लक्ष प्रथम गेलें आहे; तेव्हां ही माझी स्त्री असून तुला आईप्रमाणें आहे. हें ऐकून उपसुंद म्हणाला, असें होणार नाहीं. या स्त्रीवर माझा हक्क आहे. याकरितां हिला त्वां आपल्या मुलीप्रमाणें मानावी. अखेर दोघांचा तंटा सुरू झाला. शेवटीं दोघेही हुमरीतुमरीवर येऊन एकमेकांच्या मस्तकावर गदा मारूं लागले. अखेरीस त्या युद्धांत दोघांचाही अंत झाला.'

नारद म्हणतात, 'धर्मराजा, असा हा स्त्रीसंबंध आहे. मनुष्य एकदा कामातूर झाला म्हणजे त्याला सारासार विचार राहत नाहीं. एवढ्यासाठीं तुम्हीं आपल्या स्त्रीसंबंधानें कांहीं नियम करावेत. असें न केल्यास तुम्हां पांचाचाही द्रौपदीमुळें नाश होईल; व कौरवांचा कार्यभाग अनायासें सिद्धीस जाईल. तेव्हां तुम्हीं असें करा कीं, दोन महिने व बारा दिवसपर्यंत एकेकानें द्रौपदीचा उपभोग घेत जावा; व या नियमाचें जो उल्लंघन करील त्यानें बारा वर्षें तीर्थाटण करावें.' नारदाची आज्ञा सर्वांनीं मान्य केली. नंतर नारद तेथून निघून गेले. नियमाप्रमाणें दोन महिने बारा दिवस झाल्यावर द्रौपदी अग्निकुंडांत प्रवेश करी, व त्यांतून पवित्र होऊन बाहेर निघून दुसऱ्या पतीची सेवा करीत असे. याप्रमाणें त्या साध्वीचा क्रम चालला होता, म्हणूनच ती प्रातःस्मरणीय पतिव्रता असें लोक समजतात.

### ३. कौरवोत्पत्तिप्रकार.

वैशंपायनऋषींनीं ही कथा सांगितल्यावर जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला, ऋषे, धर्मादिक पंडूपासून उत्पन्न झाले, म्हणून त्यांनां पांडव असें म्हणतात, परंतु धृतराष्ट्राच्या पुत्रांना कौरव नांव पडण्याचें कारण काय, तें मला कृपाकरून सांगावें. तेव्हां वैशंपायन ऋषी म्हणाले:—

'जनमेजया, गंगेपासून जशी भीष्माची उत्पत्ती झाली; त्याचप्रमाणें तपती नांवाच्या नदीपासून कुरुराजाची उत्पत्ती झाली. एकदां श्रीसूर्यनारायण नित्याप्रमाणें आकाशपंथानें गमन करीत असतां, फार थकल्यामुळें त्यांना घाम आला. तो त्यांनीं हातानें पुसून खालीं टाकिला. तो घाम, खालीं पृथ्वीवर कळकाचे एक बेट होतें, त्यावर पडला. त्यापासून तेथें सावित्री व तपती नांवाच्या दोन सुंदर कन्या निर्माण झाल्या. दोघीही सौंदर्यवान असून पवित्र व धर्मरत

होत्या. त्या नेहमीं झाडांवर बसून तपसाधन करीत असत. एकदां सोमवंशांतला सुवर्ण नांवाचा एक राजा शिकारीसाठीं तेथें आला. तो त्या उपवर तरुणींना पाहून अगदीं मोहित झाला. अशा सुंदर स्त्रिया आपणास मिळतील तर आपण खरोखर धन्य होऊं, असें त्याला वाटूं लागलें. नंतर तो तपतीला म्हणाला; 'हे सुंदर स्त्रिये, तूं मजबरोबर विवाह करावास, अशी माझी इच्छा आहे. माझी ही विनंती मान्य करून माझा स्वीकार कर.' तपती म्हणाली, 'हे राजा, श्रीसूर्य हा माझा पिता आहे. माझा विवाह कोणाबरोबर करावयाचा हें त्याच्या स्वाधीन आहे. त्यानें सांगितल्यास मी तुजबरोबर विवाह करीन.' नंतर सुवर्ण राजानें एका पायावर उभें राहून, हात वर करून बारा दिवसपर्यंत सूर्यमंत्राचा जप केला. वसिष्ठ त्या राजाचे कुलगुरु होते. राजाच्या तपश्चर्येचें वर्तमान ऐकतांच ते तेथें आले व त्यांनीं सूर्याची प्रार्थना केली. त्यावेळीं सूर्यानें प्रसन्न होऊन तपतीला सुवर्ण राजाबरोबर विवाह करण्यास आज्ञा दिली. मग वसिष्ठ ऋषींनीं सुमुहूर्त पाहून तपतीचा सुवर्ण राजाबरोबर विवाह केला. सुवर्णराजाला तपतीपासून कुरु या नांवाचा अत्यंत पराक्रमी पुत्र झाला. या कुरु राजापासून पुढें जो वंश वाढला त्या सर्वांनां कौरव म्हणजे कुरुवंशोत्पन्न असें नांव मिळालें. दुर्योधनादि त्याच वंशांतले असल्यामुळें त्यांनां कौरव असें म्हणत. धर्मादिही त्यांतील असतां त्यांस 'पांडव' या विशेष नामानें संबोधूं लागले. पांडव याचा अर्थ मागें गेला आहे.

---

# अध्याय १३ वा.

## १. शकुंतला आख्यान.

जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; वैशंपायन ऋषि; कुरू वंशांत उत्पन्न झालेल्यांना कौरव म्हणतात तें बरोबर आहे; परंतु याच वंशांतील लोकांना भारत असें कां म्हणतात; याचें कारण आपण कृपा करून मला सांगावें. जनमेजय राजाची ती इच्छा जाणून वैशंपायनऋषि म्हणाले; राजा जनमेजया, कुरूच्या पूर्वी भरत नांवाचा एक प्रसिद्ध राजा होऊन गेला. त्या भरताचे ते वंशज म्हणून त्यांना भारत असें म्हणतात. या भरताची कथा अशी आहे कीं, पूर्वी विश्वामित्र नांवाचा एक ऋषी होता. त्याचे तपसामर्थ्य कांहीं विलक्षण होतें. दुसरी सृष्टि निर्माण करण्याची त्याच्या अंगीं शक्ति होती. तो अत्यंत दृढ निश्चयी व तेजस्वी होता. तो तपश्चर्येला बसला असतां सर्व देव थरथर कांपत असत. असा तो विश्वामित्र ऋषि हिमालय पर्वतावर तपश्चर्या करूं लागला असतां इंद्राला अत्यंत भीति वाटूं लागली. विश्वामित्राचें हें तपसामर्थ्य असेंच

वाढूं दिल्यास संपूर्ण त्रिभुवन जाळून टाकण्यास तो समर्थ होईल, असा त्याला धाक पडला. त्यानें विश्वामित्राच्या तपाला विघ्न करण्याचा विचार केला, व मेनका नांवाच्या अप्सरेला बोलावून आणून आपला हेतू कळविला. मदन व वसंत यांना मदतीसाठीं देऊन मेनकेला त्यानें हिमालयपर्वतावर पाठवून दिलें. ते तिघे पर्वतावर येऊन पोंचल्यावर वसंतानें पुढें होऊन, विश्वामित्र ज्या अरण्यांत तपश्चर्या करीत बसला होता, तें अरण्य शृंगारण्यास आरंभ केला. थोड्याच वेळांत त्यानें त्या अरण्याला एखाद्या विलासी राजाच्या उपवनाप्रमाणें करून सोडिलें. नानातऱ्हेचीं फुलझाडें फुलांनीं लवून गेलीं, लतांची शोभा मनोहर दिसूं लागली, वृक्षांवर मधुर फळांचे घोंस लटकूं लागले, सुगंधयुक्त मंद वायू वाहूं लागला, भ्रमरांचा गुंजारव सुरू झाला, कोकिळा पंचमस्वरानें गाऊं लागल्या, व मयूर आपले मनोहर पिसारे उभारून नाचूं लागले. याप्रमाणें विलक्षण स्थित्यंतर होऊन त्या अरण्याचें उपवन तयार झालें. विश्वामित्रऋषि ह्या वेळपर्यंत निश्चित मनानें तप करीत होते, परंतु ती अनुपम वनश्री अवलोकन करून त्यांचें मन अस्थिर झालें. इकडेतिकडे पाहतात तों तेथें मेनका त्यांचे दृष्टीस पडली. मेनकेचें तें अपूर्व सौंदर्य, आणि पूर्ण शृंगारयुक्त हावभाव पाहून विश्वामित्रऋषि सर्व आश्रमधर्म विसरून गेले, व मेनकेकडे अनिमिषनयनानें एकसारखे पाहूं लागले. इतक्यांत जोराचा वारा आला, व त्याबरोबर मेनकेनें परिधान केलेलें वस्त्र उडालें. तेव्हां मेनकेचें सर्व शरीर विश्वामित्राच्या दृष्टीस पडलें. तिचें ते अनुपम सौंदर्य पाहून विश्वामित्रऋषि कामातुर होऊन आपल्या आसनावरून उठले, व मेनकेचा हात धरून तिला म्हणाले; हे स्वर्गसुंदरी, तुझें हृ अपूर्व सौंदर्य पाहून मी कामविव्हल झालों आहें, तर माझी इच्छा पूर्ण कर. मेनकाही तेवढ्यासाठींच मुद्दाम आली होती. तिनें आढेवेढे न घेतां विश्वामित्राची विनंति लगेच मान्य केली. सोळा वर्षेंपर्यंत मेनका विश्वामित्राजवळ होती. तितक्या अवधींत तिनें विश्वामित्राचें सर्व तपसामर्थ्य मातींत मिळवून दिलें. मेनकेच्या आधीन झाल्यावर तिच्या प्रसन्नतेसाठीं विश्वामित्राच्या हातून अनेक अनाचार होऊं लागले व त्यामुळें विश्वामित्राचें सर्व पुण्य नष्ट होऊन शिरावर पापाचें ओझें मात्र झालें. याप्रमाणें विश्वामित्राला भ्रष्ट केल्यावर, वारवनिता दरिद्री यजमानाला जशी सोडून देते, किंवा मूल जसें दूध नसलेला स्तन तोंडांत धरीत नाहीं, त्याप्रमाणें मेनका विश्वामित्राचा त्याग करून स्वर्गांत निघून गेली. मेनका स्वर्गांत जाण्याचे वेळीं गरोदर होती. मृत्युलोकींचा गर्भ स्वर्गांत नेणें बरोबर नाहीं असा विचार करून तिनें उदरांतील गर्भ हिमालयावर टाकून दिला, व नंतर स्वर्गांत गमन केलें. तेथें पक्ष्यांनीं कमलांतील मकरंद आणून त्या गर्भाचें संरक्षण केलें. ती मुलगी होती; पुढें कांहीं कारणासाठीं कण्वऋषि तेथें आले, आणि त्या मुलीला अरण्यांत एकटी पडलेली पाहून सदय अंतः-

करणानें त्यांनीं तें मूल उचलून घेतलें, व त्यास त्यांनीं आपल्या आश्रमात आणिलें. पक्ष्यांनीं तिचें संरक्षण केलें म्हणून त्या मुलीचें नांव शकुंतला असें ठेविलें, व पोटच्या मुलीप्रमाणें तिचें संगोपन करून त्यांनीं तिला लहानाची मोठी केली. शकुंतला जसजशी वाढत चालली, तसतसें तिचें सौंदर्यही वाढूं लागलें. तिचे सर्व अवयव रेखल्यासारखे होते, त्यामुळें ती फारच सुंदर दिसत होती. तारुण्य प्राप्त झाल्यामुळें तर ती अप्सरेपेक्षांही सुंदर दिसूं लागली. ती मेनकेसारख्या स्वर्गसुंदरीची मुलगी होती, तेव्हां ती अप्सरेपेक्षांही सुंदर दिसावी, यांत मोठेंसें नवल तें काय ? असो.

शकुंतलेला तारुण्यावस्था प्राप्त झाली असतां एके दिवशीं दुष्यंतराजा शिकार करीत त्या कवण्ऋषीच्या आश्रमांत आला. त्यावेळीं कण्वऋषि आश्रमांत नसून स्नानासाठीं गंगेवर गेले होते, व शकुंतला झाडांना पाणी घालीत होती. तिचें मनोहर सौंदर्य पाहून दुष्यंतराजा थक्क झाला. तिला पाहतांच तो घोड्यावरून खालीं उतरला व एका झाडाला घोडा बांधून तो आश्रमाजवळ आला. जवळ येऊन शकुंतलेस निरखून पाहिल्यावर तर राजाची अवस्था चमत्कारिक झाली. तो अत्यंत कामपीडित झाला, व आपली इच्छा पूर्ण करण्याविषयीं तिची विनवणी करूं लागला. तेव्हां शकुंतला म्हणाली, ‘ माझा पिता कण्वऋषी आहे. माझा विवाह कोणाबरोबर करावयाचा, हें त्याच्या मर्जीवर अवलंबून आहे. त्याच्या अनुमति शिवाय मला तुम्हाबरोबर विवाह करितां येणार नाहीं.’ शकुंतलेचें भाषण ऐकून दुष्यंतराजा म्हणाला, ‘ हे चारुगात्री, तूं म्हणतेस तें खरें, पण कण्वऋषीच्या अनुमोदनावांचून जरी तूं माझा स्वीकार केलास, तरी कण्वऋषी यासंबंधानें तुजवर रागवणार नाहींत. मी दुष्यंतराजा असून ते मला चांगले ओळखतात. मी राजा असून तुझी मनधरणी करीत आहें, इकडे लक्ष दे.’ शकुंतला म्हणाली, ‘राजा, माझ्या पुत्रास जर तूं राज्यावर बसवशील तर मी तुजबरोबर गांधर्वपद्धतीनें विवाह करीन.’ राजानें त्या अटीप्रमाणें वागण्याचें कबूल करून तिजबरोबर गांधर्वविधीनें लग्न केलें. व नंतर राजा तिचा निरोप घेऊन आपल्या राजधानीस परत गेला.

राजा गेल्यानंतर थोड्या वेळानें कण्वऋषि स्नान करून आश्रमांत परत आले. सहजगत्या त्यांची दृष्टी शकुंतलेकडे गेली तों तिचें लाजणें, वरचेवर पदर सांवरणें, वगैरे चिन्हें पाहून तिचा कोणातरी पुरुषाबरोबर संबंध घडला असावा, असें त्यास वाटलें. नंतर कण्वऋषीनें शकुंतलेला त्यासंबंधानें युक्तीनें विचारिलें; तेव्हां तिनें घडलेली सर्व हकीकत त्यांस सांगितली. ती ऐकून कण्वऋषीला फार संतोष झाला. कारण दुष्यंत राजा हा क्षत्रियकुलावंतस असून शूर, शांत, विचारी, सुशील व सुंदर असा होता. अशा प्रसिद्ध राजाबरोबर शकुंतलेचा विवाह झाल्यानें, ऋषीला आपल्या श्रमाचें व संगोपनाचें

सार्थक झालें असें वाटलें. शकुंतला, राजाच्या समागमानें गरोदर राहिली व नवमास पूर्ण झाल्यावर प्रसूत झाली. तिला सुंदर पुत्र झाला. पुत्रप्राप्तीनें शकुंतलेला व कण्वादि सर्व आश्रमवासीयांना फार आनंद झाला. कण्वानें मुलाची जन्मवेळ पाहून जातक वर्तविलें, तेव्हां तो मुलगा सर्व जगांत अलौकिक होईल असें त्यांना दिसून आलें. नंतर 'हा मुलगा सर्व राजांना जिंकून जगावर आपली सत्ता गाजवील, व सर्व राजांत श्रेष्ठ होईल.' असें कण्वानीं शकुंतलेस सांगितलें. इतक्यांत आकाशवाणी झाली कीं, 'हा मुलगा एकछत्री राज्य करील, ऋषी-लोक पुराणांत याची कीर्ति गातील; हा अत्यंत शक्तिशाली होईल, व साहव्या वर्षींच वाघ, सिंह, वगैरे हिंस्र पशूंना बांधून आणील.' ती आकाशवाणी ऐकून सर्वांना शकुंतलेच्या मुलाविषयीं अत्यादर वाटूं लागला. कण्वानें त्या मुलाचें नांव सर्वदमन असें ठेविलें. तो मुलगा जसजसा मोठा होऊं लागला, तसतसा त्याचे पराक्रम सर्वांच्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागून तो सर्वांना अत्यंत प्रिय झाला. तो आठ वर्षांचा झाला नाहीं तोंच अचूक शरसंधान करूं लागला, वाघाचा घोडा करून त्यावर स्वार होऊं लागला, हत्तीच्या शुंडा धरून लीलेनें त्यांस खेळवूं लागला. मुलाचे ते खेळ पाहून सर्वांना मोठें कौतुक वाटूं लागलें. मग कण्व-ऋषीनें शकुंतला व सर्वदमन यांना दुष्यंतराजाकडे पाठवून देण्याचा विचार करून, त्यांस आपल्या शिष्यांबरोबर राजाकडे रवाना केलें.

शकुंतला कण्वऋषीची आज्ञा घेऊन निघाली ती पुत्रासह हस्तिनापुरास येऊन दाखल झाली. बरोबर आलेल्या शिष्यांनीं दुष्यंतराजाला कण्वऋषीचा निरोप सांगून आपली स्त्री व पुत्र सांभाळण्यास सांगितलें. त्या वेळीं दुष्यंत-राजाला पूर्वगोष्टीची विस्मृति झाली असल्यामुळें तो आश्चर्य दाखवून शिष्यांना म्हणाला, 'अहो, तुम्हीं असत्य भाषण करीत आहां. या स्त्रीचा व माझा कोण-त्याही प्रकारचा संबंध नाहीं; तसेंच हा पुत्रही माझा नाहीं; तेव्हां मी दुसऱ्याच्या स्त्रीचा स्वीकार करून पाप कसें जोडूं !'

दुष्यंतराजाचें तें असत्यभाषण ऐकून शकुंतलेला फार राग आला. ती रागानें राजाला म्हणाली, 'राजा, तूं शिकार करीत कण्वाच्या आश्रमांत आला असतां तेथें मजबरोबर विवाह करून 'तुझ्या पुत्राला राज्यावर बसवीन' म्हणून मला जें वचन दिलेंस तें सर्व विसरलास काय ? राजा, असत्य बोलणें हें मोठें पाप आहे; जो असत्य भाषण करतो, जो वचनभंग करतो, जो विश्वासघात करतो, त्याला निश्चयानें नरकाची प्राप्ती होते; त्याला केव्हांही जय मिळत नाहीं.' याप्रमाणें शकुंतलेनें पुष्कळ रीतीनें बोलून दुष्यंतराजाला पूर्वाचरणाची स्मृति देण्याचा प्रयत्न केला, परंतु त्याच्या मनावर तिच्या बोलण्याचा यत्किंचितही परिणाम झाला नाहीं. त्याला पूर्व गोष्टीची मुळींच स्मृति होईना. राजाचा तो विश्वास-घातकपणा पाहून शकुंतलेला फार वाईट वाटलें. ती राजाला आश्रमांतील अनेक

गोष्टी सांगून पुन्हा पुन्हा स्मृति देऊं लागली, परंतु राजाला ती गोष्ट मुळींच खरी वाटेना, व आपला संबंध असल्याचेंही कबूल करीना. तो म्हणाला. 'तूं अगदीं असत्य बोलत आहेस. जर या गोष्टीस कोणी साक्षिदार असतील तर त्यांना बोलावून आण; म्हणजे मी खरें मानीन.' शकुंतला म्हणाली; राजा, तूं हें अगदीं अनुचित भाषण करीत आहेस. भलत्याच प्रसंगीं कोठें साक्षिदार असतात ? तथापि तुला सत्याची जर कांहीं चाड असेल, पंचमहाभूतांना जर तूं पूज्य मानीत असशील, तर त्यांचे देखत आपला विवाह झाला आहे.' शकुंतलेचें भाषण ऐकून दुष्यंतराजा म्हाला, 'या साक्षीदारांना मी कबूल करीत नाहीं. ते जर प्रत्यक्ष, खरा प्रकार काय आहे हें सांगतील, तर मी तुझें म्हणणें खरें मानीन, व तुझा स्वीकार करीन.' तेव्हां शकुंतला पंचमहाभूतांची प्रार्थना करून म्हणाली, 'हे पंचमहाभूतांनों, मनुष्याच्या चांगल्या वाईट वर्तनाचे साक्षी तुम्ही आहांत. जर आम्हा दोघांचा झालेला विवाह सत्य असून मी ह्या राजाची धर्मपत्नी व हा या राजाचा जर खरा मुलगा असेल, तर आपण त्याप्रमाणें सांगून राजाचा संशय दूर करा, व त्याची खातरी करून द्या.' याप्रमाणें शकुंतलेनें प्रार्थना करतांच मोठ्यानें आकाशवाणी झाली; कीं, 'हे दुष्यंतराजा, ही शकुंतला तुझीच स्त्री असून हा सर्वदमनही तुझाच पुत्र आहे.' आकाशवाणी ऐकिल्याबरोबर दुष्यंतराजानें सिंहासनावरून उठून, शकुंतलेचा स्वीकार केला व पुत्राला हृदयाशीं कुरवाळून धरिलें. नंतर राजा शकुंतलेला म्हणाला, 'तूं माझीच स्त्री आहेस. परंतु लोकांना संशय घेण्यास जागा राहूं नये म्हणून, मी अशा रीतीनें त्यांची खात्री करून दिली.' मग दुष्यंतराजानें त्या मुलाचें नांव भरत असें ठेवून हस्तिनापुरांत सर्वत्र मोठा उत्सव केला. पुढें तो भरतराजा विजयी होऊन सर्वत्र प्रसिद्ध झाला. त्या भरतराजापासून पुढें जो वंश वाढला त्या सर्वांना भारत असें म्हणूं लागले.

## २. अर्जुनाचें तीर्थपर्यटण.

नारदानें पांडवांना नियम घालून दिल्याप्रमाणें त्यांचा क्रम चालला होता. एके दिवशीं रात्रीं, 'चोरांनीं गायी पळविल्या, धांवा धांवा' असें मोठ्यानें ओरडत एक ब्राह्मण राजवाड्यापुढें आला. ब्राह्मणाचें ओरडणें ऐकून अर्जुन झोपेंतून जागा झाला; व ब्राह्मणाच्या गायी सोडवून चोरांस शिक्षा करण्याकरितां शस्त्रें घेण्यासाठीं शस्त्रागारांत गेला. तेथें धर्म व द्रौपदी एका शय्येवर निजलेली त्याच्या दृष्टीस पडली. अर्जुनानें शस्त्रें घेऊन चोरांचें पारिपत्य केलें व ब्राह्मणांनां त्यांच्या गाई आणून दिल्या. परंतु धर्म व द्रौपदीला एकांतांत पाहिल्यामुळें त्याला फार अनुताप वाटूं लागला. तो धर्माला नमस्कार करून म्हणाला, 'धर्मा, आज मजकडून मोठा प्रमाद झाला. शस्त्रें घेण्यासाठीं शस्त्रागारांत आलों असतां, तुम्हां उभयतांना एका शय्येवर मीं अवलोकन

केलें. तेव्हां नियमभंग झाल्यामुळें नारदानें सांगितल्याप्रमाणें मी तीर्थयात्रेला जातों. आपली आज्ञा असावी.' तेव्हां धर्म म्हणाले, अर्जुना, झालेल्या प्रकाराबद्दल खेद मानण्याचें कांहीं कारण नाहीं. मी तुझा वडील बंधू असून तुला पित्याप्रमाणें आहे. तेव्हां पित्याच्या एकांतांत मुलानें येणें मोठेंसें दोषास्पद आहे असें नाहीं. असें धर्मानें सांगितल्यावर अर्जुन म्हणाला, एकदां नियमाचें उल्लंघन झाल्यास अन्यप्रसंगींही तसें होण्याचा संभव असतो. शिवाय ऋषीच्या आज्ञेचा भंग होतो. म्हणून नियमाप्रमाणें अपराधाचें प्रायश्चित हें भोगलें पाहिजेच. असें म्हणून अर्जुनानें कुंती, धर्म, व भीम यांना नमस्कार केला, व सर्वांचा निरोप घेऊन तो बारा वर्षेपर्यंत तीर्थयात्रा करण्यासाठीं निघून गेला.

अर्जुन तीर्थयात्रेसाठीं घराच्या बाहेर पडल्यावर प्रथम हरिद्वारास गेला. तेथें यथासांग यात्रा केल्यावर तेथें कौरव नांवाचा एक ऐरावत सर्पाचा पुत्र राहत होता, त्यांची व अर्जुनाची भेट झाली. त्या कौरवाला उलूपी नांवाची उपवर झालेली एक सुंदर मुलगी होती. अर्जुनास पाहतांच हा आपणास पति मिळावा अशी तिला इच्छा उत्पन्न झाली. एके दिवशीं अर्जुन गंगेंत स्नान करून वर आल्यावर ती त्याचा हात धरून म्हणाली, पार्था, माझी पुष्कळ दिवसांची मनोवांच्छा आज पूर्ण झाली. तूं पति मिळावास म्हणून मी तुझी मार्गप्रतिक्षा करीत होतें. आज तुझी भेट झाली हें माझें महद्भाग्य होय. तर तूं आतां माझा स्वीकार कर. तेव्हां पार्थ म्हणाला; 'हे सुंदरी, मी हल्लीं ब्रह्मचर्यव्रत धारण केलें असून बारा वर्षेपर्यंत तीर्थयात्रा करण्यांत मला आपला काळ कंठावयाचा आहे.' असें म्हणून त्यानें आपली सर्व हकीकत कळविली व अशा स्थितींत मला तुझा स्वीकार करितां येणार नाहीं, असें सांगितलें. अर्जुनाचें भाषण ऐकून उलूपी म्हणाली; 'तूं म्हणतोस तें खरें, परंतु नारदाचा नियम द्रौपदी विषयीं आहे, दुसऱ्या स्त्रीबरोबर विवाह करण्यासंबंधानें प्रतिबंध त्यांत मुळीच नाहीं,' अशाप्रकारें समजूत घालून तिनें अर्जुनाची अनुमती मिळविली. मग त्या दोघांचा तेथें थाटानें विवाह झाला. ती उलूपी फार विलासी होती. तिनें पार्थाला आपल्या मंदीरांत बरेच दिवस ठेवून घेऊन नंतर पुढें जाण्याची परवागी दिली.

अर्जुन हरिद्वाराहून निघून हिमालयपर्वतावर गेला. तेथें ऋषींचीं दर्शनें घेतल्या नंतर तेथून तो कुंतलदेशीं गेला. तेथें तीर्थांत स्नान करून मग तो गंगासागरीं गेला. तेथून फिरत फिरत तो मणिपुरास आला. त्या वेळीं मणिपूर हें शहर पाहण्यासारखें होतें. तेथें मित्रवाहन नांवाचा एक सूर्यवंशी राजा राज्य करीत होता. त्या राजाला चित्रांगी या नांवाची सर्वांग सुंदर अशी उपवर झालेली एक मुलगी होती. ती राजकन्या आपल्या राजवाड्यांतील खिडकींत उभी राहून शहराची शोभा पहात होती; त्याचवेळीं राजवाड्यावरील मार्गानें अर्जुन जात

असतां तिची व अर्जुनाची नजरानजर झाली. त्या राजकन्येचें अपूर्व सौंदर्य पाहून अर्जुन अगदीं मुग्ध होऊन गेला. आपण आजवर अनेक स्त्रिया अवलोकन केल्या, परंतु अशी लावण्यलतिका आपल्या दृष्टीस पडली नाहीं, असें त्याला वाटूं लागलें. शक्य तितका प्रयत्न करून ही सुंदर स्त्री आपण मिळवावी अशी त्याला इच्छा उत्पन्न झाली, व आपण प्रवासांत भिक्षेकरीच आहोंत; तेव्हां राजाजवळ ह्या मुलीची भिक्षा मागावी म्हणजे झालें; असा विचार करून अर्जुन राजवाड्यांत आला. राजानें कोणी तीर्थवासी अतीत भिक्षेसाठीं आला आहे असें जाणून अर्जुनाचा फार गौरव केला, व त्यास आसनावर बसवून काय इच्छा आहे, म्हणून प्रश्न केला. तेव्हां अर्जुन म्हणाला, 'राजा, मी तीर्थयात्रा करणारा असून तुजकडे तुझ्या कन्येची भिक्षा मागण्यासाठीं आलों आहें. मला आपली मुलगी तूं अर्पण करून माझा मनोरथ पूर्ण कर.' पार्थाचें हें भाषण ऐकून चित्रवाहनराजा म्हणाला, 'मी पुत्राच्या इच्छेनें पुष्कळ दिवस शंकराची सेवा करीत असतां, शंकरानीं प्रसन्न होऊन पुत्र होण्याचे माझ्या नशीबीं नसल्यामुळें ही मुलगी मला दिली. नंतर मीं असें ठरविलें कीं, 'या कन्येपासून होणारा पहिला मुलगा जो मला देईल, त्यालाच ही चित्रांगी द्यावयाची.' माझें हें म्हणणें तुला कबूल असल्यास मी चित्रांगीबरोबर तुझा विवाह करण्यास तयार आहे.' तेव्हां अर्जुनानें चित्रवाहनराजाचें म्हणणें मान्य केलें. मग राजानें अर्जुन व चित्रांगी यांचा मोठ्या समारंभानें विवाह केला. पुढें अर्जुन श्वशुराचे घरीं तीन वर्षेपर्यंत होता. चित्रांगीला अर्जुनापासून बभ्रुवाहन नांवाचा मुलगा झाला. तो अर्जुनानें चित्रवाहनराजाला अर्पण करून आपण तीर्थयात्रेसाठीं तेथून दक्षिणेंत निघून गेला.

अर्जुन दक्षिणेंत फिरत फिरत व ठिकठिकाणचीं तीर्थें करीत पंचतीर्थांजवळ येऊन पोंचला. तो प्रदेश अगदीं ओसाड पडला होता. त्यामुळें त्या पवित्र तीर्थांची शोभा नाहींशी होऊन गेली होती. तो भयाण प्रदेश पाहून अर्जुनाला फार आश्चर्य वाटलें, व असें होण्याचें कारण समजून घेण्याची त्यास जिज्ञासा उत्पन्न झाली. इतक्यांत एका ब्राह्मणाची व अर्जुनाची गांठ पडली. तेव्हां अर्जुन त्यास म्हणाला, 'महाराज हीं पंचमहातीर्थें अशीं जनशून्य कां दिसतात? असें होण्याचें कारण काय? हें ऐकण्याची माझी इच्छा आहे, तर आपण कृपा करून ती हकीकत मला सांगावी.' तें ऐकून ब्राह्मण म्हणाला, 'अर्जुना, या प्रत्येक तीर्थांत भयंकर जलचरें आहेत, तीं या तीर्थांत स्नानाला येणाऱ्या प्राण्यांचा नाश करतात; म्हणून हीं तीर्थें अशीं जनशून्य झालीं आहेत.' त्या ब्राह्मणानें सांगितलेली हकीकत ऐकून अर्जुनास त्या दुष्ट जलचरांचा नाश करण्याची इच्छा उत्पन्न झाली. मग अर्जुनानें आपला पोषाग तेथें काढून ठेवून स्नान करण्यासाठीं तो त्या पंचतीर्थांत उतरला. इतक्यांत ब्राह्मणानें

सांगितल्याप्रमाणें जलचरांनीं त्याच्या अंगावर धांवून येऊन दोन्ही पायांस मगरमिठी मारिली. तेव्हा त्यानें जोरानें आपले पाय झाडले. अर्जुनाच्या शरीराचा स्पर्श होण्याबरोबर तीं जलचरें नाहींशीं होऊन तेथें पांच सुंदर स्त्रिया उत्पन्न झाल्या. त्या स्त्रियांनां पाहून अर्जुन म्हणाला; 'हे स्त्रियांनों, तुम्हीं कोण आहांत ? व तुम्हांस असें जलचर स्वरूप कशानें प्राप्त झालें ?' तेव्हां त्या स्त्रिया म्हणाल्या, 'हे अर्जुना, आम्ही पांचही जणी कुबेराच्या घरच्या अप्सरा आहोंत. आम्हीं ऋषींच्या तपश्चर्येस विघ्न केलें, म्हणून त्यांनीं क्रुद्ध होऊन, तुम्हीं जलचरें व्हाल, असा आम्हांस शाप दिला. ऋषींचें शापवचन ऐकून आम्हीं अत्यंत भयभीत झालों, व ऋषींस नमस्कार करून उःशाप मागूं लागलों. तेव्हां ऋषींनीं शांत होऊन आम्हाला असा उःशाप दिला कीं, 'पार्थाच्या शरीरस्पर्शानें तुम्हीं शापापासून मुक्त व्हाल.' त्याप्रमाणें आज आम्हीं तुझ्या शरीरस्पर्शानें शापापासून मुक्त झालों. असें सांगून अप्सरा तेथून निघून गेल्या. पुढें अर्जुनही तीर्थयात्रा करीत करीत द्वारकेस येऊन पोंचला.

## ३. सुभद्राहरण.

अर्जुन द्वारकेस आल्यावर त्याची व श्रीकृष्णाची भेट झाली. अर्जुनाचा तो प्रवासी वेष पाहून श्रीकृष्णानीं त्याला प्रवासाचें कारण विचारिलें. तेव्हां अजुनानें धर्म व द्रौपदी यांनां एका शय्येवर पाहिल्याचा सर्व वृत्तांत सांगून, त्या पापक्षालनासाठीं आपण बारा वर्षें तीर्थयात्रा करीत फिरत आहों. असें सांगितलें. नारदानें सांगितल्याप्रमाणें अर्जुनाची तीर्थयात्रा पुरी झाली असल्यामुळें श्रीकृष्णानीं त्यास दोन दिवस आपले घरीं ठेवून घेतलें. अर्जुन तेथें असतां, कृष्णानीं त्यास 'तूं कोणकोणतीं तीर्थें पाहिलींस' म्हणून विचारिलें. तेव्हां अर्जुन सागूं लागला. तो म्हणाला, मी प्रथम हरिद्वारास गेलों. तेथें भगीरथ राजाच्या प्रयत्नानें आलेल्या भागीरथींत स्नान केलें. ही भागीरथी पुढें वाऱ्यामुळें व पर्वतश्रेणींमुळें सप्तभाग होऊन सात ओघांनीं वाहात गेली आहे. त्यांत हरिदिनि, नंदिनी, सुचक्षा व पावनी हे चार ओघ पश्चिम दिशेनें वाहात गेले आहेत. आणि सीता, सिंधु व भागीरथी हे तीन ओघ पूर्व दिशेनें वाहात गेले आहेत. या सातही पवित्र नद्यांत मीं स्नानें केलीं. नंतर बद्रिकेदारास गेलों. तेथून कामाक्षी, कांतीदुळ, वैश्वानर, माहुर, मातुलिंग, प्रथमकाळेश्वर, आणि गंगासागर, ह्या यात्रा केल्या. मग हिंगुळा, आसापुरी, नेपाळ, जगन्नाथपुरी, पंढरी, त्रिमल्ल, रंगनाथ, मल्लिकार्जुन, व हिमशैल वगैरे ठिकाणीं गेलों. तेथून पंपातीर्थ, मथुरा, रामेश्वर, जंगुकेश्वर, शुक्रतीर्थ, गोदासागर, गोसमाधी, गोकर्ण, कन्याकुमारी, काळस्त्री, ब्रह्मगिरी, पुण्यतीर्थ गोदावरी, कृष्णासागरसंगम, प्रयाग, काशी, कामरू, अंबुसरोवर, लोणारु, रेणुका, चित्रकूट, वेदपुर, कालिका, कऱ्हाड, काळहस्ती, चंडिका, आदिअंबिका, गोरक्षी, हटडी, वेरुळ, येळराजकांती, गया, नर्मदा,

यमुना, भीमा, तपती, हंपिनिरुपाक्ष, नैमिषारण्य, महाभद्रकाळी, प्रसिद्ध, सिंधु-मति, रामघाट, त्र्यंबक, कोरेश्वर, चंद्रगौतमी, सिद्ध मुरुडेश्वर, कार्तिकस्वामी, ज्वालामुखी रुदंमेश्वर, जयनारसिंह, धूळखेट, मलया, स्तरणेश्वर, वाई, पुष्कर, महाबळेश्वर, सिद्धवंशकर, नारायण, पामेश्वर, निवृतिसंगम, नाशिक, प्राची भास्कर, नारसिंहपर्वत, जटाशंकर, सिद्धपूर, वासरसरस्वती, चंपकारण्य, गंडिका, तुळजारामेश्वर, नागपाठण, पीटपुर, सिद्धेश्वर, त्रिचनापल्ली, खांडेपा-खाळ, लक्ष्मणेश्वर, शिवकांची, विष्णुकांची, गुप्तप्रयाग, कुरुक्षेत्र, अंबुवन, काश्मीर, क्षिप्रा, चंडिकेदार, बिल्वेश्वर, वैतरणी, सुरनदी, शंखोद्धारस्था, मूळ-माधव, कनकेश्वर, पंचतीर्थ, जयंती, गोमती, धारेश्वर, जुनागड, वेदवती, गौत-मेश्वर, तुंगभद्रा, कावेरी, भुलेश्वर, ताम्रपर्णी, कोल्हापूर, गोरक्षीपूर, राजमहेंद्री, लंका, चांगदेव, कुवचेश्वर, मल्लारी म्हाळसा, गुप्तकेदार, चोर भगवती, मलबार, कालिकोट, गोमती, सर्वोद्धार, धर्मपुर, द्वारावती, जागेश्वरी, कलंकेश्वरी, व विराट देवी. याप्रमाणें सर्व तीर्थांत स्नानें करीत व देवांचीं दर्शनें घेत तुझ्या दर्शना-साठीं आलों आहें. हे श्रीकृष्णा, तुझ्या चरणाचे ठिकाणीं सर्व तीर्थें व सर्व देव राहात आहेत, तेव्हां या तुझ्या चरणस्पर्शानें मी पुनीत झालों आहें; व तुझ्या या प्रेमळ अवलोकनानें माझा सर्व पापमल नाहींसा होऊन गेला आहे.

यावेळीं श्रीकृष्णाची बहीण सुभद्रा उपवर झाल्यामुळें तिच्या विवाहाची चर्चा द्वारकेंत राजवाड्यांत चालत होती. श्रीकृष्णाचे मनांत सुभद्रा अर्जुनाला द्यावी असें पूर्वींपासून होतें, परंतु बळरामाचे मनांतून ती दुर्योधनाला द्यावयाची होती. अशा परिस्थितींत अर्जून हा तेथें असतां, त्याची व सुभद्रेची गांठ पडली. सुभद्रेचें अनुपम सौंदर्य पाहून अर्जुनाची चलबिचल उडाली; तिच्या लावण्यानें तो अगदीं मुग्ध होऊन गेला. सुभद्रेची स्थितीही अजुर्नाप्रमाणेंच झाली होती. अर्जुनास पाहिल्यापासून तिच्या अंतःकरणांत त्याची मूर्ति प्रस्थापित झाली होती. तिला आपला विवाह अर्जुनाबरोबरच व्हावा, असें वाटूं लागलें. नंतर त्या दोघांनींही कृष्णाला एकांतीं गांठून आपआपल्या मनाची स्थिति सांगितली. तेव्हां श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले, 'अर्जुना, तूं विवाहाचे भानगडींत पडण्यापेक्षां सुभद्रेला पळवून घेऊन जा.' तसेंच ते सुभद्रेला म्हणाले, 'सुभद्रे, अर्जुन तुला पति मिळावा अशी जर तुझी इच्छा असेल, तर तो तुला घेऊन जाऊं लागला असतां, त्याच्याबरोबर तूं पळून जा.' कृष्णाची सल्ला सुभद्रेलाही पसंत पडली. आपण असें कृत्य केल्यास आपणावर कदाचित धर्माचा राग होईल, म्हणून अर्जुनानें एक पत्र पाठवून धर्माला सुभद्रेविषयींची सर्व हकीगत कळविली. तेव्हां धर्मानें अर्जुनाला पत्रोत्तरानें असें कळविलें कीं, 'हा योग जुळत असल्यास अवश्य जुळवून आणावा; म्हणजे, श्रीकृष्णाचा व आपला संबंध अधिक दृढ होऊन आपणास

त्याची कृपा संपादिता येईल.' याप्रमाणें धर्माची अनुमति मिळाल्यावर अर्जुन सुभद्रेचें हरण करण्याची संधी पहात बसला.

बलरामानें दुर्योधनाबरोबर सुभद्रेचा विवाह करण्याचें नक्की ठरवून लग्नतिथीही कायम केली होती. लग्नसमारंभासाठीं मांडव वगैरे घालून सर्व द्वारकानगरी शृंगारून काढली होती. दुर्योधनाला व दुसऱ्या राजेरजवाड्यांना आमंत्रण-चिठ्या पाठवून बोलावून आणिलें होतें. याप्रमाणें लग्नाची पूर्ण तयारी झाली होती. लग्नाचे आधीं एक दिवस कृष्ण बलरामाला म्हणाला, 'दादा, सुभद्रेनें असा नवस केला आहे कीं, लग्नापूर्वी रैवतक पर्वतावर जाऊन गौरीहराचें दर्शन घ्यावयाचें. त्याप्रमाणें तिला रैवतक पर्वतावर पाठविण्याची तयारी करावी.' बलरामानें ती गोष्ट मोठ्या आनंदानें मान्य केली व सुभद्रेला रैवतक पर्वतावर पाठवून दिलें. कृष्णानें आपला रथ अर्जुनाला देऊन त्यास अगोदरच पर्वताच्या मार्गावर उभें राहण्यास सांगितलें होतें. सुभद्रा गौरीहराचें दर्शन करून परत येत असतां, त्यानें तिला आपले रथांत बसविलें, व शक्रप्रस्थाच्या मार्गानें वेगानें रथ चालविला. तें वर्तमान एका दूतानें धांवत जाऊन बलरामाचे कानावर घातलें. तो दूत बलरामाला म्हणाला, 'महाराज, घात झाला! आम्हीं पर्वताहून परत येत असतां वाटेंत एका संन्याशानें सुभद्रेला रथांत बसून पळून नेलें.' दूतांच्या तोंडचा तो मजकूर ऐकून बलराम सिंहाप्रमाणें खवळला, व आपलें सैन्य घेऊन अर्जुनाचा पाठलाग करूं लागला. आपणास धरण्यासाठीं बलराम ससैन्य येत आहे, असें पाहून अर्जुनानें आपला रथ मागें परतविला, आणि बलरामाबरोबर त्यानें युद्ध सुरू केलें. यादववीर असंख्य होते व अर्जुन एकटा होता; तरी त्यानें आपल्या विलक्षण धनुर्युद्धानें सर्वांना थक्क करून टाकिलें. तो भयंकर युद्धप्रसंग पाहून सुभद्रा भीतीनें काळवंडून गेली. अर्जुनाचा पराभव झाल्यास तेंही वाईट; व बलरामदादाचा पराभव झाल्यास तेंही वाईट, असें तिला वाटूं लागलें. अशा प्रसंगीं श्रीकृष्णावांचून हा तंटा तोडण्यास कोणी समर्थ नाहीं, असें जाणून तिनें श्रीकृष्णाचा धांवा सुरू केला. सुभद्रेची परिस्थिति लक्षांत आणून श्रीकृष्ण रणांगणावर आले, व कौतुकानें तो युद्धप्रसंग पाहूं लागले. कृष्णाची ती तटस्थ वृत्ति पाहून बलरामास त्याचा फार राग आला. ते कृष्णाकडे रागानें पाहूं लागले. तेव्हां श्रीकृष्णास हंसूं आलें. कृष्णाचें तें वर्तन पाहून, हें सर्व कपट कृष्णाचेंच आहे असें बलरामास वाटलें; व ते फारच खवळले. तेव्हां श्रीकृष्ण शांतपणानें त्यास म्हणाले, 'दादा हा अर्जुन आहे, याच्यापुढें कोणी टिकणार नाहीं. तेव्हां युद्ध न करितां सुभद्रा त्यास देऊन पूर्वी असलेला संबंध अधीक दृढ करावा हें बरें, असें मला वाटतें.' श्रीकृष्णाचें बोलणें ऐकून बलरामानें युद्ध करणें बंद केलें, व कृष्णास हा काय प्रकार आहे,

म्हणून विचारिलें. तेव्हां कृष्णानें बलरामास अर्जुनाची सर्व हकीकत सांगून त्याचें समाधान केलें. मग बलरामानें अर्जुनाचा आदरसत्कार करून सुभद्रेसुद्धां द्वारकेंत आणिलें, व त्या दोघांचा मोठ्या समारंभानें विवाह केला. विवाहासाठीं कुंती, धर्म, भीम वगैरे सर्वजण द्वारकेस आले होते. लग्नानिमित्त बलरामानें नऊ दिवसपर्यंत द्वारकेंत मोठा उत्सव केला; नंतर अर्जुन सुभद्रेला घेऊन सर्वांसह इंद्रप्रस्थास परत आला. याप्रमाणें सुभद्रेचा लाभ झाल्यामुळें कुंती, पांडव व सर्व प्रजाजन, यांनां अत्यंत आनंद झाला.

## ४. पांडवांचा परिवार.

पुढें कांहीं दिवसांनीं सुभद्रेला द्वारकेस परत आणण्यासाठीं बलराम व श्रीकृष्ण असे उभयतां इंद्रप्रस्थ येथें गेले. बलराम सुभद्रेला घेऊन द्वारकेस परत आले; व पांडवांनीं अतीशय आग्रह केला म्हणून श्रीकृष्ण तेथेंच कांहीं दिवस राहिले. तेथें असतां श्रीकृष्ण धर्माला म्हणाले; 'धर्मा, पुरुषास दोन स्त्रिया अवश्य असाव्यात. ब्रह्मचर्यव्रतानें सर्वकाळ राहणें हें चांगल्या मोठमोठ्या तपोनिधींनाही साधत नाहीं. त्यांतही एक वेळ ब्रह्मचर्यापासून भ्रष्ट झालेल्यास तर फारच अशक्य. तुम्ही पांडव तर संसारलिप्त त्यांतून वैभवसंपन्न आहांत. तुम्हा पांचजणांत मिळून एक स्त्री असणें ही खरोखर मोठी नाजूक गोष्ट आहे. म्हणून तुम्ही प्रत्येकजण एकेक स्त्री करा. अर्जुनाला जशी सुभद्रा मिळाली आहे, त्याप्रमाणें तुम्हीं चौघे आपणास आणखी एकेक स्त्री मिळवा.' श्रीकृष्णाचें हें म्हणणें सर्वांना पसंत पडलें, व त्याप्रमाणें त्यांनीं दुसऱ्या स्त्रियांबरोबर विवाह केले. गोवसेन नांवाचा एक राजा होता, त्याची मुलगी देविका, हिच्याबरोबर धर्मानें विवाह केला. काशीश्वराच्या बळधन्या नांवाच्या कन्येबरोबर भीमानें विवाह केला. अर्जुनाला उलूपी, चित्रांगी व सुभद्रा अशा तीन स्त्रिया होत्याच. चैद्यराजानें आपली मुलगी ऋणावती नकुळाला दिली; आणि मद्रदेशच्या राजाची विजया नांवाची मुलगी होती ती सहदेवाला स्त्री केली. या स्त्रियांपासून पांडवांना पुढीलप्रमाणें पुत्र झाले.

द्रौपदीला प्रतिविंध्य, श्रुतसेन, श्रुतकीर्ति, शतानीक, व श्रतकर्मा असे पांच पुत्र झाले. धर्माची स्त्री देविका हिला माध्ययु या नांवाचा एकच पुत्र झाला; भीमसेनाला पूर्वीं हेडंबेपासून घटोत्कच पुत्र झाला होता व बळधन्येपासून सर्वगम्य या नांवाचा पुत्र झाला. अर्जुनाला चित्रांगीपासून बभ्रुवाहन नांवाचा पुत्र झाला तो आपल्या आजोळीं मणिपूर येथेंच रहात असे. व सुभद्रेपासून त्यास अभिमन्यू नांवाचा पुत्र झाला. नकुळाला ऋणावतीपासून त्रिमी नांवाचा मुलगा झाला व सहदेवाला विजया नांवाच्या स्त्रीपासून सहोत्र या नांवाचा पुत्र झाला. याप्रमाणें पांडवांचा स्त्रीपुत्रादि परिवार होता.

### ५. अभिमन्यूचा जन्मवृत्तांत.

वैशंपायनऋषि, जनमेजयराजाला वरील कथा सांगत असतांना, जनमेजयराजा मध्येंच वैशंपायनाला म्हणाला, 'ऋषि, अभिमन्यूला हजार हात होते, पण ते कृष्णानीं तोडले असें पुराणांत लिहिलें आहे असें म्हणतात, तर हा अभिमन्यू पूर्वी कोण होता वगैरे त्याचा पूर्व जन्मवृत्तांत मला सांगावा.' तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले, 'राजा अभिमन्यू हा चंद्राचा अवतार होय. विष्णुपुराणामध्यें अभिमन्यू हा सहस्रार्जुनाचा अवतार होता असें सांगितलें आहे. कसेंही असो, अभिमन्यूला सहस्र हात होते, एवढी गोष्ट खरी. चंद्रासंबंधानें असा प्रकार आहे कीं, बृहस्पतीची स्त्री तारा, चंद्रानें चोरून नेली होती म्हणून बृहस्पतीनें त्याला शाप दिला कीं, 'तुला मनुष्य जन्म प्राप्त होऊन त्यांत तुला विपत्ति भोगावी लागेल.' त्याप्रमाणें चंद्रानें सुभद्रेच्या उदरांत मनुष्य जन्म घेण्याकरितां प्रवेश केला. गरोदर असतां, सुभद्रेनें एकदां श्रीकृष्णाला चक्रव्यूह कसा रचतात, तें सांगण्याविषयीं विनंति केली. तेव्हां श्रीकृष्ण तिला चक्रव्यूहाची रचना सांगू लागले. त्या वेळीं सुभद्रा पर्यंकावर पडून ती कथा ऐकत होती. कथा ऐकतां ऐकतां सुभद्रेला झोंप लागली, तरी कृष्णाला कथेचा होकार मिळतच होता. सुभद्रा निजली असतांही होकार मिळत आहे याबद्दल कृष्णाला फार आश्चर्य वाटलें. मग शोध करितां सुभद्रेच्या उदरांतील गर्भाकडून होकार मिळत आहे, आणि हा गर्भ चंद्राचा अवतार असून त्यास सहस्र कर आहेत असें समजलें. नंतर, हा सहस्रकरयुक्त जन्मल्यास सर्वांना अजिंक्य होईल. व त्यामुळें मोठा अनर्थ होईल, असा कृष्णानीं विचार करून त्याचे हात नाहींसे करण्याचें मनांत आणिलें, आणि सुभद्रा झोंपेंत असतां त्यांनीं तिच्या मुखांत सुदर्शनचक्राचें तीर्थ घातलें. तें तीर्थ उदरांत जाऊन गर्भाला लागतांच त्याचे दोन हात कायम राहून बाकी सर्व हात विरघळून गेले. हा सर्व प्रकार सुभद्रा निद्रेंत असतां घडून आल्यामुळें तिला त्यासंबंधानें कांहींच समजलें नाहीं. अभिमन्यूनें गर्भावस्थेंत असतांना चक्रव्यूहांत प्रवेश कसा करावयाचा हें ऐकिलें होतें, परंतु त्यांतून बाहेर कसें पडावयाचें हें त्यानें ऐकिलें नाहीं, कारण सुभद्रेला झोंप लागली, हें कृष्णाचें लक्षांत आल्यावर त्यांनीं पुढें कथा सांगण्याचें बंद केलें होतें.

---

## अध्याय १४ वा.

---

### १. सप्तशती आख्यान.

जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला, ऋषि, गंडकी नदींत सांपडणाऱ्या दगडांना शालिग्राम व चक्रें असें कां म्हणतात ? ते इतके पवित्र कां

मानतात ! हें ऐकण्याची माझी इच्छा आहे. तर कृपा करून ही माझी इच्छा पूर्ण करावी. तेव्हां वैशंपायनऋषि म्हणाले, 'राजा, ही गंडकी नदी कश्यपाची स्त्री जी अदिती, तिचा अवतार आहे. सर्वेश्वर नांवाचा जो विसावा ऋषि तो याच नदीपासून अवतरला होता. जय–विजय हे स्वतःच्याच शापानें शापित होऊन एक नक्र व एक गजेंद्र होऊन दुःख भोगीत होते. पूर्वी तृणविंदू नांवाच्या ऋषीनें आपली कन्या देवदूती कर्दम नांवाच्या प्रजापतीला दिली होती. देवदुतीला कर्दम ऋषीपासून जय, विजय व कपिल असे तीन पुत्र झाले होते. कपिलमहामुनी हा भगवान श्रीविष्णुचाच अवतार होता. जय विजय हे विष्णूचे द्वारपाळ होते. ते [illegible] पारंगत होते. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद हे चारी वेद व न्याय, पुराण, धर्मशास्त्र, वगैरे वेदांगें या सर्वांचें त्यांना पूर्ण ज्ञान होतें

सोमवंशांतल्या मरुत नांवाच्या राजानें एका मोठ्या यज्ञाला आरंभ केला, व त्यानें जय व विजय या दोघांची विद्वत्ता जाणून आपल्या यज्ञांत विजयाला ब्रह्मा केलें, व जयाला आचार्य केलें. यज्ञ यथासांग पूर्ण झाल्यावर मरुतराजानें जय व विजय या दोघांना अपरिमित सुवर्ण, रत्नें दक्षणा दिली. दक्षणा घेऊन ते दोघे परत येत असतां, वाटेंत आपल्या दक्षणेची वाटणी करूं लागले. वाटणीच्या वेळीं जय विजयाला म्हणाला, 'विजया, मी तुझा वडील बंधु आहे, तेव्हां वडील या दृष्टीनें मला जो अधिक भाग द्यावयाचा तो अगोदर निराळा काढून ठेव व बाकीच्या दक्षणेचे दोन भाग कर.' परंतु विजयास जयाचें तें म्हणणें पसंत पडलें नाहीं. तो म्हणाला, 'दक्षणेच्या बाबतींत मी, वडील व धाकटा हा भेद जाणत नाहीं; दोघेही सारखे भाग करून घेऊं. अधिक भाग मी तुला देणार नाहीं.' जय म्हणाला, 'मी वडील आहे, तेव्हां अधिक भाग घेतल्यावांचून मी राहणार नाहीं.' दोघेही हट्टाला पेटले. जो तो आपलें म्हणणें योग्य व दुसऱ्याचें अयोग्य असें प्रतिपादूं लागला; परंतु कोणीच तडजोड करीना. शेवटीं दोघे एकमेकावर अत्यंत संतप्त झाले, व त्यांनीं परस्परांना शाप दिला. विजय जयाला म्हणाला, अरे लोभिष्ठा, या लोभामुळें तुला हत्तीचा जन्म प्राप्त होवो. विजयाचा शाप ऐकून जय म्हणाला, अरे नष्टा, तुला जलचराचा जन्म प्राप्त होवो. याप्रमाणें एकमेकांस एकमेकांनीं शाप दिल्यावर विजय सुसर होऊन गंडकी नदींत पडला, व जय हत्ती होऊन गंडकीच्या तीरावर एका अरण्यांत राहूं लागला.

एके दिवशीं त्या हत्तीला जलक्रीडा करावी अशी इच्छा उत्पन्न झाली. तो गंडकी नदीच्या विपुल पाण्यांत मोठ्या उत्साहानें जलक्रीडा करूं लागला. विजय सुसर होऊन त्याच पाण्यांत राहिला असेल अशी त्याला कल्पना नसल्यामुळें तो निःशंकपणें विहार करीत होता. हत्तीच्या क्रीडेमुळें उडालेली खळ-

बळ पाहून सुसरीस हा काय प्रकार आहे हें पाहण्याची इच्छा उत्पन्न होऊन ती तेथें आली. दोघांनांही पूर्व जन्मीचें स्मरण होतें. त्यामुळें ते दोघेही एकमेकांस पहातांच एकमेकांचे अंगावर धांऊन गेले. सुसरीनें आपला भयंकर जबडा पसरून हत्तीचा पाय धरिला व त्याला खोल पाण्यांत ओढूं लागली. हत्ती ती मगरमिठी सोडविण्याकरितां तिला बाहेर ओढूं लागला. अशा रीतीनें त्यांचें बरेंच दिवस युद्ध चाललें होतें. सुसरीच्या जबड्यांतून सुटण्यासाठीं हत्तीनें आपल्या प्रयत्नाची पराकाष्ठा केली, परंतु सुसरीपुढें त्याचें कांहीं चालेना. शेवटीं निरुपाय झाल्यावर भगवान् विष्णुकडे त्याचें लक्ष गेलें. त्या दीनसंरक्षक प्रभुवांचून आतां आपणांस वांचवि[illegible] समर्थ नाहीं, असें जाणून तो भगवंताची करुणा भाकूं लागला. तो म्हणाला, ' हे भक्तवत्सला करुणाकरा, शारंगधरा, हे अनाथनाथा, आदिपुरुषा, हे शेषशयना, अनंता, हे वैकुंठपते, या सुसरीच्या मुखांतून माझी सोडवणूक कर. देवा, या संकटांतून मला सोडीव. देवा, मला साह्य करण्यास तुझ्यावांचून कोणीही समर्थ नाहीं. हे लक्ष्मीरमणा, दासाच्या संरक्षणासाठीं धांवून ये. देवा, या दीनाला वाचीव.' याप्रमाणें त्या हत्तीनें भगवंताची पुष्कळ करुणा भाकिली. भगवंतास हत्तीचा करुणास्वर ऐकून दया आली. लगेच ते गरूडावर आरूढ झाले व क्षणार्धांत लक्ष्मीसह गंडकी नदीच्या कांठीं आले. तेथें सुसरीच्या त्रासानें हत्ती अगदीं व्याकूळ झालेला आहे, असें पाहून विष्णूनीं सुदर्शनचक्र त्या दोघांमध्यें सोडून दिलें. तें भयंकर सुदर्शनचक्र पाहतांच सुसरीनें हत्तीला सोडून दिलें. नंतर सुसर व हत्ती यांनीं तें भगवंताचें रम्य स्वरूप अवलोकन करतांच वैरभाव सोडून दिला. ते भगवंताच्या चरणीं लीन झाले. विष्णूनीं त्या दोघांना शापमुक्त करून वैकुंठास येण्याची आज्ञा दिली व पाण्यांत सोडिलेलें सुदर्शनचक्र बाहेर काढिलें. सुदर्शन चक्राच्या प्रहारानें पाण्यांतील दगड छिन्नविच्छिन्न होऊन गेले. आपल्या चक्रानें दगडांचा भंग झाला म्हणून त्या फुटलेल्या दगडांत विष्णु व लक्ष्मी यांनीं अंशरूपानें प्रवेश केला. जय विजय या दोघांना ते दगड दाखवून विष्णु म्हणाले, जय विजयहो, ही शालिग्राम शिला म्हणजे माझीचकेवळ मूर्ति होय. जो या शिलेची व या चक्रांची–फुलें, तुळशी, चंदन वगैरे वाहून–पूजा करील, तो सर्व पातकांपासून मुक्त होईल. त्यानें केलेली शालिग्रामपूजा मलाच प्राप्त होईल. या शालिग्रामाची जे एकनिष्ठपणें भक्ति करितील त्यांना शेवटीं वैकुंठलोकाची प्राप्ति होईल. याप्रमाणें जयविजयास सांगून विष्णु गरुडावर बसून वैकुंठास निघून गेले.

## २. नद्यांत देवांचा अंश.

ही कथा ऐकून जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला, वैशंपायनऋषि, अशा रीतीनें विष्णूनीं अंशरूपानें दगडांत प्रवेश केला हें ऐकून देवांनीं नद्यांचीं

स्वरूपें धारण केलीं होतीं असें ऐकिल्याचें मला स्मरण झालें. तेव्हां ती कथा ऐकण्याची माझी इच्छा आहे. आपण कृपा करून मला ती कथा सांगावी. जनमेजयराजानें अशी विनंति केल्यावर वैशंपायनऋषि म्हणाले.

'राजा, पूर्वी सिंहाद्रि नांवाच्या पर्वतावरील पवित्र अशा महाबळेश्वरतीर्थावर ब्रह्मदेवानें यज्ञ करण्याचें ठरविलें, व त्याप्रमाणें यज्ञाची सर्व व्यवस्था केली. यज्ञासाठीं सर्व देवांना, व मोठमोठ्या ऋषींना बोलावून आणिलें. यज्ञप्रारंभ करण्यापूर्वी नवराबायकोनीं एकत्र बसून पुण्याहवाचन करावें लागतें. त्याप्रमाणें ब्रह्मदेवानें सावित्रीला आंगधुणें आटोपून लवकर येण्यास सांगितलें. पतीच्या सांगण्याप्रमाणें सावित्री आंगधुणें वगैरे आटोपून विशेष अलंकार घालून नटूं लागली. तिला येण्यास उशीर लागल्यामुळें मुहूर्ताचा अतिक्रम होईल असें ऋषींना वाटून त्यांनीं गायत्रीस बोलावून मुहूर्त साधण्यास ब्रह्मदेवास सांगितलें. ब्रह्मदेवानें धाकटी स्त्री गायत्री जवळ होती, तिलाच पुण्याहवाचनासाठीं जवळ बसवून पुजेस आरंभ केला; इतक्यांत सावित्री तेथें आली. ब्रह्मदेवाच्या शेजारीं गायत्रीला बसलेली पाहून तिला अत्यंत राग आला. देवांनीं मुद्दाम आपला अपमान केला, असें तिला वाटूं लागलें. ती सर्वांवर रागावून म्हणाली, 'अहो, मी वडील स्त्री आहे; दैवपितृकार्यामध्यें पतीजवळ बसण्याचा [illegible] आहे;

मात्रानें नदीरूप व्हावें.' सावित्रीचें म्हणणें सर्व देवांनीं मान्य केलें, व त्याप्रमाणें ते कांहीं अंशानें नदीरूप झाले.]

हे जनमेजयराजा, आतां तुला कोणत्या नदींत कोणत्या देवाचा अंश आहे तें सांगतों. कृष्णानदींत भगवान नारायणाचा अंश आहे. महानदींत महादेवांचा अंश आहे. ब्रह्मकमंडळींत ब्रह्मदेवाचा अंश आहे. ज्या नद्या पूर्वेकडे वाहात गेल्या आहेत त्यांत पुरुषांचा अंश आहे, व ज्या पश्चिम दिशेनें वाहात गेल्या आहेत त्यांत स्त्रियांचा अंश आहे. याप्रमाणें सर्व नद्यांमध्यें देवांचा अंश उत्पन्न झालेला आहे.

### ३. धनेश्वर ब्राह्मणाची गोष्ट.

एकदां जनमेजय व वैशंपायनऋषि संतसंगतिविषयीं बोलत असतां, वैशंपायनऋषि जनमेजयराजाला एक गोष्ट सांगू लागले. ते म्हणाले; 'राजा, पूर्वी पुरी नांवाच्या एका प्रसिद्ध शहरामध्यें धनेश्वर नांवाचा एक ब्राह्मण राहात होता. तो जातीनें जरी ब्राह्मण होता तरी, त्याला द्रव्याचा लोभ विशेष असे. तो आपलें ब्रह्मकर्म सोडून व्यापार करीत असे. त्यानें व्यापारांत अनेक प्रकारच्या लबाड्या कराव्या, अज्ञानी लोकांना फसवावें, लोकांचा माल चोरावा, व अन्‍ [illegible] विश्वासघात वगैरे करून आपल्या पैशांत भर टाकावी. असा [illegible] र्गानें पैसा मिळवीत अ [illegible]

पुढें तो धनेश्वर ब्राम्हण पैसा घेऊन आपल्या गावीं परत आला. त्याच कार्तिकमहिन्यांतील पौर्णिमेला सोमवारीं त्याला सर्पदंश होऊन मृत्यु आला. तो महा पापी आहे असें जाणून यमदूतांनीं त्याला यमाच्या दरबारांत आणिलें. चित्रगुप्तानें त्याच्या पापपुण्यांचा शोध करून यमास सांगितलें कीं, यमराजा, हा धनेश्वर महादुष्ट, नीच, दुराचारी व घोर पातकी आहे. याचें सर्व पातक लिहिण्यास आकाशही पुरणार नाहीं.' यमानें चित्रगुप्ताचें भाषण ऐकून आपल्या दूतांना धनेश्वराला कठोर शिक्षा करण्यास सांगितलें. आज्ञेप्रमाणें दूतांनीं धनेश्वराला शतयोजनें विस्तीर्ण व अत्यंत प्रज्वलित असलेल्या अग्निकुंडांत टाकून दिलें. परंतु तो जळून जाण्याच्या ऐवजीं असा चमत्कार घडून आला कीं, तें अग्निकुंड शीतळ झालें. तेव्हां त्यांनीं त्याला तेथून काढून कुंभीपाकांत नेऊन टाकिलें. तेथेंही त्यास कांहीं इजा होईना. नंतर त्याला असिपत्रवनांत नेऊन टाकिलें. तेथें चक्रें फिरेनाशीं झालीं, व त्यांची धारही नाहींशी होऊन गेली. हा चमत्कार पाहून यमदूत आश्चर्यचकित झाले. मग त्यांनीं त्याला जेथें भयंकर कुत्रे व कावळे हो[illegible] नेऊन ठेविलें, पण तेथें कु[illegible]चीं तोंडेंच बंद झालीं, व कावळ्यांना दिसेनासें झालें. [illegible] यातना होत नाहीं असें पाहून यमदूतांनीं त्य[illegible] आणिलें व सर्व हकीकत सांगितली; इतक्यांत तेथें नारद आले, त म्हणाले; यमा, अरे या धनेश्वराला नर्कलोकीं आणण्यांत तुझ्या दूतांची चूक झाली आहे. याला तूं विष्णुलोकीं पोंचवून दे.' तेव्हां यम म्हणाला, 'नारदमुने, हा ब्राह्मण अत्यंत पातकी आहे, याच्या पातकास गणती नाहीं असा आमचेकडे हिशेब आहे; अशा पातक्याला विष्णुलोकीं कोणत्या आधारें पाठवावयाचें ?' तेव्हां नारद म्हणाले, 'यमा, तूं म्हणतोस तें खरें, पण या धनेश्वराला थोडी संतसंगती झाली आहे. त्या संतसमागमामुळें थोडा वेळ याच्या कानावर प्रभूचें नांव पडलें आहे. त्यानें याच्या पातकांचा नाश होऊन हा वैकुंठपदास जाण्यास योग्य झाला आहे.' नारदानें असें सांगितल्यावर यमानें धनेश्वराला वैकुंठास पाठवून दिलें. वैशंपायन म्हणतात, हे जनमेजयराजा, थोडा वेळ झालेल्या संतसंगतीचा असा सुपरिणाम झाला; मग ज्यांना सतत संतसंगती होत असेल, ते हा भवसागर सहज उद्धरून जातील, यांत नवल तें काय ? धनेश्वर वैकुंठलोकीं गेल्यावर विष्णूनीं त्याला अलकेचें राज्य देऊन त्याचें नांव कुबेर असें ठेविलें. याच-अर्थात् संतसंगती-विषयीं तुला आणखी एक गोष्ट सांगतों.'

## ४. सुरथराजा व समाधीवैश्य यांची गोष्ट.

पूर्वी सूर्यवंशी सुरथ नांवाचा एक प्रसिद्ध राजा होऊन गेला. तो राजा अत्यंत पराक्रमी असून त्यानें सर्व पृथ्वी जिंकिली होती. दुर्भाग्यवशात एकदां त्याजवर परचक्र येऊन त्यांत त्याचा पराभव झाला. शत्रूंनीं त्याचें राज्य, संपत्ति,

वगैरे सव हरण केलें. याप्रमाणें तो सुरथराजा दुर्दैवानें सर्वस्वाला मुकल्यामुळें त्याच्या स्त्रीपुत्रादिकांनींही त्यास सोडून दिलें. त्यामुळें तर त्याला फारच अनुताप वाटूं लागला. ज्या स्त्रीपुत्रांसाठीं आपण एवढे भगीरथ प्रयत्न करीत होतों, त्यांनीं आपण दरिद्री होण्याबरोबर आपणास सोडून दिलें; या वरून संकटसमयीं कोणाचाच उपयोग होत नाहीं, असें जाणून त्यानें जवळ जें थोडें द्रव्य शिलक होतें तेंही ब्राह्मणांना देऊन टाकलें व अंगाला राख फासून तो अरण्यांत निघून गेला. मनाला समाधान वाटावें म्हणून तो साधुच्या संगतीचा शोध करीत फिरत होता. फिरतां फिरतां तो चित्ररथ नांवाच्या अरण्यांत आला. तेथें त्याला मार्केडेयऋषींचें दर्शन झालें. राजाची ती दीन स्थिति अवलोकन करून मार्केडेयऋषींना फार वाईट वाटलें. ते राजाला म्हणाले, 'राजा, तुझी अशी स्थिति होण्याचें कारण काय ?' तेव्हां राजा म्हणाला, 'ऋषि, माझें राज्य शत्रूंनीं हरण केल्यामुळें मी अगदीं दरिद्री झालों. मजजवळ द्रव्य नाहीं असें पाहून, यजमानाजवळचें द्रव्य संपल्यावर गणिका जशी त्याला सोडून देते, किंवा स्तनांतील दूध संपल्यावर मूल [illegible] सोडून देतें, त्याप्रमाणें म[illegible] दिलें. यामुळें मला फार दुःख होऊन [illegible] तुम्हाला शरण [illegible] ुरथराजा मार्केडेयऋषींना आपली हकीकत सांगतो आहे, इतक्यांत समाधी नांवाचा एक वैश्य तेथें आला. तो वैश्यही असाच दुःखी दिसत होता. त्याचा तो निराश व दीन चेहरा पाहून सुरथराजा वैश्याला म्हणाला, अरे तूं हीनभाग्य झाल्यासारखा दिसत आहेस. तुझी हकीकत काय आहे ती मला सांग. वैश्य म्हणाला, 'हे सुरथराजा, मी वैश्य असून व्यापारधंदा करून निर्वाह करीत असे. मजजवळ पैसा विपुल होता. त्यावेळीं लोक मला भला भला म्हणत असत; व माझे स्त्रीपुत्र मजवर अत्यंत प्रेम करीत असत. पुढें दैवयोगानें चोरांनीं माझ्या घरांत शिरून माझें सर्वस्व हरण केलें, यामुळें मी एका दिवसांत लक्षाधीशाचा भिक्षाधीश बनलों. मजजवळ पैसा असतांना जे लोक माझ्याशीं गोडगोड बोलत असत व ज्यांना मी वारंवार पैसे देऊन संतुष्ट केलें होतें; त्यांकडे जाऊन मी साह्य मागूं लागलों, परंतु त्या नीच लोकांनीं मला साह्य न करितां उलट धक्के मारून घालवून दिलें.मग निराश होऊन मी घरीं परत आलों. व पाहतों तों बायको व मुलें यांच्या प्रकृतींतही विलक्षण फरक पडल्याचें दिसून आलें. ते माझा पाणउतारा करून मला वाटेल तें बोलूं लागले. एक दोन दिवसांत केवळ पैशाच्या अभावामुळें अशी परिस्थिति बदललेली पाहून मला फार उद्विग्नता प्राप्त झाली. शेवटीं मी घरदार सोडून देऊन अरण्यांत चालता झालों. दुःखानें अतिशय त्रस्त झाल्यामुळें भ्रमिष्टासारखा फिरत फिरत येथें आलों आहे.' त्याची हकीकत ऐकून सुरथराजा म्हणाला. 'हे वैश्या माझीही

तुझ्या प्रमाणेंच स्थिति झाली आहे. मी पूर्वी राजा होतों, पण माझें राज्य गेल्यामुळें माझाही असाच सर्वोकडून अपमान होऊं लागला, म्हणून मी घर सोडून येथें आलों आहें. आपण दोघे समसुखदुःखी आहों. आतां आपण दोघेजण या मार्कंडेयऋषींना शरण जाऊं, व त्यांना आपल्या उन्नतीविषयीं कांहीं उपाय विचारूं. समाधीवैश्याला राजाचें म्हणणें मानवलें. नंतर ते दोघे मार्कंडेय ऋषींना शरण जाऊन, पुन्हा पूर्ववैभव कशानें प्राप्त होईल तें विचारूं लागले.

त्यांचा तो प्रश्न ऐकून मार्कंडेयऋषि म्हणाले, 'बाबानों, तुम्हांला सुखाची आवश्यकता आहे. सुख हें समाधानांत असून, समाधान हें आत्मज्ञानांत आहे. मनुष्यजन्म हाच अगोदर दुःखाचा सागर आहे. यांत द्रव्य मिळविण्यासाठीं कष्ट करावे लागतात. त्याचें संरक्षण करण्यासाठीं नेहमीं सावध रहावें लागतें, बरें, इतके कष्ट सोशिले तरी तें निश्चयानें आपणाजवळच राहील याचा नियम आहे का? मुळींच नाहीं. असें हें धन सर्वप्रकारें दुःखदायक आहे. आणि हाच प्रकार इतर सर्व सुखकारक म्हणून मानलेल्या गोष्टीविषयीं आहे. आत्मज्ञान संपादन केल्यास मात्र तें कोणी नेत नाहीं, आपण होऊन दुसऱ्यास दिलें तरी तें आपणाजवळचें कमी होत नाहीं, व त्यापासून होणारा आनंद क्षणिक नसून चिरकाल राहाणारा असा आहे. ईश्वरभक्तीचेंही माहात्म्य तसेंच आहे. असो! तुम्हांला फिरून ऐश्वर्य प्राप्त व्हावें अशी इच्छा आहे, याकरितां असें करा कीं, प्राणिमात्रांचें दुःखनाशन करणारी, भुक्ति व मुक्ति देणारी, मूळदेवता जी महामाया, तिचें तुम्ही भजनपूजन करा; म्हणजे तुमचे सर्व क्लेश नाहींसे होतील. या देवीच्या मूर्तीला अठरा हात असतात. अक्षमाळ, खड्ग, चक्र, कमळ, बाण, गदा, वज्र, शंख, घंटा, पाणिपात्र, कमंडलु, शक्ति, दंड, परशु, मुसळ, त्रिशूळ, पाश, महाधनुष्य, आणि अर्धचंद्र हीं या देवीचीं अठरा आयुधें आहेत. देवीच्या गळ्यांत मनुष्यांच्या मस्तकाची माळ असून तिचे डोळे रक्तासारखे लाल आहेत. तिचें मुख विशाळ व भयंकर असून ती सप्तशृंग पर्वतावर राहते. तिचा रक्तवर्ण असून तिचें वस्त्रही रक्तवर्णाचें आहे. हिला चामुंडा असें म्हणतात. वर सांगितल्याप्रमाणें महामायेची अठरा भुजायुक्त किंवा, चतुर्भुजयुक्त मूर्ति करावी. याच महामायेनें द्वापारीं नंदाचे घरीं अवतार घेतला होता. कंसाचे हातून जी निसटून गेली ती हीच आदिमाया होय. हिला रक्तचामुंडा असेंही म्हणतात. हिची चतुर्भुजायुक्त मूर्ति करावी, शिवाय गौरी म्हणून एक अवतार झालेला होता, त्या गौरीची अष्टभुजायुक्त मूर्ति करावी. या मूर्तीच्या गळ्यांत मोत्यांची माळ घालावी, रक्तचंदनाचा टिळा लावावा, व हातांत शंख, घंटा, त्रिशूळ, धनुष्य, बाण, चक्र, मुसळ व लांगूल अशीं आयुधें द्यावींत. अशाप्रकारें मूर्ति तयार करून तिचें भजनपूजन करावें. मूर्ति धातु, पाषाण, अथवा माती

यापैकीं कशाचीही केली तरी चालेल. पूजन करून मूर्तीचें स्तवन करावें. तें कसें तें तुम्हाला सांगतों.

'हे त्रिगुणे, तामसी, महादेवी, हे शक्ति, चंडिके, शांभवी, हे स्वर्गदुर्गे, महामाये वैष्णवी, हे महालक्ष्मी, महाकाली, महाबळी, भीमरूपे, हे माते, त्रिलोचने,' अशा प्रकारें देवीच्या अनेक नांवांनीं तिचें स्तवन करावें. तिची विधिपूर्वक पूजा करावी, गंध, धूप, दीप, नैवेद्य वगैरे सर्व उपचार यथासांग भक्तिभावानें करावे; म्हणजे ती शांभवी तुम्हां दोघांना कांहीं दिवसांनीं प्रसन्न होईल व तुमची मनकामना पूर्ण करील.

याप्रमाणें ऋषींनीं सांगितल्यावर सुरथराजा व समाधीवैश्य हे दोघे मार्कंडेय-ऋषींना वंदन करून दुसरीकडे गेले. त्यांनीं एका नदीच्या कांठीं रम्य स्थान पाहून तेथें देवीची अठरा भुजांची मूर्ति स्थापन केली. ऋषींनीं सांगितल्या-प्रमाणें ते दोघे स्नान करून, त्या मूर्तीचें प्रत्यहीं नियमानें भजन-पूजन करूं लागले. मूलमंत्रानें हवन करावें, देवीला नानाप्रकारचीं पुष्पें, दूर्वा, वगैरे वहाव्यात, स्वतःचें मांस कापून त्याचा होम करावा; याप्रमाणें त्या दोघांचा पुष्कळ दिवसपर्यंत सारखा क्रम चालू होता. तें व्रत स्वीकारिल्यापासून ते निराहार करीत, कोणाशीं बोलत नसत, व देवीनें दर्शन द्यावें म्हणून देवीची भक्तिभावानें सेवा करीत. अशा क्रमानें तीन वर्षें त्यांनीं देवीची एकनिष्ठपणें सेवा केल्यावर भगवती अंबा तेथें प्रत्यक्ष प्रगट झाली. त्या वेळीं ती सिंहावर बसली होती. तिचा वर्ण रक्ताप्रमाणें लाल होता, तिला अठरा हात होते, व त्या प्रत्येकांत एक अशीं अठरा आयुधें तिनें धारण केलीं होतीं. महामायेची ती उग्र मूर्ति पाहून दोघेही थरथर कांपूं लागले, व देवीला वंदन करून तिच्यापुढें नम्रपणें उभे राहिले. दोघांची भक्ति पाहून देवी म्हणाली, 'वत्सहो, भिऊं नका. तुम्हीं केलेल्या सेवेमुळें मी तुम्हाला प्रसन्न झालें आहें. तुम्हीं जी इच्छा धरून माझी सेवा केलीत, ती तुमची इच्छा पूर्ण होईल. हे सुरथराजा, तुला तुझें राज्य, संपत्ति, वैभव वगैरे सर्व पुन्हां प्राप्त होईल. ज्यांनीं तुझें राज्य हरण केलें ते तुझे दासानुदास होतील, व पृथ्वीवर तुझें राज्य एकछत्री होईल. या जन्मीं इहलोकच्या सुखाचा उपभोग घेऊन पुढील जन्मीं तूं सूर्याचा पुत्र होशील. सूर्य तुझें नांव 'सावर्णिकमनू' असें ठेवील व त्या जन्मांत तूं चिरंजीव होशील. आणि या समाधीवैश्यासही पूर्व वैभव लवकरच प्राप्त होईल. याच्या पातकाचा अद्याप नाश झाला नाहीं, परंतु आणखी कांहीं दिवस त्यानें माझी सेवा केली म्हणजे त्याचें सर्व पातक नाहींसें होऊन त्याला विपुल संपत्ति मिळेल; व स्त्रीपुत्रादिकांचाही त्याला लाभ होईल. हे सुरथराजा, जो भक्तिभावानें माझी सतत सेवा करील, आश्विनशुद्ध प्रतिपदेपासून नऊ दिवसपर्यंत जो माझा उत्सव करील, त्याच्या सर्व आधी व्याधी क्लेश नाहींसे होतील; त्याची

विपत्ति नाहींशी होईल; त्याला धन लाभ होऊन सुखाची प्राप्ती होईल.' असें सांगून देवी अदृश्य झाली. मग त्या सुरथराजाला कांहीं दिवसांनीं राज्य प्राप्त होऊन तो पूर्वीपेक्षां अधिक वैभवशाली बनला. समाधीवैश्यही कांहीं दिवसांनीं अत्यंत धनाढ्य सावकार झाला. असा या देवीच्या भजन-पूजनाचा महिमा आहे.

---

# अध्याय १५ वा.

## १. देवीचे अवतार.

वैशंपायनऋषींनीं सांगितलेलें देवीचें माहात्म्य ऐकून जनमेजयराजाला देवीची उत्पत्ति कशी झाली, हें ऐकण्याची इच्छा होऊन तो वैशंपायनऋषीला म्हणाला, आपण ज्या भगवतीची एवढी महती सांगितली, त्या भगवतीनें केव्हां व कोणत्या कारणाकरितां अवतार घेतला, हें आपण कृपा करून मला सांगावें. याप्रमाणें जनमेजयराजाची विनंति ऐकून वैशंपायनऋषि ती कथा राजला सांगूं लागले. ते म्हणाले:—

'पूर्वी कल्पसमाप्तीचे वेळीं भगवान श्रीविष्णु विश्रांति घेण्यासाठीं क्षीरसागरीं जाऊन शेषशय्येवर अठ्ठावीस युगें निजले होते. निद्रितावस्थेंत त्यांच्या कानांतील मळापासून मधु व कैटभ या नांवाचे दोन विशालदेहधारी, अत्यंतपराक्रमी, तामसीवृत्तीचे राक्षस निर्माण झाले. उत्पन्न होण्याबरोबर त्यांना युद्ध करण्याची इच्छा उत्पन्न होऊन ते आपणास योग्य असा वीर शोधूं लागले. त्यांची नजर विष्णूच्या नाभिकमलांत असलेल्या ब्रह्मदेवाकडे जाऊन ते त्याला युद्धाला पाचारण करूं लागले. त्या दोघा राक्षसांबरोबर आपण युद्ध करण्यास असमर्थ आहों असें जाणून ब्रह्मदेवास त्यांच्याजवळ जाण्याचें धैर्य होईना. ते राक्षस शक्तिमदानें धुंद होऊन गेल्यामुळें ब्रह्मदेव येत नाहीं, असें पाहून ते त्याच्या अंगावर धांवून गेले. तेव्हां ब्रह्मदेव आपल्या आसनावरून उठून राक्षसांच्या भीतीनें पळत पळत विष्णूजवळ आला. तों विष्णु योगनिद्रेंत मग्न झाले आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. नंतर योगनिद्रेनें विष्णूला सोडावें म्हणून ब्रह्मदेव योगनिद्रेची स्तुति करूं लागला. तो म्हणाला, हे आदिमाये योगनिद्रे, हे ईश्वरी जगदुद्धारिणी, स्वाहास्वधावषट्कारिणी, परात्परे, अक्षरसिद्धे, स्वरात्मके, हे स्थितिसंहारकारिणी, महारौद्रे, हे माहेश्वरी योगनिद्रे, तूं अकार उकार व मकार स्वरूप असून अर्धमात्राही तूंच आहेस. तात्पर्य तूं ओंकारस्वरूप आहेस. लक्ष्मी, सावित्री आणि अंबिका ह्या तुझ्याच अंशस्वरूप आहेत. तुझें तेज विष्णूच्या बरोबरीचें असून विश्वोत्पत्तीचें महाबीजरूपी तूंच आहेस. संपूर्ण विश्वाचे

उत्पत्ति, पालन आणि संहार हे तुझ्याच इच्छेनुरूप होतात. तूं सर्व विद्येची अधिष्ठात्री देवता आहेस; महामती ज्ञानदेवता तूंच आहेस; हे जगन्माते, हे शुभकारके, शांतिस्वरूपे, परमानंदे, हे देवि, मधु व कैटभ नांवाचे दोन क्रूर राक्षस फार उन्मत्त झाले आहेत; व त्यांनीं मला अत्यंत त्रस्त केलें आहे. या वेळीं माझें संरक्षण करण्यास विष्णुवांचून कोणी समर्थ नसल्यामुळें साह्य मागण्यासाठीं मी विष्णूकडे आलों आहें; तर हे योगमाये, तूं विष्णूला जागृत कर.' याप्रमाणें ब्रह्मदेवानें योगमायेची स्तुति केल्यावर, ती विष्णूच्या बाहू, नासिका, मुख, नेत्र व हृदय वगैरे अवयवांपासून उत्पन्न होऊन निघून गेली. योगनिद्रेपासून विष्णु मुक्त होतांच, ते जागृत होऊन ब्रह्मदेवाकडे पाहूं लागले. तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला, हे लक्ष्मीरमणा, अनंता, हे क्षीरसागरनिवासी मंगलधामा, तुझ्या कर्णमळापासून उत्पन्न झालेले मधु व कैटभ नांवाचे दोन राक्षस मला त्रास देत आहेत, म्हणून मी तुजकडे आलों आहे. तर माझें संरक्षण कर व त्या दुष्ट राक्षसांचा नाश कर.

याप्रमाणें ब्रह्मदेवानें विष्णूची प्रार्थना केल्यावर विष्णु त्या राक्षसांवर अत्यंत क्रुद्ध झाले. त्यांनीं दोघां राक्षसांना युद्धासाठीं बोलावून त्यांचा नाश केला. त्या दोन्ही राक्षसांच्या मेदापासून ही पृथ्वी उत्पन्न झाली म्हणून तिला मेदिनी असें म्हणतात. हे जनमेजयराजा, ही जी विष्णुशरीरापासून उत्पन्न झालेली योगनिद्रा, तिलाच योगमाया अथवा आदिमाता असें म्हणतात.

## २. महिषासुरवध.

मधु कैटभ राक्षसांचा नाश केल्यानंतर कांहीं दिवसांनीं पृथ्वीवर महिषासुर नांवाचा एक राक्षस उत्पन्न झाला. तो सर्व चराचरांना अजिंक्य झाला होता. पृथ्वी, पाताळ व स्वर्ग तिन्हीं लोकांवर त्यानें आपली सत्ता स्थापन केली होती. त्यानें एक दिव्यसंवत्सरपर्यंत इंद्राबरोबर युद्ध करून सर्व देवांसह त्याचा पराभव केला व अमरावतीचें सिंहासन आपल्या ताब्यांत घेतलें होतें. महिषासुराचा विलक्षण पराक्रम पाहून देवगुरू बृहस्पति भयभीत होऊन मार्ग मिळेल तिकडे पळूं लागला. चंद्र, सूर्य व दिशापति यांनांही त्यानें जिंकून रणांगणावरून दशदिशा पळावयाला लाविलें होतें. महिषासुरानें असा अनर्थ करून टाकिल्यामुळें सर्व देव काळजीनें व्यग्र झाले व विष्णूकडे येऊन संकटांतून सुटका करण्याकरितां विष्णूची प्रार्थना करूं लागले. ते म्हणाले, ' हे त्रिगुणातीता, भक्तवत्सला-अनंता, हे चक्रधरा, लक्ष्मीरमणा, या महिषासुरराक्षसानें तिन्ही लोकीं मोठा अनर्थ मांडला आहे. आमचीं राज्यें जिंकून त्यानें आमची दुर्दशा केली आहे. तर हे विश्वनाथा, त्या दुष्ट राक्षसाचा लवकर नाश करून टाक. ' याप्रमाणें सर्व देवांनीं विष्णूची प्रार्थना केल्यावर भगवान विष्णु त्या राक्षसाचा नाश कोणत्या प्रकारानें करावयाचा याचा विचार करूं लागले. त्या राक्षसांचीं भयंकर कृत्यें ऐकून

विष्णू रागानें अत्यंत लाल झाले तेव्हां त्यांच्या वदनापासून तेज उत्पन्न झालें. तसेंच सर्व देवांच्याही शरीरांपासून तेज उत्पन्न झालें. विष्णु, ब्रह्मदेव, इंद्र, चंद्र, सूर्य, वगैरे सर्वांचें तेज एकवटून त्यापासून एक सुंदर स्त्री उत्पन्न झाली. त्या स्त्रीचें तेज सूर्यापेक्षांही प्रखर असून तिचा वर्ण कुंकुमाप्रमाणें लाल होता. हे जनमेजयराजा! आदिशक्ति, आदिमाया, योगमाया, योगनिद्रा असें म्हणतात ती हीच स्त्री होय. शंकराच्या तेजापासून तिचें मुख उत्पन्न झालें; सौम्यदेवापासून तिचे स्तन उत्पन्न झाले, तिन्ही अग्निपासून तिला डोळे प्राप्त झाले, यमराजाच्या तेजापासून तिला केश प्राप्त झाले, विष्णूच्या तेजापासून तिचे बाहु निर्माण झाले, वरूणापासून तिचा मध्य उत्पन्न झाला, इतर देवांच्या तेजांपासून नितंबभाग निर्माण झाला, इंद्रतेजानें तिचे दंड उत्पन्न झाले, अष्टवसूंच्या तेजापासून तिचीं बोटें निर्माण झालीं, सूर्यापासून आंगठे निर्माण झाले, ब्रह्मदेवापासून तिचे चरण निर्माण झाले, वायुपासून कान निर्माण झाले, प्रजापतिपासून दांत निर्माण झाले, कुबेरापासून नाक निर्माण झालें आणि अन्य देवांच्या तेजापासून तिचे रोम वगैरे भाग उत्पन्न झाला होता. याप्रमाणें सर्व देवांनीं आपल्या तेजापासून आदिमायेची मूर्ति निर्माण केल्यावर तिला देवांनीं अठरा आयुधें दिलीं. कारण तिला अठरा हात होते. महादेवांनीं त्रिशुळ दिला, विष्णूनीं सुदर्शनचक्रापासून दुसरें चक्र उत्पन्न करून दिलें, पवनानें धनुष्य व बाण दिले, अग्नीनें शक्ति दिली, इंद्रानें वज्र दिलें, ऐरावतीनें घंटा दिली, यमानें प्रखर असें खड्ग दिलें, प्रजापतीनें अक्षमाळा दिली, चूडामणीनें अर्धचंद्र, कंकणें व कुंडलें दिलीं, सूर्यानें रोमकूप दिला, ब्रह्मदेवानें कमंडलु दिला, हिमालयानें तिला बसण्यासाठीं सिंह दिला, समुद्रानें गळ्यांत घालण्यासाठीं कमळांची माळा दिली, क्षीरसागरानें वस्त्र दिलें, विश्वकर्म्यानें परशु व मुद्रिका दिली, कुबेरानें मद्यपात्र व वारूणी दिली, पृथ्वीनें सर्पहार दिला, आणि शेषानें महामणी दिला. याप्रमाणें तिला सर्व देवांपासून वस्त्रालंकार व आयुधें मिळाल्यावर ती शांभवी अधिक तेजस्वी व शक्तिशाली दिसूं लागली. भगवतीची ती प्रभावशाली मूर्ति अवलोकन करून सर्व देवांना, आतां ही महिषासुराचा खात्रीनें नाश करील, असा भरंवसा उत्पन्न झाला. त्यांनीं आनंदित होऊन देवीचा जयजयकार केला. तेव्हां योगमायेनें वीरश्रीनें मोठा भयंकर शब्द केला. त्या गर्जनेनें सर्व पृथ्वी डळमळूं लागली, आणि समुद्रांत खळबळ होऊन संपूर्ण त्रिभुवन कंपायमान झालें.

जगदंबेची गर्जना ऐकून तो मदोन्मत्त महिषासुरराक्षस अत्यंत क्रुद्ध झाला. त्यानें देवीबरोबर युद्ध करण्यासाठीं चक्षुर नांवाच्या राक्षसाला पाठवून दिलें. तो महापराक्रमी चक्षुरराक्षस आपणाबरोबर सहा पद्म रथ घेऊन युद्ध करण्यासाठीं आला. चक्षुर रणांत येऊन पोंचतो आहे, इतक्यांत मागून असि-

लोमा नावाचा अत्यत पराक्रमी राक्षस आपणाबरोबर पन्नास अयुतें सैन्य घेऊन आला. त्याच्या सैन्यांत पायदळावर उदग्राक्ष नांवाचा एक सेनापती होता. तो फार पराक्रमी असून रणविद्येंत विशेष निपुण होता. असिलोमाच्या मागून बाहाळिक नांवाचा शूर सेनापति आपणाबरोबर एक कोटी रथ व सहाशें अयुतें सैन्य घेऊन आला. व्रतकाळ नांवाचा सेनापति या प्रमाणेंच पन्नास अयुतें सैन्य व पांच हजार हत्ती घेऊन आला होता. त्याच्या मागून बिडाळाक्ष पन्नास हजार अयुतें सैन्य घेऊन रणावर आला. बिडाळाक्षराक्षस हा एक शूर सेनापति असून युद्धविद्येंत अत्यंत निपुण होता. शेवटीं महिषासुर स्वतः बरोबर कोटी कोटी रथ (एक जलधी) व अगणित सैन्य घेऊन देवीबरोबर युद्ध करण्यासाठीं आला. राक्षसाचा तो प्रचंड सेनासमूह रणांगणांवर एकवटल्यावर त्याकडे पाहणें देखील फार भयंकर झालें. सैन्याच्या रणवाद्यांनीं दाह दिशा दणाणून गेल्या. धूळीनें आकाशमंडळ भरून जाऊन सूर्य दिसेनासा झाला. सैन्याच्या चालण्यानें पृथ्वी हादरूं लागली. राक्षसांच्या बीभत्स ओरडण्यानें दिशा कोंदून जाऊन समुद्रांत खळबळ सुरू झाली. महिषासुर युद्धाला आलेला पाहून सर्व देव भयभीत होऊन देवीच्या मागें जाऊन लपले. महिषासुराचें तें प्रचंड सैन्य अवलोकन करून जगदंबा अधिक क्रुद्ध झाली, आणि तिनें प्रचंड देह धारण केला. तिचे ते विशाल हात सर्व दिशेला जाऊन पोंचले, व तिचें मस्तक आकाशाला जाऊन भिडलें. असा विशाल देह धारण केल्यानंतर जगदंबेनें प्रचंड गर्जना केली. तेव्हां सर्व राक्षससैन्य सज्ज होऊन तिजवर धांवलें. कित्येक आपलीं शस्त्रें परजूं लागले; कित्येकांनीं धनुष्यें घेऊन अव्याहत शरवृष्टि सुरू केली; कित्येकांनीं देवीवर तोमरशस्त्राचा मारा चालविला; कित्येक भिंडिमाळा फेकूं लागले; व कित्येक परशू मारूं लागले. याप्रमाणें सर्व बाजूनें मुसळ, खड्ग, पट्टीश, वगैरे शस्त्रांचा भयंकर मारा देवीवर होऊं लागला. शस्त्रांचा तो भयंकर वर्षाव पाहून देव अधिक भयभीत झाले, व देवाला कसा जय मिळेल याची त्यांनां मोठी काळजी वाटूं लागली. इतका शस्त्रांचा वर्षाव होत असतांही जगदंबा मुळींच डगमगली नाहीं. पर्वतावर कमळें पडावींत त्याप्रमाणें देवीला त्या शस्त्रांपासून यत्किंचितही इजा झाली नाहीं. नंतर देवीनें आपल्या सिंहाला इशारा केला. त्याबरोबर सिंहानें देवीस पाठीवर घेऊन राक्षस सैन्यांत उड्डाण केलें; व चंडिकेनें धनुष्यावर शर योजून राक्षसांवर सोडण्यास सुरवात केली. तिची ती शरवृष्टी पाहून जणुं काय प्रळयकाळच समीप आला आहे असें वाटूं लागलें. देवीनें या प्रमाणें आपल्या शस्त्रांचा मारा राक्षसावर चालूं केल्यावर प्रत्येक क्षणीं सहस्रावधी राक्षस भूमीवर मृत होऊन पडूं लागले. हजारों हत्ती मरून पर्वताप्रमाणें अडवे पसरले, व शेंकडों रथ मोडून चूर्ण झाले. देवीचा

---

* एक अयुत म्हणजे दहा हजार.

असा पराक्रम पाहून देवांच्या हृदयांत उत्पन्न झालेली भीति नाहींशी झाली व त्यांना धैर्य उत्पन्न होऊन ते देवीला साह्य करण्यासाठीं रणांगणांवर आले.

जगदंबा व देव यांचा भयंकर मारा राक्षसांवर चालू झाल्यावर राक्षस मुंग्याप्रमाणें पटापट मरूं लागले, माराच्या भीतीनें सर्व राक्षस गर्भगळीत झाले; व ते रणावरून पळून जाण्यास पाहूं लागले, परंतु जगदंबेच्या त्या प्रचंड देहामुळें त्यांस कांहीं मार्ग दिसेना. ज्या देवीचे हात सर्व दिशा व्यापून राहिले होते, तेथें ते राक्षस पळून लपणार तरी कोठें ? त्यांना पळावयाला मार्ग दिसेना व लपून बसावयालाही ठिकाण मिळेना. अशा अडचणींत त्यांना दोन गोष्टींशिवाय तिसरा मार्गच उरला नाहीं. एक युद्ध करून रणांत मरून जावें, किंवा देवीला शरण जाऊन तिची क्षमा मागावी. त्याप्रमाणें कित्येक देवीला शरण येत व कित्येक युद्ध करून रणांगणावर मरून पडत. लक्षावधी राक्षस रणक्षेत्रावर मरून पडल्यामुळें शोणिताची विशाल नदी त्या रणक्षेत्रावर वाहूं लागली. त्या नदींतून मेलेले हत्तीही वाहूं लागले; मग राक्षस व रथ वाहून गेले असतील यांत मोठेंसें नवल तें काय ? याप्रमाणें राक्षसांच्या सैन्याची दुर्दशा उडालेली पाहून देवांना अतिशय आनंद झाला. त्यांनीं देवीवर सुमनांची वृष्टि करून तिचा जयजयकार केला. महिषासुरराक्षस आपल्या सैन्याचा नाश झालेला पाहून अत्यंत क्रोधायमान झाला व मोठ्या त्वेषानें तो जगदंबेवर चाल करून गेला. त्या वेळीं त्या दोघांमध्यें अत्यंत निकराचें युद्ध झालें. महिषासुरानें देवीवर सारखी शरवृष्टी करून कांहींवेळ देवीला स्तंभित करून टाकिलें. देवी व महिषासुर यांचें याप्रमाणें युद्ध चाललें असतां बाहुलक नांवाचा राक्षस देवीच्या अंगावर धांवून आला. त्यानें आपला परशु देवीच्या अंगावर टाकिला, तेव्हां देवीनें क्रुद्ध होऊन हुंकार केला, व आपला त्रिशूळ त्याच्या हृदयावर मारिला. त्रिशूळाच्या प्रहारानें तो दुष्ट राक्षस भूमीवर पडला. मग सिंहानें त्याचे केश धरून नखानें त्याचें शरीर विदारण करून टाकिलें. बाहुलकाची अशी स्थिति झालेली पाहून बिडाळाक्ष नांवाचा राक्षस महिषासुराला साह्य करण्यासाठीं हातांत एक प्रचण्ड वृक्ष घेऊन देवीच्या अंगावर धांवून गेला. आणि देवीला प्रहार करूं लागला. तेव्हां सिंहानें त्या नीच राक्षसाला एक चपेटा मारून भूमीवर लोळविलें, व नखानें त्याचें पोट फाडून त्याचीं आंतडीं बाहेर काढिलीं. त्यानंतर उद्‌ग्राक्ष नांवाचा महापराक्रमी राक्षस आपलें मुसळ घेऊन भगवतीवर धांवून गेला. तो जवळ आला असें पाहून देवीनें आपला त्रिशूळ त्याच्या हृदयावर मारिला. त्या प्रहारानें तो राक्षस जमिनीवर पडून पंचत्व पावला. याप्रमाणें अनेक शूर राक्षससेनापतींचा देवीनें संहार केल्यामुळें महिषासुर अधिक क्रुद्ध झाला; व त्यानें आपल्या पराक्रमाची शिकस्त केली. परंतु भगवतीच्या माऱ्यामुळें त्याला पाऊलभरही पुढें सरकतां येईना. मग त्यानें आपला रोख फिरवून एकदम देवांवर चाल केली. तेव्हां सर्व देव भयभीत होऊन दशी-

दिशेस पळूं लागले. नंतर देवीनें त्याला अडवून अगदीं हैराण करून टाकिलें. त्या दोघांची लढाई जेव्हां सुरू झाली, तेव्हां मेरू व मंदराचळ या दोन पर्वतांचें युद्ध होत आहे कीं काय, असें वाटूं लागलें. परस्परांचीं शस्त्रें एकमेकांवर आदळून अग्नीच्या ठिणग्यांचा वर्षाव होऊं लागला, संपूर्ण पृथ्वी त्रस्त होऊन गेली, व दशदिशांमध्यें वन्ही प्रदीप्त झाला. त्यामुळें सर्व प्राणि व्याकुळ होऊं लागले. सिंहही अतिशय हैराण झाला. तेव्हां देवीनें आपल्या सुरापात्रांतून थोडी सुरा सिंहाला पाजून शांत केलें, आणि त्यास महिषासुराला धरण्याची आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें सिंहानें एकदम उडी टाकून महिषासुरास पकडलें. तेव्हां भगवतीनें आपला विशाळ त्रिशूळ महिषासुराच्या हृदयावर मारिला. त्यासरसें महिषासुरानें महिषाचें रूप धारण केलें. तेव्हां देवीनें त्याच्यावर चढून त्यास ठार केलें. मग देवीनें आपलें भयंकर चक्र सोडून महिषाचे चारी पाय तोडिले, उदर फाडून आंतडीं बाहेर काढिलीं, शिंगें तोडून पर्वतावर फेंकून दिलीं, धड व पुच्छ सागरांत टाकून दिलें, कातडें पर्वताच्या दरींत टाकिलें, व रक्त मांस दशदिशांमध्यें फेंकून दिलें. याप्रमाणें, शांभवीनें महिषासुराचा नाश केल्यानंतर मोठ्यानें शंख व डमरू वाजविला व सुरापान करून ती आनंदानें डोलूं लागली. तिनें कांहीं सुरा आपल्या सिंहालाही पाजिली. त्यायोगें सिंहाचा थकवा जाऊन तोहि ताजा तवाना झाला, व उड्या मारूं लागला.

जगदंबेनें अशा रीतीनें महिषासुराला मारून सर्व देवांचें संकट दूर केल्यामुळें ते आनंदित होऊन जगदंबेचा जयजयकार करूं लागले. आकाशांत वाद्यांचा गजर होऊं लागला. देवांनीं पुष्पवृष्टी करून देवीचा फार गौरव केला. आपलें राज्य आपणास फिरून परत मिळालेलें पाहून इंद्रास अत्यंत आनंद झाला. तो भगवतीपुढें येऊन तिची स्तुति करूं लागला. तो म्हणाला, 'हे विश्वमूर्ते, आदिमाये तेजस्फूर्ते, भक्तवत्सले, तूं जगाचें संरक्षण करणारी असून दुष्ट, नीच, कपटी अशा असुरांचा संहार करणारी आहेस. बुद्धि व लक्ष्मी देणारी तूंच असून त्यांची वृद्धि करण्याचें सामर्थ्यही तुझेंच आहे. दुःष्टांना त्यांच्या दुष्कृतीमुळें तूं नरकांत लोटतेस आणि साधूंना मोक्षाची प्राप्ती करून देतेस. हे परात्परे, योगमाये, तूं या सर्व विश्वाचें मूळ आहेस. तूं त्रिगुणात्मक आहेस. तुझ्या संपूर्ण स्वरूपाची ओळख हरिहरांनांही होत नाहीं. हे शांभवी माते, तूं सर्वाधार असून सर्वांहून श्रेष्ठ आहेस. तूं हें संपूर्ण विश्व व्यापून उरली आहेस. हे आदिमाते भगवती, तूं या महिषासुराचा नाश करून हा रणयज्ञ दैत्यांचा आहुतीनें पूर्ण केलास, यामुळें सर्व विश्व सुखी झालें आहे. योगी तुजसाठीं तत्वज्ञानाचा अभ्यास करितात. तुझे चरण हेंच मोक्षभुवन होय. ऋग्वेद, यजुर्वेद साम व अथर्वण या वेदांचा इत्यर्थ तूंच असून सर्व शास्त्राचें सारही तूंच आहेस. जे तुझी पूजाअर्चा करितात,

त्यांना तूं संतति, संपत्ति व राज्यलक्ष्मी देतेस. तूं त्यांच्या सर्व संकटाचें निवारण करून शेवटीं त्यांना मोक्ष देतेस.'

याप्रमाणें इंद्रानें भगवतीची स्तुति केल्यावर सर्व देवांनीं देवीची पूजा केली. त्यांनीं मंगल वाद्यांच्या गजरांत तिला मंगलस्नान घालून चांगलीं वस्त्रें परिधान करण्यासाठीं दिलीं, व सुगंधी गंध लावून तिजवर दिव्य पुष्पांची वृष्टि केली. नंतर आरती करून नानाप्रकारच्या पक्वान्नांचा तिला नैवेद्य समर्पण केला, व तिची प्रार्थना करून देव म्हणाले, हे जगदंबे, त्वां पुन्हां कधीं संकट प्राप्त झाल्यास आमच्या करुणावाणीस हाक देऊन आमच्या साह्यासाठीं धांवून यावें. तेव्हां जगदंबा म्हणाली, 'संकटसमयीं तुम्हीं माझें स्मरण केलें असतां, मी तेथें प्रगट होऊन तुमच्या संकटाचें निवारण करीन' असें सांगून देवी अदृश्य झाली. मग सर्व देव आपापले स्थानीं जाऊन आपापले व्यवसाय करूं लागले.

### ३. शुंभनिशुंभराक्षसांची कथा.

महिषासुरराक्षसाचा नाश झाल्यानंतर पुष्कळ दिवसपर्यंत स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तिन्ही लोकचे व्यवहार सुरळीत चाललेले होते व सर्व विश्व सुखांत निमग्न होतें. परंतु पुढें शुंभ व निशुंभ नांवाच्या दोन क्रूर राक्षसांच्या जुलुमामुळें सर्वत्र अस्वस्थता पसरून पुन्हां सर्वांना दुःख प्राप्त झालें. ते शुंभनिशुंभराक्षस सख्खे बंधु असून हिरण्याक्ष राक्षसाचे पुत्र होते. विष्णूनीं वराह अवतार घेऊन हिरण्याक्षाचा नाश केला म्हणून या शुंभ निशुंभ राक्षसांना, देवांना जिंकून बापाचें वैर उगवावयाचें होतें, म्हणून ते ब्रह्मदेवाच्या प्रसन्नतेसाठीं तपश्चर्या करूं लागले. त्यांनीं दहाहजार वर्षेंपर्यंत मौन धारण केलें. ते नेहमीं निराहार करीत असत व ब्रह्मचर्यानें राहून भूमीवर शयन करीत असत. अशी कडकडीत तपश्चर्या केल्यामुळें ब्रह्मदेव त्यांना प्रसन्न होऊन म्हणाले, 'हे शुंभनिशुंभहो, तुमची ही निःसीम भक्ति पाहून मी तुम्हाला प्रसन्न झालों आहें. तर तुमची जी इच्छा असेल ती मला सांगा, मी मोठ्या संतोषानें पूर्ण करीन.' याप्रमाणें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून राक्षस ब्रह्मदेवाला म्हणाले, 'हे ब्रह्मदेवा, या संपूर्ण विश्वावर आमची सत्ता असावी. जगांतील कोणत्याही पुरुषाच्या हातून आम्हांस मृत्यु प्राप्त होऊं नये, एवढेंच आमचें मागणें आहे.' ब्रह्मदेव 'तथास्तु' असें म्हणून दोघांच्या मस्तकांवर वरदहस्त ठेवून सत्यलोकीं निघून गेले. त्या नीच राक्षसांना याप्रमाणें वरप्रदान मिळाल्यामुळें ते अत्यंत उन्मत्त झाले. हळूं हळूं एकेक देश जिंकून त्यांनीं सर्व पृथ्वी पादाक्रांत केली. पाताळलोक जिंकून तेथल्या राजांना त्यांनीं आपले दासानुदास केले. नंतर स्वर्गावर स्वारी करून तेथील सर्व लोकांस जिंकून ते स्वर्गलोकचें वैभव भोगूं लागले, व इंद्रादि सुरवरांना त्यांनीं आपले दासानुदास करून ते नीच राक्षस त्यांचा वारंवार मानभंग करूं लागले. याप्रमाणें त्या दुष्ट राक्षसांनीं त्रैलोक्य जिंकून सर्वत्र आपली सत्ता स्थापन केली. अशा-

रीतीनें संपूर्ण विश्व त्यांच्या ताब्यांत आल्यावर ते दुष्ट राक्षस लोकांवर अत्यंत जुलूम करूं लागले, व त्यांना अत्यंत छळूं लागले. त्यांच्या अनियमित व अन्यायी राज्यपद्धतीमुळें लोकांचें जीवित, वित्त व अब्रु हीं केव्हां नष्ट होतील याचा भरंवसा राहिला नाहीं. पुण्यकर्में बंद पडलीं, यज्ञयाग होईनासे झाले, देवांना हविर्भाग मिळेनात, व जिकडे तिकडे पाप वाढूं लागलें. याप्रमाणें संपूर्ण विश्व त्यांनीं पीडित करून सोडिलें. तेव्हां सर्व सुरवर अत्यंत त्रस्त होऊन त्यांनीं हिमवंताची करुणा भाकिली. ते म्हणाले, 'हे हिमालया, शुंभ व निशुंभ राक्षसांनीं आम्हांस जिंकून आमचीं राज्यें हरण केलीं, आम्हांस अमरावतीहून हांकून लाविलें, व आमचे हविर्भागही बंद केले. देवब्राह्मणांना अत्यंत त्रास देऊन सर्व त्रिभुवनास त्रस्त करून सोडिलें आहे तर हे हिमालया, या संकटाचा नाश कोणत्या उपायानें होईल तें आम्हांस कथन कर.' तेव्हां हिमालय इंद्राला आश्वासन देऊन म्हणाला, ' हे इंद्रा; भिऊं नकोस, धैर्य धर, तुझी विपत्ति लवकरच नाहींशी होईल अशी मी तजवीज करितों.'

हिमालय याप्रमाणें इंद्रादि सुरवरांना आश्वासन देऊन तेथून निघाला व त्रिपथगंगेंत जाऊन स्नान करून त्यानें शंकराचें स्तवन केलें. नंतर तो अंबिकेची स्तुति करूं लागला. तो हात जोडून अंबिकेला म्हणाला, ' हे देवी, महादेवी तुला नमस्कार असो. हे कल्याणकारिणी शांभवे, तुला नमस्कार असो. हे अंबिके, सिद्धिबुद्धि व चैतन्य स्वरूप तूंच आहेस. क्षुधा, निद्रा व तृषा यांना कारण तूंच आहेस. तूं तामसी असून शांत अशीही तूंच आहेस. हे पार्वती, तूं रति, कांति, दया, स्फूर्ति, प्रज्ञा व माया, यांचा आधार तूंच आहेस. हे आदिमाये, तूं साधूंचें संरक्षण करितेस, व दुष्टांचा नाश करितेस; हे जगदंबे, सर्व देव तुझे दासानुदास असून तुझे भक्त आहेत. हे देवी, तुझ्या भक्तांना दुष्ट शुंभनिशुंभ राक्षस फार त्रास देत आहेत, व संपूर्ण विश्व जिंकून ते देवब्राह्मणांवर अत्यंत जुलूम करीत आहेत. हे अंबे त्या दुष्टांचा तूं नाश कर व आपल्या या भक्तांचें संरक्षण कर. ते सर्व तुला शरण आले आहेत. हे देवि, ते तुझी अनन्यभावानें करुणा भाकीत आहेत. त्यांच्यावर कृपा कर व नवीन अवतार घेऊन त्या दुष्टांचा संहार कर.' याप्रमाणें हिमालयानें पार्वतीची विनंति करून शुंभनिशुंभराक्षसांची हकीकत कळविली. तेव्हां पार्वती अत्यंत क्रुद्ध झाली; तिच्या मुखापासून एक अत्यंत सुंदर व तेजस्वी स्त्री निर्माण झाली. उत्पन्न झालेली ही स्त्री जरी सुंदर होती, तरी तिचा चेहरा संतापानें लाल झालेला असल्यामुळें ती अत्यंत भयानक दिसत होती. तिचा वर्ण कृष्ण असल्यामुळें तिला ' कालिका ' असें म्हणूं लागले. अशा रीतीनें ' कालिका ' उत्पन्न झाल्यावर पार्वती हिमालयाला आश्वासन देऊन म्हणाली, ' हे हिमालया, तूं स्वस्थानीं जा व सर्व देवांनाही आपआपलें स्थानीं परत जाण्यास सांग. ही कालिका त्या शुंभनिशुंभ-

राक्षसांचा नाश करील व तुमचीं सर्व संकटें दूर करील.' याप्रमाणें पार्वतीचें भाषण ऐकून हिमालय परत आला, व त्यानें देवांना सर्व वृत्त कळविलें. तेव्हां सर्व देव आनंद मानून आपआपले स्थानीं निघून गेले.

इकडे शुंभनिशुंभराक्षस अमरावतींतील सिंहासनावर बसून राज्यकारभार करीत असतां, त्यांना भेटण्यासाठीं नारदमुनीची स्वारी तेथें आली. शुंभनिशुंभराक्षसांनीं त्यांचा फार सन्मान करून त्यांच्या आगमनाबद्दल आनंद दर्शविला. परस्परांचे कुशलप्रश्न झाल्यावर ते शुंभनिशुंभराक्षस नारदमुनीला म्हणाले, 'नारदमुनी, आपलें येण्याचें कारण काय? आपलें भ्रमण सर्व त्रिभुवनांत असतें, तर कांहीं अपूर्व आपले अवलोकनांत आलें असल्यास आम्हांस कृपा करून विदित करावें.' तेव्हां नारदमुनी म्हणाले, 'हे शुंभनिशुंभहो, तुम्ही सांप्रत त्रिभुवनाचे राजे आहांत. कुबेर व समुद्र हे तुमचे भांडारी आहेत, चतुरंग सैन्यही तुमच्या जवळ असंख्य आहे, तुम्हाला एक गोष्टीशिवाय कांहीं कमी असेल असें मला वाटत नाहीं. ती एक गोष्ट म्हणजे ही कीं, तुमच्या या वैभवाला योग्य अशी सुंदर स्त्री तुम्हां दोघांपैकीं एकालाही नाहीं, याबद्दल मला [illegible]र वाईट वाटतें. हे शुंभनिशुंभ राक्षसपतिहो, तुम्हांला शोभण्यासारखी एक [illegible] अवलोकनांत आली आहे. ती जर तुम्ही मिळवाल, तर तुमचे वैभवांत [illegible]चाही उणेपणा राहणार नाहीं. हिमालय पर्वतावर कालिका नांवाची एक स्त्री आहे. तिचें लावण्य अप्रतिम आहे. ती खरोखर त्रैलोक्य सुंदर [illegible]. तिला पाहून मृत प्राण्याचाही कामाग्नि प्रदीप्त होईल, मग सजीवांची तर काय? तुम्हीं दोघे प्रयत्न कराल तर ती स्त्री तुम्हाला सहज प्राप्त [illegible] तुमचें सौंदर्य, तुमची शक्ति व तुमचें वैभव पाहून ती तुम्हाला सहज [illegible]ल. कदाचित नच झाली तर तिला जबरदस्तीनें आणण्याची तुम्हाला [illegible]व. हे शुंभनिशुंभराक्षसहो, त्या कालिकेचें स्वरूप जर तुम्ही एकवार [illegible] तुम्हांस त्याच घटकेला तिच्या प्राप्तीचा प्रयत्न करावा असें वाटेल. [illegible]नुकतेंच तारुण्य प्राप्त झाल्यामुळें मदनही तिच्या प्राप्तीसाठीं लाळ घोटीत [illegible] अशा त्या अखिलमोहिनीला पाहून साधारण लोकांच्या मनावर तिच्या अवलोकनानें काय परिणाम होत असेल, याची तुम्हीच कल्पना करा. ती गायन, नर्तन, वगैरे सर्व कलांमध्यें निपुण असून, जणूं काय इंद्रनील मण्यांचीच मूर्ति तयार केली आहे, इतकी सतेज आहे. तिचें मुखकमल तर इतकें सुंदर आहे कीं, तें पाहून चंद्रानेंही लज्जित होऊन पळून जावें. तिचें वस्त्र भगव्या रंगाचें आहे तें पायघोळ नेसून ती उभी राहिली म्हणजे तिचें सौंदर्य कांहीं अपूर्व रीतीनें खुलून जातें. ती नेहमीं रेशमी कांचोळी अंगांत घालते. तिच्या गळ्यांत मोत्यांच्या माळा अक्षय रूळत असतात. तिचे ओंठ तांबडे लाल असून दांत डाळींबाच्या दाण्याप्रमाणें आहेत. तिचे केंस काळे कुळकुळीत

असून त्याची वेणी तिच्या पृष्ठभागावर मस्त सर्पिणीप्रमाणें रुळत असते. तिचा कटिप्रदेश मनोहर असून सिंहास लाजविणारा आहे. तिचें नाक चांफेकळीप्रमाणें असून त्यांत मोत्यांची नथ नभमंडळांतील ताऱ्यांप्रमाणें चमकत असते. ती आपल्या विशाल भालप्रदेशावर चंदन लावून त्यावर कुंकुम तिलक लाविते त्यावेळीं त्याची शोभा अपूर्व दिसते. तिच्या भृकुटी धनुष्याकार असून डोळ्यांचें तेज तर कांहीं विलक्षण आहे. तिच्या कानांत रत्नखचित फुलें असून तिचा केशकलाप मोत्यांनीं गुंफलेला आहे व कपाळावर मोत्यांची झालर आहे. सारांश त्या सुंदरीच्या स्वरूपाचें वर्णन करण्यास मी अगदीं असमर्थ आहें. अशी ती सुंदर स्त्री प्रयत्न करून तुम्ही अवश्य मिळवा, म्हणजे तुमच्या वैभवाला पूर्णता प्राप्त होईल.' याप्रमाणें कालिकेचें वर्णन करून नारदमुनी तेथून निघून गेले. नारदांनीं केलेलें वर्णन ऐकून त्या शुंभनिशुंभ राक्षसांना तिच्या प्राप्तीविषयीं उत्कट इच्छा उत्पन्न झाली, व ते दोघे त्या प्रयत्नाला लागले.

वैशंपायनऋषि जनमेजय राजाला सांगतात; हे जनमेजयराजा, हे शुंभनिशुंभ-राक्षस पूर्वजन्मी जालंधराचे पाशीं शुंभनिशुंभ याच नांवानें होते. त्यांनीं मायेची पार्वती तयार करून तिची शंकरा समक्ष विडंबना केली होती, म्हणून शंकरानें त्यांना शाप दिला होता कीं, 'तुम्हीं मायेची पार्वती करून तिची विडंबना केली याकरितां त्याच पार्वतीकडून तुमचा मृत्यु होईल.' महादेवाच्या त्या शापाची निवृत्ति होण्यासाठीं तेच राक्षस शुंभनिशुंभरूपानें पुन्हा जन्म पावले. पार्वतीच्या मुखापासून निघालेली ही कालिका, ती पूर्वीची कृत्रिम पार्वतीच

---

## अध्याय १६ वा.

### कालिका अवतार–पुढें चालू.

शुंभनिशुंभराक्षसांना नारदानीं कालिकेची आशा लावून दिल्यामुळें आपला विवाह कालिकेबरोबर केव्हां होईल व आपण तिच्या सहवाससुखाचा अनुभव केव्हां घेऊं, असें होऊन गेलें होतें. आपण कालिका सहज प्राप्त करून घेऊं असा त्यांना भरंवसा होता. मग शुंभ राक्षसानें आपल्या सुग्रीव नांवाच्या दूतास बोलावून सांगितलें कीं, 'सुग्रीवा, तूं मोठा विश्वासू असून फार चतुर आहेस, तुझ्या वाणींत नेहमीं मोहकपणा भरलेला आहे, याकरितां तूं हिमालय-पर्वतावर जा, व तेथें कालिका नांवाची एक स्त्री आहे, तिला माझ्या वैभवाचें, गुणाचें व स्वरूपाचें असें सुंदर वर्णन करून सांग कीं, तें ऐकतांच मजशीं विवाह करण्यास तिनें सहज तयार व्हावें. हें कार्य घडवून आणण्यासाठीं मी तुझी मुद्दाम योजना केली आहे. कारण दूत शहाणा असला म्हणजे तो प्रसंगास

अनुसरून निरनिराळ्या युक्त्या योजून कार्य घडवून आणितो. श्रीमंतांचा गौरव वाढण्यास केवळ शहाणे दूतच कारण असतात. यासाठीं तूं तिच्या प्राप्तीसाठीं माझा गौरव वाढवून तिला सांग व ती प्राप्त होईल असें कर. आपल्या घरीं कोणत्याही गोष्टीचें उणें नाहीं हें तिला नीट समजावून दे. माझें वैभव केवढें आहे हें तुला माहित आहेच, तें सर्व तिला सांग. घोडे, हत्ती, रथ, रत्नें, वस्त्रें, अलंकार यांना गणतीच नाहीं असें तिला कळीव. सूर्याचा उच्चैःश्रवा नांवाचा घोडा, इंद्राचा ऐरावत नांवाचा हत्ती, ब्रह्मदेवाचा हंसा वाहन आणि रथ, समुद्राची कमलमाला, कुबेराचें नीलवर्णछत्र हीं सर्व सांप्रत माझ्या जवळ आहेत. तसेंच अग्नीचें तेज, चंद्राच्या औषधी, यमाची मारकशक्ति इत्यादिकांवर आज माझी सत्ता आहे, हें तिच्या लक्षांत आणून दे. याप्रमाणें माझे अनेक गुण वानून ती मजबरोबर विवाह करण्यास तयार होईल, असें कर. इतकेंही करून जर ती विवाहाला तयार होणार नाहीं, तर तिला बलात्कारानें घेऊन ये.'
शुंभराक्षसाची अशी आज्ञा होतांच, तो [illegible] रावतीहून निघून कालिकेच्या भेटीसाठीं हिमालयपर्वतावर [illegible] न पूर्वींच कळलें होतें, म्हणून ती मुद्दाम दूताच्या मार्गावर येऊ[illegible] सली होती [illegible] कालिकेला
सुग्रीवानें मोठा आनंद दर्शविला, व आपण तुजकडे कांहीं काया[illegible]
आहों, असें सांगून त्यानें शुंभराक्षसाचें गुणवर्णन करण्यास आरंभ [illegible]
वेळ त्याची स्तुती केल्यानंतर तो म्हणाला, 'हे कालिके, तूं [illegible]
विवाह केल्यास तुला अमरावतीसारख्या रम्य शहरांत राहण्यास
विश्वाची स्वामिनी होशील. तुला जगांतील सर्व रत्नांचा उप[illegible] [illegible]ट पाहात होती. सर्वांत
आणि असें झालें असतां तुझ्या या सौंदर्याचें चीज होईल.[illegible] [illegible]नाला चांगली भिक्षा मि-
बोलणें ऐकन कालिकेला हंसूं आलें. व ती तिरस्कार दर्श[illegible] जण वांटून घ्या, असें उत्तर
अरे [illegible]दलें, त [illegible] [illegible]यांस हं[illegible]स असें वाटनें [illegible] कुंतीला म्हणाले, 'आई, ही
[illegible]दररोजच्या सारखा [illegible]सून आज सें दिस स्वयंवरांत स्त्री मिळाली आहे. तेव्हां तिची वांटणी कशी करितां येईल?' कुंती म्हणाली, 'माझें बोलणें खोटें होणार नाहीं. व्यासांनींही असेंच सांगितलें आहे; याकरितां त्याला आतां तुम्हीं बाध आणूं नका. तुम्ही पांचहीजण त्या स्त्रीचें पाणिग्रहण करा;' आईची आज्ञा पांडवांनीं मान्य केली. नंतर कुंतीनें द्रौपदीकडे अवलोकन केलें. द्रौपदीचें तें अप्रतिम सौंदर्य व तिची विनयसंपन्नता पाहून तिला फार समाधान वाटलें. द्रौपदीनें आपल्या सासूला नमस्कार केला. तेव्हां कुंतीनें तिला आशीर्वाद दिला. नंतर सर्वांनीं भोजन वगैरे आटोपून शयन केलें. इकडे द्रुपदराजाला, भिक्षेकऱ्यांनीं पण जिंकून नेल्यामुळें वाईट वाटत होतें; पण क्षत्रियांना लाजविणारा असा त्यांचा पराक्रम पाहून त्याला संशय उत्पन्न झाला. हे खरोखरी भिक्षुक नसून द्रौपदीहरणासाठीं आलेले देव असावेत असें त्यास वाटलें.

आहे, हें जर तुला पसंत नसेल तर मला बलात्कारानें तुला घेऊन जावें लागेल याचा विचार कर. आपण होऊन आपल्या हातानें कां विटंबना करून घेत आहेस? ज्या शुंभराक्षसाचे घरीं लक्षावधी रथी महारथी वीर आहेत; ज्याच्याजवळ अपरंपार सैन्य आहे, ज्यानें सर्व देवांना जिंकून बंदींत टाकिलें आहे, ज्यानें आपल्या बाहुबलानें आज त्रिभुवनावर आपली सत्ता स्थापन केली आहे, त्याला तुझ्यासारख्या अबलेला नेण्यास किती वेळ लागणार? म्हणून म्हणतों, त्या शुंभराक्षसाच्या पराक्रमाचा, त्याच्या वैभवाचा व सत्तेचा कांहीं विचार कर आणि त्याच्या गळ्यांत माळ घालून त्रिभुवनांत धन्य हो.' हें ऐकून कालिका अधिक क्रुद्ध होऊन म्हणाली, 'अरे सुग्रीवा, ज्याच्या सैन्याची व सेनानीची तूं एवढी प्रौढी गात आहेस, त्या शुंभराक्षसास जर मजबरोबर विवाह करावयाचा असेल तर त्यानें मजबरोबर युद्धास तयार व्हावें, व माझा पराभव करावा.' कालिकेचें तें निदानीचें भाषण ऐकून तो सुग्रीवराक्षस स्तब्ध झाला व तेथून निघून शुंभराक्षसाकडे आला. त्या[illegible]ासास कालिकेचा निरोप अक्षरशः सांगितला. तो ऐकून शुंभराक्ष[illegible]प झाला[illegible]; व त्यानें धूम्राक्ष ना[illegible]ंवाच्या [illegible]ाला कालिके[illegible] जबरदस्ती[illegible]ून येण्याची आज्ञा केली.

## २. चामुंडानामाभिधान.

[illegible]क्षराक्षस शुंभराक्षसाच्या आज्ञेप्रमाणें आपणाबरोबर साठ हजार पायदळ घेऊन हिमालयपर्वतावर आला. कालिकेला सैन्याची [illegible] तिनेंही युद्धाची तयारी केली. तिनें आपलीं हजार आयुधें [illegible]र आरोहण केलें, व धूम्राक्षराक्षस जवळ येत [illegible] समोर पाहिल्यावर तो उन्मत्त राक्षस [illegible]

[illegible] घेण्या[illegible] सप्तऋषींला दि[illegible] करण्यास हरकत नाहीं. [illegible] परंतु द्रुपदराजाला ती गोष्ट खरी वा[illegible] इतक्यांत व्यास व धौम्यऋषी तेथें आले. त्या दोघां[illegible] [illegible]प्रसंग [illegible] असतो, तेव्हां त्यांनींही धर्माप्रमाणें द्रौपदीचा पांचांबरोब[illegible] का[illegible] हरकत नाहीं, असें सांगितलें. तथापि द्रुपदास तसें [illegible]कर दिसेना, मग व्यासानें स्वर्गलक्ष्मीची व पांच इंद्रांची कथा सांगून, पूर्वनियमाप्रमाणें द्रौपदीचा पांच पतीबरोबर विवाह होणेंच अवश्य आहे, अशा रितीनें द्रुपदराजाची समजूत केली. पण ती हकीकत द्रुपदराजाला खरी वाटेना. तेव्हां व्यासांनीं त्याच्या डोळ्यांवर हात ठेवून त्याला दिव्यदृष्टि दिली. तेव्हां त्यास पांच पांडव हे पांच इन्द्र व द्रौपदी ही स्वर्गलक्ष्मी आहे, असें कळून आलें. मग द्रुपदराजानें द्रौपदीचा पांडवांबरोबर मोठ्या समारंभानें विवाह केला. त्यामुळें स्वर्गांतील सुरवरांना हर्ष झाला. त्यांनीं मंगल वाद्यांचा गजर करून पांडव व द्रौपदी यांच्यावर पुष्पवृष्टि केली. द्रुपदराजानें जांवयांस दास, दासी, हत्ती, घोडे, रथ, वस्त्रें, अलंकार व अनेक देश आंदण दिले. त्यावेळीं कुंतीनें द्रौपदीला 'तूं महा साध्वी होऊन तुझी कीर्ति सर्वत्र होईल. लोक तुझ्या नांवाचा प्रात:कालीं

विशाल देह प्रचंड पर्वताप्रमाणें दिसूं लागला, तिचा मुकुट आकाश मंडपाचें विदारणच करीत आहे कीं काय, असें दिसूं लागलें. धूम्राक्षराक्षसाकडे तिनें एकवार क्रुद्ध दृष्टीनें अवलोकन करून भयंकर गर्जना केली. ती गर्जना म्हणजे प्रळयकाळचें मेघांचें ओरडणेंच होय. त्या भयंकर शब्दानें दशदिशा दणाणून गेल्या, समुद्र उंचबळून आला, व पर्वत हादरूं लागले. धूम्राक्षराक्षस तें कालिकेचें विक्राल रूप पाहून मनांत दचकला, तथापि न भ्याल्यासारखें दाखवून त्यानें आपल्या सैन्याला कालिकेवर हल्ला करण्याचा इषारा केला. त्याबरोबर कालिकेवर हजारों शस्त्रें येऊन पडूं लागलीं, व बाणाची वृष्टी होऊं लागली. पण कालिकेला त्याची कांहींच क्षिती वाटली नाहीं. तिनें त्या सर्व शस्त्रास्त्रांचा नाश करून राक्षससैन्यावर शस्त्रांचा भयंकर मारा चालविला. देवीचा सिंहही हत्तीवर क्षणोक्षणीं तुटून पडून हजारों हत्तींचा संहार करीत होता. याप्रमाणें थोडा वेळ युद्ध झालें नाहीं तोंच धूम्राक्षराक्षसाचें पुष्कळ सैन्य मरून पडलें, व हजारों वीर कालिकेच्या भीतीनें रणावरून पळून जाऊं लागले. कांहींना तर सिंहानें मध्येंच खाऊन टाकिलें. तो धूम्राक्षराक्षस कालिकेच्या समोरून निघून जाण्याची शिकस्त करीत होता, परंतु देवीकडून होणाऱ्या शस्त्रांच्या माऱ्यापुढें त्याला पळून जाण्यास मार्ग मिळेना. कालिकेनें याप्रमाणें धूम्राक्षास अगदीं त्याकूळ करून आपलें मुसळ त्याच्या हृदयावर मारिलें, व त्याला यमपुरीला पाठवून दिलें.

धूम्राक्षराक्षसाचा सर्व सैन्यासह याप्रमाणें मोड झाल्यावर जे कांहीं थोडे फार सैनिक राहिले होते, ते रणावरून पळून अमरावतीस गेले व त्यांनीं रणांगणावर घडलेली एकंदर हकीकत शुंभनिशुंभराक्षसांना सांगितली. ती ऐकून ते शुंभनिशुंभराक्षस कालिकेवर अत्यंत क्रुद्ध झाले. त्यांनीं चंड व मुंड या दोन राक्षसांना पुष्कळ सैन्यासह लढाई करण्यासाठीं पाठवून दिलें. ते चंड व मुंड राक्षस फार पराक्रमी होते. आपण कालिकेचा सहज पराभव करूं, असा त्यांना भरंवसा होता. 'आम्ही कालिकेला बांधून आतां आपणासमोर आणतों' अशी प्रतिज्ञा करून ते मोठ्या वीरश्रीनें निघाले. हिमालयावर येऊन त्यांनीं आपल्या सैन्याचे निरनिराळे भाग केले; व कालिकेच्या शरीरासभोंवतीं सैन्याचा वेढा घालून सर्वांनीं एकदम कालिकेवर हल्ला केला. कोणी तलवार घेऊन धांवला, कोणी बाणाची वृष्टि करूं लागला, कोणी कालिकेला त्रिशूळानें टोंचूं लागले, कित्येक राक्षस मोठाले वृक्ष तोडून घेऊन त्यांनीं मारूं लागले, कित्येक कालिकेच्या अंगावर मोठाले पर्वत उचलून फेकूं लागले, याप्रमाणें सर्व राक्षसांनीं एकच गर्दी केली; परंतु त्यापासून कालिकेच्या एका रोमालाही धक्का लागला नाहीं. त्या राक्षसांचा उन्मत्तपणा पाहून महाकाली अत्यंत क्रोधायमान झाली. संतापातिरेकानें तिचे डोळे विरतवाप्रमाणें लाल झाले होते. तिच्या हातांतलीं शस्त्रें विजेप्रमाणें चमकत होतीं. नुकत्याच मारलेल्या राक्ष-

सांच्या मुंडक्यांची माळ तिनें आपल्या गळ्यांत घातली होती. राक्षसांच्या रक्त-प्राशनाच्या इच्छेनें ती आपली जिव्हा क्षणोक्षणीं बाहेर काढीत होती. तिनें या वेळीं सिंहचर्म परिधान केलें होतें. राक्षसांवर रोंख धरून आपला त्रिशूळ ती गरगर फिरवीत होती. क्रोधानें मधून मधून ती जेव्हां गर्जना करी, तेव्हां तर ते महापराक्रमी चंडमुंडराक्षसही भीतीनें थरथर कांपत असत. कालिकेनें राक्षसांवर जेव्हां आपल्या शस्त्रास्त्रांचा भयंकर मारा चालू केला, तेव्हां रणांगणावर राक्षसांच्या कलेवरांचे ढीगचे ढीग पडले. त्यामुळें रणावर प्रत्यक्ष मृत्यूचीच मूर्ति प्रगट झाली असून ती आपल्या भयंकर जबड्यांत जो राक्षस येईल तो घेत चालली आहे, असें वाटूं लागलें. इकडे सिंहानेंही राक्षसांना सळो कीं पळो असें करून टाकिलें होतें. हजारों घोडे, व हजारों हत्ती, मारून टाकून सहस्रावधी रथ त्यानें आपल्या पंजाच्या आघातानें मोडून टाकिले होते. याप्रमाणें प्रसंग पाहतांच राक्षससैन्य रणांवरून पळूं लागलें. परंतु पळून जाणारांना सिंह आपल्या भयंकर नखांनीं फाडून टाकीत होता व देवी जो हातीं सांपडेल त्याला पर्वतावर आपटून मारून टाकीत होती. राक्षससैन्याचा असा विलक्षण संहार पाहून चंडराक्षस कालिकेवर मोठ्या त्वेषानें धांवून गेला. तेव्हां देवीनें त्यावर आपलें भयंकर चक्र सोडिलें, पण राक्षसानें तें तोडून देवीशीं अगदीं अंगलगट केली. तेव्हां देवीनें आपला त्रिशूळ फेंकून त्याला खालीं पाडिलें, तो चंडराक्षस खालीं पडतांच सिंहानें त्याचें हृदय फाडलें व यथेच्छ रक्त प्राशन केलें.

चंड राक्षस मरून पडलेला पाहून त्याचा बंधु जो मुंडराक्षस त्याला अत्यंत क्रोध आला. त्यानें रागानें एक मोठा पर्वत उचलून देवीच्या मस्तकावर फेंकून दिला, परंतु देवीनें पर्वत मस्तकावर पडण्याचे अगोदरच आपल्या हातांतली गदा त्यावर मारून त्याचें चूर्ण करून टाकिलें. नंतर देवी हातांत भयंकर वज्र घेऊन राक्षसाच्या अंगावर धांवून गेली, आणि सिंहाला मद्य पाजून त्यालाही तिनें मुंड राक्षसाच्या अंगावर सोडून दिलें. सिंहानें वेगानें जाऊन तो दुष्ट राक्षस आपल्या मुखांत धरिला, आणि देवीनें वज्राचा आघात करून त्याचें शिर धडापासून वेगळें केलें. याप्रमाणें चंड व मुंड राक्षसांचा नाश केला, म्हणून कालिकेला तेव्हांपासून चामुंडा असें नांव प्राप्त झालें.

## ३ रक्तबीज राक्षसाची कथा.

चंडमुंडराक्षसांचा याप्रमाणें नाश झाल्यावर जे राक्षस रणावरून जीव घेऊन पळून गेले होते, त्यांनीं शुंभनिशुंभराक्षसांना, तो रणांगणावरील दुःख-कारक वृत्तांत सांगितला. ती हकीकत ऐकून शुंभनिशुंभराक्षसांना चंडमुंडासारखे आपले चांगले वीर मेल्याबद्दल फार वाईट वाटलें. त्यांच्याजवळ ‘ रक्त-बीज ’ नांवाचा एक फार शूर व युद्धविद्येंत निपुण असा राक्षस सेनापति होता. तो अपजय घेऊन केव्हांही परत यावयाचा नाहीं, असा शुंभनिशुंभराक्षसांना

भरंवसा असल्यामुळें त्यांनीं कालिकेबरोबर युद्ध करण्यासाठीं त्याची योजना करून, विपुल सैन्यासह त्याला हिमालयावर पाठवून दिलें. रक्तबीजानें त्या युद्धाची जबाबदारी आपणावर मोठ्या उत्साहानें घेतली. 'कालिकेला एक धरून तरी आणीन, किंवा रणांत तिचा संहार तरी करीन.' अशी प्रतिज्ञा करून तो निघाला; आणि युद्धांत ज्यांचा कधीं पराभव झाला नाहीं व जे कधीं जय मिळविल्यावांचून रणावरून परतले नाहींत, असे कोट्यावधी वीर त्यानें आपणाबरोबर घेतले. त्याच्याबरोबर एकंदर सहा पद्मे सैन्य होतें. शिवाय सहस्रावधी हत्ती, सहस्रावधी घोडे व सहस्रावधी रथ होते. याप्रमाणें प्रचंड सैन्य घेऊन तो रक्तबीजराक्षस हिमालयपर्वतावर आला, व त्यानें आपलीं भयंकर रणवाद्यें वाजवून कालिकेला युद्धास आव्हान केलें. तेव्हां कालिकाही सिंहावर बसून मोठ्या वेगानें रणांगणावर आली. कालिकेला पाहतांच राक्षसांनीं तिजवर शस्त्रांचा भयंकर मारा सुरू केला. तेव्हां कालिकेनें आपलें धनुष्य हातीं घेतलें व राक्षसांवर कोट्यावधी बाणांची वृष्टि सुरू केली. देवीचा एकही बाण फुकट न जातां प्रत्येक बाणानें हजारों राक्षस मृत्युमुखीं पडूं लागले. याप्रमाणें राक्षस मुंग्याप्रमाणें जेव्हां पटापट मरूं लागले, तेव्हां राक्षससैन्यांत एकच हाहाःकार उडाला, परंतु इतक्यांत राक्षससैन्यास आणखी मदत मिळाली व त्या दोघांनीं मिळून पुन्हा निकराचा देवीवर हल्ला केला. तेव्हां कालिका अत्यंत संतप्त झाली. क्रुद्ध होतांच तिच्या शरीरापासून तेहतीस कोटी देवांच्या देहधारी शक्ति उत्पन्न झाल्या. प्रथम आद्यशक्ति ब्रह्माणी उत्पन्न झाली. ती हंसावर बसली होती, व तिच्या हातांत अक्षमाळा, कमंडलु व ब्रह्मसूत्र होतें. नंतर माहेश्वरी निर्माण झाली. तिला पांच मुखें होतीं, व तिच्या हातांत त्रिशूळ, डमरू, वगैरे आयुधें होतीं, ती बैलावर बसलेली होती. नंतर कुमारिका षडाननी उत्पन्न झाली. ती मोरावर बसलेली होती, व तिच्या हातांत शंखचक्रादि आयुधें होतीं. यज्ञशक्ति वराहवाहनासह निर्माण झाली. इंद्रशक्ति जी निर्माण झाली ती हत्तीवर बसून रणांत आली. याप्रमाणें तेहतीस कोटी देवता निर्माण होऊन त्या आपआपल्या आयुधांनीं राक्षसांना एकसारख्या पंचत्वाला पाठवूं लागल्या. असा राक्षसांचा भयंकर संहार चालू झाल्यावर क्षणांत कोट्यावधि राक्षस मेले, व कांहीं पळून गेले. अशा रीतीनें थोडक्याच वेळांत सर्व रणांगण राक्षस–शून्य दिसूं लागलें. तो प्रकार पाहून रक्तबीज अत्यंत संतप्त झाला, व आपल्या सैन्यास धीर देऊन पुन्हा युद्ध करूं लागला. तेव्हां सर्व देवता राक्षसांवर तुटून पडल्या. माहेश्वरी त्रिशूळानें मारूं लागली, वैष्णवी चक्रें सोडून राक्षसांना पंचत्वाला पाठवूं लागली, षडाननी शक्तीनें मारूं लागली, इंद्रायणी आपलें वज्र फिरवूं लागली, वराही दांतांनें राक्षसांना तोडूं लागली, नारसिंही नखांनीं राक्षसांना फाडून खाऊं लागली. याप्रमाणें प्रत्येक देवशक्ती राक्षसांचा संहार करूं लागली. हें पाहून रक्तबीजानें कालिके-

बरोबर युद्ध करण्यासाठीं धूम्र व जटिल या नांवाचे दोन पराक्रमी सेनापति पाठवून दिले. ते मदोन्मत्त राक्षस हत्तीप्रमाणें खवळून कालिकेवर एकदम तुटून पडले. कालिकेनें दोघांनांही एकाच वेळीं धरून आकाशांत गरगर फिरविलें व जोरानें भूमीवर आपटून मारून टाकिलें.

दोघांनांही मेलेले पाहून तो रक्तबीजराक्षस आपणाबरोबर निवडक सैन्य घेऊन त्या सर्व देवतांवर एकदम चाल करून आला. तेव्हां कालिका व तिच्या अंगापासून उत्पन्न झालेल्या त्या देवता त्या रक्तबीजराक्षसावर आपल्या शस्त्रांचा मारा करूं लागल्या. इंद्रायणीनें अगदीं त्याच्या जवळ जाऊन आपलें भयंकर वज्र त्या रक्तबीजराक्षसाचे मस्तकावर जोरानें मारिलें. वज्रप्रहारानें त्याचें मस्तक फुटून त्यांतून रक्त वाहूं लागलें. तें रक्त जमिनीवर पडतांच त्यापासून शेंकडों वीर उत्पन्न झाले. त्यांचा रंग वगैरे सर्व हुबेहूब रक्तबीजासारखें होतें. त्यांचीं आयुधेंही रक्तबीजाच्या आयुधाप्रमाणें होतीं. ते राक्षस उत्पन्न झाल्याबरोबर कालिकेवर तुटून पडले. कालिका व त्या देवता असंख्य राक्षसांस यमसदनास सारख्या पाठवीत होत्या, परंतु राक्षसांची संख्या कमी न होतां उलट अधिकाधिक वाढूं लागली. सरतेशेवटीं त्यांची वाढ इतकी झाली कीं, जिकडे तिकडे राक्षसच राक्षस होऊन गेले. तो विलक्षण प्रकार पाहून सर्व देवता भयभीत होऊन पळूं लागल्या. आकाशांत हा युद्ध–चमत्कार पाहण्यासाठीं आलेल्या देवांनां तर ' दे माय धरणी ठाय ' होऊन गेलें. ते देवीची स्तुति करूं लागले. चंडिकेलाही या राक्षसांचा संहार कसा करावा, याचा क्षणभर विचार पडला. नंतर तिनें त्या सर्व देवतांस जवळ बोलावून सांगितलें कीं, हा रक्तबीजाच्या रक्ताचा प्रभाव आहे. त्याचें रक्त जमिनीवर पडतांच त्यापासून राक्षस उत्पन्न होतात. याकरितां त्याच्या रक्ताचा भूमीस स्पर्श न होईल असें केलें पाहिजे. म्हणून मी त्याच्यावर शस्त्रप्रहार करितें व तुम्हीं त्याचें सर्व रक्त प्राशन करा, म्हणजे नवीन राक्षस निर्माण होणार नाहींत. चंडिकेची ती सल्ला सर्वांना पसंत पडली. मग चंडिकेनें रक्तबीजावर सारखा शस्त्रांचा प्रहार सुरूं केला, व देवतांनीं राक्षसांचें रक्त प्राशन करण्याचा सपाटा चालविला. अशा रीतीनें त्यांनीं रक्तबीजास रक्तरहित करून यमसदनास पाठविलें, आणि त्याच्या रक्तापासून उत्पन्न झालेल्या सर्व राक्षसांचा निःपात केला.

## ४. शुंभनिशुंभराक्षसांचा वध.

रक्तबीज मेला असें पाहून सर्व देवांनां मोठा आनंद झाला. त्यांनीं जयजयकार करून कालिकेवर पुष्पवृष्टि केली. रक्तबीजाची निधनवार्ता ऐकून शुंभ-निशुंभराक्षसांना रक्तबीजासारखा शूर सेनापति हरपल्याबद्दल फार वाईट वाटूं लागलें. ज्या कालिकेनें एवढा अनर्थ केला, तिचा त्यांना ह्यावेळीं अत्यंत राग आला, व तिचा सूड कसा उगवावा, याचा त्यांना

मोठा विचार पडला. शेवटीं दोघेही सर्व राक्षससैन्य बरोबर घेऊन मोठ्या वेगानें हिमालयपर्वतावर आले. राक्षसांच्या त्या प्रचंड सैन्यानें तो विशाल हिमालयपर्वत डळमळूं लागला. सैन्याच्या चालण्यानें पृथ्वी कंपायमान होऊं लागली, रणवाद्यांनीं दशदिशा कोंदून गेल्या, धुळीनें आकाश भरून गेलें, आणि जिकडे नजर फेंकावी तिकडे राक्षससैन्य दृग्गोचर होऊं लागलें. राक्षसांचें तें प्रचंड सैन्य पाहून कालिकेला व तिच्या सोबतिणी देवतांना मोठा आनंद झाला. कालिकेनें आपल्या सिंहाला आज्ञा करतांच तो तिला आपल्या पृष्ठ-भागावर घेऊन निघाला, व राक्षससैन्यांत शिरून शुंभराक्षससमोर आला. कालिकेला पाहिल्याबरोबर शुंभराक्षस मोठ्यानें गर्जना करून म्हणाला, 'हे कालिके! तुझा पण पुरा करून तुला जिंकण्यासाठीं मी स्वतः आलों आहें. आजवर पाठविलेल्या माझ्या सेनापतींना तूं कपटानें मारून टाकलेंस, परंतु आतां माझ्याशीं गांठ आहे. इंद्रादिक देवही माझ्यापुढें येण्यास भितात, तेथें तुझा पाड काय? अजूनही सावध हो. युद्ध करून निष्कारण अवहेलना करून घेण्यापेक्षां माझ्याबरोबर विवाह कर, म्हणजे मी तुला सन्मानानें अमरावतीस घेऊन जाईन.' शुंभाचें भाषण ऐकून कालिका म्हणाली, 'मूर्खा, उगीच वल्गना करण्यांत क[illegible] तात्पर्य? पराक्रम करून दाखीव!' असें म्हणून कालिकेनें शुंभराक्षसा[illegible] [illegible]णवृष्टि करण्यास आरंभ केला. तेव्हां शुंभराक्षसही क्रुद्ध होऊन देवीवर [illegible]ाप्रमाणें शरवृष्टि करूं लागला. त्याच्या शरवृष्टीनें आकाशांत बाणाचें छत[illegible]लें आहे कीं काय असें दिसूं लागलें. सूर्य झांकून जाऊन पृथ्वीवर अंधार पडला. नंतर चंडिकेनें त्या सर्व बाणांचा नाश केला. नंतर शुंभासुरानें देवीवर अग्न्यस्त्र सोडिलें. त्या अस्त्रप्रभावानें जिकडे तिकडे अग्नीच्या ज्वाळा धडकूं लागल्या, देव आपलीं विमानें दूर पळवूं लागले, सर्व विश्व उष्णतेनें तडफडूं लागलें व जिकडे तिकडे एकच हाहाःकार उडून गेला. तें पाहून चंडिकेनें पर्जन्यास्त्र सोडून अग्न्यस्त्राचा नाश केला. नंतर शुंभासुरानें वाय्वस्त्र सोडिलें, तेव्हां चंडिकेनें पर्वतास्त्र सोडून त्याचा परिहार केला. अशा रीतीनें त्यांचें युद्ध चाललें होतें. देवीनें आपला त्रिशूळ गरगर फिरवून शुंभासुरावर फेकला. त्रिशूळप्रहारानें शुंभराक्षस मूर्च्छित होऊन भूमीवर पर्वताप्रमाणें धाडकन पडला. त्या शुंभराक्षसाचा बंधु निशुंभ हा त्याच्या मागेंच होता. बंधूला मूर्च्छित पडलेला पाहून तो कालिकेवर एखाद्या चवताळलेल्या वाघाप्रमाणें धांवून आला. तेव्हां कालिकेनें बाण सोडून त्याच्या रथाचे घोडे मारून टाकले. राक्षस विरथ झाल्यामुळें हातांत गदा घेऊन कालिकेवर चालून आला. तेव्हां त्या दोघांचें गदायुद्ध सुरूं झालें. कालिकेनें त्याची गदा चूर्ण करून क्षणार्धांत त्याला मागें परतविलें. मग तो त्रिशूळ घेऊन धांवला. तेव्हां देवीनें आपल्या त्रिशूलानें त्याच्या त्रिशूलाचे तुकडे केले व तरवारीनें वार करून त्यास जमिनीवर

पाडिलें. जमिनीवर पडतांच सिंहानें त्याच्या अंगावर उडी टाकून आपल्या नखांनीं त्याचें शरीर शतखंड करून टाकिलें.

इकडे शुंभ राक्षस मूर्छित पडला होता तो सावध होऊन पाहतो तों, कालिकेनें आपल्या बंधूला मारिलें असून सिंह त्याचें मांस तोडून खात आहे. तो प्रकार पाहतांच शुंभ राक्षस फार संतप्त झाला व तो कालिकेबरोबर पुन्हां युद्ध करूं लागला. तेव्हां कालिका अत्यंत संतप्त होऊन म्हणाली, 'अरे नीचा, तूं मजबरोबर विवाह करण्यास आला आहेस नाहींका ? दुष्टा, तुझा विवाह आतां या रणभूमीबरोबर लावून देतें. याठिकाणीं तुझें रक्त हेंच या विवाहांतील उटणें, त्रिशूळ हेंच तुझें बाशिंग, आणि यमदूत तुला उचलून नरकलोकीं नेतील तीच तुझी वरात. अशारीतीनें माझ्या अभिलाषाचे उट्टें काढितें.' असें म्हणून कालिकेनें शुंभराक्षसावर अर्धचंद्र बाण सोडला. त्या बाणानें शुंभाचें धनुष्य मोडून गेलें व रथाचे घोडे मेले. सारथ्याची तीच अवस्था झाली, व रथ मोडून चूर झाला. तेव्हां शुंभासुरानें एक मोठा पर्वत उचलून चंडिकेवर टाकिला. चंडिकेनें त्या पर्वताचें वरच्यावरच चूर्ण करून टाकिलें; व देवीनें चंद्राप्रमाणें दीप्तिमंत भयंकर शस्त्र शुंभराक्षसाच्या अंगावर सोडिलें, पण शुंभानें गदेनें त्याचा नाश करून टाकिला. नंतर त्या दोघांचें मल्लयुद्ध सुरू झालें. तेव्हां सर्व सुरवर आश्चर्यचकित होऊन गेले. शेवटीं कालिकेनें त्या दुष्ट [illegible]साला खालीं पाडून त्याच्या हृदयावर वज्रमुष्टि मारून त्याला ठार केलें. शुंभ राक्षस मेला असें पाहून सुरवरांना अत्यंत आनंद झाला. ते [illegible] करूं लागले, व–उदो उदो–म्हणून त्यांनीं देवीचा जयजयकार केला. [illegible] प्रजा दुःखरहित झाली. सर्व व्यवहार योग्यरीतीनें चालूं लागल्यामुळें सर्वत्र आनंद होऊन गेला.

---

## अध्याय १७ वा.

### भगवतीचा निरोप.

शुंभनिशुंभ राक्षसांचा नाश होऊन सर्वत्र आनंदी आनंद झाल्यावर ब्रह्मा, विष्णु, महेश, सूर्य, चंद्र, इंद्र, वरुण वगैरे सर्व देव देवीच्या दर्शनाला आले, व तिला वंदन करून म्हणाले, 'हे आद्यशक्ति अंबिके, तुझा जयजयकार असो, माते जगदंब, तूं आदि, मध्य व अंत्यरहित आहेस. हे जगदुद्धारिणी, हे ब्रह्मनिष्ठे सदाचारिणी, या सर्व स्थावर व जंगम विश्वावर तुझीच सत्ता आहे. सर्वांच्या कार्यांची सिद्धि करणारी तूंच आहेस. सर्वांना मंगलबुद्धि देणारी तूंच आहेस. हे चांडिके, कार्यकारणस्वरूपी सर्वत्र तूंच आहेस. आम्ही सुखप्राप्तीसाठीं जीं अनेक क्रियाकर्मे करीत आहों, ती केवळ तुझीच कृपा होय. हे अंबिके, साधूंचें संरक्षण

करणारी तूंच आहेस. हे देवि, विघ्नांचा नाश करणारी तूंच आहेस. हे विश्वे-श्वरी, अन्नपूर्णे, त्रिपुरारी, हे विश्वबीजे, परममाये, तूं सर्व जगाची स्थिति, उत्पत्ति व लय करणारी आहेस. तूं अनंतरूप आहेस. भुक्ति, मुक्ति, माया, विद्या या सर्व तूंच आहेस. हे वैष्णवी, नारायणी, सर्वार्थ सिद्ध करून देणारी सर्व मंगळा तूंच आहेस. पद्मा, सारंगा, शांभवी, गौरी, वगैरे हीं सर्व तुझींच रूपें आहेत. हे कालिके, हे जगदुद्धारिणी अंबिके, जसें या वेळीं आमचें संरक्षण केलेंस, तसेंच पुढेंही संकटसमयीं प्रगट होऊन तूं आमचें संरक्षण कर, तूं या विश्वाची माता असून आम्हीं सर्व तुझीं लेंकरें आहोंत. आमच्यावर प्रेम ठेवून आमच्या विपत्तीचा तूं नाश करीत जा, एवढीच तुला आमची अनन्यभावें प्रार्थना आहे.'

यांप्रमाणें सर्व देवांची स्तुति ऐकून भगवती प्रसन्न होऊन म्हणाली, 'भक्तहो मी आपल्या भक्तांच्या संरक्षणासाठीं सदैव तत्पर राहीन. जेव्हां तुम्हांला संकट प्राप्त होईल तेव्हां तुम्हीं माझें स्मरण करा, म्हणजे मी प्रगट होऊन तुमच्या विघ्नांचा नाश करीन. आतां यापुढें अठ्ठावीस युगांनीं म्हणजे द्वापार युगांत वैवस्वत मन्वंतर असतांना, हेच शुंभनिशुंभ राक्षस पृथ्वीवर पुन्हा उत्पन्न होतील व हल्लींप्रमाणेंच ते देव व मानव यांना त्रस्त करतील, त्यावेळीं मी वसुदेवदेवकीच्या उदरीं जन्म घेऊन त्यांचा नाश करीन. त्यावेळीं माझा वर्ण रक्तासारखा लाल असेल, दांत इंद्रगोप [illegible]प्रमाणें तांबडे असतील, म्हणून त्यावेळीं मला रक्तदंतिका हें नांव प्राप्त होईल. त्यानंतर कित्येक वर्षांनीं पृथ्वीवर मोठें अवर्षण पडेल, व शंभर वर्षेपर्यंत पाऊस न पडल्यामुळें हाहाःकार होऊन जाईल त्या वेळीं मी अवतार घेऊन जिकडे तिकडे धन-धान्याची संवृद्धि करीन. त्या वेळीं मला शाकंभरी असें म्हणतील. मग मी कित्येक वर्षांनीं सतनेभी या नांवानें प्रगट होऊन राक्षसांचा नाश करीन व तुम्हां सर्वांचें संकट दूर करीन. त्यानंतर मी दुर्गा या नांवानें प्रगट होऊन दुष्टांचा नाश करीन, व नंतर भीमादेवी म्हणून प्रगट होईन. त्यानंतर कित्येक वर्षांनीं पृथ्वीवर पुन्हां राक्षस उन्मत्त होतील व त्यांच्या जुलमानें सर्व त्रिभुवन त्रस्त होईल त्या वेळीं मी भुंग्याचें रूप घेऊन सर्व राक्षसांनां मारून टाकीन, त्यावेळीं मला भ्रमरशक्ति असें म्हणतील. यांप्रमाणें मी वेळोवेळीं प्रगट होऊन तुमचें संकट दूर करीन. इंद्रादि देव हो, जेव्हां पृथ्वीवर राक्षस उन्मत्त होऊन तुम्हांला त्रास देऊं लागतील, त्या वेळीं तुम्ही माझें स्मरण करा, म्हणजे मी प्रकट होऊन तुमच्या संकटाचें निवारण करीन व दुष्टांचा संहार करीन. तसेंच जो कोणी माझें हें व्रत नेहमीं करील त्याला विघ्नांचा संसर्ग मी कधींही होऊं देणार नाहीं. आश्विन शुद्ध प्रतिपदेचे दिवशीं घटस्थापन करून त्यावर माझी मूर्ति स्थापन करावी, व नऊ दिवस भक्तिभावानें भजनपूजन करून नववे दिवशीं हवन करावें.

माझा उत्साह प्रत्येक वर्षी याप्रमाणें जो करील त्याचें दुःख, दरिद्र, कष्ट वगैरे सर्व आपत्ति दूर होतील, मी स्वतः खड्ग धारण करून माझ्या भक्तांचें संरक्षण करीन. मधूकैटभ, शुंभनिशुंभ वगैरे राक्षसांचा संहार करून मी जसें आपल्या भक्तांचें आजवर संरक्षण केलें, तसेंच पुढेंही करीन. मी आपल्या भक्तांनां मोक्ष देईन व दुष्टांचा नाश करीन. जो माझें भजन पूजन करील, जो माझ्या नांवानें कीर्तन करील, जो माझ्या मंत्रानें प्रेमपूर्वक होम करील, जो माझें माहात्म्य पठन करील, त्याच्यापासून मी क्षणभरही दूर होणार नाहीं. त्याच्या दुःखाचा नाश करीन, तसेंच ग्रह, व भूत–पिशाचादिकांच्या पीडेपासून त्यांचें मी सतत संरक्षण करीन.' आश्विन, माघ अथवा चैत्र या महिन्यांत जो माझा नऊ दिवस उत्सव करील, त्यास कोणतीही पीडा होणार नाहीं. हें माझें व्रत ब्राह्मण, शूद्र, वैश्य या सर्वांनीं करावें. ज्ञातिधर्माप्रमाणें मला नैवेद्य समर्पण करावा. याप्रमाणें केलें असतां त्यांच्या घरीं मी सतत लक्ष्मी रूपानें वास करीन. याप्रमाणें देवीनें सर्व देवांनां वर देऊन ती अदृश्य झाली. नंतर सर्व देवही आनंदित होऊन आपआपल्या स्थानीं निघून गेले.

याप्रमाणें वैशंपायन ऋषींनीं सांगितलेली कथा ऐकून जनमेजय राजा म्हणाला, 'ऋषि, देवता अवतार घेऊन या राक्षसांचा वारंवार संहार करितात तरी हे राक्षस पुनः उत्पन्न होतात याबद्दल मला मोठें आश्चर्य वाटतें, व अशी शंका येते कीं, हे राक्षस पुनःपुन्हा उत्पन्न होतात कसे? तर कृपा करून ही माझी शंका दूर करावी.' राजाचें [illegible] ळें ऐकून ऋषि म्हणाले, 'राजा, जगांत ज्याप्रमाणें छाया व [illegible] किंवा दिवस व रात्र; नेहमी असतात, त्याचप्रमाणें सुष्ट व दुष्ट हे असतात. [illegible] तविक रक्त व दूध हें एकच आहे. रक्तापासूनच दूध तयार होतें. त्याप्रमा[illegible] [illegible]ष्ट व दुष्ट हेही एकच आहेत. ते केवळ प्रकृतीनें भिन्न असतात. ज्यांची वृत्ती तामसी असते, जे क्रूर प्रकृतीचे असतात. ज्यांचे विचार नीच असतात, जे क्षुद्र बुद्धीचे असतात, त्यांनां राक्षस असें म्हणतात, आणि जे सात्विकगुणी असतात, ज्यांचे विचार उदात्त असतात, जे दयाळू असतात, जे परोपकार बुद्धीचे असतात, त्यांनां सज्जन सुष्ट किंवा देव असें म्हणतात. दुष्टांचा ओढा पापकृत्यांकडे असतो व सुष्टांचें लक्ष पुण्यकर्मांकडे असतें. केव्हां केव्हां दुष्टांचा जय होतो, व त्यांचीच सर्वत्र सत्ता होते, परंतु लवकरच त्यांचा नाश होतो व शेवटीं सज्जनांचाच जय होतो. हे जनमेजयराजा, ही मार्कंडेय पुराणांतली कथा मार्कंडेय ऋषींनीं पूर्वी इंद्राला सांगितलेली, तीच आज मी तुला कथन केली आहे. ही कथा जो भक्तिभावानें श्रवण करील त्याच्या सर्व पातकांचा नाश होईल, व इहलोकच्या सर्व सुखाचा उपभोग घेऊन अंतीं तो मोक्षपदास जाईल.

**पांचवें स्तबक संपूर्ण.**

---

# कथाकल्पतरु.



## स्तबक ६ वा.

### अध्याय १ ला

#### मंगलाचरण.

हे मंगलमूर्ति गजानाना, तुला मी साष्टांग [illegible] र करितों, हे जगन्माते सरस्वती मी तुल. [illegible]दन करितों, आणि ज्या गुरू[illegible] [illegible]नें मी हा ग्रंथ लिहिण्याचें कार्य करीत आहेत, त्या गुरुलाही मी अनन्य[illegible]वानें अनंत प्रणाम करितों. हे सर्वेश्वरा, नारायणा, हे त्रिजगतपरिपूर्ण अनंता, हे ब्रह्माधीशा परमहंसा, तुझा जयजकार असो. हे ज्योतीरूपा चतुरंगा गुणप्रकाशा, तूं चारी मुक्तींचा दाता असून प्रळयकाळीं सर्वांचा लय करणाराही तूंच आहेस. हे त्रिविक्रमरूपा, परमेश्वरा, तं [illegible] [illegible]दिक[illegible] [illegible]वरण [illegible] तूं य[illegible] [illegible] स्थान व आदिबीज

# अध्याय

## १. जंबुद्वीपवर्णन व नी.

एके दिवशीं जन राजा वैशंपायनऋषीला म्हणाला, 'वैशंपायनऋषि, या विशाल विश्वाविषयं विचार करावा, तों तों मनुष्य मुग्ध होऊन अधिक घोटाळ्यांत पडत .वेश्वाच्या रचनेविषयीं अनेक प्रकारचे विचार मनांत येतात, परंतु त्या तात्विक ज्ञान नसल्यामुळें त्याविषयीं कांहींच ठाम मत होत नाहीं, कळतही नाहीं. तर, आपण या विश्वस्थितीविषयीं मला कांहीं माहिती ावी. पृथ्वी, आकाश, स्वर्ग, मृत्यु, पाताळ, सप्तसागर, मेरू वगैरे पर्वत, गा वगैरे नद्या, ध्रुवमंडळ, यांविषयीं मला कांहींच माहिती नाहीं, तर यांची समग्र माहिती आपण मला सांगितल्यास माझें अज्ञान दूर होऊन माझ्या मनांत ज्या वारंवार निरनिराळ्या शंका निर्माण होतात, त्याही नाहींशा हो ल.' जनमेजयराजाची अशी इच्छा ऐकून शंपायनऋषि म्हणाले,

'असन त्यासंबंधानें

'केतुमाल खंड'; चवथ्यास 'हिरण्मयखंड'; पांचव्यास 'कुरूखंड'; सहाव्यास 'रमणक खंड'; सातव्यास 'भद्राश्वखंड'; आठव्यास 'इलावृत्त' व नवव्या खंडास 'हरिवर्ष खंड' असें म्हणतात. जंबुद्वीपाचा विस्तार एक लक्ष योजनें आहे. कमळाला ज्याप्रमाणें देंठाचा आधार असतो, त्याप्रमाणें पृथ्वीला मेरु पर्वताचा आधार आहे. या मेरुपर्वतामुळें सूर्यापासून पृथ्वीचें संरक्षण होत आहे. आकाशमार्गानें सूर्याचा रथ वेगानें धांवूं लागला, म्हणजे फार मोठा वारा सुटतो. जर पृथ्वीला मेरूचा आधार नसता तर त्या वाऱ्यानें केव्हांच पृथ्वीचा नाश झाला असता. मेरुपर्वताचा आधार असल्यामुळें पृथ्वी तो झंझावात सहज सहन करूं शकते. मेरुपर्वताची मुळापासून मस्तकापर्यंत उंची एक लक्ष योजनें आहे. तो सोळा हजार योजनें भूमींत असून बाहेर चौऱ्यायशीं हजार योजनें आहे. मेरु पर्वताचा आकार लोहाराच्या ऐरणीसारखा खालीं बारीक व वर मोठा असा आहे, हें मागें सांगितलें आहेच. या पर्वताच्या मुळाचा परिघ अर्ध योजनाचा असून त्याचें मस्तक बत्तीस योजनें परिघाचें आहे. हा पर्वत पृथ्वीचे मध्यस्थानीं आहे. तो ज्या खंडांत आहे, त्यास इलावृत्त खंड असें म्हणतात. या इलावृत्त खंडामध्येंच मेरुपर्वताच्या सभोंवतीं लहान लहान आणखी चार पर्वत आहेत. पहिल्या पर्वताचें नांव मंदर असें आहे. दुसऱ्या पर्वताचें नांव मेरुमंदर असें आहे, तिसऱ्या पर्वताचें नांव सुपार्श्व असें असून चौथ्या पर्वताचें नांव कुमुद असें आहे. यांपैकीं मंदर पर्वत पूर्वेस आहे व मेरुमंदर पश्चिमेस आहे. सुपार्श्व दक्षिणेस आहे व उत्तरेस कुमुद पर्वत आहे. [illegible] या पर्वतांवर अनुक्रमानें आंबा, जांबुळ, कदंब व वट असे मोठे वृक्ष आहेत. त्यांचीं मस्तकें आकाशमंडपाला जाऊन लागलीं आहेत. प्रत्येक वृक्षाचा विस्तार शतयोजनाचा आहे. प्रत्येक वृक्षाखालीं एक एक याप्रमाणें चार डोह देवांनीं तेथें तयार करून ठेविले आहेत. पहिल्या डोहांत दूध भरलें आहे, दुसरा डोह मधुरसानें भरलेला आहे, तिसरा डोह इक्षुरसानें भरलेला आहे, आणि चौथ्या डोहांत गोडें पाणी आहे. या डोहांच्या सभोंवताल असलेल्या भागाला निरनिराळीं नांवें आहेत. पयरसाच्या सभोंवतालच्या प्रदेशाला नंदनवन असें म्हणतात, मधुरसा सभोंवतालच्या प्रदेशाला चित्ररथवन असें म्हणतात, इक्षुरसा सभोंवतालच्या प्रदेशाला सर्वतोभद्रवनें, व जलरसा सभोंवतालच्या प्रदेशाला वैभ्राजकवन असें म्हणतात. तेथें चारी वर्णांचे ऋषि आपल्या स्त्रियांसह राहतात, तसेंच देवगणही तेथें येऊन क्रीडा करितात. वर आंबा, जांबुळ, वगैरे जे चार वृक्ष सांगितले, त्यांना हत्तीएवढालीं विशाल फळें येतात. हीं फळें मोटीं विलक्षण असतात. त्यांना साल असते व बीही नसतें. हीं मधुर व रुचकर फळें, हेंच देवांचें भोजन होय. शिवाय या फळांच्या अंगीं असा विलक्षण गुण आहे कीं, ज्यांना तीं भक्षण करण्यास मिळतात, त्यांना जरा व मृत्यु कधींही प्राप्त होत नाहींत, व कोणत्याही

प्रकारच्या व्याधी जडत नाहींत. या फळांतून भूमीवर गळत असलेल्या रसानें वर सांगितलेले चारी डोह भरून जाऊन बाहेर मोठमोठ्या नद्या वाहूं लागल्या आहेत. आम्रफळांच्या रसापासून जी नदी निघाली आहे, तिला ‘ अरुणोदा ’ असें म्हणतात. ही नदी इलावृत्त खंडांतून पूर्व दिशेनें वाहात गेली आहे. जांबुळाच्या फळांच्या रसापासून निघालेली नदी दक्षिण दिशेनें कांहीं अंतर वाहात जाऊन पुढें त्याच पर्वतांत मुरून गेली आहे. या नदीला जांबुनद असें म्हणतात. या नदीच्या आसपासची जी माती तेंच सुवर्ण होय. या नदीचे दोन्ही कांठ सुवर्णाचे आहेत असें म्हणतात. ही नदी इलावृत्तखंडांत असल्या-मुळें देव व देवांगना यांना सुवर्णाचा मुळींच तोटा पडत नाहीं. तेथील सुवर्ण अत्यंत पवित्र असतें असें मानतात. कदंबाच्या फळांपासून रस गळून जें सरोवर निर्माण झालें आहे, त्यापासून पंचमधुधारा नांवाची नदी उत्पन्न होऊन ती केतुमाल नांवाच्या खंडांत वाहत गेली आहे. त्या नदीच्या पाण्याचा असा एक विलक्षण गुण आहे, कीं तें पाणी पिणाऱ्या इसमाच्या अंगाचा सुगंध दहा योजनेंपर्यंत सारखा वाहत जातो, व तें पाणी पिणाऱ्या इसमाची कांती उज्वल होते. वटवृक्षाच्या फळांपासून रस गळून जें सरोवर उत्पन्न झालें आहे, त्यापासून दहा नद्या उत्पन्न होऊन उत्तरदिशेला वाहात गेल्या आहेत. या नद्यांपासून दुध, दहीं, तूप, अन्न, मधु, शर्करा, शय्या, आसन, वस्त्रें व अलंकार, अशा दहा वस्तु प्राप्त होतात. इलावृतखंडांत अशा प्रकारच्या अनेक गुणांच्या नद्या असल्यामुळे त्या खंडांतले लोक जरा, मृत्यु व व्याधी यां-पासून अलिप्त असून स्वेच्छाचारी, शांत व सतेज असे आहेत.

मस्तकावर प्रचंड वृक्ष असलेले जे चार पर्वत मेरुपर्वतासभोंवतीं आहेत म्हणून सांगितलें, ते मेरुचे हातपाय आहेत असें म्हणतात. या चार पर्वतांशिवाय मेरुपर्वताच्या सभोंवतीं लहान लहान अनेक पर्वत आहेत. कमलपुष्पामध्यें जसे बारीक बारीक केसर असतात, त्याप्रमाणेंच मेरुसभोंवतीं हे पर्वत आहेत; म्हणून त्यास मेरुकेसर असें म्हणतात. मेरुचे मुख्य केसर एकवीस आहेत. त्यांचीं नांवें:—कपिल, शिनीवास, कुरंग, वेकंक, त्रिकूट, पतंग, रुचक, निषध, [illegible], देवकूट, हंस, वैडूर्य, कुरर, जारुधि, नारद, शिशिर, ऋषभ, कुसुंभ, [illegible], [illegible] व आदि; अशीं आहेत. हे पर्वत, कमलकेसराप्रमाणें मेरुपर्वतासभोंवतीं पसरले आहेत. ह्यांची उंची अठरा हजार योजनें असून स्थूलता दोन हजार योजनांची आहे. या पर्वतांशिवाय आणखी आठ पर्वत आहेत. यांची उंची मागीलप्रमाणें अठरा हजार योजनें असून स्थूलता दोन हजार योजनें आहे. यां पकीं जठर व देवकूट नांवाचे पर्वत पूर्वदिशेला आहेत, पवन व पारियात्र हे पश्चिम दिशेला आहेत, कैलास व करवीर हे दक्षिण दिशेला आहेत, [illegible] त्रिशृंग व मकर हे उत्तर दिशेला आहेत. हेही पर्वत इलावृत खंडांतच मोड-

तात. या सर्व पर्वतावर निरनिराळ्या देवतांची निरनिराळीं निवासस्थानें आहेत. मेरू पर्वताच्या मध्य शिखरावर ब्रह्मदेवाचें राहण्याचें ठिकाण आहे, त्यास सत्य लोक असें म्हणतात. तो सत्यलोक सुवर्णमय असून त्यांत शहरें दहा हजार आहेत. मेरु पर्वतावर आठ दिशेला आठ दिक्पाळांचीं राहण्याचीं ठिकाणें आहेत. पूर्व दिशेला इंद्रलोक आहे. तेथें इंद्र आपल्या ऐरावतासह राहतो. इंद्रलोकाचा विस्तार अडीच हजार योजनें आहे. इंद्रलोक हा सर्व सुवर्णाचा तयार केलेला आहे. आग्नेय दिशेला अग्निनारायणाचें राहण्याचें स्थान आहे. अग्नीचें वाहन मेंढा आहे. ईशान्य दिशेला महादेवाचें स्थान असून त्याचें वाहन बैल आहे. दक्षिण दिशेला यमराजाचें स्थान असून त्याचें वाहन हेला आहे. पश्चिम दिशेला वरुण रहात असून त्याचें वाहन सुसर आहे. नैर्ऋत्य दिशेला डुकरावर बसणारा निर्ऋति नांवाचा दिक्पाळ राहतो. प्रभंजन नांवाचा दिक्पाळ वायव्य दिशेला रहात असून त्याचें वाहन ससा आहे. याप्रमाणें हे आठ दिक्पाळ सुवर्णमय मेरूपर्वतावर आठ दिशेला राहातात. इन्द्रलोकांप्रमाणें प्रत्येक दिक्पाळाच्या स्थानाचा विस्तार अडीच हजार योजनें असून तीं सर्व स्थानें सुवर्णाचीं आहेत. नवखंड पृथ्वी मेरूपर्वताच्या सभोंवती आहे.

या पृथ्वीच्या नऊ खंडांसभोंवतीं सात सागरांचे वेढे आहेत. स्वायंभुव मनूला प्रियव्रत नांवाचा एक मुलगा होता. त्यानें पूर्वी रथांत बसून सात वेळ पृथ्वीप्रदक्षिणा केली, त्या वेळीं रथाच्या धांवांनीं मोठमोठे सात खंदक तयार झाले. त्यांसच सप्तसागर असें म्हणतात. हे जनमेजय राजा, आतां तुला या जंबु द्वीपाची रचना कशी आहे, तें सांगतों. नील, श्वेत, शृंगवान, वगैरे आठ पर्वतांच्या योगानें पृथ्वीचे नऊ भाग झालेले आहेत, हें तुला पूर्वी सांगितलें आहेच. या नऊ खंडामध्यें पहिलें इलावृत खंड होय. या इलावृत खंडाचा विस्तार नऊ हजार योजनें असून तेथें संकर्षण नांवाचा देव राहतो. त्या संकर्षणानें हें सर्व विश्व आपल्या मस्तकावर मोहरी प्रमाणें धारण केलें आहे. हा संकर्षण महादेवाची पूजा करीत असतो. ब्रह्मा; विष्णु व त्रिपुरारी हे तिन्ही देव या संकर्षणापासून उत्पन्न झाले आहेत. इलावृत खंडाच्या पूर्व दिशेला भद्राश्व नांवाचें दुसरें खंड आहे. तेथें हयग्रीव नांवाचा देव राहत असून त्याचा भद्रश्रवा नांवाचा भक्त आहे. या भद्राश्व खंडांत जे लोक राहतात त्यांचीं मुखें घोड्यांच्या मुखांसारखीं आहेत. हें भद्राश्व खंड अकरा हजार योजनें विस्तीर्ण आहे. त्याची एक बाजू समुद्राला जाऊन लागली आहे, व त्याच्या तिन्ही बाजूला नील, गंधमादन व निषध हे पर्वत आहेत. इलावृत खंडाच्या पश्चिम दिशेला जें खंड आहे, त्याचें नांव केतुमाल असें आहे. या केतुमाल खंडाचे पश्चिमेस समुद्र असून पूर्वेस माल्यवान नांवाचा पर्वत आहे, दक्षिणेस निषध पर्वत आहे व उत्तरेस नील पर्वत आहे. या केतुमाल खंडाचा राजा कामदेव हा

असून त्याची देवता लक्ष्मी आहे. यमानें आपल्या अकरा हजार सुंदर मुली कामदेवालाच दिल्या आहेत. त्या स्त्रियाही आपल्या पतीप्रमाणें लक्ष्मीला आपलें दैवत मानून तिची सेवा करितात. या केतुमाल खंडाचाही विस्तार अकरा हजार योजनें आहे. इलावृत खंडाचे उत्तर दिशेला 'रमणक' नांवाचें खंड आहे. या खंडाचे दक्षिण दिशेला नील पर्वत आहे व उत्तरेस श्वेत पर्वत आहे. पश्चिम व पूर्व दिशेस सागर आहे. या खंडाचा विस्तार अकरा हजार योजनें आहे. या खंडांत मनु नांवाचा राजा राहत असून तो मत्स्यरूपी भगवंतास आपली आराध्य देवता समजतो. या रमणक खंडाचे उत्तर दिशेला हिरण्मय नांवाचें खंड आहे. या खंडाचाही विस्तार अकरा हजार योजनें आहे. या खंडाचे दक्षिण दिशेला श्वेतपर्वत आहे व पूर्व आणि पश्चिम बाजूसहि समुद्र आहे. उत्तरेस शृंगवान नांवाचा पर्वत आहे. या खंडांत सर्व पितरांचा राजा जो अर्यमा तो राज्य करितो. त्याची आराध्य देवता कूर्म देव ही आहे. या हिरण्मय खंडाचे उत्तर दिशेला कुरु खंड आहे, त्याचा विस्तार पूर्वीप्रमाणेंच आहे. या खंडाचे दक्षिण दिशेला शृंगवान नांवाचा पर्वत असून बाकी तिन्ही दिशेला समुद्र आहे. या खंडाची देवता वराहावतार ही असून पृथ्वि ही तिचा भक्त आहे. इलावृत खंडाचे दक्षिण दिशेला हरिवर्ष नांवाचें खंड आहे. या खंडाचे उत्तरेस निषध पर्वत असून पूर्वेस व पश्चिमेस समुद्र आहे. दक्षिण दिशेला हेमकूट नांवाचा पर्वत आहे. या हरिवर्ष खंडाचाही विस्तार पूर्वींच्या खंडाइतकाच आहे. तेथें प्रल्हाद या नांवाचा राजा राहतो. त्याची आराध्य देवता लक्ष्मीनरसिंह आहे. या हरिवर्ष खंडाचे दक्षिणेस किंपुरुष खंड आहे. या किंपुरुष खंडाचा विस्तार अकरा सहस्र योजनें आहे. या खंडाचे उत्तर दिशेला हेमकूट पर्वत आहे, दक्षिणेस हिमालय पर्वत आहे, व पूर्व व पश्चिम या दोन्ही दिशेला समुद्र आहे. या खंडाची देवता श्रीरामचंद्र ही असून, हनुमंत हा भक्त आहे. या खंडांत बहुतेक वानरांचीच वस्ती आहे. या किंपुरुष खंडाचे दक्षिणेस जे नववें खंड आहे, त्या खंडाला भरतखंड असें म्हणतात. या भरत खंडाचे उत्तरेस हिमालय पर्वत असून दक्षिण, पश्चिम व पूर्व या तिन्हीं दिशेला समुद्र आहे. या भरतखंडाचाही विस्तार अकरा हजार योजनेंच आहे, व या खंडाची आराध्य देवता नरनारायण आहेत. या देवतेचा भक्त नारदमुनी हा आहे. प्रत्येक खंडाचा विस्तार अकरा हजार योजनें जरी मानला आहे, तरी त्या सभोंवार असलेल्या पर्वतांनीं प्रत्येकांतील दोन हजार योजनें भूमि व्याप्त केली असल्यामुळें प्रत्येक खंडांतील भूमीचा निव्वळ विस्तार नऊ हजार योजनांचाच आहे. ज्या अष्टाचलांमुळें पृथ्वीचे नऊ भाग झाले आहेत, तो प्रत्येक पर्वत दोन हजार योजनें स्थूळ असून अठरा हजार योजनें उंच आहे, हें मागें सांगितलेंच आहे. भरत खंडाच्या उत्तर सीमेवर जो हिमालय नांवाचा पर्वत आहे, तो आपल्या

नांवाप्रमाणेंच केवळ बर्फाचा पर्वत आहे. त्यामुळें त्या पर्वतावर थंडी अत्यंत असते. त्या हिमालय पर्वतावर नउशें धनुष्यें, इतक्या मर्यादेंत तर थंडी अत्यंत असते. ती मर्यादा ओलांडून पलीकडे जाण्यास अत्यंत धाडसी असा मनुष्य सुद्धां समर्थ नाहीं; मग इतरांची ती कथा काय ?

स्वायंभुव मनूचा पुत्र जो प्रियव्रत राजा, त्याच्या रथचक्राच्या आघातानें पृथ्वी फाटून जे सात भाग झाले होते, त्यांसच समुद्र असें म्हणतात, असें भागवतांत सांगितलें आहे. हें ऐकून जन्मेजय राजा म्हणतो, समुद्रास सागर असें म्हणण्याचें कारण काय, तें कृपा करून सांगावें. तें ऐकून वैशंपायनऋषि म्हणाले, राजा, समुद्राची उत्पत्ति सगरापासून झालेली आहे म्हणून त्यास सागर असें म्हणतात. सगर राजाचे पुत्र, यज्ञवारु गुप्त झाल्यामुळें त्याचा शोध करूं लागले, तेव्हां त्यांस असें समजलें कीं, तो पाताळांत आहे. तेव्हां पाताळांत जाण्याकरितां ते पृथ्वी उकरूं लागले. त्यांनीं पृथ्वींतील मृत्तिका उकरून इकडेतिकडे टाकिल्यामुळें अष्ट क्रमानें अष्ट दिशेला उपद्वीपें निर्माण झालीं. त्यांत पूर्व दिशेला सुवर्णप्रस्थ नांवाचें द्वीप निर्माण झालें. नंतर चंद्रशुक्र, आवर्तन, रमणक, मंदरहरिण, सिंहल, पांचजन्य व लंका हीं उपद्वीपें उत्पन्न झालीं. हीं आठ उपद्वीपें व नऊ खंडें मिळून जंबुद्वीप असें म्हणतात. जंबुद्वीपासभोंवतीं लवण समुद्राचा वेढा आहे. त्याची रुंदी एक लक्ष योजनें असून खोली तितकीच आहे. वैशंपायन म्हणतात, राजा आतां या भरत खंडांत ज्या नद्या व पर्वत आहेत त्यांचीं नांवें तुला सांगतों. या भरतखंडामध्यें चित्रकूट, वेंकट, सह्याद्री, नील, गोवर्धन, ब्रह्मगिरी, पारियात्र, ऋक्षगिरी, शुक्तिमान, कूटक, मंगलप्रस्थ, मलयाद्री, त्रिकूट, मैनाक, देवगिरी, ऋषभ, कोल्लक, द्रोणगिरी, वारिधार, महेंद्र, विंध्याचल, गोकामुख, इंद्रकील, ऋषिशृंग, श्रीशैल, रैवत आणि कामागिरी हे पर्वत मुख्य आहेत. ह्याशिवाय आणखीही पुष्कळ पर्वत आहेत, परंतु ज्या पर्वतापासून प्रसिद्ध प्रसिद्ध नद्या निघाल्या आहेत, तेवढ्यांचींच नांवें तुला सांगितली. आतां नद्यांचीं नांवें सांगतों. चंद्रवशा, ताम्रपर्णी, अवटोदा, यमुना, कृष्णा, रेवा, कृतमाला, वेणी, शर्करावर्ता, वैहायसी, गोमती, पयस्विनी, भीमा, तुंगभद्रा, पयोष्णी, निर्विंध्या, नर्मदा, नंदिनी, शोणभद्रा, सुरसा, सुषोमा, गोदावरी, शतद्रु, चंद्रभागा, कावेरी, मरुद्वृधा, वितस्ता, महेंद्री, सिंधुरंध, असिक्नी, विश्वस्ता, सत्यवती, तापी, शरयू, रोधस्वती, कौशिकी, ऋशिकुल्या, चर्मण्वती, मंदाकिनी, दवती, त्रिसामा, दृषद्वती, महानदी, सरस्वती, वैतरणी, वगैरे अनेक नद्या या भरतखंडांत आहेत त्यांतील प्रसिद्ध नद्यांचीं नांवें तुला सांगितलीं. यापैकीं, यमुना, सरस्वती व सिता-गंगा या वेदमुनीच्या नद्या आहेत; यामुळें या भरतखंडाचें माहात्म्य विशेष आहे. हे जनमेजय राजा, या पृथ्वीमध्यें अनेक खंडें आहेत हें मी तुला सांगितलें आहेच, परंतु या सर्व खंडांमध्यें भरतखंडाची

थोरवी कांहीं विलक्षण आहे. या खंडांत पर्जन्य योग्य कालीं पडत असल्यामुळें धान्य चांगलें पिकतें. या खंडांतील हवा फार मजेची आहे. या खंडाला कर्म-भूमि असें म्हणतात. या खंडांत वर्णाश्रम धर्मानें राहून शुभ कर्म केलें असतां अंतीं मोक्षपदाची प्राप्ति होते. येथें इंद्रादि देवहि कर्मबंधनामुळें जन्म घेतात व कर्माप्रमाणें योग्य वैभवाचा उपभोग घेतात. हा कर्ममार्ग आक्रमिण्यास ज्ञान अवश्य लागतें. ज्ञान हें कर्मसमुद्र तरून जाण्यास साधनरूप एक नौकाच आहे. या नौकेच्या आश्रयानें हजारों श्रद्धावान लोक हा भवसमुद्र तरून पार गेले आहेत.

---

## अध्याय ३ रा.

### १. विश्वोत्पत्ति कथा.

मागील कथा ऐकून जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; 'वैशंपायन ऋषि, आपण सांगितलेली कथा ऐकून मला संपूर्ण ब्रह्माण्डविषयक कथा ऐकण्याची फार उत्कंठा झाली आहे, याकरितां ह्या ब्रह्मांडासंबंधाची संपूर्ण माहिती आपण मला सांगावी. ह्या विशाल आकाशांत अनंत तारे आहेत, अनेक ग्रह आहेत, चंद्रसूर्य आहेत, या सर्वांचे अनेक प्रकार दिसतात. यापैकीं कांहीं तारे मोठे आहेत, तर कांहीं लहान आहेत. कांहीं स्वच्छ प्रकाशयुक्त आहेत तर कांहीं अंधक आहेत. कांहीं अधिक कृष्णवर्ण आहेत तर कांहीं तांबुस रंगाचे दृष्टीस पडतात. हे चमत्कार पाहिले म्हणजे अंतःकरण अगदीं गुंग होऊन जातें, व ईश्वराच्या अघटित घटनेचें त्यास फार आश्चर्य वाटतें, तेव्हां हे ऋषिवर्या या विषयींची सर्व हकीकत मला सांगून माझ्यावर कृपा करावी. राजाची इच्छा जाणून वैशंपायन ऋषि त्यास विश्वोत्पतीची कथा सांगू लागले. म्हणाले:—

पूर्वी महादेव व पार्वती कैलास पर्वतावर खेळत बसले असतां ब्रह्मदेव तेथें येऊन त्यांच्या समोर बसला व मंत्र म्हणूं लागला. मंत्रप्रभावानें एकाएकीं वारा सुटला त्यायोगें पार्वतीनें परिधान केलेलें वस्त्र उडालें व तिचें नग्न शरीर ब्रह्मदेवास दिसलें. तें विलक्षण सौंदर्य पाहून ब्रह्मदेवास काम विकार उत्पन्न होऊन त्याचें रेत स्खलन झालें. त्या रेतापासून वालखिल्यादि साठ हजार ऋषि उत्पन्न झाले. तो प्रकार पाहून सर्वदेव तेथें आले, व ब्रह्मदेवास परस्त्रीचा आभिलाष केल्यावद्दल दोष देऊं लागले. नंतर सर्वजण ब्रह्मदेवास प्रायश्चित्त देऊन शुद्ध करितां येईल किंवा नाहीं, याचा विचार करूं लागले. तेव्हां देवगुरू

बृहस्पति म्हणाला, देवहो, ब्रह्मदेवानें फक्त नेत्रानें परस्त्री अभिलाषिली आहे तेव्हां याला प्रायश्चित्त देऊन शुद्ध करितां येईल. बृहस्पतींनीं असें सांगितल्यावर सर्व देवांची काळजी दूर झाली व ते ब्रह्मदेवाला प्रायश्चित्त देण्याची तयारी करूं लागले. सर्व देवांनीं पांचहीं तत्वें एकत्र करून त्यापासून पाणी उत्पन्न केलें, आणि त्यानें ब्रह्मदेवास सचैल स्नान घालून त्यास शुद्ध केलें. ब्रह्मदेव शुद्ध झाल्यामुळें सृष्टीचे व्यापार पुन्हा सुरळीत चालूं लागले.

ज्या पंचतत्वाच्या पाण्यानें ब्रह्मदेवास शुद्ध केलें त्याच पाण्यानें भरलेला कमंडलू पुढें कित्येक वर्षेंपर्यंत ब्रह्मदेवाजवळ तसाच होता. पुढें पृथ्वीवर ज्या वेळीं बळीराजा अत्यंत उन्मत्त झाला, त्यावेळीं भगवंतानीं बळीचा नाश करण्यासाठीं वामन अवतार घेतला, व बळीजवळ येऊन संध्या वगैरे करण्यासाठीं तीन पावलें भूमि मागितली. बळीनें वामनाचें मागणें मोठ्या संतोषानें कबूल करून त्याचे हातावर उदक सोडिलें. उदक हातावर पडतांच प्रभूनीं विराटरूप धारण केलें, व दोन पावलांत सर्व विश्व व्याप्त करून टाकिलें. व तिसरें पाऊल देण्यास जागा नाहीं असें पाहून बळीनें आपल्या मस्तकावर प्रभूला पाऊल ठेवण्यास सांगितलें. भगवंतानीं बळीच्या मस्तकावर पाय ठेवून त्यास पाताळांत घातलें वगैरे कथा मी तुला पूर्वीं सांगितली आहेच. त्या वेळीं विराट स्वरूप धारण करून आपलें विशाल पाऊल जेव्हां स्वर्गकपाटावर ठेविले, तेव्हां त्याच्या चरणनखांनीं ब्रह्मलोक व्याप्त झाला. तें पाहून ब्रह्मदेवानें आपल्याजवळ असलेल्या कमंडलूंतील उदकानें त्या विशाल पावलाची पूजा केली. परंतु ब्रह्मदेवाच्या कमंडलूंतलें पाणी प्रभूचे संपूर्ण चरण धुण्यास पुरलें नाहीं. त्यानें प्रभूचें एक नख मात्र प्रक्षालित झालें. तें पाणी विष्णूच्या नखांत पुष्कळ दिवस पर्यंत तसेंच होतें. नंतर विष्णु शिवलोकीं आले असतां त्यांच्या नखांतून तें तीर्थ तेथें पडलें, परंतु तें पाणी आदिपुरुषाच्या नखांत सहस्र दिव्य वर्षें राहिलें असल्यामुळें शंकरांनीं तें दुसरीकडे लोटून दिलें. तेव्हां तें पाणी रुद्रलोकापासून बत्तीस कोटी योजनें दूर असलेल्या सत्यलोकावर येऊन पडलें. ( रुद्रलोक हा सत्यलोकापासून बत्तीस कोटी योजनें उंच आहे ) इतक्या उंचावरून तें पाणी पडल्यामुळें, तेथून तें उडून तपोलोकावर येऊन पडलें. हा तपोलोक सत्यलोकापासून आठ कोटी योजनें खालच्या बाजूला आहे. नंतर तपोलोकाहून तें विष्णुनखतीर्थ जनलोकांवर येऊन पडलें. हा जनलोक तपोलोकापासून चार कोटी योजनें खालच्या बाजूला आहे. या जनलोकावरून तें तीर्थ जनलोकाच्या खालच्या बाजूला दोन कोटी योजनें अंतरावर असलेल्या महर्लोकावर येऊन पडलें. तेथून तें तीर्थ एक कोटी योजनें दूर असलेल्या ध्रुवलोकावर येऊन पडलें. याप्रमाणें हें उदक ध्रुवलोकापर्यंत येण्यास एक हजार दिव्यवर्षें लागलीं. या उदकासच गंगा असें म्हणतात. नंतर ही गंगा तेथून वाहत वाहत स्वर्ग लोकावर आली.

( यावरून स्वर्गलोक हा ध्रुवलोकाच्या खालच्या बाजूला आहे हें उघड होतें. ) तेथून ही गंगा सप्तऋषिमंडळांत गेली, तेव्हां ऋषींनीं तिचें वंदन करून त्या अत्यंत पवित्र तीर्थानें स्नान केलें, त्यामुळें ते पुनीत झाले. नंतर ती तेथून वाहात वाहातं शनिमंडळावर गेली. शनिमंडळ हें स्वर्गलोकापासून दोन लक्ष योजनें खालच्या बाजूला आहे. तेथून ती दोन लक्ष योजनें दूर असलेल्या गुरुमंडलावर आली. तेथून ती गंगा मंगलमंडळावर आली. हें मंगलमंडळ गुरुलोकापासून दोन लक्ष योजनें खालीं आहे. मंगलग्रहावरून ही गंगा दोन लक्ष योजनें दूर असलेल्या बुधलोकावर आली, व तेथून शुक्रलोकावर आली. हा शुक्रलोक बुधलोकापासून दोन लक्ष योजनेंच दूर आहे. याप्रमाणें गंगेनें ग्रहमाला आक्रमण करून ती तारामंडळावर आली. तारामंडळ म्हणजे नक्षत्रें. हीं बुधग्रहापासून तीन लक्ष योजनें खालच्या बाजूला आहेत. या नक्षत्रमंडळापासून चंद्रलोक दोन लक्ष योजनें खालच्या बाजूला आहे. त्या चंद्रलोकावर ही गंगा येऊन तेथून सूर्यलोकावर आली. सूर्यलोक हा चंद्रलोकापासून एक लक्ष योजनें खालीं आहे.

वैशंपायन म्हणतात; हे जनमेजय राजा, गंगा सूर्यलोकीं आल्यावर तेथून ती मेरूपर्वताच्या मस्तकावर पडली. तेथें तिचे चार भाग होऊन ती चार दिशेनें वाहूं लागली. हे निरनिराळे चार ओघ मेरु पर्वतावर ब्रह्मपुरी म्हणून जें एक स्थान आहे तेथून निघाले आहेत. या चारी ओघांचीं नांवें अनुक्रमें अलकनंदा, सीता, भद्रा, आणि चक्षुषी, अशीं आहेत. पैकीं सीता नांवाची नदी ब्रह्मपुरीहून निघून इंद्रपुरीवरून वाहत वाहत जाऊन आकाशांतूनच पूर्वसमुद्राला मिळाली. दुसरी अलकनंदा ही ब्रह्मपुरीहून निघून दक्षिण दिशेनें आकाशांतून यमपुरीवरून वाहत गेली आहे. चक्षुषी नांवाची नदी ब्रह्मपुरीहून निघून वरुणावतीवरून वाहत वाहत आकाशांतून पश्चिम सागराला जाऊन मिळाली आहे. आणि भद्रा नांवाची नदी ब्रह्मपुरीहून निघून कुबेराच्या नगरावरून उत्तर दिशेनें आकाशांतून वाहात जाऊन उत्तर सागराला मिळाली आहे. अशा प्रकारें ब्रह्मदेवाच्या कमंडलूंतल्या गंगेनें एवढा विलक्षण प्रवाह केला. ती जेव्हां मेरू पर्वतावर येऊन पडली, तेव्हां तिचे अनेक तुषार उडाले. त्यापैकीं, एक कण वाऱ्यानें उडून हिमालय पर्वतावर येऊन पडला. तो तुषार म्हणजे पातकरूपी हत्तीचा नाश करणारा सिंहच होय. असा तो पवित्र जलकण हिमालय पर्वतावर पडतांच त्याचे कांहीं ओघ निर्माण झाले. त्या पवित्र ओघांनीं या भरतखंडांत वाहात येऊन त्यास पावन केलें आहे. या जलकणापासून उत्पन्न झालेल्या नद्या भरत खंडांतून वाहत जाऊन क्षीरसमुद्राला मिळाल्या आहेत.

भरतखंडाशिवाय दुसऱ्या आठ खंडांत जे प्राणी राहात आहेत, ते भरत खंडांतील प्राण्यापेक्षा विशेष सुखी आहेत. त्यांचें आचरण अत्यंत शुद्ध असून

ते पवित्र व तेजस्वी आहेत. त्यांचें सामर्थ्य ईश्वराप्रमाणें आहे. तेथील प्राण्यांची आयुष्यमर्यादा दहासहस्र वर्षांची आहे. त्यांनां दहा हजार हत्तींचें बळ आहे. त्यांनां एक कन्या किंवा एक पुत्र एवढीच संतती होते. तेथील लोकांची अंगकांती देवांप्रमाणें सतेज असते. दुःख व दरिद्र म्हणजे काय, हें तेथील लोकांनां मुळींच माहीत नाहीं. तेथें राहणाऱ्या लोकांस दुष्ट वासना कधींही होत नाहींत. ते लोक कधींही हिंसा करीत नाहींत. ते अक्षय आपल्या इष्टदेवतेची उपासना करीत असतात. भरतखंडांतील लोकांना तसें सौख्य नाहीं. या खंडांतील लोकांना त्या खंडांतील सुख अनुभवण्याची इच्छा उत्पन्न होते, परंतु भरतखंडाचे उत्तर सीमेवर अत्यंत थंड असा हिमालय पर्वत आडवा असल्यामुळें कोणासही तो ओलांडून पलीकडे जातां येत नाहीं, तसेंच तिन्हीं दिशेला असलेला सागर ओलांडूनही कोठें बाहेर जातां येत नाहीं. त्यामुळें भरतखंडांतल्या लोकांचा नाइलाज आहे.

वैशंपायनऋषि जनमेजय राजाला सांगतात, हे जनमेजया, या संपूर्ण नवखंड पृथ्वीसभोंवतीं समुद्राचें वेष्टन आहे. तो समुद्र अत्यंत प्रचंड असल्यामुळें त्याच्या पलीकडचें कांहीं दिसत नाहीं; त्यामुळें आपणास विश्व काय तें एवढेंच असें वाटतें. परंतु खरोखर तसें नाहीं. पृथ्वीच्या सभोंवती जसा समुद्र आहे, तशी समुद्राच्या सभोंवती पलीकडच्या बाजूला भूमि आहे, व या क्रमानें एकंदर विश्वांत सप्तसागर आहेत. या सागरांविषयीं व सप्तद्वीपांविषयीं आतां तुला मी सांगतों. सप्तद्वीप म्हणजे ज्यास आपण सध्यां पृथ्वी असें म्हणतों, ( वास्तवीक सात द्वीपें मिळून पृथ्वी झालेली आहे म्हणूनच तिला सप्तद्वीपा असें म्हणतात. ) जंबुद्वीपाच्या सभोंवतीं क्षारसमुद्राचें वेष्टन आहे. या क्षारसमुद्रापलीकडे प्लक्षद्वीप आहे. हें द्वीप दोन योजनें रुंद असून समुद्राच्या खोलीच्या दुप्पट उंच आहे. यामुळें हें द्वीप आकाशालाच जाऊन लागलें आहे असें वाटतें. त्या द्वीपाची कांती सुवर्णाप्रमाणें सतेज आहे. तेथें अग्नी सप्तजिव्ह मूर्तिमंत राहतो. तेथें प्रियव्रत नांवाचा राजा होता. त्याला इध्मजिव्ह नांवाचा मुलगा होता. बापाच्या मागें हा पुष्कळ दिवस राज्य करून मरण पावल्यावर त्याच्या सात मुलांनीं तें द्वीप विभागून घेतलें. जो भाग ज्या मुलाला मिळाला त्या भागाला त्या मुलाचेंच नांव दिलें आहे. त्या सात विभागांना सात खंडें असें म्हणतात. प्रथमखंडाचें नांव 'शिवखंड' असें आहे. दुसऱ्या खंडाचें नांव 'शतखंड,' तिसऱ्या खंडाचें नांव 'अभयखंड,' चौथ्याचें नांव 'अमृतखंड,' पांचव्याचें नांव क्षेमखंड, सहाव्याचें नांव 'यवयसखंड,' व सातव्याचें नांव 'सुभद्रखंड' असें आहे. या प्रत्येक खंडांत एकेक पर्वत असून त्यापासून एकेक नदी उत्पन्न झाली आहे. हिरण्यष्ठीव, मणिकूट, सुपर्ण, वज्रकूट, ज्योतिष्मान, इंद्रसेन, व मेघमाल, याप्रमाणें त्या सात पर्वतांचीं नांवें आहेत. या पर्वतापासून निघालेल्या नद्या सागराला जाऊन मिळालेल्या आहेत.

त्यांचीं नांवें अरुणा, नृम्णा, ऋतंभरा, सुप्रभा, आंगिरसी व सावित्री अशीं आहेत. या द्वीपांतील लोक सूर्योपासक असून ते वर्णाश्रम धर्मानें राहणारे आहेत. येथील लोक चार वर्णांचे आहेत. हंस, पतंग, रुध्वायन, व सत्यांग हे त्यांचे वर्ण होत. येथील लोकांचें आयुष्यमान एक हजार वर्षांचें असून प्रत्येकास एक पुत्र किंवा एक कन्या असें अपत्य होतें. या प्लक्षद्वीपा सभोंवतीं समुद्र आहे, त्या समुद्राला इक्षुरससागर असें म्हणतात. तो समुद्र दोन लक्ष योजनें रुंद असून तितकाच खोल आहे. या समुद्राचे पाण्याचे अंगीं आयुष्य, बळ, ओज, क्षेम वीर्य, व इंद्रियतेज वाढविण्याची विलक्षण शक्ति आहे. या इक्षुरससागराचे पलीकडे शाल्मली नांवाचें द्वीप आहे. हें द्वीप चार लक्ष योजनें रुंद आहे. या द्वीपांत शाल्मली नांवाचा सुवर्णाप्रमाणें पीतवर्णाचा एक अजस्र वृक्ष आहे, त्याची उंची चार लक्ष योजनें आहे. त्या वृक्षावरून या द्वीपकल्पाला शाल्मली असें नांव प्राप्त झालें आहे. या वृक्षावर गरुडानें आपलें निवासस्थान केलें असून तो नेहमीं तेथें प्रभूचें चिंतन करीत असतो. प्रियव्रताचा पुत्र यज्ञबाहू हा याच द्वीपांत राज्य करीत होता, परंतु आपल्या आयुष्याचा उपयोग तपसाधनांत करावा असें त्याला वाटल्यावरून त्यानें आपल्या सात पुत्रांना तें द्वीप सारखें विभागून दिलें. त्या प्रत्येक भागाला त्या पुत्रांचींच नांवें प्राप्त झालीं. तीं अशीं:—‘सौमनस्य-खंड, सुरोचनखंड, रमणकखंड, पारिभद्रखंड, देववर्षखंड, आप्यायनखंड, व 'अविज्ञातखंड;—हीं होत. या प्रत्येक खंडांतही प्लक्षद्वीपांतील खंडांप्रमाणें पर्वत व त्यापासून निघालेली एकेक नदी आहे. त्यापैकीं पर्वतांचीं नांवें, शतभृंग, वामदेव, कुमुद, सहस्रश्रुति, कुंद, व स्वरस व पुष्पवर्ष अशीं आहेत. व नद्यांचीं नांवें, नंदा, राका, सरस्वती, कुहू, रजनी, अनुमति आणि सिनीवाली अशीं आहेत. या द्वीपांतील लोक चंद्रोपासक असून ते वीर्यधर, श्रुतधर, वसुंधर, व इषंधर या चार वर्णांचे आहेत. या द्वीपाचे सभोंवतीं ‘वारुणी’ अशा नांवाचा समुद्र आहे. या समुद्राचें पाणी त्याच्या नांवाप्रमाणेंच मादक आहे. कित्येक ऋषिमत शाल्मलद्वीपाचे सभोंवती सात समुद्र आहेत, असें आहे. असा हा वारुणीसमुद्र चार लक्ष योजनें रुंद असून तितकाच खोल आहे. या समुद्राचे पलीकडे कुशद्वीप नांवाचें द्वीप आहे. हें द्वीप आठ लक्ष योजनें विस्तीर्ण असून समुद्रापासून तितकेंच ऊंच आहे. या द्वीपांत कुशस्तंभ नांवाचा प्रचंड वृक्ष आहे. तो आठ लक्ष योजनें उंच आहे व त्याचें तेज सूर्याप्रमाणें आहे. त्या वृक्षामुळें तें द्वीप नेहमी प्रकाशमान असतें. त्या वृक्षापासून प्रकाशाचे स्रोत चारी दिशेला सर्वकाळ पसरत असतात. या कुशद्वीपांत हिरण्यरेता नांवाचा प्रियव्रताचा पुत्र राज्य करीत होता. पुष्कळ दिवस राज्य केल्यावर त्यानें आपलें राज्य आपल्या सात पुत्रांना विभागून दिलें व आपण तपसाधन करूं लागला. त्याच्या मुलांचीं नांवें, वसु, स्तुत्यव्रत, वसुदान, नाभिगुप्त, दृढरुची, विविक्त व

वामदेव अशीं होतीं. जें खंड ज्या मुलाच्या वाटणीला गेलें, त्या खंडाला त्या मुलाचेंच नांव प्राप्त झालें आहे. त्या खंडांत पूर्वीप्रमाणें सात पर्वत आहेत. त्यांचीं नांवें, चतुःशृंग, कपिल, चित्रकूट, चक्राचल, देवानीक, ऊर्ध्वरोमा, शैल, व द्रवीण अशीं आहेत. या पर्वतांपासून रसकुल्या, मधुकुल्या, विभक्ता, श्रुविंदा, मित्रविंदा, घृतच्युता, अंत्रमाळा, देवगर्भा, सुशीतला वगैरे अनेक नद्या निघालेल्या आहेत. येथील लोक बलवान, दीर्घायुषी, पुण्यवान व सदाचरणी आहेत. ते अग्निपुरुषाला आपले दैवत मानून त्याचें भजन पूजन करितात. आधीव्याधी वगैरे आपत्ति या द्वीपांतील लोकांना मुळींच माहीत नाहींत. या कुशद्वीपाचे पलीकडे घृतसागर आहे. तो आठ लक्ष योजनें खोल असून तितकाच रुंद आहे. या घृतसागराचे पलीकडे क्रौंच नांवाचें द्वीप आहे. तें आठ लक्ष योजनें रुंद आहे. पूर्वी एकदां या द्वीपामध्यें कार्तिकस्वामी गेले होते असें सांगतात. परंतु त्या विषयीं कोणतीही कथा उपलब्ध नाहीं. या द्वीपांत घृतपृष्ट नांवाचा प्रियव्रताचा पुत्र राज्य करीत होता. त्यानें वार्धक्यावस्थेंत आपल्या सात पुत्रांना आपलें राज्य विभागून दिलें व आपण तपश्चर्या करण्यासाठीं निघून गेला. त्या सात पुत्राचीं नांवें मधुरुह, मेघपृष्ट, आत्मा, सुधामा, भ्राजिष्ठ, वनस्पति, व लोहितार्ण अशीं आहेत. हींच नांवें त्यांच्या भागांला प्राप्त झालीं आहेत. प्रत्येकांत सात पर्वत आहेत. त्यांचीं नांवें शुक्ल, वर्धमान, सर्वतोभद्र, भोजन, नंद, उपबर्हिण व नंदन अशीं आहेत. या पर्वतांपासून सात नद्या निर्माण झाल्या आहेत. त्यांचीं नांवें, अमृतौघा, तीर्थवती, अभया, आर्यका, रूपवती, पवित्रवती व शुक्ला अशीं आहेत. या द्वीपांतील लोक चार वर्णाचे असून ते आपदेवतेचे ( उदक ) उपासक आहेत. दारिद्र्य, व कोणत्याही प्रकारची आपदा त्या द्वीपांतील लोकांनां मुळीं माहीत नाहीं. या क्रौंच द्वीपापलीकडे क्षीरसमुद्र आहे. तो सोळा लक्ष योजनें रुंद असून तितकाच खोल आहे. या समुद्राचे पलीकडे शाक नांवाचें द्वीप आहे. हें शाकद्वीप सोळा लक्ष योजनें रुंद आहे. या द्वीपामध्यें सगुण नांवाचा एक प्रचंड वृक्ष आहे. तो सोळा लक्ष योजनें उंच असून सूर्याप्रमाणें तेजस्वी आणि मोठा सुगंधयुक्त असा आहे. या द्वीपांत मेधातिथि नांवाचा प्रियव्रताचा पुत्र राजा होता. त्यानें आपलें राज्य आपल्या सात मुलांना सारखें विभागून दिलें, व आपण स्वत: तपश्चर्या करूं लागला. त्या सात पुत्रांचींच नांवें त्यांच्या विभागांस प्राप्त झालीं. त्या सात पुत्रांचीं नांवें, चित्ररेफ, मनोजव, पवमान, धूम्रानीक, पुरोजव, विश्वधार, वरुण व बहुरुप अशीं आहेत. या खंडामध्यें सात पर्वत आहेत. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:—ईशान, बलभद्र, उरुशृंग, शतकेसर, महानस, सहस्रश्रोत्र व देवपाळ अशीं आहेत. या पर्वतांपासून सात नद्या निर्माण झाल्या आहेत. त्यांचीं नांवें, आद्या, पंचपदी, सहस्रस्रोता, उभयसंपुष्टी, पराजिता, आयुर्दा, व

सहस्रसुता अशीं आहेत. या द्वीपांतील लोक चार वर्णांचे असून ते सूत्रात्म्याची उपासना करणारे आहेत. ते अत्यंत सुखी, सतेज व पवित्र असून त्यांना दुःख दरिद्र, व्याधि, व्यथा, वगैरेचें नांवही माहीत नाहीं. या शाकद्वीपाचे पलीकडे दधिसमुद्र आहे. तो बत्तीस लक्ष योजनें रुंद असून तितकाच खोल आहे. या समुद्रापलीकडे पुष्कर नांवाचें विशाल द्वीप आहे. हें द्वीपही बत्तीस लक्ष योजनें रुंद आहे. या द्वीपांत कमलवृक्ष आहे, त्याची उंची बत्तीस लक्ष योजनें आहे. त्या वृक्षाला येणारीं कमळें सहस्रदळांचीं असतात. त्या प्रत्येक कमळाचें तेज प्रतिसूर्याप्रमाणें असतें. त्या कमळांत ब्रह्मदेवाचें स्थान आहे. तो तेथें सावित्री व गायत्री यांसह विष्णुमूर्तीची आराधना करीत असतो. तेथील लोक चार वर्णांचे असून ब्रह्मदेव हा त्यांची उपास्य देवता आहे. या द्वीपांत पर्वत व नद्या असंख्य आहेत. येथें कमळांची उत्पत्ती फार असून त्यांच्या पाकळ्या अनेक रंगाच्या असतात, व सुवास मनोहर असतो. हीं कमळें अत्यंत निर्मळ असून केवळ सुवर्णमय अशीं असतात. येथें मानस नांवाचा पर्वत आहे त्याची उंची बत्तीस लक्ष योजनें आहे. हा पर्वत अत्यंत रमणीय असून सर्व सुवर्णमय आहे. या सुवर्णमय मानसपर्वताच्या शिखरावर अनेक लोकपालांचीं राहण्याचीं ठिकाणें आहेत. या द्वीपांत सूर्याचें कालचक्र नांवाचें अत्यंत दैदीप्यमान चक्र आकाशांत वेगानें फिरत असतें. त्याचा या द्वीपावर सर्वत्र प्रकाश पडतो. या द्वीपांत वीतिहोत्र नांवाचा प्रियव्रतराजाचा पुत्र राज्य करीत होता. पुढें तो आपलें राज्य आपल्या दोघां मुलांना वाटून देऊन आपण तपश्चर्या करूं लागला. या द्वीपाचे पलीकडे मधुरोदक ( गोडे पाण्याचा ) सागर आहे. त्याची रुंदी चौसष्ट लक्ष योजनें असून खोलीही तितकीच आहे.

हे जनमेजयराजा, याप्रमाणें नऊ खंडें व सात द्वीपें याविषयींची माहिती संक्षेपानें तुला सांगितली. आतां नद्यांचें पाणी समुद्रास मिळतें व मेघवृष्टीचें पाणीही त्यांतच पडतें, तेव्हां इतकें पाणी पडत असतां समुद्र वाढत कां नाहीं? याचें कारण असें आहे कीं, समुद्रांत वडवानल नांवाचा अग्नि आहे. तो समुद्राचें पाणी शोषण करितो, म्हणून समुद्राची वाढ होत नाहीं. देवांनीं चौदा रत्नें काढण्यासाठीं ज्या सागराचें मंथन केलें* तो मधुरोदक सागर होय. याच सागरामध्यें लक्ष्मीचा जन्म झालेला आहे. प्रळयकाळचे वेळीं देव आपलीं शस्त्रें व रत्नें याच सागरांत ठेवितात. अगस्ती ऋषीनें ज्या समुद्राचें प्राशन केलें तो हा समुद्र नव्हे. जंबुद्वीपाभोंवतीं असलेला तो क्षार समुद्र होय. हीं सप्तद्वीपें व नवखंडें यांशिवाय जें दहावें खंड आहे त्यास काशी असें म्हणतात.

---

* कांहीं ठिकाणीं 'क्षीरसमुद्राचें मंथन केलें' असें सांपडतें.

# अध्याय ४ था.

## विश्वोत्पत्ति कथा–पुढें चालू.

### १. लोकालोक पर्वत.

हीच कथा पुढें सांगण्याविषयीं जनमेजयराजानें विनंति केल्यावरून वैशंपायनऋषि ती कथा पुढें सांगूं लागले. ते म्हणाले,—हे जनमेजयराजा, मधुरोदक म्हणून जो सप्तद्वीपाच्या पलीकडे समुद्र आहे म्हणून सांगितलें, त्या पलीकडे लोकालोक पर्वत आहेत. ते पर्वत अत्यंत विशाल असून त्यामध्यें साडेबारा लक्ष योजनें भूमि व्यापिली आहे. परंतु तो सर्व भाग मनुष्यरहित आहे. कारण सूर्याची मार्गक्रमण करण्याची मर्यादा पन्नास कोटी योजनांची आहे. दररोज सूर्यास इतका मार्ग आक्रमण करावा लागतो. या पन्नास कोटी योजनांच्या पलीकडे लोकालोक पर्वत असल्यामुळें तेथें सूर्याचा प्रकाश पडत नाहीं. अर्थात येथें नेहमीं अंधार असतो. परंतु दोनी पर्वतामधील भाग मात्र स्वयंप्रकाशित आहे. तेथील भूमीचा व पर्वतांचा वर्ण मौतिकाप्रमाणें सतेज असल्यामुळें तो एकंदर प्रदेश आरशाप्रमाणें सोज्वल असा आहे. हे लोक व आलोक पर्वत किती उंच आहेत हे नक्की सांगणें कठीण होय. असें सांगतात कीं, हे दोन्ही पर्वत साडेबारा कोटी योजनें उंच आहेत. सूर्यलोक, ध्रुवलोक, व नक्षत्रमंडळ यांपेक्षांही हे दोन्ही पर्वत उंच आहेत. सूर्यलोकापासून हे पर्वत अत्यंत दूर असल्यामुळें सूर्याचा प्रकाश या पर्वतांवर केव्हांही पडत नाहीं. या पर्वतांची चार शिखरें असून त्या प्रत्येक शिखरावर एकेक विशाल हत्ती स्थापन केलेला आहे. पृथ्वी कोणत्याही प्रसंगीं डळमळूं नये म्हणून हें हत्तीचें वजन पर्वतावर ठेविलेलें आहे असें म्हणतात. या हत्तींचीं नांवें ऋषभ, अपराजित, पुष्कर, व वामन अशीं आहेत. याच पर्वताच्या शिखरावर महापुरुषाचें राहाण्याचें स्थान आहे. ज्यानें हे संपूर्ण विश्व निर्माण केलें, जो सर्व प्राणिमात्रांना उत्पन्न करून त्याचें संरक्षण करितो, व त्यांचा नाशही करितो, जो तिन्ही लोकांत सत्यमूर्तीनें असतो, जो महाविभूतींच्या हृदयांत वास करतो, ज्याच्या पराक्रमाची व कर्तुमकर्तुम् शक्तीची कोणासही कल्पना करितां येत नाहीं, ऋद्धिसिद्धि ह्या ज्याच्या दासी आहेत, त्रैलोक्य ज्यानें सहज लीलेनें निर्माण केलें; तो आदिपुरुष ह्या पर्वतावर राहातो. तें त्याचें स्थान विश्वापासून अगदीं निराळें आहे. तेथें कोणासही जातां येत नाहीं. तेथें सूर्याचे किरणही जाण्यास असमर्थ आहेत, मग इतरांचा पाड काय? तेथें तो आदिपुरुषच चैतन्यसूर्यस्वरूपी होय. त्या पन्नासकोटी विस्तीर्ण प्रदेशांत चैतन्य

---

१ यासच मधुसमुद्र म्हणतात.

भरलेलें आहे. तेथें चैतन्य सूर्यस्वरूपी असल्यामुळें रात्र आणि दिवस हा भेद होणें अर्थातच शक्य नाहीं. जे योगी योगाभ्यास करून आदिपुरुषाला जाऊन मिळतात, त्यांनां मात्र तो चैतन्यप्रदेश पहावयाला मिळतो. आदिपुरुष हा अत्यंत तेजःपुंज असून त्यास प्रतिसूर्य असें म्हणतात; परंतु सूर्यापेक्षां आदिपुरुषाची योग्यता व शक्ति फार निराळी असल्यामुळें आदिपुरुषाला चैतन्यसूर्य असें म्हणतात. हिरण्यगर्भ हें ह्याचेंच नांव होय. ब्रह्माण्डापासून हें चैतन्यसूर्यमंडळ पन्नासकोटी योजनें दूर आहे. यावरून या आदिपुरुषाच्या विराटशरीराची सहज कल्पना होणार आहे. देव, मनुष्य, जीवजंतु व अन्य स्थावरजंगमादि समस्त-वस्तु या हिरण्यगर्भाच्या अंडगोलापासून उत्पन्न होतात; म्हणजे सर्व चराचराचा मूलभूत हिरण्यगर्भ आहे. हिरण्यगर्भापासून पंचवीसकोटी योजनें वर ब्रह्मकटाह आहे. त्याला देवलोक असें म्हणतात. या देवलोकांचें वर्णन करण्यास ब्रह्मदेवही असमर्थ आहे. परंतु या भूगोलाचे ज्ञान मला जें झालें तें तुला कथन केलें. वालाच्या जशा दोन पाकळ्या एकमेकांवर जडलेल्या असतात, त्याप्रमाणें भूलोक व देव-लोक एकमेकांवर जोडले आहेत. त्या देवलोकांत सूत्रात्मा विराट राहत असतो. व त्याच्याच इच्छेवरून चंद्र, सूर्य, पृथ्वी, वगैरे सर्व विश्वाची घडामोड अव्याहत सुरू असते.

## सूर्यमंडळाची परिस्थिति.

हे राजा जनमेजया, आतां तुला सूर्यमंडळाविषयीं मला जी माहिती व्यासां-कडून मिळाली आहे ती सांगतों. द्विदल धान्याचीं ज्याप्रमाणें दोन शकलें असून त्या भोंवतीं टरफलाचें जसें आवरण असतें, त्याप्रमाणें पृथ्वी व दुसरे लोक यांच्या सभोंवतीं आकाशाचें आवरण आहे. पृथ्वी व ध्रुव वगैरे लोक यांच्या मध्यें सूर्यमंडळ आहे. कोळी नांवाचा कीटक ज्याप्रमाणें आपल्या शरीरापासून तंतू निर्माण करून त्याचें जाळें तयार करितो; व पुन्हा तंतू आपल्या उदरांत आकर्षण करून घेतो; त्याप्रमाणें या संपूर्ण विश्वास चलन आदिपुरुषाकडून मिळत आहे. प्रकाशासाठीं सूर्याची उत्पत्ति करून आदिपुरुषानें सूर्यास गमना-दिकांचे नियम ठरवून दिले आहेत. त्या नियमांप्रमाणें सूर्य आकाशांत फिरत असल्यामुळें सृष्टीचे व्यापार सुरळीत चालले आहेत. सूर्याला तीन प्रकारच्या गति आहेत. त्या तीन गतींनीं त्यास प्रत्येक वर्षी क्रमानें मार्ग आक्रमण करावा लागतो. या गतींचीं नांवें, आरोहणगति, अवरोहणगति व समानगति अशीं आहेत. पृथ्वीची भूमध्यरेषा सोडून सूर्य जेव्हां उत्तरेच्या बाजूनें मार्गक्रमण करतो, त्या वेळीं सूर्याची आरोहणगति असते; म्हणजे सूर्य मंदगतीनें मार्गक्रमण करीत असतो; त्यामुळें दिवस मोठा होतो. जेव्हां सूर्य मध्यरेषेवर म्हणजे विषुव-वृत्तावर असतो, त्या वेळीं सूर्याची समानगति असते. यामुळें रात्र व दिवस याचें मान सारखें असतें. व जेव्हां सूर्य मध्यरेषा सोडून दक्षिणेच्या बाजूनें गमन

करितो त्या वेळीं सूर्याची गति जलद असल्यामुळें दिवस लहान होतो. ज्यावेळीं सूर्य दक्षिणेच्या बाजूला जातो त्या वेळीं दक्षिणायन व उत्तरेच्या बाजूला जातो त्यावेळीं उत्तरायण असें म्हणतात. यामुळें वर्षांत एक दिवस सर्वांत मोठा, एक दिवस सर्वांत लहान व एक दिवस समान असे असतात. सूर्याची गति कमी अधिक होते त्यास संक्रांत असें म्हणतात. या संक्रांती बारा आहेत. त्यांचीं नांवें, कर्क, सिंह, कन्या, वृश्चिक, धन, मेष, तूळ, कुंभ, मीन, मिथुन, मकर व वृषभ अशीं आहेत. कर्क, सिंह, कन्या, वृश्चिक व धन या राशीला जेव्हां सूर्य असतो तेव्हां दिवस लहान होत असतो, व रात्र मोठी होत असते. मेष व तूळ या राशीला जेव्हां असतो तेव्हां दिवस व रात्र समसमान असतात; व कुंभ, मीन मिथुन, मकर, व वृषभ या राशीला जेव्हां सूर्य असतो, तेव्हां दिवस मोठा होत असतो, व रात्र लहान होत असते.

सूर्याच्या रथाला एक चाक आहे. तें अत्यंत विशाल असून त्यांतील कण्याचें एक टोंक मानस पर्वताच्या शिखरावर टेंकलेलें असून दुसरें टोंक मेरु पर्वताच्या शिखरावर टेंकलेलें आहे. हा सूर्याचा रथ पृथ्वीच्या सभोंवतीं कंकणाप्रमाणें वर्तुलाकार फिरत असतो. सूर्याच्या रथाचें चाक साडेनऊ कोटी योजनें व्यासाचें आहे. या चक्रावरील रथही चक्राला शोभेल असाच प्रचंड आहे. तो रथ छत्तीस लक्ष योजनें उंच आहे. रथाची लांबी अठरा लक्ष योजनें असून रुंदी नऊ लक्ष योजनें आहे. तसेंच घोडे जोडावयाचें अवजार नऊ लक्ष योजनें लांबीचें आहे. सूर्याचा हा प्रचंड रथ ओढण्यासाठीं उच्चैःश्रवा आदि सात घोडे आहेत. तीन घोडे उजव्या बाजूला व चार डाव्या बाजूला जोडले आहेत. या घोड्यांचा वर्ण शेंदुराप्रमाणें लाल असून ते अग्नीप्रमाणें [1]सतेज आहेत. ह्या सूर्याचा विशाल रथ चालविणारा सारथी अरुण नांवाचा आहे. तो पंगु आहे, तथापि रथ चालविण्यांत अत्यंत कुशल असून विलक्षण शक्तिसंपन्न व अत्यंत तेजस्वी असा आहे. त्याचा वर्ण कुंकुमाप्रमाणें लाल असल्यामुळें सूर्योदयसमयीं प्रथम त्याचे किरण पृथ्वीवर पडतात. म्हणून त्यावेळेचा प्रकाश अरुण रंगाचा असतो. रथ, सूर्य, घोडे व सारथी या सर्वांना चलन देणारा सूत्रधार हिरण्यगर्भ म्हणजे आदिपुरुष हा होय.

हे जनमेजयराजा, पृथ्वीवर कांहीं प्रदेश असे आहेत कीं, तेथें उदय व अस्त मुळींच नाहींत. त्या प्रदेशाच्या मस्तकावर सूर्य हा अक्षय असतो. मेरूपर्वतासभोंवतीं पूर्वदिशेला इंद्राची अमरावती आहे, दक्षिणेस यमाची संयमिनी नांवाची पुरी आहे, पश्चिमदिशेला वरुणाची निम्लोचनी नांवाची पुरी आहे, आणि उत्तरदिशेला सोमदेवाची विभावरी नांवाची नगरी आहे. याप्रमाणें

---

१ सूर्याचे घोडे हिरवे आहेत, परंतु अरुणाची कांति त्यांचेवर पडल्यानें त्यांचा रंग तांबडा दिसतो. म्हणूनच सूर्यास हरिदश्व असें म्हणतात.

मेरूच्या चार दिशेला जे हे चार प्रदेश आहेत त्या प्रदेशांवर सूर्याचा प्रकाश अक्षय असतो. सूर्य त्या प्रदेशांवरून नेहमीं उजव्या बाजूनें प्रदक्षिणा करीत असतो. यामुळें देव व गंधर्व यांच्या प्रदेशांवर कधींही अंधकार पडत नाहीं. इंद्राच्या अमरावतीपासून यमाची यमपुरी सव्वादोन कोटी साडेबारालक्ष योजनें ( दोन कोटी सदतीस लक्ष पन्नास हजार ) आहे. तितका मार्ग क्रमण करण्यास सूर्याला पंधरा पंधरा घटिका लागतात. आणि ह्याप्रमाणेंच प्रत्येक प्रदेशावर जाण्यास सूर्याला पंधरा पंधरा घटिका लागतात; म्हणजे साठ घटिकांनीं सूर्याची प्रदक्षिणा पुरी होते. यावरून प्रत्येक मुहूर्तास सूर्य चौतीस लक्ष अठराशें योजनें इतका मार्ग आक्रमितो, असें उघड आहे. सूर्यबिंबापासून सूर्याची प्रभा नऊ कोटी एकावन लक्ष योजनें चौफेर गेलेली आहे. एकंदर नक्षत्रें सत्तावीस आहेत, त्यांपैकीं सव्वादोन नक्षत्रांचा मार्गक्रमण करण्यास सूर्याला जो काल लागतो, त्यास महिना असें म्हणतात. आणि हे दोन महिने म्हणजे एक ऋतु होतो. ऋतु सहा आहेत. तीन ऋतूंचे काळाला अयन असें म्हणतात, व दोन अयनांचा काळ गेला म्हणजे एक वर्ष झालें असें म्हणतात. सवादोन नक्षत्रें म्हणजे एकराशि आक्रमण करण्यास सूर्यास एक महिना लागतो, चंद्राला सव्वादोन दिवस लागतात, मंगळाला दीड महिना लागतो, गुरूला एक वर्ष लागतें, शनीस तीस महिने लागतात, शुक्रास एक महिना लागतो, व बुधासही एक महिनाच लागतो. याप्रमाणें निरनिराळ्या ग्रहांची गति निरनिराळी आहे.

ह्या सर्व नक्षत्रांच्या मध्यबिंदुस्थानीं ध्रुव आहे. ध्रुवलोक अचल असून त्याच्या सभोंवतीं नक्षत्रें फिरतात. ज्योतिषचक्राच्या दृष्टीनें ध्रुव ही पुण्यमेढच आहे. या ध्रुव लोकापासून तेरा लक्ष योजनांवर विष्णुलोक आहे. ज्योतिषचक्राची आकृति शिशुमार नांवाचा एक प्राणी आहे, त्याच्या आकृतीसारखी आहे. या आकृतीस ज्योतिषी कुंडली असें म्हणतात. हें ज्योतिषचक्र हा शिशुमार प्राणीच आहे, अशी जर कल्पना केली; तर पुढील प्रमाणें त्याच्या अवयवाचे ठिकाणीं त्या त्या देवांचें राहण्याचें ठिकाण आहे असें म्हणतां येईल. पुच्छभागीं प्रजापति आहे. इंद्र, धर्म व अग्नि हे मुखाच्या स्थानीं आहेत. दक्षिणायनांतली नक्षत्रें उजव्या बाजूला व उत्तरायणांतलीं नक्षत्रें डाव्या बाजूला आहेत. पृष्ठभागावर मध्यभागीं ब्रह्मदेवाची अजवीथी म्हणून एक खूण आहे. पोटांतून गंगा वाहात आहे, तिलाच आकाशगंगा म्हणतात. वक्षःस्थलाचे ठिकाणीं सविता आहे व हृदयांत विष्णु, मुखांत शंकर व कटी प्रदेशीं ब्रह्मदेव आहे. याचे पाय आठ व कान चार आहेत. त्या प्रत्येक अवयवावर दोन दोन नक्षत्रें आहेत. अशा या अपूर्वप्राण्याचें जो पूज्यबुद्धीनें चिंतन करील त्यानें यमलोक चुकविला असें निश्चयानें समजावें.

सूर्यमंडळाचें खालीं दहा हजार योजनें विस्तीर्ण असें एक वायुचक्र आहे. या वायुचक्राखालीं राहुमंडळ आहे. राहुमंडळाचे खालच्या बाजूला अनुक्रमें सिद्ध, चारण, विद्याधर, यक्ष, राक्षस व पिशाचें यांचीं मंडळें आहेत. पिशाच-मंडळाखालीं प्रेत व भूतगण यांचीं मंडळें आहेत. या प्रत्येक मंडळांत दहा दहा-हजार योजनें अंतर आहे. या सर्वांखालीं दहा हजार योजनांवर जलधर—म्हणजे मेघ-मंडळ आहे. आणि मेघमंडळाखालीं पृथ्वी आहे. चंद्रमंडळाचा विस्तार बारा हजार योजनें असून सूर्यमंडळाचा विस्तार दहा हजार योजनें आहे.

## ३. पाताळलोक

वैशंपायनऋषींनीं सांगितलेली आकाशांतील माहिती ऐकून जनमेजयराजा वैशंपायन ऋषीला म्हणाला, ऋषि, पृथ्वीपासून हजारों योजनें दूर असलेल्या आकाशांत असणाऱ्या ग्रह वगैरेंची माहिती आपण मला सांगितली; तसेंच आतां पाताळाविषयींची माहिती ऐकावी अशी मला इच्छा उत्पन्न झाली आहे. त्याचीही अशीच विलक्षण घटना आहे असें ऐकितों; याकरितां त्या विषयींची माहिती आपण मला कृपा करून सांगावी. राजानें अशी विनंति केल्यावर वैशंपायनऋषि म्हणाले, राजा, ह्या पृथ्वीखालीं एकंदर सात लोक आहेत. त्यांस सप्त-पाताळ असें म्हणतात. या पाताळांचीं नांवें अतल, वितल, सुतल, महातल, तलातल, रसातल व पाताल अशीं आहेत. आकाशमंडपांत जसे अनेक लोक आहेत व त्यांना जसा भोगादि सुखाचा अनुभव मिळत आहे, तसाच पाताळांतील लोकांनांही सर्व सुखाचा उपभोग मिळत असून व्याधी निवर्ण संताप रोग वगैरे पासून तर ते अगदीं अलिप्त आहेत. येथें प्रकाश देणारे अत्यंत तेजस्वी अ मणी आहेत. त्यांचा प्रकाश प्रतिसूर्याप्रमाणें असल्यामुळें अंधार कशाला म्हण त्याव तें तेथील लोकांना मुळींच ठाऊक नाहीं. या मण्याच्या अंगीं सर्व व्याधींचा नाश करण्याची शक्ति आहे. त्यामुळें येथील लोक व्याधीरहित असतात. शिवाय त्या मण्याच्या अंगीं तृषा व भूक शांत करण्याचीही शक्ति आहे. शिवाय तेथें मोठमोठ्या औषधी आहेत. त्यांच्या रसाचें ते पान करितात व फळें भक्षण करितात. त्यामुळें, त्यांना कोणत्याही प्रकारचे रोग होत नाहींत. त्यांना घाम येत नाहीं व शरीरापासून अन्य कोणत्याही प्रकारची दुर्गंधीही उत्पन्न होत नाहीं. ते कधीं म्हातारे होत नाहींत. तेथील लोकांना जरी कोणत्या जरा नाहींत, तरी त्यांनां मृत्यु नाहीं असें मात्र नाहीं. तेथील लोक सुदर्शनचक्रामुळें मृत्यु पावतात. जोंपर्यंत सुदर्शनचक्र त्यांच्या मस्तकाला येऊन लागलें नाहीं, तोंपर्यंत तेथील लोक कलिकाळासही अजिंक्य आहेत. तेथील स्त्रिया सुदर्शनचक्राच्या संसर्गाशिवाय प्रसूत होत नाहींत. त्यांच्या उदरांतील गर्भाला जेव्हां सुदर्शन-चक्राची भीति दाखवावी, तेव्हां तो गर्भ उदरांतून बाहेर पडतो.

प्रथम पाताळ जें अतल तेथील राजा दैत्यकुलोत्पन्न असून त्याचें नांव बलिपाळ असें आहे. तो मायावी विद्येंत विशेष निष्णात आहे. त्यानें आपल्या राज्यांत अनेक इंद्रजालिक चमत्कार करून ठेविले आहेत. सैरण, मोहन, उच्चाटन, जारण मारण, स्तंभन, घात, पात व कामन या विलक्षण विद्या त्याच्या जांभई पासून निर्माण झालेल्या आहेत. तेथील स्त्रिया अत्यंत स्वेच्छाचारी असून वरील विद्येंत अत्यंत निपुण असतात. केव्हां केव्हां त्या पृथ्वीवर येऊन सुंदर पुरुषांना युक्तिप्रयुक्तिनें पाताळांत घेऊन जातात व त्यांच्याशीं रममाण होतात. पाताळांत हाटक नांवाचा एक सुवर्णाचा रस आहे, तो रस पृथ्वीवरील मनुष्यास पाजला असतां त्याला दहा हजार हत्तीचें बळ प्राप्त होतें व तो अत्यंत सुंदर व सतेज होतो, परंतु त्यामुळें त्यास भ्रम उत्पन्न होतो. मग त्या स्त्रिया त्यास आपला दासानुदास बनवून त्याचे बरोबर रममाण होतात. दुसरें वितल नांवाचें जें पाताळ आहे तेथें हाटकेश्वर राजा राज्य करीत असतो, तेथें हाटक नांवाची एक नदी आहे. शंकराचे रेतापासून ती निर्माण झाली आहे. या नदीचें पाणी म्हणजे केवळ सुवर्णाचा रसच होय. तें पाणी अग्नीचे योगानें गोठून त्याचें सुवर्ण बनतें. तिसरें पाताळ सुतल हें होय, तेथें विरोचनपुत्र बळी हा राज्य करीत असून त्याचे द्वारीं प्रभु त्रिविक्रम द्वारपाळ होऊन उभे आहेत. हा केवळ भक्तीचा महिमा होय. बळीची श्रीहरीवर विलक्षण भक्ति असल्यामुळें देवानीं त्याच्या म्हणण्याप्रमाणें नेहमीं त्याचे जवळ राहण्याचें कबूल केलें. त्या प्रमाणें ते सतत त्याच्या दाराशीं उभे आहेत. बळी खरोखर धन्य आहे, कारण त्याला प्रभूचें रोज प्रत्यक्ष दर्शन होऊन पूजा करावयाला मिळत आहे. त्याला देवाचा आश्रय झालेला असल्यामुळें त्यास परचक्र वगैरे कोणत्याही प्रकारची भीति नाहीं. एकदां रावण हा बळीजवळ विपुल द्रव्य आहे, असें ऐकून तें त्याजपासून शक्तीच्या जोरावर मागण्यासाठीं पाताळांत आला, व बळीच्या वाड्यांत जाऊं लागला, परंतु त्रिविक्रमानें त्याला लाथ मारून दहा हजार योजनें दूर फेंकून दिलें. या सुतल पाताळा खालीं तलातल नांवाचें पाताळ आहे. तेथें मय नांवाचा राजा आहे. त्या मयराजाला बळीप्रमाणेंच शंकराचा आश्रय आहे. पूर्वी त्या पाताळांत त्रिपुर नांवाचा एक दुष्ट होता, तो अत्यंत उन्मत्त झाल्यामुळें शंकरानीं त्यांचा नाश केला व मयाची त्या राज्यावर स्थापना केली. तो मयराजा शंकराच्या कृपेनें निर्भय असून त्यास कोणतीही भीति उरलेली नाहीं. या पाताळाखालीं महातल नांवाचें पाताळ आहे. तेथें सर्पकुळांतला क्रोधावसु नांवाचा राजा राज्य करीत असतो. तो कद्रू नांवाच्या स्त्रियेपासून उत्पन्न झालेला कश्यपाचापुत्र आहे. तो आपल्या बंधूंसह येथें सुखानें राहात आहे. त्याचे सुषेण, कुहक, कालिया, व तक्षक नावाचे चार सर्प प्रधान आहेत. सर्पांना पृथ्वीवर गरुडा पासून जेव्हां फार त्रास होऊं लागला, तेव्हां ब्रह्मदेवानें त्यांना या पाताळांत आणून

ठेविलें; व तेथें त्यांस सुखानें राहतां येईल अशी त्यांची व्यवस्था करून दिली. या पाताळाखालीं रसातल नांवाचें पाताळ आहे. तेथें राक्षस व सर्प उभयतां सलोख्यानें राहतात. तेथें हिरण्य नांवाचा राक्षस व कालिया नांवाचा सर्प असे दोन राजे राज्य करीत आहेत. सर्पांना सुदर्शनाचें तेज सहन होत नसल्यामुळें ते भूमींत बिळें करून राहतात. त्यांच्याखालीं पाताळ म्हणून जो सातवा लोक आहे, तेथें वासुकी नांवाचा सर्प राज्य करितो. त्याच्या गळ्यांत चंद्रमौळी नांवाचा एक प्रसिद्ध हार आहे. तेथें श्वेत, शंख, कुलिक, शंखचूड, महाशेष, कंबल व अश्वतर इत्यादिक अनेक सर्प राहात आहेत. तसेंच धनंजय, धृतराष्ट्र, महाशंख, शतमुख, देवदत्त वगैरे दहा दहा, शंभर शंभर, हजार हजार फण्यांचे मोटमोठे नागही तेथें आहेत. त्या सर्वांच्या मस्तकावर अत्यंत तेजस्वी असे मणी आहेत. त्यांच्या प्रकाशामुळें पाताळांत सर्वत्र उजेड पडलेला असतो. त्याच्याखालीं शेष आहे, त्यास संकर्षण म्हणतात. त्याचें शरीर अत्यंत विशाल आहे. ही संपूर्ण पृथ्वी त्याच्या मस्तकावर स्थापन केली आहे, तरी त्यास तिचा भार न होतां केवळ मोहरीच्या दाण्याप्रमाणें ती त्याला वाटतें. त्याच्या भुंवईपासून अकरा रुद्र उत्पन्न झाले आहेत. व विष्णूनीं याचेवरच शयन केलें आहे. या संकर्षणाचे गुणानुवाद स्वर्गात ब्रह्मदेव सर्व देवांना सांगत असतो, व नारदही त्याचे पोवाडे गात असतो. असा हा महात्मा संकर्षण त्याचें जो कोणी नामस्मरण करील, जो कोणी भजनपूजन करील, त्याच्या सर्व पातकांचा नाश होईल. या संकर्षणाखालीं कोटी योजनें खोल अंतरावर हरिहरांचें पदयुगुल आहे. त्या पदयुगुलावर हें एवढें ब्रह्मांड आदिपुरुषानें स्थापन केलें आहे.

## ४. नरकलोक.

याप्रमाणें वैशंपायनऋषींनीं पाताळाविषयीं सांगितलेली माहिती ऐकून राजाला नरकलोकची एकंदर हकीगत ऐकण्याची इच्छा उत्पन्न झाली. तो ऋषीला म्हणाला, मनुष्यांस पापकृत्यांबद्दल ज्या स्थानीं ईश्वरदत्त दंड मिळतो तें स्थान किंवा मरणानंतर तसले प्राणी कोठें जातात, त्यांचें पुढें काय होतें, वगैरे सर्व ऐकावें असें मला वाटतें, तर तें आपण मला कृपा करून सांगावें. हें ऐकून वैशंपायनऋषि म्हणाले, 'राजा, कर्म हें संचित, प्रारब्ध व क्रियमाण अशा तीन प्रकारचें आहे. हे तिन्ही प्रकार यावत् जीवकोटीस लागू आहेत. कृतकर्माचें फळ भोगिल्या-वांचून कोणाचीही सुटका होत नाहीं. कर्मफळ चांगलें किंवा वाईट हें कर्मावर अवलंबून आहे. चांगल्या कर्मांचीं फळें चांगलीं असतात. तीं मृत्यूनंतर स्वर्ग वगैरे लोकीं जाऊन भोगावयास मिळतात. वाईट कर्मांचीं फळें वाईट असतात व तीं मृत्यूनंतर नरकलोकीं जाऊन भोगावीं लागतात. मुख्य नरक अठ्ठावीस असून लहान लहान असंख्य आहेत. नरकलोक हा त्रैलोक्या-मध्यें दक्षिण दिशेला अंतराळीं आहे. या नरकलोकाच्या अलीकडे अग्निष्वात्त,

वगैरे पितरांचा लोक आहे. ते पितर नेहमीं 'सत्पुत्र व्हावा' अशी इच्छा करितात. नरकलोकांचा राजा यम हा असून तो आपले पुत्र व दूत यांच्याकडून आपला सर्व राज्यकारभार चालवितो. ज्याचें जसें पाप असेल, त्याप्रमाणें त्यास तेथें कमी अधिक प्रमाणानें नरकयातना भोगाव्या लागतात. तेथें जे अनेक नरक आहेत त्यापैकीं तामिस्र, अंधतामिस्र, रौरव, महारौरव, अपार, कुंभपाक, काळसूत्र, तप्तसूर्मी, वैतरणी, वज्रकंटक, असिपत्रवन, व सूकरमुख हे अकरा नरक मुख्य आहेत. याशिवाय पर्यावर्तन, अंधकूप, कृमिभोजन, शाल्मलीक, कर्दमघोडी, प्राणरोधन, विशसन, लालाभक्षण, क्षारकर्दम, सूचीमुख, राक्षसभोजन, शूलप्रोत, अवटनिरोधन, दंदशूक, श्वानभक्षण, काकमुख, वगैरे अनेक आहेत. ज्यानें जसें पाप केलें असेल त्याप्रमाणें त्याला एक अथवा अनेक नरकांत वास करावा लागतो. स्त्रिया व अज्ञान मुलें यांचें ज्यानें द्रव्य हरण केलें असेल, किंवा स्त्रिया व मुलें हींच ज्यानें चोरलीं असतील, त्याला तामिस्र नांवाचा नरक प्राप्त होतो. या नरकांत प्राणी पडला म्हणजे त्याला अन्न व पाणी भक्षण करण्यास मिळत नाहीं, त्यामुळें त्याचे प्राण कासावीस होतात. तशा स्थितींत यमाचे दूत त्याच्या शरीरावर प्रत्यही लाखों मुद्गलांचा प्रहार करीत असतात. त्यामुळें तो क्षणोक्षणीं मूर्छित होऊन पडतो. नंतर ते त्यास उभा करून धोंड्यावर आदळतात. विस्तवाप्रमाणें लाल धोंडे त्याच्या अंगावर फेंकतात, व अनेक प्रकारें त्याचे हाल करितात. जो स्त्रीपुत्रांनां सोडून भोजन करितो, व त्यांनां नेहमीं त्रास देतो, त्यास ते दूर अंधतामिस्र नांवाच्या नरकांत टाकितात. ह्या नरकांतही वरील प्रमाणेंच भयंकर छळ सोसावा लागतो. त्याची मर्यादा एक हजार वर्षें असते. जो स्वकुटुंब संरक्षणार्थ प्राण्याचा वध करितो, त्यास रौरव नरक प्राप्त होतो. प्राण्याचा वध करितेवेळीं जशारीतीनें त्यास त्रास दिला असेल तसा त्रास वध करणाऱ्यास येथें भोगावा लागतो. जो प्राणी वध करून किंवा अन्यरीतीनें मांस भक्षण करितो, त्यास महारौरवांत टाकितात. तेथें त्याच्या शरीराचें क्षणोक्षणीं मांस काढितात व त्यास अति त्रास देतात. एवढ्यासाठीं यज्ञावांचून कधींही पशुवध करू नये. जो, पशु, पक्षी वगैरे प्राणी बाळगितो व त्यांचा विक्रय करितो, त्यास महानरक प्राप्त होतो. त्यास तापलेल्या तेलांत ढकलून देतात व कुंभीपाकांत टाकितात. जो ब्राह्मणाचा द्वेष करितो त्यास अत्यंत प्रखर अशा अग्निशिळेखालीं दडपितात, पशूच्या अंगावरील केसांच्या गणती इतकीं वर्षें ब्रह्मद्वेष्ट्या मनुष्यास त्या भयंकर अग्नीचें दुःख भोगावें लागतें. जो दुष्टहेतूनें किंवा केवळ उदरंभरणासाठीं दुष्टांची सेवा करितो, त्यास यमदूत असिपत्र नांवाच्या अरण्यांत नेऊन टाकितात. त्या अरण्यांतील पानांस तरवारीप्रमाणें तीक्ष्ण धारा आहेत, व तीं पानें पाप्यांच्या शरिरांस अत्यंत त्रास देतात. पापी मनुष्याच्या देहाचे तेथें राईप्रमाणें तुकडे होऊन जातात. तेथून पळूं लागल्यास

यमाचे दूत त्याला मुसळांनीं ताडण करितात. जो राजा प्रजेचा निष्कारण छळ करितो, निरपराध्यांनां दंड करितो, प्रजेवर जुलूम करतो व ब्राह्मणांस त्रास देतो त्याला सूकरमुखनरक प्राप्त होतो. तेथील सूकर आपल्या भयंकर दातांनीं अशा राजाला खंडविखंड करून टाकितात. ऊंस चरकांत घालून जसा पिळून काढतात त्या प्रमाणें ते सूकर आपल्या दाढेनें पिळून त्याला त्याच्या कृतकर्मांचें पुरें प्रायश्चित देतात. जो दुसऱ्याचा जोडा किंवा अन्य वस्तु चोरतो, त्यास अंधकूप नरक प्राप्त होतो. तसेंच जो पशु, पक्षी, मृग, कीटक, मुंगी, ढेंकूण, मच्छर वगैरे जीव जंतूंना मारतो, त्यासही अंधकूपनरक प्राप्त होतो. जे यज्ञयागाची हेटाळणी करितात, जे अधर्माचरण करितात, जे वर्णाश्रम धर्मानें वागत नाहींत, त्यांना कृमिभोजन नरक प्राप्त होतो. तेथें अनेक प्रकारचे कृमि असतात, ते पातक्यांच्या शरिराला तोडीत असतात,त्यामुळें त्यांस फार क्लेश होतात.जो आपण मिष्टान्न खाऊन दुसऱ्यास कदान्न घालतो, जो जेवणाचे वेळीं पंक्तिभेद करितो, त्यासही कृमिकुंडांत जावें लागतें व त्यामुळें त्यास अत्यंत त्रास होतो. सुवर्ण चोरतो त्यास यमदूत तप्त सांडसानें भाजून काढितात. त्या तापलेल्या सांडसांत एकदां प्राणी सांपडला म्हणजे त्याचें मांस जळूं लागतें व त्यास अत्यंत यातना होतात. जे पुरुष परस्त्रीबरोबर असद् व्यवहार करितात, व ज्या स्त्रिया व्यभिचारिणी असतात, त्यांना तप्त लोखंडाच्या स्त्रीपुरुषांच्या पुतळ्यांबरोबर तसेच व्यवहार करावयास लावितात. जे दुराचारी सृष्टिविरुद्ध कर्में करितात, त्यांना यमदूत वज्रकंटकावर निजवून मुसळानें मारितात. जो अधर्मानें वागतो व लोकांत पाखांड पसरवितो, त्यास यमदूत वैतरणी नरकांत टाकून देतात. वैतरणी नदी म्हणजे एक मोठा खंदक असून अठ्ठावीस नरकांतली मळ, मूत्र, नखें, केंस, रक्त, वसा, मांस, कफ वगैरे घाण त्या नदींतून वाहात असते. त्या नदींत प्राणी पडला म्हणजे घाणीनें तो अगदीं त्रस्त होतो. तेथें असलेले राक्षस त्याला वारंवार दंश करितात; त्याला जेव्हां क्षुधा लागते तेव्हां तें मळमूत्र यमदूत त्याच्याकडून खाववितात. जे अरण्यांत जाऊन श्वानादिकांकडून जीवहिंसा करितात, व अमिष दाखवून जे प्राण्यांचा वध करितात, त्यांना यमदूत वज्रबाणांनीं विंधून जर्जर करून टाकितात. जे स्त्रियांवर बलात्कार करितात, जे परस्त्रीगमन करितात, त्यांना रेतकुंडांत टाकितात. तें रेत अति तप्त असल्यामुळें त्यांना फार यातना होतात. यमदूत तें तप्त रेत त्या दुष्ट प्राण्यांच्या मुखांत घालितात. तप्त सळयांनीं त्यांचे डोळे फोडितात, व त्यास वज्रघाणींत घालून पिळून काढितात. जो चोरी करून पोट भरतो, जो दुसऱ्याचे घराला अग्नि लावतो, जो विषप्रयोग करितो, व जो लांच खातो; त्याला नरकलोकीं कुत्रीं आपल्या तीक्ष्ण दांतांनीं टोंचून त्याचें मांस बाहेर काढितात. जो खोटें बोलतो, जो खोटी साक्ष देतो, त्यास

सहस्रावधि विंचू दंश कारितात, व त्या वेदनांनीं त्याचे पंचप्राण कासावीस होतात. यमदूत नाना प्रकारच्या विषारी वल्लींचा धूर देतात व उंच पर्वतावरून ढकलून देतात. जो ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र एकादशी करीत नाहीं, जो एकादशीचे दिवशीं सुरापान करितो, स्त्रीशीं रममाण होतो, तांबूल भक्षण करितो, त्यास यमदूत लोखंडाच्या तप्तरसांत टाकून देतात; व तो तप्तरस तोंडांत ओतितात व त्याचा अनेक प्रकारानें छळ करितात. जो विद्या, द्रव्य, तारुण्य, तप, सत्ता व दान या सर्वांमुळें किंवा एकामुळें गर्विष्ठ होऊन उन्मत्तपणानें ज्याचा त्याचा उपमर्द करितो, तो नरकलोकीं क्षारकृमीच्या तडाख्यांत सांपडतो व त्यामुळें त्याची अवस्था अत्यंत शोचनीय होते. यमाचे शंभर शंभर दूत अशा पातक्यांना त्रास देत असतात. जे दुराचारी कोणाला कळूं न देतां मांस भक्षण करितात, त्यांना आपल्या स्वतःच्याच मांसाचा दंड द्यावा लागतो. जो साधूची निंदा करितो, जो सज्जनाशीं विरोधानें वागतो, जो खऱ्याचें खोटें करितो, त्याच्याकडून यमदूत तप्तशिला जिव्हेनें चाटवितात. जो निरपराध्यांना त्रास देतो, जो गरीबांना गांजितो, करमणुकीकरितां पशुपक्षी मारितो, त्याला यमदूत सुळावर देतात; तो सूळ उदरांत शिरून त्या प्राण्याचे अत्यंत हाल होतात, त्या स्थितींत घारी येऊन चोंचीनें त्याच्या अंगास टोंचितात. जे राजे किंवा राजदूत कपटानें किंवा अन्यायानें दुसऱ्याला पीडा देतात, अनाथांस नाहक गांजितात, त्यांना अंधारकोठडींत कोंडितात, सुळावर देतात, किंवा कारागृहांत टाकितात, व अशा राजांना यमदूत वज्रविवरांत फेंकून देतात, मिरच्याची धुरी देतात व शरीराला गळ टोंचून त्यांच्या पापाचा दंड त्यांना पुरा भोगवितात. जो अतिथींकडे वक्रदृष्टीनें पाहतो, त्यांचा उपहास करितो व त्यांची अवहेलना करून त्यांस त्रास देतो, त्याचे डोळे यमदूत गिधाडांकडून फोडवितात व जिव्हा तोडून काढवितात. जो संपन्न असतांही कृपणपणानें वागतो, मुलाबाळांना व स्त्रियांना वस्त्रालंकार देत नाहीं, कदन्नावर निर्वाह करितो, द्रव्याचा जो सदुपयोग करीत नाहीं, त्यास नरकलोक प्राप्त होतो. तेथें यमदूत त्याच्या शरिराला सुया टोंचून त्यास अगदीं त्रस्त करितात. उंदरांकडून वज्रदंतांनीं त्यास चाववितात. याप्रमाणें नरकलोकीं पाप्यांना त्यांच्या दुष्कृतीप्रमाणें दंड मिळतो. जे पुण्यवान असतात त्यांना स्वर्गलोक प्राप्त होतो, व तेथें त्यांनां आपल्या शुभकर्मांचें फळ प्राप्त होतें. पुण्य संपलें म्हणजे त्यांस मृत्युलोकीं पुनः मनुष्य जन्म प्राप्त होतो, व पाप्यांना त्यांच्या कृतकर्मांचें फळ जो नरकवास तो भोगून झाला म्हणजे त्यांस पुन्हा नीचयोनींत जन्म प्राप्त होतो. जे अध्यात्मविषयांत पूर्णत्वास पावलेले असतात, ज्यांनीं योगाभ्यास करून ईश्वरास पूर्णपणें ओळखिलें असतें, त्यांना मात्र मोक्ष प्राप्त होतो. हे जनमेजयराजा, एवढ्यासाठीं प्रत्येकानें सन्मार्गानें वागून ईश्वरास ओळखण्याचा प्रयत्न करावा.

---

# अध्याय ५ वा.

## पृथुराजाचें चरित्र.

एके दिवशीं जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला, वैशंपायनऋषि, आपण या विश्वोत्पत्तीविषयीं मला संपूर्ण माहिती सांगितली, हे आपले मजवर मोठे उपकार झाले. परंतु मला अशी शंका उत्पन्न झाली आहे कीं, पृथ्वी ही पृथुराजानें उत्पन्न केली, म्हणून तिला पृथ्वी असें कित्येक म्हणतात, आणि आपण ती आदिपुरुषानें विष्णूकडून मधु व कैटभ या राक्षसांना मारवून निर्माण केली, असें सांगितलें. तर दोहोंची एकवाक्यता कशी होऊं शकते, तें मला कळत नाहीं. तर तें आपण कृपा करून सांगावें. वैशंपायनऋषि म्हणाले, राजा, पृथ्वी ही पूर्वींपासूनच आहे, तिचें मुळचें नांव मेदिनी असें आहे; कारण ती मधु व कैटभ राक्षसांच्या मेदापासून निर्माण झाली आहे. याप्रमाणें या मेदिनीला वसुंधरा, वसुमति, वगैरे अनेक नांवें आहेत. त्यांपैकींच पृथ्वी हें एक नांव आहे. तें नांव पृथुराजामुळें तिला प्राप्त कसें झालें ती कथा मी तुला सांगतों.

पूर्वी उत्तानपाद नांवाचा एक मोठा पराक्रमी व धर्मशील राजा होऊन गेला. तो राजा प्रसिद्ध प्रियव्रतराजाचा बंधु होय. तो राजा प्रजेला चंद्राप्रमाणें आवडता असे. त्या उत्तानपादराजाला प्रसिद्ध ध्रुव मुलगा झाला. ध्रुवाला वत्सर नांवाचा मुलगा झाला, व वत्सरराजाला उल्मुक नांवाचा पुत्र झाला. या उल्मुकराजाला अंग नांवाचा पुत्र होता; आणि या अंगराजाला प्रसिद्ध वेन हा पुत्र झाला. वेनराजाचा पिता अत्यंत उदार, पापभीरु व सत्धर्मरत असून फार पराक्रमी होता. त्याच्या राज्यांत सर्व प्रजा सुखी होती, व पापाचरणानें वागणारे लोक मुळींच नव्हते. परंतु वेनराजा हा अत्यंत दुष्ट निघाल्यामुळें त्यानें बापाचे मागें राज्य प्राप्त होण्याबरोबर सव राज्याची घडी बिघडवून टाकिली. तो अत्यंत अनाचारानें वागूं लागला. त्याच्या बेफाम वागण्यानें प्रजा फार त्रस्त झाली. ऋषि याप्रमाणें कथा सांगत असतां, जनमेजयराजा मध्येंच म्हणाला, ऋषि, ध्रुवकुल म्हणजे उत्तम कुल, शिवाय वेनराजाचा पिता अंग हाही सत्धर्मप्रतिपालक राजा होता; असें असतां त्या राजाच्या पोटीं हा दुष्ट वेनराजा कसा निर्माण झाला ! तेव्हां वैशंपायनऋषि म्हणाले, राजा, यांत कुलाचा किंवा त्याच्या मातपित्याचा कांहींही दोष नाहीं. मनुष्याचें आचरण बिघडण्यास संगति व प्रकृति या दोन गोष्टी कारण असतात. त्याप्रमाणें या वेनराजाला वाईट संगति लागल्यामुळें व त्याची प्रकृतीही क्षुद्र असल्यामुळें त्याच्याकडून निंद्याचरण होऊं लागलें. राज्य प्राप्त झाल्यावर तो सत्ता व वैभव यामुळें फार उन्मत्त झाला; आपल्या हुकमतीनें सर्व जग चालत आहे असा त्यास अभिमान वाटूं लागला; व या अभिमानामुळें त्याची विवेकशक्ति नाहींशी झाली. तोंडांतून जो शब्द निघेल तो

खरा करावयाचा असें त्याचें वर्तन चाललें होतें. आपल्या शब्दासाठीं तो वाटेल तसें लोकांचें नुकसान करीत असे. ईश्वर वगैरे कांहीं नसून सर्व जगाचा कर्ता हर्ता कायतो मीच आहें, राजाचा अधिकार देवापेक्षांही अधिक आहे, आपणही राजे आहोंत, तेव्हां असेंच असलें पाहिजे, अशी त्याची दृढ भावना झाली. अशा कुबुद्धीनें त्यास ग्रासल्यामुळें, त्याची मजल साधूंनां छळण्यापर्यंत जाऊन पोहोंचली.

एकदां त्या राजानें जगांत जेवढे सत्पुरुष होते तेवढ्यांना राजवाड्यांत येण्याविषयीं निरोप पाठविला. राजाच्या निरोपाप्रमाणें, सनक, सनंदन, सनत्कुमार, स्वायंभुवमनु, अंगिरा, देवतनु, अत्रिऋषि, नारदमुनी, पौलस्ती, पुलहमुनी, भृगु पाराशर, वसिष्ठ, कर्दम, वगैरे अनेक ऋषि व साधु सत्पुरुष राजाकडे आले. तो सज्जनसमूह पाहून सर्व जगांतील साधुता, पवित्रसद्गुण, सर्व विद्या ह्या प्रत्यक्ष मूर्तिमंत आल्या आहेत, किंवा जगांतील सर्व पुण्याचा ठेवा एकत्र होऊन तेथें प्राप्त झाला आहे, असें वाटूं लागलें. असे ते वेदविद्येचे पुतळे, ब्रह्मविद्येचे सागर, ज्ञानाचे पर्वत, प्रत्यक्ष वेनराजाच्या घरीं चालत आले. राजवाड्यांत पाऊल टाकिल्याबरोबर त्यांनीं मंत्रघोष करण्यास आरंभ केला. निरनिराळे ऋषि निरनिराळे मंत्र म्हणूं लागले. कोणी राजाला आशीर्वाद देऊं लागले, कोणी राजाचें अभिष्ट चिंतूं लागले, कोणी गायत्री मंत्र म्हणूं लागले, कित्येक वेदघोष करूं लागले, याप्रमाणें तो सर्व राजवाडा त्यांनीं गर्जवून सोडिला. ते ऋषि राजाच्या समोर येऊन उभे राहिले, परंतु ऋषींना पाहून तो उन्मत्त वेनराजा आपल्या सिंहासनावरून उठला नाहीं, किंवा शब्दानेंही त्यानें त्यांचें स्वागत केलें नाहीं. पण उलट, तो मोठ्यानें गर्जना करून म्हणाला, अहो ऋषिजनहो ! हा वेदघोष बंद करा. मी या संपूर्ण पृथ्वीचा कर्ता हर्ता असून तुम्हीं माझ्यासमोर ईश्वराची स्तुति करीत आहां, व त्याचेच उपकार मानीत आहां, हा तुमचा मूर्खपणा होय. हा तुमचा अपराध अक्षम्य आहे, परंतु एकदां तुम्हांला क्षमा केली आहे. आजपासून तुम्हीं वेदाध्ययन किंवा अनुष्ठानें अथवा होम हवनें केलीं, तर मी तुम्हांला जबर शिक्षा करीन. जो प्रातःस्नान व जपजाप्य व भजनपूजन करील त्याचा मी क्षणोक्षणीं अपमान करीन. जो वेदघोष करील विष्णूचें किंवा अन्यदेवांचें भजन करील, तो आपल्या प्राणाला मुकला म्हणून समजा. जो पंचाग्निसाधन, धूम्रपान, वगैरे तपश्चर्या व तपसाधन करील त्याला मी आपल्या बंदीशाळेंत टाकून देईन. तुम्ही ऋषि, आपणास थोर ज्ञानी म्हणवितां, परंतु खरोखर या जगाचा कर्ता हर्ता कोण आहे, हें तुम्हांला मुळींच कळत नाहीं. अहो, हें सर्व जग माझ्या कृपेमुळें चाललें आहे. माझ्यामुळें तुमचें भरण पोषण होत आहे, माझ्या सत्तेनें तुम्हीं सुरक्षित आहांत, माझ्या राज्यांत तुम्हीं राहात आहांत; सारांश, माझ्यामुळें तुमचे सर्व व्यवहार चालले आहेत.

असें असून तुम्ही माझें भजनपूजन न करितां, ज्याच्या भूमीवर तुम्ही राहात नाहीं, जो तुम्हाला खावयाला देत नाहीं, जो तुमचे संरक्षण करीत नाहीं त्या विष्णूचें तुम्ही भजनपूजन करितां; हा तुमचा मूर्खपणा नव्हे काय ? असो, एक-वार तुम्हांला मीं क्षमा केली आहे. पण हें लक्षांत ठेवा कीं, मी राजा, राज्य-कर्ता, शास्ता संरक्षक, दाता, देव व पराक्रमी असा मीच आहें. तुम्ही माझी सेवा सुश्रूषा करीत जा. तसें न करितां जर विष्णूचें किंवा अन्य देवतांचें भजन केलेंत तर तुम्ही आपली विटंबना करून घेऊन प्राणांसही मुकाल. याप्रमाणें त्या राजाचीं कटु उत्तरें ऐकून सर्व ऋषींना फार वाईट वाटलें, व त्या राजाचा त्यांना रागही आला; परंतु मूर्खाशीं बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असें जाणून ते सर्व ऋषि तेथून निघून गेले.

तो वेनराजा उन्मत्त होऊन स्वतःच जेव्हां अशा रीतीनें धर्मांचा उच्छेद करूं लागला, तेव्हां त्याच्या राज्यांत नास्तिक व पापी असे जे लोक होते त्यांना अधिकच फावलें. राजा त्यांच्या तंत्रानें वागूं लागला, तेव्हां त्याच्या राज्यांतील पुण्यांश कमी होऊं लागला, व पाप वाढूं लागलें. राज्यांत सर्वत्र अंदाधुंदी चालूं झाली. चोर, व्यभिचारी, कपटी, कुलांगार, दुष्ट, क्रूर अशा लोकांचा मानमरातब वाढूं लागला, व त्यांना राजाश्रय मिळूं लागला, दुर्जनांनां आपल्या इच्छेप्रमाणें वागण्याची राजानें मोकळीक दिली असल्यामुळें सज्जनांनां अत्यंत त्रास होऊं लागला, त्यांचें जीवित व संपत्ति यांचा क्षणोक्षणीं नाश होऊं लागला. दुष्टांकडून साध्वी स्त्रियांच्या अब्रूचा नाश होऊं लागला, साधूंचा छळ होऊं लागला, निरपराधी कारागृहांत पडूं लागले, पुण्यकर्मे बंद पडलीं, होमहवनें होत नाहींशीं झालीं, आणि जिकडे तिकडे अधर्माचें साम्राज्य माजलें. दुष्ट राजमन्त्र्यांच्या तंत्रानें वागावें, राजाचा जयघोष करावा, त्याच्या पासून प्रजेचा इतका छळ होत होता तरी त्याची स्तुति करावी, तो क्रूर होता तरी त्याला दयाळू म्हणावें, तो अधर्मी होता, तरी त्याला सत्धर्मप्रतिपालक म्हणावें, अशा रीतीनें वागणाऱ्यांसच फक्त सुरक्षितपणें राहतां येत असे. तरी राजाची वक्र-दृष्टी केव्हां फिरेल याचा कांहीं नियम नव्हता. एकदां त्या राजानें कित्येक ऋषीनां जबरदस्तीनें बोलावून आणिलें, व तो त्यांना म्हणाला; 'ऋषीहो, तुमचें बरें वाईट करणें माझ्या स्वाधीन आहे, हें तुम्हांला आतां कळून चुकलेंच आहे. तेव्हां तुम्ही आतां माझी पूजा करा, माझें भजन करा, माझी स्तुति करा, मिष्टान्नांचा नैवेद्य मलाच समर्पण करा, आणि मीच देव असें मानून माझे पोवाडे गा. राजाची ही आज्ञा ऋषींनीं निमुटपणें मान्य केली. ते राजा-पुढें हात जोडून उभे राहिले, व म्हणाले, हे राजराजेश्वरा, तूंच देव आहेस, तूंच सर्व कर्ता हर्ता आहेस, या सृष्टीमध्यें द्रव्य वित्तादि स्वरूपी तूंच आहेस, पुण्य स्वरूपी तूंच आहेस, तीर्थ स्वरूपी मोक्षरुपी तूंच आहेस. या संपूर्ण जगांत

तुझ्यासारखा उदार, दयाळू, धर्मशील, प्रतापी असा दुसरा कोणीही नाहीं. आदि-शक्ति, आदिमूर्ति, परब्रह्म, जें म्हणतात तें तूंच आहेस. तूं देवांचा देव आहेस. हे देवाधिदेवा, आम्ही तुला शरण आहोंत. याप्रमाणें ऋषींनीं राजाची खोटी स्तुति केल्यामुळें तो मूर्ख दुराचारी राजा प्रसन्न झाला, व त्यानें ऋषींनां तुमची काय इच्छा आहे म्हणून विचारिलें. राजाची प्रसन्नता पाहून यावेळीं राजाला उपदेशाच्या दोन गोष्टी सांगितल्यास त्याच्या मनावर त्यांचा कांहीं परिणाम होईल, असें वाटल्यावरून ते ऋषि राजाला म्हणाले; 'हे राजा, राजानें यज्ञयाग करणें हें त्याचें कर्तव्य होय. यज्ञयागानें ऋतुकाळ व्यवस्थित असतात, व पर्जन्य यथासमयीं वृष्टि करितो, व त्यायोगें धनधान्याची समृद्धि होऊन प्रजा सुखी होते. ऋषीचें भाषण ऐकून त्या दुराचारी वेनराजाला विलक्षण राग आला. हे ऋषि आपणास भलतीच सल्ला देऊन आपलें अहित करूं पाहात आहेत, असें वाटून तो त्या सर्व ऋषीवर क्रुद्ध झाला, व त्यांनां वाटेल तसें बोलूं लागला. राजाचीं तीं दुरुत्तरें ऐकून सर्व ऋषि राजावर संतप्त झाले व त्यांनीं राजाला शाप दिला कीं, ' दुष्टा, तुला मृत्यु प्राप्त होवो.' ऋषींनीं शाप देतांच तो वेनराजा गतप्राण होऊन भूमीवर पडला. अशा रीतीनें तो वेन-राजा मरण पावल्यामुळें राजवाड्यांत जिकडे तिकडे एकच कल्होळ उडाला. राजमाता व राजाचे अन्य आप्त दुःखित होऊन फार शोक करूं लागले. त्या वेनराजाला पुत्र नसल्यामुळें त्याच्या पश्चात राज्यावर कोणाला बसवावें, याचा सर्वांना मोठा विचार पडला, परंतु त्या वेळीं योग्य असा कोणताच उपाय सुचेना. शेवटीं राज्यावर दुसरा कोणी बसेपर्यंत तें प्रेत तसेंच ठेवण्याचा सर्वांनीं विचार केला व त्याप्रमाणें तें प्रेत तसेंच ठेविलें गेलें.

## २. पृथुराजाचा जन्म.

इकडे ऋषींनीं राजाला शाप देऊन ते राजवाड्यांतून निघाले व नदीवर स्नाना-साठीं गेले. त्या वेनराजाच्या राज्यांत पापाचरणामुळें वेताळ, राक्षस, भुतें वगैरे दुष्टदेवतांचा फार सुळसुळाट झाला होता. त्या अपदेवता राजा मरण पावल्या-बरोबर सर्व नगरांत व राज्यांत फिरूं लागल्या, व लोकांना फार त्रास देऊं लागल्या. त्या भुतांच्या भूतचेष्टांनीं लोक अत्यंत त्रस्त होऊन ऋषींनां शरण गेले. तेव्हां तो प्रकार पाहून ऋषींनांही मोठा विचार पडला. मग स्वायंभुवमनु म्हणाला, अहो, राज्यावर कोणी तरी योग्य पुरुष बसविल्यावांचून हें संकट दूर व्हावयाचें नाहीं. एवढ्यासाठीं आपण वेनराजाचें शरीर मंथन करूं; म्हणजे त्याच्या शरीरापासून पुत्र होतील व ते या पिशाचांचा संहार करतील. स्वायंभुव-मनूच्या सूचने प्रमाणें सर्व ऋषि राजवाड्यांत आले. मग त्या ऋषींनीं एक दर्भाचा दोर तयार केला व त्यानें त्या वेनराजाचा डावा ढोंपर मंथन केला. तेव्हां त्या राजाच्या शरीरांतलें सर्व पाप एकवटून त्याचा एक कृष्णवर्ण खुजट व

स्थूलपोटाचा पुरुष निर्माण झाला. तो निषाद होता. त्याला ऋषींनीं त्या वेताळादि भुतांचा नाश करण्याची आज्ञा केली, व जेथें मनुष्य प्राणी राहात नसतील तेथें जाऊन राहाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो निषाद पिशाचांचा नाश करून निर्मनुष्य ठिकाणीं जाऊन राहिला. नंतर ते ऋषि राज्यावर बसण्यासारखा योग्य पुरुष निर्माण व्हावा म्हणून पुन्हा प्रयत्न करूं लागले. त्यांनीं दर्भदोर दक्षिणभुजेला बांधला व ते ती भुजा मंथन करूं लागले, तेव्हां त्या भुजेपासून विष्णुतेजाचा एक सर्वांगसुंदर असा पुरुष निर्माण झाला. तो पुरुष दुष्टांचा संहार करण्यासाठीं प्रगट झालेले साक्षात विष्णूच होत. त्या पुरुषाचें तेज विलक्षण असून तो पुरुष प्रभावशाली व सौंदर्यवान दिसत होता. ऋषींनीं त्याचें नांव पृथु असें ठेविलें. नंतर ऋषींनीं वेनराजाची डावी भुजा मंथन केली, तेव्हां त्या भुजेपासून एक सुंदर स्त्री निर्माण झाली. ती स्त्री प्रत्यक्ष लक्ष्मी होती. तिचें तें विलक्षण सौंदर्य व अपूर्व तेज पाहून ऋषींनां फार आनंद झाला. त्यांनीं तिचें नांव आर्चि असें ठेविलें. याप्रमाणें विष्णु व लक्ष्मी यांनीं जन्म धारण केल्यावर ऋषींनीं त्यांचा आनंदानें जयजयकार केला. त्या वेळीं ब्रह्मदेव, इंद्र, अग्नि, वायु, मही, यम, वरुण, सोम, सूर्य, वगैरे सर्व तेथें आले, व त्यांनीं त्या दोघांचा जयजयकार करून त्यांच्यावर पुष्पवृष्टि केली. त्यांनां कुबेरानें सुवर्णासन दिलें, इंद्रानें मुकुट दिला, सूर्यानें छत्र दिलें, विश्वकर्म्यानें रथ दिला, वायूनें पंखा दिला, यमानें संयमन दिलें, व धर्मानें कीर्तिमाळ दिली. याप्रमाणें सर्व देवांनीं निरनिराळ्या वस्तु पृथूला देऊन त्याचा गौरव केला. नंतर त्यांनीं पृथूचें व अर्चीचें मोठ्या समारंभानें लग्न केलें, व त्यास राज्यावर बसवून देव आपआपले स्थानीं निघून गेले.

पृथूला राज्याधिकार प्राप्त झाल्यावर त्यानें पापी व दुराचारी लोकांनां यथोचित दंड करून राज्यांतील बंडाळी मोडून टाकिली; सज्जनांना राजमंत्री केलें व त्यांच्या तंत्रानें राज्यकारभार चालविला; तसेंच राज्यांतील राक्षस वगैरे दुष्टांचा नाश करून टाकिला व प्रजेच्या सुखाचे मार्ग मोकळे केले. त्यानें आपल्या शत्रूंचें दमन केलें व सर्व पृथ्वी जिंकून एकछत्री राज्य केलें. पापकर्मांचा उच्छेद करून राज्यांत सर्वत्र पुण्यकर्में चालू केलीं. याप्रमाणें त्या पृथुराजानें पुष्कळ वर्षेपर्यंत राज्य केल्यावर एक विलक्षण प्रकार घडून आला. यथासमयीं लोकांनीं जमिनींत धान्य पेरलें, पाऊसही जसा पडावयाला पाहिजे होता तसा पडला, परंतु पेरलेलें धान्य वर येईना. लोकांनीं पुन्हां प्रयत्न करून पाहिला, परंतु धान्य मुळींच उगवेना. याप्रमाणें दोन तीन वर्षें झाल्यावर राज्यांत सर्वत्र भयंकर दुष्काळ पडला व जिकडे तिकडे हाहाःकार उडाला. हा राजा कांहीं तरी गुप्त रीतीनें पापकर्में करीत असावा म्हणून धान्यबीज पृथ्वी खाऊन टाकते, असा सर्व लोकांचा समज झाला, व ते लोक त्या राजाला

वाटेल तें बोलूं लागले. या राजापेक्षां पूर्वींचा तो वेनराजा बरा असेंही कित्येक म्हणूं लागले. एकदां तर पुष्कळ लोक एका ठिकाणीं जमले व त्यांनीं या संबंधानें राजाला स्पष्ट जबाब विचारिला. तेव्हां राजालाही मोठें गूढ पडलें; व तो हें संकट टाळण्याचा विचार करूं लागला. ऋतुकाल पूर्ववत असून पर्जन्यही चांगला पडत आहे तर पिकें कां येत नाहींत, याचें त्याला कांहीं कारण कळेना. शेवटीं ही पृथ्वीच बीजें खाते, असें त्याला वाटून तो वसुंधरेवर संतप्त झाला. व मी एवढा सद्धर्मानें वागणारा असून ही बीजें खाते तेव्हां हिचाच प्राण घेतों; असें म्हणून त्यानें धनुष्य हातीं घेतलें, व पृथ्वीवर बाण सोडण्यासाठीं तें आकर्ण ओढिलें. तो पृथुराजा म्हणजे साक्षात नारायणाचा अवतार, तो पृथ्वीवर याप्रमाणें संतप्त होण्याबरोबर पृथ्वी भयानें गर्भगळित झाली, व ती धेनूचें रूप धारण करून गिरिकंदरांतून पळूं लागली. ती गाय ही पृथ्वीच आहे, असें राजानें तावडतोब ओळखिलें, व तोही तिच्या मागें धांवूं लागला. पळतांना पृथुराजा तिला म्हणाला, 'हे वसुंधरे, मी सत्धर्मानें वागत असतां व माझी प्रजाही चांगल्या रीतीनें तुझें पूजन-अर्चन करीत असतां, तूं त्यांची बीजें काय म्हणून खालीस ? तूं पिकत नाहींस म्हणून मी तुझा प्राण घेतों व तुझ्या रक्तमांसानें प्रजेला संतुष्ट करितों. राजाचें भाषण ऐकून ती गाय फारच भयभीत झाली. अगोदरच पळतां पळतां ती थकून गेली होती. व कित्येक वर्षें सारखी पळत असल्यामुळें तिला कांहीं खाण्यापिण्यासही मिळालें नव्हतें. त्यामुळें तिचें मांस सर्व झडून जाऊन फक्त अस्थी राहिल्या होत्या. शेवटीं ती अगदींच थकली. तिला पाऊलही पुढें टाकवेना. गोमय व मूत्र यांचा ती वारंवार स्राव करूं लागली. तिच्या सर्व अंगास घाम सुटला व ती थरथर कांपूं लागली. तेव्हां ती राजाला दीनस्वरानें म्हणाली. 'हे राजा, रक्षण कर, रक्षण कर. मी तुझ्या प्रजेचें बीं खाल्लें यांत माझा कांहीं देखील अपराध नाहीं. हे राजा, तूं चक्रवर्ती राजा असून माझा धर्मपिता आहेस, तेव्हां माझा अपराध नसतां तूं मला मारूं नकोस. तुझा पिता वेनराजा फारच पातकी होता, त्यानें मला अत्यंत त्रास दिला. त्याच्या पापकृतीनें मी फार क्षीण झालेली आहे. त्यानें कित्येक वर्षें यज्ञयाग, होमहवनें, वगैरे न केल्यामुळें हविर्भागावांचून मी पुष्कळ दिवसाची क्षुधित होत्यें, त्यामुळें माझा नाइलाज होऊन मी तुझ्या प्रजेचीं बीजें खाल्लीं. हे पृथुराजा, तूं पुण्यश्लोक आहेस. माझ्या या म्हणण्याचा विचार कर व मला प्राणदान दे. मी आतां तुझ्या प्रजेला दशगुणित पीक देईन.

### ३. पृथ्वीरूप धेनूचें दोहन.

पृथ्वीरूपी गायीनें याप्रमाणें पृथुराजाची करुणा भाकिल्यावर त्या राजाला तिची दया आली. त्यानें आपला बाण भात्यांत घातला व धनुष्यही खांद्यावर ठेविलें. तो पृथ्वीला म्हणाला, हे वसुंधरे, तूं मला फार कष्टविलें आहेस. जर

तूं यापुढें माझ्या प्रजेला पीक दिलें नाहींस तर मी तुझा खरोखर नाश करीन. माझ्या राज्यांत प्रत्यहीं होमहवनें होत आहेत. तेव्हां तुला क्षुधेचे कष्ट मुळींच होणार नाहींत. तसेंच तुझ्या पृष्ठभागावर जे वेडेवांकडे व निरूपयोगी पर्वत आहेत तेही नाहींसे करण्याची मला तूं परवानगी दे; म्हणजे मी तुला सारखी करीन व तसें झालें म्हणजे माझ्या प्रजेला बीं पेरण्यासाठीं अधिक जमीन मिळेल. हें ऐकून धेनु म्हणाली, हे राजा, तूं हे डोंगर पाडून टाकून मला सपाट करून टाक. त्याबद्दल मला कांहीं विषाद वाटणार नाहीं. तसेंच तुझ्या राज्यांत जोंपर्यंत यज्ञयागादि कर्मे होत आहेत, तोंपर्यंत मी तुझ्या प्रजेला मुबलक पीक देईन. याप्रमाणें इकडे पृथुराजा व पृथ्वी यांचें भाषण चाललें आहे, तों दुसरीकडून तेथें त्या राजाची बुभुक्षित प्रजा आली. कित्येक वर्षे पृथ्वी पळत असल्यामुळें त्यांना धान्याचा एक कणही मिळाला नव्हता, त्यामुळें ते सर्व लोक वैतागून जाऊन क्षुधेनें अगदीं पिडले होते. ते तेथें आल्यावर राजाला म्हणाले, राजा, अरे कित्येक वर्षे धान्य न पिकल्यामुळें आम्हीं पुष्कळ दिवसाचे उपोषित आहोंत, तर आम्हाला अगोदर कांहींतरी खावयाला दे. इतक्यांत तेथें हिमालयपर्वत कांहीं दुसऱ्या पर्वतांसह आला, व राजाला म्हणाला, राजा, या पृथ्वीनें माझ्या शरीरांतले संपूर्ण आठ रस ( धातु ) खाऊन टाकिले आहेत, तर ते मला हिच्याकडून परत देवीव. इतक्यांत तेथें विश्वावसु आला व तोही राजाला याप्रमाणेंच सांगूं लागला. नंतर तेथें इंद्र आला, तो पृथ्वीनें अमृत नाहींसें केलें म्हणून म्हणाला. याप्रमाणेंच शेषही सर्व सर्पांसह आला, व त्यानेंही आपली हकीकत कळविली. सर्व श्वापदांसह सिंह आला, व तोही क्षुधेनें पीडित असल्याचें म्हणूं लागला. नद्या तेथें येऊन पात्रांतील पाणी पृथ्वी पिऊन गेली म्हणून सांगूं लागल्या. गवत खाणारे पशु आले ते पृथ्वीनें गवत खाल्यामुळें उपासी मरत आहोंत असें सांगूं लागले. बृहस्पती आला तो वेदवीर्य व वेदस्वरूप पृथ्वीनें नाहींसें केलें म्हणून सांगूं लागला. याप्रमाणें अनेक व्यक्ति तेथें आल्या व त्या राजाला आपआपलें गाऱ्हाणें सांगूं लागल्या. तेव्हां पृथुराजा वसुंधरेला म्हणाला, हे वसुंधरे, या सर्वांचें तूं जें जें हरण केलें आहेस तें तें यांनां द्विगुणित देऊन संतुष्ट कर. पृथुराजाचें भाषण ऐकून ती धेनु म्हणाली, तुम्हीं सर्वजण वत्स होऊन माझें दोहन करा म्हणजे तुमचें तुम्हांला प्राप्त होइल. गायीनें असें सांगितल्यावर स्वायंभूवमनु वत्स झाला व त्यानें सर्व औषधी मिळविल्या, भूतगणांनीं वत्स होऊन रक्तप्राशन केलें, बृहस्पति व अन्य ऋषींनीं वेदांचें दोहन केलें. अशा रीतीनें पृथ्वीपासून वेद प्राप्त झाल्यानंतर ऋषींना फार आनंद झाला. नंतर गंधर्वराज विश्वावसु वत्स झाला व त्यानें दोहन केलें. चित्ररथ गंधर्वानें वत्स होऊन दोहन केलें व गायन, नर्तन व वादन ह्या कला त्यानें गायीपासून मिळविल्या. नंतर इंद्र वत्स होऊन आला व त्यानें गायीला दोहून

अमृत काढिलें, तें त्यानें सुवर्णपात्रांत भरून स्वर्गलोकीं नेलें. प्रल्हाद तेथें वत्स होऊन आला, व गायीला दोहून त्यानें श्रवणपद मिळविलें. हिमालय पर्वतानें दोहन करून अष्टधातु मिळविल्या. याप्रमाणें सर्वांनीं दोहन करून आपणास जें पाहिजे होतें तें मिळविलें व ते संतुष्ट होऊन आपआपले स्थानीं गेले. अशा रीतीनें पृथ्वीनें सर्वांनां संतुष्ट केलेलें पाहून पृथुराजाला फार संतोष झाला. हे जनमेजयराजा, ज्यावेळीं हा प्रकार घडून आला, त्यावेळीं ही वसुंधरा पर्वतांच्या गर्दीनें अत्यंत विषम अशी होती. मग पृथुराजानें पर्वतांवर बाण सोडून त्या पर्वतांचें चूर्ण केलें व तिला सारखी केली. वसुंधरेला पृथुराजानें सारखी केली म्हणून तिला पुढें पृथ्वी असें नांव पडलें. त्या पृथुराजानें आपल्या पराक्रमानें अशी विलक्षण क्रांति घडवून आणिल्यामुळें त्याच्या प्रजेला फार सुख झालें. नद्या नाले पाण्यानें भरून वाहूं लागले, भूमींत उत्तम प्रकारचें धान्य पिकूं लागलें, वृक्षांना विपुल फळें येऊं लागलीं, गुरांना गवत वगैरे भरपूर खावयाला मिळूं लागल्यामुळें दूधदुभतें सर्वत्र झालें. जिकडे तिकडे पुण्यकर्मे सुरू झालीं, होमहवनें होऊं लागलीं; यज्ञयाग होऊं लागले, व त्यामुळें देव, पृथ्वी, प्रजा व राजा असे सर्व संतुष्ट झाले.

---

## अध्याय ६ वा.

### पृथ्वी-विस्ताराची कथा.

पृथ्वीविषयीं पृथुराजाची कथा ऐकिल्यावर जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला, ऋषेश्वरा, या पृथ्वीचा छपन्न कोटी योजनें विस्तार आहे असें सांगतात, तर एवढ्या प्रचंड भूमीचे विभाग कसकसे केलेले आहेत व तीं स्थानें कोणत्या नांवानें प्रसिद्ध आहेत, हें मला कृपा करून सांगावें. जनमेजयराजानें अशी विनंति केल्यावर वैशंपायन ऋषि, राजाला ती कथा सांगूं लागले. ते म्हणाले, हे जनमेजयराजा, ही पृथ्वी एकंदर छपन्न कोटी योजनें आहे. त्यापैकीं, चौदा कोटी योजनें, रुद्र व मनु यांच्या स्वाधीन आहे. हे रुद्र अकरा असून मनु नऊ आहेत. या नऊ मनूंचीं नांवें स्फटिक, शिवहस्तक, गंभीर, गरुडघ्न, लोथुंबक, नीलोदर, हरमळणी, केयूरमणी, व सक्षुरमणी अशीं आहेत. हे नऊही मनु सूर्याप्रमाणें दीप्तिकर आहेत. तसेंच ते रुद्रही प्रति अग्निप्रमाणें तेजस्वी व पराक्रमी आहेत. या अकरा रुद्रांचीं नावें तुला यथाक्रमानें सांगतों. अमर, अकळ, अभेद, संध्या, वामदेव, अछद्र, तपता, अविनाश, अघोर, तन्मुख व ईशान, अशीं हीं अकरा रुद्रांचीं अकरा नांवें आहेत. नऊ मनु व अकरा रुद्र मिळून या विसांकडे चौदा कोटी भूमि आहे. या भूमीवर अंधार

असतो. बाकी राहिलेली बेचाळीस कोटी योजनें भूमि सूर्याकडे आहे. तितक्या भूमीवर नेहमीं प्रकाश असतो. म्हणजे पृथ्वीवर नेहमीं एक चतुर्थांश भूमीवर अंधार असतो व तीन चतुर्थांश भूमीवर उजेड असतो. मेरु व अष्टाचल पर्वत हे नेहमीं दिव्यप्रमाणें प्रकाशमान असतात. त्यामुळें त्यांच्यावर नेहमीं उजेड असतो. कित्येक पुराणांच्या मतें पृथ्वी ही छपन्न कोटी योजनें नसून पन्नास कोटी योजनें आहे. आतां या पृथ्वीवर कोणा कोणाचा किती योजनें विस्तार आहे, हें तुला सांगतों.

पृथ्वीवर एकंदर समुद्रांचा विस्तार नऊ कोटी योजनांचा आहे. तसेंच मोठ्या व लहान पर्वतांनीं नऊ कोटी योजनें भूमि व्याप्त केली आहे. अरण्यांचा विस्तार सात कोटी योजनांचा आहे. बत्तीस लक्ष योजनें भूमि मेरुपर्वतानें व्याप्त केली आहे. आणि सप्तद्वीपांनीं एक कोटी अडुसष्ट लक्ष योजनें भूमि व्याप्त केली आहे. समुद्राचा विस्तार नऊ कोटी योजनांचा आहे, यापैकीं चार कोटी योजनें क्षीर समुद्राचा विस्तार आहे. घृतसमुद्र, इक्षुरससमुद्र, मधुरोदक समुद्र, व सुरोदकसमुद्र या चार समुद्रांनीं तीन कोटी योजनें भूमि व्याप्त केली आहे. दधिसमुद्राखालीं एक कोटी योजनें भूमि गुंतलेली आहे, व क्षार समुद्राखालीं एक कोटी योजनें भूमि गुंतलेली आहे. या पृथ्वीनें हलूं नये म्हणून तिजवर जें अष्टकुलाचलांचें दडपण ठेविलेलें आहे, त्या पर्वतांनीं नऊ कोटी योजनें भूमि व्याप्त केली आहे. हे पर्वत आठ दिशेला आठ आहेत. पूर्व दिशेला उदयाचल या नांवाचा पर्वत असून त्यानें सव्वा कोटी योजनें भूमि व्याप्त केली आहे. पश्चिम दिशेला अस्ताचल या नांवाचा पर्वत असून त्यानें सव्वा कोटी योजनें भूमि व्याप्त केली आहे. तसेंच दक्षिणेला मलयगिरी पर्वत असून त्यानें सव्वा कोटी योजनें भूमि व्याप्त केली आहे. उत्तर दिशेला हिमालय नांवाचा पर्वत असून त्यानेंही सव्वा कोटी योजनें भूमि व्याप्त केलेली आहे. आग्नेय दिशेला मंदराचल नांवाचा पर्वत असून त्यानें एक कोटी भूमि गुंतविलेली आहे. गंधमादन पर्वत ईशान्य दिशेला असून त्याच्याखालीं एक कोटी योजनें भूमि गुंतली आहे. नैऋत्य दिशेला हेमकूट या नांवाचा पर्वत असून त्या पर्वतानें आपणाखालीं एक कोटी योजनें भूमि व्याप्त केली आहे. वायव्य दिशेला असलेला नील नांवाच्या पर्वतानेंही एक कोटी योजनें भूमि आपल्या अंगाखालीं गुंतविली आहे. याप्रमाणें या आठ पर्वतांनीं नऊ कोटी योजनें पृथ्वी व्याप्त केली आहे.

या पृथ्वीवर मुख्य चार अरण्यें असून त्या अरण्यांनीं सात कोटी योजनें भूमि व्याप्त केलेली आहे. पूर्व दिशेला चित्ररथवन या नांवाचें अरण्य आहे; उत्तर दिशेला नंदनवन या नांवाचें अरण्य आहे; पश्चिम दिशेला वैभ्रांजन या नांवाचें अरण्य आहे; आणि दक्षिण दिशेला

गंधमादन या नांवाचें अरण्य आहे. या प्रमाणें चार दिशेला हीं चार अरण्यें आहेत. तसेंच सत्यद्वीपामध्यें सात प्रचंड वृक्ष आहेत. जो वृक्ष ज्या द्वीपांत आहे त्याच वृक्षाचें नांव त्या द्वीपाला पडलेलें आहे. हे जनमेजयराजा, याविषयीं तुला पूर्वी सांगितलें आहेच. जंबूवृक्ष ज्या द्वीपांत आहे त्या वृक्षाला जंबूद्वीप असें नांव आहे. प्लक्षवृक्ष ज्या द्वीपांत आहे त्या द्वीपाला प्लक्षद्वीप असें म्हणतात. शाकवृक्षाचें द्वीपाला शाकद्वीप असें म्हणतात. कुश या नांवाचा वृक्ष ज्या द्वीपांत आहे त्या द्वीपाला कुशद्वीप असें म्हणतात. क्रौंच या नांवाचा वृक्ष क्रौंचद्वीपामध्यें आहे. शाल्मलि नांवाचा वृक्ष ज्या द्वीपांत आहे, त्या द्वीपाला शाल्मलद्वीप असें म्हणतात; आणि पुष्कर या नांवाचा वृक्ष ज्या द्वीपांत आहे, त्या द्वीपाला पुष्करद्वीप असें म्हणतात.

हे जनमेजयराजा, शाकद्वीप हे उध्वस्त झालेलें आहे. त्यांत मनुष्य अथवा कोणत्याही प्राण्याची वस्ती नाहीं, असें म्हणतात. क्रौंच या नांवाचें जें द्वीप आहे, त्या द्वीपांत राक्षसयोनींतील लोक राहतात. पुष्करद्वीपांमध्यें चारी वर्णांचे लोक राहात आहेत. शाल्मल नांवाच्या द्वीपांत किंपुरुष या नांवाचे लोक राहतात. गोमेदद्वीपांत म्हणजे प्लक्षद्वीपामध्यें तेहतीस कोटी देव राहतात. कुश नांवाच्या द्वीपांत देवकन्या व अप्सरा राहतात. या अप्सरा स्वरूपानें अत्यंत सुंदर असून त्यांत सात अप्सरा विशेष प्रसिद्ध आहेत. या सात अप्सरांचीं नांवें—मेनिका, रंभा, उर्वशी, तिलोत्तमा, सुकेशी, कळावर्मा व मध्ययोषा अशीं आहेत. याप्रमाणें या द्वीपांमध्यें निरनिराळ्या लोकांची वस्ती आहे.

## २. जंबूद्वीपाची माहिती.

ही कथा ऐकून जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला, ऋषि, आपण ज्या ह्या जंबूद्वीपांत राहतों, त्या द्वीपाची स्थिति कशी आहे, आणि या द्वीपांत मुख्य मुख्य देश कोणते आहेत, विशेष क्षेत्रें व प्रेक्षणीय स्थळें कोणतीं आहेत, व या द्वीपाचा विस्तार किती व कसा आहे, वगैरे सर्व माहिती मला आपण कृपा करून सांगावी. जनमेजयराजानें याप्रमाणें इच्छा दर्शविल्यावर वैशंपायनऋषि म्हणाले, राजा, हें सर्व जंबूद्वीप अत्यंत पवित्र, सुंदर व प्रेक्षणीय असें आहे. या जंबूद्वीपांत मनुष्यजन्म मिळणें हें महत्पुण्याचें फल होय. अशा या परममंगल भरतखंडांमध्यें चार अत्यंत रमणीय, प्रशांत व प्रचंड अरण्यें आहेत. पहिल्या अरण्याचें नांव दंडकारण्य असें आहे. दुसऱ्या अरण्याचें नांव धर्मारण्य असें आहे. तिसऱ्या अरण्याचें नांव नैमिषारण्य असें असून चवथ्या अरण्याचें नांव धर्मारण्य असें आहे. हीं चारही अरण्यें प्रसिद्ध असून तीं पुण्यवान ऋषींच्या आश्रमामुळें लोकांना अत्यंत पवित्र अशीं वाटतात. तसेंच प्रसिद्ध

अशीं चार पीठें* आहेत. त्यांचीं नांवे. महालक्ष्मी (कोल्हापूर.) भवानी (तुळजापूर.) रेणुका (मातापूर.) व योगेश्वरी, (जोगाईचे अंबे.) यांशिवाय चार प्रसिद्ध क्षेत्रें आहेत. तीं–हरिक्षेत्र, कुरुक्षेत्र, पुष्करक्षेत्र व चौथें प्रयागक्षेत्र हीं होत. मनुष्यशरीरांत हस्तपादादि अवयवांमध्यें जसें शिर प्रधान होय. त्याप्रमाणें सर्व पृथ्वींत जंबूद्वीप हें विशेष प्रमुख होय. या जंबूद्वीपांत अनेक देश, अनेक नद्या, व अनेक पर्वत आहेत, त्यांतील देशाविषयीं तुला सविस्तरपणें सांगतों. येथें गंगापार या नांवाचा देश असून तो चवेचाळीस हजार योजनें विस्तीर्ण आहे. वडवानदेश हा चार लक्ष योजनें विस्तीर्ण आहे. वेणुदेशाचा विस्तार चौदा हजार योजनांचा आहे. माळवादेश अठरा हजार योजनें विस्तीर्ण आहे. नऊ लक्ष योजनें विस्तीर्ण असा डाहाळी या नांवाचा देश आहे. कुशस्थळीदेशाचा विस्तार दहा लक्ष योजनें असून, सज्जन नांवाचा देश तितकाच विस्तीर्ण आहे. तसेंच कोळी व बाबरोडी हे दोन्ही देश अठरा अठरा हजार योजनें विस्तीर्ण आहेत. नेमाडदेशाचा विस्तार एक कोटी योजनांचा आहे. काश्मीरदेश हा एक कोटी सतरा हजार योजनें विस्तीर्ण असून, जालंधरदेश हा तीस हजार योजनें विस्तीर्ण आहे. तसेंच कांकर, गुजराथ व भोट हे देश प्रत्येकीं सत्तर लक्ष योजनें विस्तीर्ण आहेत. महाभोट या नांवाचे देशाचा विस्तार अठरा लक्ष योजनें आहे. सोरटदेशाचा विस्तार एक लक्ष योजनें आहे. ब्रह्मवाहाळ व कर्नाटक हे दोन्ही देश तीन तीन लक्ष योजनें विस्तीर्ण आहेत. खुरासनदेशाचा विस्तार तर अठरा कोटी योजनांचा आहे. सौराष्ट्र व सोमनाथ या दोन्हीं देशांचा विस्तार सात सात लक्ष योजनांचा आहे. स्त्रीराज्य हें एक लक्ष योजनें विस्तीर्ण आहे, तैलंगणदेश नऊ लक्ष योजनें विस्तीर्ण आहे, लंकावेट दहा लक्ष योजनें विस्तीर्ण आहे, ज्वालामुखी या नांवाचा देश अकरा लक्ष योजनें विस्तीर्ण आहे. नंदीदेश बारा लक्ष योजनें विस्तीर्ण आहे, आणि पायांस या नांवाचा देशही तितकाच विस्तीर्ण आहे. तेरा लक्ष योजनें भूमि सर्पमेखणेर या नांवाच्या देशानें व्याप्त केली आहे. प्रसिद्ध हस्तिनापूर देशानें चौदा लक्ष भूमि गुंतविलेली आहे. कोंकण देशाचा विस्तारही या हस्तिनापुराप्रमाणेंच चौदा लक्ष योजनांचा आहे. आणि चीन व हस्तमुखदेश इतकेच मोठे आहेत. नवसांस, आसाम व वेषरमुख हे तिन्ही देश आकार मानानें सारखे असून यांचा विस्तार प्रत्येकीं पंधरा लक्ष योजनें आहे, भालुकांच्या देशाचा

---

* कथाकल्पतरु ग्रंथकारानें हा पीठांचा खुलासा असा केला आहे–चारी पीठें पुण्यतर। वोडियाणा पीठ पातर। तैसाचि पूर्ण गिरिवर। जालंधर मनोहर तें॥१॥ या ओंवीवरून सांप्रत प्रसिद्ध असलेली चार पीठें (कित्येक साडेतीनही म्हणतात.) व ओंवींतील चार पीठें हीं एकच कीं वेगळीं असा संशय उत्पन्न होतो. सांप्रत प्रसिद्ध असलेल्याच चार पीठांचा वर निर्देश केला आहे.

विस्तार अकरा कोटी योजनें आहे, सिंधुदेश नऊ लक्ष योजनें विस्तीर्ण आहे. जालंधर देश चौसष्ट लक्ष योजनें विस्तीर्ण आहे. शुकमुख व चतुर या प्रत्येक देशानें ऐशीं लक्ष योजनें भूमि व्याप्त केली आहे. नंदनपूर देशानें नऊ लक्ष योजनें भूमि आपल्या अंगाखालीं घेतली आहे. महीपटल देश सतरा कोटी योजनें विस्तीर्ण आहे. उंचियश्वा व स्वयंपरा या नांवाचे दोन्ही देश, दोन दोन लक्ष योजनें विस्तीर्ण आहेत. मारवाडदेशाचा विस्तार नऊ हजार योजनें आहे, तेरा हजार योजनांचा विस्तार नेमाड देशाचा आहे. व नवकळंब आणि कानडा या प्रत्येक देशानें दोन दोन लक्ष योजनें भूमि व्याप्त केली आहे. जाल्हरदेश चौसष्ट हजार योजनें विस्तीर्ण आहे, कामरदेश पांच लक्ष योजनें विस्तीर्ण आहे, व देशाल्हरदेश दहा हजार योजनें विस्तीर्ण आहे. हुर्मुज देशाचा विस्तार अकरा सहस्र योजनें आहे, कांबोज देशाचा विस्तार छत्तीस हजार योजनें आहे, आनंदभोज व वैराट देश एकेक हजार योजनें विस्तीर्ण आहेत. चंदेरी देशानें पांच लक्ष योजनें भूमि व्याप्त केलेली आहे. भामरी देशानें पंचेचाळीस लक्ष योजनें भूमि व्याप्त केली असून सनकसन या नांवाच्या देशानें तीन लक्ष योजनें भूमि व्याप्त केलेली आहे. बावीस लक्ष योजनें भूमि देमान नांवाच्या देशानें आडविली आहे. गाजीन देशाचा विस्तार दोन कोटी योजनें आहे. नऊ लक्ष योजनें विस्तार नवसरी देशाचा आहे, ब्याणव लक्ष योजनें विस्तार माळवा[1] देशाचा आहे. द्राविड देश चौदा लक्ष योजनें विस्तीर्ण आहे, महेंद्री देशाचा विस्तार बहात्तर लक्ष योजनें आहे. उज्जयनी देशाचा विस्तार एक लक्ष योजनें आहे, मागध देशाची योजनसंख्या एकतीस हजार आहे, व संजिणा देश दहा हजार योजनें विस्तृत आहे. स्वशी देश बारा हजार योजनें विस्तीर्ण आहे, जयंती देश पंधरा हजार योजनें विस्तृत असून वैरागर देशाचा विस्तार सोळा हजार योजनें आहे. दिल्ली देशाचा विस्तार तेहतीस हजार योजनें आहे, वनमाळी देशाचा विस्तार बत्तीस हजार योजनें आहे, व पारिजात या नांवाचा देश सतरा हजार योजनें विस्तीर्ण आहे. हे जनमेजयराजा, याप्रमाणें या जंबुद्वीपांत देश असून त्यांचा याप्रमाणें विस्तार आहे. हे सर्व चराचर उत्पन्न करण्याचें कार्य आदिपुरुषानें ब्रह्मदेवावर सोंपविलें आहे. विष्णु या सर्वांचें पोषण करितो आणि शंकर सर्वांचा नाश करितात. हे ब्रह्मा, विष्णु, महेश, तिघेही निर्गुण असून नाशिवंत आहेत.

---

१ हा माळवा पूर्वी आलेल्याहून भिन्न आहे.

# अध्याय ७ वा.

## १. ब्रह्मा, विष्णु व महेश यांची कथा.

मागील कथेचा समारोप करितांना वैशंपायन ऋषींनीं जनमेजय राजाला ब्रह्मा, विष्णु व महेश हेही नाशिवंत आहेत असें सांगितलें होतें. तें वैशंपायनऋषीनीं केलेलें विधान ऐकून जनमेजय राजाला फार आश्चर्य वाटलें. तो वैशंपायन-ऋषीला म्हणाला; वैशंपायन महाराज, ज्या तीन देवता सृष्टींत विशेष प्रधान आहेत, ज्यांचें भजन, पूजन व चिंतन करून लोक पुनीत होत आहेत, ज्यांची शक्ति व ज्यांचें कर्तृत्व विलक्षण असल्याबद्दल प्रसिद्धी आहे, असे जे ब्रह्मदेव, विष्णु व महादेव हे तिघेही नाशिवंत आहेत, हें ऐकून मला फार आश्चर्य वाटतें, तर या तिन्ही देवतांची उत्पत्ति वगैरे मला आपण कृपा करून सांगावी. जनमेजयराजानें याप्रमाणें विनंति केल्यावर, वैशंपायनऋषि म्हणाले; राजा जनमेजया, यांत मोठें आश्चर्य असें कांहीं नाहीं. या विश्वाचा असा नियम आहे कीं, जो उत्पन्न झाला, त्याचा नाशही पण व्हावयाचाच. उत्पत्ति, स्थिति व लय ह्या तीन अवस्था फक्त आदिपुरुषाला मात्र नाहींत. कारण तो आदिपुरुष या विश्वाचा कर्ता असून तो आदिकालापासून आहे, आणि पुढेंही तो अनंत काल-पर्यंत राहणारच. तो या विश्वापूर्वी किती दिवस आहे, व पुढें किती दिवस राहणार, हें सांगावयाला प्रत्यक्ष ब्रह्मदेवही समर्थ नाहीं, मग इतरांना त्या विषयाचा बोध कोठून होणार?

हें मनोहर विश्व निर्माण करणारा आदिपुरुष म्हणजे सर्व बीजांचें बीज होय. तो त्रिगुणात्मक परमेश्वर सर्व सारांचें सार आहे. हें संपूर्ण विश्व निर्माण केल्यावर या निर्जन वनांत कांहीं प्राणी निर्माण करावेत, अशी त्याला इच्छा उत्पन्न झाली, तेव्हां त्या आदिपुरुषानें तीन अंडीं निर्माण केलीं. तीं तिन्हीं अंडीं फोडिलीं तेव्हां प्रत्येक अंड्यांतून स्त्रीपुरुष अशी जोडी निघाली. पहिले अंडें फोडिलें तेव्हां त्यांतून त्रिनेत्र महादेव त अत्यंत सुंदर सावित्री निघाली. दुसरें अंडें फोडलें तेव्हां त्यांतून विष्णु व पार्वती अशीं दोन अपत्यें निघालीं आणि तिसरें अंडें फोडलें तेव्हां त्यांमधून ब्रह्मदेव व लक्ष्मी अशीं दोन अपत्यें निघालीं. याप्रमाणें सर्वांगसुंदर अशीं सहा बालकें त्या अंड्यांमधून काढिल्यावर त्यांचे रंग, रूप व गुण यांकडे लक्ष देऊन आदिपुरुषानें त्यांचीं लग्नें लाविलीं. महादेव तामसी आहे असें जाणून आदिपुरुषानें त्याच्याबरोबर सात्विक वृत्तीच्या पार्वतीचा विवाह केला. त्याप्रमाणेंच ब्रह्मदेव हा तामसी आहे असें जाणून त्याचे बरोबर राजस वृत्तीच्या सावित्रीचें लग्न लाविलें आणि लक्ष्मी सात्विक वृत्तीची असून विष्णु हे राजस वृत्तीचे आहेत असें जाणून त्या उभयतांचा विवाह केला. असे

या तिन्ही देवांचे विवाहसंबंध त्या आदिपुरुषानें घडवून आणले, व त्यांचीं नांवेंही आदिपुरुषानींच ठेविलीं. मग त्या विराटपुरुषानें ब्रह्मदेवाला सृष्टीची उत्पत्ति करण्याविषयीं सांगितलें. विष्णूला ब्रह्मदेव जें कांहीं उत्पन्न करील त्याचें संरक्षण करण्यास सांगितलें, व शंकराला ज्याचा नाश करावयाला योग्य कारण घडून येईल, त्याचा नाश कर म्हणून सांगितलें. याप्रमाणें आदिपुरुषानें सृष्टीच्या उत्पत्तीची, संरक्षणाची व नाशाची व्यवस्था करून ठेविली आहे. हे जनमेजय राजा, याविषयीं अन्य कथा आहे, तीही तुला सांगतों.

## २. विश्वोत्पत्तीविषयीं वेगवेगळ्या कथा.

शून्य अशा आकाशांत आदिपुरुष असतांना त्यास पुत्रप्राप्तीची इच्छा झाली; तेव्हां त्या विराट, अनादि व अनंत पुरुषाच्या भुंवईपासून महादेव निर्माण झाले. महादेवास पांच मुखें असून तीन डोळे होते. अशा या तेजस्वी, सुंदर व प्रभावशाली पुत्राला उत्पन्न केल्यावर हा विराटपुरुष अनंत काळपर्यंत स्वस्थ होता. पुढें त्यास असा विचार उत्पन्न झाला कीं, या शून्य आकाशांत एकटा रुद्र काय करणार ? याप्रमाणें आदिपुरुष विचार करीत आहे तों त्या पुरुषाच्या नाभींतून एक विलक्षण तेजाची जोत निघाली. त्या तेजस्वी जोतीला त्यानंतर फेंस आला व त्या फेंसापासून एक अंडें उत्पन्न झालें. हें अंडें म्हणजे कमल होय. हें कमल आठ पाकळ्यांचें होतें, व त्या आठ पाकळ्या आठ दिशेला पोहोंचल्या होत्या. या कमळाचे मध्यभागीं राजहंस जो ब्रह्मदेव तो होता. नंतर या ब्रह्मदेवानें हें सर्व जग निर्माण केलें.

विश्वोत्पत्तीविषयीं दुसरी एक कथा अशी आहे कीं, प्रथम आदिपुरुषाचा जन्म झाला. त्यानंतर अनादि उत्पन्न झाला. या अनादिपासून ओंकाराची उत्पत्ति झाली. ओंकारापासून वेद उत्पन्न झाला. वेदापासून हव्ययाची उत्पत्ति झाली आणि या हव्ययापासून पुढें कित्येक धर्म उत्पन्न झाले आहेत. नंतर धर्मापासून मेघ उत्पन्न झाले व मेघापासून उदकाची उत्पत्ति झाली. उदक उत्पन्न झाल्यावर त्या उदकापासून ब्रह्मांड निर्माण झालें. मग ब्रह्मांडांतील उदकावर आदि विष्णूनें शयन केलें. या शयनास जलशयन असें म्हणतात. हें शयन विष्णूनीं चौदा युगेंपर्यंत केलें होतें. त्या युगांचीं नांवें अनुक्रमानें-अर्धयुग, जंद्रयुग, बंदयुग, मनुयुग, मेरूयुग, मध्ययुग, धूम्रयुग, धूमाकारयुग, मगयुग, तरयुग, नरकाक्षयुग, अतीतयुग, आणि चौदावें असक्षयुग अशीं आहेत. या चौदायुगांपर्यंत श्रीहरि सुषुप्तावस्थेंत, आपल्या उदरांत पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं पांच तत्वें सांठवून निद्रिस्त होते. सुषुप्तावस्था म्हणजे ज्या अवस्थेंत सूर्य नाहीं, चंद्रमंडळ नाहीं, ध्रुव व अन्य नक्षत्रेंही नाहींत, अशी जी शून्य अवस्था तिला सुषुप्तावस्था असें म्हणतात. या सुषुप्तावस्थेंत सर्व जग विष्णुमय होतें. आंत विष्णु, बाहेर विष्णु व सर्वत्र विष्णुच अशी स्थिति

या अवस्थेंत होती. या सुषुप्तावस्थेंत विष्णु निद्रिस्थ असतांना त्यांच्या नाभीकमळांतून कमल उत्पन्न झालें. तें कमल आठ पाकळ्यांचें असून परम-दैदिप्यमान असें होतें. त्या कमळाचे मध्यभागीं विलक्षण तेजस्वी व अत्यंत सुंदर असा एक पुरुष होता. त्या पुरुषाचें नांव ब्रह्मदेव हें होय. ब्रह्मदेवाला पांच मुखें होतीं. पैकीं चार मुखानें तो चार वेदांचें पठण करी व पांचव्या मुखानें पांचवा वेद जो गायन त्या गायनाचे स्वरभेद तो म्हणत होता. अशा रीतीनें ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाल्यावर त्यानें स्वयंस्फुर्तीनें प्राणिमात्रासह सर्व सृष्टि निर्माण केली.

वैशंपायन ऋषि, जन्मेजय राजाला सांगतात; हे जनमेजया, मी हें मत काशीखंडाचे अनुरोधानें सांगितलें आहे. परंतु मार्कंडेय ऋषींचें मत या पेक्षां निराळें आहे. भागवतात या संबंधानें असें सांगितलें आहे कीं, या ब्रह्मांडा-मध्यें प्रथम माया निर्माण झाली; आणि पर्वतावर जसें आपोआप गवत उगवतें त्याप्रमाणें मायेपासून हें आकाश निर्माण झालें. या आकाशांत प्रथम वायु उत्पन्न झाला, वायुपासून उदकाची उत्पत्ति झाली, आणि उदक उत्पन्न झाल्यावर त्या उदकापासून सृष्टि निर्माण झाली. माया म्हणजे तेज होय. याप्रमाणें विश्वांत प्रथम तेज, नंतर आकाश व त्या मागून वायु व त्यानंतर पाणी आणि शेवटीं पृथ्वी, अशी हीं पंचतत्वें निर्माण झालीं. हीं पंचतत्वें विश्वाला मूलभूत असून त्यापासून पुढें सृष्टीचा विस्तार झाला. हीं पंचतत्वें आदिपुरुषानें सहज लीलेनें निर्माण केलीं हें निराळें सांगावयाला नको. पाणी निर्माण झाल्यावर पाण्याच्या अंगच्या सहज गुणाप्रमाणें प्रथम कमल उत्पन्न झालें, आणि त्या कमलापासून पांच मुखाचा असा ब्रह्मदेव निर्माला झाला. ब्रह्मदेव उत्पन्न झाल्यावर आपली दृष्टि उघडून समोर पाहूं लागला, तों प्रचंड देहाचे व भयंकर असे दोन राक्षस त्याच्याकडे वेगानें धांवून येत आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. तें भयंकर दृश्य प्रथमतःच पाहिल्याबरोबर ब्रह्मदेव अत्यंत भयभीत झाला, व आपलें संरक्षण त्या दुष्टापासून कसें करून घ्यावें याची काळजी उत्पन्न झाली. कोणाचें तरी साह्य मिळाल्यावांचून आपलें रक्षण होणार नाहीं, असें त्यास वाटलें, परंतु त्याला तेथें अन्य कोणीही दिसेना; तेव्हां ब्रह्मदेव आदिपुरुषाची करुणा भाकूं लागला. तो दीनवाणीनें म्हणाला; हे आदिअनंतपुरुषा, या तुझ्या पुत्राचें संरक्षण कर. हे कमलापते, हे संकटपरिहारक देवाधिदेवा तुझा जयजयकार असो. हे विश्वंभरा, हे परमपूज्य परात्परा, हे लीलालाघवी चराचरा, तुझा जयजयकार असो. हे सच्चिदानंद दयाघना, मला तूंच निर्माण केलें आहेस. तेव्हां या लेंकराचा सांभाळ करण्यासाठीं तुझ्यावांचून कोण धांवून येणार आहे? हे विश्वपालका तूं आंत आणि बाहेर परिपूर्ण असून अचेतनास चैतन्य देण्यास व अज्ञानी लोकांस ज्ञान देण्यास तूंच शक्तिवान आहेस. हे दीनवत्सला करुणा करा, हे भक्तजनवज्रपंजरा, तूं अजर, अमर व सर्वत्र आहेस. हे सर्व व्यापक

ओंकार बीजा, सर्व विश्व हा तुझा एक अंकुर आहे. हे जगन्नाथा, या तुझ्या पुत्राचें संरक्षण कर, व या दुष्टांचा नाश करून माझी भीति दूर कर. याप्रमाणें ब्रह्मदेवानें आदिपुरुषाची करुणा भाकिल्यावर, अशी आकाशवाणी झाली कीं, 'हे ब्रह्मदेवा; तूं तप कर; म्हणजे या संकटाची निवृत्ति होईल.' ती आकाशवाणी ऐकून ब्रह्मदेवाला मोठें समाधान वाटलें, परंतु तप म्हणजे काय, व तें करावयाचें कसें, हें त्याला माहीत नसल्यामुळें तो पुनः विचारांत पडला. मग आदिपुरुषानें प्रत्यक्ष उत्पन्न होऊन त्याला तप करण्याची सर्व व्यवस्था सांगितली, व आदिपुरुष तेथून निघून गेला. आणि ब्रह्मदेव आदिपुरुषानें सांगितल्याप्रमाणें तप करीत बसला.

## ३. ब्रह्मदेवाचा सृष्टिविस्तार.

ब्रह्मदेव तप करूं लागल्यावर कांहीं दिवसांनीं त्यास नारायण प्रसन्न झाले, व त्यांनीं त्या दोन राक्षसांचा नाश करून टाकिला. हे दोन राक्षस म्हणजे मधु व कैटभ या नांवाचे दैत्य होत. या राक्षसांचे मेदापासून मेदिनी निर्माण झाली. ती मेदिनी ब्रह्मदेवाला दाखवून आदिपुरुष म्हणाला, हे ब्रह्मदेवा ! तुझें संकट मीं त्या राक्षसांना मारून दूर केलें आहे, त्या राक्षसांचे मेदापासून ही मेदिनी उत्पन्न झाली आहे, तर तूं पुढें आतां या सृष्टीचा विस्तार कर. असें सांगून नारायणाची मूर्ति अदृश्य झाली. ब्रह्मदेव सृष्टीचा विस्तार कसा करावयाचा, याचा विचार करूं लागला. आपणासारखेच पुत्र निर्माण व्हावेत असें त्याला वाटूं लागलें; परंतु ते निर्माण कसे करावयाचें हें त्याला कळेना. याप्रमाणें तो विचार करीत आहे, इतक्यांत त्याच्या मानसापासून चार पुत्र निर्माण झाले, व ते त्याच्या समोर उभे राहिले. त्या चार सुंदर व तेजस्वी पुत्रांना पाहून ब्रह्मदेवाला फार आनंद झाला. त्या पुत्रांचीं त्यानें—सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार—अशीं नांवें ठेविलीं. तो आपल्या पुत्रांकडे सस्नेहदृष्टीनें पाहून म्हणाला; पुत्रहो ! तुम्हीं आतां या सर्व चराचराची उत्पत्ति करा. ब्रह्मदेवानें याप्रमाणें त्या पुत्रांना सांगितल्यावर ते सर्वजण नम्रपणें ब्रह्मदेवाला म्हणाले, हे तात ! आम्हांला हा संसारमार्ग आवडत नाहीं. मायाजाळांत गुंतून पडण्याची आम्हां चौघाचीही इच्छा नाहीं. आमचा विचार मुक्तिपंथानें जावयाचा आहे, तर त्या रस्त्यानें कसें जावयाचें, हें आम्हांला कृपा करून सांगा. हें सृष्टिरचनेचें कार्य म्हणजे दृढतर मायाबंधनें होत. त्या मायाबंधनांत सांपडून कोण आपलें आयुष्य फुकट गमावील ? वंगसंगानें कांचनाचा ज्याप्रमाणें बिघाड होतो, त्याप्रमाणें संसारांत सांपडल्यानें आयुष्याची खराबी होते. उत्पत्ति, स्थिति व नाश हें रहाटगाडगें निरंतरचें असून त्या चरकांत सांपडल्यावर मग कोणाचीही सुटका होत नाहीं. हीं पंचभूतें त्याला अत्यंत जांचणी करितात, व त्याला पुनःपुनः कर्ममार्गावर नेऊन टाकितात. कर्ममार्गांत असतांना हातून अनेक

पातकें होतात, त्यामुळें रौरवनरक प्राप्त होतो, त्या वेळीं प्राणी शुद्धीवर येतो; व मग सायुज्यमुक्ति मिळविण्याचा प्रयत्न करितो. ; त्यापेक्षां आतांच त्या निरंजनाचें ध्यानधारणेंत आयुष्य घालविणें हें फार चांगलें. याप्रमाणें त्या चौघा पुत्रांनीं आपला मनोदय स्पष्टपणें ब्रह्मदेवाला कळविला. तेव्हां ब्रह्मदेवाचा नाइलाज झाला. त्यानें त्या चौघांनां ऊर्ध्वदेहिक मार्गानें जाण्याची परवानगी दिली. ती पित्याची परवानगी मिळाल्यावर ते चौघे तेथून निघून गेले. मग ब्रह्मदेव पुन्हां चिंताक्रांत झाला व आतां पुत्र कसे निर्माण करावेत याचा विचार करूं लागला. तेव्हां त्यास आदिपुरुषाचें स्मरण झालें व पुत्रप्राप्तीसाठीं तो त्याचें ध्यान करीत बसला. त्या ध्यानधारणेमुळें त्यास आठ पुत्रांचा लाभ झाला. त्या आठ पुत्रांपैकीं सहा पुत्र आपल्या स्त्रीसमवेत होते. अशा त्या पुत्रांना व सुनांना पाहून ब्रह्मदेवाला फार आनंद झाला. या आठ पुत्रांचीं नांवें–कश्यप, अत्रि, वसिष्ठ, प्रजापति, नारद, भृगु, पुलस्ती व दक्ष–अशीं आहेत. यांपैकीं नारद व कश्यप असे दोघे स्त्रीविरहित होते, व बाकी सहा स्त्रीसमवेत होते. नंतर ब्रह्मदेवाला फिरून काळजी उत्पन्न झाली कीं, या दोघांनां स्त्रिया कोठून आणाव्यात? याप्रमाणें तो चिंताक्रांत होऊन विचार करीत आहे, तोंच दक्षाच्या स्त्रीला सुंदर व तरुण अशा साठ मुली झाल्या. तो प्रकार पाहून त्याची सर्व काळजी दूर झाली. ब्रह्मदेवानें त्या सर्वांना आशीर्वाद दिला व त्यांना आपणाजवळ बसवून घेतलें.

ब्रह्मदेवाला त्या पुत्रपौत्रांच्या सहवासानें क्षणभर समाधान वाटलें खरें, पण लागलीच त्याच्यापुढें अशी काळजी उभी राहिली कीं, या सर्वांचें संरक्षण व पालनपोषण कसें करावें ? मी एकटा असून हे पुत्रपौत्र अनंत आहेत. शिवाय संरक्षण म्हणजे काय व तें करावयाचें कसें, हेंही मला माहीत नाहीं. असें ब्रह्मदेव आपल्या मनाशीं म्हणून फारच चिंताक्रांत झाला. त्यास तें एक नवीनच संकट उत्पन्न झाल्यासारखें वाटूं लागलें व शेवटीं निरुपाय जाणून संकटाच्या परिमार्जनासाठीं तो पुन्हां आदिपुरुषाची करुणा भाकूं लागला. तो म्हणाला; हे सदाचारा, तूं शब्द नाहींस, तूं सूक्ष्म नाहींस व तूं छांदिष्टही नाहींस. तूं गंध नाहींस, तूं रूपविलास वगैरे कांहींएक नाहींस. तूं सर्वसारांचे सार असून सर्वश्रुतींचें बीजाक्षर आहेस. तूं आदि असून अंतींही आहेसच. हे करुणाकरा, कृपासागरा, तूं सांगितल्याप्रमाणें मी या सृष्टीची उत्पत्ति करीत आहे, परंतु या उत्पन्न केलेल्या पुत्रपौत्रांचें संरक्षण कसें करावयाचें, हें मला माहीत नसल्यामुळें मी मोठ्या संकटांत पडलों आहे. शिवाय मी एकटा असल्यामुळें या सर्वांचें संगोपन करण्यास अगदींच असमर्थ आहें. मागें मधु व कैटभ या दोन राक्षसांचे वेळीं मी असाच संकटांत पडलों होतों, त्या वेळीं त्या दुष्टांचें निर्दालन करून तूंच मार्ग सुचविलास. त्याप्रमाणें या वेळींही या तुझ्या अज्ञान लेंकराला

योग्य मार्ग दाखीव; व या उत्पन्न झालेल्या पुत्रपौत्रांचें संरक्षण कर. तुझ्या आज्ञेप्रमाणें मी या सृष्टीचा विस्तार करीत आहे, पण यांचें संरक्षण करण्यास मी असमर्थ आहें. तर हे आदिपुरुषा, तूं हें संकट त्वरित दूर कर.

ब्रह्मदेवाची ती करुणावाणी ऐकून आदिपुरुषाला दया आली, व पुढें सृष्टीच्या संरक्षणाची काय तजवीज करावी याचा आदिपुरुष विचार करूं लागला. तेव्हां आदिपुरुषाच्या सत्वगुणापासून एक अत्यंत तेजस्वी मूर्ति प्रगट झाली. ती मूर्ति पुरुषाकृति असून तिला चार हात होते, व तिचा वर्ण नीलमण्याप्रमाणें सतेज होता. तो पुरुष निर्माण होतांच आदिपुरुषापुढें हात जोडून उभा राहिला, व त्याची स्तुति करून, मी पुढें काय करूं म्हणून विचारूं लागला. तेव्हां आदिपुरुषानें त्याचें नांव विष्णु असें ठेविलें व त्यास ब्रह्मदेवाकडे जाऊन सृष्टीचें संरक्षण करण्याविषयीं सांगितलें. त्याप्रमाणें विष्णु आदिपुरुषाजवळून निघून एकविसाव्या स्वर्गात ब्रह्मदेवाकडे आला. तो ब्रह्मदेवाला भेटून म्हणाला; हे ब्रह्मदेवा, मी आदिपुरुषाच्या आज्ञेनें सृष्टीचें संरक्षण करण्यासाठीं आलों आहें; तर तूं सकल चराचर निर्माण कर व मी त्यांचें संरक्षण करीन. प्रतिपालनासंबंधानें तूं कोणतेही प्रकारची काळजी करूं नकोस. विष्णुचें भाषण ऐकून ब्रह्मदेवाला परम संतोष झाला. मोठ्या काळजींतून दूर झाल्याप्रमाणें त्याला वाटूं लागलें. तो आदिपुरुषाचे उपकार मानून म्हणाला; हे अनंता, अंतःकरणांतली चिंता तूं अशा रीतीनें दूर केलीस हे मजवर तुझे अनंत उपकार झाले आहेत. मग ब्रह्मदेवानें मोकळ्या मनानें सृष्टीचा विस्तार करण्यास आरंभ केला. त्याला जे आठ पुत्र झाले होते, त्या आठापैकीं कश्यप व नारद यांना स्त्रिया नव्हत्या, म्हणून दक्षाला झालेल्या साठ मुलींपैकीं, कांहीं मुली त्या दोघांना द्याव्या असें ब्रह्मदेवानें ठरविलें; परंतु नारदानें आपण अविवाहित राहणार म्हणून स्पष्ट कळविलें. तेव्हां ब्रह्मदेवानें त्या साठ मुलींपैकीं तेरा मुली कश्यपऋषीला दिल्या. पुढें त्या कश्यपाच्या तेरा स्त्रियांनां कश्यपापासून पुष्कळ संतति झाली. अदिति नांवाच्या स्त्रीला तेहतीस कोटी देवपुत्र झाले. दिति नांवाच्या स्त्रीला सर्व दैत्यपुत्र झाले. सेना नांवाच्या स्त्रीला प्रसिद्ध सूर्य–पुत्र झाला, आणि त्यानंतर तिला चंद्र–पुत्र झाला. सव्यकेला अठ्यायशीं हजार ऋषि पुत्र झाले. तसेंच विनता या नांवाच्या स्त्रीला अरुण व गरुड अशीं दोन मुलें झालीं. कद्रु नांवाच्या स्त्रीला कश्यपऋषीपासून सर्प पुत्र झाले. सुरभी नांवाच्या स्त्रीला शहाण्णव कोटी मुली झाल्या; त्या नद्या ह्या होत. निशीका नांवाच्या स्त्रीला अनेक राक्षस पुत्र झाले. दनु नांवाच्या स्त्रीला अनेक दानव पुत्र झाले. षडनेत्रीपासून चार वर्णांचे पुत्र उत्पन्न झाले. पुढें कालांतरानें या सर्वांपासून चौऱ्यायशीं लक्ष योनी उत्पन्न झाल्या. या पैकीं बेचाळीस लक्ष प्राणी जलचर जातीचे असून बेचाळीस लक्ष जाती स्थलचर आहेत. हा एवढा सर्व विस्तार कश्यपऋषी-

पासून झालेला आहे. ब्रह्मदेवाचा दुसरा मुलगा जो पुलस्ति ऋषि, त्याला सात अपत्यें झालीं होतीं. त्या पैकीं तीन पुत्र व चार कन्या होत्या. पुत्रांचीं नांवें रावण, कुंभकर्ण व बिभीषण अशीं असून कन्यांचीं नांवें असाळी, त्रिजटा, क्रौंचा व शूर्पनखा अशीं होतीं. ब्रह्मदेवाचा तिसरा मुलगा जो विश्रवा त्याला दोन पुत्र झाले, त्यांचीं नांवें कुबेर व मणिग्रीव हीं होत. त्या दोघांनां अलकावतीचें राज्य दिलें. कुबेर व मणिग्रीव हे दोघे अशा रीतीनें वैभवसंपन्न झालेले पाहून रावण त्यांचा फार द्वेष करूं लागला, व तोही तसें वैभव मिळविण्याचा प्रयत्न करूं लागला. त्यानें तशा वैभवासाठीं शंकराची एकांगुष्ठावर उभें राहून कित्येक वर्षें तपश्चर्या केली व आपलीं शिरकमलें शंकराला वाहून शंकरास प्रसन्न केलें. तेव्हां शंकर प्रसन्न झाले, आणि रावणाला वर माग म्हणून म्हणाले, तेव्हां रावण शंकराला म्हणाला; हे महादेवा, माझ्या सापत्नबंधूनां सर्व देवांनीं आपले भांडारी करून त्यांना अलकावतीचें राज्य दिलें आहे; तर मलाही तूं तसेंच वैभवशाली कर व मला दहा शिरकमलें दे. शंकरांनीं रावणाचें हें मागणें प्रसन्नचित्तानें मान्य केलें व रावणाला दहा शिरकमलें देऊन अलकावतीप्रमाणेंच सुवर्णाचें लंका नांवाचें एक बेट तयार करून त्याला दिलें. ब्रह्मदेवानें संपूर्ण पृथ्वीचें राज्य दक्षाला दिलें. त्या दक्षप्रजापतीला साठ मुली होत्या. त्यांपैकीं दाक्षायणी या नांवाची कन्या महादेवाला दिलेली होती, सत्तावीस कन्या चंद्राला दिल्या होत्या, तेरा कन्या कश्यपऋषीला दिल्या होत्या, वायव्यकोनांतील लोकपाळाला एक दिली होती, व धर्माला दहा मुली दिल्या होत्या. हे जनमेजयराजा, याप्रमाणें या सर्वांचे विवाहसंबंध घडून येऊन या सृष्टीचा विस्तार होतां होतां तिला हें आजचें स्वरूप प्राप्त झालें आहे. यावरून या सर्व विश्वाचा उत्पादक आदिपुरुष हा असून त्यानें हें विश्व सहजस्फूर्तीनें तयार केलें आहे. हे जनमेजया, ही कथा उपनिषदांत सांगितली आहे, तीच मी तुला संक्षेपानें येथें कथन केली आहे.

---

## अध्याय ८ वा.

### १. राजकन्या मालती हिची कथा.

जनमेजयराजाला वैशंपायन ऋषीनीं विश्वविस्ताराची कथा सांगितल्यावर जनमेजयराजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; वैशंपायनऋषी, दक्षाच्या दहा कन्या दक्षिणदिशेचा राजा जो यम, त्याला दिल्या होत्या, असें आपण सांगितलें; परंतु यमाला अकरा स्त्रिया होत्या, असें म्हणतात, तर आणीक एक स्त्री यमाला कोणी दिली होती; तें मला आपण कृपाकरून सांगण्याचें करावें. जनमे-

जयराजानें याप्रमाणें वैशंपायनऋषीला विनंति केल्यावर ते म्हणाले; हे राजा जनमेजया, त्या विषयींची कथा तुला सांगतों, ती तूं श्रवण कर.

पूर्वी सरस्वतीपूर या नांवाच्या नगरामध्यें वीरवर्मा नांवाचा मोठा पराक्रमी असा क्षत्रिय राजा राज्य करीत होता. तो राजा अत्यंत सदाचारसंपन्न असून अधर्म व अनीति हीं त्यास मुळींच ठाऊक नव्हतीं. त्या राजाला एक अत्यंत सुंदर, चतुर व सद्गुणी अशी मुलगी होती. ती मुलगी तारुण्यानें तर अधिक सुंदर दिसूं लागली. तिजवर त्या राजाचे फार प्रेम असून तिला चांगला पति मिळावा अशी त्याची इच्छा होती. ती मुलगी विशेष धर्मरत असून तिचा परमार्थाकडे फार ओढा होता. राजानें त्या परमप्रिय मुलीचें नांव मालती असें ठेविलें होतें. ती मुलगी अगदीं उपवर झाली होती तरी तिला स्वतःला आपल्या लग्नाची फिकीर मुळींच वाटत नसे. कारण ती सर्व दिवसभर ईश्वरभजनांत मग्न असल्यामुळें तिला आपल्या तारुण्यासंबंधानें किंवा आपल्या विवाहासंबंधानें कधीं विचारच उत्पन्न होत नव्हता. परंतु ती विशेष उपवर झाल्यावर राजाला मात्र तिच्या विवाहाची काळजी लागली होती. तिच्या योग्य पति कसा मिळेल या चिंतेनें तो अगदीं त्रस्त झाला होता. शेवटीं त्यानें विवाहासंबंधानें मुलीचा विचार काय आहे तें पाहून तिच्या मताप्रमाणें विवाह करावयाचा असें ठरविलें. मग त्यानें लागलीच मालतीला आपणाजवळ बोलावून घेतलें, व तुला पति कसा पाहिजे म्हणून तिला विचारिलें. तेव्हां मालती आपल्या पित्याला म्हणाली; बाबा, मी स्वतः मनुष्य आहे. तेव्हां मी मनुष्ययोनींतील पुरुषाबरोबर विवाह करावा हें योग्य खरें, परंतु तसें करण्याची माझी इच्छा नाहीं. हें पार्थिव शरीर नाशिवंत आहे. त्याचा केव्हां नाश होईल याचा नियम नाहीं; म्हणून जो पुरुष नाशिवंत नसेल त्याच्याबरोबर विवाह करण्याची माझी इच्छा आहे. मुलीचा विचार ऐकून राजा वीरवर्मा यास मोठा आनंद झाला. त्यानें पुष्कळ विचार करून शेवटीं धर्मराज जो यम त्याला मुलगी देण्याचें ठरविलें. तो आपल्या मुलीला म्हणाला; हे मालती, तूं म्हणतेस त्या प्रमाणें धर्मराज यम तुझ्या योग्य पति आहे, असें मला वाटतें. तो जर तुला पसंत पडेल तर तो कसा प्राप्त करून घ्यावा, हें मी तुला सांगतों. तेव्हां मालती आपल्या बापाला म्हणाली; बाबा, आपण जो हा यम म्हणतां, त्याच्या विषयीं पूर्ण माहिती मला कळल्यावांचून तो पसंत किंवा नापसंत हें सांगावयाला मी असमर्थ आहें. तेव्हां वीरवर्मा राजानें मालतीस यमाची सर्व हकीकत सांगितली, व म्हणाला; हे मालती, त्या यमधर्माचा अधिकार फार मोठा असून प्रत्येक भूतमात्राला त्याच्या पापकर्मानुसार दंड करण्याचा अधिकार त्याला आहे. हें ऐकून मालती बापाला म्हणाली; बाबा, असा जर त्या यमाचा अधिकार असेल, तर त्याच्याच बरोबर विवाह करण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां तुम्ही माझ्यासाठीं प्रयत्न

करून तो पति मला मिळवून द्या. मालतीचें हें भाषण ऐकून राजा वीरवर्मा यास फार आनंद झाला. तो मुलीला म्हणाला; हे कन्ये, तूं यमाची कांहीं दिवस विधिपूर्वक स्तुति कर, म्हणजे तो तुला प्रसन्न होईल व तुजबरोबर विवाह करील. मग वीरवर्म्यानें यमाला प्रसन्न करून घेण्याचा मंत्र, ज्यास यमश्रुति असें म्हणतात, तो तिला सांगितला. त्या मंत्राप्रमाणें मालती प्रत्यहीं यमाची विधिपूर्वक पूजा अर्चा करून जप करूं लागली.

राजकन्या मालतीचा यमाला प्रसन्न करून घेण्याचा तो क्रम कित्येक दिवस चालला असतां, तो प्रकार नारदाला विदित झाला. तेव्हां नारदमुनीची स्वारी आपला वीणा घेऊन निघाली व दक्षिणदिशेला जाऊन यमाला भेटली. यमानें नारदाला अवलोकन करून त्याचा योग्य सत्कार केला व त्याला आपल्या सिंहासनावर आणून बसविलें. नंतर यमधर्म नारदाचें कुशल विचारून त्याला म्हणाला. हे नारदा, भ्रमण करित असतांना तुझ्या अवलोकनांत कांहीं नवल विशेष आलें असल्यास तें मला कथन कर. तेव्हां नारद म्हणाला; हे यमा, तसें नवलाविशेष माझ्या अवलोकनांत आलें आहे व तें सांगण्यासाठींच मुद्दाम मी तुजकडे आलों आहे. पृथ्वीवर सरस्वतीपुरांत वीरवर्मा या नांवाचा पराक्रमी व धर्मशील राजा आहे. त्या राजाला मालती या नांवाची सर्वांगसुंदर व तरुण अशी एक मुलगी आहे. बापाप्रमाणें ती सदाचारी व धर्मरत आहे. आपणास यम पति मिळावा, अशी तिची इच्छा असून त्याप्रमाणें कित्येक दिवसपर्यंत ती तुझ्या प्राप्तीचा सारखा प्रयत्न करीत आहे. ती राजकन्या मालती फारच सुंदर असून परम पतिव्रता, महासाध्वी, आणि सुशील व सद्गुणी अशी आहे. तुझ्या वांचून अन्य पुरुषाशीं विवाह करावयाचा नाहीं, असा तिनें कृतसंकल्प केला आहे, व तुझें नामस्मरण करीत आहे. तर त्या साध्वीची मनोवांछा पूर्ण कर, अशी तुला माझी विनंती आहे. तेव्हां यम नारदाला म्हणाला; नारदा, त्या साध्वीबरोबर विवाह करावा अशी आतां मलाही इच्छा उत्पन्न झाली आहे. व येत्या वैशाखशुद्ध द्वादशीचे दिवशीं सरस्वती नगरास जाऊन मी तिजबरोबर विवाह करीन. तूं आतां सरस्वतीपुराला जा व त्या वीरवर्माराजाला त्याप्रमाणें लग्नाची तयारी करावयाला सांग. यमानें असें सांगितल्यावर नरदाला फार आनंद झाला व तो तेथून निघून लागलाच सरस्वतीपुरास आला. वीरवर्माराजानेंही नारदाला अवलोकन करून त्याचा फार सत्कार केला व त्यास सिंहासनावर आणून बसविलें. नंतर नारदानें यमधर्माचा निरोप राजाला कळविला, व नारद तेथून निघून गेला. यमाचा तो निरोप ऐकून राजा व राजकन्या या दोघांना फार आनंद झाला; व त्यांनीं लग्नाची तयारी चालविली.

## २ यमाचे एकशेंआठ प्रधान व त्यांचीं कामें.

दक्षिणदिशेचा राजा जो यमधर्म, त्याचे प्रधान एकशेंआठ आहेत. लग्नाचा दिवस जवळ आल्यावर तो आपल्या सर्व प्रधानांना बोलावून लग्नासाठीं सरस्वतीपुरास चला म्हणून म्हणाला. तेव्हां ते प्रधान यमाला म्हणाले, हे राजा, आम्ही त्या सरस्वतीपुरांत येण्यास असमर्थ आहोंत, कारण त्या नगरांतील सर्व लोक नीतिमान, सत्धर्मरत, पुण्यवान व परोपकारी असे आहेत. तेथें प्रत्येक घरीं श्रीहरीचें कीर्तन चाललेलें असतें, घरोघर तुळशीचीं वृंदावनें असून स्त्रिया तुळशीची सेवा करीत असतात; ठिकठिकाणीं वेदांचीं पठणें होत असतात; देवालयांतून रात्रंदिवस देवतार्चन चाललें असतें; पितापुत्र, सासुस्नुषा, वगैरे आपआपल्या मर्यादेनें राहतात; तेथील लोक पूर्णपणें वर्णाश्रम धर्मानें वागत आहेत; त्या नगरांत पापाचा लवलेशही नाहीं. अशा त्या सरस्वतीनगरांत आमचा शिरकाव कसा होईल तें आपण आम्हांला कथन करावें.

याप्रमाणें वैशंपायनऋषि कथा सांगत असतां, जनमेजयराजा म्हणाला; वैशंपायनमहाराज, यमाजवळ एकशेंआठ प्रधान आहेत, असें आपण सांगितलें, तर ते प्रधान कोणते व इतक्या प्रधानाचें काय प्रयोजन, तें सांगावें.

तेव्हां ऋषि म्हणाले; राजा; पूर्वी देवांनीं व राक्षसांनीं जेव्हां समुद्रमंथन केलें तेव्हां त्या समुद्रांतून एकशेंआठ व्याधी निघाल्या. त्या व्याधी समुद्रांतून निघाल्या म्हणून त्यांना समुद्रपुत्र असें म्हणतात. हे समुद्रपुत्र समुद्रांतून निघाल्यानंतर देवांनीं व राक्षसांनीं पुन्हा समुद्रमंथन केलें, तेव्हां समुद्रांतून एकशें आठ दिव्य औषधी निघाल्या. मग या सर्वांचा स्वीकार कोण करितो, याचा सर्वांना विचार पडला. तेव्हां त्या दिव्य औषधींचा स्वीकार अश्विनौवैद्यानें केला; पण व्याधींचा स्वीकार कोणी करीना. त्या वेळीं देव यमाला म्हणाले; हे दक्षिणदिशापते, तूं या व्याधींचा स्वीकार कर. या सृष्टीविषयीं तुजकडे जें कार्य आहे, तें कार्य करण्यास या व्याधींचा तुला चांगला उपयोग होईल. हे तुझे प्रधान होतील, व तुला अनेक प्रकारें साह्य करितील. यमाची सर्व देवांनीं अशी प्रार्थना केल्यावर यमानें त्या एकशें आठ व्याधींचा स्वीकार केला व त्यांनां प्रधान करून त्यांस सर्व राज्यकारभार सोंपविला.

हे राजा जनमेजया, हे यमाचे एकशें आठ प्रधान कोण आहेत व तें काय कार्य करितात याविषयीं तुला संक्षेपानें सांगतो. मुख्य प्रधानाचें नांव राजयक्ष्मा असें आहे. या प्रधानामध्यें संग्रहणी, विषूचि कांवीळ, गंडमाळा वगैरे कांहीं स्त्रियाही प्रधान आहेत. या प्रधानांच्या अंगांत पापी मनुष्याच्या शरीरांत प्रवेश करण्याची विलक्षण शक्ति आहे. पापकर्मांच्या न्यूनाधिक्याप्रमाणें हे प्रधान मनुष्यास त्रास देत असतात. जे लोक आपल्या गुरूला रिक्त हस्तानें भेटतात, अतीताला विन्मुख घालवितात आणि अभ्यागताला कटु शब्द बोलतात, त्यांना

बारिकसारिक व्याधी वारंवार होत असतात. जी स्त्री व्यभिचार करिते तिला भगंदर नांवाचा रोग होतो. जो गुरूची निंदा करतो त्याला मूळव्याध होते. जे लोक पैशाचा गर्व बाळगून उन्मत्त होतात; वैभवाच्या धुंदीनें कोणाची मानमान्यता ठेवीत नाहींत; गुरू व आईबाप यांचा जे अपमान करितात, त्यांना धनुर्वात होतो. याप्रमाणें हे व्याधी पातकी मनुष्याच्या शरीरांत शिरून त्याला अत्यंत त्रास देतात. ह्या सर्व व्याधींनीं यमाला आपला प्रवेश वीरवर्मा राजाच्या नगरांत होणें कठीण आहे, असें सांगितल्यावर यम म्हणाला; हे प्रधानहो, अशा पुण्यभूमीचें ठिकाणीं तुम्हांला येण्याला कोणतीच हरकत नाहीं. तुम्हांला तेथील सदाचरणी लोकांकडून मुळींच त्रास होणार नाहीं. मी पाप्यांना प्रलयकाळासारखा दिसतो, परंतु पुण्यवान लोकांस शांतस्वरूपी दिसतो. त्याप्रमाणें जे पापी लोक आहेत त्यांना तुम्हीं हिडीस व रोगरूप दिसतां, परंतु साधूंना तुम्ही चांगलेंच दिसतां; आणि तुम्हींही पण जे साधुसत्पुरुष आहेत त्यांनां कोणत्याही प्रकारचा त्रास देत नाहीं व माझी आज्ञाही तुम्हाला तशीच आहे. जे ब्रह्महत्या करणारे असतील, किंवा जे अन्य पातकें करीत असतील, त्यांनां मात्र तुम्ही वाटेल तितकें छळा; परंतु असे पातकी जर आपल्या पापक्षालनाचा योग्य प्रयत्न करीत असतील तर त्यांनां तुम्ही आपल्या त्रासांतून लवकर सोडीत जा. ज्यांनीं ब्रह्महत्या केली असेल त्यांनीं मृत्युंजयमंत्रानें रुद्रानुष्ठान करावें, म्हणजे त्यांचें तें पातक नाहींसें होईल. जो हें रुद्रानुष्ठान बारा वर्षेपर्यंत करील, त्याला तुम्हीं लागलेंच सोडून द्यावें. जो वेदाध्ययन करीत असेल, जो गंगास्नान नियमितपणें करीत असेल, जो व्रत, तप, अनुष्ठान, वगैरे पुण्यकर्में करीत असेल त्याला तुम्हीं कधींही स्पर्श करूं नये. जो दुसऱ्याचें द्रव्य चोरील, जो ब्राह्मणांनां भोजन घालणाराचा तिरस्कार करील; त्याला संग्रहणीनें जाऊन त्रास द्यावा; परंतु तो जर अनुताप पावून ब्राह्मणांना अन्नदान देईल, तर त्याला तिनें त्रास देऊं नये. जे सुवर्णाची चोरी करितात, व स्वगोत्रांतल्या स्त्रियांबरोबर अगम्य व्यवहार करितात, त्यांना मूत्रकृच्छ्रानें त्रास द्यावा; पण ते जर त्या पातकनिवृत्तीसाठीं ब्राह्मणांनां सुवर्णदान देतील, तर त्यांनां मुत्रकृच्छ्रानें किंवा कोणत्याही रोगानें त्रास देऊं नये. जे स्त्रीची व अलंकाराची चोरी करितात त्यांना पंडुरोगानें छळावें; परंतु असे पातकी, जर आपल्या पापक्षालनासाठीं दुभत्या म्हशी ब्राह्मणांना दान देतील, तर त्यांनां पंडुरोगानें सोडून द्यावें. ज्याला म्हैस दान देण्याचें सामर्थ्य नसेल त्यानें सालंकृत घोडी किंवा साखरपाणी ब्राह्मणाला दिलें असतां, त्यासही पंडुरोगानें त्रास देऊं नये. आपल्या पापाचें परिमार्जन करण्याचा जो प्रयत्न करणार नाहीं, त्याला पंडुरोगानें छळून शिवाय अन्य व्याधींनीं त्याचा बंधु व त्याची आई, या दोघांना छळून मारून टाकावें. जी स्त्री गर्भपात करील, व जे पुरुष गर्भपात करण्यास साह्य करितील, त्यांनां जलो-

दरानें प्राण जाईपर्यंत छळावें. हे महापातकी जर अनाथासाठीं ठिकठिकाणीं पाणपोई घालतील तर मात्र त्यांनां पापमुक्त समजून जलोदरानें सोडून द्यावें. तसेंच जो आपली तुला करून ती ब्राह्मणांस दान देईल, तर त्याला जलोदरानें त्रास देऊं नये. ज्या पाप्यांना हड्यावर्ण छळीत असेल, त्या पातक्यांनीं जर एकशें आठ ब्राह्मणांची पूजा केली, किंवा ब्राह्मणांना सवत्स गायी दिल्या, तर त्यांनां हड्यावर्णानें सोडून द्यावें. ज्या पाप्याला विषूचिकेनें गांठलें असेल, त्यानें जर सुवर्णदान करून आपल्या पातकाची निवृत्ति करून घेतली, तर त्याला विषूचिकेनें सोडून द्यावें. ज्या स्त्रिया अपूर्ण गर्भाला प्रसवीत असतील त्या जर ब्राह्मणांनां केळीं दान देतील, तर त्या पातकापासून मुक्त आहेत असें व्याधीनें समजावें; व तिला कोणत्याही प्रकारचा त्रास देऊं नये. जे लोक विश्वासघातकी असतील, दुसऱ्यांना फसवून जे द्रव्य मिळवीत असतील, त्यांनां सन्निपातानें यथास्थित छळावें, परंतु असे पातकी जर शंकराचें मंदिर बांधितील, किंवा देवस्थानाचा जीर्णोद्धार करितील, तर ते पापमुक्त समजून सन्निपातानें त्यांनां आपल्या त्रासांतून सोडून द्यावें. जो पूर्वीचीं देवळें पाडतो, मूर्ति फोडतो व नवीन मूर्तिची स्थापना करीत नाहीं, त्याला अतिसारानें खुशाल छळावें, व त्यानें मंदिर बांधून त्यांत मूर्ति स्थापन करीपर्यंत त्यास सोडूं नये. जो अधर्मानें द्रव्याचा संग्रह करीत असेल व परस्त्रीचा अभिलाष धरीत असेल त्या पातक्याला संग्रहणीनें अगदीं त्रस्त करून सोडावें, व त्यानें महिषीदान दिल्यावांचून त्याची सुटका करूं नये. जो ब्राह्मणांना भोजन घालीत नाहीं, अतीत अभ्यागतांना अन्न देत नाहीं; व कोणी दिलें असतां ज्याला राग येतो, त्यास अग्निमांद्यानें छळावें व जेव्हां असा पातकी ब्राह्मणांना अन्नदान देईल तेव्हां त्यास सोडून द्यावें. जर कोणी अनाथांना कदान्न किंवा धक्का देऊन सोयऱ्यांना पंचपक्वान्नांच्या मेजवान्या देईल तर त्याच्यावर शूळानें एकदम झडप घालावी व त्यास हैराण करावें, पण असा पातकी जर साधु, संत, अनाथ, गोरगरीब यांनां संतोषित करील, तर शूळानें त्यास आपल्या त्रासांतून सोडावें. तसेंच अनाथास आश्रय देत असतील, शरण आलेल्याचें संरक्षण करीत असतील, जाळ्यांत सांपडलेल्या पक्षांची सुटका करीत असतील, गाळांत फसलेल्या जनावरांना जे बाहेर काढितील, चोरांच्या हातून जे लोकांचें संरक्षण करितील, त्यांनांही शूळानें कधीं त्रास देऊं नये. जे वाडवडिलांचें म्हणणें असत्य मानतात, जे जुन्या मार्गाचें उल्लंघन करितात, पोथ्यापुस्तकांची निंदा करितात, धर्माचा उपहास करितात, व साधुसंतांना वेडे म्हणतात, त्यांनां धनुर्वातानें आपल्या ताब्यांत घ्यावें, व त्यांनां देववेल तितका त्रास द्यावा; परंतु अशा पातक्यानें उडीद व मूग ब्राह्मणांना दिल्यास त्यांना धनुर्वातानें ताबडतोब सोडून द्यावें. जे श्रीहरीची कथा श्रवण करीत नसतील, जे देवाचें भजन ऐकत नसतील,

मंगलवाद्यांचा ज्यांना त्रास वाटत असेल, मंत्रघोष ऐकून जे कंटाळतात, त्यांनां कर्णमुळानें छळावें; पण असा पातकी जर कपिला गाय ब्राह्मणाला दान देऊन आपलें पाप क्षालन करील तर त्याला कर्णमुळानें सोडून द्यावें. जो परस्त्रीकडे पाप दृष्टीनें पाहतो, त्यास नेत्ररोगानें अनेक प्रकारानें छळावें व त्या पातक्यांनीं सालंकृत गाय ब्राह्मणाला दान दिल्यावांचून त्यांस सोडूं नये. जे दुसऱ्यास मर्मांतक बोलतात, दुसऱ्याचा पाणउतारा करितात, लोकांत दुसऱ्या विषयीं खोटें सांगतात, व जे आपल्या निंद्य वर्तनानें सज्जनांनां संकटांत पाडितात, त्यांना अपस्मारानें आपल्या ताब्यांत घेऊन वाटेल तितका त्रास द्यावा; पण अशा पातक्यानें सुवर्ण व चांगल्या फळांचे वृक्ष ब्राह्मणांना दान दिले, तर मात्र त्यांनां सोडून द्यावें. जे हरएक बाबतींत दांभिकपणा स्वीकारून लोकांत मोठेपणा मिरवितात व कुटुंबांतील सुना व अन्य आप्त स्त्रियांशीं अनुचार व्यवहार करितात त्यांनां कुष्ट अथवा महारोगानें छळून नाहींसें करून टाकावें, पण असे पातकी जर हरिहरांच्या यात्रा करितील, अनेक तीर्थांत स्नानें करितील, व ब्राह्मणांनां द्रव्य व वस्त्रें वगैरे देऊन संतुष्ट करितील, तर त्यांनां सोडून द्यावें.

याप्रमाणें यमानें आपल्या एकशें आठ प्रधानांनां त्यांचा शासनमार्ग चांगल्या प्रकारें समजावून देऊन, तो त्या प्रधानांसह योग्य दिवशीं वीरवर्माराजाच्या नगरांत आला. वीरवर्मा राजानें त्या सर्वांची शहराबाहेर मंडप वगैरे देऊन उतरण्याची व्यवस्था केली होती. यमाची स्वारी आली असें कळल्याबरोबर तो त्यास आपल्या सरदारांसह सामोरा गेला, व त्यास त्यानें मंगल वाद्यांच्या गजरांत मिरवीत मिरवीत नगरांत आणिलें. वैशाख शुद्ध द्वादशीचे दिवशीं त्यानें यमाबरोबर मालतीचा मोठ्या समारंभानें विवाह केला. चार दिवसपर्यंत त्यानें मोठा उत्सव केला व यमाला असंख्य वस्तु दान दिल्या. यथासांग लग्नविधी पूर्ण झाल्यावर यमधर्म वीरवर्मा राजाचा निरोप घेऊन मालतीसह आपल्या स्थानीं परत आला. हे राजा जनमेजया, याप्रमाणें यमाला अकरावी मालती नांवाची स्त्री प्राप्त झालेली आहे. यमाचे एकशें आठ प्रधान म्हणजे एकशें आठ व्याधी होत. त्या सर्व व्याधींचें निराकरण करण्याची शक्ति अश्विनौ देवांत आहे. कारण त्यांस एकशें आठ दिव्य औषधी प्राप्त झालेल्या आहेत. त्या औषधी यथाविधी सेवन केल्या असतां रोगाचा नाश होतो.

---

# अध्याय ९ वा.

## १. अश्विनौदेवाची उत्पत्ति.

नंतर जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; वैशंपायन ऋषि, अश्विनौदेवाला एकशें आठ औषधी प्राप्त झाल्या असें सांगितलें, हा अश्विनौदेव सूर्याचा पुत्र होता, असें आपण मागें सांगितलें होतें. तर सूर्याला एकंदर पुत्र किती होते, व त्या सर्वांविषयींचा इतिहास कसा काय आहे, तें मला कृपाकरून कळवावें जनमेजयराजानें याप्रमाणें वैशंपायन ऋषीस विनंति केल्यावर वैशंपायनऋषि राजाला ती कथा सांगूं लागले. ते म्हणाले; हे राजा जनमेजया, सूर्य हा कश्यपाचा पुत्र होय. या सूर्याला त्वष्टा नांवाच्या प्रजापतीनें आपली संज्ञा या नांवाची मुलगी दिली होती. त्या संज्ञेला सूर्यापासून अनेक पुत्र व कन्या झाल्या. प्रथम तिला मुलगा झाला तो यमधर्म हा होय. त्या नंतर तिला शनि या नांवाचा मुलगा झाला. याप्रमाणें दोन पुत्र झाल्यानंतर तिला मुलगी झाली, ती सर्व प्रसिद्ध यमुना ही होय. हीं तीन अपत्यें संज्ञेस सूर्यापासून झालीं हें खरें, परंतु सूर्याच्या प्रखरतेजामुळें तिला त्रास होऊं लागला, व त्याच्या सहवासांत राहणें फार दुःसह झालें. त्या स्थितीला ती फारच कंटाळल्यावर तिनें आपल्या छायेपासून अगदीं आपणासारखीच एक स्त्री निर्माण केली, व तिचें नांव तिनें सुवर्णा असें ठेविलें. नंतर तिनें त्या सुवर्णेला आपलें सर्व रहस्य सांगून तूं माझे पश्चात सूर्याची मजप्रमाणेंच सेवा सुश्रूषा ठेव असें सांगितलें. आणि अगदीं नाइलाज झाल्यास तूं आपलें नांव व खरी हकीकत सांग; असें तिला सुचवून संज्ञा सूर्याजवळून कोणाला नकळत निघाली व पृथ्वीवर येऊन घोडीच्या रूपानें फिरूं लागली. इकडे सुवर्णेला सूर्यापासून सर्व सुख मिळूं लागलें, व सूर्यासही सुवर्णेसंबंधानें कधीं संशय आला नाहीं. सुवर्णेला त्या वेळीं सूर्यापासून सावर्णिक मनु, व्यतिपाल, भद्रा, वैधृती, कुलिक व अर्धयाम, अशीं अपत्यें झालीं. इतकीं अपत्यें होईपर्यंत सूर्याला संज्ञेविषयीं खरें वर्तमान मुळींच कळलें नाहीं; परंतु पुढें कांहीं कारणावरून तो सर्व प्रकार सूर्याच्या लक्षांत आला; व संज्ञा आपला त्याग करून अशा रीतीनें पृथ्वीवर गेली, याबद्दल त्याला फार वाईट वाटलें. संज्ञेवर त्याची अत्यंत प्रीति असल्यामुळें त्याला तिचा वियोग क्षणभरही सहन होईना. तें विरहदुःख अनावर झाल्यामुळें सूर्यही घोड्याचें रूप घेऊन पृथ्वीवर आला व अश्विनीरूपी संज्ञेचा शोध करूं लागला. ती संज्ञा एका अरण्यांत आहे असें कळल्यावर सूर्य त्या अरण्यांत गेला व आपल्या प्रियपत्नीला मोठ्या प्रेमानें भेटला. त्या वेळीं अश्वरूपी संज्ञा ऋतुस्नात होती, त्यामुळें ती गरोदर झाली व घोडी अस-

त्यानांच प्रसूत झाली. त्या अवस्थेंत तिला जे पुत्र झाले ते अश्विनौदेव हे होत. असो. याप्रमाणें सर्याला अश्विनौदेव व अन्य अपत्यें होतीं. शिवाय कर्ण हाही सूर्यपुत्रच होय. तो लहानपणीं कुंतीला कौमार्यावस्थेंत मंत्रशक्तीनें झाला होता. याविषयींची कथा मी तुला मागें सांगितली आहेच. कौरव आणि पांडव यांची कुरुक्षेत्रीं जेव्हां भयंकर लढाई झाली, तेव्हां सर्व कौरव नाहींसे झाले, परंतु त्यांत या कर्णाचा पुत्र वृषकेतु या नांवाचा होता, तो मात्र मोठ्या शिकस्तीनें वाचला. अर्जुनाचा पुत्र अभिमन्यू याचा ज्यावेळीं कांहीं कौरवांनीं अनीतियुद्ध करून नाश केला, त्या वेळीं अर्जुनाला कौरवांचा अत्यंत राग आला व त्यानें संतप्त होऊन कौरवांचें निर्मूळ करणारा बाण अभिमंत्रून सोडला. तेव्हां तो बाण सर्व कौरवांचा संहार करीत चालला होता, परंतु कर्ण पुत्र वृषकेतु याची कुंतीला दया आली व तिनें त्याचें त्यावेळीं संरक्षण केलें.

## २. वृषकेतूची कथा.

वरील हकीकत ऐकून जनमेजय राजा म्हणाला; ऋषि महाराज, मला या वृषकेतूची संपूर्ण कथा ऐकण्याची इच्छा उत्पन्न झाली आहे, तर हा वृषकेतु कुंतीनें कसा वांचविला, वगैरे हकीकत कृपा करून सांगावी. तेव्हां वैशंपायन ऋषि राजाला ती हकीकत सांगूं लागले. ते म्हणाले;

हे जनमेजय राजा, कौरव आणि पांडव यांचें महायुद्ध अठरा दिवसपर्यंत मोठ्या धुमश्चक्रीनें चाललें होतें. या युद्धांत कौरवांचा नाश झाला. सर्व बाजूंनीं कौरवांचा मोड झाल्यामुळें ते सर्व अत्यंत वैतागून गेले होते, व न्याय अन्याय यांकडे लक्ष न देतां पांडवाचा नाश करावा, असें त्यांना वाटूं लागलें. कोणत्यातरी प्रकारें सूड घेण्याच्या नीच कल्पना त्यांच्या डोक्यांत वावरूं लागल्या, व जे कांहीं क्षुद्र बुद्धीचे व अविचारी कौरव होते, ते त्या उद्योगालाही लागले. चक्रव्यूहांत अभिमन्यू सांपडल्यावर त्याच्यावर दुःशासनादि नीच वृतीचे दहा-पांचजण वीर तटून पडले व त्यांनीं त्या बाळवीरावर चोंहोंकडून मारा करून त्यास ठार मारिलें. दुःशासन हा इतक्या नीच वृत्तीचा मनुष्य होता कीं, रणांत अभिमन्यू मरून पडल्यावरही त्यानें त्या बालवीराच्या कलेवराला लाथ मारिली. तो प्रकार पाहून बाकीच्या कौरवांनांही वाईट वाटलें व त्यांना दुःशासनाचा राग आला. मग त्यासंबंधानें पांडवांनां किती वाईट वाटलें असेल, ते कौरवावर किती क्रुद्ध झाले असतील, याची कल्पनाच केली पाहिजे. असो, त्यानंतर कौरवांनीं अभिमन्यूप्रमाणें भीमाचा पद्मावतीपासून झालेला एक पुत्र होता, त्याचाहि नाश केला. हें वर्तमान अर्जुनाचे कानावर जातांच त्याचा क्रोध अनावार झाला, व हे कौरव नीचपणें पोरांवर हत्यार धरीत आहेत, तेव्हां आपणही कौरवांच्या पोरांबाळांचा नाश करावा असें त्याच्या मनांत आलें. हें कर्म निंद्य आहे असें त्याला कळत होतें, परंतु दुःखभारानें तो अत्यंत संतप्त झालेला असल्या-

मुळें त्यानें कौरवांचे पुत्र, अर्भकें व उदरांतील पुरुषगर्भ या सर्वांचा नाश करणारा वज्रबाण अभिमंत्रून सोडिला. तो वज्रबाण म्हणजे यमधर्माचें बिनचूक निमंत्रणच होय. तो बाण धनुष्यापासून सुटल्याबरोबर कौरवांचे पुरुषांकुर पटापट कापून टाकूं लागला. त्याच्या प्रभावानें कौरवांची हजारों मुलें मृत झालीं व जिकडे तिकडे मोठा हाहाःकार उडाला. स्त्रिया आपल्या मुलांना घेऊन सैरावैरा धावूं लागल्या, व गरोदर असलेल्या स्त्रिया सुरक्षित ठिकाणीं लपून बसूं लागल्या, परंतु तो वज्रबाण त्या त्या ठिकाणीं नेमका जाऊन आपला कार्यभाग बजावूं लागला. याच समयास कर्णाची स्त्री प्रभावती ही प्रसूत झाली होती व तिला त्या दिवशीं पांचवा दिवस होता. तिला मुलगा झाला होता व त्या मुलाचें नांव तिनें वृषकेतु असें ठेविलें होतें. कर्ण त्याच वेळीं रणांत मृत झाल्यामुळें ती फार दुःखांत होती. इतक्यांत तिच्या कानावर अर्जुनाच्या वज्रबाणाची गोष्ट गेल्यामुळें ती भयानें गांगरून गेली; व पतीला जाऊन दोन दिवस झाले नाहीं तोंच हें अर्भकही आपणास सोडून जाणार, असें वाटून तिला अत्यंत दुःख होऊं लागलें. आपला एवढा तरी वंशतंतू कायम राहावा म्हणून कुंतीला शरण जाण्याचें तिनें ठरविलें. परंतु एकदम कुंतीकडे जाण्यापेक्षां ज्या धृतराष्ट्रानें आपणास आश्रय दिला आहे त्याला एकवार पुत्रसंरक्षणविषयीं विनंती करावी, व त्यानें आपली विनंती अमान्य केल्यास मग कुंतीकडे जावें, असें तिला वाटलें. त्याप्रमाणें ती आपल्या पांच दिवसांच्या लहान मुलाला घेऊन धृतराष्ट्राकडे गेली, व धृतराष्ट्र व गांधारी या उभयतांनां भेटून म्हणाली; "हे धृतराष्ट्रा, कौरव वंशांकुरांचा नाश करण्याकरितां अर्जुनानें आपला वज्रबाण सोडला आहे त्यानें कौरवपुत्र पटापट मृत्युमुखीं पडत आहेत, तर या वेळीं तूं माझा या पुत्राचें संरक्षण कर. याचा पिता तुझ्याकरितां रणांत मृत्यु पावला असून मला त्याच्याबरोबर सहगमन करावयाचें आहे. परंतु लहान अर्भकाच्या संरक्षणाची व्यवस्था केल्यावांचून सहगमन करणें हा अधर्म असल्यामुळें मी तुझ्याजवळ या माझ्या पुत्रसंरक्षणाची भिक्षा मागण्याकरितां आलें आहे." प्रभावतीचें भाषण ऐकून धृतराष्ट्र मोठ्या विचारांत पडला. अर्जुनाच्या वज्रबाणापुढें आपलें कांहीं चालणार नाहीं, हें पक्केपणीं कळून चुकल्यामुळें तो प्रभावतीला म्हणाला, "हे प्रभावती, मी तुझ्या पुत्राचें संरक्षण करण्यास या वेळीं असमर्थ आहे. युद्धांत माझे शंभर पुत्र नाहींसे झाले; व अकराअक्षौहिणी सैन्यहि नाहींसें झालें. तेव्हां तुझ्या मुलाचें संरक्षण मी कसें करणार ? त्या अर्जुनाच्या वज्रबाणाचें निवारण माझ्यानें होणार नाहीं. तर तूं आपला पुत्र दुसऱ्या कोणाच्या स्वाधीन कर." धृतराष्ट्राचें असें भाषण ऐकून प्रभावती निराश झाली, व पुत्राला घेऊन ती कुंतीकडे गेली.

याप्रमाणें ही कथा वैशंपायनऋषि जनमेजयराजाला सांगत असतां जनमेजयराजा वैशंपायनऋषीला मध्येंच म्हणाला; "ऋषि, कौरवपांडवांच्या युद्धांत

अठरा अक्षौहिणी सैन्य होतें म्हणतात, त्या पैकीं अकरा अक्षौहिणी कौरवांचें सैन्य होतें, व सात अक्षौहिणी पांडवांचें सैन्य होतें. परंतु अक्षौहिणी म्हणजे किती संख्या व त्यांतील सैन्याचे विभाग कसे असतात, हें मला माहित नसल्यामुळें या इतक्या सैन्याची कल्पना मला बरोबर करितां येत नाहीं, याकरितां अक्षौहिणी प्रमाणाची माहिती आपण मला करून द्यावी." जनमेजय राजाची याप्रमाणें इच्छा पाहून वैशंपायनऋषि म्हणाले; "हे राजा, अक्षौहिणीचें प्रमाण कसें, व किती, तें तुला सांगतों. पांच पायदळ सैनिक, तीन घोडे, एक हत्ती व एक रथ, इतक्या सैन्यसमुदायास पती असें म्हणतात. असे तीन पती मिळून झालेल्या सैन्यसमुदायाला सेनापति असें म्हणतात. या सेनापती सैन्याच्या तिप्पट सेनेस गुल्म असें म्हणतात. गुल्मसैन्याच्या तिप्पट सैन्यसंख्या असल्यास वाहिनी असें म्हणतात, व तीन वाहिनी सैन्यें एकत्र केल्यास त्या सैन्याला गण सैन्य असें म्हणतात. गण सैन्याच्या तिप्पट सैन्याला पृतना असें म्हणतात. पृतनासैन्याच्या तिप्पट समुदायांला चमू म्हणतात. तीन चमूसैन्यें एकत्र केल्यास त्या सैन्याला अनीकिनी म्हणतात, आणि असें अनीकिनी सैन्य दसपट असलें म्हणजे त्या सैन्याला अक्षौहिणी सैन्य असें म्हणतात. हे राजा जनमेजया, याप्रमाणें एका अक्षौहिणी सैन्यांत एक लक्ष, नऊ हजार, तीनशें पन्नास पायदळ सैनिक असतात; पांसष्ट हजार सहाशें दहा घोडे असतात; एकवीस हजार आठशें सत्तर हत्ती असतात; व रथांची संख्याही इतकीच असते. असे अठरा अक्षौहिणी सैन्य कौरवपांडवांच्या युद्धाचे वेळीं होतें. यावरून तें युद्ध किती भयंकर झालें असेल याची कल्पना कर.

असो, इकडे प्रभावती आपला मुलगा वृषकेतु याला घेऊन निघाली व कुंतीकडे येऊं लागली, इतक्यांत अर्जुनाचा बाण सूं सूं करीत प्रभावतीकडे आला. तेव्हां प्रभावती धैर्य धरून त्या बाणाला म्हणाली; "हे अर्जुनसेवका वज्रबाणा, तुला अर्जुनाचीच शपथ आहे, मी या माझ्या मुलाला कुंतीच्या स्वाधीन करीपर्यंत तूं त्याला त्रास देऊं नकोस. नारद व श्रीकृष्ण यांचीहि तुला शपथ आहे." याप्रमाणें प्रभावतीनें बाणाला शपथ घातल्यामुळें तो मागें परतला व अन्य कौरव पुत्रांचा संहार करण्यासाठीं दुसरीकडे निघून गेला. नंतर प्रभावती आपल्या मुलाला घेऊन कुंतीकडे आली, व कुंतीला वंदन करून ती नम्रपणें म्हणाली; "अहो, या माझ्या पुत्राचें संरक्षण आपण कराल असें जाणून मी आपणाकडे आलें आहें. माझा पति कर्ण रणांत मृत झाल्यामुळें मला सहगमन करावयाचें आहे; परंतु या लहान मुलाच्या संरक्षणाची व्यवस्था केल्यावांचून सहगमन करणें, हें पाप आहे, असें म्हणतात. म्हणून मी मुद्दाम तुम्हांकडे आलें आहें." प्रभावतीचें तें भाषण ऐकून कुंतीला तिची दया आली. तिनें त्या पुत्राचें संरक्षण करण्याचें कबूल केलें, [illegible] मुलाला आपणाजवळ घेतलें.

त्या पांच दिवसाच्या वृषकेतूला पाहून तिला कर्णाची आठवण झाली व त्याच्या मुलाला अशा रीतिनें संरक्षणाकरितां दीनवाणीनें दुसऱ्याकडे जाण्याचा प्रसंग आला, हें पाहून कुंतीचें हृदय गहींवरून आलें. वृषकेतूच्या रूपानें कर्णच आपणाला भेटला असें मानून मोठ्या प्रेमानें ती त्या मुलाला आपल्या हृदयाशीं घट्ट धरून कुरवाळूं लागली. इतक्यांत सूं सूं करीत अर्जुनाचा बाण तेथें आला. बाण पाहून दोघीही घाबरल्या. कुंतीनें प्रभावतीला हा काय प्रकार आहे म्हणून विचारिलें; तेव्हां प्रभावती म्हणाली:—" अहो, कौरवांवर संतप्त होऊन त्यांचे सर्व वंशांकुर नाहींसे व्हावेत म्हणून अर्जुनानें आपला हा वज्रबाण सोडिला आहे. ह्यानें कौरवपुत्रांचा एकसारखा संहार चालविला आहे, व ह्या मुलाचा नाश करण्याकरितां येथें आला आहे. तेव्हां त्याचें निवारण आपण करा. मी आपणाकडे या मुलाला घेऊन येत असतां वाटेंत हा बाण माझे पाठीमागें लागला, तेव्हां मीं त्याला पार्थाची आण घालून आपणाजवळ मुलगा देईपर्यंत त्याचा नाश न करण्याविषयीं सांगितलें. त्यानेंही माझें बोलणें ऐकून हा वेळपर्यंत माझ्या पुत्राला त्रास दिला नाहीं. आतां यापुढें त्याचें संरक्षण करणें सर्वस्वी आपल्या स्वाधीन आहे." प्रभावतीनें सांगितलेली हकीकत ऐकून कुंतीनें बाणाला आपली स्वतःची शपथ घातली व त्यास मागें परतण्यास सांगितलें, तेव्हां तो बाण कुंतीची आज्ञा मान्य करून निमुटपणें मागें परतून गेला. याप्रमाणें आपल्या पुत्राचें संरक्षण झालेलें पाहून प्रभावतीला फार आनंद झाला. नंतर ती कुंतीचा शेवटचा निरोप घेऊन पतीबरोबर सहगमन करण्यासाटीं निघून केली.

कुंती त्या मुलाचें लालनपालन मोठ्या प्रेमानें व काळजीनें करीत असे. पांडवांपैकीं कोणाच्याही दृष्टीस तो पडल्यास मोठा अनर्थ होईल, असें जाणून ती त्याचें संरक्षण गुप्त रीतीनें करीत असे. एकदां कुंती वृषकेतूला खेळवीत असतां भीमानें त्या मुलास पाहिलें व हा कोणाचा पुत्र म्हणून कुंतीला विचारिलें. कुंतीनें 'करमणूक करण्यासाटीं दुसऱ्या एकाचा आणिला आहे.' असें सांगून भीमाचें समाधन केलें. भीमाचा स्वभाव साधारणतः भोळा असल्यामुळें, तो त्याविषयीं अधिक चौकशी न करितां तेथून निघून गेला. पुढें तो वृषकेतु दहा अकरा वर्षाचा झाल्यावर कुंतीला म्हणाला; " हे माते ! मला तूं असें गुप्त रीतीनें किती दिवस ठेवणार ? मला ही स्थिति फार दुःसह वाटते. मी असें काय पातक केलें आहे, म्हणून या एकांतांतच राहूं ? " वृषकेतुचें बोलणें ऐकून कुंतीनें वृषकेतूला घडलेली सर्व हकीकत सांगितली, आणि त्यास म्हणाली; " बाळा वृषकेतु, भीमार्जुनांनीं कौरवांचे सर्व पुत्र नाहींसे करण्याचा निश्चय केला, तेव्हां मी तुझें अशा रीतीनें संरक्षण केलें, व पुढेंही तुझा नाश होऊं नये म्हणून तुला अशा गुप्त रीतीनें ठेविला " तें ऐकून वृषकेतु म्हणाला, " हे माते !

असें असेल तर भिऊन किती दिवस निभाव लागणार ? जे प्राक्तनांत लिहिलेलें असेल तें टाळण्यास कोणीही समर्थ नाहीं. तेव्हां मजविषयीं कोणतीही भीति न बाळगितां तूं मला बाहेर हिंडूं देत जा, मग माझ्या नशीबानें जें व्हावयाचें असेल तें होईल." वृषकेतूनें याप्रमाणें कुंतीला सांगितल्यावर कुंतीनेंही त्याचें म्हणणें बरोबर आहे, असें जाणून त्याला गुप्त ठिकाणांतून बाहेर काढिलें. वृषकेतु बाहेर हिंडूं लागला असतां प्रथम त्याला नारदाचें दर्शन झालें. त्यावेळीं नारद कांहीं कारणासाठीं कुंतीकडे आले होते. वृषकेतूला पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें. त्यानें कुंतीला—हा कोण, कोणाचा—वगैरे विचारिलें. तेव्हां कुंतीनें त्या कर्णपुत्राची सर्व हकीकत नारदाला सांगून त्याच्याकडून नारदास नमस्कार करविला. नारदानें वृषकेतूला 'तूं रणांत अक्षय विजयी होशील' असा आशीर्वाद दिला, व कुंतीला त्याच्या संबंधानें भिण्याचें कारण नाहीं, असें सांगून नारद तेथून निघून गेला. पुढें तो वृषकेतु द्रौपदीच्या दृष्टीस पडला. नारदाप्रमाणेंच द्रौपदीलाहि त्या सर्वांगसुंदर व तेजस्वी मुलाला पाहून फार आश्चर्य वाटलें. मग कुंतीनें द्रौपदीलाही कर्णपुत्राची सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून द्रौपदीच्या हृदयांतही कुंतीप्रमाणें प्रेम उत्पन्न झालें. तिनें वृषकेतूला आपल्या मांडीवर बसवून त्यास कुरवाळिलें, व रणांत विजयी होशील, असा त्याला आशीरवाद देऊन आपल्या वेणींतून एक उत्तम धनुष्य काढून तें त्यास दिलें. हें धनुष्य तिला द्रुपदराजानें दिलें होतें. त्याचा उपयोग कारणपरत्वें करितां यावा, म्हणून तिनें तें आपल्या केशकलापांत ठेविलें होतें. वृषकेतूवर कुंतीचें अत्यंत प्रेम होतें. धर्मार्जुनादि पांडवांपासून त्याला कांहीं त्रास होऊं नये म्हणून ती फार जपत असे. पांडवांना हा प्रकार समजल्यास पुढें काय होईल, याची तिला नेहमीं काळजी वाटे. वृषकेतूला युद्धविद्येंत चांगलें निपूण केलें असतां, तो आपलें संरक्षण स्वतःच करील असा विचार करून तिनें सूर्याचें स्तवन केलें. तेव्हां सूर्य कुंतीपुढें प्रत्यक्ष येऊन उभा राहिला, व 'मला कां पाचारण केलेस' म्हणून विचारिलें. तेव्हां कुंतीनें वृषकेतूला सूर्याचे चरणावर घालून त्यास त्याची सर्व हकीकत सांगितली. कर्ण सूर्याचा मुलगा असल्यामुळें त्या पुत्राला अवलोकन करून सूर्याला फार आनंद झाला. सूर्यानें वृषकेतूला आशीर्वाद देऊन सर्व विद्या शिकविल्या. जातेवेळीं सूर्य वृषकेतूला म्हणाला, "हे वृषकेतु, संकटसमयीं माझें स्मरण कर, म्हणजे मी तुजजवळ येऊन तुला योग्य तें साहाय्य करीन" [illegible] सांगून सूर्य आपल्या लोकीं निघून गेला.

पुढें पांडव अश्वमेध करण्यासाठीं आपल्या मंडपांत बसले असतां कुंती वृषकेतूला घेऊन त्यांच्याकडे गेली. कुंती बरोबर वृषकेतूला पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें, त्याप्रमाणें वृषकेतूसही सर्व पांडवांना पाहून मोठा विस्मय वाटला.

तो कुंतीला म्हणाला, “ हे कुंतीमाते ! यांपैकीं माझ्या पित्याला कोणीं मारिलें, तें मला दाखीव.” तेव्हां कुंती त्याला खूण करून म्हणाली, “ बा वृषकेतु, हें असें भलतेंच कांहीं येथें विचारूं नकोस, भीमार्जुनांच्या कानावर ही गोष्ट गेल्यास अनर्थ होईल.” कुंतीचें हें बोलणें ऐकून वृषकेतु म्हणाला, “ पण हें मी शत्रुभावानें विचारीत नाहीं. जो आपल्या कुळाला सोडून शत्रुपक्षाकडे गेला, ज्यानें धर्मासारख्या साधूचा आश्रय सोडला, आणि ज्यानें दुष्टांना साह्य केलें, त्या माझ्या पित्याला मारल्याबद्दल मला मुळींच विषाद वाटणार नाहीं.” वृषकेतूचें तें शहाणपणाचें बोलणें ऐकून कुंतीला फार आनंद झाला, व ती त्याला धर्माजवळ घेऊन गेली; आणि तिनें त्याला कर्णपुत्राची एकंदर हकीकत सांगितली. ती ऐकून सर्व पांडवांना कर्णाबद्दल अतिशय वाईट वाटलें. त्यांनीं वृषकेतूच्या मस्तकाचें अवघ्राण केलें, व त्यास आशीर्वाद दिला. धर्मानें त्याला आपल्या मांडीवर बसवून त्याचें कुशल विचारिलें. अशा रीतीनें कर्णपुत्राचा लाभ झाला म्हणून धर्मानें आपल्या नगरांत मोठा उत्सव केला.”

### ३. सूर्यपुत्र सुग्रीव याची कथा.

वरील कथा सांगितल्यावर, वैशंपायनऋषि, म्हणाले, “राजा जनमेजया, याशिवाय सूर्याला सुग्रीव या नांवाचा एक पुत्र होता, त्याची कथा तुला सांगतों. एकदां सत्यलोकीं, ब्रह्मदेव सचिंत बसला असतां, त्याच्या डोळ्यांतून कांहीं अश्रु पडले. ते अश्रु वसुंधरेनें जतन केल्यामुळें त्यापासून एक पुत्र निर्माण झाला. त्याचा आकार मनुष्यासारखाच होता, परंतु त्यास पुच्छ असून सर्व अंगभर केस होते; म्हणून त्या पुत्राचें नांव ब्रह्मदेवानें वानर असें ठेविलें. त्या पुत्रावर ब्रह्मदेवाचें फार प्रेम होतें. त्यास तो नेहमीं आपल्या आसनाजवळ बसवीत असे. तो वानर वारंवार वेड्यावांकड्या चेष्टा करीत असे; व त्या चेष्टा पाहून ब्रह्मदेवाला फार आनंद होत असे. ब्रह्मदेव त्या वानराला खाण्यासाठीं फळें व मुळें देत असे. ब्रह्मदेवानें त्या माकडाला फार लडिवाळपणानें वागविल्यामुळें तो वानर वाटेल त्याची वाटेल ती चेष्टा करीत असे. केव्हां केव्हां तर तो नृत्य करणाऱ्या अप्सरांना आपल्या पुच्छानें बांधून पाडून टाकी. ब्रह्मदेवानें त्याचें नांव मोठ्या कौतुकानें ऋक्षराज असें ठेविलें होतें. त्या ऋक्षराजानें वाटेल त्याच्या उपवनांत जावें व तेथील वाटतील तीं फळें खावींत, असा क्रम चालविला . शिवाय तो कित्येकांच्या उपवनाची नासधूसही करीत असे, परंतु त्यास ब्र[illegible] आश्रय असल्यामुळें त्याला कोणी शिक्षा करीत नसे.

एके वेळीं तो ऋक्षराज वानर, कैलासपर्वतावर संचार करण्यासाठीं गेला. त्या कैलासपर्वतावर एक सरोवर होतें. त्या सरोवरांत स्नान करण्याच्या हेतूनें त्यानें उडी टाकली, व मनसोक्त विहार करूं लागला. त्या सरोवराला पार्वतीनें शाप दिला होता. त्याचें कारण असें कीं, एकदां शंकर व पार्वती त्या सरोवरांत

नग्न होऊन जलक्रीडा करीत असतां तेथें कांहीं ऋषि स्नानासाठीं आले. त्या ऋषींना पाहून पार्वती फार लाजली व तिला त्यासंबंधानें फार वाईट वाटलें. मग तिनें, तेथें कोणीं येऊं नये म्हणून असा शाप दिला कीं, 'या सरोवरांत महादेवाशिवायकरून जो स्नान करील तो स्त्री होईल!' असा शाप दिल्यापासून त्या सरोवरावर कोणीही जाईनासें झालें. बिचाऱ्या ऋक्षराजाला तो प्रकार कांहींच माहीत नसल्यामुळें, त्यानें त्या सरोवरांत निःशंक मनानें विहार केला. पण बाहेर येऊन पाहतो तों त्यास त्याच्या स्थितींत विलक्षण स्थित्यंतर झाल्याचें दिसून आलें. सर्व पुरुषचिन्हें नाहींशीं झालीं असून आपण एक तरूण स्त्री झालों आहों, असें त्याच्या लक्षांत आलें. ते स्तनादि अवयव पाहून त्यास पराकाष्ठेचें आश्चर्य वाटूं लागलें, व तो मोठ्या गोंधळांत पडला.

इकडे तो ऋक्षिराज आपल्या त्या विलक्षण स्थितीचा विचार करीत असतां त्याच्याकडे इंद्र व सूर्य या दोघांची एकाच वेळीं नजर गेली. ती एक उपवर झालेली सुंदर स्त्री असून एकटीच आहे, असें त्या दोघांनीं पाहिलें व ते दोघेही त्या स्त्रीचा अभिलाष धरून तिच्याजवळ आले; व तिनें आपल्यास वश व्हावें म्हणून तिची विनंती करूं लागले. त्या दोघांचें तें चमत्कारिक भाषण ऐकून ऋक्षराज वानररूपी स्त्री अत्यंत गोंधळून गेली, व तिला त्यांची फार भीति वाटूं लागली. ती स्त्री कांहींच बोलत नाहीं असें पाहून दोघे अधिक कामातुर झाले व तिच्याशीं लगट करूं लागले. तेव्हां तो ऋक्षराज फारच भयभीत झाला, व सत्यलोकाकडे पळूं लागला. त्यावेळीं कामातूर झालेले ते इंद्र व सूर्य असे दोघेहि त्या स्त्रीच्या मागें धांवू लागले. त्या स्थितींत पळत असतां सूर्याचें रेत स्खलन झालें. तें रेत ऋक्षराजाच्या कंठावर पडलें व त्यापसून एक पुत्र निर्माण झाला. मानेला ग्रीवा असें म्हणतात म्हणून त्या पुत्राचें नांव सुग्रीव असें ठेविलें. इंद्राची स्थितीही सूर्याप्रमाणेंच झाली असल्यामुळें त्याचेंही रेत स्खलन झालें, तें ऋक्षराजाच्या केसांवर पडलें, त्या रेतापासूनही एक पुत्र निर्माण झाला. केसाला दुसरें नांव वाल असें आहे. वालापासून त्या पुत्राचा जन्म झाला म्हणून त्याचें नांव वाली असें ठेविलें. याप्रमाणें ऋक्षराजाला वाली व सुग्रीव असे दोन पुत्र झाले. त्यांपैकीं सुग्रीव हा सूर्याचा पुत्र होय. हे जनमेजयराजा, याप्रमाणें सूर्याला संतति झालेली आहे, त्याविषयीं संक्षिप्त कथा तुला निवेदन केली.

---

# अध्याय १० वा.

## मरणकाळ कसा ओळखावा.

एके दिवशीं जनमेजय राजा, वैशंपायन ऋषीला म्हणाला; " वैशंपायन ऋषि कित्येकांस आपणास मृत्यु केव्हां प्राप्त होईल ह्याचें ज्ञान असतें तें त्यास कसें समजतें तें सांगावें. तेव्हां ऋषि म्हणाले; " हे राजा जनमेजया, हा विषय फार गहन आहे. या विषयाचें संपूर्ण ज्ञान अभ्यासावांचून होत नाहीं. तथापि मी तुला संक्षेपानें सांगतों. ज्या पुरुषाची डावी नाडी वाहात असून तींतून रात्रींचा वायू वाहत असेल तर तो पुरुष तीन दिवसांचे आंत मरणार असें समजावें. तसेंच शक्र व रमण या नांवाच्या दोन नाड्या आहेत. त्यांच्यातून वायु वाहूं लागला म्हणजे सहा महिन्यांनीं मरेल असें समजावें. वामनाडी चालू होण्याचे प्रसंगीं जर सत्यप्रस्थस्थानीं सूर्य किंवा जन्मस्थानीं चंद्र असेल तर तो मनुष्य तत्काळ मरण पावेल असें समजावें. ज्याच्या मुखांतून लाळ वाहू लागते, तो रोगी दहा प्रहरांनीं मरण पावतो. ज्याची सावली दक्षिण दिशेला झुकून पडते तो पांच दिवसांनीं मरण पावणार असें समजावें. ज्याला डोळ्यांपुढें काळा व पिंवळा वर्ण दिसतो त्या मनुष्याचें आयुष्य दोन वर्षें राहिलें असें समजावें. ज्याला आरशांत आपला चेहेरा दिसत नाहीं, त्या मनुष्याचें आयुष्य सहा महिने उरलें असतें. ज्या रोग्याचा कंठ, ओष्ठ, जिव्हा व दांत हे कोरडे पडतात, तो साधारणतः सहा महिनेपर्यंत वांचतो. ज्या रोग्याचे डाळे, डोळ्यांतील बुबळें व तोंड हीं निळसर रंगाचीं दिसतात, तो रोगी एक महिन्यानें सायंकाळच्या वेळीं मरण पावतो. ज्याला वस्तूचा रंग भलताच दिसतो, तो साधारण सहा महिने पर्यंत वांचतो. ज्याला जिकडे तिकडे सर्प पसरल्यासारखे दिसतात तो चार महिने-पर्यंत वांचणार असें समजावें. शिंकेसरसें ज्याचें मल, मूत्र व रेत यांचा स्राव होतो तो साधारणपणें तीन चार महिन्यांनीं मरण पावतो. ज्याला पाण्यांत आपलें प्रतिबिंब, मस्तक व पाय यां वांचून दिसेल त्यानें आपला मृत्यु पांच महिन्यांनीं होणार असें समजावें. शरीर सदृढ व प्रकृति निकोप असतांनां छाया जर शरीरापेक्षां रुक्ष पडेल तर सुमारें चार महिन्यांनीं मरणकाळ प्राप्त होतो. स्नान केल्यानंतर लागलींच जर हात, पाय व हृदय हीं कोरडीं होतील तर त्याला तीन महिन्यांनीं यम आपल्या पुरींत घेऊन जाईल असें जाणावें. ज्याला बुद्धिभ्रंश होतो, सूर्य व चंद्र हे ज्याला दोन दिसतात, रात्रींच्या वेळीं ज्याला तारे न दिसतां ते दिवसां दिसतात, तसेंच वृक्ष व पर्वत यांवर ज्याला गंधर्व किंवा भूत पिशाचें दिसतात तो बहुत्येक एक महिन्यांतच मृत्यूच्या मुखांत जाऊन पडतो. तसेंच ज्या मनुष्याला एकाएकीं बहिरेपण येतें तोही एक महिन्यांत मृत्यु

पावतो. जो मनुष्य एकाएकीं कृश होऊं लागतो, किंवा जो कृश असून स्थूल होऊं लागतो, त्यानेंही आपण एक महिन्यानें मरण पावणार असें समजावें. कांहीं स्वल्प कार्य करीत असतांनां मध्येंच शिंक येणें हेंही अशुभ असून असा मनुष्य पांच महिन्यांचे आंतच मृत होतो. आकाश मंडळांतील अरुंधती, ध्रुव, तीन विष्णुपदें व मातृमंडळ हीं ज्यास दिसणार नाहींत, तो लवकरच मरेल असें समजावें. हे राजा जनमेजया, हीं अरुंधती, ध्रुव, वगैरे स्थानें ब्रह्मांडाप्रमाणें शरीरांतही आहेत. जिव्हास्थान हें अरुंधतीचें स्थान असून, नाकाच्या अग्रभागावर ध्रुवाचें स्थान आहे. दोन्ही भुंवयांच्या मध्यभागीं विष्णुपदाचें स्थान असून दोन्हीं डोळ्यांच्या अग्रभागीं मातृमंडळें आहेत. हीं स्थानें मनुष्यास साधारण सूक्ष्म दृष्टीनें आपलीं आपणास दिसतात, परंतु तीं जर न दिसतील तर मरण लवकरच प्राप्त होणार असें समजावें.

या वर सांगितलेल्या चिन्हांशिवाय स्वप्नावरूनही मरण ओळखितां येतें. जर स्वप्नांत प्रेतें व भूतें दृष्टीस पडतील, तसेंच पक्षी व श्वापदें शरिराला येऊन झोंबतील, तर त्या मनुष्यानें आपण फारतर एक महिनाभर जगणार असें समजावें. स्वप्नांत जर आपलें शरीर आपणास गंध, फुलें व वस्त्रें यांनीं आलंकृत केलेलें दिसेल, तर आठ महिन्यांच्या आंतच आपला मृत्यु होणार असें समजावें. आपण आपणास डोंगरावर चढतांनां पाहिलें, किंवा धुळींत लोळतांनां पाहिलें, अथवा स्तंभावर किंवा सूळावर आपणास देत आहेत, असें दिसलें, तर सहा महिन्यांनीं मृत्यु प्राप्त होणार असें समजावें. जर डोक्यावर वाळलेलें गवत किंवा लांकडें घेतलीं आहेत, असें स्वप्नांत दृष्टीस पडेल, तर त्या मनुष्याला सहा महिन्यांत मृत्यु प्राप्त होतो. जर प्राण्याला त्याचा पुत्र अंगास तेल लावून स्नान घालीत आहे किंवा घोड्यावर बसून जात आहे, असें स्वप्नांत दिसेल तर तो लवकरच मृत्यु पावणार असें समजावें. कृष्णवर्णाचा मनुष्य वस्त्राभरणांनीं आलंकृत झालेला असा जर स्वप्नांत दृष्टीस पडेल, तर तीन महिन्यांनीं मृत्यु प्राप्त होणार असें समजावें. जो मनुष्य आपण स्वप्नांत आकाश पंथानें पूर्व दिशेकडे गमन करीत आहों असें पाहतो, तो मनुष्य एक महिना व पांच दिवसांनीं मृत होतो.

## २. स्वप्नाचें शुभाशुभ फळ.

वैशंपायन ऋषींनीं जनमेजय राजाला मृत्यु जाणण्याची साधारण माहिती सांगितली ती ऐकून राजा म्हणाला; "मुनिवर्य, मनुष्यास अनेक प्रकारचीं स्वप्नें पडतात. तर त्यांत शुभ कोणतीं व अशुभ कोणतीं, तसेंच त्यांचें फल काय, तें मला कथन करावें."

जनमेजयराजाची अशी इच्छा पाहून वैशंपायनऋषि, राजाला ती कथा सांगू लागले. ते म्हणाले; हे जनमेजयराजा, रात्रीच्या पहिल्या प्रहरांत जीं स्वप्नें दृष्टीस

पडतात, त्या स्वप्नांचें फळ एकवर्षांनीं प्राप्त होतें. दुसऱ्या प्रहरांत जीं स्वप्नें पडतात त्या स्वप्नांचीं शुभाशुभ फलें आठ महिन्यांनीं मिळतात; तिसऱ्या प्रहरांत जीं स्वप्नें पडतात, त्या स्वप्नांचीं फळें साधारणतः एक महिन्यांनीं अनुभवाला येतात; आणि जीं स्वप्नें चौथे प्रहरांत पडतात, त्या स्वप्नांचीं फळें लागलींच दृष्टीस पडतात. उजाडण्याचे सुमारास जर स्वप्न पडलें तर त्याचें फळ दहा दिवसांनीं प्राप्त होतें. दिवसा जें स्वप्न पडतें त्या स्वप्नाचें फळ एक दिवसानें मिळतें, व सूर्यास्त समयीं स्वप्न पडल्यास त्या स्वप्नाचें फळ लवकरच प्राप्त होतें. उजाडल्यानंतर स्वप्न पडल्यास त्या स्वप्नाचें फळ उशीरां प्राप्त होतें. कित्येकांनां एकसारखीं स्वप्नें पडत असल्यामुळें, त्यांनां तशाच प्रकारच्या निद्रेची संवय होते. अशा मनुष्यास पडणारीं स्वप्नें निर्फळ जाणावींत. त्या स्वप्नापासून शुभ अथवा अशुभ असें कोणतेंच फळ प्राप्त होत नाहीं. तसेंच काळजीमुळें किंवा कित्येक गोष्टींचें चिंतन केल्यामुळें त्याच संबंधाचीं जीं स्वप्नें पडतात तींहीं निर्फळ जाणावींत. स्वप्न जर चांगल्या प्रकारचें पडलें असेल तर तें लोकांजवळ सांगावें, वाईट स्वप्न असल्यास तें कोणाजवळ सांगू नये. त्या स्वप्नाची अशुभ फलप्राप्ती होऊं नये म्हणून ब्राह्मणाकडून शांति वगैरे करावी. आतां या स्वप्नांच्या शुभाशुभ फलाविषयीं तुला संक्षेपानें सांगतों.

स्वप्नांमध्यें जर घोडा दृष्टीस पडेल, किंवा वनगाय दृष्टीस पडेल, तर कांहीं तरी लाभ होणार आहे, असें निश्चयानें जाणावें. तसेंच बैलाच्या गाडींत बसून मार्गक्रमण करित आहों, घोड्यावर अथवा हत्तीवर बसून मार्गानें जात आहों, किंवा देऊळ, घर अथवा डोंगर यांवर चढत आहों, असें जर स्वप्न पडेल तर तें शुभ स्वप्न होय. त्या स्वप्नापासून लवकरच चांगला लाभ होतो. अंगाला विष्टा लागली आहे, किंवा आपण कांहीं कारणानें स्वप्नांत रडत आहों, अथवा स्वप्नांमध्यें आवाज ऐकूं येत असेल, तर तें स्वप्न लाभकारक असून, तसा अनुभव लवकरच येतो. हलक्या जातीच्या स्त्रीशीं जर स्वप्नांत सहवास घडून येईल तर तें स्वप्नही लाभकारक आहे असें समजावें. पुष्पपल्लवांनीं डवडवलेला परंतु फलरहित असा वृक्ष जर स्वप्नांत दृष्टीस पडेल, तर चांगला धनलाभ लवकरच होणार असें समजावें. सर्प अथवा तशाच प्रकारचें एखादें किरडूं आपल्या अंगाला चावत आहे, असें जर स्वप्न पडेल तर पुत्राची प्राप्ति लवकरच होणार असें समजावें. स्वप्नामध्यें कांहीं पांढरी वस्तु दृष्टीस पडली, किंवा समुद्र अथवा सरोवर दृष्टीस पडलें, तर तो राजा होतो. तसेंच स्वप्नांत खिरीचें भोजन झालें तर राज्य प्राप्त होतें. लहान मुलाच्या कडेवर मूल आहे, असें जर स्वप्न पडलें, तर स्त्रीचा लाभ होणार असें समजावें. स्वप्नांत पांढरा सर्प दृष्टीस पडून त्या सर्पाला उजव्या पायानें लाथाळून देत आहों, असें जर दृष्टीस पडेल, तर दाही दिशेला म्हणजे जिकडे जावें तिकडे धनाची प्राप्ती होते. आप-

णास कोणी शृंखलांनीं बद्ध केलें आहे असें जर स्वप्न पडेल, तर पुत्रलाभ होऊन शिवाय लोकांत मानमान्यता वाढते. आपलें बसावयाचें आसन किंवा निजावयाचा पलंग अथवा रहावयाचें घर, हें जर जळतांना दृष्टीस पडेल तर द्रव्याची प्राप्ती होणार असें समजावें. स्वप्नामध्यें जर सूर्य किंवा चंद्र यांचें दर्शन होईल, तर रोगाचा नाश होईल असें समजावें; आणि रोग नसल्यास धनलाभ होणार असें समजावें. स्वप्नामध्यें जर पाणी किंवा तेल पिण्यांत येईल, मासे वगैरे खात आहों असें स्वप्न पडेल, किंवा वाघ व डुकर हे आपणांस नखांनीं छिन्नविछिन्न करीत आहेत असें दृष्टीस पडेल, अथवा स्वप्नांत माकडें दृष्टीस पडतील, तर राजापासून कांहीं तरी त्रास होणार आहे असें समजावें. तसेंच स्वप्नांमध्यें दिवे एकाएकीं विझाल्याचें किंवा पडल्याचें दृष्टीस पडेल, तर राजभय आहे असें समजावें. विडा, दहीं, तूप, साखर, श्रीखंड, मोतीं, फुलें, व निळीं पांढरीं कमळें, हीं जर स्वप्नांत दृष्टीस पडतील तर द्रव्यप्राप्ती होईल असें समजावें. स्वतःच्या शरीराचे केस गळत आहेत, दांत हालत आहेत, किंवा ते पडत आहेत, असें ज्याला स्वप्न पडतें, त्याच्या द्रव्याचा नाश होतो; अथवा अपत्यहानि होते. स्वप्नांत आपला कोणी उद्धार करीत आहे, असें जर दृष्टीस पडेल, तर कांहीं तरी रोग उत्पन्न होणार असें समजावें. आपण शौचविधि करीत आहों, असें जर स्वप्न पडेल तर धननाश खात्रीनें होतो. तांबडें वस्त्र परिधान केलेली व तांबडें गंध लेपन केलेली स्त्री स्वप्नांत दृष्टीस पडल्यास तें स्वप्न रोगसूचक आहे असें समजावें. ज्या मनुष्याला स्वप्नांत कृष्णवर्णाची स्त्री पिवळें वस्त्र नेसलेली व आंगाला हळद लावलेली अशी दृष्टीस पडेल, त्यामनुष्याच्या हातून ब्रह्महत्या होणार असें समजावें. जी स्त्री चित्रविचित्र रंगाचें वस्त्र नेसली आहे, व अनेक रंगाचे गंधाचे लेप अंगाला लावले आहेत, अशी स्त्री जर स्वप्नांत दृष्टीस पडेल तर रोगभय आहे असें समजावें. कृष्णवर्णाची स्त्री असून तिनें कृष्णवर्णाचें वस्त्र परिधान केलेलें आहे, अशी स्त्री जर स्वप्नांत दृष्टीस पडेल, तर मरणकाळ लवकरच येणार म्हणून समजावें. पांढरें वस्त्र नेसलेली स्त्री व पांढरें चंदन लाविलेली स्त्री, जर स्वप्नांत येईल तर द्रव्यप्राप्ती होणार असें समजावें. हाडें हीं जर स्वप्नांत मुखाला लागतील तर तें स्वप्न अशुभ आहे असें समजावें. साधारणतः असा एक नियम आहे कीं, स्वप्नांत पांढऱ्या वस्तु जेवढ्या दृष्टीस पडतील तेवढ्या शुभ असतात, व काळ्या दृष्टीस पडतील त्या अशुभ असतात. परंतु पांढऱ्या वस्तूंत ताक, भात, मीठ, वगैरे वस्तु अशुभ आहेत; व कपिला गाय, देवांच्या काळ्या मूर्ति, वगैरे शुभ आहेत. हत्ती, घोडा, व ब्राह्मण हे कोणत्याही वर्णाचे असले तरी स्वप्नांत त्यांचें दर्शन झाल्यास लाभ होतो. दुभावरची साय अथवा तूप हें जर स्वप्नांत अंगाला लावलें तर मरणाचें भय असतें. स्वप्नांमध्यें धनुष्यबाण किंवा छत्री याची प्राप्ति

झाल्यास प्रवास करावा लागेल असें समजावें, परतु घरीं लवकरच परत येणं होतें. स्वप्नांत दहीं मिळालें असतां धनलाभ होतो; तूप मिळालें असतां कीर्ति वाढते; परंतु तूप भक्षण करण्यांत आल्यास तें स्वप्न अशुभ आहे, असें समजावें. स्वप्नामध्यें गहूं व सातू यांचा लाभ झाल्यास धनलाभ खात्रीनें होतो. धूम्रयुक्त अग्नि दृष्टीस पडल्यास कांहीं तरी अशुभ प्रकार घडून येतो, व धूररहित अग्नि दृष्टीस पडल्यास कांहीं तरी शुभ प्रकार घडून येतात. दिवा, फळ, कमळ, कन्या, छत्री व पताका यांपैकीं कोणतीही वस्तु स्वप्नांत दृष्टीस पडल्यास काळजी दूर होऊन इच्छित मनोरथ लवकर पूर्ण होतो. आपण स्वप्नांत मनुष्याचें कच्चें मांस खात आहों असें जर दृष्टीस पडेल, तर खात्रीनें लवकरच विपुल धनलाभ होतो. मनुष्याचें मांस कच्चें न खातां तें शिजवून खात आहों, असें स्वप्नांत दृष्टीस पडल्यास लवकरच मरण प्राप्त होतें. आपण मनुष्याचा पाय कच्चा खात आहों असें स्वप्न पडल्यास पांचशें मुद्रांचा लाभ होतो; हात खात आहों, असें स्वप्न पडल्यास सहस्र मुद्रांचा लाभ होतो; आणि शिर खात आहों असें स्वप्न पडल्यास राज्यलाभ होतो. तसेंच आपल्या स्वतःच्याच अंगाचें मांस काढून खात आहों, असें स्वप्न पडल्यासही चांगला फायदा होतो. जो मनुष्य स्वप्नांमध्यें आपल्या घरांत माहार आलेले पाहतो, तो मांडलिक राजा होतो; आणि सर्व नगर अंत्यजांनीं व्याप्त केलें आहे, असें दृष्टीस पडल्यास, सार्वभौमत्व प्राप्त होतें. देवता हंसतांना, नाचतांना किंवा रडतांना जो स्वप्नांत पाहतो, त्यानें देशनाश होणार असें समजावें. देव, ब्राह्मण, पितर व राजे यांचें स्वप्नांत दर्शन झाल्यास चिंतिलेलें कार्य खात्रीनें होतें. तांबडें अन्न, तांबडीं वस्त्रें व तांबडीं फुलें हीं अशुभ असून तीं स्वप्नांत दृष्टीस पडल्यास वाईट प्रकार घडून येतात. असो, हे राजा जनमेजया! या कालज्ञानासंबंधानें व स्वप्नांसंबंधानें भविष्य-पुराणांत पुष्कळ विचार केला आहे, त्यांतील मुख्य मतितार्थ मी तुला संक्षे-पानें कथन केला आहे."

---

## अध्याय ११ वा.

### परब्रह्म स्वरूपाची ओळख.

एके दिवशीं जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला, "ऋषी महाराज, या विश्वामध्यें परब्रह्म म्हणून जें एक गूढ तत्व आहे, तें कसें ओळखावें, हें आपणाकडून ऐकावें अशी मला इच्छा उत्पन्न झाली आहे, तर ही माझी इच्छा आपण पूर्ण करावी" जनमेजय राजानें या प्रमाणें आपली इच्छा प्रदर्शित केल्या-

चर वैशंपायन ऋषि, राजाला सर्वव्यापक, सर्वमय परंतु निर्गुण अशा परब्रह्म स्वरूपाची ओळख करून देऊं लागले. ते म्हणाले:—

" हे राजा जनमेजया, तुला मागें षट्चक्रांविषयीं सांगितलेलें आहेच. या सहा चक्रांपासून जें अलिप्त असून सर्व शास्त्रांनाही जें अगोचर आहे, त्यास परब्रह्म असें म्हणतात. हें परब्रह्म स्वरूप ओळखण्यास मोठें कठीण आहे. द्रष्टा, दृश्य व दर्शन हीं तिन्हीं त्याचीं स्वरूपें आहेत; तसेंच ज्ञेय, ज्ञाता व ज्ञान हीं तिन्हीं त्याचीं लक्षणें आहेत. या परब्रह्माला ज्ञानस्वरूप म्हणावें तर त्याचें ज्ञान होत नाहीं, जाणणें हा ज्ञानाचा धर्म आहे, परंतु परब्रह्मास जाणीवता नाहीं; अभावच आहे, म्हणजे कांहीं नाहीं, असें म्हणावें तर तें परब्रह्म सर्वत्र आहे, हें ज्ञानी मनुष्यास त्या संबंधानें जो अनुभव येतो त्यावरून स्पष्ट होतें. जे ब्रह्मविद आहेत त्यांचें म्हणणें परब्रह्म हें सर्वत्र आहे. व जे शून्यवादी आहेत त्यांचें म्हणणें परब्रह्म स्वरूपरहित आहे, अर्थात् कांहीं नाहीं. परंतु त्यांचें हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण चैतन्य हें जरी दिसत नाहीं, अथवा तें घेतां येत नाहीं, तरी तें नाहीं असें मात्र म्हणतां येणार नाहीं. त्याची प्राप्ती होत नाहीं, म्हणून तें नाहीं, हें म्हणणें अनुचित होय. आकाशांत अभ्र आलें असतां आकाश दिसत नाहीं, म्हणून तें नाहीं असें आपण जसें म्हणत नाहीं, त्याप्रमाणें मायापटला-मुळें परब्रह्म आपणांस दिसत नाहीं, म्हणून तें नाहीं, हें म्हणणें बरोबर नव्हे. आपल्या अज्ञानास आडवें आलेलें मायापटल दूर केलें असतां परब्रह्माची सहज ओळख होतें, परंतु हें मायापटल दूर करणें अत्यंत दुःसाध्य आहे. ही माया महा मायावी असून तिचेपासून चराचरांचा विस्तार झाला आहे. ही माया जरी विलक्षणशक्तिमान आहे, तरी परब्रह्माला स्पर्श करण्याची तिला शक्ति नाहीं. परब्रह्म हें माये पासूनही दूर आहे, तें निर्गुण आहे. त्याला नाम व रूप नाहीं, तें श्रुतीनांही अगम्य आहे.

चैतन्य म्हणजे विश्वांत असणारी सत्तात्मक शक्ति, ही परब्रह्माची ओळख पटवून देणारी आहे. माया अथवा विश्वांतील दृश्य प्रकार, हे सर्व परब्रह्मा-पासून निर्माण झाले आहेत. आणि म्हणून माया ही परब्रह्माची वीर्य शक्ति आहे असें म्हणतात. परब्रह्म हें निर्विकार असून तें अगोचर आहे. हें सर्व विश्व मिथ्या असून सत्यत्वानें भासतें, हा केवळ भास होय. याला विवर्त असें म्हणतात. विवर्त म्हणजे वस्तु एक प्रकारची असून तिचा अन्य प्रकारानें भास होणें. जशी दोरीचे ठिकाणीं सर्पभ्रांति होते, म्हणजे त्या ठिकाणीं सर्प आहे अशी केवळ आपली समजूत झालेली असते. वस्तुतः दोरीचें स्वरूप न बदलतां तें पूर्ववत् कायमच असतें. अथवा पाण्यांत सूर्याचें प्रतिबिंब दिसलें असतां पाण्यांत खरा सूर्य आहे, असा आपणांस भास होतो; पण तो पाण्यांतील सूर्य वेगळा नसतो. तो सर्वत्र सारखा असतो. त्याप्रमाणें परब्रह्म सर्वत्र ओतप्रोत भरला आहे, व जगत म्हणजे ही सूर्यप्रतिबिंबाप्रमाणें भ्रांति आहे. स्वप्नांतील सुख सत्या-प्रमाणें भासतें, परंतु जागें झाल्याबरोबर सर्व मिथ्या भासते; त्याप्रमाणें तात्विक

ब्रह्मज्ञान झालें असतां जग वगैरे कांहीं नसून एक परब्रह्म आहे, असा अनुभव येतो. विवर्ताला ऋषिलोक गुणसाम्य असें म्हणतात. योग्यांस या अवस्थेमध्यें परब्रह्मज्ञान होतें, तीस उन्मनी अवस्था असें म्हणतात. खरोखर ब्रह्मज्ञान होण्यास या अवस्थेची अवश्यकता असते. त्या स्थितींत दिसणारें जें परब्रह्म, तेंच खरें परब्रह्म होय. यावरून परब्रह्माची ओळख होण्यास मायेचा जितका अडथळा तितका उपयोगही पण आहे, ही गोष्ट उघड होय. ही जी मायेची सुलभ व दुर्लभ अवस्था त्या अवस्थेला ब्रह्मविवर्त असें म्हणतात. ब्रह्म व माया या दोघांची विश्वावर सारखीच सत्ता असून विश्वाच्या विस्तारास दोघे कारण आहेत. माया व ब्रह्म निरनिराळीं आहेत हें खरें, पण त्यांचा निराळेपणा ओळखणें हें मानवी विचारशक्तीला असाध्य आहे. माया ही परब्रह्माप्रमाणेंच शुद्ध व सत्वरूप असून अघटित करणी घडवून आणणारी आहे. मायेचा व परब्रह्माचा विस्तार जरी सारखाच आहे, माया व ब्रह्म हें जरी एकरूप आहेत, तरी या मायेचा विस्तार स्वप्नाप्रमाणें मिथ्या आहे. आकाशांत मेघांचीं नगरें जशीं क्षणार्धांत तयार होऊन लगेच नाहींशीं होतात, त्याप्रमाणें मायेचा बाजार आहे. मनुष्याची विश्वांतील कालक्रमणा, हें एक स्वप्न आहे. फारतर काय संपूर्ण विश्वही स्वप्नवत आहे. स्वप्नांतील सुखदुःखाचा अनुभव ज्या प्रमाणें जागृतावस्थेंत नसतो, त्या प्रमाणेंच या विश्वांतील सुखदुःखें ज्ञान झालें असतां मिथ्यारूप भासतात.

माया व परब्रह्म हीं परस्परांपासून भिन्न नाहींत इतकेंच नव्हे, तर केव्हांही तीं भिन्न होत नाहींत. जेथें उजेड असेल तेथें अंधार असणार हें उघड आहे, परंतु अंधार व उजेड हे जसे एकमेकांशीं संलग्न झालेले असतात. उजेडापासून अंधार निराळा होत नाहीं, व अंधारापासून उजेड निराळा होत नाहीं, त्याप्रमाणें माया व ब्रह्म यांत भेद आहे तरी भिन्नत्व नाहीं. वायु हा आकाशापासून भिन्न आहे, परंतु तो आकाशापासून जसा निराळा होत नाहीं, अथवा पाणी व तरंग जसें एकरूपच आहे, त्या प्रमाणें माया व ब्रह्म एकरूप आहेत. मायेचें भ्रमपटल जरी भुरळ पाडणारें आहे, तरी चैतन्य म्हणजे सत्य दृष्टि, ही मायेपासूनच प्राप्त होते. आकाश हें सर्वत्र असल्यामुळें तें जसें प्रत्येक घटांत असतें, त्याप्रमाणें मायाही स्वयंसिद्ध चैतन्यरूप असल्यामुळें तिच्यापासून प्रत्येक प्रकृतीला चैतन्यस्फूर्ति प्राप्त होते. माया ही जरी मूळ प्रकृतीपासून भिन्न आहे, तरी ती सर्वव्यापक असून या मायेची उपाधी कोणासही टाळतां येत नाहीं."

याप्रमाणें वैशंपायनऋषि, राजाला कथा सांगत असतांनां जनमेजयराजा वैशंपायनाला म्हणाला; "मुनिवर्य, आपण माया ही मूळ प्रकृतीपासून भिन्न आहे असें म्हणता, तर मूळ प्रकृति म्हणजे काय? तें मला सांगावें."

तेव्हां वैशंपायनऋषि म्हणाले; "हे राजाजनमेजया, बाह्यप्रकृति व मूळ प्रकृति अशा दोन प्रकृत्या आहेत. बाह्यप्रकृति ही सहज जाणतां येते, परंतु मूळ प्रकृति ही ज्ञानदृष्टीनें अभ्यास करून जाणावी लागते. मूळ प्रकृति हेंच परब्रह्म होय; आणि मूळप्रकृतीचा मार्ग सात्विक असून तो स्वतःच्या प्रकाशानें पाहून आक्रमण करावा लागतो. मूळप्रकृति ही ज्ञेय व ज्ञाता अशी असून वेद्य व वेत्ताहि ती आहे. ही शक्ति बाह्य प्रकृतीच्या म्हणजे मायेच्या आंगीं नाहीं. ज्ञानी पुरुषांनीं साधारणतः असें ठरविलें आहे कीं, माया ही भासमान असून, परब्रह्म हें निराभास आहे. माया ही परप्रकाशित असून ब्रह्म हें स्वयंप्रकाश आहे. माया व परब्रह्म यांमध्यें जरी असे भेद आहेत, तरी त्यांच्यांत भिन्नत्व नाहीं. तीं एकमेकांशीं संलग्न झालेलीं आहेत. हे जनमेजया, तुला मीं हें सांगितलें आहेच. मूळप्रकृति जर इतकी उच्च आहे, तर बुद्धिभेद हा कां उत्पन्न होतो, असा तुला संशय येईल; परंतु यांत विशेष असें कांहीं नाहीं. धनलोभी जसा धनानें मत्त होऊन अविचारानें वागतो, किंवा कामातुर स्त्रीच्या बुद्धीनें वागतो; त्याप्रमाणें बाह्यप्रकृतीच्या आधीन मूळ प्रकृति झाल्यास, ज्ञान नाहींसें होऊन अज्ञान प्राप्त होतें; आणि अज्ञान प्राप्त झाल्यामुळें मनुष्य सर्व विसरून जाऊन माया नाचवील तसा नाचतो. अशा रीतीनें हें मायापटल ब्रह्मज्ञानास आडवें येऊन परब्रह्माची ओळख होऊं देत नाहीं.

परब्रह्म जो ईश्वर तो मूर्त आहे, कीं अमूर्त आहे; विकारी आहे, कीं निर्विकार आहे; सगुण आहे कीं निर्गुण आहे; याविषयींचा विचार करून निर्णय करणें फार कठीण होय. या विश्वयोजनेस ब्रह्म हें निमित्तमात्र आहे. सगुण ब्रह्मास विश्वोत्पत्ती करण्याची इच्छा उत्पन्न झाल्यामुळें त्यानें माया उत्पन्न केली व मायेपासून महतत्त्व झालें. व महतत्वापासून रज, सत्व व तम असे गुण निर्माण झाले. त्यानंतर तिच्यापासून त्रिविध ताप, अहंकार, ज्ञान, क्रिया व द्रव्यशक्ति असे निर्माण झाले. पुढें तम व द्रव्यशक्ति यापासून आकाश उत्पन्न झालें. आकाशापासून वायु व तेज उत्पन्न झालें. वायु व तेज यापासून उदक निर्माण झालें, व उदकापासून सृष्टि निर्माण झाली. आकाश, वायु, तेज, उदक आणि सृष्टि यांनां पंचतत्वें असें म्हणतात. या तत्वांचे ठिकाणीं शब्द, स्पर्श, रूप, रस, व गंध असे पांच गुण आहेत. शिवाय त्यांचे संयोगादि गुण मिळून वीस गुण आहेत. क्रियाशक्ति व रजोगुण यापासून पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें, व पांच वायु उत्पन्न झाले. श्रोत्र, नेत्र, त्वचा, जिव्हा व घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें आहेत. वाचा, पाय, हात, शिश्न व गुद, हीं पांच कर्मेंद्रियें आहेत. आणि समान, व्यान, उदान, अपान व प्राण, असे पांच वायु आहेत. याप्रमाणेंच ज्ञानशक्ति व सत्वगुण यांपासून मन, बुद्धि, चित्त व कारण अशीं चार अंतःकरणें उत्पन्न झालीं. हे चार भेद सूक्ष्म असून ते कळण्यास कठीण

आहेत. दिवस हा चार प्रहराचा असून, प्रत्येक प्रहरांत सूर्याचा प्रकाश जसा निराळा असतो, त्याप्रमाणें अंत:करण जरी वस्तुतः एकच आहे, तरी त्याचे मन, बुद्धि, चित्त, व करण असे चार भेद आहेत. रज, तम व सत्व या तिन्ही गुणांचा जो वृतिप्रकार त्यास त्रिपुटी असें म्हणतात. या त्रिपुटीचे तीन प्रकार आहेत. भोग्य, भोग व भोक्ता हा एक प्रकार असून, ज्ञेय, ज्ञान व कर्ता, हा एक प्रकार आहे. त्याचप्रमाणें कार्य, कारण व कर्ता हा एक प्रकार आहे. भोग्य हा गुण तामसाचा असून, भोग हा इंद्रियाकडून होतो, व भोक्ता हें अंत:करण असतें. याचप्रमाणें पंचभूतांविषयीं व पांच विषयांविषयीं जाणावें.

वैशंपायनऋषींनीं केलेलें वरील विवेचन ऐकून जनमेजयराजा ऋषीला म्हणाला; वैशंपायनऋषि, तत्वांचें व भूतांचें समीकरण कसें झालें तें सांगावें. तेव्हां ऋषि म्हणाले; हे राजा जनमेजया, अंत:करणाच्या योगानें अंत:करण व श्रोत्रेंद्रियांच्या योगानें शब्दज्ञान होतें. श्रोतेंद्रियामुळें आकाशांत शब्द उत्पन्न होतो, व मन नांवाच्या अंत:करणाचें समानवायूशीं एकीकरण झाल्यामुळें, त्वचेंद्रियापासून स्पर्शगुण उत्पन्न होतो. त्याप्रमाणें बुद्धि व उदान्यवायु एकत्र झाला म्हणजे चक्षुरिंद्रियाकडून रूप नांवाचा गुण निर्माण होतो. चित्त नांवाचें अंत:करण व प्राण नांवाचा वायु एकत्र झाल्यास जिव्हेंद्रियाकडून रसगुण उत्पन्न होतो. 'कारण' या नांवाचें अंत:करण अपानवायूशीं संलग्न झाल्यास घ्राणेंद्रियापासून गंधगुण उत्पन्न होतो. या पांच गुणांचीं पांच स्थानें आहेत. शब्दगुणाचें स्थान आकाश आहे. स्पर्शगुणाचें स्थान वायु असून, रूपगुणाचें स्थान तेज हें आहे. रसगुणाचें स्थान उदक हें असून, गंधगुणाचें स्थान पृथ्वी ( मृत्तिका ) हें आहे. प्रत्येक तत्वाच्या पांच पांच गुणांमुळें एकंदर पंचवीस प्रकार झाले आहेत. या सर्वांपासून जो विस्तार झालेला आहे, त्याचे सूक्ष्म व स्थूल असे दोन भाग केलेले आहेत. वरील पंचवीस तत्वांचे सूक्ष्म भाग देवांनीं एकत्र करून सर्वे-श्वराचा लिंगदेह ( सूक्ष्मदेह ) तयार केला, व उरलेले भाग एकत्र करून त्याचा स्थूलदेह निर्माण केला. या दोन्हीं देहानंतर सर्वेश्वरानें पंचीकृताला आरंभ केला.

हें ऐकून जनमेजय राजा म्हणाला; "वैशंपायन ऋषि, हें पंचीकरण काय आहे हें सांगण्याची कृपा करावी." मग वैशंपायन ऋषि, जनमेजयाला पंची-करणासंबंधानें सांगू लागले. ते म्हणाले; "हे राजा जनमेजया, हिरण्यगर्भातल्या पंचवीस अंशांपासून हा लिंगदेह झालेला आहे. या देहाच्या अवयवस्थानाला जी अन्य नांवें आहेत तीं तुला सांगतों. श्रोत्रास दिशा म्हणतात. वायुला त्वचा, व डोळे सूर्य, जिव्हा वरुण, नाक अश्विनौदेव, आणि जठर अग्नि होय. पादस्थानीं उपेंद्र असून गुदस्थानीं नैऋत्य मानतात. हात हेच इंद्रस्वरूप असून शिश्न हे प्रजापति स्वरूप आहे. अंत:करणाचे ठिकाणीं श्रीमति असून अहंकार

स्थानीं रुद्र आहे. मनाचे ठिकाणीं इंद्राची योजना असून ब्रह्मा हीच त्याची बुद्धि आहे, आणि चित्त हें नारायणाचें स्थान आहे. याप्रमाणें हा सूक्ष्म देह आहे.

राजा जनमेजया, स्थूळ देहाची अवस्था सूक्ष्म देहाप्रमाणें नाहीं. स्थूळ-देहाचें पंचीकरण निराळें आहे. त्या विषयीं तुला संक्षेपानें सांगतो. पंचवीस विभाग कल्पितात. म्हणजे एका भूताचे पांच भाग होतात. प्रत्येक भूतांच्या चार भागाचें एकीकरण असें पांच भागाचें एकीकरण त्यास पंचीकरण म्हणतात. अंतःकरण हें आकाश तत्वाचा एकभाग असून त्यास व्यान, श्रोत्र, शब्द व वाचा असे चार भाग येऊन मिळतात. याप्रमाणें पांचहि तत्वांची स्थिति आहे. या पांचहि तत्वांना गुण, धर्म व कर्म हीं आहेत. आकाश तत्वाचा गुण, शब्द हा असून, त्याचें कर्म अवकाश, व अच्छिद्रता हा धर्म आहे. वायुतत्वाचे गुण शब्द व स्पर्श असे दोन असून, चांचल्य हा त्या तत्वाचा धर्म आहे. शोक आणि आनंद अशीं वायूचीं दोन कर्में आहेत. शब्द, स्पर्श व रूप असे तीन गुण तेज तत्वाचे आहेत. या तत्वाचा धर्म उष्णता असून कर्म तेजोमय असणें हें आहे. उदकतत्वाचे गुण शब्द, रस, शीत व स्पर्श असे चार असून रस हा या तत्वाचा धर्म आहे. या तत्वाचें कर्म वाहणें हें आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध असे पांच गुण पृथ्वीचें असून कठिणत्व हा त्या तत्वाचा धर्म आहे, व धारणशक्ति हें या तत्वाचें कर्म आहे. या प्रमाणें या पंचभूतांचीं कर्में, धर्म व गुण हीं आहेत. या पंच भूतांचें पंचिकरण होऊन लिंगदेह व स्थूल देह उत्पन्न झालेला आहे. या अनंताच्या स्थूल म्हणजे विराट देहाचें वर्णन करणें कठीण आहे. या देहाचे चरण इतके विशाल आहेत कीं, त्यानें सप्तपाताळ व्याप्त केले आहेत. पदतळीं त्रिविक्रमाचें अधिष्ठान आहे. उदराचे ठायीं सप्तसागर आहेत. दिशा याचे ब्रह्मरंध्रें होत. सरिता ह्या रक्तवाहिन्या आहेत. गुल्मवल्ली व गवत हे या देहावरील रोमांकुर आहेत. जलवृष्टी हे रेत होय. जनलोक हें मुखकमल असून, वडवानळ हा जठरवन्ही आहे. भूमंडळ हें या देहाचें नाभिस्थान आहे. कंठाचे ठिकाणीं महर्लोक असून तपोलोक हाच या देहाचा ललाट प्रदेश होय. ब्रह्मभुवन व सप्तलोक हें त्याचें मस्तक आहे. इंद्रलोक या देहाच्या हातावर असून, दांत हे स्नेहस्वरूप आहेत. दाढा याच यमअसून जिव्हा ही वरुण स्वरूप आहे. वक्षस्थळाचे ठिकाणीं जोतिर्लोक असून सूर्यमंडळ हे नेत्र होय. गुदस्थानीं नैर्ऋत्य लोक असून प्रजापति हा शिश्नस्थानीं आहे. कर्माचा परिणाम लिंगदेहास भोगावा लागतो. त्यास कर्मबंधनानें चौऱ्यांशी योनी हिंडाव्या लागतात. हे सर्व जीव ज्या ब्रह्मांड गोलांत असतात, त्या ब्रह्मांडाची सप्तावरणें आहेत. तीं पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, अहंकार व महत्व हीं होत. या सप्तावरणांनीं वेष्टिलेलें जसें ब्रह्मांड आहे, तसाच पिंडही या सप्तवरणांनीं वेष्टिलेला आहे.

परब्रह्म हें ओंकार स्वरूप असून या ओंकाराच्या तीन मात्रांपासून ब्रह्मा, विष्णु, व महेष यांची उत्पत्ति झालेली आहे. सृष्टीकर्ता ब्रह्मदेव अकार मात्रेपासून निर्माण झाला आहे. उकार मात्रेपासून विष्णु झाला आहे, आणि मकारापासून रुद्र उत्पन्न झाला आहे. याप्रमाणें हे तिघेहि मात्रारूप आधारानें परब्रह्मापासून उत्पन्न झाले आहेत. लिंगदेहाच्या हिरण्यगर्भात हे तिन्ही देव अवस्था स्थितींत असतात. अवस्थास्थिति म्हणजे एकप्रकारची स्वप्नावस्था होय. ब्रह्मदेव हा सृष्टीचा अभिमानी असून, विष्णु, हिरण्यगर्भ व श्रुति यांचा अभिमानी आहे. आणि रुद्र कारणदेह व प्रकृति यांचा अभिमानी आहे. हे तिन्ही देव सर्वेश्वर व माया, यांच्यापासून उत्पन्न झालेले आहेत. या तिघांकडून परब्रह्म, सृष्टीची उत्पत्ती, स्थिति व लय हीं तीन कार्यें करीत आहे. सत्व, रज व तम हे तीन प्रणवाचे चरण असून या तिन्हीं चरणास अनुक्रमें अकार, उकार व मकार असें म्हणतात. अकारापासून ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली आहे. म्हणून ब्रह्मदेवाला अकार असेंहि म्हणतात, उकारापासून विष्णुची उत्पत्ति झालेली असल्यामुळें विष्णूला उकार असें म्हणतात, व रुद्रोत्पत्ती मकारापासून झालेली असल्यामुळें रुद्राला मकार असें म्हणतात.

हे राजा जनमेजया, मीं जें हें विवेचन केलें, तें वेदानुरोधानें केलें. याविषयीं ब्रह्मपुराणांत निराळें मत आहे. ब्रह्मपुराणाच्यामतें ब्रह्मा, विष्णु व महेश हे मायादेवीच्या तळहातापासून उत्पन्न झाले आहेत. माया आपल्या शुद्ध स्वरूपाचे ध्यान करीत असतां तिच्या ललाट प्रदेशावर एक फोड उत्पन्न झाला, व त्या फोडांतून तीन मुलें उत्पन्न झालीं. त्यांचीं नांवें रज, सत्व व तम अशीं ठेविलीं. त्यानांच ब्रह्मा, विष्णु व रुद्र असें म्हणतात. पुढें ती माया ब्रह्मदेवाला म्हणाली, " तूं माझा स्वीकार कर." तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला; " हे माये तूं तर माझी माता आहेस. मातेचा स्वीकार करणें हें सर्वथा अनुचित असल्यामुळें मला तुझा स्वीकार करितां येत नाहीं." ब्रह्मदेवानें असें सांगितल्यामुळें मायेला फार राग आला व तिनें ब्रह्मदेवाला शाप देऊन भस्म करून टाकिलें. नंतर तिनें आपला मनोदय विष्णूला कळविला, विष्णूलाही तो प्रकार अनुचित वाटून त्यानें ब्रह्मदेवाप्रमाणें तिला स्पष्ट कळविलें. तेव्हां मायेनें विष्णूलाही शाप देऊन भस्म करून टाकिलें. त्या दोघांची अशी स्थिति पाहून रुद्र भयभीत झाला. त्यानें त्या दोघांची राख अंगाला लाविली व तो दुःख करीत बसला. नंतर मायेनें रुद्राजवळ येऊन त्याला आपला स्वीकार करण्याविषयीं सांगितलें. तेव्हां रुद्र म्हणाला. "हे माये तूं जर या दोघांनां सजीव करशील तर मी तुझा स्वीकार करीन." तेव्हां मायेनें त्या दोघांना जिवंत केलें, व रुद्रानें मायेचा स्वीकार केला. ऋषि म्हणाले; राजा, ह्या परब्रह्माचा अंत लागणें फार कठीण आहे. पण मी तुला संक्षेपानें सांगितलें. हें ब्रह्म जगाच्या आदिपासून असून तें जगाच्या अंतींहीं राहणारें आहे. बीजापासून

अंकुरोत्पत्ति होऊन त्याचें अवसानही बीजस्वरूपांतच होतें. म्हणजे साळी पेरल्या असतां जसें त्याचें तृण उत्पन्न होऊन पुन्हां त्यांपासून साळीं उत्पन्न होतात, त्याप्रमाणें हें स्थावरजंगम जगत् परब्रह्मापासून उत्पन्न झालें असून त्याचें अवसानही शेवटीं परब्रह्मांतच होणारें आहे.

---

## अध्याय १२ वा.

### जीवब्रह्म व परब्रह्म.

वरील कथा ऐकल्यावर, जनमेजयराजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; "ऋषिमहाराज, जीवात्मा आणि परमात्मा एक आहे असें कित्येक म्हणतात; व कित्येकांस तें खरें वाटत नसून ते त्यांस भिन्न भिन्न मानितात, तेव्हां या परब्रह्माशीं जीवब्रह्माचा कसा काय संबंध आहे, द्वैत खरें किंवा अद्वैत खरें, तें सांगावें. तेव्हां ऋषि म्हणाले "राजा जनमेजया, परब्रह्मासंबंधानें द्वैत मानणें हें अत्यंत अनुचित होय. जे द्वैत मानितात व त्यासंबंधानें दुराग्र दर्शवितात, तें स्वतः आपणासाठीं पापमार्ग तयार करितात, असें म्हटलें पाहिजे. अज्ञान मनुष्य जसा स्वतःच्या दुर्बुद्धीनें फसतो, किंवा पतंग स्वतःच दिव्यावर उडी मारून आपल्या प्राणास मुकतो, त्याप्रमाणें जे द्वैतवादी आहेत ते केवळ हट्टानेंच मोक्षाला अंतरून पापाचे वांटेकरी होतात. मनुष्यानें द्वैताची बाधा कधींही होऊं देऊं नये. कारण तिजपासून विषयसंगाचीं बंधनें दृढ होतात, व त्यामुळें मनुष्य भ्रांतिष्ट होतो, म्हणजे तत्व ओळखण्यास असमर्थ होतो. या पृथ्वीवर उच्च नीच जातींचे अनेक लोक आहेत. नीच जातीनें अन्नाला स्पर्श केला असतां तें विटाळतें असें म्हणतात; परंतु विटाळण्याचा परिणाम वस्तुतः अन्नावर कांहींच होत नाहीं, व विटाळाचें अन्न पाहिल्यास त्यास अमक्याचा विटाळ झाला आहे, असेंहि कोणास नुसतें अन्न पाहून ठरवितां येत नाहीं. त्याप्रमाणें सत्य अशा परब्रह्माविषयीं कोणी कितीहि कुतर्क काढिले तरी त्याचा परिणाम परब्रह्मावर कांहींच होत नाहीं. जीवाचे विषय जरी निरनिराळे आहेत, तरी परब्रह्म हें एक असून तें सत्य व नित्य असें आहे. एवढ्यासाठीं ज्ञात्यांनीं जी वस्तु अनित्य असेल तिचा त्याग करण्याचा प्रयत्न करावा. असा प्रयत्न सारखा चालू ठेविला म्हणजे कांहीं दिवसांनीं परब्रह्मस्वरूपाची सहज ओळख होते. समुद्राचें पाणी व इतर नद्या वगैरेचें पाणी, हें दिसण्यांत जरी सारखेंच असते तरी समुद्राच्या पाण्यापासून तृषा शांत होत नाहीं. त्याप्रमाणें ऐहिक सुखें हीं समुद्राच्या पाण्यासारखीं आहेत. विशाल समुद्र पाहून मनुष्य जसा थक्क होऊन जातो, त्याप्रमाणेंच ऐहिक सुखाच्या अनुभवानें मनुष्यास सर्वस्व कायतें हेंच असें वाटूं लागतें. परंतु मनुष्या

 

सुखांत गुरफटून जाऊन परमार्थ सुखाला आंचवतो. या करितां प्रपंच अनित्य असून एक परमात्माच नित्य आहे, हें ज्ञानी मनुष्यानें नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे. असो, ब्रह्माविषयींचें हें ज्ञान होणें फार कठीण आहे; तें प्राप्त करण्यासाठीं प्रयत्न करावा लागतो. ऐहिक सुखाप्रमाणें तें सहज साध्य नाही. तें साध्य होण्यास मुमुक्षूंनीं विशेषत: साधूंची संगती अवश्य जोडावी, म्हणजे तें आपणास रजतमांचा संसर्ग होऊं देत नाहींत. परब्रह्माविषयीं जाणीवता उत्पन्न होण्याच्या तीन अवस्था आहेत. त्या तिन्ही अवस्थांना किंवा लक्षणांना तत्पद लक्षण, शबल लक्षण, व त्वंपद लक्षण असें म्हणतात. हीं लक्षणें ऐहिक स्थितींतच उत्पन्न होऊन भ्रम दूर होत असतो. पूर्वचैतन्य म्हणजे तत्पद होय. मध्यचैतन्य म्हणजे शबल व प्रत्यक् चैतन्य म्हणजे त्वंपद होय. या अवस्थानंतर जीवात्म्याचें ज्ञान होतें, व त्यानंतर परमात्म्याचें ज्ञान होतें. हें ज्ञान झालें म्हणजे जीवात्मा परमात्म्याच्या स्वरूपांत मिळावा, अशी इच्छा होते, व सदुद्योगानें ती पूर्ण होते.''

वरील विवेचन ऐकिल्यावर जनमेजयराजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; "वैशंपायनऋषि, ईश्वराच्या विराट शक्तीकडे पाहिलें म्हणजे मनुष्य हा अत्यंत क्षुद्र आहे असें दिसून येतें. परमेश्वर नित्य असून मनुष्यप्राणी जन्ममृत्यूच्या खेपा एकसारख्या करीत आहे. परमात्मा सर्वव्यापक असून मनुष्य अति क्षुद्र आहे. परमात्मा स्वतंत्र व सर्वगामी असून मनुष्य परतंत्र आहे. असा विचार केला असतां, हा यत्किंचित मनुष्यप्राणि सर्वशक्तिमान अशा त्या ईश्वराशीं साम्य कसा पावेल ? याची शंका येते, तर ती माझी शंका दूर करावी." वैशंपायनऋषि म्हणाले; "हे राजा; ही तुझी शंका वैष्णवी मताप्रमाणें आहे. जीव, ब्रह्म व परब्रह्म, यांमध्यें इतकें विलक्षण अंतर आहे कीं, त्या दोघांची भेट होणें दुरापास्त आहे, असें वैष्णव म्हणतात. एखाद्या राजाच्या सेवकाला जसें त्या राजाचें सिंहासन कधीं बसायाला मिळत नाहीं, किंवा वांझ स्त्रीला पुत्र होणें जितकें कठीण, तितकेंच जीव व शिव एकत्र होणें असंभाव्य होय. परंतु जे प्रयत्नवादी आहेत ते ही भीति बाळगीत नाहींत, ते परमेश्वरावर विश्वास ठेवून प्रयत्न करीत असतात. वास्तविक प्राणिमात्रास जी चैतन्यशक्ति आहे ती परमेश्वराचा अंश आहे. तेव्हां ज्याचा अंश त्याच्यांत जाऊन मिळणार नाहीं असें कसें होईल ? परमात्मा हा कर्मफलदायक असून कर्मफलांचा भोक्ता जीव हा आहे. तीं कर्मबंधनें जीवानें तोडिलीं, म्हणजे त्यांचें परमात्म्याशीं तादात्म्य हें होणारच. कांहीं उपाधीमुळें त्या सत्पदाला मनुष्यास पोहोंचतां येत नाहीं; परंतु उपाधींचा त्याग केला असतां त्यांचें ऐक्य होण्यास कोणताही प्रत्यवाय नाहीं. वास्तविक जीवात्मा व परमात्मा हे एकच आहेत. या दोघांचें सापेक्ष स्वरूप तुझे लक्षांत येण्यासाठीं तुला एक उदाहरण सांगतों. सुवर्ण व लोखंड या दोन्ही धातूमध्यें कितीं अंतर असतें हें तुला माहीत आहेच. एक स्वयंप्रकाशित असून दुसरी निस्तेज आहे;

परंतु सुवर्णाच्या पत्र्याप्रमाणें लोखंडाचा पातळ पत्रा चांगला तयार केला, व त्यास झिलई दिली, तर त्याचा सुवर्णाच्या पत्र्याप्रमाणेंच आरसा तयार होईल, आणि त्या दोहोंतही प्रतिबिंब दिसेल. हें जें तेज उत्पन्न होतें, तें सुवर्ण व लोह या दोन्हीं धातूंतील एकरूप आहे. त्याप्रमाणेंच चैतन्य ६ असून तें प्रयत्नानें मूळ चैतन्यांत समावितां येतें. लोखंडाला झिलई देऊन त्यावर कृत्रिम तेज उत्पन्न करणें या प्रकारास माया असें म्हणतां येईल. मायेचा पसारा खोटा आहे. हा खोटा पसारा खरा भासणें हें अविद्येचें लक्षण होय. ही अविद्या जीवात्म्याला असते, परमात्म्याला असत नाहीं. हाच जीवात्मा व परमात्मा यांत फरक आहे. अविद्या म्हणजे अज्ञान हें नाहींसें झालें असतां, हा फरक दूर होऊन जीवात्मा व परमात्मा एकरूप होतो. ही अनिर्वचनीय अविद्या, व मिथ्यारूपमाया, या दोहोंचें मंथन केल्यास, म्हणजे त्याविषयीं ज्ञात्यांच्या साह्यानें चांगला विचार केल्यास, हा भ्रम दूर होतो. या भेदाचें निरसन करण्यास तीन लक्षणांपैकीं जहदजहल्लक्षणाची विशेष आवश्यकता आहे. या तीन लक्षणांचीं नांवें अनुक्रमें, जहल्लक्षणा, अजहल्लक्षणा व जहदजहल्लक्षणा अशीं आहेत. जहल्लक्षणा म्हणजे शब्दाच्या शक्तीनें मनांत आलेल्या अर्थाचा त्याग करून इष्ट अर्थाचा त्यापासून बोध मानणें हा होय. अजहल्लक्षणा म्हणजे वरील अर्थाचा त्याग न करितां इष्ट अर्थाचा त्या पासून बोध मानणें; व जहदजहल्लक्षणा म्हणजे वरील अर्थाचा सर्वस्वीं त्याग न करितां अनभिमत अशा कांहीं अंशाचा त्याग करणें व अभिमत दुसऱ्या अर्थाचा त्यापासून बोध मानणें हा होय. एवढ्या साठीं जीव पदार्थाचा वाच्यांश जो किंचित् जाणणारें चैतन्य, यापैकीं किंचित् जाणणारें हा अंश सोडून ईश्वर पदाचा अर्थ जो सर्व जाणारें चैतन्य, यापैकीं सर्व जाणणारें या अंशाचा त्याग करून, बाकी राहिलेल्या दोन्हीअर्थांकडे दृष्टी दिली असतां केवल चैतन्य असें स्पष्ट कळतें. याचा अर्थ असा कीं, उपाधीचा त्याग करून चैतन्याचें ऐक्य जाणण्याचा प्रयत्न करावा. जसें आपण भाताचें वरील टरफळ काढून टाकून आंतील तांदूळ घेतों, किंवा करवंटी टाकून खोबरें घेतों, त्या प्रमाणेंच या उपाधीला निरुपयोगी समजून तिजपासून दूर व्हावें, व चैतन्य हेंच खरें आहे, म्हणून तें जाणण्याचा उद्योग करावा. या उपाधीमुळें चैतन्य ओळखितां येत नाहीं; आणि तें ओळखून काढावें, अर्थात् त्याचा शोध करावा, अशी इच्छाही उत्पन्न होत नाहीं. जसा उत्तम प्रकारच्या वस्त्राभरणांनीं आलंकृत झालेला मनुष्य जर दुसऱ्या अवस्थेंत पाहिला—उदाहरणार्थ तो भगवीं वस्त्रें परिधान करून जोगी झाला आहे, असें जर आपल्या दृष्टीस पडलें, तर तो आपणास लवकर ओळखितां येत नाहीं. वास्तविक मनुष्य एकच, परंतु तो निरनिराळ्या वस्त्राभरणांनीं अन्य कोणी आहे असें वाटतें. त्या प्रमाणेंच जीवात्मा व परमात्मा हे एक रूपच आहेत; परंतु एक उपाधि रहित आहे, व एक

उपाधीनें बद्ध झाला आहे. उपाधि म्हणजे त्या विश्वेश्वराची माया होय. हें मायापटल दूर केल्यावर जीवशिव यांचें तादात्म्य होतें. त्या वेळीं परमात्मा व जीवात्मा ह्यांत कांहीं भेद उरत नाहीं.

परमात्म्याच्या स्वरूपांत विलीन होण्यास ज्ञानाची मुख्य आवश्यकता आहे, कारण परब्रम्ह म्हणजे ज्ञानमय चैतन्य होय. मनुष्य अज्ञानांत इतका गुरफटून गेलेला असतो, कीं त्यांतून बाहेर पडणें त्यास कठीण होतें. त्याला त्यांतच सुख वाटूं लागतें; व त्या ऐहिक सुखाच्या भ्रमानें मनुष्य कर्मबंधनांत सांपडून बहुतेकांशीं सुखापेक्षां दुःखाचाच अधिक वाटेकरी होतो. हीं कर्मबंधनें प्रयत्न करून तोडून टाकिलीं म्हणजे चैतन्याचा अंश जो जीव त्याचें ज्ञान होतें. हें ज्ञान झाल्यावर चैतन्यांत म्हणजे परब्रह्मांत विलीन होण्याची त्यास सहज इच्छा होते, व ती इच्छा झाल्यावर ऐक्याचा प्रयत्न करून जीवात्मा परमात्म्यांत लीन होतो. चैतन्याची खूण ती हीच असून ईश्वरप्राप्ति यालाच म्हणतात. हें प्रत्येक चैतन्य पूर्णचैतन्यांत सामावल्यावर सर्व दुःखाचा नाश होतो. दुःखाप्रमाणें सुखाचाही नाश होतो. कारण ती स्थितच्चि अशी आहे कीं, तेथें सुखाचाही संबंध राहत नाहीं, व दुःखाचाही विटाळ राहात नाहीं. तेथें अज्ञान उरत नाहीं, व ज्ञानही राहत नाहीं. त्या अवस्थेला ज्ञान व अज्ञान हें मुळींच नाहीं. तेव्हां जीवात्मा हा जर परमेश्वराचा अंशभूत आहे, तर तो परमेश्वरापासून निराळा आहे, असें कोणासही म्हणतां येणार नाहीं. जे कोणी परमात्मा व जीवात्मा यांत भेद मानितात, त्यांसच अज्ञानी म्हटलें पाहिजे. त्यांत भेद मानणें म्हणजे सूर्य व सूर्याचें पाण्यांत पडलेलें प्रतिबिंब हीं भिन्न आहेत असें म्हणण्यासारखें आहे. आकाश हें जसें सर्वत्र एकरूप असूनही ते घट–पट–मठ इत्यादि उपाधिभेदामुळें घटाकाश, मठाकाश, इत्यादि भेदयुक्त होतें, परंतु त्यांच घटादिकांचा नाश झाला असतां, जसें तें एक रूपच राहतें त्याचप्रमाणें जीवात्मा व परमात्मा यांची सांगड आहे. मायाबंधनें तोडिल्यावांचून जीवात्मा परमात्म्याशीं तादात्म्य पावत नाहीं. हीं मायाबंधनें तोडण्यासाठीं सत्पुरूष जो प्रयत्न करीत असतात, त्या प्रयत्नास जहद-जहल्लक्षणा असें म्हणतात. जीवात्म्याला जें भिन्नत्व आलें आहे तें मिथ्या भिन्नत्व असून मायोपाधीमुळें आलेलें आहे. ही मायोपाधी दूर झाली म्हणजे, परमशुद्ध, परमसत्य, व महाचैतन्य परब्रम्ह प्राप्त होतें. तत्पद म्हणजे ईश्वरब्रह्म व त्वंपद म्हणजे जीवब्रम्ह होय. या दोघांचें ऐक्य त्यास जीवेश्वरऐक्य असें जें म्हणतात, तें असिपदानें घडून येतें. तात्पर्य जीव व ब्रह्म भिन्न नसून एकच आहेत.”

## २. सुखदुःख विवेचन.

जीवब्रह्म व परब्रम्ह यांविषयीं वैशंपायनऋषींनीं सांगितलेलें विवेचन ऐकून जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला; “ वैशंपायनऋषि, आपण केलेल्या वि-

वेचनावरून मला जीवब्रह्म व परब्रह्म यांविषयीं चांगला बोध झाला; परंतु मला अशी शंका उत्पन्न झाली आहे कीं, जर सर्वांचे जीवात्मे एका परमात्म्याचे अंश आहेत, तर एक विद्वान व एक अविद्वान, एक सुखी तर एक दुःखी, असा भेद कां दृष्टीस पडतो, याचें कारण काय तें सांगावें; तेव्हां वैशंपायनऋषी म्हणाले; " हे राजा जनमेजया, या सर्वांचें कारण मायारूप उपाधि हें आहे. जीवात्मा हा जरी एक परमात्म्याचा अंश आहे, तरी सुखदुःखें व प्रकृति हीं पूर्वकर्मानें प्रत्येकास निरनिराळीं असतात. जशीं एकाच जातीचीं पण निरनिराळ्या वृक्षांचीं फळें एकसारखीं नसतात, त्यांच्या रंगांत, रूपांत व रुचींत जसा फरक असतो, तसें जरी बीज एक आहे, तरी प्रकृति व सुखदुःखें हीं भिन्न आहेत. आकाशांत सूर्य हा एकच आहे, परंतु उदकानें भरलेल्या पात्रांत त्या सूर्याचीं जीं प्रतिबिंबें पडतात तीं सर्व एकमेकांपासून भिन्न असतात. त्यास बिंबउपाधि असें म्हणतात. उदकांतील, बिंबें जशीं उदकाधीन असतात, उदक हाललें कीं बिंब हालतें, पण त्याचा परिणाम सूर्यावर होत नाहीं. त्याप्रमाणें बिंबवत असलेल्या जीवात्म्याच्या कोणत्याही कृतीचा परिणाम परमात्म्यावर होत नाहीं. जलांतील बिंबाचें ज्यावेळीं चलनवलन चालू असतें, त्याच वेळीं अन्य आरसा वगैरेंतील बिंबें कांहीं चलनवलन करीत नाहींत. कारण मूळ सूर्य स्थिर असतो, म्हणून तीं बिंबेंही स्थिर असतात. त्याप्रमाणेंच एका जीवाची कृति दुसऱ्या जीवात्म्याच्या कृतीप्रमाणें नसते. तेव्हां जें एकाचें सुखदुःख तेंच दुसऱ्याचें सुखदुःख असें असत नाहीं. असें असण्याचें मुख्य कारण त्या त्या जीवात्म्याचा कर्मभेद हें होय. बिंबाचें कोणात्याहि प्रकारचें चलनवलन झालें, तरी सूर्य जसा स्थिर असतो, त्याप्रमाणें जीवात्म्यानें उपाधिगुणानें कांहीं केलें, तरी त्याचा परिणाम परमात्म्यावर होत नाहीं. जेथें जेथें उदक असेल तेथें तेथें सूर्याचें बिंब जसें पडतें, त्याप्रमाणें अनंत देह, हीं परमात्म्याचीं प्रतिबिंबें आहेत. अर्थातच सर्व बिंबाची स्थिति जशी सारखी असत नाहीं, त्याप्रमाणें सर्व देहाची प्रकृतिसुखदुःखें हीं समान असत नाहींत. प्रतिबिंबाची भिन्न स्थिति असण्याचें कारण जसें उदक हें आहे, त्याप्रमाणें प्रत्येक प्राण्याची स्थिति निरनिराळी असण्याचें कारण माया व कर्म हें होय." सुखदुःखादि जे कर्मभोग आहेत ते लिंगदेहाला भोगावे लागतात. उपाधि हा लिंगदेहाचा धर्म आहे. जीं कर्में लिंगदेह आचरितो, तींच कर्में स्थूल शरीराला भोगावीं लागतात. त्या कर्माचें सुखदुःखादि जें फल तें जीवाला भोगावें लागतें. सर्वांचीं कर्में एकसारखीं नसल्यामुळें सर्वांचीं सुखदुःखें सारखीं नसणें साहजिक आहे. तसेंच जरी सर्व जीवात्मे परमात्म्याचे अंशभूत आहेत, तरी त्यांनां एकमेकांचें सुखदुःख जाणतां येत नाहीं. हा प्रकार एका प्रतिबिंबाला दुसऱ्या प्रतिबिंबाची स्थिति ज्याप्रमाणें ओळखितां येत नाहीं, त्याचप्रमाणें एका जीवाला दुसऱ्या जीवाची स्थिति जाणतां यावयाची नाहीं; परंतु चित्तांतःकरणाचा विषय-

विकार दूर झाल्यास ही दृष्टि प्राप्त होते; बुद्धीचा विकार लिंगदेहाला असून अभिमानाचा विकार स्थूल देहाला आहे. हें देहद्वैत, जागृतावस्था व स्वप्नावस्था याप्रमाणें आहे. शुद्धस्थितींत जशा या दोन्ही अवस्था नाहींशा होतात, त्याप्रमाणें, हा देहद्वैतभाव शुद्धस्वरूपीं विलीन झाल्यावर नाहींसा होतो. यास ज्ञानाची आवश्यकता आहे. अतीत, अनागत व वर्तमान असें हें प्रपंचज्ञान योगबळानें ज्या प्राण्यास प्राप्त होईल त्यास आपलें तारण करून घेतां येतें. इंद्रियसापेक्षज्ञान हें खरोखर ज्ञान नसून भ्रांति वाढविणारा तो एक प्रकार आहे. इंद्रियसापेक्षज्ञानानें हें ज्ञान कीं अज्ञान, असा भ्रम उत्पन्न होतो. आपण करितों हें चांगलें कीं वाईट, असा विचार उत्पन्न होणें, यास सापेक्षज्ञान म्हणतात. आत्म्याचे द्रष्टपणास या अशा ज्ञानाची मुळींच आवश्यकता नाहीं. तें द्रष्टपण, मन, चक्षु अथवा घ्राणाची वासशक्ति यांनीं जाणतां येणारें नसून तें केवळचैतन्य सतत श्रवण, मनन, निदिध्यास यांनीं जाणावें लागतें. या चैतन्यदृष्टीनें आत्म्याचें दर्शन झालें म्हणजे आत्मा जीवात्म्यास आपणांत सामावून घेतो. लोहचुंबकाजवळ लोखंडाचे कण आले असतां, लोहचुंबक जसे ते कण स्वतः हालचाल न करितां आपणाकडे ओढून घेतो, त्याप्रमाणें जीवात्म्याचा परमात्म्यांत समावेश होतो, त्यावेळीं परमात्मा कोणत्याहि प्रकारची हालचाल म्हणजे प्रयत्न करीत नाहीं. इंद्रियाचे चलनवलनास तरी हाच नियम लागू आहे. लोहचुंबक स्थिर राहून लोखंडाचे रजःकण मात्र त्याच्याजवळ जातात, त्याप्रमाणें इंद्रियाचे व्यापार चैतन्याच्या यदृच्छेनें होतात. इंद्रियें हीं स्वतंत्र नसून तीं आत्म्याच्या आधीन आहेत, तथापि जीवात्मा स्वतः त्यांच्या हालचालीविषयीं कांहींच करीत नाहीं. चैतन्य हें अहंता व ममतारहित आहे. कार्यकारण जाणणें हा प्रकृतीचा धर्म होय. आणि सुखदुःखादि भोगांचें कारण प्रकृति आहे. पूर्ण चैतन्य हें उपाधि वेगळें आहे, यामुळें तें सुखदुःखापासूनहि वेगळें आहे. हा मायाभास दूर झाला म्हणजे प्रत्येकजण स्वतःच परमात्मास्वरूप आहे. हा प्रपंचविस्तार प्रळयकाळीं जसा नाहींसा होतो, त्याप्रमाणें योगप्रलयानें सर्वांचा लय केला म्हणजे प्रत्येकजण परमात्मा होतो. अनेक प्रकारच्या उपाधि, मायापटल व कर्मबंधनें, हीं चैतन्यप्राप्तीला विघ्नरूप असून तीं मनुष्यास भलत्याच मार्गाला लावितात. त्यांच्या तावडींत मनुष्य सांपडला म्हणजे खरें चैतन्य त्यास दुर्मिळ होऊन तो ऐहिक सुखदुःखांतच गुरफटून जातो, आणि तीं सुखदुखें त्यास त्याच्या कर्माप्रमाणें निरनिराळीं प्राप्त होतात.

## ३. पंचप्रलय विवेचन.

वरील कथा ऐकिल्यावर जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; "ऋषि, आपण आतां प्रलयाविषयीं सांगत असतांना योगी योगबलानें सर्वांचा लय करितो असें सांगितलें, तर हे प्रलय किती प्रकारचे आहेत ते ऐकण्याची मला इच्छा उत्पन्न

झाली आहे, तर ही माझी इच्छा आपण पूर्ण करावी. तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले; " हे जनमेजया, एकंदर प्रलय पांच आहेत. दोन प्रलय पिंडाचे असून दोन प्रलय ब्रह्मांडांत आहेत, आणि पांचवा प्रलय मोक्ष हा होय. पिंडावस्थेंत जे दोन प्रळय आहेत, त्यांपैकीं सुषुप्तिकाळ हा एक प्रलय होय. हा प्रत्येक दिवशीं होतो, म्हणून यास दैनंदिन प्रलय असें म्हणतात. दुसऱ्या प्रलयाचें नांव महाप्रलय असें असून तो प्रलय म्हणजे मरणकाळ होय. याप्रमाणें हे प्रलय पिंडावस्थेंतले आहेत. आतां ब्रह्मांडाचे जे दोन प्रलय आहेत त्यां विषयीं सांगतों. चार युगें एकहजार वेळां गेलीं म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो. हा ब्रह्मदेवाचा एक दिवस झाला म्हणजे दैनिक प्रळय होतो. या प्रळयसमयीं त्रिभुवनांतल्या सर्व जीवजंतूंचा नाश होतो. हा प्रळय होण्याचे पूर्वीं आकाशांत बारा सूर्य उत्पन्न होतात. त्या बारा सूर्यांची भयंकर उष्णता एकत्र झाली म्हणजे जिकडेतिकडे अग्नि उत्पन्न होऊन सर्व भस्म होऊन जातें. नंतर पर्जन्यवृष्टि होते. ही पर्जन्यवृष्टि म्हणजे महामेघांपासून मुसळासारख्या धारा पडून सर्वच जलमय होऊन जातें. त्या भयंकर प्रळयांत तिन्ही लोक बुडून जातात. या प्रळयकाळीं स्थूळ देह नाहींसे होतात, परंतु लिंगदेह तसेच कायम राहतात. त्यावेळीं हे जीव कारणशरीरांत स्वकर्मानुरोधानें एकत्रित होतात. वस्तूपासून छाया ही जशी दूर होत नाहीं, त्या प्रमाणें जीव हे कारणशरीरापासून भिन्न होत नाहींत. असा हा ब्रह्मदेवाच्या दिवसाचा प्रलय झाला, म्हणजे माया दुःखाश्रु गाळिते. तेव्हां त्या अश्रूंत सर्व जीव समावतात. नंतर ब्रह्मदेव रात्रीची झोंप घेऊन प्रभात काळीं जागृत होतो. इतका काळ म्हणजे सहस्र युगें होत. ही सहस्रयुगांची रात्र गेल्यावर ब्रह्मदेव जागृत होतो व त्या प्रलयोदकाचें प्राशन करितो. मग ब्रम्हदेव पुन्हा सृष्टिरचनेला आरंभ करितो, व पूर्वीप्रमाणें सृष्टीचें सर्व कार्य अव्याहत सुरू होतें. यावेळीं जे जीव कारणशरीरांत असतात त्यांनां आपल्या कर्मानुरोधानें नवा देह प्राप्त होतो. हा जो प्रळय त्यास ब्रम्हप्रळय असें म्हणतात. चौथ्या प्रळयाचें नांव ब्रम्हांडप्रळय असें आहे. या प्रळयाचे वेळीं ब्रह्मा, विष्णु, महेश, यांसह सर्व ब्रह्मांडाचा नाश होतो. हा प्रळयकाळ सुरू झाला म्हणजे प्रथम शंभर वर्षेंपर्यंत पावसाचा एक थेंबही पडत नाहीं. आकाशांत बारा सूर्य उत्पन्न होऊन ते आपल्या भयंकर किरणांनीं सर्वत्र अग्निवर्षाव करीत असतात. त्यानंतर शंभर वर्षेंपर्यंत मुसळधार पाऊस पडत असतो. तेव्हां सर्वत्र पाणीच पाणी होतें, व त्यांत सर्व त्रिभुवनचा लय होऊन जातो. महाअग्नीनें हें त्रिभूवन अगोदरच जळून गेलेलें असतें, ती त्रिभुवनाची राख पर्जन्योदकांत विरून जाते; आणि अशा रीतीनें पंचभूतांपासून जेवढें म्हणून कांहीं उत्पन्न झालें असतें त्या सर्वांचा नाश होतो. नंतर आकाशमंडपांत उत्पन्न झालेले मेघ नाहींसे होऊन, लुप्त

झालेलें तेज पुन्हा प्रगट होतें, तेव्हां प्रलयोदकाचा नाश होतो. उदकाच्या नाशा-नंतर भयंकर वायु उत्पन्न होतो, त्यावायूनें पूर्ण तेज नाहींसें होतें. यावायूचा आकाशांत अंत होतो, आकाशाचा तमामध्यें लय होतो, तमाचा राजसाकडून नाश होतो, व राजसाला सत्व गिळून टाकितें. नंतर महासत्व उत्पन्न होऊन तें या सत्वाला त्याच्या शक्तीसहित गिळून टाकितें. याप्रमाणें या देवताचक्राचा नाश झाल्यावर, माया, महतत्वाचाही नाश करून टाकिते. पुढें या गुणशोधक मायेचाही महाद्वयाकडून नाश होतो. ही गुणस्वामिणी माया नाहींशी झाल्या-वर, तिच्या मागून ज्ञानक्रिया नाहींशी होते, व शक्तिचक्रही नाहींसें होतें. या प्रमाणें माया, ज्ञान, व शक्ति असें नाहींसें झाल्यावर सगुणस्वरूप प्रकृतीसहित नाहींसें होतें; मग फक्त निर्गुण ब्रह्म अवशिष्ट राहतें. या वेळीं पंचभूतात्मक जीव सगुणोदरांत आश्रय घेऊन राहिलेले असतात, ते आपल्या पूर्वोक्त कर्मा-नुसार ज्ञानसंपन्न होऊन आपली सुटका करून घेतात; परंतु ज्या जीवांनां तें ज्ञान प्राप्त करून घेण्याची शक्ति नसते, ते जन्ममृत्यूच्या येरझारा करण्यासाठीं तसेच अंतराळांत फिरत असतात. सगुणोदरांत जेव्हां जीव असतात, तेव्हां आत्म-ज्ञान होणें हें पूर्वोक्त कर्माधीन असतें. एवढ्यासाठीं प्रत्येकानें सत्कर्म करावें व असत्कर्माचा त्याग करावा,

असो, या प्रमाणें हे चार प्रळय आहेत. आतां पांचव्या प्रळयाविषयीं तुला सांगतो. पांचवा प्रळय म्हणजे मोक्ष होय. अज्ञानाचा नाश होऊन ज्ञानांत विलीन होणें यास मोक्षप्रळय असें म्हणतात. रस्त्यांत पडलेला दोरीचा तुकडा पाहून सर्पाचा भास होणें हें अज्ञान होय, आणि तो भ्रम दूर झाला असतां दोरीची ओळख होते, यास तात्विक ज्ञान असें म्हणतात. परमेश्वराचें स्वरूप जाणण्यास आपण असेंच भ्रांत झालेले आहोंत. ही भ्रांति विवेकानें नाहींशी होते. ही मायामयादि पृथ्वि प्रपंचानें वेष्टिलेली असल्यामुळें मनुष्य भ्रांतीच्या तडाख्यांत सहज सांपडतो, ही भ्रांति म्हणजे अज्ञानरूपी अंधःकार होय. या अंधारांत सांपडल्यावर मनुष्यास चांगला मार्ग कोणता व वाईट मार्ग कोणता, याचें ज्ञान राहत नाहीं. अंधारांतून योग्य मार्गानें जाण्यासाठीं विवेक दीपाची अत्यंत अवश्यकता असते. विवेकदीप नसला तरी आपण वाईट मार्गानें जावें, अशी कोणाची इच्छा नसते. प्रत्येकाचा प्रयत्न चांगल्यामार्गानें जावा असाच असतो, परंतु खरोखर चांगला मार्ग कोणता, हें विवेक दीपा-वांचून कळत नाहीं. हरणें, पाणी म्हणून जसे मृगजलाच्या मागें धांवत असतात, त्याप्रमाणें अविवेकी मनुष्य, चांगला म्हणून भलत्याच मार्गानें जातो, व शेंवटीं मृगाप्रमाणें फसतो. एवढ्यासाठीं तत्वांची अगोदर ओळख करून घेतली पाहिजे. गव्हांच्या पिठाची गाय, म्हैस, मृग, वाघ, हत्ती, वगैरे चित्रें तयार केल्यास तीं सर्व चित्रें निरनिराळीं आहेत हें आपण ओळखितों, परंतु तीं एकाच

कणिकेचीं केलेलीं आहेत, हें आपण विसरत नाहीं. त्याप्रमाणेंच हें जग विवर्तानें मिथ्यास्वरूप विस्तारिलेलें आहे. त्या महामायेचे जे शतशः खेळ चाललेले असतात ते विवेकानें ओळखून मुख्य तत्व जाणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. प्रपंचबंधनें तोडून टाकून आत्म्याचा ब्रह्मांत लय होणें त्यास मोक्ष असें म्हणतात व हाच मोक्षप्रळय होय. स्थूळ देहाचा नाश होणें म्हणजेच मोक्ष होय असें पुष्कळ समजतात; परंतु ती चूक आहे. कारण भयदायक अज्ञानाचा जोंपर्यंत नाश होत नाहीं, तोंपर्यंत लिंगदेह हा कायमच असतो. या देहाचा नाश होणें हें शुभाशुभ कर्मांवर अवलंबून आहे. एखाद्या चक्राची दोरी जशी त्या चक्राला फिरवीत असते, त्याप्रमाणें कर्मरूपीदोरी लिंगदेहाला फिरवीत असते. ज्या चौऱ्यायशी लक्ष योनी आहेत, त्या केवळ कर्मानुरोधानें प्राप्त होतात. जीवास आशा उत्पन्न होणें हें अविद्येचें लक्षण होय. अविद्या संसारांतील ऐहिक सुखाची चटक लावून चित्तांत विकार उत्पन्न करते, व नानायोनी भोगावयाला लाविते. सत्व, रज व तम यांचें चित्त हें एक द्वार आहे. या त्रिगुण मिश्रणानें चित्ताला जे विकार उत्पन्न होतात, त्या विकारांमुळ इंद्रियांस ते ते विकार उत्पन्न होऊन चलनवलनाचें स्फुरण प्राप्त होतें. सत्व, रज व तम यांच्या कमी अधिक मिश्रणानें चित्तास चांगलें अथवा वाईट कर्म करण्याची इच्छा उत्पन्न होते, व त्याप्रमाणें इंद्रियेंही व्यापार करितात. चित्तांत जे तीन गुण असतात, त्यांत सत्वाचें प्रमाण अधिक असल्यास हातून सत्कर्मं होतात, व ऐहिक व मानसिक सुख प्राप्त होतें. रजोगुणाचें आधिक्य असल्यास सुखदुःखादि समसमान असतें; व तमोगुणाचें आधिक्य असल्यास तो केवळ इहलोकचा नरक होतो. सारांश तामसी मनुष्यास इहलोक सोडल्यानंतर नरक प्राप्त होतो यांत नवल तें काय? ही महामहत्वदशा जीवाला भोगावी लागते. वस्त्र जीर्ण झालें असतां मनुष्य त्याचा जसा त्याग करितो, त्याप्रमाणें जीवात्मा देहाचा कंटाळा आला असतां, एका देहाचा त्याग करून दुसऱ्या देहांत प्रवेश करितो, याप्रमाणें ह्या मोक्षप्रलयाची माहिती संक्षेपानें तुला सांगितली आहे.

## ४. पंचावस्था विचार.

प्रळयासंबंधानें वरील माहिती ऐकल्यावर जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला, " ऋषि, जागृति, तुर्या, स्वप्न, सुषुप्ति व गतावृत्ती अशा ज्या पांच अवस्था आहेत त्यांतील तुर्या अवस्थेलाच उन्मनी अवस्था असें म्हणतात. तर या तुर्यावस्थेविषयीं मला कांहीं माहिती सांगावी. " तेव्हां ऋषि म्हणाले, हे राजा जनमेजया, स्वस्वरूपाचें पुनःपुनः चिंतन करणें हेंच महाकारण होय. या महाकरणांत तुर्यावस्था ही असते. ज्या तुर्यावस्थेमुळें जनकादिकासारखे पुरुष उद्धरून गेले, त्या तुर्यावस्थामध्यें परमसुखाशिवाय दुसरें कांहींएक नाहीं. या तुर्यावस्थेचें पूर्ण ज्ञान होणें अनुभवाशिवाय कठिण आहे. ही तुर्यावस्था

कशी ओळखावी हें तुला सांगतों, या विषयास स्थूल देहाची अत्यंत आवश्यकता आहे, म्हणून त्या स्थूल शरीराचाही विचार अवश्य केला पाहिजे. जेथें ज्ञान नाहीं, कंठ, नेत्र, हृदय वगैरे कर्मेंद्रियें ज्यास नाहींत, स्थूलभोग ज्याला नाहीं व सुपुप्तावस्था ज्यास नाहीं, तसेंच स्थूळदेह नाहीं, व लिंगदेहाचाही जेथें संभव नाहीं, तें गुणातीत म्हणजे सत्व, रज व तम या तिन्ही गुणांपासून निराळें आहे. त्याला कोणताही आकार नसल्यामुळें निर्विकार असें म्हणतात, व जें संकल्प विकल्परहित आहे; असें जें ब्रह्म तें जो ओळखितो त्यास तुर्यावस्था प्राप्त होते. जो ही तुर्यावस्था प्राप्त करून घेतो, त्यास परब्रह्मस्वरूपाचें दर्शन खात्रीनें होतें. कांहीं दिवसाच्या अभ्यासानें तुर्यावस्थेला जो पक्कपणा येतो त्यास उन्मनी-अवस्था असें म्हणतात. म्हणजे उन्मनी अवस्था ही तुर्येपासून निराळी नाहीं, तुर्याअवस्थेचाच अतिरेक होऊन जी अवस्था प्राप्त होते, त्यास उन्मनी असें म्हणतात. परब्रह्मस्वरूपाचा खरा आनंद या अवस्थेंत अधिक होतो. निंबोळीं नांवाचें फळ आरंभीं वाईट असतें, परंतु तेंच फळ पक्क झाल्यावर अत्यंत मधुर लागतें. त्याप्रमाणें तुर्याअवस्थेच्या आरंभीं ब्रह्मसुखाविषयींची बरोबर कल्पना होत नाहीं, परंतु अभ्यासानें उन्मनीअवस्था प्राप्त झाली म्हणजे ब्रह्मस्वरूपाची पूर्ण ओळख होते. तुर्या, शरीरमाया व प्रत्यगात्मा असे ओंकाराच्या अर्ध-मायेचे अंश आहेत. ब्रह्मरंध्र हें त्याचें स्थान असून तेथें आनंद, आभास व भोग यांच्याशीं तूर्या, शरीरमाया व प्रत्यगात्मा यांचें एकीकरण होतें. हें एकीकरण म्हणजे प्रणयाचा चौथा भाग होय. तादात्मक निर्गुण स्वरूप ज्याला म्हणतात, तें हेंच होय. ही अवस्था प्राप्त करून घेण्यास मायेचीही आवश्यकता आहे, परंतु तिचें गुणसाम्य असलें पाहिजे. तें गुणसाम्य नसल्यास तूर्या व सर्वज्ञाता या अवस्था प्राप्त व्हावयाच्या नाहींत. तसेंच महामाया नसली तर ह्या दोन अवस्था प्राप्त व्हावयाच्या नाहींत. या ज्या दोन अवस्था, त्या अवस्थांच्यामुळें ब्रम्हरंध्रीचा सुखानुभव मिळतो. योगी या ब्रह्मरंध्राला प्रणवाचा चौथा चरण असें म्हणतात. परमात्म्याचें सगुणस्वरूप म्हणजे प्रवणचरण होय. तेथें वर्णांचा विचार नसून ध्वनिमात्रानें व्यवहार होतो, म्हणून अर्धमात्रेचा विस्तार प्रणवाचा असून तो प्रणवाला शोभतो, असें योगी म्हणतात.

ब्रह्मरंध्रांत नादब्रह्माचा वास असून तेथें मायेचा संपर्क मुळींच नाहीं. ब्रह्म-रंध्र हें केवळ ज्ञानसत्तेचें केंद्र स्थान आहे. कारण व कार्य हा प्रापंचिक भिन्न-भाव तेथें मुळींच नाहीं. परंतु हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ब्रह्मसत्तेवांचून प्रपंचकारणाची वृद्धि होत नाहीं. ही वृद्धि झाल्यावांचून सूक्ष्म प्रपंचाचाही विस्तार होत नाहीं. जसा सूक्ष्मप्रपंच असेल तसाच स्थूळप्रपंच असतो. म्हणून कार्यकारणसंबंध सत्य आहे, हें जाणिलें पाहिजे. जन्म, जरा व मृत्यु या तीन अवस्था स्थूल शरिराला आहेत, लिंगदेहाला यांचा मुळींच संपर्क नाहीं.

हा लिंगदेहाचा गाभारा अभंग असा आहे; परंतु ज्ञानी पुरुषाला त्या लिंगदेहाचाही नाश व्हावा असें वाटतें व ते आत्मज्ञानाची प्राप्ती करून घेऊन त्या लिंगदेहाचा भंग करितात. प्रत्येक मनुष्याचें आत्मज्ञान हें ध्येय असून जे ही गोष्ट जाणतात ते या अंगुष्ठपूर्णप्रमाण लिंगदेहाचा आत्मज्ञानानें नाश करितात व स्थूल शरीराचें सार्थक करितात. हें आत्मज्ञान गुरुमुखावांचून प्राप्त होणारें नाहीं; एवढ्यासाठीं योग्य गुरूला प्रसन्न करून त्याच्याकडून हें आत्मज्ञान प्राप्त करून घ्यावें, म्हणजे विश्वव्याप्त जें परब्रह्म, त्या परब्रह्मस्वरूपाची ओळख होते. या आत्मज्ञानानें पूर्ण चैतन्याचीं पक्क चिन्हें दिसूं लागलीं म्हणजे लिंगदेहाचा सहाजिक तिटकारा उत्पन्न होतो, व त्या लिंगशरीराचा केव्हां लय होईल असें वाटूं लागतें. तोंच एकसारखा निदिध्यास लागतो व आत्मज्ञान प्राप्तीचा प्रयत्न सारखा चालू असतोच. मग कांहीं दिवसांनीं पिकलेलें फळ जसें देंठांपासून निसटून खालीं पडतें, किंवा सूर्योदय झाला म्हणजे असा अंधकाराचा नाश होतो; त्याप्रमाणें पूर्ण आत्मज्ञान झालें म्हणजे लिंगदेहाचा सहज नाश होतो. या ज्ञानाचा मुख्य मार्ग तुर्या किंवा उन्मनी अवस्था होय. तें ज्ञान मुमुक्षूनें सद्गुरूजवळून प्राप्त करून घ्यावें, व मोक्षाची प्राप्ति करून घ्यावी! म्हणून जन्माचें सार्थक तें हेंच असून ज्या ईश्वराच्या दयेनें हा नरदेह प्राप्त झाला तो त्याच्या प्राप्तीसाठीं झिजविणें म्हणजे त्याचा विनियोग करणें, हें प्रत्येकाचें कर्तव्य होय."

## ५ योगविवेचन.

नंतर जनमेजय राजा वैशंपानय ऋषीला म्हणाला; "वैशंपायन ऋषि आपण जसें उन्मनीविषयीं सांगून माझ्या मनाचें समाधान केलें, त्याप्रमाणेंच योगाविषयीं कांहीं सांगाल तर मजवर उपकार होतील." तेव्हां वैशंपायन ऋषि राजाला योगाविषयीं सांगूं लागले. ते म्हणाले; "हे राजा जनमेजया, परब्रह्मस्वरूपीं विलीन होण्याचा जो मार्ग त्यास योगमार्ग असें म्हणतात. मार्कंडेयपुराणांत या विषयीं जें विवेचन केलें आहे, तें मी तुला संक्षेपानें सांगतों. प्रथम या योगमार्गांत शुचिर्भूत होऊन पद्मासन घालून बसावें लागतें. नंतर नासिकाग्रावर एकाग्र दृष्टि लावून सर्वचित्तशक्ति उन्मनीकडे लावावी. इडा व या पिंगळा नाड्यांतील वायु आवरून धरून तो आदिमुळाशीं आणावा. तेथें त्या वाऱ्याचा रोध होईल व तो सूक्ष्मशरीरांत प्रवेश करील. मग त्या वाऱ्यानें षटचक्रें आपोआप भरून जातील. शटचक्रें भरल्यानंतर कुंडलिनी नावाची नाडी जागृत होऊन ती ऊर्ध्व मुख होईल. तेथें बहात्तरीचा जप केला पाहिजे. नाहींतर ऊर्ध्व मुख झालेली सर्पिणी नाडी भ्रमण करील. बहात्तरीचा जप केला म्हणजे एकवीस स्वर्ग भिजून जातील. नंतर तेथें पवनाचा विस्तार होऊन त्यांत पन्नासही मात्रा बुडून जातील. मग तेथून अग्निचक्रांत प्रवेश होऊन चक्राच्या उपकंठ भागावर येतां येते. तें स्थान म्हणजे अनुहात सरणीच्या रहाटी असलेल्या जगन्नियंत्याचें स्थान होय. त्या स्थानाच

सुख फक्त योग्यांनांच माहीत असतें. तेथें ध्यान नसून कार्यही नसतें; तेथें चंद्र नसतो व सूर्यही नसतो, तारे नसतात व अंधारही नसतो. तर सर्व सुखाचें आगर असें स्वयंप्रभ जोतिरत्न तेथें असतें. तें डोळ्यांवांचून दिसतें. तेथें अनुहात ध्वनीची गर्जना होत असते. शंख, भेरी, नौबदी, वीणे व मृदंग इत्यादि वाद्यें तेथें वाजत असतात. तेथें जी ज्योति असते तिचें तेज सूर्यापेक्षांही उज्वल असतें. तें केव्हांही कमी अधिक होत नसल्यामुळें तेथें दिवस व रात्र हा भेद मुळींच नाहीं. जेथें कामधेनूच्या क्षिरीचें भोजन व अमृताचें पान मिळतें, अशा स्थलीं तो महासिद्ध बसलेला असतो. ज्याच्या दृष्टीस ही आदिमूर्ति पडते, त्याच्या लिंगदेहाचा सहज नाश होतो. ही परब्रह्मज्योति फक्त ज्ञानदीपानें दिसते, तो दीप प्रज्वलित करण्यास योग्य गुरूची कृपा संपादन केली पाहिजे. साधनें हीं चार प्रकारचीं आहेत. प्रत्येक साधनांत फलाशा ही आहेच. प्रथम साधनाला पिपिलिका मार्गसाधन असें म्हणतात. दुसरा मार्ग आकाशांत पक्षांप्रमाणें फळासाठीं उडण्यासारखा आहे. वानर फळांसाठीं उडी मारतो, त्याप्रमाणें हा तिसरा मार्ग आहे, व वृक्षातलीं बसणें हा चौथा मार्ग होय. कोणताही मार्ग असला तरी फलप्राप्ति हें मुख्य ध्येय आहे. या ध्येयासाठीं खेचरी मुद्रेनें शून्यांतरी दृष्टि लाविली असतां धूर्जटीचें दर्शन होतें. त्या वेळीं सर्व किल्मिष नाहींसें होऊन कर्माचें मूळ कापलें जातें, व ज्ञान हेंच रणक्षेत्र वाटून वैराग्य हेंच शूरत्व आंगीं बाणलें जातें. त्रिविध कर्माचा लोप होऊन सर्व यातायातीपासून सुटका होते. काष्ठ हें अग्नींत पडलें असतां तें जसें अग्निरूप होतें, त्याप्रमाणें परब्रह्मस्वरूपाचें दर्शन झाल्यावर जीवब्रह्महि परब्रह्मच होतें, हिला सायुज्यमुक्ति असें म्हणतात. राजा जनमेजया, या विषयासंबंधानें किती ही सांगितलें तरी तें थोडें असून कळण्यासही फार कठीण आहे. तें गुरुमुखानेंच समजून घेतलें पाहिजे."

## ६. निर्गुण सायुज्यमुक्ति.

वरील विवेचन ऐकिल्यावर जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; "ऋषिमहाराज, मुक्ति ह्या चार प्रकारच्या आहेत असें मीं ऐकिलें आहे. त्यांत निर्गुण सायुज्यतेची प्राप्ती कशी होते, हें आपणाकडून ऐकावें अशी माझी इच्छा आहे. तर त्याविषयीं आपण मला कृपा करून सांगावें." तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले; "हे राजा जनमेजया, सलोकता, समीपता, स्वरूपता, व सायुज्यता अशा चार मुक्ति आहेत. या चार मुक्ति, मायानिर्मित असल्यामुळें त्या प्राप्त झाल्या असतांही जीवब्रह्माच्या येरझारा चुकत नाहींत. जसें जयविजय सारूप्यमुक्ति पावले असतांही विष्णुलोकाला मुकून जन्ममृत्यूच्या तडाख्यांत सांपडले, त्याप्रमाणें प्रत्येक प्राणी या चार मुक्तींनीं मुक्त झालेला जन्ममृत्युच्या चक्रांत पुन्हा सांपडतो. ज्यांचा विस्तार मायेमध्यें होतो, व ते महा-

प्रळयांत नाहींसे होतात. ही अवस्था चारी मुक्तींतील जीवांना लागू आहे. परंतु पांचवी मुक्ति जी निर्गुण सायुज्यता, त्यांतील जीवात्मे कोणत्याही प्रळयकाळीं जन्ममृत्यूच्या चक्रांत सांपडत नाहींत. कारण ते परमात्म्यांत विलीन झालेले असतात. अग्नि ज्या प्रमाणें काष्टतृणाचा नाश करून टाकितो, त्याप्रमाणें ब्रह्मविद्या व ज्ञानाग्नि, देहत्रय जाळून टाकून जीवात्म्याला परमात्मस्वरूपी संलग्न करितात. ज्ञानवडवानळानें देहत्रय जळून दग्धपटन्यायानें खोटें स्वरूप मात्र दिसतें, प्रारब्धकर्मांचा नाश झाल्यावर, देहधर्म मात्र राहतात. परंतु स्थूल देहाचा नाश झाल्यावर जन्म व मृत्यु यांपासून प्राणि कायमचा सुटतो. ब्रह्म-प्राप्ति झाली तरी इंद्रियाचे विकार कायम असतात, परंतु ते शुष्क असतात. ब्रह्मवेत्ते जरी संसारांत असले तरी ते संसारलिप्त असत नाहींत. ब्रह्मविद्या ही अग्निकणाप्रमाणें आहे. अग्नीचा कण बारीक जरी असला तरी तृण जाळून टाकितो, त्याप्रमाणें ब्रह्मविद्या प्राप्त झाल्यावर ती सर्व कर्मे व देहत्रय यांचा नाश करून जीवब्रह्म व परब्रह्म यांची सांगड घालून देते. परब्रह्मस्वरूपीं जीव विलीन झाला, म्हणजे जन्ममृत्यूच्या तापत्रयांतून त्याची आपोआप सुटका होते. या सुटकेला निर्गुणपूज्यमुक्ति असें म्हणतात."

---

# अध्याय १३ वा.

## १. भद्रा व सहदेव यांचें युद्ध.

ही कथा ऐकल्यावर जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; "वैशंपायन ऋषि, चंद्र हा अमावास्येला नाहींसा कां होतो, व पौर्णिमेला पूर्ण कां दिसतो, तसेंच त्याची उत्पत्ति कशी झाली आहे, हें ऐकण्याची मला इच्छा झाली आहे, तर ही माझी इच्छा आपण पूर्ण करावी." तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले; "हे राजा जनमेजया, चंद्र हा कश्यप ऋषीचा पुत्र होय. या चंद्राच्या आंगीं अमृत उत्पन्न करण्याची विलक्षण शक्ति आहे. हें सामर्थ्य त्यास ब्राह्मणांच्या अग्निहोत्रामुळें प्राप्त झालेलें असतें. अग्निहोत्राचा सर्व सत्वांश चंद्राला प्राप्त होतो, व त्यापासून अमृत बनतें. चंद्राच्या कला सोळा असून त्याचा विस्तार फार मोठा आहे. असें सांगतात कीं, चंद्र हा अठ्याऐशीं हजार योजनें-विस्तीर्ण आहे. चंद्राच्या सोळा कला पैकीं, त्यानें चौदा कला अन्यदेवतांनां विभागून दिल्या आहेत. त्या कला देवता क्रमानें जेव्हां विभागून घेतात तेव्हां चंद्राला क्षय होतो; व तो हळूं हळूं क्षय पाऊन अमावास्येला नाहींसा होतो. व त्या कला जसजशा पुन्हा प्राप्त होतात, तसतसा तो वाढत जाऊन पौर्णिमेला पूर्ण होतो. हे राजा जनमेजया, ज्या ज्या देवतांनां ह्या कला मिळाल्या आहेत त्यांविषयीं तुला सांगतों.

प्रतिपदेची कला ही अग्नीला दिलेली आहे. द्वितीयेची सूर्याला दिलेली असून तृतीयेची विश्वेदेवाला दिलेली आहे. सलीलपति जो वरुण, त्याला चतुर्थीची कला मिळालेली असून, इंद्राला पंचमी तिथीची कला प्राप्त झालेली आहे. तसेंच वासुदेवाला षष्ठीची, मुखमोद्वेतीला सप्तमीची आणि अष्टमीची कला अजैकपालाला, म्हणजे पूर्वाभाद्रपदाचा जो देव त्याला विभागून दिलेली आहे. नवमीची कला यमधर्माला, दशमीची कला वायुला, एकादशीची कला विष्णूला, द्वादशीची कला पितरांनां, त्रयोदशीची कला कुबेराला, चतुर्दशीची कला महादेवाला, आणि पौर्णिमेची कला षोडशीकलेसह स्वतः चंद्रानें आपणाला ठेविली आहे. अमावास्येचा स्वीकार ब्रह्मदेवानें केला आहे. त्याप्रमाणें या षोडशकला असून त्या निरनिराळ्या देवतांनीं विभागून घेतल्या आहेत. अमावास्येच्या दिवशीं सर्व कळा ब्रह्मदेव शोषून घेतो, त्यामुळें चंद्र निस्तेज होतो, व पौर्णिमेच्या दिवशीं त्यास सर्व कळा प्राप्त झाल्यामुळें तो पूर्ण प्रकाशित होतो. अमावास्येच्या दिवशीं ब्रह्मदेवानें सर्व कळा शोषून घेतल्या म्हणजे सूर्य, जल, वनस्पति, मृत्तिका व वायु अशा पांचजणांची तृप्ति होते. अमावास्या ही तिथि विशेष अशुभ व अनिष्टकारक असल्यामुळें या तिथीला कोणत्याही कार्याचा आरंभ करूं नये. तसें करण्यानें अपयश येतें; अशीं उदाहरणें आहेत. याविषयीं तुला श्रीकृष्णाची एक गोष्ट सांगतों.

एकदां पांडवांचे घरीं पंडूराजाचें श्राद्ध होतें. श्राद्ध–तिथि अमावास्येची होती. श्रीकृष्णाचा व पांडवांचा फार लोभ असल्यामुळें, श्राद्धासाटीं श्रीकृष्णाला बोलवावें असें धर्माला वाटलें, व त्यानें सहदेवाला श्रीकृष्णाला आणण्यासाठीं द्वारकेस पाठविलें. धर्माची आज्ञा होतांच सहदेव वारुणावतीहून निघाला व द्वारकेच्या मार्गाला लागला. त्या दिवशीं अमावास्या आहे हें सहदेवाच्या मुळींच लक्षांत नव्हतें; परंतु वाटेनें एकेक विघ्न येऊं लागल्यामुळें, ती गोष्ट त्याच्या लक्षांत आली. तो कांहींसा मार्ग क्रमून पुढें जात आहे, तोंच वाटेंत त्याला एक म्हातारी भेटली. ती म्हातारी दुसरी कोणी नसून स्वतः अमावास्याच म्हातारीच्या रूपानें बसली होती. त्या म्हातारीनें सहदेवाला जवळ बोलावून प्रेमळपणें म्हटलें; “ बाळ, मीं फार म्हातारी झाल्यामुळें जागचें हालवत नाहीं, करितां मला तूं आपल्या रथांत बसीव आणि द्वारकेला घेऊन चल.” म्हातारीचें बोलणें ऐकून सहदेवाला तिची दया आली व तो तिला उचलूं लागला, परंतु ती क्षीण झालेली वृद्धा, त्याला मुळींच हालेना. तो प्रकार पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें, व ही यःकश्चित् वृद्धा आपणास कां उचलत नाहीं, याचा तो विचार करूं लागला. परंतु त्याला त्याचें कारण कळेना. मग सहदेवानें आपला सारथी व बरोबर असलेले सेवक यांनां मदतीला घेऊन त्या म्हातारीला उचलण्याचा प्रयत्न केला; परंतु ती म्हातारी जमिनीपासून एक बोटभरही वर

उचलेना. तेव्हां हा कांहीं तरी मायावी प्रकार आहे असें त्या सर्वांनीं जाणलें. सहदेव आपणास उचलीत नाहीं असें जाणून ती म्हातारी त्याच्यावर रागावली, व तिनें सहदेवाच्या मस्तकावर एक चापट मारली. तेव्हां सहदेवाला त्या म्हातारीचा फार राग आला व त्यानेंही तिच्या मस्तकावर जोरानें ठोंसा मारला. त्याबरोबर त्या वृद्ध स्त्रीचें मस्तक फुटून त्यांतून रक्त वाहूं लागलें. तो प्रकार पाहून सहदेवाला फार वाईट वाटूं लागलें, पण इतक्यांत पाहतों तों, त्या रक्तापासून विशाल शरीराचे शेंकडों भयंकर यक्ष उत्पन्न झाले, व ते सहदेवाच्या अंगावर धावून आले ! तेव्हां मात्र सहदेवाला फारच आश्चर्य वाटलें; पण तो खरा वीर असल्यामुळें न डगमगतां त्या यक्षांबरोबर युद्ध करूं लागला. परंतु त्या यक्षांच्या शरीरांपासून नाना प्रकारच्या भयंकर स्त्रिया उत्पन्न झाल्या. त्या स्त्रिया शरीरानें विशाल व रूपानें विक्राळ होत्या. उत्पन्न होतांच आपलीं भयंकर मुखें पसरून त्या सहदेवाच्या अंगावर धांवून आल्या. त्यांच्या हांतून निसटण्याचा सहदेवानें पुष्कळ प्रयत्न केला, पण त्या मायावी स्त्रियांपुढें सहदेवाचें कांहीं न चालतां तो त्यांच्या तावडींत सांपडला. त्यांनीं सहदेवाला बांधून ठेविलें. हा प्रकार पाहतांच सेवकांनीं वारुणावतीस जाऊन घडलेली सर्व हकीकत धर्माला सांगितली. धर्मानें भीमाला बोलावून त्यास सहदेवाला सोडवून आणण्यासाठीं पाठविलें. धर्माच्या आज्ञेप्रमाणें भीमानें तेथें जाऊन त्या मायावी स्त्रियांचा संहार केला व सहदेवाची सुटका केली. नंतर त्या स्त्रियांची मुख्य नायिका जी अमावास्या, तिजपुढें जाऊन भीमानें तिचे केश धरले. भीमाच्या केशाकर्षानें अमावस्या फार व्याकुळ होऊन म्हणाली, "हे वृकोदरा ! माझा असा छळ करूं नकोस ! मी भद्रा आहे, तुझा पराक्रम पाहून मीं प्रसन्न झालें आहें. तर तुझी जी इच्छा असेल तें माग; मी तें मोठ्या संतोषानें देत्यें." भीम म्हणाला, "हे भद्रे ! तूं वर देण्यास जर तयार झाली आहेस, तर आम्हां पांडवांना जेव्हां कांहीं संकट पडेल तेव्हां तूं त्याचें निवारण कर." भीमाचें मागणें भद्रेनें 'तथास्तु' म्हणून आनंदानें मान्य केलें, व ती अदृश्य झाली.

असो, अशा रीतीनें भद्रेचा पराभव करून भीम वारुणावतीला परत आला, व सहदेव श्रीकृष्णाला आणण्यासाठीं द्वारकेला गेला. द्वारकेंत आल्यावर श्रीकृष्णाला वंदन करून सहदेवानें त्यास धर्माचा निरोप कळविला. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, "सहदेवा, बलराम वडील बंधु आहेत, मी त्यांच्या आधीन आहें, ते जर जाण्यास परवानगी देतील, तर मी मोठया आनंदानें येईन. कृष्णाच्या इच्छेप्रमाणें सहदेव बलरामाकडे गेला व त्यानें त्यास धर्माचा निरोप कळवून श्राद्धासाठीं कृष्णाला पाठवावें म्हणून विनंति केली. तेव्हां बलरामानें ती गोष्ट कृष्णाच्याच मर्जीवर ठेविली. पुनः सहदेव कृष्णाकडे आला; तेव्हां कृष्णानें वसुदेवाकडे बोट दाखविलें. सहदेवानें वसुदेवाला विचारल्यावर वसु-

देवानें बलरामाकडे बोट दाखविलें. सहदेवानें जेव्हां बलरामाला विचारिलें तेव्हां त्यानें कृष्णावर लोटलें. याप्रमाणें एकमेकांच्या टोलवाटोलवीनें सहदेवाला फार राग आला, व त्यानें कृष्णाला बळेंच नेण्याचा विचार केला; आणि कृष्णाचा हात धरून तो त्याला ओढूं लागला. तेव्हां कृष्णाला अत्यंत राग आला व त्यानें सहदेवाच्या मस्तकावर प्रहार केला. त्या आघातानें सहदेवही रागावला, व त्यानें आपलें खड्ग कृष्णास मारिलें. तेव्हां कृष्णानें आपलें सुदर्शनचक्र सोडिलें. त्या सुदर्शनचक्राच्या प्रहारानें सहदेवाच्या शरीरापासून जे रक्तबिंदू बाहेर पडले, त्यांच्यापासून असंख्य सहदेव उत्पन्न झाले. याप्रमाणें उत्पन्न झालेल्या सहदेवांनीं सर्व द्वारका व्याप्त करून टाकिली. श्रीकृष्णानीं पुष्कळ खटपट केली, परंतु चोहोंकडे पसरलेले सहदेव कमी होईनात. शेवटीं श्रीकृष्ण सहदेवाच्या हातीं सांपडले. सहदेवानें श्रीकृष्णाला तेथून उचलून आपल्या रथांत बसविलें व रथ वारुणावतीच्या रस्त्यानें हांकिला. सहदेवाचा कार्यभाग होतांच ते उत्पन्न झालेले सहदेव नाहींसे झाले.

असो; हा एवढा सारा प्रकार अमावास्येमुळें झाला; हे राजा जनमेजया! एवढ्यासाठीं अमावास्येच्या दिवशीं कोणत्याही महत्कार्याला आरंभ करूं नये. सत्राजिताचा स्यमंतकमणि चोरल्याचा आळ अमावस्येमुळेंच कृष्णावर आला होता. तसेंच श्रावण आपल्या आईबापांना कावडींत बसवून काशीयात्रेला अमावास्येचेच दिवशीं निघाल्यामुळें त्याला ती यात्रा सफल न होता त्याचा अयोध्येस दशरथाकडून नाश झाला. त्याप्रमाणेंच इंद्रद्युम्न व दंडकराजा यांनीं अमावास्येचे दिवशीं कांहीं कार्याला आरंभ केल्यामुळें त्यांचें कार्य न होतां त्यांना शाप मिळून अनर्थ मात्र ओढवला. असो, याप्रमाणें या अमावास्येस कार्यास आरंभ केल्यामुळें अपयश आल्याचीं उदाहरणें पुष्कळ देतां येतील. अशी अशुभ ही तिथि आहे! अमावास्येचे दिवशीं सुरापान करणें हें गोरक्तप्राशन करण्यासारखें आहे. शिवाय सुरापान करणारास ब्रह्महत्येचें पातक लागतें. तसेंच अमावास्येला स्त्रीसंग करूं नये. कारण त्यापासून पूर्वजांना कोटी वर्षे नरक प्राप्त होतो. त्या दिवशीं असत्य भाषण करूं नये, शुचिर्भूत राहावें, व कथाकीर्तनांत वेळ घालवावा; म्हणजे सर्व पातकांचा नाश होतो. असो, याप्रमाणें ही चंद्राची व अमावास्येची कथा आहे. ब्रह्मपुराणाच्या मतें चंद्राची उत्पत्ति अत्रिऋषीच्या डोळ्यापासून झाली आहे. कित्येक पुराणांच्या मतें चंद्राची उत्पत्ति समुद्रापासून झालेली आहे. तो चौदा रत्नांपैकीं एक असून, समुद्रमंथनाचे वेळीं देवांना प्राप्त झालेला आहे."

---

# अध्याय १४ वा.

## दशरथ व कौसल्या यांचा विवाह.

वरील कथा ऐकल्यावर, जनमेजयराजा म्हणाला, "वैशंपायनऋषिमहाराज, दशरथराजा व कौसल्या यांचा समुद्रांत विवाह झाला; असें मीं ऐकिलें आहे, तर असें होण्याचें कारण काय, तें सांगावें." तेव्हां वैशंपायनऋषि, ती कथा सांगूं लागले. ते म्हणाले; "पूर्वी एकदां नारद रावणाला भेटण्याकरितां सहज लंकेमध्यें गेले होते. नारद आलेले पाहून रावणानें नारदाचा मोठा आदरसत्कार केला, व त्याला आपलें सर्व वैभव दाखविलें. संपूर्ण देव, दानव, मानव, दिक्पाळ, लोकपाळ व चंद्रसूर्य यांनां ज्या बंदिशाळेंत ठेविलें होतें, त्या बंदिशाळा नारदाला दाखवून रावण अभिमानानें म्हणाला; "नारदा; आतां मला मारणारा या त्रिजगतांत कोण वीर उरला आहे ?" रावणाची गर्वोक्ति ऐकून नारदाला हंसूं आलें. तो रावणाला म्हणाला; "रावणा; सर्व देव तुझ्या बंदिशाळेंत आहेत. राक्षसांना व पृथ्वीवरील सर्व भूपाळांनांही तूं जिंकिलें आहेस; परंतु इतकें करण्यानेंही तुला मृत्यु येणार नाहीं असें मात्र समजूं नकोस. यांच्यापैकींच एखाद्याकडून तुझा नाश होईल. कारण मृत्यु सर्वांना असून तो चुकविण्यास कोणीही समर्थ नाहीं. नारदाचें भाषण ऐकून रावण फार विस्मित झाला. तो म्हणाला; "नारदा, यावरून तुला माझ्या मरणाविषयीं कांहीं माहिती आहे, असें दिसतें. तर माझें मरण कोणापासून आहे, तें मला सांग." नारद म्हणाला; "रावणा, सूर्यवंशांत उत्पन्न झालेल्या दशरथराजाच्या कौसल्येपासून उत्पन्न होणारा पुत्र जो प्रभु श्रीरामचंद्र, त्याच्या हातानें तुझा मृत्यु आहे." नारदानें केलेल्या ह्या भविष्याबद्दल रावणाला चुटपुट लागली; तो सत्यलोकीं ब्रह्मदेवाकडे गेला व त्यास नारदानें सांगितलेलें भविष्य कळविलें. तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला; "रावणा, नारदानें सांगितलेली गोष्ट खरी आहे. तूं ज्या दशरथाविषयीं म्हणतोस तो दशरथ अयोध्येचा राजा 'अज' याचा मुलगा आहे. तसेंच कौसल्या ही कौसलदेशाच्या राजाची मुलगी आहे; व या दोघांचा विवाह आजपासून तिसऱ्या दिवशीं होणार आहे." याप्रमाणें ब्रह्मदेवानें सांगितल्यावर रावण सत्यलोकाहून निघून लंकेंत आला, व त्यानें आपलें सैन्य पाठवून कौसल्येला पकडून आणविलें. तिला मारून टाकावें असें प्रथम रावणाला वाटलें, परंतु आपण आपल्या हातानें स्त्रीहत्या करणें बरें नाहीं, असें वाटून त्यानें एक मोठी पेटी तयार करविली, त्या पेटींत कौसल्येला ठेवलें; आणि पुष्कळ दिवस पुरेल इतकी खाद्यपेयादि सामुग्री घालून ती पेटी बंद करून समुद्रांत फेंकून दिली. इकडे ती पेटी एका मोठ्या माशाला सांपडली. तो मासा ती पेटी आपल्या

दाढेंत धरून नेऊं लागला असतां, त्याची व दुसऱ्या एका माशाची गांठ पडली. त्या माशाला तें भक्ष्य आपणास मिळावें, अशी इच्छा उत्पन्न झाली, व तो त्याजपासून ती हिसकूं लागला. तेव्हां पहिला मासा म्हणाला; "गड्या, आपण दोघे अशा रीतीनें भक्ष्याची ओढाताण करूं लागलों तर तें आपणांस न मिळतां तिसऱ्यालाच प्राप्त होईल. एवढ्यासाठीं, ही वस्तु आपण एखाद्या सुरक्षित ठिकाणीं नेवून ठेवूं, व नंतर युद्ध करूं. युद्धांत ज्याचा जय होईल त्यानें हें भक्ष्य घ्यावें." हें म्हणणें दुसऱ्या माशाला पसंत पडलें, व दोघांनीं ती पेटी समुद्रांत जवळच एक लहानसें बेट होतें त्यावर नेऊन ठेविली, आणि त्यांनीं युद्धास आरंभ केला. इकडे राजा दशरथ, ठरलेल्या तिथीला कोसलदेशीं जाऊन पोंचले पाहिजे म्हणून खुषकीच्या मार्गानें जाण्याचा विचार रहित करून समुद्रमार्गानें मोठमोठालीं जहाजें तयार करून अतेष्ट व सैन्य यांसह वेगानें निघाला. हें वर्तमान रावणाला लंकेंत समजतांच तो स्वतः विमानांत बसून तेथें आला, व दशरथाच्या जहाजावर आकाशांतून शस्त्रवृष्टि करून त्यानें दशरथाचीं जहाजें क्षणार्धांत फोडून पाण्यांत बुडविली व निश्चित चित्तानें लंकेला परत गेला.

पाण्यांत पडल्यानंतर दशरथाचे हाताला एक फळी लागली. त्या फळीच्या आधारानें वाहत वाहत तो, माशानें कौसल्येची पेटी ठेविली होती, त्याच बेटावर आला. त्या लहानशा बेटावर कोणी मनुष्य भेटेल या आशेनें तो इकडे तिकडे फिरत असतां त्याची नजर तेथें असलेल्या पेटीकडे गेली. अशा निर्जन स्थळीं पेटी पाहून राजाला फार आश्चर्य वाटलें. पेटीजवळ येऊन त्यानें ती पेटी निरखून पाहिली. तो ती बंद केली आहे, असें दिसून आलें. दशरथानें त्या पेटीस स्पर्श करितांच तिचें कुलूप आपोआप तुटून पडलें; व आंत एक सुंदर स्त्री बसलेली असून, अनेक प्रकारची खाद्यपेयादि सामग्री ठेविली आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. तो प्रकार पाहून दशरथ राजा विस्मित झाला, व त्या स्त्रीकडे साशंक दृष्टीनें पाहूं लागला. कौसल्येचीहि तशीच चमत्कारिक अवस्था झाली. दशरथ राजाला पाहतांच ती उठून उभी राहिली व भीतियुक्त दृष्टीनें पाहूं लागली. दशरथराजा तिला म्हणाला; "हे सुंदरी, तूं कोण आहेस, आणि अशा या निर्जन बेटामध्यें तुला कोणीं आणून ठेविलें ?" ती म्हणाली; महाराज आपण कोण हें कळल्यावांचून मला माझी हकीकत सांगण्यास धीर होत नाहीं. याकरितां आपण कोण आहांत, या निर्जनबेटावर समुद्रांत येण्याचें कारण काय, हें कृपा करून आपण प्रथम कथन करावें, नंतर मी माझी हकीकत आपणास कथन करीन. तेव्हां दशरथराजा म्हणाला; "सुंदरी, तुला माझी भीति वाटत असल्यामुळें तूं आपली हकीकत सांगत नाहींस असें मला वाटतें, पण मजपासून तुझें काडीइतकें देखील अनिष्ट व्हावयाचें नाहीं. तूं निर्भयपणें आपली सर्व हकी-

कत मला सांग, म्हणजे या अशा संकटावस्थेंत तुला मी शक्य तितकें साह्य करीन.’’ राजाचे अभयप्रद भाषण ऐकून कौसल्या म्हणाली; “ महाभागा, मी कोसलरायाची मुलगी असून माझें नांव कौसल्या आहे. माझ्या बापानें माझा विवाह अजराजसुत दशरथ, यांच्याबरोबर करण्याचें ठरविलें होतें, व आजच आमचा विवाह व्हावयाचा होता. परंतु रावणानें मला माझ्या घरून उचलून आणिलें व या पेटींत घालून समुद्रांत टाकून दिलें. पुढें ही पेटी कोणातरी जलचरानें तोंडांत धरून येथें आणून ठेविली असावी. ” ती हकीकत ऐकून दशरथ राजाला, मोठा आनंद झाला. तो म्हणाला; “ कौसल्ये, अजराजसुत दशरथ तो मीच असून तुझ्या विवाहासाठींच जहाजांत बसून निघालों होतों. इतक्यांत रावण विमानांतून आला व त्यानें माझीं जहाजें फो[illegible] माझा सर्व परिवार समुद्रांत बुडविला. मीहि त्या वेळीं जलसमाधिस्थच व्हावयाचा, परंतु ईश्वराची कृपा म्हणून माझ्या हातीं एक फळी लागर[illegible] फळीच्या साह्यानें मी वाहत वाहत या बेटावर आलों. कौसल्ये, [illegible] वेळीं तुझी व माझी भेट झाली, हा खरोखर विलक्षण योगा[illegible] दशरथाच्या मुखांतले शब्द कौसल्येला अमृताप्रमाणें गोड व[illegible] “ महाराज, खरोखर, आपणा उभयतांची अशा रीतीनें गाठ [illegible]श्वराची कृपा म्हटली पाहिजे. ठरल्याप्रमाणें आपण आजच्या [illegible] स्वीकार केला आहे. येथें विवाह साहित्य नाहीं याबद्दल उ[illegible] नका. येथें आपला दोघांचा जो हर्ष तोच आपण मधुपर्क स[illegible] मंडप व आपणा उभयतांचें संभाषण हींच मंगलाष्टकें, उ[illegible] व पेटीरूपी या बहुल्यावर बसूं आणि एकमेकांला सुखदुःखा[illegible] पुण्याहवाचन करूं.” कौसल्येचें तें भाषण दशरथाला पसंत [illegible] पंचमहाभूतांना साक्षीभूत ठेऊन पवित्र अंतःकरणानें कौसल्येचा [illegible] नंतर सायंकाळपर्यंत ते उभयतां बोलत बसले, व रात्र झाल्यावर [illegible] पेटींत निजले, व पेटीचें झांकण बंद करून घेतलें. याप्रमाणें दिवसा [illegible] फिरावें व रात्र झाल्यावर पेटींत निजावें, असा त्यांचा क्रम चालला [illegible] एके दिवशीं रात्रीं तीं दोघेंही निद्रिस्थ असतां पूर्वी ठरल्याप्रमाणें युद्धांत जय पावलेला मासा तेथें आला, व ती पेटी दाढेंत धरून खाण्यासाठीं चांगलें स्थळ शोधीत शोधीत लंकाबेटाच्या किनाऱ्यावर येऊन पोंचला.

ब्रह्मदेवाच्या वाणीला आपण असत्यपणा आणून आपलें संकट दूर केलें आहे, तर मुद्दाम ब्रह्मदेवाला भेटावें व त्यास नमस्कार करावा अशी इच्छा रावणाला उत्पन्न झाली व मोठ्या प्रौढीनें तो ब्रह्मदेवाला भेटण्यासाठीं सत्यलोकीं गेला, व मोठ्या आढ्यतेनें म्हणाला, “ हे सत्यलोकाधिपते, मी तुजकडे दशरथाचा विवाह झाला कीं होणार आहे, तें विचारण्यासाठीं आलों आहें.”

तेव्हां ब्रह्मदेव म्हणाले; " बा दशानना, मीं म्हटल्याप्रमाणें त्यांचा विवाह तर त्याच वेळीं झाला." ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून रावणाला हंसूं आलें. तो म्हणाला, " हे ब्रह्मदेवा, तुला सत्यलोकचा राजा असें म्हणातात. तुझी वाणी केव्हांही असत्य व्हावयाची नाहीं, अशी तुझी कीर्ति आहे, पण यावेळीं तूं अगदीं फस-लास. तूं सांगतोस त्या वेळेला कौसल्या व दशरथ यांचा विवाह झाला तर नाहींच, पण तो आतां पुढेंही कधीं होणें शक्य नाहीं. कारण मीं त्या दोघां-नांही जलसमाधि दिली आहे." रावणाची गर्वोक्ति ऐकून ब्रह्मदेवाला हंसूं आलें. ते म्हणाले; तूं जरी इतका प्रयत्न केलास तरी ते दोघे त्या प्रसंगांतून वांचले असून मी सांगतों त्याचवेळीं त्या उभतांचा विवाहही झाला. सांप्रत ते दोघेही कुशल अ तुझ्याच लंका बेटाच्या किनाऱ्याशीं तूं ज्या पेटींत कौसल्येला ठेविलें होतें त्याच पेटींत आहेत. ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून रावणाला आश्चर्य वाटलें. लंकेस आला व त्यानें आपले हजारों दूत समुद्र किनाऱ्यावर यासाठीं पाठवून दिले. त्या दूतांनीं शोध करून ती पेटी सोडवून राजवाड्यांत रावणासमोर आणून ठेविली.

द्रांत जी पेटी सोडिली होती तीच ही आहे, असें ओळखून तः उघडली; व आंत पाहतों तों, दशरथ व कौशल्या दोघेही आहेत. तो प्रकार पाहून रावणाच्या हृदयांत एकाच वेळीं न्न झाला. त्या दोघांस मारून टाकण्याच्या उद्देशानें त्यानें म्यानांतून बाहेर काढिली. दशरथ राजा हाडाचा क्षत्रिय सल्या भयंकर स्थितींतही तो पेटींतून ताडकन् उडी व रावणाबरोबर युद्ध करण्यास तयार झाला. त्या वेळीं दोदरी तेथें जवळच होती. तिनें पुढें होणारा अनर्थ टळावा ला प्रतिबंध केला; व ती हात जोडून म्हणाली, " प्राणनाथ, हें केव्हांही खोटें व्हावयाचें नाहीं; तुह्मी या उभयतांना मारून पापाची वृद्धि .. रूं नका. राम जन्मास येणार म्हणून त्यांचा आपण वध करणार, पण तसें करण्यापासून जो अनर्थ पुढें ओढवून यावयाचा आहे, तो आतांच येईल. प्रल्हादाचे वेळीं नरहरी जसा स्तंभांतून निघाला, त्याप्रमाणें यांच्या पोटांतून राम आतांच प्रकट होऊन तुमचा नाश कशावरून करणार नाहीं ? म्हणून म्हणत्यें, या दोघांचा नाश न करितां यांनां अयोध्येस पोंचतें करून द्या." मंदोदरीचें म्हणणें रावणाला खरें वाटलें. आपल्या अविचारानें आतांच राम उत्पन्न झाल्यास न जाणों आपण याच वेळीं सर्वस्वाला मुकूं, त्यापेक्षां पुढें जेव्हां राम उत्पन्न होईल तेव्हां काय तें पाहूं. असा विचार करून रावणानें कौसल्येला व दशरथाला आपल्या विमानांत बसवून अयोध्येस पोंचतें केलें. इकडे कोसलदेशांत व अयोध्येंत दोघांच्या अशुभ वार्तेमुळें मोठा अनर्थ उडाला होता; परंतु त्या दोघांना सुखरूपपणें परत आलेले पाहून सर्वांना अत्यानंद झाला.

---

# अध्याय १५ वा.

## १. रावणभस्मासुरसंवाद.

वैशंपायन ऋषि जनमेजय राजाला सांगू लागले. "हे राजा जनमेजया, एवढ्यासाठीं आपलें मरण कोणासही विचारूं नये. कारण मृत्यु हा सर्वांना आहेच. मग त्याविषयीं शोध करून निष्कारण काळजी करण्यांत काय फायदा? या रावणानें एकदां सटवीलाहि असेंच आपलें मरण विचारलें होतें. त्याविषयींची कथा भविष्योत्तर पुराणांत आहे, ती तुला संक्षेपानें कथन करितों. एकदां सटवी रात्रीचे वेळीं रावणाचे पाय चुरीत बसली होती. रावणाचे पाय सटवी चुरते याबद्दल तुला आश्चर्य वाटत असेल, परंतु त्यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहीं नाहीं. कारण रावणानें सर्व देव आपल्या बंदिशाळेंत ठेऊन त्यांच्याकडून तो सेवा करून घेत असे. त्याप्रमाणें त्यानें सटवीलाही आपली सेवासुश्रूषा करावयाला लाविलें होतें. एकदां ती त्याचे पाय दाबीत असतां, रावणाचा डोळा लागला आहे असें पाहून, त्या दिवशीं श्रवसी नांवाची स्त्री प्रसूत होऊन पांचवा दिवस होता म्हणून तिजकडे चटकन निघून गेली. इकडे रावण जागा होऊन पहातो तों सटवी तेथें नाहीं. तेव्हां त्यास राग आला आणि सटवी परत आल्याबरोबर त्यानें तिला 'मला न विचारितां कोठें गेली होतीस?' म्हणून रागानें प्रश्न केला. तेव्हां सटवी म्हणाली; "महाराज माझें कार्य कोणतें हें आपणांस माहीत नाहीं असें वाटतें. नूतन जन्मलेल्या मुलाचें भविष्य मला वर्तवावें लागतें; त्याप्रमाणें आतां एका प्रसूतिगृहांत जाऊन आलें." सटवीचें भाषण ऐकून रावण म्हणाला; असें जर आहे, तर माझें भविष्य काय आहे तें सांग पाहूं? तेव्हां सटवी म्हणाली; "महाराज आपलें भविष्य मी जाणतें, पण ते आपण मला विचारूं नये. कारण भविष्यांत चांगल्या गोष्टीप्रमाणें वाईट गोष्टीही असतात, व तसल्या गोष्टी ऐकण्यानें निष्कारण काळजी मात्र वाटते; एवढ्यासाठीं आपलें भविष्य कधींही कोणाला विचारूं नये." परंतु सटवीचें हें म्हणणें रावणाला रुचलें नाहीं. त्यानें भविष्य सांगण्याविषयीं विशेष आग्रह केला. तेव्हां सटवीचा नाईलाज होऊन ती रावणास म्हणाली; "रावणा, तुला आपलें भविष्य ऐकणेंच आहे तर थोडें कुंकू घेऊन ये." सटवीच्या सांगण्याप्रमाणें रावणानें कुंकू आणवून सटवीजवळ दिलें. सटवीनें तें कुंकू पाण्यांत कालवून आपल्या हाताला लाविलें, व तो हात रावणाच्या कपाळाला लावून रावणाला दाखविला; आणि ती म्हणाली; रावणा, तुझें भविष्य या माझ्या हातावर उठलें आहे, तें तूंच वाचून पहा, म्हणजे तुला सर्व कळून येईल. रावणानें सटवीच्या हातावर उमटलेलीं अक्षरें वाचिलीं. त्यांत—'अयोध्येच्या अजराजाचा नातू दशरथ राजाचा मुलगा श्रीरघुनाथ याचे हातून रावणाचा

नाश होईल,–' असा मजकूर होता. तीं अक्षरें वाचून, रावणाच्या हृदयांत काळजी उत्पन्न झाली. त्याचा चेहेरा एकदम फिका पडून गेला. त्याला त्या वेळीं कांहीं सुचेनासें झालें. मग त्यानें आपली भीति दूर करण्यासाठीं अजराजावर स्वारी करून त्याचा नाश करावा, असा विचार ठरविला.

रावणानें आपला विचार सेनापतीस कळविला, व अपार सैन्य बरोबर घेऊन तो अजराजावर चाल करून आला. अजराजाही आपलें चतुरंग सैन्य घेऊन नगराबाहेर रणमैदानांत येऊन उभा राहिला. अजराजाचें तें प्रचंड सैन्य पाहून रावण चकित झाला, व त्याला अशी शंका आली कीं, आपण या राजाबरोबर सैन्यासह युद्ध केल्यास खात्रीनें आपणासच जय मिळेल असें नाहीं. कदाचित जरी आपणास जय मिळाला, तरी त्यांत अजराजा आपल्या हातीं सांपडेल असें कशावरून? तो रणांतून पळून गेल्यास आपला सर्व प्रयत्न फुकट जाईल. याकरितां दोघांनींच युद्ध करावें हें बरें. असा विचार करून तो आपलें सैन्य सोडून एकटाच पुढें आला, व अजराजाला म्हणाला; अजराजा, वास्तविक युद्धप्रसंग आपणा दोघांतच व्हावा अशी माझी इच्छा आहे. तेव्हां आपण उभयतां, आपापल्या सैन्यास बाजूस ठेवून मल्लयुद्ध करूं. अजराजानें ती गोष्ट कबूल केली. परंतु हा आपला युद्धप्रसंग पाहण्यासाठीं कोणी त्रयस्थ साक्षिदार असावा असें त्यानें कळविलें. तेव्हां रावण म्हणाला; " आपणा दोघांचे सैन्यासच आपण त्रयस्थ समजूं म्हणजे झालें. " परंतु तें म्हणणें अजराजाला पसंत पडलें नाहीं. तो म्हणाला; " बा रावणा, सैन्यांस साक्षीभूत ठेवूस चालावयाचें नाहीं. कारण जें तें सैन्य आपआपल्या धन्याचा पक्ष खरा, असें म्हणेल. आणि असें झालें म्हणजे खरा निकाल कळणार नाहीं. एवढ्यासाठीं आपण स्वर्गांत जाऊन इंद्रादि देवांसमोर युद्ध करूं; म्हणजे ते कोणाचा जय झाला हें निःपक्षपातानें सांगतील." अजराजाचें हें म्हणणें रावणाला पसंत पडलें, परंतु आपला स्वर्गलोकीं प्रवेश कसा होईल, अशी त्याला शंका आली. तेव्हां अजराजा म्हणाला;–रावणा, माझ्या बरोबर येण्यानें स्वर्गांत तुला कोठेंही प्रतिबंध होणार नाहीं.– असें बोलून अजराजानें रावणाचा हात धरिला व आपल्याबरोबर त्याला स्वर्गांत नेलें. अजराजा व रावण या दोघांनां पाहून इंद्राला आनंद झाला व त्यानें दोघांचा सत्कार करून त्यांनां बसावयाला आसनें दिलीं. आसनांवर बसल्यानंतर बृहस्पतीनें त्यांनां–कोणीकडे येणें केलेंत–म्हणून प्रश्न केला. तेव्हां अजराजा नमस्कार करून म्हणाला; " बृहस्पते, यासंबंधानें रावणाला विचारिलें असतां सर्व खुलासा होईल. " मग तोच प्रश्न बृहस्पतीनें रावणाला विचारिला. तेव्हां रावण म्हणाला; " बृहस्पते, सटवीपासून मला असें कळलें आहे कीं, या अजराजाचा नातू रामचंद्र, याच्या हातानें माझा मृत्यु होईल, म्हणून मीं याच्याबरोबर युद्ध करून त्याचा नाश करण्याचें योजिलें आहे. याचा नाश करण्यानें दशरथ

उत्पन्न होणार नाहीं, आणि दशरथाच्या अभावीं अर्थातच रामचंद्राची उत्पत्ति व्हावयाची नाहीं. तसें झालें म्हणजे अनायासें संकटाचें निवारण होईल." अशा हेतूनें मी याचेबरोबर युद्ध करण्याकरितां आलों असतां, यानें इंद्रास साक्षी ठेवून युद्ध करूं, म्हणजे तिराइताकडून आपणास खरा निकाल मिळेल, असें सांगितलें, म्हणून आम्हीं दोघे येथें आलों आहों." रावणाचें भाषण ऐकून बृहस्पति म्हणाले. "रावणा तुझा प्रयत्न योग्य आहे. कारण वाटेल तो प्रयत्न करून स्वतःवरील संकट दूर करावें, अशी नीति आहे. परंतु अजाच्या नाशा-साठीं तूं त्याच्याबरोबर युद्ध न करितां समोर असलेल्या भिंतींत बंद केलेलें जें दार आहे तें उघड, म्हणजे हा अजराजा आपोआप मरण पावेल." बृहस्पतीच्या सूचनेप्रमाणें रावणानें त्या दाराजवळ जाऊन जोरानें त्यावर एक लाथ मारिली. रावणाला असा भरंवसा होता कीं, आपण एक्या लत्ताप्रहारानें तें दार शतखंड करून टाकूं. पण रावणाच्या लत्ताप्रहारानें तो भक्कम दरवाजा एक केसभरही न ढळतां उलट आंतून एक भयंकर शब्द झाला. तो शब्द इतका भयंकर व प्रचंड होता कीं, त्यानें रावण गर्भगळित झाला व हातपाय वाकडे करून धाडकन् भुमीवर मूर्च्छित पडला. त्याचें सर्व शरीर थरथर कापूं लागलें, व त्याच्या सर्वांगाला घाम सुटला. क्षणाभरानें रावण सावध झाला, तेव्हां बृहस्पति म्हणाले; "रावणा, दार तुला उघडत नाहीं काय ?" तेव्हां रावण म्हणाला, "महाराज, आतां त्या दाराची गोष्टही काढूं नका." तेव्हां बृहस्पति म्हणाले; "रावणा, असा भिऊं नकोस. तूं त्या दाराजवळ पुनः जा व आंत कोण आहे तें विचार." रावणाला या वेळीं काय करावें याचा मोठा विचार पडला होता, त्याच्या हृदयांत पूर्वीची भीति कायम होती. पण हा काय प्रकार आहे, तें जाणण्याची त्यास जिज्ञासा उत्पन्न झाल्यामुळें व आपणास कोणी भित्रा म्हणूं नये, अशी त्याची इच्छा असल्यामुळें, तो तसाच धैर्य धरून दरवाजाजवळ गेला व दरवाजा ठोठावून 'आंत कोण आहे ?' असें विचारूं लागला. तेव्हां त्या दाराच्या आंतून त्याला पुढील उत्तर मिळालें. "अरे, मी भस्मासुर आहें. मीं शंकराची स्त्री पार्वती, तिच्याकडे वाईट नजरेनें अवलोकन केलें म्हणून मला येथें आणून टविलें असून, माझ्या दोन्ही डोळ्यांवर दोन लोखंडाच्या तीक्ष्ण आरा ठेविल्या आहेत. आतां थोड्या वेळापूर्वी कोणी दुष्ट मनुष्य येथें आला, व त्यानें हें दार हालविलें, त्यामुळें ह्या आरा हालल्या व माझे डोळे दुखावले, म्हणून मी मोटयानें ओरडलों." भस्मासुराचें भाषण ऐकून रावण आश्चर्यचकित झाला, व पुनः म्हणाला; "भस्मासुरा, आतां तुझी येथून सुटका कधीं होणार ?" तेव्हां भस्मासुर म्हणाला; "लंकेंत रावण या नांवाचा कोणी राजा आहे असें म्हणतात. तो जेव्हां श्रीरामचंद्राची स्त्री वाईट बुद्धीनें हरण करील, त्यावेळीं तो श्रीरामचंद्र रावणाला मारून टाकून सीतेला घेऊन जाईल. नंतर राव-

णाला येथें आणून त्याच्या डोळ्यांवर ह्या आरा ठेवितील व मला सोडून देतील." भस्मासुराचें भाषण ऐकून रावणाचा चेहरा एकदम काळवंडून गेला. त्यास पुढें काय करावें तें सुचेना. अजराजाबरोबर युद्ध करण्याचें त्यास मुळींच धैर्य राहिलें नाहीं. शेवटीं ब्रह्मदेवानें जें लिखित लिहून ठेविलें आहे तें टाळण्यास कोणीही समर्थ नाहीं, अशी त्याची खात्री झाली व तो अजराजाबरोबर युद्ध करण्याचें सोडून देऊन पुनः त्याच्याच साह्यानें स्वर्गावरून पृथ्वीवर आला. व दोघेही आपापल्या नगरास गेले. ऋषि म्हणाले, हे राजा जनमेजया, याप्रमाणें ही कथा भविष्योत्तर पुराणांत आहे, ती मीं तुला संक्षेपानें कथन केली आहे."

---

## अध्याय १६ वा.

### मारुतीची उत्पत्तिकथा.

वरील कथा ऐकल्यानंतर जनमेजय राजानें वैशंपायन ऋषीला मारुतीची कथा सांगण्याविषयीं विनंति केल्यावरून वैशंपायन ऋषि, राजाला मारुतीची कथा सांगू लागले. ते म्हणाले; " हे राजा जनमेजया, दशरथ राजानें पुत्रेष्ठि यज्ञ शृंगऋषीकडून करविला होता; त्यासंबंधानें मीं तुला पूर्वी सांगितलें आहेच. त्या वेळीं यज्ञप्रसादाचे तीन भाग करून ते दशरथदानें आपल्या तिन्ही स्त्रियांना दिले होते. त्यांपैकीं कैकयीला दिलेला भाग तिच्या हातांतून घारीनें पळविला. ती घार तो भाग घेऊन जात असतां वाटेंत दुसऱ्या घारीचें व तिचें त्या पिंडखाद्याबद्दल भांडण सुरू झालें. त्या भांडणांत तो भाग घारीचे तोंडांतून खालीं पडला. तेथें अंजनी नांवाची केसरी वानराची स्त्री पुत्र प्राप्त्यर्थ अंजली पसरून तपश्चर्या करीत होती, तिचे हातांत तो भाग पडला. तिनें तो भक्षण करितांच त्यापासून तिला गर्भ राहिला. त्या वानरीनें तीन पिंडांपैकीं एक यज्ञभाग समग्र ग्रहण केल्यामुळें प्रत्यक्ष यज्ञपुरुष तिच्या पोटीं मारुती म्हणून जन्मास आला. राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न हे चौघे जसे यज्ञभागापासून उत्पन्न झाले होते, त्याप्रमाणें मारुतीही यज्ञभागापासून उत्पन्न झालेला असल्यामुळें हे पांच दिसण्यांत जरी भिन्न होते, तरी ते खरोखर एकच होत. मारुतीला वायूचा पुत्र असेंही म्हणतात. त्याची शक्ति व चालण्याची गति याविषयीं नुसतें अनुमान करणेंही कठिण होय. राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न हे चौघेही शक्तिसंपन्न होते, परंतु मारुतीची शक्ति कांहीं विलक्षण होती. कारण यज्ञाप्रसादाचा एक तृतियांश भाग अंजनीनें भक्षण केला होता. बाकी राहिलेल्या दोन भागांतील थोडा थोडा भाग कैकयीस दिला गेल्यानें रामादिकांचे भाग मारुतीच्या भागा पेक्षां कमी होते. मारुती हा बालब्रह्मचारी होता.

तो आपल्या मातेच्या उदरांतून बाहेर पडला त्याचवेळीं लंगोटी नेसला होता. त्याचें तेज अग्नीप्रमाणें होतें. जन्मल्याबरोबर पूर्वदिशेस नुकतेंच उगवलेलें सूर्यमंडळ त्याच्या दृष्टीस पडलें; तेव्हां तें एक पिकलेलें लाल फळ आहे असें समजून मारुतीनें त्यावर उड्डाण केलें. मारुतीचा विलक्षण वेग पाहून तेथें असलेले संपूर्ण देव विस्मित होऊन मारुतीकडे टकमक दृष्टीनें पाहूं लागले, व हा इतका विलक्षण वेगवान आहे तरी कोण ? असें ते आपसांत पुटपुटूं लागले. मारुती सूर्यमंडळाजवळ जाऊन पोहोंचतो आहे, इतक्यांत तेथें राहू आला. तेव्हां मारुतीनें आपलें पुच्छ मोठ्या जोरानें राहूच्या मुखावर मारिलें. त्याबरोबर राहू गर्भगळित झाला. त्याचे दांत पडले व तोंडांतून भडभडा रक्त वाहूं लागलें. तें पाहून केतू राहूच्या मदतीस धांवला, तेव्हां मारुतीनें त्यासहि एक मुष्टीप्रहार केला; त्याबरोबर तो कासावीस झाला, व ते दोघेही धांवत इंद्राकडे गेले व त्यास घडलेली हकीकत कळवून आपलें रक्षण करण्याविषयीं आणि मारुतीचें पारिपत्य करण्याविषयीं विनंति केली. ते आणखी म्हणाले, 'देवेंद्रा, आमच्या हातून असा कोणता अपराध झाला होता, म्हणून आपण हा नवीन पुच्छकेतू उत्पन्न करून आम्हांस शिक्षा करण्यास पाठविला?' राहूचें भाषण ऐकून देवेंद्राला फार आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, "अरे, मला त्या पुच्छकेतूसंबंधानें कांहीं माहिती नसून मीं त्याला मुळींच पाठविलें नाहीं. तूं सांगतोस हा प्रकार खरा असल्यास मोठें आश्चर्य म्हणावयाचें! असा पुच्छकेतू उत्पन्न केला तरी कोणी ? व तो तेथें आला तरी कसा ? असो, आतां तूं त्या पुच्छकेतूसंबंधानें मुळींच काळजी करूं नकोस. मी आपलें सैन्य घेऊन तुझ्याबरोबर येतों, व त्या पुच्छकेतूचा नाश करून टाकितों" असें म्हणून इंद्र आपल्या सैन्यासह सूर्य मंडळाजवळ येऊन दाखल झाला; व पहातो तों सूर्य थरथर कांपत आहे, व मारुती त्यास खाण्याकरितां त्याचेवर धांवत आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. ऐरावतावर बसलेला इंद्र व त्याचे मागें लपलेले राहु—केतू आपणाकडे येत आहेत, असें पाहून मारुतीनें राहु व केतू यांस एक मुष्टीप्रहार केला; त्याबरोबर ते व्याकूळ होऊन मोठ्यानें आक्रोश करूं लागले. इंद्रानें त्यांस धीर दिला व आपला ऐरावत मारुतीच्या अंगावर घातला. तेव्हां मारुतीनें त्यास एक पुच्छाचा तडाका मारला, त्याबरोबर ऐरावत चीं चीं करीत पळत सुटला. ऐरावताला वळविण्याचा इंद्रानें पुष्कळ प्रयत्न केला, पण मारुतीच्या माराची त्यास जबरदस्त भीति बसल्यामुळें तो जीव घेऊन पळतच सुटला! इतक्यांत मारुतीनें आपल्या पुच्छाचा तडाका इंद्रासही लगाविला. त्या तडाक्यासरसा इंद्राचा मुकुट खालीं पडला व तोही कासावीस झाला. इंद्राची ही दुर्दशा पाहून यमाला मारुतीचा फार राग आला, व तो आपला काळदंड घेऊन मारुतीच्या अंगावर धांवून गेला. तेव्हां मारुतीनें आपल्या पुच्छाचा

वेढा घालून त्याला लांब झुगारून दिलें. सगळ्या जगाला गांजणाऱ्या यम-धर्माची जेव्हां अशी स्थिति झाली, तेव्हां वरुण, कुबेर, वगैरे देव आपआपल्या वाहनावर बसून रणांतून सूं पळत सुटले. इंद्रानें सर्व देव पराभूत झाले असें पाहून मारुतीवर आपलें वज्र सोडिलें. मारुतीनें इतक्यांत आपल्या पुच्छाचा वेढा ऐरावती व इंद्र यांस घालून त्यांना गरगर फिरविलें व जमिनीवर आपटिलें; परंतु वज्राच्या आघातानें मारुती मूर्छित होऊन मेरुपर्वतावर पडला.

मारुति मूर्छित पडल्याचें वर्तमान समजतांच वायू धांवून आला. त्यानें आपल्या मूर्छित झालेल्या पुत्रास उचलून घेतलें, व मारुतीची ती अवस्था पाहून तो फार क्रुद्ध झाला; व आपल्या शक्तीनें त्यानें सर्वांचे प्राणवायु आकर्षण केले. प्राण वायु आकर्षण होतांच सर्वांचे पंचप्राण व्याकूळ होऊं लागले. देव, दानव, मानव, आदिकरून सर्व प्राण्यांत हाहा:कार उडाला. पशु, पक्षी, राक्षस, गंधर्व, सिद्ध, चारण, वगैरे ब्रम्हदेवाकडे धांवत गेले; तो ब्रम्हदेवाचीही तीच अवस्था त्यांच्या दृष्टीस पडली. ते हात जोडून ब्रम्हदेवाला म्हणाले; " हे सत्यलोकनाथा, आमचे पंचप्राण कोणी तरी गुप्त रूपानें आकर्षण करीत असल्यामुळें आम्ही अत्यंत त्रस्त झालों आहों. कांहीं उपाय विचारावा म्हणून आम्ही तुजकडे आलों, परंतु तुझी स्थितीही आम्हांप्रमाणेंच झाली आहे. तेव्हां आतां यासंबंधानें काय करावें, याची आम्हांला मोठी काळजी उत्पन्न झाली आहे; तूं कांहीं योग्य उपाय सुचविशील तर कांहीं होईल, नाहीं तर आज सर्व जगाचा लय होतो हें खास." याप्रमाणें देवांनीं ब्रम्हदेवाची करुणा भाकिल्यावर ब्रम्हदेव म्हणाला; " बाबांनों, हा सर्व खेळ वायूनें चालविलेला आहे. त्याचा पुत्र जो मारुती, त्याला इंद्रानें वज्र मारिल्यामुळें तो मूर्छित होऊन पडला आहे, व त्यामुळेंच तो सर्वांचे प्राण आकर्षण करीत आहे. यावेळीं सर्व देवांनीं मिळून वायूकडे गेलें पाहिजे व त्याची समजूत करून मारुतीची मूर्छा दूर केली पाहिजे. म्हणजे वायुप्रसन्न होईल व तो आपलें निरोधनास्त्र काढून घेईल." ब्रह्मदेव असें म्हणत आहेत, तों विष्णु, शंकर, इंद्र, यम, कुबेर, वरूण वगैरे सर्व देव तेथें आले. त्यांच्याबरोबर अनेक तपोनिधि ऋषीहि होते. सर्वांची अवस्था ब्रह्मदेवाप्रमाणेंच झाली होती. नंतर सर्वांनीं विचार करून ते सर्व वायूकडे आले. ब्रम्हादि देवांनां पाहून वायूनें त्यांस साष्टांग प्रणाम केला. तेव्हां सर्व देव वायूला म्हणाले; " हे जगत्प्राणा, हा तूं काय अविचार करीत आहेस; आपल्या एका पुत्रासाटीं सगळें जग निर्दाळून टाकणें हा केवळ वेडेपणा होय. असा अविचार करूं नकोस, तूं सर्वांचे प्राण आकर्षण केले आहेस ते सोडून दे; नाहींतर मोठा अनर्थ होईल." हें देववाक्य ऐकून वायु म्हणाला; " जोंपर्यंत माझा मारुति मूर्छितावस्थेंत आहे, तोंपर्यंत मी सर्वांचें प्राण आकर्षण करणार. तुह्मांला तुमच्या प्राणाची जरूर असेल तर माझ्या या मारुतीची मूर्च्छा दूर करा." वायूचें

भाषण ऐकून विष्णूला हंसूं आलें. ते म्हणाले:—हे वायु, तूं मारुतीसंबंधानें काळजी करीत आहेस; हा तुझा वेडेपणा होय. अरे, या मारुतीला मारण्यास कोणीही समर्थ नाहीं; कारण हा चिरंजीव आहे. रामभागाच्या द्विगुणित पिंडापासून याची उत्पत्ति झालेली असल्यामुळें याला जन्म व मृत्यु हीं मुळींच नाहींत. असें म्हणून विष्णूनीं मारुतीच्या अंगावरून हात फिरविला; त्याबरोबर मारुती सावध झाला व तो सर्वांकडे प्रसन्न दृष्टीनें पाहूं लागला. नंतर विष्णूनें त्याला वरदान दिलें कीं, " शंख, चक्र व गदा ह्या माझ्या आयुधांपासून केव्हांही तुला त्रास होणार नाहीं. " शंकर म्हणाले; " हे मारुती, माझ्या कोणत्याही आयुधापासून तुला त्रास होणार नाहीं. इतकेंच नव्हे तर माझ्या या डोळ्यानेंही तूं भस्म होणार नाहींस असा मी तुला वर देतों. " नंतर ब्रह्मदेवानें मारुतीला असा वर दिला कीं, " माझा ब्रह्मदंड व ब्रह्मपाश यापासून तुला कधीं पीडा होणार नाहीं. " नंतर इंद्र म्हणाला; " माझें वज्र या मारुतीला लागल्यामुळें हा मजवर क्रुद्ध झाला आहे; पण मी याला असा वर देतों कीं, हें माझें वज्र मारुतीला कांहीं करूं शकणार नाहीं. तसेंच माझ्या वज्रानें झालेलें हनुप्रदेशावरील चिन्ह, या मारुतीला भूषणास्पद होईल. त्या चिन्हावरून याला सर्व लोक ' हनुमंत ' असें म्हणतील, व याची कीर्ति तिन्ही लोकीं अक्षय राहिल. " असें म्हणून इंद्रानें आपल्या गळ्यांतील, परमसुवासिक व कधींही न सुकणारी अशी ' कुशकाश ' कमळाची माळ मारुतीच्या गळ्यांत घालून त्याचा गौरव केला. नंतर सूर्य म्हणाला; " हा जेव्हां इच्छिल, तेव्हां याला अध्यात्मज्ञान प्राप्त होईल." वरुण म्हणाला; " माझ्या वरुणपाशापासून याला कधीं इजा होणार नाहीं व हा जळांत वाटेल तिकडे संचार करण्यास समर्थ होईल." यम म्हणाला, " माझ्या यमदंडापासून मारुतीला कधींही त्रास होणार नाहीं. " कुबेर म्हणाला; " हे वायो, हा तुझा पुत्र मारुती रणांत कधींही थकणार नाहीं, व त्याला माझ्या शस्त्रानें कधीं इजा व्हावयाची नाहीं " विश्वकर्मा म्हणाला, मीं जेवढीं शस्त्रें निर्माण केलीं आहेत, त्या शस्त्रांपासून मारुतीला लवमात्रही त्रास होणार नाहीं. याप्रमाणें सर्वांनीं मारुतीवर आशीर्वादांची वृष्टि केल्यामुळें वायूला अत्यानंद झाला. मग ब्रह्मदेव त्याला म्हणाला; "हे वायो, तुझें थोर भाग्य म्हणून हा हनुमान तुझे वंशांत जन्मास आला आहे. हा मोठा धीर वीर असून जगामध्यें प्रसिद्ध होईल. याची बरोबरी करणारा वीर कधींही मिळावयाचा नाहीं. हा वज्रशरीराचा असून याला कोणत्याही शस्त्रास्त्राची बाधा होणार नाहीं. लंकानाथ जो रावण, त्याचा हा पराभव करील व सीतेचा शोध करून श्रीरामचंद्राला सुखी करील. " याप्रमाणें सर्वांनीं मारुतीचा जयजयकार केल्यावर वायु सर्वांवर अत्यंत प्रसन्न झाला व त्यानें आपलें प्राणनिरोधनास्त्र दूर केलें.

## २. ऋषींचा मारुतीस शाप.

वैशंपायन ऋषि पुढें म्हणाले, " हे राजा, जनमेजया, याप्रमाणें मारुतीची जन्मकथा आहे. ज्यानें जन्म होण्याबरोबर इतकें भयंकर उड्डाण केलें त्या मारुतीचें शक्तिसामर्थ्य किती असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. तेव्हां पासून मारुतीची कीर्ति जी त्रिभुवनांत पसरली आहे, ती अद्यापपर्यंत तशीच कायम आहे. श्रीरामचंद्र व हनुमान या दोघांचा सेव्यसेवक संबंध आहे, असें लोक समजतात; परंतु वास्तविक राम व मारुती हे दोघे एकच होत. त्या दोघांचें सामर्थ्य सारखेंच होतें. ते केवळ लोकांत देव व भक्त या भिन्न स्वरूपानें वागत होते. आतां, कोणीही भक्त असला तरी तो परमेश्वर स्वरूपापासून भिन्न मानणें हा लोकांचा भ्रम होय. डोंगराला लागलेला वन्ही व घरांत लाविलेला दिवा, या दोहोंचें स्वरूप जसें एकच आहे, त्याप्रमाणें देव व भक्त एकच आहेत. अज्ञानी जे आहेत ते मात्र भक्तांना देवांपासून भिन्न समजतात. असो, आतां या मारुतीच्या कांहीं बालचेष्टा तुला सांगतों. कित्येक ऋषि गंगेच्या कांठीं आश्रम बांधून राहात होते. तेथें जवळच असलेल्या अरण्यांत मारुतीचा वास होता. तेथें तो ऋषींची रोज कांहीं तरी चेष्टा करी व कधीं ऋषींचे आश्रमच उचलून जेथें पाणी व छाया नसेल अशा पर्वतावर नेऊन ठेवी. केव्हां तो ऋषींचीं यज्ञपात्रें फोडून टाकी, तर कधीं दर्भासनें फाडून टाकी. याप्रमाणें तो ऋषींनां फार त्रास देत असे. परंतु ऋषि त्याच्या बालस्वभावाकडे पाहून त्याला क्षमा करीत असत. पण एकदां त्यानें एक हत्ती मारून त्याचें प्रेत ऋषींच्या आश्रमांत टाकिलें, आणि कित्येक ऋषींनां आपल्या पुच्छानें गुंडाळून आकाशांत उड्डाण केलें. तेव्हां ऋषि त्याजवर रागावले व त्यांनीं मारुतीला असा शाप दिला कीं, ' जोंपर्यंत तुला श्रीरामचंद्राची भेट होणार नाहीं, तोंपर्यंत तुझें सामर्थ्य कमी होईल. ' ऋषींनीं असा शाप देतांच मारुतीचें सामर्थ्य नाहींसे झालें. पुढें कांहीं वर्षांनीं मारुतीस श्रीरामचंद्राची भेट झाली, तेव्हां त्याचें पूर्वसामर्थ्य त्यास प्राप्त झालें. हे राजा जनमेजया, हा मारुती वानर कोटींतील असूनही त्याच्या तोडीचा भक्त व ब्रह्मचारी कोणी झाला नाहीं, अशी त्याची कीर्ति आहे. या महाबळी मारुतीच्या शूरत्वाच्या प्रसिद्धीप्रमाणेंच, सतीपणाविषयीं मंदोदरीची प्रसिद्धि आहे. ती जरी रावणासारख्या उन्मत्त राक्षसाची स्त्री होती, तरी तिचें आचरण सर्व प्रकारें इतकें शुद्ध होतें, कीं मोठमोठ्या साध्वी स्त्रियाही तिची कीर्ति ऐकून तोंडांत बोट घालीत असत. या मंदोदरीनें केवळ आपल्या शुद्ध आचरणानें प्रसिद्ध पंचसाध्वीमध्यें स्थान मिळविलें आहे. "

# अध्याय १७ वा.

## १. रावणाला मंदोदरीची प्राप्ती.

मारुतीची कथा ऐकिल्यावर जनमेजय राजाला मंदोदरीची कथा ऐकण्याची इच्छा उत्पन्न झाली. तो म्हणाला; " ऋषि, आपण ज्या मंदोदरीविषयीं म्हणालात तिची प्राप्ती रावणाला कशी झाली, ती कथा सांगावी. तेव्हां ऋषि, ती कथा सांगू लागले. ते म्हणाले; " हे राजा जनमेजया, रावणाची आई कैकसी, हिचा नित्य नियम असा होता कीं, प्रत्यहीं प्रभातकाळीं समुद्राचें स्नान करावयाचें, व समुद्राचे कांठीं पंचधान्याच्या पीठाचें हातावर शिवलिंग तयार करून त्याची षोडशोपचारानें पूजा करावयाची, व बेलाचीं एकलक्ष पत्रें शिवनामस्मरण करून वहावयाचीं. एकेदिवशीं ती याप्रमाणें पूजा करून शिवलिंगाचें ध्यान करीत असतां, इंद्र राक्षसाचें रूप धारण करून तेथें आला, व त्यानें तें शिवलिंग कैकसीच्या हातावरून हळूंच उचलून समुद्रांत फेंकून दिलें, व आपण अमरावतीला निघून गेला. तें शिवलिंग नाहींसें व्हावें म्हणून इंद्रानें समुद्रांत फेंकलें खरें, परंतु कैकसीच्या भक्तीमुळें तें शिवलिंग इतकें सुदृढ झालें होतें कीं, जरी तें पिठाचें होतें, तरी त्याचा नाश करण्यास किंवा तें पोटांत समावून घेण्यास समुद्रही असमर्थ झाला. समुद्रानें तें शिवलिंग गोमतीच्या कांठीं टाकिलें. तें अद्यापपर्यंत तसेंच असून, हाटकेश्वर या नांवानें तें प्रसिद्ध आहे. असो हातावरील लिंग गेलें तरी कैकसी शिवध्यानांत मग्न होती. तिचें ध्यान जेव्हां विसर्जन झालें, व तिनें डोळे उघडून हाताकडे पाहिलें, तेव्हां हातावरचें शिवलिंग नाहींसें झालें असें तिला आढळून आलें. तो प्रकार पाहतांच ती चिंताग्रस्त झाली. आणि पूजा पूर्ण होण्यापूर्वीच शिवलिंग नाहींसें झालें हा खात्रीनें कांहींतरी अशुभ प्रकार आहे, असें जाणून ती शोक करूं लागली. हें वर्तमान रावणाला समजतांच तो तेथें आला. तेव्हां कैकसी रावणाला म्हणाली; " बाळा रावणा, मी आपल्या हातावर पिठाचें लिंग तयार करून त्याचें ध्यान करीत असतां कोणी चोरानें तें लिंग माझ्या हातावरून पळविलें; म्हणून मी दुःखी झालें आहे. त्या चोराचा शोध करून माझें शिवलिंग पूजेसाठीं परत आणून दे. " मातेचें भाषण ऐकून रावण म्हणाला; "आई, आतां त्या चोराचा शोध कसा लागणार ? आणि यदाकदाचित शोध लागला तरी त्याचा उपयोग काय ? कारण तें पिठाचें लिंग त्यानें कोठें तरी टाकून दिलें असेल. तेव्हां तें शिवलिंग शोधण्यांत कांहीं फायदा नाहीं. आपल्या घरीं शिवाचें रत्नलिंग आहे, तें पाहिजे तर मी तुला पूजेसाठीं आणून देतों. " तेव्हां कैकसी म्हणाली; " बा रावणा, पार्थिवलिंगाची बरोबरी शंकराच्या आत्मलिंगावांचून कोणत्याही

लिंगाला यावयाची नाहीं. मला तें रत्नलिंग काय करावयाचें आहे? माझें पार्थिव-लिंग परत न मिळालें तर मला प्राणत्याग केला पाहिजे. कारण पार्थिवपूजेचा नाश होणें फार अशुभकारक आहे." आईचें असें निश्चयाचें भाषण ऐकून रावण म्हणाला; "आई, तें तुझें पार्थिवलिंग मिळणें मला तर कठीण वाटतें; परंतु मी आतांच कैलासपर्वतावर जातो व शंकराला प्रसन्न करून त्यांच्याजवळून आत्मलिंगच घेऊन येतों." रावणाचें भाषण ऐकून कैकसीला अत्यंत आनंद झाला. ती म्हणाली; "बा रावणा, त्या आत्मलिंगाची पूजा करावी अशी माझी फार दिवसांपासून इच्छा आहे. ती माझी इच्छा पूर्ण झाली तर मी आपल्या जन्माचें सार्थक मानीन. मला एकदां नारदांनीं देखील त्या आत्मलिंगाविषयीं सांगितलें होतें; परंतु तें मिळणें अशक्य असल्यामुळें मी त्यासंबंधानें आजवर तुझ्याजवळ गोष्टच काढली नाहीं." मातोश्रीची इच्छा पाहून रावण आत्मलिंग आणण्याकरितां कैलासपर्वतावर गेला. तेथें त्यावेळीं शंकराचा शृंगी नांवाचा एक गण, तंबोरा वाजवून गात होता, व तें चित्ताकर्षक गाणें ऐकण्यांत शंकर आपलें देहभान विसरून तल्लीन झालेले होते. रावण पुढें जाऊन उभा राहिला, तरी शंकराचें लक्ष त्याकडे गेलें नाहीं. तेव्हां शंकराला कसें प्रसन्न करून घ्यावें, याचा रावणाला विचार उत्पन्न झाला. तो गायन व वादनकलेंत चांगला निष्णात होता, परंतु त्यावेळीं जवळ वाद्य नव्हतें. तेव्हां त्यानें आपल्या मानेजवळचा भाग कापून शिरा बाहेर काढल्या, व त्या बांधून त्यानें स्वतःच्या शरीराची किनरी तयार केली, आणि ती वाजवून उत्तम रागदारींत तो गाऊं लागला. त्या कर्णमधुर स्वरामुळें सर्वांचें लक्ष शृंगीकडून रावणाकडे गेलें. रावणाची मान वांकडी होऊन स्नायू ताणले गेले आहेत, व एक हात तोडून त्याची किनरी केली आहे; हा प्रकार पाहून तर शंकर प्रसन्न झाले. ते रावणाला म्हणाले; "रावणा, तूं माझ्या प्रसन्नतेसाठीं आपलें शिर व हात तोडलेस, म्हणून मी तुला असा वर देतों कीं, तुला दहा मुखें व वीस हात प्राप्त होतील." शंकरानीं असा वर देतांच रावणास दहा मुखें व वीस हात उत्पन्न झाले. त्यानें शंकराला साष्टांग प्रणाम केला. तेव्हां शंकर म्हणाले, "रावणा, तुझी ही विलक्षण भक्ति पाहून मी तुजवर अत्यंत प्रसन्न झालों आहें, तुझी जी इच्छा असेल तें माग; मी तें तुला मोठ्या संतोषानें देईन." तेव्हां रावण म्हणाला; "हे देवाधिदेवा महादेवा! तूं जर खरोखर प्रसन्न झाला आहेस तर तुझी सुंदर स्त्री पार्वती मला दे, व तुझें आत्मलिंग माझ्या आईला पूजेसाठीं दे." रावणाचें विलक्षण मागणें ऐकून शंकराला वाईट वाटलें, व त्याचा रागही आला; परंतु जें देतों म्हणून कबूल केलें, तें न दिल्यास लोकांत आपली अपकीर्ति होईल असें जाणून शंकर रावणाला 'तथास्तु' म्हणाले. आणि आत्मलिंग व पार्वती त्याच्या स्वाधीन केली. तेव्हां पार्वती अत्यंत

दुःखाकुल झाली, व या संकटाच्या निवारणार्थ ती मोटमोठ्यानें शोक करूं लागली. तिची स्थिती फार केवीलवाणी झाली व दीन वदनानें चोंहीकडे पाहूं लागली.

त्या नीच रावणानें पार्वतीच्या त्या स्थितीचा कांहींही विचार केला नाहीं. शंकर ' तथास्तु ' म्हणाल्याबरोबर त्यानें पार्वतीला खांद्यावर उचलून बसविली, व आत्मालिंग हातावर घेऊन तो एकदम लंकेच्या मार्गाला लागला. तेव्हां पार्वती अत्यंत चिंतातूर होऊन विष्णूची करुणा भाकूं लागली. हें वर्तमान विष्णूस समजताच ते ऋषीचें रूप घेऊन रावणासमोर आले व कार्तिकस्वामीला आपला शिष्य बनवून आपणाबरोबर घेतलें, आणि गणपतीस गुराखी होऊन रावणाजवळील आत्मलिंग हरण करण्याची युक्ति सांगितली. विष्णु वृद्ध ब्राह्मणाच्या रूपानें रावणासमोर येऊन त्यास म्हणाले; 'रावणा, तुला पार्वती मिळाली म्हणून मोठा आनंद वाटत आहे, पण शंकरानीं तुला फसविलें. त्यांनीं ही पिशाच्चवत् अवदसा तुझ्या स्वाधीन केली आहे. तूं हिला पुनः महादेवाकडे घेऊन जा, व त्यांनीं पार्वती आपल्या आसनाखालीं लपवून ठेविली आहे, ती घेऊन ये." विष्णूच भाषण ऐकून रावण आश्चर्यचकित झाला. त्यानें आपल्या खांद्यावरून पार्वतीला उतरून तो तिच्याकडे पाहूं लागला, तों ब्राह्मणाच्या म्हणण्याप्रमाणें तो प्रकार खराच आहे, असें त्याला आढळून आलें. पार्वतीचें तें हिडिस स्वरूप पहातांच रावणास शंकराचा फार राग आला, व तो तसाच त्या स्त्रीस घेऊन शंकराकडे परत गेला.

ऋषि म्हणाले, राजा जनमेजया, आतां तुला मंदोदरीची उत्पत्ति कशी झाली तें सांगतों. या मंदोदरीच्या उत्पत्तींविषयीं अनेकांचीं अनेक मतें आहेत. लक्ष्मीनें विष्णूच्या अंगाला केशराची उटी लाविली होती, त्या उटीच्या मळापासून मंदोदरीची उत्पत्ति झाली असें कित्येक म्हणतात. पुराणांत मंदोदरी विषयीं अशी कथा आहे कीं, पार्वतीनें आपल्या अंगमळाची एक सुंदर कन्या निर्माण करून ती गृहसंरक्षणासाठीं ठेविली होती. ती उपवर झाल्यावर इतकी मनोहर दिसूं लागली की, शंकराला देखील तिच्याकडे पाहून मोह उत्पन्न झाला. तेव्हां पार्वतीनें क्रोधयुक्त होऊन त्या मुलीला असा शाप दिला कीं, 'तूं सहस्र वर्षे बेडकुळी होशील '. त्याप्रमाणें सहस्रवर्षेपर्यंत मंदोदरी बेडकुळीच्या स्थितींत होती. पुढें पार्वतीवर जेव्हां हा वरील प्रसंग आला, तेव्हां तिनें ब्राह्मणस्वरूपी विष्णूची पूजा करून त्याचें पादप्रक्षालन केलें. तें विष्णुपादोदक बेडकुळीच्या शरीराला लागतांच ती शापमुक्त होऊन सर्वांगसुंदर स्त्री झाली. मग तिला विष्णूनें खुणाविल्याबरोबर ती तेथून निघाली व शंकराच्या सिंहासनाखालीं जाऊन बसली. हा प्रकार रावणाला मुळींच कळला नाहीं. तो त्या ओंगळ स्त्रीला घेऊन शंकराकडे आला, म्हणून सांगितलेंच आहे. शंकरासमोर येतांच त्या कुरूप स्त्रीला उभें करून रावण म्हणाला; " महादेवा, तूं मला पार्वती

म्हणून ही अवदसा दिलीस व खरी पार्वती तूं आपल्या आसनाखालीं लपवून ठेविलीस, अशा रीतीनें आपल्या भक्ताला फसविणें बरें नव्हे." रावणाचें भाषण ऐकून, व समोर उभी असलेली ती कुरूप स्त्री पाहून शंकराला आश्चर्य वाटलें. त्यांनीं अंतरदृष्टीनें विचार केला, तेव्हां सर्व प्रकार त्यांच्या लक्षांत आला. मग रावणाच्या इच्छेप्रमाणें त्यांनीं आपल्या सिंहासनाखालून मंदोदरीला काढून त्याच्या स्वाधीन केलें. मंदोदरीचें अनुपमेय स्वरूप पाहून रावणाला अत्यंत हर्ष झाला व तो तिला घेऊन पुन्हा लंकेच्या मार्गाला लागला.

## २. आत्मालिंग हरण.

रावण, शंकराचें आत्मालिंग व मंदोदरी यांस घेऊन चालला असतां, मार्गांत त्यास लघुशंका लागली. आत्मलिंग जवळ ठेवून लघुशंका करणें,अथवा तें भूमीवर ठेवणें, ह्या दोन्ही गोष्टी अनुचित्त असल्यामुळें रावण विचारांत पडला. इतक्यांत गाई चारीत असलेल्या ब्राह्मणपुत्राकडे त्याचें लक्ष गेलें. तो ब्राह्मणाचा शुचिर्भुत मुलगा दृष्टीस पडतांच रावण त्याजवळ जाऊन म्हणाला,–" बाळ, मी लघुशंका करीपर्यंत एवढें माझें आत्मलिंग घेऊन उभा रहा." तेव्हां तो वेषधारी मुलगा म्हणाला; तुझ्या लघुशंकेला किती वेळ लागेल याचा काय नियम आहे ? मला तर आतां गायी घेऊन गांवांत गेलें पाहिजे. मी तुला तीन हाका मारीन, व तूं लवकर न उठल्यास मी तें जमिनीवर ठेवीन. रावणानें त्या गोपरूप गणपतीचें म्हणणें कबूल केलें, व तें लिंग त्याच्या हातांत दिलें, व आपण लघुशंकेस बसला. पुष्कळ वेळ झाला तरी त्याची लघवी संपेना. तेव्हां गणपतीनें त्यास तीन वेळ हाका मारल्या, व शेवटीं तें आत्मलिंग जमिनीवर ठेवून तो निघून गेला. कांहीं वेळानें लघुशंका संपल्यावर रावण उठून पाहतो, तों ब्राह्मणाचा मुलगा आत्मलिंग भुमीवर ठेवून निघून गेल्याचें त्यास दिसलें. तेव्हां रावणास वाईट वाटलें, आणि लिंगाजवळ जाऊन तें तो एका हातानें उचलूं लागला, परंतु तें त्याला मुळींच हलेना. मग त्यानें दोन, तीन, चार याप्रमाणें आपल्या वीस हातांनीं आपली सर्व शक्ति खर्च करून तें आत्मलिंग उचलण्याचा प्रयत्न केला; पण सर्व व्यर्थ ! रावणानें आपली पराकाष्ठा केली; परंतु लिंग अनुमात्रही हालेना, तेव्हां तो त्या आत्मलिंगाजवळ बसून शोक करूं लागला. त्या शोकभरांत त्याचें देहभान जाऊन त्यानें आपलें वस्त्र, मुद्रिका, वगैरे फेंकून दिलीं. तेव्हां त्या प्रत्येक वस्तूचे ठिकाणीं एकेक लिंग उत्पन्न झालें. त्याचें वस्त्र जेथें पडलें तेथें मुरूडेश्वर या नांवाचें लिंग उत्पन्न झालें. मुद्रिका पडली होती तेथें जें लिंग उत्पन्न झालें, त्यास मुक्तेश्वर असें म्हणतात. शिवदोर टाकिला होता तेथें मुक्तेश्वर उत्पन्न झाला. व कानडें टाकिलें होतें तेथें धारेश्वर नांवाचें लिंग उत्पन्न झालें,व जेथें शिवशेज टाकिली, तेथें शेजेश्वर या नांवाचें लिंग उत्पन्न झालें. हे राजा जनमेजया, याप्रमाणें ही मंदोदरीची व आत्मलिंगाची कथा आहे.

---

# अध्याय १८ वा.

## १ दंडकारण्य कथा.

वरील कथा ऐकल्यानंतर जनमेजयराजा ऋषीला म्हणाला, " ऋषि, भरतखंडांतील दक्षिणेकडील भागाला 'दंडकारण्य' असें कां म्हणतात, तें सांगावें." तेव्हां वैशंपायनऋषि म्हणाले; " पूर्वी या दक्षिण देशामध्यें दंडक या नांवाचा एक मोठा प्रतापशाली राजा होऊन गेला. तो राजा मोठा पराक्रमी व वैभवशाली होता; परंतु तितकाच तो अभिमानी होता. आपणासारखें वैभवसंपन्न या पृथ्वीवर दुसरें कोणीं नाहीं असें त्याला वाटत असे. अशा गर्वानें तो अंध झालेला असल्यामुळें त्याच्याकडून साधुसंताचा उपमर्द होत असे. एकदां शृंगऋषि नदीवर स्नान करून राजमार्गानें जात असतां, समोरून राजाची स्वारी आली. राजास पाहतांच सर्व लोकांनीं बाजूला होऊन त्याला प्रणाम केला, परंतु शृंगऋषि, राजाकडे लक्ष न देतां, नीट रस्त्यानें तडक चालला. तेव्हां राजाला ऋषीचा फार राग आला; व तो त्याच्या अंगावर मोठ्यानें ओरडून म्हणाला, "अरे उन्मत्त ब्राह्मणा, तुला डोळ्यांनीं दिसत नाहीं काय ? मी या देशाचा राजा आहे. माझा अधिकार केवढा, माझी संपत्ति केवढी, माझें वैभव केवढें, याचा कांहीं तुला विचार आहे कीं नाहीं ? मी आल्याबरोबर मोठमोठे लोकही बाजूला होऊन त्यांनीं मला रस्ता मोकळा करून दिला, आणि तूं यःकश्चित ब्राह्मण असून तसाच उद्दामपणें पुढें येत आहेस ! " दंडकराजाचें असें हें गर्वोक्तिपूर्ण भाषण ऐकून शृंगऋषीलाही फार राग आला. तो म्हणाला, " हे दंडकराजा, मी तुला पुरें ओळखिलें आहे, परंतु तूंच मला ओळखिलें नाहींस असें वाटतें. अरे, मी च्यवनऋषीचा पुत्र शृंग आहे. माझें तेज, माझें तपसामर्थ्य व माझी कीर्ति तुला माहीत नाहीं असें वाटतें." शृंगऋषीचें हें उत्तर ऐकून दंडकराजाची अवस्था आगीवर तेल पडावें त्याप्रमाणें झाली. अगोदरच तो उन्मत्त, त्यांत तो रागावलेला, आणि तशांत आणखी शृंगऋषीचें वरील उत्तर मिळालें. मग काय ? राजाचा राग एकदम वाढला, व रागाच्या सपाट्यांत त्या दंडकराजानें आपल्या हातांतील चाबकाचा एक तडाका शृंगऋषीच्या पाठीवर मारला. त्याबरोबर शृंगऋषीही रागानें लाल झाला व त्या रागाच्या आवेशांत ' तूं व तुझें सर्व राज्य भस्म होवो ' असा त्यानें शाप दिला. त्याबरोबर तो राजा तर जळून गेलाच, परंतु त्याची सर्व अनपराधी प्रजाही राजाबरोबर खाक झाली व तो सुंदर प्रदेश लागलाच रुक्ष होऊन गेला. दंडकराजाचें राज्य सेतुबंधापासून विंध्याचलापर्यंत होतें. तितका सर्व प्रदेश जळून गेल्यामुळें तो अत्यंत भयाण झाला व तेथें एक चिट पाखरूंही उडतांना दिसेनासें झालें. त्या शापानें सर्व मनुष्येंच भस्म झालीं असें

नाहीं; तर सरिता, तडाग, वृक्ष, तृण, पक्षी व श्वापदें या सर्वांचा नाश होऊन गेला. अशा त्या वैराण झालेल्या प्रदेशावर पुढें पर्जन्यही पडेनासा झाला. हा भाग दंडकराजाचा असल्यामुळें त्याला 'दंडकारण्य' असें नांव पडलें. तेंच नांव पुढें तो प्रदेश भरभराटीला आला तरी अद्याप तसेंच चाललें आहे.

राजा जनमेजया, हें दंडकारण्य रुक्ष असून पुढें सुरम्य कसें झालें, तें तुला सांगतों. एकदां नारदाचे चिथावणीवरून मेरु व विंध्य या दोन पर्वतांमध्यें मोठें भांडण लागलें होतें. मेरू विंध्याचलाला म्हणाला; 'मी तुजपेक्षां उंच आहें.' व विंध्याचल म्हणे; 'मी तुझ्यापेक्षां उंच आहे.' याप्रमाणें त्या दोन्ही पर्वतांत चुरस लागल्यामुळें ते दोघेही उंच होऊं लागले. होतां होतां ते दोन्ही पर्वत आकाशांत उंच गेल्यामुळें सूर्य व चंद्र यांचे रथ आकाशांतून चालेनात. तेव्हां चंद्र व सूर्य उदयाला येण्याचें कार्य बंद पडलें. सूर्य व चंद्र यांच्या उदयास्तावर सृष्टीचे बहुतेक व्यवहार अवलंबून असल्यामुळें, ते सूर्यचंद्राच्या अभावीं होईनातसे झाले. होमहवनादि कर्में बंद पडलीं, जपतप व स्नानसंध्यादि व्यवहार करण्यास दिनमानाचें साधन नाहींसें झालें, आणि सर्वत्र मोठा घोंटाळा उडाला. या संकटाचें निवारण कसें करावें, याचा विचार करण्याकरितां ऋषि ब्रह्मदेवाकडे गेले. तेव्हां ब्रह्मदेवालाहि विचार पडला. मग त्यांनीं शंकर व विष्णूला ती हकीकत कळविली. तेव्हां ब्रह्मा, विष्णु व महेश या तिघांनीं विचार करून त्या कार्याचा भार अगस्तीऋषीवर टाकावा असा विचार ठरविला, व ते अगस्ती ऋषीजवळ जाऊन त्यास म्हणाले; "अगस्तीऋषि, तूं काशीक्षेत्र सोडून दक्षिण दिशेला विंध्याद्रिकडे जा; आणि त्याला कोणत्या तरी युक्तीनें भूमीवर शयन करावयाला लाव, म्हणजे आकाशांतील मार्ग मोकळा होऊन सृष्टीचे सर्व व्यवहार पूर्वीप्रमाणें सुरळीत चालतील. तसेंच दक्षिण देश शृंगऋषीच्या शापानें उध्वस्त झाला आहे, तेथें वस्ती करून तो पूर्वस्थितीला आण." श्रीभगवान् त्रिमूर्तीच्या आज्ञेप्रमाणें अगस्तीऋषि आपणाबरोबर आपला शिष्यसमुदाय घेऊन विंध्याद्रि पर्वताजवळ आले. त्या ऋषीस पाहतांच विंध्याद्रीनें त्यांची पूजा करून येण्याचें कारण विचारिलें. तेव्हां ऋषि म्हणाले. "बा विंध्याद्री तुझा हा प्रचंड देह व तुझी असामान्य शक्ति पाहून मला तुझ्याबद्दल मोठा अभिमान वाटतो. तुझा प्रताप ऐकून मेरू पर्वत तुझ्यावर फार रागावला आहे व देवही तुझा द्वेष करीत आहेत. परंतु तुला पीडा करण्याचें सामर्थ्य देवांच्या अंगांत नसल्यामुळें ते स्वस्थ बसले आहेत, व मेरूही तुझें हें विशाल शरीर पाहून गतधैर्य झाला आहे. त्यांनीं तुझा कितीही द्वेष केला तरी त्यांच्यापासून तुला काडीइतकाही त्रास होणार नाहीं; असा तुला माझा पूर्ण आशिर्वाद आहे." अगस्तीचें भाषण ऐकून विंध्याचलाला स्वतःविषयीं अधिक अभिमान उत्पन्न झाला, व अगस्तीऋषीविषयीं त्याच्या

मनांत फारच पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. त्यानें अगस्तीऋषीला साष्टांग प्रमाण केला, व तो हात जोडून विनयानें म्हणाला; " ऋषि, आपण मजविषयीं जो आदर व्यक्त केला, त्यामुळें मी आपला दासानुदास झालों आहे. आपलें कांहीं कार्य असल्यास सांगावें तें मी मोठ्या आनंदानें करीन." विंध्याद्रीवर आपला पूर्ण पगडा बसला आहे असें पाहून अगस्ती ऋषि म्हणाले; " बा विंध्याचला, मी दक्षिण दिशेकडील यात्रा करण्यासाठीं निघालों आहे. तूं वाटेंत उभा असल्यामुळें पलीकडे जाणेंयेणें बंद झालें आहे. करितां तूं जर आडवा होशील तर तुला ओलांडून मी पलीकडे जाऊं येऊं शकेन व मला आपली यात्रा पुरी करितां येईल. विंध्याचलानें ऋषीचें तें म्हणणें मोठ्या आनंदानें मान्य केलें व तो लागलीच भूमीवर आडवा होऊन अगस्ती ऋषीला म्हणाला; " ऋषि, आपण आतां खुशाल यात्रेला जावें. मी आपली आज्ञा होईपर्यंत असाच पडून निश्चित चित्तानें झोंप घेतों."

अशा युक्तीनें विंध्याचल पर्वताला अगस्ती ऋषीनें निजविल्यावर तिकडे मेरूही आपला उंचपणा टाकून देऊन ठेंगणा झाला. याप्रमाणें हे दोन्ही पर्वत खालावल्यावर सर्वत्र आनंदीआनंद झाला, आणि सूर्य व चंद्र यांचे रथ निष्प्रतिबन्ध रीतीनें आकाशांतून जाऊं लागले; आणि दिनमानाची व्यवस्था लागतांच सर्वांचे आश्रमधर्म व्यवस्थितपणें चालू लागले. अशा प्रकारें हें एक कार्य आटोपल्यावर अगस्ती ऋषि दंडकारण्य सुपीक करण्याच्या उद्योगाला लागले. अगस्ती ऋषीच्या तपःसामर्थ्यामुळें तेथें मेघ वृष्टी करूं लागले. नंतर ऋषींनीं आपणाबरोबर हिमालयापासून आणलेलीं बीजें पेरिलीं, त्यायोगें तो रुक्ष दंडकारण्याचा प्रदेश वृक्ष, लता, धान्य व तृण ह्यांनीं परिपूर्ण होऊन गेला. नद्या, वापी, तडाग वगैरे भरून गेलें. अनेक प्रकारचीं श्वापदें तेथें येऊन त्या घनदाट अरण्यांत सुखानें विहार करूं लागलीं. सारांश ती निर्जन भूमि नंदनवनाप्रमाणें मनोहर झाली. मग अगस्ती ऋषींनीं आपणाबरोबर जे ऋषि वगैरे आणिले होते, त्यांनां त्या सुंदर प्रदेशांत पवित्र नद्यांच्या कांठीं आश्रम बांधून राहण्यास सांगितलें व त्यांच्याकडून तो प्रदेश वसविला. अगस्तीऋषीनें जरी याप्रमाणें हा प्रदेश सुरम्य केला, तरी शृंग ऋषीच्या शापाची खूण अद्याप ह्या भूमींत तशीच राहिलेली आहे. ती खूण म्हणजे दंडकारण्यांतली भूमि इतर भुमीप्रमाणें कृष्णवर्णाची नसून राखेच्या वर्णाची आहे.

## २ पिठोरी–व्रत–कथा.

ही कथा ऐकल्यावर जनमेजयराजा म्हणाला; " ऋषि, स्त्रिया पिठोरीव्रत म्हणून जें एक व्रत करीत असतात, तें व्रत कोणी उत्पन्न केलें, त्याविषयींची कथा ऐकण्याची इच्छा आहे, तर ती सांगण्याची कृपा करावी." तेव्हां वैशंपायन ऋषि, ती कथा सांगू लागले. ते म्हणाले; राजा जनमेजया,

'ज्या स्त्रियांचीं मुलें लहानपणींच मृत होतात, त्या स्त्रियांनीं कोणतें व्रत केलें असतां त्यांची ती पीडा दूर होते;' असा प्रश्न एकदां धर्मानें श्रीकृष्णाला केला होता. त्या वेळीं कृष्णानें धर्माला जी कथा सांगितली होती, तीच मी तुला सांगतों. "ज्या स्त्रिया श्रावण महिन्यांतील अमावास्येच्या दिवशीं सायंकाळीं पिठोरीचें पूजन करितात; त्या स्त्रियांची संतति दीर्घायु होते. हें पिठोरीव्रत म्हणजे काय, व तें पूर्वीं कोणीं केलें होतें, याविषयीं तुला सांगतों. पूर्वीं कृतयुगामध्यें सुमंत या नांवाचा एक ब्राह्मण होता. तो मोठा पवित्र, उदार व सच्चरित्र होता. त्याच्या स्त्रीचें नांव हेममालिनी असें होतें. या हेममालिनीपासून त्यास सात मुलें झालीं होतीं. तीं मुलें चांगली कर्तीसवरतीं झालीं, व त्यांनांही मुलेंबाळें झालीं, परंतु या सुमंत ब्राह्मणाची वडील सून चंपा नांवाची होती, तिला मूल झालें, कीं ते श्रावणवद्य अमावास्येचे दिवशीं मृत होई. याप्रमाणें तिचीं सहा मुलें मृत झालीं, आणि सातव्या वेळीं ती गरोदर झाली. चंपाचीं मुलें जगत नसत म्हणून ती घरांत सर्वांस अप्रिय झाली होती, व तिची सासू तर तिचा तिरस्कार करीत असे. ह्याप्रसंगीं ती तिला म्हणाली, "चांडाळणी, तूं आपलीं स्वतःचीं मुलें खाणारीं राक्षसीणच आहेस. तुझ्यासारखी कपाळकरंटी सून मला मिळाल्यामुळें माझ्या मुलाला संसारसुख काडीइतकें देखील मिळत नाहीं. तूं मेली असतीस तर मी दुसरी तरी केली असती. तुझ्यासारखी सून मला नसलेली पतकरली. तूं आतांच्या आतां माझ्या घरांतून निघून जा." याप्रमाणें नाहीं नाहीं तें बोलून त्या निर्दय हेममालिनीनें आपल्या त्या गरीब सुनेला घराच्या बाहेर घालवून दिलें. त्यावेळीं ती चंपा अत्यंत शोकाकुल झाली, व आपल्या प्राक्तनावर भार ठेवून एका अरण्यांत येऊन राहिली. त्या अरण्यांत असतांना श्रावण वद्य अमावास्येचे दिवशीं सायंकाळचे वेळीं ती प्रसूत झाली, व तिला मुलगा झाला; परंतु तो झाला तोंच मृत झाला. तेव्हां चंपेला अत्यंत दुःख झालें, व त्या दुःखाच्या आवेशांत जीव देण्याकरितां ती एका सरोवराच्या कांठीं गेली. तेथें सात सुंदर स्त्रिया भुमीवर चित्रें काढून पूजा करीत होत्या. चंपेला पाहतांच त्या स्त्रियांनीं ती आपली पूजा वस्त्रांनीं झांकून टाकिली. तेव्हां चंपा दीनवाणीनें म्हणाली, "बायांनों, मी एक दुर्भागी स्त्री आहें. तुमच्या अनुग्रहानें आपलें दुःख हलकें करून घ्यावें म्हणून मी तुमच्याकडे आलें. तुम्ही ही कसली पूजा करीत आहां व या व्रताची फलप्राप्ति काय, तें मला सांगाल तर फार उपकार होतील." चंपेचें तें दीनवाणें भाषण ऐकून त्या सातही स्त्रियांनां तिची दया आली व त्यांनीं तिला आपणाजवळ बसवून घेतलें. नंतर त्यांच्यापैकीं एक स्त्री चंपेला म्हणाली, "चंपे, आम्हीं जें आतां व्रत करीत आहों, त्या व्रताला पिठोरीव्रत असें म्हणतात. हें व्रत केलें असतां संतति होऊन ती दीर्घायु होते." त्या स्त्रीचें भाषण ऐकून रोग्याच्या

हातांत अमृतचिंतामणीची मात्रा पडावी, त्याप्रमाणें चंपेला आनंद झाला. ती त्या स्त्रियांना म्हणाली, "बायानों, हें व्रत कसें करावयाचें तें आपण मला सांगाल तर मजवर मोठे उपकार होतील. मी ब्राह्मणाची स्त्री असून मला जी संतति होते ती लगेच मृत्यु पावते. याप्रमाणें माझीं सहा मुलें मृत झालीं आणि सातव्या वेळीं मी गरोदर असतांना या माझ्या अवगुणामुळें मला माझ्या सासूनें घराच्या बाहेर घालवून दिलें. तेव्हां मी अरण्यांत येऊन राहिलें. येथें मी आजच प्रसूत झालें, पण मला मुलगा झाला नाहीं तोंच तो मृत झाला. त्यामुळें मी वैतागून गेलें, व या अरण्यांत प्राण देण्याकरितां इकडे एखादें स्थल शोधण्याकरितां हिंडत होतें, तों येथें तुमचें दर्शन झालें. जर मला तुम्हीं हें व्रत कसें करावयाचें तें सांगाल तर तें मी मोठ्या भक्तिभावानें करीन." चंपेची हकीकत ऐकून त्या स्त्रियांनां तिची दया आली. मग त्यांनीं त्या पिठोरी-व्रतासाठीं आपल्या पूजेंतून सर्व साहित्य दिलें व तें व्रत कसें करावयाचें तें त्या सांगू लागल्या. त्यांपैकीं एक म्हणाली; "प्रत्येक श्रावण वद्य अमावास्येचे दिवशीं भूमि सारवून त्यावर सात अप्सरा व सात योगिनी काढून दळण, कांडण, सुसळण, स्वयंपाक, उतरंडी वगैरे चित्रें काढावीं, व कांहीं शिवालयें व मुलेंही काढावींत. नंतर त्या सर्वांची गंधपुष्पांनीं पूजा करावी व नैवेद्य समर्पण करावा. याप्रमाणें पूजा झाल्यावर वाटींत अन्न घालून तें वाण स्त्रीनें आपल्या मुलाला द्यावें. त्यावेळीं आईनें 'अतीत कोण आहे?' असें म्हणावें, व पुत्रानें 'मीच अतीत आहे' असें म्हणून तें वाण घ्यावें, व त्यांतील अन्न खाऊन टाकावें. तें वाण देतेवेळीं स्त्रीनें मागें पाहूं नये. हें व्रत तूं आतांच कर व 'अतीत कोण आहे?' म्हणून विचार, म्हणजे तुला तुझ्या सर्व पुत्रांची प्राप्ति होईल." त्या बाईच्या सूचनेप्रमाणें चंपेनें स्नान वगैरे करून भूमि सारविली; व त्यावर त्या स्त्रियांनीं सांगितल्याप्रमाणें चित्रें काढून त्यांची भक्तिभावानें पूजा केली. नंतर तिनें त्या पिठोरी देवतेला नैवेद्य समर्पण करून वाणें तयार केलीं, व ती 'अतीत कोण आहे?' म्हणून म्हणाली. त्याबरोबर तिचा वडील मुलगा आला व 'मी अतीत आहें' म्हणून म्हणाला. तिनें त्या मुलाला वाण दिलें, व पुन्हा 'अतीत कोण आहे?' म्हणून विचारिलें, तेव्हां तिचा दुसरा मुलगा आला व त्यानें तें वाण घेतलें. याप्रमाणें तिचे सातही पुत्र आले व त्यांनीं तिच्याजवळून वाणें घेतलीं. अशा रीतीनें सातही पुत्र प्राप्त झाल्यामुळें चंपेला अत्यानंद झाला. तिनें त्या सातही स्त्रियांचे मनापासून आभार मानले, पण इतक्यांत त्या सातही देवता गुप्त झाल्या. तेव्हां चंपेला ही लीला ईश्वराची आहे असें दिसून आलें. नंतर आपल्या सातही मुलांनां बरोबर घेऊन ती आपल्या सासरीं आली. सून मुलांसह येत आहे, हें पाहून हेममालिनीला मोठें आश्चर्य वाटलें. तिनें आपल्या नातवांवरून लिंबलोण उतरून त्यांस प्रेमानें पोटाशीं कुरवाळून धरिलें,

व हर्षभरानें ती म्हणाली, 'बाई चंपे, तूं कोणत्या देवाला प्रसन्न करून हे पुत्र मिळविलेस ?' तेव्हां चंपेनें घडलेली सर्व हकीकत आपल्या सासूला निवेदन केली. श्रीकृष्ण म्हणाले, "धर्मा, तेव्हांपासून हें पिठोरीव्रत चालू झालें आहे. या व्रताचें उद्यापन करतेवेळीं ज्ञात्या ब्राह्मणास गव्हांनीं भरलेल्या सात दुरड्या, व कांचोळ्यासह सात वायनें द्यावींत. हें व्रत जो यथासांग करील त्याची संतति दीर्घायु होते." हे राजा जनमेजया, याप्रमाणें कृष्णानें युधिष्ठिराला सांगितलेली पिठोरी व्रताची कथा मीं तुला निवेदन केली आहे. "

---

## अध्याय १९ वा.

### १. हुताशनी कथा.

वरील कथा ऐकल्यानंतर जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला, "फाल्गुन शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं हुताशनी करून लोक शंखध्वनि करितात, त्याचें कारण काय, व त्याविषयीं कोणती कथा आहे, तें सांगावें." तेव्हां ऋषि म्हणाले, " हे राजा जनमेजया, हाच प्रश्न युधिष्ठिरानें श्रीकृष्णाला केला होता; त्यावेळीं श्रीकृष्णानें जी कथा धर्माला सांगितली होती, तीच मी तुला कथन करितों. पूर्वी कृतयुगांत अयोध्येस रघु या नांवाचा एक राजा राज्य करीत होता. तो मोठा शूर, पराक्रमी, उदार, सत्वशील व पुण्यवान् होता. आपल्या बाहुबळानें सर्व पृथ्वी जिंकून तो सार्वभौम राजा झाला होता. प्रजेच्या संरक्षणासाठीं तो नेहमीं दक्ष असे. राजाप्रमाणें त्याची प्रजाही पापभीरु व धर्मरत असे. राजा व प्रजा असे उभयतां धर्मन्यायानें वागणारे असल्यामुळें दुर्भिक्ष कसें असतें तें त्या रघुराजाच्या प्रजेला मुळींच माहीत नव्हतें. अशा प्रकारें तो राजा राज्य करीत असतां त्याच्या राज्यांत ढुंढा या नांवाची एक दुष्ट राक्षसीण आली. ती धुंडून म्हणजे शोध करून लहान मुलें भक्षण करीत असे. म्हणून तिला ढुंढाराक्षसी असें म्हणत असत. ती राक्षसी विशाल देहधारी, व फार क्रूर होती. लहान मूल दृष्टीस पडलें कीं, तें ती संबंध उचलून तोंडांत टाकीत असे. त्या राक्षसिणीच्या त्रासानें सर्व लोक त्रस्त झाले व त्यांनीं आपल्या राजाला सर्व वर्तमान कळवून आपलें रक्षण करण्याविषयीं विनंति केली. राजानें आपल्या प्रजेची विनंती मान्य करून त्यांस अश्वासन दिलें, व त्या राक्षसिणीचा नाश कशा प्रकारें करावा, याचा विचार करण्याकरितां तो कुलगुरू वसिष्ठऋषि यांजकडे गेला; व त्यांस विनयपूर्वक म्हणाला, " ऋषि, माझ्या राज्यांत ढुंढा या नांवाची एक राक्षसीण आली असून ती मनुष्यांचा संहार करीत आहे. या राक्षसिणीची काय व्यवस्था करावी, तें विचारण्यासाठीं मी

आपणाकडे आलों आहें. तसेंच ही राक्षसीण उत्पन्न कशी झाली, तिला एवढी शक्ति कोठून प्राप्त झाली, व तिचा नाश कोणत्या उपायानें होणार, तें कृपाकरून सांगावें." रघुराजाची विनंति ऐकून वसिष्ठऋषि, राजाला ढुंढाराक्षसिणीची कथा सांगू लागले. ते म्हणाले; "हे राजा, मालिनी नांवाची एक राक्षसीण होती, तिची ही ढुंढा मुलगी आहे. तिनें पुष्कळ दिवसपर्यंत लोहचूर्ण भक्षण करून, व धूम्रपान सेवन करून पंचाग्निसाधन केलें होतें. तिची ती कडकडीत तपश्चर्या पाहून शंकर तिला प्रसन्न झाले व 'वर माग' म्हणून म्हणाले. तेव्हां ही राक्षसीण म्हणाली, "हे उमारमणा, तूं जर खरोखर मला प्रसन्न झाला आहेस, सर्व त्रैलोक्य मीं जिंकावें, मला कोणा पासूनही मरण प्राप्त होऊं नये, कोणाच्याही शापानें, शस्त्रानें किंवा अस्त्रानें मला मृत्यु येऊं नये, तसेंच थंडीनें किंवा उष्णतेनें, रात्रीं अथवा दिवसा व गांवांत किंवा रानांतही मला मृत्यु येऊं नये." तेव्हां शंकर म्हणाले, "हे ढुंढे, तूं म्हणतेस त्याप्रमाणें मी तुला वर देतों, परंतु तुझा मृत्यु अपशब्दाच्या उच्चारानें मात्र होईल. फाल्गुन शुद्ध पौर्णिमेस लोकांनीं अपशब्दाचा उच्चार केला असतां तुझीं गात्रें क्षीण होऊन तूं मरण पावशील, मग नगरवासी लोक तुझ्या मृत्यूनें आनंद पावून मोटा उत्सव करितील. तुझ्यावर लांकडें ठेवून तुझें दहन करितील, व दुसरे दिवशीं तुझी रक्षा उधळून देतील." हें महादेवाचें भाषण ऐकून ढुंढा राक्षसीण म्हणाली; "हे कैलासनाथा, माझें हें मर्मस्थान लोकांनां माहीत होऊन जर माझा मृत्यु झाला, तर माझें नांव मागें राहील किंवा नाहीं?" तेव्हां शंकर म्हणाले; "हे ढुंढे, तुझ्या मृत्युचें सुतक लोक पांच दिवस पाळतील व त्या पांच दिवसांत लोक धूळ, राख, गोमय, वगैरे घाणेरडे पदार्थ घेऊन क्रीडा करितील, आणि तोंडानें अभद्र शब्दांचा उच्चार करितील; व तुझें सुतक पाळून तुला नारळ अर्पण करितील. असें केल्यानें त्यांच्या सर्व विघ्नांचा नाश होऊन सुख प्राप्त होईल." वसिष्ठ ऋषि म्हणाले, हे रघुराजा, याप्रमाणें त्या ढुंढाराक्षसिणीचा इतिहास आहे. हिचा वध वसंतऋतूंत होणार आहे. एवढ्यासाठीं, शीतकाळ संपल्याबरोबर व उष्णकाळाला आरंभ होण्याचे आधीं, तुम्ही मोठ्यानें शंखध्वनि करून, अपशब्दांचा उच्चार करावा, म्हणजे ती दुष्ट राक्षसीण मृत्यु पावेल. ती मेल्यानंतर चिता तयार करून अग्नि लावावा. नंतर त्या चितेला तीन प्रदक्षिणा घालून शंखनाद करावा. ती पेटलेली चिता ज्या दिशेला ढांसळेल ती दिशा अशुभ असें जाणावें. ही ढुंढाराक्षसीण हुत झाल्यावर तिला हुताशनी असें म्हणावें. याप्रमाणें ती राक्षसीण हुत झाल्यावर तिचें तुम्ही पांच दिवस सुतक पाळा; म्हणजे तुमच्या सर्व विघ्नांचा नाश होऊन जाईल. नंतर पांचव्या दिवशीं चितेच्या जागीं उदक शिंपडून धूप दीप दाखवून पूजा करावी, आणि सुवासिक रंग तयार करून तो लहान मुलांनीं एकमेकांच्या अंगावर शिंपडावा. म्हणजे

त्या मुलांच्या सर्व पीडा दूर होतील. हे रघुराजा, याप्रमाणें तूं फाल्गुन शुद्ध पंचमीचे दिवशीं स्वतः आपल्या प्रजाजनांकडून करीव, म्हणजे त्या क्रूर ढुंढाराक्षसिणीचा नाश होईल व तुम्ही सर्वजण सुखी व्हाल."

वैशंपायनऋषि जनमेजय राजाला सांगतात, "हे राजा, जनमेजया, याप्रमाणें वसिष्ठांनीं रघुराजाला सांगितल्यावर तो राजा ऋषीला वंदन करून अयोध्येला परत आला; व नागरिकांना आपणाबरोबर घेऊन त्यानें वसिष्ठानें सांगितल्याप्रमाणें सर्व लोकांकडून मोठ्यानें शंखध्वनि व अपशब्दांचा गजर चालविला. त्याबरोबर त्या ढुंढाराक्षसिणीचीं पंचगात्रें आकळूं लागलीं. ती धांवत नगराचे वेशीजवळ गेली, व तेथें तिचें प्राणोत्क्रमण झालें. नंतर लोकांनीं लांकडाची विस्तृत चिता करून त्यावर त्या विशाल राक्षिणीला निजवून ती पेटवून दिली. नंतर पांच दिवस सुतक धरून त्या पांच रात्रीं जागरण केलें, व ते पांच दिवस वसिष्ठांनीं सांगितल्याप्रमाणें अश्लील क्रीडा करण्यांत घालविले."

ऋषि म्हणाले, "राजा जनमेजया, याप्रमाणें ही होळीची कथा आहे. त्या ढुंढाराक्षसिणीचा जरी नाश झाला आहे, तरी महादेवाच्या वरप्रदानाप्रमाणें पुष्कळ लोक तिचा उत्सव अद्यापही करीत आहेत. प्रत्येकानें फाल्गुन शुद्ध पंचमीचे दिवशीं हुताशनी करून पांचव्या दिवशीं होळी विसर्जन करावी. सडा-संमार्जन करून होळीची जागा निर्मळ करावी, व त्यावर रंगवाल्लिका काढून चौक तयार करावा. त्या चौकाच्या चारी बाजूला चार कलश ठेवून ते सुतानें सुतवावेत. त्या चौकावर सुवासिनी व मुलें यांनां बसवून त्यांच्या अंगावर केशर व चंदन कालवून शिंपडावें. सुवासिनीला सौभाग्य वायनें द्यावीत. तसेंच देव व आंब्याचा वृक्ष यांची पूजा करून त्यांच्यावरही चंदन व केशर टाकावें. हे राजा जनमेजया, या हुताशनीविषयीं भविष्योत्तरपुराणांत जी कथा आहे, ती तुला कथन केली आहे. याविषयीं दुसरें एक मत आहे, तें असें:—पूर्वी मदनानें शंकराला फसविल्यामुळें शंकर त्यावर रागावले व त्यांनीं रागांत मदनाला जाळून टाकण्याचा आरंभ केला. त्यावेळीं पार्वती महादेवाजवळच होती. मदन सर्वस्वी जळाल्यास जगांत मोठा अनर्थ होईल असें जाणून पार्वतीनें हळूच मदनाचा एक जव आपल्या नखांत लपवून ठेविला. मदन एकंदर तेरा जव होता; त्या पैकीं पार्वतीनें एक जव लपवून ठेविला व बारा जव मदन, शंकराच्या तृतीय नेत्रानें जळून गेला. तो राहिलेला एक जव पार्वतीजवळ कित्येक दिवसपर्यंत तसाच होता. पुढें कांहीं दिवसांनीं होळकासूर नांवाचा एक राक्षस उन्मत्त होऊन त्यानें सर्वत्र अत्यंत त्रास दिला. त्याचा नाश कोणाच्यानेंही होईना; तेव्हां पार्वतीनें त्या राक्षसाबरोबर युद्ध करून त्याचा नाश केला, व चिता तयार करून त्याचें शव दहन केलें, व त्या सभोंवतीं आपल्या बत्तीस सख्यांसह पार्वतीनें अनेक प्रकारची क्रीडा केली. तेव्हां तिच्या नखांत असलेला एक जव

मदन बाहेर पडला व त्याला पुन्हा पूर्व स्वरूप प्राप्त झालें. तो दिवस फाल्गुन शुद्ध पौर्णिमेचा होता. मदन पूर्णरूपानें प्रगट झाला व होळकासूर मरण पावला, म्हणून त्या स्त्रियांना आनंद झाला होता. त्यांनीं तो आनंदोत्सव पांच दिवस-पर्यंत केला. तेव्हांपासून हें होळीचें व्रत पृथ्वीवर आलें आहे. ही कथा लिंग-पुराणांत विस्तारानें दिलेली आहे. ती मी तुला संक्षेपानें कथन केली आहे."

## २. विजयादशमीकथा.

वरील कथा ऐकल्यावर जनमेजयराजा वैशंपायन ऋषीला म्हणाला, "ऋषि, आपण होळीसंबंधानें कथा सांगून जशी माझी जिज्ञासा तृप्त केलीत, त्याप्रमाणेंच विजयादशमीची कथा ऐकण्याची इच्छा झाली आहे, तर ही माझी इच्छा आपण पूर्ण करावी. या रघुराजानें हुताशनीचें जसें व्रत चालू केलें, त्याप्रमाणेंच विजयादशमीचें व्रतही त्यानेंच चालू केलें, असें मी ऐकिलें आहे. तर हें व्रत त्या राजानें कसें निर्माण केलें, व त्या दिवशीं शमी आपट्याचें पूजन कां करितात, त्या झाडाचीं पानें व मृत्तिका घरांत आणून कां टाकितात, वगैरे सर्व शंकांची आपण निवृत्ति करावी." तेव्हां वैशंपायनऋषि, म्हणाले; "हे राजा जनमेजया, पूर्वी पैठण नांवाच्या नगरांत देवदत्त नांवाचा एक ब्राह्मण राहत होता. त्याला कौत्स नांवाचा एक सुलक्षणी, सुशील व सुंदर मुलगा होता. तो मुलगा प्रौढ झाल्यावर आपण वेदशास्त्राचा अभ्यास करावा, अशी त्यास इच्छा उत्पन्न झाली; परंतु त्याच पैठण नावाच्या नगरांत वेदाभ्यासाची कांहींच सोय नव्हती. परंतु त्या समयास एक विद्वान ब्राम्हण तीर्थयात्रा करीत तेथें आला. त्याची व कौत्साची भेट झाल्यावर त्या दोघांचें वेदा-ध्ययनासंबंधानें पुष्कळ बोलणें झालें, व कौत्स ब्राह्मणाची विद्येविषयीं कळकळ पाहून त्या यात्रेकरू ब्राह्मणाला मोठें कौतुक वाटलें. तो त्या कौत्साला म्हणाला; "हे कौत्सा, तुला जर चांगल्या रीतीनें वेदपठण करावयाचें असेल तर तूं भडोज नांवाच्या शहरांत जा. तेथें वरतंतु नांवाचा एक ऋषि आहे तो सर्व शास्त्रांत पारंगत आहे. तो कांहींएक मोबदला न घेतां विद्यार्थ्यास शिकवितो." त्या ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून कौत्सास आनंद झाला, व त्यानें तेथें जाण्याचा आपला विचार आपल्या आईबापास कळवून त्यांची त्यानें परवानगी मिळविली, व भडोज येथें जाऊन वरतंतू ब्राह्मणास आपला हेतु कळविला. कौत्सकाचा हेतु पाहून वरतंतूला आनंद झाला व त्यानें सुमुहूर्त पाहून त्याला विद्या शिकविण्यास आरंभ केला.

कांहीं दिवसांनीं कौत्स ब्राम्हण सर्व शास्त्रांत पारंगत झाला. तेव्हां गुरूला कोणती गुरुदक्षिणा द्यावी व त्यांच्या ऋणांतून कसें मुक्त व्हावें, याचा त्यास विचार पडला. एके दिवशीं तो आपल्या गुरूला म्हणाला; "वरतंतु महाराज, आपल्या विद्यादानानें मी आपला अत्यंत ऋणि झालों आहें. आपणास कांहीं

तरी गुरुदक्षिणा द्यावी अशी इच्छा आहे, तर आपणास कशाची आवड आहे तें सांगावें, म्हणजे मी तें आपणास आणवून देण्याचा प्रयत्न करितों. " तेव्हां गुरु म्हणाले, " बा कौत्सा, तुजजवळून कांहीं घ्यावें अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. विद्या विकणें हें कर्म अनुचित असल्यामुळें मी कोणाजवळून गुरु-दक्षिणा घेत नाहीं. शिष्य विद्येनें सुसंस्कृत झालेला पाहून गुरुला जो आनंद होतो, तीच खरी गुरुदक्षिणा होय. तें समाधान मला तुझ्यामुळें प्राप्त झालें, हीच मी तुझी गुरुदक्षिणा समजतों. " गुरूला योग्य दक्षिणा न दिल्यास विद्या सफल होत नाहीं अशी कौत्साची पूर्ण भावना असल्यामुळें, आपणाजवळून गुरु-दक्षिणा घेत नाहींत तेव्हां आपण दुर्भागी आहोंत, असें कौत्सास वाटूं लागलें. व आपणाजवळून कांहीं तरी दक्षिणा घ्यावी असें त्यास वाटून तो वरतंतूची परोपरीनें विनंति करूं लागला. तेव्हां वरतंतु म्हणाला; " हे कौत्सा, जर दक्षिणा देण्याचीच इच्छा असेल तर, मी तुला चौदा विद्या शिकविल्या आहेत, तेव्हां प्रत्येक विद्येबद्दल एक कोटी या प्रमाणें चौदा कोटी मुद्रा आणून दे. पण या चौदा कोटी मुद्रा तूं एका जवळूनच आणून दिल्या पाहिजेत, दहा वीस घरें भिक्षा मागून आणशील तर मी ती दक्षिणा घेणार नाहीं. " अशा अटीवरच कां होईना, परंतु गुरु दक्षिणा घेण्यास कबूल झाले, याबद्दल कौत्साला आनंद झाला, व गुरुला वंदन करून दक्षिणा आणण्यासाठीं तो निघाला.

चौदा कोटी मुद्रा म्हणजे कांहीं लहान सहान रकम नव्हे, तेव्हां एवढी रकम आणावयाची कोठून याची कौत्साला मोठी काळजी उत्पन्न झाली. त्यानें मोठमोठ्या राजाकडे जाऊन आपली गरज कळविली; परंतु चौदा कोटीची रकम एकदम कोणीही देईना. तो सर्व पृथ्वीवर हिंडला, परंतु चौदा कोटी मुद्रा देणारा त्याला कोणीही यजमान भेटला नाहीं. तेव्हां कौत्सास फार वाईट वाटलें, व गुरूला दक्षिणा घेण्याविषयीं आपण निष्कारण आग्रह केला असें वाटून चिंतेनें तो व्याकूळ झाला. अशा स्थितींत असतां, त्याला एक ब्राह्मण भेटला. दोघांनीं एकमेकाला आपलें मनोगत कळविल्यावर तो ब्राह्मण कौत्सास म्हणाला; ' अरे कौत्सा, तूं अयोध्येस जाऊन रघुराजाला भेट म्हणजे तुझें हें कार्य सहज होईल. तो राजा अत्यंत दयाळू, उदार व सच्चरित्र आहे. कोणी कसाही अतिथि येवो, त्याची इच्छा तो पूर्ण केल्यावांचून राहत नाहीं. तो एकटा रघुराजा तुला चौदा कोटी मुद्रा सहज देईल.' ब्राह्मणाच्या सूचनेप्रमाणें कौत्स अयोध्येला गेला. व त्यानें रघुराजाची गांठ घेतली. त्या सर्वविद्यापरिपूर्ण अशा कौत्स ब्राह्मणाला पाहून राजानें त्याचा योग्य सत्कार केला; व त्या विद्वान् ब्राह्मणाचे पुजेकरितां राणीला पूजा साहित्य घेऊन बोलाविलें. आज्ञा होतांच पतीच्या आज्ञेंत वागणारी ती राणी पूजासाहित्य घेऊन आली. इतका वेळपर्यंत आपला कार्यभाग सहज होईल, असा कौत्साला मोठा भरंवसा होता, परंतु राणीनें परिधान केलेलें

साधें पातळ, सुवर्ण कळशा ऐवजीं पाण्यानें भरलेलें मातीचें मडकें व सुवर्णताटा ऐवजीं खापराचें परळ, व अंगावरील ताडपत्राचे अलंकार, वगैरे प्रकार पाहून कौत्साची आशा पार मावळून गेली. ती अशी दरिद्रावस्था रघुराजाला येण्याचें कारण असें होतें कीं, त्यानें विश्वजित यज्ञ केला होता, व त्या यज्ञप्रसंगीं त्यानें आपलें सर्व द्रव्यभांडार ब्राह्मणाकडून लुटविलें होतें. तो यज्ञ नुकताच झालेला असल्यामुळें तो रघुराजा निष्कांचन झाला होता. असो.

ब्राह्मणाची पूजा केल्यानंतर राजा म्हणाला; "महाराज, या दासाला जी आज्ञा करावयाची असेल ती निःशंकपणें करावी. मी ती आज्ञा शिरसावंद्य करीन व आपणास संतुष्ट करण्याचा प्रयत्न करीन." रघुराजाचें भाषण ऐकून कौत्स ब्राम्हण दीर्घ निःश्वास सोडून म्हणाला; "राजा, माझ्या सर्व इच्छा तुला व तुझ्या राणीला पाहून पूर्ण झाल्या. दात्याची शक्ति पाहून मागणें मागावें असें शास्त्र आहे; नाहींतर तो मागणारा मूर्ख ठरतो. त्याप्रमाणें तुम्हां दोघांचें हें ऐश्वर्य पाहून कांहीं मागण्यापेक्षां गप बसलेलेंच बरें, असें मला वाटतें." तेव्हां रघुराजा म्हणाला; "हे द्विजश्रेष्ठ कौत्सा, आपण माझ्या स्थितीसंबंधानें मुळीं देखील काळजी करूं नये. आपली जी कांहीं इच्छा असेल ती मला सांगावी आपलें कार्य कितीही दुर्घट असलें तरी मी करीन." रघुराजानें अशी विनंति केल्यावर तो कौत्स ब्राह्मण म्हणाला, "हे रघुराजा, तूं म्हणतोस म्हणून मी तुला आपली इच्छा कळवितों, परंतु ती इच्छा तूं पूर्ण करावीस असा माझा मुळींच आग्रह नाहीं. शक्य असल्यास पूर्ण कर, शक्य नसल्यास तूं आपणाला कोणत्याही संकटांत घालून घेऊं नकोस. मी ज्या गुरूजवळ विद्या शिकण्यासाठीं राहिलों होतों, त्या गुरूनें गुरुदक्षिणा म्हणून माझ्याजवळ चौदा कोटी मुद्रा मागितल्या आहेत. इतक्या मुद्रा मजजवळ नसल्यामुळें मी तुजकडे आलों आहे. दहा घरीं भिक्षा मागून मी चौदा कोटी मुद्रा मिळविल्या असत्या; परंतु अशा रीतीनें गोळा केलेली दक्षिणा मी घेणार नाहीं, असें माझ्या गुरूनें मला बजाविलें आहे, म्हणून मी तुझी कीर्ति ऐकून तुजकडे द्रव्य मागण्यास आलों, पण तुझें हें ऐश्वर्य पाहून आतां मला पश्चात्ताप वाटूं लागला आहे."

कौत्स ब्राह्मणाचें तें निराशायुक्त भाषण ऐकून रघुराजाला किंचित हंसूं आलें. तो त्या ब्राह्मणाला म्हणाला; "महाराज आपण म्हणतां यांत आपली कांहीं चूक नाहीं. मी विश्वजित यज्ञ केल्यामुळें हल्लीं अगदीं निष्कांचन झालों आहे, तथापि मी आपणाला चौदा कोटी मुद्रा लवकरच देतों, त्याबद्दल आपण खात्री बाळगा. जरी मी अशा स्थितींत आहे, तरी मी आपणाला एवढी रक्कम दोन तीन दिवसाच्या मुदतींत सहज देईन." असें म्हणून त्यानें आपल्या प्रधानाला बोलाविलें व त्याला त्या ब्राह्मणाचा हेतु कळविला. तेव्हां प्रधान म्हणाला; "महाराज, चौदा कोटी मुद्रा या ब्राह्मणाला सांप्रत देणें अशक्य आहे.

कारण यावेळीं सर्व मांडलिक राजांचा कारभार चुकता झाला आहे, व प्रजेकडेही जमीन महसुलासंबंधानें हक्त घेणें राहिलेला नाहीं. यज्ञप्रसंगीं इंद्राकडून मात्र संपत्ति आणावयाची राहिली होती, ती त्यानें या वेळीं दिल्यास मात्र या ब्राह्मणाची इच्छा पूर्ण करितां येईल" प्रधानाचें भाषण ऐकून रघुराजाला मोठा आनंद झाला व त्यानें इंद्रावर स्वारी करण्याविषयीं प्रधानाला आज्ञा केली; आणि स्वारी करण्यासाठीं उत्तम दिवस कोणता, असें ब्राह्मणाला विचारिलें. तेव्हां त्या ब्राह्मणानें आश्विन शुद्ध दशमी हा दिवस सुचविला. त्या दिवशीं श्रवण नक्षत्र असून चंद्र मकर स्थानीं होता. त्या दिवशीं दक्षिण दिशेनें बाहेर पडून स्वारी केल्यास तुम्हाला खात्रीनें यशप्राप्ति होईल, असें ब्राह्मणानें सांगितलें. हें वर्तमान नारदाला समजतांच तो इंद्राकडे गेला, व त्यानें रघुराजाची सर्व हकीकत इंद्रास कळविली. तेव्हां इंद्रानें कुबेरास बोलावून रघुराजाच्या नगरांत सुवर्णमुद्रेचा वर्षाव करण्याची आज्ञा केली. देवेंद्राची आज्ञा होतांच कुबेरानें अयोध्या नगराबाहेर शमी व आपट्याचें झाड होतें, त्यावर हेममेघाकडून सुवर्णाची वृष्टी करविली.

इकडे अयोध्येंतील लोक सूर्योदय झाल्यावर पाहतात, तों शमी व आपट्याच्या वृक्षांवर सुवर्णवृष्टि होऊन तेथें सुवर्णाचा एक मोठा पर्वत तयार झाला आहे. तो चमत्कार पाहून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. राजानें त्या सर्व सुवर्णमुद्रा उंटावर चढवून त्या ब्राह्मणाच्या स्वाधीन केल्या. कौत्स तें घेऊन गुरूकडे आला व गुरूला वंदन करून त्यानें तें सर्व द्रव्य गुरूपुढें ठेविलें; परंतु वरतंतूनें त्यांतून चौदा कोटी मुद्रा घेऊन बाकीचें परत नेण्यास सांगितलें. तेव्हां तें उरलेलें द्रव्य घेऊन राजाचे दूत अयोध्येला परत आले, व राजास सर्व प्रकार सांगून त्यांनीं तें द्रव्य पुढें ठेविलें! पण राजाही त्या द्रव्याचा स्वीकार करीना. त्यानें तें सर्व द्रव्य कौत्साकडे पाठवून कळविलें, कीं हें सर्व द्रव्य आपल्यामुळें प्राप्त झालें आहे, तेव्हा तें आपण ठेवावें. परंतु कौत्सानें राजास उलट कळविलें कीं, "राजा, मला फक्त गुरुदक्षिणेपुरत्या द्रव्याची आवश्यकता होती. तो माझा कार्यभाग झाला आहे, तेव्हां आतां मला या द्रव्याला घेऊन काय करावयाचें आहे? मी वेदपठण करणारा ब्राह्मण आहे. तुझ्यासारख्या राजाकडून माझा योगक्षेम चालत आहे. मला या पापमूलक द्रव्याचा विटाळ नको." याप्रमाणें तें सुवर्ण कोणीच घेईना तेव्हां राजानें तें शमी–आपट्याच्या वृक्षांजवळ नेऊन ठेविलें.

हे राजाजनमेजया, तेव्हांपासून लोक हा दसऱ्याचा-म्हणजे विजया दशमीचा सण पाळतात. विजयादशमीच्या दिवशीं अयोध्येंतील लोकांनीं शमी व आपटा या वृक्षांचें पूजन करून तें सर्व सुवर्ण लुटून नेलें व एकमेकांनां देऊन आनंद व्यक्त केला. शमी ही आपट्याची स्त्री आहे, व ते दोघे एका शय्येवर असतांना त्यांच्यावर सुवर्णवृष्टि झाली होती. म्हणून विजयादशमीच्या दिवशीं या दोन्ही

वृक्षांची पूजा करून त्यांचीं पानें व तेथील तीन मुठी मृत्तिका आणून आपल्या घरांत ठेवितात. ही रघुवंशाची कथा रामायणांत पंचम सर्गात आहे, ती मी तुला संक्षेपानें कथन केली आहे.

---

# अध्याय २० वा.

## अनंतव्रतकथा.

यानंतर अनंतव्रताची कथा वैशंपायन ऋषि राजाला सांगूं लागले ते म्हणाले; "राजा जनमेजया, पूर्वी धर्मराज, वनवासांत असतांनां श्रीकृष्णाला म्हणाला; हे श्रीकृष्णा, तूं एवढा आमचा साह्यकारी असतां आम्हाला अशी विपत्ति कां प्राप्त झाली, व हें संकट दूर करण्याचा उपाय काय?" तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले; "हे युधिष्ठरा, चक्रनेमीक्रमाप्रमाणें सुख व दुःख अशा दोन्ही अवस्था मनुष्यास भोगणें भाग आहे. विपदावस्था ही एक कसोटी असून तिच्या योगानें मनुष्याचें शील कसाला लागतें. एवढ्यासाठीं संकट समयीं धैर्य न सोडतां प्रसंगांतून पार पडण्याचा नेटानें नैतिक प्रयत्न करावा, म्हणजे संकटाचें निरसन होऊन सुख व समाधान प्राप्त होतें. पूर्वी कौंडण्य ऋषि असाच संटकांत सांपडला होता, परंतु त्यानें अनंताला प्रसन्न करून आपल्या संकटाचें निरसन करून घेतलें. ती कथा अशी आहे कीं; पूर्वी असित नांवाच्या नगरामध्यें सुमंत नांवाचा एक ब्राह्मण राहात होता. तो पवित्री सत्शील सदाचारी व धर्मशील होता. त्याला भृगुऋषीनें आपली दीक्षा नांवाची मुलगी दिली होती. त्या स्त्रीपासून सुमंत ब्राह्मणाला एक मुलगी झाली. त्या मुलीचें नांव सुमंतानें सुशीला असें ठेविलें. त्या मुलीवर तिच्या आईबापाचें अत्यंत प्रेम होतें, व ती नांवाप्रमाणेंच सुशील व सुंदर होती. परंतु त्या बिचाऱ्या सुशिलेला मातृसुख फार दिवस लाभलें नाहीं. ती लहान असतांनाच तिची आई तिला सोडून स्वर्गलोकीं निघून गेली. पुढें त्या लहान मुलीचें संगोपन व्हावें व आपला गृहस्थाश्रम चांगल्यारीतीनें चालावा, म्हणून सुमंतब्राह्मणानें दुसरें लग्न करण्याचें मनांत आणिलें. धर्मभूप नांवाच्या एका ब्राह्मणाची कर्कशा नांवाची एक मुलगी होती. तिच्या बरोबर त्यानें लग्न केलें. ती मुलगी नांवाप्रमाणेंच कर्कशा होती. कर्कशेचा दुष्ट स्वभाव त्याच्या अनुभवास येऊं लागला, तेव्हां आपण लग्न केलें नसतें तर बरें होतें, असा त्याला पश्चात्ताप वाटूं लागला. त्यानें मुलीच्या योग्य असा वर पाहून त्याच्याबरोबर त्या सुशीलेचें लगेंच लग्न करून टाकिलें.

सुमंतानें सुशीलेसाठीं जो वर पाहिला होता, तो ऋषिपूर येथील राहणारा होता. त्याचें नांव कौंडण्य असें होतें. तो सर्वविद्येंत पारंगत असून सुशील

व सुस्वरूप होता. ईश्वराच्या दयेनें आपणास जांवई चांगला मिळाला याबद्दल सुमंताला फार आनंद झाला, व त्यानें आपल्या मुलीचें लग्न मोठ्या थाटानें करून चार दिवस यथाविधी सोहळा केला; व जांवयास अनेक वस्तु आंदण दिल्या. या विवाहानें कर्कशेला मात्र मोठें वैषम्य उत्पन्न झालें. तिनें जांवई आपल्या गांवीं ज्या दिवशीं जाणार होता, त्या दिवशीं त्याच्या पेट्यांतून आंदण दिलेल्या सर्व वस्तु काढून घेतल्या व त्याच्या ऐवजीं माती व उष्टें अन्न भरून त्या पेट्या बंद केल्या. तो कौंडण्यभट मार्गांत एका नदीचे कांठीं उतरला व आपण स्नानसंध्या करण्यास बसून सुशीलेला त्यानें भोजनाची तयारी करण्यास सांगितलें. तेव्हां सुशीलेनें स्नान केलें, व ज्या पेट्यांत पक्वान्नें भरून ठेविलीं होतीं, त्या पेट्या ती उघडून पाहूं लागली. तेव्हां त्यांत पक्वानें नसून उष्टें अन्न मात्र आहे, असें तिच्या दृष्टीस पडलें. तो प्रकार पाहून सुशीलेला आपल्या सापत्न आईचें कपट कळून आलें. परंतु तो प्रकार आपल्या पतीला कळल्यास आपली मानखंडना होईल अशी तिला भीति वाटूं लागली. मग तिनें दुसऱ्या पेट्या उघडून पाहिल्या, तों त्यांत माती भरून ठेविली आहे, असें तिला दिसून आलें. तेव्हां ती फार दुःखी झाली. व आतां नवऱ्याला कांहीं तरी सांगून त्याची समजूत करावी, असा तिनें विचार केला, व ती कळशी घेऊन पाणी आणण्याकरितां नदीवर गेली.

ज्या दिवशीं हा प्रकार घडून आला; त्या दिवशीं भाद्रपद शुद्ध चतुर्दशी होती. त्या दिवशीं नदीच्या कांठीं कांहीं स्त्रिया पूजा करीत बसल्या होत्या. त्या सुंदर व शुचिर्भूत स्त्रियांचा समूह पाहून सुशीलेला त्यांची पूजा पाहण्याची इच्छा झाली, व ती त्या स्त्रियांजवळ जाऊन तो सर्व प्रकार लक्षपूर्वक पाहूं लागली. त्या स्त्रियांनीं चौकोनी चौक तयार करून तो चित्रविचित्र रंगवल्लिकांनीं सुशोभीत केला होता व एका रेशमी दोरीला चौदा ग्रंथी देऊन तो दोरा त्यावर ठेविला होता. त्या दोऱ्याची हळदकुंकू नाना व प्रकारचीं पुष्पें वाहून पूजा केल्यानंतर एका स्त्रीनें इतर स्त्रियांना कथा सांगितली. कथा आटोपल्यावर त्या सगळ्याजणींनीं ते ग्रंथी दिलेले दोरे एकमेकीच्या दंडांत बांधिले. हें सर्व कृत्य पाहून सुशीलेनें एका स्त्रीस–हें कसलें व्रत आहे व त्यापासून फलप्राप्ति काय, असा प्रश्न केला. तेव्हां ती स्त्री म्हणाली “ बाई, या व्रताला अनंतव्रत असें म्हणतात. हें व्रत भाद्रपद शुद्ध चतुर्दशीचे दिवशीं विधिपूर्वक भक्तिभावानें केलें असतां, सर्व प्रकारच्या आपत्ति नाहींशा होऊन सुखसमृद्धि प्राप्त होते, व जें कार्य मनांत चिंतावें तें प्राप्त होतें. हा अनंत नांवाप्रमाणें अनंत इच्छा परिपूर्ण करितो. ” त्या स्त्रीचें हें भाषण ऐकून सुशीलेला तें व्रत घेण्याची इच्छा झाली. ती म्हणाली; बाई, हें व्रत घेण्याची माझी इच्छा आहे, व मी तें भक्तिभावानें करीन. सुशीलेनें अशी विनंति केल्यावर त्या स्त्रीला तिची करुणा आली व

तिनें सुशीलेकडून अनंताची यथासांग पूजा करवून तिच्या हातांत तो दोरा बांधिला. अशा रीतीनें अनंतव्रत प्राप्त झाल्यावर कळशींत नदीचें पाणी भरून सुशीला मुक्कामावर परत आली.

मुक्कामावर आल्यावर सुशीला पुन्हां काळजीनें व्यग्र झाली. पतीला भोजनासाठीं काय द्यावें, याची तिला पुन्हा चिंता उत्पन्न झाली. एखाद्या तरी पेटींत चांगलें अन्न असल्यास पहावें, असें वाटून तिनें एक पेटी उघडली. तों त्या पेटींत उत्तम, ताजी, खमंग व स्वादिष्ट पक्वान्नें भरलेलीं आहेत, असें तिला आढळलें. तो चमत्कार पाहून तिची खात्री झाली कीं, हा सर्व आपण केलेल्या अनंतव्रताचा प्रसाद आहे. मग तिनें दुसऱ्या पेट्या उघडून पाहिल्या, तों त्या सर्व पेट्या सुवर्णालंकारांनीं भरलेल्या आहेत, असें दिसलें. नंतर तिनें पतीला उत्तम पदार्थांचें भोजन वाढून आपणही भोजन केलें व ते दोघे आपल्या गांवाला निघून गेले.

तो कौंडण्य ब्राह्मण आपल्या घरीं येऊन पाहतों तों घरांत विलक्षण स्थित्यंतर झालें आहे असें त्यास दिसून आलें. पूर्वीचा त्याचा जो आश्रम होता, तोच आश्रम आतां राजवाड्याप्रमाणें प्रशस्त व सुंदर दिसूं लागला. तें पाहून कौंडण्य ब्राह्मणाला आपल्या संपत्तीचा अभिमान उत्पन्न झाला. सुशीला मात्र हा सर्व प्रसाद अनंताचा आहे असें जाणून काडीमात्र अभिमान न बाळगितां तें व्रत नियमानें पाळीत असे. एकदां तो व सुशीला जवळ बसून कांहीं बोलत असतां त्याचें लक्ष सहज सुशीलेच्या हातांत असलेल्या दोऱ्याकडे गेलें. तिच्या दंडांतला दोरा पाहून कौंडण्याला सुशीलेचा फार राग आला, व तो तिला म्हणाला, "सुशीले, हें तूं आपल्या दंडांत काय बांधलें आहेस ? माझ्या घरीं सुवर्णाला व हिरेमाणिक वगैरे रत्नाला तोटा नसतां, भिकाऱ्याप्रमाणे हा दोरा तूं बांधलास ? यापासून आपल्या वैभवाला कमीपणा येणार आहे, तर हा दोरा सोडून फेकून दे." तेव्हां सुशीला म्हणाली; " नाथ हा दोरा नसून, याला 'अनंत' असें म्हणतात. याच्याच प्रसादानें आपणाला हें एवढें वैभव प्राप्त झालें आहे. " सुशीलेचें हें भाषण ऐकून कौंडण्य ब्राह्मणाला फार राग आला. तो म्हणाला; " हा सर्व माझ्या दैवाचा प्रभाव आहे. या दोऱ्याच्या अंगीं अशी शक्ति आहे, ही तुझी खुळेपणाची समजूत आहे. मी तो दोरा सोडून अग्नींत टाकून देतों. " असें म्हणून कौंडण्य तो दोरा सोडूं लागला. सुशीला 'नको नको' म्हणत होती, तरी त्यानें बलात्कारानें तो दोरा सोडून अग्नींत टाकून दिला. तेव्हां सुशीला घाईघाईनें उठली व तिनें तो दोरा अग्नींत हात घालून बाहेर काढला, व दुधांत टाकिला. परंतु त्या दिवसापासून त्यांचें वैभव खालावत चाललें. एके दिवशीं चोरांनीं कौंडण्य ब्राह्मणाच्या घरावर दरवडा घालून त्याची सर्व संपत्ति लुटून नेली. नंतर कांहीं दिवसांनीं त्याच्या घराला आग लावून

त्याचें सर्व घरदार जळून गेलें. याप्रमाणें थोडक्याच दिवसांत जेव्हां तो कौंडण्य पूर्वीपेक्षांही निस्कांचन झाला, तेव्हां त्यास आपल्या स्त्रीच्या म्हणण्याची स्मृति होऊं लागली, व आपण तो दोरा अग्नींत टाकला, हें अत्यंत अनुचित केलें, व त्यामुळेंच हें संकट आपणास प्राप्त झालें, असें त्यास वाटूं लागलें. जो थोड्या दिवसांपूर्वीं द्रव्यानें मत्त झाला होता, त्या कौंडण्य भटाला व त्याच्या स्त्री व मुलांनां आतां पोटभर अन्नही मिळेनासें झालें. तो आपल्या स्त्रीजवळ अनुताप दर्शवून ती विपदावस्था टाळण्याचा उपाय काय, असें विचारूं लागला. तेव्हां सुशीलेनें त्यास पूर्वींची सर्व हकीकत सांगून ‘ तुम्ही त्या अनंताची सेवा करा, म्हणजे तो ही आपदा दूर करील ’ असें सुशीलेनें सुचविलें. स्त्रीचें म्हणणें कौंडण्याला सत्य वाटून तो तसाच अरण्यांत गेला व अनंताचें एकनिष्ठपणें ध्यान करूं लागला. त्याच्या त्या दृढ निश्चयानें त्याची वृत्ति अगदीं तन्मय झाली व जो कोणी भेटेल त्याला ‘अनंत कोठें आहे ?’ म्हणून तो विचारूं लागला. असें विचारीत विचारीत तो हिंडत असतां, एक मोटा आंब्याचा वृक्ष त्याच्या दृष्टीस पडला. तो वृक्ष फळांनीं लवलेला होता, परंतु त्या फळांच्या आंगीं कांहीं दोष असल्यामुळें त्या फळांना कोणीही स्पर्श करीत नसे. त्या आम्रवृक्षाजवळ कौंडण्य ब्राह्मण गेला, व त्याला म्हणाला, “ हे आम्रवृक्षा, अनंत कोठें आहे हें तुला माहीत आहे काय ? ” तेव्हां तो आम्रवृक्ष म्हणाला, “ बाबा, मला त्या अनंताचें मुळींच दर्शन झालें नसून तो कोठें आहे, तेंही माहीत नाहीं. जर तुला तो भेटेल तर माझ्याविषयीं त्याला विचार व तो जें कांहीं सांगेल तें मला येऊन सांग ” तेव्हां कौंडण्य तेथून पुढें गेला, तों वाटेंत त्याला एक गाय भेटली. ती गाय सर्व अवयवांनीं पूर्ण होती, परंतु तिच्या मुखांत तृण जात नसे. तिलाही कौंडण्यानें ‘अनंत कोठें आहे ?’ म्हणून विचारिलें; परंतु तिनें आम्रवृक्षाप्रमाणेंच उत्तर देऊन आपणाविषयीं चौकशी करण्यास सांगितलें. पुढें त्याला एक बैल भेटला. कौंडण्यानें त्यालाही तोच प्रश्न केला, व बैलानें गाईप्रमाणेंच उत्तर दिलें. तेव्हां कौंडण्य पुढें चालला. कांहीं मार्ग क्रमिल्यावर त्याला दोन पुष्करणी भेटल्या. त्या दोन्ही पुष्करणी अगदीं जवळ असून एकमेकींचें पाणी एकमेकींत वाहत होतें. त्या दोन्ही पुष्करणीला कौंडण्य म्हणाला; “ हे पुष्करणींनो, तुम्हांला ‘अनंत कोठें आहे,’ तें माहीत आहे काय ? ” पुष्करणींनींही आम्रवृक्षाप्रमाणेंच उत्तर दिलें. तेव्हां कौंडण्य निराश होऊन पुढें चालला. तो त्याला एक गाढव व हत्ती भेटला. त्या दोघांनांही कौंडण्यानें वरीलप्रमाणेंच प्रश्न केला, व त्यांनीं त्यास पुष्करणीप्रमाणेंच उत्तर दिलें. याप्रमाण सर्व ठिकाणीं निराश झाल्यावर तो कौंडण्य ब्राह्मण अगदीं वैतागून गेला. पुष्कळ दिवसांपासून पोटांत अन्नाचें एक शीत किंवा पाण्याचा एक थेंबही न पडल्यामुळें त्याच

पंचप्राण कासावीस होऊं लागले, त्यांत वरीलप्रमाणें त्याची निराशा झाल्यावर तर त्याचें धैर्य नाहींसें होऊन, तो मूर्छा येऊन भूमीवर पडला.

कौंडण्य ब्राह्मणाची ती एकनिष्ठ भक्ति पाहून प्रभु अनंतास त्याची करुणा आली. भगवान् वृद्ध ब्राह्मणाचें रूप धारण करून तेथें आले; व कौंडण्याच्या डोळ्यांला पाणी लावून त्यांनीं त्याला सावध केलें. प्रत्यक्ष भगवंताचा हात लागतांच कौंडण्याची मूर्छा लागलीच नाहींशी झाली. तो त्या ब्राह्मणाला म्हणाला; " अहो द्विजश्रेष्ठ, अनंत कोठें आहे, तें तुम्हाला माहीत आहे काय ? " तेव्हां भगवान् म्हणाले; " हे कौंडण्या, मला तो अनंत माहीत असून त्याचें मी तुला दर्शनही करवितों. " असें म्हणून भगवंतानीं त्या कौंडण्याच्या डोळ्यांवरून हात फिरविला, त्याबरोबर कौंडण्यास आपण एका निराळ्याच सृष्टींत आहोंत असें दिसूं लागलें. आपण एका सुंदर नगरांत असून तेथील एका भव्य मंदिरांत रत्नजडित सिंहासनावर कोटी सूर्यांच्या तेजाप्रमाणें अनंताची चतुर्भुज दैदिप्यमान मूर्ति आहे, व तिचें दर्शन आपण घेत आहोंत. अशी मूर्ति पाहतांच कौंडण्य ब्राह्मण हात जोडून म्हणाला; " हे पतितोद्धारका अनंता, मी अनंत अपराधी आहें. मला क्षमा कर, माझे अपराध पोटांत घाल, व माझा उद्धार कर. " कौंडण्याची प्रार्थना ऐकून अनंतानें त्यास आलिंगन दिलें व ते म्हणाले; " हे कौंडण्या, तुझी भक्ति पाहून मी प्रसन्न झालों आहें. तुझी विपदावस्था आतां संपली असें समज. तुम्ही उभयतां माझें व्रत चालवा व त्याचा प्रसार करा, म्हणजे तुम्हांला तुमची पूर्वींची सर्व संपत्ति प्राप्त होईल; व चौदा वर्षांनीं तुमची संपत्ति पूर्वीपेक्षां दसपट होईल, आणि अंतीं तूं व तुझी स्त्री असे उभयतां मोक्ष पावाल. " अनंताचें वरप्रदान ऐकून कौंडण्यभटाला परम संतोष झाला. तो पुन्हां वंदन करून म्हणाला; " दातारा, प्रभो अनंता, मजवर तूं अनंत कृपा केली आहेस; पण मला वाटेंत जे कोणी भेटले त्या सर्वांनीं आपला वृत्तांत विचारिला आहे; तर त्यांची हकीकत तेवढी मला सांग. " तेव्हां अनंत म्हणाला; " हे ब्राह्मणा, तुला जो अम्रवृक्ष प्रथम भेटला, तो पूर्व जन्मीचा ब्राह्मण होय. तो मोठा वेदपति होता, परंतु शिष्यांजवळून वाटेल तसे कष्ट घेई आणि त्यांना मनापासून विद्या शिकवीत नसे. या पापामुळें त्याचीं फळें कोणीही घेत नाहीं. त्या नंतर तुला जी गाय भेटली ती पूर्वजन्मीं भूमि होती. ती एका ब्राह्मणाला एकानें दान दिली होती, पण ती मुळींच धान्य प्रसवत नसे, म्हणून ती गाय झाली व त्या तिच्या पापामुळें तिला खावयाला मिळत नाहीं. तसेंच तुला जो बैल भेटला तो आपल्या मालकाला सोडून गेला, म्हणून त्याला तशी स्थिति प्राप्त झाली आहे. त्यानंतर तुझ्या दृष्टीस ज्या दोन पुष्करणी पडल्या त्या पूर्वजन्मीं दोघी बहिणी होत्या. त्या वाणें वगैरे एकमेकींला दान देत असत म्हणून त्यांनां ती स्थिति प्राप्त झाली आहे. त्यानंतर

तुला जो गाढव व हत्ती भेटला ते दोघे प्रत्यक्ष क्रोध व मत्सर होत; आणि जो तुला ब्राह्मण भेटला तो मीच होय." अशा प्रकारें खुलासा करून अनंतानें कौंडण्य ब्राह्मणास आपल्या गांवीं जाण्यास निरोप दिला. कौंडण्य ब्राह्मण आपल्या गांवांजवळ आला तो त्यास आपल्या गांवचें विलक्षण वैभव दिसलें. त्याचा आश्रम राजवाड्याप्रमाणें झाला व पूर्वीचें सर्व वैभव त्यास दिसून आलें. त्यानें तें व्रत स्वतः आचरून त्याचा सर्वत्र प्रसार केला. शेवटीं त्या दोघांनांही मोक्ष प्राप्त झाला. श्रीकृष्ण म्हणाले; हे धर्मा, याप्रमाणें हें अनंतव्रत पृथ्वीवर आलें असून त्यापासून लोकांच्या अनेक आपदा दूर झाल्या आहेत."

## २. संकष्टचतुर्थी व्रतकथा.

ऋषि, म्हणाले; "राजा जनमेजया, ही अनंतव्रताची कथा, श्रीकृष्णानीं धर्माला कथन केली, तीच तुला सांगितली. या कथेप्रमाणेंच धर्मानें कृष्णाला संकष्टचतुर्थीची कथा विचारिली होती, तीही मी तुला कथन करितों. हें व्रत प्रथम शंकरांनीं कांहीं दिवस केलें, त्यामुळें त्यांच्या हातून त्रिपुरासुराचा नाश झाला. षडाननानें हें व्रत करून सिद्धि मिळविली व तारकासुराचा नाश केला. त्याप्रमाणें तें व्रत मारुतीनें आचरण करून सीताशुद्धि केली. तसेंच श्रीकृष्णानेंही हें व्रत करून मदनाकडून शंबरासुराचा नाश केला. गरुड याच व्रताच्या योगानें अमृत आणण्यास समर्थ झाला. हें व्रत गौतमऋषीनें करून शंकराला प्रसन्न करून घेतलें होतें. गौतमाला गंगेची प्राप्ती झाली ती या व्रताच्याच प्रभावानें. हें व्रत मूळ स्वर्गांत माहीत होतें, नंतर तें तेथून पृथ्वीवर आलें. याविषयीं अशी कथा आहे कीं, पूर्वी चंद्रावती नांवाच्या नगरांत चंद्रसेन नांवाचा राजा राज्य करीत होता. या राजाला पारधीचें मोठें व्यसन होतें. त्याच नगरांत साधारण स्थितींतील एक मनुष्य राहात होता, त्यालाही पारधीचें व्यसन होतें. एके दिवशीं तो अरण्यांत पारधीसाठीं गेला असतां त्यानें पराकाष्ठा केली पण एक मृग देखील मिळाला नाहीं. तेव्हां निराश होऊन तो एका नदीचे कांठीं सचिंत बसला असतां त्याची नजर जवळच कांहीं स्त्रिया पूजा करीत बसल्या होत्या त्यांच्याकडे गेली. तेव्हां तो त्या स्त्रियांजवळ गेला व 'तुम्हीं काय करीत आहां?' असा त्यानें त्यांस प्रश्न केला. तेव्हां त्यांच्यापैकीं एक स्त्री म्हणाली; 'आम्हीं ही गणपतीची पूजा करीत आहों. या व्रताला संकष्टचतुर्थी व्रत असें म्हणतात.' तेव्हां तो पारधी त्यांना म्हणाला, "बायांनों, हें संकष्ट चतुर्थी व्रत म्हणजे काय, व तें कसें करावयाचें, हें जर आपण मला सांगाल तर मी तुमचा फार ऋणी होईन." तेव्हां ती स्त्री म्हणाली, "प्रत्येक महिन्याच्या वद्य चतुर्थीला गणपतीची एक सुवर्णाची मूर्ति करून चंद्रोदय प्रसंगीं तिची पूजा करून पंचपक्वान्नाचा नैवेद्य समर्पण करावा, नंतर ब्राह्मणाला भोजन घालून ती मूर्ति द्यावी. याप्रमाणें जो हें व्रत करतो त्याची संकटापासून मुक्तता होते."

त्या स्त्रियांच्या सांगण्याप्रमाणें पारध्यानें पहिली जी चतुर्थी आली, त्या चतुर्थीला तें व्रत यथासांग केलें. तेव्हांपासून त्याचें प्राक्तन उघडलें, व त्याला पुष्कळ शिकार मिळूं लागली.

एकदां त्या चंद्रावती नगराचा राजा सर्व सैन्यासह अरण्यांत शिकारीला गेला असतां त्याला त्या दिवशीं शिकार मिळाली नाहीं, परंतु त्याच अरण्यांत तो पारधी शिकार करीत होता त्याला विपुल शिकार मिळाली. तेव्हां राजानें तो यशस्वी आहे असें जाणून त्याला एक चांगला घोडा बसावयाला देऊन त्यास आपणाबरोबर शिकारीसाटीं घेतलें. पारधी राजाकडे येतांच राजाला कधीं मिळाली नव्हती अशी शिकार मिळाली, व तेव्हांपासून राजाचें प्रेम त्या पारध्यावर फार जडलें. त्यानें त्यास एक लक्ष मुद्रा बक्षीस दिल्या. पुढें राजाशीं त्याचा स्नेह फार वाढत चालला. राजाला त्याच्यावांचून घटकाभरही करमेनासें झालें. होतां होतां राजानें त्याला आपला मांडलिक राजा केला. पुढें त्याचा एका राजकन्येबरोबर विवाह झाला, व तो सुखी झाला. तो जरी वृद्ध झाला होता तरी तें व्रत त्यानें नियमानें चालविलें होतें. एके दिवशीं त्याचा मुलगा त्याला म्हणाला, " बाबा, तुम्हीं आतां थकलां आहांत, तेव्हां हें व्रत तुम्हीं मला द्या. " पुत्राच्या इच्छेप्रमाणें त्यास व्रत दिलें, परंतु बापाप्रमाणें त्याजकडून नियमानें व्रत होईना. तारुण्यमदानें त्याच्या हातून पुष्कळ चुका होऊं लागल्या. तेव्हां गणपतीची अवकृपा होऊन त्यांची सर्व संपत्ति लयास गेली व शेवटीं अन्नान्न दशा होऊन त्याच्या कुटुंबांतील सर्व मनुष्यें मरण पावलीं. परंतु व्रताचा पुण्यसंचय पदरीं असल्यामुळें त्या पारध्याला पुढें राजाच्या पोटीं जन्म मिळाला. त्या राजाला याच्यासह एकंदर पांच मुलें होतीं. वृद्धावस्थेमुळें राजानें आपल्या वडील मुलाच्या स्वाधीन राज्य केलें व आपण तपश्चर्येसाटीं अरण्यांत निघून गेला. परंतु त्या बिचाऱ्याला तें राज्य फार दिवस लाभलें नाहीं. त्याचे धाकटे चार भाऊ एकत्र झाले व त्यांनीं तें राज्य त्याच्यापासून हिरावून घेऊन त्याला त्याच्या स्त्रीसह राज्याबाहेर घालवून दिलें. तो अरण्यांत एका सरोवराचे कांठीं आपल्या दैवदुर्विलसिताचा विचार करीत बसला असतां एका ऋषीची व त्याची भेट झाली, त्याची दीन स्थिति पाहून ऋषीला त्याची दया आली व त्याला तो आपल्या आश्रमांत घेऊन गेला. तेथें गेल्यावर तो राजपुत्र म्हणजे पूर्वजन्मीचा पारधी त्या ऋषीला म्हणाला, " ऋषि, माझी अशी अवस्था व्हावयाला कारण काय ? " तेव्हां ऋषीनें त्या राजपुत्राच्या डोळ्यांवरून हात फिरवून त्याला दिव्यदृष्टि दिली. तेव्हां हें सर्व व्रतभंगाचें फळ आहे असें त्यास कळून आलें. नंतर त्यानें घडलेल्या अपराधाबद्दल गणपतीची क्षमा मागून तें संकष्टचतुर्थीचें व्रत पुन्हा चालू केलें. तेव्हां राजपुत्राला आपलें राज्य

पुन्हा प्राप्त होऊन पूर्वीपेक्षां दसपट वैभव मिळालें. हे राजा जनमेजया, याप्रमाणें ही कथा भविष्योत्तरपुराणांत असून ती मी तुला संक्षेपानें सांगितली आहे. ”

---

## अध्याय २१ वा.

### १. व्यतिपात–व्रत कथा.

नंतर वैशंपायन ऋषि व्यतिपातव्रत कथा सांगू लागले. ते म्हणाले, “ राजा जनमेजया, एकदां मार्कंडेयऋषि, धर्माला भेटण्यासाठीं गेले होते. तेव्हां धर्मानें त्यांचा बहुमान करून त्यांची पूजा केली; आणि एकादें अलौकिक व्रत असल्यास सांगा, अशी विनंति केली. तेव्हां मार्कंडेय ऋषि म्हणाले, “ हे धर्मराजा, तूं सांगितलेंस तशा प्रकारचें व्यतिपातव्रत आहे. या व्रताचें पुण्य फार असून तें मनुष्यास सर्वप्रकारें सुखदायक आहे. याविषयींची एक कथा तुला सांगतों. पूर्वी कोणीएक राजा एकदां शिकारीसाटीं गेला असतां अरण्याला एकाएकीं वणवा लागला. तेव्हां राजा भयभीत होऊन बाहेर पडण्याकरितां इकडे तिकडे धाऊं लागला. तों एक डुक्कर त्याच्या दृष्टीस पडला. तो डुक्कर शरीरानें धष्टपुष्ट होता; परंतु वणव्यांत सांपडल्यामुळें त्याची अगदीं दुर्दशा झाली होती. त्याचें सर्व अंग होरपळून निघालें होतें, व त्यामुळें तो त्या तापलेल्या जमिनीवर तळमळत पडला होता. त्या डुकराला पाहून राजाच्या अंतःकरणांत दया उत्पन्न झाली. तो म्हणाला, “अरेरे ! बिचाऱ्या प्राण्या, काय रे ही तुझी दशा ! ! पूर्वजन्मीं तूं पातक तरी कोणतें केलें होतेंस !! ” राजाचे उद्गार ऐकून डुकराला वाटलें कीं, राजाचे हृदयांत आपणाविषयीं सहानुभूति आहे, तेव्हा आपला इतिहास याला सांगितल्यास, याला आपली दया येऊन हा आपली या संकटांतून सुटका करील. असा विचार करून तो डुक्कर म्हणाला; “ बाबा, हा सर्व पूर्वकर्माचा खेळ आहे. जसें कर्म करावें तसें त्याचें फळ प्राप्त होतें. राजा, मी पूर्व जन्मीं वैश्य होतों. माझा व्यापार फार मोठा होता, व अलोट संपत्ति माझ्याजवळ होती. परंतु त्या संपत्तीचा उपयोग स्वतःच्या ऐषआरामावांचून दुसरीकडे मीं कधींही केला नाहीं. मी आपल्या प्रपंचाला दक्ष होतों, बहुश्रुत होतों, सर्व शास्त्रांचा अभ्यासही मीं केला होता; परंतु सत्कर्माकडे एक कवडी देखील मी खर्चे केली नाहीं. कोणी याचक मजकडे आल्यास मी त्याचा उपहास करी, व त्याला मर्मांतिक बोलून घालवून देत असे. सूर्यमण्याच्या अंगीं बहात्तर खोडी असल्या, तरी त्याच्या तेजानें त्याच्या खोडी कोणाला दिसण्यांत येत नाहींत, त्याप्रमाणें माझ्याजवळ केवळ धर्माचा अभाव असल्यामुळें, मी जरी शास्त्रज्ञ, श्रीमंत व बहुश्रुत होतों; तरी माझें नांव निघालें कीं, लोक कपाळाला आंठ्या

घालीत. एके दिवशीं एक विद्वान्, सच्चरित्र व वृद्ध असा ब्राह्मण मजकडे आला. त्या दिवशीं व्यतिपातासारखा महा पर्वकाळ होता. त्या ब्राह्मणानें आल्याबरोबर मला उत्तम आशिर्वाद दिला; परंतु मी त्या ब्राह्मणाकडे लक्ष दिलें नाहीं. मी आपल्या ख्यालीखुशालींत दंग होतों. त्या ब्राह्मणानें पुनः-पुन्हा मला आशिर्वाद दिला व दक्षिणेची याचना केली, पण मी त्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं, इतकेंच नाहीं, तर उलट त्याची अवहेलना करून कुचेष्टा केली. तेव्हां तो ब्राह्मण रागावला, व म्हणाला; "तूं धनानें उन्मत्त होऊन माझी अशी उपेक्षा करितोस तर तूं डुकर होऊन अरण्यांत भटकत फिरशील व वणव्यांत सांपडशील." ब्राह्मणाचा शाप ऐकतांच मी शुद्धीवर आलों व त्याची क्षमा मागून उःशाप मागितला. तेव्हां तो म्हणाला; "हे वैश्या, माझा शाप भोगल्यावांचून तुला सुटका नाहीं; पण जर तुला त्या स्थितींत कोणी व्यतिपाताचें पुण्य देईल तर तुझा उद्धार होईल." डुकराची ती हकी-कत ऐकून राजाला त्याची दया आली. तो त्याला म्हणाला; "हे सूकरा, तुझी मला फार दया येते, पण तुला मुक्त करण्याचें सामर्थ्य माझ्या अंगीं नाहीं; याबद्दल फार वाईट वाटतें. तूं म्हणतोस तें व्यतिपातव्रत मी अद्यापपर्यंत मुळींच केलें नाहीं व त्या संबंधानें कोठें कांहीं ऐकिलेंहि नाहीं. पण हें व्रत कसें करावयाचें हें जर तूं सांगशील तर मी तें भक्तिभावानें करीन व त्याचें पुण्य तुझ्या उद्धरार्थ खर्च करीन. अशी राजाची इच्छा जाणून तो सूकर व्रताचा इतिहास सांगूं लागला. तो म्हणाला, पूर्वीं बृहस्पतीची तारा नांवाची स्त्री चंद्रानें चोरून नेली होती. तेव्हां बृहस्पति चंद्रावर अत्यंत क्रुद्ध झाले व चंद्राबरोबर युद्ध करण्यास तयार झाले. त्या वेळीं चंद्र व बृहस्पति या दोघांच्या क्रोधापासून एक पुरुष निर्माण झाला, तोच हा व्यतिपात होय. हा व्यतिपात अत्यंत कराल व विशाल असून त्याला चार मुखें आहेत. त्याचें प्रत्येक मुख शंखासारखें असून नाक दीर्घ आहे. त्याला आठ डोळे असून ते रक्तासारखे लाल आहेत. तो शतयोजनें उंच असून त्याची छाती अत्यंत विस्तीर्ण आहे. त्याचीं मुखें फारच भयंकर आहेत. त्याच्या मिशा व शिखा पिंगट वर्णाच्या असून फारच दीर्घ आहेत. दांत फार मोठाले असून त्याचें शरीर अत्यंत दीप्तिवंत आहे. असा हा व्यतिपात जेव्हां उत्पन्न झाला, तेव्हां त्याला चंद्र व सूर्य तेथून घालवून देऊं लागले. तेव्हां तो व्यतिपात म्हणाला, "मला फार क्षुधा लागली आहे; कांहीं खाण्यासाठीं द्या, म्हणजे मी येथून निघून जातों." तेव्हां चंद्रसूर्य म्हणाले; तुझ्या जन्मकाळीं जे लोक स्नानदान वगैरे पुण्यकर्में करितील त्या कर्माचें पुण्य भक्षण करून तूं आपला निर्वाह कर. जे लोक तुझ्या पर्वकाळीं स्नान, दान, जप, तप वगैरे करितील त्यांना पुत्र, पौत्र, संपत्ति व कीर्ति प्राप्त होऊन त्यांच्या सर्व संकटाचें निरसन होईल. तुझ्या पर्वकालाचें जें पुण्य प्राप्त होईल त्यापासून सर्व पात-

कांचा नाश होईल. तसेंच जो चंद्रग्रहणसमयीं दानादिकृत्यें करील त्याला त्यांच्या शतपट पुण्य प्राप्त होईल, व सूर्यग्रहणकाळीं दान करणारास सहस्रपट व विषुव प्रसंगीं दशसहस्रपट पुण्य प्राप्त होईल. असें सांगून सूर्य व चंद्र यांनीं व्यतिपाताला तेथून घालवून दिलें. डुकर म्हणाला; राजा, या व्यतिपाताचें व्रत असें करितात कीं, मार्गशीर्ष, फाल्गुन, वैशाख अथवा जेष्ठ महिन्यापासून हें व्रत करावयाला आरंभ करावा. या महिन्यांत ज्या दिवशीं व्यतिपात असेल त्या दिवशीं पंचगव्य प्राशन करून प्रायश्चित्त घेऊन स्नान करावें. नंतर धूतवस्त्र परिधान करून एक पाण्यानें भरलेला नवा घट घ्यावा, व त्यावर एक पात्र ठेवून त्यांत शर्करा घालावी. त्या शर्करेवर सुवर्णाची व्यतिपाताची मूर्ति ठेवून तिची विधिपूर्वक पूजा करावी, व नंतर ती सर्व पूजा ब्राह्मणाला अर्पण करून त्याला भोजनाला बसवावें, आणि तांबूल व दक्षिणा देऊन त्याचा आशिर्वाद घ्यावा. डुकरानें सांगितल्याप्रमाणें राजानें व्यतिपातव्रत करून त्याचें पुण्य त्याला अर्पण केलें व त्याचा उद्धार केला. हे धर्मा, याप्रमाणें हें शक्तिशाली व्यतिपातव्रत आहे. तें तूं नियमानें करीत जा, म्हणजे तुझा काळ सुखानें जाऊन तुला कधींही विपत्ति प्राप्त व्हावयाची नाहीं" वैशंपायन ऋषि म्हणाले, राजा जनमेजया, असें सांगून मार्कंडेय ऋषि आपल्या आश्रमीं निघून गेले."



# कथाकल्पतरु.

## स्तबक ७ वा.

## अध्याय १ ला.

### मंगलाचरण.

हे विघ्नविनाशक गजानना, तुला मी अनन्य भावानें साष्टांग प्रणाम करितों. हे व्यंकटरूपा नारायणा, तूं त्रिभुवन भरून उरला असून तूंच सर्व रूप आहेस. हे प्रभो अनंता तूंच सर्व कांहीं आहेस. हे उदार दातारा, गणपती, सरस्वती वगैरे सर्व तुझींच रूपें आहेत. तूं नाहींस असें या विश्वांत कांहीं देखील नाहीं. हें सर्व विश्व तुझ्या इच्छेनें चाललें आहे. कोणतेंही कार्य तुझा कृपाप्रसाद झाल्यावांचून सफळ होत नाहीं. हे अनंता, तूं कैवल्यदानी असून शेशावर निद्रिस्थ झालेला आहेस, पण तूं झोंपलेला असून जागा आहेस. तुझें लीलालाघव विलक्षण असून तें जाणण्यास कोणीहि समर्थ नाहीं. हे परमानंद अनादिसिद्ध गोविंदा, हे गुणातीत निजाक्षर मूळकंदा, तुझा जयजयकार असो. हे षड्गुणैश्वर्यसंपन्न परात्परा, हे भक्तजनतारका श्रीहरि, तुझी स्वरूपशोभा कांहीं अवणनीय आहे. तुझ्या पीतांबराचें व रत्नमुकुटाचें तेज विलक्षण आहे. तूंच मुळीं तेजाचा गाभारा आहेस, मग तुझे अलंकार तरी तेजस्वी कां असणार नाहींत? हे पुरुषोत्तमा तूं सत्यस्वरूप असून असत्य व अज्ञान यांचा नाश करणारा आहेस. मजसारख्या दुर्बलाच्या हातून हा ग्रंथ लिहवीत आहेस, ही केवळ तुझीच कृपा होय. आजवर तूं आपला वरदहस्त या लेंकराच्या मस्तकावर ठेवून जसे सहा स्तबक पुरे करविलेस, तसे पुढील स्तबकहि मजकडून पूर्ण करीव. तुझी भक्ति करावी, तुझी स्तुति करावी, तुझे गुणानुवाद गावेत, एवढ्याच उद्देशानें मी ग्रंथ लिहीत आहे. तूं आपली कृपादृष्टि या दुर्बळावर ठेव, म्हणजे हा ग्रंथ मी सहज पूर्ण करीन. श्रोतेजनहो, आपण श्रीहरीचे भक्त अहांत, तेव्हां हा ग्रंथ आपणांस प्रिय होईल असा मला भरंवसा आहे. माझे बोल लहान मुलाप्रमाणें जरी बोबडे असले, तरी तुम्ही ते गोड करून घ्यावेत. याप्रमाणें प्रार्थना करून कवी कथाभागास आरंभ करतात.

# अध्याय २ रा.

## १. मनु-उत्पत्ति-विचार.

एके दिवशीं जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला; "मुनिवर्य, एकंदर मनु किती आहेत, त्यांची उत्पत्ति कशी होते, किती संवत्सराचे युग होतें, आजपर्यंत किती मनु व किती प्रळय झाले, हें सांगण्याची कृपा करावी" तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले; "राजा जनमेजया, चार युगांचें प्रमाण, व प्रलयस्थिति याविषयीं मी तुला मागें सांगितलेंच आहे. आतां तूं जी इच्छा दर्शित केली आहेस, ती तुझी इच्छा थोडक्यांत पूर्ण करितों. चार युगांची एक चौकडी होते, आणि अशा चौदा चौकड्या झाल्या म्हणजे एक मनु होतो. म्हणजे छप्पन युगांचा जो काळ तो मनूचा काळ होय. असा चौदा मनूंचा जो काळ त्याला कल्प असें म्हणतात. प्रत्येक कल्पाचे शेवटीं पृथ्वि, आकाश व चंद्र सूर्य यांचा नाश होतो. या स्थितीला कल्पांत असें म्हणतात. अत्यंत विशाल व उंच असा मेरू पर्वतहि त्यावेळीं जलप्रलयांत बुडून जातो. चंद्र व सूर्य नाहींसे झाल्यामुळें दिवस व रात्र हा भेद रहात नाहीं. आणि प्रलय व शांति हाहि भेद उरत नाहीं.

आतां मनूचा काळ किती हें तुला सांगतों. कृत, त्रेत, द्वापार व कलि हीं चार युगें पूर्ण झालीं म्हणजे देवांचें एक युग होतें. त्यास देवयुग असें म्हणतात. अशीं देवयुगें ७१३ इतकीं झालीं म्हणजे एका मनूचा काळ होतो, आणि अशा चौदा मनूंचा जो काळ त्याला कल्प असें म्हणतात. अशा अनंत कल्पाचें ब्रह्मदेवाचें आयुष्यमान आहे. तें आयुष्य संपल्यावर ब्रह्मदेवाचाहि नाश होतो. ब्रह्मदेव हा सृष्टिकर्ता असून, विष्णु ही प्रतिपालन करणारी देवता आहे; आणि रुद्र हा सर्वांचा नाश करणारा आहे. या तिन्ही देवतांना गर्भवासाचें दुःख भोगावें लागतें व त्यांनांहि जन्ममृत्यूच्या खेपा घालाव्या लागतात. आजवर या तिन्ही देवतांना अनंत वेळां जन्ममरणाच्या यातना भोगाव्या लागल्या आहेत. पाण्याच्या लाटांमुळें वाळू जशी बाहेर पडते व लाटांबरोबरच ती जशी पुन्हां पाण्यांत जाते, त्याप्रमाणें जन्ममृत्यूची स्थिति देवांनांहि चुकत नाहीं.

राजा जनमेजया, हें ऐकून तुला मोठें आश्चर्य वाटेल; परंतु यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. ब्रह्मा, विष्णु व शिव या देवता अत्यंत शक्तिशाली आहेत. तथापि परब्रह्म स्वरूपाची प्राप्ति त्यांनां होत नाहीं. याचें कारण असें आहे कीं, व्यवसायामुळें त्यांनां स्वतःचा विसर पडतो. ब्रह्मदेव हा शास्त्रशोधक आहे, त्याचा लय वेदाध्ययनांत विशेष असल्यामुळें त्याला मूळस्वरूपाचें वारंवार विस्मरण होतें. शिवाय सृष्टीच्या उत्पत्तीचा व्यवसाय त्याच्या मागें लागल्यानें

आपलें सर्वस्व काय तें हेंच असा जो अभिमान—तो परब्रह्म स्वरूपाची ओळख होण्यास त्यास नडत आहे. इंद्र हाहि महाज्ञानी आहे, परंतु सर्व त्रिभुनावर आपलें प्रभुत्व असावें ही जी त्याची महत्वाकांक्षा, ती महत्वाकांक्षा त्याला मूळस्वरूपाची ओळख होऊं देत नाहीं, व तीच त्याला जन्ममृत्यूच्या खेपा घालावयाला लावीत आहे. त्याप्रमाणेंच विष्णूची स्थिति आहे. सृष्टीचें संरक्षण करावयाचा व्यवसाय त्यानें पत्करल्यामुळें त्याच्याहि जन्ममृत्यूच्या खेपाला गणति राहिलेली नाहीं. शिव मात्र कांहीं अंशानें ईश्वरस्वरूपीं विलीन झालेला आहे. त्यानें काम, क्रोध वगैरे मायेचे कर्मव्यापार सोडलेले आहेत, त्यामुळें त्यास परब्रह्म स्वरूपाची ओळख झालेली आहे.

असो, हें तुला कथानुरोधानें कथन केलें आहे. आतां चौदा मनूंची रचना कशी आहे हें तुला सांगतों. ही मनुरचना मनुष्यास कळणें परम दुष्कर होय. परंतु तो सर्व प्रकार मनुष्यास विदित असावा म्हणून भगवंतांनीं मार्कंडेय ऋषीला एकवीस कल्पांचें आयुष्य दिलेलें आहे. त्यामुळें ही सर्व मनुरचना मार्कंडेय ऋषीच्या अवलोकनांत आलेली आहे. त्यांनीं ती सर्व कथा ब्रह्मदेवाला सांगितली होती, ब्रह्मदेवानें ती व्यासाला सांगितली होती, व व्यासाकडून मला समजलेली आहे. ती सर्व कथा तुला सांगतों. पाण्यानें भरलेल्या घटावर पाणी पडल्यास तें जसें सांडून जातें, किंवा नदीला पूर आल्यावर तिचें पाणी जसें सर्वत्र पसरतें, अथवा तंतु तुटलें असतां वस्त्र जसें विस्कळीत होतें; त्याप्रमाणें आयुष्य पूर्ण झालें म्हणजे सर्वांचा नाश होतो. या सृष्टींतील सकल चराचराला कालमर्यादा ही आहे. ही कालमर्यादा फक्त निरक्षर, निर्गुण परब्रह्म, यास मात्र नाहीं. कृतयुगाची वर्षसंख्या सत्रा लक्ष अठ्ठावीस हजार आहे, त्रेतायुगाची वर्षसंख्या बारा लक्ष शहाण्णव हजार आहे, व द्वापार युगाची वर्षसंख्या नऊ लक्ष चौसष्ट हजार असून, कलियुगाची वर्षसंख्या चार लक्ष बत्तीस हजार आहे. या चार युगांच्या वर्षसंख्येला चौकडी असें म्हणतात. आणि अशा चौदा चौकड्या झाल्या म्हणजे एका मनूचा काळ होतो, त्यासच कल्प असें म्हणतात. असा एकवीस कल्पकाळ तो ब्रह्मदेवाचा किंचित् काळ होय. चौऱ्यांयशीं कल्प झाले म्हणजे ब्रह्मदेवाची एक घटका होते. प्रत्येक सहस्र कल्पानंतर ब्रह्मदेवाचा संहार होतो; अर्थात त्या वेळीं उत्पत्ति, स्थिति, हे सर्व व्यापार बंद राहतात. तेव्हां परब्रह्म जी आदिमूर्ति ती निद्रिस्थ होते. मग योगमायेच्या योगानें सर्व भूतांच्या शक्ति एकत्र होऊन सर्व चराचराचा नाश होऊं लागतो. ही शक्ति म्हणजे उष्णता होय. बारा सूर्यांची उष्णता व सर्व भूतांतील उष्णता एके ठिकाणीं झाल्यामुळें भयंकर उष्णता उत्पन्न होते; व ती प्रथम सर्व सृष्टींतील पाणी नाहींसें करून टाकिते. त्या उष्णतेनें मोठमोठाले समुद्रहि क्षणार्धांत नाहींसे होऊन जातात व सर्व पृथ्वी जळूं लागते. शेवटीं ती उष्णता इतकी वाढते

कीं त्यायोगें पाताळांत नागकुळाचा व अमृताचाहि नाश होतो आणि पंचतत्वेंहि नाश पावून सर्वात्मक जें एक तत्त्व तें मात्र शिल्लक राहतें. अशी स्थिति झाल्यावर वायु उत्पन्न होतो व तो अग्नीला पोटांत घालून आपल्या शक्तीनें सर्व रक्षा एका ठिकाणीं करितो. या वायुपासून मेघ उत्पन्न होतात व त्यांच्याकडून भयंकर वृष्टि सुरू होते. ही वृष्टि इतकी भयंकर असते कीं, तिच्या योगानें पृथ्वि, पाताळ व स्वर्ग, सर्व जलमय होतें. अशी स्थिति झाल्यावर मग या सृष्टींत शून्यावांचून कांहींहि रहात नाहीं. तो सर्वेश्वर या तेजोमय शून्यांत नेहमीं योगनिद्रेंत असतो. तो जरी योगनिद्रेंत असतो, तरी उत्पत्ति, स्थिति व लय या तीन अवस्था त्याच्याचकडून अगदीं सहज होत असतात. प्रलयांती सर्व देह-देवता त्याचे ठिकाणी विलीन होतात. नदी सागराला मिळते त्याप्रमाणें तत्त्वें विराटाला मिळतात. समुद्रापासून नदीचें पाणी भिन्न करितां येत नाहीं; परंतु समुद्रापासूनच मेघ उत्पन्न होऊन ते पुन्हा नद्यांनां पाणी देतात, या न्याया-प्रमाणें परमात्म्याचे ठिकाणीं देहात्मे विलीन होतात व विश्वाची उत्पत्तीहि पुनः आदिपुरुषापासूनच होते. आतां जीवरूपाला जी अवागमन स्थिति आहे, ती असण्याचें कारण शुभाशुभ कर्मप्रवृत्ति हें होय.

असो, प्रलयकालीं सर्व जलमय झाल्यावर या विश्वांत निर्गुणब्रह्मावांचून कांहींहि नसते. तेव्हां ती स्थिति कशी असते हें कळण्यास कोणीच समर्थ नसतो, परंतु तो सर्व प्रसंग मार्कंडेय ऋषीनीं पाहिलेला आहे. ही प्रलयस्थिति सर्वांना श्रुत व्हावी म्हणून एकदां मार्कंडेय ऋषीला आदिपुरुषानें मुद्दाम दर्शन दिलें, व चौदा मनूंचे चौदाही प्रळय त्यांनीं सुषुप्तावस्थेंत पाहिले, आणि म्हणूनच ही प्रलयस्थिति लोकांनां कळण्यास मार्ग झाली.

याप्रमाणें कथा ऐकल्यावर राजा म्हणाला; "ऋषि, मनूचें कालज्ञान समजलें, पण प्रथम कोणता मनु झाला व त्यानें सृष्टीची योजना कशी केली तें सांगावें; तेव्हां ऋषि म्हणाले; "राजा जनमेजया, प्रथम सृष्टिप्रवर्तक स्वायंभुव नांवाचा मनु झाला. प्रत्येक मनूचे काळीं सप्तऋषि, देव व मनूचे पुत्र हे असतातच. या सर्वांच्या प्रयत्नानें सृष्टीची उत्पत्ति होते. यासंबंधानें पुराणांत अशी कथा आहे कीं, अग्नि, जीवन, वन, पर्वत, पंचभूतें, दशप्राण, वाचा, देव व सत्वादि त्रिगुण यांनां प्रथम स्वयंभुव मनु प्रसवला, पंचमहाभूतें हीं मनूच्या श्वासापासून उत्पन्न झालीं व तेज ही मनूची स्वयंज्योति होय. समुद्रादि व फलपुष्पयुक्त वसुमति प्रथम स्वायंभुव मनूनें उत्पन्न केली. सृष्टि उत्पन्न झाल्यावर मार्कंडेय-ऋषीला मोठें समाधान वाटूं लागलें व तो कोणी तरी प्राणी भेटेल म्हणून इतस्ततः संचार करूं लागला. त्या सृष्टींत चंद्र, सूर्य, तारे, वगैरे नसल्यामुळें सर्वत्र अंधःकार होता. जिकडेतिकडे पाण्यावांचून दुसरें कांहीं नसल्यामुळें मार्कंडेयऋषीनीं आदिपुरुषाची प्रार्थना केली, तेव्हां आदिपुरुषानें त्याला दर्शन

दिलें, व स्वारोचिष या नांवाचा मनु उत्पन्न झाला; व त्याच्या वासनेपासून सृष्टीचा विस्तार झाला. ह्या द्वितीय मनूच्या प्रलयकालींही पूर्वीप्रमाणेंच सर्वांचा लय झाला, व मार्केडेय ऋषींनीं पुन्हा आदिपुरुषाची प्रार्थना केली, तेव्हां तिसरा मनु तेजापासून उत्पन्न झाला; व पुन्हा पूर्ववत सृष्टीची उत्पत्ति झाली. पुढें त्या मनूचाही योग्यकाळीं नाश झाला. तेव्हां पुन्हां मार्केडेय ऋषि त्यांत सांपडले, व ईश्वराची करुणा भाकूं लागले. मग चौथा मनु उत्पन्न झाला, व त्याजपासून पुन्हा सृष्टीची उत्पत्ति झाली. या मनूचें नांव प्रभाघन होय. त्या प्रळयकाळीं चंद्रसूर्यांच्या उत्पत्तीपूर्वी मार्केडेय ऋषि पाण्यांत तरंगत असतांना एका वटवृक्षाच्या पत्रावर एक बालमूर्ति दृष्टीस पडली. तो वृक्ष इतका विशाल होता कीं, त्यानें स्वर्ग, मृत्यु व पाताळ व्यापिलें होतें. त्या वृक्षाला एक मूळ होतें व तीन पेडें, चार शाखा, व अठरा पारंब्या होत्या. पानें व फुलें अनंत होतीं. त्या वटपत्रावरील ती चरणांगुष्ठ मुखांत घातलेली बालमूर्ति पाहून मार्केडेय ऋषीला मोठें कौतुक वाटलें, आणि त्यांनीं त्या बालकास ‘ तूं कोण आहेस ’ असा प्रश्न केला. तेव्हां बालमुकुंद म्हणाला; “ मार्केडेया, मला–बाल-मुकुंद–असें म्हणतात. या सृष्टीचा कर्ता हर्ता तो मीच असून, हा प्रलय चमत्कार दाखविण्यासाठीं मीच तुला चिरंजीव केलें आहे. तूं माझें हें प्रलयचरित्र सर्वांना श्रुत कर.” असें म्हणून ती बालमुकुंदाची मूर्ति अदृश्य झाली. नंतर मार्केडेय ऋषि पाण्यावर तरंगत असतांना पांचवा मनु जो रैवत तो उत्पन्न झाला. हा रैवत मनु उत्पन्न झाल्यावर त्यानें मोठ्यानें हुंकार केला. त्या हुंकारामुळें प्रलयजलाला छिद्र पडलें व त्यांतून तें सर्व प्रलयजल नाहींसें झालें. हें निराकार छिद्र म्हणजे आकाश होय. त्या आकाशांत ह्या मनूच्या हुंकारामुळें चंद्र सूर्य तारे वगैरे उत्पन्न झाले. प्रकाशापासून आकाश व आकाशापासून वायु उत्पन्न झाला. वायूपासून अग्नि, आणि वायु व अग्नि यांपासून पुन्हां उदक निर्माण झालें. नंतर त्या उदकांत श्रीहरीच्या नाभीपासून एक सहस्रदळाचें कमळ उत्पन्न झालें. या कमळाचा मध्यकोम तो मेरु पर्वत होय. कोमाच्या सभोंवताली जे बारीक केंसर आहेत ते अठरा असून अन्य लहान केंसर आहेत. त्या कमळांतील रस ते समुद्र व कमळांतील मल ती पृथ्वी होय. या कमळावर हंसस्वरूप ब्रह्मदेव असून तो वेदाचें पठण करीत आहे.

हे राजा जनमेजया, आदिपुरुष हा, सत्व, रज व तम या तिन्हीं गुणांनीं युक्त असा आहे. त्या आदिपुरुषाच्या सत्व गुणापासून विष्णूची उत्पत्ति झालेली आहे. रजोगुणापासून ब्रह्मदेवाची उत्पत्ति झालेली असून तमोगुणापासून रुद्राची उत्पत्ति झालेली आहे. ब्रह्मदेव हा त्या विराट पुरुषाच्या नाभीस्थानीं असून रुद्र हा ललाटस्थानीं व विष्णु हा हृदयस्थानीं आहे. हे तिन्ही देव जरी निरनिराळे आहेत तरी ते एकाच आदिपुरुषापासून उत्पन्न झालेले असल्यामुळें

ते एकच आहेत. विष्णूच्या कर्णमळापासून मधु व कैटभ असे दोन राक्षस निर्माण झाले. या राक्षसांचा विष्णूनें कसा नाश केला, व त्यांच्या मेदापासून मेदिनी कशी निर्माण झाली, हें मी तुला पूर्वी सांगितलें आहेच. असो, नंतर या रैवत मनूचा काळ झाल्यावर, पुन्हां पूर्वीप्रमाणें प्रलय होऊन सर्वांचा नाश झाला. पुढें चाक्षुप या नांवांचा मनु उत्पन्न होऊन त्यानें पुन्हां पूर्वीप्रमाणें ही सृष्टि निर्माण केली. या सहाव्या मनूनें सृष्टि कशी निर्माण केली या विषयींची कथा तुला आतां सांगतों."

---

## अध्याय ३ रा.

### पिंडब्रम्हांड विचार.

ऋषि म्हणाले; "राजा जनमेजया, पांचव्या मनूचा अंत होऊन जिकडे तिकडे जलप्रलय झाल्यावर, निराकार अशा ईश्वरास सृष्टिरचनेची वासना उत्पन्न झाली. त्या आदिपुरुषाला हा विचार तो निद्रिस्थ किंवा जागृतावस्थेंत नसतांनां उत्पन्न झाला होता. प्रभूला तो विचार उत्पन्न होण्याबरोबर, त्यानें मोठ्यानें हुंकार केला, त्यायोगें वायु उत्पन्न झाला, व त्यापासून पंचतत्वें उत्पन्न झालीं. पुढें या सृष्टीचा विस्तार हिरण्यगर्भापासून झाला. हिरण्यगर्भ ह्मणजे मूळचें अंडें होय. त्या अंड्याला हिरण्यगर्भ असें म्हणतात. तें अंडें फुटल्यावर त्यांतून सावयव असा ब्रह्मदेव व त्यामागून मनु उत्पन्न झाले. या सहाव्या मनूचें नांव चाक्षुस असें होतें. मनूपासून सूर्य व चंद्र उत्पन्न झाले, व त्या अंड्यांतून जो जार बाहेर पडला, त्यापासून ही सृष्टि निर्माण झाली. त्या हिरण्यगर्भअंड्याची खालची कवटी तें पाताळ असून वरच्या कंवटीपासून आकाश निर्माण झालेलें आहे. मग ब्रह्मदेवानें प्रथम स्वर्गलोक, नंतर सत्यलोक, मग गंधर्वलोक, देवलोक, तारालोक, चंद्रलोक, आदित्यलोक, पितृलोक, वगैरे लोकांची उत्पत्ति केली. असे अनेक लोक उत्पन्न झाल्यावर सृष्टीचा विस्तार होण्यासाठीं आदिपुरुषाच्या कृपेनें ब्रह्मदेवास मरीचि, नारद, दक्ष, अत्रि, अंगिरा, कश्यप, पुलस्ति, पुलहक्रतु वगैरे पुत्र झाले. यापैकीं कश्यप नांवाच्या मुलाला तेरा स्त्रिया होत्या त्यांच्यापासून ही सर्व सृष्टि निर्माण झाली. अदिति नांवांची स्त्री देवांनां प्रसवली, म्हणून देवांनां आदितेय असेंहि म्हणतात. विनता नांवांच्या स्त्रीपासून सर्व प्रकारचे पक्षी उत्पन्न झाले. कद्रु नांवाच्या स्त्रीपासून अनेक प्रकारचे सर्प उत्पन्न झाले. याप्रमाणें कश्यपऋषीच्या तेरा स्त्रियांपासून गण, गंधर्व, यक्ष, किन्नर, साठसहस्र ऋषि वगैरे उत्पन्न झाले आहेत. हे राजा जनमेजया, पुढें या सहाव्या मनूचाही काळ सृष्टिक्रमाप्रमाणें संपला व त्याचा नाश झाला.

त्याबरोबर सृष्टींत प्रळयकाळाचीं चिन्हें उत्पन्न झालीं व सर्व सृष्टीचा पंचतत्वासह नाश झाला. आकाश, पाणी, पाताळ, कैलास, वगैरे सर्वांचा नाश होऊन, फक्त अविनाशी जें परब्रह्म तें तेवढें राहिलें. कांहीं कालानंतर हा आदिपुरुष जागृत झाला, व त्यास सृष्टि उत्पन्न करावी अशी इच्छा उत्पन्न झाली. इच्छा उत्पन्न होतांच त्याच्या नाभीकमळापासून ब्रह्मदेव सावित्रीसह उत्पन्न झाला, हृदयापासून विष्णु लक्ष्मीसह निर्माण झाला व ललाटदलापासून शंकर पार्वतीसह उत्पन्न झाला." ही कथा वैशंपायनऋषि सांगत असतांनां जनमेजयराजा मध्येंच म्हणाला; "ऋषि महाराज, आपण महादेव पार्वतीसह उत्पन्न झाला असें सांगितलें, पण पार्वती ही हिमालयाची मुलगी असून तिच्या बरोबर शंकराचा विवाह झाला, असें सांगतात, तर यांत खरें काय ?" तेव्हां वैशंपायन म्हणाले; "राजा, दाक्षायणी हीच पार्वती होय. दाक्षायणीचा दक्षयज्ञांत नाश झाल्यावर तिनें हिमालयाच्या पोटीं जन्म घेतला व शंकराशीं विवाह केला. तेव्हांपासून दाक्षायणीला पार्वती असें म्हणतात." असो; वैवस्वत मनु उत्पन्न झाल्यावर त्याच्याबरोबर चंद्र व सूर्य उत्पन्न झाले, व सृष्टीचें कार्य सुरळीत चालूं झालें. पुढें या सातव्या मनूचाही नाश झाला व जलप्रलय होऊन पुन्हां पूर्वींप्रमाणें आदिपुरुषाला सृष्टिरचनेची इच्छा झाली. मग आठवा सावर्ण या नांवाचा मनु उत्पन्न झाला. प्रथम आदिब्रह्मानें निरसनाची रचना केली. हें निरसन शून्याला प्रसवलें व यावेळीं जगाला परमेश्वराचा भास शून्य रूपानेंच झाला. मग या शून्यापासून निरालंब उत्पन्न झालें, व निरालंबापासून अंधकार उत्पन्न झाला. अंधकारापासून आकार व आकारापासून चालक परमेश्वर उत्पन्न झाला असें म्हणतात. या निराभास परमेश्वरापासून शक्ति उत्पन्न झाली. शक्तीचें पोटीं अगोचर व आलेख असे निर्माण झाले. या आलेखापासून वायु निर्माण झाला; व वायूपासून निरंजनाची उत्पत्ति झाली. नंतर हें आकारयुक्त चराचर निर्माण झालें. त्या शून्य निराकारापासूनच हा त्रिवेणी विस्तार झाला आहे. प्रथम आदिधर्म उत्पन्न झाला असून मग विराट पुरुष उत्पन्न झाला. त्या विराट पुरुषाच्या पादुका तोच पाताळलोक होय. मृत्युलोक म्हणजे त्याच्या कानांतलीं कुंडलें होत. आकाश म्हणजे ब्रह्मगोळ असून मागील भाग तो मेरु पर्वत होय. हे राजा जनमेजया, मी सांगतों हें तुला कदाचित समजत नसेल, पण त्यास कांहीं इलाज नाहीं. कारण आध्यात्मविषय हा असाच गहन आहे. तो समजावयास फार कठिण आहे. या विषयाची वाच्यता निष्कारण करूं नये. अधिकार ओळखून तो कथन करावा अशी नीति आहे. तुला ही कथा मी लौकिकासाठीं सांगितली आहे.

ही जी ब्रह्मांडरचना आहे, तशीच रचना पिंडाचीही आहे; आणि म्हणूनच जें पिंडीं तेंच ब्रह्मांडीं, असें ज्ञाते म्हणतात. हा प्रकार जे परमार्थी आहेत त्यांच्या-

वांचून इतरांना कळवयाचा नाहीं. श्रीहरीच्या नाभीकमळापासून कमळ उत्पन्न हो-ऊन जसें हें ब्रह्मांड उत्पन्न झालें आहे, त्याप्रमाणेंच, पिंडांतील आधारमूळ सहस्र-दळ कमळ आहे. या कमळापासून अग्निचक्र निर्माण झालें. या अग्निचक्राचे ठिकाणीं सर्व तेजाचें रूप सामावलेलें असून तेंच त्याचें मुख आहे. हे एक पर-मात्म्याचें स्थान असून त्यास अध्यात्म भाषेंत सम्यक चंद्र असें नांव आहे. जें चंद्र नसून आपतेजरूपीं बीज आहे. त्याखालचें सर्व दलस्थान हें शिवाचें स्थान आहे. सहस्रदळ कमळाचे तळवटांत जें द्वादशदळाचें कमळ आहे. त्यांत महाविष्णूचें क्षीरसागर या नांवाचें स्थान आहे. तेथें महाविष्णु अक्षय योग-निद्रेंत असतो. या विष्णुकमळाखालीं चार हजार पाकळ्यांचें कमळ आहे, तें ब्रह्मदेवाचें स्थान होय. तेथून वायु उत्पन्न झाला, तो द्वादशांगुळें प्रवेश करून नासिकाग्रीं भेद पावला आहे. त्याखालीं दुर्धर्ष आहे. यासच स्वाधिष्ठान असें म्हणतात. पृथ्वीची रचना करण्याकरितां ब्रह्मदेव मूळ त्याच ठिकाणीं उत्पन्न झाला. प्रथम लोकाला भूर्लोक असें म्हणतात. भुर्लोक हें देवाचें स्थान आहे; आणि जनलोक हें आद्य पुरुषाचें स्थान आहे. त्यापासून तपोलोक उत्पन्न झालेला आहे. या तपोलोकाखालीं शेषलोक उत्पन्न झालेला आहे. या शेष लोकाखालीं कूर्मलोक असून त्याखालीं वराहलोक आहे. हे राजा जनमेजया, आतां एकवीस स्वर्गांची गणना कशी आहे, तें तुला सांगतों. या एकवीस स्वर्गांचें वर्मस्थान एकच असून तें कमळ फार मोठें व हजार पाकळ्यांचें आहे. तेथील सुखाचा अनुभव ज्यांनीं तें ज्ञान संपादन केलें आहे, त्यांनाच प्राप्त होतो. तेथील प्रथम स्थानाला श्रीहाट असें म्हणतात, दुसरें स्थानाला उद्धट असें म्हणतात, तिसरे स्थानाला गोल्हाट असें म्हणतात, आणि चौथे स्थानाला औटपीठ असें म्हणतात. हीं सर्व स्थानें आक्रमण करण्यास ज्या शिडीची योजना केलेली आहे, तिला त्रिवेणी असें म्हणतात. योग्यानें आपलें लक्ष या त्रिवेणीकडे एकसारखें ठेविलें पाहिजे. या औटपीटाच्या भ्रमरगुंफेंत प्रवेश होण्यास गुरूच्या कृपेची अत्यंत आवश्यकता आहे. तेथील प्रमाण गुरुपादुका हेंच होय. आठ गिरि, मेरू व सप्तपाताळ हीं सर्व स्थानें आद्य पुरुषानें निर्माण केलीं आहेत. त्या पुराणपुरुषानें हीं सर्व स्थानें निर्माण करून त्यांचें तो स्वतःच दहन करूं लागला, तेव्हां अनादिधर्म म्हणाला; "हे आदिपुरुषा, तुम्हीच हें शरीर निर्माण केलें असतां त्याचें दहन तुम्हींच कां करितां?" तेव्हां तो सर्वेश्वर म्हणाला; "अशा रीतीनें तुला हें त्रिभुवन निर्माण करण्याची आज्ञाच मीं दिली आहे, असें तूं समज." अशा रीतीनें पाहिलें असतां तो आदिपुरुष सर्वांचा पितामाता व सहोदर आहे, परंतु तो सर्व कर्मांपासून वेगळा आहे. पुरुषाचा अंगमद जसा सर्व व्यापून अभेद असतो, त्याप्रमाणें तो परमात्मा सर्व व्यापून निराळा आहे. संसारांतील कर्ताकर्म तो तोच असून

व्यापारांतील धर्माधर्म तोच आहे. तसेंच जगांतील उत्पत्ति, स्थिति व लय हीं तोच आहे. पुष्पांतील वास, वनस्पतीचा गुण व तेजांतील प्रकाश, हा तोच आहे. त्याचा सर्वत्र स्वयंसिद्ध संचार झालेला आहे. कर्म, धर्म, शोभा, अंकुर, माया, अव्यक्त, विलय, हे सर्व त्याचे आपोआप होणारे व्यापार आहेत. चंद्रसवितादि स्वरूप हें मन असून, सत्व हेंच मेदमांसादि आहे. याचीच छपन्न कोटी वसुंधरा निर्माण झाली असून नखें अष्टकुळाचळें आहेत. रोमसार हा अस्त्रभूत असून रोमावली ह्या वनस्पती आहेत. मस्तकावर जी रोमावली ती आकाशांतील तारकामाला होय. ह्या तारका नऊ कोटी आहेत व तितकेंच मस्तकावरील केस आहेत" हें वरील विवेचन ऐकून जनमेजयराजा म्हणाला; "वैशंपायन ऋषि, आपण सांगितलेल्या माहितीवरून पिंडाचें व ब्रह्मांडाचें सादृष्य माझ्या चांगलें लक्षांत आलें, परंतु हे जे सप्तसमुद्र आहेत, हे पिंडांत कसे आहेत तें सांगावें." तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले; "राजा, जलसमुद्र हा स्वेदापासून उत्पन्न झालेला असून, नेत्रोदकापासून अमृतसमुद्र निर्माण झालेला आहे. कल्पनेपासून उदधी, नाभिजला पासून महोदधी, मूत्रापासून क्षारसमुद्र व दहनाचे पोटांतून घृतसमुद्र उत्पन्न झालेला आहे. तो घृतसमुद्र सत्रावीच्या मूळ देठीं आहे. तसेंच गंगा, यमुना, सरस्वती ह्या नद्या त्या शरीरांतील इडापिंगळादि शिरा होत. शरीरांचीं आठ अंगें असून मुख्य नाड्या नऊशें आहेत. प्रत्येक नाडीला अनेक शाखा आहेत. त्या सर्व नाड्यांची संख्या सव्वालक्ष आहे. चौसष्ट कला पासून चौसष्ट योगिनी उत्पन्न झाल्या आहेत. या सर्व योगिनी जवळ तेहतीस कोटी देव आहेत. कल्पनेपासून प्रथम आकाश उत्पन्न झालें. त्या आकाशापासून विष्णु उत्पन्न झाला. विष्णूच्या मुखापासून ब्राह्मण व भुजांपासून क्षत्रिय, जानुपासून वैश्य व चरणापासून शुद्र उत्पन्न झाले. इंद्रियांपासून पशु उत्पन्न झाले, व कक्षस्थानापासून आठ कोटी भैरव व कात्यायनी उत्पन्न झाल्या. अशी ही आठव्या मनूची उत्पत्ति आहे. पुढें कालक्रमानें या मनूचाहि नाश झाला व जिकडे तिकडे जलमय झालें. त्या वेळीं मार्कंडेय ऋषि पाण्यावर भ्रमण करीत असतां त्यांचे दृष्टीस कैलास पर्वत पडला. तो पर्वत बर्फाप्रमाणें धवल असून त्याचा विस्तार बारा कोटी योजनांचा होता. सप्तपाताळ व एकवीस स्वर्ग यांची रुंदी एकेक योजनांची आहे. कैलासाची उंची चार कोटी योजनें व मेरूचा विस्तार बत्तीस कोटी योजनांचा आहे. कैलासाचा राज्यधर जो शूळपाणी तो तेथें असतो. क्षीरसागरांत शेषावर लक्ष्मीसह श्रीविष्णु मुरारी हा असतो, आणि सत्य लोकांत सावित्रीसह ब्रह्मदेव हा असतो. या प्रमाणें हे तीन लोकचे तिन्ही ब्रह्मांडनायक आपआपले स्थानीं आहेत. हे राजा जनमेजया, आतां तुला चार खाणी कोणत्या आहेत तें सांगतों. जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज अशा चार खाणी होत.

ज्या प्राण्यांची उत्पत्ति घामापासून होते त्यांना स्वेदज असें म्हणतात. नेत्र व अस्ती यापासून जे जीव निर्माण होतात, त्यांना अंडज असें म्हणतात. कारण त्यापासून प्रथम अंडें निर्माण होतें व मग अंड्यापासून प्राणि उत्पन्न होतो. गर्भाचे सभोंवतीं जी पिशवी असते, तिला जारज असें म्हणतात. या जारापासून जे प्राणी उत्पन्न होतात, त्यांना जारज असें म्हणतात. वाळवी इत्यादि प्राण्यांना उद्भिज्ज असेंहि म्हणतात. कारण हे प्राणि मेदिनीपासून उत्पन्न होतात. तसेंच वनस्पति ह्याहि उद्भिजच आहेत. याशिवाय एक पांचवी खाणी आहे, तींतून वर्षाऋतूंत कांहीं प्राणि पाण्यापासून उत्पन्न होतात, तसेंच कांहीं कीटकांचें रूपांतरहि त्यापासून होतें. याप्रमाणें या चार खाणी आहेत.

---

## अध्याय ४ था.

### १. तत्व–गुणधर्म विवेचन.

राजा म्हणाला; ऋषि, आपण चाऱ्ही खाणीविषयीं माहिती सांगितली, तशींच चार वाचा व तत्वांचे गुणधर्म याविषयींची माहिती सांगावी. तेव्हां ऋषि म्हणाले; “ हे राजा जनमेजया, परा, पश्यंती, मध्यमा व अणुर अशा चार वाचा आहेत. पंचतत्वापासून मन, बुद्धि, अहंकार व चित्त असें उत्पन्न झालें, व आकाशापासून अहंकार उत्पन्न झाला. तेजापासून बुद्धि, अपानापासून मन आणि वायुपासून चित्त असें उत्पन्न झालेलें आहे. या सर्वांना ज्ञानामुळें बोध प्राप्त झालेला आहे. आकाशाचें मुख कर्ण हें असून त्वचा हें वायूचें मुख आहे. डोळे हें तेजाचें मुख असून रसना हें आपाचें मुख आहे, व पृथ्वीचें मुख वदन हें आहे. तसेंच आकाशाचा आहार शब्द, वायूचा आहार स्पर्श, तेजाचा आहार रूप, आपाचा आहार रस आणि पृथ्वीचा आहार षड्रसपक्वान्नें याप्रमाणें प्रत्येकांचे आहार आहेत. आतां या पंचतत्वांच्या चवी कशा आहेत तें तुला सांगतों. आप हें गोड असून, पृथ्वी आंबट, तेज चोखट, वायु तुरट आणि आकाशाची चव कडवट आहे. पृथ्वीचा वर्ण पीत असून आपाचा वर्ण पांढरा आहे. वायूचा वर्ण नील, अग्नीचा वर्ण लाल व आकाशाचा वर्ण तांबूस काळा याप्रमाणें त्यांचे वर्ण आहेत. तसेंच पृथ्वीचा गुण निद्रा, आपाचा गुण रुचि, तेजाचा गुण पाहणें, वायूचा गुण गति आणि आकाशाचा गुण पोकळ राहणें असे त्यांचे गुण आहेत. आतां या पंचतत्वाचें प्रमाण किती आहे हें तुला सांगतों. तेजाचें प्रमाण आठ अंगुळें असून, पाण्याचें प्रमाण चार अंगुळें, वायूचें प्रमाण बारा अंगुळें व आकाशाचें प्रमाण सोळा अंगुळें आहे. जीवनाचें शस्त्र सुरी, वायूचें शस्त्र तरवार, पृथ्वीचें शस्त्र फरशु व आकाशाचें शस्त्र बाण, याप्रमाणें त्यांचीं शस्त्रें आहेत. याप्रमाणें ह्या पंचतत्वांची स्थिति आहे. आतां त्रिगुणाविषयीं तुला सांगतों.

सत्व, रज व तम असे तीन गुण आहेत. या त्रिगुणानें सर्व चाराचर व्याप्त झालें आहे. विष्णु हा सत्वगुणविशिष्ट असून, ब्रह्मा हा रजोगुण विशिष्ट आहे, व शिव हा तमोगुण विशिष्ट आहे. सत्व हें गौर वर्णाचें असून, तम हें कृष्ण वर्णाचें आहे; व रज हें गौर व कृष्ण या दोहोंच्या मिश्रवर्णाचें म्हणजे सांवळें असें आहे. सत्व पृथ्वीपासून, रज पाण्यापासून व तम तेजापासून निर्माण झालें आहे. विष्णु ही देवता जरी सत्वगुणविशिष्ट आहे, तरी ती त्रिगुणातीत आहे. तो सत्वानें सात्विक असून, रजोगुणानें राजस असा आहे, व तमोगुणानें तामसही आहे. आतां पंचवायूंचीं स्थानें कोणतीं हें तुला सांगतो. समानवायु हा नाभिस्थानीं असून प्राणवायु हा हृदयस्थानीं आहे. अपानवायु हा गुदस्थानीं असून कंठस्थानीं उदानवायु आहे. या त्रिगुणाला व्यापून टाकणारी जी वासना ती अहंकारापासून उत्पन्न झालेली आहे. मनाचें मुख निशापति हें असून पवनाचें मुख गभस्ति हें आहे. तेथें चित्तविकासस्थितीचा उद्भव होतो. चित्त हें हृदय व सर्वांग व्यापून असतें आणि हेतु पांच अंगांत असतो.

ब्रह्मांडाप्रमाणें पिंडाला मुख्य आधार कुंडलिनीचा आहे. पिंडांत मस्तक हेंच आकाश, पृथ्वी हीच अधिष्ठान, नासिक हेंच वायु व कंठ हेंच आप आहे. याप्रमाणें पिंड व ब्रह्मांड यांची स्थिति अगदीं सारखी आहे. उपकंटाला स्वाधिष्ठान असें म्हणतात. त्या स्वाधिष्ठानाचें उपकंठांत व मणिपुराचें तळवटांत शोणित व शुक्र असें एकत्र झालें म्हणजे गर्भोत्पति होते. या गर्भाला जे अंकुर फुटतात त्याला इंद्रियें असें म्हणतात. गर्भाला ज्यावेळीं इंद्रियें प्राप्त होतात, त्याचवेळीं तो पंचतत्वानेंही व्याप्त होतो. पोट व पाठ यांमध्यें वायु उत्पन्न होतो, शब्दकळा उमटते व शुक्रशोणिताची भेट होते. पहिले महिन्यांत आकार प्राप्त होऊन अष्टधातु व पांच रस उत्पन्न होतात. शिवाय संचित, क्रियमाण व प्रारब्ध ह्या संबंधाचीही व्यवस्था होते. दुसरे महिन्यांत गर्भ अंड्याप्रमाणें असतो. तिसरे महिन्यांत त्याला अंकूर उत्पन्न होतात. चवथे महिन्यांत बाह्य नाड्या निर्माण होतात. पांचव्या महिन्यांत अस्थि व मांस उत्पन्न होऊन पंचतत्वाची पूर्णता होते. सहाव्या महिन्यांत हाताची व पायाचीं बोटें व केंस उत्पन्न होतात. सातवे महिन्यांत नासिक, नेत्र व प्राण हीं उत्पन्न होतात. आठव्या महिन्यांत पवन दशा प्राप्त होते, व हा पिंडब्रह्म संपूर्ण प्रकारें तयार होतो. नववे महिन्यांत जीवांश पूर्ण होऊन तो गर्भ योनीभागांतून बाहेर येतो. याप्रमाणें पिंडदेह हा ब्रह्मांडाप्रमाणेंच घडविलेला आहे. या गर्भात जो सूक्ष्म जीव तो शंखिनि नळिकेनें प्रवेश करितो.

वरील विवेचन ऐकून जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; "ऋषि, हा पिंड ब्रह्मांडांतील जीव, प्रळयकाळीं कोठें समावला जातो, तें कृपा करून सांगावें. तेव्हां वैशंपायनऋषि म्हणाले; "राजा, स्थूलपिंड हा ब्रह्मांडांत

मिळून जातो. पृथ्वीमध्यें पृथ्वि मिळून जाते; तेजामध्यें तेज; वायूमध्यें वायु व आकाशांत आकाश हें मिळून जातें, व या पांचांमागून पंचवीसहि तत्वें त्या त्या तत्वांत मिळून जातात. अस्थि, त्वचा, मेद, मांस व स्नायु हीं पृथ्वींत मिळतात. लाळ, मूत्र, शुक्र व शोणित हे आपांत मिळतात. नेत्रशक्ति व तेज हीं तेजांत मिळतात. चलन, वलन, धांवणें, आकुंचन व प्रसरण यांचा लोप वायूंत होतो; व राग, द्वेष, हर्ष, भय, चिंता यांचा लय आकाशांत होतो. याप्रमाणें या पिंडाची स्थिति आहे. मन हें चंद्रस्वरूप असून त्याचा पिंडांतील चंद्रांत लोप होतो, व चित्ताचा सूर्यांत लय होतो; आणि वायु हा ओंकार स्वरूप असून त्याचा ओंकारांत लय होतो." हें ऐकून जनमेजयराजा म्हणाला; "ऋषि, हा पिंड ब्रह्मांडांत कसा समावतो, हें आपल्या विवेचनावरून मला समजलें. पण या पिंडाप्रमाणेंच ब्रह्मांडाचा जेव्हां नाश होतो, तेव्हां तें कोठें समावतें, हें ऐकण्याची माझी इच्छा आहे. ब्रह्मांड हे शून्यांत समावलेलें आहे असें आपण मागें सांगितलें होतें; पण तेवढ्यानें माझी शंका दूर झाली नाहीं. तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले; "राजा जनमेजया, ज्या वेळीं पिंडाप्रमाणें या ब्रह्मांडाचाहि नाश होतो, त्या वेळीं प्रथम पृथ्वि ही पाण्यांत मिसळते. पाण्याचा नाश तेजाकडून होतो, तेज वायूंत समावतें, वायु आकाशांत मिळतो आणि आकाश शून्यांत विलीन होतें. याप्रमाणें पिंडाची व ब्रह्मांडाची स्थिति आहे. ब्रह्मांडाचा जेव्हां नाश होतो, व शून्यच राहतें, तेव्हां आदिविष्णुहि निद्रिस्थ होतो.

ह्या प्रलयसमयीं मार्कंडेय ऋषि उदासीन होऊन भटकत असतां आदिपुरुषाला हंसूं आलें. तो हास्यध्वनि आकाशांत मोठ्यानें दुमदुमला. त्यायोगें सर्व पाणी आटून गेलें. नंतर आदिपुरुषाच्या मुखापासून ज्योति निघाली व त्यामुळें आकाशांत चंद्र, सूर्य, तारे वगैरे निर्माण झाले. या आदिपुरुषाचे जागृतावस्थेपासून परा वाचा; नासाग्रापासून पश्यंती; व हृदयस्थानापासून मध्यमा उत्पन्न झाली. मनासहित जेव्हां पवन उसळतो, तेव्हां परा, पश्यंती यांना चलन मिळून त्या पश्चिमेकडे काकिणीमुखाजवळ जातात. पश्यंती वाचेचें स्थान नासिकाग्र हें आहे व ती सेथून प्रवेश करिते. वैखरी वाचा म्हणजे रुद्रशक्ति होय. जी वाचा शून्यांत समावते, तिला मध्यमा असें म्हणतात. परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी, व अनिर्वाच्य, या पांच वाचांपैकीं अनिर्वाच्य वाचा ही निराकारांत समावणारी आहे, तिचा उद्भव परावाचेनें होतो. म्हणजे कोणत्या शब्दाचा उच्चार करावयाचा हें परावाचा ठरविते, व पश्यंती वाचेनें त्याचा उच्चार होतो. आतां या वाचेचे वेदार्थ कसे आहेत तें तुला सांगतों. परावाचा म्हणजे अथर्ववेद, पश्यंतीवाचा म्हणजे सामवेद, मध्यमा म्हणजे यजुर्वेद व वैखरी म्हणजे ऋग्वेद होय. या चाऱ्ही वेदांपासून उत्पन्न झालेला जो मनु त्याला रुद्रक म्हणतात. इंद्रियें, मन, बुद्धि व अहंकार यांचा कार्यकारण संबंध आहे.

जाग्रीत, स्वप्न, सुषुप्ता, तूर्या व उन्मनी या पांच अवस्था आहेत. जाग्रतावस्था म्हणजे धरणी होय. स्वप्नावस्था ही स्वतंत्रावस्था असून सुषुप्तावस्थाही जाग्रति व स्वप्न यांच्या मधली स्थिति आहे. तूर्यावस्था ही जाग्रतावस्थेला प्रबोध करणारी आहे, व उन्मनी अवस्था ही आकाशीं वास करणारी अवस्था आहे. राजा जनमेजया, आतां मुद्रा किती प्रकारच्या आहेत तें तुला सांगतों. खेचरी, भूचरी, चांचरी, अगोचरी व आलेख याप्रमाणें पांच मुद्रा आहेत. खेचरी-मुद्रा नादबिंदूंत, भूचरीमुद्रा नासाग्रीं, चांचरीमुद्रा नेत्रयुगलीं, अगोचरीमुद्रा कर्णाचे ठायीं व आलेखमुद्रेचें स्थान शून्य ( आकाश ) हें आहे. जें आलेखचें स्थान तेंच उन्मनीचें स्थान होय. तेथें तूर्यावस्था ही लीन होते. त्या उन्मनीच्या स्थानांत काळनिद्रेला मुळींच थारा मिळत नाहीं. त्या अवस्थेला जो जाऊन पोहोंचला त्याचें जन्ममरण चुकलें असें समजावें. वासना ही बुद्धि व जीव यांस वारंवार विकार उत्पन्न करिते व त्या वासनेच्या प्रेरणेनें इंद्रियेंहीं चलवलन करितात. स्वाधिष्ठान म्हणून जें एक कमळ मनुष्याजवळ आहे, त्या कमळांतील सत्व, रज व तम हे तीन गुण म्हणजे बिंदुत्रिकुट होय. या कमलपुष्पाला अनेक पाकळ्या आहेत. ज्या ज्या पाकळीवर जीव भ्रमण करितो, त्या त्या पाकळी-प्रमाणें वासना उत्पन्न होते. प्राण, अपान, व्यान, समान व उदान असे पांच वायु आहेत हें तुला मागें सांगितलें आहेच. याशिवाय पिंडब्रह्मांडांत पांच उपप्राण आहेत. त्यांचीं नांवें—नाग, कूर्म, कृकलय, देवदत्त व धनंजय अशीं आहेत. प्राण हृदयस्थानीं, अपान गुदस्थानीं, समान हा नाभीचे खालचे स्थानीं, उदान कंठस्थानीं व व्यान हा सर्व शरीरगत असतो. नाग, कूर्म हे दोन वायु इडा नांवाच्या नाडींत असतात, कृकल व देवदत्त हे पिंगळा नांवाच्या नाडींत असतात, आणि धनंजय नांवाचा वायु सुषुम्नेंत असतो. आतां दहा नाड्या कोणत्या आहेत हें तुला सांगतों. इडा, पिंगळा, सुषुम्ना, गांधारी, जीवनी, दशतुंडी, दीक्षाबाणदशा, शंखिनी, द्वितीया, व सौक्षिणी अशा दहा नाड्या आहेत. राजा जनमेजया, दहाव्या मनूची कथा सांगतांना ही माहिती तुला मीं पूर्वीं सांगितली आहेच.

---

## अध्याय ५ वा.

### १. मनुवंशोत्पत्ति कथा.

जनमेजयराजा वैशंपायनऋषीला म्हणाला; " ऋषि महाराज, आपण सांगितलेली मनूविषयींची कथा ऐकून मला मोठें समाधान वाटलें. आतां दहाव्या मनूची उत्पत्ति कशी झाली तें सांगावें. तेव्हां वैशंपायनऋषि राजाला ती कथा सांगूं लागले. ते म्हणाले; " हे राजा जनमेजया, महाप्रळय झाल्यावर

कोणे एके दिवशीं जगत्कारण जो परब्रह्म आदिपुरुष तो जागृत झाला. परमात्मा जागृत झाल्याबरोबर त्याची दृष्टि तामसावर गेली. तेव्हां वासना उत्पन्न होऊन देवापुढें उभी राहिली. त्या वासनेला परमात्म्यानें प्रळयजीवनाचें मंथन करण्याची आज्ञा दिली. त्या आदिपुरुषाच्या शब्दहुंकारानें प्रलयजल नाहींसें झालें. मग प्रभूनें कल्पनेची रवि व शेषाचा दोर करून मंथन केलें. त्या मंथनाच्या श्रमानें देवाला घाम आला. त्या घामापासून मनु उत्पन्न झाला. हा दहावा मनु होय. या मनूबरोबरच चंद्र व सूर्य निर्माण झाले. नंतर धर्म व सहस्रफणी यांनीं मंथन केलें, तेव्हां उदकाला फेंस येऊन, त्या फेंसापासून पृथ्वि उत्पन्न झाली, व पाण्यांतल्या तेजापासून आकाश व निरालंब उत्पन्न झालें. त्यानंतर सात पाताळें उत्पन्न झालीं. आणि मग चार वाचा व चार खाणी निर्माण झाल्या. या चार वाचा ब्रह्मदेवाच्या चाऱ्ही मुखापासून उत्पन्न झाल्या. चौदा विद्याहि ब्रह्मदेवापासूनच उत्पन्न झाल्या, व चौदा रत्नेंहीं त्यावेळीं मंथनांतून निघालीं.

हे राजा जनमेजया, आतां तुला चार युगांची स्थिति कशी आहे तें सांगतों. तेव्हां जनमेजय राजा म्हणाला; " ऋषि, एकंदर युगें चौदा आहेत असें आपण पूर्वीं सांगितलें आहे, परंतु केव्हांहि युगांची कथा निघाली असतांना आपण फक्त चार युगांविषयींच माहिती सांगतां, तेव्हां बाकी दहा युगें कोणतीं व त्यांची स्थिति कशी आहे, तें आपण कृपा करून सांगावें." तेव्हां वैशंपायन म्हणाले; " राजा, युगें चौदा आहेत खरीं, पण तीं चार युगांशिवाय निराळीं नाहींत. कृत, त्रेत, द्वापार व कली हीं चार युगें झालीं म्हणजे पुन्हा ज्या युगाला आरंभ होतो त्या युगाला कृतयुग असें म्हणतात; व अशाप्रकारें चौदा युगें झालीं म्हणजे एक मनूचा काळ होतो. कृतयुगांतील मनु सावर्णिक, त्रेतायुगांतील मनु भौतिक, द्वापारांतील मनु स्वरोचिक आणि कलींतील चौथा मनु वैवस्वत हा होय." वैशंपायन ऋषीचें हें विवेचन ऐकून राजा म्हणाला, "ऋषि आपण पूर्वीं असें सांगितलेंत कीं, चौदा युगांचा जो काळ तो एका मनूचा काळ होय, आणि प्रत्येक युगांत एकेक निराळा मनु असतो असेंहि सांगतां, तर खरे मनु किती ?" तेव्हां वैशंपायन म्हणाले; " राजा, प्रत्येक युगीं एक निराळा मनु असून चौदा युगेंपर्यंतहि एक स्वतंत्र मनु असतो. एकंदर मनु चौदा आहेत. त्यांपैकीं दहा मनु विष्णूपासून उत्पन्न झाले असून चार मनु चार युगांपासून उत्पन्न झाले आहेत. पृथ्वीशिवाय इतरांचा जेव्हां लय होतो, तेव्हां त्यास मनुप्रळय असें म्हणतात. असे चार मनुप्रळय झाले म्हणजे महाप्रळय होतो, त्यास कल्प असें म्हणतात. महाप्रळयांत पृथ्वि, चंद्र, सूर्य, तारे या सर्वांचा नाश होतो. कृतयुगाचा आरंभ कार्तिक शुद्ध नवमीला बुधवारी झालेला आहे. आरंभीं विष्णूच्या नाभींतून ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली आणि

ब्रह्मदेवापासून कालविस्तार झाला. तिथी व वार हे ब्रह्मदेवान आपल्या कल्पनेनें तयार केलेले आहेत. चंद्र, तारा व सूर्य त्यानेंच निर्माण केले आहेत. सूर्य, चंद्र व तारे यांच्यामुळें दिवस व रात्र यांची व्यवस्था झाली आहे. कृतयुगाचे चार चरण असून प्रथम चरणाचे आरंभीं ब्रह्मदेव निर्माण झाल्यावर ब्रह्मदेवापासून मरीचि उत्पन्न झाला. मरीचीपासून कश्यपाची उत्पत्ति झाली. कश्यपापासून गभस्ति उत्पन्न झाला. गभस्तीपासून सावर्णिक मनु व शांतिकर्णिक मनु उत्पन्न झाले. यांच्यापासून अत्रि निर्माण झाला. या अत्रिपासून प्रसिद्ध सोमवंशांतील इक्ष्वाकु राजा निर्माण झाला. या इक्ष्वाकूची आधी सूर्यापासून उत्पत्ति झालेली आहे. सूर्यपत्नी जी सुवर्णा तिला प्रथम सावर्णिक पुत्र झाला व नंतर शांतिकर्ण या नांवाचा पुत्र झाला. सावर्णिक मनूपासून जी संतति झाली ती सूर्यवंशी होय, व शांतिकर्णापासून जी संतति झाली ती सोमवंशी होय. इक्ष्वाकुं राजाला जो पुत्र झाला त्याला विकुक्षि असें म्हणतात. विकुक्षीला बाण या नांवाचा पुत्र झाला. बाणाला जो पुत्र झाला त्याला इंद्र असें म्हणतात. इंद्राला कर्मण्य या नांवाचा पुत्र झाला. कर्मण्याला कर्कवीर, कर्कवीराला विश्वावसु; विश्वावसूला प्रसिद्ध गाधि मुनि व गाधिमुनीपासून विश्वामित्राची उत्पत्ति झाली. विश्वामित्र हा प्रतिसृष्टिकर्ता होता. त्यानें जी सृष्टि निर्माण केली आहे, ती ब्रह्मदेवाच्या सृष्टीहून किंचित् न्यून अशी आहे. गाधिमुनीला पांच पुत्र होते. त्यांत वडील पुत्रापासून पंचवसूंची उत्पत्ति झाली. पंचवसूपासून जो पुत्र झाला त्याला प्रश्रवा असें म्हणतात. प्रश्रवाला धनुर्धर, धनुर्धराला महिधीवा व महिधीवापासून यमांश उत्पन्न झाला. या यमांशापासून पुढें पृथ्वीवर सोमवंशाचा विस्तार झाला. या सोमवंशांत मांधाता या नांवाचा प्रसिद्ध चक्रवर्ती राजा होऊन गेला आहे. कृतयुगांत प्रसिद्ध असे एकोणीस राजे झाले. या युगांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चारच वर्णाचे लोक होते. कृतयुगांत पुरुषाला सहस्र हत्तींचें बळ होतें; व मनुष्य एकवीस ताड ऊंच होता. कृतयुगांत एकंदर छत्तीसहजार ग्रहणें झालीं. त्या युगांत धर्म प्रत्यक्ष होता व तो आपल्या चर्मचक्षूंनीं सर्व कांहीं पहात असे. जमिनींत एकदां बीज पेरलें म्हणजे एकवीस वेळां धान्य पिकत असे, गाय सव्वा घट दूध देत असे, वनस्पती पुष्पफलभारानें अक्षय डबडबलेल्या असत, व मनुष्यास एक लक्ष वर्षांचें आयुष्य असे.

राजा जनमेजया, कृतयुगाच्या चवथ्या चरणांत कोण कोण राजे झाले तें तुला सांगतों. विश्वावसुपासून मुचुकुंद, मुचुकुंदापासून लेखापाद, लेखापादापासून भैरवनाद, भैरवनादापासून परार्ध, परार्धापासून हिरण्यक, हिरण्यकापासून हिरण्यकश्यप, हिरण्यकश्यपापासून भगवद्भक्त प्रल्हाद, प्रल्हादापासून विरोचन व विरोचनापासून बळी. हा बळी फार पराक्रमी असून त्यानें इंद्राची अमरावती जिंकिली होती. याला भगवंतांनीं वामन अवतार घेऊन पाताळांत कसें घातलें; तो इतिहास तुला

सांगितला आहेच. बळीपासून बाणासुर व बाणासुरापासून शंखासुर झाला. यानें ब्रह्मदेवाला भीति दाखवून वेदाचें हरण केलें होतें. मग प्रभूंनीं मत्स्यावतार घेऊन शंखासुराचा वध केला व ब्रह्मदेवाला ते वेद नेऊन दिले. या शंखासुराचा पुत्र गवासुर होय. त्या गवासुराला पिप्पलासुर या नांवाचा पुत्र होता. असें होत होत शेवटीं या सूर्य वंशांत भद्रकापिल हा झाला. त्यावेळीं वसुंधरेवर दैत्यांचा अत्यंत सुळसुळाट झाला होता, व त्यामुळें वसुंधरा अत्यंत गांजून गेली होती. तेव्हां ती धेनूचें रूप धारण करून आपली कहाणी सांगण्यासाठीं क्षीरसागरीं विष्णुकडे गेली. तेथें ब्रह्मदेवानें तिच्यासाठीं अनंताची विनंति केली. तेव्हां भगवान् म्हणाले; ब्रह्मदेवा, दुर्वासऋषींनीं रागावून अंबऋष राजाला ‘ तुला दहा गर्भवासाचें दुःख प्राप्त होवो ’ म्हणून शाप दिला आहे, त्या शापाचा स्वीकार भक्तासाठीं मी स्वतः केला आहे. म्हणून मला दहा गर्भवास भोगावयाचे आहेत. यासाठीं मीं जेव्हां जेव्हां दैत्यभारानें पृथ्वी गांजली जाईल, त्या त्या वेळीं अवतार घेऊन दैत्यांचा संहार करीन. त्याप्रमाणें मी आतां अवतार घेऊन दुष्टांचा नाश करितों. भगवंतांनीं ब्रह्मदेवाला सांगितल्याप्रमाणें कृतयुगांत चार अवतार घेतले. प्रथम मत्स्यावतार घेतला. त्यावेळीं हंसनगरीचा राजा शंखासुर फार उन्मत्त झाला होता, म्हणून प्रभूंनीं हुताशन याची स्त्री जी शंखावती तिच्या पोटीं जन्म घेऊन शंखासुराचा नाश केला. राजा जनमेजया, ही कथा पद्मपुराणांत असून ती तुला संक्षेपानें कथन केली आहे.

---

## अध्याय ६ वा.

### १. कार्तिकेयोत्पत्ति कथा.

वरील कथा ऐकल्यावर जनमेजयराजा म्हणाला, “ ऋषि, प्रभूंनीं दहा अवतार कसे कसे घेतले तें मला कृपा करून सांगावें.” तेव्हां वैशंपायनऋषि म्हणाले; “राजा, मत्स्य–अवताराची कथा मागें तुला सांगितली आहेच. मधु व कैटभ या नांवाचे दोन दुष्ट राक्षस शिवपुर नगरांत राज्य करीत होते. ते उन्मत्त होऊन त्यांच्या पापभारानें पृथ्वी त्रस्त झाली तेव्हां भगवंतांनीं चंद्रावतीचे उदरीं शक्तिरूपानें जन्म घेऊन मधु व कैटभ या दोघांचा नाश केला आणि वसुंधरेला संकटांतून सोडविलें. त्यापूर्वी प्रभूंनीं कूर्म अवतार घेऊन असाच पृथ्वीचा पापभार नाहींसा केला होता. त्याप्रसंगीं भगवंतांनीं पद्मावतीचे उदरीं वराहअवतार घेऊन दैत्यांचा नाश केला. त्यावेळीं भगवंताचा पिता देवलह हा होता. वराहावताराचे वेळींही दैत्यांच्या त्रासानें पृथ्वी लयास जात होती; त्या वेळीं वराहानें पृथ्वि आपल्या दांतावर तोलून तिचें रक्षण केलें व राक्षसांचा संहार केला. वराहा-

वतारानंतर प्रभूंनीं प्रल्हादासाठीं नारसिंहावतार घेऊन हिरण्यकशिपूचा वध केला. पुढें प्रभूंनीं मोहिनी रूप धारण करून विरोचनाचा नाश केला. ही कथा तुला पूर्वी सांगितलेली आहेच. त्यानंतर प्रभूंनीं वामनावतार घेऊन विरोचनाचा पुत्र जो बळी, त्याला पाताळांत घातलें. परंतु तो प्रभूचा निस्सीम भक्त असल्यामुळें प्रभूंनीं त्यास अमरत्व देऊन त्याचें द्वारपालकत्व पत्करिलें. या बळीचा पुत्र प्रसिद्ध बाण हा होय. तो शोणितापुर नांवाच्या प्रसिद्ध शहरांत राज्य करीत होता. तो फार शंकरभक्त होता. त्याला शंकरांनीं प्रसन्न होऊन तें शोणितापुर नांवाचें पट्टण दिलें होतें."

वैशंपायनऋषि ही कथा सांगत असतां जनमेजयराजा मध्येंच म्हणाला; "ऋषि, त्या शहराचें शोणितापुर हें नांव माझ्या कानाला अश्रुतपूर्व असें वाटतें. कारण शोणित म्हणजे रक्त होय. तेव्हां त्या नगराला रक्ताचें नांव कां पडलें हें ऐकण्याची इच्छा आहे. तेव्हां वैशंपायन म्हणाले; "राजा, याविषयींची कथा तुला मागें सांगितली होती. त्यापेक्षां ही थोडी निराळी आहे, ती तुला सांगतों. एके वेळीं महादेवांकडे अग्नि* भिक्षा मागण्यासाठीं आला. त्यावेळीं महादेव व पार्वती सुरतक्रिडेंत मग्न होते. अशासमयीं एकाएकीं अतिताचा शब्द ऐकून महादेव व पार्वती यांनां अतिताचा सत्कार कसा करावा, याचा मोठा विचार पडला. पार्वतीचा विचार अतिताला विन्मुख दवडावें असा होता, परंतु महादेवाला तो पसंत पडला नाहीं. त्यांनीं एक ओंजळभर आपलें वीर्य अग्नीच्या भिक्षापात्रांत घातलें. ती भिक्षा घेऊन अग्नि तेथून निघून गेला. अग्नीनें तें महादेवाचें प्रखर वीर्य भक्षण केलें. त्यायोगें अग्नीला गर्भ राहिला,व त्याचें पोट मोठें होऊं लागलें. तेव्हां तो महादेवाला शरण गेला, व हात जोडून म्हणाला, "हे नीलकंठा, तुझें वीर्य प्राशन केल्यामुळें मला फार त्रास होत असून लोकांतही अपमान होत आहे. तर माझ्या पोटांत जो गर्भ आहे, त्याची कांहीं व्यवस्था कर." अग्नीची परिस्थिति पाहून शंकरास त्याची दया आली, व ते म्हणाले; "अग्नि, तूं गंगेकडे जा आणि तिच्या स्वाधीन हा गर्भ कर, म्हणजे तुझी सुटका होईल." शंकराच्या आज्ञेप्रमाणें अग्नि गंगेजवळ गेला व तिची विनवणी करून त्यानें तिला शंकराची आज्ञा कळविली. महादेवाच्या आज्ञेप्रमाणें गंगेनें अग्नीच्या उदरांतील गर्भ काढून तो आपल्या उदरांत समावून घेतला.

स्त्रीजातीच्या सहाजिक धर्माप्रमाणें गंगेला जरी गर्भ सहन करण्याची शक्ति होती, तरी तो गर्भ फार तेजस्वी असल्यामुळें तिला सहन होईना. शेवटीं ती फारच त्रासली व तिनें तो गर्भ नेत्रद्वारानें बाहेर टाकून दिला. ज्या ठिकाणीं भागीरथीनें तो गर्भ टाकिला, तेथें अर्थातच विपुल शोणित सांडलें. त्यामुळें तेवढा भागीरथीचा कांठ रक्तरंगाचा होऊन गेला. भागीरथीनें जो

---

* कित्येक पुराणांत इंद्र हा मोराचें रूप घेऊन गेला होता; असें वर्णन आहे.

गर्भ तेथें टाकिला होता, तो सहा मुखांचा होता, व त्याला बारा नेत्र व बारा हात होते. जेथें हा गर्भ पडला होता, तेथें कार्तिकस्नानासाठीं म्हणून प्रभातकाळीं सहा ऋषींच्या सहा स्त्रिया आल्या होत्या. त्यांच्या दृष्टीस तो गर्भ पडला तेव्हां त्यांनां त्याची दया आली व त्या सहाही स्त्रियांनीं त्या मुलाला आपलें स्तनपान करवून त्याचें संरक्षण केलें. तो मुलगा कार्तिकांत झाला म्हणून त्याला कार्तिकेय असें म्हणतात. गंगेपासून झाला म्हणून त्याला गांगेय असेंही म्हणतात. पुढें त्या मुलास नारदानें पार्वतीकडे नेलें, व हा तुझाच मुलगा आहे असें कळवून तो तिच्या स्वाधीन केला. पार्वती जेव्हां त्याचें लालनपालन करूं लागली, तेव्हां त्यास सर्वत्र कार्तिकस्वामी असें म्हणूं लागले. त्यानंतर महादेवांनीं ज्या भूमीवर कार्तिकस्वामीचा जन्म झाला त्या भूमीवर एक नगर वसविलें व त्याचें नांव शोणितापुर असें ठेविलें. याप्रमाणें हा इतिहास आहे.

---

# अध्याय ७ वा.

## १. प्रल्हादचरित्र कथा.

"शंकरांनीं शरभरूप कसें धारण केलें व नृसिंहाचें तेज कसें हरण केलें, तें मला कृपा करून सांगावें." अशी राजानें विनंति केली; तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले, "राजा, तुला आतां महाभगवद्भक्त जो प्रल्हाद त्याचें पूर्ण चरित्र सांगतों, म्हणजे हिरण्यकशिपूचा वध भगवंतांनीं नृसिंहावतार घेऊन कां केला तें तुझ्या लक्षांत येईल."

हिरण्यकशिपु हा हिरण्याक्षाचा बंधु होय. हिरण्याक्षाचा वध तो उन्मत्त झाल्यावर प्रभूंनीं वराहावतार घेऊन कसा केला, हें तुला मागें सांगितलें आहेच. हिरण्याक्षाचा वध झाल्यावर त्याचें राज्य हिरण्यकशिपूला प्राप्त झालें होतें. हा हिरण्यकशिपु आपल्या बंधुप्रमाणेंच उन्मत्त, क्रूर व जुलमी असून देवांचा द्वेष करणारा होता. विष्णूनीं वराहावतार घेऊन त्याच्या बंधूचा वध केला असल्यामुळें तो विष्णूचा फार द्वेष करीत असे. या हिरण्यकशिपूचा प्रल्हाद हा पुत्र होय. प्रल्हाद हा लहानपणापासून भगवद्भक्त होता. त्याला गुरुगृहीं विद्याभ्यासासाठीं ठेविलें असतांना तो प्रभूच्या नामस्मरणावांचून कोणतीही विद्या शिकेना. प्रभूचें नामस्मरण करणें हा, त्याच्या बापाच्या मतें अपराध असल्यामुळें, प्रल्हादाचा गुरु त्यास नामस्मरण करूं देईना. परंतु प्रल्हाद त्या बाबतींत आपल्या गुरूचेंहि न ऐकतां प्रभूचें नामस्मरण एकसारखें करीत होता. तेव्हां त्याच्या गुरुला राजाचा कोप होण्याची भीति वाटूं लागली व त्यानें त्या भीतिमुळें प्रल्हादास शिकविण्याचें बंद करून त्यास हिरण्यकशिपूच्या स्वाधीन

केलें. विष्णूचें नामस्मरण करूं नको, म्हणून हिरण्यकशिपूनें प्रल्हादाला पुष्कळ प्रकारें सांगून पाहिलें, परंतु प्रल्हाद मुळींच ऐकेना. तो उलट आपल्या बापापुढें विष्णूच्या सामर्थ्याची थोरवी गावूं लागला. असला कुलांगार मुलगा जीवंत ठेवणें बरें नाहीं, असें जाणून हिरण्यकशिपूनें त्याचा नाश करण्याचा प्रयत्न सुरू केला. त्यास मस्त हत्तीच्या पायास बांधलें, चितेंत टाकलें, खड्गांचे प्रहार केले, भयंकर सर्प त्याचे अंगावर सोडले, पर्वतावर नेऊन ढकलून दिलें, अशा प्रकारें प्रल्हादाचा नाश करण्याकरितां सर्व प्रकारचे प्रयत्न केले. तथापि त्यापासून प्रल्हादाच्या एका केसासही धक्का लागला नाहीं. तो श्री हरीच्या नामस्मरणांत दंग होता. आपला एकहि इलाज या पोरावर चालत नाहीं असें पाहून हिरण्यकशिपु क्रोधानें संतप्त झाला, व त्यानें प्रल्हादाचा हात धरून 'तुझा ईश्वर कोठें आहे ?' तो दाखीव, असा त्यास प्रश्न केला. तेव्हां प्रल्हाद म्हणाला; "बाबा, श्रीहरी सर्वत्र आहे. तो सर्व–चराचर व्यापून उरला आहे. जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं, सर्वत्र तो प्रभु आहे." प्रल्हादाचें भाषण ऐकून हिरण्यकशिपूचा राग अनावर झाला, व तो त्वेषानें म्हणाला; "हा जो पाषाणाचा स्तंभ आहे, त्यांत तुझा श्रीहरि आहे काय ?" तेव्हां प्रल्हाद म्हणाला; "होय बाबा, त्या पाषाणाच्या स्तंभांतहि श्रीहरि आहे." हें एकतांच हिरण्यकशिपूनें त्या स्तंभावर लत्ताप्रहार केला. त्याबरोबर भयंकर कडकडाट होऊन तो स्तंभ दुभंग झाला व त्यांतून भगवान नृसिंह रूप घेऊन बाहेर पडले. त्या वेळीं नृसिंह व हिरण्यकशिपु या उभयतामध्यें भयंकर युद्ध झालें. नंतर सूर्यास्तसमयीं नृसिंहानें हिरण्यकशिपूस राजवाड्याच्या उमरठ्यांत मांडीवर घेऊन आपल्या तीक्ष्ण नखांनीं त्याचें वक्षस्थळ विदारण केलें.

ही कथा ऐकून राजा म्हणाला, "ऋषि, हिरण्यकशिपु हा शंकराचा वरद पुत्र असून त्यास मृत्यु येणार नाहीं, असा शंकरांनीं वर दिला होता. मग तो मृत्यु कसा पावला ?" तेव्हां वैशंपायनऋषि म्हणाले, "राजा, त्या हिरण्यकशिपूनें असा वर मिळविला होता कीं, मला मनुष्य अथवा पशु यांच्याकडून मृत्यु प्राप्त होऊं नये. तसेंच दिवसा किंवा रात्रीं व घरांत अथवा घराच्या बाहेर मृत्यु येऊं नये, असा त्यानें वर मिळविला होता. म्हणूनच प्रभूनें मनुष्य व पशु या व्यतिरिक्त असें नृसिंहरूप घेतलें. तसेंच शस्त्रानें मरण येऊं नये असें त्याचें मागणें होतें म्हणून प्रभूनीं निर्जिव अशा नखांनीं त्याचें वक्षस्थळ विदारण केलें, आणि रात्रहि नाहीं व दिवसहि नाहीं अशा सायंकाळच्यावेळीं, घरहि नाहीं व घराच्या बाहेरहि नाहीं अशा उमरठ्यावर त्याचा वध केला. सारांश, शंकराच्या वाणीला बाध येऊं दिला नाहीं. ऋषि म्हणाले, राजा जनमेजया, आतां तुला नृसिंहरूपाचा पराभव कसा झाला, ती कथा सांगतों. ही कथा फारच

थोड्यांनां माहित असेल. ती ब्रह्मदेवानें प्रथम सनत्कुमारांनां सांगितली होती, त्यांच्याकडून ती व्यासांना कळली होती, व व्यासांनीं मला सांगितली आहे.

## २. नृसिंह व वीरभद्र.

नृसिंहानें हिरण्यकशिपूचा वध केल्यावर तो क्रुद्ध दृष्टीनें सर्वांकडे पाहूं लागला. त्या वेळीं नृसिंहाचें तेज अत्यंत प्रखर असल्यामुळें तिन्हीं लोकांत विलक्षण उष्णता उत्पन्न झाली, व त्या उष्णतेमुळें सर्वांना अत्यंत त्रास होऊं लागला. त्रैलोक्यासह पृथ्वि त्या तेजामुळें लोखंडाप्रमाणें तप्त होऊन गेली. तेव्हां सर्व देव घाबरले, व आतां प्रळयकाळ होणार असें वाटूं लागलें. ती प्रळयकाळचीं चिन्हें पाहून ब्रह्मदेवाला आपलें गणित चुकलें कीं काय, असें वाटूं लागलें, व सर्व देवांस बरोबर घेऊन ब्रह्मदेव महादेवाकडे गेले, व हात जोडून ते शंकराची प्रार्थना करूं लागले; ते म्हणाले–विष्णूनीं नृसिंहरूप धारण करून हिरण्यकशिपूचा वध केला, परंतु नृसिंहाचें तेज फार प्रखर असल्यामुळें तें कोणासही सहन होत नाहीं. संपूर्ण त्रिभुवन त्या तेजानें तप्त झालें आहे, तर तें नृसिंह तेज लवकर नाहींसें करावें. ब्रह्मदेवाची प्रार्थना ऐकून शंकरांनीं त्यांस आश्वासन दिलें, आणि स्वतः शरभ रूप धारण करून शंकराची स्वारी घंटा, डमरू वगैरे वाद्यांच्या दमदमाटानें नृसिंहाजवळ आली, आणि त्यांनीं आपलें तेज आवरण्याविषयीं नृसिंहास उपदेश केला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां महादेवानें वीरभद्राचें स्मरण केलें. त्याबरोबर वीरभद्र तेथें प्रकट झाला, व–'काय आज्ञा',–म्हणून त्यानें विचारलें. तेव्हां महादेव म्हणाले; "वीरभद्रा, तूं नृसिंहरूप घेतलेल्या श्रीहरीकडे जा, आणि युक्तिप्रयुक्तीनें त्याचें तेज नाहींसें कर. जर त्याची तुला भीति वाटेल तर तूं माझें हें शरभरूप धारण कर व कार्यभाग कर." महादेवाच्या आज्ञेप्रमाणें वीरभद्र नृसिंहाकडे गेला व त्यास करुणस्वरानें म्हणाला; "हे आदिपुरुषा तूं या विश्वाच्या सुखासाठीं वारंवार अवतार घेतोस. तुझ्या या अवतारकृत्यामुळें तुझे जगावर अनंत उपकार झाले आहेत. या सृष्टीचें प्रतिपालन करण्यासाठीं तूं युगायुगीं अवतार घेतोस. हिरण्यकशिपु उन्मत्त होऊन तुझ्या भक्तांना त्रास देऊं लागला म्हणून तूं हें प्रस्तुतच उग्र नृसिंहरूप धारण करून त्या दुष्टाचा नाश केलास व आपल्या भक्ताचें रक्षण केलेंस, यामुळें तुझ्या भक्तांवर तुझे उपकारच झाले आहेत, पण हे अनंता, तुझ्या या विलक्षण प्रखर तेजामुळें सर्व विश्व तप्त झालें असून, सर्व प्राणिमात्र अत्यंत त्रस्त झाले आहेत. करितां हें तेज तूं आवरून घेण्याची कृपा कर."

वीरभद्रानें याप्रमाणें प्रार्थना केली; परंतु त्या प्रार्थनेचा उपयोग न होतां उलट नृसिंह कोपायमान होऊन म्हणाले, "अरे वीरभद्रा, तूं शंकराच्या आज्ञेनें मजकडे आला आहेस, पण माझा कोप शंकराचें कैलास जाळण्यासही

समर्थ आहे. या त्रिभुवनांत मीच एक थोर असून सर्वत्र कर्ताहर्ता मीच आहे. मीच विस्तार करितों, मीच प्रतिपालन करितों व मीच संहार करितों-या अखिल विश्वाची घडामोड माझ्या दृष्टिपातानें होत आहे. सर्व देवांना माझाच आधार असून, ब्रह्मा, विष्णु व शंकर मीच आहे. ब्रह्मदेव माझे नामीस्थानीं असून, ललाटस्थानीं शंकर आहे. सहस्र मुखाचा शेष माझ्या बळानें ही भूमि आपल्या मस्तकावर धारण करीत आहे. सर्वांना तारण्यास, रक्षण करण्यास किंवा सर्वांचा संहार करण्यास मीच एक समर्थ आहे. उत्पत्ति स्थिति व संहार या सर्व माझ्याच लीला आहेत. वीरभद्रा, माझी ही विलक्षण शक्ति लक्षांत घे, व आला तसा परत जा."

नृसिंहाचें हें भाषण ऐकून वीरभद्रानें शंकराचें चिंतन केलें. त्याबरोबर शंकर प्रकट झाले व म्हणाले; "वीरभद्रा, तूं पुन्हा एकदां नृसिंहाकडे जा, व त्यास असा अहंकार करणें चांगलें नाहीं, असा उपदेश कर." शंकराच्या आज्ञेप्रमाणें वीरभद्र पुन्हा नृसिंहाकडे आला, व त्यास म्हणाला; "हे अच्युता, तूं सर्व कांहीं जाणत असून असा अहंकार करतोस हें बरें नव्हें. मागें ऋषियज्ञाचे वेळीं तूं द्वारपाळाचें कार्य करीत असतांना असाच गर्व धरिला होतास. त्यावेळीं तुझ्या हातांतील धनुष्याची दोरी तुटली व त्यामुळें तुझें शिरकमळ आकाशांत उडून गेलें; तेव्हां ऋषींनीं तेथें घोड्याचें मुख लाऊन तुला जिवंत ठेविलें. हे गोविंदा तूं सर्वज्ञ असें आपणास म्हणवीत असून महादेवाची निंदा करीत आहेस हा प्रकार निश्चयानें तुझ्या कीर्तीचा क्षय करणारा आहे. तुझा पराक्रम किती आहे हें दक्षयज्ञाच्या वेळीं आम्हीं पाहिलें आहे. यःकश्चित महादेवाचा जो नंदी, त्यानें तुझी किती फजिती केली होती हें स्मृतींतून गेलें असें वाटतें. तूं आपले स्वतःचे गुण वाखाणून मीच मोठा, मीच मोठा, असें क्षणोक्षणीं म्हणत आहेस. पण खरें पाहिल्यास महादेवाचाच महिमा मोठा आहे. या विश्वांत मुख्य पंचमहाभूतें महादेवापासून निर्माण झालीं आहेत. महादेवाची पंचभूतें तींच हीं पंचमहाभूतें होत. पृथ्वि हें कैलासनाथाचें प्रथम भूत असून तें महादेवाचें सद्योजात मुख होय. आप तें वामदेवमुख होय. तेज अघोर मुख होय, व तत्वपुर वायूचें मुख असून आकाश ईशानमुख आहे. महादेव एकवीस स्वर्ग व तिन्ही देव यांच्या शिरावर असून त्या सर्वांपेक्षां त्यांचें तेज अधीक आहे. तो या विश्वास मूलभूत असून त्याच्या चरणापासून तिन्हीं देवांची उत्पत्ति झालेली आहे. मी महेशाचाच अवतार असून माझी उत्पत्ति शंकराच्या जटेपासून झालेली आहे. उत्पत्ति आणि संहार करण्याची शक्ति मलाहि आहे. सृष्टि निर्माण करण्यासाठीं म्हणून महादेवानें सहज लीलेनें ब्रह्मदेवाला उत्पन्न केला आहे. अर्थात् हें सर्व विश्व महादेवाच्या कृपेनें निर्माण झालें आहे. महादेवाची योग्यता फार मोठी असून त्याला सर्व

वंद्य मानतात. त्याप्रमाणें हे नृसिंहा! तूंहि महादेवाला श्रेष्ठ मानून त्याची आज्ञा ऐकावीस? वराह, कूर्म आणि शेष हेही महादेवाच्या चरणावर लोटांगणें घेऊन पुनित होतात. अशा महादेवाचें तूं न ऐकतां सर्व जगाला पीडा देत आहेस हें बरें नव्हे. आपल्या भक्तासाठीं अवतार घेतलास हे भक्तांवर तुझे मोठे उपकार झाले, पण सर्व जगावर अनुपकार होत आहेत, हें तुझ्या ब्रीदाला शोभत नाहीं. तूं युगायुगीं अवतार घेऊन दुष्टांचा संहार करितोस, याबद्दल तुला फार अभिमान वाटत असेल; पण ही अवतारशक्ति तुला महादेवाजवळून मागून घ्यावी लागते, हें तुझ्या लक्षांत नाहीं काय? तुझें मुख शंकरानीं आपल्या मुंडमाळेमध्यें सहज लीलेनें ओंविलें आहे. वराहावताराचें वेळीं तूं असाच मस्त होऊन आपल्या दाढांनीं ज्या पृथ्वीचें रक्षण केलेंस त्या पृथ्वीला त्रास देऊं लागलास; तेव्हां शंकरानीं त्या तुझ्या दाढा मोडून काढल्या, तें तूं विसरलास असें वाटतें. दक्षासारख्या पराक्रमी पुरुषाचें मस्तक मी सहज लीलेनें उडविलें. तसेंच ब्रह्मदेवाचें मुखही शंकरानीं सहज छेदून टाकिलें. त्यावेळींच तुझ्या अंगीं किती शक्ति आहे हें दिसून आलें आहे. तुझा पुत्र जो मदन त्यास शंकरांनीं आपला तिसरा नेत्र उघडून सहज लीलेनें जाळून टाकिलें. तसेंच शंकरांनीं त्रिपुरराक्षसाला ससैन्य मारून त्रिपुरारी असें नांव मिळविलें आहे. त्याप्रमाणें मरुध्वजाच्या युद्धांतही शंकरानीं तुला हरविलें आहे. दधीचिऋषीचा प्रसंगहि तुझ्या स्मरणांतून गेला असें वाटतें. विषाचा स्वीकार करण्याच्या वेळेला तूं तर अगदीं भाजून गेला होतास, व प्रळय काळींही अत्यंत ग्रस्त झाला होतास, तेव्हां शंकरानीं तुझें संरक्षण केलें, हें तुझ्या लक्षांत नाहीं काय? शिवाची तुजवर कृपा म्हणून त्यानें सर्व शक्तींचें चक्र तयार करून दिलें आणि तेव्हांपासून तुला चक्रपाणी असें म्हणातात. महादेव तुझ्या संरक्षणाची काळजी घेतात, व तूं त्यांचा द्वेष करतोस हें बरें नव्हे." या प्रमाणें वीरभद्रानें नृसिंहास पुष्कळ उपदेश केला, पण त्याचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. तेव्हां वीरभद्राला फार संताप आला व त्यानें नृसिंहाला एक थाप मारून त्याचें तेज हरण केलें, तेव्हां सर्व देवांनीं वीरभद्राचा जयजयकार करून त्याच्यावर पुष्पवृष्टि केली.

---

## अध्याय ८ वा.

### १. शरभ आख्यान.

वरील कथा ऐकल्यावर जनमेजय राजा वैशंपायनऋषीला म्हणाला; ऋषि, शंकराच्या शरभरूपासंबंधानें दुसरी एक कथा आहे, असें आपण म्हणालां, तर ती दुसरी कथा कोणती? तेव्हां वैशंपायनऋषि म्हणाले; "राजा याविषयीं

स्कंधपुराणांत व अग्निपुराणांत अशा भिन्न भिन्न कथा आहेत. त्यापैकीं तुला अग्निपुराणांतील कथा सांगितली आहे. आतां स्कंधपुराणांतली सांगतों ती श्रवण कर. स्कंधपुराणांत वर सांगितल्याप्रमाणेंच कथा आहे. परंतु वीरभद्राकडून नृसिंहाचा पराभव झाला नाहीं असें त्यांत म्हटलें आहे. वीरभद्रानें नृसिंहाला उपदेश केला पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं, तेव्हां तो महादेवाकडे परत गेला. तेव्हां शंकर अत्यंत क्रुद्ध झाले व त्यांनीं अत्यंत भयंकर असें शरभ-रूप धारण केलें. शंकराचें तें भयंकर शरभरूप व तो त्याचा क्रोध पाहून सर्व देव भीतीनें थरारून गेले. हेमतेज व अग्नितेज एकत्र व्हावें, किंवा लक्षावधि विद्युल्लतेचें तेज एकाठिकाणीं व्हावें, अथवा प्रळयकाळच्या वेळीं अकाशांत बारा सूर्यांचें तेज एकाच वेळीं प्रगट व्हावें, त्याप्रमाणें शरभाचें तेज होतें. त्याचें पुढील धड पक्षाचें असून मागील धड सिंहाचें होतें, व अंगावर शस्त्राप्रमाणें तीक्ष्ण असे असंख्य पंख असून त्यास आठ पाय होते. त्या आपल्या आठी पायानें भूमि उकरीत उकरीत व मोठ्यानें हुंकार करीत तो शरभ मोठ्या वेगानें नृसिंहाजवळ येऊन उभा राहिला.

तो विक्राळ व तेजस्वी शरभ नृसिंहाजवळ येतांच नृसिंहाचा अभिमान पार नाहींसा झाला. वाघ दृष्टीस पडतांच बकरी जशी निस्तेज बनते, त्याप्रमाणें नृसिं-हाची स्थिति झाली. त्याच्या शरीरांतील भयंकर तेज निघालें व तें शरभाच्या शरीरांत शिरलें. तेज नाहींसें होतांच नृसिंहाची सर्व शक्ति नष्ट झाली, व भीतीमुळें त्याच्या शरीराला कंप सुटला. इतक्यांत शरभानें आपल्या पुछानें नृसिंहास बांधून टाकिलें व त्यासह ऊंच आकाशांत उड्डाण केलें, व नभोमंड-ळांतून त्यानें त्याला खालीं फेंकून दिलें. नंतर पुन्हां शरभ भरारी मारून भूमीवर आला व नृसिंहाला घेऊन आकाशांत उडला व पुन्हा भूमीवर त्याला फेंकून दिलें. याप्रमाणें अनेक वेळां केलें. त्या योगें नृसिंहाचे पंचप्राण व्याकूळ होऊन तो अगदीं निस्तेज झाला.

त्याचा अभिमान, गर्व, अहंकार सर्व नाहींसा होऊन तो अगदीं लीन झाला, व शंकराचे चरण वंदन करून म्हणाला; "हे कैलासनाथा, तुला मी अन्यभावानें शरण आलों आहे. तुझ्या कृपेमुळें माझा अहंकार दूर होऊन मला दिव्य दृष्टि प्राप्त झाली आहे. तूंच कर्ता हर्ता परमेश्वर असून सर्वांपासून निरिछ असा आहेस. तूं आपल्या लीलेनें आम्हला सहज खेळवीत आहेस. माझें अवतार-कृत्य ही केवळ तुझीच कृपा होय. हे शूलपाणी, मी जेव्हां अहंकारानें असा अज्ञान व अंध होईन, तेव्हां तूं मजवर अशीच कृपा करून माझा अहंकार दूर करीत जा." या प्रमाणें विष्णूनीं शंकराचीं अष्टोतर शतनांवें घेऊन करुणा भाकिली व त्याचे चरणावर लोटांगण घातलें. या प्रमाणें नृसिंहस्वरूपविष्णु शंकराला शरण गेल्यावर सर्व देवांनीं शंकराचा जयजयकार करून शंकर व विष्णु

या दोघांवर पुष्पवृष्टि केली, आणि शंकराची स्तुती करून ते म्हणाले, शंकरा आम्ही सर्व देव केवळ तुझ्या कृपेमुळें प्रभावशील व तेजस्वी आहोंत. तूं जेव्हां आम्हाला शक्ति देतोस तेव्हां आम्ही कार्य करितों. शिव व अघोर अशी तुझीं दोन शरीरें असून सूर्य, विष्णु व हुताशन हे तुझ्या अघोर शरीराचे अंश आहेत व चंद्र हा शिवतनूचा अंश आहे. तसेंच ब्रह्मदेव, वज्रपाणि, वरुण, मही, सहस्रफणी, शेष, वायु, वगैरे पंचतत्वें हे तुझेच अंश आहेत.

या प्रमाणें देवांनीं महादेवाची स्तुति केल्यावर महादेव प्रसन्न चित्तानें सर्व देवांकडे पाहून म्हणाले; " देवहो, मी नृसिंहाची ही स्थिति केली आहे, यांतील गूढ तत्व तुम्हांस कळणार नाहीं. मला व विष्णूला भिन्न मानण्याचें कारण नाहीं. जो विष्णु तोच हर व जो हर तोच विष्णु असें तुम्ही निश्चयानें जाणावें. आम्हां दोघांत भेद मानणें म्हणजे आम्हां दोघांशींहि द्रोह करण्यासारखें आहे. जो मी देवांचा देवेश, जो मी भूतांचा भूतेश हर, तोच हृषिकेशी, असें तुम्हीं समजावें. दोन जागीं विभक्त केलेलें पाणी एकत्र केलें असतां त्यांतील भिन्नत्व जसें ओळखितां येत नाहीं, त्याप्रमाणें मजपासून हरीला व हरीपासून मजला दूर करणें दुष्कर आहे. याप्रमाणें शंकरांनीं देवांनां उपदेश करून नृसिंहाची सर्व त्वचा काढली व तिनें आपला देह झांकून घेतला; आणि शिरकमळ तोडून तें मुंडमाळेंत ओंवून टाकलें. नंतर महादेव वीरभद्रासह कैलासाला निघून गेले. त्या दिवसापासून शंकराला नृसिंहसंहारण असें नांव प्राप्त झालें आहे. ऋषि म्हणाले हे राजा जनमेजया, या प्रमाणें हें शरभाख्यान असून तें तुला संक्षेपानें कथन केलें आहे. ही शरभकथा फार पुण्यवान असून पातकांचा नाश करणारी आहे. ही कथा भक्तिभावानें ऐकिली असतां सर्व पापांचें निरसन होतें.

---

## अध्याय ९ वा.

### १. त्रेतायुग विवेचन.

वरील कथा ऐकल्यावर जनमेजय राजा म्हणाला; " वैशंपायन ऋषि, आपण पूर्वी मला कृतयुगाची कथा सांगितली. त्याप्रमाणें त्रेतायुगाची कथा सांगावी. तसेंच वेदव्यासांनीं, अठरा पर्वें भारत सांगितलें त्या पर्वांचीं नांवें कोणकोणतीं तेंहि सांगावें. " जनमेजय राजाची इच्छा पाहून ऋषि म्हणाले; " राजा, आदिपर्व, सभापर्व, अरण्यपर्व, विराटपर्व, उद्योगपर्व, भीष्मपर्व, द्रोणपर्व, कर्णपर्व, शल्यपर्व, शांतिपर्व, सौप्तिकपर्व, स्त्रीपर्व, आश्वमेधिकपर्व, अनुशासनपर्व, आश्रमवासिकपर्व, मौसलपर्व व स्वर्गारोहणपर्व, याप्रमाणें महाभारताचीं अठरा पर्वें आहेत. त्याप्रमाणेंच मार्कंडेयपुराण, अग्निपुराण, पद्मपुराण, गरुडपुराण, कूर्मपुराण, वामनपुराण, लिंगपुराण, नारदपुराण, स्कंदपुराण, वराहपुराण, नृसिंह-

पुराण, मत्स्यपुराण, भविष्योत्तरपुराण, वायुपुराण, ब्रह्मपुराण, ब्रह्मांडपुराण आणि भागवत याप्रमाणें अठरा पुराणें आहेत." हें ऐकून राजा मध्येंच म्हणाला; "ऋषि, जीवाची भ्रमण स्थिति कशी आहे, तें मला प्रथम सांगावें आणि नंतर ही कथा सांगावी." तेव्हां ऋषि म्हणाले; "राजा, हृदयांत अष्टदल कमळ आहे. त्या कमळांत जीवाचा वास आहे. या जीवाला परमहंस असेंही म्हणतात. हा परमहंस या अष्टदळ कमळांतील पाकळ्यांत भ्रमण करीत असतो. या प्रत्येक पाकळीचे गुणदोष निरनिराळे आहेत. ज्या पाकळीवर हंस असेल त्याप्रमाणें वासना व बुद्धि उत्पन्न होते. पूर्व दिशेकडील दळ शुभ्रवर्णाचें असून तेथें जेव्हां परमहंसाचा वास असतो, तेव्हां पुण्य वासना उत्पन्न होते. अग्नेय दिशेकडील पाकळी धूम्रवर्णाची असून त्या स्थानीं जेव्हां परमहंस असतो तेव्हां चिंता व आळस उत्पन्न होऊन अमंगल वासना उत्पन्न होते. दक्षिणदिशेकडील दळ लोहित वर्णाचें असून तेथें जेव्हां परमहंसाची वस्ति होते, तेव्हां भ्रम व मत्सर उत्पन्न होतो. नैर्ऋत्य दिशेकडील पाकळी नीलवर्णाची असून त्या स्थानीं परमहंसानें वास केल्यास अधर्ममूलक वासना उत्पन्न होते. पश्चिमदिशेकडील दळ पीत वर्णाचें असून तेथें जेव्हां हंस येतो, तेव्हां धर्म व पुण्यवासना उत्पन्न होते. वायव्य दळावर परमहंस येतो, तेव्हां उत्तम वासना उत्पन्न होते. या वायव्य दळाची कांती काश्मीर वर्णाची आहे. उत्तर दिशेकडील दळाचा वर्ण माणिक रंगाचा असून तेथें परमहंस आला असतां समाधन प्राप्त होऊन चांगलीं वासना प्राप्त होते. ईशान्य दळाचा वर्ण सुवर्णाप्रमाणें असून तेथें परमहंस विराजमान झाला असतां उदार व दयापूर्ण अशी वासना उत्पन्न होते, आणि जेव्हां हा परमहंस या अष्टदलांचे संधीवर असतो, तेव्हां नाना व्याधी उत्पन्न होतात, व मन त्रस्त होऊन जातें. ऊर्ध्व कमळामध्यें जेव्हां त्याचा वास होतो, तेव्हां जागृती व ज्ञान उत्पन्न होतें. याप्रमाणें या परमहंसाची स्थिति आहे. असो, ही आड कथा सोडून तुला त्रेतायुगाची कथा सांगतो.

त्रेतायुगाचें आरंभीं कृतयुगाप्रमाणेंच ब्रह्मदेवानें हें सर्व चराचर निर्माण केलें. त्रेतायुगाला आरंभ वैशाख शुद्ध तृतियेला प्रथम प्रहरीं झाला आहे. त्या युगांत जामदग्न्यापासून भृगु वंशाचा विस्तार झाला. व त्याच्या मागून रघुवंशाचा विस्तार झाला. ह्या वंशविस्ताराच्या कथा भविष्योत्तर पुराणाच्या भूगोलखंडांत सविस्तर सांगितल्या आहेत. त्याच तुला मी संक्षेपानें येथें सांगतों. ब्रह्मदेवापासून मांधाता निर्माण झाला. त्या मांधात्याला दोन पुत्र होते. त्यांत वडील पुत्राचें नांव मुचुकुंद व धाकट्याचें नांव परिक्षित असें होतें. या परिक्षितीचा पुत्र मनु व मनूचा पुत्र उत्तानचरण. या उत्तानचरणाचा जगत्‌वंद्य व जगत्प्रसिद्ध असा ध्रुव नांवाचा पुत्र होता. त्या ध्रुवापासून वत्सर व वत्सरापासून उल्मुख यांची उत्पत्ति झाली. पुढें उल्मुखापासून अंगराजा व

अंगापासून वेणुराजाची उत्पत्ति झाली. हा वेणुराजा अधर्मप्रवर्तक होता. त्यानें विहित मार्ग मोडले व ब्राह्मणांना फार त्रास दिला, तेव्हां ब्राह्मणांच्या शापानें त्याचा नाश झाला, व त्याच्या पश्चात् त्याचें राज्य त्याचा पुत्र पृथु यास मिळालें. त्या पृथुराजानें प्रजेचें पालन पुत्राप्रमाणें करून संपूर्ण पृथ्वि सारखी केली. या पृथुराजाचा पुत्र हरिश्चंद हा होय. हरिश्चंद्राचा पुत्र रोहिदास व रोहिदासाचा पुत्र अंबऋषि हा होय. अंबऋषीचा पुत्र तालजंघ होय. तालजंघाचा पुत्र अजखंड, अजखंडापासून नाडसिंधु, नाडसिंधुपासून नाडयोग, व नाडयोगापासून धुंधुमार नांवाचा पुत्र निर्माण झाला. प्रसिद्ध भगीरथ हा सगराचा वंशज होय. भगीरथापासून दिलीपाची उत्पति झाली. दिलीप राजाला रघुराजा या नांवाचा पुत्र झाला. हा रघुराजा चक्रवर्ती राजा होता. या रघुराजाचा पुत्र अजराजा हा होय. अजराजाचा पुत्र प्रसिद्ध दशरथ हा असून दशरथाचा पुत्र श्रीरामचंद्र हा होय. प्रभु श्रीरामचंद्रानें अत्यंत नीतीनें राज्य करून आपल्या प्रजेला पुत्राप्रमाणें वागविलें. श्रीरामचंद्राला लव व कुश असे दोन पुत्र होते. या कुशाला सुकर्म या नांवाचा पुत्र झाला. सुकर्माला नष्टनाभी या नांवाचा पुत्र झाला. नष्ट नाभीपासून क्षेमदधीची उत्पत्ति झाली. क्षेमदधीला देवाजित या नांवाचा पुत्र झाला. देवाजितापासून उनाम, उनामापासून परिजाग्नि, परिजाग्निकेचा शैल, शैलाचा पुत्र नभ, व नभाचा वज्रबाहो, वज्रबाहूचा पुत्र विश्रवा, विश्रवाचा पुत्र सुराव, सुरावाचा पुत्र हिरण्यनाभी, व हिरण्यनाभीपासून शैल्याची उत्पत्ति झाली. पुढें शैल्यापासून धर्मसेन, धर्मसेनापासून केशवसंधी, केशवसंधीपासून अतिवर्ण, अतिवर्णापासून धुशधी, धुशधीपासून अजमीढ, अजमीढापासून जनरूप, जनरूपापासून परळदीप, परळदीपापासून रूपसेन, याप्रमाणें त्रेतायुगांत रामवंशावळीच्या बावन पिढ्या झाल्या. त्रेतायुगांत लोकांची धर्मनिष्ठा जाज्वल्य असून प्रत्येकजण आपआपल्या वर्णाश्रमधर्माप्रमाणें वागत होता. कृतयुग व त्रेतायुग यांची व्यवस्था सारखीच होती. त्या युगांतील लोक संस्कृत भाषेंत बोलत असत व त्या युगाची वर्षसंख्या बारा लक्ष शाण्णव हजार होती. मनुष्याची उंची चौदा ताल असून, दहा हजार वर्षांचें त्यांस आयुष्य होतें, व प्रत्येकास हजार हत्तींचें बळ होतें. भूमि एकवेळ पेरली असतां तिच्यापासून चौदा वेळ धान्य उत्पन्न होत असे. लोक असत्य कधींहि बोलत नसत. धेनूंची विपूलता असून ती सवाघट दूध देत असे. त्या युगांत जेव्हां जेव्हां असूरांच्या प्रळयानें वसुंधरा पापानें जड होई, तेव्हां तेव्हां भगवंतांनीं अवतार घेऊन दुष्टांचें हनन व सुष्टांचें संरक्षण केलें आहे. त्रेतायुगांत भगवंतांनीं तीन अवतार घेतले होते. या तिन्ही अवतारांत भगवंताची माता अदिती, पिता वासुदेव व गुरू वसिष्ठ होता. पहिला अवतार वामन हा होय. त्या वळीं बळी नांवाचा राजा यज्ञयागादि कृत्यांनीं अत्यंत

उन्मत्त व अभिमानी झाला होता. तो सुकृत करीत असतांहि पृथ्वीवर पाप वाढत चाललें. भूमि पीक देईनाशी झाली व दुष्ट लोक अधिक अनाचारानें वागूं लागले. याचें कारण असें कीं, तो बळी राजा जें सुकृत करीत असे, तें केवळ स्वत:साठींच करीत असे. अन्य कोणासाठीं सुकृत करून फलाशा न बाळगितां तें भगवंतास अर्पण केलें, तरच पृथ्वीवर पुण्यांश वाढतो, आणि राजाला पुण्य मिळतें. अशा प्रकारें राजा सद्धर्मी असला म्हणजे प्रजाहि नीतीनें व धर्मानें वागते, आणि त्या राज्यांत पापसंचार होत नाहीं. परंतु हें ज्ञान बळीला नसल्यामुळें तो स्वतः जरी यज्ञयागादि कृत्यें करणारा होता, तरी त्याचा उपयोग न होतां पाप मात्र वाढत चाललें होतें. शिवाय बळीची राज्य-तृष्णाहि फार अनिवार झाली होती. त्यानें इंद्राची अमरावती जिंकून स्वर्गाचें राज्य घेतलें होतें. तसेंच त्यानें महादेव व ब्रह्मदेव यांनाहि आपआपल्या राज्यांतून पळवून लाविलें होतें. म्हणून त्याचा गर्व परिहार करण्याकरितां प्रभूनें वामन अवतार घेऊन त्यास पाताळांत घातलें. त्यानंतर प्रभूंनीं परशराम अवतार घेऊन सहस्त्रार्जुनाचा नाश केला व पृथ्वि एकवीस वेळां निःक्षत्रिय करून पृथ्वीवरील पाप निर्मूल करून टाकिलें. त्यानंतर पृथ्वीवर रावण उन्मत्त झाला, तेव्हां प्रभूंनीं रामअवतार घेऊन त्याचा नाश केला. याप्रमाणें या युगांत तीन अवतार झाले."

राजा म्हणाला; "वैशंपायनऋषि, त्रेतायुगांत भगवंतांनीं हे जे तीन अवतार घेतले, त्या तिन्ही अवतारांत भगवंताचें पितृत्व वासुदेवाकडे व मातृत्व अदिती-कडे होतें. हा इतका मोठेपणा भगवंतांनीं या दोघांनां कां दिला, तें मला कृपा करून निवेदन करावें." तेव्हां ऋषि म्हणाले; "राजा, कश्यपाची स्त्री अदिती, हिनें सहस्र वर्षेपर्यंत क्षीरसागरीं विष्णूची तपश्चर्या केली होती. विष्णु सुखसमा-धींत असतांनां त्याचें वीर्य स्खलन झालें. आदितीला तें माहीत नसल्यामुळें तिच्या चरणानें तें वीर्य भूमीवर पसरलें गेलें. पुढें शारंगपाणी अदितीच्या तपश्चर्येनें प्रसन्न झाले, व तिला--वर माग--म्हणून म्हणाले. तेव्हां अदितीनें पुत्राची इच्छा दर्शविली. ती तिची इच्छा जाणून श्रीहरीनीं भूमीवरील पुष्कळ दिवसाचें वीर्य आपल्या ओंजळींत घेऊन तें अदितीला दिलें व ते म्हणाले, "तुला मजसारखे पुत्र होतील." इतक्यांत श्रीहरीला अदितीस दान दिलेल्या वीर्याची स्मृति झाली. तेव्हां विष्णु म्हणाले; "हे अदिती, मी हें आपलेंच वीर्य तुझ्या हातीं दिल्यामुळें मला तुझ्या पोटीं आतां जन्म घेतला पाहिजे." श्रीहरीचें भाषण ऐकून अदितीला फार आनंद झाला, व ती स्वस्थानीं निघून गेली. त्या वरप्रदानाप्रमाणें अदितीच्या उदरीं भगवंतांनीं तीन वेळां जन्म घेतला होता. राजा जनमेजया ही कथा मोटी आहे, पण तुला संक्षेपानें सांगितली."

नंतर जनमेजयराजा म्हणाला; ऋषि, रावण हा राक्षस असून त्यास ब्राह्मण असें कां म्हणतात, तें सांगावें. तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले; " राजा, ब्रह्मदेवाचा पुत्र पुलस्ती हा होय. हा पुलस्ती मोठा तपोनिधी होता. त्या पुलस्तीला विश्रवा नांवाचा पुत्र होता. तो विश्रवाहि आपल्या पित्याप्रमाणेंच तपोनिष्ठ होता. तो तप करीत बसला असतां, रावणाची आई कैकसी त्या ऋषीचें सौंदर्य पाहून मोहित झाली व ती त्याजवळ ऋतुदान मागूं लागली. तेव्हां विश्रवा म्हणाला; " कैकसी, मी ब्राह्मण असून सांप्रत तप करीत आहे, शिवाय आतां प्रदोषकाळची वेळ आहे, अशा वेळीं मजकडून असलें भलतेंच आचरण व्हावयाचें नाहीं." ऋषीचें भाषण ऐकून कैकसी म्हणाली; "मी ऋतुस्नात आहे, आणि जर या वेळीं तूं मला ऋतुदान दिलें नाहींस, तर मी तुला शाप देईन." कैकसीचें भाषण ऐकून विश्रवाचा नाइलाज झाला, व त्यानें कैकसीला ऋतुदान दिलें. त्या विश्रवाच्या वीर्यापासून कैकसीला गर्भ राहून रावण झालेला आहे. म्हणून रावणाला ब्रह्मराक्षस असें म्हणतात.

---

## अध्याय १० वा.

### १. ध्रुवाख्यान.

जनमेजयराजा वैशंपायनऋषीला भक्तिभावानें वंदन करून म्हणाला; " ऋषिमहाराज, आपण मागें त्रेतायुगांतील वंशविस्तार सांगत असतांना उत्तानचरणराजाचा पुत्र जो ध्रुव, त्या विषयीं कांहीं माहिती सांगितली होती. त्यावरून मला ध्रुवाची संपूर्ण कथा ऐकण्याची इच्छा झाली आहे, तर माझी ही इच्छा पूर्ण करावी." तेव्हां वैशंपायनऋषि म्हणाले; " राजा, पूर्वी बृहस्पति नांवाच्या नगरामध्यें उत्तानचरण नांवाचा राजा राज्य करीत होता. त्या राजाला दोन स्त्रिया होत्या. एकीचें नांव सुनीति व दुसरीचें नांव सुरुचि. ध्रुव हा सुनीतीचा पुत्र होय. तो लहानपणापासून निश्चयी, भक्तिनिष्ठ व वैराग्यशील असा होता. सुनीति व सुरुचि या दोघी सवती असल्यामुळें त्या दोघींमध्यें सवतीमत्सर जागृत होता. त्यांतून सुनीतीला पुत्र झाल्यापासून तर सुरुचि सुनीतीचा अधिकच मत्सर करूं लागली. सुनीती ही राजाची वडील स्त्री होती, पण सुरुचि विशेष सुस्वरूप असल्यानें मागाहून केली होती. सुनीतीवर जरी राजाचें प्रेम होतें तरी सुरुचीवर विशेष असून राजानें तिलाच पट्टराणी म्हणून ठरविलें होतें. शिवाय राज्यावर तुझाच पुत्र बसवीन असेंहि त्यानें सुरुचीला अभिवचन दिलें होतें. यामुळें सुरुचीला फार अभिमान झाला होता व ती सुनीतीचा व ध्रुवाचा फार द्वेश करीत होती.

एके दिवशीं उत्तानचरण राजाकडे कांहीं उत्सव होता. त्या उत्सवाच्या नाचरंगांत राजा मग्न असतां, तेथें त्याचा तो ध्रुव बालक मजा पाहण्यासाठीं आला. ध्रुवाची ती मनोहर बालमूर्ति पाहून राजाच्या हृदयांत पुत्रप्रेम उचंबळून आलें व त्यानें ध्रुवास चटकन उचलून आपल्या मांडीवर घेतलें. त्यावेळीं सुरुची राजाच्या जवळच बसलेली होती. राजाच्या बाजूला एक लहानसा रत्नखचित आरसा होता. त्या आरशाकडे ध्रुव कौतुकानें पाहूं लागला, तेव्हां राजानें तो आरसा उचलून ध्रुवाच्या हातीं दिला. तो रत्नखचित आरसा सुरुचीचा होता. आधींच मत्सरानें तिचा द्वेषाग्नी भडकलेला होता, तशांत आपला आरसा राजानें सवतीच्या मुलाच्या हातांत दिलेला पाहतांच, ती क्रोधानें लाल झाली. तिनें त्या ध्रुवाच्या हातांतील आरसा हिसकून घेऊन त्यास राजाच्या मांडीवरून जोरानें ढकलून दिलें. त्याबरोबर ध्रुव कोलवंडून पडला व त्यास लागलीच मूर्च्छा आली. सुरुचीची ती दुष्ट कृति पाहून सर्व लोक हळहळले व त्यांनां तिचा फार राग आला. कित्येकांनीं तर तिला स्पष्टपणें कटुशब्दांनीं संबोधिलें व ते राजसभेंतून उठून गेले. कित्येकांनीं ध्रुवाला वारा वगैरे घालून सावध केलें व त्याला त्याच्या आईकडे नेऊन पोहोंचविलें. उत्तानचरण राजालाहि अत्यंत वाईट वाटलें, परंतु बायको संतापेल म्हणून तो स्वस्थ बसला.

मातेजवळ आल्यानंतर ध्रुवानें सभेंत घडलेली सर्व हकीकत आईला सांगितली. ती ऐकून सुनीतीला फार दुःख झालें, पण निरुपाय म्हणून ती स्वस्थ बसली. ध्रुवाला मात्र या प्रकारानें फार अनुताप झाला. ज्या जगांत इतकीं मनुष्यद्वेषी माणसें आहेत, त्या जगाचा संपर्क नसलेलाच बरा, अशी त्याची भावना झाली; व तो आपल्या आईला म्हणाला; "हे माते, ज्याच्या लीलेनें हें एवढें जग निर्माण झालें आहे, ज्याच्या मायेच्या चेष्टेनें हें चराचर उत्पन्न झालें आहे, तो कोण आहे, व कोठें आहे, हें मला कृपा करून सांग."

## २. सुनीतीचा ध्रुवाला उपदेश.

ध्रुवाचें भाषण ऐकून सुनीति म्हणाली; बाळा ध्रुवा, ज्याचा अंत वेदालाहि लागला नाहीं, त्रैलोक्य व ब्रह्मादि ही ज्याला जाणावयास समर्थ नाहींत, तो परमात्मा तुला तुझ्या बाळमतीनें कसा बरें सांपडेल? जो आपल्या इच्छाशक्तीनें विलक्षण घटना घडवून आणितो तो तुला पोराला कसा बरें ओळखूं येणार? हे सुनीतीचे शब्द ऐकून ध्रुव म्हणाला; "आई, मी जरी लहान आहे, तरी भगवंताची भेट घेण्याचा मी निश्चयच केलेला आहे. मला जर देवाची भेट झाली नाहीं, तर मी आपला हा प्राण ठेवणार नाहीं. करितां मला तूं परमेश्वर प्राप्तीचा मार्ग समजावून सांग. मदालसेनें ज्याप्रमाणें आपल्या मुलांनां वैराग्याचा उपदेश करून त्यांनां सिद्धीकरितां घरांतून घालवून दिलें, त्याप्रमाणें तूं मला उपदेश करून परमात्म्याची व माझी भेट करीव." हें ऐकून सुनीति म्हणाली; "बाळा, जें

ज्ञान मदालसेनें आपल्या मुलांना करून दिलें, तें फार कठीण आहे. तें तुला कोठून कळणार ? मोठमोठे ऋषि कित्येक वर्षे तपश्चर्या करितात, तेव्हां त्यांना तें ज्ञान प्राप्त होतें. तथापि तुला तें गूढ तत्व मी थोडक्यांत सांगतें."

बाळा ध्रुवा, प्राण, अपान, उदान, व्यान व समान असे पांच वायु असून रेचक, पूरक व कुंभक यांनीं त्यांचें नियमन करितां येतें. हें नियमन येऊं लागल्यावर एकवीस हजार जप करावा, म्हणजे मुक्ति, मनु, ब्रह्मदेव, विष्णु व शंकर यांचें ज्ञान होतें. मूळ जें आधारचक्र तेथें रिद्धिसिद्धिचा नायक जो गणपति तो आहे. रक्तवर्ण ही त्याची खूण आहे. सहाशें जप केला असतां, गणनाथाचें दर्शन होतें. या स्थितींत असतांना पंचद्वाराचा पवन एकत्र होऊन तो गुदद्वारीं दाटतो. दुसरें चक्र स्वाधिष्ठान हें होय. तेथें ब्रह्मदेव असतो. त्या ठिकाणीं सावित्री त्याची सेवा करीत असते. तेथें वाचा वैखरी असून जागृतावस्था असते. तेथील मुक्ति सलीलता असून मुद्रालक्षण खेचरी आहे. ओंकार म्हणजे ऋग्वेद होय. आधिभौतिकादिक तीन ताप आहेत. ऊरस्थळ व गुह्यभाग या दोहोंतील सहस्र मात्रा मायलेकाच्या संबंधाप्रमाणें अनुकूल पाहिजेत. तेथें ऊर्ध्व मार्गानें वीस हजार जप केला पाहिजे. त्यावरती लिंगदेहस्थानीं पूरकचक्र आहे. त्या ठिकाणीं विष्णूचा लक्ष्मीसह वास आहे. तेथील वाचा मध्यमा ही असून, वर्ण ब्रह्माचा आहे. त्या स्थानीं स्वप्नावस्था असून मुद्रा भूचरी आहे; व मुक्ति समीपता आहे. तेथील प्राण हा समान असून गुण तत्व आहे. तेथें चतुर्थ गुरुलिंग असून पवन कुंभक आहे. यज्ञ अनुहात असून ध्वनि श्रीहाट आहे. मातृका द्विदळ असून प्राणहि द्विदळ आहे. येथील जप संख्या सहा हजार आहे." इतकें ऐकल्यावर ध्रुव आपल्या आईला म्हणाला; "हे माते, अनुहात यज्ञाचा विचार कसा आहे, व कारण देहाची स्थिति कशी आहे, तें मला कृपा करून सांग." तेव्हां सुनीति म्हणाली, "बाळा अनुहात चक्रीं शंकर पार्वतीसह आहेत. तेथील वर्ण तांबडा असून वाचा पश्यंति आहे. अवस्था सुषुप्ता असून स्वरुपता ही मुक्ति आहे. ज्याला ज्ञानी ज्योतिकळेचा आश्रम म्हणतात, तो तेथेंच आहे. तेथील मुद्रा चांचरी असून तमोगुण आहे; व अक्षर मकार आहे. मकार म्हणजे सामवेद होय. कर्मज्ञान अध्यात्मिक असून त्राहाटक पवन आहे. गोल्हाट पीठ चतुष्ठाकार असून मध्यप्राण मध्यें आहे. या पुलस्तीचा जप सहा हजार असून अनुहाताचा जप बारा हजार आहे. विशुद्धचक्राचे ठिकाणीं कारण देह आहे. तेथील शक्ति अविद्या ही असून आत्मा हा देह आहे. वाचा, परा असून अवस्था तूर्या आहे. वेद अथर्वण असून वर्ण ज्वाळेच्या रंगाप्रमाणें आहे. मुक्ति, सायुज्यता असून पवन साधण्याचा मार्ग रेचक आहे. मुद्रा अगोचरी असून प्राण उदान आहे. पुण्यगिरी पीठाश्रम हा मार्ग असून अर्धमात्रा ही तेथील खूण आहे. हें कमल शोडशदळाचें असून

तेथील जप एक हजार आहे. हे बाळा ध्रुवा, आतां तुला अग्नीचक्राविषयीं सांगतों. अग्निचक्राचे ठिकाणीं लिंगदेह असून, तो परमात्मा केवळ माया शक्तीच्याच पूजनानें प्रसन्न होतो. त्याच्या प्राप्तीसाठीं उन्मनी अवस्था पाहिजे. येथील प्रभा माणकाप्रमाणें आहे. अंतःकरणांत प्रसादलिंग आणून, व त्रिवेणीसंगम करून त्या त्रिकुटस्थानीं निश्चल मानसानें एक हजार जप केला पाहिजे. यापुढें विराट देह आहे. तो ज्या चक्रांत आहे त्या चक्राला उन्मनीचक्र असें म्हणतात. तें कमळ सहस्र पाकळ्यांचें आहे. तेथें महालिंग असून तेथें ब्रह्मरंध्र व पुरुष देवता आहे. तेथें जीव व शिव यांची सगुण मिथुनीं भेट होते. त्या द्विदळ भुवनाचा जप एक हजार आहे. प्रळय अवस्थेचा भाव दाखविणारा शक्तिदेहधारी महादेव हा त्या अर्धशून्य ब्रह्मांडांत असून त्याचा चतुर्थ चरण बीजरूप होय. तेथें कर्तृत्व हेंच स्वयंसिद्ध बीज आहे. त्या ठिकाणीं ध्रुवा तूं वास कर, म्हणजे स्वानंदसुखाचें सौख्य सहजच प्राप्त होईल. जें शून्य, ज्याला मूळ प्रकृति देह असें म्हणतात, तेथें निरालंबपणें रहावें. त्या निर्गुण जीवांत शिवदेवता ही अधिष्ठित झालेली आहे. तेथें महतत्व हेंच मूळ असून माया प्रकृतीचा संबंध मुळींच नाहीं. त्या ठिकाणीं म्हणजे जीवाच्या जन्मस्थानीं केवळ आत्मा हाच असतो. ती अवस्था अक्षय व निश्चळ अशी असते. त्या निर्गुण परब्रह्मस्थानीं पवनादिकांची गति सहज कुंठित होते. ती ब्रह्मदेवता निःशब्द व निरंजन देही आहे. निर्गुण अक्षर हीच तेथील साक्ष होय. जसें पिंडब्रह्मांड आहे; तसेंच हें चराचर आहे. या दोहोंचें पूर्णज्ञान प्राप्त झाल्यानंतर शून्य देहांत जी आत्मातीत अवस्था प्राप्त होते, तीच मुक्ति होय. बाळा ध्रुवा, देह अहंकार मूळ सोडून व हें मायाजाळ तोडून, तूं आपलें चित्त गोविंदपदीं अर्पण कर, मनांत अक्षय श्रीहरीची मूर्ति असूं दे, म्हणजे तुझा प्रवेश निरंजनाचे राउळांत सहजच होईल.'

यप्रमाणें सुनीतीनें ध्रुवाला उपदेश करतांच तो त्याच्या मनावर पूर्ण ठसला. त्यानें लगेच तपश्चर्येस जाण्याचा विचार ठरवून आपल्या मातोश्रीची संमती घेतली. व तो पांच वर्षांचा ध्रुव बालक एकाग्र चित्तानें प्रवास करीत मधुवन नांवाच्या अरण्यांत येऊन पोंचला. तें मधुवन फलपुष्पतडागांनीं अत्यंत रमणीय होतें, तेथें चांगली रम्य जागा पाहून ध्रुवानें आपलें आसन घातलें व मातोश्रीच्या सूचनेप्रमाणें बीज मंत्राचा जप सुरू केला. जपाला आरंभ केल्यानंतर तिसरे दिवशीं आसनावरच कर्दळीचीं थोडीं फळें खाऊन त्यानें पारणें सोडलें. या प्रमाणें महिना गेल्यावर दुसरे महिन्यांत भुमीवरील पत्रावर, तिसरे महिन्यांत फक्त उदकावर व चौथे महिन्यांत फक्त वायु सेवन करून पारणें केलें. याप्रमाणें तयारी झाल्यावर त्यानें प्राणायाम साधून दोन महिनेपर्यंत प्राणवायु रोंखून ठे

विला, आणि पूरक, कुंभक व रेचक असे तिन्हीं प्रकार त्यानें साधले. अशा रीतीनें तो शेवटीं परमेश्वर स्वरूपांत लीन होऊन महदानंदांत निमग्न झाला.

इकडे नारद भ्रमण करीत असतांना त्यांचे दृष्टीस ध्रुवाची ब्रह्मानंदांत निमग्न झालेली मूर्ति पडली. ती ध्रुवाची विलक्षण तपश्चर्या पाहून नारदाला फार आश्चर्य वाटलें, व त्यानें ती हकीकत स्वर्गीं इंद्रास कळविली; व तो म्हणाला; ध्रुवबाळाचें तपसामर्थ्य इतकें कांहीं विलक्षण वाढलें आहे कीं, तो जर नुसत्या अमरावतीकडे पाहील तर तुझ्या अमरावतीची रक्षा होऊन जाईल. एवढ्यासाठीं तूं लवकर कांहींतरी तजवीज कर." नारदाचें भाषण ऐकून इंद्राला मोठी काळजी उत्पन्न झाली व तो ब्रह्मदेवाकडे गेला. तेव्हां ब्रह्मदेवालाहि आश्चर्य वाटलें व ते सर्व कैलासावर महादेवाकडे गेले व त्यांस ध्रुवाची हकीकत सांगितली. तेव्हां महादेवही त्यांच्याबरोबर पार्वतीसह निघाला. याप्रमाणें सर्व देव क्षीरसागरीं आले व त्यांनीं विष्णूची प्रार्थना करून त्यास सर्व हकीकत कळविली. तेव्हां विष्णु लक्ष्मीसह सर्व देवांस बरोबर घेऊन त्या मधुवनांत आले. आणि स्वस्वरूपीं लीन झालेली ध्रुवाची बालमूर्ति पाहून सर्व देवांचीं हृदयें प्रेमानीं भरून आलीं. नंतर विष्णूनीं आपला शंख त्याच्या मस्तकाला लावून त्याला समाधींतून जागें केलें. समाधी उडतांच तो सर्व देवांकडे पाहूं लागला. इतक्यांत लक्ष्मीनें त्यास प्रेमानें कडेवर घेऊन कुरवाळिलें. ब्रह्मदेवानें आपल्या जवळचा पीतांबर त्याला नेसविला. सावित्रीनें कनकारतीनें त्याला ओंवाळिलें. शंकरानीं त्याला विभूतितिलक लाविला व पार्वतीनें त्याला पुत्राप्रमाणें आपल्या हृदयाशीं धरिलें. ध्रुवानें सर्व देवांनां साष्टांग प्रणाम केला. विष्णु ध्रुवाला म्हणाले:—बाळा ध्रुवा, तूं एवढ्या लहान वयांत येथें कसा आलास व माझ्या प्राप्तीचें ज्ञान तुला कोणी करून दिलें ? तेव्हां नारदानें घडलेली सर्व हकीकत विष्णूस सांगितली. तेव्हां भगवंत ध्रुवाच्या मस्तकावर हात ठेवून म्हणाले; "बाळा ध्रुवा, तूं हा सर्व प्रयत्न मोक्षप्राप्तीसाठीं केला आहेस, त्याप्रमाणें तुला मोक्ष पद तर मीं दिलेंच आहे, परंतु घरीं जाऊन तूं प्रथम आपल्या पित्याच्या राज्याचा स्वीकार कर, म्हणजे तुझ्या मातापित्याला व तुझ्या राज्यांतील प्रजेला मोठा आनंद होईल. त्या राज्याचा उपभोग तूं छत्तीस हजार वर्षेंपर्यंत घे, व नंतर मोक्षस्थानीं ये. तूं जेव्हां इच्छा दर्शविशील तेव्हां तुला मोक्षपद प्राप्त होईल." असें सांगून विष्णूसह सर्व देव आपआपले स्थानीं निघून गेले.

असो; इकडे बृहस्पति नगरांतून ज्या दिवशीं ध्रुव निघून गेला, त्या दिवसापासून संपूर्ण बृहस्पति नगराला औदासिन्य प्राप्त झालें होतें. सुनीतीला आपला पुत्र कशासाठीं घर सोडून निघून गेला हें जरी माहीत होतें, तरी ज्या कार्यासाठीं तो गेला आहे, तें कार्य तो कसें सिद्धीस नेईल याची तिला चिंता वाटत होती. राजाची स्थिति तर फारच चमत्कारिक झाली होती. त्याच्या मांडी-

वरून ध्रुव पडल्यावर तो जो नाहींसा झाला तों झालाच, असा प्रकार झाल्यामुळें राजा अत्यंत उद्वीग्न व दुःखी झाला होता. तसेंच सवतीमत्सराचे भरांत सुरूचीनें ध्रुवाला जरी ढकलून दिलें होतें, तरी तिला मागाहून आपण मोठी चूक केली असें वाटूं लागलें होतें. राजपुत्राच्या जाण्यामुळें प्रजेची स्थिति अशीच अनुकंपनीय झाली होती. सारांश, ध्रुवाविषयीं सर्व जन चिंताग्रस्त झालेले होते. इतक्यांत कांहीं सेवक राजाकडे धांवत आले व त्यांनीं राजाला 'आपला पुत्र ध्रुव येत आहे.' असें आनंददायक वर्तमान कळविलें. ती बातमी ऐकून राजाला महदानंद झाला. त्यानें बरोबर रथ, सैन्य, मंगलवाद्यें घेतलीं व तो ध्रुवाला सामोरा गेला. तपःसामर्थ्यामुळें ध्रुवाची ती सतेज झालेली मनोरम बालमूर्ति पाहून सर्वांचीं हृदयें गहिंवरून आलीं. राजानें पुत्राला आपल्या हृदयाशीं घट्ट धरून प्रेमानें त्याचें चुंबन घेतलें, व मंगल वाद्यांच्या गजरांत मिरवीत मिरवीत त्यास नगरांत आणलें. तेव्हां नगरवासी जनांनीं पुष्पवृष्टि करून त्याचा जयजयकार केला; सुवासिनींनीं पंचारती ओंवाळिली व वृद्धांनीं आसिर्वाद दिला. सुनीतीनें मोठ्या प्रेमानें लिंबलोण उतरून त्यास हृदयाशीं धरिलें. नंतर राजानें शुभ मुहूर्त पाहून वायुकन्या विडा व कोंडा यांजबरोबर ध्रुवाचा विवाह केला. त्या समारंभास अनेक राजे, महाराजे व अनेक ऋषीहि आपआपल्या स्त्रियासह आले होते. ऋचिक व त्याची स्त्री आकृति, दक्ष व त्याची स्त्री प्रसूति, पुलहऋषि व त्याची स्त्री गति, अत्रि ऋषि व त्याची स्त्री अनुसूया, मरीचि ऋषि व त्याची स्त्री कळा, अंगिराऋषि व त्याची स्त्री सिद्धा, वासिष्ट व त्याची स्त्री अरुंधती, याप्रमाणें भृगु, पुलस्ती, वगैरे अनेक ऋषि आपल्या स्त्रियांसहवर्तमान आले होते. लग्नानंतर राजानें मोठ्या समारंभानें आपलें सर्व राज्य ध्रुवाचे स्वाधीन केलें व आपण तपश्चर्येसाठीं अरण्यांत निघून गेला.

इतक्या अवधींत राजाची स्त्री जी सुरुचि, तिला पुत्र होऊन, तोहि बराच मोटा झाला होता. त्याचें नांव सुरुचीनें उत्तम असें ठेविलें होतें. त्या उत्तमाला ध्रुव चांगल्या रीतीनें वागवी व त्याचा मानमरातब आपणाप्रमाणेंच ठेवीत असे. एके दिवशीं उत्तम आपणाबरोबर पुष्कळ सैन्य घेऊन शिकारीसाठीं अरण्यांत गेला. तें अरण्य यक्षपतीचें होतें. यक्षपतीस हें वर्तमान दुतांकडून समजतांच तो आपलें सैन्य घेऊन उत्तमावर आला व उभयतांचें युद्ध झालें. त्या युद्धांत उत्तम यक्षाच्या हातानें मृत झाला. तें वर्तमान सुरूचीला समजलें, तेव्हां ती फारच शोक करूं लागली. पुत्र निधनामुळें तिला कांहीं सुचेनासें झालें. पुत्राचें प्रेम कसें असतें तें तिला या वेळीं चांगलें कळून आलें, व तिला त्या स्थितींत ध्रुवाला राजाच्या मांडीवरून ढकलून दिल्याची आठवण झाली. तेव्हां ती स्वतःला अनेक प्रकारें दोष लावून घेऊं लागली. तिचा शोक इतका वाढला कीं, त्या शोकभरानें सुरूची मूर्च्छित होऊन पडली. तेव्हां ध्रुवानें

तिची पुष्कळ समजूत करून, यक्षाला चांगली शिक्षा लावितों, असें तिला अभिवचन दिलें; व बरोबर सैन्य घेऊन त्यानें यक्षावर स्वारी केली.

उत्तर दिशेला हिमालय पर्वतावर त्या यक्षराजाचें स्थान होतें. तेथें जाऊन ध्रुवानें त्यास युद्धासाठीं आव्हान केलें. तेव्हां यक्षाचें सैन्यही युद्धाची मोठी तयारी करून ध्रुवाबरोबर युद्ध करूं लागलें. उभय पक्षांकडील सैन्य रणकुशल असल्यामुळें त्या युद्धाला लवकरच भयंकर स्वरूप आलें व तो विशाल हिमालय पर्वत रुधिरसिंचनानें तांबडा लाल होऊन गेला. कित्येक मायावी यक्ष ध्रुवाच्या सैन्यावर पर्वतावरील वृक्ष व दगड फेकूं लागले. पर्वताच्या दरडीच्या दरडी कोसळून पडूं लागल्या. याप्रमाणें यक्षाचें सैन्य उत्पात करीत होतें तरी ध्रुवाचें सैन्य यक्ष सैन्याचा पराभव करीत यक्षराजाच्या नगराकडे चाललें होतें. ध्रुवाचें धोरण ओळखून यक्षराजा अपार सैन्य घेऊन स्वत: युद्धासाठीं आला. त्या वेळीं समुद्रच खवळला आहे असें वाटूं लागलें. त्यानें ध्रुवाच्या रथावर चौदा पद्म वीरांसह एकदम हल्ला केला, परंतु एकट्या ध्रुवानें त्या सर्व वीरांना पळवून लाविलें. ध्रुवाची युद्धनैपुण्यता पाहून यक्षराजानें मायावी युद्धास आरंभ केला. तेव्हां ध्रुवाच्या सैन्यांत तांबड्या, हिरव्या, पिंवळ्या, निळ्या, वगैरे अनेक रंगाच्या ज्वाळा फिरूं लागल्या. काळ्या रंगाचे व पांढऱ्या शेंपटीचें विंचू मस्तकावर पडूं लागले. अनेक जातीचे भयंकर सर्प सैन्यांत संचार करूं लागले. हा चमत्कार पाहून ध्रुवाचें सर्व सैन्य भिऊन गेलें व तोहि स्वत: काय करावें, या काळजींत पडला. इतक्यांत तेथें वसिष्ठ ऋषि आले व ते ध्रुवाला म्हणाले; " ध्रुवा, तूं व्यर्थ काळजी करूं नकोस. ज्या श्रीहरीनें पूर्वी तुला दर्शन दिलें होतें, त्याचें तूं स्मरण कर, म्हणजे सर्व संकटांतून मुक्त होशील. " वसिष्ठांच्या सूचनेप्रमाणें ध्रुवानें विष्णूचें स्मरण केलें, त्याबरोबर तेथें विष्णु प्रकट झाले, व त्यांनीं ध्रुवाला आत्म्याविषयीं अध्यात्मिक उपदेश केला. तो ऐकून ध्रुवाला आत्मज्ञान झालें. तेव्हां त्यास यक्षराजा शत्रुऐवजीं मित्र दिसूं लागला. त्यानें युद्ध बंद केलें, व तो आपल्या नगरास परत आला. मग त्यानें सुरूचीची समजूत केली. त्यानें केलेला आत्मज्ञानाचा बोध सुरुचीलाही मानवला. या नंतर ध्रुवानें विष्णूच्या आज्ञेप्रमाणें छत्तीस हजार वर्षेंपर्यंत राज्य करून मग तें आपला पुत्र उत्कल याच्या स्वाधीन केलें, व तो अढळपदाकडे निघून गेला.

## अध्याय ११ वा.

### १. ध्रुवाची अढळपदावर स्थापना.

मागील कथा ऐकल्यावर जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; वैशंपायन महाराज, आपण सांगितलेली ध्रुवाची कथा ऐकून मला मोठा संतोष झाला. आतां ध्रुव अढळ पदावर कशा प्रकारें गेला, ती कथा सांगण्याची

कृपा करावी. तेव्हां ऋषि म्हणाले; "राजा जनमेजया, ध्रुव बृहस्पति नगराहून निघाला तो छप्पन्न कोटी देशाची यात्रा करीत करीत अढळ पदावर निघून गेला. त्यानें एकंदर बेचाळीस कोटी योजनांचा प्रवास केला. पैकीं तेहतीस कोटीचा प्रवास सूर्यप्रकाशांतून व नवकोटी योजनांचा मार्ग अंधःकारांतून आक्रमण केला. या अंधःकारांत प्रसिद्ध असे अकरा रुद्र आहेत. अभेद रुद्र हा पूर्व दिशेला आहे. अमररुद्र हा अग्नेय दिशेला आहे. अंतरोद्भवरुद्र दक्षिण दिशेला आहे. आकलरुद्र नैऋत्य दिशेला आहे. अविकाररुद्र पश्चिम दिशेला आहे. ततरुद्र वायव्य दिशेला आहे. सिद्धरुद्र उत्तर दिशेला आहे. महादेव ईशान्य दिशेला आहे. आणि मध्यभागीं तीन रुद्र आहेत. त्यांचीं नांवें, आद्यपुरु, सप्तश्रु व हनुमंत अशीं आहेत. या अकरा रुद्रांनां नमस्कार करून ध्रुव पुढें निघाला, तेव्हां त्यास अणिमा, महिमा, लघिमा, गरिमा, प्राप्ति, प्राकाम्यं, ईशित्वं व वशित्वं अशा अष्टसिद्धींची भेट झाली. त्या अष्टसिद्धींनां त्यानें वंदन केलें व तो पुढें मार्ग क्रमूं लागला. कांहीं भूभाग चालून गेल्यावर त्यास क्षार समुद्र लागला. तो दोन कोटी योजनें विस्तीर्ण आहे. तो ओलांडून गेल्यावर इक्षुरस समुद्र लागला. तोहि दोन कोटि योजनें विस्तीर्ण आहे. त्यानंतर कोटी योजनें विस्तीर्ण असा घृतसमुद्र लागला. त्यापुढें तितकाच लांब सुरोदसमुद्र त्यानें ओलांडिला. पुढें एकेक कोटी योजनांचे दधि, दुग्ध व शुद्धोदकसमुद्र लागले. त्या सर्व समुद्रांत स्नानें करीत करीत ध्रुव पुढें निघून गेला. या एकंदर सप्तसमुद्रांनीं वसुंधरेची नऊ कोटी जागा व्याप्त केली आहे. याप्रमाणें समुद्रांतून पार पडल्यावर त्यास अनेक देश लागले. प्रथम शहाण्णव कोटी योजनांचा वालुका प्रदेश लागला. त्यानंतर तो अठरा कोटी योजनें विस्तीर्ण अशा सुरासन नांवाच्या देशांत गेला. तेथून मगध देशांत गेला. त्या देशाचा विस्तार दोन कोटी योजनें आहे. तेथून तो पुढें एक कोटी विस्तीर्ण अशा पंचदेशांत जाऊन कनोज देशांत गेला. तो कनोज देश बत्तीस हजार योजनें विस्तीर्ण आहे. तेथून तो तीन सहस्र योजनें विस्तीर्ण असलेल्या जालंधर देशांत जाऊन अयोध्येस गेला. अयोध्या नऊ लक्ष योजनें विस्तीर्ण आहे. अयोध्येहून तो उज्जनीला गेला. नंतर तसाच कन्याकुमारीपर्यंत जाऊन, कोंकण, माळवा, कर्नाटक, सोरट, वत्सहर, आरूप, मालसेंडा, विराध, गुजराथ, सुरथ, कलंबर, वेटर, काशी, कांची, कोनब्रह्म, जालंधर, वडनगर, मागधदेश, जयंती, लंका, सिंहल, काडर, नेपाळ वगैरे देशांतून मार्ग क्रमित उत्तरेकडे गेला. तिकडे जात असतांना त्यास दंडकारण्य, चंपकारण्य, नैमिष्यारण्य, व धर्मारण्य अशीं चार अरण्यें लागलीं. या चार अरण्यांतून प्रवास केल्यावर बोढिया, नाग, ज्वाळाधर व पूर्णगिरी अशीं चार पिठें पाहिलीं. त्यानंतर अग्नि, संचार, चक्रवती व सागर अशीं चार तीर्थें पाहिलीं. या चार तीर्थांत स्नान करून ध्रुव

पुढें गेल्यावर त्यास तीन नद्या लागल्या. त्या नद्यांचा उगम विष्णु चरणापासून झालेला आहे; व मूळ ओढ्यास तीन फांटे फुटले आहेत. एक फांटा पश्चिम दिशेला, दुसरा उत्तर दिशेला व तिसरा पूर्व दिशेला गेला आहे. त्या तिन्ही ओघांत ध्रुवानें स्नान करून तो प्लक्षद्वीपांत गेला. जंबुद्वीपांत मनुष्य वस्ती असून प्लक्षद्वीप हें निर्मय आहे. तेथून तो शाल्मलीद्वीपांत गेला. या शाल्मली द्वीपांत ऋषी व योगी यांचा वास आहे. तेथून तो कुशद्वीपांत गेला. त्या द्वीपांत सर्व राक्षसांचीच वस्ती आहे. तेथून क्रौंच द्वीपांत तो जेव्हां गेला, तेव्हां त्याला जिकडे तिकडे माधवांचीच वस्ती दिसून आली. पुढें त्यास शाकद्वीप लागलें. त्या शाकद्वीपांत नंदीवृषभांचीच वस्ती आहे. नंतर तो गोमेद द्वीपांत आला. त्या द्वीपांत अप्सरा राहतात. त्या द्वीपांत जेव्हां ध्रुव गेला तेव्हां मेनका, रंभा, घृताची, तिलोत्तमा, उर्वशी, मंजुघोषा व सुकेशी अशा सात अप्सरा त्यास आडव्या झाल्या, व आपल्या मनोहर चेष्टांनीं त्या, ध्रुवाला मोहित करण्याची पराकाष्ठा करूं लागल्या. परंतु ध्रुव न भुलतां पुढें निघून गेला."

ही कथा सांगत असतांना जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; मुनि महाराज, जंबुद्वीपाचे जे नऊ खंड केलेले आहेत, त्यांचीं नांवें कोणतीं ? तेव्हां ऋषि म्हणाले; राजा, एकंदर द्वीपें सात आहेत. जंबुद्वीप, प्लक्षद्वीप, शाल्मलीद्वीप, कुशद्वीप, क्रौंचद्वीप, शाकद्वीप व सातवें पुष्करद्वीप होय. यांपैकीं जंबुद्वीपाचे नऊ भाग केलेले आहेत. त्या भागाला खंड असेंहि म्हणतात. हरिवर्षखंड, इलावर्तखंड, रमणकखंड, हिरण्यखंड, कुरूखंड, किंपुरूषखंड, भरतखंड, भद्राश्वखंड व नववें केतुमालखंड होय. त्याप्रमाणेंच चौदा भुवनें आहेत. तीं-वायुभूवन, मेघभूवन, सूर्यभूवन, चंद्रभूवन, ताराभूवन, गगनभूवन, इंद्रभूवन, ब्रह्मभूवन, विष्णुभूवन, शिवभूवन, शून्यभूवन, काळभूवन, पक्षिभूवन व निरंजनभूवन हीं होत. हीं चौदा भुवनें पाहून ध्रुव पुढें निघाला. मार्गांत ध्रुवाला कोणते पर्वत लागले तें सांगतों. ज्या पर्वताला कृष्णवर्णाच्या व रक्तवर्णाच्या रेषा आहेत व ज्याच्या सभोंवती चंद्रसूर्यादि फिरत आहेत तो मेरुपर्वत इलावर्त खंडांत आहे. त्यापुढें नीलपर्वत आहे. त्या पर्वतावरून ध्रुव रमणक व हिरण्यक खंडांत जाऊन प्रचंड अशा भृंगवान पर्वतावर गेला. तो पर्वत उतरून गेल्यावर त्यास उत्तर दिशेला असलेलें कुरूखंड लागलें. त्यापुढें त्याला इलावर्ताचे दक्षिण दिशेला असलेला निषध पर्वत लागला. त्या पर्वतावरून तो हरिवर्ष खंडांत गेला व तेथून हेमकूट पर्वतावर गेला. त्या पर्वतावरून उतरून पलीकडे गेल्यावर त्याला किंपुरूषखंड लागलें. त्या खंडांतून तो प्रवास करीत दक्षिणदिशेनें हिमाचल पर्वतावर गेला. त्या पर्वतावरून पुढें गेल्यावर त्यास भरतखंड लागलें. त्या पुढें माल्यवंत पर्वत लागला. तो पर्वत चढून तो केतुमाल खंडांत गेला. नंतर त्यास गंधमादन पर्वत लागला. त्या

पर्वतावरून पलीकडे गेल्यावर तो भद्राश्व खंडांत आला. त्या खंडांतून मार्ग आक्रमण करून गेल्यावर त्यास अत्यंत विशाल असा मेरुपर्वत दृष्टीस पडला.

हे राजा जनमेजया, त्या अश्रुतपूर्व अशा मेरुपर्वताला पाहून ध्रुवाला मोठा आनंद झाला. या पर्वताचा खालचा भाग सोळा हजार योजनें विस्तीर्ण असून, वरील पृष्ठभाग बत्तीस हजार योजनें विस्तीर्ण आहे; व त्याच्या चार दिशेला चार टोंकें आहेत. पूर्वदिशेकडील टोंकाला मंदरगिरि असें म्हणतात. या मंदरगिरी-वर प्रचंड आम्रवृक्ष आहे. त्या आम्रवृक्षाचा विस्तार अकराशें योजनें असून, त्याची छाया शंभर योजनें विस्तीर्ण आहे. या विशालवृक्षाला फळेंहि विलक्षण प्रचंड येतात. तें फळ पक्व होतें, तेव्हां देंठापासून सुटून खालीं पडतें व त्याचा रस एका कुंडांत सांचतो. हा रस दुग्धाप्रमाणें असल्यामुळें त्यास दुग्धकुंड असें म्हणतात. या दुग्धाच्या कुंडांतून अरुणोदा या नांवाची दुधाचीच नदी निघालेली असून ती मंदरगिरीवरून वाहत वाहत इलावर्त खंडांत गेली आहे. या नदीचा उपभोग पार्वती घेत असून तिच्या सेवासुश्रुषेला अनेक यक्ष किन्नर तेथें आहेत. मेरु पर्वताचें जें उत्तरदिशेकडील टोंक आहे, त्यास कुमद असें म्हणतात. या कुमद पर्वतावर सहस्र योजनें विस्तीर्ण असा वटवृक्ष आहे. या विशाल वृक्षाची छाया शंभर योजनें विस्तृत आहे. त्या वटवृक्षाच्या खालीं अत्यंत रम्य असें उदकाचें कुंड आहे. हें कुंड शंभर योजनें विस्तीर्ण असून त्यांतील उदक अत्यंत स्वच्छ व मधूर असें आहे. तो वटवृक्ष प्रति कल्पवृक्षाप्रमाणें आहे. त्या वटवृक्षाच्या छायेंत ज्या ज्या वस्तूची इच्छा दर्शवावी, ती ती वस्तु प्राप्त होते. पश्चिम दिशेला मेरु पर्वताचा जो भाग आहे, त्यास सुपार्श्वगिरी असें म्हणतात. त्या सुपार्श्व पर्वतावर कदंबवृक्ष आहे. तो वृक्ष दहा हजार योजनें विस्तीर्ण असून त्याच्या खालीं शंभर योजनें विस्तृत असें इक्षुरसाचें कुंड आहे. त्या कुंडाजवळ पांच लहान लहान गिरि असून इक्षुरस कुंडांतील रस त्या पर्व-तामधून वहात असल्यामुळें त्यापासून पांच नद्या उत्पन्न झाल्या आहेत. त्या नद्या इलावर्त खंडांत वाहत गेल्या आहेत. मेरु पर्वताच्या दक्षिण भागाला मेरुमंदर असें म्हणतात. त्या मेरुमंदर पर्वतावर जांभळीचा प्रचंड वृक्ष आहे. तो वृक्ष सहस्र योजनें विस्तीर्ण आहे. त्या वृक्षाच्या छायेखालीं मधुकुंड आहे. त्या कुंडांतील उदक अत्यंत मधूर असून त्या कुंडासभोंवती चैत्ररथ नांवाचें उपवन आहे. त्या जांभळीच्या वृक्षाला हत्तीप्रमाणें मोठीं फळें येतात. तीं रसभरीत फळें भूमीवर आपटून शतखंड होतात, व त्यांचा रस त्या मधुकुंडांत पडतो. तेथून तो रस वहात जातो, त्या प्रवाहाला जंबुनद असें म्हणतात. त्या जंबुनदाच्या रसांत सुवर्ण करण्याची विलक्षण शक्ति आहे, यामुळें त्या नदीच्या काठीं पुष्कळ सुवर्ण सांपडतें.

याप्रमाणें हीं चाऱ्हीं टोकें ध्रुवानें पाहिल्यावर तो मंदरगिरीच्या पूर्वदिशेला गेला. तेथें त्यास एक नगर लागलें. तें नगर सत्यलोक असून तेथें ब्रह्मदेव रहात आहे. तेथें ब्रह्मदेवाची भेट घेऊन विष्णुलोकीं जाण्याची आपली इच्छा ध्रुवानें त्यांस कळविली. तेव्हां ब्रह्मदेव त्यास बरोबर घेऊन निघाले. ते दोघे दक्षिणदिशेच्या बाजूनें मेरूपर्वतावर चढून वर चालले असतांना त्यांनां कैलासभूवन दृष्टीस पडलें. तें कैलासनाथाचें अत्यंत मनोरम असें नगर पाहून ध्रुवाला शंकराचें दर्शन घेण्याची इच्छा झाली. तेव्हां शंकराच्या प्रासादांत ब्रह्मदेव ध्रुवाला घेऊन गेला. तेथें गेल्यावर ध्रुवानें महादेवाला साष्टांगप्रणाम करून आपली इच्छा कळविली. तेव्हां शंकरही ध्रुवाबरोबर विष्णुलोकीं जाण्यास निघाले. ते तिघेही तेथून उत्तर दिशेला असलेल्या कुमुद पर्वतावर चढूं लागले. वैकुंठ भूवन ज्याला विष्णुलोक असें म्हणतात तें वैकुंठ, कुसुम पर्वतावर आहे. त्या मार्गावरील सृष्टिसौंदर्य पाहून ध्रुवास मोठें कौतुक वाटलें. त्या विष्णुलोकांसभोंवतीं वरुण, मदन वगैरे तेहतीसकोटी देवांची वस्ती आहे. तेथें पारिजातक व कल्पवृक्ष यांचीं अरण्यें असून कामधेनूंचीं खिल्लारें आहेत. जवळच इंद्राची अमरावती आहे. अमरावती पाहणें झाल्यावर इंद्राचा सत्कार घेऊन ते तिघेही विष्णूच्या मंदिरांत आले. त्यावेळीं विष्णु आपल्या शयनावर निद्रिस्त होते. म्हणून ब्रह्मदेव हात जोडून त्यांच्या समोर उभा राहिला व त्यांची करुणा भाकूं लागला. तो म्हणाला, " हे कमलापते, हे अनंता, हे विश्वभरिता त्रैलोक्यनाथा, तूं आपला भक्त जो ध्रुव त्याला अभिवचन दिल्याप्रमाणें तो छत्तीसहजार वर्षें राज्य करून मुक्तीसाठीं तुजकडे आला आहे; तर त्याला मुक्ति देण्याची कृपा करावी. " ब्रह्मदेवाची प्रार्थना ऐकून लक्ष्मीरमण श्रीहरि योगनिद्रेंतून जागे झाले, व प्रसन्नदृष्टीनें म्हणाले, " ब्रह्मदेवा, ध्रुवाला इकडे आणलें हें फार चांगलें झालें. याला अभिवचन दिल्याप्रमाणें याची अढळपदावर स्थापना केली पाहिजे. हा माझा ध्रुवभक्त सर्व भक्तांत श्रेष्ठ असा आहे. तो आपल्या अढळ पदावरून कधींही ढळणार नाहीं." असें म्हणून विष्णु, ध्रुवास बरोबर घेऊन अढळ पदावर गेले व तेथें त्यांनीं ध्रुवाची स्थापना केली. तेव्हांपासून ध्रुव त्या मोक्ष पदावर अद्यापपर्यंत कायम आहे. ध्रुवाची आढळपदावर स्थापना झाली, त्यावेळीं सर्वांना मोठा आनंद झाला, व सूर्य, चंद्र, मंगळ, बुध आदिकरून अनेक देव त्याला भेटण्यासाठीं आले.

ऋषि म्हणाले, राजा जनमेजया, देवांप्रमाणें आकाशांतील तीन लक्ष नक्षत्रांनींही ध्रुवाचें दर्शन घेतलें. ध्रुवाचे स्थानापासून सप्तऋषींचें स्थान चौदा लक्ष उंच आहे. एकंदर ध्रुवमंडळ पंधरा कोटी योजनें विस्तीर्ण असून ध्रुवाचें स्वतःचें स्थान तीन योजनें विस्तृत आहे. हें ध्रुवाचें स्थान मेरूहूनही उंच आहे. आतां ग्रहांचें वर्ण व आकार याविषयीं तुला सांगतों. पृथ्वीचा

पुत्र जो मंगळ, त्याचा आकार त्रिकोणी आहे, सूर्य बारा कोणी आहे, चंद्राची आकृति चोवीस कोणी आहे, बुध बाणासारखा आहे, गुरू स्फटिकाप्रमाणें असून तो सहा कोणी आहे, शुक्र पंचकोणी आहे, शनी धनुष्याप्रमाणें आहे, व केतु ध्वजेप्रमाणें आहे. दशदिशांच्या मध्यभागीं सूर्याचें स्थान असून त्याच्याच जवळ चंद्राचें स्थान आहे. तसेंच मंगळ दक्षिण दिशेला, बुध उत्तर दिशेला, बृहस्पति पश्चिम दिशेला, शुक्र नैर्ऋत्य दिशेला, शनि अग्नेय दिशेला, राहु ईशान्य दिशेला व केतु वायव्य दिशेला आहे.

ही कथा ऐकिल्यावर जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; "ऋषि, शनीला सन्मुख कां पाहूं नये, व तसेंच तो उलट्या पावलानें कां चालतो, तें सांगावें." तेव्हां ऋषि म्हणाले; "राजा जनमेजया, पूर्वी दक्षप्रजापति यज्ञ करीत असतां, त्यानें आचार्यपद ब्रह्मदेवाला दिलें होतें; परंतु शनीची इच्छा तो मान आपणास मिळावा अशी असल्यामुळें तो ब्रह्मदेवाशीं भांडण करूं लागला. ब्रह्मदेवाला तें शनीचें म्हणणें हास्यास्पद वाटलें, व हा आपला अपमान करीत आहे असें वाटून ते शनीवर संतप्त झाले. तेव्हां शनीही रागावला, व तीक्ष्ण दृष्टीनें तो ब्रह्मदेवाकडे पाहूं लागला. त्या तामसी दृष्टीनें ब्रह्मदेव मूर्छित पडला. ब्रह्मदेवाची स्थिति पाहून यज्ञमंडपांतील सर्व ऋषि भयभीत झाले, व सर्वांनीं मिळून ब्रह्मदेवाला सावध केलें. ब्रह्मदेव सावध होतांच त्यांनीं शनीला 'तुझें मस्तक गळून पडो' असा शाप दिला. त्याबरोबर शनीचें मस्तक धडापासून तुटलें व तें यज्ञकुंडांत पडलें. तेव्हां दक्षानें तें चटकर बाहेर काढिलें. ती ब्रह्महत्या झालेली पाहून सर्व ऋषि वगैरे देव चिंतातुर झाले व ब्रह्मदेवानें हा मोठा प्रमाद केला असें म्हणूं लागले. दक्ष राजा तर फारच दुःखी झाला. आपण यज्ञाची एवढी तयारी केली आणि ऐनवेळीं हें विघ्न उत्पन्न होऊन ती सर्व फुकट गेली, म्हणून त्यास वाईट वाटलें. ब्रह्मदेवालाही त्या कृत्याबद्दल फार अनुताप झाला. मग तो दक्षाला म्हणाला; "हे दक्षप्रजापते, ज्या यज्ञांत मी आहे, तेथें अशी ब्रह्महत्या घडणें व त्यामुळें यज्ञकार्य बंद पडणें, हें अत्यंत अनुचित होय, म्हणून मी शनीला जिवंत करून तुझा यज्ञ पूर्ण करून देतों." असें म्हणून ब्रह्मदेवानें घाईघाईनें शनीचें मस्तक घेतलें व तें त्याच्या धडावर उलटें बसविलें. त्याबरोबर शनि उठून बसला, पण मस्तक उलटें लागलें गेलें तें तसेंच राहिलें. तेव्हांपासून शनीच्या कृतींत विपरीतपणा उत्पन्न झाला आहे. पुढें सर्व ऋषींनीं आचार्यपदावर शनीला बसवून तो दक्षाचा पुत्रकामेष्टी यज्ञ पूर्ण केला; पण त्या यज्ञांत शनीनें दक्षाला मुलाच्या ऐवजी मुलगी होईल, असा आशीर्वाद दिला. याचें कारण तरी शनींत उत्पन्न झालेला विपरीतपणाच होय. ऋषि म्हणाले; राजा, ही कथा भविष्योत्तरपुराणांत सविस्तर दिलेली असून ती तुला मीं संक्षेपानें कथन केली आहे."

---

# अध्याय १२ वा.

## १. हरिश्चंद्र राजाची कथा.

एके दिवशीं जयमेजय राजा ऋषीला म्हणाला; वैशंपायन महाराज, आजपर्यंत या भूतलावर सत्वधीर असे राजे कोण होऊन गेले आहेत तें सांगण्याची कृपा करावी. तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले; " राजा, आजपर्यंत या भूतलावर सत्वशील असे अनेक राजे होऊन गेले आहेत. श्रियाळ राजानें सत्व संरक्षणासाठीं स्वतःच्या परमप्रिय अशा मुलाचा वध केला, परंतु सत्व म्हणून जाऊं दिलें नाहीं. त्या प्रमाणेंच रुक्मांगद राजानें एकादशीच्या व्रतासाठीं अनेक कष्ट सोसून शेवटीं वैकुंठप्राप्ती करून घेतली आहे. तसेंच चक्रवर्ती जो शिबीराजा त्यानें तर सत्वसंरक्षणासाठीं स्वतःच्या शरीराचें मांस कापून अतीथीस संतुष्ट केलें आहे. पण या सर्वांमध्यें हरिश्चंद्र राजानें सत्व संरक्षणासाठीं जे कष्ट सोसले आहेत, त्याला तर कशाचीहि उपमा नाहीं. स्वप्नांत दिलेलें दानही त्या राजानें कबूल केलें, व दक्षिणेसाठीं आपणास स्त्रीपुत्रासह विकून घेऊन त्यानें ब्राह्मणास संतुष्ट केलें. असा तो महान् सत्वशील होऊन गेला.

ही हकीकत ऐकून जनमेजय राजाला हरिश्चंद्र राजाची कथा ऐकण्याची इच्छा झाली. तेव्हां वैशंपायन ऋषि त्यास हरिश्चंद्र राजाची कथा सांगू लागले. ते म्हणाले; " राजा जनमेजया, हरिश्चंद्र राजा हा सूर्यवंशी असून तो अयोध्येस मोठ्या नीतिधर्मानें राज्य करीत होता. एकदां इंद्राच्या सभेंत अनेक देव, ऋषि, वगैरे बसले असतां, तेथें नारदमुनी आले. इंद्रानें नारदाची पूजा वगैरे करून त्यांचा गौरव केला व ' कांहीं अश्रतपूर्व पाहण्यांत आलें असल्यास कथन करावें.' अशी विनंति केली. तेव्हां नारद म्हणाले " देवेंद्रा, आज अयोध्येंतील हरिश्चंद्र राजाकडे मी गेलों होतों. त्या राजासारखा सत्वशील, सत्यव्रत, पुण्यवान व धर्मरत राजा मला वाटतें देवलोकीं देखील मिळावयाचा नाहीं. त्या राजाचे प्रधानहि राजाप्रमाणेंच सदाचारसंपन्न, दयाभूत व धर्मरत असे आहेत. त्या राजाच्या स्त्रीचें नांव तारामति असून पुत्राचें नांव रोहिदास आहे. देवेंद्रा, त्याची स्त्री व पुत्रहि राजाप्रमाणेंच पूर्ण सत्वशील आहेत. फार काय, पण आज हरिश्चंद्राची बरोबरी करणारा त्रिभुवनांत कोणी नाहीं. नारदानें केलेली स्तुती ऐकून अनेक ऋषींनीं माना डोलविल्या व ही हकीकत खरी आहे, असें दर्शविलें. वसिष्ठ ऋषि म्हणाले; "खरोखर त्या हरिश्चंद्र राजाची योग्यता तशीच विलक्षण आहे. त्याचा सारखा दानशूर, सत्वशील व धर्मरत राजा असा सांप्रत या त्रिभुवनांत तोच एक आहे. " वसिष्ठानें हरिश्चंद्राची अशी स्तुति केली, ती ऐकतांच

विश्वामित्र ऋषीला फार राग आला. विश्वामित्र ऋषि वसिष्ठाचा पूर्वीपासूनच द्वेष करीत असे. विश्वामित्र म्हणाला;"वसिष्ठा, तूं सूर्यवंशाचा पुरोहित असल्यामुळें हरिश्चंद्राची निष्कारण स्तुति करीत आहेस. अरे, किती झालें तरी तो मृत्युलोकीं वास करणारा, त्याची बरोबरी स्वर्गलोकींच्या राजाबरोबर कशी होईल ? त्याला कसोटीवर धरलें तर तो किती सत्वशील आहे हें तेव्हांच दिसून येईल." विश्वामित्रऋषीचें भाषण ऐकून वसिष्ठऋषि म्हणाले; "अहो, विश्वामित्रऋषि, आपण काय वाटेल तो प्रयत्न केला, तरी हरिश्चंद्र राजा सत्वापासून कधींहि ढळणार नाहीं, अशी माझी पूर्ण खात्री आहे. तो राजा आपले प्राणहि खर्ची घालील, परंतु सत्व असें जाऊं देणार नाहीं." वसिष्ठाचें भाषण ऐकून विश्वामित्रऋषि फार क्रुद्ध झाले. ते म्हणाले; "वसिष्ठा, असें असेल तर मी त्या हरिश्चंद्र राजाला सत्वापासून आतां ढळवितों. त्याची एवढी कथा ती काय ? मी अशी प्रतिज्ञा करतों कीं, हरिश्चंद्र राजाला सत्वापासून ढळवीनच ढळवीन; आणि जर माझा प्रयत्न फुकट गेला तर मी आजपर्यंत जीं अनेक तपें केलीं आहेत, त्याचें पुण्य हरिश्चंद्राला अर्पण करीन." अशी प्रतिज्ञाकरून विश्वामित्र ऋषि तसेच सभेंतून निघाले व मृत्युलोकीं आले. विश्वामित्र ऋषीनें प्रतिज्ञा केली आहे, तेव्हां तो हरिश्चंद्राला छळल्याशिवाय राहणार नाहीं, असें वाटून वसिष्ठऋषीहि तेथून निघाले व अयोध्येस आले; आणि त्यांनीं हरिश्चंद्राची भेट घेऊन इंद्रसभेंत घडलेली हकीकत व विश्वामित्रानें केलेली प्रतिज्ञा, त्यास कळविली. व ते म्हणाले; "राजा, विश्वामित्रानें तुला सत्वापासून परावृत्त करण्याची प्रतीज्ञा करून ते सिद्धाश्रमांत येऊन राहिले आहेत, तर त्या आश्रमांत तूं जाऊं नकोस; आणि जर प्रसंग आला, तर सत्वापासून ढळूं नकोस." कुलगुरू वसिष्ठाची आज्ञा राजा हरिश्चंद्रानें शिरसावंद्य केली. नंतर वसिष्ठमुनी तेथून निघाले व प्रयाग येथें जाऊन तपश्चर्या करीत बसले.

विश्वामित्रऋषि इंद्रसभेंत प्रतिज्ञा करून जो निघाला तो अयोध्येजवळ असलेल्या सिद्धाश्रमांत येऊन राहिला. तेथें त्यानें एक अग्निकुंड सिद्ध केलें व स्वतः मेंढ्यावर बसला आणि स्वतःचे शरीरांतून रक्त काढून त्यांत तांदूळ भिजवून त्याच्या आहुती तो अग्निकुंडांत देऊं लागला. विश्वामित्राची ती उग्र तपश्चर्या पाहून अग्निदेवता प्रसन्न झाली. त्या अग्निकुंडांतून प्रत्यक्ष भवानीची मूर्ति निघाली व तिनें विश्वामित्राचें छिन्नविछिन झालेलें शरीर पूर्ववत् करून 'वर माग' म्हणून म्हणाली; तेव्हां विश्वामित्र म्हणाला; "हे माते भवानी ! अयोध्येंतील प्रजा पशुकडून पीडिली जावी असा कांहीं तरी चमत्कार कर." भवानी 'तथास्तु' म्हणून अदृश्य झाली, आणि अग्निकुंडांतून अनेक भयंकर वाघ निघून ते मोठ्यानें गर्जना करीत अयोध्येकडे चालले. वाघांचा सुळसुळाट झाला. तेव्हां अयोध्यानगरांतील सर्व लोक भीतीनें गांगरून गेले, व या

संकटाचें निवारण करण्याविषयीं त्यांनीं राजास विनंति केली. तेव्हां प्रजाजनांचें संकट निवारण करण्यास्तव हरिश्चंद्र राजा निवडक सैन्य बरोबर घेऊन वाघांचें हनन करूं लागला. त्यावेळीं ते मायावी वाघ सिद्धाश्रमांत येऊन गुप्त झाले. वाघाच्या मागें राजा बरोबरच्या लोकांसह नगरापासून बराच दूर आला, पण पुढें वाघ दिसत नाहींत असें पाहून त्यानें बरोबरच्या लोकांना नगरांत परत जाण्यास सांगितलें, व आपण, तारामति व प्रधान असे घोड्यावरून आसमंत भागाची शोभा पहात पहात फिरूं लागले. इतक्यांत विश्वामित्रानें एक मायावी हरिणाची जोडी तयार करून ती राजाच्या घोड्यापुढें सोडलीं. तीं सुंदर हरिणें पाहून राजाला त्यांची शिकार करण्याची इच्छा झाली व त्यानें आपला घोडा हरणांच्या मागें वेगानें सोडला. राणी व प्रधान यांनींहि राजाच्या मागून आपले घोडे फेंकले. अशाप्रकारें हरिणांचे मागें लागून फसलेला राजा, राणी व प्रधान यांसह सिद्धाश्रमांत आला. तेथें येण्याबरोबर तीं हरिणें गुप्त झालीं. हातची शिकार गेल्यामुळें राजास वाईट वाटलें व श्रमपरिहारार्थ तो त्या आश्रमांतच एक चांगली जागा पाहून तेथें राणी व प्रधान यांसह विश्रांति घेत बसला.

राजा विश्रांति घेत बसला आहे, ही संधि साधून विश्वामित्रानें दोन सुंदर अप्सरा निर्माण केल्या, व त्यांनां राजाकडे पाठवून दिलें. त्यांनीं आपल्या मधुर नृत्यगानानें राजास मोहित करण्याचा प्रयत्न चालविला. परंतु वेश्येचें गाणें ऐकणें अनुचित होय, असें जाणून राजानें त्या कलावंतिणींनां घालवून दिलें. तेव्हां त्या विश्वामित्राकडे परत आल्या व आपला कांहीं उपाय चालत नाहीं, असें त्यांनीं कळविलें. तेव्हां विश्वामित्र स्वतः राजाजवळ गेला व त्याला रागानें म्हणाला, " अरे दुराचारी राजा, मला न विचारतां तूं येथें आलास व माझीं परमप्रिय अशीं श्वापदें मारून मोठा प्रमाद केलास. पुत्राप्रमाणें ज्यांचें मी स्वतः संरक्षण करितों, अशा माझ्या श्वापदांस त्रास देण्याकरितां तूं या आश्रमांत कां आलास ? ' याप्रमाणें विश्वामित्र ऋषि रागावून राजाला वाटेल तें बोलूं लागला. तेव्हां राजा, तारामती व सत्यकीर्ति प्रधान असे तिघेही ऋषीचे पाय धरून क्षमेची प्रार्थना करूं लागले. हरिश्चंद्र राजा म्हणाला; " ऋषि, मला ही गोष्ट मुळींच माहित नव्हती, नाहीं तर मी या आश्रमांत खचित आलों नसतों. मजकडून मोठा प्रमाद झाला, त्याबद्दल क्षमा करावी." याप्रमाणें विनंति करून विश्वामित्राचा राग शांत केला, व राजा अयोध्येच्या मार्गाला लागला. वाटेनें येत असतांना मार्गांत एक निर्मल पाण्याचें सरोवर राजाच्या दृष्टीस पडलें. तें रम्य सरोवर पाहून राजाला त्या सरोवरांत स्नान करण्याची इच्छा झाली, परंतु सायंकाळची वेळ असल्यामुळें रात्रीं तेथें मुक्काम करून सकाळीं स्नान करण्याचें त्यांनीं ठरविलें.

त्या सरोवराचे काठीं राजा निद्रित असतां 'कोणीं एक ब्राह्मण आपणाजवळ दान मागण्याकरितां आला, व आपण त्याला आपलें नवखंड पृथ्वींत असलेलें संपूर्ण राज्य दान दिलें' असें विलक्षण स्वप्न पडलें. स्वप्न पाहून राजा दचकून जागा झाला व तारामती व प्रधान यांस जागें करून त्यानें तें चमत्कारिक स्वप्न त्यांस सांगितलें. तेव्हां प्रधान म्हणाला; "महाराज, अशीं स्वप्नें पुष्कळ पडतात, त्याबद्दल विशाद मानण्याचें कारण नाहीं. शिवाय घडलेल्या स्वप्नाचा कांहीं वाईट अर्थ असावा असें मला वाटत नाहीं. परंतु असें शास्त्र आहे कीं, रात्रीं स्वप्न पडल्यास सकाळीं सचैल स्नान करावें, व ब्राह्मणाला दक्षिणा देऊन संतुष्ट करावें," सत्यकीर्ति प्रधान राजाला अशी सल्ला देत आहे, तोंच विश्वामित्रऋषि एका वृद्ध ब्राह्मणाचें रूप घेऊन तेथें आला. त्या ब्राह्मणाला पाहून तिघांनांहि आनंद झाला व त्यांनीं त्या ब्राह्मणाला स्नानसंकल्प सांगण्याविषयीं विनंति केली. तेव्हां तो मायावी वृद्ध ब्राह्मण म्हाणाला; "मी मोठ्या आनंदानें संकल्प सांगतों, परंतु हे राजा हरिचंद्रा, माझी अशी इच्छा आहे कीं, मला तुजकडून औटभार सुवर्ण दक्षिणा मिळावी. तसें असेल तर मी संकल्प सांगतों, नाहींतर मी आपला आल्या मार्गानें परत जातों." ब्राह्मणाचें म्हणणें राजानें कबूल केलें, आणि मजबरोबर आपण अयोध्येस आलें असतां मी आपली दक्षिणा देईन, असें राजा म्हणाला. राजाचें म्हणणें ब्राह्मणानें कबूल केलें. मग राजानें सचैल स्नान केलें व ब्राह्मणरूपी विश्वामित्रानें संकल्प सांगितला. नंतर ते सर्व अयोध्येस आले.

अयोध्येस आल्यावर ब्राह्मणाची दक्षिणा देण्याकरितां राजा भांडारखान्यांतून औटभार सुवर्ण मागवूं लागला, तेव्हां तो ब्राह्मण राजाला अडवून म्हणाला, "राजा, तूं आपलें संपूर्ण राज्य, मला स्वप्नांत दान केलें आहेस, तेव्हां तुझा आतां येथें कशावरही अधिकार उरलेला नाहीं. मी म्हणतों हें असत्य आहे, असें म्हणून जर तुला आपलें सत्व गमवावयाचें असेल तर मी आपला आल्यामार्गानें परत जातों." वृद्ध ब्राह्मणाचें तें भाषण ऐकून हरिश्चंद्र राजाच्या लक्षांत सर्व प्रकार आला. तो त्या ब्राह्मणाला म्हणाला; "महाराज, आपण जरा शांत व्हा, म्हणजे मी आपल्या दक्षिणेची कांहींतरी तजवीज करितों. आपण त्यासंबंधानें मुळींच काळजी करूं नये. मी आपणास स्वप्नांत जरी माझें सर्व राज्य दान दिलें आहे, तरी तें मी कालत्रयींहि नाकबूल करणार नाहीं." याप्रमाणें राजा व ब्राह्मण यांचा वाद चालला आहे, तों तें वर्तमान सर्व नगरांत झालें, व तेथें अनेक नागरीक जमले हरिश्चंद्राचा पुत्र रोहिदासही तेथें आला. त्या ब्राह्मणाचे अनर्गल प्रलाप ऐकून सर्वांनां त्याचा राग आला, व ते सर्व त्याचा तिरस्कार करूं लागले. तेव्हां तो ब्राह्मण संतप्त होऊन म्हणाला; "हरिश्चंद्र राजा, तूं सत्वशील म्हणवितोस व लोकांकडून माझी अशी अवहेलना

करतोस काय ? दक्षिणा द्यावयाची नसल्यास नाहीं म्हणून सांग, म्हणजे मी आपला येथून निघून जातों.'' तेव्हां साध्वी तारामति म्हणाली; "महाराज नाहीं म्हणून सांगणें आम्हांकडून कधींहि होणार नाहीं. माझ्या अंगावर हे अलंकार आहेत, ते आपण आपल्या दक्षिणेच्या ऐवजीं घ्या.'' रोहिदास म्हणाला, "महाराज, तसेंच मीहि माझ्या अंगावरील अलंकार आपणास दक्षिणा म्हणून देण्यास तयार आहे. आपण आह्मां दोघांच्या अंगावरील अलंकार खुशाल घ्यावेत व माझ्या पित्याला आपल्या ऋणांतून मुक्त करावें." तेव्हां तो ब्राह्मण गर्जना करून म्हणाला; "मूर्खांनो तुमच्या अंगावरचीं वस्त्रें व अलंकार यावर माझीच सत्ता आहे. तेंच दान व तीच दक्षिणा असें करून तुम्हांस जर आपलें सत्व गमवावयाचें असेल, तर माझी हरकत नाहीं." ब्राह्मण पुढें म्हणाला; राजा हरिश्चंद्रा, तुला जर आपलें सत्व राखावयाचें असेल तर त्याला एकच उपाय आहे. तो हाच कीं, तूं निष्कांचन स्थितींत माझ्या राज्यांतून स्त्रीपुत्रासह बाहेर निघून जावें, व वाटेल तो प्रयत्न करून साडेतीन भार सुवर्ण मिळवून मला द्यावेंस. असें करावयाचें नसलें तर आपल्या सत्वावर पाणी सोड, म्हणजे मी कांहींएक न मागतां निघून जातों." ब्राह्मणाचें भाषण ऐकून हरिश्चंद्र राजा म्हणाला; "महाराज, आपण म्हणतां तें खरें आहे. संपूर्ण नऊ खंड पृथ्वीहि मी आपणास दान दिली आहे. एक दहावें खंड काशी मात्र राहिलेली आहे. तर तेथें जाऊन मी स्त्रीपुत्रासह स्वतःचा विक्रय करून घेतों, व आपली दक्षिणा देतों.'' राजाचें असें भाषण ऐकून नागरिकांचे डोळे पाण्यानें भरून आले. सत्यकीर्ति प्रधान त्या ब्राह्मणाला म्हणाला; "महाराज, आम्हीं नागरीक राजासाठीं साडेतीन भार सुवर्ण देतों, पण आपण राजाला ऋणांतून मुक्त करावें.'' प्रधानाचें भाषण ऐकून ब्राह्मण हंसला, तो म्हणाला; "अरे, राजानें जर सर्व राज्य मला अर्पण केलें आहे तर प्रजेच्या वित्तावर व जीवितावरही आतां माझीच सत्ता आहे, हें तुम्हाला कसें कळत नाहीं?'' तेव्हां हरिश्चंद्रराजा म्हणाला; महाराज, आपण आतां मजबरोबर वाराणसी क्षेत्राला यावें. तेथें आपली दक्षिणा मीं देतों. तेव्हां ब्राह्मण म्हणाला, "बरें आहे बाबा, तुझ्यासाठीं मी वराणसीला येतों. तुम्हीं आतां तिघेहि आपापलीं वस्त्रें व अलंकार येथें काढून ठेवून एकेका वस्त्रानिशी काशीच्या मार्गाला लागा. तुम्हीं तेथें पोंहोचेतोंपर्यंत मीहि मागाहून येतों.'' ब्राह्मणाच्या आज्ञेप्रमाणें राजा, राणी व राजपुत्र या तिघांनीं अलंकार व वस्त्रें काढून ठेविलीं व ते एकेक वस्त्र घेऊन काशीच्या मार्गाला लागले. राजा जाऊं लागला त्यावेळीं हजारों प्रजाजन राजाला आडवे आले व लहान पोराप्रमाणें रडूं लागले. तेव्हां राजानें त्या सर्वांची मोठ्या कष्टानें समजूत करून काशीचा मार्ग धरिला. ज्यांनां कधीं उन्ह तहान यांचा संसर्ग नाहीं, अशी सुकुमार तारामती व कुमार रोहिदास यांसह राजा हरिश्चंद्र

अरण्यांतून मार्ग क्रमीत असतां विश्वामित्रानें मार्गांत भयंकर उष्णता उत्पन्न केली, त्या योगें सर्व जमीन तापली. व अशा स्थितींत राजा हरिश्चंद्राचें सत्व हरण करण्याकरितां स्वतः विश्वामित्र वृद्ध ब्राह्मणाचें रूप घेऊन मार्गावर आला व राजाची याचना करून म्हणाला; "बाबा, मी एक गरीब ब्राह्मण आहे, बायको गरोदर आहे, व मूल लहान आहे, त्यांचे पाय या उन्हानें भाजून चाळणीसारखे झाले आहेत. तर कृपा करून तुमच्या पायांतले तेवढे जोडे द्या." ब्राह्मणाची केविलवाणी स्थिति पाहून त्या तिघांनींहि आपले जोडे त्यांच्या स्वाधीन केले व अनवाणी पायानें ते पुढील मार्ग क्रमण करूं लागले.

विश्वामित्र मोठा मानी व पराक्रमी होता. त्यानें हरिश्चंद्राचें सत्व हरण-करण्याकरितां हरप्रयत्न करण्याचें ठरवून सूर्यास प्रखर उन्ह पाडण्यास व वरुणास सर्व पाणी नाहींसें करण्यास सांगितलें. तपःसामर्थ्यामुळें सर्व देवतांवर विश्वा मित्राचा अधिकार चालत असे. आज्ञा होतांच सूर्यानें हरिश्चंद्राचा मार्ग विस्त-वाप्रमाणें तप्त केला व वरुणानें पाणी आटवून टाकिलें. विश्वामित्रानें अशी व्यवस्था केल्यावर हरिश्चंद्र, तारामती व रोहिदास यांनां फार कष्ट होऊं लागले. मार्ग तप्त लोखंडाप्रमाणें तापल्यामुळें त्यांचे पाय होरपळून त्यास फोड आले, व तृषेनें तिघांचे प्राण व्याकूळ झाले. इतक्यांत त्या अरण्यास विश्वामित्रानें वनवा लावला, तेव्हां त्या वनव्यांत हरिश्चंद्र, तारामती व रोहीदास अशी तिघांची चुका-मूक झाली. ऋषि म्हणाले, राजा जनमेजया, या पूर्वी नळराजालाहि विपत्ति प्राप्त झाली होती, पांडवांनांही वनवास प्राप्त झाला होता, अनेकावर अनेक संकटें आलीं होतीं, परंतु त्या सर्वांच्या विपत्तीला कांहीं तरी मर्यादा होती; पण हरिश्चंद्राच्या विपत्तीला पारावार नव्हता. असो; इतकी व्यवस्था केल्यावर ज्या मार्गानें हरिश्चंद्र चालला होता, त्या मार्गावर विश्वामित्रानें एक लहानसें मायावि उपवन सुंदर पानपोईसह उत्पन्न केलें. इकडे ते तिघे जंगलांत एकमे-कांचा शोध करीत भटकत असतां, राजा हरिश्चंद्र त्या पाणपोईजवळ येऊन पोंचला. तेव्हां पाणक्याचें सोंग घेतलेला विश्वामित्र राजाला म्हणाला; "हे महाभागा, ये, थोडें साखरपाणी घे." राजा म्हणाला; "महाराज मी आपल्या श्रमानें दुसऱ्यांनां संतुष्ट करावें हा माझा धर्म आहे. दुसऱ्याच्या श्रमानें मी सुखी व्हावें हें अनुचित आहे. त्यामुळें हें पाणपोईतले पाणी मला पितां येत नाहीं." असें म्हणून राजा पुढें निघून गेला. राजा गेल्यानंतर तृषेनें व्याकुळ झालेली तारामती तेथें आली. तिला पाहून तो वेषधारी पाणक्या म्हणाला; "बाई, कोण ही तुझी स्थिति झाली आहे ! आतां अंमळ येथें बैस. पाणी पी, थोडी विश्रांति घे, आणि मग पुढें जा." पाणक्याची विनंती तारामतीनें नाकारली, तेव्हां तो तोतिया पाणक्या म्हणाला, "बाई, तूं अगदीं वेडी आहेस. हरिश्चंद्रासारखे सत्वधीर राजे देखील या पाणपोईतलें पाणी निःशंकपणानें पितात

आणि तुला प्यायला काय हरकत आहे ? पुढें शंभर कोसपर्यंत पाणी नाहीं. म्हणून मी तुला एवढा आग्रह करतों. तो पहा हरिश्चंद्र राजा अझून आंतच विसावा घेत बसलेला आहे. ” असें म्हणून विश्वामित्रानें एक मायावी हरिश्चंद्र करून त्या पोईंत बसविला होता, तो दाखविला. परंतु त्या पतिव्रता तारामतीचा त्यावर विश्वास बसला नाहीं. ती म्हणाली, ‘हरिश्चंद्र राजाच्या सत्वशीलपणाची मला पूर्ण खातरी आहे, तो पाणपोईंतील पाणी प्राणांतीहि पिणार नाहीं.’ असें म्हणून तारामति तशीच पुढें निघून गेली. तारामतीचा सत्वशीलपणा पाहून विश्वामित्राला आपल्या प्रतिज्ञेची निराशा वाटूं लागली. इतक्यांत त्याच मार्गानें रोहिदास आला. तेव्हां विश्वामित्रानें हरिश्चंद्र व तारामती अशीं उभयतां मायावी निर्माण करून तीं रोहिदासास दाखविलीं व तो म्हणाला, ‘बाळा ये, हे तुझे आईबाप येथें पाणी पिऊन विश्रांति घेत आहेत, तूंहि थोडें पाणी पी व विश्रांति घे. पुढें शंभर कोसपर्यंत पाणी नाहीं.’ पाणक्याचें भाषण ऐकून रोहिदास म्हणाला; “महाराज अन्नछत्रांतलें अन्न व पाणपोईंतलें पाणी हीं आह्मां क्षत्रियांनां वर्ज आहेत. एवढ्यासाठीं मला हें पाणी पितां येत नाहीं. आणि माझे तात व माता हे धर्मपोईंतलें पाणी प्राणांतीहि पिणार नाहींत अशी माझी पूर्ण खातरी आहे. आपण जें दाखवितां तें केवळ असत्य होय.’ असें म्हणून रोहिदास तेथें न थांबतां तडक पुढें निघून गेला.

याप्रमाणें तिघांचेंहि विलक्षण धैर्य व सत्वशीलपणा पाहून विश्वामित्रऋषि अगदीं थक्क होऊन गेला, परंतु त्या तिघांनां सत्वभ्रष्ट करावयाचें अशी त्यानें प्रतिज्ञा केलेली असल्यामुळें तो पुन्हां त्यांच्यामागें लागला. ज्या जंगलांतून ते तिघे चालले होते, त्या जंगलास त्यानें आग लाविली, व काळ्या कुट्ट अशा धुरानें सर्व दिशा धुंद करून टाकल्या. तेव्हां त्या तिघांनां दिसेनासें होऊन तिघे तीन मार्गास लागले. तारामति आपला पुत्र व पति यांचा शोध करीत फिरत असतां तिला एक वृद्ध ब्राह्मण भेटला. तो ब्राह्मण म्हणजे वेषधारी विश्वामित्रच होय. तारामति त्याला केंविलवाण्या स्वरानें म्हणाली; “अहो महाराज, या अरण्यांत एक पुरुष व एक लहान मुलगा आपल्या दृष्टीस पडला कां?” तेव्हां तो तोतिया ब्राह्मण म्हणाला, “बाई, तूं आपल्या पतीचा व पुत्राचा शोध करीत आहेस असें दिसतें. बाई, या वणव्यांतून तूं जिवंत बाहेर पडलीस हें आपलें भाग्य समज. मी देखील या वणव्यांत सांपडलों होतों, पण मोठ्या कष्टानें वाचलों, आणि मार्गानें येत असतांना एक मुलगा व एक पुरुष भाजून मरून पडलेले दिसले. तुझा पति व पुत्र तेच जर ते असतील तर तुझें प्राक्तन फुटलें म्हणावयाचें दुसरें काय ! ” असें म्हणून विश्वामित्रानें आपणाबरोबर तारामतीला घेतलें व तिला राजाचें व राजपुत्राचें कृत्रिम प्रेत दाखविलें. तीं दोन्हीं प्रेतें पाहून तारामतीचें हृदय फाटून गेलें, व ती शोकाकुल होऊन त्या प्रेतावर धाडकन पडली.

---

# अध्याय १३ वा.

## हरिश्चंद्र राजाची कथा पुढें चालू.

ऋषि म्हणाले; राजा, त्या वेळीं तारामतीनें जो शोक केला, त्याचें वर्णन करणें कठिण. हा पति हा पति, हा वत्स हा वत्स, म्हणून ती टाहो फोडून आपलें मस्तक ताडण करून घेऊं लागली व तीं मायावी प्रेतें आपल्या हृदयाशीं कवटाळून ती म्हणाली, " अहो, तुम्ही दोघेही स्वर्गांत निघून गेला, आणि मला अशीच या नर्कयातना भोगावयाला मागें ठेविलीतना ! हे अनंता, हे नारायणा, मी आतां ह्या विपदप्रसंगीं कोणाचें साह्य मागूं ? हे श्रीपते, माझ्यावर तूं हा दुःखाचा डोंगरच कोसळविलास. मी अबला या अशा विपदप्रसंगीं आतां कोणाचें साह्य मागूं !" याप्रमाणें तारामति शोक करीत असतां तिला विश्वामित्र म्हणाला, " बाई, आतां तूं कितीही शोक केलास तरी त्याचा काय उपयोग आहे ! जें होऊं नये तें झालें खरें. आतां अस्तमान होऊन गेला आहे, तेव्हां येथें असें अरण्यांत बसणें बरें नव्हे. माझें घर जवळच आहे. तेथें तूं रात्रभर रहा आणि सकाळीं या प्रेतांची काय व्यवस्था करावयाची ती कर." तारामती म्हणाली, "महाराज, या प्रेतांना रानांत टाकून मी कशी बरें घरीं येऊं? मी रात्रभर या प्रेतांजवळच बसून राहतें. त्यांत माझें जें व्हावयाचें असेल तें होईल." तारामतीनें असें सांगितल्यावर विश्वामित्र तेथून निघून गेला. इकडे तारामति त्या भयंकर अंधाऱ्या रात्रीं प्रेताचें संरक्षण करीत बसलेली असतां विश्वामित्र तेथें व्याघ्राचें रूप घेऊन आला व तीं दोन्हीं कृत्रिम प्रेतें घेऊन गेला. पतीचें व पुत्राचें प्रेतही व्याघ्रानें नेलें, तेव्हां तारामतीचें दुःख फारच वाढलें. हा हरिश्चंद्र, हा रोहिदास, असें म्हणून ती मोठ्यानें टाहो फोडूं लागली, तेव्हां तो प्रदेश तिच्या शब्दाच्या प्रतिध्वनीनें दुमदुमून गेला. याप्रमाणें तारामती शोक करीत असतां प्रभात समयीं हरिश्चंद्र व रोहिदास शोध करीत तिच्याजवळ आले. त्या दोघांनां पाहतांच हीं पिशाचें आहेत कीं मनुष्यें आहेत, असा तिला प्रथम संशय उत्पन्न झाला; परंतु हरिश्चंद्रानें व रोहिदासानें इत्थंभूत हकीकत सांगून तिचा भ्रम दूर केला, तेव्हां तिला आनंद झाला, व ते सर्व आपलें दुःख विसरून वाराणसीच्या मार्गाला लागले. ते तिघेहि काशीचा मार्ग क्रमित असतांनां एका ओसाड नगरांत येऊन दाखल झाले. त्या नगरांत मोठमोठालीं घरें व मंदिरें होतीं, पण तीं सर्व मोडकळीस आलेलीं असून सर्व शहरांत विंचु, सर्प, घोण, सरड, मांडूक, नाग, वगैरे विषारी जीव जंतु निर्भयपणें वावरत होते. अशा शहरांत रात्रभर मुक्काम करणें अत्यंत धोक्याचें होतें, परंतु रात्र बरीच झालेली असल्यामुळें एक मंदिर पाहून त्यांत त्यांनीं ती रात्र ईश्वरावर भरंवसा ठेवून जागृत अवस्थेंत काढली.

सूर्योदय झाल्यावर तिघेहि पुढील मार्गाला लागले. कांहीं मार्ग आक्रमण केल्यावर त्यांस काशी क्षेत्राचें दर्शन झालें. गंगेचा प्रवाह व देवाच्या नांवाचा होत असलेला जयघोष पाहून त्यांनां आनंद झाला. त्यांनीं गंगेंत स्नान करून काशीविश्वेश्वराचें दर्शन घेतलें व ते शंकराची प्रार्थना करूं लागले. इतक्यांत ब्राह्मणरूपधारी विश्वामित्र तेथें आला आणि रागानें म्हणाला; 'ब्राह्मणाला यत्किंचित साडेतीन भार सुवर्णाच्या दक्षिणेसाठीं इतक्या लांब तंमड्यातोड करावयाला लावणारा राजा तूं मोठा सत्वशील दिसतोस? बाबा, मी म्हणून इतक्या लांब जिवंत आलों, दुसरा कोणी असता तर वाटेंतच मरून गेला असता. राजा हरिश्चंद्रा, आतां कबूल केल्याप्रमाणें माझी दक्षिणा दे, किंवा स्पष्ट नाहीं म्हणून तरी सांग, आतां अस्तमानाला थोडा अवकाश राहिला आहे. आज सूर्यास्ताचे आंत माझी दक्षिणा दिलीस तर बरें आहे, नाहीं तर तूं देत नाहींस असें समजून मी येथून निघून जाईन." विश्वामित्राचें तें भाषण ऐकून राजाला मर्मांतिक दुःख झालें. तो हात जोडून म्हणाला; "महाराज, आपण मजबरोबर बाजारांत चलावें व तेथें आम्हां तिघांचा विक्रय करून आपली दक्षिणा घ्यावी." हें राजाचें म्हणणें विश्वामित्रानें कबूल केलें, व त्यानें त्या तिघांनां बरोबर घेऊन राजरामार्गानें विक्रीसाठीं चालविलें.

एक ब्राह्मण तीन माणसें विकीत आहे, हें वर्तमान हां हां म्हणतां सर्वत्र पसरलें व ती मजा पहाण्यासाठीं विश्वामित्रासभोंवती हजारों लोक जमले. राजा, राणी व राजपुत्र यांच्या करुणमय सुस्वरूप चेहेऱ्याकडे पाहून लोकांनां आश्चर्य वाटलें. तारामतीचें तें अप्रतीम स्वरूप पाहून एका गणिकेस तिची लालसा उत्पन्न झाली व तिनें विश्वामित्राजवळ तिची मागणी केली. ती तारामतीला म्हणाली, "बाई, मी तुला विकत घेण्यासाठीं आलें आहे. तुझी जी कांहीं किंमत असेल ती मी या ब्राह्मणाला द्यायला तयार आहे. मी आपल्या घरीं तुझी व्यवस्था उत्तम प्रकारें टेवीन, तुझ्या सेवेंत पुष्कळ दास दासी देईन, तुला नृत्यगायन शिकवीन, रत्नाच्या अलंकारानीं तुला सजवीन, उत्तम उत्तम वस्त्रें तुला नेसावयाला देत जाईन, व रोज पंचपक्वान्नाचें भोजन मिळेल. सारांश माझ्या येथें तुला कशाचीही उणीव पडणार नाहीं.' गणिकेचें भाषण ऐकून तारामतीस आपणावर आकाश कोसळतें कीं काय, असें वाटलें. तिनें विश्वामित्राचे पाय घट्ट धरले व ती करुणास्वरानें म्हणाली; "महाराज, ही जी स्त्री मला विकत घेऊं इच्छित आहे, ती गणिका असून पशुवृत्तीसाठीं ती मला विकत मागत आहे. तेव्हां माझा सतित्वधर्म राखण्यासाठीं मजवर दया करा, आणि मला ह्या बाईच्या स्वाधीन करूं नका." तारामतीनें केविलवाणें केलेली ती विनंती पाहून जमलेल्या सर्व लोकांचे डोळे पाण्यानें भरून आले, पण विश्वामित्राचे मनावर त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं. तो म्हणाला; "तारामती, तुला गणिकेला विकूं

नये हें खरें, पण अन्य कोणी विकत न घेतलें तर मला माझ्या दक्षिणेसाठीं तिला विकणें भाग आहे." विश्वामित्राचें भाषण ऐकून तारामती दीनवदनानें जमलेल्या लोकांकडे पाहूं लागली. त्यांत कालकौशिक या नांवाचा एक सत्वस्थ वृद्ध ब्राह्मण होता, त्यास तारामतीची दया आली व त्यानें तारामतीला विकत घेण्याचें ठरविलें. तो विश्वामित्राला म्हणाला; "महाराज, आपणच हा मनुष्य विकण्याचा धंदा करीत आहां काय ? मला ह्या स्त्रीला विकत घ्याव-याचें आहे, तर हिची किंमत काय ती सांगा." विश्वामित्र म्हणाला; "हो, मीच हा राजा हरिश्चंद्र, ही राणी तारामती व हा राजपुत्र रोहिदास ह्या तिघांचा विक्रय मांडला आहे. राजाचें मोल दोन भार सुवर्ण, तारामतीची किंमत एक भार सुवर्ण आणि या राजपुत्राची किंमत अर्धभार सुवर्ण आहे. ज्याची इच्छा असेल त्यानें सुवर्ण द्यावें व ह्यांनां विकत घ्यावें."

विश्वामित्राच्या मागणीप्रमाणें कालकौशिकानें एकभार सुवर्ण काढलें व तें तो विश्वामित्राच्या हातांत मोजून देऊं लागला. तेव्हां तारामती त्या ब्राह्मणाला म्हणाली; महाराज, मला आपण कोणत्या कार्यासाठीं विकत घेत आहां, तें सांगाल तर मजवर आपला मोठा अनुग्रह होईल. तेव्हां कालकौशिक म्हणाला; "बाई, तूं त्यासंबंधानें मुळीं देखील काळजी करूं नको. मी तुला आपल्या मुलीप्रमाणें वागवीन. माझ्या आश्रमांत अनेक ऋषि आहेत, त्यांनां तूं स्वयं-पाक करून भोजन घालीत जा, म्हणजे झालें." या ब्राह्मणानें आपणास चांगल्या कार्यासाठीं विकत घेतलें हें पाहून तारामतीला थोडें समाधान वाटलें व तिनें आपल्या पतीचा मोठ्या कष्टानें निरोप घेऊन रोहिदासाला आपल्या हृदयाशीं घट्ट कुरवाळून धरिलें. व ती म्हणाली; "बाळा रोहिदासा, इतका वेळ मी तुझी आई होतें, तुझें संरक्षण जसें करितां आलें तसें मीं केलें, पण यापुढें तुझी व माझी कायमचीच ताटातूट झाली असें समजलें पाहिजे. दयाघन ईश्वरावर भरंवसा ठेव, नीतीनें वाग, म्हणजे तो तुझें अक्षय संरक्षण करील." हे शब्द उच्चारतांना तिचा कंठ दाटून आला. तारामतीचे शब्द ऐकून रोहिदास मातृवियोगदुःखानें विव्हल झाला, व तारामतीच्या गळ्याला मिठी मारून तो म्हणाला; "माते, या अभागी रोहिदासानें आतां 'आई' म्हणून कोणाला हाक मारावी ? आई मलाहि तुझ्याबरोबर घेऊन जा. तूं मला आपणा-पासून दूर लोटूं नकोस' अशा प्रकारें रोहिदास तारामतीची परोपरीनें विनवणी करूं लागला. तेव्हां विश्वामित्रानें त्याचा हात धरून त्यास जोरानें ओढलें व डोळे लाल करून तो म्हणाला; "अरे कारट्या, तुझें हें रडगाणें ऐकण्यासाठीं मी येथें आलों नाहीं. तूं असा रडूं लागलास तर रडकें पोर म्हणून तुला कोणीहि विकत घेणार नाहीं. तूं आतां आपल्या आईची आशा सोडून दे. ती तुला आतां कायमचीच अंतरली." विश्वामित्राचा निर्दयपणा पाहून सर्व लोक हळहळूं

लागले. कित्येकांना तर विश्वामित्राचा फार रागही आला. तारामतीची स्थिति तर त्या वेळीं मोठी बिकट झाली. ती त्या कौशिक ब्राह्मणाचें आर्जव करून म्हणाली; "महाराज, या माझ्या पुत्रालाहि जर आपण अर्धभार सुवर्ण देऊन विकत घ्याल, तर मजवर आपले अनंत उपकार होतील. आम्हां मायलेंकराची होणारी ताटातूट तुम्ही दूर कराल तर मी तुमची जन्मजन्मांतरीची ऋणी होईन. या तुमच्या धर्मकन्येची एवढी विनंति मान्य करा. देव तुमचें कल्याण करील." तारामतीची ती करुणवाणी ऐकून कालकौशिकाला तिची दया आली व त्यानें रोहिदासाचें मुल्य देऊन त्यासहि विकत घेतलें. नंतर रोहिदास व तारामति यांनीं मोठ्या कष्टानें राजाचा निरोप घेतला व ते कालकौशिकाबरोबर त्याच्या आश्रमांत गेले.

स्वतःच्या स्त्री पुत्राचा विक्रय केल्यावर राजा सचिंत मनानें आपल्या प्राक्तनाचा विचार करीत रस्त्यावर स्वस्थ उभा राहिला. तेव्हां विश्वामित्र त्याला हलवून म्हणाला; "राजा असें स्वस्थ उभें राहून कसें चालेल ? तूं मला हें दक्षिणेचें अमिष लावून माझी चांगली खोड मोडलीस. तुझ्या दक्षिणेची यातायात करितां करितां माझे प्राण बाबा कंठांत आले आहेत. आतां एकदां दोन भार सुवर्ण देऊन माझा पिंड सोड !" विश्वामित्राचे ते मर्मभेदक शब्द ऐकून राजाचें हृदय विदीर्ण झालें; तथापि तो शांतवृत्तीनें म्हणाला; "महाराज, आपणास मजकरितां फार श्रम पडले त्याबद्दल क्षमा करा. मी आपल्या दक्षिणेची तजवीज आतां लवकरच करितों." असें म्हणून हरिश्चंद्रराजा जमलेल्या नगरवासीजनांकडे दीनमुखानें पाहून म्हणाला, "अहो दयावंत लोकहो मजवर दया करा आणि मजबद्दल दोनभार सुवर्ण या ब्राह्मणाला देऊन मला विकत घ्या." राजाचे शब्द ऐकून सर्व लोक हळहळूं लागले, परंतु राजाला विकत घेण्यासाठीं कोणीच पुढें होईना. तेव्हां एक डोंब पुढें होऊन म्हणाला; "मला एका मनुष्याची जरूर आहे, पण मी जातीनें नीच डोंब आहें, तेव्हां या उच्च कुळांतल्या मनुष्यास घेऊन काय करूं ?" तेव्हां हरिश्चंद्रराजा म्हणाला; "बाबा, तूं डोंब ऐस अथवा कोणीतरी ऐस. या ब्राह्मणाला दोनभार सुवर्ण दे आणि मला विकत घे. मजवर तुझे फार उपकार होतील. तूं सांगशील तें मी तुझें काम करीत जाईन. मला खाण्यापुरतें अन्न देत जा, म्हणजे झालें." राजाचें भाषण ऐकून डोंबाला त्याची दया आली, व त्यानें लागलींच दोनभार सुवर्ण विश्वामित्राला देऊन हरिश्चंद्राला आपल्या घरीं नेलें.

ठरल्याप्रमाणें हरिश्चंद्राकडून विश्वामित्राला दक्षिणा मिळाल्यावर आपण केलेली प्रतिज्ञा फुकट गेली, असें वाटून विश्वामित्राला कसेंसेंच झालें. परंतु त्यानें पुन्हां त्या तिघांना छळण्याचा विचार केला व त्या तयारीला तो लागला.

डोंबानें हरिश्चंद्र राजाला घरीं आणल्यावर त्याला पाणी भरण्याचें काम सांगितलें. त्याप्रमाणें राजा पाणी भरीत असतांनां विश्वामित्रानें रांजणाच्या तळाला भोंक पाडलें. त्यामुळें राजानें जरी पुष्कळ घागरी पाणी त्या रांजणांत ओतलें तरी तो रांजण भरेना. तेव्हां त्या डोंबांची स्त्री फार संतापली व ती त्याला तोंड टाकून बोलूं लागली. मग त्या डोंबानें हरिश्चंद्रास स्मशानाच्या रखवालीचें काम सांगितलें, व जो कोणी प्रेत जाळण्या करितां आणील त्याचे जवळून सवा रुपाया कर घेण्याची आज्ञा केली. इकडे कालकौशिक ब्राह्मणाचे आश्रमांत रोहिदास असतां एके दिवशीं तो ऋषीपुत्रांबरोबर समिधा आणण्याकरितां गेला. ही संधि पाहून विश्वामित्रानें भयंकर विषारी सर्पाचें रूप घेतलें व रोहिदासाला दंश केला. सर्पदंश होतांच रोहिदास गतप्राण होऊन भूमीवर पडला. तो प्रकार पाहतांच सर्व मुलें घाबरलीं व त्यांनीं तें वर्तमान् तारामतीला कळविलें. तें अशुभ वर्तमान ऐकतांच तारामतीचीं गात्रें शिथील झालीं. परंतु धैर्य धरून ती म्हणाली; "मुलांनों, आंत ऋषि भोजनाला बसले आहेत. त्यांच्या कानावर हा प्रकार जाईल तर ते अर्ध्या जेवणांतूनच उठतील. एणढ्यासाठीं थोडा वेळ कांहीं बोलूं नका." असें मुलांनां बजावून ती महासाध्वि तारामती पाकशाळेंत गेली, तिनें आपलें दुःख तसेंच दाबून ठेवलें, व ऋषींनां भोजन घालून संतुष्ट केलें. ऋषींचें भोजन झाल्यावर ती आश्रमांतून निघाली व रोहिदासाचे प्रेताजवळ आली. प्रिय पुत्राचें तें चैतन्यरहित शून्य शरीर पाहून तिचें हृदय भडभडून आलें. आणि पुत्रविरहदुःखानें ती विव्हल होऊन पडली. इतक्यांत विश्वामित्र ब्राह्मणाचें रूप घेऊन तेथें आला, व तारामतीची समजूत करून तें प्रेत स्मशानांत नेऊन दहन करण्याविषयीं त्यानें तिला सल्ला दिला. विश्वामित्रानें तें प्रेत स्मशानांत नेलें व त्यावर काष्टें रचून त्यास अग्नि लावून दिला, व आपण चालता झाला. कर दिल्यावांचून कोणी प्रेत जाळीत आहे, असें पाहतांच स्मशानरक्षणार्थ डोंबानें नेमलेला हरिश्चंद्र धाऊन आला, व चिता विझवून त्यानें रोहिदासाचें अर्धें जळालेलें प्रेत बाहेर काढलें; आणि 'कर न देतां प्रेत जाळतेस' असें म्हणून त्यानें तारामतीला ठपका दिला. तारामतीला त्यावेळीं अति दुःख झालें, पण करते काय ? कर देण्याला जवळ कांहींच साधन नव्हतें. तेव्हां ती प्रेतास पुढें घेऊन शोक करीत बसली. इतक्यांत विश्वामित्र तेथें आला व त्यानें प्रेत फाडून त्यांतील आंतडीं तारामतीच्या गळ्यांत घातलीं, व इकडे काशीच्या राजाचें लहान मूल त्यानें नाहींसें करून टाकिलें. तेव्हां प्रभातकाळीं राजवाड्यांत मोठा आकांत उडाला, व राजपुत्राच्या शोधासाठीं हजारों राजदूत हिंडूं लागले. इतक्यांत कांहीं राजदूतांची दृष्टि तारामतीकडे गेली. तारामती स्मशानांत प्रेताजवळ बसलेली असून तिच्या अंगावर आंतडीं, मांस वगैरे पडलेले आहे, हें

पाहून त्या राजदूतांची समजूत, ती लावीन आहे, अशी झाली, व तिनेंच राजाचें मूल खाल्लें असावें असें त्यांनां वाटलें. मग ते राजवाड्यांत गेले व त्यांनीं तो सर्व प्रकार राजाला सांगितला. तेव्हां राजा अत्यंत रागावला व त्या लाविणीस ठार मारण्याचा त्यानें हुकूम केला. हें वर्तमान नारदास समजतांच नारद विष्णुलोकीं गेला व विष्णूला म्हणाला; "हे अनंता, तुझ्या भक्तांच्या कसोटीचा कळस झाला. आतां तारामतीचा वध होत आहे, तर देवा, क्षणाचाही विलंब न करितां तूं काशीक्षेत्रीं जा, आणि त्या तिघांचाहि उद्धार कर." हें वर्तमान ऐकतांच विष्णु विमानांत बसले व काशीक्षेत्रीं येऊन त्यांनीं हरिश्चंद्र, तारामति व रोहिदास अशा तिघांस आपल्या विमानांत घेतलें; व त्या सर्वांसह ते विष्णुलोकीं आले. याप्रमाणें हरिश्चंद्र राजा, तारामति व रोहिदास या तिघांनां सत्व राखल्यामुळें सदेह विष्णुलोकची प्राप्ति झाली. विष्णुलोकीं ते सर्व गेल्यावर तेथें वसिष्ठासमोर विश्वामित्रानें हरिश्चंद्राची क्षमा मागितली व प्रतीज्ञेप्रमाणें आपलें सर्व पुण्य त्यास अर्पण केलें."

---

## अध्याय १४ वा.

### १. कलंकी अवताराची कथा.

राजा म्हणाला; "ऋषि महाराज, आपण कृतयुगाविषयीं जशी माहिती सांगितली त्याप्रमाणेंच आतां द्वापार व कलीयुगाची माहिती सांगावी." तेव्हां ऋषि म्हणाले; "राजा जनमेजया, द्वापार युगाचा आरंभ माघ वद्य अमावास्येला बुधवारीं झाला आहे. या युगांत मनुष्यविस्तार अत्रि ऋषीपासून झाला. प्रथम ब्रह्मदेवापासून अत्रि झाला व पुढें अत्रीपासून सोमवंशाचा विस्तार झाला. प्रथम चंद्रापासून बुधाची उत्पत्ति झाली. बुधानें येळानांवाच्या स्त्रीबरोबर विवाह केला होता. ही येळा नांवाची स्त्री कांहीं दिवस पुरुषावस्थेंत असे व कांहीं दिवस स्त्री अवस्थेंत असे. तिला बुधापासून पुरूरवा नांवाचा पुत्र झाला. ययाती राजा हा पुरूरव्याच्या पांचव्या पिढींतील होय. ययाती राजाचा पुत्र पुरू, व पुरुचे वंशांत एकविसावा पुरुष शंतनु झाला. त्यापुढें त्यापासून विचित्रवीर्य झाला, व विचित्रवीर्यापासून पंडु राजा झाला. पंडुपासून पांडव झाले. पांडवांपैकीं अर्जुनापासून अभिमन्यूची उत्पत्ति झाली व अभिमन्यूपासून परीक्षित झाला. हे राजा जनमेजया, तूं त्या परिक्षिताचा पुत्र होय. आतां यापुढें तुझा वंशविस्तार कसा होणार तें व्यासानें वर्तवून ठेविलें आहे. व्यासांचा अधिकार फार मोठा असून त्यांचा शब्द केव्हांही खोटा व्हावयाचा नाहीं. वाल्मीकीनें ज्याप्रमाणें रामचंद्र जन्मास येण्याच्यापूर्वींच रामायण लिहून ठेविलें होतें, त्याप्रमाणें व्यासानींही कित्येक भविष्यकाळच्या कथा अगोदरच लिहून ठेविल्या आहेत.

राजा जनमेजया, व्यासांनीं असें लिहून ठेविलें आहे कीं, तुझे वंशांत शेवटचा पुरुष शतानीक होईल. या शतानिकापासून वेणु राजाची उत्पत्ति होईल व वेणुपासून वत्सराज होईल. त्या वत्सराजाला नरवाहन या नांवाचा पुत्र होईल. नरवाहानापासून क्षेमक उत्पन्न होईल, व त्या क्षेमकापासून अजरायण याची उत्पत्ति होईल. अजरायणाला कामरायण नांवाचा पुत्र होईल. त्या कामरायणाला कामधन, कामधनाला महाधन, महाधनापासून मायाविनाश, व मायाविनाशाला शाकिकवधन नांवाचा पुत्र होईल, व द्वापारयुग संपेल. याप्रमाणें हें भविष्य भविष्योत्तरपुराणांत कथन केलेलें आहे. असो, द्वापारयुगांत मनुष्यास पांचशें वर्षांचें आयुष्य असून, सोळाहजार हत्तींची शक्ति आहे. मनुष्याची उंची सात ताल असून लोक स्वधर्माचरणानें वागतात. द्वापार युगांत ग्रहणांची संख्या अठराहजार असून पर्जन्य वगैरे ऋतु यथाप्रमाण आहेत. भूमि एक वेळां पेरली असतां ती सात वेळां पीक देतें. या युगांत जेव्हां वसुंधरा दैत्यभारानें त्रस्त झाली, तेव्हां भगवंतानीं वसुदेव देवकीच्या उदरीं श्रीकृष्ण अवतार या युगांत घेतला. या श्रीकृष्ण अवताराची कथा तुला मागें सांगितली आहेच. त्यानंतर शारंगपाणींनीं बौद्ध अवतार घेतला आहे. त्यावेळीं भगवंतानीं सावित्री व वसुतर यांच्या पोटीं जन्म घेतला असून गयासुरादि राक्षसांचा नाश गुप्तपणें केलेला आहे. हा बौद्ध अवतार गुप्त आहे.

ही द्वापार युगाची कथा ऐकिल्यावर राजा म्हणाला, " ऋषि, पुढें जो कलंकी अवतार होणार आहे, त्याविषयींची माहिती आपण मला कृपा करून सांगावी. " तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले, " राजा, कलीयुगाला आरंभ भाद्रपद वद्य त्रयोदशीला शुक्रवारीं तिसऱ्याप्रहरीं होणार आहे. त्या युगांत धर्माचा लोप होऊन सर्व प्राणीमात्र कलहप्रिय होतील. मनुष्यांची उंची साडेतीन ताल राहील व प्राण्यांची व्यवस्था अन्नमय होईल. स्त्रीपुरुषांत मैथुनाची व्याप्ति अत्यंत होईल. लोक पापकर्मरत होतील. त्या युगांत आयुष्यमान जरी शंभर वर्षांचें राहील तरी पुष्कळ मनुष्यें अल्पायुषि होतील, व सुंधरा जशी पिकावयाला पाहिजे तशी पिकणार नाहीं, मेघ योग्यवेळीं वर्षाव करणार नाहींत, व त्यामुळें वारंवार अवर्षणें पडतील. कलियुगांत कोण कोण राजे होतील ते आतां तुला सांगतों. प्रथम ऋकावारी या नांवाचा राजा होईल. पुढें त्याचा पुत्र सुधर्मा हा राज्य करील. त्यानंतर त्याचा पुत्र विश्वपति हा राज्यावर बसेल. विश्वपतीचे मागून तें राज्य अतिभौमा यास प्राप्त होईल व अतिभौमानंतर त्याचा पुत्र अजपाळ यास राज्य मिळेल. पुढें तें राज्य अजपाळाचे वंशांतील महाभद्रपाळ यास प्राप्त होईल. त्याच्यामागून त्याचा पुत्र धनपाळ हा राज्य करील. धनपाळानंतर त्याचा पुत्र गंधर्वसेन राजा होईल. गंधर्वसेनानंतर विक्रम, विक्रमानंतर मोक्षराज, व त्याच्या मागून भोजराज राजा होईल. भोजराजा एकुणचाळीस वर्षें, सात महिने आणि तीन दिवस राज्याचा उपभोग

घेईल. त्यानंतर त्याचा पुत्र कृपाळ हा राज्यावर बसेल. तो एकुणीस वर्षे सात महिने व तीन दिवस राज्य करील. त्यापुढें रामदेव नांवाचा राजा राज्यावर बसेल. तो बारा वर्षे व नऊ महिने राज्य करील. तो राजा आपल्या आयुष्याचे तीन दिवस उरले आहेत तोंच गजाधिपतीला राज्यावर बसवील, व तो गजाधिपती दहा वर्षे चार महिने व दहा दिवस राज्य करून मृत्यु पावेल नंतर तें राज्य म्लेंच्छाकडे जाईल.

जनमेजयराजा म्हणाला; " महाराज, कलियुगांत जेव्हां फार पाप होईल तेव्हां भगवान कोणत्या प्रकारें अवतार धारण करतील तें कथन करावें. " तेव्हां ऋषि म्हणाले; " राजा, ही भविष्यकाळाची कथा तुला कथन करतों ती श्रवण कर. गंगा, यमुना व सरस्वती या तीन नद्यांचा जेथें संगम झालेला आहे, त्याला त्रिवेणीसंगम असें म्हणतात. त्या त्रिवेणीसंगमावर ज्याला चाऱ्ही वेद मुखोद्गत् झाले आहेत व जो चौदाहि विद्येंत पारंगत असून आचारशील आहे, अशा विद्याधर नांवाच्या ब्राह्मणाबरोबर एका मांगाच्या मुलीचा विवाह होईल. नंतर त्या मांगाच्या मुलीच्या पोटीं भगवान चित्रानक्षत्रावर श्रावण शुद्ध षष्ठीचे दिवशीं तिसरे प्रहरीं कांतीनगरामध्यें जन्म घेतील. अवतार घेतल्याबरोबर प्रभु घोड्यावर बसतील व अधर्मीयांचा संहार करून सनातन धर्माची स्थापना करितील. " हें ऐकून राजा म्हणाला; " वैशंपायनऋषि, भगवंताचे जे दहा अवतार आहेत, ते अवतार भगवंतांनीं कोण कोणत्या तिथीला घेतले व कलंकीअवतार हिनजातीच्या पोटीं कां घेणार ? तें कृपाकरून निवेदन करावें. " तेव्हां ऋषि म्हणाले; " राजा, बौद्धअवतार प्रभूनीं आश्विनशुद्ध दशमीचे दिवशीं घेतलेला आहे. त्या अवतारांत भगवंताचा पिता अवधूत व माता शंखावती होती. प्रथम अवतार मत्स्यावतार हा होय. तो कृतयुगांत रेवतीनक्षत्रीं चैत्र शुद्ध तृतियेचे दिवशीं घेतला. त्या अवतारांत भगवंताचा पिता गुप्ताभिध व माता पद्मावती होती. नंतर भगवंतानीं कूर्मावतार घेतला. त्या अवताराचे वेळीं भगवंतानीं पुरूरवा व चंद्रावती यांचे उदरीं स्वाती नक्षत्रावर वैशाखशुद्ध पौर्णिमेचे दिवशीं जन्म घेतला. त्यानंतर तिसरा अवतार वाराह हा चित्रा नक्षत्रीं रात्रीं तीन घटिकेला घेतलेला आहे. त्या अवतारांत भगवंताची माता लीलावती होती. पुढें कृतयुगांतील शेवटचा अवतार जो नारसिंह, तो वैशाख शुद्ध चतुर्थीचे दिवशीं संध्या समयाला घेतला. यापुढें त्रेतायुगांत भगवंतांनीं तीन अवतार घेतले. प्रथम अवतार वामन हा असून तो प्रभूनीं माता अदिती व पिता वसुदेव यांच्या पोटीं भाद्रपद शुद्ध द्वादशीचें दिवशीं श्रवण नक्षत्रीं घेतला. त्यानंतर सहावा अवतार परशुराम हा होय. तो रेणुका व जमदग्नी यांच्या उदरीं वैशाख शुद्ध तृतियेला रोहिणी नक्षत्र असतांनां घेतला. पुढें भगवंतानीं राम अवतार घेतला. त्या अवतारांत भगवंताची माता कौसल्या

व पिता दशरथ होता. तो अवतार पुष्य नक्षत्रीं चैत्रशुद्ध नवमीचे दिवशीं दोन प्रहरीं घेतला. त्यानंतर द्वापारांतील कृष्णावतार होय. हा अवतार रोहिणी नक्षत्रावर श्रावण वद्य अष्टमीला बुधवारीं रात्रीं आठ घटकेला झाला आहे. तो अवतार भगवंतानीं देवकी व वसुदेव यांच्या उदरीं घेतला. याप्रमाणें दशावतार झालेले आहेत. आतां कलंकी अवातार भगवंत हीन योनींत कां घेणार, याविषयींची कथा तुला सांगतों.

पूर्वी जाबाली या नांवाचा एक महातपोनिधी ऋषि होऊन गेला. त्यास पुत्र नसल्यामुळें फार वाईट वाटत असे. तेव्हां त्यानें कोणती तरी देवता प्रसन्न करून पुत्रप्राप्ति करून घेण्याचें ठरविलें; व त्याप्रमाणें तो ऋषि ब्रह्मदेवाची आराधना करीत बसला. त्याची ती एकनिष्ठ सेवा पाहून ब्रह्मदेव प्रसन्न झाले व म्हणाले; " हे जाबाली ऋषि, तुझ्या भक्तीमुळें मी तुला प्रसन्न झालों आहे. तुला तुझ्या इच्छेप्रमाणें दोन सर्वगुणसंपन्न पुत्र व एक कन्या अशीं तीन अपत्यें होतील. " याप्रमाणें वर मिळाल्यावर तो जाबाली ऋषि तेथून निघून सिद्धाश्रमांत आला. पुढें त्याच्या स्त्रीला दोन पुत्र व एक कन्या याप्रमाणें संतती झाली; तेव्हां त्या ऋषीला फार आनंद झाला व आपल्या जन्माचें सार्थक झालें, असें त्याला वाटलें. नंतर कांहीं दिवसांनीं त्या सिद्धाश्रमांत तो एकाएकीं अत्यावस्थ आजारी पडला. त्या वेळीं त्याच्या जवळ फक्त त्याची मुलगी होती, व दोन्हीं मुलगे समिधा आणण्यासाठीं अरण्यांत गेले होते. जाबालीला त्या प्रसंगीं आपण वाचूं असें मुळींच वाटेना. तेव्हां तो आपल्या मुलीला म्हणाला; " हे कामदुहिते, माझी आतां प्राणांतिक अवस्था असून मी लवकरच मरेन असें वाटतें. अंत समयीं कोणी पुत्र जवळ नाहीं याबद्दल फार वाईट वाटतें, पण त्यास कांहीं इलाज नाहीं. मुली, माझ्या हातांत ही जी मुद्रिका आहे, ती तूं माझा प्राण गेला नाहीं तों माझ्या हातांतून काढ व तुझ्याजवळ ठेव; व जेव्हां माझे पुत्र येतील तेव्हां त्यांच्याजवळ दे. ह्या मुद्रिकेच्या अंगीं मोठा विलक्षण गुण आहे. ही पाण्यांत ठेवून तें पाणी प्राशन केलें असतां तिन्हीं लोकचें व तिन्हीं काळचें ज्ञान प्राप्त होतें; व भूत, भविष्य समजतें. म्हणून ही मुद्रिका नीट जपून ठेव व माझे पुत्र आले म्हणजे त्यांनां ती दे. " जाबाली ऋषीनें असें सांगितल्यावर त्याच्या मुलीनें त्याच्या हातांतील अंगठी काढली व ती आपल्या जवळ ठेविली. नंतर कांहीं वेळानें त्या जाबाली ऋषीनें प्राण सोडला. बापानें प्राण सोडल्यावर कामदुहितेला अत्यंत वाईट वाटलें व ती प्रेताजवळ बसून शोक करूं लागली. इतक्यांत अरण्यांत समिधा आणण्यासाठीं गेलेले तिचे बंधूहि परत आले. बापाला मृतावस्थेत पाहून त्या दोघांनां फार वाईट वाटलें, व तेहि प्रेताजवळ बसून अश्रु गाळूं लागले. कामदुहितेनें आपल्या भावांनां जाबालीच्या मृत्यूची सर्व हकीकत सांगितली,

परंतु त्या मुद्रिकेविषयीं तिनें त्यांनां कांहीं कळविलें नाहीं. त्या दोघा भावांनीं बराच वेळ शोक केल्यावर प्रेतसंस्काराची तयारी करून तें प्रेत उचललें व ते स्मशानांत घेऊन गेले. मार्गांत विसावा देण्यासाठीं म्हणून त्यांनीं तें प्रेत खालीं ठेविलें, व प्रेताच्या अंगावर कांहीं आहे कीं काय, म्हणून पाहूं लागले. तेव्हां त्या दोघांनांही त्याच्या हातांतल्या मुद्रिकेची आठवण झाली, पण ती त्याच्या हातांत नाहीं, हें पाहून त्यांनां फार विस्मय वाटला; व त्या संबंधानें त्यांनीं कामदुहितेला प्रश्न केला. तेव्हां ती कामदुहिता कानावर हात ठेवून म्हणाली; "बंधूंनों, ती मुद्रिका मला मुळींच माहीत नाहीं. ती होती केव्हां व नाहींशी झाली केव्हां, हें तरी मला काय ठाऊक!" बहिणीचें उत्तर ऐकून त्या दोघांनां अधिकच आश्चर्य वाटलें; परंतु ते दोघेही अंतरज्ञानी असल्यामुळें त्यांनां आपल्या बहिणीचें कपट समजून आलें, व तिरस्कार दर्शवून ते म्हणाले; "कामदुहिते, तूं मोठी कपटी आहेस. तुझ्या हातून मोठें दुष्कृत्य घडलें आहे. यासाठीं तुला कलियुगांत मांगिणीच्या पोटीं जन्म घ्यावा लागेल." बंधूंचें भाषण ऐकून कामदुहितेच्या अंतःकरणांत भीति उत्पन्न झाली व तिला मुद्रिका चोरल्याबद्दल फार अनुताप वाटला. ती आपल्या बंधूंनां आपली चूक कबूल करून म्हणाली; "बंधूंनों, मजकडून मोठा अपराध झाला आहे, त्याची मला क्षमा करा. मी तुमची मुद्रिका तुम्हाला परत देतें, पण मला उःशाप द्या, आणि मांगासारख्या नीच योनींत मला जन्म न मिळेल असा कांहीं तरी उपाय सांगा." तेव्हां ते म्हणाले; "कामदुहिते, तुला दिलेला शाप केव्हांही टळावयाचा नाहीं. तुला मांगाच्या जातींत जन्म घेतलाच पाहिजे. तथापि आह्मी तुला असा उःशाप देतों कीं, तुझा विवाह ब्राह्मणाबरोबर होईल. व कलियुग संपतासंपतां तुझ्या उदरीं भगवान जन्म घेतील, व त्यायोगें तुझा उद्धार होईल." त्या दोघां भावांनीं कामदुहितेला याप्रमाणें उःशाप दिला, पण त्यामुळें तिचें समाधान झालें नाहीं. तिनें आपल्या भावांना उलट शाप दिला. ती म्हणाली; "तुम्ही मला शाप दिलात तर मीहि तुम्हाला शाप देते कीं, तुम्हीं दोघेहि पक्षी होऊन पृथ्वीवर एक हजार वर्षेंपर्यंत संचार कराल, नंतर तुम्हीं आपली जाती निर्माण करून आकाशांत तारे व्हाल. तुम्हां दोघांमध्यें अत्यंत वैर उत्पन्न होईल व ते तुमच्या जातींतही पुढें अक्षय राहील. जरी तुम्हाला पक्षाची योनीं प्राप्त होईल, तरी एकाला त्रिकालज्ञान व एकाला संजीवनी विद्या अवगत होईल." याप्रमाणें एकमेकाचे एकमेकांना शाप झाल्यावर त्यांनीं तें जाबाली ऋषीचें प्रेत दहन केलं, व ते आश्रमांत निघून गेले.

पुढें त्या शापवचनाप्रमाणें जाबाली ऋषीचा वडील मुलगा कावळा झाला व धाकटा पिंगळा झाला. त्या दोघांनां पक्षांची योनी प्राप्त झाल्याबरोबर त्यांचें प्रेम नाहींसें होऊन त्या दोघांत हाडवैर उत्पन्न झालें. त्या स्थितींत त्यांनीं एक

हजार वर्षे काढल्यावर जो काकपक्षी होता तो शुक्राचार्य झाला, व जो पिंगळा होता हो बृहस्पति झाला. एक दैत्यांचा गुरु झाला व दुसरा देवांचा गुरु झाला. त्यापैकीं बृहस्पतीला कालज्ञान होतें, व शुक्राचार्याला संजीवनी विद्या प्राप्त झाली होती. कावळा व पिंगळा या दोन पक्षांत अत्यंत वैर असतें व तें तसेंच त्या दोघांत होतें. राजा जनमेजया आतां ती कामदुहिता मांगाकडे कशी जन्माला येईल, तो वृतांत तुला सांगतों. कोणी एक धन्वा या नांवांचा ब्राह्मण पुत्रप्राप्तीसाठीं नारायणाची फार दिवस सेवा करीत होता. त्यानें फार दिवस सेवा केल्यावर माया विष्णुला म्हणाली; " हे देवा हा तुझा भक्त तुझी पुष्कळ दिवस सेवा करीत आहे, तर त्याला प्रसन्न हो व त्याची मनोवांच्छा तृप्त कर " तेव्हां विष्णु त्या धन्वा ब्राह्मणाला प्रसन्न झाले व म्हणाले; " हे धन्वा ब्राह्मणा, तुझ्या तपश्चर्येनें मी तुला प्रसन्न झालों असून तुझी मनोवांच्छा पूर्ण करण्यास तयार आहे. पुत्र म्हणून मीच स्वतः तुझ्या पोटीं जन्म घेईन. कलियुगांत मला अवतार घ्यावयाचा आहे, त्या वेळीं तुझी ही इच्छा पूर्ण होईल. " हें विष्णूचें आशिर्वचन ऐकून तो धन्वा ब्राह्मण म्हणाला; " हे श्रीकरधरा, हा प्रकार पुढें कसा घडून येईल, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे. करितां कृपा करून ती हकीकत मला निवेदन करावी. " तेव्हां भगवान लक्ष्मीरमण म्हणाले, " हे धन्वा ब्राह्मणा, पुढें कांतीं नगरामध्यें विद्याचारसंपन्न सत्शील असा विद्याधर नांवाचा एक ब्राह्मण उत्पन्न होईल. त्याचे पोटीं तुझा जन्म होईल. नंतर असें घडून येईल कीं, तो विद्याधर ब्राह्मण भागीरथीवर स्नानासाठीं जात असतांना वाटेंत त्याला एक मांगाची मुलगी खेळतांना दृष्टीस पडेल. ती मुलगी व विद्याधर यांचा माझ्या दर्शनाबद्दल वाद सुरू होऊन ती विद्याधराला ' तुला प्रत्यक्ष विष्णूचें दर्शन करवून देतें, असें सांगेल. तें ऐकून विद्याधराला फार आश्चर्य वाटेल व तो तिला बरोबर घेऊन भागिरथीवर जाईल. तेथें विद्याधर नदींत स्नान करीत असतां ती मांगाची मुलगी मंत्रशक्तीनें त्यास माझें दर्शन करवून देईल. ती माझी मूर्ति पाहून विद्याधराला त्या मांगाच्या मुलीविषयीं फार आदर उत्पन्न होईल, व तो तिच्या आईबापाजवळ तिची मागणी करील. ती विनंति मान्य करून तिचा बाप ती मुलगी विद्याधराचे स्वाधीन करील. नंतर ती तारुण्यांत आल्यावर तिच्याबरोबर तुझा विवाह होईल, आणि योग्य-समयीं मी त्या मुलीच्या उदरीं जन्म घेईन. हे धन्वा ब्राह्मणा, ती मांगाची मुलगी जाबाली ऋषीची मुलगी असून बापाची मुद्रिका चोरल्यामुळें तिला हीन योनी प्राप्त होणार आहे. त्यांतून तिचा उद्धार करावयाचा असल्यामुळें मला तिच्या उदरीं जन्म घेणें भाग झालें आहे.' याप्रमाणें सांगून विष्णु अदृश्य झाले. नंतर तो धन्वा ब्राह्मणहि आपल्या आश्रमांत निघून गेला.

हे राजा जनमेजया; कलियुगांत भगवान् कसा अवतार घेणार आहेत, हें तुला संक्षेपानें कथन केलें आहे. कलियुग हें अत्यंत तापदायक युग असून त्या युगांत अत्यंत अनर्थ घडून येतील. लोक अधर्माचरणानें वागतील. भूमींत पीक पिकणार नाहीं. स्त्रिया पातिव्रत्य सोडून परपुरुषीं रत होतील. राजे विश्वासघातकी होतील. आकाश मेघहीन होईल. ब्राह्मण वेद सोडून क्रियाभ्रष्ट होतील. लोक देवांना अपूज्य मानतील. याप्रमाणें अनाचार माजून अनर्थपरंपरा एकसारखी वाढत राहील; व शेवटीं जेव्हां पापघट पूर्ण होईल तेव्हां भगवान कलंकी अवतार धारण करून दुष्टांचा पूर्ण संहार करितील, नंतर पुन्हां सत्ययुगाला आरंभ होईल व पृथ्वीवर सर्वत्र सुखसमृद्धि होईल."

---

## अध्याय १५ वा.

### १. पतिव्रता सुमतीचें चरित्र.

एके दिवशीं जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; "महाराज, चंद्राला कोणी सिंधुपुत्र असें म्हणतात, व कोणीं अत्रि ऋषीचा पुत्र असें म्हणतात. तर यांत खरें कोणतें, तें कथन करावें.' तेव्हां ऋषि म्हणाले; "राजा, युगपरत्वें दोन्हीहि कथा सत्य आहेत. कल्पभेदाप्रमाणें जन्मभेदहि उत्पन्न होतो. बहुरूपी हा जसा एकटाच असून निरनिराळीं सोंगें घेतो, त्याप्रमाणें कालपरत्वें चंद्राचें जन्मस्थान बदललेलें आहे. आतां अत्रिऋषीपासून चंद्राची उत्पत्ति कशी झाली, याविषयींची कथा तुला सांगतों.

पूर्वी काशीराजा नांवाचा एक राजा होऊन गेला. त्या राजाला शांडिल्या व सुमति अशा दोन मुली होत्या. वडील मुलगी शांडिल्या ही उपवर झाल्यावर ती एका विद्याचारसंपन्न ब्राह्मणाला दिली. पुढें सुमति उपवर झाल्यावर तिच्या विवाहाची राजानें पुष्कळ खटपट केली, परंतु सुमतीला कोणी पति पसंत न पडल्यामुळें ती तशीच अविवाहित राहिली. अविवाहित स्थितींत आपल्या आयुष्याचा कांहींतरी चांगला उपयोग व्हावा, असें त्या सुमतीला वाटलें व त्यासाठीं ती तपस्विनी झाली. तपस्विनी झाल्यावर तिनें शहराजवळील एका उपवनांत एक पर्णकुटिका तयार केली, व त्यांत राहून ती भगवत्चिंतन करूं लागली. दुसरी मुलगी जी शांडिल्या ती विवाह झाल्यापासून आपल्या पतीला दैवत मानून त्याच्या सेवासुश्रूषेंत आपला सर्व काळ कंठित असे. पतीची आज्ञा ती देवाची आज्ञा, असें मानून ती पतीची आज्ञा केव्हांहि उल्लंघन करीत नसे, व अहर्निश आपल्या पतीचें मंगल चिंतीत असे. ती रोज आपल्या पतीची पूजा करी, त्याच्या चरणाचें तीर्थ घेई, त्यास भोजन घालून तांबूल देई

आणि नंतर आपण भोजन करी. तसेंच रात्रीं पतीचें भोजन झाल्यावर त्याला शयनावर निजवी, त्याची पादसेवा करी, व त्याला पंख्यानें वारा घालून झोंप लागली म्हणजे मग आपण स्वतः उपहार करून शयन करी. प्रातःकाळीं पतीच्या अगोदर उठून शुचिर्भूत होई, व पतीच्या चरणावर मस्तक ठेवून नंतर अन्य गृहकृत्यें करी. पतीला शारीरिक व मानसिक कोणत्याहि प्रकारचे क्लेश होऊं नयेत म्हणून ती फार जपत असे. पतीला सुख व्हावें म्हणून ती फार कष्ट घेई व आपल्या प्रयत्नाची पराकाष्ठा करून संसारांतील अडचणी पतीच्या लक्षांत येऊं देत नसे. या पतिसेवेलाच शांडिल्या आपला मुख्य धर्म समजत असे. पतीची सुश्रुषा हेंच तिचें व्रत व पति हेंच तिचें दैवत होतें. त्याशिवाय तिला अन्य धर्म, व्रत, नियम, उपोषण वगैरे कांहीं माहीत नव्हतें.

सुमतीचें आचरण याविरुद्ध होतें. विवाह झालेला नसल्यामुळें स्त्रीचें खरें कर्तव्य व खरा धर्म कोणता, याची तिला मुळींच ओळख नव्हती. अनेक योगी, मुनी, ऋषि, वगैरे ज्या मार्गाचें अवलंबन करितात, त्याच मार्गाचें आपण अवलंबन केल्यामुळें इतर विवाहित स्त्रियांपेक्षां आपली योग्यता अधिक आहे, अशी तिची समजूत झाली होती. ती निरनिराळीं व्रतें करीत असे. वारंवार उपोषणें करी. पुष्कळ देवांच्या मंदिरांत दर्शनासाठीं जाई, तीर्थांचीं स्नानें करी व अनेक साधुसंताचा उपदेश श्रवण करी. याप्रमाणें त्या दोघी बहिणींचा वेगवेगळा क्रम चाललेला असतां, एके दिवशीं त्या शहराला अकस्मात प्रचंड आग लागली. शहरांतील मोठमोठे वाडे, मंदिरें, घरें, त्या अग्निप्रळयांत जळून खाक होऊं लागलीं. तो अनर्थ पाहून शांडिल्येला वाटलें कीं, आतां आपल्या पतीचेंहि घर जळून जाणार. तेव्हां तिनें किंचित् पाणी घेऊन तें घरासभोंवतीं शिंपडलें व अग्नीला हात जोडून म्हणाली; "हे अग्निनारायणा, मी जर खरी पतिव्रता असेन, पतीच्या ठिकाणीं जर माझी एकनिष्ठ भक्ति असेल, तर हें माझें घर तूं जाळूं नकोस." शांडिल्येनें अग्नीला अशी विनंती केल्यामुळें अग्नीनें तिच्या घराला मुळींच स्पर्श केला नाहीं. समुद्र ज्याप्रमाणें मर्यादा सोडीत नाहीं, त्याप्रमाणें अग्नीनें शांडिल्येनें पाणी सिंचन करून केलेली मर्यादा उलंघन केली नाहीं. शांडिल्येच्या घराशेजारी असलेलीं घरें जळून खाक झालीं, पण तिच्या घराला किंचित् आंचहि लागली नाहीं. ऋषि म्हणाले; हे राजा जनमेजया, यावरून पतिव्रता स्त्रियांच्या शब्दाला देवहि किती मान देतात, हें तुझ्या लक्षांत आलें असेलच. सती, सत्यवादी व दानशील यांच्या शब्दाचें प्रतिपालन देवही करितात, असें शास्त्रांत सांगितलें आहे. असो.

त्या वेळीं तें प्रचंड शहर अग्नीनें पार जळून गेलें. त्यांत सुमतीची पर्णकुटिकाहि जळून गेली. फक्त शांडिल्येचें घर मात्र राहिलें होतें. सुमतीची पर्णकुटिका जळाल्यावर तिला साहजिक असें वाटलें कीं, या आगीनें सर्व शहर जळालें,

तेव्हां त्यांत शांडिल्येचेंहि घर जळालें असावें. म्हणून ती शांडिल्येची स्थिति पाहण्यासाठीं शहरांत गेली. शहरांत जिकडेतिकडे राखेचे ढीग पडले होते; मोठालीं मंदिरें जळून खाक झालीं होतीं; पण शांडिलेचें घर तसेंच कायम होतें. तो विलक्षण प्रकार पाहून सुमतीला फार आश्चर्य वाटलें. ती शांडिल्येजवळ गेली व तिला म्हणाली; " ताई शांडिल्ये, सभोंवतालचीं मोठमोठीं मंदिरें वृक्ष वगैरे जळून गेले असून तुझें घर तेवढें कायम आहे, याचें कारण काय तें कृपा करून निवेदन कर. " तेव्हां शांडिल्या म्हणाली; " बाई सुमती, हा सगळा माझ्या पतीच्या चरणाचा पुण्यप्रताप आहे. जेव्हां सर्वत्र आग लागून माझ्याहि घराजवळ अग्निनारायणाची स्वारी आली, तेव्हां मी त्याला अशी आण घातली कीं "हे अग्निनारायणा, मी जर खरी पतिव्रता असेन तर माझ्या घराला स्पर्श करूं नकोस. तेव्हां अग्नि माझ्या घराला स्पर्श न करतां पुढें निघून गेला." शांडिल्येचें भाषण ऐकून पतिसेवेचा महिमा तिला कळून आला. ती शांडिल्येला म्हणाली, " ताई, हा पतिसेवेचा प्रभाव मला मुळींच माहीत नव्हता. मी अभागी म्हणून पतिसेवेला अंतरलीच म्हणावयाची. परमेश्वर प्राप्तीचें एवढें सोपें साधन असतां मी व्यर्थ तपसाधनाच्या मागें लागलें. बरें, आतां लग्न करून पतिसेवा करीन म्हणावें, तर वयही राहिलें नाहीं." असें म्हणून उद्विग्न दृष्टीनें सुमति शांडिल्येकडे पाहूं लागली. तेव्हां शांडिल्येला तिची दया आली व ती तिला म्हणाली; " सुमति, तूं या संबंधानें मुळींच काळजी करूं नकोस. नगराबाहेर मंदीर आहे, त्या मंदिरांत उद्यां सूर्योदयाच्या वेळेला जा. त्या वेळीं तेथें जो पुरुष असेल त्याच्याबरोबर तूं विवाह कर, व त्याची मनोभावानें सेवा कर, म्हणजे तुझें सर्व दुःख नाहींसें होईल व तुला समाधान प्राप्त होईल.

शांडिल्येच्या सूचनेप्रमाणें दुसरे दिवशीं सूर्योदयाच्या आंत सुमति पैठण नगराच्या बाहेर पडली, व भोगावती नदींत स्नान करून मंदिरांत गेली. त्या मंदिरांत एका कोंपऱ्यांत कौशिक नांवाचा एक कुष्ट रोगानें पिडलेला ब्राह्मण माशांच्या त्रासानें बसलेला होता. सुमतीच्या दृष्टीस तो पडल्या-बरोबर तिनें त्याच्या गळ्यांत मनोभावें माळ घातली, व ती त्याला म्हणाली; " हे ब्राह्मणा, मीं तुला वरलें असून आजपासून तूं माझा पति झाला आहेस. तर येथून ऊठ व माझ्या आश्रमांत चल. " तेव्हां तो कुष्टरोगी ब्राह्मण म्हणाला; " हे स्त्रिये, तूं माझ्या गळ्यांत माळ घालून अगदीं फसलीस. मी एक दरिद्री असून कुष्टरोगानें पिडलों आहे. माझे हातपाय, ओंठ, कान वगैरे अव-यव सडले असून सर्व शरीरास क्षतें पडलीं आहेत, व त्यांतून लस वाहत आहे. मी तर मोठ्या कष्टानें एक श्वास सोडतो व एक श्वास घेतो, मग येथून उठून मला चालण्याची ती शक्ति कोठली ! व मजसारख्या दुर्दैव्याला वरून तरी तुला फायदा तो काय ?" कौशिक ब्राह्मणाचें असें भाषण ऐकून

सुमतीची स्थिति मोठी चमत्कारिक झाली, तिला त्या वेळीं काय करावें तें सुचेना; परंतु शांडिल्येनें सांगितलेल्या गोष्टीवर तिचा पूर्ण विश्वास बसल्यामुळें तिनें त्यालाच आपला पति निश्चित केला. ती त्याला म्हणाली, “ हे ब्राह्मणा, मी तुला वरिलें आहे त्यांत आतां बदल व्हावयाचा नाहीं. मी तुझी धर्मपत्नी झालें आहे तेव्हां मजकडून तुला सेवा घेतलीच पाहिजे. तुला चालण्याची शक्ति नसल्यास माझ्या पाठीवर बैस, व माझ्या आश्रमांत चल.” असें म्हणून तिनें त्या कुष्टरोगी कौशिकला आपल्या पाठीशीं घेतलें व आपल्या आश्रमांत आणलें. तेव्हां सुमतीचें सर्व शरीर लशीनें भरून गेलें. परंतु तिनें आपल्या पतीबद्दल मुळींच तिरस्कार दर्शविला नाहीं. आश्रमांत आणल्यावर तिनें त्यास उष्णोदकानें स्नान घालून त्याची लस वगैरे धुवून टाकिली. नंतर तिनें भिक्षा मागून आणून पतीस चांगलें अन्न तयार करून भोजन घातलें, व आपण कदान्न खाल्लें. याप्रमाणें ती दररोज आपल्या पतीची सेवासुश्रुषा करी, व त्यास मोकळी हवा लागावी म्हणून एका पेटाऱ्यांत बसवी व तो पेटारा डोक्यावर घेऊन ती त्यास फिरावयास नेत असे. याप्रमाणें सुमति आपल्या पतीची सेवासुश्रुषा करूं लागल्यावर कांहीं दिवसांनीं त्याची प्रकृति सुधारूं लागली. एकदां संध्याकाळच्या वेळीं सुमति अपल्या पतीला पेटाऱ्यांत बसवून त्याला डोक्यावरून फिरवीत असतां तिच्या पतीची दृष्टि एका वेश्येकडे गेली. त्या वेश्येचें अनुपम सौंदर्य पाहून त्या ब्राह्मणाला कामेच्छा उत्पन्न झाली. तेव्हां तो आपल्या स्त्रीला म्हणाला; “ हे सुमति, ह्या सुंदर वेश्येकडे माझें मन गेलें आहे, तेव्हां ती मला प्राप्त होईल अशी कांहीं तजवीज कर.” पतीचें भाषण ऐकून सुमति म्हणाली; “स्वामी, यांत कांहीं कठीण नाहीं. वेश्या द्रव्यानें वश होणाऱ्या असतात. द्रव्य असल्यास ती सहज प्राप्त होईल. परंतु मजजवळ आतां द्रव्य नाहीं. कांहीं दिवसांनीं भिक्षा मागून द्रव्य मिळवीन व तुम्हाला तिच्याकडे घेऊन जाईन.” पुढें तिनें रोज भिक्षा मागून द्रव्याचा संचय केला व बरीच रात्र झाल्यावर तिनें आपल्या पतीला पेटाऱ्यांत बसवून डोक्यावर घेतलें व ती त्या वेशेच्या घराकडे जावयास निघाली. अंधारांतून ती आपल्या पतीला मस्तकावरून घेऊन चालाली असतां मार्गांत एका उंच सुळावर मांडव्य नांवाचा ऋषि लोंबकळत होता. त्या सुळाला कौशिकाच्या कोंपराचा धक्का लागला. त्यामुळें त्या मांडव्य ऋषीला अत्यंत त्रास झाला व त्या दुःखानें संतप्त होऊन त्यानें असा शाप दिला कीं, ‘ज्याचा धक्का या सुळाला लागला तो दुष्ट मनुष्य सूर्योदय होण्याबरोबर मृत्यु पावेल’, ती शापवाणी ऐकतांच सुमति अत्यंत चिंताग्रस्त झाली, व पुढें काय करावें याचा विचार करूं लागली. तिनें आपल्या पतीला मस्तकावरून खालीं ठेवलें व ती सूर्याला म्हणाली “ हे भगवन् भास्करा, मी जर खरी पतिव्रता असेन तर तूं माझी आज्ञा होई-पर्यंत उदयाला येऊं नकोस” असें म्हणून सुमति आपल्या कार्याला गेली.

सुमतीचें पातिव्रत्य जाज्वल्य होतें. त्यामुळें सूर्यास तिची आज्ञा पाळणें भाग पडलें व सूर्यानें उदयास येण्याचें बंद केलें. तेव्हां लोकांचे व्यवहार बंद पडले व चोंहीकडे घोंटाळा उडाला. अर्थात् सर्वांना मोठी काळजी उत्पन्न झाली. सर्व देव बृहस्पतिकडे गेले व म्हणाले; " देवगुरु, आज दहा दिवस सूर्य उदयाला कां आला नाहीं, याचें कारण कृपा करून आम्हांस निवेदन करावें. सूर्याच्या अभावामुळें पृथ्वीवर फार अनर्थ ओढवला आहे. " तेव्हां बृहस्पति म्हणाले; " सुरवरांनो हें सर्व कार्य त्या सती सुमतीचें आहे. सूर्योदयाबरोबर तिच्या पतीला मृत्यु प्राप्त होईल असा शाप मांडव्य ऋषीनीं दिल्यामुळें तिनें सूर्याला उदयास येऊं नको, अशी आण घातली आहे. त्यामुळें सूर्य उदयास येत नाहीं. तर सूर्य उदयास यावा अशी तुमची इच्छा असेल तर सर्वांनीं सुमतीची कांहीं तरी समजूत केली पाहिजे. त्या सुमतीची पतिनिष्ठा दांडगी असून ती महासाध्वी आहे, तेव्हां तिची समजूत करण्यासाठीं कोणी तरी तशीच साध्वी स्त्री पाठविली पाहिजे. अत्रि ऋषीची स्त्री अनुसूया महा साध्वी आहे. तेव्हां आपण सर्वजण तिच्याकडे जाऊं व तिचें साह्य मागूं. " बृहस्पतीच्या सूचनेप्रमाणें सर्व देव अत्रिऋषीच्या आश्रमांत आले, व त्यांनीं अनुसूयेला सर्व हकीकत सांगून सुमतीची समजूत करण्याविषयीं विनंति केली. देवांच्या विनंतीप्रमाणें अनुसूया सर्वांना बरोबर घेऊन सुमतीच्या आश्रमांत आली. सती अनुसूयेची प्रशांत मूर्ति पाहून त्या पतिव्रता सुमतीनें तिला वंदन केलें, व बसण्यासाठीं आसन आणून दिलें. तेव्हां अनुसूया तिला आशिर्वाद देऊन म्हणाली; " हे सुमति, तूं महा साध्वि आहेस. तुझ्या धाकानें सूर्य उगवावयाचा थांबला आहे, व त्यामुळें महा अनर्थ ओढवला आहे. तर माझें ऐक आणि सूर्याला उगवण्याची आज्ञा कर. " अनुसूयेचें भाषण ऐकून सुमति म्हणाली, " माते अनुसूये, तूं साक्षात जगज्जननी आहेस. तुझी आज्ञा वंद्य करणें हें माझें कर्तव्य आहे, पण सूर्योदय होताच मी आपल्या सौभाग्याला मुकेन, त्याची वाट काय ? " तेव्हां अनुसूया म्हणाली; " सुमति, तूं त्यासंबंधानें कांहीं काळजी करूं नकोस. सूर्योदय होतांच मांडव्य ऋषीच्या शापवचनाप्रमाणें तुझा पति मृत होईल हें खरें; पण मी त्यास लागलाच जिवंत करीन, त्याचा कुष्टरोग दूर करीन, व लोखंडाला परीस लागला असतां त्याचें ज्याप्रमाणें उत्कृष्ट कांचन होतें, त्याप्रमाणें तुझ्या पतीला उत्तमावस्था प्राप्त होईल. " अनुसूयेनें या प्रमाणें अश्वासन दिल्यावर सुमतीनें सूर्याला उदयास येण्याची विनंति केली. त्याबरोबर सूर्य क्षितीजावर उदयास पावला. सूर्योदय होताच मांडव्य ऋषीच्या शापवचनाप्रमाणें सुमतीचा पति मृत्यु पावला. मग अनुसूयेनें अंतरदृष्टीनें आपल्या पतीची प्रार्थना केली. ती म्हणाली; " अहो अत्रिऋषि, मी जर तुमची धर्मपत्नी असेन तर या साध्वी सुमतीचा पति जिवंत व्हावा. " अनुसूयेनें अशी

प्रार्थना करतांच सुमतीचा पति जिवंत झाला, व त्याचा कुष्टरोग पार नाहींसा होऊन त्याची कांति दिव्य झाली. तेव्हां सुमतीला फार आनंद झाला. तिनें अनुसूयेला वंदन करून ती म्हणाली; "हे माते अनुसूये, तूं मला माझें पतिनिधान परत देऊन मजवर अनंत उपकार केले आहेस. हे तुझे उपकार मी केव्हांही विसरणार नाहीं." सुमतीचें भाषण ऐकून अनुसूया म्हणाली; "बाई सुमति, तुझी पतिनिष्ठा पाहून मला अत्यंत आनंद झाला. तुझ्यासारखी पतिव्रता स्त्री मी आजवर कोठेंहि पाहिली नाहीं. तुला थोडा वेळ वैधव्य प्राप्त होऊन तूं आपल्या अलंकाराचा त्याग केला होतास; या गोष्टीची स्मृति पृथ्वीवर अक्षय रहावी म्हणून प्रत्येक हिंदु कुलीन स्त्री रात्रीं शयन करिते वेळीं आपले अलंकार काढून ठेवून शयन करीत जाईल. आणि जी स्त्री या प्रमाणें अलंकार न काढितां शयन करील, तिनें आपल्या पतीच्या आयुष्यावर शस्त्र घातल्याचें पातक होईल." असें म्हणून अनुसूया सर्व देवांसह तेथून निघाली; त्या वेळीं ब्रह्मदेव, विष्णु व शंकर असे त्रिवर्ग अनुसूयेला म्हणाले; "हे अनुसूये या सूर्योदय प्रसंगामुळें आम्हीं तुझे ऋणि आहोंत, तर तुझी जी इच्छा असेल ती आम्हाला कळीव, म्हणजे आम्ही ती तुझी इच्छा तृप्त करूं. तेव्हां अनुसूया म्हणाली; "मला जर कांहीं देण्याची तुमची इच्छा असेल तर तुम्ही तिघेहि माझ्या उदरीं या. एवढीच माझी इछा आहे." तेव्हां तिघेहि देव तथास्तु म्हणाले, व स्वस्थानीं निघून गेले. हे राजा जनमेजया, या प्रमाणें साध्वीच्या शब्दाचा प्रभाव असून ती कथा तुला संक्षेपानें कथन केली आहे.

## १ मांडव्य ऋषीची कथा.

वरील कथा ऐकल्यावर राजा, वैशंपायन ऋषीला म्हणाला; "ऋषि, मांडव्या सारख्या तपोनिधि ऋषीला सूळ कां प्राप्त झाला, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे." तेव्हां ऋषि म्हणाले; "राजा, हा मांडव्य ऋषि सूर्योपासक होता. त्याची तपश्चर्या दांडगी होती. एकदां कांहीं चोरांनीं राजवाड्यांत चोरी करून पलायन केलें, तेव्हां राजदूत त्या चोरांच्या पाठीस लागले. त्या वेळीं ते चोर मांडव्य ऋषीच्या आश्रमांत जाऊन लपले. चोर ऋषीच्या आश्रमांत सांपडले म्हणून दूतांनीं तो सर्व आश्रम जाळून टाकून ऋषीसह सर्व चोरांनां धरून राजाकडे आणलें. राजानें त्या चोरांजवळ सांपडलेला मुद्देमाल पाहून त्या सर्वांनां सुळाची शिक्षा दिली. त्याप्रमाणें राजदूतांनीं सर्वांना सुळावर चढवून मारून टाकिलें, परंतु मांडव्य ऋषीला जेव्हां सुळावर चढविलें, तेव्हां तो वरच्यावर राहिला. तो त्या सुळावर एक वर्ष होता, व एक राजदूत त्या सुळाजवळ पाहरा करीत होता. मांडव्य ऋषीची ती स्थिति पाहून कांहीं ऋषि, पक्षाचें रूप घेऊन त्याजकडे आले, व 'तुझी ही अशी दशा कशानें झाली ?' म्हणून त्यांनीं प्रश्न केला, तेव्हां मांडव्यऋषि म्हणाला; "ऋषीहो ! या जन्मीं

तर मीं कांहीं पातक केलें नाहीं; व पूर्वजन्मीं कांहीं केलें असल्यास त्याची स्मृति नाहीं. पण हा सर्व परिणाम थोडा वेळ घडलेल्या दुष्टांच्या संगतीचा आहे." हें मांडव्यऋषीचें भाषण ऐकून ते ऋषि स्वस्थानीं निघून गेले. हा सर्व संवाद सुळाजवळ उभा असलेला राजदूत ऐकत होता. मांडव्यऋषीची ती खरी हकिकत ऐकून त्यास मोठा अनुताप वाटला, व त्यानें राजाला ती सर्व हकिकत निवेदन केली. ती हकिकत ऐकल्यावर राजा मांडव्यऋषीच्या सुळाजवळ आला, व सुळावरून ऋषीला काढण्याची त्यानें दूतांला आज्ञा केली. त्याप्रमाणें ते दूत ऋषीला सुळावरून काढूं लागले, परंतु त्यायोगें तो ऋषि सुळावरून न निघतां त्याच्या उदरांत तो सूळ अधिकाधिक जाऊं लागला. तेव्हां मांडव्यऋषि राजाला म्हणाला; "हे राजा! माझा भोग संपल्यावांचून हा सूळ सुटावयाचा नाहीं. मला तूं सुळावर दिलेंस, यांत तुझा कांहीं दोष नसून, हा सगळा माझ्या नशिबाचाच योग आहे." ऋषीनें असें सांगितलें तरी राजानें प्रयत्न सोडला नाहीं. त्यानें आपल्या तीक्ष्ण तलवारीनें तो सूळ छेदून टाकला, व ऋषीला सुळापासून वेगळें केलें.

अशा रीतीनें मांडव्यऋषीची सुटका झाली, परंतु त्या सुळाचें टोंक त्याच्या पोटांत तसेंच राहिलें होतें. आपण कांहीं अपराध केला नसतां आपणास एवढा त्रास कां झाला, याची त्याला मोठी चुटपूट लागली व त्याचें कारण समजावून घेण्यासाठीं तो यमाकडे गेला, व यमास असें होण्याचें कारण विचारलें. तेव्हां यम म्हणाला; "मांडव्या, तूं लहानपणीं भिंगोरी नांवाच्या कीटकाच्या उदराला कांटा टोंचून भिंगोरी खेळलास, म्हणून तुला ही शिक्षा झाली आहे." हें ऐकून मांडव्यऋषि यमावर रागावला. तो म्हणाला; "हे यमधर्मा! माझा दोष अल्प असून तूं मला शिक्षा मात्र भयंकर दिलीस. एवढ्यासाठीं मी तुला असा शाप देतो कीं, तुला पृथ्वीवर मनुष्यजन्म प्राप्त होईल व तूं दासीपुत्र होशील." असा शाप देऊन मांडव्य ऋषि तेथून निघून गेला. पुढें व्यासापासून झालेला विदुर तोच हा शापलेला यमधर्म होय.

## २. दत्तात्रेयोत्पत्ति कथा.

मांडव्य ऋषीची कथा सांगितल्यावर वैशंपायन ऋषि म्हणाले; "हे राजा जनमेजया, आतां तुला अनुसूयेचे उदरीं तिन्ही देव कसे जन्मास आले, ती कथा सांगतों. एकदां अनुसूया ऋतुवंत असतां अत्रि ऋषीला कामेच्छा उत्पन्न झाली. तेव्हां त्याच्या नेत्रांतून ऊर्ध्वरेत बाहेर आलें व त्यापासून चंद्र उत्पन्न झाला. तो चंद्र प्रथम अत्यंत स्वच्छ व तेजस्वी होता, परंतु त्याला अत्रिऋषीच्या बुबुळाचें पाणी लागल्यामुळें तो किंचित कलंकयुक्त झाला. याप्रमाणें चंद्राची उत्पत्ति झालेली आहे. चंद्र हा अयोनिसंभव असून ब्राह्मणपुत्र आहे, म्हणून चंद्राला जरी कलंक लागला होता, तरी अत्रि ऋषीनें त्यास आकाशांत राहण्या-

साठीं स्थान दिलें. नंतर विष्णु, ब्रह्मदेव व शंकर यांनीं अनुसूयेला वर दिला होता, त्याप्रमाणें त्या तिघांच्या अंशापासून तिला दत्तात्रेय झाला. दत्तात्रेयाला तीन मुखें आणि सहा हात होते. त्या पुत्राला पाहून अनुसयेला व अत्रि ऋषीला अत्यानंद झाला. तो उपजतच ब्रह्मपुरुष व ब्रह्मज्ञानी गुरुदत्तात्रेय अनुसूया व अत्रि यांच्या इच्छेप्रमाणें कांहीं दिवस त्यांच्याजवळ राहून नंतर सिंहाद्रि पर्वतावर तपश्चर्येसाठीं गेला. तेथें तो पवनाचा आहार करी व ब्रह्मानंदांत निमग्न होई. ऋषींना ती गोष्ट समजली, तेव्हां अनेक ऋषि त्या सिंहाद्रि पर्वतावर आले, व दत्ताचें दर्शन घेऊन त्यांनीं त्याची सेवा करण्याची इच्छा दर्शविली. त्यावेळीं अवधूत म्हणाला; " ऋषीहो, तुम्हीं तर ज्ञानी पंडीत आहां, व मी तर अज्ञानी अवधूत असा आहे. यासाठीं मला गुरु करून तुम्हाला कोणता लाभ व्हावयाचा आहे ?" तेव्हां ते ऋषि म्हणाले; " हे अवधूता तूं तर ज्ञानमूर्ति असून परब्रह्म तेंहि तूंच आहेस. तेव्हां तुला सोडून आम्हीं अन्य कोणाला गुरु करणार ? तुझी सेवा करण्यांतच या शरीराचा आही उपयोग करूं." असें म्हणून ते ऋषी अवधूताची सेवा करूं लागले. एकदां त्या ऋषींची आपणावर किवी निष्ठा आहे, हें पाहण्याचें दत्तात्रेयानें ठरविलें. आणि पाण्यांत बुडी मारून गुरुदत्त एक हजार वर्षेपर्यंत अदृश्य झाला. तेव्हां ते ऋषि दत्तात्रेयावर भरंवसा ठेवून त्याचें चिंतन करीत बसले. हजार वर्षांनीं बरोबर लक्ष्मी व मदिरेनें भरलेलें पात्र घेऊन अवधूत त्या ऋषिसमुहांत आला. आपण मदिरासक्त झालों असून सुंदर स्त्रीच्या मोहजालांतहि सांपडलों आहों, असें दाखवून अवधूतास त्या ऋषींनां साशंक करावयाचें होतें; परंतु त्या ऋषींना ब्रह्मखूण पूर्णपणें पटलेली असल्यामुळें ते किंचितहि न गडबडतां खऱ्या भक्तीनें त्यांनीं दत्तात्रेयाची सेवा चालू ठेविली. तेव्हां दत्ताला परम संतोष झाला व त्यांनीं त्या सर्वांना ज्ञानमार्ग दाखवून दिला."

## २. जंबुराक्षसाचा वध.

वैशंपायन ऋषि म्हणाले, " राजा जनमेजया, दत्तात्रेयानें आपणाबरोबर लक्ष्मीला आणल्यावर त्या लक्ष्मीनें जंबु नांवाच्या राक्षसाचा वध कसा केला ती कथा तुला सांगतों. ही कथा पूर्वी गर्ग ऋषीनीं सहस्रार्जुनाला सांगितलेली आहे. पूर्वी कृतवीर्य राजा निवर्तल्यावर त्याचा मुलगा जो अर्जुन, त्या अर्जुनाला राजाच्या पश्चात सिंहासनावर बसवूं लागले. परंतु तो सिंहासनावर बसेना. तो आपला कुलगुरु जो गर्गऋषि, त्यांना म्हणाला, "आपण सर्वजण मला राज्यावर बसवून व्यर्थ नरकाचा अधिकारी करीत आहां. प्रजेचें पालन करावयाचें काम अत्यंत कठिण आहे. जो दोषी नसेल त्याला प्रसंगीं दोषी असें म्हणावें लागतें; प्रजेच्या वित्ताचा लोभ सुटून प्रजेचें द्रव्य हरण करण्याची इच्छा होते; श्रुतिमार्गानें न वागतां अनाचारानें वागण्याची प्रवृत्ति होते; सुंदर स्त्रिया बलात्कारानें

हरण करण्याची इच्छा होते, शिकारीचा नाद लागून अक्षय हिंसा होते; राज्यांतीं राजाच्या प्राक्तनांत नरक हा ठेवलेलाच असतो, असें पुराणें सांगत आहेत, तेव्हां अशा राज्याचा स्वीकार करणें मला प्रशस्त वाटत नाहीं. तथापि मला जर कोणी सद्गुरू भेटेल व त्याची मजवर कृपा होईल, तर मी ह्या राज्याचा स्वीकार करीन." तेव्हां गर्गाचार्य म्हणाले, "तुझें म्हणणें खरें आहे. तूं आतां सिंहाद्री पर्वतावर दत्तअवधूत या नांवाचा महासिद्ध आहे, त्याच्याकडे जा व त्याची सेवा कर, म्हणजे तो प्रसन्न होऊन तुझी इच्छा पूर्ण करील. त्याची कृपा झाली म्हणजे मोठालीं कार्यें सिद्ध होतील. एकदां इंद्राचें राज्य जंबु नांवाच्या राक्षसानें हरण केलें होतें तें त्या अवधूतानें इंद्राला सहज प्राप्त करून दिलें." तेव्हां अर्जुन म्हणाला; "गर्ग ऋषि, इंद्राचें राज्य जंबू राक्षसापासून दत्त अवधूतानें इंद्राला कसें परत दिलें, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे. तर ती हकीकत कृपा करून निवेदन करावी." अर्जुनानें अशी विनंति केल्यावर गर्गाचार्य म्हणाले; "अर्जुना, पूर्वी क्रौंच नांवाच्या राक्षसाला जंबु या नांवाचा एक मुलगा होता. त्यानें शंकराला प्रसन्न करून अनेक वर मिळविले होते. त्या वरप्रदानामुळें त्यानें इंद्राची अमरावती जिंकून इंद्राचें सर्व राज्य हस्तगत केलें. तेव्हां इंद्र देवांनां बरोबर घेऊन क्षीरसागरीं विष्णूकडे गेला; पण क्षीरसागरीं विष्णु नाहीं, असें पाहून इंद्र फारच चिंतातूर झाला. तेव्हां देवगुरू बृहस्पति इंद्राला म्हणाले; "देवेन्द्रा, सांप्रत श्रीपति अवधूत वेषानें सिंहाद्रि नांवाच्या पर्वतावर आहेत, करितां तूं तेथें जा, म्हणजे तुझा कार्यभाग होईल." बृहस्पतीच्या सूचनेप्रमाणें सर्व देवांसहित इंद्र सिंहाद्रि पर्वतावर आला, व सर्वांनीं दत्ताची स्तुति करून त्यास वंदन केलें. तेव्हां गुरू दत्तात्रेय म्हणाले; "देवहो, तुम्हीं साक्षात् सुरवर आहां, व मी तर एका हातांत मद्य व एका हातांत स्त्री घेऊन बसलों आहे. तेव्हां मजसारख्या अनाचाऱ्याला आपण कां वंदन करितां?' तेव्हां बृहस्पति म्हणाले; "हे देवाधिदेवा अवधूता तूं प्रत्यक्ष वेदमूर्ति आहेस. तुझी लीला जाणावयाला कोणींही समर्थ नाहीं. अग्नि, ब्राह्मणाचे घरीं व महाराचे घरीं जसा सारखाच शुद्ध असतो, त्याप्रमाणें तूं कोठेंही व कोणत्याही स्थितींत जरी असलास तरी परब्रह्मस्वरूपच आहेस. हे देवा अनंता, अमरावतीचें राज्य जंबु नांवाच्या राक्षसानें घेतल्यामुळें सर्व देव चिंतातूर झाले आहेत, तेव्हां या संकटाचें निवारण करण्यास तुझ्यावांचून कोणींही समर्थ नाहीं." बृहस्पतीनें अशी विनंति केल्यावर दत्तात्रेय म्हणाले; "देवेन्द्रा, तुम्हीं आतां सर्वजण त्या राक्षसाबरोबर युद्ध करण्यासाठीं जा, व त्याला युद्ध करीत करीत या माझ्या आश्रमापर्यंत घेऊन या." अवधूताच्या सूचनेप्रमाणें देवेंद्र सैन्यासह त्या राक्षसाबरोबर युद्ध करण्यासाठीं गेला, व त्या राक्षसाला सिंहाद्रि पर्वतावर घेऊन आला. तेथें आल्यावर दत्तात्रेया शेजारी बसलेली सर्वांगसुंदर लक्ष्मी त्या जंबु

राक्षसाचे दृष्टीस पडली. त्यावेळीं लक्ष्मीचें तें अपूर्व सौंदर्य पाहून जंबु राक्षस मोहित झाला, व लक्ष्मीला आपल्या मस्तकावर घेऊन तो तेथून पळाला. हा प्रकार पाहून देवेन्द्र निराश झाला, व दत्तात्रेयाला म्हणाला; "हे परात्परा, त्या दैत्यानें माझें राज्य तर हरण केलेंच आहे, पण आतां तुझी स्त्रीहि हरण केली. यावरून मी आतां माझ्या राज्याला मुकलों असेंच समजावयाचें!" देवेंद्राचे ते निराशजनक उद्गार ऐकून दत्तात्रेयाला हंसू आलें. ते म्हणाले; "देवेंद्रा, चिंता करण्याचें कारण नाहीं. आतां त्या राक्षसाचा खात्रीनें नाश झाला असें समज. कारण या लक्ष्मीला जो मस्तकावर धारण करितो, त्याचा खात्रीनें नाश होतो; व जो तिला पायाजवळ ठेवतो, त्याची ती दासी होते. तसेंच जो तिला हृदयाचे ठिकाणीं धारण करितो, त्यास वस्त्रें भूषणें प्राप्त होतात. असा या लक्ष्मीचा महिमा आहे." गुरुदत्तात्रेय याप्रमाणें देवेंद्रास सांगत आहेत, तों तिकडून लक्ष्मी त्या राक्षसाचा शिरच्छेद करून तेथें आली. लक्ष्मीचा पराक्रम पाहून सर्व देवांनीं तिचा जयजयकार केला व दत्तात्रेयाची स्तुति करून त्यास वंदन केलें. नंतर दत्तात्रेयानीं इंद्राला अमरावतीस नेऊन राज्यावर बसविलें. हे अर्जुना, असा त्या अवधूताचा विलक्षण महिमा आहे."

गर्गाचार्यांच्या सूचनेप्रमाणें अर्जुन सिंहाद्रिपर्वतावर गेला, व दत्तात्रेयाला साष्टांगप्रणिपात करून म्हणाला; "हे देवाधिदेवा, दत्तात्रेया, मी तुला अनन्य शरण आलों आहे. हे सच्चिदानंदा, तूं साक्षात नारायण असून तूं सर्व भूतीं आहेस. तुझा पार जाणावयाला ब्रह्मादिकहि असमर्थ आहेत, तेथें मजसारख्या पामराची कथा काय? हे विश्वरमणा, मी तुझी सेवा करण्यासाठीं आलों आहें, तूं माझा स्वामी असून मी तुझा सेवक आहे" याप्रमाणें अर्जुनानें दत्तात्रेयाची स्तुति करून तो तेथें त्यांच्या सेवेला राहिला. एके दिवशीं अर्जुन दत्तात्रेयास स्नानासाठीं ऊन पाणी आणीत असतांना त्याचें सर्व शरीर भाजलें. त्यावेळीं त्याची भक्ति पाहून दत्तात्रेय प्रसन्न झाले व काय मागावयाचें असेल तें माग, म्हणून म्हणाले; "तेव्हां अर्जुन म्हणाला; हे स्वामी अवधूता, जर मला द्यावयाचें असेल तर सहस्र हात व संपूर्ण भूमंडळ जिंकण्याची शक्ति दे." अर्जुनाचें मागणें ऐकून दत्तात्रेय म्हणाले; "अर्जुना तुला सर्व भूमंडळचें राज्य प्राप्त होईल. ब्राह्मणाशिवाय तूं सर्वांनां अजिंक्य होशील. शिवाय ॥ कार्तवीर्यार्जुनो नाम राजा बाहुसहस्रवान् ॥ १ ॥ या मंत्रानें जें तुझें स्मरण करतील, त्यांची कार्यसिद्धि होईल." असें वरदान मिळाल्यावर अर्जून आपल्या नगरांत परत आला व सिंहासनावर बसून राज्य करूं लागला."

---

# अध्याय १६ वा.

## १. निरनिराळ्या जातींची उत्पत्ति.

जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; "ऋषि, या अर्जुनाच्या कुलांतच पांचाळ उत्पन्न झाले असें आपण मला सांगितलें होतें. तेव्हां या पृथ्वीवर ज्या अनेक जाती आहेत, त्या कशा उत्पन्न झाल्या, हें ऐकण्याची माझी इच्छा आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे मूळ चारच वर्ण असून सांप्रत तर लक्षावधि जाती दिसत आहेत. तर ह्या जाती कशा निर्माण झाल्या तें मला कृपा करून निवेदन करावें." तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले; "राजा, मूळ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चारच वर्ण होते. ब्राह्मण हे ब्रह्मदेवाच्या मुखापासून उत्पन्न झाले, क्षत्रिय बाहूपासून उत्पन्न झाले, वैश्य ब्रह्मदेवाच्या हृदयापासून निर्माण झाले, व शूद्र चरणापासून उत्पन्न झाले. पुढें या चार वर्णांच्या संकरापासून अनेक जाती निर्माण झाल्या आहेत. ब्रह्मदेवानें चार जाती निर्माण केल्यावर ब्रह्मदेव विश्वकर्मोला म्हणाले; 'विश्वकर्मा, तूं पृथ्वीवर जा, व अनेक प्रकारचे वृक्ष, अरण्यें, उपवनें, पर्वत, ग्रामें, देवस्थानें, तीर्थें, नक्षत्रें वगैरे निर्माण कर, व मी जे चार वर्ण निर्माण केले आहेत त्यांना जे पुत्रपौत्र होतील त्यांची वर्णव्यवस्था करून दे.'' ब्रह्मदेवाचे आज्ञेप्रमाणें विश्वकर्मानें पृथ्वीवर येऊन पर्वत–अरण्यें–नद्या–शहरें वगैरे निर्माण करून पृथ्वी उत्तमप्रकारें शृंगारली. नंतर त्यानें चार वर्णांचे लोकांस व त्यांचेपासून उत्पन्न झालेल्या प्रजेस बोलाविलें. तेव्हां विश्वकर्म्यासमोर हजारों स्त्री पुरुष येऊन उभे राहिले. तो विलक्षण लोकसमूह पाहून विश्वकर्माहि आश्चर्यानें थक्क झाला. मग त्यानें त्या स्त्रीपुरुषांचे अनुलोम व प्रतिलोम असे दोन भाग केले, व त्या प्रत्येक भागाचे आणखी शतशः पोटभाग केले. उच्च वर्णाचा पुरुष व नीच वर्णाची स्त्री यांपासून जे निर्माण होतील त्यांस अनुलोम असें म्हणावें, व नीच वर्णाचा पुरुष व उच्च वर्णाची स्त्री यांपासून जे निर्माण होतील त्यास प्रतिलोम म्हणावें, असें त्यानें ठरवून दिलें.

राजा जनमेजया, आतां अनुलोमापासून किती जाती निर्माण झाल्या तें तुला सांगतो. क्षत्रिय स्त्री व ब्राह्मण पुरुष यापासून जी जात निर्माण झाली त्या जातीला धर्मावशिक असें म्हणतात. वैश्य स्त्री व ब्राह्मण यापासून झालेल्या जातीला अबष्ट असें म्हणतात. हें अबष्ट सुवर्णाचे अलंकार करण्यांत व वद्यविद्येंत प्रवीण असतात. यांनांच सांप्रत सोनार असें म्हणतात. क्षत्रिय पुरुष व वैश्य स्त्री यापासून महिष या या नांवाची शकून जाणणारी जात उत्पन्न झाली. जोशी म्हणून जे लोक अस-

तात तेच हे महिष होत. क्षत्रिय पुरुष व शूद्र स्त्री या पासून शस्त्रवृत्ति करणारे रजपूत निर्माण झाले. वैश्य पुरुष व शूद्र स्त्री या पासून करण नांवाचे लेखक व चितारी निर्माण झाले. आतां प्रतिलोम भागांतील ज्या सहा जाती झाल्या त्या तुला सांगतों. वैश्य स्त्री व शूद्र पुरुष यापासून वणजारी लोक झाले. क्षत्रियाची स्त्री व शूद्र पुरुष यापासून राजद्वारी उभे राहणारे यत्रधारी लोक उत्पन्न झाले. ब्राह्मणाची स्त्री व शूद्र पुरुष यापासून स्मशानाचें संरक्षण करणारे चांडाळ निर्माण झाले. क्षत्रियाची स्त्री व शूद्र पुरुष यापासून स्तुतिपाठ करणारे मागध या नांवाची जात उत्पन्न झाली. ब्राह्मण स्त्री व वैश्य पुरुष यांपासून वैदेहक नांवाची कारागिरी करणारी जात निर्माण झाली. क्षत्रिय पुरुष व ब्राह्मणाची स्त्री यापासून सूत नांवाची हत्तीघोड्यांनां शिकविणारी जात उत्पन्न झाली. याप्रमाणें मुळचे चार वर्ण, अनुलोमपद्धतीनें झालेले सहा वर्ण व प्रतिलोमापासून झालेले सहा वर्ण, एकूण सोळा वर्ण प्रथम उत्पन्न झाले. पुढें या सोळा वर्णांच्या संकरापासून शतशः जाती निर्माण झाल्या आहेत.

महिष म्हणजे जोशाचा पुरुष व चित्रकथ्याची स्त्री यापासून सुतार झाले तसेंच जोशी व कौलकिणी या पासून साळी झाले. साळ्याचा पुरुष व क्षत्रियाची स्त्री यापासून मल्ल ( मर्दनी ) झाले. मर्दनी पुरुष व क्षत्रिय स्त्री या पासून कोल्हाटी झाले. चित्रकथ्याची स्त्री व वैश्याचा पुरुष यापासून गोवारी झाले. मर्दनी स्त्री व माळी यापासून मणिपार नांवाची जात झाली. संकरहीन ब्राह्मण व क्षत्रिय स्त्री यापासून क्षत्रियविद्या जाणणारे राजगुरु झाले. राजगुरु व क्षत्रिय स्त्री यांजपासून मालविक झाले. हे मालविक शिखासूत्रहीन असून त्यांनां व्रतबंध करण्याचा अधिकार नाहीं. अशाच प्रकारच्या पतित ब्राह्मणापासून शूद्र स्त्रीला जी संतति झाली, तिला गुरव असें म्हणतात. गुरवाची स्त्री व न्हावी या पासून रंगारी झाले. महिषाची स्त्री व ब्राह्मण पुरुष या पासून गौळी झाले. महिषाची स्त्री व पाथरवट या पासून कायस्थ झाले. महिषाची स्त्री व नटवी यापासून कलावंत झाले. नटवीची स्त्री व रजपूत यापासून नापिक झाले. नटवीची स्त्री व पाथरवट यापासून परीट झाले. रजपूत पुरुष व सोनाराची स्त्री यापासून तेली झाले. पाथरवटाची स्त्री व नटवी यापासून बाबर झाले. ब्राह्मण व नटवी स्त्री यापासून कोळी झाले. कोळ्याची कन्या व ब्राह्मण यापासून शिकारी झाले. वणजाऱ्याची स्त्री व ब्राह्मण यापासून झिलकर झाले. रजपुतांची स्त्री व ब्राह्मण या पासून कुंभार झाले. वैद्याची स्त्री व ब्राह्मण यापासून कासार झाले. कोळीण व शूद्र यापासून टकसाळकर झाले. क्षत्रियांची स्त्री व शूद्र यापासून पारधी झाले. शूद्र स्त्री व पाथरवट यापासून रांधवण झाले. शूद्र व वणजारी यापासून पालटुकर झाले. क्षत्रिय व सोनारीण यापासून तांबट झाले. क्षत्रीय व नटवीण यापासून लोहार झाले. वैद्य स्त्री व पाथरवट

यापासून जलमंडपी झाले. पाथरवट व कोळीण यापासून गौड लोक झाले. सुतार व पाथरवटाची स्त्री यापासून दारवटकार झाले. सोनार व पाथरवटाची स्त्री यापासून जासूद झाले. पाथरवटाची स्त्री व वणजारी यापासून भाट, व रांधवणपासून सारथी झाले. कोळ्यापासून पाथरवटाचे स्त्रीला जे झाले त्यांना गारुड म्हणतात. पाथरवटाची स्त्री व चांडाळ यापासून बुरुड झाले. वैद्य व पाथरवटाची स्त्री यापासून नटभ्रम झाले. शूद्र व पाथरवटाची स्त्री यापासून शिंपी झाले. मणियार पुरुष व धीवराची स्त्री यापासून नारा झाले. याच स्त्रीला चांडाळ पुरुषापासून जी संतति झाली तिला खाटिक असें म्हणतात. धीवर स्त्रीला कोष्ट्यापासून जे झाले त्यांना भामरी म्हणतात. हे भामरी गोणपाट विकण्याचा धंदा करितात. धीवर स्त्री व गवळी यांजपासून जे झाले ते तीरकार होत. गवळ्याच्या स्त्रीला टांकसाळकारापासून पेठरी, सेगर व निळकर अशा जाती झाल्या. वणजारीण व सोनार या दोघांपासून ढीवर झाले. तसेंच वणजारीण व कायस्थ यापासून मर्दनी झाले. क्षत्रियाची स्त्री व वैश्य पुरुष यापासून वेश्या उत्पन्न झाल्या. ब्राह्मण व वेश्या यापासून काचंडिया झाले. काचंडिया व कुंभारीण या पासून तांबोळी झाले. सन्यासी व विधवा यापासून बोडळ झाले. विधवा व ब्राह्मण यापासून गोळक झाले. पति जिवंत असतां ब्राह्मणाचे स्त्रीला अन्य ब्राह्मणापासून जे झाले त्यांना कुंड असें म्हणतात. ब्राह्मण स्त्री व कर्मभ्रष्ट ब्राह्मण या पासून देवलक झाले. देवलक व शेलकानी यापासून धनगर झाले. ब्राह्मणाची स्त्री व भजकंटक यापासून वासुदेव झाले. वासुदेवाची स्त्री व मर्दनी यापासून वालुंजकर झाले. वालुंजकर व विप्र स्त्री यापासून उष्ट्राखे झाले. ब्राह्मणाची स्त्री व कऱ्हेकर या पासून कैकाडी झाले. कैकाडी पुरुष व ब्राह्मणाची स्त्री यापासन सौक्तिक झाले. कावडीपुरुष व मल्लाची स्त्री यापासून शेजवल झाले. पहाटगाण व जासुद स्त्री यापासून झारेकरी झाले. कोळीण व भामरी यापासून कावाडी झाले. कावाडीण व चांडाळ यापासून डोंब व पांगुळ या जाती निर्माण झाल्या. मोचीण व वणजारीण यापासून डोहार झाले. मोचीण व कोळी यापासून चांभार झाले. मोचीण व कुंभार यापासून भोडवा नांवाची जात उत्पन्न झाली. उग्रपुरुष व अंधस्त्री यापासून मैच्छ झाले. चांडाळ व तेलीण यापासून महार झाले. चांडाळ व डोहारीण या पासून मांग झाले. कैकाडीण व चांडाळ यापासून श्वानराखे झाले आणि गारुडीण व कोळी यापासून कैकाडी झाले. राजा जनमेजया, याप्रमाणें पृथ्वीवर एकंदर बेचाळीस कोटी जाती निर्माण झालेल्या आहेत. पूर्वीचा वर्ण संकर होऊन जरी ह्या अनेक जाती निर्माण झाल्या तरी, पुढें ज्यानें त्यानें आपल्या वर्णधर्माप्रमाणें वागावें, म्हणून शास्त्रकारांनीं त्या सर्वांना अनेक बंधनें घालून ठेविलीं आहेत.

# अध्याय १७ वा.

## १. चार आश्रमांची माहिती.

जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; "ऋषि महाराज, आपण चार वर्णांची ज्याप्रमाणें माहिती सांगितली, त्याप्रमाणें चार आश्रमांचीही माहिती सांगण्याची कृपा करावी." तेव्हां ऋषि म्हणाले; "राजा, आश्रम चार आहेत. प्रथमाश्रमास ब्रह्मचर्याश्रम असें म्हणतात. या आश्रमांत असतांना ब्रह्मचर्यानें राहून वेदाध्ययन करावें लागतें. दुसरा गृहस्थाश्रम होय. या आश्रमासारखा श्रेष्ठ आश्रम नाहीं. धर्म, अर्थ, काम व मोक्ष अशा चाऱ्ही अवस्था प्राप्त करून देणारा हा आश्रम आहे. तिसरा वानप्रस्थ आश्रम हा असून, चौथा आश्रम संन्यासाश्रम हा होय संन्यासाश्रमांतील आचारधर्म व्यवस्थित रीतीनें पाळले गेल्यास कैवल्यपदाची प्राप्ति होते. राजा जनमेजया, हे चाऱ्ही आश्रम आनंदप्रद असेच आहेत; परंतु सर्वांत गृहस्थाश्रम श्रेष्ठ होय. या आश्रमांत पंचमहायज्ञ होऊन हरिहराचें भजनपूजन करितां येतें; आणि विशेषतः अतीत, अभ्यागत, गोरगरीब, दीनदुबळे, यांचा समाचार घेतां येतो. शास्त्रांत अनेक दानें सांगितलेलीं आहेत, परंतु त्या सर्वांत ज्ञानदान व अन्नदान हीं श्रेष्ठ होत. हें अन्नदान गृहस्थाश्रमांत करितां येतें. अन्नदानासारखें पुण्य कोणत्याही कृत्यांत नाहीं. एवढ्यासाठीं प्रत्येक गृहस्थानें आपल्या शक्तीप्रमाणें अन्नदान करावें, असा नियम आहे. वैदर्भ देशच्या राजानें अन्नदान केलें नव्हतें म्हणून त्याची स्थिति फारच दुःखद झाली होती.

## २. प्रेतभक्षक वैदर्भ राजाची कथा.

हें ऐकून जनमेजय राजा म्हणाला; "ऋषि, वैदर्भ देशच्या राजाची अन्नदान न केल्यामुळें काय स्थिति झाली, तें कृपा करून सांगावें." तेव्हां ऋषि म्हणाले; "राजा जनमेजया, ही कथा अगस्ती ऋषीनें श्रीरामचंद्राला सांगितलेली आहे, तीच मी तुला सांगतों. एकदां अगस्ती ऋषि आपल्या आश्रमांत असतांना त्यांच्या दर्शनासाठीं श्रीरामचंद्र लक्ष्मणासह आले. रामचंद्रानीं अगस्तीऋषीचें दर्शन घेतल्यावर ऋषीनीं त्यांचा योग्य आदर सत्कार केला, व श्रीरामचंद्राला एक रत्नकंकण अर्पण केलें. तें अपूर्व रत्नकंकण पाहून श्रीरामचंद्र अगस्तीऋषीला म्हणाले; "ऋषि, आपणाला मी कांहीं तरी अर्पण करावयाचें, त्याऐवजीं आपणच मला हें अमूल्य कंकण देत आहां, हें काय!" तेव्हां अगस्तीऋषि म्हणाले; "रामचंद्रा, आम्हां तापसीजनांना या रत्नकंकणांचें काय करावयाचें आहे! तूं विष्णुअवतार असून चक्रवर्ती राजा आहेस, तेव्हां तें तुझ्या हातांत चांगलें शोभेल. हें रत्नकंकण मोठें अद्भुत आहे. याचें यथाविधि पूजन केलें असतां त्यापासून पुष्कळसें सुवर्ण व इच्छित प्राप्त होतें."

अगस्तीऋषीचें भाषण ऐकून श्रीरामचंद्र म्हणाले; "ऋषि, हें अपूर्व कंकण आपणास कसें प्राप्त झालें, तें सांगण्याची कृपा करावी." तेव्हां अगस्तीऋषी रामचंद्राला ती कथा सांगूं लागले. ते म्हणाले; "श्रीरामचंद्रा, या माझ्या आश्रमाजवळ एक उत्कृष्ट जलपूर्ण असें सरोवर आहे. त्या सरोवरांत मी प्रत्येक दिवशीं तिन्ही वेळां स्नानास जात असतो. रोजच्या नियमाप्रमाणें एके दिवशीं माध्यान्हसमयीं सरोवरांत स्नान करीत असतां एकाएकीं आकाशांत घंटानाद होऊं लागला. तेव्हां मी वर पाहिलें, तों एक सर्वोत्कृष्ट विमान पृथ्वीवर येत आहे, असें माझ्या दृष्टीस पडलें. तें विमान सरोवराजवळ येऊन थांबलें, व त्यांतून एक दिव्य पुरुष बाहेर पडला. त्या पुरुषानें सरोवरांत स्नान केलें व सरोवरापासून कांहीं अंतरावर एक प्रेत पडलें होतें, त्या प्रेताजवळ तो गेला. त्यानें तें प्रेत बारीक दृष्टीनें निरीक्षण केलें, व नंतर तें मस्तकापासून पायापर्यंत सर्व खाऊन टाकलें; आणि पुन्हा आपल्या विमानांत बसून निघून गेला. तो प्रकार पाहून मला साहजिकच आश्चर्य वाटलें. दुसरे दिवशीं मी जेव्हां दुपारीं स्नानाला गेलों, तेव्हां तो पुरुष पुन्हा विमानांत बसून स्नानाला आला, व स्नान केल्यावर त्या प्रेत ठेवलेल्या जागेवर गेला. तेथें पूर्वीप्रमाणेंच एक प्रेत पडलेलें होतें. तें त्यानें पूर्वीप्रमाणेंच खाल्लें व तो निघून गेला. याप्रमाणें तीन चार दिवस झालें, तेव्हां तो कोण आहे, हें समजावून घेण्याची मला इच्छा झाली. मीं त्यास गाठलें व 'तूं कोण आहेस?' म्हणून प्रश्न केला. तेव्हां तो दिव्यपुरुष माझ्या चरणावर मस्तक ठेवून म्हणाला, "ऋषि, आपण प्रश्न केलात म्हणून मला माझी हकीकत सांगणें भाग आहे. मी स्वर्गभुवनांत राहतों, पण तेथें खावयाला मिळत नाहीं. मला अत्यंत क्षुधा लागते, तेव्हां मी मृत्युलोकीं येतो व प्रेत भक्षण करितों." त्या दिव्य पुरुषाचें हें भाषण ऐकून मला फार आश्चर्य वाटलें. मी त्याला म्हणालों; "हे दिव्य पुरुषा, ज्यास स्वर्ग प्राप्त होतो त्यास क्षुधा लागत नाहीं, असें सांगतात; व शिवाय जरी कदाचित क्षुधा लागली तरी ती प्रेतें खाऊन शमवावी लागते हें तर त्याहून आश्चर्यकारक आहे. तेव्हां तूं दिव्य पुरुष आहेस, कीं भूत पिशाच आहेस, याबद्दल मला संशय वाटतो." तेव्हां तो दिव्य पुरुष म्हणाला; "ऋषि महाराज, मी सांगतों हें अगदीं सत्य आहे. मी पूर्वी वैदर्भ देशाचा राजा होतों. मी आपलें राज्य यथा न्यायानें व नीतिनें चालवीत असे. पापाचरण असें माझ्या हातानें कधीं झालें नाहीं. नेहमीं धर्मन्यायानें वागत असे, परंतु अतीत, अभ्यागत, यांनां मीं कधींहि अन्नदान केलें नाहीं. किंवा प्राणीमात्राला अन्न देऊन संतुष्ट केलें नाहीं. स्वतः खावें प्यावें, भूषणें घालावींत, उत्तम वस्त्रें वापरावींत, असा माझा क्रम होता. मी जरी स्वतः सुखोपभोग घेत असे, तरी त्या साठीं कधींहि अनीतीचें वर्तन करीत नसे. याप्रमाणें इहलोकीं माझी कालक्रमणा चालली असतां एके दिवशीं माझें प्राणो-

त्क्रमण झालें. तेव्हां यमाचे दूतांनीं मला यमाच्या दरबारांत नेलें. यमानें चित्रगुप्ताला बोलावून माझ्या पापपुण्याचा हिशेब विचारिला. तेव्हां चित्रगुप्त म्हणाला; "हे यमधर्मा, हा राजा होता. यानें आपलें राज्य अत्यंत दक्षतेनें न्यायनीतीनें व प्रजेचें पुत्रवत पालन करून केलें आहे. राजा यादृष्टीनें पाहिलें असतां यानें आपलें कर्तव्य उत्तम केलें आहे. त्यानें पाप केलें नाहीं, तसें कांहीं पुण्यही केलें नाहीं. अर्थात याला येथें न ठेवितां स्वर्गलोकीं पोहोंचतें करावें." मग यमदूतांनीं मला स्वर्गलोकीं नेलें. तेथें राजनीतीच्या पुण्यांशामुळें मला स्वर्गस्थान व दिव्य शरीर प्राप्त झालें. पुढें मी तेथें असतांना मला क्षुधा लागली, तेव्हां मी देवांना कळविलें. माझें भाषण ऐकून स्वर्गांतील दिव्य पुरुषांना आश्चर्य वाटलें. ते म्हणाले; "तूं पूर्वीं जीं अन्नदानें केलीं असतील त्याचें स्मरण कर म्हणजे तुझी क्षुधा शांत होईल." त्यांचें उत्तर ऐकून मी म्हणालों; "देवहो, मी तर अन्नदान मुळींच केलें नाहीं, तेव्हां त्याचें स्मरण काय करूं?" तेव्हां त्यांनीं मला विष्णूकडे जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें मी विष्णुलोकीं आलों व विष्णूला वंदन करून म्हणालों; "हे वैकुंठनिवासी लक्ष्मीरमणा, मला अत्यंत क्षुधा लागल्यामुळें मी स्वर्गलोकाहून येथें आलों आहे. मृतलोकीं मी अन्नदान मुळींच केलेलें नाहीं, त्यामुळें त्या अन्नदानाचें स्मरण करून क्षुधा शांत कण्यास मी असमर्थ आहे; तेव्हां मी आतां आपली क्षुधा कशी शांत करावी, हे विचारण्यासाटीं तुजकडे आलों आहे." तेव्हां विष्णु म्हणाले; "तूं अन्नदान मुळींच केलें नाहींस, तेव्हां तुला येथें खाण्यास कांहींहि मिळावयाचें नाहीं. आतां तूं मृत्युलोकीं जा आणि तेथें जें तुझें शव आहे, तें तूं खा; म्हणजे तुझी क्षुधा शांत होईल. तें शव तूं एकवार खालेंस तरी पुन्हा तुझ्या क्षुधेच्या वेळीं तें पूर्ववत् होत जाईल." श्रीविष्णूच्या सूचनेप्रमाणें मी विमानांत बसून प्रत्यहीं येथें येतो, व हें प्रेत खाऊन परत जातों." ऋषि म्हणाले; हे रामचंद्रा, त्या वैदर्भ देशच्या राजानें आपली अशी हकीकत सांगितल्यावर मला त्याची करुणा आली व मी आपलें अन्नदानाचें कांहीं पुण्य त्याच्या हातावर घालून त्या शोचनीय अवस्थेंतून त्याची सुटका केली. जातेवेळीं त्या राजानें हें दिव्य कंकण मला दिलें, तें मी तुला अर्पण केलें."

वैशंपायन म्हणाले; राजा जनमेजया, याप्रमाणें श्रीरामचंद्राला कंकण प्राप्त झाल्यावर ते अगस्ती ऋषीला वंदन करून लक्ष्मणासह अयोध्येस निघून गेले. ही अन्नदानाची कथा रामायणांत सांगितलेली असून ती मी तुला संक्षेपानें कथन केली आहे. यावरून गृहस्थाश्रम हा किती श्रेष्ठ आहे, व त्या आश्रमांत पुण्य संपादन करण्याचे मार्गही किती सुगम आहेत, हें तुझ्या लक्षांत आलें असेलच."

---

# अध्याय १८ वा.

## १. चंद्रकलाविवेचन.

जनमेजयराजा ऋषीला म्हणाला; वैशंपायनऋषि, चंद्र आमावास्येला कां दृष्टीस पडत नाहीं, त्याचें कारण सांगावें. तेव्हां ऋषि म्हणाले; " राजा जनमेजया, यासंबंधानें व्यासानीं जी कथा निवेदन केली आहे, तीच मी तुला सांगतों. अमावास्येच्या दिवशीं सूर्य व चंद्र एकाच रथांतून मार्गक्रमण करितात त्यामुळें सूर्याच्या तेजानें चंद्र लोपून जातो, व त्या कारणानें तो दृष्टीस पडत नाहीं. आतां त्या दिवशीं सूर्य व चंद्र एकाच रथांत कां येतात, याचें कारण तुला सांगतों. कश्यपापासून विनतेला झालेला पुत्र अरुण, हा झाल्याबरोबर सूर्याच्या रथावर जाऊन बसला व त्याला म्हणाला; " हे सहोदरा, मी तुझा सारथी होण्याण्यासाठीं आलों आहे. मी तुझा रथ व्यवस्थितपणें चालवीन व तुझें सारथ्य करून राहीन. " अरुणाच्या विनंतीप्रमाणें सूर्यानें त्यास आपलें सारथ्य करण्यास सांगितलें. आज्ञा होतांच अरुण रथावर बसला, व रथ हांकू लागला. परंतु त्यास सूर्याचें तेज सहन होईना. सूर्याच्या तेजानें तो धाडकन रथावरून खालीं पडला. तेव्हां सूर्य त्यास सावध करण्यासाठीं त्याचेजवळ जाऊं लागला. परंतु सूर्य जसजसा जवळ येऊं लागला, तसतसा अरुण घाबरा होऊं लागला. त्यावेळीं सूर्याला मोठा विचार पडला. अरुणाजवळ जावें तर तो उष्णतेनें अधिक कासावीस होतो, बरें जाऊं नये तर पृथ्वीवर अंधार पडतो. अशा अडचणींत सूर्य सांपडल्यावर त्यास अरुणाला वाचविणेंच अधिक बरें वाटलें, व तो अस्ताचली जाऊन राहिला. सूर्य एक महिनाभर अस्ताचली होता. अरुणाला वाचविण्यासाठीं सूर्यानें ही योजना केली खरी, परंतु त्यामुळें पृथ्वीवर मोठा अनर्थ झाला. तेव्हां ब्रह्मदेव कैलासांत गेले व त्यांनीं शंकरास सर्व हकीकत कळविली. तेव्हां शंकरानीं विष्णूकडे जाण्याचें ठरविलें; व ते दोघेहि क्षीरसागरीं आले, आणि त्यांनीं विष्णूला सर्व हकीकत सांगितली. तेव्हां विष्णु, शंकर व ब्रह्मदेव यांस बरोबर घेऊन पृथ्वीवर आले; व सर्व परिस्थिति लक्षांत घेऊन त्यांनीं असें ठरविलें कीं, चंद्राची अमृतकला अरुणाला द्यावी म्हणजे त्याची मूर्च्छा दूर होईल, व त्याला पुढेंहि सूर्यापासून त्रास होणार नाहीं. असें ठरल्यावर विष्णूनीं चंद्राला बोलाविलें व त्यास त्याची अमृतकला अरुणाला देण्याविषयीं सांगितलें. तेव्हां चंद्र म्हणाला, " हे शारंगपाणी, माझी अमृतकला तुम्हीं घेतल्यास माझा क्षणार्धांत नाश होईल. मला जगांतून नाहींसें करावयाचें असल्यास माझा नाइलाज आहे; पण मी नाहींसा झाल्यास सर्व जगहि नाहींसें होईल, याचा आपण विचार करावा. " चंद्राचें म्हणणें ऐकून

ब्रह्मदेवानें एक युक्ति सुचविली. तो म्हणाला; "चंद्र सोळा कलांनीं युक्त आहे. त्यापैकीं, जीवनकला यानें अरुणाला द्यावी, म्हणजे अरुणाची मूर्छा दूर होईल, व त्यास सूर्याचा त्रास होणार नाहीं. शिवाय सूर्याचा रथ हांकीत असतांना जेव्हां अरुणाला त्रास होऊं लागेल, तेव्हां त्या जीवनकलेपासून पाणी उत्पन्न होईल, व त्यायोगें अरुणासभोंवतीं शीतलता उत्पन्न होईल." ब्रह्मदेवाची ही योजना सर्वांना पसंत पडली. विष्णूच्या इच्छेप्रमाणें चंद्रानें आपली जीवनकला अरुणाला दिली. जीवनकला मिळताच अरुणाची मूर्छा दूर झाली, व तो सूर्याच्या रथावर जाऊन बसला. तेव्हां सूर्य पूर्ववत उदयास येऊं लागला.

सूर्य उदयास येतांच सर्वांना आनंद झाला, पण सर्व वनस्पति एके ठिकाणीं होऊन तेथें धांवत आल्या, व त्या विष्णूला म्हणाल्या; "हे श्रीपति, उदक नाहींसें झाल्यामुळें आम्हीं अगदीं मरणोन्मुख झालों आहोंत. दरीखोऱ्यांतून पाणी पाझरत येऊन आमचें संरक्षण होत असे, पण सर्व पाणी नाहींसें झाल्यामुळें आमची फार कठीण स्थिति झाली आहे. तर चंद्राला आमच्यावर अमृताचा वर्षाव करण्यास सांग, म्हणजे आमची मरणभीति दूर होईल.' तेव्हां विष्णु चंद्राला म्हणाले; "चंद्रा, तुझ्या अंगीं अमृतशक्ति आहे. तेव्हां या वनस्पतीवर तूं अमृतसिंचन कर, म्हणजे त्या तेजस्वी होतील." चंद्र म्हणाला; "हे अनंता, या शरीरावर तुझीच सत्ता आहे. तूं सांगशील त्याप्रमाणें करण्यास मी तयार आहे." चंद्राचें भाषण ऐकून विष्णूनीं संतोष दर्शविला व ते म्हणाले; "चंद्रा, तुझें औदार्य पाहून मला मोठा आनंद झाला आहे. तूं आपल्या सोळा कलांपैकीं एक कला अरुणाला दिली आहेसच, आतां बारा कला वनस्पतींनां देऊन त्यांचें संरक्षण कर." विष्णूची आज्ञा चंद्रानें शिरसामान्य केली व आपल्या बारा कला वनस्पतीला दिल्या. चंद्राचें औदार्य पाहून महादेव फार प्रसन्न झाले, व त्यांनीं चंद्राला 'महिन्यांतून एक दिवस सर्व कला प्राप्त होतील.' असा वर दिला.

ऋषि म्हणाले; "राजा जनमेजया, आतां या चंद्राच्या सोळा कलांची स्थिति कशी आहे, हें तुला सांगतों. पौर्णिमेचे दिवशीं चंद्र सोळाही कलांनीं पूर्ण असतो. त्या दिवशीं तो दिव्य रथांत बसून मार्ग क्रमण करितो. प्रतिपदेला एकच कला असते, त्या कलेला निर्मळकला असें म्हणतात. त्या दिवशीं चंद्र श्वेत रथांत बसतो. द्वितीयेच्या कलेला शुक्लकला असें म्हणतात. त्याप्रमाणें तृतीयेस जीर्णकला, चतुर्थीस सगुणकला, पंचमीस राजकला, षष्ठीस अर्धकला, याप्रमाणें प्रत्येक तिथीस वेगवेगळ्या कला असतात. शुक्लपक्षांत त्याच्या कला वाढत जाऊन पौर्णिमेस तो पूर्ण होतो, व कृष्णपक्षांत एकेक कला जीर्ण होऊन अमावास्येस तो सूर्याबरोबर बसतो.

ही कथा ऐकून राजा म्हणाला; " ऋषि, अभिमन्यु चंद्राचा अवतार होता असें सांगतात, तर ती कथा मला सांगावी." तेव्हां ऋषि म्हणाले; " राजा, तुला मागें चंद्रानें गुरुपत्नी तारा चोरून नेल्याची कथा सांगितली होती, ती तुला आठवत असेलच. त्या तारेसाठीं देव व चंद्र या उभयतांमध्यें घनघोर युद्ध झालें; त्यावेळीं चंद्रानें शीतवृष्टि करून संपूर्ण विश्व थंडगार करून टाकण्याचा बेत केला होता. तेव्हां महादेव चंद्रावर क्रुद्ध झाले व त्यांनीं आपला त्रिशूळ चंद्राला मारण्यासाठीं हातीं घेतला. तें संकट ओळखून ब्रह्मदेवानें शंकराची समजूत केली, व तारा चंद्राकडून आणून गुरूच्या स्वाधीन केली. त्या वेळीं गुरूनें चंद्राला शाप दिला कीं, 'तुला पृथ्वीवर मनुष्य जन्म प्राप्त होवो,' त्या शापवचनाप्रमाणें चंद्र हा सुभद्रेच्या पोटीं जन्माला आला होता. सुभद्रा गरोदर असतांना श्रीकृष्ण तिला व्यूहरचना कशी असते, तें सांगत होते, वगैरे कथा पूर्वी तुला सांगितलीच आहे.

---

## अध्याय १९ वा.

### १. वत्सलाहरण कथा.

जनमेजय राजा म्हणाला; " वैशंपायन महाराज, मला वत्सला हरणाची कथा ऐकण्याची इच्छा झाली आहे, तर ती कथा कृपा करून सांगावी." तेव्हां वैशंपायन ऋषि राजाला ती कथा सांगू लागले. ते म्हणाले; " राजा, वत्सला ही श्रीकृष्णाचा वडील बंधु जो बलिराम त्याची कन्या होय. पांडवांचा चालता काळ असतांना बलरामानें ती अर्जुनाचा पुत्र अभिमन्यु यास देऊं केली होती. पांडव वनवासांत गेल्यावर आपला मुलगा जो लक्ष्मण त्याला वत्सला स्त्री करावी अशी दुर्योधनाला इच्छा उत्पन्न झाली, व त्यानें आपला मंत्री बलरामाकडे पाठविला. मंत्र्यानें बलरामाची भेट घेऊन त्यास दुर्योधनाची इच्छा कळविली व तो म्हणाला, "बलरामा, दुर्योधनाच्या वैभवाविषयीं तुला कांहीं सांगावयाला पाहिजे असें नाहीं. तूं वत्सला अभिमन्यूला देऊं केली आहेस, पण पांडव हल्लीं वैभवहीन झाले असून पुढें केव्हां त्यांचा भाग्योदय होईल, अशीहि कांहीं चिन्हें दिसत नाहींत. तेव्हां आपली मुलगी लक्ष्मणास द्यावी हें तुम्हांसहि श्रेयस्कर आहे." मंत्र्याचें हें भाषण बलरामालाहि पसंत पडलें. त्यानें मंत्र्याला रूकार दिला, व लवकर लग्न उरकून टाकावें असें कळविलें. बलरामाचा निरोप समजतांच दुर्योधनाचा आनंद गगनांतहि मावेनासा झाला. त्यानें हस्तिनापुरांत लग्नाच्या तयारीची एकच गर्दी उडवून दिली, सर्वांना निमंत्रण पत्रिका पाठविल्या, व जिकडे तिकडे वत्सलेच्या लग्नाची चर्चा सुरू झाली. तेव्हां ती वार्ता सुभद्रेच्या कानावर गेली. त्या वेळीं सुभद्रा अभिमन्यूसह, पांडव वनवासांत

असल्यामुळें विदुराच्या घरीं होती. बलराम, वत्सला लक्ष्मणास देत आहे हें ऐकून विदूरालाहि फार वाईट वाटलें. सुभद्रा तर तें वर्तमान ऐकल्यापासून अत्यंत चिंतातुर झाली. तेव्हां अभिमन्यु तिला म्हणाला; " आई, तूं असा शोक कां करीत आहेस, तुला जें संकट पडलें असेल तें मी जरी लहान आहे तरी सहज दूर करीन," तेव्हां सुभद्रा म्हणाली, "बाळा, तुला पोराला मी काय सांगू? तुझा पिता घरीं असतां किंवा भीमभावोजी येथें असते, तर त्या दुर्योधनानें आमचा असा मानभंग कधींच केला नसता. बाळ अभिमन्यु, बलरामानें आपली कन्या वत्सला तुला देण्याचें कबूल केलें होतें, पण आपला पडता काळ आला आहे असें पाहून त्यानें आपला शब्द बदलला, व आतां वत्सला दुर्योधनाचा पुत्र लक्ष्मण यास देऊ केली. तें लग्नहि लवकरच होणार आहे." सुभद्रेचें भाषण ऐकून अभिमन्यु शांतपणें म्हणाला, " आई, तसें झालें तर झालें. त्यांत काय मोठेंसें बिघडणार आहे. वत्सला नाहीं तर नाहीं, दुसरी एखादी मुलगी मिळेल. माझें प्राक्तन जर बलवान् असेल तर मला वत्सलेपेक्षांहि चांगली मुलगी मिळेल. आई, विवाहासारखीं कार्यें विधिसूत्रावर अवलंबून असतात, त्यांत मनुष्यानें प्रयत्न करण्यांत काय अर्थ आहे ?"

अभिमन्यूचें हें दैववादी उत्तर सुभद्रेला आवडलें नाहीं. ती म्हणाली; "वीराच्या पोटीं जन्म घेऊन तूं कुळाला कलंक लाविलास! अरे, तुला कबूल केलेली मुलगी तो बलराम देत नाहीं, याबद्दल तुला कांहींच वाटत नाहीं? अशा प्रकारचा मानभंग शूर क्षत्रियानें कधींहि सहन केला नसता. तूं क्षत्रिय असून हा अपमान निमूटपणें सहन करितोस, तेव्हां तुला धि:कार असो. अभिमन्यु, अर्जुनाचा पुत्र असें म्हणवून घ्यायला सुद्धां तुला खचित लाज वाटली पाहिजे!" सुभद्रेचें हें रागाचें भाषण ऐकून अभिमन्यु सिंहाच्या छाव्याप्रमाणें खवळला. तो म्हणाला; " आई, मी वीराच्या पोटीं जन्म घेतला असून रण-क्षेत्रावर क्रीडा करण्यासाठींच आपलें आयुष्य वेंचणार आहे. बलरामासारख्याची मुलगी तुझी सून करावयाची, यांत तर कांहींच कठीण नाहीं. जोंपर्यंत हा अभिमन्यु हातांत शस्त्र घेऊन तयार झाला नाहीं, तों पर्यंतच कौरवांचे हे खेळ चालणार आहेत. माझे बाहु संपूर्ण पृथ्वीहि पालथी घालण्यास समर्थ आहेत, मग कौरवांची व बलरामाची ती कथा काय ? आपणाजवळ जरी रथसारथी वगैरे कांहीं नाहीं, तरी मी एकटा वत्सलेचें हरण करण्यास पुरा आहे. हा मी आतां द्वारकेस जातों व बलरामाला चांगली शिक्षा लावतों." असें म्हणून अभिमन्यूनें धनुष्य व बाणाचा भाता घेतला, व तो मंदिराबाहेर पडूं लागला. तेव्हां विदुर अभिमन्यूला म्हणाला; " बाळ अभिमन्यु तुझ्या पराक्रमाविषयीं मला मुळींच संदेह नाहीं. तूं या कार्यांत यश मिळवून येणार अशी माझी खात्री आहे, पण द्वारकेपर्यंत पायानें जाणें कठिण आहे. यासाठीं माझा रथ घेऊन जा. मजजवळ

सारथी नाहीं या साठीं तुझी आई सुभद्रा ही तुझें सारथ्य करील. यावेळीं कौरव द्वारकेस जाऊन पोंहोंचले असतील, तेव्हां तुम्हीं राजमार्गानें न जातां आडमार्गानें द्वारकेला जा, म्हणजे लवकर जाल. या कार्यांत तुम्हाला श्रीकृष्णाकडूनहि चांगलें साह्य होईल."

विदूरानें असें सांगिल्यावर सुभद्रेनें रथ सिद्ध केला, व त्यांत सुभद्रा व अभिमन्यु बसून तीं उभयतां द्वारकेच्या मार्गाला लागलीं. विदूरानें सांगितलेला मार्ग द्वारकेला जाण्यास जवळचा होता हें खरें, पण तो अत्यंत विकट होता. हस्तिनापुराहून निघून कांहीं मार्ग चालून गेल्यावर, त्यांस त्या मार्गांत मोठें थोरलें अरण्य आडवें आलें. त्यांतील वृक्षांना अडखळून रथ क्षणोक्षणीं उभा राहूं लागला, तेव्हां अभिमन्यूनें बाण सोडून मार्गावरील सर्व वृक्ष छेदून टाकले व मार्ग निष्कंटक केला. अभिमन्यूचें तें धनुर्विद्येंतील नैपुण्य पाहून सुभद्रेला अत्यंत आनंद झाला व तिनें मोठ्या वेगानें रथ चालू केला. इतक्यांत प्रचंड देहाचे व विक्राळ वदनाचे राक्षस आडवे आले. तेव्हां सुभद्रा अत्यंत भयभीत झाली. परंतु अभिमन्यूनें तिला धीर देऊन त्या सर्व राक्षसांचा विलक्षण शरवृष्टीनें नाश केला. परंतु तें वर्तमान त्यांच्या भाईबंदांस समजतांच दोन महान विक्राळ व अत्यंत पराक्रमी राक्षस अभिमन्यूच्या रथावर चालून आले. तेव्हां त्या राक्षसांचा व अभिमन्यूचा घनघोर रणसंग्राम झाला. त्या युद्धांत अभिमन्यूच्या मर्मस्थलावर गदा लागली व अभिमन्यु मूर्च्छित होऊन रथाखालीं पडला.

तो भयंकर प्रसंग पाहून सुभद्रा अत्यंत चिंतातूर झाली, व ती रथाखालीं उतरून अभिमन्यूला सावध करूं लागली. त्यावेळीं सुभद्रेच्या अंतःकरणांत अनेक विचार येऊं लागले. पण इतक्यांत अभिमन्यु सावध झाला व धनुष्यबाण घेऊन पुन्हा राक्षसाबरोबर तो युद्ध करूं लागला. अभिमन्यूच्या विलक्षण माऱ्यानें एक राक्षस मरण पावला व दुसरा मूर्च्छित झाला. मूर्च्छित झालेल्या राक्षसाच्या पतनाघातानें भूमीवर प्रचंड ध्वनि झाला. ज्या अरण्यांत हा प्रकार घडून आला, तें अरण्य हेडंबा नांवाच्या राक्षसिणीचें होतें. तिला हा प्रकार समजतांच तीं धांवत आली, व आपला पुत्र घटोत्कच मूर्च्छित पडलेला पाहून ती मोठ्यानें आक्रोश करूं लागली. ती म्हणाली; "हे घटोत्कचा कोणी तुझीही अशी दशा केली? तुझा पिता भीम जर यावेळीं येथें असता तर तुला त्रास देणाऱ्या त्या दुष्टाला चांगलीच शिक्षा लाविली असती. पण तो पंडुकुमार प्राणनाथ भीम, वनवासांत असल्यामुळें माझा अगदीं नाइलाज झाला आहे. बाळा घटोत्कचा, सावध हो, सावध हो!" याप्रमाणें भीमाचें नांव पुन्हपुन्हा घेऊन ती हेडंबा घटोत्कचाला सावध करीत होती. भीमाचें नांव ऐकून सुभद्रेला फार आश्चर्य वाटलें, व ती हेडिंबे जवळ जाऊन म्हणाली; "बाई तूं भीमाचें नांव घेऊन शोक करतेस तेव्हां भीमाचा व तुझा काय संबंध आहे?" तेव्हां हेडंबेनें सुभद्रेला आपली सर्व

हकीकत सांगितली. ती ऐकून हेडंबा भीमाची स्त्री आहे असें सुभद्रेला कळून आलें आणि तिला तिजविषयीं सहानुभूति उत्पन्न झाली. मग तिनें योग्य उपचार करून घटोत्कचाला सावध केलें, व सुभद्रेनें त्या दोघांनां आपली सर्व हकीकत कळवून आपण वत्सलेस आणण्याकरितां जात आहों असें सांगितलें. तें ऐकून घटोत्कच व हेडंबा या दोघांनां फार आनंद झाला. नंतर घटोत्कच सुभद्रेला वंदन करून म्हणाला; "सुभद्रा मातोश्री, आपण या विवाहसंबंधानें काळजी करण्याचें मुळींच कारण नाहीं. आपण माझ्या घरीं दोन दिवस कृपाकरून रहा, व नंतर आपण द्वारकेस जाऊं. तोंपर्यंत मी माझें राक्षस सैन्य तयार करितों." घटोत्कचाची विनंति सुभद्रा व अभिमन्यु यांनीं मान्य केली व ते दोघेजण हेडंबेच्या घरीं दोन दिवस राहिले.

याप्रमाणें वैशंपायन ऋषि वत्सलाहरणाची कथा सांगत असतां जनमेजय राजा वैशंपायन ऋषीला म्हणाला; ऋषि, आपण देव व राजे यांचे वंशविस्तार कसे झाले तें मला सांगितलें; तसेंच राक्षसांचा वंशविस्तार भूतलावर कसा झाला तेवढें सांगावें. तेव्हां वैशंपायन ऋषि म्हणाले; "राजाजनमेजया कश्यपाची स्त्री जी दिती, तिच्यापासून राक्षसांची उत्पत्ति झालेली आहे. एकदां कश्यप ऋषि सायंकाळच्या वेळीं होम करीत असतां, ऋतुस्नात असलेल्या दितीला कामेच्छा उत्पन्न झाली. तेव्हां ती होमकुंडाजवळ आली व पतीला तिनें ती आपली इच्छा कळविली. तिचें तें चमत्कारिक भाषण ऐकून कश्यपऋषि म्हणाले; "भलत्याच वेळीं कामेच्छा होणें हें अत्यंत अनुचित होय. हें अनुचित कृत्य करण्यास मला तूं भाग पाडूं नयेस, अशी तुला माझी विनंती आहे." परंतु दितीला तें म्हणणें आवडलें नाहीं. ती म्हणाली; महाराज आपण माझे पति आहांत माझी इच्छा आपण पूर्ण न केल्यास भ्रूणहत्येचें पातक लागेल, याचा विचार करा. दितीनें असें सांगितल्यावर निरुपाय होऊन ऋषीनें तिला ऋतुदान दिलें. त्यायोगें दितीला अमळ नांवाचा असुरपुत्र झाला. पुढें त्या अमळ राक्षसापासून अश्वमुखी, खरमुखी, सुकरमुखी, अजामुखी, महिषमुखी, व हस्तीमुखी, असे राक्षस निर्माण झाले. नंतर त्या राक्षसांपासून निरनिराळे वंशविस्तार झाले. अश्वमुखीला ज्वाळासुर या नांवाचा पुत्र होता तो आदिमायेनें मारला. त्या ज्वाळासुराचा पुत्र लवणासुर होता त्याचा वध लक्ष्मीनें केला. लवणासुराचा पुत्र गद होता त्याला श्रीकृष्णानीं मुक्ति दिली. खरमुखी राक्षसाचा पुत्र हटासूर होता, व त्या हटासुराला, विराटसुर, तृणासुर, अघासुर, बकासुर, बाणासुर, धेनुकासुर, मायासुर, घाघासुर, व्योमासुर व पूतना अशीं मुलें होतीं. त्या सर्वांचा नाश प्रभूनीं कृष्णावतारांत केला. सूकर मुखीचा पुत्र अंधकासूर होता. त्या अंधकासुराला तारकासुर, शंबरासुर, मरीचि व सुबाहु असे चार पुत्र होते. यापैकीं तारकासुराचा वध स्वामी

कार्तिकानीं व शंबरासुराचा नाश मदनानें केला आहे. मरिचि व सुबाहु या दोघा राक्षसांनां श्रीरामचंद्रानीं मारलें. श्वानमुखीचा पुत्र कोल्हासुर होता, कोल्हासुराचा पुत्र मेंढासुर होता; व त्या मेंढासुराला महिषासुर, काळासुर, चक्षुषासुर, वामासुर, महावीर, देवाजित, हिमासुर, रक्तबीज, चंड व मुंड असे अकरा पुत्र होते. या सर्व राक्षसांचा व शुंभनिशुंभाचा नाश कालिकेनें केला. अजामुखी राक्षसाला धूम्रकेतु नांवाचा पुत्र होता. धूम्रकेतूचा पुत्र ताम्रकेतु, ताम्रकेतूचा पुत्र वज्रकेतु, वज्रकेतूचा पुत्र सुवज्रकेतु, व सुवज्रकेतूचा पुत्र वृषकेतु होय. जनमेजया, आतां तुला हस्तिमुखीचा वंश विस्तार सांगतों. हस्तिमुखीचा पुत्र धूम्रवज्र, धूम्रवज्राचा पुत्र ताम्रध्वज, ताम्रध्वजाला मयूरध्वज व तालध्वज असे दोन पुत्र होते. तालध्वजाला सुबाहु या नांवाचा पुत्र होता. सुबाहूला विचित्रवीर्य नांवाचा पुत्र व जरा या नांवाची कन्या होती. त्या जरा राक्षसिणीची हेडंबा ही पितृभगिनी असून घटोत्कच हा तिचा पुत्र होय.

ऋषि म्हणाले, राजाजनमेजया, याप्रमाणें या राक्षसांचा वंशविस्तार आहे. असो, घटोत्कचाची व अभिमन्यूची ओळख झाल्यावर घटोत्कचानें दोन अक्षौहिणी राक्षस सैन्य गोळा केलें, व तें सर्व सैन्य बरोबर घेऊन ते द्वारकेच्या मार्गाला लागले. इकडे द्वारकेमध्यें दुर्योधनादि कौरव अगोदरच आले होते, व सर्व द्वारका नगरींत वत्सलेच्या लग्नाची गडबड चालली होती. अशा वेळीं अभिमन्यूनें घटोत्कचाच्या सैन्याकडून सर्व द्वारकेला वेढा देवविला. ते लक्षावधि लोक पाहून द्वारकेंतील लोकांनां तें दुर्योधनाचेंच सैन्य आहे असें वाटलें, व त्यामुळें घटोत्कचाच्या सैन्याला बलरामाच्या दूतांनीं मुळींच आडकाठी केली नाहीं. राक्षस मायावी विद्येंत पूर्ण निष्णात असल्यामुळें त्यांच्यांतील हजारों राक्षसांनीं पीतांबर, शालु, शाली, रत्नहार, याप्रमाणें निरनिराळ्या वस्तूंचीं स्वरूपें घेतलीं. मग कित्येक राक्षस सौदागर झाले व त्या वस्तु घेऊन ज्या ठिकाणीं कौरव उतरले होते, त्या भागांत विकण्यासाठीं गेले, आणि जुनें द्यावें व नवें घेऊन जावें, असा त्यांनीं बाजारभाव ठरविला. कौरवांनां वाटलें, कीं हे व्यापारी नवीन असून दिवाळें काढण्यासाठीं व्यापार करीत आहेत, तेव्हां यांनां लुबाडण्यास कमी कां करा ? असा विचार करून सर्व कौरवांनीं आपलीं वस्त्रें व अलंकार त्या मायावी सौदागरांना देऊन त्यांच्या जवळच्या सुंदर वस्तु त्या ऐवजीं घेतल्या. याप्रमाणें वस्तुरूपी राक्षस कौरवांच्या अंगावर बसल्यावर त्यांचा शिरकाव थेट बलरामाच्या मंदिरांत होण्यास हरकत पडली नाहीं. इतकें कार्य झाल्यावर कित्येक राक्षसांनीं सुंदर व कुलीन स्त्रियांचीं रूपें धारण केलीं, व लग्नसाहित्य घेऊन त्या रूपधारी स्त्रिया बलरामाच्या स्त्रीकडे गेल्या, व तिला म्हणाल्या; "बाई, आम्हीं दुर्योधनाची स्त्री जी भानुमति तिच्या सख्या असून वत्सलेला नेण्यासाठीं आलों आहोंत. आमचा असा कुलाचार आहे कीं,

लग्नाचे आधीं मुलींची पूजा करावी. त्याकरितां मुलीला आमच्याबरोबर पाठवा. पूजा झाल्यावर तिला आम्हीं पोंहोंचतें करूं." त्या स्त्रियांचें तें भाषण बलरामाच्या स्त्रीला खरें वाटलें, व तिनें त्यांच्याबरोबर वत्सलेला पाठवून दिलें. याप्रमाणें वत्सलेची प्राप्ति झाल्यावर त्या स्त्रीरूपधारी राक्षसांनीं तिला आपल्या बिन्हाडीं आणलें व अभिमन्यूबरोबर तिचें लग्न लाविलें. अशाप्रकारें वत्सलेचें अभिमन्यूबरोबर लग्न लावल्यावर घटोत्कचानें वत्सलेसारखें रूप धारण केलें, व त्या खोट्या वत्सलेला पूर्वीच्या त्या मायावी स्त्रिया रेवतीकडे घेऊन गेल्या. रेवतीला ती आपलीच मुलगी वत्सला आहे, असें वाटलें. फलप्रदान, तेलफळ, रुखवत, वगैरे होऊन लग्नाची ऐन घटका जवळ आली; तेव्हां मुलीला थोडें खाऊं घालावें म्हणून रेवतीनें वत्सलेला पाकशाळेंत नेऊन जेवावयाला बसविलें. तेव्हां त्या मायावी वत्सलेनें सर्व स्वयंपाक खाऊन फस्त केला. भोजन झाल्यावर ती मायावी वत्सला पानावरून उठली व बोहल्यावर जाऊन उभी राहिली. ब्राह्मणांनीं मध्यें अंतरपाट धरून लक्ष्मणास आणून उभें केलें, व मंगलाष्टकें म्हणण्यास आरंभ केला. तेव्हां नवरामुलगा आपल्या स्त्रीला पाहून फारच भयभीत झाला. इतरांनां वत्सला सुस्वरूप दिसत होती, पण लक्ष्मणाला ती मोठ्या भयंकर राक्षसिणीप्रमाणें दिसत होती. तिचें तें भयंकर रूप पाहून शेवटीं तो फारच घाबरला, व मूर्च्छित होऊन बोहल्यावर धाडकन पडला. ऐन लग्नसमयीं हा असा अनर्थ झाल्यामुळें जिकडेतिकडे मोठा हाहा:कार उडाला, व शेंकडों लोक लक्ष्मणासभोंवती गोळा झाले. इतक्यांत घटोत्कचानें आपलें स्त्रीरूप टाकून भयंकर स्वरूप प्रकट केलें व मोठ्यानें गर्जना करून तो म्हणाला; "अरे दुष्टानों, माझा बंधु जो अभिमन्यु त्याची नवरी वत्सला तुम्हीं नेणार होतां, पण तिचें व अभिमन्यूचें केव्हांच लग्न होऊन चुकलें आहे. आतां वचनभंग केल्याबद्दल यादवांनां व तुम्हां कौरवांना मी चांगलीच शिक्षा लावतों." घटोत्कचाची गर्जना ऐकून सर्व कौरवांत एकच गडबड उडाली व ते सर्व त्या घटोत्कचावर शस्त्रास्त्रें घेऊन धांवले. इतक्यांत त्या ठिकाणीं सहस्रावधि राक्षस निर्माण झाले! कोणाच्या गळ्यांतला कंठा नाहींसा होऊन तेथें राक्षसनें त्याच्या गळ्याला मिठी मारली, तर कोठें कमरेचा पितांबर नाहींसा होऊन तेथें राक्षस उत्पन्न झाला व तो फरफरा पाय ओढूं लागला. कोठें रत्नमाळेचा राक्षस होऊन तो छातीवर बसला. असा प्रकार सुरू झाल्यामुळें कौरवांची दाणादाण झाली. वस्त्रांचे राक्षस झाले तेव्हां सर्व कौरव उघडे पडले. अशा स्थितींत राक्षसाशीं युद्ध करावें कीं अब्रूचें रक्षण करावें, याचें त्यांस कोडें पडलें. परंतु दुर्योधनानें तितक्यांत सैन्याची तयारी करून व बलरामाचें कांहीं सैन्य साह्यास घेऊन त्यानें घटोत्काचाबरोबर युद्ध सुरूं केलें; परंतु घटोत्कचाकडील सैन्य मायावी युद्धांत पूर्ण निपूण असल्यामुळें त्यानीं यादवांनां व कौरवांनां तेव्हांच जेरीस आणलें. इतक्यांत

श्रीकृष्ण बाहेर गांवीं गेले होते ते द्वारकेस परत आले; व तो विलक्षण प्रकार पाहून ते आश्चर्यचकित झाले. त्यांनीं हा काय प्रकार आहे, म्हणून बलरामाला विचारलें. तेव्हां बलरामानें श्रीकृष्णाला सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून श्रीकृष्ण म्हणाले, " दादा, आपण हें अगदीं अनुचित कृत्य केलेंत. वत्सला अभिमन्यूला देण्याचें ठरलें असून, तुम्ही ती दुर्योधनाचे मुलाला देण्याची विनाकारण खटपट केली. या वेळेस भीमार्जुन वनवासांत आहेत, हें एक प्रकारें बरें झालें, नाहींतर त्यांनीं या प्रसंगीं यादवांना व कौरवांना चांगलीच आठवण करून दिली असती. तथापि त्या लहान अभिमन्यूनें सुद्धां तुम्हां सर्वांनां चांगलाच हात दाखविला म्हणावयाचा. दादा, वत्सला तर अभिमन्यूला प्राप्त झालीच, पण सुभद्रेचा मात्र तुमच्यावर आतां शब्द राहील. म्हणून लवकर जा, व तिला आणि अभिमन्यूला समजावून आणा आणि वत्सलेचें व अभिमन्यूचें चांगल्या थाटानें लग्न करा. म्हणजे आपल्या बहिणीला फसविल्याच्या दोषांतून तुम्हीं मुक्त व्हाल. " श्रीकृष्णाचें म्हणणें बलरामाला रुचलें व त्यानें सुभद्रेला व अभिमन्यूला ससैन्य नगरांत मिरवीत आणून त्यांचा योग्य आदर सत्कार केला. नंतर अभिमन्यूबरोबर वत्सलेचा थाटानें विवाह करून नगरांत चार दिवस मोठा उत्सव केला.

सातवा स्तबक संपूर्ण.




**सूचना:**—पूर्वी प्रसिद्ध केल्याप्रमाणें तीन भागांत ,ह्या विराट ग्रंथाचा पूर्वार्ध वाचकांच्या सेवेंत हजर केला आहे. पुढील सात स्तबकांचा उत्तरार्ध लहानलहान भागानें प्रसिद्ध न करितां सबंध उत्तरार्ध एकच भागांत प्रसिद्ध करण्याविषयीं कित्येक हितचिंतक वाचकांकडून सूचना झाल्यामुळें पुढील सात स्तबकांचा उत्तरार्ध एकाच भागांत प्रसिद्ध करण्याचें आम्हीं ठरविलें आहे. उत्तरार्धाचा ग्रंथ पूर्वार्धासारखाच किंबहुना यापेक्षांहि थोडा मोठाच होईल, व तो सुमारें सात किंवा आठ महिन्यांच्या मुदतींत प्रसिद्ध करण्याचा आमचा विचार आहे.

प्रकाशक.

# उपसंहार.

ह्या ग्रंथाचा पूर्वार्ध येथें संपूर्ण झाला. हा पूर्वार्ध संपूर्ण करतांना कवि लिहितात, यांतील कथा वेगवेगळ्या पुराणांतून घेतल्या आहेत; परंतु त्यांत कांहीं हस्तदोष किंवा भाषादोष झाला असल्यास त्याबद्दल वांचकांनीं क्षमा करावी. ह्या विराट ग्रंथाचा कर्ता श्रीविष्णुभक्त कृष्णकवि हे होत. कौंडण्य, वसिष्ठ व मित्रावरूण ह्या तीन प्रवरांनींयुक्त अशा वशिष्ठगोत्रांत पिता अंबऋषि व माता कमळजा यांच्या उदरीं ह्या कवीचा जन्म झाला आहे, व श्रीनासीकक्षेत्रीं त्यांनीं हा पूर्वार्ध ग्रंथ पुरा केला आहे. ह्या पूर्वार्धांत आलेल्या सात स्तबकांतील अध्यायांची संख्या १२६ असून त्यांची एकंदर ओंवीसंख्या २०,०६८ आहे, आणि त्यांत पुढीलप्रमाणें वेगवेगळ्या कथा आल्या आहेत.

**स्तबक १**—अध्याय १–यांत मंगलाचरण असून महाराष्ट्रवाचकांकरितां, अनेक पुराणें, रामायण, भारत, भागवत इत्यादि संस्कृत ग्रंथांतील निवडक कथा या ग्रंथांत घेण्वाचा आपला हेतू कवीनीं दर्शविला आहे. दुसऱ्या अध्यायांत वज्र-नाभवरप्रदान, रोहिदाससंरक्षण कथा, सुशीलावरप्रदान, प्रभावतीस दुर्वासाचा आसिर्वाद याप्रमाणें कथा आहेत. तिसऱ्या अध्यायांत श्रीकृष्णसंवाद, हंसहंसीचें द्वारकेस गमन, प्रभावतीची वनक्रीडा इत्यादि कथा आहेत. चवथे अध्यायांत मदनदहन, शंबरउत्पत्ति, कृष्णतपाभिगन, श्रीकृष्णास पुत्रप्राप्ति, मदनाचें हरण, शंबरयुद्ध इत्यादि कथा आहेत. पांचवे अध्यायांत शर्मिष्ठादेवयानी कलह, कचोपाख्यान, ययातीस पुत्रांची प्राप्ति व ययातीचा पुत्रांस शाप इ. कथा आहेत. सहा व सात अध्यायांत बाणासुराची संपूर्ण कथा असून उखा व अनिरुद्ध यांच्या विवाहाची कथा आहे. अध्याय आठ, नऊ व दहा यांत नळराजाची संपूर्ण कथा आहे. अकराव्या अध्यायांत वसुदेवाचा यज्ञ, मदनसांबाचें वज्र-पुरीस गमन, रावणउर्वशीशापकथा, नलकुबेरकथा व मदन आणि प्रभावती यांची भेट, याप्रमाणें कथा आहेत. बाराव्या अध्यायांत लक्ष्मणाहरण, बलभद्र-पराक्रम, बुधोत्पत्ति, पुद्युम्नोत्पत्ति इत्यादि कथा आहेत. तेराव्या अध्यायांत मदन व वज्रनाभ यांचें युद्ध व वज्रनाभाचा मृत्यु हा कथाभाग आहे. चवदाव्या अध्यायांत मुसळगर्भकथा, यादवीकथा, जगन्नाथाची स्थापना इत्यादि कथा असून ह्या पहिल्या स्तबकाची एकंदर ओंवीसंख्या २६२५ आहे.

**स्तबक २**—अध्याय १–मंगलाचरण. अ. २–कंसउत्पत्ति, कृष्णजरासंध युद्ध, परशुराम व कृष्ण यांची भेट, सृगालवध, गोमंताचळकथा. अ. ३–कालयवन उत्पत्ति, द्वारकेची उत्पत्ति, मुचुकुंद पूर्वपीठिका, शण्मुख उत्पत्ति, पृथ्वीपार्वती-शापदानें. अ. ४–कुशमुरदैत्यवृत्तांत, त्रिविक्रमदुर्वासभेट, प्रल्हादपूर्वकथा, विरो-चनवृत्तांत, मोहनीरूपधारण. अ. ५–समुद्रमंथन, प्रवराम मधुमतीउत्पत्ति, सोमसवितातीर्थ, पारद उत्पत्ति, मोहनीविरोचन विवाह, बळी व वामन उत्पत्ति पूर्वपीठिका. अ. ६–बळीचा यज्ञ, गदासूरनिधन, नृगराजकथा. अ. ७–

दधिची अस्थि प्राप्ति, ब्रह्महत्याविभाग, इंद्रद्युम्नअगस्ति कथा, बळीवरुणशापबंधन. अ. ८–अंबरीष आख्यान, ब्रह्मदेवपंचमशीरच्छेदन, कपालेश्वरस्थापना. अ. ९–एकादशीव्रतकथा, रुक्मांगदमोहिनी कथा, आळिका कथा. अ. १०–सगराची उत्पत्ति, गंगा, वालखिल्य व गजानन यांची उत्पत्ति, गौतमचरित्र, कोटीतीर्थ-कुशावर्तांची उत्पत्ति, व गोदावैतरणीची उत्पत्ति. अ. ११–रेणुराज कथा, रेणुका उत्पत्ति, ऋचिकसत्यवती विवाह, जमदग्नी व विश्वामित्र यांची उत्पत्ति. अ. १२–परशुरामाची उत्पत्ति, सहस्रार्जुन चरित्र, रावण व सहस्रार्जुन यांचें युद्ध. अ. १३–आतापि, वातापि व इल्वल यांची कथा, म्लेंच्छादि उत्पत्ति, कालिंदु राक्षसाचा वध. अ. १४–परशुराम व अर्जुन युद्ध, यज्ञकरण वदोत्पत्ति, अजीगर्तशूनशेप कथा, त्रिशंकुराजाची कथा, मातृकाक्षेत्रमहिमा, वैतरणीतटनिवास. अ. १५–येळराजाचें चरित्र, विद्याधराची कथा, माणकावती चरित्र, माणकेश्वर उत्पत्ति, शिवभिल्ली आख्यान. अ. १६–येळा नदीची उत्पत्ति, घृष्णेश्वर, शिवलिंग पतन, द्वादशज्योतिर्लिंग, व काकवर्जवन. अ. १७–हयग्रीव अवतार, सूर्यमंडळ उत्पत्ति, बुद्ध अवतार, असुरयागकरण. याप्रमाणें ह्या दुसऱ्या स्तवकांत वेगवेगळ्या कथा असून ह्या दुसऱ्या स्तवकाची एकंदर ओंवीसंख्या २४३४ आहे.

स्तवक ३—अ. १–मंगलाचरण. अ. २–वाल्मिकनारद समागम, क्रौंचक्रौंची मरण, विभांडकशृंगी वृत्तांत, शृंगी व वाल्मिक यांची उत्पत्तिकथा. अ. ३–दशरथकन्याकथा, रामलक्ष्मण अवतरण. अ. ४–सीतापूर्वपीठिका, मानससरोवर कथा, सिद्धाश्रम कथा. अ. ५–कान्यकुब्जनामकारण, ब्रह्म, दत्त, गंगा, पार्वती व सगर यांची उत्पत्ति. अ. ६–यमुनावृत्तांत, शनीसुवर्णाकलह, अश्विनीकुमार उत्पत्ति, गंगायमुना संगम, अहिल्योद्धार. अ. ७–मरुतोत्पत्ति, त्रिशंकुराजाचें चरित्र, अंबरीष चरित्र, सूर्य व सोम वंशावळी, सीतास्वयंवर. अ. ८–दक्षकन्यांची वाटणी, दक्षयाग. अ. ९–दाक्षायणीदेहदहन, कोकिला उत्पत्ति, शिवगणयुद्ध. अ. १०–वीरभद्र अवतार, पूषाबंधन. अ. ११–दक्षयुद्ध, सकळदळसंजीवन कथा. अ. १२–प्रसूती सतीगमन कथा. अ. १३–शिखि मुनीची कथा, नंदीकेश्वराची कथा, सुनाभचक्र उत्पत्ति कथा. अ. १४–गरुडगर्वहरण, शिवमहिमा, दक्षसंजीवन. अ. १५–दक्षसंतति कथा, नारदशाप. अ. १६–व्याधी व औषधी यांची कथा, नागपंचमी कथा, एकवीर उत्पत्ति, शिभ्रीचें आख्यान. अ.१७–पुरुरवाच्या चौथ्या पौत्राची कथा,इंद्रकुमरी, एकवीर, सहस्रार्जुन आणि यांच्या कथा व चंद्रगुप्ता व धर्मपाळ विवाह. याप्रमाणें वेगवेगळ्या कथा या तिसऱ्या स्तवकांत आल्या असून त्याची ओंवीसंख्या ३१९१ आहे.

स्तवक ४—अ. १–मंगलाचरण. अ. २–वसुदेवदेवकी व नंदयशोदा पूर्वपीठिका, श्रीकृष्णजन्म. अ. ३–कृष्णलीला, अघासुरबघासुर वध, भक्तिज्ञान वेदांत. अ. ४–धेनुकासुर वध, सौभरीची कथा, कालियामर्दन, कात्यायनी व्रत. अ. ५–शेतकन्याची गोष्ट, इंद्रगर्वहरण, सुदर्शनगंधर्व कथा. अ. ६–अक्रूर-

लोकांची संगति ल       त्याला अनेक ६
खाणेंपिणें वगैरे . . . .हार करूं लागला.          .. ..
असतां, तो एकदां आपला कांहीं माल विकण्यासाठीं नर्मदेच्या क.
नगरांत गेला. तेथील लोक अत्यंत धर्मरत होते. त्या वेळीं कार्तिक ...
होता म्हणून शहरांत सर्वत्र प्रभूचें भजनपूजन चाललें होतें. शहरांतील व्यापाऱ्यांनीं धनेश्वरानें आणलेला माल दरदाम ठरवून घेतला व त्यास थोड्या वेळानें येऊन पैसा घेऊन जाण्यास सांगितलें. ठरल्याप्रमाणें धनेश्वर आपलें भोजन वगैरे आटोपून एका व्यापाऱ्याकडे पैसा मागण्यासाठीं गेला, परंतु तेथें श्रीहरीचें कीर्तन चालूं असल्यामुळें, त्यानें कीर्तन होईपर्यंत धनेश्वरास बसवून घेतलें व नंतर पैसा चुकता केला. दुसऱ्या व्यापाऱ्याकडे गेला तों तेथें प्रभूचें पुराण चाललें होतें. तें होईपर्यंत धनेश्वरास त्या व्यापाऱ्यानें बसण्यास सांगितलें, नंतर त्याचा हिशेब चुकता केला. याप्रमाणें कोठें भजन, कोठें पूजन, कोठें प्रभूचें पारणें, असे प्रकार चालूं असल्यामुळें पैसा मिळण्यास उशीर होऊन त्याला आपला सर्व पैसा भरून पावण्यास तीन दिवस लागले. अशा रीतीनें तो धनेश्वर महिकावतीस तीन दिवस राहिल्यामुळें त्याच्या कानावर प्रभूचें नांव अनायासें जात असे, परंतु त्याला त्या नामाचें किती माहात्म्य आहे याची मुळीं कल्पनाच नव्हती.

# कथाकल्पतरू.

## वेद, श्रुति, स्मृति, उपनिषद्, श्रीमद्भागवत, रामायण, महाभारत व अठरा पुराणें.—या अक्षय कीर्तिशाली सुमनोहर सुमनांनीं प्रफुल्लीत झालेल्या विराट ग्रंथाचें गोष्टीच्यारूपानें भाषांतर.

हिंदूंचें प्राचीन वाङ्मय म्हणजे एक विराट महासागर होय. या महासागरांत विहार करण्याची प्रत्येक सात्विक हिंदूची सदीच्छा असते. परंतु हल्लींच्या परिस्थितींत चार वेद, अठरा पुराणें, अनेक उपनिषदें, महाभारत, रामायण व भागवत या सर्वांचा संग्रह करणें व त्यांचा अभ्यास करणें, द्रव्य व आयुष्य या दृष्टीनें मोठें कठीण झालें आहे. शिवाय हे सर्व ग्रंथ संस्कृत भाषेंत असून ती भाषा दुर्बोध असल्यामुळें सहस्रावधी लोक इच्छा असूनही या अमूल्य रत्नभांडारापासून दूर राहिले आहेत. महाराष्ट्र भाषेंत यापैकीं, कांहीं थोड्या ग्रंथांचीं भाषांतरें झालीं असून कांहींचीं होत आहेत, तथापि हे ग्रंथही विलक्षण मोठे, पुष्कळ किंमतीचे व अपूर्णावस्थेंत असल्यामुळें, महाराष्ट्रांतील सर्व-साधारण जनसमूह या ज्ञानसागरांत विहार करण्यास सर्वतोपरी असमर्थ झाला आहे. समाज, वाङ्मय व राष्ट्र या दृष्टीनें ही खरोखर मोठी उणीव आहे. ती यथाशक्त्या भरून काढावी या हेतूनें आम्ही हा प्रयत्न चालू केला आहे.

महाराष्ट्रांतील प्रसिद्ध श्रीकृष्ण व मधुकर या कवीद्वयांनीं अविश्रांत परिश्रम करून '**कथाकल्पतरू**' या नावाचा प्राकृत ओवीबद्ध ग्रंथ लिहिलेला आहे. या ग्रंथांत वेद, वेदांग, उपनिषदें, रामायण, भारत व भागवत या संस्कृत ग्रंथांतील संपूर्ण कथा व उपकथा आलेल्या आहेत. हा ग्रंथ फार मोठा असून त्याची किंमतहि फार जबर आहे. त्यामुळें त्याचा लाभ सर्वांस घेतां येत नाहीं. ही अडचण दूर व्हावी आणि आबालवृद्ध मराठी वाचकांस सुलभ रीतीनें त्याचा लाभ घेतां यावा, म्हणून सरळ गोष्टीच्या रूपानें त्याचें हें भाषांतर छापण्याचा क्रम सुरू केला आहे. प्रत्येक हिंदू बंधु भगिनींनां हा ग्रंथ अत्यंत आवडता व्हावा अशाच योजनेनें भाषांतराची भाषा आबालवृद्धांनां समजण्यासारखी साधी, गोड व मुळास धरून ठेविली आहे.

कथाकल्पतरू ग्रंथांत अडीचशें मुख्य कथा असून एक हजारांवर उपकथा आहेत. सारांश, वेद, वेदांग व उपनिषद या सर्वांचें सार संकलन केलेलें असून अठरा पुराणें व रामायण, भारतादि ग्रंथांतील सर्व कथा संगतीनें यांत आल्या आहेत. भागवत म्हणजे वैष्णवांचें परम आदरणीय रत्न, त्या कठीण भाग-वतांतील सृष्टितत्व, ईश्वरतत्व, वगैरे रहस्यजनक कथा [illegible] भाषेंत या

ग्रंथांत गोंविल्या आहेत. भूत, भविष्य व वर्तमान या तिन्हीं कालांचा यांत विचार केलेला आहे. तसेंच जरा, मृत्यु, भय, भाव, अभाव वगैरे विषयीं सोपपत्तिक निर्णय या ग्रंथांत केलेला आहे. विविध प्रकारचे धर्म व आश्रम याविषयीं या ग्रंथांत सांगोपांग विचार केलेला आहे. त्याप्रमाणें चातुवर्ण्यव्यवस्था, तप, ब्रम्हचर्य, पृथ्वी, चंद्र, सूर्य, तारे, ग्रह, नक्षत्रें, वगैरे संबंधानें संपूर्ण माहिती यांत आहे. विश्वोत्पत्तीविषयीं सर्व कथांचा यांत संग्रह केलेला आहे. मोठ्या कष्टानेंहि जे गुह्यविषय ऐकावयाला मिळत नाहींत, ते यांत सुगमतेनें पहावयाला मिळतात. परमेश्वराच्या विराट व सूक्ष्म स्वरूपाचें विवेचन यांत फार सोप्या शब्दानें केलेलें आहे. भगवंताच्या मनुष्य व पशु अवतारांविषयीं ज्या अनेक कुकल्पना पसरलेल्या आहेत, त्या कुकल्पना या ग्रंथांतील अवतार मिमांसा वाचून खातरीनें नाहींशा होतील. पृथ्वीवरील प्रेक्षणीय पवित्र व प्रसिद्ध अशीं तीर्थें, देवालयें, नद्या, पर्वत, समुद्र, अरण्यें, उपवनें व शहरें या सर्वांविषयीं या ग्रंथांत अनेक कथा आलेल्या आहेत. तसेंच युद्धतत्व, जातीतत्व व लोकतत्व याविषयींहि यांत अनेक कथांचा संग्रह केलेला आहे. आणि आबालवृद्धांना सारखा आनंद होईल अशा अनेक राजांच्या, साधूंच्या व साध्वी स्त्रियांच्या हजारों कथा यांत आल्या आहेत.

या विराट ग्रंथाचे १४ स्तबक असून त्याची किंमत २० रुपये आहे. परंतु त्याचा लाभ मराठी भाषा जाणणाऱ्या अबालवृद्ध स्त्रीपुरुषांस अल्प किंमतींत आणि सुलभ रीतीनें घेतां यावा, ह्मणून दोन दोन स्तबकांचा एकेक भाग याप्रमाणे ७ भागांत हा ग्रंथ एक वर्षाचे मुदतींत प्रसिद्ध करण्याचें आह्मी योजिलें आहे हल्लीं याचा पहिला भाग छापून तयार आहे. यांत पहिले दोन स्तबक सरळ गोष्टीच्या रूपानें आले आहेत. टाइप चांगला सुबक घेतला असून कागदहं ग्लेज वापरला आहे. प्रत्येक भागाची किंमत एक रुपया ठेविली आहे. परं सातही भागाकरितां आज वर्गणीदार होणारास हा समग्र ग्रंथ फक्त ५ रुपयां देण्याची योजना केलेली आहे. सर्व ग्रंथाकरितां वर्गणीदार होणारास प्रथमतः दो रुपये भरून आपलें नांव रजिस्टरांत नोंधविलें पाहिजे. नांव दाखल होतां वर्गणीदारास पहिला भाग मिळेल. पुढें बाकी राहिलेले सहा भाग जसजसे तया होतील तसतसे दरेक भागाबद्दल फक्त आठ आणे घेऊन दिले जातील. बाहेर गांवचे लोकांस टपाल व व्ही. पी. खर्च वेगळा पडेल. पांच रुपयासारख्या अल्प किंमतींत पुस्तक रूपानें मिळणारा हा लाभ मराठी वाचक अवश्य घेती आणि या अपूर्व ग्रंथाचा संग्रह करतील अशी आशा आहे.

**दामोदर सावळाराम आणि मंडळी**

**ठाकुरद्वार-मुंबई**